# भाग पांचवा

## म ते विठ्ठल सुंदर

संपादक:

यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्‌एल्. बी.

चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

संपादक—ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश, शास्त्रीय परिभाषाकोश, इत्यादि.

१० डिसेंबर १९५०

किंमत २५ रुपये

# ५

# भारतीय व चिनी संस्कृति-विकास

## पूर्वावलोकन—

आतांपर्यंत आपण या विश्वविकासाच्या इतिहासामध्यें प्रथम या विश्वाची उत्पत्ति एकंदर विश्वसंस्थेंतून कशी झाली व त्यांतून आपल्या या सृष्टीची उत्पत्ति होऊन पृथ्वीवर जलस्थलादि कशीं उत्पन्न झालीं व पृथ्वीवर निरनिराळ्या वनस्पती व प्राणी कसे विकास पावले ह्याचा इतिहास थोडक्यांत सांगून ह्या पृथ्वीवर मानवप्राणी कसा उत्पन्न झाला व त्याचा ह्या पृथ्वीवरील निरनिराळ्या प्रदेशांत प्रसार कसकसा होत गेला, व त्यानें निर्माण केलेल्या ह्या पृथ्वीवरील प्रदेशांतील भिन्न भिन्न संस्कृती निरनिराळ्या काळीं कशा विकास पावल्या ह्याचें वर्णन थोडक्यांत केलें. या निरनिराळ्या संस्कृतींचें संवर्धन भिन्न भिन्न प्रदेशांत तेथील भौगोलिक व प्रादेशिक परिस्थितीमुळें निरनिराळ्या अंगांनीं कसकसें होत गेलें ह्याचेंहि वर्णन थोडक्यांत करण्यांत आलें. कोणत्याहि विशिष्ट संस्कृतीचा विकास तेथील भौगोलिक व हवामानाच्या परिस्थितीवर अवलंबून असतो. मानवाचा आयुष्यक्रम सभोंवतालच्या परिस्थितीशीं अनुरूप विकास पावत असतो. त्यामुळें निरनिराळ्या प्रदेशांतील संस्कृतीचा विकासकाळ व विकासस्वरूप ह्यांमध्येंहि फरक असतो व आजहि आपणांस जगामध्यें ज्या भिन्न भिन्न मानवाच्या सांस्कृतिक अवस्था आढळून येतात त्यांचेंहि कारण सभोंवतालची भिन्न भिन्न परिस्थिति, हवामान व दळणवळणाचीं साधनें ह्याच गोष्टी होत.

आतांपर्यंत आपण ज्या संस्कृतींच्या विकासाचें अवलोकन केलें त्या बहुतेक आशिया खंडाचा पश्चिम भाग व त्याच्याहि पलीकडील पश्चिमेकडील प्रदेश ह्यांत विकास पावलेल्या होत्या. आतां आपणांस आशिया खंडाचा पूर्वेकडील भाग विशेषतः अवलोकनांत घ्यावयाचा आहे. पूर्वी सांगितलेंच आहे कीं, मनुष्यप्राण्याचा प्रथम विकास कोठें झाला ह्याबद्दल जरी अनेक मतें असलीं तरी सामान्यतः मध्य आशियाचें पठार ही भूमि एके काळीं मानवविकासास अत्यंत अनुकूल अशी होती आणि तेथेंच आद्य मानवाचा विकास झाला असावा, व तेथून तो निरनिराळ्या प्रदेशांत भिन्न भिन्न सांस्कृतिक अवस्थांत भ्रमण करीत अनेक प्रदेशांत जाऊन स्थायिक झाला असावा, व तेथील स्थानिक परिस्थितीमुळें त्याच्या शारीरिक रचनेमध्यें व बौद्धिक वाढीमध्यें फरक होत गेला असावा व त्यामुळें त्याचे निरनिराळे मानववंश बनत गेले असावे.

आतांपर्यंत आपण भिन्न भिन्न मानववंशाच्या संस्कृतीचें अवलोकन केलें. त्यांत सरतेशेवटीं आर्य म्हणून ज्ञात असलेल्या मानववंशाच्या पश्चिमेकडील महत्त्वाच्या अशा ग्रीक व रोमन ह्या शाखांच्या संस्कृतीचें वर्णन करण्यांत आलें आहे, व ह्या भागांत आपण आर्य मानववंशाची जी शाखा पूर्वेकडे भ्रमण करीत गेली तिचें वर्णन करणार आहोंत. या आर्य मानववंशाचा आज जगांत सर्वत्र प्रसार झाला आहे, व बुद्धीनें व कर्तबगारीनें तो आज सर्वश्रेष्ठ ठरला आहे. त्याच्या निरनिराळ्या शाखा आज जगावर पसरलेल्या असून त्यांनीं आपल्या संस्कृतींत पुष्कळच वाढ केली आहे. या भिन्न भिन्न शाखांचे पूर्वज पूर्वी अत्यंत प्राचीन काळांत कोठें तरी एकत्र राहत असावे याबद्दल आतां सर्वत्र एकमत आढळून येतें. याचें गमक म्हणून ह्या आर्य वंशाच्या ज्या निरनिराळ्या शाखा आहेत, त्यांच्या भाषांमध्यें असलेलें व स्पष्टपणें प्रतीत होणारें साम्य हें होय. या आर्य वंशाच्या पश्चिमेकडील शाखांच्या ज्या ग्रीक, लॅटिन, लिथुआनियन, वगैरे भाषा आहेत. त्यांमध्यें आणि पूर्वेकडील अवेस्ता, फारशी व संस्कृत या भाषांमध्यें उघड उघड सदृश रूपें आढळतात व त्यावरून या भाषा बोलणाऱ्या लोकांचे पूर्वज पूर्वी कोठें तरी एकाच स्थळीं राहत असत व त्यांचा आयुष्यक्रमहि सारखाच असावा असें अनुमान सर्व विद्वान् भाषाशास्त्रज्ञ काढीत असतात. तेव्हां आपणांस भारतीय आर्यांच्या पूर्वजांचें मूलस्थान कोठें होतें व तेथील त्यांचा आयुष्यक्रम कसा होता किंवा, त्यांचा सांस्कृतिक विकास कोठपर्यंत झाला होता ह्याचें अवलोकन करणें इष्ट आहे. कारण यापासून आपणांस भारतीय संस्कृतीचा विकास कसकसा होत गेला हें सुसूत्र रीतीनें आकलन करितां येणार आहे. ह्याकरितां आपण मूलगृहकालीन आर्य संस्कृतीचें थोडेसें अवलोकन करूं.

## आर्यांचा मूलगृहकालीन आयुष्यक्रम—

या मूलगृहकालीन संस्कृतीचें अवलोकन करावयाचें म्हणजे आपणांस तत्कालीन आर्यांच्या भाषेचें ज्ञान कितपत विकास पावलें होतें, याच केवळ एकाच गोष्टीवरून अनुमान काढतां येण्यासारखें आहे व याकरितां वर सांगितलेल्या आर्यांच्या भाषांचा भाषाशास्त्रज्ञांनीं तौलनिक पद्धतीनें अभ्यास करून कांहीं अनुमानें काढलीं आहेत. त्यांवरच आपणांस आज भिस्त ठेवावी लागत आहे. भाषाशास्त्राबरोबर प्राचीन कालच्या आयुष्यक्रमाच्या अभ्यासाचें क्षेत्र जसजसें वाढत जाईल तसतसा ह्या अनुमानास अधिक अधिक आधार मिळत जाईल किंवा त्यांत अधिक अधिक बदल होत जाईल हें उघड आहे. भाषेखेरीज मूलगृहकालीन मानव-चरित्राचे बोधक अवशेष आजपर्यंत कोठें उपलब्ध झालेले नाहींत, जर ते अद्यापि यापुढें एखाद्या उत्खननांत उपलब्ध झाले तर आपल्या अनुमानास त्यामुळें बळकटी येण्याचा संभव आहे.

आर्यांच्या मूलगृहामध्यें ज्या वेळीं त्यांची वस्ती होती त्या वेळीं त्यांचा आयुष्यक्रम कसा असावा ह्यासंबंधीं अभ्यासकांनीं जें संशोधन केलें आहे त्याचा निष्कर्ष थोडक्यांत पुढीलप्रमाणें मांडतां येईल.

## आर्य कुटुंबसंस्था—

तत्कालीन आर्यांच्या कुटुंबाचा विस्तार पाहिल्यास आपणांस वर सांगितल्याप्रमाणें जीं भाषासाम्यें किंवा शब्दसाम्यें आढळून येतात त्यांवरून पुढील अनुमानें शास्त्रज्ञांनीं काढलेलीं आहेत: आर्य कुलांतील बहुतेक भाषांत पितृवाचक, भ्रातृवाचक, पुत्रवाचक, कन्यावाचक व मातृवाचक आणि स्वसृवाचक शब्द सदृश स्वरूपांत आढळतात. त्यांवरून इतक्या मंडळीचें मिळून एक कुटुंब होत असावें असें वाटतें. पितृव्य अथवा चुलता व नातू यांचे वाचक शब्दहि समान आढळतात. तसेंच स्नुषावाचक शब्दहि बहुतेक भाषांत एकच आहेत. त्यावरून तत्कालीन कुटुंबाची मर्यादा लक्षांत येते. पिता, पुत्र, बंधु, भगिनी, स्नुषा, वगैरे इतकी मंडळी त्या वेळीं कुटुंबांत एकत्र राहत असली पाहिजेत. तसेंच विवाहित स्त्रीहि आपल्या पतीच्या व सासऱ्याच्या कुटुंबांत राहत असावी असें दिसतें. म्हणजे अर्थात् हें कुटुंब पितृसत्ताक पद्धतीचें होतें. हे लोक घरें करून राहत असत ही गोष्ट दम ह्या शब्दाच्या इतर भाषांतील तदर्थवाचक शब्दांशीं असलेल्या सादृश्यावरून दिसून येते. हे लोक वस्त्राकरितां जरी कातडीं वापरीत असत तरी वस्त्रें विणण्याची कला त्यांच्यामध्यें वाढीस लागली होती ही गोष्ट विणणें ह्या धातूच्या सदृश शब्दांवरून सिद्ध होते. हे लोक अन्न शिजवून खात असत ही गोष्ट भाजणें ह्या शब्दाशीं असलेल्या सदृश शब्दांवरून उघड होते. या लोकांस प्रथम उन्हाळा व हिंवाळा हे दोनच ऋतू माहीत असावे. पुढें पावसाळा माहीत झाला. शतपथ ब्राह्मणांत तीन ऋतू, पांच ऋतू व सहा ऋतू असे उल्लेख आहेत. ह्यावरून त्यास आजच्या ऋतूंची माहिती हळूहळू झाली असावी असें दिसतें. त्यांच्या कालगणनेंत चांद्रमास व सौरवर्ष हें माहीत असून त्या दोघांचा मेळ घालणें ही गोष्टहि माहीत होती हें अधिकमासाच्या उल्लेखावरून स्पष्ट होतें.

## प्राचीन ज्ञात प्राणी—

या लोकांस माहीत असलेले प्राणी म्हणजे कुत्रा, लांडगा, अस्वल, कोल्हा, उंदीर, ससा, इत्यादि प्राणी त्यांस परिचित असावे असें त्या लोकांतील शब्दसाम्याच्या कल्पनेवरून दिसून येतें. सिंह, हत्ती, माकड, वगैरे प्राण्यांचे उल्लेख जरी ऋग्वेदांत आढळत असले तरी तत्सदृश शब्द पश्चिमेकडील आर्यसंभव भाषांत आढळत नाहींत. यावरून हे प्राणी त्यांस मूलगृहांतून निघून गेल्यावर मागाहून, ज्ञात झाले असावे. वाघ ह्या शब्दाचा उल्लेख प्रथम अथर्ववेदांत आढळतो. त्या काळांत शेतीची वाढ बरीच झाली असून तत्कालीन लोकांची उपजीविका मुख्यतः शेतीवरच होत असावी. शिकार करणें हें गौण समजलें जात असावें असें दिसतें, कारण शिकारींत मारलेले प्राणी देवास अर्पण करण्यांत येत नसत. पक्ष्यांपैकीं उलूक, कोकिळा, कृकवाकु व तित्तिरी ह्या पक्ष्यांचे वाचक शब्द निरनिराळ्या भाषांत आढळतात. ह्यावरून हे पक्षी त्यांस माहीत असावे असें दिसतें. कपोत हा पक्षी बराच परिचित असावा. तसेंच पक्ष्यांवरून शुभाशुभ शकुन मानण्याची प्रवृत्ति त्या वेळीं वाढली असावी असें दिसतें. एवढेंच नव्हे तर शकुन हा शब्दच पक्षिवाचक आहे. पक्ष्यांचें मांस खाण्याची प्रथा फारशी नसावी. कारण प्रमुख यज्ञीय बलींमध्यें पशूंप्रमाणें पक्ष्यांची गणना केलेली आढळत नाहीं.

पाळीव जनावरांपैकीं अश्व, वृषभ हे प्राणी सर्वत्र आढळतात. तसेंच कळपवाचक शब्दहि सारखेच दिसून येतात. आर्य लोकांच्या पश्चिमेकडे गेलेल्या शाखेस उष्ट्र हा प्राणी माहीत नव्हता, पण पर्शु-भारतीय लोकांस खर व उष्ट्र प्राणी परिचित होते. मांजर हा प्राणी उत्तरकाळीं माहीत झाला असावा.

## प्राचीन वृक्ष व वनस्पती—

प्राण्यांप्रमाणें वनस्पतींचें ज्ञान तत्कालीन लोकांस किती होतें याचा अंदाज घ्यावयाचा झाल्यास आपणांस असें दिसतें कीं, दारु म्हणजे लांकूड अथवा वृक्षवाचक शब्द आपणांस सर्व भाषांत आढळून येतो. तसेंच भूर्ज हा शब्द सर्व भाषांत परिचित दिसतो;

परंतु ओक हा वृक्ष त्यास तेव्हां माहीत नसावा. मूलगृहकालीं आर्यांमध्यें शेतीचें काम बरेंच वाढलें असावें. यव, सस्य, कर्पू, गोधूम, उर्वरा, वगैरे शब्दांशीं सदृश शब्दांवरून पर्शु-भारतीय लोकांस कृषिविद्येचें ज्ञान बरेंच झालें होतें, परंतु पाश्चात्य लोकांमध्यें तें बऱ्याच उशीरा झालें असावें असें दिसतें; कारण वरील शब्दांस त्यांच्या भाषेंतून सदृश शब्द आढळत नाहींत.

आर्यांचें मूलगृहकालीन वास्तव्य अत्यंत दीर्घ कालापूर्वींचें असल्यामुळें व त्यानंतर सृष्टीमध्यें अनेक घडामोडी होऊन गेल्या असल्यामुळें व आज तर आर्यांच्या मूलगृहाच्या ठिकाणीं मानवाची वस्ती फारच तुरळक असल्यामुळें व तीहि सतत नसल्यामुळें मानवांच्या मूलगृहकालीन आयुष्यक्रमासंबंधीं सुसंगत कल्पना देणें आज अशक्य झालें आहे व या बाबतींत केवळ आर्यांची भाषा हेंच साधन उरलें आहे व तींतहि त्यांच्या परिभ्रमणांबरोबर निरनिराळे शाखाभेद व रूपांतरें होत गेल्यामुळें केवळ अनुमानांवर भिस्त ठेवावी लागते व निरनिराळ्या पंडितांनीं काढलेल्या अनुमानांतहि पुष्कळच फरक आढळून येतो. यामुळें तत्कालीन आयुष्यक्रमाची केवळ स्थूल कल्पना येण्याकरितां वरील शब्दसाम्यावरून जेवढ्या कल्पना देतां आल्या तेवढ्याच देण्यांत आल्या आहेत. या बाबतींत अनेक दिशांनीं संशोधन होण्याची आवश्यकता आहे. ज्याप्रमाणें मोहनजोदरो येथील उत्खननांत एका प्राचीन असुर वसाहतीचे अवशेष आढळून आले तसे जर मध्य आशियामध्यें एखाद्या उत्खननांत अत्यंत प्राचीन कालचे अवशेष प्रत्यक्ष आपणांस उपलब्ध झाले तर तत्कालीन लोकांच्या आयुष्यक्रमाचें चित्र आपणांस अधिक स्पष्ट रीतीनें रंगवितां येईल व ज्याप्रमाणें कांहीं नष्ट प्राण्यांचे पूर्वज आपणांस बर्फांत पुरलेले आढळून आले आहेत त्याप्रमाणें असे अवशेष सांपडणें केवळ अशक्य आहे असें नाहीं.

## आर्यांचें भ्रमण—

या मूलगृहापासून तेथें झालेल्या हिमप्रलयामुळें व हवामानांत होत गेलेल्या प्रतिकूल फरकामुळें आर्य लोक निरनिराळ्या दिशांनीं भक्ष्य व योग्य हवामानाची परिस्थिति यांच्या शोधार्थ व वस्ती करण्याकरितां भ्रमण करीत गेले. अर्थात् यामुळें त्यांच्या भाषांत व राहणींत फरक पडत जाऊन त्यांच्या निरनिराळ्या शाखा पडल्या. त्यांची एक शाखा पश्चिमेकडे व दक्षिण दिशेच्या रोखानें भ्रमण करीत गेली तीमध्यें हिटाइट व बहुधा हिक्सॉस् हे लोक असावेत. ज्यांस असुर अशी संज्ञा मिळाली तेहि लोक कदाचित् यांपैकींच असून त्यांच्यापूर्वींच दक्षिणेस आले असावे; कारण वैदिक वाङ्मयांत असुर शब्द प्रथम बलवान्, सामर्थ्यवान् या अर्थानें वापरण्यात आलेला आहे व पुढें असुर शब्द हा शत्रुवाचक बनला. ईजिप्तमधील किंवा इतर प्रदेशांतील मानवहि अत्यंत प्राचीन काळीं त्याच मूलस्थानापासून भ्रमण करीत आले असावे.

या सर्वांची माहिती यापूर्वी देण्यात आली आहे. आर्यांचीच दुसरी एक शाखा जी दक्षिण पूर्वेकडे भ्रमण करीत गेली तिच्या पर्शु-भारतीय व भारतीय अशा दोन शाखा पडल्या. त्यांपैकीं पर्शु-भारतीय लोक इराण देशांत प्रथम स्थायिक होऊन राहिले. इराण हा शब्दहि आर्यन अथवा आर्य शब्दापासून निघालेला आहे. आज ज्यास अझरबैजन असें संबोधण्यांत येतें त्यास पूर्वी अर्यनवेजो असें म्हणत असत. हे इराणी लोक जी अवेस्ता नांवाची भाषा बोलत व ज्या भाषेंत त्यांचें अत्यंत प्राचीन वाङ्मय ग्रथित केलेलें आहे, त्या भाषेचें वैदिक संस्कृत भाषेशीं अत्यंत निकट साम्य आहे. तसेंच भारतीय आर्यांप्रमाणेंच त्यांच्यामध्यें यज्ञसंस्थेचा विकास झालेला होता. मात्र त्यांचा यज्ञ हा केवळ सोमसंस्थारूप होता व ते लवकरच कृषिप्रधान आयुष्यक्रम आचरूं लागल्यामुळें त्यांच्यामध्यें पशुयज्ञ प्रचलित राहिला नाहीं. या इराणी लोकांमध्यें जीं दोन मोठीं साम्राज्यें विकास पावलीं त्यांची माहिती मागील विभागांत दिलीच आहे. आतां आपणांस आर्यांची जी दुसरी शाखा पूर्वेकडे भ्रमण करीत जाऊन भरतखंडांत स्थायिक झाली तिच्या आयुष्यक्रमाचें वर्णन करावयाचें आहे.

## वैदिक वाङ्मयाचें महत्त्व—

मूलगृहापासून भरतखंडापर्यंतच्या या दीर्घ प्रवासास आर्य लोकांस बराच दीर्घ काल लागला यांत शंका नाहीं. तथापि या दीर्घ कालांतील स्मृती ह्या आर्य लोकांनीं आपल्या वैदिक मंत्रांत कायमच्या ग्रथित करून ठेवल्यामुळें आपणांस त्यांचें आजहि ज्ञान करून घेणें शक्य झालें आहे. या आर्यांनीं रचलेलें वैदिक वाङ्मय हें जगांतील अत्यंत प्राचीन वाङ्मय होय. जरी तें लिखित स्वरूपांत येण्यास बराच दीर्घ काल लागला तरी तोंडी परंपरेनें तें अबाधित रूपानें फार प्राचीन कालापासून चालत आलें आहे, ह्यांत संशय नाहीं. या वैदिक वाङ्मयावरूनच आपणांस प्राचीन आयुष्यक्रमाचें व संस्कृतीचें ज्ञान करून घेणें शक्य झालें आहे. या वेदमंत्रांची रचना फार दीर्घ कालपर्यंत होत गेली असल्यामुळें त्यांतील कांहीं मंत्रांत केवळ प्राचीन स्मृतींचें वर्णन केलेलें आढळतें अथवा प्राचीन दृश्यें चित्रित केलेलीं आढळतात. आणि कांहीं ठिकाणीं तर प्राचीन लोकांचे विचार प्रदर्शित केलेले दिसतात. उलट कांहीं मंत्रांवरून तत्कालीन वर्तमान स्थितीचा बोध होतो. हीं वैदिक सूक्तें प्रथम कांहीं कुटुंबांत पृथक्पणें वंशपरंपरेनें प्रचलित होतीं.

यांसच गोत्र-मंडळें अशी संज्ञा होती. कांहीं सूक्तें तर कांहीं विशिष्ट देवतांच्या उपासनेच्या निमित्तानें निर्माण झालीं असावींत. कांहीं सूक्तें तर द्यूतकार सूक्ताप्रमाणें प्रचलित आयुष्य-क्रमाचें वर्णन करीत असलेलीं उघडपणें दिसून येतात. कांहीं सूक्तांत संवादरूपानें प्राचीन कथांचें अथवा प्रसंगांचें वर्णन केलेलें आढळतें. अशा तऱ्हेनें या वैदिक वाङ्मयाचा विकास दीर्घ कालामध्यें झालेला असून त्याचा संग्रह अथवा संहिती-करणहि दोन-तीन टप्प्यांनीं होत गेलें असावें असें वाटतें.

या वाङ्मयावरून आर्यांचें भरतखंडांत जें आगमन झालें तेंहि एका कालीं झालें नसून त्यांचे निरनिराळे समाज अथवा टोळया निरनिराळया वेळीं या प्रदेशांत प्रवेश करून राहिल्या असाव्या असें दिसतें. अर्थात् अशा वेळीं मागाहून येणाऱ्या टोळीनें प्रथम वसाहत केलेल्या टोळीशीं संग्राम करून तिला पुढें लोटून तिचें स्थान घेतलें असावें हें उघड आहे व अशा तऱ्हेच्या संघर्षाचें वर्णन ऋग्वेदादि ग्रंथांत केलेलें आढळतें.

### प्राचीन आर्यकुल—

भरतखंडामध्यें प्रवेश करणाऱ्या या आर्यांमध्यें पुरु अथवा भरत हें कुल विशेष प्रामुख्यानें दृष्टीस पडतें. दाशराज्ञ युद्धामध्यें सुदास हा भरतांचा राजा प्रमुख होता व पुढें महा-भारतांत प्रसिद्धीस आलेले कौरव व पांडवहि याच पौरव व भरत कुलांतील होते.

याप्रमाणें आर्य लोकांनीं निरनिराळया वेळीं येऊन भरत-खंडांत वस्ती केली, परंतु हे आर्य लोक ज्या वेळीं प्रथम या प्रदे-शांत आले तेव्हां हा प्रदेश कांहीं निर्जन होता असें नव्हे, तर ते येण्याच्या पूर्वीं या प्रदेशांत बऱ्याच दीर्घ काळपर्यंत मानववस्ती झाली असून त्यांची विशिष्ट संस्कृतिहि विकास पावली होती.

### भरतखंडाची भौगोलिक रचना—

वास्तविक भूस्तरशास्त्रदृष्टया भरतखंड हा एक अत्यंत प्राचीन कालापासून अस्तित्वांत आलेला प्रदेश असून त्यामध्ये भौगोलिक स्थित्यंतरें अनेकदां घडून आलेलीं आहेत व त्यामध्यें मानववस्तीहि फार प्राचीन कालापासून असल्याचीं चिन्हें दृष्टीस पडतात. भरतखंडाची भौगोलिक रचना पाहूं जातां असें दिसतें कीं, त्याचा पृष्ठभाग आज ज्या स्थितींत आहे तसा तो प्राचीन कालीं नसून त्याचें स्वरूप निराळया प्रकारचें असावें. भरतखंडामध्यें अरवली पर्वतापासून दक्षिणेकडे सह्य पर्व-ताच्या दक्षिण टोंकापर्यंत एक सलग पर्वताची रांग असून तो या भरतखंडाचा कणा होता. कच्छच्या रणापासून पूर्वेकडे पसर-लेला एक मोठा समुद्र होता. अति उंच हिमालय पर्वत त्या कालीं अस्तित्वांत नव्हता. परंतु भूगोलाच्या आंदोलनामुळें हिमालय पर्वत उत्पन्न होऊन तो उंचीमध्यें सतत वाढत राहिला आणि अद्यापहि त्याची वाढ खुंटली आहे असें म्हणवत नाहीं. नुकत्याच आसाम प्रांतांत झालेल्या भयानक भूकंपाचें कारणहि हिमालय पर्वताच्या पायाशीं असणाऱ्या भूप्रदेशाच्या दाबामुळें हिमालय पर्वत अधिक उंच रेटला जात आहे हेंच आहे. हिमालय पर्वताचें अत्युच्च शिखर जें एव्हरेस्ट अथवा गौरीशंकर तें प्रथम ज्ञात झालें तेव्हां त्याची उंची २९,००२ फूट होती ती आतां दोनशें फुटांनीं वाढली आहे हें त्रिकोणमितीच्या गणितानें सिद्ध झालें आहे. हिमालय पर्वताबरोबरच काश्मीर-मध्यें पूर्वीं एक नैसर्गिक तलाव होता. त्याचा नैसर्गिक बांध फुटून गेल्यामुळें पाणी वाहून जाऊन त्याचा तळ उघडा पडला व तेथें सुपीक जमीन व नंदनवनासारखें सुंदर उपवन उत्पन्न झालें. गंगा व यमुना या नद्या दक्षिण व पूर्ववाहिनी होऊन त्या बंगालच्या उपसागरास मिळाल्या व मध्य भारतांतील समुद्र आटून जाऊन तेथें सपाट व सुपीक भूप्रदेश निर्माण झाला. अग्निजन्य धातुरसामुळें दक्षिणेतील पठार व त्यामधील काळा प्रस्तर निर्माण झाला. हें भौगोलिक स्थित्यंतर होत असतां कांहीं मानवजाती या भरतखंडांत वस्ती करून राहिल्या होत्या व त्यांचे वंशज आजहि आपणांस गोंड, मुंडा, खोंड, कोडगू, भिल्ल व कातकरी, वगैरे जाती आढळून येतात. त्यांच्या भाषा अगदीं पृथक् असून अगदीं प्राथमिक अवस्थेंतील आहेत. या भरतखंडांत या प्राथमिक अवस्थेंतील मानवांनंतर द्राविड लोकांनीं वसाहत केली. त्यांचा प्रसार तत्कालीन बहुतेक भरतखंडावर झाला होता. बलुचिस्तानांत ब्राहुई ही एक द्राविड वंशांतील भाषा अद्यापि प्रचलित आहे. यावरून तेथपर्यंत द्राविड संस्कृतीचा प्रसार झाला होता असें दिसतें. या द्राविड लोकांनीं इमारती बांधण्याच्या कामांत बरीच प्रगति केली होती असें दिसतें. या द्राविड लोकांचा सुमेरी लोकांशीं कांहीं संबंध जोडतात.

या द्राविड लोकांप्रमाणेंच असुर लोकांच्या कांहीं वसाहती भरतखंडांत झालेल्या असाव्यात असें दृष्टीस पडतें. मोहनजोदरो व हरप्पा येथें जे भूमिगत अवशेष सांपडले आहेत त्यांवरून तेथें असुर लोकांची एक वसाहत असावी असे स्पष्ट दिसतें. हे अव-शेष खिस्तपूर्व तीन हजार वर्षांइतक्या प्राचीन कालचे असावेत असें अनुमान आहे. या अवशेषांत ज्या मानवांच्या प्रतिकृती, अलंकार, मुद्रा, वगैरे आढळून आल्या आहेत त्या आर्य लोकांहून अगदीं निराळ्या दिसतात. त्यांच्या मुद्रांवर जीं अक्षरें कोरलेलीं आहेत त्यांचें अद्यापि बरोबर वाचन झालेलें नाहीं. तें झाल्या-वर त्या संस्कृतीवर अधिक प्रकाश पडण्याचा संभव आहे. जे

आर्य लोक भरतखंडांत येऊन वस्ती करून राहिले. त्यांचा आयुष्यक्रम बराच विकास पावला होता. या लोकांत यज्ञसंस्था म्हणून जी उपासना-पद्धति प्रचलित होती तिची वाढ बरीच झालेली असल्यामुळें तिच्या अनुषंगानें त्यांच्या संस्कृतींत बरीच वाढ झालेली असावी असें अनुमान करितां येतें. या आर्यांच्या संस्कृतीचें ज्ञान करून घ्यावयाचें म्हणजे त्यांच्या यज्ञसंस्थेचा अभ्यास करणें आवश्यक आहे. परंतु तसा तो अद्याप फारसा झालेला दिसत नाहीं. तथापि या यज्ञसंस्थेशीं संबद्ध अशा ज्या अनेक गोष्टी त्यांच्या वैदिक वाङ्मयांत आढळून येतात त्यांवरून त्यांच्या आयुष्यक्रमाचें साधारण बरेंचसें चित्र रेखाटतां येतें.

## आर्यांची यज्ञसंस्था—

ही यज्ञसंस्था म्हणजे प्रथम कौटुंबिक उपासना-पद्धति होती. तिलाच पुढें सामाजिक स्वरूप येत गेलें व तिचा विकास पुढें एका राष्ट्रीय संस्थेंत झाला. प्रथम प्रत्येक मनुष्य आपली उपासना स्वतः करीत असे. परंतु पुढें चार आप्तेष्ट अथवा शेजारीपाजारी जमवून उपासना करण्याची पद्धत प्रचारांत आली. हिचें अगदीं प्राथमिक स्वरूप म्हणजे इष्टि हें होय. या इष्टी प्रत्येक अमावास्येस व पौर्णिमेस करावयाच्या असत. ह्यांत यजमानाखेरीज तीनचार ऋत्विज असून कांहीं सभ्य लोकांसहि अंतर्भूत करून घेतां येत असे. यानंतर एकरात्र, द्विरात्र, त्रिरात्र, एकाह, द्वादशाह, वगैरे अनेक दिवस चालणारे यज्ञ प्रचारांत आले. त्यांतीलच षळह म्हणजे सहा दिवस चालणाऱ्या एका क्रतूस प्राधान्य येऊन असे अनेक षळह मिळून मोठा यज्ञ प्रचारांत आला. याचाच पुढें सत्र नांवाच्या यज्ञांत विकास होऊन त्यास सार्वजनिक स्वरूप आलें. कारण सामान्य यज्ञ एक यजमान व बाकीचे ऋत्विज अशा स्वरूपाचे असत. सत्रामध्यें सर्वच यजमान व सर्वच ऋत्विज असत. त्यामुळें हा पूर्णपणें सार्वजनिक यज्ञ असे. हीं सत्रें एक वर्षापासून बारा वर्षांपर्यंत इतका दीर्घ कालहि चालू असत. यामुळें आर्यांची निरनिराळ्या ठिकाणीं वस्ती स्थायिक होण्यास व त्यांच्या संस्कृतीचा प्रसार होण्यास फार साहाय्य झालें. या यज्ञामध्यें राजापासून सामान्य लोकांपर्यंत सर्वांस भाग घेतां येऊं लागला. राजसूय, अश्वमेध यांसारखे कांहीं यज्ञ तर केवळ राजे लोकांनींच करावयाचे असत. त्यामुळें सामाजिक स्थैर्य उत्पन्न होऊन राजाचें महत्त्व व पराक्रम यांस अवसर मिळूं लागला.

## यज्ञसंस्थेमुळें सामाजिक विकास—

या यज्ञांमध्यें ज्या निरनिराळ्या क्रिया होत असत, त्यांमुळें अनेक सामाजिक गोष्टींचाहि विकास होण्यास साहाय्य झालें. यज्ञांमध्यें ज्या निरनिराळ्या वस्तू लागत त्यांची संख्या व प्रकारहि यज्ञाच्या स्वरूपाबरोबर वाढत गेले व अनेक कला व उद्योगधंदे यांचें संवर्धन होण्यास सहाय्य झालें. या यज्ञांमध्यें सोनार, सुतार, कुंभार, चांभार, कोष्टी, लोहार, शिंपी, वगैरेकडून निरनिराळ्या वस्तू तयार करून घेण्यांत येऊं लागल्या, त्यामुळें या धंद्यांस साहाजिकच प्रोत्साहन मिळूं लागलें. यज्ञामध्यें जे यज्ञमंडप व चिती तयार करीत त्यामुळें गृहरचना व बांधकाम यांमध्यें प्रगति झाली. यज्ञाच्या अंगानेंच संगीतास उत्तेजन मिळून सामवेदाच्या विकासामुळें संगीतादि कलांस उत्तेजन मिळालें. यज्ञामध्यें निरनिराळे पशू, पक्षी गोळा करण्यांत येत असत. तसेंच निरनिराळ्या शर्यती व खेळ करण्यांत येत असत. त्यामुळें अनेक लोकांस त्यांमध्यें भाग घेण्यास क्षेत्र मिळत असे व अशा रीतीनें एकंदर सामाजिक प्रगतीस मदत होत असे. या दृष्टीनें भारतीय सामाजिक विकासाच्या अभ्यासामध्यें या यज्ञसंस्थेच्या अभ्यासास फार महत्त्व आहे. आजच्या समाजांत ही यज्ञसंस्था केवळ प्रतीकरूपानें अथवा भातुकलीच्या खेळाप्रमाणें प्रचलित आहे. परंतु तिच्या मूळ स्वरूपाचें ज्ञान करून घेतल्यास समाजशास्त्राच्या अभ्यासाच्या दृष्टीनेंहि त्याचा उपयोग बराच होण्यासारखा आहे.

## वैदिक भाषेवरून सामाजिक स्थितीचें ज्ञान—

यज्ञसंस्थेप्रमाणेंच वैदिक भाषा व तींतील शब्द हेंहि तत्कालीन समाजाच्या व संस्कृतीच्या विकासाचें ज्ञान करून घेण्याचें एक उपयुक्त साधन आहे. या दृष्टीनें आतां आपण वैदिक शब्दांकडे थोडेंसें लक्ष देऊं. वैदिक वाङ्मयांत सामान्यतः जे प्रदेशवाचक शब्द आलेले आहेत त्यांवरून आर्यांचा प्रसार आर्यावर्तामध्यें म्हणजे उत्तर हिंदुस्थानांत केवढा झाला होता तें दिसून येतें व तो फक्त आर्यावर्तांतच असावा; कारण, दक्षिणापथ हा शब्द आर्य लोकांतून हद्दपार केलेला मनुष्य घालविण्याचा प्रदेश याचा निदर्शक म्हणून वापरला आहे. यावरून दक्षिणेकडे त्यांची वस्ती झाली नसावी असें दिसतें. तसेंच विदर्भादि दक्षिणेकडील प्रदेश यांचा उल्लेख उपनिषत्कालापर्यंत आढळत नाहीं. नद्यांचें वर्णन पाहूं जातां पंजाबांतील नद्यांसच प्रामुख्य दिलेलें आढळतें. यावरून त्या प्रदेशांतच त्यांची विशेष वस्ती होती असें दिसतें.

## वैदिक कुटुंबपद्धति—

वैदिक काळांत कुटुंबपद्धति सामान्यतः मूलगृहकालीन आर्यांची होती त्याप्रमाणेंच असावी. ही कुटुंबपद्धति अर्थात् पितृसत्ताक होती. साहजिकच ह्या कुटुंबांत पति व पत्नी हीं

प्रमुख असून पित्याची सर्व कुटुंबावर पूर्ण सत्ता असे. पुत्र हे पित्याच्या आज्ञेत वर्तत असत. मुलींचा विवाह बालपणांत होत नसे. त्या वेळीं बहुभार्यात्व प्रचलित होतें, पण बहुपतित्व नव्हतें. राजांस चार स्त्रिया करण्याची मुभा असे व त्यांस अनुक्रमें महिषी, परिवृक्ति, वावाता आणि पालागली असे शब्द वापरीत. त्या काळीं बहुपत्नीत्व मान्य असलें तरी एकपत्नीव्रतास विशेष महत्त्व देण्यांत येत असे. त्या वेळीं प्राजापत्य, आसुर, आर्ष व राक्षस हे विवाह प्रचलित असावेत. ऋग्वेदामध्यें नियोगाची पद्धति रूढ असल्याबद्दल उल्लेख आहेत.

## वैदिक गृहरचना—

वेदकालीन आर्यांच्या घरांस गृह, दम, पस्त्या व हर्म्य असे निरानिराळे शब्द आढळतात व त्यांवरून निरनिराळ्या आकारांच्या घरांचा बोध होतो. विशेषतः हर्म्य ह्या शब्दाचा अर्थ घर व त्यासभोंवतालचें आवार असा दिसतो. त्यावरून अशा घरांमध्यें राहणाऱ्यांमध्यें एका मोठ्या कुटुंबाचा व त्याप्रमाणेंच त्यांच्या पाळीव पशूंचाहि समावेश होत असावा. अशा घरांत बऱ्याच खोल्या असून त्यांस दारें असत. तथापि एकंदर घरांची रचना कशी असावी यासंबंधीं स्पष्ट वर्णन आढळत नाहीं. परंतु यज्ञांतील सद वगैरे मंडपांवरून त्यांची थोडीफार कल्पना येऊं शकेल. घरांतील सामान दर्शविणारे शब्द ऋग्वेदामध्यें अनेक आढळतात, त्यांत तल्प, आसन्दी, वगैरेंवरून पलंग व बैठकी यांचा बोध होतो. वाह्य हा शब्दहि मंचकवाचक आढळतो. घरांतील निरनिराळीं भांडीं दाखविणारे कलश, कुंभ, पात्र, वगैरे शब्द आढळतात. तसेंच इतर घरांतील निरनिराळ्या व्यापारासंबंधीं जे शब्द आढळतात त्यांवरून वेदकालीन आर्यांचा आयुष्यक्रम बराच सुधारलेला असावा असें वाटतें.

## समाज—

ऋग्वेदकालीं आर्य लोक जमावानें राहत असत ही गोष्ट गोत्र, कुल या शब्दांनीं व्यक्त होते व त्यांमध्यें भिन्नगोत्रीय विवाहपद्धति प्रचलित होती यावरून निरनिराळ्या लोकसमूहांमध्यें दळणवळण होत असे, असें दिसतें. ऋग्वेदसंहितेंत पुरु, अनु, द्रुह्यु, यदु व तुर्वश या पांच जमातींचा पंचजन म्हणून उल्लेख केलेला आढळतो व यांचा उल्लेख अनेक सूक्तांत आलेला आढळतो. या पंचजनांचीं दस्यु, वगैरे परकीय लोकांशीं, त्याचप्रमाणें पृथु व पर्शु, तसेंच गंधारी, वगैरे लोकांशीं युद्धें झाल्याचें वर्णन अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतें. संहिताकालानंतरच्या कालांत अन्ध, पुलिंद, पांचाल, कंबोज, कुंती, कुरुपांचाल, कौरव्य, मूतिब, मागध, वगैरे अनेक लोकांचा उल्लेख आढळतो. हे आर्येतर लोक असून त्यांचा समावेश पुढें भारतीयांत झाला असावा असें वाटतें.

## पोषाख—

वेदकालीन लोकांचा पोशाख एक नेसतें वस्त्र व दुसरें उत्तरीय अथवा अधिवास असा असे. अधिवास हा कदाचित् शिवलेला झगा असावा. तसेंच पेशस् नांवाचें कशिदा वगैरे काढलेलें वस्त्र नर्तकी स्त्रिया वगैरे वापरीत असत. वसन, वस्त्र, वासस् हे शब्द सामान्यार्थी पोषाखवाचक असत. वस्त्रें विणण्याची कला या लोकांत बरीच वाढलेली होती ही गोष्ट विणकामविषयक शब्द आढळतात त्यावरून दिसून येते. ऋग्वेदामध्यें कुरीर, कर्णशोभन, खादी, मणि, ओपश, वगैरे जे शब्द आढळतात, त्यांवरून तत्कालीन लोक दागिने व भूषणें घालीत असत असें दिसतें.

## कृषि व व्यापार—

ऋग्वेदकालीन लोकांमध्यें कृषिव्यवसाय बराच विकास पावला असावा असें तत्संबंधीं अनेक उल्लेखांवरून दृष्टीस पडतें. एका सूक्तांत केवळ कृषीचें वर्णन केलेलें आढळतें. तसेंच सीरा, लांगल, कृपीवल, वगैरे शब्दावरून, कृषिकर्मांचा बोध होतो. क्षेत्र या शब्दाचा अर्थहि कसलेलें शेत असाच होत असे. खनित्र या शब्दावरून त्या वेळीं शेतीकरितां पाटबंधारेहि बांधीत असत असें दिसतें. नांगरणी, पेरणी, कापणी व मळणी ह्यांचे वाचक कृषतः, वपन्तः, लुनन्तः व मृणन्तः हे शब्द आढळतात. यावरून ह्या सर्व क्रियांची माहिती त्यांस होती असें दिसतें. तैत्तिरीय संहितेमध्यें जीं व्रीहि, यव, मुद्ग, गोधूम, नीवार, श्यामाक, मसूर, इत्यादि धान्यांचीं नांवें आलेलीं आहेत त्यांवरून किती निरनिराळीं पिकें तत्कालीन लोक काढीत असत तें दिसून येतें. त्या वेळीं प्रपथ, अध्वन्, अनुपथ, रथ्य, वगैरे शब्दांवरून निरनिराळे दळणवळणाचे मार्ग व्यक्त होतात. प्लव, नौ, अरित्र, वगैरे शब्दांवरून नाविक दळणवळणाचा बोध होतो.

## वैदिक व्यवसाय—

ऋग्वेदांत शंभर वल्ह्यांनीं चालविलेल्या नौकेचा उल्लेख आढळतो. रथ हें त्या वेळचें वाहन प्रसिद्ध असून त्याचे अनेक प्रकार असत. त्याच्या निरनिराळ्या अवयवाचा उल्लेख आढळतो. रथ हांकण्याकरितां सारथी अर्थातच लागत असे; विशेषतः युद्धामध्यें सारथ्याची आवश्यकता असे. सारथीवाचकच स्थातृ व यन्तृ हे शब्दहि ऋग्वेदांत आढळतात. ऋग्वेदकालीन लोक निरनिराळ्या धंद्यांचा अवलंब करीत

असत ही गोष्ट निरनिराळ्या शब्दांवरून व्यक्त होते. कर्मार हा त्या वेळचा लोहार होता व तो भट्टींत धातूचा रस करीत असे, ही गोष्टहि वर्णन केलेली आढळते. त्याचा भाता पक्ष्यांच्या पंखांचा असे. तक्षन् हा तत्कालीन सुतार होता व तो गाड्या व रथ तयार करीत असे. कुलिश, परशु, कुन्हाड व स्वधिति हीं त्यांचीं हत्यारें असत. पशुप हा त्या वेळचा गुराखी असे. न्हाव्यास वप्तृ असें म्हणत. त्या वेळीं रथकारांचाहि एक स्वतंत्र वर्ग असे. त्या वेळीं शस्तृ व गोविकर्तन हे शब्द खाटिक किंवा पारध्यास लावीत. पारधीवाचक दुसरा शब्द श्वघ्नी असा आहे. यावरून तो कुत्र्याच्या साहाय्यानें शिकार करीत असावा. स्तेन शब्दावरून त्या वेळीं चोरांचेंहि अस्तित्व होतें, असें दिसून येतें. चौर्यवाचक शब्द अनेक असून चोर हा शब्द तैत्तिरीय आरण्यकांत आढळतो. परंतु तस्कर, तायु, वनर्गु व परिपंथिन् हे शब्द यापूर्वीच आढळतात. दहन् हा शब्द लांकुडतोड्यास लावीत असत. पथिकृत् हा मार्ग तयार करणारा असे. बेकनाट व कुसीदिन् हे शब्द व्याजबट्टा करणाऱ्या सावकारांस लावीत. भिषज हा शब्द अनेकवार आढळतो त्यावरून तत्कालीन वैद्यक विषयांत बरीच प्रगति झालेली दिसते. विशेषतः अश्विनी देवतांच्या चमत्कारांमध्यें रुग्णांस दृष्टि आणून देणें व लंगड्यास चालावयास समर्थ करणें, च्यवनासारख्या वृद्धास तारुण्य प्राप्त करून देणें, इत्यादि गोष्टींवरून वैद्यकलेची बरीच वाढ झाली होती असें दिसतें. शैलूष या शब्दावरून नट व नर्तन या कलाहि वाढीस लागल्या होत्या. महानाम्नी ही एक गणिका असे. वाणिज्य हा शब्द मात्र ब्राह्मणकालापर्यंत आढळत नाहीं. क्रयविक्रय, इत्यादि शब्दांवरून त्या वेळीं अदलाबदल करून व्यापार करीत असत असें दिसतें.

## वृक्ष व वनस्पती—

ऋग्वेदांत किंशुक, खदिर, पर्ण, पिप्पल, इत्यादि वृक्षवाचक व इतर जे वनस्पतिवाचक शब्द आढळतात त्यांवरून त्यांस अनेक झाडांची माहिती होती असें दिसतें. सोम ही वल्ली तर सर्वप्रसिद्धच आहे, परंतु भरतखंडांत आल्यावर ती दुर्मिळ झाल्यामुळें इतर प्रतिनिधी वापरीत असें दिसतें. सोम ही वल्ली आर्जीकिया सरोवराजवळ मूजवत् पर्वतावर आढळत असे. ही वनस्पति निश्चित कोणती होती तें अद्यापि निर्णीत झालें नाहीं. तत्कालीन लोकांस चिरपरिचित प्राणी म्हणजे अश्व व गो हे होत. यांसंबंधीं अनेक शब्द ऋग्वेदामध्यें व इतर वैदिक वाङ्मयांत आढळतात. तसेंच अजा, मेष, गर्दभ, वराह, वृक, वृष, कपि, वगैरे अनेक प्राणिवाचक शब्दांवरून त्यांस बहुतेक भरतखंडांत आढळणारे प्राणी परिचित होते असें दिसतें. पक्ष्यांपैकीं श्येन, चक्रवाक, कपोत, मयूर, वायस, सुपर्ण, हंस, वगैरे अनेक पक्षी त्यांस माहीत होते.

## समाजव्यवस्था—

ऋग्वेदकाळीं समाजामध्यें समाजाचें धारण करण्याकरितां कुटुंबांत जसा पिता अथवा गृहपति हा प्रमुख असे त्याप्रमाणें समाजामध्यें विश्पति हा प्रमुख असावा. तसेंच राजा हा सर्वसत्ताधीश असल्याचा पुरावा आढळतो. त्या वेळची राज्यपद्धति एकसत्ताक असून राजा हा बहुतेक वंशपरंपरेनें होत असे. क्वचित् राजास प्रजेकडून मान्यता लागत असे, असे उल्लेख आढळतात. राजास प्रजेकडून खर्चाकरितां करभार मिळत असे. तो न्याय करण्याचें कामहि करीत असे. तसेंच दंड देण्याचेंहि काम तोच करीत असे, परंतु त्याबरोबर मध्यमशी म्हणजे मध्यस्थ पंच ही संस्थाहि त्या वेळीं अस्तित्वांत असावी असें दिसतें. राजास पुरोहितहि सल्ला देत असे ही गोष्ट विश्वामित्र व वसिष्ठ यांच्यासंबंधींच्या आख्यायिकांवरून स्पष्ट दिसते. युद्धामध्यें राजा हा प्रमुख असे. त्या वेळीं अधिराज व सम्राज म्हणजे राजांचा राजा अर्थात् सार्वभौम राजा असे, ही गोष्ट स्पष्ट आहे.

## सार्वभौम राजे—

ऐतरेय ब्राह्मणांत महाराज्याभिषेक झालेल्या राजाची माहिती दिलेली आहे; त्यांत परीक्षितिपुत्र जनमेजय, मनुपुत्र शार्यात, सत्राजितपुत्र शतानीक, भुवनपुत्र विश्वकर्मा, पैजवन सुदास, अवीक्षितपुत्र मरुत्त, अंगराज, दुष्यन्तपुत्र भरत, जानंतपय अत्यराति, दुर्मुख, इत्यादि राजांचीं नांवें आढळतात. यांपैकीं जनमेजय, सुदास, भरत व मरुत्त हीं नांवें विशेष परिचित आहेत. मरुत्त राजाची स्तुति आजहि मंत्रपुष्पांजलींतील मंत्रांमध्यें केलेली सर्व ब्राह्मण पठण करीत असतात.

ग्रामणी या शब्दावरून प्रत्येक गांवास एक प्रमुख असे, असें दिसतें. ग्रामणीप्रमाणें पूर्पति हा शब्द ऋग्वेदांत आढळतो. राजाचा सेनानी म्हणून सैन्यांचा अधिपति असे. याप्रमाणेंच उपमंत्री, गणपति, सदस्पति, क्षेत्रस्थपति, गोपति, अश्वपति, वगैरे कांहीं अधिकाऱ्यांचीं नांवें तत्कालीन वाङ्मयांत आढळतात.

## युद्धें व संघर्ष—

त्या वेळीं आर्य किंवा आर्येतर जे निरनिराळे समाज असत त्यांमध्यें परस्परांत सन्निकर्ष होऊन कांहीं प्रसंगीं युद्धें होणें साहजिकच होतें व तशीं तीं होत असत याबद्दल वैदिक वाङ्मयांत भरपूर पुरावा आढळतो. प्रत्यक्ष ऋग्वेदामध्यें युद्ध, समर, संख, आजि, वगैरे अनेक शब्द युद्धवाचक आढळतात. गविष्टि या शब्दावरून गाई धरून आणण्याकरितां केलेलें युद्ध असा अर्थ

स्पष्ट होतो. दाशराज्ञयुद्ध हें दहा राजांत झालेलें युद्ध तर प्रसिद्धच आहे. महाधन हा शब्द मोठें लाभदायक युद्ध या अर्थी योजलेला आढळतो. युद्धामध्यें जे भाग घेत त्या योद्ध्यांचे वाचकहि शब्द वैदिक वाङ्मयांत अनेक आढळतात. उदाहरणार्थ, वीर, महावीर, युयुधि हे सामान्य योद्धे होते. मुष्टिहन्, अस्तृ, इषुहन्, धन्व-सहस्, परशुमत्, रथी, वगैरे युद्धसाधनांवरून बनलेले शब्द निरनिराळ्या प्रकारचे योद्धे दाखवितात. पत्ति, रथेष्ठ हे शब्द पायदळ व रथदळ-वाचक होत. युद्धांत वापरलीं जाणारीं निर-निराळीं शस्त्रेंहि त्या वेळीं अनेक प्रकारचीं असत. त्यामध्यें अंकुश, असि, कुलिश, कृती, तोद्, इषुधि, सायक, अस्त्र, शक्ति, वगैरे प्रमुख असत. युद्धांत शरीर-संरक्षणाकरितां कवच, खादी, खृगल, अंसत्र, वगैरे निरनिराळ्या अवयवांचें रक्षण करणारीं साधनें वापरीत असत. धनुष्यबाण हें युद्धाचें मुख्य साधन असे व तद्वाचक शब्द अनेक आढळतात. युद्धामध्यें ध्वज वापरीत असत. युद्धांतील सैन्याचेहि निरनिराळे प्रकार असत व त्याबद्दल अनीक, पृतना, वाहिनी, सेना, इत्यादि शब्द आढळतात.

### कालगणना—

वैदिक लोकांमध्यें यज्ञसंस्था ही विशेष महत्त्वाची बाब असून तिचा त्यांच्या आयुष्यक्रमावर विशेष महत्त्वाचा परिणाम झालेला दृष्टीस पडतो. पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणें हे यज्ञ एक दिवसापासून बारा वर्षांइतक्या दीर्घकालपर्यंत चालणारे असत, त्यामुळें साहजिकच त्यांस पद्धतशीर रीतीनें कालगणना करणें अवश्य होतें. ही कालगणना ते आकाशस्थ ग्रह, तारे, सूर्य, चंद्र यांच्या साहाय्यानें करीत. सूर्य किंवा चंद्र विशिष्ट तारका-समूहांत केव्हां असतो व पुन्हां त्याच तारकासमूहांत केव्हां येतो यावरून ते महिना व वर्ष ह्यांची गणना करीत. एक वर्ष चाल-णाऱ्या यज्ञाकरितां सूर्याची गति त्यांस ज्ञात करून घ्यावी लागत असे. याकरितां यज्ञांचा आरंभ विशिष्ट कोणत्या वेळीं करावयाचा म्हणजे समाप्तिहि त्याच कालांत येईल या गोष्टीस विशेष महत्त्व असे. विशेषतः अग्न्याधान कोणत्या वेळीं करावें यासंबधीं विवेचन तैत्तिरीय संहितेंत केलेलें आढळतें. वर्षभर चालणाऱ्या यज्ञांमध्यें आरंभदिवसाप्रमाणेंच मध्य-दिवसासहि महत्त्व असे. त्यास विषूवान असें म्हणत. हा सहा महिन्यांनीं अर्थातच येत असे. हा दिवस बहुधा सूर्य ज्या वेळीं विषुववृत्त ओलांडीत असे तो असावा म्हणजे वसंत किंवा शरद् संपात दिन असावा. प्राचीन आर्य लोक उत्तर ध्रुवाजवळ राहत असल्यामुळें त्यांस सहा महिने रात्र व सहा महिने दिवस ह्या चमत्काराचा परिचय होता व सूर्य आकाशांत एका अक्षाभोंवतीं वाटोळा फिरतो, ही गोष्टहि त्यांस परिचित होती. यासंबंधीं उल्लेख ऋग्वेदसंहितेंत आढळतात. आर्यांची काल-गणना नक्षत्रावरून केलेली असे, त्यामुळें त्यांचे महिने चांद्र असून प्रत्येक दिवसास तिथि अशी संज्ञा असे व पौर्णिमा व अमावास्या ह्या दिवसांस फार महत्त्व असे व त्याच दिवशीं इष्टि नांवाचा यज्ञ करीत असत. आज ज्ञात असलेल्या सर्व नक्ष-त्रांचा उल्लेख तैत्तिरीय व त्यानंतरच्या संहितांत आढळतो. मात्र ह्या नक्षत्रमालेचा आरंभ कृत्तिका नक्षत्रापासून धरलेला आहे. यावरून त्या कालीं वसंत संपात कृत्तिकांत असावा व येथून वर्षारंभ धरीत असावे असें दिसतें. त्या वेळीं अर्थातच दक्षिणा-यन व उत्तरायण यांस विशेष महत्त्व असे. कारण उत्तर ध्रुव-प्रदेशांत दक्षिणायनांत रात्र दीर्घ असून उत्तरायणांत दिवस दीर्घ काल टिकत असे. त्या वेळीं हीं अयनें संपातबिन्दूपासून मोजीत असावे असें दिसतें. यांपैकीं एकास पितृयान व दुस-ऱ्यास देवयान म्हणत. प्रथम वसंत व हेमन्त हे दोनच ऋतु असावे, परंतु पुढें वर्षा इत्यादि ऋतूंस महत्त्व येऊन पुढें पांच व नंतर सहा ऋतू बनले. आर्यांच्या कालगणनेंत पांच, सात, बारा व साठ वर्षांचें वर्षचक्र असे. वैदिक कालांत सात वार व बारा राशी ह्या अज्ञात होत्या. त्यांचा स्वीकार आर्यांनीं खाल्डियन ज्योतिष्यांपासून केला. भारतीय आर्यांस संख्येचें ज्ञान बरेंच असून त्या वेळीं दशमानपद्धति रूढ होती व त्यांस परार्धा-पर्यंत संख्या मोजतां येत असे. तसेंच त्यांस अपूर्णांकहि माहीत होते असें दिसतें.

याप्रमाणें वैदिक लोकांच्या आयुष्यक्रमाचें व त्यांच्या सांस्कृ-तिक विकासाचें आणि त्यांनीं केलेल्या ज्ञानसंवर्धनाचें थोडक्यात विवेचन केलें आहे. या ठिकाणीं विस्तृत विवेचन करण्यास अव-काश नाहीं आणि तितकीं भरपूर साधनेंहि आज उपलब्ध नाहींत. या बाबतींत भारतीय पंडितांनीं संशोधन करावयास हवें. वैदिक वाङ्मयांत जे देवतांच्या स्तुतिपर अथवा यज्ञयागपर मंत्रांतून तुरळक उल्लेख आढळतात त्यांवरून तत्कालीन आयुष्यक्रमाचें अनुमान काढावें लागतें. अर्थातच तें त्रोटक स्वरूपाचेंच असणार. परंतु वैदिक वाङ्मय हें फार प्राचीन कालापासून अत्रुटित परंपरेनें आपणांपर्यंत चालत आलें असल्यामुळें आपणांस इतपत तरी माहिती देतां येणें शक्य आहे. इतर समाजांबद्दल इतक्या प्राचीन कालचा इतपतहि पुरावा आढळत नाहीं. तथापि अद्यापि या क्षेत्रांत पुष्कळच संशोधन करण्यास वाव आहे. अद्यापि आपणास सर्व वैदिक वाङ्मयहि मूळ व शुद्ध स्वरूपांत उपलब्ध झालेलें नाहीं. कित्येक शाखांचे ग्रंथ लुप्त झालेले आहेत. अध्य-यनाच्या परंपरा त्रुटित झाल्या आहेत व कांहीं बंद पडत चालल्या आहेत. प्राचीन वाङ्मयाचें भारतीय पंडितांनीं केलेलें संशोधन

व शुद्धपाठ-प्रकाशन जेव्हां होईल व अनेक नष्टप्राय झालेले ग्रंथ अभ्यासकांस उपलब्ध होतील तेव्हांच खरोखर आपल्या प्राचीन पूर्वजांविषयीं आपणांस निश्चित माहिती देतां येईल.

## दाशराज्ञ युद्ध—

वेदकालांतील एक महत्त्वाची घटना म्हणजे पूर्वी उल्लेखिलेलें दाशराज्ञ युद्ध हें होय. या दाशराज्ञ युद्धाशीं अनेक व्यक्ति निगडित असून बहुतेक ऋग्वेदसंहितेशीं त्यांत उल्लेख केलेल्या निरनिराळ्या व्यक्तिहि कमीअधिक प्रमाणांत संबद्ध असल्याचें आढळतें. या दाशराज्ञ युद्धांतील विजेता सुदास हा असून त्यानें अनेक शत्रूंस जिंकून आपल्या साम्राज्यास प्रस्थापित केल्याचें वर्णन वसिष्ठांनीं एका सूक्तांत (७·१८) केलेलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत वसिष्ठानेंच सुदासास साम्राज्यमहाभिषेक केल्याचें वर्णन आढळतें. या दाशराज्ञ युद्धाची कथाहि इतस्ततः पसरलेली आहे. तुरळक उल्लेखांवरूनच त्याची संगतवार रचना करावी लागते; परंतु असे कांहीं निरनिराळे संदर्भ एकत्र केले असतां भरतांनीं दिग्विजय करीत आर्य देशांत प्रवेश करून तेथें साम्राज्याची प्रस्थापना कशी केली त्याची अंधुक कल्पना येते. सुदासाचा पिता अथवा आजा दिवोदास या नांवाचा एक राजा असून त्याचा जन्म सरस्वती नदीच्या तीरीं झाला असावा.

ही सरस्वती नदी अर्कोशिया प्रांतांतील हरिकिटी असावी असें मत आहे. दिवोदासानें शंबरादि शत्रूंस जिंकून बरेंच धन प्राप्त करून घेऊन भारद्वाजांकडून यज्ञ करविले असे उल्लेख आढळतात. त्याचा एकदां पक्थांचा राजा तुर्वयाण यानें पराभव केल्याचाहि उल्लेख आढळतो. त्याच या दिवोदासाचा मुलगा किंवा नातू सुदास यानें विश्वामित्राच्या साहाय्यानें अश्वमेध यज्ञ करून यज्ञीय अश्वासह विपाट् व शतुद्रि ह्या नद्या ओलांडून भरतखंडांत स्वारी केल्याचा उल्लेख विश्वामित्राच्या एका सूक्तांत आढळतो. त्यानंतर सुदासाचें पौरोहित्य वसिष्ठाकडे येऊन त्यानें त्यास दाशराज्ञ युद्धांत जय मिळवून देऊन त्याच्या साम्राज्याची स्थापना केली व त्याचें यश त्रिभुवनांत पसरलें. या दाशराज्ञ युद्धांत सुदासाचे शत्रू केवळ दहा राजेच होते असें नसून ते अनेक होते व त्यांत कांहीं आर्य व अनार्यहि होते असें दिसून येतें. त्यांतील आर्य शत्रू पुढीलप्रमाणें दिसतात. अनु, द्रुह्यु, पुरु, यदु, तुर्वश, कवष, वैकर्ण व मत्स्य. तसेंच अनार्य शत्रूंमध्यें शिम्यु, भेद, पक्थ, भलानस, अलीन, विषाणी, अज, शिव, शिग्रु, इत्यादि अनेक आढळतात. या युद्धाची भूमि पंचनद्यांचा किंवा सप्तसिंधूंचा प्रदेश हीच असावी व ह्याच प्रदेशांत सुदासानें आपलें साम्राज्य स्थापन केलें असावें व त्याच कालांत आणि त्याच प्रदेशांत वेदांचें पहिलें संहितीकरण झालें असावें. वेदांच्या संहितांत जरी निरनिराळ्या सूक्तांत प्राचीन कालच्या स्मृती वर्णन केलेल्या आढळतात तरी त्यांचें ग्रथन प्रथम ह्याच कालांत झालें असावें. तसेंच हें संहितीकरण एकदांच झालेलें नसून तीन प्रसंगीं झालेलें असावें असें वाटतें. पहिल्या संहितीकरणांत फक्त दोन ते सात हीं गोत्रमंडळें असावींत. त्यानंतर आठवें व नववें हीं यदुतुर्वशांसंबंधीं म्हणजे आठवें काण्व गोत्रीयांचें व नववें पवमान सोममंडळ अंतर्भूत करण्यांत आलें असावें. यानंतर एका उत्तरकालीं इतर सूक्तें पहिल्या व दहाव्या मंडळांत समाविष्ट केलीं गेलीं असावींत व यानंतर जीं सूक्तें गोळा झालीं तीं खिल नांवाच्या परिशिष्टांत ग्रथित करण्यांत आलीं.



## वैदिक संस्कृतीचा विस्तार—

या वैदिक संस्कृतीचा प्रसार हळूहळू सप्तसिंधूंच्या प्रदेशापासून पूर्वेकडे कर्मनाशा नदीपर्यंत होत गेला. त्यापलीकडे मगध देश असून तेथें आर्य संस्कृतीचा प्रसार दीर्घकालपर्यंत झाला नव्हता. कर्मनाशा नदीच्या अलीकडे आर्यांचे यज्ञयागादि विधि व संस्कार चालू असत व म्हणून त्या प्रदेशास आर्यावर्त म्हणत. मगधामध्यें कीकट लोकांची वस्ती असून ते अयाजक होते, असें वर्णन आढळतें. या अयाजक लोकांस व्रात्य अशी संज्ञा असे व ते संस्कारहीन समजले जात. एखादा आर्य संस्कारहीन झाल्यास त्यास व्रात्यांच्या प्रदेशांत घालवून देत. तसेंच एखाद्या व्रात्यास संस्कार करून आर्यांत समाविष्ट करून घेतल्यास त्याचें पूर्वीचें मुंडासें (उष्णीश), चाबूक, जोडे, वगैरे सामान एखाद्या मगध देशीय मनुष्यास देत असत. तसेंच आर्यावर्तांतील सर्व रोगांस या अनार्य लोकांच्या मगधादि प्रदेशांत जाण्याची प्रार्थना केलेली आढळते. कर्मनाशा या नदीच्या नांवावरूनहि ज्या नदीपलीकडे वैदिक कर्मांचा लोप होतो अशी नदी असा अर्थ व्यक्त होतो. यावरून त्या नदीपलीकडे आर्यांच्या वैदिक संस्कृतीचें अस्तित्व नव्हतें ही गोष्ट स्पष्ट होते व कर्मनाशा नदीचें उल्लंघन केलें असतां धर्मलोप होतो अशी समजूत दीर्घ कालपर्यंत रूढ असून पेशवेकालीन पत्रव्यवहारांतहि ती व्यक्त केल्याचें आढळतें. यावरून आर्यांच्या तत्कालीन संस्कृतीच्या प्रसाराची कल्पना येते.

## यज्ञाच्या साहाय्यानें संस्कृति-विस्तार—

आर्यांनीं जो आपल्या संस्कृतीचा प्रसार केला तो यज्ञसंस्थेच्या साहाय्यानें केला असा उल्लेख पूर्वीच केलेला आहे. प्रथम हे यज्ञ केवळ कौटुंबिक स्वरूपाचे लहान इष्टींच्या रूपाचे असून पुढें त्यांचा विस्तार अनेक वर्षांच्या सत्रांमध्यें व अश्वमेधादि मोठ्या यज्ञांमध्यें झाला ही गोष्ट पूर्वी सांगितलीच आहे.

यज्ञ हें एक संस्कृति-प्रसाराचें साधन कसें होतें हें एखाद्या सोमयज्ञाचें त्या दृष्टीनें अवलोकन केलें असतां दिसून येईल. यज्ञामध्यें यजमानास दीक्षित असें म्हणत. हा मनुष्य जेथें वस्ती नसेल अशा नवीन ठिकाणीं प्रथम जात असे. यज्ञभूमि ही राजापासून नवीन भूमि दान मागून घ्यावयाची असे व ती साफ करून व नांगरून तेथें यज्ञमंडप तयार करून त्यांत यज्ञाच्या वेदी तयार करावयाच्या असत. या प्रदेशास देवयजन-भूमि असें म्हणत. यामध्यें एक प्राचीन वेदी व एक उत्तर वेदी अशा दोन वेदी असत. प्राचीन वेदी ही पूर्वगृहाची द्योतक असून उत्तर वेदी ही नवीन गृहाची द्योतक असे. उत्तर वेदी ही पहिल्या वेदीपासून बरीच दूर असे व तिच्यापलीकडे आणखी कांहीं अंतरावर यूप पुरलेला असे.

यानंतर यज्ञाकरितां निरनिराळे सोळा ऋत्विज यजमानानें निवडावयाचे असत. यज्ञाच्या आरंभीं प्रायणीय नांवाची इष्टि करावयाची असे. हिची देवता पथ्यास्वस्ती या नांवाची असे; यावरून यजमान अथवा दीक्षित हा आपल्या मूळ गृहापासून प्रयाण करून नवीन ठिकाणीं राहावयास जात आहे ही कल्पना या विधींच्या मुळाशीं स्पष्टपणें दिसून येते. यजमानाच्या पुढें एक गाय चालत नेण्याचा विधि आहे. यावरून तो आपले पाळीव पशू अथवा गोधन आपल्याबरोबर घेऊन नवीन गृहीं प्रवेश करीत असे, ही गोष्ट स्पष्ट होते. यानंतर सोमक्रयविधि असे. सोम हा मूजवत पर्वतांत असून तो गंधारी लोकांकडून विकत घ्यावयाचा असे व तो आर्य ज्या नवीन देशांत वस्ती करीत होते त्या देशांत दुष्प्राप्य झाला होता ही गोष्ट स्पष्ट होते. त्या वेळीं सोमास फार महत्त्व प्राप्त झालें असून त्याची अतिथि म्हणून पूजा करीत असत. सोमाची स्तुति करीत असतां त्यास आपल्याबरोबर येण्याची प्रार्थना करीत. तीमध्यें धाम म्हणजे पूर्वीचें घर व दुर्य म्हणजे उत्तरकालीन घर असे शब्द वापरीत. यानंतर तानुनप्त्रचार म्हणून यज्ञ करणाऱ्या सर्व लोकांनीं एक शपथविधि करावयाचा असे व त्यांत सर्व लोक हा यज्ञ एकजुटीनें करावयाची शपथ घेत. त्यानंतर प्रवर्ग्य ह्या नांवाचा एक विधि करावयाचा असे. त्यामध्यें एका भांड्यांत दूध तापवून उतूं जाऊं द्यावयाचें असे. यावरून पूर्वीच्या वस्तींत दाटी झाल्यामुळें कांहीं मंडळी बाहेर पडून नवीन वस्ती करीत आहेत या गोष्टीचें प्रतीक दृष्टीस पडतें. यानंतर उपसद या नांवाचा एक तात्पुरत्या वस्तीचा बोधक विधि करावयाचा असे. हे सर्व विधी पूर्वकालीन वेदीवर करावयाचे असत. यानंतर उत्तर वेदी ही पूर्वेच्या दिशेकडे बांधावयाची असे. यावरून आर्यांचा प्रसार पश्चिमेकडून पूर्वेकडे होत गेला हें दिसून येते. या उत्तर वेदीच्या पलीकडे पुरलेल्या यूपाशीं यज्ञीय पशु बांधावयाचा असे व तेथें यज्ञीय पशूचें हनन करण्यांत येऊन उत्तर वेदीवर त्याच्या मांसाचें हवन करून हुतशेषाचें भक्षण करावयाचें असे. यानंतर सोमरस काढून त्याचें हवन करण्यांत येत असे व उरलेल्याचें प्राशन करीत असत. हें यज्ञीय सोमपान एकाच पात्रांतून सर्व ऋत्विजांनीं करावयाचें असे. त्यावरून तत्कालीन लोकांतील दृढबंधनांचें तें प्रतीक असावें असें दिसतें. यानंतर यजमानाच्या पितरांचें स्मरण करून त्यांस पुरोडाशाचे पिंड अर्पण करण्यांत येत असत. त्यानंतर उदयनीय नांवाची इष्टि करावयाची असे व तींत पूर्वीप्रमाणेंच पथ्यास्वस्ती या देवतेची स्तुति करीत असत. याप्रमाणें सर्व ऋत्विज मिळून एक ठिकाणीं राहून यज्ञ करून दीक्षित यजमानाची या नवीन ठिकाणीं स्थापना करीत व नंतर त्याची रजा घेत असत. याप्रमाणें निरनिराळीं कुटुंबें नवीन नवीन ठिकाणीं वसाहत करून स्थायिक होत असत.

## भिन्न समाजांचा स्वीकार—

यज्ञांगानें संस्कृति-प्रसाराची पुढील पायरी म्हणजे आर्य लोकांहून भिन्न अशा ज्या लोकांत यज्ञविधींचा प्रचार नव्हता त्यांस आपल्या विधीमध्यें अंतर्भूत करून घेणें ही क्रिया होय. ही क्रिया फार प्राचीन कालापासून चालत आली असली पाहिजे. ऋभू या देवांच्या कारागिरांना सोमपानाचा अधिकार नसे तो त्यांच्या कारागिरीतील कौशल्यामुळें त्यांस मिळाला. यासंबंधीं वर्णन ऋग्वेदसंहितेंतच आढळतें. त्यानंतर रथकार वगैरे ज्या जातींस यज्ञ करण्यासंबंधीं अधिकार नसे, त्यांस तो अधिकार देऊन आर्यांनीं आपल्या समाजांत समाविष्ट करून घेतलें. त्यानंतर आर्यांचा जेव्हां निषाद वगैरे नवीन नवीन लोकांशीं संबंध आला तेव्हां त्यांनीं त्यांच्या स्थपतीस यज्ञामध्यें यजमान होण्याचा अधिकार देऊन आपल्या संस्कृतींत अंतर्भूत करून घेतलें. यज्ञसंस्थेचा जेव्हां कौटुंबिक उपासनेपासून अधिक अधिक विकास होऊन यज्ञास सोमयागासारखें स्वरूप प्राप्त झालें तेव्हां यज्ञ करण्याचें तंत्र कांहीं विशिष्ट कुटुंबांत राहून त्यांचा ब्राह्मण म्हणून निराळा वर्ग बनला व योद्ध्यांचा वर्ग क्षत्रिय म्हणून स्वतंत्र बनला. परंतु आर्यांच्या संस्कृतिप्रसारांत ह्या दोन्ही वर्गांचें ऐक्य आवश्यक असल्यामुळें सोमयागाहून निराळे असे राजसूय, अश्वमेध ह्यांसारखे नवीन मोठमोठे याग निर्माण करण्यांत आले व त्यांत क्षत्रिय राजांस प्रामुख्य देण्यांत आलें. याचा परिणाम इतका दूरवर झाला कीं, उत्तरकालीं समुद्रगुप्तासारख्या देश्य राजांनींच केवळ नव्हे तर कुशानवंशीय आर्येतर राजांनींहि अश्वमेध यज्ञ केल्याचें वर्णन आढळतें. आर्य जेव्हां भरतखंडांत स्थाईक झाले तेव्हां कृषिवाणिज्य करणारा वैश्यवर्ण व चौथा शूद्र वर्ग हे समाजांत उत्पन्न झाले.

### वैदिक समाजांत इतरांचा अन्तर्भाव—

वैश्य व शूद्र यांसहि आपल्या संस्कृतींत व यज्ञामध्यें अंतर्भूत करून घेण्याकरितां पुरुषमेधासारखे मोठमोठे याग निर्माण करून व त्यांत खेळ, करमणूक, वगैरे अनेक प्रकार निर्माण करून समाजांतील सर्व वर्गांस कोठें ना कोठें तरी स्थान मिळेल अशी व्यवस्था करण्यांत आली. तसेंच विशिष्ट व्यक्ती व समाज आपल्या समाजांत अंतर्भूत करून घेण्यासाठीं व्रात्यस्तोमासारखे विधी प्रचारांत आणून सर्व समाजास निरनिराळ्या संस्कारांनीं बद्ध करण्यांत आलें. याप्रमाणें ह्या आर्य संस्कृतीचा प्रसार खिस्तपूर्व पांच हजार वर्षांपासून आर्यांच्या मूलगृहाच्या स्थानापासून भरतखंडाच्या उत्तरेकडील प्रदेशापर्यंत अव्याहत होत गेला.

### यज्ञसंस्थेचें वाङ्मयदृष्ट्या महत्त्व—

याप्रमाणें आर्य संस्कृतीचा जो आतांपर्यंत प्रसार होत गेला तो या यज्ञसंस्थेच्या अनुषंगानें होत गेला हें वर आपण पाहिलेंच आहे. यज्ञसंस्थेमध्यें ऋत्विजांस महत्त्व असे व हे ऋत्विज ब्राह्मण असत. त्यामुळें यज्ञ करणाऱ्या लोकांचा म्हणजे ब्राह्मणांचा एक स्वतंत्र वर्ग तयार झाला व आतांच वर सांगितल्याप्रमाणें राजे लोकांचा व व्यापार करणाऱ्या वैश्य लोकांचाहि स्वतंत्र वर्ग बनला. एवढेंच नव्हे तर जसजसे हे यज्ञयाग वाढत गेले तसतसे ब्राह्मणांमध्येंहि निरनिराळे वर्ग उत्पन्न झाले. पूर्वी वेदवाङ्मय विस्कळीत स्वरूपांत होतें, व यज्ञ करण्यास जे मंत्र अथवा इतर वचनें उपयोगांत आणीत त्यांचें वर्गीकरण केलेलें नव्हतें. परंतु हें वाङ्मय जसजसें जमत जमत पुष्कळ जमलें तसतशीं त्यांतील विशिष्ट देवतांचीं अथवा निरनिराळ्या देवतांचीं सूक्तें वेगळीं काढून त्यांची संहिता बनविण्यांत आली. त्यानंतर यज्ञामध्यें हे मंत्र किंवा सूक्तें पठण केलीं जावीं म्हणून होता या ऋत्विजास शस्त्रें पठण करण्यास सांगण्यांत येऊं लागलें. त्यानंतर हींच सूक्तें सुस्वर संगीतांत म्हणणाऱ्यांचा एक वर्ग निर्माण झाला. तेव्हां अशा गायनोपयोगी सूक्तांचा एक स्वतंत्र वर्ग करण्यांत येऊन त्यास सामवेद असें नांव देण्यांत आलें, व त्यासहि यज्ञामध्यें गायकाचें काम देण्यांत आलें. याप्रमाणेंच गृह्य अथवा घरगुती नित्य संस्कार करण्याकरितां अथवा कांहीं विशिष्ट रोगपीडादि निवारण्याच्या कार्याकरितां जें मंत्रतंत्रादि वाङ्मय निर्माण करण्यांत आलें होतें तें एकत्र करून त्यास अथर्ववेद असें नांव देण्यांत आलें, व त्याचें अध्ययन करणारास यज्ञविधीमध्यें ब्रह्मा म्हणून स्वीकारण्यांत आलें. हें सर्व वाङ्मय इतकें मोठें झालें कीं, त्याचें अध्ययन करणारांच्या निरनिराळ्या शाखा बनल्या; तसेंच हे मंत्र यज्ञ करण्यास उपयोगी पडावे म्हणून प्रत्येक शाखेचे ब्राह्मण ग्रंथ निर्माण झाले. त्यानंतर या यज्ञप्रसंगीं ज्या निरनिराळ्या तात्त्विक चर्चा होत त्यांतून उपनिषदें निर्माण झालीं. या उपनिषदांमध्यें केवळ गूढ विषयांची चर्चा असल्यामुळें व कोणतीहि क्रिया करण्याचें तंत्र नसल्यामुळें या क्रियेमध्यें क्षत्रिय राजांनीं विशेष प्रामुख्यानें भाग घेतलेला दिसतो, व ही विद्या क्षत्रिय लोकांत विशेष प्रचलित झालेली आढळते व तींत आत्मा व तत्त्वज्ञान यांचा विचार विशेष दृष्टीस पडतो.

या यज्ञांमध्यें अध्वर्यु हा मुख्य व्यवस्थापक व क्रिया करणारा असे. त्याच्या शाखेचा जो यजुर्वेद त्याची वाढ दीर्घ कालापासून व यज्ञविधींच्या अनुषंगानें होत गेल्यामुळें त्याची रचना फारच विस्कळीत झालेली होती. तिची मांडणी सुव्यवस्थित करण्याकरितां याज्ञवल्क्यानें आपली वाजसनेयी संहिता बनविली. ही संहिता प्रथम अठरा अध्यायांचीच असावी, परंतु वर सांगितल्याप्रमाणें अश्वमेध, पुरुषमेध, वगैरे यज्ञ अस्तित्वांत आल्यामुळें त्यांस अनुलक्षून त्या संहितेंत अधिक अध्याय घालावे लागले, व त्यामुळें ही संहिता हळूहळू चाळीस अध्यायांची बनली. शेवटच्या अध्यायांत तर ईशावास्य हें उपनिषदच आहे. याप्रमाणें या वैदिक वाङ्मयाची वाढ दीर्घ काल होत राहिली. वर सांगितल्याप्रमाणें संहिता व ब्राह्मणें तयार झाल्यानंतर विशिष्ट यज्ञांतील कर्मांचा क्रम व कृत्यें एका ठिकाणीं सांगणारीं श्रौत सूत्रें तयार झालीं. त्यानंतर वैयक्तिक संस्कार व गृहस्थ धर्मांतील क्रियांचें वर्णन करणारीं गृह्य सूत्रें रचण्यांत आलीं, व प्रथम ज्याप्रमाणें संहितांमुळें ब्राह्मणांचे निरनिराळे वर्ग पडले त्याप्रमाणें सूत्रभेदानें ब्राह्मणांच्या निरनिराळ्या शाखा पडल्या, व यांसच पुढें जातींचें स्वरूप प्राप्त झालें.

### कर्मानुरूप जातींची उत्पत्ति—

ज्याप्रमाणें ब्राह्मणांच्या त्यांच्या विधेप्रमाणें जाती बनत गेल्या त्याप्रमाणेंच समाजांतील इतर लोकांच्याहि त्यांच्या धंद्याप्रमाणें अथवा व्यवसायाप्रमाणें जाती बनत गेल्या, व यामुळें भारतीय समाजांत जातिभेद निर्माण झाले. प्रथम या जाती प्रत्यक्ष व्यवसायावरून तो व्यवसाय करणारासच अनुलक्षून असत, व त्यामुळें त्या गुणकर्मविभागावरून पडत असत. म्हणजे एका जातीच्या व्यक्तीस आपल्या धंद्याप्रमाणें आपली जात बदलतां येत असे. ही वस्तुस्थिति महाभारतकालीं बाल्हीक, वगैरे देशांत होती, परंतु महाभारत-कालांतच द्रोण व कृप हे क्षत्रियकर्म करूनहि ब्राह्मण राहिले होते. यावरून त्या वेळीं भारतखंडांत जन्मजात जाती निर्माण झाल्या होत्या असें दिसतें. तथापि बौद्ध जातककथांतून खि. पू. पांचव्या शतकाच्या सुमारास अगदीं पूर्णपणें जन्मजात जाती सिद्ध

झाल्या नव्हत्या असें दिसतें. उदाहरणार्थ, जातककथा (५·२९०). या कथेमध्ये एका क्षत्रियानें कुंभार, बुरूड, माळी व स्वयंपाकी असे धंदे एकामागून एक स्वीकारले होते असें वर्णन आहे. तसेंच एका श्रेष्ठीनें शिंपी व कुंभाराचा धंदा पत्करला तरी त्याचें समाजांत स्थान कायम राहिलें असेंहि दिसून येतें. एका राजपुत्रानें राज्य सोडून व्यापार आरंभला, एक राजपुत्र व्यापाऱ्याकडे नोकरीस राहिला. एकानें तिरंदाजाची नोकरी पत्करली, एक ब्राह्मण पैसे मिळावे म्हणून व्यापारी बनला, एक ब्राह्मण पूर्वी कोष्टी असलेल्या तिरंदाजाकडे नोकरीस राहिला, कांहीं ब्राह्मणांनीं शिकार व फांसेपारध हे धंदे स्वीकारले तर एक ब्राह्मण तर चाकें तयार करीत असे. तसेंच ब्राह्मण हे गोपालन व कृषि हे धंदे तर करीतच असत. याप्रमाणें त्या वेळीं जातिनिर्बंध शिथिल होते.

## रामायण व संस्कृति-प्रसार—

वैदिक काळांत ज्याप्रमाणें दाशराज्ञ युद्धाच्या अनुषंगानें आर्यांच्या भरतखंडातील एका स्वारीचें वर्णन करण्यांत आलें आहे, त्याप्रमाणेंच आर्यांच्या दक्षिण हिंदुस्थानांतील संस्कृतिप्रसाराच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा एका महायुद्धाचें वर्णन रामायण या ग्रंथांत वाल्मीकीनें केलें आहे. वाल्मीकीच्या ह्या काव्यांत राम व लक्ष्मण हे दोन राजपुत्र अयोध्येहून वनवासांत धाडले गेल्यामुळें गंगा नदी उतरून चित्रकूट मार्गानें दक्षिणेकडे विंध्य पर्वतास वळसा घालून खालीं उतरले; तेथें त्यांस अत्रि, अगस्त्य, वगैरे ऋषींचे आश्रम लागले. या ऋषींनीं आपले आश्रम स्थापन करून दक्षिणेंत आर्य संस्कृतीचा प्रसार केला होताच. रामाच्या आगमनाच्या पूर्वींच भृगु वंशांतील परशुराम यानें भरुकच्छ अथवा भडोचपासून मलबारपर्यंत सर्व किनाऱ्यावर व सह्याद्रीच्या पश्चिमेकडील भागावर आर्यांच्या वसाहती स्थापन करून आर्य संस्कृतीचा प्रसार केला होता. यामुळें परशुरामाच्या देवालयांचें आपणांस या सर्व भागांत अस्तित्व दिसून येतें. त्याप्रमाणेंच अगस्त्य ऋषीनें पूर्वेकडील बाजूच्या सर्व दक्षिण भारतांत आर्य संस्कृतीचा प्रसार केल्यामुळें अगस्त्य ऋषींचीं स्मारकें सर्व दक्षिण भारतांत दृष्टीस पडतात. याप्रमाणें रामायणकालांत आर्य संस्कृतीचा प्रसार सर्व भरतखंडभर झालेला आपल्या दृष्टीस पडतो.

## महाभारत—

रामायणकालानंतर भारतीय संस्कृतीच्या इतिहासांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे कौरव व पांडव ह्यांमध्यें झालेलें भारतीय युद्ध ही होय. ह्या युद्धप्रसंगास अनुसरून महाभारत हें महाकाव्य तयार झालेलें आहे. या ग्रंथाची रचनाहि एका विशिष्ट काळीं झालेली नसून तीन निरनिराळ्या वेळीं त्याचें ग्रथन झालेलें आहे. या ग्रंथामध्यें तत्कालीन भारतीय समाजाचें विविध अंगांतील चित्र स्पष्टपणें रेखाटलेलें आहे. त्याचें विस्तृत वर्णन देण्यास येथें अवकाश नाहीं. तथापि थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, महाभारत हा ग्रंथ म्हणजे एक तत्कालीन सांस्कृतिक व सामाजिक ज्ञानकोशच होय. त्यामध्यें भारतीय समाजाची तत्कालीन निरनिराळ्या अंगांनीं वाढ कशी झाली होती ह्याचें चित्र स्पष्टरीतीनें पाहावयास सांपडतें. त्या वेळीं दक्षिणेकडील कांहीं थोडासा भाग सोडला तर भरतखंडाचा बहुतेक सर्व भाग हिमालयापासून आसामपर्यंत आर्यांनीं व्यापलेला असून त्या सर्व प्रदेशांतील राजांनीं भारतीय युद्धांत भाग घेतलेला दिसतो. त्यांतील पश्चिम व वायव्य प्रदेशांतील कांहीं राजे पांडवांच्या पक्षास असून बाकी सर्व कौरवांच्या पक्षांत सामील होते.

## पुराणग्रंथ—

यानंतर भारतीय संस्कृतीच्या इतिहासास उपकारक ग्रंथ म्हटले म्हणजे पुराणें हे होत. प्रत्येक पुराणाची रचना सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतर आणि वंशानुचरित या अनुक्रमें पांच विभागांत केलेली असते. म्हणजे त्यांमध्यें सृष्टीची उत्पत्ति, तिची वाढ, या पृथ्वीवर होऊन गेलेले निरनिराळे मानव-वंश व निरनिराळे सार्वभौम राजे, त्यांच्या वंशावळी व त्यांचीं कृत्यें यांचें वर्णन केलेलें असतें. हीं पुराणें अठरा असल्याचें वर्णन आढळतें व त्यांची नामावळीहि थोड्याफार फरकानें सर्वत्र दिलेली दिसून येते. परंतु त्यांमध्यें मत्स्य, वायु, ब्रह्मांड व भविष्य हीं पुराणें महत्त्वाचीं असून त्यांत दिलेल्या राजवंशांच्या याद्या विशेष विश्वसनीय आढळून येतात. या याद्यांमध्यें भारतीय युद्धापासून तों विशिष्ट पुराणांच्या रचनाकालापर्यंत राजांची वंशावळ दिलेली दिसून येते. परंतु ह्या पौराणिक वंशावळीकडे पाहण्यापूर्वी भारतांत घडून आलेल्या एका महत्त्वाच्या क्रांतीकडे आपणांस लक्ष दिलें पाहिजे.

## सांप्रदायिक क्रांति—

पूर्वी सांगितलेंच आहे कीं, भारतीय संस्कृतीचा प्रसार यज्ञसंस्थेच्या अंगानें व ब्राह्मणांच्या प्रामुख्यानें होत गेला. ह्या ब्राह्मणांस क्षत्रियांचें साहाय्य असे व प्रसंगीं वैश्यांसहि ते आपल्या समारंभांतून भाग घेऊं देत असत. परंतु दीर्घकालपर्यंत समाजाची वाढ एका विशिष्ट दिशेनें व ब्राह्मण-प्रामुख्यानेंच होत गेली. यज्ञविधी हे जसजसे मोठमोठे व अधिक संकीर्ण स्वरूपाचे व दीर्घ काल चालणारे व गुंतागुंतीचे होऊं लागले, तसतसे

यज्ञसंस्थेसंबंधीं व त्यांतील मंत्रतंत्रांचें विशिष्ट ज्ञान असणें अवश्य होऊं लागलें. एवढेंच नव्हे तर केवळ विशिष्ट विषयांचें ज्ञान होणें आवश्यक होऊं लागलें. यामुळें अर्थातच हें ज्ञान असणाऱ्या ब्राह्मण वर्गास महत्त्व येऊं लागलें. यज्ञसंस्था हीच केवळ परमार्थ-साधनाचा मार्ग आहे अशी समजूत सर्व समाजांत प्रसृत झाल्या-मुळें सामान्य मनुष्यांस आपल्या पारमार्थिक उन्नतीचा स्वतंत्र असा मार्ग राहिला नाहीं. त्यामुळें सामान्य जनतेचा एक तऱ्हेचा कोंडमारा होऊं लागला व त्यांस आपला भविष्य काळ उज्ज्वल करून घेण्याचें साधन नाहींसें झालें. यज्ञयागांप्रमाणें तप करणें, हाहि एक त्या वेळचा पारमार्थिक साधनाचा मार्ग होता. परंतु तोहि सामान्य जनतेस अनुकूल नसून कष्टदायकच असे. तेव्हां सामान्य जनतेस मार्गदर्शक होईल व आपली पारमार्थिक उन्नति स्वतःच करून घेण्यास साहाय्यक होईल अशा एखाद्या उपदेशकाची जनतेस आवश्यकता होती व तें कार्य भगवान् बुद्धानें केलें. तें कसें केलें हें आपणांस पाहा-वयाचें आहे.

## विचार-संक्रमण—

गौतम बुद्धाच्या कार्याचें अवलोकन करण्यापूर्वी आपणांस गौतम बुद्धासारखाच दुसरा एक महत्त्वाचा धर्मसंस्थापक महावीर याच्याहि कार्याकडे प्रथम थोडें लक्ष दिलें पाहिजे. महावीर व बुद्ध ह्यांचा जन्म होण्याच्या कालीं भरतखंडांत एक नवीन वैचारिक चळवळ चालू होती. तिचा उगम कदाचित् उपनिषदां-पासूनच झालेला असणें शक्य आहे. उपनिषदांमध्यें आपणांस ह्या सृष्टीचें अवलोकन करून या सृष्टीची उत्पत्ति व तिची चालना यांसंबंधीं, तसेंच मानवप्राणी व त्याचा आत्मा यांसंबंधीं विचार व्यक्त केलेले आढळतात. या प्रकारचेच विचार व्यक्त करणारे त्या वेळीं इतरहि कांहीं तत्त्वज्ञानी होऊन गेले. त्यांवर उपनिषदांप्रमाणें भगवद्गीतेंतील विचारांचाहि बराच पगडा बस-लेला होता असें दिसतें. त्या वेळीं समाजांत जीं निरनिराळीं दैवतें प्रचलित होतीं तीं सर्व एकाच परमेश्वराचीं निरनिराळीं रूपें होत ही कल्पना वैदिक ऋषींनींहि व्यक्त केलेली आढळते. ह्याच कल्पनेची पुढें वाढ होऊन एकेश्वरी अथवा परमात्मवादी पंथ उत्पन्न झाले. या प्रकारचे विचार आपणांस महाभारतांतहि व्यक्त केलेले आढळतात. त्यांत विशेषतः नारायणीय धर्म म्हणून जो वर्णन केलेला आहे त्यांत पुढील भागवत धर्माचें मूळ आढळतें. या विचारांच्या प्रसारापासूनच भागवत धर्म व अवतारांची कल्पना निघाली. या बाबतींत उपरिचर वसु, नारदमुनि, इत्यादिकांचा संबंध विशेष आढळतो. यांनीं यज्ञयाग करण्यापेक्षां भक्तीनें परमेश्वराची प्राप्ति होते असें प्रतिपादन केलें आहे. ह्यामध्यें विशेषतः वासुदेव याची भक्ति वर्णन केली आहे. यासच नारायणीय धर्म असें म्हणतात. वासुदेवास गोविंद, कृष्ण अशीं नांवेंहि दिलेलीं आढळतात. तसेंच त्याच धर्मास पांचरात्र अथवा भागवत धर्म असें म्हणतात. वासुदेवाचा उल्लेख पाणिनीच्या अष्टाध्यायींत आढळतो तसाच तो खि. पू. दुसऱ्या शतकांतील शिलालेखांत आढळतो. भगवंतांनीं नारदाला वासुदेव धर्म समजावून दिल्याचें वर्णन महाभारतांत आढळतें. त्यामध्यें हरीची भक्तियुक्त उपासना करणें व आवश्यक ग्रंथांस म्हणजे उपनिषदांस महत्त्व दिलेलें आहे. उपनिषत्कालीन विचारांतूनच वासुदेव धर्म उदयास आला व हेच विचार बौद्ध व जैन तत्त्वज्ञानाच्याहि मुळाशीं आहेत. भक्तिधर्माचा मूळ उपदेशक वासुदेव असून कृष्ण हें त्याचें अपरनाम आहे. वासुदेव धर्म व भगवद्गीतेंत सांगितलेला धर्म हे एकच आहेत व भगवद्गीतेंतील तत्त्वज्ञान हें उपनिषदें व दर्शनें यांतून घेतलेलें आहे. या धर्मांत भक्तीस प्राधान्य दिलें आहे व नारदाचीं भक्तिसूत्रें प्रसिद्ध आहेत. नारायण या देवतेच्या कल्पनेचा विकास ऋग्वेदकालापासून झालेला आहे. पुढें नारायण व वासुदेव यांचें ऐक्य कल्पिलें गेलें. ऋग्वेदांत विष्णूस फारसें प्रामुख्य नसलें तरी त्याबद्दल सूक्तें आहेत. पुढें वासुदेव व विष्णु यांचेंहि ऐक्य मानण्यांत येऊं लागलें. वासुदेव अथवा कृष्णपूजा आभीर लोकांनीं भारतांत आणली असावी व त्यांच्या देशासच कान्हदेश हें नांव मिळालें असावें. भागवत धर्माचें मूळ पांचरात्रसंहितेंत आहे. यावरून असें दिसून येईल कीं, महावीर जैन अथवा बुद्ध ह्यांच्या आगमनाच्या पूर्वींच भरतखंडांत यज्ञसंस्थेस प्रतिस्पर्धी अशी एक वैचारिक भूमिका व भक्तिसंप्रदायाची संस्था अगोदरच तयार झालेली होती. याप्रमाणेंच परमेश्वराची भक्ति केल्यामुळें ज्याप्रमाणें मोक्ष अथवा मुक्ति मिळते त्या-प्रमाणेंच सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्या केल्यानेंहि मनुष्य भवपाशापासून मुक्त होतो असे विचार व्यक्त करणारा आजीवक ह्या नांवाचाहि एक पंथ अस्तित्वांत आलेला होता. या यतिधर्माचे प्रवर्तक असे सहा प्रचारक निर्ग्रंथ ह्या नांवानें त्या वेळीं ज्ञात होते. ते म्हणजे (१) पूर्ण काश्यपबुद्ध, (२) मखली गोशाल, (३) निगंठ नातपुत्त, (४) अजित केशकंबल, (५) संजय बेलट्टे, (६) ककुध कात्यायन. यांपैकीं निगंठ नातपुत्त व महावीर हे एकच होत असेंहि एक मत आहे. या महावीरा-संबंधीं व त्याच्या पंथासंबंधीं उल्लेख बौद्ध वाङ्मयांतहि आढळतात. या नातपुत्तानें मुख्य पांच महाव्रतांचा पुरस्कार केलेला आढळतो. तीं म्हणजे: (१) अहिंसा, (२) सूनृत, (३) अस्तेय, (४) ब्रह्मचर्य व (५) अपरिग्रह (त्याग). महावीरानें या निर्ग्रंथ मतांतच सुधारणा केली. नवीन संप्रदायाची

स्थापना केली नाहीं असें एक मत आहे. कारण जैन वाङ्मयांतील चतुर्दश पर्वें, सूत्रें व आचारांग, इत्यादि वाङ्मय महावीरापूर्वींच अस्तित्वांत होतें असें दिसतें. बौद्ध संप्रदायहि महावीराच्या जैन संप्रदायापासून निघालेला नाहीं. कारण त्यानें हीं निग्रंथाचीं मुख्य तत्त्वें व विधी नाकबूल करून त्यावर टीका केलेली आहे. महावीराच्या निर्वाणाचा काल ख्रिस्तपूर्व ५२७ हा असावा.

## गौतम बुद्ध—

गौतम बुद्धाचा जन्म कपिलवस्तूजवळ असलेल्या लुंबिनी वनांत झाला. तो शाक्य कुलांतील असून त्याच्या बापाचें नांव शुद्धोदन व आईचें नांव माया असें होतें. याचें नांव प्रथम सिद्धार्थ असें असून बुद्ध हें नांव त्यास ज्ञानप्राप्तीनंतर मिळालें. बुद्धाच्या चरित्रांतील मुख्य गोष्टी पुढील वर्षांच्या सुमारास घडल्या असें दिसतें. ( १ ) बुद्धाचा जन्म ख्रिस्तपूर्व ५५७ ( २ ) त्याचा गृहत्याग ५२९ ( ३ ) बोधिप्राप्ति ५२२ ( ४ ) निर्वाण ४७८. बुद्धाचें चरित्र थोडक्यांत पुढीलप्रमाणें वर्णन करतां येईल : त्याच्या जन्मकाळीं कांहीं शुभ गोष्टी घडल्या. त्याचा विवाह गोपा नांवाच्या कन्येशीं झाला होता व त्यास राहुल या नांवाचा पुत्र होता. त्यास जरा, मृत्यु, वगैरे मानवी दुःखें पाहून संसाराचा वीट आला व तो गृहत्याग करून वैशालीस गेला. तेथें त्यास दुःखनाशक धर्माची प्राप्ति झाली नाहीं. तेथून तो राजगृहास गेला. तेथें बिंबिसार राजानें त्यास राहण्याचा आग्रह केला, पण तेथें न राहतां तो गयेस गेला. तेथें त्यानें तपश्चर्या केली. त्या वेळीं मारानें त्यास मोह पाडण्याचा प्रयत्न केला. तपानें बोधिप्राप्ति होत नाहीं हें कळून आल्यावर तो बोधिमंडाकडे गेला. बोधिद्रुमाखालीं तो आसनस्थ असतां मार व मारकन्या यांनीं त्यास वश करण्याचा प्रयत्न केला, पण तो यशस्वी झाला नाहीं. अखेरीस त्यास बोधितत्त्वाची प्राप्ति झाली व नंतर त्यानें धर्मचक्रपरिवर्तनास आरंभ केला व यापुढें लोकांस उपदेश करीत करीत आपलें आयुष्य व्यतीत केलें. बुद्धाच्या संप्रदायाचा प्रसार उत्तर हिंदुस्थानांत त्याच्या कालांतच झाला. त्यानें ब्रह्मावर्ताच्या बाहेर स्वतः चहूंकडे संचार केला होता. याच्या संप्रदायाचा उगम कोसल व मगध ह्या प्रांतांत झाला. बुद्धनिर्वाणानंतर लवकरच महाकश्यप ह्या त्याच्या शिष्यानें राजगृह येथें एक धर्मसंगीति भरवून बुद्धाच्या आज्ञांचा संग्रह केला व बौद्धांच्या आचारासंबंधीं व इतर नियम घालून दिले. यानंतर शंभर वर्षांनीं बौद्ध संप्रदायांतील निरनिराळ्या वचनांच्या अर्थासंबंधीं मतभेद उत्पन्न झाल्यामुळें वैशाली येथें दुसरी संगीति भरवून कांहीं निर्णय घेण्यात आले. ह्यानंतर तिसरी धर्मसंगीति प्रसिद्ध अशोक राजानें पाटलीपुत्र येथें भरविली होती. या संप्रदायाचा प्रसार अशोकानें त्यास दिलेल्या आश्रयामुळे व त्याच्या प्रसारास प्रत्यक्ष सहाय्य केल्यामुळें विशेष झाला. त्यानें दक्षिणेस महाराष्ट्र, म्हैसूर व सिलोनपर्यंत धर्मप्रचारक पाठविले. तसेंच उत्तरेकडे काश्मीर, वगैरे प्रांतांत धर्मप्रचारक पाठवून व सर्वत्र मठांची स्थापना करून भिक्षु व भिक्षुणी यांच्या योगक्षेमाची तरतूद केल्यामुळें ह्या संप्रदायाचा प्रसार सर्व दिशांनीं होत गेला. यानें या संप्रदायांतील तत्त्वें शिलालेखांवर व स्तंभांवर कोरून त्यांचा प्रसार केला. अशोकानंतर मिनँडर अथवा मिलिंद ह्या राजानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला. ह्याच सुमारास बॅक्ट्रिया व चीन या देशांत या संप्रदायाचा प्रसार झाला. कनिष्कानेंहि बौद्ध संप्रदायास आश्रय दिला असावा असें दिसतें. त्यानें इ. स. शंभर या सुमारास एक धर्मसंगीति भरविली होती. त्या वेळीं त्या संप्रदायामध्यें अठरा निरनिराळे पंथ निघाले होते. त्यांतील प्रमुख हीनयान व महायान असे दोन भाग होते. कनिष्काच्या धर्मसंगीतींत हीनयान पंथाचे लोक बरेच उपस्थित असून महायान पंथी लोक आले नाहींत. त्यामुळें हीनयान पंथीयांत ऐक्य प्रस्थापित झालें तसें महायान पंथांत झालें नाहीं. हीनयान पंथ दक्षिणेस सिलोनमध्यें व ब्रह्मदेशात प्रचलित राहिला व उत्तरेकडे व चीनमध्यें महायान पंथाचा विशेष प्रचार झाल्याचें दिसतें. इ. स.च्या आठव्या शतकानंतर हिंदुस्थानांतील बौद्ध संप्रदायाचा ऱ्हास होत गेला व पुढें मुसलमानी अमलांत त्यांचे मठ नष्ट झाल्यामुळें त्याचा लोप झाला व त्याचे अनुयायी ब्राह्मणी धर्मांत मिसळून गेले. तथापि एकंदर पाहूं जातां बौद्ध संप्रदायाचा प्रसार हिंदुस्थानाच्या बाहेर ब्रह्मदेश, सिंहलद्वीप, चीन, जपान, जावा, बलि, सुमात्रा, कोरिया, सयाम व तिबेट, इत्यादि देशांत झालेला असून जरी हिंदुस्थानांतून तो बहुतेक नष्ट झाला असला तरी त्या देशांत त्याचें अस्तित्व कायम आहे. अलीकडे तर युरोपांतहि बौद्ध संप्रदायाचे अनुयायी आढळून येतात व त्या देशांत त्यांची संख्या वीस हजारांहूनहि अधिक असल्याचें सांगण्यांत येतें. एकंदर जगांत आज ख्रिस्ती संप्रदायानंतर बौद्ध संप्रदायी लोकांची संख्या इतर धर्मीयांपेक्षां अधिक आहे. भूतानमध्यें या पंथास दक्पा म्हणतात. ब्रह्मदेशांत अकराव्या शतकापासून या पंथाचा प्रसार झाला. आसामांत याचा ऱ्हास होत आहे. सिलोनमध्यें यांची संख्या मोठी आहे. चीन देशांत सन ६५ मध्यें याचा प्रवेश व सातव्या शतकापर्यंत फार उत्कर्ष झाला. जपानमध्यें हा पंथ टिकून आहे. यवद्वीपात शिव व बुद्ध हे दोन्ही पंथ सलोख्यानें राहतात. सुमात्रांत आतां हा नाममात्र आहे. कोरियात याचें अस्तित्व

चांगलेंच आहे. तिबेटांतील लामा धर्म प्रसिद्धच आहे. याप्रमाणें याचा विस्तार थोडक्यांत सांगतां येईल.

### तिपिटक—

बौद्धांचा तिपिटक अथवा पालीधर्मशास्त्र या नांवाचा प्रसिद्ध ग्रंथ आहे. त्यामध्यें ह्या संप्रदायाचें चित्र पूर्णपणें रेखाटलें आहे. या तिपिटकाचे विनय, सुत्त व अभिधम्म असे तीन भाग आहेत. विनयपिटकाचे सुत्तविभंग, खंधक व परिवार असे तीन भाग असून सुत्तपिटकांत पांच निकाय आहेत ते म्हणजे : (१) दीघ निकाय, (२) मज्झिम निकाय, (३) संयुक्त निकाय, (४) अंगुत्तर निकाय व (५) खुद्दक निकाय हे होत. यांमध्यें उपदेशपर सूत्रें, संभाषणें व संवादकथा व कांहीं जातकांचा संग्रह आहे. अभिधम्म पिटकांत सात भाग असून त्यांत निरनिराळे संकीर्ण विषय आहेत. या तिपिटकाशिवाय बौद्ध वाङ्मयांत पाली भाषेंत, मिश्र संस्कृत भाषेंत व शुद्ध संस्कृत भाषेंत लिहिलेले अनेक ग्रंथ आहेत. त्यांतील बरेच हिंदुस्थानबाहेर लिहिलेले आहेत.

### पौराणिक वंशावळी—

पूर्वी सांगितलेंच आहे कीं, भारतीय युद्धानंतर भरतखंडामध्यें जे राजवंश होऊन गेले त्यांचें वर्णन पुराणात केलेलें आहे. विशेषतः या राजघराण्यांचें वर्णन मत्स्य, वायु, ब्रह्माण्ड, विष्णु, भागवत, गरुड व भविष्य ह्या पुराणांत आढळतें. मत्स्य पुराणांत उत्तरकालीन पौरव घराण्यांतील परंपरा दिली असून तिचा पूर्वीच्या घराण्यांशीं संबंध दाखविला आहे. तर इतर पुराणांत उत्तरकालीन घराणीं स्वतंत्र दाखविलेलीं आहेत. भागवत पुराणामध्यें इक्ष्वाकूचा वंश सुसंगत दाखविला आहे व इतर घराणीं वेगळीं दाखविलीं आहेत. या सर्व पुराणांत वर्णन केलेले राजे भविष्यकाळांत होतील असें वर्णन आढळतें. परंतु वास्तविक ते पूर्वीच होऊन गेले असून ह्या पुराणांत त्यांचें वर्णन मागाहून करण्यांत आलें आहे. केवळ भाषा तशी वापरली आहे. या पुराणांचें मूळ कदाचित् प्राकृत वृत्तांत असावें व विशेषतः मगध देशामध्यें या प्राकृत गाथांचा वगैरे प्रचार विशेष असावा असें वाटतें. मत्स्य पुराणांत आंध्र राजांपर्यंतच वंशावळी दिल्या आहेत. परंतु वायु, ब्रह्माण्ड, विष्णु, आणि भागवत या पुराणांत गुप्तांच्या काळापर्यंत वर्णन केलेलें आढळतें. तथापि त्यामध्यें समुद्रगुप्ताच्या विजयांचा उल्लेख आढळत नाहीं. यावरून या पुराणांची रचना चंद्रगुप्ताचा मृत्युकाल म्हणजे सुमारें इ. स. ३३५ या सुमारास पूर्ण झाली असावी. त्यांतहि मत्स्य पुराण हें या कालापूर्वीच पूर्ण झालें असून वायु व ब्रह्माण्ड या पुराणांत पुढील हकीकत मागाहून जोडली गेली असावी.

या पुराणांमध्यें कुरुयुद्ध-कालापासून गुप्त-कालापर्यंत होऊन गेलेल्या निरनिराळ्या राजांच्या व घराण्यांच्या वंशावळी दिलेल्या आहेत. त्यांमध्यें पौरव घराण्याचा आरंभ अभिमन्यु, परीक्षित व जनमेजय यांचेपासून करून क्षेमक या राजापर्यंत सुमारें तीस राजांचीं नांवें दिलीं आहेत. इक्ष्वाकू घराण्यात बृहद्बल राजापासून सुमित्र राजापर्यंत एकतीस नांवें दिलीं आहेत. ह्यांतच शाक्य, शुद्धोदन, सिद्धार्थ, राहुल ह्या नांवांचा समावेश केला आहे. हीं नांवें बुद्धाशीं संबद्ध आहेत हें उघड आहे. भारतीय युद्धापूर्वीच भीमानें मारलेला जरासंध राजा मगध देशाचा सम्राट् होता. त्याचा पुत्र सहदेव हा पांडवांच्याच पक्षांत असून तो भारतीय युद्धांत मारला गेला. त्यानंतर सोमाद्रि हा मगध अथवा गिरिव्रज राज्याचा राजा झाला. त्यानंतर विश्वजित् व शत्रुंजय ह्या राजांपर्यंत सुमारें तेवीस राजांचीं नांवें व त्या राजांच्या कारकीर्दीचीं वर्षें दिलेलीं आहेत. त्याच्यानंतर प्रद्योत नांवाच्या घराण्यांत पांच राजे होऊन गेल्याचें वर्णन आहे. त्यानंतर शिशुनाग घराण्यांतील सुमारें दहा राजांचीं नांवें दिलेलीं आढळतात. ह्यांत बिंबिसार व अजातशत्रु हे बुद्धकालीन राजे दृष्टीस पडतात. तसेंच कुसुमपूर अथवा पाटलीपुत्र ह्या शहराची स्थापना ह्याच घराण्यांतील उदय या राजानें केल्याचें वर्णन आढळतें. यानंतर नन्द घराण्याचें वर्णन आढळतें. त्यांत महानंदाचा पुत्र महापद्मनंद व त्याचे आठ पुत्र यांनीं एकंदर शंभर वर्षें कारभार चालवून त्यांतील शेवटचा नन्द कौटिल्य ह्या ब्राह्मणाकडून मारला जाऊन चंद्रगुप्त नांवाचा मौर्य राजा राज्यावर स्थापन केला जाईल असें वर्णन केलें आहे. यानंतर चंद्रगुप्त चोवीस वर्षें, बिन्दुसार पंचवीस वर्षें, अशोक छत्तीस वर्षें व त्याचा पुत्र कुणाल आठ वर्षें राज्य करील असें वर्णिलें आहे. यानंतर कुणालापासून बृहद्रथापर्यंत मौर्य घराण्याची सत्ता चालत राहून बृहद्रथास त्याचा सेनापति पुष्यमित्र हा ठार करून शुंग वंशाची स्थापना करील असें लिहिलें आहे. या शुंग घराण्यांत अग्निमित्रापासून देवभूमीपर्यंत नऊ राजे राज्य करतील व देवभूमीस त्याचा प्रधान वसुदेव हा पदच्युत करून स्वतः राज्यपद घेऊन काण्व वंशाची स्थापना करील. या काण्व वंशांत एकंदर चार राजे होऊन गेल्यानंतर आन्ध्र घराण्याचा उदय होईल व त्या घराण्यांत सिमुकपासून पुलुमायीपर्यंत सुमारें एकतीस राजे राज्य करतील. आंध्रांनंतर त्यांचे नोकर आन्ध्रभृत्य राज्य घेतील व त्यानंतर सात आन्ध्र, दहा आभीर, सात गर्दभी, अठरा शक, आठ यवन, चौदा तुषार व तेरा गुरुण्ड व अकरा मौन असे राजे होतील, इत्यादि वर्णन मत्स्य, वायु व ब्रह्माण्ड पुराणांत आढळतें. इतकी वंशावळ या तीन पुराणांत आढळते. यावरून या पुराणांच्या रचनाकालापर्यंतचा इतिहास जेवढा या पुराणकारांस

माहीत होता तेवढा त्यांनीं या पुराणांत ग्रथित केलेला असून तेथें त्यांनीं तो सोडून दिलेला आहे, म्हणजे पुराणकारांच्या दृष्टीनें जरी भाषा भविष्यकालीन असली तरी इतिहास वर्तमान-कालापर्यंत दिलेला असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें पुराणरचनाकालापर्यंत भरतखंडाच्या इतिहासाचें त्रोटक वृत्त आहे.

## बुद्धकालीन भारतवर्ष—

बुद्ध आपल्या धर्माचा उपदेश करूं लागला त्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत चार प्रबळ राज्यें अस्तित्वांत होतीं. त्यांतील सर्वांत महत्त्वाचें मगध देशांतील राज्य होय. त्याची राजधानी प्रथम राजगृह येथें होती. तेथून पुढें तिची पाटलीपुत्र अथवा पाटणा ह्या शहरीं स्थापना करण्यांत आली. या ठिकाणीं शिशुनाग घराण्यातील बिंबिसार नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचा वध करून त्याचा पुत्र अजातशत्रु हा राजा झाला. हे दोघेहि गौतम बुद्धाचे अनुयायी होते. दुसरें राज्य कोसल देशाचें असून याची राजधानी श्रावस्ती येथें होती. तेथें प्रसेनजित् हा राजा गादीवर होता. ह्याचाहि उल्लेख बौद्ध वाङ्मयांत अनेक ठिकाणीं येतो. तिसरें वत्स राज्य. याची राजधानी यमुनेच्या तीरावर कौशांबी येथें होती व तेथें उदयन राजा राज्य करीत असे. त्याच्यापलीकडे दक्षिण दिशेस अवंती राज्य असून त्याची राजधानी उज्जयिनी येथें होती व त्या ठिकाणीं प्रद्योत नांवाचा राजा राज्य करीत होता. अवंतीची राजकन्या वासवदत्ता व कौशांबीचा राजा उदयन, अथवा वत्सराज यांच्या विवाहाची कथा स्वप्नवासवदत्ता या नाटकांत भासानें वर्णन केलेली आहे. या कथेचा उल्लेख धम्मपदाच्या एकवीस ते तेवीस या श्लोकांमध्यें आढळतो. या निरनिराळ्या ठिकाणच्या राजांचे आपसांत कलह व युद्धें नेहमींच होत असत. ह्यांपैकीं मगध देशांतील व कौशांबी येथील राजांसंबंधीं अनेक उल्लेख बौद्ध वाङ्मयांत व दीपवंश व महावंश ह्या ग्रंथांत आढळतात; तसेंच कल्पद्रुमकालिका या जैन ग्रंथांतहि तत्कालीन राजांचीं वर्णनें दृष्टीस पडतात. यासंबंधीं विशेष विस्तृत इतिहास देण्यास येथें अवकाश नाहीं. त्या वेळच्या हिंदुस्थानांतील एकंदर निरनिराळ्या प्रदेशांतील राज्यांचें थोडक्यांत वर्णन द्यावयाचें तर पुढीलप्रमाणें देतां येईल :—

(१) अंग—हें राज्य मगधांच्या पूर्वेस असून त्याची राजधानी चंपा येथें होती. तें मगधांचें मांडलिक असावें. अंग राज्याबद्दल अनेक आख्यायिका आढळतात.

(२) मगध—हें राज्य फार विस्तृत असून तें सध्याच्या बिहार प्रांतांत पसरलेलें होतें. यामध्यें ऐंशीं हजार गांवें असून त्याचा विस्तार तेवीसशें चौरस मैल असावा. या देशाच्या प्रख्यात बुद्धकालीन राजांचीं नांवें बिंबिसार व अजातशत्रु हीं वर दिलीं आहेत.

(३) काशी—ह्यामध्यें काशी नगराभोंवतालच्या प्रदेशाचा समावेश होत असे. हें एका कालीं स्वतंत्र राज्य होतें. परंतु बहुधा तें कोसल राज्याचें मांडलिक बनलें असावें.

(४) कोसल—हें राज्य सध्यांच्या नेपाळ ह्या प्रदेशावर पसरलें असावें. याची राजधानी श्रावस्ती ही गोरखपूरच्या वायव्येस सत्तर मैलांवर असून त्याचा विस्तार दक्षिणेस गंगा नदीपर्यंत व पूर्वेकडे गंडकी नदीपर्यंत असावा. या राज्यांतच बनारस व साकेत ह्यांचा समावेश होत असे.

(५) वज्जी—यांचा एक आठ कुलांचा संघ असून त्यांत लिच्छवी व विदेह हीं कुलें प्रसिद्ध होतीं. हें राज्य प्रजासत्ताक होतें. याची राजधानी मिथिला ही असून तेथें प्रसिद्ध जनक राजा राज्य करीत होता. सध्यां जनकपूर म्हणून जें गांव आहे त्यास या राजावरून नांव मिळालें असावें असें वाटतें. या राजाबद्दल बौद्ध वाङ्मयांत, तसेंच पौराणिक वाङ्मयांतहि अनेक उल्लेख आढळतात.

(६) मल्ल—ह्यांची कुशीनार व पावा येथें राज्यें होतीं. ह्यांचा प्रदेश शाक्यांच्या दक्षिणेस व वज्जी लोकांच्या पूर्वेस होता.

(७) चेदि (अथवा चेती)—हे लोक प्रथम नेपाळमध्यें असून पुढें कौशांबीच्या पूर्वेस राहिले असावेत. ह्यांचाहि उल्लेख पौराणिक वाङ्मयांत अनेकदां आढळतो. रुक्मिणीचा नियोजित पति शिशुपाल हा चैद्य राजा होता.

(८) वत्स (अथवा वंश)—यांची राजधानी कौशांबी येथें असून त्यांचा प्रदेश अवंतीच्या उत्तरेस यमुनेच्या कांठावर असावा.

(९) कुरु—यांची राजधानी प्रसिद्ध इन्द्रप्रस्थ येथें होती. ह्या राज्याचा विस्तार दोन हजार मैल असावा. याच्या पूर्वेस पांचाल व दक्षिणेस मत्स्य हे देश होते.

(१०) पांचाल—यांचीं दोन राज्यें असून तीं काम्पिल्य व कनोज ह्या ठिकाणीं होतीं. हा प्रदेश यमुना नदीच्या उत्तरेस असावा.

(११) मत्स्य—हा देश यमुनेच्या पश्चिमेस व कुरु देशाच्या दक्षिणेस असून तेथील राजांचा उल्लेख बौद्ध व पौराणिक ग्रंथांत अनेक ठिकाणीं आढळतो. विराट हा मत्स्य देशाचा राजा प्रसिद्ध होता.

(१२) शूरसेन—ह्या राज्याची राजधानी मथुरा ही होती ह्या देशाच्या नांवावरूनच शौरसेनी ह्या प्राकृत भाषेस नांव मिळालें आहे.

(१३) अश्मक—ह्या लोकांचें राज्य गोदावरीच्या कांठीं असून त्यांची राजधानी पोतन किंवा पोटली ही होती. ह्यांचा उल्लेख अवन्तीबरोबर केलेला आढळतो.

(१४) अवन्ती—या देशाची राजधानी उज्जयिनी येथें असून ह्यासच पुढें मालव म्हणूं लागले.

(१५) गांधार—पूर्वीचा गांधार म्हणजे सध्यांचा कंदाहार हा भाग होय. त्याची राजधानी तक्षशिला या प्राचीन प्रसिद्ध शहरीं होती. येथील विद्यापीठ फार प्रसिद्ध होतें.

(१६) कांबोज—हा प्रदेश वायव्येकडे असून गांधाराजवळच होता.

वरील प्रदेशांच्या नांवांवरूनच बुद्धकालीं एकंदर आर्य संस्कृतीचा विस्तार उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र झालेला असून दक्षिणेकडे फक्त गोदावरीपर्यंत झालेला दिसून येतो. तसेंच वंग देश म्हणजे बंगाल ह्याच्या पूर्वेकडील प्रदेशांचा उल्लेख ह्या वाङ्मयांत आढळत नाहीं. त्यावरून ह्या प्रदेशांत आर्य संस्कृतीचा प्रसार ह्या कालापर्यंत झाला नसावा असें दिसतें.

दक्षिणापथ ह्या प्रदेशाचा उल्लेख बौद्धांच्या सुत्तनिपात या प्राचीन ग्रंथांत आढळतो. तसेंच कलिंग अरण्य म्हणून पूर्वेकडील कलिंग देशाचा उल्लेख केलेला असून त्याची राजधानी दंतपुर असल्याचें वर्णन आहे. विनयपिटकामध्यें भरुकच्छ म्हणून भडोचचा उल्लेख आढळतो व उदान ह्या ग्रंथांत सोपारा या बंदराचाहि उल्लेख दृष्टीस पडतो. दक्षिणेकडील सर्वांत दूरचें शहर म्हणजे गोदावरीकांठचें प्रतिष्ठान अथवा पैठण हें बौद्ध कालीं परिचित होतें असें दिसतें.

**बौद्धकालीन समाज—**

बौद्धांच्या जातककथा व इतर वाङ्मय यांवरून तत्कालीन लोकांच्या राहणीची व सामाजिक परिस्थितीची कांहींशी कल्पना येते. तत्कालीन शहरांभोंवतीं तट व खंदक असून त्यांस मोठमोठ्या वेशी व पहाऱ्याकरितां बुरूज असत. घरांसभोंवतीं मोकळी जागा असे. घरें बहुतेक लांकडी व मातीचीं बांधलेलीं असावींत. महोसध ह्यानें जमिनीखालीं एक मोठा वाडा बांधल्याचें वर्णन एका जातककथेंत आढळतें. सत्तभूमक पासाद या सात मजली इमारतीचें वर्णन एका ठिकाणीं दृष्टीस पडतें. परंतु तशी इमारत तेथें कोठेंहि उत्तर कालांत आढळली नाहीं. शहरांतून न्हाणीघरें व पावसाचें पाणी वाहून जाण्याकरितां मोठमोठीं गटारें जमिनीखालून बांधलेलीं आढळतात व त्यांतून कोल्हे व लांडगे आंत येत अशीं वर्णनें आढळतात. त्या वेळीं प्रेतें जाळण्याची चाल असे.

त्या वेळीं लोकांमध्यें प्रचलित असलेले धंदे पाहिल्यास पुढील-प्रमाणें आढळून येतात—(१) महात, (२) घोडेस्वार, (३) सारथी, (४) तिरंदाज, (५) सैन्यांतील निरनिराळे प्रकार, (६) गुलाम, (७) स्वयंपाकी. (८) न्हावी, (९) स्नानगृहांतील सेवक, (१०) हलवाई, (११) माळी, (१२) धोबी, (१३) कोष्टी, (१४) बुरूड, (१५) कुंभार, (१६) कारकून, (१७) फडणीस, इत्यादि. ह्यांखेरीज निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकांचे संघ असत. अशा तऱ्हेचे संघ अठरा असल्याचा उल्लेख आढळतो व ही जातींची संख्या अठरा पगड जाती या वाक्प्रचारांत आपणांस दिसून येते. हे संघ सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें असावेत: (१) सुतार, (२) धातुकाम करणारे, (३) पाथरवट, (४) कोष्टी, (५) चांभार, (६) कुंभार, (७) हस्तीदंती कारागीर, (८) रंगारी, (९) सोनार, (१०) मच्छीमार, कोळी, (११) खाटिक, (१२) शिकारी व पारधी, (१३) आचारी व हलवाई, (१४) न्हावी व संवाहक, (१५) माळी, (१६) नाविक, (१७) दोरखंडे वळणारे व बुरूड आणि (१८) चितारी.

त्या वेळीं मालाची ने-आण करण्याचा प्रघात गाड्या किंवा बैलांच्या तांड्यांच्या सहाय्यानें करण्याचा होता. त्या वेळीं सडका किंवा पूल नसत व अनेक ठिकाणीं कर व जकात द्यावी लागे व संरक्षकांचाहि खर्च करावा लागे. समुद्रकिनाऱ्यानें लहान-मोठ्या होड्यांतून माल नेत-आणीत असत. या कालांतील व्यापारी माल म्हटला म्हणजे रेशमी कापड, मलमल, चिलखतें, नक्षीचीं कामें, पांघरुणें, सुगंधी द्रव्यें, औषधें, हस्तीदंती जिन्नस, जवाहीर, सोनें, वगैरे असत.

प्रथम व्यापार अदलाबदलीनें होत असे. पण पुढें कार्षापण, वगैरे नाणीं प्रचारांत आल्यामुळें विनिमयपद्धति बंद पडली. नाणीं बहुधा व्यापारी शिक्क्यांचीं असत. राजमुद्रांच्या शिक्क्यांचीं नाणीं अद्यापि दृष्टीस पडत नाहींत. नाण्यांप्रमाणेंच हुंडीचा व्यवहारहि बराच चालत असे. मोठमोठ्या शहरांतून व्यापारी परस्परांवर हुंड्या लिहीत.

समाजांतील लोकांची आर्थिक स्थिति सामान्यतः चांगली होती. अन्नाची ददात कोणास नसे. शेतीकरितां जमीन मुबलक असून ती बहुधा शेतकऱ्यांच्या मालकीची असे. त्या वेळीं मध्यम वर्गांतील सुखवस्तु लोक व व्यापारी बरेच असावेत. परंतु फार श्रीमंत लोक फक्त कांहीं शहरांतून व तेहि थोडेच असत.

## राजमार्ग—

त्या वेळीं दळणवळणाचे मार्ग मुख्यतः निरनिराळीं शहरें एकमेकांस जोडणारे राजमार्ग असत. असा एक मार्ग उत्तरेकडील श्रावस्ती शहरापासून दक्षिणेकडे प्रतिष्ठान नगरापर्यंत गेलेला होता व त्यावर दक्षिणेकडून उत्तरेकडे माहिष्मति उज्जयिनी, गोनर्द, मिथिला, कौशांबी, साकेत हीं टप्प्यांचीं ठिकाणें होतीं. दुसरा मार्ग श्रावस्तीपासून राजगृहापर्यंत पर्वताच्या पायथ्यापायथ्यानें व नंतर दक्षिणेकडे गेलेला आढळतो. ह्या मार्गांत पुढील टप्पे आढळतात, सेतव्य, कपिलवस्तु, पावा, कुशीनार, हस्तिग्राम, भंडग्राम, वैशाली, पाटलीपुत्र व नालंद. यानंतर हा मार्ग बुद्धगयेवरून ताम्रलिप्तीपर्यंत व तेथून समुद्रापर्यंत गेला असावा. ह्यांखेरीज नद्यांच्या कांठाकांठानें जाणारे इतर मार्ग आढळतात. तसेंच गंगा व यमुना या नद्यांतून नावांनींहि दळणवळण चालत असे व गंगा नदींतून पुढें ब्रह्मदेशापर्यंत समुद्रकिनाऱ्यानें प्रवास करतां येत असे. याखेरीज विदेह देशापासून गांधारापर्यंत व मगधापासून सोवीराकडे व भरुकच्छ व सोपारा व तेथून समुद्रमार्गानें ब्रह्मदेश व त्यापलीकडेहि नावांचें दळणवळण असल्याचे उल्लेख आढळतात. मिलिंद प्रश्नांत चीनबरोबर व्यापार असल्याचा उल्लेख आढळतो. तसेंच हिंदुस्थानांतून बाबिलोनपर्यंत सफर केल्याचाहि निर्देश दिसून येतो. मोहनजोदरो येथें असुर लोकांची एक वसाहत होती. यावरून भरतखंड व असुरिया आणि बाबिलोनिया यांमध्यें अखंड दळणवळण चालू होतें ही गोष्ट स्पष्ट होते. अजंठा येथील एका बौद्ध लेण्यांत इराणी बादशहाकडून दक्षिण भारतांतील एका राजाकडे आलेल्या वकील मंडळाचें चित्र रेखाटलेलें आढळतें.

## लेखनकला—

बौद्ध वाङ्मयांतील शील नांवाच्या ग्रंथांत अक्षरिका या नांवाच्या खेळाचा जो उल्लेख आहे त्यावरून त्या वेळीं म्हणजे खिस्तपूर्व ५०० च्या सुमारास भरतखंडांत लेखनकला प्रचलित होती ही गोष्ट उघड आहे. विनयपिटकामध्यें लेखनकला ही एक उत्तम कला असल्याचें वर्णन आहे. तसेंच लेखनासंबंधीं इतरहि अनेक उल्लेख आढळतात. यावरून त्या काळीं लेखनकला रूढ होती ह्याबद्दल संशय राहत नाहीं. त्या कालांत एकंदर निरनिराळे जे संप्रदाय अस्तित्वांत होते त्यांच्या तत्त्वज्ञानाचें विवेचन करण्यासाठीं व इतकी प्रगत राज्यपद्धति चालविण्यासाठीं लागणाऱ्या तत्कालीन लोकांचें भाषाज्ञान बरेंच वाढलेलें असलें पाहिजे. ही भाषा अर्थातच आज जी आपणांस ग्रांथिक संस्कृत भाषा दिसते ती नसून इतक्या विस्तृत प्रदेशांत सामान्य माणसास समजेल अशी प्राकृत भाषा असावी व संस्कृत हें तिचेंच शिष्ट रूप असावें. संस्कृत भाषेंतील नाटकांवरून असें दिसतें कीं, त्या वेळची सुलभ संस्कृत भाषा सर्व लोकांस समजत असावी, परंतु बहुजनसमाजाची बोलण्याची भाषा मात्र प्राकृत असावी.

## बौद्ध मठांस दानें—

तत्कालीन समाजांतील एक विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्या वेळचे जे निरनिराळे दानलेख आढळतात ते बहुतेक पालींत किंवा तत्सदृश प्राकृत भाषेंत लिहिलेले आढळतात व हीं बहुतेक दानें बौद्ध भिक्षूंस व भिक्षूंच्या मठांस दिलेलीं दृष्टीस पडतात. खिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून खिस्तोत्तर चौथ्या शतकापर्यंत ब्राह्मणी धर्माशीं संबद्ध अशा इमारती अथवा लेणीं, वगैरे कोठेंहि आढळत नाहींत. उलट बौद्धांचे विहार, मठ व लेणीं मात्र अनेक आढळतात व त्यांस दानें दिल्याचे शिलालेखहि दृष्टीस पडतात. उत्तरकालीं मात्र जेव्हां मोठमोठ्या राजेलोकांनीं यज्ञ, वगैरे विधी केल्याचें दृष्टीस पडतें तेव्हांपासूनच ब्राह्मणांस दानें दिल्यासंबंधीं ताम्रपट अथवा शिलालेख आढळून येतात. तत्पूर्वी ब्राह्मण लोक स्वतः शेती करून आपला स्वतःचा निर्वाह व आश्रमाचा खर्च भागवीत असत असें दिसतें. त्यामुळें ब्राह्मणांचीं जीं गुरुकुलें असत त्यांस देणगीची अपेक्षा नसावी असें वाटतें. पूर्वीच्या आश्रमांचीं जीं वर्णनें आढळतात त्यांवरूनहि ऋषींच्या तपोवनांस फक्त राजांचा कर माफ असे. बाकीचा आश्रमाचा खर्च ते स्वतः करीत असत असें दिसून येतें. दानलेखांमध्यें बहुतेक जी शब्दयोजना आढळते व विशेषतः जेथें बौद्ध व ब्राह्मण यांस दानें दिल्याचा उल्लेख येतो तेथें ' श्रमणब्राह्मणाः ' असा शब्दप्रयोग आढळतो. यावरून प्रथम श्रमणांस व नंतर ब्राह्मणांस अशीं दानें देण्याची प्रथा पडली असावी असें दिसतें. हिंदुधर्मी अनेक राजांनींहि श्रमणांस दानें दिल्याचे उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात.

## आर्यांची भाषा—

आर्यांच्या प्रसाराबरोबर त्यांच्या भाषेवरहि स्थानिक परिस्थितीचा परिणाम होत गेला असावा असें दिसतें. आर्यांच्या वैदिक भाषेवरहि द्राविड भाषांतील शब्द व वर्ण यांचा परिणाम उपनिषत्कालापासूनच होत गेला असल्याचें आपणांस छांदोग्य उपनिषदावरून दिसून येतें. त्यांत मटची हा द्राविड शब्द टोळ या अर्थी वापरलेला आहे. पूर्वमीमांसेच्या काळीं तर संस्कृतेतर अनेक शब्द संस्कृत भाषेंत शिरल्याचे उल्लेख पतंजलीनें

केलेले आहेत. यास्क या निरुक्तकारांनीं भाषेंतील निरनिराळया शब्दांचीं प्रादेशिक रूपें भिन्न भिन्न असतात ही गोष्ट सोदाहरण दाखविली आहे. आर्य लोकांचा प्रसार भरतखंडामध्यें जसजसा दूरवर होत गेला तसतसें प्राकृत भाषांस व्यवहारांत महत्त्व येऊन संस्कृत भाषा ही फक्त शिष्ट लोकांची भाषा झाली व विशिष्ट प्रकारचें वाङ्मय त्या भाषेंत लिहिलें जाऊं लागलें व सामान्य लोकांचें वाङ्मय प्राकृत भाषांत तयार होऊं लागलें. दक्षिण हिंदुस्थानांत याच्या उलट परिस्थिति झाली. तेथें द्राविड भाषांवर संस्कृत भाषेचें वर्चस्व स्थापन झालें व अनेक संस्कृत शब्द द्राविड भाषांत प्रवेश करते झाले व त्या भाषांत संस्कृत तत्सम व तद्भव शब्दांचा इतका मोठा भरणा झाला कीं, त्या भाषांच्या व्याकरणावरहि याचा मोठा परिणाम झाला. बौद्ध संप्रदाया-बरोबर पाली भाषेचा बराच प्रसार होत गेला. परंतु त्याच्या ऱ्हासानंतर जैन संप्रदायाची भरभराट झाली व त्यांनीं आपलें वाङ्मय महाराष्ट्रीय प्राकृतमध्यें रचलें. जैन वाङ्मयांत कथा-वाङ्मय व पुराणवाङ्मय विशेष वाढीस लागलें. तसेंच पौराणिक वाङ्मयाचा परिणाम द्राविड वाङ्मयावरहि होऊन द्राविड भाषेंतील अभिजात वाङ्मय म्हणजे रामायण व महाभारत यांतील विषयांवरच रचलेलीं द्राविड कवींचीं काव्यें होत अशी परि-स्थिति उत्पन्न झाली.

बौद्ध व जैन ह्या संप्रदायांची जरी कांहीं काळ भरभराट झाली तरी ब्राह्मणी धर्मापुढें त्यांचा फार काळ टिकाव लागला नाहीं. ब्राह्मणांनीं आपल्या धर्मामध्यें अनेक नवीन नवीन गोष्टींचा स्वीकार करून आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें. परंतु हें करण्या-करितां त्यांना फार जबरदस्त किंमत द्यावी लागली.

## समाजस्थैर्याकरितां ब्राह्मणांनीं केलेला त्याग—

ब्राह्मणांकडे सामाजिक महत्त्व व तत्त्वज्ञान ह्यांचा मक्ता आला खरा, परंतु त्यांस आपल्या वैदिक देवता, वैदिक भाषा व वैदिक तत्त्वज्ञान हीं जवळजवळ नामशेष झालेलीं पाहण्याचा प्रसंग आला. समाजामध्यें अनेक देवतांस प्राधान्य प्राप्त झालें. वैदिक दैवतें फक्त नाममात्र उरलीं. वैदिक यज्ञहि तुरळक राहिले. परंतु अनेक देवतांस बळी देण्याच्या रूपानें प्राणिहिंसा मात्र चालूच राहिली. ब्राह्मणांस वैदिक देवतांचें पूजन सोडून अनेक नवीन देवतांची नवीन नवीन मंत्रांनीं पूजा-अर्चा करणें व अशा देवतांस पूजणाऱ्या लोकांस मान देणें भाग पडूं लागलें व नवीन देव-तांच्या स्तुतिपर नवीन पौराणिक व धार्मिक वाङ्मय तयार करावें लागलें. प्राचीन कल्पनांस नवीन रूपें देतांना ऐतिहासिक व तात्त्विक दृष्टि कमी झाली. वैदिक गंभीर सूक्तांच्याऐवजीं आधु-निक स्तोत्रें व माहात्म्यें तयार झालीं. त्यामुळें पूर्वीचें उदात्त स्वरूप जाऊन सर्व गोष्टींस सामान्य स्वरूप प्राप्त झालें. याचें एक प्रतीक पुढील गोष्टींत दिसून येतें तें हें कीं, यादव कालांत वैदिक संस्कारांवर ग्रंथ होण्याच्याऐवजीं मतखंड तयार झाला.

## नंदोत्तर राजे—

भारतीय युद्धानंतर पुराणग्रंथात जीं निरनिराळीं राजघराणीं दिलेलीं आढळतात त्यांचा उल्लेख पूर्वीं केलाच आहे. त्यांत सामान्यतः नंद घराण्याच्या अंतापासून क्षत्रिय राज्यकर्त्यांचा लोप झाला अशी समजूत आहे. नंद घराण्याचा शेवट झाल्या-नंतर चंद्रगुप्त मौर्य चाणक्याच्या साहाय्यानें गादीवर बसला. ह्या चंद्रगुप्तानें अलेक्झांडरचा सेनापति व त्याचा पूर्वेकडील साम्राज्याचा वारस सेल्युकस निकेटार ह्याचा पराभव केल्यामुळें तो बराच प्रसिद्ध आहे. यानें सेल्युकस निकेटारच्या मुलीशीं लग्न केलें होतें व ह्याच्या दरबारांत मेग्यास्थिनीस ह्या नांवाचा एक ग्रीक वकील ठेवण्यांत आला होता. त्यानें तत्कालीन सामाजिक स्थितीची बरीचशी माहिती लिहून ठेवली होती. परंतु त्यापैकीं फारच त्रोटक माहिती आज उपलब्ध आहे. तथापि त्यावरून तत्कालीन परिस्थितीचा बराचसा बोध होण्यासारखा आहे. चंद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा बिंबिसार हा गादीवर बसला. याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाहीं. त्यानंतर त्याचा पुत्र अशोकवर्धन हा राज्यारूढ झाला. हा राजा मोठा पराक्रमी असून त्यानें हिंदुकुशपासून कलिंगापर्यंत व दक्षिण भारताचेंहि साम्राज्य चालविलें. कलिंग देशावर केलेल्या स्वारीमुळें बराच मनुष्यवध झाल्यामुळें त्यास उपरति होऊन त्यानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला व आपल्या राज्यांत हिंसा बंद केली. यानें आपलीं शासनें अथवा आज्ञा निरनिराळया प्रदेशात स्तंभांवर व शिलांवर कोरून ठेवल्या आहेत व त्यांत मानवांचीं अंतःकरणें आकर्षून घेणें हाच खरा विजय होय असें सांगितलें आहे. तसेंच बौद्ध संप्रदायाचा सहाशें योजनें दूरवर व दक्षिणेस चौल, पांड्य, भोज, कांबोज, इत्यादि देशांत प्रसार केल्याचें वर्णन केलेलें आहे. यानें बौद्ध धर्माच्या प्रसाराकरितां सर्व देशांत उपदेशक पाठवले व त्यांनीं दक्षिणेकडे सिलोन बेटांतहि ह्या धर्माचा प्रसार केला व तेथें त्यास चांगलें यश आलें. हे बौद्ध धर्मोपदेशक अलेक्झांड्रिया-पर्यंत गेले असावे यासंबंधीं उल्लेख पूर्वीं केलेलाच आहे.

यानें आपले शिलालेख ख्रि. पू. २४० च्या सुमारास कोरलेले असावेत. त्या वेळेस इजिप्तमध्यें टॉलेमी फिलाडेल्फस व एपायरस-मध्यें अलेक्झांडर, किरीस येथें अंटायोकस हे राज्य करीत होते. अशोकाचे बौद्ध धर्मप्रसारक भिक्षु त्या देशांत धर्मप्रसाराकरितां गेले होते असा पुरावा मिळतो. चीन देशांतहि बौद्ध धर्म-प्रसारक गेल्यामुळें चीन व भरतखंड ह्यांचा संबंध येऊन उत्तर

कालांत बहुतेक चीन बौद्ध संप्रदायी बनला. एवढेंच नव्हे तर बौद्ध धर्माचा अभ्यास करण्याकरितां अनेक चिनी प्रवासी हिंदुस्थानांत येऊन राहिले. त्यांपैकीं फाहियान, ह्युएनत्संग, इत्सिंग यांनीं तत्कालीन समाजस्थितीचें वर्णन करून ठेवलें आहे. या भिक्षूंनीं अनेक बौद्ध धर्मावरील ग्रंथ चीनमध्यें नेले. त्यामुळें आज या धर्माविषयींचे बरेचसे ग्रंथ मूळ हिंदुस्थानांत नष्ट झाले असूनहि त्यांच्या प्रतिकृति तिबेट व चीनमध्यें आढळून आल्या आहेत.

## चिनी प्रवासी—

बौद्ध धर्माचा प्रसार जसजसा चीन देशांत वाढत गेला तसतसें तेथें बौद्ध संप्रदायाचा स्वीकार करणाऱ्या व भिक्षूंची दीक्षा घेणाऱ्या लोकांत बौद्ध धर्माचें उत्पत्तिस्थान जो भारत देश त्याबद्दल कुतूहल वाढत गेलें. बौद्ध धर्मांचीं आद्य तत्त्वें कोणतीं याचा अभ्यास करणें, भारतांत बौद्ध संप्रदायाचें स्वरूप कसें काय आहे याचें प्रत्यक्ष अवलोकन करणें, वगैरे जिज्ञासेनें प्रेरित झालेले अनेक चिनी बौद्ध पंडित भारतांत बौद्ध धर्माचा अभ्यास करण्याकरितां प्रवास करून आले व त्यांनीं भारतांत प्रवास करून व नालंदासारख्या बौद्ध विहारांत व विद्यापीठांत राहून बौद्ध धर्माचा अभ्यास केला. तेथील अनेक ग्रंथांचें अध्ययन केलें व अनेक ग्रंथांच्या प्रती करून ते आपल्याबरोबर घेऊन गेले. या अशा प्रवाशांपैकीं पहिल्या प्रवाशाबद्दलची जी आपणांस माहिती मिळते ती फाहियान याबद्दलची होय. हा चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या कालांत येऊन गेला. त्यानंतर प्रसिद्ध ह्युएनत्संग हा हर्ष राजाच्या कारकीर्दींत आला व त्यानंतर इत्सिंग अथवा इचिंग हा सातव्या शतकांत आला. या सर्व प्रवाशांनीं तत्कालीन भारताच्या लोकस्थितीचें वर्णन केलें आहे. यांनीं अनेक ग्रंथ भारतांतून मूळ स्वरूपांत अगर भाषांतररूपानें चीनमध्यें नेले व त्यांचीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं.

वर उल्लेखिलेल्या प्रवाशांखेरीज अनेक प्रवासी वेळोवेळीं भारतांत येऊन गेले. त्यांच्यापैकीं प्रमुखांचीं नांवें द्यावयाचीं म्हणजे पुढीलप्रमाणें देतां येतील : ताउहि उर्फ श्रीदेव, ख्से, आर्यवर्मा ( ६३८ ), हुइनिए, युआन ताई, बोधिधर्म, तौत्सिंग, शंगातिह, चित्तवर्मा, लंग, सिंग युएन, संघवर्मा ( समरकंद ), व्हुइलुन ( कोरिया ), तअंग, ताउलिन, ह्युइता, शेनहंग, सेंगची, वूहिंग, वगैरे सुमारें चाळीस नांवें इत्सिंगनें आपल्या प्रवासवर्णनांत दिलीं आहेत.

## चंद्रगुप्ताची राज्यपद्धति—

चंद्रगुप्त व अशोक यांची राज्यपद्धति कौटिल्याच्या अर्थशास्त्राप्रमाणें असावी. त्या वेळीं पाटलीपुत्र हें शोण नदीच्या तीरावर वसलेलें शहर त्याची राजधानी होती. त्या ठिकाणीं आतां पाटणा व बंकीपूर हीं शहरें वसलीं आहेत. चंद्रगुप्ताचा राजवाडा अतिशय भव्य असून तो लांकडी होता व त्याच्या खांबांवर सोनेरी व रुपेरी चित्रें बसविलेलीं होतीं. तत्कालीन आयुष्यक्रमावर इराणी पद्धतीचें वर्चस्व असावें असें दिसतें. क्षत्रप ही इराणी पदवी प्रचलित होती. तसेंच पश्चिमेकडे खरोष्ट्री ही लिपिहि प्रचारांत होती असें दिसतें. पूर्वापार पद्धतीप्रमाणें राजांचें सैन्य चतुरंग असे. त्यांत हत्ती, रथ, अश्व व पदाती असत. त्या वेळच्या शिक्षा फार कडक असत. राज्याचे विभाग पाडून त्यांवर प्रांताधिप नेमलेले असत. तसेंच शहरांत गोप, नागरक यांची वस्ती असून जाणाऱ्या-येणाऱ्यांवर देखरेख ठेवण्याकरितां प्रस्थित व आगत असे अधिकारी असत. त्या वेळीं प्रजेची गणना करण्याची पद्धति असे. नगराचा कारभार पाहण्यास एक नागरिकांचें मंडळ असे व त्याच्या निरनिराळ्या समित्या असून त्या उद्योगधंदे, कला, जनन, मरण, व्यापार, विनिमय, क्रय-विक्रय, वजनें-मापें, वगैरे गोष्टींवर देखरेख ठेवीत. त्या वेळीं हेरांचें एक स्वतंत्र खातें असून तें सर्व राज्यांतील बातम्या राजास देत असे. जमिनीवरील कर बहुतेक धान्यात घेत असून शेतीकरितां पाटबंधाऱ्यांची व्यवस्था केलेली असे. तसेंच व्यापाराकरितां मोठमोठे रस्ते बांधलेले असून त्यांवर अंतर दाखविणारे खांब पुरलेले असत. तक्षशिला ते पाटलीपुत्र असा एक मोठा राजरस्ता त्या वेळीं अस्तित्वांत होता. मागें सांगितल्याप्रमाणें चंद्रगुप्ताच्या दरबारीं सेल्युकस निकेटार याचा वकील मेगॅस्थिनीस हा होता. त्यानें आपल्या इंडिका या नांवाच्या ग्रंथांत तत्कालीन भारताच्या लोकस्थितीचें फार सुंदर वर्णन केलें आहे. तो मूळ ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं. परंतु त्या ग्रंथांतील उतारे इतर अनेक ग्रंथकारांनीं घेतलेले आढळतात.

चंद्रगुप्ताचा वंशज बृहद्रथ मौर्य ह्या राजास मारून त्याचा सेनापति पुष्यमित्र ह्यानें राज्यसत्ता काबीज करून शुंग घराण्याची स्थापना केली ही गोष्ट वर सांगितलीच आहे. ह्या शुंगांच्या कारकीर्दींत खिस्तपूर्व १७५ च्या सुमारास मिनांडर ह्यानें हिंदुस्थानवर स्वारी केली व मथुरा जिंकून पाटलीपुत्रावर चाल केली. परंतु पुष्यमित्रानें त्याचा पराभव करून त्यास हिंदुस्थानाबाहेर हांकून दिलें. पुष्यमित्रानें अश्वमेध यज्ञ केल्याचा व त्यांत पतंजलि हा वैयाकरण उपस्थित असल्याचा उल्लेख आढळतो. त्यावरून बौद्ध धर्मावर ह्या वेळीं ब्राह्मणी धर्मानें विजय मिळविल्याचें दृष्टीस पडतें. पुष्यमित्राचा पुत्र अग्निमित्र व नातू वसुमित्र हेहि पराक्रमी राजे होते. अग्निमित्रानें विदर्भ देश जिंकला होता. याच

अग्निमित्राचा मालविकेशीं झालेला विवाह हा कालिदासाच्या एका नाटकाचा विषय आहे.

### शुंग व कण्व घराणीं—

शुंग घराण्यांतील अखेरचा राजा देवभूमि हा व्यसनी निघाल्यामुळें त्यास पदच्युत करून त्याचें राज्य त्याचा प्रधान वसुदेव यानें घेतलें व कण्व घराण्याची स्थापना केली.

या कण्व घराण्यांत एकंदर चार राजे होऊन गेले. यानंतर त्यांची सत्ता आंध्र घराण्याकडे गेली. वास्तविक आंध्र राजे यापूर्वीच दीर्घ कालपर्यंत पूर्वेकडील आंध्र देशांत राज्य करीत होते. त्यांनींच पाटलीपुत्राचें राज्य हस्तगत केलें असें दिसतें. या साम्राज्याचा पहिला राजा सिमुक या नांवाचा होता. आंध्र घराण्यांतील दुसरा राजा कृष्ण यानें गोदावरीतीरावरील नाशिकपर्यंत आपल्या सत्तेचा प्रसार केला. परंतु आंध्र राजा शातकर्णी याच्या कालांत कलिंग देशाचा राजा खारवेल हा स्वतंत्र झाला. आंध्र राजे आपणांस शातवाहन म्हणवीत. त्यांच्यापैकीं सतरावा राजा हाल यानें महाराष्ट्री भाषेंत संकलित केलेला सप्तशती हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याच घराण्यांतील तेविसावा राजा गौतमीपुत्र शातकर्णी व चोविसावा राजा वासिष्ठीपुत्र पुळुमायी हे पराक्रमी राजे झाले. यांस इंडो-पार्थियन राजांशीं युद्धें करावीं लागलीं. गौतमीपुत्र शातकर्णी यानें क्षहरात नहपान याचा पराभव केल्याचा उल्लेख त्याच्या शिलालेखांत व दानपत्रांत आढळतो. त्याचा मुलगा वासिष्ठीपुत्र पुळुमायी याचा विवाह उज्जयिनी येथील महाक्षत्रप रुद्रदामा याच्या कन्येशीं झाला होता. या राजांचे शिलालेख नाशिकजवळच्या पांडुलेण्यांत खोदलेले आहेत. यानंतर यज्ञश्री हा महत्त्वाचा राजा या वंशांत होऊन गेला. याचीं बरींच नाणीं उपलब्ध असून त्यांपैकीं कांहींवर जहाजाचें चित्र आढळतें. यावरून त्यानें समुद्रावर किंवा त्यापलीकडेहि आपली सत्ता प्रस्थापित केली असावी असें दिसतें. हें आंध्र घराणें इ. स. २२६ च्या सुमारास नष्ट झालें.

### शक लोकांच्या स्वाऱ्या—

यानंतर भरतखंडावर शक लोकांच्या स्वाऱ्या होऊन त्यांनीं बराच प्रदेश पादाक्रांत केल्याचें दिसतें. ह्या शक अथवा सिथियन लोकांची कांहीं माहिती पूर्वीं दिलीच आहे. त्यांपैकीं युएची अथवा कुशान ह्या लोकांनीं बॅक्ट्रिया व हिंदुस्थानांतील कांहीं भाग यांवर राज्य केलें. हे कुशान लोक मूळचे चीनमधील कानशु प्रांतांतील असून त्यांचेच बांधव हिउंग्नु यांनीं त्यांस तेथून हुसकून दिल्यामुळें ते इराणकडून हिंदुस्थानाकडे हळूहळू प्रवास करीत आले. वाटेंत ते कांहीं काळ बॅक्ट्रियांत राहिले. त्यांच्यापैकीं, कोझुलोकडफिसेस यानें प्रथम ग्रीक सत्तेचा नाश करून काबूल नदीच्या आसपासचा प्रदेश काबीज केला. यानंतर कांहीं काळानें हिमकपिश या नांवाच्या राजानें हिंदुस्थानवर स्वारी केली. याच्यामागून होऊन गेलेला कनिष्क (इ. स. १२० ते १६२) हा प्रसिद्ध राजा बौद्धांचा पुरस्कर्ता म्हणून होऊन गेला. ह्यानें एक बौद्धांची संगीति भरविली. याच्या अमलाखालीं काश्गर, यार्कन्द, खोतान हे प्रांत होते. कनिष्कानंतर हुविष्क व वासुदेव हे राजे होऊन गेले. कनिष्काची राजधानी पुरुषपूर म्हणजे पेशावर येथें होती. यानें बुद्धावशेषांवर एक मोठी उंच लांकडी तेरा मजली इमारत बांधली असल्याचा उल्लेख चिनी प्रवासी करतात. ह्या इमारतीशेजारीं कांहीं बौद्ध विहार असून तेथें एक प्रसिद्ध विद्यापीठ होतें. त्या विद्यापीठांत बौद्ध संप्रदायाचें अध्यापन खिस्ती शकाच्या पूर्वीपासून अखंड चालू होतें. हें विद्यापीठ गझनीच्या महमदानें नष्ट केलें असावें. कनिष्कास पार्थियन लोकांबरोबर युद्ध करावें लागलें. कनिष्काच्या कारकीर्दींत भिन्न संस्कृतींचें मिश्रण कसें होत होतें हें त्याच्या नाण्यांवरून चांगलेंच दृष्टीस पडतें. त्याच्या आरंभींच्या नाण्यांवर ग्रीक देवतांचीं चित्रें व ग्रीक भाषेंतील व लिपींतील लेख कोरलेले आढळतात. नंतरच्या नाण्यांवर ग्रीक, इराणी व हिंदु देवतांचीं चित्रें असून ग्रीक लिपींत फारसी अक्षरें आढळतात व अखेरच्या नाण्यांवर बुद्धाची मूर्ति व ग्रीक लेख आढळतात. यावरून त्या वेळीं बुद्धाच्या मूर्ती करण्याचा प्रघात पडला असावा. परंतु तो अशोकाच्या कालीं आढळत नाहीं. याच कालांत बौद्धांचा महायान पंथ अस्तित्वांत आला.

कनिष्कानंतर होऊन गेलेल्या हुविष्कानें हुष्कपुर नावाचें एक शहर काश्मीरांत वसविलें होतें. तेथें ह्युएनत्संग इ. स. ६३१ मध्यें गेला होता. तेथें त्या वेळीं पुष्कळ मठ असून पांच हजार भिक्षु होते. आज त्या ठिकाणीं उष्कुर नांवाचें एक खेडें व एक स्तूप आढळतो. या राजाचीं बरींच सोन्याचीं नाणीं आढळतात. त्यांवर ह्याचा मुखवटा कोरलेला आढळतो. हुविष्कानंतर वासुदेव हा राजा पूर्णपणें हिंदु पद्धतीनें वागत असावा असें दिसतें. कारण ह्याच्या नाण्यांवर शिव व नंदीची प्रतिमा आढळते. याचे अनेक शिलालेख मथुरा येथें आढळले आहेत.

या सुमारास इराणमध्यें अर्सीसीडी घराणें नष्ट होऊन ससन घराणें राज्य करीत होतें त्याची माहिती पूर्वीं दिलीच आहे. या राजांनीं हिंदुस्थानकडे फारसें लक्ष दिलेलें आढळत नाहीं. चौथ्या शतकाच्या आरंभीं एका कुशानवंशीय राजानें ससन राजा दुसरा होर्मझ यास आपली मुलगी दिली होती असा उल्लेख आढळतो. तसेंच दुसरा शापूर यानें कुशान सैन्य व हत्ती यांची

मदत रोमन लोकांचा पराभव करण्याकरितां घेतली होती असें दिसतें. यानंतर कुशान व ससन घराण्यांचा संबंध कांहीं काळ चालू असावा असें त्या दोन्हींच्या नाण्यांतील सादृश्यावरून दिसतें. परंतु पंजाब व उत्तर हिंदुस्थान ह्यांमधील राजांची फारशी माहिती आढळत नाहीं.

यानंतर गुप्त घराण्याचा उदय होऊन त्या घराण्यांत चंद्रगुप्त, समुद्रगुप्त, वगैरे बलाढ्य राजे झाले.

### गुप्त घराणें—

पाटलीपुत्र येथें चंद्रगुप्त या नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचा विवाह नेपाळांतील लिच्छवी राजाच्या मुलीशीं इ. स. ३०८ ह्या वर्षी झाला. या विवाहामुळें घडून आलेल्या ऐक्यामुळें चंद्रगुप्तानें गंगा-यमुनांच्या कांठचा प्रदेश व तिरहुत, दक्षिण बिहार व अयोध्येसभोंवतालचा मुलूख काबीज केला. याच्या नाण्यांवर त्याच्या नावाबरोबर त्याची राणी कुमारदेवी हिचेंहि नांव कोरलेलें आढळतें. याचा मुलगा समुद्रगुप्त यानें फार मोठे विजय मिळवून त्या विजयाची हकीकत अशोकानें उभारलेल्या एका स्तंभावर संस्कृत भाषेंत कोरून ठेवली आहे. हा स्तंभ प्रयागच्या किल्ल्यांत आहे. तसेंच त्याच्या विजयांचें वर्णन हरिसेन नांवाच्या राजकवीनें गद्यपद्यमय केलेले आढळतें. या ग्रंथाचा काल इ. स. ३६० च्या सुमाराचा असावा. यानें सर्व हिंदुस्थानवर चारहि दिशांस दिग्विजय केल्यानंतर अश्वमेध यज्ञ केला व त्या यज्ञाचें स्मारक म्हणून अग्निकुंडापुढें यज्ञीय अश्व उभा असलेलीं सोन्याचीं पदकें ब्राह्मणांस दान दिलीं. त्यांपैकीं कांहीं अलीकडे उपलब्ध झालीं आहेत. तसेंच उत्तर अयोध्येंत एक अश्वाची प्रतिमा शिलालेखासह उपलब्ध झाली आहे.

समुद्रगुप्ताचा पुत्र दुसरा चंद्रगुप्त यानें राज्यावर आल्यावर विक्रमादित्य ही पदवी धारण केली व माळवा आणि गुजराथ यांवर चाल करून तेथील परकीय शक लोकांची सत्ता नष्ट केली. यानेंच या वेळीं विक्रमसंवत् सुरू केला. या वेळीं पश्चिम किनाऱ्यावरील बंदरें ताब्यांत आल्यामुळें हिंदुस्थानचा युरोप खंडाशीं व्यापार वाढला. चंद्रगुप्त विक्रमादित्यानें आपली राजधानी पाटलीपुत्र येथेंच ठेवली. त्यामुळें त्या शहराची पुष्कळच भरभराट झाली. इ. स. ६४० च्या सुमारास चिनी प्रवासी ह्युएनत्संग यानें या शहराचा पूर्वी विस्तार केवढा होता व या राजाचें केवढें वैभव होतें, त्याचें वर्णन केलें आहे. विक्रमादित्यानंतर त्याचा पुत्र कुमारगुप्त हा गादीवर आला. त्यानेंहि अश्वमेध यज्ञ केला. ह्या गुप्त राजांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानमध्यें व्यापार, कलाकौशल्य यांची बरीच वाढ झाली. मृच्छकटिक, मुद्राराक्षस, वायुपुराण व मनुस्मृति हे ग्रंथ याच काळांत लिहिले गेले असावे व वराहमिहिर हा सुप्रसिद्ध ज्योतिषी याच काळांत होऊन गेला असावा. या वेळीं सर्व बौद्धिक गोष्टी व इतर व्यवसाय अत्यंत उत्कर्ष पावले होते, ही गोष्ट अलीकडे उपलब्ध होणाऱ्या अवशेषांवरून दिसते. गुप्तांच्या कारकीर्दीच्या अखेरच्या कालांत हूण लोकांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या. त्यांस प्रथम स्कंदगुप्त, बालादित्य या गुप्त राजांनीं तोंड दिलें. परंतु अखेरीस त्यांचा पराजय होत गेला. गुप्त राजांच्या कारकीर्दीत चीनमधील लिआँग घराण्यांतील पहिला बादशहा वुति अथवा सिऔयेन या राजानें एक विद्वान् लोकांचें मंडळ बौद्ध महायान पंथाचे ग्रंथ व त्यांचीं भाषांतरें मिळविण्याकरितां पाठविलें होतें, त्यास कुमारगुप्तानें चांगलें साहाय्य देऊन परमार्थ नांवाचा पंडित त्यास मदत करण्याकरितां दिला होता. या मंडळानें अनेक ग्रंथ व भाषांतरें चीनमध्यें नेलीं. व त्याबरोबर परमार्थ या पंडितासहि तें चीनमध्यें घेऊन गेलें. तो इ. स. ५४६ पासून ५६९ पर्यंत चीनमध्यें राहून तेथेंच मरण पावला. असाच एक बोधीधर्म नांवाचा दक्षिणेंतील राजपुत्र इ. स. ५२० मध्यें चीनमध्यें जाऊन राहिला होता. गुप्त राजांपैकीं शेवटचा राजा दुसरा जीवितगुप्त हा आठव्या शतकाच्या आरंभीं राज्यावर होता. त्यानंतर हें राज्य बंगालच्या पाल राजांच्या सत्तेखालीं गेलें.

### विक्रमादित्य चंद्रगुप्तकालीन भारत—

चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या काळांत फाहिआन नांवाचा एक चिनी बौद्ध भिक्षु हिंदुस्थानांत आला होता. हा पहिला चिनी प्रवासी होय. त्यानें तत्कालीन भारताच्या लोकस्थितीचें वर्णन केलें आहे. त्यास पाटलीपुत्र येथील राजवाडा पाहून फार आश्चर्य वाटलें. त्याच्याशेजारील दोन मठांत महायान व हीनयान या दोन्ही पंथांतील मिळून सहासातशें विद्वान् भिक्षू अध्ययन करीत होते. त्या वेळीं मगधांतील शहरेंहि संपन्न होतीं. देणग्यांवर चाललेल्या संस्था अनेक होत्या. प्रवाशांस उतरण्यास मोठमोठ्या धर्मशाळा जागजागीं होत्या. राजधानींत मोठें धर्मार्थ रुग्णालय होतें व त्यांत सर्वांची औषधपाण्याची व शुश्रूषेची सोय होती. गंगा-यमुनांच्या कांठच्या मोठमोठ्या शहरांत हजारों भिक्षु अनेक मठांत आनंदानें राहत होते. मथुरेच्या दक्षिणेकडील माळव्याचा प्रदेश फारच संपन्न होता. हिंदुस्थानांत सर्वत्र प्रवासास मोकळीक असे. फौजदारी कायदा सौम्य होता. बहुतेक गुन्ह्यांस दंड असे. फांशीची शिक्षा बहुतेक कधींच होत नसे. सरकारी अधिकाऱ्यांस योग्य व ठरीव पगार असल्यामुळें ते रयतेवर जुलूम करीत नसत. या देशांत कोणी कोणतीहि हिंसा करीत नाहीं. दारू पीत नाहीं. कांदे-लसूण खात नाहीं. कोंबड्या-बदकें पाळीत नाहीं. गुरें विकीत नाहीं. बाजारांत खाटकांचीं दुकानें नाहींत.

दारूच्या भट्या नाहींत. असें त्यानें म्हटलें आहे. त्या वेळीं चलनांत कवड्या होत्या. बौद्ध मठांस राजाकडून मोठाल्या देणग्या होत्या व त्यांस अन्नवस्त्र, वगैरे मुबलक मिळत असे. फाहिआन हा भरतखंडांत एकंदर सहा वर्षे होता (४०५-४११). त्यांत पाटलीपुत्र येथें तीन व ताम्रलिप्ती येथें एक वर्ष होता.

## गुप्तोत्तर घराणीं—

पांचव्या शतकाच्या अखेरीस मैत्रक जातीच्या भट्टारक नांवाच्या राजानें सौराष्ट्रांत वलभी येथें एक राजघराणें स्थापन केलें. हें राज्य इ. स. ६७० पर्यंत टिकलें. वलभी हें एक विद्येचें केंद्र असल्याचा उल्लेख इत्सिंग या चिनी प्रवाशानें केला आहे. वलभीनंतर अनहिलवाडा पाटण व पुढें कर्णावती म्हणजे सध्यांचें अहमदाबाद येथील राज्य हीं उदय पावलीं.

स्कंदगुप्त हा गुप्त घराण्यांतील राजा गादीवर असतां इ. स. च्या पांचव्या शतकांतच हूण लोकांनीं हिंदुस्थानवर स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला. ह्या हूणांच्या ॲटीला नांवाच्या पुढाऱ्यानें युरोप खंडांत पांचव्या शतकांत मोठें साम्राज्य स्थापन केलें होतें. तसेंच त्यांचा एक पुढारी तोरमाण यानें मध्य हिंदुस्थानांत माळवा प्रांतांत आपलें राज्य स्थापिलें. तोरमाणानंतर त्याचा मुलगा मिहिरगुल यानें साकल ( सियालकोट ) येथें आपली राजधानी केली होती. ह्या हूण राज्याचें वर्णन सोंगयून ( ५१९ ) नांवाच्या चिनी प्रवाशानें केलें आहे. मिहिरगुलाच्या विरुद्ध देश्य राजांनीं एक संघ करून त्याचा पराजय केला. यानें पुढें कपटानें काश्मीरचें राज्य व नंतर गांधार या देशाचें राज्यहि हस्तगत केलें होतें. हा शिवोपासक असून बौद्ध संप्रदायाचा त्यानें नाश करण्याचा प्रयत्न केला. इ. स. ५४० च्या सुमारास मिहिरगुल मरण पावला व त्याबरोबर हूण सत्ता लयास गेली. या हूण राजांबरोबर गुर्जर नांवाच्या राजांचा उल्लेख येतो. हे बहुधा परकीय असून हूणांचेच सजातीय असावेत. त्याप्रमाणेंच प्रतिहार अथवा परिहार नांवाचीं कांहीं परकीय घराणीं माळव्यांत व राजपुतान्यांत सत्ताधीश होऊन तेथें स्थायिक झालीं असावीं व तीं पुढें क्षत्रिय मानलीं जाऊं लागून येथील समाजांत मिसळून गेलीं असावींत. यानंतर ठाणेश्वर येथील राजघराणें पुढें आलें. त्यापैकीं हर्षवर्धन हा राजा पराक्रमी होता. ह्याची कारकीर्द इ. स. ६०६ पासून ६४७ पर्यंत असावी.

## हर्षकालीन समाजस्थिति—

हर्षवर्धनाच्या कारकीर्दींत ह्युएनत्संग नांवाचा प्रसिद्ध चिनी प्रवासी हिंदुस्थानांत येऊन गेला. त्यानें तत्कालीन लोकस्थितीचें फार सुंदर वर्णन केलें आहे. या देशांत क्षत्रिय व ब्राह्मण यांचें वर्तन निष्कलंक व अगदीं साधें असून त्यांत डामडौल नसून राहणी अगदीं साधी असते. तिसरा वर्ग वैश्यांचा असून ते नानाविध वस्तूंचा देशीं-परदेशीं व्यापार करून धनसंचय करतात. चौथा वर्ग शेतकऱ्यांचा होय. या लोकांत आपापल्या कामाप्रमाणें स्वतंत्र संघ करून राहणारे अनेक वर्ग असून त्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं. यांचे कपडे बहुधा शिवलेले नसून पांढरे असतात. त्यांस रंगीत अथवा छिडकावाचीं वस्त्रें आवडत नाहींत. हे पुष्पमाला धारण करतात. तसेंच निरनिराळीं भूषणें व दागिने घालतात. त्यांत अंगद नांवाचीं बाहुभूषणें, कुंडलें, केयूर, वगैरे कर्णभूषणें असतात. स्त्रिया तर सर्वत्र दागिने घालतात. बहुतेक लोक अनवाणी चालतात. हिंदु व बौद्ध दोघेहि मूर्तिपूजक असून शिव, विष्णु, सूर्य व बुद्ध यांचीं अनेक मंदिरें राजे व धनाढ्य लोक बांधीत असत. यांत सुवर्णाच्या मूर्ती असून त्यांवर रत्नजडित दागिने असत. हे लोक कोणाचीहि वस्तु अन्यायानें घेत नाहींत. पापाचें प्रायश्चित्त अन्य जन्मीं भोगावें लागतें अशी समजूत असल्यामुळें ते पापभीरु आहेत. या देशांत गोवध अथवा अन्य प्राणिवध होत नाहीं. मांससेवन वर्ज्य आहे. तथापि अज, मत्स्य हे आहारांत असत.

या ह्युएनत्संग यानें केलेल्या वर्णनास बाणाचें हर्षचरित व इतर तत्कालीन ग्रंथ यांचा पाठपुरावा मिळतो.

हर्षानंतर पुढें ६०० वर्षेपर्यंत फारसे महत्त्वाचे राजे हिंदुस्थानांत झाले नाहींत. ह्यानंतर पाल व सेन ह्या नांवाचीं दोन घराणीं बंगाल व बिहार प्रांतांत होऊन गेलीं. काश्मीरांत कर्कोटक, उत्पल, लोहर, वगैरे घराणीं राज्य करीत होतीं.

## दक्षिणेंतील राज्यें—

ह्याच सुमारास दक्षिणेत चालुक्य घराण्याचा उदय होऊन त्यानें दक्षिण हिंदुस्थानांत बरींच वर्षे मोठ्या वैभवानें राज्य केलें. त्यानंतर इ. स. ७५० च्या सुमारास राष्ट्रकूट ह्या घराण्याचा उदय झाला. याची राजधानी मालखेड येथें असून महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें हें फार महत्त्वाचें घराणें होऊन गेलें. वेरूळ येथील कैलास नांवाचें जगप्रसिद्ध लेणें याच घराण्यांतील कृष्ण नांवाच्या राजानें कोरलेलें आहे. राष्ट्रकूटांनंतर यादवांचें घराणें उदय पावलें व त्याच्या हातून राज्यसत्ता मुसलमानांकडे गेली.

दक्षिणेकडे तामीळ देशांत केरळ, चोल, पाण्डय, पल्लव, बल्लाळ, वगैरे महत्त्वाचीं घराणीं होऊन गेलीं.

आतांपर्यंत भरतखंडामध्यें जेव्हां आर्य लोक प्रवेश करीत होते त्या वेळीं भरतखंडांत पूर्वीपासूनच अत्यंत प्राचीन काळीं स्थायिक झालेले भिल्ल, गोंड, कोडगू, वगैरे वन्य लोक, जे अद्यापहि

संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंत डोंगर-पहाडामध्यें राहत आहेत, अशा जाती व त्यानंतर आलेले आर्य लोक यांनीं एकंदर हिंदुस्थानांत वसाहती करून आपल्या संस्कृतीचा या भूभागांत प्रसार कसा केला याची थोडक्यांत हकीकत दिली आहे. भारताच्या अगदीं दक्षिण भागांत आर्य संस्कृतीचा प्रसार उत्तरकालीं झाला व तो उत्तर भारताइतका दृढ झाला नाहीं. त्यामुळें अद्यापहि दक्षिण भारतांत द्राविड संस्कृतीचें बरेंच प्राबल्य आहे व जरी भारतीय संस्कृतीची मुख्य भाषा संस्कृत हिचा परिणाम या द्राविड भाषांवर फार महत्त्वाचा झाला असला तरी द्राविड भाषा अद्यापिहि दक्षिण भारतांतील व्यवहाराच्या भाषा असून त्यांमध्यें वाङ्मयहि तयार होत आहे. अनेक संस्कृत शब्द तत्सम अथवा तद्भव रूपांमध्यें जरी या द्राविड भाषांत अंतर्भूत करण्यांत आले असले तरी द्राविड शब्दहि मोठ्या प्रमाणांत या भाषांत रूढ असून अनेक द्राविड शब्द प्राचीन कालापासून संस्कृतादि भाषांनीं ग्रहण केले आहेत ही गोष्ट मागें सांगितलीच आहे. द्राविड शिल्पकला ही एक अत्यंत प्रगत अशी कला असून तिचीं स्मारकें दक्षिण भारतांत सर्वत्र आढळून येतात. तसेंच या द्राविड प्रदेशांत फार प्राचीन काळापासून रूढ असलेली मातृकन्यापरंपरा अद्यापहि मलबारामध्यें रूढ असून त्यांतील तरवड ही कुटुंबपद्धति अद्याप तेथें सर्वत्र आढळण्यांत येते. जे आर्य लोक त्या भागांत गेलेले असून स्थायिक झाले आहेत तेच मात्र पितापुत्रपरंपरेचा अवलंब करतांना आढळतात.

## सिंहलद्वीप

भारताच्या दक्षिणेस असलेल्या सिंहलद्वीपाचा संबंध भरतखंडाशीं फार प्राचीन काळापासून निकटचा असलेला आढळून येतो. सिंहलद्वीपाच्या राजकन्यांचे भारतीय राजांशीं विवाह झालेले आढळतात. रामायणांत वर्णन केलेल्या लंकेचें स्थान अद्यापिहि कांहीं संशोधक अनिश्चित मानतात, परंतु तें सिंहलद्वीपच असावें अशी सामान्य समजूत आहे व रामाचा सेतु वगैरे स्थलनिर्देशांवरून ती समजूत दृढ झालेली आहे. चोल, पाण्ड्य, वगैरे दक्षिण भारतीय राजांचे सिंहलद्वीपाच्या राजांशीं अनेक संग्राम झालेले आहेत. व आजहि अनेक भारतीय सिंहलद्वीपांत जाऊन राहिलेले आहेत. विशेषतः अशोकाचा पुत्र महिंद व संघमित्रा हिनें बौद्ध धर्माचा प्रसार करण्याकरितां त्या द्वीपांत गमन केल्यापासून व बोधिवृक्षाची म्हणजेच बौद्ध संप्रदायाची शाखा तेथें दृढमूल केल्यापासून बौद्ध संप्रदायाचा तेथें बराच प्रसार झाला. आज जरी भरतखंडांत बौद्ध संप्रदायाचा लोप झाला असला तरी सिंहलद्वीपांत अद्यापहि तो पुष्कळच प्रमाणांत प्रचलित असून या संप्रदायाचा इतिहास दीपवंसो व महावंसो या ग्रंथांत ग्रथित करण्यांत आला आहे. अनुराधपुर वगैरे ठिकाणीं बौद्ध मठ वगैरे असून अनेक ठिकाणीं बौद्ध स्तूप व इतर अवशेष प्रसिद्ध आहेत; त्यांत बुद्धदंतावरील स्तूप अर्थातच विशेष प्रख्यात आहे. त्याप्रमाणेंच बौद्धांचा प्राचीन संप्रदाय जो हीनयान त्याचा इतरत्र लोप झाला तरी सिंहलद्वीपांत त्याचें रूप अस्तित्वांत असून त्या पंथाचें वाङ्मय आज याच बेटांत आपणांस विशेष उपलब्ध होतें. सिंहलद्वीपाची मूळ भाषा एळु या नांवाची असून पुढें त्या भाषेवर पाली व संस्कृत या भाषांचा पुष्कळच परिणाम झालेला आढळतो.

## ब्रह्मदेश—

सिंहलद्वीपानंतर भारताच्या निकटचा प्रदेश म्हणजे ब्रह्मदेश हा होय. या प्रदेशांतहि बौद्ध धर्माचा व त्यामार्फत भारतीय संस्कृतीचा विशेष प्रसार झालेला आपल्या दृष्टीस पडतो. ब्रह्मदेशांतहि बौद्ध धर्मासंबंधीं प्राचीन वाङ्मय बरेंच उपलब्ध आहे. ब्रह्मदेशचे राजे आपणांस भारतीय पद्धतीप्रमाणें ब्राह्मणांकडून राज्याभिषेक करून घेत व याकरितां भरतखंडांतून ते ब्राह्मण पुरोहित नेत असत. तसेंच त्यांचा राज्यकारभार वगैरे मनुस्मृतीस अथवा मानवधर्मशास्त्रास अनुसरून चालत असे. ब्रह्मी लोकांनीं बरेचसे भारतीय नीति-ग्रंथहि ब्रह्मदेशांत नेलेले आढळतात. यांच्या धर्मग्रंथांचीं नांवें मनु, नंदन व धम्मवलीय, इत्यादि आहेत. मनूच्या ग्रंथास धर्मशास्त्र असें म्हणतात. ब्रह्मदेशांत ब्रह्मी, रुखेंग, मोन अथवा तलैंग, मुंडा, मोनख्मेर, इत्यादि भाषा आढळतात. ब्रह्मी भाषेंतील वाङ्मय बहुतेक भारतीय वाङ्मयांतील बौद्ध व महाभारतादि पौराणिक ग्रंथांवर आधारलेलें आढळतें. रुखेंग भाषेवर पाली भाषेचा बराच परिणाम झालेला दिसतो व तिची लिपिहि देवनागरीसारखीच आहे. ही एकाक्षरी भाषा आहे. या भाषेंत असलेलें वाङ्मय बहुतेक पाली ग्रंथांचीं भाषांतरें अथवा संस्कृत ग्रंथांवर आधारलेले ग्रंथ अशा स्वरूपाचें आहे. तलैंग, मॉन, मुंडा, मॉनख्मेर या भाषाची लिपि बहुतेक तलैंग लिपीसारखी असून या तलैंग लिपीचें अमरावती येथील स्तूपावरील लेखाशीं सादृश्य दिसतें. या भाषांतील वाङ्मयहि बहुतेक बौद्ध वाङ्मय व इतर कथावाङ्मयांवर आधारलेलें आहे.

## पूर्वेकडील देश—

यानंतर अधिक पूर्वेकडील प्रदेशांकडे पाहूं गेल्यास व विशेषतः त्यांच्या भाषेचा अभ्यास केल्यास असें दिसून येईल कीं, त्या प्रदेशांतील बहुतेक भाषा संस्कृतसंभव आहेत. तसेंच

हिंदु समाजपद्धतीचाहि तेथें बराच परिणाम झालेला आहे. उदाहरणार्थ, फिलिपाइन्समध्यें राजा, मित्र, चिंता यांसारखे अनेक शब्द तेथील भाषेंत आढळतात. सेलिबिस बेटांत बुगी नांवाची शिवपूजक जात आहे. बोर्निओ बेटाच्या आग्नेय भागांत अमुंगनाई व मार्तापूर येथें हिंदु वसाहतींचे अवशेष अद्यापि आढळतात. सुमात्रा बेटाची संस्कृति मूळ हिंदुच आहे. तेथें पदांग येथें सातव्या शतकांतील शिलालेख सांपडले असून ते हिंदु राजांचे आहेत. सयामशीं भारतीय व्यापाऱ्यांचें दळणवळण फार मोठ्या प्रमाणावर चालत आलें असून तेथें हरिहरांचीं प्रचंड देवालयें आहेत. कांबोज देशावर तर भारतीय संस्कृतीचा परिणाम विशेषच झालेला आढळतो. या देशांत आठव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंत एक हिंदु वसाहत होती. तिच्या भरभराटीच्या काळांतच अंकोरवात वगैरे प्रचंड देवालयांचें बांधकाम झालें असावें. तेथील बकु हे ब्राह्मणपरंपरेंतील असून ते राजपुरोहित होते. ते अद्यापहि शिव व विष्णु यांची उपासना करतात व शेंडी ठेवतात. इंडोचीन अथवा भारतीय-चीनमध्यें मलयु, जावा, बुगी, बिम, बत्ता, तागाल या अनेकाक्षरी भाषा असून रखेंग, ब्रह्मी, थइ, खोहमेन, लाव व अनामी या एकाक्षरी भाषा आहेत. या सर्वांवर पाली व संस्कृत भाषांचा परिणाम झालेला असून पाली हीच पंडिती भाषा आहे. या सर्व भाषांपैकीं मलयु या भाषेचा प्रसार सर्वत्र आढळतो. मलयु भाषेची मूळ लिपि देवनागरी असावी, पण अलीकडे अरबी लिपींत कांहीं अक्षरें अधिक घालून ती वापरतात. मलयु वाङ्मयांत भारतकथा, शुककथा, कौरवपांडवयुद्ध, वगैरे अनेक भारतीय वाङ्मयावर आधारलेले ग्रंथ आहेत.

### यव व बलिद्वीप—

यवद्वीप अथवा जावा बेटांत तर भारतीय संस्कृतीचा फार मोठ्या प्रमाणावर परिणाम झालेला दिसतो. या बेटाशीं फार प्राचीन काळापासून व्यापारी दळणवळण चालू असून सिंहलद्वीप व यवद्वीप यांचा निकट संबंध होता व या दोन द्वीपांच्या राजघराण्यांत विवाहसंबंध होत असत. यवद्वीपाच्या भाषेस कवि असें नांव असून या भाषेंत भारतीय वाङ्मयावर, विशेषतः रामायण, महाभारत, वगैरे ग्रंथांवर आधारलेले ग्रंथ आहेत. या द्वीपांत चातुर्वर्ण्य असून बौद्ध व ब्राह्मण यांचें सामाजिक व वाङ्मयीन ऐक्य आढळतें. तेथें अद्यापि शालिवाहन शक चालू आहे. संस्कृत छंद काव्यांत योजलेले आढळतात व कामंदकीय-नीतिसारासारखे ग्रंथहि आढळतात. तेथील बोरोबदुर येथील देवालयांत येथून गेलेल्या व्यापाऱ्यांचें किनाऱ्यावर उतरणें, तसेंच अनेक पौराणिक कथाप्रसंग, वगैरे खोदलेले दृष्टीस पडतात. बलिद्वीपांत तर अद्यापिहि ब्राह्मण व हिंदु आढळून येतात.

याप्रमाणें भारतीय संस्कृतीचा पूर्वेकडे ब्रह्मदेशापासून मलाया, सयाम, कांबोज, भारतीय चीन, इत्यादि देश व फिलिपाइन्स बेटें, बोर्निओ, सेलिबिस, इत्यादि बेटें व सुमात्रा, जावा व बलि हीं द्वीपें यांमध्यें प्रसार झाला होता व अद्यापिहि त्या संस्कृतीचे अवशेष थोड्याफार प्रमाणांत या प्रदेशांत सर्वत्र आढळून येतात. विशेषतः तेथील भाषा व वाङ्मय आणि सामाजिक व्यवस्था या बाबतींत भारतीयांनीं विशेष संस्कार घडवून आणले व जरी उत्तरकालीं भारतामध्यें परकीयांच्या आक्रमणामुळें या देशांशीं असलेलें दळणवळण तुटलें तरी तेथील समाजावर घडलेला परिणाम दृढमूल असल्यामुळें महंमदीयांच्या त्या प्रदेशावरील आक्रमणानंतर व युरोपियन लोकांच्या सत्तेनंतरहि अद्यापि स्पष्टपणें दिसून येतात व आतां तेथें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य स्थापन झाल्यामुळें हे संबंध पुन्हां जोडले जाण्याचा संभव उत्पन्न झाला आहे. हें संस्कृतिप्रसाराचें कार्य फार प्राचीन काळापासून चालत आलेलें होतें. अशोकानें आपले धर्मप्रसारक अनेक देशांत पाठविल्याचें प्रसिद्धच आहे. सीलोनमध्यें त्याचा पुत्र महिंद व बहीण संघमित्रा ही गेल्याचें वृत्त सुप्रसिद्धच आहे. तसेंच टॉलेमी राजांच्या कारकीर्दींत बौद्ध धर्मप्रसारक ईजिप्तमध्यें गेल्याचा उल्लेख पूर्वी केलाच आहे. बौद्ध संप्रदायाच्या व हिंदी राजांच्या भरभराटीच्या काळांत पश्चिम किनाऱ्यावरील भरुकच्छ, सोपारा व चौल या बंदरांतून मोठमोठीं गलबतें आफ्रिका, अरबस्तान व ईजिप्त येथपर्यंत सफरी करीत असत व आज सोकोत्रा या नांवानें प्रसिद्ध असलेलें बेट हें सुखाधारद्वीप या नांवानें त्या वेळीं ज्ञात होतें व हें नांव त्यास या सफरी करणाऱ्यांनींच त्याच्या उपयुक्ततेवरून दिलें असावें ही गोष्ट स्पष्टच आहे. या बंदरांतून चीन देशाशीं व्यापार चालत असे. याप्रमाणेंच पूर्वेकडील बंदरांतून व कलिंग देशांतून पूर्वेकडील द्वीपांशीं व्यापार चालत असून एका आंध्र राजानें आपल्या नाण्यांवर जहाजाच्या चित्राचा ठसा उमटविला होता यावरून तत्कालीं त्याचें साम्राज्य पूर्वेकडील प्रदेशावर पसरलेलें असावें व त्या देशाचा व्यापार पूर्वेकडील दूरदूरच्या प्रदेशांशीं चालू असावा हें स्पष्ट होतें.

### भारतीय संस्कृतीचा पश्चिमेकडे प्रसार—

ज्याप्रमाणें पूर्वेकडील प्रदेशांमध्यें भारतीय संस्कृतीचा प्रसार प्राचीन कालापासून बौद्ध धर्म, ब्राह्मणी धर्म व व्यापार यांच्या साहाय्यानें होत होता, त्याप्रमाणेंच पश्चिमेकडेहि भारतीय संस्कृतीचा प्रसार करण्याचें कार्य अव्याहत दीर्घ काल चालू

होतें. या कार्याची पाहणी करावयाची म्हणजे अगदीं जवळचा प्रदेश घेतला तर बलुचिस्तान हा पूर्वी भारताचाच भाग होता ही गोष्ट स्पष्ट आहे व तेथें आजहि शिबिखेल, पणिखेल, वगैरे नांवांनीं ज्ञात असलेले समाज हे पूर्वीचे शिबी व पणी लोक होत हेंहि स्पष्टच आहे. तसेंच आज पुख्तुनस्तान म्हणून ज्ञात असलेला प्रदेश व तेथील पुख्तू अथवा पुश्तु ही भाषा म्हणजे पूर्वीचा पक्थ लोकांचा देश होय हें उघड असून पुश्तु भाषेचें संस्कृत भाषेशीं फारच साम्य आहे ही गोष्ट या भाषांची तुलना केली असतां स्पष्ट होईल. बलुचिस्तानप्रमाणें अफगाणिस्तान हाहि भारताचाच भाग असून वेदांतील कुभा ही काबूल नदी होय हें उघड आहे. वेदकालीन कथांत या प्रदेशाचे उल्लेख अनेक ठिकाणीं येणें साहाजिक आहे. अशोकाचें साम्राज्य हिंदुकुशपर्यंत पसरलें होते व या भागांत दहाव्या शतकापर्यंत हिंदु राज्य असून पुढें अफगाणिस्तान हा मोंगल राज्याचा सुभा होता व तेथें जसवंतसिंग हा रजपूत सुभेदार होता ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. गेल्या शतकाच्या अखेरीपर्यंत काफरिस्तान हा हिंदूंनीं व्यापलेला होता हीहि गोष्ट प्रसिद्ध आहे.

इराणमध्यें लुरिस्तान नांवाच्या प्रदेशांतील लोकांच्या कल्पना हिंदु कल्पनांशीं बऱ्याचशा जुळणाऱ्या आहेत व फारसी भाषा ही संस्कृत भाषेची स्वस्र भाषा असून वैदिक भाषेची एक शाखा अवेस्ता हीपासून निघालेली आहे. आज इराणनें फार्स हें नाव टाकून इराण हें प्राचीन आर्यन नांव धारण केलेलें आहे. या भागांत बौद्ध धर्माचा प्रसार एका कालीं बराच झाला असून पुढें उद्भवलेला शामनिझम अथवा श्रमण संप्रदाय हा बराचसा बौद्ध तत्त्वज्ञानावर आधारलेला होता ही गोष्ट ज्ञात आहे. त्याप्रमाणेंच चौथ्या शतकात उत्पन्न झालेला माणि संप्रदाय यांतहि अनेक बौद्ध संप्रदायांतील तत्त्वें ग्रथित करण्यात आलीं होतीं ही गोष्टहि सर्वज्ञात आहे.

इराणमार्गानें प्रवास करीत भटकत जाऊन सर्व युरोप खंड व्यापणारे जिप्सी लोक यांच्या भाषेचा मूळ आधार भारतीय असून या टोळ्या भारतांतूनच पश्चिमेकडे भ्रमण करीत फार प्राचीन कालींच गेल्या असें अभ्यासकांचें मत आहे.

## चीन देश व त्याची संस्कृति—

आर्य लोक आपल्या मूलस्थानापासून निरनिराळ्या दिशांनीं भ्रमण करीत जाऊन निरनिराळ्या प्रदेशांत स्थायिक झाल्याचें वर्णन आतांपर्यंत केलेंच आहे. अत्यंत प्राचीन कालीं एक मानवांची शाखा पूर्वेकडे भ्रमण करीत जाऊन चीन ह्या देशांत स्थायिक झाली व तिनें तेथें आपली एक स्वतंत्र संस्कृति निर्माण केली. ज्याप्रमाणें भरतखंडांतील आर्य लोकांची संस्कृति ही सतत परंपरेनें चालत आलेली आहे त्याप्रमाणेंच चिनी लोकांची संस्कृतिहि अखंड परंपरेनें विकास पावत आलेली आहे. प्रथम चिनी लोकहि वन्य स्थितींत असून त्यांचा समाज बनला नव्हता. हें कार्य प्रथम फुहि नांवाच्या त्यांच्या एका अत्यंत प्राचीन कालच्या बादशहानें केलें अशी त्यांची समजूत आहे. याचा काल ते ख्रिस्तपूर्व २८५२ ते २७३८ मानतात. या राजानें प्रथम विवाहसंस्था व कुटुंबसंस्था स्थापन केली. यानेंच प्रथम सामाजिक जीवनास आवश्यक अशा सर्व गोष्टींचा शोध लावला अशी चिनी लोकांची समजूत आहे. या बादशहानें त्यांस पशुपालन, मच्छीमारी व मृगया हीं शिकविलीं व एक तऱ्हेची चित्रलिपि प्रचारांत आणली. पुढें शाननुंग यानें त्यांस कृषिकर्माचें ज्ञान करून दिलें व अनेक वनस्पतींच्या औषधी गुणांचा शोध लावला. यानंतर हुआगाति या बादशहाने अनेक सुधारणा केल्या. सर्व सुधारणांचा आरंभ आपल्या कार्यकीर्दींत झाला अशी त्याची बढाई असे. यानें चिनी राज्याची मर्यादा वाढविली व चिनी लोकांस देवालयें व घरें बांधण्याची कला शिकवून गाड्या व नावा बांधून दळणवळण सुलभ केलें. यानंतर यौ व शुन असे दोन राजे होऊन गेले. ह्यांचा उल्लेख कन्फ्युशिअसच्या शुकिंग नांवाच्या ग्रंथांत आढळतो. शुन राजानंतर हिया घराण्याची कारकीर्द सुरू झाली. ह्यांतील यू नांवाच्या राजानें पीत नदीच्या पुराचें पाणी वाहून जाण्याकरितां कालवे खोदले व आपल्या राज्याची नऊ प्रान्तांत विभागणी केली. ह्या घराण्यांत एकदर अठरा बादशहा झाले व तें ख्रिस्तपूर्व १७६६ मध्यें लयास गेलें. ह्यानतर शांग उर्फ यिन ह्या नांवाचें घराणें ख्रि. पू. १७६६ पासून ११२२ पर्यंत राज्य करीत होतें. या कालांत पश्चिमेकडे हिउंगनु अथवा हूण लोक हे एकसारख्या स्वाऱ्या करीत असत. ह्या घराण्यांतलि चौसिन ह्याच्या कारकीर्दींत वोनवांग नांवाच्या पंडितानें ह्किंग नांवाचा एक ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचा अद्यापहि चिनी लोक अभ्यास करितात.

## चिनी संप्रदाय—

चीनमध्यें सामाजिक प्रगतीबरोबरच धार्मिक प्रगति होत गेली. चीनमध्यें सध्यां बौद्ध, कन्फ्युशिअस व ताओ असे तीन संप्रदाय प्रचलित आहेत. ह्यांपैकीं बौद्ध संप्रदायाचें वर्णन येऊन गेलेंच आहे. कन्फ्युशिअस हा ख्रिस्तपूर्व सहाव्या किंवा पांचव्या शतकात होऊन गेला असावा. ह्यानें तत्कालीन सर्व तत्त्वज्ञानाचें संहितीकरण केलें व तें शिकिंग्, शिहाकिंग्, इकिंग् व लिलीकिंग् नांवाच्या ग्रंथांत ग्रंथित केलें. कन्फ्युशिअसनें मुख्यतः राजधर्म व नीतिधर्म ह्यांचें प्रतिपादन केलें आहे. त्यानें पारलौकिक गोष्टींचें वर्णन न करितां मनुष्यानें

आपला आयुष्यक्रम कसा ठेवावा ह्यासंबंधींच विवेचन केलें आहे. त्यानें सामान्यतः सामाजिक नीति व राजनीति ह्यांवर विशेष भर दिला आहे व ह्याच गोष्टींची त्या वेळीं विशेष आवश्यकता होती. मनुष्य ज्ञानाच्या योगानें आपली उन्नति करून घेऊं शकतो असें त्याचें सांगणें असे. मानवानें परोपकार, मनाचा सरळपणा, औचित्य, चाणाक्षपणा व सद्धेतु ह्या गोष्टींकडे लक्ष दिलें असतां समाजांत बंधुभाव राहण्यास मदत होते असें तो म्हणत असे. राजा व प्रजा, पिता व पुत्र, वडील व धाकटा भाऊ, पति व पत्नी, मित्र व शत्रु यानीं परस्पराशीं सहकार केल्यास आयुष्य सुखमय होईल अशी ह्याची शिकवणूक असे.

ताओ संप्रदाय हा लौत्से नावाच्या पुरुषानें खिस्तपूर्व ६०४ च्या सुमारास स्थापन केला. याच्या ग्रंथाचें नाव ताओ तेकिंग असें आहे. हा ग्रंथहि संहितास्वरूपाचा असणें शक्य आहे. ताओ ह्या शब्दाचा अर्थ मार्ग, बुद्धि अथवा वाणी असा होऊ शकतो. तथापि मार्ग हा शब्द त्यास अभिप्रेत असावा. मानवानें निरभिमानानें आपलें कर्तव्य करीत असावें अशी त्याची शिकवणूक असे. सामान्यतः निष्काम व निर्हेतुक कर्म करणें हाच ताओ या मार्गाचा सिद्धांत दिसतो. ताओची शिकवण कांहींहि असली तरी पुढें त्याची अवनति एका अज्ञानी कर्मठपणांत झाली व त्यांत किमया, पिशाचबाधा, मंत्रतंत्र, भविष्यज्ञान ह्यांसारख्या गोष्टीहि शिरल्या.

## चीनचीं राजघराणीं—

खिस्तपूर्व ११२२ मध्यें चीन देशांत चौ नांवाच्या घराण्याची स्थापना झाली. ह्या घराण्यांतील पहिला राजा वूवंग या नांवाचा होता. यानें सर्व साम्राज्याची संघटना करून राज्यकारभाराची नीट व्यवस्था लावली. यानें आपल्या नातेवाइकांस मोठमोठ्या जमीनदाऱ्या दिल्या. त्यांचीं पुढें संस्थानें बनून चिनी साम्राज्य म्हणजे एक संस्थानांचा संघ बनला व बादशहा हा त्याचा प्रमुख झाला. धार्मिक बाबतींतहि चीनमध्यें राजा हाच मुख्य पुरोहित मानला जाऊं लागला. याप्रमाणें राजकीय व धार्मिक दोन्ही बाबतींत राजासच प्रामुख्य प्राप्त झालें.

या बादशहानें सर्व राजकीय व इतर व्यवहारांच्या बाबतींत नियम घालून दिले व सर्वत्र शिस्त स्थापन केली. वूवंग बादशहानें स्थापन केलेलें साम्राज्य खिस्तपूर्व २५३ पर्यंत टिकलें. या घराण्यांत एकंदर ३५ बादशहा झाले. खिस्तपूर्व ७ व्या शतकांत या घराण्यांतील सत्ता दुर्बल झाली होती व चीनमध्यें अनेक संस्थानें बलिष्ठ झालीं होतीं व तीं आपसांत युद्धें करूं लागलीं होतीं. तथापि एकंदरींत चौ घराण्याच्या कारकीर्दींत चीन देशाचा बराच उत्कर्ष झाला. वर उल्लेखिलेल्या तीनहि संप्रदायांचा प्रसार ह्यांच्याच कारकीर्दींत विशेष झाला.

## त्सिन घराणें—

ह्यानंतर चीनमधील सत्ता त्सिन या घराण्याकडे गेली (खिस्तपूर्व २४९ ते २१०). ह्या घराण्यांत शी व्हांगती या नांवाचा एक प्रख्यात राजा होऊन गेला. त्यानें सिगनफू येथें राजधानी नेऊन तेथें एक मोठा राजवाडा बांधला. यानें पूर्वीची संस्थानी व सरंजामी पद्धति बंद केली व सर्व प्रांतांवर आपले अधिकारी नेमले. ह्यानेंच चीनची प्रचंड भिंत बांधली. तसेंच पूर्वीचें सर्व वाङ्मय जाळून टाकण्याचा हुकूमहि ह्याच बादशहानें दिला. ह्याच्या मृत्यूनंतर अनेक बंडें होऊन हान घराण्याची स्थापना झाली.

## हान घराणें—

हान घराण्यानें सुमारें २०० वर्षें राज्य केलें. या घराण्यांतील बादशहानें काओति ही पदवी घेऊन प्रथम लोयाग येथें व नंतर शेनसि प्रांतांतील चंगअन येथें आपली राजधानी केली. यानें पूर्वीच्या व्हांगति या बादशहाचे ग्रंथविध्वंसक वगैरे सर्व कायदे रद्द केले. याच्यामागून झालेल्या व्हेती नांवाच्या बादशहानें ग्रंथलेखनास उत्तेजन दिलें व पूर्वींचे सर्व नष्ट ग्रंथ पुन्हा तयार करविले. हान घराण्याच्या कारकीर्दींत चीन देशाचे पश्चिमेकडील युएची लोकांशीं चंग किएन या सेनापतीमार्फत तह करून त्यांच्याशीं व भरतखंडांतील लोकांशीं संबंध जोडण्यांत आले व सर्वत्र शांतता स्थापन करून युरोप व रोमपर्यंत व्यापार सुरक्षितपणें करतां येऊं लागला.

हान घराण्याच्या कालांत चीनमध्यें पुन्हां सरंजामी पद्धतीचा अवलंब करण्यात आला. या राजांनीं पश्चिमेकडील देशांपैकीं खोनान, काश्गर, कुंचा व शेनशेन ह्या प्रदेशांशीं पानचौ ह्या वकिलामार्फत संबंध जोडले व पुढें तीं संस्थानें आपल्या राज्यांत सामील केलीं. त्यांच्याच कारकीर्दींत बौद्ध संप्रदायाचा प्रवेश चीनमध्यें प्रथम इ. स. ६५ या वर्षी झाला. हान घराण्याच्या कारकीर्दींत बरीच सुधारणा होऊन चीनचा व्यापार वाढला. शिक्षणांत सुधारणा होऊन परीक्षांची पद्धति अमलात आली. या कालाच्या सुमारास भरतखंड व चीन यांमध्यें बरेंच दळणवळण वाढलेलें असून हिंदुस्थानांतून इ. स. २५७ मध्यें पहिलें वकील मंडळ चीनमध्यें गेलें. त्यानंतर सन ४२८ त दुसरें व पुढें ४७७ पासून ५७१ पर्यंत सुमारें ९ वकील मंडळें भारतांतून चीनमध्यें गेल्याचें माबेल डफनें वर्णन केलें आहे. ह्या घराण्यानंतर कांहीं काल चीनमध्यें अस्वस्थता व बंडाळी माजली. अखेरीस इ. स. ५९० मध्यें यंगकिएन यानें सुई घराण्याची

स्थापना केली. ह्याच्या कारकीर्दीत चीनमध्यें वाङ्मयास उत्तेजन मिळून सुमारें १०,००० ग्रंथ तयार झाले. ह्याचा मुलगा यांगति ह्यानें ही ग्रंथसंख्या ५४,००० पर्यंत वाढविली. तसेंच पुष्कळ कालवे खोदले. परंतु त्या कामांत झालेल्या खर्चामुळें लोकांनीं बंड केलें. ह्यानंतर तंग घराण्याची स्थापना झाली.

## तंग घराणें—

तंग घराण्याचा कौत्सु हा पहिला बादशहा होय. यानें मध्य आशियामध्यें आपलें वर्चस्व पुन्हां स्थापन केलें व आपल्या साम्राज्याची सरहद्द पुष्कळच वाढविली. इ. स. ६४३ मध्यें ह्याच्या दरबारांत नेपाळ, मगध, इराण, व कॉन्स्टांटिनोपल येथून वकील आले होते. ह्या राजाच्या कारकीर्दीत शेती, व्यापार व वाङ्मय यांची पुष्कळच वाढ झाली. यानें खिस्ती व महंमदपंथी लोकांसहि आश्रय दिला. तंग घराण्यानें एक शतक राज्य केल्यानंतर त्यास उतरती कळा लागली. यांतील वु त्सुंग या बादशहानें धार्मिक मठ वगैरे संस्था नष्ट केल्या. पण पुढें इ त्सुंग या बादशहाच्या कारकीर्दीत बुद्ध धर्माचें पुनरुज्जीवन झालें.

ह्या घराण्यानंतर लिअंग, तंग, त्सिन, हान व चौ या घराण्यांनीं एकामागून एक सत्ता बळकावली, व त्यानंतर सुंग घराणें स्थापन झालें. यांनीं सुमारें तीन-चारशें वर्षे राज्य केलें. यांच्या कारकीर्दीत उत्तर चीनच्या कांहीं भागांवर पेकिंग येथें एक किन म्हणजे सुवर्ण नांवाचें घराणें स्वतंत्रपणें राज्य करूं लागलें व सुंग घराण्यानें आपली राजधानी नानकिंग व हंगचौ येथें नेली.

## मोंगल अमल—

बाराव्या शतकांत मोगल लोकांनीं चीनवर स्वारी केली व इ. स. १२८० मध्यें कुब्लइखान यानें सर्व सत्ता काबीज करून युएन घराण्याची स्थापना केली. ह्याच्याच कारकीर्दीत मार्कोपोलो या प्रवाशानें चीनला भेट दिली. यानें राज्यांत शांतता प्रस्थापित करून पुष्कळ सुधारणा केली. परंतु चिनी लोकांस तो अप्रियच होता. अखेरीस चु युएन चंग या एका चिनी मजुराच्या मुलानें बंड करून मिंग घराण्याची स्थापना केली. ह्या घराण्यांतील चेंग वे बादशहाच्या कारकीर्दीत पोर्तुगीज लोकांशीं व इतर युरोपियन राष्ट्रांशीं चीनचा संबंध आला.

## मांचु घराणें व प्रजासत्ता—

यानंतर सतराव्या शतकांत चीनमध्यें मांचु लोकांनीं आपल्या घराण्याची स्थापना केली. ह्याच घराण्याची चीनवर नवीन प्रजासत्ताक राज्याची स्थापना होईपर्यंत सत्ता होती. या वेळेस चीनचा राज्यविस्तार उत्तरेस सैबेरियापर्यंत, दक्षिणेस अनाम व ब्रह्मदेशापर्यंत, पूर्वेस पॅसिफिक महासागरापर्यंत व पश्चिमेस काश्गर व यार्कंद प्रांतापर्यंत झालेला होता.

ज्याप्रमाणें भारतीयांची संस्कृति ही त्यांच्यामध्यें विकास पावलेल्या व पुढें प्रसृत झालेल्या वैदिक वाङ्मयामुळें व याच वैदिक वाङ्मयाच्यापुढें स्थानिक परिस्थितीप्रमाणें व समाजाच्या वृद्धीप्रमाणें मंत्र व सूत संस्कृतींच्या एकत्रीकरणामुळें व वाढीमुळें आणि क्षत्रियादि वर्गांच्या प्रयत्नांमुळें त्याचा उपनिषदादि वाङ्मयांत, षड्दर्शनांत व पुढें पौराणिक वाङ्मयांत विकास झाल्यामुळें अखंड परंपरेनें दीर्घकालपर्यंत चालत आली, त्याचप्रमाणें चिनी संस्कृतिहि अत्यंत दीर्घकालपर्यंत अत्रुटित परंपरेनें चालत आली आहे. ज्याप्रमाणें भारतीयांच्या वाङ्मयांत खिस्तपूर्व पांच हजार वर्षांच्या स्मृति, आचार, विचार, इत्यादि ग्रथित झालेले आहेत त्याप्रमाणें चीनमध्येंहि खिस्तपूर्व तीन हजार वर्षांपासूनचा इतिहास तरी ग्रथित झालेला आहे. चीनमध्यें ज्या मानवशाखेनें वसाहत केली तिचें परिभ्रमण फार प्राचीन कालीं म्हणजे वेदकालीन लोकांच्या मूलस्थानविषयक सामाजिक आयुष्यक्रमाचा व भाषेचाहि विकास होण्यापूर्वी झालेलें असावें व त्यांनीं आपली संस्कृति व सामाजिक व्यवस्था अगदीं स्वतंत्रपणें परिणत केल्या असल्या पाहिजेत ही गोष्ट त्यांचें इतर भाषांशीं वगैरे मुळींच साम्य आढळत नाहीं यावरून स्पष्ट होते.

## चिनी कुटुंब—

चिनी कुटुंबांत पिता हा कुटुंबाचा प्रमुख असतो तसेंच राष्ट्र हें एक मोठें कुटुंब असून राजा अथवा सरकार हें पित्याच्या ठिकाणीं असते. यामुळें या लोकांत पितृपूजेस फार महत्त्व आलें. सर्व सामाजिक बाबतींत कुटुंबांत पित्यास प्रामुख्य असतें, तसेंच सरकारचेंहि एक विधि व सामाजिक उत्सवाचें खातें आहे. विवाहामध्यें वरवधूंस प्रामुख्य नसून विवाह जमविणें व सर्व विधी पार पाडणें यांत कुटुंबप्रमुख अथवा पित्यासच महत्त्व असतें. वर फक्त विवाहविधीच्या अखेरीस अवगुंठन दूर करून वधूचें मुख पाहतो.

चिनी समाजाचे मुख्यतः चार वर्ग मानण्यांत येतात : विद्वान्, शेतकरी, कारागीर व वैश्य. या देशांत पिढीजाद सरदारवर्ग अथवा क्षत्रियवर्ग नाहीं. अधिकारी वर्गास समाजांत विशेष मान असतो. कांहीं चिनी घराण्यांत वंशपरंपरा पदव्या असतात. पित्यामागें पुत्रांमध्यें संपत्तीची समविभागणी होत असल्यामुळें शेतीच्या जमिनीचे लहान लहान तुकडे होत जातात. पित्याची मुलांवर पूर्ण सत्ता असल्यामुळें मुलांस गुलाम म्हणून विकण्याचाहि पित्यास अधिकार असतो. त्यांत स्त्री गुलाम अधिक

आढळतात. कन्येपेक्षां पुत्रास अर्थात् अधिक महत्त्व असतें. स्त्रियांस स्वातंत्र्य नसून पिता, पति वा पुत्र यांच्या अंकित राहावें लागतें. अनेकपत्नीत्व रूढ असून पहिली पत्नीच वृद्धापकाळीं आपल्या पतीस दुसरी स्त्री करून देते व सर्व स्त्रिया एकत्र आनंदानें राहतात, अर्थात् वडील स्त्रीस अधिक मान असतो.

नूतन वर्षाचा आरंभदिन सण मानण्यांत येतो. चिनी लोक परस्परांस नमस्कार करून अभिवादन करतात. स्त्रिया व पुरुष यांचा पोषाख बहुतेक सारखाच असतो. चिनी लोकांचें स्वतंत्र पंचांग आहे. त्यांत अधिक महिना धरण्याचा प्रघात आहे. पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्कामुळें चिनी लोकांत सुशिक्षित वर्गांत सुधारणा होत आहे, तरी सामान्य लोक जुन्याच चालीरीतीस धरून आहेत.

चीनमध्यें कन्फ्युशिअस, ताओ व बुद्ध धर्म हे फार प्राचीन काळापासून प्रचलित आहेत. त्यानंतर अलीकडे मोंगल लोकांबरोबर महंमदी व त्यानंतर इतर संप्रदायांचा तुरळक प्रसार झालेला दृष्टीस पडतो.

## चिनी वाङ्मय—

चिनी वाङ्मयाचा आरंभ फार प्राचीन काळापासून झालेला असून तें पूर्णपणें सर्वांगीण आहे. तसेंच तें सत्याधिष्ठित असून उच्च दर्जाचें आहे. त्यांत ग्राम्यता सहसा आढळत नाहीं. या वाङ्मयांत काव्यें फार प्राचीन काळापासून होत असून कन्फ्युशिअसनें त्यांचा शिकिंग या ग्रंथांत संग्रह केला आहे. तअंग घराण्याच्या कारकीर्दींत काव्याची फार भरभराट झाली. काव्याप्रमाणेंच कागदपत्रांचा एक संग्रह शूकिंग या नांवानें कन्फ्युशिअसनें केलेला आढळतो. यांत यौ बादशहाच्या ( ख्रि. पू. २३५७-२२५५ ) कारकीर्दीपासूनचे कागदपत्र आढळतात. यावरून तत्कालीन समाजस्थितीचें चांगलें ज्ञान होतें.

चिनी वाङ्मयांत बऱ्याच प्राचीन काळापासून लिहिलेल्या बखरी बऱ्याच महत्त्वाच्या आहेत. त्या ख्रिस्तपूर्वकाळापासून अर्वाचीन काळापर्यंतच्या असून बहुतेक घराण्यांनीं आपल्या पूर्वीच्या घराण्यांच्या बखरी लिहिलेल्या असून त्या निःपक्षपातीपणानें लिहिलेल्या आहेत. तअंग घराण्याचा इतिहास प्रथम तसा न लिहिला गेल्याचें आढळून आल्यामुळें तो पुन्हां लिहिण्यांत आला.

याखेरीज चरित्रसंग्रह, प्रवासवर्णनें व भूवर्णन, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, भविष्यज्ञान, चित्रकला, वगैरे विषयांवर अनेक ग्रंथ चिनी भाषेंत दीर्घ कालापासून लिहिण्याची प्रथा आढळते. याशिवाय चिनी वाङ्मयाचा एक विशेष म्हणजे समुच्चयग्रंथांचा वर्ग होय. यांत एखाद्या ग्रंथकाराच्या लेखसंग्रहाचा अंतर्भाव होतो. चिनी वाङ्मयामध्यें ज्ञानकोश हा एक महत्त्वाचा भाग आहे. असे ज्ञानकोश अनेक तयार झाले असून त्यांतलि कांहीं तर इतके प्रचंड आहेत कीं, ते मुद्रित करणें अशक्य झालें. उदाहरणार्थ, मिंग घराण्यांतील तिसरा बादशहा युंगलो (१४०३-१४२५ ) यानें एक प्रचंड ज्ञानकोश तयार करविला. तो लिहिण्यास २,२०० मनुष्यें ५ वर्षें काम करीत होतीं. या ग्रंथांत २२,८७७ प्रकरणें असून केवळ विषयसूचीचीं ६० प्रकरणें आहेत व एकंदर पृष्ठसंख्या सुमारें ९,१७,००० आहे. हा अमुद्रितच ठेवण्यांत आला. अशा प्रकारचे अनेक ज्ञानकोश तयार करण्यांत आले होते. अशाच एका दुसऱ्या ज्ञानकोशाच्या फक्त १०० प्रती छापण्यांत आल्या होत्या.

चिनी लोक प्रथम लांकडाच्या फळीवर बांबूच्या कांचटीनें आकृती काढीत. मग कांबटीच्या ऐवजीं रंगाची कुंचली व फळीच्या ऐवजीं रेशमी कापडाचा उपयोग करूं लागले. पुढें रेशमी कापड महाग पडूं लागल्यामुळें त्यांनीं कागदाचा शोध लावून त्यावर लिहिण्यास सुरवात केली व याप्रमाणें जगास एक मोठें ज्ञानप्रसाराचें साधन उपलब्ध करून दिलें. तसेंच मुद्रणकलाहि प्रथम चिनी लोकांनींच शोधून काढली. मात्र ते केवळ अनेक शब्द खोदलेल्या लांकडी ठशावरून मुद्रण करीत. सुट्या खिळ्यांची कल्पना त्यांस आली नव्हती.

## चिनी लोकसमाज—

चीन देशांतील समाजानें आपल्या संस्कृतीची पुष्कळच प्रगति केली होती. अगदीं प्राचीन कालच्या त्यांच्या स्मृतीप्रमाणें तीन बादशहांच्या कारकीर्दींतच त्यांनीं कृषि, पाटबंधारे, पशुपालन, वगैरे गोष्टींचा विकास केला होता. त्यांची भाषा ही अगदीं स्वतंत्रपणें उगम व विकास पावलेली आहे. ईजिप्ती किंवा संस्कृत भाषेप्रमाणें तिचा विकास वर्णमूलक शब्दरचनेच्या मार्गानें झाला नाहीं. चित्रलिपीनंतरची एक पायरी म्हणजे कल्पनालिपीच्या अवस्थेपर्यंतचा तिचा विकास झाला. त्यामुळें प्रत्येक कल्पनेकरितां स्वतंत्र अक्षर योजावें लागल्यामुळें त्या भाषेंत या कल्पनाक्षरांची संख्या बेसुमार म्हणजे हजारोंनीं वाढली. अर्थात् चिनी भाषा चांगल्या तऱ्हेनें अवगत करून घ्यावयाची म्हणजे सुमारें पांच हजार अक्षरांची तरी कमींत कमी माहिती करून घ्यावी लागते. अशा तऱ्हेची भाषेची अडचण असली तरीसुद्धां चिनी लोकांमध्यें ज्ञानाचा अनेकांगी व पुष्कळच विकास झाला होता ही गोष्ट पाहिली म्हणजे आश्चर्य वाटतें. पाश्चात्य देशांत अनेक शोध लागण्यापूर्वी चिनी लोकानीं ते शेंकडो वर्षांपूर्वी

लावलेले होते. उदाहरणार्थ, लेखनकला ही त्यांनीं फार प्राचीन काळींच अवगत केल्यामुळें लेखनाचें साहित्य जे कागद ते तयार करण्याची कलाहि त्यांनीं पुष्कळच प्राचीन काळीं साध्य करून घेतली होती व त्यांच्यामार्फतच तिचा प्रसार अरब लोकांत व नंतर इतर लोकांत झाला. बंदुकीची दारू प्रथम चीनमध्येंच तयार होऊं लागली, पण तिचा उपयोग त्यांनीं फक्त फटाके करण्याकडे केला. ज्या क्रियेच्या साहाय्यानें पुढें रसायन-शास्त्राचा प्रारंभ व प्रगति झाली त्या क्रियेचा प्रारंभ प्रथम चीनमध्येंच झाला व त्याच्यापासूनच अरब लोकांनीं ती विद्या प्राप्त करून घेतली. लोहचुंबकाचा शोध प्रथम चीनमध्येंच लागला. चीन देशांत तंत्रवाङ्मयाची वाढ विशेषतः ताओ पंथांत फार झाली व त्यामुळें रसायनादि विषयात त्यांची प्रगति बरीच झाली. वैद्यकशास्त्रातहि चीनची प्रगति बरीच झाली. क्रयविक्रयामध्यें धातूंच्या तुकड्यांचा उपयोग विशेषतः चांदीचा उपयोग चिनी लोक फार प्राचीन काळापासून करीत आले आहेत. चीनमध्यें अनेक प्रकारांनीं वाङ्मयाचीहि वाढ झाली. राज्यकारभारामध्यें मोठ्या अधिकारावर नेमावयाचीं माणसें परीक्षा घेऊन त्यांच्या ज्ञानाची कसोटी लावून घ्यावयाची ही पद्धति त्यांनींच सुरू केली. सर्व देशाची भौगोलिक पाहणी करून प्रादेशिक माहिती देणारे ग्रंथ अथवा गॅझेटिअर या प्रकारचे ग्रंथ चीनमध्येंच प्रथम तयार झालेले आढळतात. तसेंच ज्ञानकोशा-सारखे ग्रंथहि प्रथम चीनमध्येंच दृष्टीस पडतात; व त्यांपैकीं कांहीं इतके अवाढव्य झाले कीं, ते छापून घेणें अशक्य झालें. चीनची प्रचंड भिंत हें एक चिनी बांधकामाचें प्रत्यक्ष उदाहरण आहे.

चीन देशांत बौद्ध धर्माचा विशेष प्रसार झाल्यामुळें अनेक बौद्ध धर्मीय संस्कृत ग्रंथांचें चिनी भाषेंत भाषांतर झालेलें आहे. अशीं भाषांतरें करण्याकरितां अनेक भिक्षूंनीं आपलें आयुष्य खर्च केल्याचीं उदाहरणें आहेत. कांहीं ग्रंथ तर असे आहेत कीं, त्यांचे मूळ ग्रंथ भारतांत नष्ट झाले असून आज ते चिनी भाषां-तररूपानेंच उपलब्ध आहेत. ज्यांच्या ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें झालीं आहेत अशा कांहीं प्रमुख ग्रंथकारांचीं नावें द्यावयाचीं म्हणजे मैत्रेय, अश्वघोष, नागार्जुन, देव, वसुबंधु, स्थिरमति, स्थित-गति, देवशर्मा, वसुमित्र, समंतभद्र, शिलादित्य, कपिल व ज्ञानचंद्र हीं होत. यांविरीज ज्या अनेक ग्रंथकारांनीं अशा तऱ्हेचीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं त्यांच्यापैकीं कांहीं महत्त्वाचीं नांवें द्याव-वयाचीं तर पुढें दिल्याप्रमाणें देतां येतील : काश्यपमातंग, कुफालान, लोकरक्ष, धर्मकाल, धर्मरक्ष, बुद्धभद्र, विमलाक्ष, कुमारजीव, धर्ममित्र, परमार्थ, बोधिरति, गौतमधर्मज्ञान, पुण्यो-पाय, देवप्रज्ञा, शुभकरसिंह, अमोघवज्र, इत्यादि.

## जपान—

जपानबद्दलची माहिती जरी बऱ्याच प्राचीन काळापासून उपलब्ध असली तरी त्यांच्या संस्कृतीचा उगम चिनी संस्कृती-मध्येंच झालेला आढळतो. त्यांचे कोझीकी व निहोंगी हे दोन ग्रंथ त्याच्या पौराणिक वाङ्मयाची माहिती देतात. ख्रि. पू. ६६० ते इ. स. ४०० पर्यंतचा काल हा जपानचा प्रागैतिहासिक काल होय. या कालांत एकंदर २४ राजे झाले. यांतील पहिला राजा सूर्यदेवतेचा नातू सोसून याच्या वंशजांनीं जपानात प्रथम इझुमो येथें वसाहत केली. याचा अर्थ कोरिया-मधून मंगोलियन लोकांनीं प्रथम जपानवर स्वारी केली असावी असें दिसतें. यानंतर मलायी लोकांनीं दक्षिणेकडून जपानात प्रवेश केला. अलीकडे जपानांत बरेचसे प्राचीन अवशेष उत्खनन करून काढण्यांत आले आहेत. पण त्यात प्राचीन लेख फारसे आढळत नाहींत. पहिला राजा जिम्मु हा ख्रि. पू. ६६७ मध्यें हिउंग येथून आला व त्यास ६६० मध्यें यामाटो येथें राजवाड्यांत राज्याभिषेक करण्यांत आला. प्राचीन राजे प्रत्येकीं आपली राजधानी बदलीत त्यामुळें जपानांत प्रथम शहराची वाढ झाली नाहीं. दहाव्या राजाच्या कारकीर्दींत खाने-सुमारी, नौकानयन, पाटबंधारे, तलाव, वगैरे कामें करण्यांत आलीं. हे बादशहा अनेक स्त्रिया करीत त्यामुळें अनेक पुत्र होऊन त्यांस जहागिरी द्याव्या लागत. एका राजास ८० पुत्र होते. यामुळें सामुराई वर्ग उत्पन्न झाला. त्यानंतर बौद्ध संप्रदायाच्या प्रसाराबरोबर भारतीय संस्कृतीचा परिणाम जपानी लोकांवर झालेला दिसून येतो व तो अनेकांगी आहे. विशेषतः जपानी संगीत भारतीय संगीतावर आधारलेलें दिसतें. त्याप्रमाणेंच जपाननें आपल्या भाषेसहि वळण देऊन बाराखड्या-प्रमाणे एक पंचाक्षरी का, की, कू, के, को अशी तयार करून आपली भाषा चिनी भाषेपेक्षां सुलभ करून घेतली. त्यामुळें त्या देशांत त्यांच्या भाषेंत वाङ्मय व शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करण्यास अडचण पडली नाहीं. जपाननें अर्वाचीन संस्कृतीचा फारच लवकर व झपाट्यानें स्वीकार करून स्वतःस पाश्चात्य राष्ट्रांच्या बरोबरीस आणलें. गेल्या युद्धांत जपानचा पराभव झाल्यामुळें त्याच्या प्रगतीच्या मार्गांत मोठीच अडचण आली आहे खरी, तथापि तो देश लवकरच या आपत्तींतून पार पडून आपलें पूर्ववैभव प्राप्त करून घेईल अशी खात्री वाटते, व तशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

## उपसंहार—

याप्रमाणें आपण आतांपर्यंत विश्वोत्पत्तीपासून विश्वविकास कसकसा होत गेला व त्यांत मानवप्राण्याचा विकास होऊन

त्यानें पृथ्वीवरील निरनिराळे प्रदेश व्यापून भिन्न भिन्न परिस्थितींत आपला सामाजिक विकास कसकसा करून घेतला व प्रागैतिहासिक काळांत व विशेषतः प्राचीन काळांत या पृथ्वीतलावर भिन्न भिन्न मानवसंस्कृती अस्तित्वांत येऊन त्यांचा अनेकविध अंगांनीं कसा विकास होत गेला याचें स्थूल अवलोकन केलें. नियोजित मर्यादेमध्यें या सर्व संस्कृतींचें वर्णन तें कितीहि उद्बोधक व रम्य असलें तरी यापेक्षां अधिक तपशीलवार करतां येणें शक्य नव्हतें. या प्राचीन संस्कृतींपैकीं भारतीय व चिनी या दोन संस्कृतीच त्यांच्यावर अनेक आक्रमणें झालीं व त्यांच्या स्वरूपांत भिन्न भिन्न कालीं थोडाफार फरक पडत गेला तरी सातत्यानें आज अस्तित्वांत राहिल्या आहेत व अत्यंत प्रतिकूल परिस्थितींतहि त्यांनीं टिकाव धरून आपलें सनातनत्व प्रगट केलें आहे.

आतांपर्यंत ज्या अनेक संस्कृतींचें आपण अवलोकन केलें त्यांपैकीं बऱ्याचशा आज भूतलावरून नष्ट झाल्या आहेत ही गोष्ट आपणांस त्यांच्या इतिहासावरून स्पष्ट झालेलीच आहे व जरी भारतीय व चिनी संस्कृति या आज अस्तित्वांत असल्या व आपल्या परंपरेचा अभिमान बाळगीत असल्या तरी आतांपर्यंत आपण जें त्यांच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे त्यावरून त्यांच्या आजच्या स्वरूपांत व तत्कालीन स्वरूपांत बराच फरक झालेला आहे ही गोष्ट आपणांस सहज प्रतीत होईल. याकरितां आपण आतांपर्यंत वर्णन केलेल्या संस्कृतींस सामान्यपणें प्राचीन संस्कृती असें नामाभिधान देण्यास हरकत नाहीं. यानंतर यापुढें जो आपणांस विश्वविकास किंवा संस्कृतिविकास वर्णन करावयाचा आहे त्याचे मध्ययुगीन व अर्वाचीन असे दोन खंड पडतात. या मध्ययुगीन व अर्वाचीन काळांत एकंदर ज्ञात जगांत बरेच निरनिराळ्या प्रकारचे सांस्कृतिक, सामाजिक, वैचारिक, सांप्रदायिक, आर्थिक, वगैरे फरक घडून आले व त्यांचें स्वरूपहि आतांपर्यंत वर्णन केलेल्या स्वरूपाहून भिन्न होतें; म्हणून त्याचा एकत्र, व्यापक व सर्वज्ञ.त भूतलावरील साकल्यानें विचार करावयास हवा. तसा तो आपण पुढील विभागाच्या प्रस्तावनेंत करून ही विश्वविकासाची कथा संपूर्ण करूं.

# भाग पांचवा

## म

**म**—या वर्णाच्या वळणांतील चार मुख्य अवस्था दिसतात. पहिली अशोकाच्या गिरनार लेखांत, दुसरी खि. पू. १ ल्या शतकाच्या सुमाराची एका जैन लेखांतील, तिसरी समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद स्तंभावरील लेखांत व चौथी इ. स. ५३२ च्या मंदसोर लेखांत आढळून येते.

**मकरंद**—एक ज्योतिषी. पंचांगसाधनाच्या कामीं आधारभूत मानलेल्या व सूर्यसिद्धांतानुसार लिहिल्या गेलेल्या 'मकरंद' नांवाच्या सारणी-ग्रंथाचा कर्ता. ग्रंथकाल सन १४७८ आहे. हा काशीचा राहणारा. दिवाकर नांवाच्या एका विद्वान् गृहस्थानें याच्या वरील ग्रंथावर 'मकरंदविवरण' नांवाची टीका लिहिली आहे. तसेंच गोकुळनाथ दैवज्ञानें शके १६८८ मध्यें यांतील सारण्यांची उपपत्ति दिली आहे. आज हा सारणी ग्रंथ काशी येथें छापला आहे.

**मकरंदगड**—मुंबई, सातारा जिल्हा. मालकमपेठेच्या वायव्येस ७ मैलांवर हा किल्ला आहे. हा महाबळेश्वरापेक्षां ६५० फूट खालीं आहे. देवली खेड्यावरून कोयना उतरून घोणसपूर या खेड्याजवळून या किल्ल्यावर चढून जातां येतें. येथें एक मल्लिकार्जुनाचें देवालय शिवाजीनें बांधलें आहे. हा गड १६५६ त शिवाजीनें बांधला.

**मका**—[ लॅ. झिआमेस ]. हें एक जातीचें गवत आहे. याची वाढ फार झपाट्यानें होते. याच्या कांहीं जातींत याचीं कणसें एक फूट लांब असून दोन ते तीन इंच जाडीं असतात. याची लागवड अमेरिकेमध्यें फार मोठ्या प्रमाणांत करण्यांत येते. व त्या प्रदेशांत याचा केलेला पाव बहुतेक सर्व लोक खातात. याचें पीठ जरी अत्यंत पौष्टिक असलें तरी तें गव्हाच्या कणिकेबरोबर किंवा दुसऱ्या एखाद्या पिठांत मिसळावें लागतें, तरच त्याचा पाव चांगला होतो. अमेरिकेमध्यें याचे ओले दाणे भाजून फार मोठ्या प्रमाणावर खाण्यांत येतात. त्यास 'पॉप कॉर्न' म्हणतात.

अमेरिकन सं. संस्थानें, द. आफ्रिका, अर्जेंटिना, ब्राझील व रुमानिया या देशांतून याचें फार मोठें पीक होतें. १९३९-४० सालीं जगांत एकंदर १२० कोटी क्विंटल मका पिकला.

मका मूळ अमेरिकेंत होत असून बहुतेककरून पोर्तुगीज लोकांनीं हा हिंदुस्थानांत आणला असावा. मक्याचा मुख्य उपयोग अन्न व चारा म्हणून करतात. उ. हिंदुस्थानांत मक्याच्य पिठाच्या भाकरी करतात. याचीं हिरवीं कणसें भाजून अथवा उकडून खातात. मक्याचा ओला चारा गुरेंढोरें खातात. वाळलेला फक्त हत्ती खातात. अमेरिकेंत मक्यापासून पिष्टसत्त्व व पिष्टशर्करापाक अथवा फलशर्करा तयार होते. याच्यापासून व्हिस्की व मद्यार्क तयार करतात. फलशर्करा केल्यावर राहिलेल्या पदार्थापासून अलीकडे रबर तयार करतात. बियाच्या कोंबापासून एक प्रकारचें तेल होतें. त्याचा जाळणें, ओंगण व साबण करणें या कामांकरितां व स्केल्ड तेल करण्याकडे उपयोग होतो. मधला दांडा व पानें यांच्यापासून चलनी नोटांना योग्य असा कागद निघतो. पिष्टसत्त्व, फलशर्करा, व्हिस्की व मद्यार्क तयार केल्यावर उरलेल्या पदार्थांपासून गुरांसाठीं अन्न तयार करतात.

**मकाओ**—चीनमधील कॅंटन नदीच्या मुखाजवळील एक बेट. ही पोर्तुगीज लोकांची वसाहत आहे. मुख्य ठिकाण मकाओ या नांवाचें शहर आहे. आणि शेजारच्या तैइपा व कोलोन या दोन बेटांमिळून एक पोर्तुगीज प्रांत बनलेला आहे. मकाओ येथें पोर्तुगीज लोक १५५७ पासून वसाहत करून राहिलेले आहेत. परंतु १८८७ पर्यंत या वसाहतीचें स्वातंत्र्य चीननें मान्य केलें नव्हतें. या वसाहतीचें क्षे. फ. ६ चौ. मैल असून लो. सं. ३,७४,७३७ आहे. यांत पोर्तुगीज ८,९८९ व बाकीचे विविध राष्ट्रांतील लोक आहेत. ४१९ हिंदी आहेत. मकाओ येथें एक कॉलेज आहे. व्यापार चिनी लोकांच्या हातीं आहे.

**मकाव पोपट**—हे अमेरिकेच्या उष्ण कटिबंधांत राहतात. यांचा रंग फार चमत्कारिक असतो, परंतु यांच्या गालांवर पिसें नसतात व शेपटी मात्र लांब पिसांची बनलेली असते. विशेषतः किरमिजी रंगाचा मकाव पोपट फारच सुंदर दिसतो.

**मॅकेन्झी नदी**—ही नदी कानडांतील रॉकी पर्वतांत उगम पावून आथा बास्का सरोवराला मिळते (लांबी ६८० मै.); नंतर स्लेव्ह नदी या नांवानें पुन्हां ही नदी वाहूं लागून व मार्गांत तिला 'पीस' नांवाची नदी मिळाल्यावर ही ग्रेट स्लेव्ह लेक या सरोवराला मिळते आणि या सरोवरापासून ही नदी मॅकेन्झी या नांवानें पुन्हां वाहूं लागून मॅकेन्झी उपसागराला मिळते. या नदींत सुमारें १००० मैल नाविक वाहतूक चालते.

**मॅकेव्हेली, निकोलो** (१४६९-१५२७)— एक इटालियन ग्रंथकार व मुत्सद्दी. मध्यम वर्गांत जन्म होऊन लॉरेन्झोच्या दरबारीं प्रसिद्धीस आला. १४९८ सालीं प्रजासत्ताक राज्य स्थापन झाल्यावर मेडिसी घराणें परत येईपर्यंत (१५१२) फ्लॉरेन्समधील दुसऱ्या चॅन्सेरीचा तो चिटणीस होता. त्यानें 'डेल लार्टे डेला ग्वेरा' (१५२०), 'डिस्कोर्सी' व 'प्रिन्सिपे' हे तीन ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं प्रिन्सिपे ग्रंथांत त्यानें अनियंत्रित राजसत्तेचें समर्थन करून आपल्याकडील कौटिल्य किंवा कणिक नीतीप्रमाणें कुटिलराजनीतिशास्त्राची शास्त्रीय पद्धतीनें छाननी करून अनियंत्रित राजानें यशस्वी रीतीनें राज्यकारभार कसा चालवावा याचें विवेचन केलें आहे. पुढें युरोपांत लोकशाहीचीं तत्त्वें रूढ झाल्यामुळें हा ग्रंथ कुप्रसिद्धि पावला आहे; एरवीं त्या ग्रंथांतील व्यवहारशास्त्र चुकीचें नाहीं. पण नीति व सद्गुण यांना त्यानें आपल्या विवेचनांत फांटा दिल्यामुळें 'मॅकेव्हेलिझम' (कुटिलनीति) हा निंदाव्यंजक शब्दप्रयोग रूढ झाला आहे.

**मक्का**—हें अरबस्तानांतील मुख्य शहर व मुसलमानी धर्माचें पवित्र क्षेत्र आहे. महंमदापूर्वी तें व्यापाराकरितां व यात्रेचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध होतें. मुसलमानी धर्माच्या विजयाबरोबर मक्का शहराचें महत्त्व वाढलें. येथील मोठाले व्यापारी साम्राज्याचे सत्रप अथवा पेन्शनर होऊन बसले. इब्न झुबेरच्या मरणानंतर येथील धर्म व राजकीय सत्ता नष्ट झाली. काबा हें अतिशय पवित्र स्थान गणलें गेलें व लांबलांबचे यात्रेकरू मक्केस येऊं लागले. मक्केचे लोक जागा भाड्यानें देणें, वाटाड्याचा धंदा करणें, धर्मकृत्यांत मदत करणें, इत्यादि गोष्टींवर निर्वाह करतात. स्नानगृहें, हिंदुस्थान व जावा या ठिकाणांहून येणाऱ्या यात्रेकरूंसाठीं सदावर्तें, रुग्णालयें, अन्नछत्रें, इत्यादि सार्वजनिक संस्था येथें आहेत. मक्का येथील कायमची वस्ती ५०,००० पासून ६०,००० पर्यंत असावी. येथें पाण्याचा पुरवठा चांगला आहे. तुर्कांनीं ईजिप्त जिंकल्यावर ओटोमन सुलतानांच्या ताब्यांत मक्का येऊन (१५१७) त्यांनीं देवळें, पवित्र स्थानें, इत्यादि बरींच लोकोपयोगी कामें केलीं. गेल्या महायुद्धांत मक्केचा शेरीफ हुसेन ब्रिटिशांच्या बाजूला होऊन त्यानें सुलतानाचा अमल झुगारून दिला व हेजाझचा

स्वतः राजा बनला. महंमदापूर्वी मक्का येथील पवित्र देवस्थान काबा हेंच होय. महंमदानें यांतील मूर्ती फोडून इस्लामी धर्मासाठीं काबा देवस्थान उपयोगांत आणिलें. काबाच्या खालोखाल महत्त्वाच्या इमारती म्हणजे झमझम व मॅकम इब्राहिम या मशिदी होत. येथें सफा आणि मखा या नांवाच्या दोन टेंकड्या आहेत, आणि त्यांचा मान धार्मिक दृष्टीनें काबाच्या खालोखाल आहे. मक्केची यात्रा करणाऱ्याला हाजी म्हणतात.

मक्केची यात्रा फार जुनी म्हणजे अब्राहामपासूनची आहे. अब्राहामनें अरबांना एकेश्वरी मताचा उपदेश केल्या वेळेपासून ही यात्रा आहे. महमदाच्या वेळीं या यात्रेचें स्वरूप जसें धार्मिक खेळाप्रमाणें असे तसेंच आज आहे. सुमारें एक लाखापर्यंत दरसाल बाहेरची यात्रा जमते. येथें यात्रेकरू काबाला प्रदक्षिणा घालतात तेव्हां त्यांना इस्लामधर्मांतील बहुतेक पूज्यस्थानें दिसतात. त्यांच्यासंबंधीं कथा आहेत. काबा हें देवघरच आहे. तें दरसाल राजा व त्याचे मंत्री स्वतः स्वच्छ करतात. आपल्याकडल्याप्रमाणेंच यात्रेकरूंना मक्केंत विशिष्ट नियम पाळावे लागतात; व्रतवैकल्यें करावीं लागतात. मुसलमानांखेरीज कोणालाहि मक्केंत येऊं देत नाहींत. कांहीं लोक मक्केची यात्रा पायीं करतात. कोठून कोठून तरी ते येतात. त्यामुळें मक्केंत एकूण एक इस्लामी प्रदेशांतील लोक दिसतात, यांत नवल नाहीं.

**मॅक्डोनल्ड, जेम्स रॅम्से** (१८६६–१९३७)—हा ब्रिटिश राजकारणी पुरुष मजूर पक्षाचा पुढारी व वृत्तपत्रकार होता. तो स्वतंत्र मजूर पक्षाचा अध्यक्ष (१९०६–१९०९) आणि पुढारी (१९११–१९१४) होता. तो लीसेस्टरतर्फे पार्लमेन्टांत मजूर पक्षाचा सभासद १९०६ ते १९१८ पर्यंत होता. १९२२ सालीं तो पार्लमेंटचा सभासद म्हणून पुन्हां निवडून आला आणि पार्लमेन्टरी मजूरपक्षाचा अध्यक्ष आणि पार्लमेंटांतील सरकारविरोधी पक्षाचा पुढारी झाला. १९१२–१४ सालांत हिंदुस्थानांत जें रॉयल कमिशन आलें होतें त्यांत हा होता; व तेव्हां हिंदी लोकांनीं त्याचा मोठा सत्कार केला. १९२४ सालच्या जानेवारींत तो पहिला ब्रिटिश मजूरपक्षीय पंतप्रधान झाला. आणि त्या जागीं त्याच सालच्या नोव्हेंबर महिन्यापर्यंत होता. नंतर १९२४ डिसेंबरांत तो पुन्हां सरकारविरोधी पक्षाचा पुढारी झाला. १९२९ सालीं पुन्हां मजूरपक्ष अधिकारारूढ होऊन हा पंतप्रधान झाला. १९३१ सालीं देशावर आर्थिक संकट ओढवल्या वेळीं यानें इतर पक्षांतील पुढारी घेऊन राष्ट्रीय सरकार बनविलें. १९३५ मध्यें प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यानें मुख्य प्रधानगिरी सोडली. हिंदुस्थानांत राजकीय आंदोलनें चाललीं असतां यानें त्यांकडे फार सहानुभूतीनें पाहिलें व राउंड टेबल परिषदा भरवून तडजोडीचे प्रयत्न केले. त्यानें पुढील ग्रंथ लिहिले—'सोशॅलिझम' (समाजवाद); 'सोशॅलिझम अँड सोसायटी' (समाजवाद आणि समाज), 'दि सोशॅलिस्ट मूव्हमेन्ट' (समाजवादी चळवळ) आणि 'दि गव्हर्नमेन्ट ऑफ इन्डिया' (हिंदुस्थानची राज्यव्यवस्था).

**मॅक्डोनेल, डॉ. अर्थर अॅन्थनी** (१८५४–१९३०)—एक वेदाभ्यासी आग्ल पंडित. यानें लाइप्झिग विद्यापीठाची पीएच्. डी. पदवी ऋग्वेदासंबंधीं संशोधनावर मिळविली. ऑक्सफोर्ड येथें प्राध्यापक असतांना यानें बरेच प्राच्यविद्यासंशोधनपर ग्रंथ लिहिले. त्याचें वैदिक व्याकरण प्रसिद्ध आहे. तसेंच वेदांची नाम-विषयसूची हीहि फार उपयुक्त आहे. त्यानें एक संस्कृत कोशहि केला आहे; तसेंच संस्कृत-वाङ्मयाचा सुंदर इतिहास प्रसिद्ध केला आहे. तेव्हां वेदाभ्यासकांना याचे ग्रंथ बहुमोलाचे वाटतात यांत नवल नाहीं.

**मॅक्मिलन, डोनॉल्ड बॅक्स्टर** (१८७४–    )—या अमेरिकन संशोधकाचा जन्म मॅसॅच्युसेट्समध्यें झाला. १९१० ते १९१२ या वर्षांत त्यानें लॅब्रॉडोरमध्यें एस्किमो लोकांचा मानवशास्त्रदृष्ट्या अभ्यास केला. यानें एक सफर करून ग्रीनलंड बेटाचा किनारा व इतर अनेक बेटांचें संशोधन केलें. शिकागो येथील फील्ड पदार्थ-संग्रहालयासाठीं यानें ग्रीनलंड व बॅफिन बेट यांमध्यें तीन सफरी केल्या. १९३१ मध्यें तो लॅब्रॉडोरमधील वैमानिक संशोधक सफरीचा मुख्य होता. यानें आपल्या संशोधनावर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत.

**मक्रान**—बलुचिस्तान. हा कलात संस्थानचा एक नैर्ऋत्येकडील भाग होय. याचें क्षे. फ. २६,००० चौरस मैल आहे. या भागांत केव्हां केव्हां पांच पांच वर्षें अगदीं पाऊस पडत नाहीं. बृहत्संहितेंत मकर या जातीचा उल्लेख केलेला आहे. अलेक्झांडर परत जातांना या मुलुखांतून गेला. हा मुलूख कांहीं काळ इराणच्या ताब्यांत तर कांहीं काळ हिंदु राजांच्या मुलुखांत मोडत असे. १९०० सालापासून येथें एक असिस्टंट पोलिटिकल एजंट हिंदुस्थान सरकारनें नेमिलेला असे. मक्रानची लो. सं. सुमारें ७८,००० असून या भागांत खेडीं १२५ आहेत. किल्ल्याभोंवतीं लोक वस्ती करून राहतात. अर्धे लोक मुसलमानांतील सुनी पंथाचे आहेत. बहुतेक जण शेतीवर उपजीविका करतात. यांत गहूं व यव हीं धान्यें पिकतात. पण सर्व भिस्त खारकेच्या पिकावर असते. या भागांत खारकांचीं तीन लाखांवर झाडें असून त्यांचें व इतर पिकांचें मिळून वार्षिक करांचें पन्नास हजार रुपयांवर उत्पन्न आहे. इंग्रज सरकारकडून खानास तारायंत्ररक्षणादाखल ५२५० रुपये मिळतात. या मुलुखावर कलातच्या खानाचा ताबा आहे. न्याय करण्याचें काम काजीकडे असतें. या राज्यांत गुन्हे मुळींच होत नाहींत, असें म्हटलें तरी चालेल,

**मॅक्लोरिन, कॉलिन** ( १६९८–१७४६ )—एक स्कॉटिश गणितशास्त्रज्ञ. हा एडिनबर्ग येथील गणितशास्त्राचा प्रोफेसर होता व भूमितिशास्त्रांत तो अव्वल दर्जाचा तज्ज्ञ होता. त्यानें १७४० सालीं समुद्राच्या भरती-ओहोटी या विषयावर निबंध लिहून फ्रेंच ॲकेडमीचें बक्षीस मिळविलें. त्यानें कांहीं ग्रंथहि लिहिले आहेत. मॅक्लोरिनचा फलविस्तार( एक्सपॅन्शन ऑफ ए फंक्शन )चा सिद्धांत प्रसिद्ध आहे. बीजगणित आणि त्रिकोणमिति यांतील बायनॉमियल थिअरमसारखे विस्तार हीं या सिद्धांताचीं विशिष्ट उदाहरणें होत.

**मॅक्समुलर** ( १८२३–१९०० )—एक आंग्लो-जर्मन भाषाशास्त्रज्ञ व संस्कृतज्ञ. त्यानें लाइप्झिक व बर्लिन विद्यापीठांत संस्कृत वाङ्मय व तत्संबंधीं तुलनात्मक भाषाशास्त्र, तुलनात्मक धर्म, भारतीय तत्त्वज्ञान, इत्यादि विषयांचा अभ्यास केल्यावर १८५० सालीं त्याला अर्वाचीन युरोपीय भाषांचा प्रोफेसर म्हणून ऑक्सफोर्ड येथें नेमण्यांत आलें. १८५६ सालीं तो बोडलियन लायब्ररीचा व्यवस्थापक झाला, व १८९२ सालीं ओरिएंटल कॉंग्रेसचा अध्यक्ष होता. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते— ( १ ) 'चिप्स फ्रॉम ए जर्मन वर्कशाप'–या ग्रंथाचे तीन खंड असून त्यांत ऋग्वेद, झेंदावेस्ता, बौद्ध धर्म, तुलनात्मक देवताशास्त्र, प्राचीन वाङ्मय, चरित्रें, वस्तू, इत्यादींसंबंधीं विवेचन आहे. ( २ ) 'ऑल्ड लॅंगसाइन'–यांत हिंदी व युरोपीय पंडितांचीं व विशेषतः टागोर, केशवचंद्र सेन, दयानंद सरस्वती, रामकृष्ण परमहंस, बेहरामजी मलबारी, पंडिता रमाबाई, आनंदीबाई जोशी, वगैरेंचीं चरित्रें आहेत. ( ३ ) 'इंडिया : व्हॉट कॅन इट् टीच'. ( ४ ) प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. ( ५ ) षड्दर्शनें. ( ६ ) 'फिजिकल रिलिजन'. ( ७ ) 'ॲन्थ्रॉपॉलॉजिकल रिलिजन'. ( ८ ) सॉयकॉलॉजिकल रिलिजन'. ( ९ ) 'इंट्रोडक्शन टु दि सायन्स ऑफ रिलिजन'. ( १० ) 'दि सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट'–या ग्रंथमालेपैकीं पहिले तीन ग्रंथ. हिंदुस्थान व प्राचीन हिंदु संस्कृति यांबद्दल मॅक्समुल्लरला अतिशय आदर होता. लो. टिळक यांना पहिली शिक्षा झाली तेव्हां त्यांच्या सुटकेच्या प्रयत्नांत हाहि होता.

**मॅक्सवेल, जेम्स क्लार्क** ( १८३१–१८७९ )—एक स्कॉटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. तो अबर्डीन येथें सृष्टतत्त्वज्ञानाचा ( नॅचरल फिलॉसफी ) प्रोफेसर होता ( १८५६–१८६० ) आणि नंतर लंडन येथील किंग्ज कॉलेजमध्यें होता ( १८६०–१८६५ ). १८७१ सालीं तो केंब्रिज येथें प्रायोगिक पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर नेमला गेला आणि त्यानें कॅव्हेंडिश प्रयोगशाळा सुव्यवस्थित चालू केली. 'शनीच्या कड्यांची स्थिरता', 'वर्णांधता', 'रंग पाहून होणारें ज्ञान', 'विद्युत् आणि चुंबकत्व', वगैरे त्याचे महत्त्वाचे निबंधग्रंथ आहेत. त्यानें विद्युद्विषयक उपपत्तीमध्यें क्रांति केली. आणि त्यामुळें विद्युत्क्षेत्रांत पुष्कळ आधुनिक सुधारणा झाल्या. त्यांपैकीं बिनतारी संदेश ( वायरलेस टेलेग्रॅफी ) ही फार महत्त्वाची असून या सर्व सुधारणा मॅक्सवेलच्या संशोधनांतून निर्माण झालेल्या आहेत.

**मंख** ( ११२०–११७० )—एक काश्मीरस्थ संस्कृत कवि. 'श्रीकण्ठचरित' नांवाच्या २५ सर्गांच्या महाकाव्यांत त्यानें स्वतःविषयीं जी माहिती दिलेली आहे तीवरून काश्मीरचा राजा जयसिंह याच्या काळीं तो होता असे निश्चितपणें म्हणतां येतें. याच्या बापाचें नांव विश्ववर्त असें होतें. याचा प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'श्रीकण्ठचरित' होय. हा हल्लीं छापून प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथांत त्रिपुरवधाची हकीकत आली आहे. याशिवाय मंखानें 'मंखकोश' म्हणून एक शब्दकोशहि केला असून त्याचा उल्लेख हेमचंद्रानें आपल्या कोशांत केलेला आहे.

**मखमल**—एक उंची कापड. हें निव्वळ रेशमाचें किंवा इतर सुताच्या भुईवर विणलेलें रेशमाचें कापड असतें. यावर उठावदार सुतें जीं दिसतात तीं, तारांवर उभी वीण घेतल्यावर जी डोळ्यांची रांग बनते ती सुरीनें कापल्यावर तयार झालेलीं असतात. हें मखमलीचें कापड जर्मनी, फ्रान्स, ब्रिटन, अमेरिका, वगैरे देशांत फार होतें. खरी मखमल सबंध रेशमाची असते. पण सुती आणि लोंकरी मखमलीहि करतात. मखमलीवर उठावदार भरतकाम करण्यांत येतें. ख्रिस्ती देवळांतून पडदे, वेदीवरची हांथरी, वगैरे याच प्रकारचीं असतात. मखमलीची अगदीं मूळ कल्पना चीनची असावी. नंतर इटली, स्पेन, फ्लँडर्स, वगैरे ठिकाणीं ती पसरली.

**मखमाल**—याचीं झाडें कंबरभर उंच वाढतात. यांत कांहीं जाती आहेत. पानें कातीदार असतात. फुलांस वास नसतो. रक्ती मुळव्याधीला पाल्याचा रस तुपांत देतात. व्रणावर पाल्याच्या रसांत कुड्याच्या सालीचें चूर्ण मिसळून लावतात.

**मखली गोशाल**—एक धर्मपंथसंस्थापक. हा एका सरदाराच्या घरचा गुलाम होता. याच्या आईचें नांव मखली होतें, व हा गोशाळेंत जन्मला म्हणून याचें नांव मखली गोशाल असें झालें. एके दिवशीं हा तेलाचें भांडें घेऊन जात असतां त्याचा पाय घसरला व भांडें खालीं पडलें. तेव्हां तो मालकास भिऊन पळूं लागला असतां मालकानें त्याचीं वस्त्रें पकडलीं. तथापि तो वस्त्रें टाकून देऊन नग्न स्थितींतच पळत सुटला, व एका शहरांत शिरून दिगंबर जैन अथवा बुद्ध म्हणून प्रसिद्धीस आला असें म्हणतात. त्यानें काढलेल्या पंथास मखली गोशाल हें नांव प्राप्त झालें. मनुष्यास सुखदुःख पूर्वकर्मानुसार प्राप्त होत नसून तें यदृच्छेनें प्राप्त होतें असें हा म्हणत असे.

**मग ( लोक )**—प्राचीन पारशी धर्मातील पुरोहितवर्ग. मग या शब्दाची व्युत्पत्ति प्राचीन इराणी 'मगु' संज्ञेपासून आहे. पण मग हे प्रथम आर्येतर मूलदेशस्थ लोक असून पुढें आर्यांच्या वर्चस्वामुळें ते त्यांच्यांत समाविष्ट झाले, असें कांहीं संशोधक समजतात. मगांचा धार्मिक दर्जा हिंदु ब्राह्मणां-इतकाच होता. इ. सनापूर्वी ५९० च्या सुमारास त्यांनीं जुडिया प्रांतांतील लोक आपल्या धर्मांत घेतले. झरथुष्ट्री गाथ्यांत 'मोठा पुरवठा करणारा मग' व 'वोहुमनाचा मग' असे उल्लेख आढळतात. पण हे इराणी लोकांचे धर्मगुरू होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. मग लोक स्वप्नांचे अर्थ सांगत व भविष्यें वर्तवीत. त्या वेळीं मंत्राचें ( जादुटोण्याचेंहि ) फार प्राबल्य असल्यानें तें करणाऱ्यांच्या नांवावरून त्या क्रियेला 'मॅजिक' असें नांव पडलें. बायबलांत मगांचा उल्लेख आहे. बृहत्संहिता व भविष्यपुराण यांतूनहि मगांचे उल्लेख आहेत. मग ब्राह्मण आज जे दिसतात ते यांचेच वंशज होत. मगी सन पहा.

**मॅगडेनबर्ग**—जर्मनीमधील एक शहर. हें सॅक्सनी प्रांताची राजधानी असून एल्ब नदीवर वसलेलें आहे. मध्ययुगीन कालांत हें फार भरभराटीस आलेलें शहर होतें. तें १८०६ सालीं फ्रान्सच्या ताब्यांत गेलें, पण १८१४ सालीं पुन्हां जर्मनीकडे आलें. या ठिकाणीं जर्मनींतील साखर व चिकरी यांची मोठी पेठ आहे. याखेरीज किराणा माल, घोडे, लोंकर, कोळसा, धान्य व पुस्तकें यांचाहि मोठा व्यापार चालतो. लोकसंख्या सुमारें तीन लक्ष. येथें एक किल्ला व सुंदर गॉथिक शिल्पाचें देऊळ आहे.

**मॅगपाय**—हा कावळ्याच्या वर्गांतील पक्षी आहे. युरोपमध्यें आढळणारा पक्षी काळा-पांढरा असून काळया रंगावर हिरवट व जांभळी चकाकी असते. हे पक्षी फार चोरटे म्हणून प्रसिद्ध आहेत. उत्तर आफ्रिका आणि कॅलिफोर्निया या देशांतहि यांच्या दोन जाती आढळतात. दक्षिण स्पेन व पूर्व आशिया यांमध्यें निळया जातीचे हे पक्षी आढळतात.

**मगर**—नक्र किंवा सुसर वर्गांतील एक सरपटणारा प्राणी. याचें डोकें आंखूड व चपटें असून याच्या वरच्या जबड्यांत पोकळी असते; तींत याचे खालच्या जबड्यांतील श्वदंत बरोबर बसतात. याच्या पायांचीं बोटें कमी सांधलेलीं असतात. हे अमेरिकेच्या उष्ण भागांत दलदलींतून आढळतात. यांची लांबी १८ पासून २० फुटांपर्यंतहि भरते. हिंवाळ्यामध्यें हे दलदलीमध्यें बिळें करून त्यांत उन्हाळा येईपर्यंत सुस्तपणें पडून राहतात. यांची मादी वाळू किंवा चिखल यांमध्यें पुष्कळ अंडीं घालते; तीं उन्हाच्या उष्णतेनें फुटून त्यांतून पिलें बाहेर पडतात. अमेरिकन संयुक्त संस्थानांच्या दक्षिणेकडील भागांत आढळणारे हे प्राणी फार भयंकर असतात व त्यांचें तोंड थोडें वर वळलेलें असून लहान भाल्यासारखें दिसतें.

हे बहुधा गोड्या पाण्यांत आढळतात. गंगा, यमुना, नर्मदा, कावेरी, वगैरे मोठ्या नद्यांतून मगरी दिसतात. या कधीं कधीं कांठावर येऊन सरपटत जातात. सुसरीच्या शेपटांत फार जोर असतो. त्याच्या फटकाऱ्यानें नावा फुटतात. पाठीवर खवले असून तेथील कातडें टणक असल्यानें त्याचा ढालीसारखा उपयोग होतो. याच्या पेट्या-पिशव्या करतात. यांचें रक्त थंड असतें. एखादें भक्ष्य जबड्यांत धरून तें पाण्याखालीं खबदाडांत नेऊन ठेवतात व कुजल्यावर खातात. यांना बरेंच आयुष्य असतें. मगरीची मिठी फार बळकट असते. गजेंद्रमोक्षाची कथा प्रसिद्धच आहे.

नाइल नदींत आढळणाऱ्या सुसरी प्रसिद्ध आहेत. यांचा आकार फार मोठा असून त्या फार बळकट असतात. परंतु त्यांचे पाय आंखूड असून शरीर बेढब दिसतें. हे मांसाहारी असून आपलें भक्ष्य पकडल्यावर कुजवून खाणें त्यांस फार आवडतें. यांची लांबी कधीं कधीं ३० फूटपर्यंत भरते. यांचें आयुष्यहि दीर्घ असतें.

**मगर तलाव**—( मगरपीर ). मुंबई, सिंध प्रांत, कराची जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें कराचीपासून ९ मैलांवर आहे. तलावाचें पाणी ऊन असतें. आसपासचा प्रदेश डोंगराळ व खडकाळ असून पूर्वीं येथें तलाव होता; त्यात शेंकडों माणसाळलेल्या मगरी राहत होत्या. तो तलाव आतां आटून कोरडा झालेला आहे. पाण्याच्या तळयांतील ऊन पाण्याचें उष्णमान १५३° अंशापर्यंत असतें. यांत स्नान केलें असतां त्वग्रोग बरे होतात. हिरानंद कोडीखाना याच हेतूनें येथें स्थापन करण्यात आलेला आहे. कराचीपासून मगर तलावापर्यंत पक्की सडक केलेली असून पुढें ती हब नदीपर्यंत गेलेली आहे. येथें एक धर्मशाळा व बंगला बांधला आहे.

**मंगरूळ**—वऱ्हाड, अकोला जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ६३० चौ. मैल. ज्वारी व कापूस

हीं महत्त्वाचीं पिकें आहेत. लो. सं. सुमारें सव्वा लाख. मंगरूळ हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें १०,००० आहे. येथें एक सरकी काढण्याचा कारखाना आहे. येथें कांहीं दरगे असल्यामुळें यास मंगरूळपीर म्हणतात.

**मंगल**—(मॅंगनीज). एक मूलद्रव्य. भारांक ५४·९३. हा तांबूस पांढऱ्या रंगाचा धातु आहे. मंगलद्विप्राणिद (मॅंगनीज डाय ऑक्साइड) म्हणून पायरोल्युसाइट नांवाच्या काळ्या खनिज धातूंत सांपडतो. पायरोल्युसाइटचा हर (क्लोरीन) व त्याचीं संयुक्तें तयार करण्यासाठीं उपयोग होतो. पालाश परमंगनेत (पोटॅशियम परमॅंगनेट) हा त्या धातूंचें महत्त्वाचें संयुक्त असून त्याचा जंतुनाशक (ऑक्सडाइझिंग एजंट) म्हणून चांगला उपयोग होतो. मंगल धातु हा लोखंडापेक्षां कठिण असून १२६०° शत. ला वितळूं लागतो. पोलाद करण्यासाठीं ह्याचा उपयोग करतात. कोरड्या बॅटरी, गारगोटी कांच, चिनी मातीचीं भांडीं, इ. तयार करण्यांत मंगलाचीं संयुक्तें वापरतात. ब्राझील, जॉर्जियांतील पीडमॉंट पर्वत व दक्षिण रशिया यांत मोठ्या प्रमाणावर हा धातु सांपडतो.

**मगवे**—उ. ब्रह्मदेश, मगवे भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३३१३ चौरस मैल. जिल्ह्याच्या पश्चिम भागांतून इरावती नदी वाहते. जंगली हत्ती, वाघ, रानरेडे, चित्ते व जंगली कुत्रे या भागांत विपुल आढळतात. पावसाचें वार्षिक मान सरासरी २९ इंच. मगवे जिल्ह्यांत ७ प्रसिद्ध देवालयें आहेत. सतवा तालुक्यांत कोकोगावा येथें जुन्या राजधानीचे अवशेष आढळून येतात. जिल्ह्याची लो. सं. सु. साडेचार लाख होती. एकंदर लोकसंख्येंत शें. ९९ बौद्ध धर्माचे लोक असून ब्रह्मी भाषा सोडून बाकीच्या भाषा बोलणारे शें. १॥ आहेत. शें. ८० लोक शेतकी करतात. मुख्य पीक तीळ, ज्वारी, तांदूळ व तंबाखू यांचें आहे. यवान नदीवर तुती पुष्कळ उगवते. तीवर रेशमाचे किडे असतात. खनिज पदार्थांत पेट्रोलियम मुख्य असून तें जिल्ह्याच्या वायव्य भागांत येनंगगंग तालुक्यांत पुष्कळ प्रमाणावर निघतें. गुरांचा व्यापार चांगला चालतो. ज्वारी व नीळ हीं दोन मुख्य पिकें होतात. तालुक्यांत खुद्द मगवे शहर व ८५ खेडीं आहेत.

**मंगळ**—सूर्यमालेंतील चौथा ग्रह. हा पृथ्वीच्या पावपट आकाराचा आहे. या ग्रहावरच्या वृक्षवनस्पती व सर्व वातावरण पृथ्वीप्रमाणेंच असावें असें दिसतें. हा पृथ्वीला फार जवळ असल्यानें याचें चांगलें निरीक्षण करतां येते. ऋतूंप्रमाणें यावरचे रंग बदलतात. हा सामान्यतः तांबूस दिसतो. यावर कालवे दिसतात व ध्रुवप्रदेश बर्फाच्छादित असावे असें वाटतें. याला सूर्याभोंवतीं फिरण्यास ६८७ दिवस लागतात व हा स्वतःभोंवतीं २४½ तासांत फिरतो. याला आपल्याकडे भूमिपुत्र जें म्हणतात तें यथार्थ वाटतें. मंगळाचें घनफळ पृथ्वीच्या ⅙ आहे व विशिष्टगुरुत्व ⅓ आहे. म्हणजे पृथ्वीवरचें तीन पौंडांचें वजन मंगळावर एक पौंड भरेल. १८७७ सालीं प्रो. हालनें याचे दोन उपग्रह शोधून काढले. या ग्रहावर दिसणारें सरळ रेषांचें जाळें जें दिसतें याबद्दल संशोधकांत अनेक तर्क चालतात. कोणी ते कालवे असावे, असें म्हणतात.

दर सोळा वर्षांनीं पृथ्वी व मंगळ जवळजवळ म्हणजे साडेतीन कोटी मैलांच्या अंतरावर असतात तेव्हां मंगळाचें चांगलें निरीक्षण करण्याची संधि मिळते. तो अगदीं दूर गेला म्हणजे सुमारें साडेचोवीस कोटी मैलांवर जातो.

आपल्याकडे फलज्योतिपात मंगळ हा पापग्रह समजतात. ग्रीक लोक याला ज्युपिटरचा पुत्र व युद्धदेवता मानीत. हा संकटें आणतो असा समज असे. म्हणून याला बळी देण्याची वहिवाट असे.

**मंगळवेढें**—सांगली संस्थानच्या मंगळवेढें पोटविभागाचें मुख्य ठिकाण. लो. सं. सु. दहा हजार. मुसलमानी रियासतीच्या पूर्वी मंगल नांवाच्या राजानें हें गांव वसविलें. येथें त्याची राजधानी होती. येथें एक किल्ला आहे.

मंगळवेढें सोलापूरच्या नैर्ऋत्येस ४२ मैल व पंढरपूरच्या दक्षिणेस १६ मैल आहे. स्कंदपुराणांत भीमामहात्म्यांत यास मातुलिंगपुरी असें नांव असावें. हें कल्याणच्या चालुक्य राजांच्या अमलाखालीं भरभराटींत असावें. १४ व्या शतकांत तें बेदरच्या बहामनी राजाकडे गेलें. त्या कालांत दामाजीपंत होऊन गेला असावा. १४६० सालांत दाक्षिणेंत मोठा दुष्काळ पडला होता त्या वेळीं दामाजीपंतानें सरकारी कोठारांतील धान्य वांटलें असावें. १४८९ त हें विजापुरकरांकडे गेलें व १६८६ मध्यें मोगलांकडे आलें. १७५० त हा गांव गोविंद हरि पटवर्धन यास मिळाला. १८०१ मध्यें तो सांगलीकरांच्या वांट्यास आला.

मंगळवेढ्याचा किल्ला— हा बहुधा बेदरच्या बादशहांनीं बांधला असावा. मंगळवेढ्याचीं जैन देवालयें पाडून हा किल्ला बांधण्यांत आला असावा. कारण किल्ल्यांतील विश्वनाथाच्या देवालयांतील एका खांबावर शके १४९४ अंगिरसनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध तृतीया अशी मिति आहे व हिवरगीचा कुलकर्णी मंगळवेढ्याचा मुजुमदार यानें तुला याकुबखान याच्या परवानगीनें जगभावी बुरुजाजवळच्या जुन्या पाडून टाकलेल्या देवळाचा जीर्णोद्धार करून विश्वनाथाची स्थापना केली असें म्हटलें आहे. किल्ल्याचा तट ३५ फूट उंच व १२ फूट रुंद आहे. फक्त पूर्वेकडील तट पडलेला असून बाकीचा चांगला आहे. याला सात बुरूज आहेत. सभोंवतीं खंदक आहे. आंत चौबुरुजी बालेकिल्ला आहे.

**मंगळूर**—मद्रास, दक्षिण कानडा जिल्ह्याच्या मध्यमार्गी असलेला तालुका. क्षे. फ. ४१५ चौ. मैल. यांत २४३ खेडीं व मंगळूर हें मोठें गांव असून तेंच या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें साडेतीन लाख आहे. यांत नारळ, ऊंस, तांदूळ, मिरची, हळद व भाजीपाला हीं पिकें होतात. मंगळूर शहर द. कानडा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. (१९४१) ८१,०६९. यात हिंदु लोकांचा विशेप भरणा असून थोडे मुसलमान व ख्रिस्ती लोकहि आहेत. इ. स. १७९९ त हें इंग्रजांच्या ताब्यांत आलें. यांत कौलें व सुती कापड तयार होतें.

येथील सेंट ॲलोशियस चर्च पाहण्यासारखें आहे. हें जुन्या दीपस्तंभाच्या टेंकडीवर आहे. याच टेंकडीवर मिशनऱ्यांनीं चालविलेलें एक आर्ट्स व सायन्स कॉलेज आहे. ॲलोशियस चर्चचें वैशिष्टय म्हणजे त्याच्या भिंतींवर व छतावर बायबल-मधील कथानकांचे प्रसंग सुंदर रीतीनें रेखाटले आहेत.

येथें कौलांचे कारखाने बरेच आहेत. कदरी टेंकडी सुंदर आहे. येथें पाण्याचीं लहान-मोठीं अनेक कुंडें व एक लहानसा धबधबा आहे. टेंकडीवर गोरखनाथाचा मठ आहे. येथील काजूच्या कारखान्यांत हजारों स्त्रिया कामास आहेत.

**मगी सन**—बंगालच्या चितगांव जिल्ह्यांत ह्या सनाचा प्रचार आहे व याच्या सालांत ६३८ किंवा ६३९ मिळविले असतां इसवी सनाचें वर्ष निघतें. बंगाली सनाप्रमाणें ह्याचाहि वर्षारंभ मेष संक्रांतीपासून म्हणजे सौर वैशाखापासून होतो; व त्याच्या महिन्यांस चैत्र-वैशाखादि नांवें असून सूर्य ज्या दिवशीं दुसऱ्या राशींत प्रवेश करतो तो नवीन महिन्याचा पहिला दिवस समजून त्या महिन्याचे पुढील दिवस मोजण्यांत येत असतात. हा सन कोणीं सुरू केला व त्याला मगी असें नांव कां मिळालें हें नीट समजत नाहीं. आराकानच्या राजानें इसवी सनाच्या नवव्या शतकांत चितगांव जिल्हा जिंकून घेतला होता. व इ. स. १६६६ त तो मोंगलांच्या राज्यास जोडला जाईपर्यंत त्यावर बहुतेक आराकानी म्हणजे मगी लोकांचीच सत्ता राहिली होती. तेव्हां कदाचित् मग लोकांवरूनच ह्या सनास मगी हें नांव पडलें असण्याचा संभव आहे.

**मॅगेलन, फर्डिनंड** (१४८०-१५२१)—एक पोर्तुगीज जलपर्यटनकार. स्पेनच्या ५ व्या चार्लस राजानें त्याला १५१९ सालीं पांच जहाजांचा कमांडर नेमलें. त्या जहाजांसह समुद्रपर्यटन करून त्यानें अमेरिकेच्या दाक्षिणेकडील ॲटलान्टिक व पॅसिफिक हे दोन महासागर जोडणारी सामुद्रधुनी शोधून काढली, व त्यामुळें तिला 'मॅगेलनची सामुद्रधुनी' (स्ट्रेट ऑफ मॅगेलन) हें नांव देण्यांत आलें. त्यानंतर त्यानें पॅसिफिक महासागरांतून प्रवास केला. पण वाटेंत मॅक्टन येथील तद्देशीय लोकांबरोबर झालेल्या चकमकींत तो ठार मारला गेला. नंतर त्या पांच जहाजांनीं सफरी करून केप ऑफ गुडहोपला वळसा घातला, व तीं जहाजें सेव्हिल बंदरांत परत आलीं. याप्रमाणें मॅगेलन व त्याच्याबरोबरचे नाविक इसम यांनीं प्रथम पृथ्वीप्रदक्षिणा केली.

मॅगेलनची सामुद्रधुनी १५२० सालीं मॅगेलननें शोधून काढली. ही द. अमेरिका व टिएरा डेलफ्युगो यांना विभागते. हिची लांबी ३५० मैलांवर असून रुंदी दोन ते सत्तर मैलांपावेतों आहे. अनेक बेटांमुळें यांत नौकानयन सुलभ नाहीं.

**मंगोल**—मंगोलियन ऊर्फ मोंगल. हा आशियांतील एक महावंश आहे. मोंग म्हणजे शूर यावरून हा शब्द बनला आहे. या मानववंशाचे बुरियत ऊर्फ बुरिल, पूर्व मंगोल व पश्चिम मंगोल असे तीन पोटभेद आहेत. या लोकांची उंची मध्यम, केंस काळे व सरळ, वर्ण फिकट पिवळा किंवा पिंगट, गालाचीं हाडें उंच, नाक सरळ व चपटें असतें. मंगोल लोकांचें स्थलांतर कॉकेशस पर्वत व युरोपांतील डॉन नदी यांपर्यंत आणि उत्तर तिबेटांत झालेलें आहे. हिंदुस्थानांतल्या द्राविड जातींशीं शरीरसंबंध होऊन बनलेली 'मंगोलाइड' ही मिश्रजात हिमालय प्रदेशांत आढळते. हे लोक मुख्यतः घोडे, उंट, गुरें व शेळयामेंढ्या पाळून स्थलांतर करीत हिंडतात, आणि त्यामुळें मोठमोठ्या टोळयांनीं लुटीकरितां परदेशांत स्वाऱ्या करणें हा धंदा कित्येक शतकें त्यांच्यांत चालू आहे.

इतिहास—युदनत्सर हा त्यांचा पहिला ज्ञात पुढारी; यानें भोंवताच्या लोकांचें पुढारीपण मिळविलें. त्याचा आठवा वंशज युस्रुगाई (येसुगाई) ह्याचा मुलगा सुप्रसिद्ध चेंगीजखान (पाहा) होय. यानें आपलें राज्य वाढवून चिनी समुद्रापासून नीपर नदी-पर्यंत इतकें विस्तृत साम्राज्य स्थापलें, व मरणसमयीं आपल्या चार मुलांना हें राज्य वांटून दिलें. ओक्ताईखान हा त्याचा मुलगा (१२२७-१२४१) बापासारखा पराक्रमी होता. त्यानें चीनवर स्वारी करून तेथील किन ऊर्फ सोनेरी घराण्याची सत्ता नष्ट केली, व युरोपवर स्वारी करून अर्धे युरोप खंड जमीनदोस्त केलें. नंतरचा बादशहा कुब्लाईखान (१२५७-१२९४) यानें सर्व चीनवर राज्य स्थापलें, व त्याच्या वंशानें १३६८ पर्यंत चीन-वर राज्य केलें. त्याच्या वंशास चीनच्या इतिहासांत 'युएन वंश' म्हणतात. पुढें मिंग व मांचू नांवाच्या बौद्ध धर्मीय घरा-ण्यांनीं या लोकांचा इतका निःपात केला कीं, पूर्व मंगोलियांत आतांपर्यंत पुन्हां हे लोक सत्ताधारी झाले नाहींत. १६४४ च्या सुमारास मंगोल लोकांत बौद्ध धर्माचा प्रसार होऊन त्यांचा आडदांडपणा कमी झाला. १७ व्या शतकांत मंगोल लोकांचा रशियाशीं स्नेह जमला. १३ व्या शतकांत प्रसिद्ध तैमूरलंग या मंगोल बादशहानें मुसलमान धर्माचा जास्त प्रसार केला, व

ख्रिस्त्यांशीं अनेक लढाया केल्या. पण त्याच्यानंतर मंगोल राजांचे युरोपातील ख्रिस्ती राजांशीं शरीरसंबंध होऊं लागले. १४ व्या शतकांत तुर्कस्तान व ईजिप्त यांकडील मुसलमानांशीं एकधर्मामुळें एकी होऊन त्यांनीं स्पेनपर्यंत युरोप पादाक्रांत केला. इकडे बाबरनें हिंदुस्थानवर स्वाऱ्या करून मोंगल वंशाचें राज्य स्थापलें.

मंगोलियन भाषेंत तिबेटी व चिनी ग्रंथांचीं भाषांतरें झालीं आहेत. कांहीं ऐतिहासिक ग्रंथ, ऐतिहासिक वीरांच्या कथा, व ऐतिहासिक युद्धवर्णनपर काव्य एवढेंच स्वतंत्र मंगोलियन वाङ्मय आहे. बायबलचें भाषांतर या भाषेंत झालें आहे.

**मंगोलिया**—चीन, पूर्वेस किंघन पर्वतापासून पश्चिमेस तबर्ग ताई पर्वतापर्यंत हा अफाट देश पसरला आहे. मंगोलियाचें क्षे. फ. सुमारें ७,५०,००० आहे. याच्या मध्यभागीं गोबीचें मैदान आहे. यांत भटके मोंगल व कालमुक (पाहा) लोक राहतात. मुख्य शहर उर्गा असून ते कियाख्ताच्या दक्षिणेस १७० मैलांवर आहे. बाह्य मंगोलियांत बऱ्याच सोन्याच्या खाणी सांपडल्या आहेत. बौद्ध लामा संप्रदाय येथें चालतो. येथील संस्थानिकांतून एक वरिष्ठ 'खान' निवडला जाई. मांचू राजघराण्याच्या नाशापूर्वींपासूनच मंगोलियांतील मोंगल संस्थानिकांच्या मनांत चीनच्या लष्करी व वसाहतवाढीच्या धोरणाबद्दल द्वेषाग्नि धुमसत होता. त्यामुळें रशियाच्या मदतीनें स्वतंत्र होण्याची आकांक्षा बाह्य मंगोलियामध्यें प्रबल होत चालली होती. १९१२–१७ च्या दरम्यानच्या काळांत रशियानें बाह्य मंगोलियांतील आपले हितसंबंध दृढ केले. १९२१ सालीं सर्व लोकांनीं चिनी सैन्याविरुद्ध संगनमत करून उर्गा येथील चीन सरकारला हांकलून लावलें. अशा रीतीनें स. १९२१ च्या फेब्रुवारीमध्यें हुतुख्तु हा मंगोलियाचा पुन्हां राजा झाला. १९२४ सालीं क्रांति होऊन हा मुलूख स्वतंत्र झाला. १९४५ सालीं चीननें या स्वतंत्र लोकराज्यास मान्यता दिली. रशियाशीं याचे चागले संबंध आहेत. उर्गा हें मुख्य शहर आहे.

**मॅक्डुगल, विल्यम** (१८७१–१९३८)—या अमेरिकन मानसशास्त्रज्ञाचा जन्म इंग्लंडमध्यें झाला. १९२० ते १९२७ या कालांत तो हार्वर्ड विद्यापीठांत मानसशास्त्राचा प्राध्यापक होता. १९२७ ते १९३८ या कालांत तो ड्यूक विद्यापीठांत होता. त्यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत; त्यांपैकीं 'शरीर आणि मन', 'समूह मन' (ग्रुप माइंड), 'मानसशास्त्राची रूपरेषा', आणि 'जागतिक संभ्रम' (वर्ल्ड केऑस) हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**मग्न**—(मॅग्नेशियम). एक धातु. परमाणुभारांक २४·३२ व द्रवणबिंदु ६५१° शत.. द्रव हरिदा (क्लोराइड)चें विद्युत्पृथक्करण करून हा धातु तयार करतात. प्रशियांतील सॅक्सनी परगण्यांत हा होतो. हवेंत हा चांगला तापविल्यास याचा पांढरा लख्ख प्रकाश पडतो. फोटोच्या व शोभेच्या दारूच्या कामांत याचा उपयोग होतो.

**मग्नगंधकित** (सजल)—(कीझेराइट). हा एक सजल मग्नगंधकित (हायड्रेटेड मॅग्नेशियम सल्फेट) स्टासफर्टच्या खाणींत सांपडतो. ह्यापासून इप्सम सॉल्ट आणि खतें तयार करतात.

**मॅग्नॅलियम**—मुख्यतः मग्न आणि स्फट (ॲल्युमिनियम्) या धातूंच्या मिश्रणापासून बनलेल्या मिश्रधातूंना ही संज्ञा आहे. हे धातू हलके असून स्फटापेक्षांहि कणखर आणि कामाला सोपे असतात.

**मग्नक्षार**—(मॅग्नेशिआ). पांढऱ्या रंगाचा, चव नसलेला मातीसारखा पदार्थ. ह्यांत एक मग्नप्राणिद (मॅग्नेशियम ऑक्साइड) असून हा क्षारधर्मी आहे. याच्या शुद्ध स्वरूपाला कॅल्साइन्ड मॅग्नेशिया असें व्यापारी नाव आहे. ह्याचा औषधात उपयोग होतो.

**मंचर**—मुंबई, पुणें जिल्ह्यांतील खेड तालुक्यांतलें एक गांव. हें खेडपासून उत्तरेस १२ मैलांवर आहे. गांवाभोंवतीं तट आहे. मंचर हें १८६८–६९ सालापर्यंत होळकरांच्या ताब्यांत होतें. पुढें तें इंग्रजांना देण्यांत आलें. येथें हेमाडपंती बांधणीचें सरासरी २५ चौरस यार्डांचें एक पाण्याचें टाकें असून त्यास पायऱ्या आहेत. हें पूर्वीं मुसलमानी रियासतींत महत्त्वाचें शहर असावें. लो. सं. ६,०००.

**मँचेस्टर**—हें इंग्लंडमधील लँकेशायर परगण्यांतलें शहर आहे. येथें अनेक रेल्वेचे फांटे येऊन मिळतात. शिवाय ३५॥ मैल लांबीचा जहाज-वाहतुकीचा कालवा येथून समुद्रकिनाऱ्यापर्यंत नेलेला आहे. त्यामुळें जगाशीं व्यापार करणारें हें एक महत्त्वाचें शहर बनलें आहे. येथें एक विद्यापीठ, एक ख्रिस्ती देवालय आणि अनेक निरनिराळ्या विषयांचीं कॉलेजें आहेत. शिवाय येथें एक वस्तुसंग्रहालय आहे. हें शहर विणकामाच्या धंद्याचें फार मोठें केंद्र असून, शिवाय येथें रासायनिक द्रव्यें, यंत्रें, कमावलेलीं कातडीं आणि रबर यांचे मोठाले कारखाने आहेत. लोंकरीचें कापड विणण्याचा धंदा येथें १२ व्या शतकांत सुरू झाला. १८ व्या शतकांत विणकामाच्या धंद्यांत यांत्रिक सुधारणा झाल्यावर आणि यांत्रिक शक्तीवर गिरण्या चालू लागल्यापासून येथें कापसाच्या कापडाचा धंदा अतिशय वाढला. या शहराची लो. सं. ६,२४,३०० असून याच्यानजीक जें मोठें सॉल्फर्ड शहर आहे, त्याची लो. सं. १,५७,१०० आहे.

एंजलस्टोन हें १५ व्या शतकांत बांधिलेलें देवालय आहे. 'होली नेम' नांवाचें जेसुइटांचें मंदिर सुंदर व प्रसिद्ध आहे.

रॉयल इन्फर्मरी, रॉयल इन्स्टिटयूशन, टाउन हॉल, रॉयल एक्स्चेंज बॅक ऑफ इंग्लंड, वगैरे इमारती प्रसिद्ध व प्रेक्षणीय आहेत. शहरांतून जागजागीं इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे पुतळे दृष्टीस पडतात. येथें नॅथम लायब्ररी, रेफरन्स लायब्ररी व जॉन रायलंड्स लायब्ररी हीं तीन मोठीं ग्रंथालयें आहेत. 'मॅचेस्टर गार्डियन' हें प्रमुख वृत्तपत्र आहे. हें शहर म्हणजे सर्व उद्योगधंद्यांचें केंद्रस्थान होय. कापडाच्या गिरण्या येथें असंख्य आहेत. गेल्या महायुद्धांत मॅचेस्टरनें दारूगोळा, स्वयंसैनिक व पैसा यांची सढळ हातानें सरकारला मदत केली.

**मच्छरें**—हीं एका जातीचीं पांखरें आहेत. हीं सर्वत्र आढळतात. यांची मादी दंश करते. तिच्या तोंडांतील नळीमध्यें चार तीक्ष्ण सुया असतात. हीं आपलीं अंडीं सांचलेल्या संथ पाण्यावर घालतात. त्यांतून वीस दिवसांनीं अळया व पुढें तीनचार दिवसांनीं मच्छरें तयार होतात.

**मच्छलीपट्टण**—मद्रास, कृष्णा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व बंदर. यांत एक किल्ला आहे. येथील फ्रेंच पेठ फ्रान्स सरकारच्या ताब्यांत आहे व बलंद पालोम (हॉलंदर गांव) येथें डच लोकांचें पुरातन स्मशान आहे. १८६४ सालीं समुद्रभरतीच्या लाटेनें याचा बराच मोठा भाग वाहून गेला व येथील ३०,००० लोक प्राणास मुकले. येथील लो. सं. (१९४१) ५९,१४६ असून तींत हिंदु-मुसलमानांचें प्रमाण जवळजवळ निम्मेनिम्म आहे. येथें फक्त कातडें रंगविण्याचा धंदा राहिला आहे.

**मच्छिंद्रगड**—मुंबई, सातारा जिल्हा. हा किल्ला कऱ्हाडच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर उंच टेंकडीवर आहे. हा शिवाजीनें १६७६ त बांधला. पायथ्यापासून ८०० फूट उंच आहे. मच्छिंद्रनाथाचें एक देवालय आहे. १८३० त एका काळीं या गांवच्या मनुष्यानें देवाची उपासना सुरू केली. त्याचे वंशज अद्यापि येथें राहतात. येथें सतीचे व समाधीचे दगड पुष्कळ आहेत. दरवर्षी मच्छिंद्रनाथाची जत्रा भरते. १८१० त हा किल्ला बापू गोखल्यानें प्रतिनिधीपासून घेतला. पुढें १८१८ त कर्नेल हीक्टेनें घेतला.

**मच्छी**—'कोळी' पाहा. मच्छी नांवाच्या जातीची हिंदुस्थानांत एकंदर वस्ती तीन लाखांवर आहे. पैकीं पावणेतीन लाख पंजाबांतच आहे. ते सर्व मुसलमान आहेत. मुंबई इलाख्यांत ही जात बहुधा भडोच, ठाणें व सुरत या जिल्ह्यांत व समुद्रकिनाऱ्यावरील लहान-मोठ्या गांवांतून आढळते. लोकसंख्या सु. चाळीस हजार. पोट भरण्याचा त्यांचा धंदा समुद्रांतील मासे धरून ते बाजारांत विकण्याचा होय. यांच्यांत घटस्फोट संमत आहे.



**मच्छीमारी**—जगांतील पुष्कळ माणसांना अन्न पुरविण्याचा हा एक महत्त्वाचा धंदा आहे. ब्रिटन, अमेरिकन संयुक्त संस्थानें, कानडा आणि न्यू फाउंडलंड हीं जगांतील प्रमुख मच्छीमारीचीं केंद्रें होत. उत्तर समुद्र, बाल्टिक समुद्र आणि भूमध्यसमुद्र यांमोंवतालच्या राष्ट्रांतून हा धंदा वाढत आहे. जपाननें तर थोड्याच काळांत या धंद्यांत अग्रेसरत्व मिळविलें, इतकेंच नव्हे तर याच्या अनुषंगानें आपलें आरमार वाढविलें. हा धंदा कित्येक देशांतून चांगला किफायतशीर होणार आहे; पण बाजारपेठ नसणें आणि स्थानिक अडचणी बऱ्याचशा असणें या दुःस्थितीमुळें हा धंदा तेथें होत नाहीं. लांबलांबच्या देशांनाहि चांगल्या स्थितींत मासे पाठविण्याची तरतूद आतां झाली आहे. शास्त्रीय शोधांनीं माशांचीं ठिकाणें, त्यांचें जनन, संवयी, इ. गोष्टी समजून आल्या आहेत. शीतक यंत्रामुळें मासे ताजे राहतात.

मच्छीमारीसंबंधानें राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय कायदे आहेत. आपल्या किनाऱ्याच्या ठराविक अंतरापलीकडे मच्छीमारीच्या बाबतींत समुद्रावर कोणत्याहि राष्ट्राचा एकमेव असा हक्क ठेवलेला नाहीं. प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्रांत मच्छीमारीकडे लक्ष देणारें एक खातें असतेंच. हिंदुस्थानाला तिन्ही बाजूंनीं समुद्राचें वेष्टण असतांनाहि आतांपर्यंत या धंद्याकडे सरकारचें लक्ष गेलें नव्हतें. कांहीं जाती फक्त हा धंदा खाजगी रीतीनें करीत. पण आतां प्रांतिक सरकार कांहीं हालचाल करीत आहे असें दिसतें.

मासे वाळवून खारवून पाठविण्याचीं साधनें नसल्यानें सुमारें ६० टक्केचें समुद्रमासे जाग्यांवरून बाहेर धाडतां येतात. हिंदुस्थानांत दरसाल सरासरी १ कोटी ७० लक्ष मण मासे वर काढण्यांत येतात व त्यांची किंमत १०॥ कोटी रु. भरते. यांपैकीं गोड्या पाण्यांतील मासे ⅔ असतात. बंगाल्यांत माशांचा फार खप असतो; कारण शें. ८० च्या वर लोक ते खातात. हिंदुस्थानांत गोड्या पाण्यांतले जितके मासे निघतात त्याच्या निम्यानें तरी एकट्या बंगालमध्यें निघतात. मद्रासमध्यें सुक्या माशांचा फार मोठा व्यापार चालतो. १९४८ सालीं मध्यवर्ती सरकारनें एक मच्छीमारी धंद्याची परिषद भरविली होती. आतां तिच्या सूचनांचा विचार होऊन शास्त्रीय पद्धतीनें व मोठ्या प्रमाणावर हा धंदा सुरू करण्यांत येणार आहे.

मच्छीमारी धंद्याचा कायदा—हा कायदा १८९७ सालीं मंजूर झाला व त्यांत १९१४ सालीं दुरुस्ती करण्यांत आली. या कायद्यांत 'खासगी जलाशय' (प्रायव्हेट वॉटर) याचा अर्थ, ज्या जलाशयावर एखाद्या इसमाची संपूर्ण व पृथक् एकट्याची मालकी आहे तो जलाशय, असा आहे; अशा जलाशयांत कोणा

दुसऱ्या इसमांना मासे मारण्याचा हक्क वहिवाटीनें प्राप्त झाला असला, तरी तें 'खाजगी जलाशयच' होय. सार्वजनिक जलाशयांत कोणी इसम मासे धरण्याकरितां किंवा मारण्याकरितां डायनामिटच्या किंवा इतर स्फोटक द्रव्याचा उपयोग करील तर त्याला १०० रुपयांपर्यंत दंड होईल (कलम ४). कलम ४ मधील 'जलाशय' या शब्दांत समुद्रकिनाऱ्यापासून दोन नाविक मैल इतक्या अंतरापर्यंतच्या समुद्राचा अंतर्भाव होतो, व या समुद्रभागांत गुन्हा केल्यास वरीलप्रमाणेंच शिक्षा होते. जो कोणी इसम मासे धरण्याकरितां किंवा मारण्याकरितां एखाद्या जलाशयांत कोणतेंहि विष, चुना, किंवा इतर अपायकारक द्रव्य टाकील त्याला दोन महिने कैद किंवा २०० रुपयांपर्यंत दंड ही शिक्षा होईल (कलम ५). प्रांतिक सरकारनें पुढें दिलेल्या बाबतींत नियम करून ते नियम सार्वजनिक जलाशयांना, आणि खासगी जलाशयाला त्या मालकाची व तेथें मच्छीमारीचा हक्क असलेल्या इसमांची कबुली घेऊन लागू करावे; सदर नियमांच्या बाबी—(१) मच्छीमारीचीं ठाम बसवलेलीं यंत्रें; (२) तारांची योजना; (३) मासे मारण्याच्या जाळ्यांची लांबी, रुंदी व वापरण्याची पद्धत. हे नियम मोडणारांना १०० रुपयांपर्यंत दंड, आणि यंत्रें, जाळी व धरलेले मासे जप्त करणें, या शिक्षा कराव्या (कलम ६).

**मंजरी**—एक वाद्य. सामान्य टाळाच्या निम्म्या आकाराचा जो टाळ असतो त्याला मंजरी म्हणतात. नाचाच्या वेळीं ताल धरण्यांत हिचा उपयोग केलेला दिसतो.

**मंजिष्ठ**—[लॅ. रुबिआ टिंक्टोरम. इं. मड्डर]. हा सरळ पसरणाऱ्या अथवा वर चढणाऱ्या वनस्पतींच्या जातीचा एक वर्ग आहे. या वेलींचीं पानें काळसर हिरवीं असून हिला लहानसर पिवळीं फुलें येतात. आर्थिक दृष्ट्या महत्त्वाच्या अशा याच्या देशी नागा व विलायती मंजिष्ठ अशा जाती आहेत.

या वेलींत अलिझरीन हें रंगतत्त्व असतें. जाड्याभरड्या कापडावर शेंदरी, तपकिरी, वगैरे रंगाच्या छटा देण्यासाठीं पूर्वी याच्या मुळाचा उपयोग करीत असत. पूर्वी देशी औषधांत मंजिष्ठाचा फार उपयोग करीत, परंतु अलीकडे फक्त कांहीं तेलांना रंग देण्यासाठींच याचा उपयोग करतात.

मंजिष्ठ रंग—(अलिझराइन). 'टर्की रेड', जांभळा, नारिंगी, वगैरे रंग तयार करण्यासाठीं उपयोगी पडणारा रंग. ह्याचे खडे (स्फटिक) नारिंगी लाल रंगाचे असून त्याची भुकटी तांबूस पिवळ्या रंगाची असते. पूर्वी हा रंग मंजिष्ठाच्या मुळ्यांतील काढीत असत. आतां अॅन्थ्रेसीनपासून हा तयार करतां येऊं लागला आहे.

मंजिष्ठापासून तयार केलेला रंग अतिशय पक्का असून पूर्वी तो फारच लोकप्रिय होता. ह्यामुळें 'मंजिष्ठा राग' म्हणजे मंजिष्ठाच्या रंगाप्रमाणें मोहक आणि कायम टिकणारें प्रेम असाहि एक अर्थ ह्या शब्दाला आला आहे.

**मंजुश्री**—बौद्ध धर्मांतील एक देवता. ती बोधिसत्त्वाचाच अंश असून मंजुघोषा, कुमार, कुमारभूत अशीं हिचीं दुसरीं नांवें आहेत. मंजुश्री पंथाचा उगम हिंदुस्थानांत झाला असला तरी चीनमध्यें त्याची विशेष वाढ होऊन चीनमधून तो पंथ नेपाळांत शिरला. महायानपंथी लोक प्रज्ञा, मंजुश्री व अवलोकितेश्वर यांना भजत असत. मंजुश्रीच्या प्रतिमा बऱ्याच आहेत. तिबेटी तांत्रिक ग्रंथांत मंजुश्रीची अपूर्व वाढ झाली, व तांत्रिक देवतांत मंजुश्रीला धर्मधातुवागीश्वर व वज्रानंग अशीं नांवें आहेत. मंजुश्रीची तुलना हिंदुधर्मांतील ब्रह्मयांशीं करण्यांत येते.

**मजूर**—अर्थशास्त्रामध्यें संपत्तीच्या उत्पादनांत जमीन, मजुरी व भांडवल हीं येतात. मजूरकाम हें बहुधा कच्च्या मालासंबंधांत असतें. भांडवल आणि मजुरी यांच्यामुळें झालेल्या उत्पादनात कोणाचा किती हिस्सा असावा याविषयीं तंटे सुरू होणें साहजिक होतें. (भांडवलदार आणि मजूर पाहा). मजुरांचीं गाऱ्हाणीं फार प्राचीन काळापासून आहेत. रोमन इतिहासकार प्लिनी यानें त्यांचें वर्णन केलें आहे. तेव्हां गुलामगिरीच असे. (गुलामगिरी व गुलामप्रतिबंधक कायदा पाहा). तथापि गुलामांखेरीज मजुरांचा स्वतंत्र वर्ग असे. इंग्लंडांत तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दीपासून मजुरांसंबंधीं कायदे होऊं लागले. निरनिराळ्या धंद्यांतील मजुरांना निरनिराळे नियम घालून दिलेले असत. यांत्रिक युग सुरू झाल्यावर तर मजुरांच्या हितासंबंधीं सरकारला जपावें लागूं लागलें. मजुरांचें संरक्षण, आरोग्य, कामाचे तास, वगैरे गोष्टींसंबंधीं सरकारनें नियम घातले. महायुद्धामुळें तर मजुरांच्या चळवळींना जोर चढला. १९१६ सालीं इंग्लंडात स्वतंत्र मजूरखातें उघडण्यांत आलें. मजूरमंत्री नेमण्यांत येऊं लागल्यापासून तर मजुरांचे प्रश्न महत्त्व पावले. 'दुकानाचा कायदा' (शॉप्स ॲक्ट) हा त्यांपैकीं एक आहे. पुढें मजुरांची संघटना होऊं लागली. (कामगार संघ पाहा.)

मजूर संघ—ही मजूरवर्गाची संघटना औद्योगिक क्रांतिकालापासूनची आहे. एकत्रितपणें एकमुखानें मजूरवर्गाचें गाऱ्हाणें सरकार किंवा मालक यांपुढें मांडण्याला ही संघटना चांगली उपयोगी पडते. प्रथम गेल्या शतकांत या संघाला दडपून टाकण्याचा भांडवलदारांचा प्रयत्न असे. पुढें सरकारी कायद्यानेंच संघाला मान्यता मिळाली. आरंभीं वेगवेगळ्या धंद्यांचे जे संघ असत ते एकत्र मजूरसंघाच्या एकाच नांवाखालीं मध्यवर्ती संस्था करून आणण्यांत आले. १९२६ सालीं इंग्लंडांत 'प्रत्यक्ष

कृती' चा प्रयत्न करून संघानें सार्वत्रिक संप घडवून आणला. या संघाच्या दरसाल परिषदा भरतात.

हिंदुस्थानांत गेल्या महायुद्धानंतर १९१८ सालीं अशी मजूरसंघटना अस्तित्वांत आली; व हळूहळू हिची प्रगति होत गेली. तथापि मजूर विविध जातिधर्मांचे व निरक्षर असल्यानें त्यांच्यातून पुढारी तयार होत नाहींत. १९२० सालापासून ट्रेड युनिअन कॉंग्रेसचीं अधिवेशनें होतात. १९२६ सालीं 'ट्रेड युनिअन ॲक्ट' झाला व व्यापारी संघाच्या सभासदांना कांहीं हक्क मिळाले. (१) कामाचे कमी तास, (२) खाणींतून स्त्री-मजुरांना बंदी, (३) किमान वेतन, (४) अस्पृश्यतानिवारण, (५) दुखणें, बेकारी व वृद्धपण यांसंबंधींचा सरकारी विमा, (६) मोफत, सक्तीचें प्राथमिक आणि यांत्रिक शिक्षण, (७) चांगलीं घरें, इ. मागण्या कॉंग्रेस करीत असते. राजकीय कॉंग्रेसप्रमाणें या मध्यवर्ती मजूर संघात राजकीय मतांप्रमाणें तट आहेतच. १९४२-४३ सालीं हिंदुस्थानांत ६९३ संघ नोंदलेले होते व सभासदांची संख्या सुमारें पावणेसात लाख होती. अशा संघांमुळें मजुरांचें हित झालें आहे यांत शंका नाहीं. संघाचें हत्यार म्हणजे मजुरांना संप करावयास सांगणें, पण या हत्याराचा नेहमींच वाजवी उपयोग केला जातो असें नाहीं.

**मजूर पक्ष**—इंग्लंडांतील हल्लींचा मजूरपक्ष मूळ १८६९ सालीं स्थापन झालेल्या 'लेबर रिप्रेझेंटेटिव्ह लीग' या संस्थेतून निर्माण झाला. या मूळ संस्थेची एक शाखा 'इंडिपेंडंट लेबर पार्टी' या नांवाची १८९३ सालीं निघाली. १९०६ सालीं इंग्लंडांतील पार्लमेंटच्या निवडणुकींत मजूर पक्षाचे ५० उमेदवार होते त्यांपैकीं २९ निवडून आले, आणि पार्लमेंटांत प्रथमच मजूर पक्ष हा स्वतंत्र राजकीय पक्ष म्हणून मान्य करण्यांत आला. याच सुमारास ह्या पक्षामध्यें केवळ मजूरवर्गाखेरीज इतर बौद्धिक धंद्यांत काम करणारे इसम सामील करण्यांत आले. या मजूरपक्षाचा मुख्य कार्यक्रम असा आहे कीं, -१ जीवनाचा ऊर्फ मजुरांच्या राहणीचा किमान राष्ट्रीय दर्जा ठरविणें; २ उद्योगधंद्यांवर लोकशाही सरकारचें नियंत्रण ठेवणें; ३ राष्ट्रीय जमाखर्चाची अधिक सुधारलेली पद्धति चालू करणें; ४ मांडवलवाल्यांवर अधिकाधिक जादा कर बसवून त्यामुळें होणारे जादा उत्पन्न सर्वसामान्य प्रजाजनांच्या सुखसोयीकडे खर्च करणें. शिवाय जगांत आंतरराष्ट्रीय शांतता नांदावी अशा धोरणाचा पुरस्कार मजूरपक्ष करतो, आणि म्हणून साम्राज्यशाहीचा मजूरपक्ष हा एक कट्टा विरोधक आहे. मजूरपक्ष १९२४ च्या जानेवारींत सरकारांत अधिकारारूढ झाला. पण ही त्यांची सत्ता फक्त २८८ दिवस टिकली.

पुढें १९२९ व १९३१ मध्येंहि हा पक्ष राज्यकारभार इतर पक्षांच्या मदतीनें चालवी. कारण पार्लमेंटांत त्यांचें संख्याधिक्य नव्हतें. तेव्हां समाजवादी तत्त्वानुसार राष्ट्रीयीकरणाचे प्रश्न हातीं घेतां आले नाहींत. चेंबरलेनच्या मंत्रिमंडळाला मजूरपक्षानें युद्ध चालविण्याच्या बाबीखेरीज कसलाहि पाठिंबा दिला नाहीं. १९४० त चर्चिल मंत्रिमंडळांत मजूरपक्षानें युद्धसमितींत आपले दोन सभासद पाठवले होते. त्यामुळें देशांतील मजुरांनीं युद्धसाहित्याच्या निर्मितींत चांगला भाग घेतला. महायुद्धानंतर इंग्लंडांत जी निवडणूक झाली तींत मजूरपक्षाला बहुमत लाभलें व तो आतांपर्यंत (१९५०) अधिकारारूढ आहे. या मजूरपक्षानें साम्राज्यशाहीविरुद्ध सर्वत्र जोराचा विरोध पाहून ज्या अधीन वसाहतींतून स्वराज्यप्राप्त्यर्थ जोराचीं आंदोलनें होतीं त्यांना स्वातंत्र्य देऊन टाकलें (उदा., हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सीलोन). यापुढें ब्रिटिश साम्राज्य म्हणून न राहतां वसाहतसंघराज्य असा बदल करण्यांत आला. फेब्रुवारी १९५० मध्यें ज्या नवीन निवडणुका झाल्या त्यात मजूरपक्षाचे प्रतिनिधि हुजूर (कॉन्झर्व्हेटिव्ह) पक्षाहून फारच थोडे अधिक निवडून आले. तेव्हां आतांचें मजूर मंत्रिमंडळ अस्थिर असून किती दिवस राहतें तें पाहावयाचें आहे.

**मजूरशोषण पद्धति**—(स्वेटिंग सिस्टिम). पूर्वी इंग्लंडांत आयते कपडे विकणारे व्यापारी गरीब मजुरांना त्यांच्या घरींच कामें देऊन व अगदीं कमी मजुरी देऊन आपण बराच नफा मिळवीत. अशा प्रकारचे इतरहि व्यापारी होते. तेव्हां गरिबांची ही पिळणूक थांबविण्यासाठीं चार्लस किंग्सले वगैरेंनीं मोठी चळवळ केली. त्यामुळें चौकशी होऊन कायदे केले गेले व व्यापारी मंडळें स्थापण्यांत आलीं. पुढें मोठ्या प्रमाणावर गिरण्यांतून माल तयार होऊं लागल्यानें अशीं लहान कामें बहुतेक थांबलीं.

**मजूरसंघवाद**—(सिंडिकॅलिझम). प्रत्येक धंद्यांतील उत्पादनाचीं साधनें त्या धंद्यांतील कामगारांच्या संघाच्या मालकीचीं असावींत असें तत्त्व. या वादाचा जनक जॉर्जेस सोरेल नांवाचा होता. कामगारांच्याकडे कामासंबंधीं सर्व गोष्टी असाव्यात व मालाच्या उत्पादनात त्यांचा हात असावा असें या वादाचे पुरस्कर्ते प्रतिपादितात. या मागण्या मान्य केल्या तर सर्व समाजाचें व विशेषतः गिऱ्हाकाचें हित होणार नाहीं; व स्वयंशासित व बलिष्ठ औद्योगिक संघांतच मांडणें लागतील, असें या वादाच्या विरोधकांचें मत पडतें. फ्रान्समध्यें कामकऱ्यांत या तत्त्वाचे पुष्कळ अनुयायी आहेत.

**मज्जातंतुदाह**—(फ्रेनिटिस). जेव्हां एखाद्या शिरेच्या बाजूंचा दाह होऊं लागतो तेव्हां त्यास ही संज्ञा देण्यात येते. सामान्यतः असा दाह होण्याचें कारण त्या शिरेमध्यें कोठें तरी

रक्त सांखळून तें घट्ट होतें व त्यामुळें हा रोग उद्भवतो. शरीराच्या एखाद्या भागास इजा झाली किंवा एखादी शस्त्रक्रिया केल्यानंतर किंवा एखाद्या संसर्गामुळें किंवा सामान्यतः अशक्ततेमुळेंहि हा विकार होण्याचा संभव असतो. हा विकार सामान्यतः मांडीच्या शिरांस होतो. व तो स्त्रियांस भारी प्रमाणांत होतो. रोग्यास ६।७ आठवडे बिछान्यांत निजून ठेवून पूर्ण विश्रांति दिली असतां शिरांतील रक्त बरोबर वाहूं लागून हा विकार बरा होतो.

**मज्जातंतुरचना**-- मज्जातंतुव्यूहाची रचना मज्जापेशी आणि तंतू मिळून झालेली असते. मेंदू अथवा मुख्य मध्यवर्ती भाग हा बहुतेक पेशीमय असतो व निरनिराळ्या स्नायूंकडे जाणारे मज्जातंतू हे तंतुमय असतात. परंतु प्रत्येक मज्जातंतु हा मज्जापेशीपासून निघालेला असतो. या पेशी फार सूक्ष्म असतात व तंतू तर त्यांहून सूक्ष्म असतात. यामुळें मज्जातंतुव्यूहाचा व व्यवस्थेंतील मुख्य घटक म्हणजे मज्जापेशी व तिचा अंकुर हीं होत, व यास न्यूरॉन अथवा प्ररोह असें म्हणतात. मज्जातंतु-व्यूहामध्यें हजारों प्ररोह असतात. तसेंच मज्जापेशींचें सूक्ष्मदर्शक यंत्रांत ठेवून निरीक्षण केल्यास त्यांपासून अनेक तंतू निघत असलेले आपल्या दृष्टीस पडतात. हे अंकुर केवळ संवेदना पोंच-विण्याचें कार्य करीत असतात. पोषणाचें व नियमनाचें कार्य मज्जापेशी करीत असतात. मज्जातंतुव्यूहाचे दोन विभाग असतात: एक मज्जापृष्ठवंशीय व दुसरा तंतुमय. पहिल्या विभागांत कवटीच्या आंतील मेंदू व पृष्ठवंशामध्यें असलेला पृष्ठवंशरज्जु आणि मेंदू व या रज्जूपासून निघणारे अनेक मज्जातंतू हे येतात. डोक्याच्या कवटींतून मेंदूचा एक भाग कवटीच्या खालच्या बाजूस असलेल्या छिद्रांतून खालती जाऊन पृष्ठवंश-रज्जु बनतो व तो पृष्ठवंशाच्या अग्रापर्यंत पसरलेला असतो. दुसरा मज्जातंतुजालकांचा भाग म्हणजे एक मज्जापेशींचा व मज्जातंतूंचा गुंतागुंतीचा व्यूह असून यामुळें निरानिराळ्या इंद्रियांतील स्नायूंस, तसेंच नलिका आणि ग्रंथी यांस चेतना मिळते. यांच्याकडूनच श्वासोच्छ्वास, रुधिराभिसरण व पचन या क्रियांचें नियमन होतें.

कवटीच्या आतील मेंदूचे चार मुख्य भाग असतात. त्यांतील मुख्य भाग वरच्या बाजूस असून तो एकंदर मेंदूच्या सुमारें ७/८ असतो; यास मोठा मेंदू, महामस्तिष्क अथवा सेरेब्रम म्हणतात. दुसरा याच्यापाठीमागें व खालच्या बाजूस कवटीच्या पाठीमागील भागांत असून तो लहान असल्यामुळें त्यास लघुमस्तिष्क अथवा सेरेबेलम असें म्हणतात. या लघुमस्तिष्काच्या पुढच्या बाजूस मेडयूला ऑब्लॉनाटा किंवा मज्जागोलक हा असतो. याचा संबंध मोठा मेंदू व पृष्ठवंश यांच्याशीं जोडलेला असतो. त्याप्रमाणेंच 'पॉन्स व्हॅरोली' या नांवाचा एक मज्जापेशींचा रुंद पट्टा या मज्जागोलकाच्या वरच्या बाजूस असून तो वरील लहान व मोठ्या मेंदूस जोडलेला असतो. पृष्ठवंशरज्जु हा सुमारें १८ इंच लांब असून १/३ ते १/२ इंच जाड असतो. हा पृष्ठवंशांतून खालीं जात असून त्याला मज्जातंतूंच्या शाखा प्रत्येक बाजूस २१ अशा फुट-लेल्या असतात. प्रत्येक शाखेंत दोन मुळें असतात. एक मागील बाजूस गतिदायक म्हणून व एक पुढील बाजूस संवेदना-दायक म्हणून असतें. या पृष्ठवंशरज्जूमध्यें एक संवेदनाकेंद्रांची रांगच असते. या रज्जूमार्फत मुख्य मेंदूपासून निघालेल्या सर्व संवेदना शरीराच्या निरनिराळ्या भागांस पोंचतात. मनुष्याच्या कातडीस, स्नायूस, वगैरे जे स्पर्शादि सुखदुःखमय संवेदन होतें तें निरनिराळ्या मज्जातंतूंच्या द्वारें त्याच्या पुढील बाजूस असलेल्या मुळांच्या मार्गानें मेंदूपर्यंत पोंचविलें जातें. मेंदूमधील मज्जागोलक हा भागहि संवेदनाज्ञानाचें व वहनाचें कार्य करीत असतो व मुख्य मेंदू आणि पृष्ठवंशरज्जु यांतील मध्यस्थाचें कार्य करितात. कांहीं विशेष महत्त्वाच्या व मर्मस्थानीं होणाऱ्या संवेदना मज्जागोलकामार्फत होत असतात. उदा., हृदयाच्या क्रियेचें नियमन करणें, रक्तगोलकाचें कार्य नियमन करणें, श्वासोच्छ्वास आणि जठरांतील पचन, वमन, इत्यादि क्रिया यांच्या कार्याचें नियमन यामार्फत होतें. पॉन्स व्हॅरोली या भागांत कांहीं महत्त्वाचे शिरोभागांतील मज्जातंतू, उदा., चेहऱ्यावरील, वगैरे असतात. या मज्जातंतुकेंद्रांचें चलन मज्जावरणापासून होत असतें. लघु-मस्तिष्काचें कार्य शरीरांतील समतोलपणा राखण्याचें असतें. शरीरविकासशास्त्रदृष्ट्या मज्जावरण हा भाग शरीरामध्यें सर्वांत अलीकडे विकास पावलेला आहे. महामस्तिष्काकडे प्रथम संवे-दना येतात आणि त्यांची प्रतिक्रिया त्याच्याकडून चेतना मिळून होत असते. त्याबरोबरच या सर्व संवेदना नमूद करून ठेव-ण्याचें कार्य महामस्तिष्क करीत असतें व या कार्यापासून एक प्रकारचें सर्वसंवेदना नोंदून ठेवण्याचें कार्य होत असतें व यामु-ळेंच स्मरणशक्ति उत्पन्न होते. ज्या प्राण्यांत मस्तिष्कावरण नसतें त्याला स्वतःची इच्छा किंवा बुद्धि असत नाहीं. आप-णाला जें मेंदूमध्यें पिवळें द्रव्य दिसतें तें अमर्याद पेशींच्या संख्येनें युक्त असतें, आणि त्या प्रत्येक पेशीमध्यें फरक असतो.

मज्जातंतूंस होणाऱ्या रोगांचें ऐंद्रिय व कार्यात्मक असें वर्गी-करण करण्यांत येतें. ऐंद्रिय रोगामध्यें कांहीं विकार आपणांस डोळ्यांनीं दिसण्यासारखे व कांहीं विकार सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें दिसण्यासारखे असतात. क्रियात्मक विकारांमध्यें भ्रम, उन्माद, आघात, वगैरेसारखे विकार येतात.

**मज्जातंतुव्यथा**—(न्युरॅलजिआ). जेव्हां एखाद्या विशिष्ट मज्जातंतूस वेदना होऊं लागतात तेव्हां त्यास मज्जातंतुव्यथा

असें म्हणतात. मांडीच्या मुख्य मज्जातंतूस (सायटिक नर्व्ह) व्यथा झाली असतां तिच्या वेदना नितंबापासून गुडघ्यापर्यंत मांडीच्या सर्व भागांत होत असतात; त्यास सायटिका असें म्हणतात. कातडीच्या मज्जातंतूस निरनिराळ्या प्रकारच्या व्यथा होतात (डॅर्मल्जिया); त्यांचें बहुतेक निरीक्षण झालेलें आहे. परंतु शरीराच्या इतर भागांतहि, स्नायू, सांधे, आंतडीं, वगैरेमध्येंहि अशी व्यथा होते (एंटराल्जिया). अशी व्यथा होण्याचें कारण मज्जातंतूस इजा होणें हें असून तें अनेक प्रकारें उद्भवण्याचा संभव असतो. ज्यांच्या शरीरांत रक्त फार पातळ असतें व ज्यांचे मज्जातंतू दुर्बल असतात अशांस हा विकार होण्याचा अधिक संभव असतो. सामान्यतः रोग्याची शक्ति वाढविणें हाच या व्यथेवर उपाय आहे.

**मज्जादौर्बल्य**—(न्युरॅस्थेनिआ). या रोगांत मज्जाशक्ति अगदीं कमी होऊन रोग्याला कसलेहि श्रम करावेसें वाटत नाहीं. हा रोग अतिशय शारीरिक किंवा मानसिक त्रास झाल्यानें, संकटें ओढवल्यानें, किंवा फार विषयसेवनानें होत असतो. या रोगांत बद्धकोष्ठता, क्षुधा व झोंप न लागणें, स्वभाव चिडखोर बनणें व अत्यंत उदासीनता वाटणें, हीं लक्षणें होतात. यामुळें मेंदू, हृदय, जठर किंवा लैंगिक जीवन यावरहि परिणाम होतो. हा रोग स्त्रियांपेक्षां पुरुषांना मध्यम वयांत होतो. हा रोग कांहींसा आनुवंशिकहि आहे. या रोगाला औषधांची फारशी गरज नसते. थोडी विश्रांति व धारेपालट यांमुळें कांहींना फायदा होतो. तसेंच पौष्टिक आहार व चांगली मलशुद्धि पाहिजे. चिंतेचें कारण दूर झाल्यास किंवा चिंता विसरल्यास मानसिक रोगी बरा होतो.

**मझ्दक**—इराणांतील एक पंथसंस्थापक. मझ्दकनें समाजव्यवस्थेंत बरीच क्रांति उडवून दिली होती व वरिष्ठ वर्गांना त्याच्या पंथाच्या लोकांकडून मोठा त्रास भोगावा लागला असें दिसतें. या परिस्थितीवर प्रतिपक्षी लेखकांनीं बराच जोर दिलेला आहे व त्यांच्या वर्णनांत तथ्यांशहि बराच दिसतो. कारण मझ्दक हा केवळ प्लेटोप्रमाणें तत्त्ववेत्ता नसून तो आपले सामाजिक सुधारणेचे विचार तरवारीच्या जोरावर अमलांत आणणारा क्रांतिकर्ता होता. आधुनिक समाजसत्तावादी आणि मझ्दक पंथी यांच्यामध्यें असा एक महत्त्वाचा फरक दाखविला जातो कीं, मझ्दकी पंथाच्या चळवळीला इतर हरएक पौरस्त्य चळवळीप्रमाणेंच धार्मिक स्वरूप फार होतें. झरथुष्ट्र पंथांतहि मझ्दक पंथाचा हा विशेष आढळतो. मझ्दकनें गुरेंढोरें मारून मांस खाण्याचें बंद केलें होतें. फर्दुसीच्या महाकाव्यांतील वर्णनावरून असें स्पष्ट दिसतें कीं, मझ्दकनें आपल्या पंथाची समता आणि बंधुत्व हीं तत्त्वें झरथुष्ट्राच्या मूळ स्वरूपांतल्या धर्मांतून घेतलीं होतीं. मझ्दकाच्या चळवळीला विलक्षण यश येण्याचें कारण इराणी धर्मांतलीं ध्येयेंच त्यानें लोकांपुढें मांडलीं हें होय.

**मटकी** (मठ)—या धान्याची लागवड हिमालयापासून तों थेट सिंहलद्वीपापर्यंत सर्व उष्ण प्रदेशांत आढळते. हें पीक हलक्या जमिनींत चांगलें येतें. ह्या पिकाचे ताणे जमिनीवर पसरतात. त्याला मुगासारख्या शेंगा येऊन आंतील दाणा रंगाला तांबूस असतो. मठ बाजरी, जोंधळा, तीळ, तूर, कोद्रू, वगैरे पिकांत मिसळून किंवा मोगण म्हणून वेगळे पेरतात. बीं दर एकरीं सुमारें १॥ ते २ पौंड लागतें. मठ नोव्हेंबर–डिसेंबरांत तयार होतो. सरासरी दर एकरीं १००–१२५ पौंडांचें उत्पन्न होतें. मठाचा उपयोग गरीब लोकांस फार होतो. गुरांना हें धान्य शिजवून घालतात. कित्येक वेळीं ओले वेल शेंगांसहित उपटून बैलांस व घोड्यांस चारतात. वाळलेला भुसा व वेल गुरांना खावयास घालतात.

**मॅटरलिंक, कौन्ट मॉरिस** (१८६२–१९४९)—एक बेल्जियन कवि, नाटककार व लेखक. त्याच्या नाटकांत मृत्यु आणि नाश यांचीं चित्रें असतात व माणसाचें विद्यमान जीवन हें फक्त क्रांतिकालांतील समजावें व त्यांत अनेक लक्षणें (सिंबॉल) सांपडतील असें त्याचें प्रतिपादन आहे. जीवनाच्या तत्त्वज्ञानावर त्याचे अनेक निबंध आहेत. विश्वाचें रहस्य समजून घेण्यासाठीं अनेक शास्त्रीय शोध त्यानें चालविले होते. मुंगीचें जीवन, माशीचें जीवन, इ. त्याच्या लेखनांतून फार सुंदर रीतीनें शास्त्राचा अचूकपणा दाखविला गेला आहे.

**मटली**—[वर्ग–मिर्टासी; मर्टस इं. मर्टल]. मेंदीसारखीं पानें असलेली एक सुगंधी वनस्पति. या झाडास सांधीं एकासमोर एक पानें असतात. याचीं फुलें पांढरीं किंवा गुलाबी असतात. हीं मेंदीसारखीं बागेंत लावतात.

भूमध्यसमुद्राच्या कांठानें व आशिया खंडाच्या समशीतोष्ण कटिबंधांत हीं पुष्कळ उगवतात. पानांमध्यें उद्वायी (व्होलटाइल) तेल असून त्याचा उत्तेजक औषध म्हणून उपयोग करतात. फळेंहि औषधी आहेत. पाश्चात्य देशांत धार्मिक संस्कारांत मटली लागते. बौद्धिक संगरांत विजय मिळविणाऱ्याच्या डोक्याला याची माळ बांधीत.

**मठवास**—हिंदु धर्मांतील चतुर्थाश्रम आणि संन्यास हा मठवासाची आवश्यकता दाखवीत आहे व प्राचीन ऋषी आणि संन्यासी यांचे मठ होतेच. बौद्ध आणि जैन संप्रदायांत मठसंस्था स्वतंत्रपणेंच उभारली गेली. पांचव्या शतकांत चिनी प्रवासी फाहियान हिंदुस्थानांत आला तेव्हां त्याला हजारों मठ आढळले व त्यांतून शिक्षणाची व्यवस्थाहि उत्तम असल्याचें त्याला दिसलें. भिक्षु–भिक्षुणींचे संघाराम असत.

ख्रिस्ती मठ इ. स. च्या तिसऱ्या शतकापासून निघाले. तथापि युरोपांतील मठसंस्थेचा उत्पादक संत बेनेडिक्ट म्हणतां येईल. या काळें झगेवाल्या बेनेडिक्टाइन मठवासीयांसाठीं बौद्ध भिक्षूंप्रमाणें नियम केलेले असत; तथापि यांची अवनति होऊन सुधारणावादी क्लुनिआक पंथ निघाला (९१०). यानंतर दुसरे मठवासीयांचे पंथ निघाले. त्या सर्वांत प्रमुख म्हणजे फ्रॅन्सिस्कन, डोमिनिकन आणि कार्मेलाइट या फकिरांचा (फ्रायर्स) होय. हे फ्रायर मंकपेक्षां वृत्तीनें निराळे असत. कॉर्थ्यूसियन मठवासीयांचा पंथ एकांतप्रिय असे. वरील पंथांत स्त्रियाहि असतच व ब्रिजिटाइन आणि उर्सुलाइन यांच्याप्रमाणें त्यांच्या कांहीं स्वतंत्र शाखा असत.

धर्मसुधारणा (रिफॉर्मेशन) निघाल्यापासून प्रॉटेस्टंट राष्ट्रांतून मठ बंद झाले. फ्रान्स, पोर्तुगाल, स्पेन यांसारख्या रोमन कॅथॉलिक देशांतहि यांच्यावर बंधनें घातलीं गेलीं. या मठांतून अत्यंत अनाचार होई, त्यामुळें धर्मभोळ्या लोकानाहि त्यांचा पुरस्कार करवेना. तेव्हां आज मठसंस्था क्वचित् कोठें जीव धरून असलेली दिसेल.

आपल्याकडे आजहि संत-महंतांचे मठ आहेत. पण जुन्या मठांतल्याप्रमाणें त्यांचा कारभार नाहीं; तर मठाधिपतींचें वास्तव्यस्थान एवढेंच त्यांचें महत्त्व उरलें आहे.

**मंडणगड**—मुंबई, रत्नागिरी, दापोली तालुक्यांत बाणकोटच्या पूर्वेस १२ मैलांवर मंडणगड नांवाच्या उंच डोंगरावर हा किल्ला आहे. याचे दोन निरनिराळे भाग असून दोहों मिळून हा किल्ला झालेला आहे. यास तिहेरी तट आहे व याचें क्षेत्रफळ ८ एकर आहे. हा फार प्राचीन आहे.

**मंडनमिश्र**—सुरेश्वराचार्य पाहा.

**मंडप मार्ग**—कमानी वाट; तोरणपथ; (इं.) आर्केड. रस्त्याच्या बाजूला खांबांवर किंवा धक्क्यावर जी कमानींची रांग बांधण्यांत येते तीस म्हणतात. अशा तऱ्हेची कमानींची रांग एखाद्या छपरास आधार म्हणून किंवा एखाद्या घराच्या भिंतीस लागून बांधण्यांत येते. या कमानींमधून एक रस्ता नेलेला असतो व आंतील बाजूस दुकानें मांडलेलीं असतात. अशा तऱ्हेचे रस्ते बोलोना, पादुआ, बर्न, वगैरे शहरीं असून त्यांची बांधणी मध्ययुगीन आहे. ट्यूरिनमधील रस्ता व पॅरिसमधील रिहोली हा रस्ता अशाच तऱ्हेचा दुकानें असलेल्या कमानींचा आहे.

**मंडपेश्वर लेणें**—मुंबई, ठाणें जिल्ह्यांत बोरिवली स्टेशनापासून एक मैलावर हें ब्राह्मणी शिल्पाचें लेणें आहे. लेणें डोंगरांत नसून जमिनीच्या पोटांत खोदलें आहे. पूर्वी आंत देवमूर्ती होत्या पण आतां एक मोडकी ख्रिस्ती देवताच फक्त चौथऱ्यावर दिसते. हें लेणें इ. स. ८ व्या शतकांतलें आहे. १६ व्या शतकांत पोर्तुगीजांनीं या लेण्याला ख्रिस्ती स्वरूप देऊन माटपेश्चिर नांव दिलें.

**मंडला**—मध्यप्रदेश (मध्यप्रांत), जबलपूर विभागामधील एक जिल्हा. क्षे. फ. ५११५ चौ. मैल. अमरकंटक पर्वतावर नर्मदा नदी उगम पावते. येथील बहुतेक प्रदेश डोंगराळ व जंगलमय आहे. यांतील चौरादादर पर्वत अमरकंटकइतकाच उंच आहे. येथील अरण्यांत साल, साग, कळक हीं झाडें विशेष प्रमाणांत होतात. वाघ, चित्ता, गवा, सांबर, नीलगाय, हीं जनावरें आढळतात. येथील हवा थंड व आल्हादकारक आहे. पाऊस सरासरी ५२ इंच पडत असून पावसाळ्यांत तापाची सांथ नेहमीं सुरू होते.

रामनगर येथील शिलालेखावरून पाहतां गढा मंडलांतील गोंड रजपूत घराण्याच्या वर्चस्वास पांचव्या शतकांत सुरुवात होते. या घराण्याचा मूळपुरुष जाधवराय नांवाचा रजपूत असून तो येथील गोंड राजाच्या पदरीं होता. त्यानें त्या राजाच्या मुलीशीं लग्न लावलें व पुढें गोंड राजाच्या मरणानंतर आपण राजा झाला. इ. स. १८१८ त हें इंग्रजांच्या ताब्यांत आलें. रामनगरांतील गढा मंडलाच्या गोंड राजाचा महाल व देवगांवचें देऊळ हीं इतिहासप्रसिद्ध स्थळें होत. जिल्ह्याची लो. सं. (१९४१) ५,०४,५८०. गहूं, तांदूळ, तीळ, कोद्रु, वगैरे पिकें होतात. लोखंडहि मुबलक सांपडतें. जाडेंभरडें सुती कापड व काशाचीं भांडीं उत्तम होतात.

मंडला गांवची लो. सं. सु. ५००० आहे. इ. स. १६७० त हें गांव गढा मंडलाच्या गोंड राज्याची राजधानी बनलें. गोंड लोकांनीं येथें एक किल्ला व राजवाडा बांधला. येथें काशाचीं भांडीं होतात.

**मंडलिक, रामचंद्र नारायण** (१८८५- )—एक महाराष्ट्रीय सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. १९०८ मध्ये हे 'विहारी' या मुंबई येथें निघणाऱ्या साप्ताहिक पत्राचे संपादक असतां यांस १२४ अ कलमाखालीं २ वर्षें सक्त मजुरी व १००० रु. दंडाची शिक्षा झाली होती. मुंबई येथील नॅशनल यूनियन व होमरूल लीग-मुंबई शाखा यांचे ते निर्वेतनी सहचिटणीस होते. १९३३ ते १९३५ पर्यंत ते डेमोक्रॅटिक स्वराज्य पक्षाचे सहमंत्री होते. १९२१ ते १९२५ मध्यें ते 'लोकमान्य' या मराठी दैनिक पत्राचे प्रथम उपसंपादक व पुढें मुख्य संपादक होते. ते अनेक वर्षें महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे मंत्री, कुलाबा जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष व ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सदस्य होते. १९३० व १९३२ मधील सत्याग्रह चळवळींत यांस दंड व तुरुंगाची शिक्षा झाली होती. कुलाबा जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे हे पहिले

सर्वाधिकारी होते. हे मुंबई असेंब्लीचे सभासद आहेत व राजकीय कैद्यांचीं व गरीब जनतेचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचा प्रयत्न करीत असतात. स्वामी विवेकानंद यांचें चरित्र ५ खंडांत यांनीं लिहिलें आहे व मिसेस बेझंट यांच्या 'हाउ इंडिया रॉट फॉर फ्रीडम' या ग्रंथाचें भाषांतर केलें आहे.

**मंडलिक, विश्वनाथ नारायण** (१८३३–१८८९)— मुंबईतील एक कायदेपंडित व सार्वजनिक कार्यकर्ते. यांचा जन्म रत्नागिरि जिल्ह्यांत मुरूड या गांवीं झाला. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन हायस्कूल व कॉलेज यांमध्यें झालें. १८६३ पर्यंत त्यांनीं अनेक हुद्यांवर सरकारी नोकरी केली व नंतर ते हायकोर्टांत वकिली करूं लागले. ते एक नामांकित वकील असून त्यांनीं चांगली कीर्ति व संपत्ति मिळविली होती. यांनीं रत्नागिरि जिल्ह्यांतील खोती–प्रकरणांत चांगली कामगिरी बजावली. १८६४ मध्यें यांनीं 'नेटिव्ह ओपिनिअन' पत्र सुरू केलें. यांनीं मुंबई म्युनिसिपालिटींत महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणल्या. १८७३ मध्यें हे सरकारी वकील झाले. १८७४ मध्यें यांस मुंबई कायदे मंडळांत सभासद नेमलें. तेथें ते आठ वर्षें होते. नंतर १८८४ सालीं यांस व्हाइसरॉय यांच्या कायदेमंडळांत नेमण्यांत आलें. १८८९ मध्यें मुंबई युनिव्हर्सिटीनें यांस आर्ट्स शाखेचे डीन नेमलें. यांनीं हिंदु कायद्यावर चांगले ग्रंथ लिहिले आहेत. एल्फिन्स्टनच्या इतिहासाचें यांनीं मराठींत भाषांतर केलें आहे. यांची वक्तशीरपणाबद्दल ख्याति होती. यांचा मोठा ग्रंथसंग्रह असून तो पुढें फर्ग्युसन कॉलेजांत ठेवण्यांत आला. यांचें विस्तृत चरित्र मराठींत श्री. ग. रा. हवालदार यांनीं दोन भागांत लिहिलें आहे.

**मंडाले**— उत्तर ब्रह्मदेश, मंडाले विभागामधील जिल्हा. यांत एक ७०० चौ. मैलांचें मोठें मैदान आहे. येथील साग्यिन डोंगरांत संगमरवरी दगडांच्या खाणी आहेत. या जिल्ह्यांतून इरावती, म्यींज, मदप्य ह्या तीन नद्या वाहतात. येथें ३० ते ४० इंचांपर्यंत पाऊस पडतो. फार प्राचीन काळापासून हा जिल्हा ब्रह्मदेशाच्या राज्यांत मोडत असे. येथें बौद्ध लोकांचीं लहान-मोठीं देवळें (पागोडा) सर्वत्र आढळतात. लो. सं. ३,५६,६२१. यांत बौद्धधर्मीयांचें प्रमाण फार मोठें आहे. मंडाले कालवा झाल्यापासून बरीच जमीन लागवडींत येऊं लागली. या जमिनींत मुख्यतः भाताचें पीक होतें. चणे, टमाटो, कांदा, तंबाखू व मिरच्या पिकतात. यांतील जंगलांत बांबू, सागवान, ओक, वगैरे इमारती लांकूड होतें. मदप्यजवळील साग्यीना टेंकडयांत संगमरवरी व ग्रॅफाइट दगड, कॅंगिथामिन व येग्यी येथें हिराकस, व ऑन्हलट येथें शिसें सांपडतें. श्वेग्यीन येथें अभ्रक व वेटविन येथें कोळसा सांपडतो. अमरपुर येथें रेशमी कापड व कम्मावा कागद तयार होतात.

शहर— मंडालेविभागाचें मुख्य ठिकाण व ब्रह्मी राज्याची राजधानी (१८३७–८५). शहर इरावती नदीच्या पूर्व तीरावर आहे. त्याच्याभोंवतीं कोट व खंदक आहे. जुनें शहर १८९२ सालीं जळालें. राजवाड्यांचे अवशेष मात्र आहेत. कुथोठा हें देऊळ फार मोठें आहे. येथें एक शेतकी कॉलेज आहे. लो. सं. (१९३१) १,४७,९३२. येथें चांदीचीं नक्षीदार भांडीं, लांकडा-वरील खोदीव काम, लोखंडी काम, चितारकाम, कलाबतूकाम, लाखेचीं भांडीं, व दगडाच्या व पितळेच्या मूर्ती येथें उत्तम होतात.

कालवा–हा इरावतीला समान्तर असून दक्षिणोत्तर बांधला आहे. मध्यभागीं असलेल्या मोठया मैदानाला कालव्याचें पाणी देण्यांत येतें. हा ३९ मैल लांब असून यांत ८०,००० एकर जमिनीला पुरण्याइतकें पाणी असतें.

**मंडी संस्थान**—पंजाबमधील एक संस्थान. हें पंजाबमधील पहिल्या प्रतीचें डोंगरी संस्थान आहे. ह्या संस्थानांत सैंधव (मीठ) सांपडतें. यांत १० मजबूत किल्ले आहेत. या राज्यांत सतीचे स्तंभ अतिशय आहेत. सुकेतच्या शाहुसेन राजाचा भाऊ बाहुसेन याच्या वंशांतील अजबरसेन यानें हें शहर वसविलें. या संस्थानांत १४६ खेडीं आहेत. एकंदर लो. सं. (१९४१) २,३२,५९३ आहे. क्षे. फ. १२०० चौ. मैल. उत्पन्न सुमारें १२ लाखांचें आहे. मुख्य उत्पन्न तांदूळ, मका, कडधान्यें, चणे, ज्वारी, बटाटे, गहूं, तंबाखू, ऊंस, खसखस, कापूस व चहा यांचें आहे. याचा ⅔ प्रदेश जंगलयुक्त आहे. सराजमध्यें व जिरींत लोखंड, गमा दिरंग खाणींत मीठ, व गोधर किंधरांत खनिज पदार्थ मुबलक सांपडतात. लोखंडी सामान, पितळेचीं भांडीं, लांकूडकाम, रंगकाम व विणकाम हीं कामें येथें होतात. संस्थानाकडून दर वर्षी १ लक्ष रुपये इंग्रज सरकारास खंडणी दिली जाई. हल्लींचे महाराज सर जोगींदरसेन हे १९२५ सालीं गादीवर आले. आतां हें संस्थान हिमाचल प्रदेशांत सामील झालें आहे.

शहर—संस्थानची राजधानी मंडी याची लो. सं. सुमारें ८,००० वर आहे. हें शहर १५२७ त वसविण्यांत आलें. कित्येक देवळें व महत्त्वाच्या इमारती येथें आहेत. डमडम राजवाडा १७ व्या शतकांत बांधला गेला. मंडी शहरांतून लडख आणि यार्कंद येथें व्यापार चालतो.

**मंडुर भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. पांडु रोगावर हें एक चांगल्यापैकीं औषध आहे. रोगी अगदीं फिक्का असणें, हाता-पायाला सूज असणें, तहान लागणें, पान्थरी वाढलेली असणें, कावीळ होणें, इत्यादि लक्षणांवर हें एक चांगल्यापैकीं औषध

आहे. मंडुराचे तीन प्रकार आहेत : बालमंडुर, मधुमंडुर व मौममंडुर. बालमंडुराला गोमूत्राचीं पुटें दिलेलीं असतात. मौममंडुरांत माक्षिकाचें मिश्रण असतें व मधुमंडुरला मधुरवर्गाचीं पुटें दिलेलीं असतात. लोहभस्मापेक्षां हें औषध सौम्य असल्यामुळें स्त्रियांना, मुलांना व सुकुमार लोकांना सहज देतां येतें. लहान मुलांच्या पांडुरोगावर व स्त्रियांना गरोदरपणीं होणाऱ्या पांडुरोगावर याचा चांगला उपयोग होतो. -॥- ते १ गुंज मध, पिंपळी, आर्द्रकावलेह, लोणी, किंवा खडीसाखर यांबरोबर घेतात.

**मंडेश्वर**—ग्वाल्हेर संस्थान, मंडेश्वर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. येथील लो. सं. सु. वीस हजार. हें गांव अफूच्या व्यापाराचें केंद्र आहे. येथें बायकांच्या चुनडया उत्तम होतात. मंडेश्वर हें फार जुनें व इतिहासाच्या व प्राचीनवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें ठिकाण आहे. याचें पूर्वीचें नांव दशपूर आहे. याच्या पूर्वेकडील किल्ला अल्लाउद्दीन खिलजीनें १४ व्या शतकांत बांधला. मंडेश्वराच्या आग्नेयीस ३ मैलांवर सोंदनी अथवा सोंगनी नांवाचें खेडें आहे. तेथें शिलालेख असलेले दोन स्तंभ आहेत. माळव्याच्या यशोधर्मन् राजानें ५२८ त मिहिरगुलाचा पराभव केला अशी नोंद यांत महत्त्वाची आहे.

**मँडोलिन**—हें एक गितारसारखें तंतुवाद्य आहे. हें वाजविण्याकरितां उजव्या हाताच्या बोटांत नखी घालून तारा वाजविण्यांत येतात व सारंगीसारखी डाव्या हाताचीं बोटें तारांवर दाबून स्वर बदलण्यांत येतात. हें वाद्य फार जुनें असून इटलींत निघालेलें असावें.

**मॅड्रिड**—स्पेनची राजधानी. आयबेरीन द्वीपकल्पाच्या मध्यावर मानझानारीज नदीकांठीं ही वसली आहे. लो. सं. ११,७५, २१०. विद्यापीठ, राष्ट्रीय ग्रंथालय व राजवाडा या इमारती प्रेक्षणीय आहेत. एक कलाप्रदर्शनाची व वेधशालेची मोठी इमारत आहे. तंबाखू, साबण, अत्तरें, बुर्चे, जवाहीर, लांकडी सामान, इ. या ठिकाणीं तयार होतात. ग्रंथनिर्मिति फार मोठ्या प्रमाणावर होते. दुसऱ्या फिलिप राजानें १५६० सालीं ही राजधानी केली.

**मँड्रिल वानर**—ही वानराची जात पश्चिम आफ्रिकेमध्यें आढळते. याची शेपटी आंखूड असते, व तोंड लांब असून कुत्र्याच्या तोंडासारखें दिसतें. याच्या कुल्ह्यावर घट्टे असतात व गाल फुगलेले दिसतात व त्यांचा रंग चमकदार असतो. याची उंची पांच फुटांपर्यंत असते.

मँड्रिल वानर

**मढी**—मुंबई, अहमदनगर जिल्हा, शेवगांव तालुका. हें एक कान्होबानाथाच्या यात्रेचें ठिकाण आहे. कान्होबाला मुसलमान शहा रमझान महीसवार असें नांव देऊन आपला संत समजतात. हिंदू लोक त्याची कान्होबानाथ (नऊ नाथापैकीं एक) म्हणून उपासना करतात. या ठिकाणीं बरींच ऐतिहासिक स्थळें आहेत.

**मणि**—एखाद्या माळेमध्यें ओंवण्याकरितां छिद्रें असलेला दगड, लांकूड, बिया, वगैरेंचा केलेला वाटोळा पदार्थ. मण्यांच्या माळा गळ्यांत किंवा शरीराच्या इतर भागांत घालण्याची चाल अगदीं प्राथमिक अवस्थेंतील मानवांमध्येंहि आढळते. प्रथम कदाचित् स्वाभाविकपणें छिद्र असलेले दगड, किंवा एखाद्या फळाच्या बिया किंवा पोकळ लांकडाचे तुकडे या कामाकरितां उपयोगांत आणण्यांत येत असावे. त्यापुढें मुद्दाम घांसून गुळगुळीत केलेल्या व कृत्रिम रीतीनें छिद्र पाडलेल्या मण्यांच्या माळा प्रचारांत आल्या असाव्या. त्यानंतर कांचेचे मणी प्रचारांत आले. त्यांचा अनेक प्रकारें उपयोग करण्यांत येतो.

परमेश्वराचें नामस्मरण करण्याकरितां रुद्राक्ष वगैरेसारखे नैसर्गिक व कांचेचे किंवा स्फटिकाचे वगैरे मणी सर्वत्र उपयोगांत आणण्यांत येतात.

उत्खननांत जुने मातीचेहि मणी सांपडतात. असे शातवाहनकालीन मणी कऱ्हाड येथें कोटांत मिळाले आहेत.

अम्लखात (एच्ड) मणी हा एक वेगळाच संशोधनाचा विषय आहे. अकीकाच्या मण्यांवर रासायनिक क्रियेनें नक्षी काढतात. ही कला फार प्राचीन असून विशेषतः प्राच्य राष्ट्रांतून आढळते. मोहेंजोदारो, हडप्पा, तक्षिला, अहिच्छत्र, राजघाट, सांबर, पाटणा, उज्जयिनी, कोल्हापूर, पैठण, वगैरे अनेक ठिकाणीं हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रकारचे अम्लखात मणी सांपडले आहेत (डॉ. मो. गं. दीक्षित—एच्ड बीड्स इन् इंडिया पाहा).

**मणिपुरी**—१. लोक–आसाम, मणिपूरच्या दरींत राहणारे लोक. यांना मेइथेई, मोग्लई, मेक्के किंवा मेखली म्हणतात. हे लोक वैष्णवपंथी हिंदू आहेत. ते मासे खातात, पण मांसाला शिवत नाहींत. रासक्रीडा, गोष्ठविहार हे यांचे मुख्य सण आहेत. यांच्यांत नागपूजेची चाल आहे. हे लोक स्त्रिया विकतात व विकत घेतात. पांडवांपैकीं अर्जुनाचे हे वंशज असल्यामुळें ते चंद्रवंशी क्षत्रिय होत. यांचे पुजारी मणिपुरी ब्राह्मण आहेत. कांहीं मणिपुरी लोक मुसलमान झालेले आहेत. यांच्यांत घटस्फोट व पुनर्विवाह प्रचलित आहे.

२. भाषा व वाङ्मय—मणिपूरची मुख्य भाषा मेइथेई ही आहे. ही कांहीं अंशीं वाङ्मयीन भाषा आहे. लिपि १८ व्या शतकारंभीं बंगालमधून घेतली असें कांहीं भाषाशास्त्रज्ञ समजतात; तर कोणी १६ व्या शतकाच्या मध्यांत चिनी लोकांकडून घेतली असें प्रतिपादतात. 'तारवे ल्लानंब', 'शंसोग्मनंब' हे हस्तलिखित ग्रंथ युद्धकथाविषयक आहेत. 'लाग्लोल' ग्रंथांत अनेक दंतकथा व म्हणी आहेत. 'शह्लौ'मध्यें जनावरांची माहिती आहे.

या भाषेचे दोन आधार-स्तंभ म्हणजे कै. हिजम अंगनघळसिंग व पंडित श्री. अटोमबापू विद्यारत्न हे होत. हे दुसरे पंडित सध्यां संस्कृत वाङ्मयांतून ऐतिहासिक व आध्यात्मिक विचारसंप्रदाय मणिपुरी वाङ्मयांत आणीत आहेत. अंगनघळसिंग हे मणिपुरी भाषेचे राष्ट्रकवि आहेत. त्यांनीं ३९००० ओळींचे एक 'खंबा-थोइबी शोएरेंग' नांवाचें महाकाव्य लिहिलें आहे. त्यांत खंबा व थोइबी यांच्या अत्यंत रोमांचकारी प्रेमकथेचें वर्णन आहे. फिरदोसीच्या प्रसिद्ध शहानामा या खंडकाव्याशीं याचें साम्य आहे. याच कवीनें 'सिंगेल इंदु' नांवाचें एक ८००० ओळींचें काव्य केलें आहे व तें मुद्रित झालें आहे. पहिल्या काव्याचा फक्त अष्टमांश भागच छापला आहे. लघु काव्याचे दोन भाग, वाङ्मयीन निबंधाचा एक भाग, एक कादंबरी व ३ नाटकें इतकें लेखन या कवीचें मुद्रित आहे. मेइथेई वाङ्मय भारतीय वाङ्मयांत महत्त्वाची भर घालील असें कलकत्ता युनिव्हर्सिटीचे डॉ. सुनीतिकुमार चतरजी यांचें मत आहे.

**मणिपूर संस्थान**—आसाम. याचें क्षे. फ. ८,६२० चौ. मैल आहे. यांत बराच मोठा डोंगराळ प्रदेश आहे. एका डोंगरावर लोकटक नांवाचें सरोवर आहे. जंगलांत इमारती लांकडांचीं व कळकांचीं झाडें असून हत्ती, वाघ, चित्ता, अस्वल, रानडुकर, हरिण, गेंडा व गवा हे प्राणी आढळतात. यांतून इंफल, इरिल, थोबल, नंबल व नंबोल या नद्या वाहतात. इंफल गांवीं सरासरी ७० इंच व डोंगरावर सरासरी १०० इंच पाऊस पडतो. इ. स. १७१४ त नाग नामक राष्ट्रजातींतील पानहिबा हा मणिपूरचा राजा झाला व नंतर त्यानें हिंदुधर्म स्वीकारून घरीब नवाझ हें नांव धारण केलें. पुढें येथील सर्व लोक कट्टे हिंदू बनले. ब्रह्मदेशाविरुद्ध मदत मिळविण्यासाठीं १७६२ मध्यें ब्रिटिशांशीं तह करण्यांत आला. १८२६ त मणिपूरचें स्वातंत्र्य जाहीर करण्यांत आलें. १८९१ ते १९०७ पर्यंत संस्थान पोलिटिकल एजंटच्या ताब्यांत होतें. स. १९०८ मध्यें चूडाचंद्राच्या हातीं कारभार देण्यांत आला. चूडाचंद्रानें १९४१ मध्यें आपण होऊन गादी सोडली व मुलाला राज्यावर बसविलें. ते बोधचंद्रसिंग आज अधिपति आहेत. संस्थानची लो. सं. (१९४१) ५,१२,०६९ असून तींत हिंदूंचें प्रमाण शें. ६० व मूळच्या रहिवाशांचें शें. ३४ आहे. यांत १४७७ खेडीं व इंफल नांवाचें एक गांव आहे. मुख्य पीक भाताचें आहे. शिवाय खसखस, गहूं, नारिंग, लिंबू, अननस, केळीं, आंबे, मिरीं, तंबाखू, व थोडा कापूस हे जिन्नस पिकतात. या संस्थानांत रेशमी किडे मलबेरी वेलीवर पोसले जातात. पितळेचीं भांडीं तयार करण्याचे, शेतकीस उपयुक्त असें सामान करण्याचे, टोपल्या, चटया, वगैरे किरकोळ धंदेहि चालतात. संस्थानचें उत्पन्न २९ लक्ष रु. आहे. १९४९ च्या ऑक्टोबर महिन्यांत हें संस्थान आसाम प्रांतांत विलीन झालें.

**मणिसंप्रदाय**—हा पश्चिम आशियांतील एक प्राचीन धार्मिक पंथ आहे. याचा संस्थापक मणि हा उच्च कुळांत जन्मलेला एकबटानाचा इराणी रहिवासी होता. कांहीं इतिहासकारांच्या मताप्रमाणें तो इ. स. २१५–२१६ त जन्मला असावा. त्याच्या बापाचें नांव फटक असें असून त्यानें मणीला काळजीपूर्वक शिक्षण दिलें होतें. फटक हा दक्षिण बाबिलोनियांतील बॅप्टिस्ट लोकांच्या पंथांत असल्याकारणानें त्याच्या मुलासहि त्याच पंथाचें शिक्षण मिळालें. या बाबिलोनी पंथाचा एकेसाइट, हेमिरोबॅप्टिस्ट व मँडिअन या दुसऱ्या पंथांशीं उघड उघड संबंध असल्यामुळें व त्यांत ख्रिस्ती संप्रदायांतीलहि अनेक गोष्टींचा अंतर्भाव झाला असल्यामुळें मणीला लहान वयांतच निरनिराळ्या पंथांच्या स्वरूपांची ओळख झाली. वयाच्या पंचविसाव्या किंवा तिसाव्या वर्षी त्यानें आपल्या नवीन संप्रदायाच्या उपदेशास सुरुवात केली. इराणचा राजा पहिला शापूर याच्या दरबारींच प्रथम ही सुरुवात झाली. आपल्या धर्मप्रसारार्थ त्यानें स्वतः दूरदूरचे प्रवास केले व आपल्या शिष्यांसहि देशपर्यटनार्थ पाठविलें. अक्टा अर्चेलाईवरून त्याची चळवळ पश्चिमेकडे ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रदेशांपर्यंत जाऊन पोहोंचलेली दिसते. पूर्वेकडील ग्रंथ वगैरेवरून जी माहिती मिळते तीवरून तो ट्रॅन्स ऑक्झोनिया, पश्चिम चीन या प्रदेशांत व दक्षिणेकडे हिंदुस्थानपर्यंत

आला होता असें सिद्ध होतें. ही त्याची मोहीम यशस्वी झाली. त्याच्यामागून झालेल्या महंमद पैगंबराप्रमाणें तोहि मी शेवटचा व श्रेष्ठ पैगंबर आहें, मला ईश्वरानें सर्वश्रेष्ठ धर्मसंस्थापना करण्याकरितां धाडिलें आहे, वगैरे सांगत फिरे. पहिल्या शापूरच्या कारकीर्दीच्या शेवटीं (इ. स. २७०) तो इराणच्या दरबारीं परत आला. तेथें त्याचे पुष्कळ भक्त होते. पण मगी पुरोहितवर्गाचें त्याच्याशीं हाडवैर होतें. या पुरोहितांनीं राजाशीं संधान बांधून त्याला कैद केलें. तथापि तो कैदेंतून पळाला. पहिल्या बहिरामनें त्याला धर्मवेड्या मगी लोकांच्या स्वाधीन केलें. इ. स. २७६–२७७ त त्याला सुळावर चढवून ठार मारण्यांत येऊन त्याच्या अनुयायांचा निष्ठुरपणानें छळ करण्यांत आला.

इसवी सनाच्या चौथ्या शतकांत ख्रिस्ती व मिथ्र संप्रदाय यांच्या झगड्यांत मणिसंप्रदायाचा उदय झाला. या संप्रदायांतील तत्त्वांत जगांत नेहमीं दिसून येणाऱ्या विरोधांची उपपत्ति लावलेली आहे. मणीच्या तत्त्वाप्रमाणें प्रकाश व तिमिर या दोन वस्तूंचें जग बनलें आहे व या दोहोंत अव्याहत लढा चालू आहे. मणिसंप्रदायांत प्रकाशतत्त्वाला आचारांत विशेष महत्त्व असे; तथापि प्रापंचिकांना बरीच सोडवणूक ठेवली होती. मणिसंप्रदायाची उभारणी अवेस्तापंथावर केली होती, व ख्रिस्ती धर्मसंप्रदायाशींहि त्याचा धागा लागतो. बौद्ध संप्रदायाचें ज्ञान मणीला असून त्यांतील बरींच तत्त्वें त्यानें आपल्या संप्रदायांत उद्धृत केलीं आहेत. शिस्त, सोईस्करपणा, सुज्ञपणा व जुन्यांशीं सांगड या योगानें हा संप्रदाय जलद प्रसार पावला. पूर्वेकडे हिंदुस्थान–चीनपर्यंत, पश्चिमेकडे रोमन राज्य व उत्तर आफ्रिका येथवर हा संप्रदाय पसरला. ख्रिस्ती धर्माशीं त्यानें निकट संबंध जोडला होता. तेराव्या शतकांत हा पंथ लयास गेला.

**मणिहार, मणियार**—एक जात. यांची सर्वांत अधिक वस्ती उत्तर प्रदेशांत (सं. प्रांतांत) (७५,०००) आहे. एकूण लो. सं. सुमारें ९५,००० आहे. हे मुसलमान लोक मणी, बांगड्या, कागद, लखोटे, साबू, लहान आरसे व पेट्या, टिकल्या, वगैरे जिन्नस विकत फिरतात. यांची आतां एक निराळी जात बनली आहे. बऱ्याच हिंदु चाली यांच्यांत कायम आहेत. विधवेला धाकट्या दिराबरोबर लग्न करतां येतें. प्रेतें उत्तरेकडे डोकें करून पुरतात. हे लोक डुकराचें व गाईचें मांस सोडून इतर सर्व प्रकारचें मांस खातात. हे लोक कोणासहि जातींत घेतात.

**मण्यार**—ही सापाची जात लहान असून विषारी असते. मण्यारीचा वर्ण किंचित् पिंगट असतो. अंगावर पांढरे पट्टे असून ते सर्व अंगभर असतात. या सापाची लांबी सुमारें तीन ते चार फूट असते.

**मताधिकार**—कोणत्याहि कामांत मत देण्याचा हक्क याला सामान्यतः 'सफ्रेज' म्हणतां येईल, पण हा शब्द राज्यकारभार करणाऱ्या संस्थांच्या प्रतिनिधींची निवड करण्यांत मत देण्याचा हक्क, या अर्थानें रूढ झाला आहे. १९१८ सालीं इंग्लंडांत 'रिप्रेझेंटेशन ऑफ दि पीपल ॲक्ट' मान्य झाला, व त्या कायद्यानें ब्रिटनमध्यें मताधिकार फार विस्तृत प्रमाणांत सज्ञान प्रजाजनांना (ॲडल्ट सफ्रेज) देण्यांत आला, व त्यांत स्त्रियांना मताधिकार मिळाला.

हिंदुस्थान देशांत ब्रिटिश सरकारनें जेव्हां विधिमंडळांत सभासद निवडून देण्याचा हक्क लोकांना दिला तेव्हां मताधिकार विशिष्ट रकमेचा शेतसारा, प्राप्तीवरील कर, विशिष्ट जात व संघ, यांवर अवलंबून ठेवला होता. स्थानिक स्वराज्यांत मताधिकार शेतसारा व घरभाडें यांवर अवलंबून आहे. आतां नवीन लोकराज्याची जी घटना झाली आहे तींत सर्व सज्ञान्यांना मताधिकार देण्यांत आला आहे. पण हा सुधारणेचा फार मोठा टप्पा एकदम गांठण्यांत आला. हिंदुस्थानांत साक्षरता फारच कमी असल्यानें या मताधिकाराचा उपयोग स्वतंत्र बुद्धीनें कितपत केला जाईल याची शंका वाटते.

**मंत्र**—मंत्रांचा मूळ अर्थ वेदकालीन ऋषींचे उद्गार, त्यांनीं रचलेल्या ऋचा, सूत्रें, सारणी, इ. होई. वेदादिकांना मंत्रवाङ्मय म्हणतात. पुढे पुढें वैदिक मंत्रांचा उपयोग प्रकृतीवर किंवा शरीरावर परिणाम करण्यासाठीं होऊं लागला. अशा मंत्रांच्या प्रभावावर पूर्ण विश्वास बहुतेक सर्व असंस्कृत जातींतून असतो. सुधारलेल्या वर्गांतलि पुष्कळ लोकहि सापाचा, विंचवाचा, कुत्र्याच्या विषावरचा, इ. मंत्रांवर विश्वास ठेवणारे सांपडतील. अथर्ववेदांत देखील असे कित्येक जारणमारण मंत्र आहेत. प्राचीन काळीं असीरियांतील मगी मांत्रिक या कामीं प्रसिद्ध होते. 'मगी' शब्दापासूनच इंग्रजी 'मॅजिक' हा शब्द जादू या अर्थी निघाला आहे. 'ओडिसी' या महाकाव्यांत रोगनिवारणाचें गीत आहे. इंग्लंडांत आज देखील मंत्रांनीं रोग बरे करून घेण्याचा प्रयत्न कांहीं आशिक्षितांमध्यें आढळेल. ॲंग्लो–सॅक्सन काळापासून ही प्रथा आहे. आपल्याकडील योगी अशा मंत्रांनीं पुष्कळ चमत्कार करून दाखवितात व मंत्रसामर्थ्य आहे असें पटवून देतात. शाक्त पंथांत अक्षरमंत्राचा जप करण्यांत येत असतो.

**मंत्रिमंडळ**—(कॅबिनेट). ब्रिटनमध्यें सरकारी अमलबजावणीची सत्ता (एक्झीक्यूटिव्ह गव्हर्नमेंट) कायदेशीरदृष्ट्या राजाच्या हातीं आहे, तरी प्रत्यक्षतः ही सत्ता मंत्र्यांच्या समितीकडे आहे; व या मंत्र्यांच्या समितीला 'कॅबिनेट' म्हणतात. या कॅबिनेटमध्यें फर्स्ट लॉर्ड ऑफ ट्रेझरी (प्राइम मिनिस्टर

बहुधा हाच असतो ), दि लॉर्ड चान्सलर, लॉर्ड प्रेसिडेंट ऑफ दि कौन्सिल, चान्सलर ऑफ एक्स्चेकर व फर्स्ट लॉर्ड ऑफ अॅडमिरॅल्टी हे पांच मंत्री आणि पांच सेक्रेटरी ऑफ स्टेट असे दहा इसम असतात. यांशिवाय आणखी कित्येक सुमारें दहापर्यंत मंत्री कॅबिनेटमध्यें असतात, व ते पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांतील सभासदांतून निवडून घेतलेले असतात. सामान्यतः हे सर्व मंत्री पार्लमेंटांतील बहुमतवाल्या राजकीय पक्षांतील असतात. मंत्रिमंडळाच्या बैठकी गुप्तपणें होतात, व त्या सभांच्या वृत्तांत लिहून ठेवीत नाहींत. ब्रिटिश राज्यघटनेचा 'कॅबिनेट' हा आवश्यक भाग आहे, पण त्याबद्दल पार्लमेंटनें कायदा केलेला नाहीं. ३ ऱ्या विल्यम राजाच्या कारकीर्दीपासून कॅबिनेटला हल्लींचें व्यवस्थित स्वरूप प्राप्त होऊं लागलें. प्रीव्हि कौन्सिल फार जुनें म्हणजे नॉर्मन राजांच्या कारकीर्दीपासून मूळ आढळून येतें. कॅबिनेट हें प्रीव्हि कौन्सिलपेक्षां सभासदांच्या संख्येनें लहान पण अधिक सत्ताधारी असतें. राजाचे सर्व अधिकार कॅबिनेटला असतात. कॅबिनेटमधील खलबताची सभासदाला स्वतंत्र रीतीनें वाच्यता करण्याची सक्त मनाई आहे. कॅबिनेटच्या सभेला राजा कधींहि हजर नसतो. कॅबिनेटमध्यें जें ठरेल तें मुख्य प्रधान राजाच्या संमतीकरितां राजापुढें मांडतो. कॅबिनेटमध्यें जें ठरेल त्याला सर्व सभासद व्यक्तिशः व समुच्चयानें जबाबदार असतात. कोणा सभासदाला कॅबिनेटचें धोरण उघड करणें असल्यास कॅबिनेटचा राजीनामा देऊन बाहेर पडावें लागतें. कॅबिनेटनें राजीनामा दिल्यास राजा कोणत्याहि योग्य माणसाला प्रधानमंडळ बनवण्याचा हुकूम देतो, व तो इतर मंत्र्यांची निवड करतो. कॅबिनेटच्या सभासदांची संख्या निश्चित ठरलेली नाहीं; पण साधारणतः १५ ते २५ पर्यंत सभासद असतात. या वाढलेल्या स्वरूपाच्या कॅबिनेटला 'मिनिस्ट्री' ( मंत्रिमंडळ किंवा प्रधानमंडळ ) म्हणतात. तथापि विशेष प्रसंगीं विशिष्ट कामाकरितां पांच सभासदांचें कॅबिनेट बनवण्यांत येतें. उदाहरणार्थ, पहिल्या महायुद्धाच्या वेळीं लॉइड जॉर्जनें 'वॉर कॅबिनेट' पांच सभासदांचें बनविलें होतें. दुसऱ्या महायुद्धांत चर्चिलनें आठ मंत्री यांत घेतले होते.

ब्रिटिश राज्यपद्धतीच्या धर्तीवर चाललेल्या वसाहतींच्या व स्वतंत्र राष्ट्रांच्या राज्यशासनांत ही कॅबिनेट पद्धति अवलंबिण्यांत आलेली आहे. अष्टप्रधान ( पाहा ) पद्धति याहून वेगळी आहे.

**मंत्री**—शिवाजीच्या अष्टप्रधानांतील मंत्री हा एक होय. यास वाकनीस अशीहि संज्ञा आहे. याजकडे खाजगीची व्यवस्था असे. याच्या ताब्यांत अठरा कारखाने, बारा महाल, हुजूरपागा व जिलबीचें पायदळ, इतक्यांचा कारभार असून खाजगीकडील दप्तर व पत्रव्यवहारहि याच्याच ताब्यांत होता. तसेंच भोजनाची तजवीज, आमंत्रणें करणें, इत्यादि कामें याजकडेच होतीं. राजपत्रावर 'संमत मंत्री' व 'बार' असे शेरे यानें करावयाचे असत. १६४७ सालीं गंगू मंगाजी या नांवाच्या गृहस्थास शिवाजीनें वाकनीस हें पद दिलें. १६६४ सालीं गंगू मंगाजीवर इतराजी होऊन दत्ताजी तिमल नांवाचा एक हुशार कारकून पागेकडे होता, त्याजला वाकनिशीचें काम सांगितलें. राज्याभिषेकाच्या वेळेस या हुद्याचें नांव मंत्री असें ठेवण्यांत आलें. दत्ताजीनें हें काम शाहू गादीवर येईपर्यंत केलें. शाहूनें नारो राम शेणव्याला १७१३ सालीं मंत्री नेमिलें. तेव्हांपासून त्याच्याच घराण्यांत तें पद चाललें. हल्लीं यांचें घराणें सातारा जिल्ह्यांत वांगणी या गांवीं आहे. छत्रपतींच्या सिंहासनाच्या उजव्या बाजूस बसण्याचा मंत्र्याचा मान असे.

**मत्स्यपुराण**—अठरा पुराणांतील एक प्राचीन पुराण. यांत सुमारें पंधरा हजार श्लोक आहेत. प्रारंभीं विष्णूनें मत्स्यावतार कां घेतला याबद्दलची कथा निरूपिली आहे. इतर पुराणांप्रमाणेंच यांतहि सृष्टयुत्पत्ति व निरनिराळे प्राचीन राजवंश यांची माहिती दिली आहे. कायदा व नीतिशास्त्र यांच्याविषयींचा या पुराणांत विचार केला असून घरें बांधणें, देवांच्या मूर्ती बनविणें, वगैरे शिल्पविषयक माहिती यांत सांपडते. कांहीं तीर्थांचीं माहात्म्यें आहेत. प्रसिद्ध भारतीय इतिहासकार व्हि. स्मिथ याच्या मताप्रमाणें यांतील आंध्र राजवंशावली विश्वसनीय आहेत.

**मत्स्यराज्य**—प्राचीन काळीं मत्स्यदेश होता. त्याचा ब्रह्मर्षि देश असा मनूनें उल्लेख केला आहे. हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर संस्थानांचें जें विलीनीकरण किंवा संघीकरण झालें त्यांत भरतपूर, अलवार, धौलपूर व करौली या चार संस्थानांच्या गटाला 'मत्स्यराज्य' असें नांव देण्यांत आलें आहे. या राज्याचा विस्तार ७६०० चौ. मै. असून उत्पन्न १८० लक्ष रुपये होईल. लोकसंख्या सुमारें १८ लक्ष भरते. हें राज्य १७ मार्च १९४८ रोजीं रीतसर स्थापण्यांत आलें. धौलपूरचे महाराज राजप्रमुख असून अलवारचे उपराजप्रमुख होते. नंतर हें बृहद्राजस्थानांत सामील करण्यांत आलें.

**मत्स्यविज्ञान**—( इक्थिऑलॉजी ). या शास्त्रामध्यें मत्स्यांच्या निरनिराळ्या जातींचा अभ्यास करण्यांत येतो. मत्स्य हे सपृष्ठवंश प्राण्यांतील जबडा असणारे सर्वांत खालच्या जातीचे प्राणी आहेत. यांचे पुढें दिल्याप्रमाणें वर्ग पाडण्यांत येतात :

१ कूर्चमत्स्य (ॲस्मोब्रँची)—यांचे खवले कंटकयुक्त पातळ तुकड्यांचे असून त्यांची रचना दातांसारखी दिसते. यांची शेपटी द्विखंड असून तिचे दोन्ही भाग सारखे नसतात. तोंड डोक्याच्या खालच्या बाजूस असतें. यांच्या कल्ल्यांचीं तोंडें बहुतेक बाहेरच्या बाजूस असून त्यांच्यावर आवरण नसतें. यांस वर

येण्याकरितां हवेच्या पिशव्या नसतात. या वर्गोतील कांहीं जाती पिल्लें घालतात. परंतु बहुतेक जाती अंडीं घालतात. व तीं शृंगमय पिशव्यांमध्यें असतात. व तीं त्या पिशवींतच उबतात. यांच्या अनेक पोटजाती आहेत, त्यांत शार्क, श्वमत्स्य, व्याघ्रमत्स्य, वगैरे येतात. करवती मासा, टॉर्पेडो मासा, वगैरेहि याच वर्गातील दुसऱ्या जाती आहेत.

२ स्थूलशीर्षमत्स्य (होलोसेफॅली)—हा एक वरील वर्गासारखाच लहानसा वर्ग असून यांचा शरीराचा सांगाडा मात्र थोडा निराळा असतो. यांच्या शरीरावर बहुतेक खवले नसतात. परंतु पाठीवरील पहिल्या पंखाच्या पुढच्या बाजूस मजबूत कणा असतो. यांच्या कल्ल्यावर अंतस्त्वचामय आवरण असतें.

३ अस्थिमत्स्य (टेलिओस्टोमी)—यांस पृष्ठभागावर येण्याकरितां हवेची पिशवी असते आणि यांचें तोंड निमुळतें होत गेलेलें असतें. यांच्या कल्ल्यावर आवरण असतें, व त्यास अस्थींचा आधार असतो. या वर्गात स्टर्जन, सालमन, कॉड, वगैरे मासे येतात.

४ फुफ्फुसमत्स्य (डिप्नोई)—हे गोड्या पाण्यांत राहणारे असून यांचें शरीर अस्थिमय असतें. हे श्वासोच्छ्वासाकरितां हवेच्या पिशवीचा उपयोग करतात. यांच्या जाती आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व अमेरिका येथें आढळतात.

**मत्स्येंद्रनाथ**—भागवतांत (कवि, हरि, अंतरिक्ष, नारायण, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस व करभाजन या) ज्या नऊ योग्यांचें वर्णन आलें आहे, त्यांचे प्रसिद्ध (मत्स्येंद्र, गोरक्ष, जालंदर, कानिफा, चर्पट, नागेश, भरत, रेवण व गहिनी हे) नऊ नाथ हे अवतार होत, अशी समजूत आहे. त्यांपैकीं मत्स्येंद्र हा पहिला व प्रसिद्ध नाथपंथप्रवर्तक होय. बद्रिकाश्रमीं दत्तानें त्याला योगमार्गाचा उपदेश केला. नंतर तपाचरण व तीर्थाटण करून यानें गोरक्षास मुख्य शिष्य बनविलें. पुढें बंगाल्यांतील स्त्रीराज्यांत मत्स्येंद्र लोभाविष्ट होऊन राहिला असतां गोरक्षानें त्याची तेथून सुटका केली. मत्स्येंद्राला त्या राज्यांतील राणीपासून मीननाथ नांवाचा पुत्र झाला. नंतर मत्स्येंद्रानें सातारा जिल्ह्यांतील मत्स्येंद्रगड येथें चैत्र वद्य पंचमीला समाधि घेतली (इ. स. १२१० चा सुमार). कृष्णाकांठच्या जोंधळ्यास मच्छिंदरी शाळू म्हणतात. मत्स्येंद्रास विष्णूचाहि अवतार समजतात. योगमार्गावर याचा 'मत्स्येंद्रसंहिता' म्हणून एक ग्रंथ आहे. यानें हठयोग व शाबरी मंत्रतंत्रविद्या यांचा प्रसार केला.

**मंथरा**—दशरथ राजाची स्त्री कैकेयी हिची कुबडी दासी. रामचंद्रास यौवराज्याचा अभिषेक होण्याचें घाटत असतां हिनें कैकेयीस चिथावून भरतास यौवराज्यपद मिळावें असें राजापाशीं मागण्यास सांगितलें. यामुळें रामाला वनवासास जावें लागलें. कृष्णावतारीं ही कुब्जा झाली.

**मथाई, डॉ. जॉन** (१८८६- )—एक प्रसिद्ध हिंदी अर्थशास्त्रज्ञ. मद्रास ख्रिश्चन कॉलेज, लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स व बेलिओल कॉलेज (ऑक्सफर्ड) येथें यांचें शिक्षण झालें. हे बी. एल्., डी. लिट्. व डी. एस्सी. आहेत. शिक्षणानंतर कांहीं काल मद्रास हायकोर्टमध्यें यांनीं वकिली केली व नंतर यांना मद्रास को-ऑपरेटिव्ह डिपार्टमेंटमध्यें नेमण्यांत आलें. सन १९२०-२५ या कालांत मद्रास युनिव्हर्सिटीचे अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणूनहि यांनीं काम केलें. सन १९२५-३१ या मुदतींत इंडियन टॅरिफ बोर्डाचे हे सभासद व अध्यक्ष झाले. पुढें सन १९३५-४० पर्यंत हिंदुस्थान सरकारनें यांना कमर्शिअल इंटेलिजन्स व स्टॅटिस्टिक्स या खात्याचे डायरेक्टर जनरल या हुद्यावर नेमलें. तेथून निवृत्त होतांच टाटा सन्स लि. कडून यांना पाचारण आलें व हे टाटा केमिकल्स लि. चे प्रमुख झाले. सन १९३७ सालीं आग्रा येथें भरलेल्या इंडियन इकॉनॉमिक कॉन्फरन्सच्या विसाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना लाभला.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील ग्रामराज्य, दारूबंदी व अबकारी, हिंदुस्थानांतील कृषिसहकार, वगैरे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत. त्रिमंत्रियोजनेनुसार तयार झालेल्या व्हाइसरॉयच्या हंगामी कार्यकारी मंडळांत व्यापारमंत्री म्हणून यांनाच निवडण्यांत आलें होतें; ते नंतर १९५० पर्यंत हिंदुस्थान सरकारचे फडणीस होते.

**मथुरा**—संयुक्त प्रांत (उत्तर प्रदेश), आग्रा विभागांतील वायव्येकडील जिल्हा. क्षे. फ. १४४७ चौ. मैल. व लो. सं. (१९४१) ८,०६,९९२. पाऊस सरासरी २६ इंच पडतो. मथुरा पूर्वी शूरसेनाची राजधानी होती. येथील फार जुन्या नाण्यावरून येथें ख्रिस्ती शकापूर्वी १०० वर्षांपासून हिंदु राजे राज्य करीत होते असें दिसतें. त्यानंतर शक-सत्रप राजे येथें राज्य करीत होते. मोंगल अमदानींत औरंगजेबानें येथें धर्मभ्रष्टता आरंभिली होती. पानपतच्या युद्धानंतर सुरजमल्ल जाटाच्या घराण्याकडे मथुरा राहिली. १८०२ च्या सुमारास बहुतेक जिल्हा इंग्रजांकडे गेला. या जिल्ह्यांत वृंदावन, महावन, गोवर्धन, वगैरे प्रेक्षणीय स्थळें आहेत. कंकाली येथील जैन स्तूपावरून कुशान राजांची बरीच हकीकत कळते. येथें शें. ८९ हिंदू आहेत. मुख्य पिकें ज्वारी, जव, हरभरा, गहूं, बाजरी, ऊंस, तंबाखू, वगैरे होत. येथें कापडावर छापील काम चांगलें होतें. दगडी इमारती बांधणारे फार कुशल कारागीर आहेत.

चादीचीं चित्रविचित्र खेळणीं होतात. थोडासा नीळहि उत्पन्न होतो.

शहर—जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें अत्यंत प्राचीन शहर यमुना नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलें असून आग्र्याहून दिल्लीला जाणाऱ्या वाटेवर आहे. वराहमिहिर, टॉलेमी, प्लिनी, वगैरेंनीं याचा उल्लेख केला आहे. लो. सं. ७६,७१६. हें शहर सप्त पवित्र पुरींपैकीं एक असून श्रीकृष्णाचें जन्मस्थान म्हणून फार प्रसिद्ध आहे. कृष्णकथांतून याचे उल्लेख येतात. रावणाची बहीण कुंभीनसी हिचा नवरा मधु यानें हें शहर वसविलें असें म्हणतात, म्हणून याला मधुपुर असेंहि नांव आहे. ही कंसाची राजधानी होती. बौद्धकालीन अवशेष येथें दिसतात. १०१७ मध्यें गझनीच्या महमदानें यावर स्वारी केली. नंतर १५०० मध्यें शिकंदर लोदीनें हें उध्वस्त केलें. १७८९ सालीं महादजी शिंद्यानें या क्षेत्राची सनद मोंगल बादशहापासून मिळविली होती. स. १८०३ त हें ब्रिटिशांकडे गेलें. येथील मंदिरें फार प्रेक्षणीय असून त्यांचे दरवाजे वगैरे बरेच शृंगारलेले असतात. एका घाटावर जयपूरच्या राणीचें 'सती बुरूज' नांवाचें स्मारक आहे. येथें मुख्यत्वेंकरून जमाखर्ची वह्यांचा कागद व पितळी मूर्ती फार तयार होतात. मथुरेपासून सहा मैलांवर महावन आहे; जवळच गोकुळ आहे. या ठिकाणीं कृष्णलीलांचीं स्थानें दाखविण्यांत येतात. मथुरेच्या उत्तरेस पांच मैलांवर प्रसिद्ध वृंदावन क्षेत्र आहे.

येथील पुराणवस्तुप्रदर्शन पाहण्यासारखें आहे. त्यांत कुशानवंशी राजांचे पुतळे आहेत. व इतर कित्येक महत्त्वाचे ऐतिहासिक अवशेष आहेत.

**मॅथ्यू (संत)**—ख्रिस्ती धर्माचा शुभवर्तमानलेखक (इव्हॅंजलिस्ट), जीझस ख्राइस्टचा एक प्रेषित (ॲपोसल), व आल्फेअसचा मुलगा. तो नाझारेथचा मूळ रहिवासी होता, असें दंतकथेवरून दिसतें. ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यापूर्वी हा रोमन साम्राज्यांत मोठ्या हुद्यावर होता. त्याचें शुभवर्तमान (गॉस्पेल) जीझस ख्राइस्ट हा अपेक्षित अभिषिक्त (मेसाया) आहे, हें सिद्ध करण्याच्या मुख्य उद्देशानें लिहिलेलें आहे. पंधरा वर्षें जेरुसलेममध्यें प्रचार केल्यानंतर तो एथिओपिआ, मॅसिडोनिआ, इराण व सिरिया या देशांत फिरला व शेवटीं इराणमध्यें त्याला हुतात्मा व्हावें लागलें.

**मदनपल्ली**—मद्रास, चित्तूर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ८३६ चौरस मैल व लो. सं. सु. दीड लाख. खेडीं ९९ आहेत. तालुक्यांतून पापघ्नी व बहुदा या दोन मोठ्या नद्या वाहत जातात. तालुक्याचा बराच भाग डोंगराळ आहे. मदनपल्ली हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. त्याची लो. सं. सुमारें १८०००. हें शहर फार रमणीय असून चोहों बाजूंनीं डोंगरी रांगा व हिरवेंगार जंगल आहे.

**मदनपाल**—१. (१४ वें शतक, उत्तरार्ध)—हा टाकवंशांतील राजा दिल्लीच्या उत्तरेस यमुना नदीच्या तीरावरील काष्ठा अथवा काढा नांवाच्या शहरावर राज्य करीत होता. 'मदनपाल विनोद निघण्टु' हा वैद्यककोश त्यानेंच लिहिला. आनंदसंजीवन, तिथिनिर्णयसागर, शूद्रधर्मबोधिनी, स्मृतिकौमुदी, वगैरे त्याच्या अमदानींत झालेले ग्रंथहि त्याचेच समजतात. त्यानें 'मदनपारिजात' नांवाच्या ग्रंथाचा कर्ता विश्वेश्वरभट्ट याला आपल्या आश्रयाखालीं ठेविलें होतें.

२. (राज्य. ११४२-६१)—बंगालमधील एक पालराजा. हा रामपालाचा मुलगा. हा बौद्ध धर्मी होता तरी हिंदु धर्मास उत्तेजन देई. याच्या पत्नीनें महाभारत ऐकून एका ब्राह्मणास एक गांव दान दिल्याचा उल्लेख आहे. रामावती ही याची राजधानी. याच्या वेळेपासून पाल घराण्याला उतरती कळा लागली.

**मदनसिंग**—छत्रपति संभाजी याचा दासीपुत्र. हा तीस वर्षें मोंगल बादशहाच्या कैदेंत होता. बाळाजी विश्वनाथ दिल्लीस गेला तेव्हां हा सुटला (१७१९).

**मंदर**—या पर्वताचें वर्णन पुराणांतून आलेलें आहे. समुद्रमंथनाच्या वेळीं हाच पर्वत घुसळण्याची रवी म्हणून वापरला होता. हा पर्वत भागलपूर जिल्ह्यांतील बोसीजवळच्या मोठ्या मैदानांत आहे. याच्याभोंवतीं पुष्कळ तलाव, पडक्या इमारती, दगडी पुतळे, वगैरे आहेत. याजवळ एक शहर असून तें चोळ राजाची राजधानी होतें असें सांगतात.

**मंदार**—मांदार. यास रुईमांदार असेंहि म्हणतात. हें एक सरळ पसरणारें व पुष्कळ वर्षें टिकणारें झुडूप असून उष्ण कटिबंधांत उष्ण परंतु ओलसर ठिकाणीं सांपडतें. हिंदुस्थानांत हें विशेषकरून बंगाल, आसाम, व दक्षिण हिंदुस्थान यांत होत असून सिलोन, सिंगापूर, मलाया यांत व चीन देशांतहि आढळतें. याची दुसरी एक जात आहे; ती रुक्ष भागांत वाढते. या झाडाच्या पांढऱ्या चिकापासून गटापर्चा, सालीपासून मजबूत वाक, बियांपासून उपयोगी पडण्यासारखा कापूस व मुळीच्या सालीपासून औषधें तयार करतात. वातशूळावर मुळाचें चूर्ण दुधाशीं देतात.

**मदारी मेहतर फरास**—शिवाजीचा एकनिष्ठ मुसलमान सेवक. शिवाजीस आग्र्याहून आपली सुटका करून घेण्याच्या कामीं याची बहुमोल मदत झाली. याच्या स्वामिनिष्ठेवर खुप होऊन शिवाजीनें यास बहुमोल अलंकार, पोशाख, एक वंशपरंपरा हक्क (राज्याभिषेकाच्या वेळीं सिंहासनावरील वस्त्रें

घेण्याचा ) दिला. सादुल्ला फरास या नांवाचा यास एक मुलगा होता. याचे वंशज शेवटपर्यंत भोसले राजांजे फरास होते.

**मदिना**—हें सौदी अरबस्तानांतील एक शहर असून याला अल् मदिना अथवा मदिना रसुलअल्ला अशीं दुसरीं नांवें आहेत. हें मक्केहून २४० मैलांवर आहे. हे मक्केच्या खालोखाल मुसलमानांचें धर्मक्षेत्र आहे. मदिना हें गांव कुराणांत सांपडतें. जवळच महमद पैगंबराचा चुलता हमजा याची कबर आहे. मदिनाची शहर व आसमंतांतील खेडीं मिळून एकंदर लो. सं. तीस हजारापर्यंत आहे. मुख्य शहराभोंवतीं दगडी कोट आहे. मदिना शहराचें भूषण म्हणजे महमद पैगंबराची कबर होय. ही कबर शहराच्या पूर्व भागांत असून हिचे मनोरे व भव्य घुमट प्रेक्षणीय आहेत. या कबरीभोंवतीं पितळेच्या तारेचें कुंपण आहे. महमद मादिना येथें आल्यापासून मदिना शहराचें ऐतिहासिक रीत्या अतिशय महत्त्व वाढलें. ही पैगंबराची मशीद मागें कित्येकदां जळाली व पुन्हां दुरुस्त केली गेली. महमदाच्या मशिदीखेरीज येथें बरींच ऐतिहासिक स्थळें आहेत. महमदाची मुलगी फतिमा व त्याच्या पुढचे दोन पैगंबर यांच्या मशिदी येथेंच आहेत. येथें मुसलमानांची वस्ती होण्यापूर्वी ज्यू लोक राहत होते. त्यांच्या वस्तीचे अवशेष येथें बरेच दिसतात. पहिल्या महायुद्धामध्यें १९१६ सालीं अरब लोकांनीं मदिनाला वेढा दिला. हा वेढा जवळजवळ तीन वर्षें चालून शेवटीं १९१९ सालीं तुर्कांचा पराजय झाला व तुर्कांनीं मदिना अरबांच्या स्वाधीन केलें.

**मदीरा बेटें**—हा ॲटलांटिक महासागरांतील पोर्तुगीज द्वीपसमूह आफ्रिकेच्या किनाऱ्यानजीक आहे. यांत मदीरा व पोर्टो सॅन्टो हीं दोन बेटें प्रमुख आहेत. या द्वीपसमूहाचें क्षे. फ. ३१४ चौ. मैल आणि लो. सं. १,८०,००० आहे. मदीरा बेट सुमारें ३५ मैल लांब आणि १२ मैल रुंद आहे. ज्वालामुखीच्या स्फोटामुळें बनलेलें हें बेट असून तें डोंगराळ आहे. येथील हवा सौम्य असल्यामुळें युरोपियन लोकांचें हें बेट आरोग्यनिवासस्थान बनलें आहे. या बेटाच्या उत्तर भागांत कालवे काढलेले असून तेथें अन्नधान्यें व फळफळावळ होते. विशेषतः नारिंगें, केळीं, लिंबें व इतर अनेक जातींचीं फळें व कॉफी येथें विपुल होते. मदीरा येथील दारू विशेष चवदार असल्याबद्दल प्रसिद्ध आहे. येथून साखर, द्राक्षें, दारू, आरारूट व कलाबतू परदेशांत जातात. फंकल ही राजधानी दक्षिण किनाऱ्यावर आहे. पोर्टो सॅटो येथें पाणी दुर्मिळ आहे. मदीरा येथें पोर्तुगीजांनीं १४१९ सालीं वसाहत केली, पण हें बेट १५८० ते १६४० पर्यंत स्पेनच्या ताब्यांत होतें आणि पुढें १८०७ पासून १८१४ पर्यंत ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत होतें.

**मदुरा**—मद्रास इलाख्यांतील पूर्व किनाऱ्यावरचा एक जिल्हा. याचें क्षे. फ. ४,८८३ चौरस मैल आहे. पावसाचें मान २६ पासून ३६ इंच असतें. पळणी येथें जें पुरातन अवशेष आढळतात त्यांवरून पांड्य राजे राज्य करीत असतां ग्रीक व रोमन लोकांचा पांड्यांच्या फौजेंत पुष्कळ भरणा होता असें दिसतें. बौद्धांचीं नाणींहि बरींच आढळल्यावरून बौद्धधर्माचा प्रसार पांड्यांच्या वेळेस होता असें म्हणावयास हरकत नाहीं. मदुरा येथील प्रसिद्ध शिवालय, त्रिमल नाइकाचा वाडा व रामेश्वराचें भव्य मंदिर हीं प्रेक्षणीय आहेत. मदुरा जिल्ह्यांत ११ शहरें असून १०९७ खेडीं आहेत. लो. सं. ( १९४१ ) २४,४६,६०१. दिंदिगल तालुक्यांतील तंबाखूची प्रसिद्धि आहे. पळणी उतरणीवर कॉफीची लागवड आहे. तलावांची संख्या ४०८१ असून एवढी संख्या मद्रास इलाख्यांत इतर कोठेंहि नाहीं. मेलूर तालुक्यांत कोटमपट्टी येथें उत्तम प्रकारचें लोखंड सांपडतें. दिंदिगल परगण्यांत वैगाय नदींत सुवर्णमिश्रित वाळू सांपडते. समुद्रकिनाऱ्यावर सूर्याच्या उष्णतेनें समुद्राच्या पाण्याचें मीठ अनायासें तयार होतें. तिरुचुळू तहशिलींत पेन्सिलीचे व चुनखडीचे दगड सांपडतात. रामनाड जमीनदारींत लाल स्फटिक दगडाची खाण असून देवालयांतील मोठमोठे खांब याचेच करण्याची चाल आहे. पवम बेटांत पोंवळीं पुष्कळ सांपडतात. मदुरा जिल्ह्यांत मुख्यतः रेशमी कापड होतें. दिंदिगल येथील विणकामाची अशीच प्रसिद्धि होती. मेलूर, दिंदिगल व पळणी या तालुक्यांतून बायका घोंगड्या विणतात. चामडें रंगविण्याचेहि कारखाने लहान प्रमाणावर असून तांब्या-पितळेचीं स्वयंपाकाचीं भांडीं व दिवे सण्ण मदुरे व दिंदिगल येथें चांगलीं तयार होतात.

शहर—हें वैगाय नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर असून साउथ इंडियन रेल्वेचें मोठें स्टेशन आहे. येथील लो. सं. ( १९४१ ) २,३९,१४४ असून हें मद्रास इलाख्यांत दुसरें मोठें शहर आहे. मुसलमानांनीं उत्तरेकडून वारंवार हल्ले करून शहराची बरीच नासधूस केली, पण या अरिष्टांतून सुंदरेश्वराचें व मीनाक्षीचें देऊळ मात्र वांचलें. त्रिमल नायकाचा वाडा हा मद्रास इलाख्यांतील शिल्पशास्त्राचा एक उत्कृष्ट नमुना आहे. मदुरा कॉलेज व अमेरिकन कॉलेज अशीं दोन कॉलेजें आहेत.

मदुरेला 'पूर्वेकडील अथेन्स' असें पाश्चात्य प्रवासी म्हणतात तें अगदीं योग्य आहे. 'जो या जन्मांत मदुरा पाहत नाहीं तो पुढील जन्मीं गाढव होतो,' अशी एक तामिळ म्हण आहे. म्हणजे हें ठिकाण अत्यंत प्रेक्षणीय आहे. येथील देवळांचें शिल्पकाम फार भव्य व सुंदर आहे. येथील सुंदरेश्वर ( शिव ) व मीनाक्षी ( पार्वती ) यांचीं देवालयें महत्त्वाचीं आहेत व तीं

तिरुमल नायकाच्या राजवाड्यांत आहेत. देवळांभोंवतीं फार उंच कोट असून त्यांत नऊ गोपुरें आहेत. सर्वांत मोठें गोपुर १५२ फूट उंच आहे. सभामंडप एक हजार खांबांचा आहे. आंत जातांच माणूस भांबावून जातो. या देवळांना फार मोठें उत्पन्न आहे; तेव्हां त्यांची व्यवस्था सरकारमार्फत ठेवली जाते. गांवाबाहेर टेप्पाकुलम् नांवाचा मोठा तलाव आहे व त्यांत मोठें देऊळ बांधलें आहे. या तलावाभोंवतीं देवळें असल्यानें देखावा फार मनोहर दिसतो.

**मंदोदरी**—१. रावणपत्नी. ही मयासुरास हेमा अप्सरेपासून झालेल्या तीन कन्यांतील दुसरी होय. हिची पतिव्रता म्हणून कीर्ति आहे. प्रातःस्मरणांतील पंचकन्यांत हिचें नांव आहे.

२. सिंहलद्वीपाच्या चंद्रसेन राजाची कन्या. पुरुष कपटी असतात म्हणून अविवाहित राहण्याचें हिनें ठरविलें होतें; पण पुढें धाकट्या बहिणीच्या लग्नांत एका राजपुत्रास वरलें; पण अनुभव तसाच आला.

**मद्य**—दारू पाहा. १. वाइन— द्राक्षाचा रस आंबवून केलेलें पेय. आंबविण्याच्या क्रियेंत मद्यार्क–आसव ( अल्कोहोल ) व कर्बाम्लवायु तयार होतो. वायु हवेंत निघून जातो व उरलेलें तें वाइन मद्य. या मद्यांत आसव, पाणी, द्राक्षाम्ल ( टार्टारिक ॲसिड ), टॅनिन, द्राक्षशर्करा, ईथर, व शुद्ध तेलें (एसेन्शिअस ऑइल्स ) हे घटक असतात. द्राक्षाच्या पांढऱ्या व काळ्या रंगाप्रमाणें मद्याचे रंग काळे व पांढरे व यांच्या मिश्र छटांचे असतात. वाइनचे मुख्य तीन प्रकार आहेत: १ स्वभाविकपणें तयार झालेली ( यांत क्लॅरेट, बर्गंडी, हॉक, इ. येतात ). २ कडक केलेली—फॉर्टिफाइड ( यांत पोर्ट, शेरी, मालागा, टारागोना, मदीरा, इ. येतात ). ३ फसफसणारी—स्पार्कलिंग ( यांत शांपेन मुख्य आहे ).

द्राक्षाचे मळे जगांत अनेक ठिकाणीं आहेत. पण दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व भूमध्यसमुद्रावरचे प्रदेश यांत पुष्कळ मद्य तयार होतें. फ्रान्समध्यें दरसाल सहस्र दशलक्षावर गॅलन मद्य निघतें. द्राक्षें पाहा.

२. स्पिरिट—सर्व आंबविलेल्या द्रवांत कांहीं विशिष्ट प्रमाणांत आसव असतें व हें जेव्हां ऊर्ध्वपातनानें इतर घटकद्रव्यांपासून निराळें काढतात तेव्हां त्याला स्पिरिट हें नांव आहे. इंग्लंडांत १६ व्या शतकापर्यंत असें स्पिरिट करण्याचें माहीत नव्हतें. पण आतां ज्या ज्या ठिकाणीं वाइन होते त्या त्या ठिकाणीं स्पिरिट तयार करतात. ब्रांडी, व्हिस्की, रम हे स्पिरिटचेच प्रकार आहेत. स्कॉटलंड देश हा ११ व्या शतकापासून व्हिस्कीविषयीं प्रसिद्ध आहे. धान्यापासून ही तयार करतात. रम ही काकवीपासून होते. ज्या ठिकाणीं ऊंस पिकतो तेथें ( विशेषतः जमैका व डेमेरारा या देशांत ) रम करतात. 'लिकर' नांवाचीं पेयें आसव, साखर व इतर अनेक चविष्ट पदार्थ यांपासून फ्रान्स, स्पेन, वगैरे देशांत करतात.

**मद्यार्क**—( अल्कोहोल ). OH समूह असलेला सेंद्रिय ( ऑर्गॅनिक ) संयुक्तांचा एक वर्ग. इथिल मद्यार्क ( एथिल अल्कोहोल $C_2H_5OH$ ) ला व्यवहारांत अल्कोहोल असें नांव आहे. व मद्यांत आणि इतरत्र ह्याचाच मुख्यतः उपयोग करण्यांत येतो. द्राक्षें, भात, यव, साखर काढलेली काकवी, बटाटे, वगैरेपासून हा मद्यार्क तयार करतात. प्रथम फळांतील साखर, किंवा धान्यांतील पिष्टपदार्थ ( स्टार्च ) ह्यांचें आसवन ( फर्मेंटेशन ) करतात व नंतर आसवनानें मिळालेल्या मद्यार्क जलाचें उत्पातन करून शुद्ध मद्यार्क किंवा अल्कोहोल तयार करतात. उत्पातित ( रेक्टिफाइड ) आणि शुद्ध ( ॲब्सोल्यूट ) अशा दोन स्वरूपांत बाजारांत अल्कोहोल येतो. पहिल्यांत अल्कोहोलचें प्रमाण शें. ९६ असतें व दुसऱ्यांत त्याच्यावर ९८–९९ पर्यंत जातें. 'डिनेचर्ड स्पिरिट' जें नेहमीं बाजारांत मिळतें तें हेंच मद्यार्क असून अपायकारक द्रव्यांच्या मिश्रणानें मनुष्याच्या प्रकृतीस हानिकारक केलेलें असतें. शुद्ध अल्कोहोल ७८° शत. ला उकळतो. तो रंगहीन द्रवपदार्थ असून त्याला उग्र वास येतो. त्याची चव जळजळीत असते. आणि शुद्ध स्वरूपांत तो विषारी आहे. १५° शत. ला ह्याचें विविष्टगुरुत्व ०·७९ असतें. हा पाण्यात वाटेल त्या प्रमाणांत मिसळतो. व –११५° शत. पर्यंत न गोठतां ह्याला थंड करतां येतो. त्यामुळें ० च्या खालचें उष्णतामान मोजण्याच्या यंत्रांत त्याचा उपयोग करतात. हा जळूं लागला म्हणजे निळी ज्योत येते. व उष्णताहि पुष्कळ मिळते. ह्यामुळें ह्याचा जळण म्हणून उपयोग करतात. मोटारींत पेट्रोलच्याऐवजींहि ह्याचा उपयोग होऊं शकतो. मद्यें तयार करण्यासाठीं ह्याचा उपयोग सर्वश्रुतच आहे. ह्याशिवाय औषधें तयार करण्यासाठीं, रंग, व्हार्निश बनविण्यासाठींहि ह्याचा उपयोग होतो. औद्योगिक व शास्त्रीय क्षेत्रांत ह्याचें महत्त्व अतिशय आहे. यामुळेंच यावर कर फारसा आकारीत नाहींत.

**मद्र**—१. देश–एक भारतवर्षीय देश. हा पश्चिम आनर्त देशाच्या पश्चिमेस असून याची राजधानी शाकल नांवाची नगरी होती. मद्रदेश बियास नदीपासून चिनाबपर्यंत किंवा दुसऱ्या कांहींच्या मतें झेलमपर्यंत पसरला होता. येथें दशरथ राजा व सीरध्वज जनक यांच्या वेळीं चारुदेष्ण राजा होता आणि पांडवांच्या वेळेस शल्य राजा होता. महाभारतांत कर्णपर्वांत कर्णानें मद्रदेशाचें वर्णन करून शल्यास खिजविल्याचा उल्लेख आहे. मद्रदेशांतील पुरुष नीच व दुराचारी असून स्त्रिया मद्यपी व व्यभिचारी असतात असें तो सांगतो.

घेण्याचा ) दिला. सादुल्ला फरास या नांवाचा यास एक मुलगा होता. याचे वंशज शेवटपर्यंत भोसले राजांचे फरास होते.

**मदिना**—हें सौदी अरबस्तानांतील एक शहर असून याला अल् मदिना अथवा मदिना रसुलअल्ला अशीं दुसरीं नांवें आहेत. हें मक्केहून २४० मैलांवर आहे. हें मक्केच्या खालोखाल मुसलमानांचें धर्मक्षेत्र आहे. मदिना हे गांव कुराणांत सांपडतें. जवळच महमद पैगंबराचा चुलता हमजा याची कबर आहे. मदिनाची शहर व आसमंतांतील खेडीं मिळून एकंदर लो. सं. तीस हजारापर्यंत आहे. मुख्य शहराभोंवतीं दगडी कोट आहे. मदिना शहराचें भूषण म्हणजे महमद पैगंबराची कबर होय. ही कबर शहराच्या पूर्व भागांत असून हिचे मनोरे व भव्य घुमट प्रेक्षणीय आहेत. या कबरीभोंवतीं पितळेच्या तारेचें कुंपण आहे. महमद मादिना येथें आल्यापासून मदिना शहराचें ऐतिहासिक रीत्या अतिशय महत्त्व वाढलें. ही पैगंबराची मशीद मागें कित्येकदां जळाली व पुन्हां दुरुस्त केली गेली. महमदाच्या मशिदीखेरीज येथें बरींच ऐतिहासिक स्थळें आहेत. महमदाची मुलगी फतिमा व त्याच्या पुढचे दोन पैगंबर यांच्या मशिदी येथेंच आहेत. येथें मुसलमानांची वस्ती होण्यापूर्वी ज्यू लोक राहत होते. त्यांच्या वस्तीचे अवशेष येथें बरेच दिसतात. पहिल्या महायुद्धामध्यें १९१६ सालीं अरब लोकांनीं मदिनाला वेढा दिला. हा वेढा जवळजवळ तीन वर्षें चालून शेवटीं १९१९ सालीं तुर्कांचा पराजय झाला व तुर्कांनीं मदिना अरबांच्या स्वाधीन केलें.

**मदीरा बेटें**—हा ॲटलांटिक महासागरांतील पोर्तुगीज द्वीपसमूह आफ्रिकेच्या किनाऱ्यानजीक आहे. यांत मदीरा व पोर्टो सॅन्टो हीं दोन बेटें प्रमुख आहेत. या द्वीपसमूहाचें क्षे. फ. ३१४ चौ. मैल आणि लो. सं. १,८०,००० आहे. मदीरा बेट सुमारें ३५ मैल लांब आणि १२ मैल रुंद आहे. ज्वालामुखीच्या स्फोटामुळें बनलेलें हें बेट असून तें डोंगराळ आहे. येथील हवा सौम्य असल्यामुळें युरोपियन लोकांचें हें बेट आरोग्यनिवासस्थान बनलें आहे. या बेटाच्या उत्तर भागांत कालवे काढलेले असून तेथें अन्नधान्यें व फळफळावळ होते. विशेषतः नारिंगें, केळीं, लिंबें व इतर अनेक जातींचीं फळें व कॉफी येथें विपुल होते. मदीरा येथील दारू विशेष चवदार असल्याबद्दल प्रसिद्ध आहे. येथून साखर, द्राक्षें, दारू, आरारूट व कलावतू परदेशांत जातात. फंकल ही राजधानी दक्षिण किनाऱ्यावर आहे. पोर्टो सॅंटो येथें पाणी दुर्मिळ आहे. मदीरा येथें पोर्तुगीजांनीं १४१९ सालीं वसाहत केली, पण हें बेट १५८० ते १६४० पर्यंत स्पेनच्या ताब्यांत होतें आणि पुढें १८०७ पासून १८१४ पर्यंत ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत होतें.

**मदुरा**—मद्रास इलाख्यातील पूर्व किनाऱ्यावरचा एक जिल्हा. याचें क्षे. फ. ४,८८३ चौरस मैल आहे. पावसाचें मान २६ पासून ३६ इंच असतें. पळणी येथें जे पुरातन अवशेष आढळतात त्यांवरून पांड्य राजे राज्य करीत असतां ग्रीक व रोमन लोकांचा पांड्यांच्या फौजेंत पुष्कळ भरणा होता असें दिसतें. बौद्धांचीं नाणींहि बरींच आढळल्यावरून बौद्धधर्माचा प्रसार पांड्यांच्या वेळेस होता असें म्हणावयास हरकत नाहीं. मदुरा येथील प्रसिद्ध शिवालय, त्रिमल नाइकाचा वाडा व रामेश्वराचें भव्य मंदिर हीं प्रेक्षणीय आहेत. मदुरा जिल्ह्यांत ११ शहरें असून १०९७ खेडीं आहेत. लो. सं. ( १९४१ ) २४,४६,६०१. दिंदिगल तालुक्यांतील तंबाखूची प्रसिद्धि आहे. पळणी उतरणीवर कॉफीची लागवड आहे. तलावांची संख्या ४०८१ असून एवढी संख्या मद्रास इलाख्यांत इतर कोठेंहि नाहीं. मेलूर तालुक्यांत कोटमपट्टी येथें उत्तम प्रकारचें लोखंड सांपडतें. *दिंदिगल परगण्यांत* वैगाय नदींत सुवर्णमिश्रित वाळू सांपडते. समुद्रकिनाऱ्यावर सूर्याच्या उष्णतेनें समुद्राच्या पाण्याचें मीठ अनायासें तयार होतें. तिरुचुळ तहशिलींत पेन्सिलीचे व चुनखडीचे दगड सांपडतात. रामनाड जमीनदारींत लाल स्फटिक दगडाची खाण असून देवालयांतील मोठमोठे खांब याचेच करण्याची चाल आहे. पवम बेटांत पोंवळीं पुष्कळ सांपडतात. मदुरा जिल्ह्यांत मुख्यतः रेशमी कापड होतें. दिंदिगल येथील विणकामाची अशीच प्रसिद्धि होती. मेलूर, दिंदिगल व पळणी या तालुक्यांतून बायका घोंगडया विणतात. चामडें रंगविण्याचेहि कारखाने लहान प्रमाणावर असून तांब्या–पितळेचीं स्वयंपाकाचीं भांडीं व दिवे सण्ण मदुरे व दिंदिगल येथें चांगलीं तयार होतात.

शहर–हें वैगाय नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर असून साउथ इंडियन रेल्वेचें मोठें स्टेशन आहे. येथील लो. सं. ( १९४१ ) २,३९,१४४ असून हें मद्रास इलाख्यांत दुसरें मोठें शहर आहे. मुसलमानांनीं उत्तरेकडून वारंवार हल्ले करून शहराची बरीच नासधूस केली, पण या अरिष्टांतून सुंदरेश्वराचें व मीनाक्षीचें देऊळ मात्र वांचलें. त्रिमल नायकाचा वाडा हा मद्रास इलाख्यांतील शिल्पशास्त्राचा एक उत्कृष्ट नमुना आहे. मदुरा कॉलेज व अमेरिकन कॉलेज अशीं दोन कॉलेजें आहेत.

मदुरेला ‘पूर्वेकडील अथेन्स’ असें पाश्चात्य प्रवासी म्हणतात तें अगदीं योग्य आहे. ‘जो या जन्मांत मदुरा पाहत नाहीं तो पुढील जन्मीं गाढव होतो,’ अशी एक तामिळ म्हण आहे. म्हणजे हें ठिकाण अत्यंत प्रेक्षणीय आहे. येथील देवळांचें शिल्पकाम फार भव्य व सुंदर आहे. येथील सुंदरेश्वर ( शिव ) व मीनाक्षी ( पार्वती ) यांचीं देवालयें महत्त्वाचीं आहेत व तीं

तिरुमल नायकाच्या राजवाड्यांत आहेत. देवळांभोंवतीं फार उंच कोट असून त्यांत नऊ गोपुरें आहेत. सर्वांत मोठें गोपुर १५२ फूट उंच आहे. सभामंडप एक हजार खांबांचा आहे. आंत जातांच माणूस भांबावून जातो. या देवळांना फार मोठें उत्पन्न आहे; तेव्हां त्यांची व्यवस्था सरकारमार्फत ठेवली जाते. गांवाबाहेर टेप्पाकुलम् नांवाचा मोठा तलाव आहे व त्यांत मोठें देऊळ बांधलें आहे. या तलावाभोंवतीं देवळें असल्यानें देखावा फार मनोहर दिसतो.

**मंदोदरी**—१. रावणपत्नी. ही मयासुरास हेमा अप्सरेपासून झालेल्या तीन कन्यांतील दुसरी होय. हिची पतिव्रता म्हणून कीर्ति आहे. प्रातःस्मरणांतील पंचकन्यांत हिचें नांव आहे.

२. सिंहलद्वीपाच्या चंद्रसेन राजाची कन्या. पुरुष कपटी असतात म्हणून अविवाहित राहण्याचें हिनें ठरविलें होतें; पण पुढें धाकट्या बहिणीच्या लग्नांत एका राजपुत्रास वरलें; पण अनुभव तसाच आला.

**मद्य**—दारू पाहा. १. वाइन— द्राक्षाचा रस आंबवून केलेलें पेय. आंबविण्याच्या क्रियेंत मद्यार्क–आसव ( अल्कोहोल ) व कर्बाम्लवायु तयार होतो. वायु हवेंत निघून जातो व उरलेलें तें वाइन मद्य. या मद्यांत आसव, पाणी, द्राक्षाम्ल ( टार्टारिक ॲसिड ), टॅनिन, द्राक्षशर्करा, ईथर, व शुद्ध तेलें (एसेन्शिअस ऑइल्स ) हे घटक असतात. द्राक्षाच्या पांढऱ्या व काळ्या रंगा-प्रमाणें मद्याचे रंग काळे व पांढरे व यांच्या मिश्र छटांचे असतात. वाइनचे मुख्य तीन प्रकार आहेतः १ स्वभाविकपणें तयार झालेली ( यांत क्लॅरेट, बर्गंडी, हॉक, इ. येतात ). २ कडक केलेली—फॉर्टिफाइड ( यांत पोर्ट, शेरी, मालागा, टारागोना, मदीरा, इ. येतात ). ३ फसफसणारी—स्पार्कलिंग ( यांत शांपेन मुख्य आहे ).

द्राक्षाचे मळे जगांत अनेक ठिकाणीं आहेत. पण दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व भूमध्यसमुद्रावरचे प्रदेश यांत पुष्कळ मद्य तयार होतें. फ्रान्समध्यें दरसाल सहस्र दशलक्षावर गॅलन मद्य निघतें. द्राक्षें पाहा.

२. स्पिरिट—सर्व आंबविलेल्या द्रवांत कांहीं विशिष्ट प्रमाणांत आसव असतें व हें जेव्हां ऊर्ध्वपातनानें इतर घटकद्रव्यांपासून निराळें काढतात तेव्हां त्याला स्पिरिट हें नांव आहे. इंग्लंडांत १६ व्या शतकापर्यंत असें स्पिरिट करण्याचें माहीत नव्हतें. पण आतां ज्या ज्या ठिकाणीं वाइन होते त्या त्या ठिकाणीं स्पिरिट तयार करतात. ब्रांडी, व्हिस्की, रम हे स्पिरिटचेच प्रकार आहेत. स्कॉटलंड देश हा ११ व्या शतकापासून व्हिस्कीविषयीं प्रसिद्ध आहे. धान्यापासून ही तयार करतात. रम ही काकवीपासून होते. ज्या ठिकाणीं ऊंस पिकतो तेथें ( विशेषतः जमैका व डेमेरारा या देशांत ) रम करतात. 'लिकर' नांवाचीं पेयें आसव, साखर व इतर अनेक चविष्ट पदार्थ यांपासून फ्रान्स, स्पेन, वगैरे देशांत करतात.

**मद्यार्क**—(अल्कोहोल). OH समूह असलेला सेंद्रिय (ऑर्गॅनिक) संयुक्तांचा एक वर्ग. इथिल मद्यार्क ( एथिल अल्कोहोल $C_2H_5OH$ ) ला व्यवहारांत अल्कोहोल असें नांव आहे. व मद्यांत आणि इतरत्र ह्याचाच मुख्यतः उपयोग करण्यांत येतो. द्राक्षें, भात, यव, साखर काढलेली काकवी, बटाटे, वगैरेपासून हा मद्यार्क तयार करतात. प्रथम फळांतील साखर, किंवा धान्यांतील पिष्टपदार्थ ( स्टार्च ) ह्यांचें आसवन ( फर्मेंटेशन ) करतात व नंतर आसवनानें मिळालेल्या मद्यार्क जलाचें उत्पातन करून शुद्ध मद्यार्क किंवा अल्कोहोल तयार करतात. उत्पातित ( रेक्टिफाइड ) आणि शुद्ध ( ॲब्सोल्यूट ) अशा दोन स्वरूपांत बाजारांत अल्कोहोल येतो. पहिल्यांत अल्कोहोलचें प्रमाण शें. ९६ असतें व दुसऱ्यांत त्याच्यावर ९८–९९ पर्यंत जातें. 'डिनेचर्ड स्पिरिट' जें नेहमीं बाजारांत मिळतें तें हेंच मद्यार्क असून अपायकारक द्रव्यांच्या मिश्रणानें मनुष्याच्या प्रकृतीस हानिकारक केलेलें असतें. शुद्ध अल्कोहोल ७८° शत. ला उकळतो. तो रंगहीन द्रवपदार्थ असून त्याला उग्र वास येतो. त्याची चव जळजळीत असते. आणि शुद्ध स्वरूपांत तो विषारी आहे. १५° शत. ला ह्याचें विशिष्टगुरुत्व ०.७९ असतें. हा पाण्यात वाटेल त्या प्रमाणांत मिसळतो. व –११५° शत. पर्यंत न गोठतां ह्याला थंड करतां येतो. त्यामुळें ० च्या खालचें उष्णतामान मोजण्याच्या यंत्रांत त्याचा उपयोग करतात. हा जळूं लागला म्हणजे निळी ज्योत येते. व उष्णताहि पुष्कळ मिळते. ह्यामुळें ह्याचा जळण म्हणून उपयोग करतात. मोटारींत पेट्रोलच्याऐवजींहि ह्याचा उपयोग होऊं शकतो. मद्यें तयार करण्यासाठीं ह्याचा उपयोग सर्वश्रुतच आहे. ह्याशिवाय औषधें तयार करण्यासाठीं, रंग, व्हार्निश बनविण्यासाठींहि ह्याचा उपयोग होतो. औद्योगिक व शास्त्रीय क्षेत्रांत ह्याचें महत्त्व अतिशय आहे. यामुळेंच यावर कर फारसा आकारीत नाहींत.

**मद्र**—१. देश–एक भारतवर्षीय देश. हा पश्चिम आनर्त देशाच्या पश्चिमेस असून याची राजधानी शाकल नांवाची नगरी होती. मद्रदेश बियास नदीपासून चिनाबपर्यंत किंवा दुसऱ्या कांहींच्या मतें झेलमपर्यंत पसरला होता. येथें दशरथ राजा व सीरध्वज जनक यांच्या वेळीं चारुदेष्ण राजा होता आणि पांडवांच्या वेळेस शल्य राजा होता. महाभारतांत कर्णपर्वांत कर्णानें मद्रदेशाचें वर्णन करून शल्यास खिजविल्याचा उल्लेख आहे. मद्रदेशांतील पुरुष नीच व दुराचारी असून स्त्रिया मद्यपी व व्यभिचारी असतात असें तो सांगतो.

२ लोक—या लोकांचा उल्लेख बृहदारण्यक या उपनिषदांत केला गेला आहे. काप्य पतंजल हा त्या वेळीं त्यांच्यांत राहत होता. त्यांच्या 'औदीच्यमद्र' या शाखेचें नांव दुसरीकडे वैदिक वाङ्मयांतहि आलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत (८, १४, ३.) हे हिमालयाच्या पलीकडे (परेण हिमवन्तम्) व उत्तर कुरूंच्या जवळपास (म्हणजे झिमरच्या मताप्रमाणें बहुधा काश्मीरांत) राहणारे म्हणून उल्लेखिले आहेत. उपनिषदांत आलेले मद्र लोक कुरूंच्याप्रमाणें बहुधा मध्यदेशांत–कुरुक्षेत्रांत राहत असावेत, असें वैदिक पंडित मॅकडोनेल याला वाटतें.

**मद्रास**—हिदुस्थान, एक प्रांत. यानें दक्षिण हिंदुस्थानचा बराच भाग व्यापला आहे. याचें क्षे. फ. १,४२,२७७ चौ. मैल असून समुद्रकिनारा पूर्वेस १२०० मैल आणि पश्चिमेस ४५० मैल आहे. मद्रास आणि कोचीन हीं दोनच बंदरें साधारण सोयीचीं आहेत. पूर्वघाट आणि पश्चिम घाट या पर्वतांच्या ओळी असून त्या नीलगिरि पर्वतानें जोडल्या गेल्या आहेत. गोदावरी, कृष्णा व कावेरी या मुख्य नद्या आहेत. इलाख्याची लो. सं. (१९४१) ४,९८,४०,५६४. पैकीं शें. ८७ हिंदू, शें. ७ मुसलमान, शें. ४ ख्रिस्ती व शें. १ वन्यधर्मी आहेत. बहुतेक लोक द्राविड मानववंशांतील असून द्राविडी भाषा बोलतात. मुख्य भाषा तामिळ व तेलगू आहेत. एक कोटी नव्वद लक्ष तामिळ व एक कोटी ऐशीं लक्ष तेलगू भाषा बोलणारे लोक आहेत. येथील मुख्य धंदा शेतकीचा असून त्यांत शें. ६८ लोक गुंतलेले आहेत. मुख्य पिकें भात, चोलम्, रागी व कंबू हीं आहेत. शिवाय कापूस, ऊंस व भुईमूग हीं पिकें होतात. शेतकरी वर्गानें 'दि युनायटेड प्लँटर्स असोसिएशन ऑफ साउथ इंडिया' या नांवाची रजिस्टर्ड संस्था स्थापली असून तिच्यामध्यें कॉफी, चहा, रबर आणि दुसऱ्या कांहीं पदार्थांची लागवड करणाऱ्या लोकांचे प्रतिनिधी आहेत. या इलाख्यांत १९४५–४६ सालीं एकंदर ६७ सुताच्या व कापडाच्या गिरण्या होत्या. याशिवाय तेलाच्या गिरण्या, दोर, रबर व कौलें वगैरेंचे मिळून १७६२ कारखाने होते. सुमारें १९ हजार चौरस मैल राखीव जंगल या इलाख्यांत आहे. १९४५–४६ सालीं इलाख्यांत एकंदर ३७,४७१ सार्वजनिक शिक्षणसंस्था असून त्यांत ३७,१९,१९० विद्यार्थी शिक्षण घेत होते. मद्रास, आंध्र व अन्नमलाई अशीं तीन विद्यापीठें प्रांतांत आहेत व त्यांना जोडलेलीं पन्नासावर कॉलेजें आहेत. प्राथमिक शाळांपासून कलाकौशल्य आणि धंदे यांचीं कॉलेजें वगैरे सर्व प्रकारच्या शिक्षणसंस्था आहेत. प्रांताचें उत्पन्न सु. पन्नास कोटी रु. असून सुमारें दहा कोटी रु. वर शिक्षणावर सरकारचा खर्च होतो. साक्षरतेचें प्रमाण ७.५ आहे. या इलाख्यांत पांच हिंदी संस्थानें (त्रावणकोर, कोचीन, पुदुकोट्टई, बंगनपल्ले व सोंडूर) असून त्यांचें एकंदर क्षे. फ. १०,०८७ चौरस मैल आहे. यांपैकीं त्रावणकोर, कोचीन यांचें एक संघराज्य बनलें असून बाकीचीं प्रांतांत विलीन झालीं आहेत.

पेड्डापल्ली येथें ब्रिटिशांनीं पहिली वखार स्थापली (१६११) व त्यानंतर मच्छलीपट्टण येथें काढली. मद्रास येथें १६३९ सालीं जागा घेऊन 'फोर्ट सेंट जॉर्ज' याची उभारणी केली. पुढें १८०१ पावेतों उत्तर सरकार ते केप कामोरिनपर्यंतचा मुलूख या प्रांतांत मोडला जात होता. त्यापूर्वींच मद्रास हा मुंबई आणि बंगाल यांप्रमाणें वेगळा प्रांत केला असून त्यावर एक गव्हर्नर असे. १९३७ सालीं हिंदुस्थानांतील इतर प्रांतांबरोबर यालाहि स्वायत्तता लाभली; व लोकनियुक्त प्रतिनिधींतून निवडलेल्या मंत्र्यांचा कारभार सुरू झाला. खालचें व वरचें अशीं दोन विधिमंडळें आहेत. आतां भारताची स्वतंत्र घटना झाल्यानें तीप्रमाणें या प्रांताचा कारभार चालेल. भावनगरचे महाराज सध्यां प्रांताधिपति किंवा राज्यपाल आहेत.

शहर—प्रांताची राजधानी. हें हिंदुस्थानांतील तिसरें मोठें शहर आहे. लो. सं. (१९४१) ७,७७,४८१. या ठिकाणीं प्रांताच्या प्रमुख कचेऱ्या आहेत. हें बंदरहि आहे; व त्याचा कारभार एक विश्वस्त मंडळ पाहतें. फार मोठा व्यापार आयात-निर्यात मालांचा चालतो. येथें पाहण्यासारखीं स्थळें पुष्कळच आहेत. उदा., हायकोर्ट, दीपगृह, मत्स्यगृह, पदार्थसंग्रहालय, प्राणिसंग्रहालय, वेधशाळा व कांहीं मोठीं देवळें. जवळच अड्यार गांवीं थिऑसॉफिकल संस्था आहे. जिंजीचा किल्ला व महाबळीपुरम् येथील सात देवळें हीं जवळचीं ऐतिहासिक ठिकाणें प्रेक्षणीय आहेत. शिक्षणसंस्था अनेक आहेत. जुन्या किल्ल्यांत सरकारी कचेऱ्या दिसतील. जॉर्ज टाउन व्यापारी पेठ आहे. मद्रास विद्यापीठ १८५७ त स्थापलेलें आहे.

ईस्ट इंडिया कंपनीच्या फ्रॅन्सिस डे या प्रतिनिधीनें १६३९ सालीं चंद्रगिरीच्या राजापासून या शहराची जागा मिळविली. सेंट थोमे ही पोर्तुगीज वसाहत याजवळच होती.

**मध**—हा मधमाशांपासून मिळतो. सं. मधु याचा अर्थ कोणतीहि खाण्याची गोड वस्तु व ऋग्वेदांत बहुधा एक प्रकारचें पेय (मध व पाणी यांपासून केलेली जालीम दारू) असा याचा अर्थ होतो. कांहीं ठिकाणीं 'सोम', 'दूध' अथवा 'मध, हा या शब्दाचा निश्चित अर्थ लागतो. परंतु 'मध' ह्याच अर्थी हा शब्द वेदानंतरच्या वाङ्मयांतच विशेष येतो. परंतु या मधाच्या उपयोगाविरुद्ध निषेध प्रदर्शित केलेला दिसतो.

आर्यवैद्यकांत मधाच्या आठ जाती सांगितल्या आहेत. आतिथ्यप्रसंगीं मधुपर्काचा एक विधि हिंदु लोकांत असे. त्याचा

मंडाले—न्यायाचे साडेचारशें पागोडे (देवळें)
(पृ. १८६१)

मदीरा—फुंचल उपसागर (पृ. १८६८)

मदिना—महंमद पैगंबराची कबर (पृ. १८६८)

ममी—शवपेटिका (पृ. १८८४)

२ लोक—या लोकांचा उल्लेख बृहदारण्यक या उपनिषदांत केला गेला आहे. काप्य पतंजल हा त्या वेळीं त्यांच्यांत राहत होता. त्यांच्या 'औदीच्यमद्र' या शाखेचें नांव दुसरीकडे वैदिक वाङ्मयांतहि आलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत (८, १४, ३.) हे हिमालयाच्या पलीकडे (परेण हिमवन्तम्) व उत्तर कुरूंच्या जवळपास (म्हणजे झिमरच्या मताप्रमाणें बहुधा काश्मीरांत) राहणारे म्हणून उल्लेखिले आहेत. उपनिषदांत आलेले मद्र लोक कुरूंच्याप्रमाणें बहुधा मध्यदेशांत–कुरुक्षेत्रांत राहत असावेत, असें वैदिक पंडित मॅकडोनेल याला वाटतें.

**मद्रास**—हिंदुस्थान, एक प्रांत. यानें दक्षिण हिंदुस्थानचा बराच भाग व्यापला आहे. याचें क्षे. फ. १,४२,२७७ चौ. मैल असून समुद्रकिनारा पूर्वेस १२०० मैल आणि पश्चिमेस ४५० मैल आहे. मद्रास आणि कोचीन हीं दोनच बंदरें साधारण सोयीचीं आहेत. पूर्वघाट आणि पश्चिम घाट या पर्वतांच्या ओळी असून त्या नीलगिरि पर्वतानें जोडल्या गेल्या आहेत. गोदावरी, कृष्णा व कावेरी या मुख्य नद्या आहेत. इलाख्याची लो. सं. (१९४१) ४,९८,४०,५६४. पैकीं शें. ८७ हिंदू, शें. ७ मुसलमान, शें. ४ ख्रिस्ती व शें. १ वन्यधर्मी आहेत. बहुतेक लोक द्राविड मानववंशांतील असून द्राविडी भाषा बोलतात. मुख्य भाषा तामिळ व तेलगू आहेत. एक कोटी नव्वद लक्ष तामिळ व एक कोटी ऐशीं लक्ष तेलगू भाषा बोलणारे लोक आहेत. येथील मुख्य धंदा शेतकीचा असून त्यांत शें. ६८ लोक गुंतलेले आहेत. मुख्य पिकें भात, चोलम्, रागी व कंबू हीं आहेत. शिवाय कापूस, ऊंस व भुईमूग हीं पिकें होतात. शेतकरी वर्गानें 'दि युनायटेड प्लॅन्टर्स असोसिएशन ऑफ साउथ इंडिया' या नांवाची रजिस्टर्ड संस्था स्थापली असून तिच्यामध्यें कॉफी, चहा, रबर आणि दुसऱ्या कांहीं पदार्थांची लागवड करणाऱ्या लोकांचे प्रतिनिधी आहेत. या इलाख्यांत १९४५–४६ सालीं एकंदर ६७ सुताच्या व कापडाच्या गिरण्या होत्या. याशिवाय तेलाच्या गिरण्या, दोर, रबर व कौलें वगैरेंचे मिळून १७६२ कारखाने होते. सुमारें १९ हजार चौरस मैल राखीव जंगल या इलाख्यांत आहे. १९४५–४६ सालीं इलाख्यांत एकंदर ३७,४७१ सार्वजनिक शिक्षणसंस्था असून त्यांत ३७,१९,१९० विद्यार्थी शिक्षण घेत होते. मद्रास, आंध्र व अन्नमलाई अशीं तीन विद्यापीठें प्रांतांत आहेत व त्यांना जोडलेलीं पन्नासावर कॉलेजें आहेत. प्राथमिक शाळांपासून कलाकौशल्य आणि धंदे यांचीं कॉलेजें वगैरे सर्व प्रकारच्या शिक्षणसंस्था आहेत. प्रांताचें उत्पन्न सु. पन्नास कोटी रु. असून सुमारें दहा कोटी रु. वर शिक्षणावर सरकारचा खर्च होतो. साक्षरतेचें प्रमाण ७·५ आहे. या इलाख्यांत पांच हिंदी संस्थानें (त्रावणकोर, कोचीन, पुदुकोट्टई, बंगनपल्ले व संदूर) असून त्यांचें एकंदर क्षे. फ. १०,०८७ चौरस मैल आहे. यांपैकीं त्रावणकोर, कोचीन यांचें एक संघराज्य बनलें असून बाकीचीं प्रांतांत विलीन झालीं आहेत.

पेड्डापल्ली येथें ब्रिटिशांनीं पहिली वखार स्थापली (१६११) व त्यानंतर मच्छलीपट्टण येथें काढली. मद्रास येथें १६३९ सालीं जागा घेऊन 'फोर्ट सेंट जॉर्ज' याची उभारणी केली. पुढे १८०१ पावेतों उत्तर सरकार ते केप कामोरिनपर्यंतचा मुलूख या प्रांतांत मोडला जात होता. त्यापूर्वीच मद्रास हा मुंबई आणि बंगाल यांप्रमाणें वेगळा प्रांत केला असून त्यावर एक गव्हर्नर असे. १९३७ सालीं हिंदुस्थानांतील इतर प्रांतांबरोबर यालाहि स्वायत्तता लाभली; व लोकनियुक्त प्रतिनिधींतून निवडलेल्या मंत्र्यांचा कारभार सुरू झाला. खालचें व वरचें अशीं दोन विधिमंडळें आहेत. आतां भारताची स्वतंत्र घटना झाल्यानें तीप्रमाणें या प्रांताचा कारभार चालेल. भावनगरचे महाराज सध्यां प्रांताधिपति किंवा राज्यपाल आहेत.

शहर—प्रांताची राजधानी. हें हिंदुस्थानांतील तिसरें मोठें शहर आहे. लो. सं. (१९४१) ७,७७,४८१. या ठिकाणीं प्रांताच्या प्रमुख कचेऱ्या आहेत. हें बंदरहि आहे; व त्याचा कारभार एक विश्वस्त मंडळ पाहतें. फार मोठा व्यापार आयात-निर्यात मालांचा चालतो. येथें पाहण्यासारखीं स्थळें पुष्कळच आहेत. उदा., हायकोर्ट, दीपगृह, मत्स्यगृह, पदार्थसंग्रहालय, प्राणिसंग्रहालय, वेधशाळा व कांहीं मोठीं देवळें. जवळच अड्यार गांवीं थिऑसॉफिकल संस्था आहे. जिंजीचा किल्ला व महाबळीपुरम् येथील सात देवळें हीं जवळचीं ऐतिहासिक ठिकाणें प्रेक्षणीय आहेत. शिक्षणसंस्था अनेक आहेत. जुन्या किल्ल्यांत सरकारी कचेऱ्या दिसतील. जॉर्ज टाउन व्यापारी पेठ आहे. मद्रास विद्यापीठ १८५७ त स्थापलेलें आहे.

ईस्ट इंडिया कंपनीच्या फ्रॅन्सिस डे या प्रतिनिधीनें १६३९ सालीं चंद्रगिरीच्या राजापासून या शहराची जागा मिळविली. सेंट थोमे ही पोर्तुगीज वसाहत याजवळच होती.

**मध**—हा मधमाशांपासून मिळतो. सं. मधु याचा अर्थ कोणतीहि खाण्याची गोड वस्तु व ऋग्वेदांत बहुधा एक प्रकारचें पेय (मध व पाणी यांपासून केलेली जालीम दारू) असा याचा अर्थ होतो. कांहीं ठिकाणीं 'सोम', 'दूध' अथवा 'मध, हा या शब्दाचा निश्चित अर्थ लागतो. परंतु 'मध' ह्याच अर्थी हा शब्द वेदानंतरच्या वाङ्मयांतच विशेष येतो. परंतु या मधाच्या उपयोगाविरुद्ध निषेध प्रदर्शित केलेला दिसतो.

आर्यवैद्यकांत मधाच्या आठ जाती सांगितल्या आहेत. आतिथ्यप्रसंगीं मधुपर्काचा एक विधि हिंदु लोकांत असे. त्याचा

मंडाले—न्यायाचे साडेचारशें पागोडे (देवळें) (पृ. १८६१)

मदीरा—फुंचल उपसागर (पृ. १८६८)

मदिना—महंमद पैगंबराची कबर (पृ. १८६८)

ममी—शवपेटिका (पृ. १८८४)

अवशेष अद्यापि लग्नविधींत दिसतो. विशिष्ट सांस्कारिक विधींत मध वापरण्याची चाल अनेक जातींतून आहे.

याचे पांढरा व पिंवळा असे दोन प्रकार आहेत. मधाचा वास व चव हीं ज्या फुलांपासून तो काढण्यांत येतो त्यांवर अवलंबून असतात. प्राचीन कालापासून मनुष्य याचा मोठ्या आवडीनें उपयोग करीत आला आहे. साखर किंवा गूळ प्रचारांत येण्यापूर्वी गोड पदार्थ करण्याकरितां याचाच उपयोग करण्यांत येत असे. रासायनिक दृष्ट्या हा शर्करातत्त्व (ग्लुकोज), फलशर्करा व इक्षुशर्करा यांचें मिश्रण आहे. वसंत ऋतूंतलि मध अधिक चांगला असतो. मेक्सिको देशांत मधाच्या मुंग्या असतात, त्यांच्या पोटाजवळच्या पिशवींत मध असतो.

मध काढण्याची जुनी रीत म्हणजे पोळ्यांना भाजून मधमाशा मारून टाकणें ही होय. पण तीऐवजीं मधमाश्या पाळून त्यांच्यापासून पद्धतशीर रीतीनें मध मिळविण्याची आधुनिक कला प्रशस्त आहे.

**मधमाशी**—ही माशी सर्वांच्या परिचयाची आहे. हिच्या घरास पोळें म्हणतात. एका पोळ्यांत एक राणी माशी असून ६०० ते ८०० नर असतात. व १५,००० ते २०,००० कामकरी माशा असतात. या कामकरी माशांच्या संवेदना-तंतूंस १२ पेरीं असतात. पोटाला सहा वलयें असतात आणि नांगी असते. यांच्या पाठीमागच्या पायांच्या बाहेरच्या बाजूस एक टोपलीसारखा गुळगुळीत आंतून पोकळ व कडेला केंस असलेला अवयव असतो, त्यांत पिलांकरितां अन्न गोळा करून ठेवण्यांत येतें. राणी माशी साध्या माशांप्रमाणेंच पण जरा मोठी असते. विशेषतः तिचें पोट मोठें असतें. तिलाहि नांगी असते. नरांच्या तंतूंस १३ सांधे असतात. त्यांचें डोकें वाटोळें असतें. डोळे मोठे असतात. ते लांबट व एकमेकांस जोडलेले असतात व त्यांस नांगी नसते. राणी माशीचें काम फक्त प्रजोत्पत्ति करण्याचें असतें व तिला दोन गर्भाशय असतात. त्यांत अनेक पोकळ भाग असतात व त्या प्रत्येक भागांत सोळा-सतरा अंडीं असतात. २४ तासांच्या अवधींत ती २००० पासून ३००० पर्यंत अंडीं घालूं शकते. राणी माशीचें सरासरी आयुष्य दोन ते तीन वर्षांचें असतें. मधमाशांचें, अंडयांतून कोशस्थ किडा (लार्व्हा) व नंतर अळी (पूपा) व नंतर माशी असें रूपांतर होत जातें. राणी माशी उन्हाळ्यांत गर्भ धारण करते व वर्षाकाळ सुरू होईपर्यंत अंडीं घालीत राहते. वसंत ऋतूंत २४ दिवसांत १२,००० अंडीं एक राणी माशी देऊं शकते. आंत राणी माशी असलेल्या एका थव्याचें वजन ६ ते ८ पौंड भरतें. यांच्या अनेक जाती आहेत.

मधमाशा पाळणें—मधमाशांचे पांच प्रकार असतात: १ आग्या माशी, २ सातपोपडीची माशी, ३ तुळईची माशी, ४ मिश्री माशी, व ५ चारीक माशी. यांपैकीं सातपोपडी (ॲपिस इंडिका)च्या माशा पाळून मध तयार करण्याचा धंदा करतात.

मधमाशा जंगलांतून आणून त्यांचे समूह-वसाहती बनवितात. एकेका वसाहतींत राणी माशी, नर माशी व कामकरी माशी अशा तीन प्रकारच्या माशा असतात. राणी माशी नरमाशीच्या संयोगानें अंडीं घालते. एका दिवसांत दोनशेंपेक्षांहि जास्त अंडीं घालणें शक्य आहे. राणीचें संगोपन कामकरी माशा करतात. या कामकरी माशा फुलांतून मध जमा करून आणतात व पोंवळ्यांत ठेवतात. या माशांवरच वसाहत चालत असते. मधमाशा पाळण्यासाठीं लांकडी पेटी करतात. या पेटींत चार भाग असतात: १ तळपत्रा, २ संसारपेटी, ३ मधपेटी व ४ छप्पर. संसारपेटींत माशांचीं अंडीं असतात. या भागांत सात चौकटी असतात. मधपेटींतहि इतक्याच चौकटी (फ्रेम्स) असतात. त्यांत माशा मध सांठवितात. चौकट मधानें भरल्यावर मधयंत्रांत घालून स्वच्छ मध बाहेर काढतात.

कुर्ग येथें अशा तऱ्हेचे मधाचे कारखाने आहेत. मधुपालनाचें शिक्षण नैनिताल, कुर्ग, होनावर, महाबळेश्वर, वगैरे ठिकाणीं मिळतें. यावर इंग्रजींत बरेंच वाङ्मय आहे. हा धंदा डोंगराळ पावसाळी मुलुखांत चांगला होऊं शकतो. महाराष्ट्रांत सह्याद्रीच्या भागांत तर याला फार मोठा वाव आहे.

मधमाशा पाळण्याचें घर अथवा खुराडें हें चांगल्या निवाऱ्याच्या, दमट नसलेल्या व अतिशय थंडी अथवा उष्णता यांपासून त्रास होणार नाहीं अशा ठिकाणीं ठेवलें पाहिजे. यांचें तोंड दक्षिण किंवा आग्नेय दिशेस असावें. तें जमिनीपासून २ फूट उंच असलेल्या घडवंच्यांवर व एकमेकांपासून दोन फूट अंतरावर ठेवण्यांत यावें; मधमाशांचीं घरें बागा, गवताळ शेतें, किंवा झाडाझुडपांनीं आच्छादिलेल्या टेंकड्या अशा ठिकाणीं ठेवलीं पाहिजेत. मधमाशांचा मध काढून घेतल्यानंतरच्या काळांत मधमाशांना साखरेचा पाक, वगैरे खाऊं घातला पाहिजे.

**मधुकैटभ**— विष्णूच्या कर्णमलापासून किंवा ब्रह्मदेवाच्या घामापासून उत्पन्न झालेले मधु व कैटभ असे दोन असुर. यांस विष्णूनेंच मारिलें. यांच्या शरीरभेदानें संपूर्ण पृथ्वी भरली, व तेव्हांपासून तिला मेदिनी नांव पडलें.

**मधुमती**—हा बंगालमधील गंगा नदीचा एक मोठा प्रवाह असून नदिया जिल्ह्यांत कुष्टिया गांवाजवळ याला गरई हें नांव आहे. हा दक्षिणेकडे असाच वाहत गेल्यावर पुढें या प्रवाहाला मधुमती हें नांव देण्यांत येतें. नंतर गोपाल गांवाजवळ वायव्य दिशेनें बाकरगंज जिल्ह्यांत शिरून व पुढें जिल्ह्याची पश्चिम

सीमा बनून हा दक्षिणेकडे वळतो. तेथून सुंदरबन प्रदेश ओलांडून खुलना व बाकरगंज जिल्ह्यांच्या बरोबर मध्य भागांतून वाहत जाऊन बंगालच्या उपसागरास मिळतो. एकंदर प्रवाहाची लांबी २३० मैल आहे. मधुमतीला बाकरगंज जिल्ह्यांतून कचा, जेसोर जिल्ह्यांतून गंगणी व खुलना जिल्ह्यांतून भैरव या नद्या मिळतात.

**मधुमादसारंग**—हा राग काफी थाटांतून निघतो. यांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत म्हणून याची जाती औडुव-औडुव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय मध्यान्ह सर्वसंमत आहे. या रागांत तीव्र व कोमल निषाद अनुक्रमें आरोहांत व अवरोहांत लागतात. निषाद व पंचम स्वरांची संगति फार मधुर आहे. हा एक सारंगाचा प्रकार आहे.

**मधुमेह**—हा विकार कर्बोज्जितांचे ( कार्बो हायड्रेट ) शरीरामध्यें पचन करण्याची जी क्रिया आहे ती बिघडली असतां उत्पन्न होतो. हा विकार झाला असतां कर्बोज्जितांचें नीट पचन होऊन तीं रक्तांत मिसळण्याच्याऐवजीं त्यांची साखर होऊन ती मूत्रामध्यें मिसळते. या विकारांत तहान फार लागते, तसेंच भूक वाढते, व लघवी फार होऊं लागते. मूत्रामध्यें शेंकडा २ पासून १० पर्यंत साखरेचें प्रमाण असतें. शरीराची कातडी कोरडी पडते. आणि शरीरास इजा झाली असतां तेथें पू होण्याचा संभव असतो. रोगी कृष होऊं लागतो. या रोगाचा पित्ताशयाशीं, पेशीशीं संबंध असतो ही गोष्ट संशोधनानें सिद्ध झाली आहे. या रोगावर उपचार करतांना रोग्याचें पथ्य कडक रीतीनें सांभाळणें आणि त्यास योग्य प्रमाणांत इन्शुलीन हें द्रव्य देणें या दोन गोष्टी येतात. रोग्याचें सामान्य आरोग्य नीट सांभाळलें पाहिजे आणि त्यास शक्य तों त्रास होणार नाहीं अशी काळजी घेतली पाहिजे. कधीं कधीं हा रोग फार तीव्र स्वरूपाचा होऊन बेशुद्धि येऊन मृत्यु घडून येतो. परंतु दीर्घकालीन रोगांत मनुष्य दहापासून वीस वर्षेपर्यंत जगूं शकतो.

याचे दोन भेद मानितात—( १ ) बहुमूत्रमेह-यांत लघवीमध्यें कांहीं बिघाड न होतां फक्त ती फारच होते येवढेंच लक्षण असतें. इतर कांहीं रोगांमध्यें पुष्कळ लघवी होणें हें लक्षण असतें. परंतु त्या रोगांचा या रोगाशीं कांहीं संबंध नसतो. हे रोग येणेंप्रमाणें—जीर्णमूत्रपिंडदाह, सिक्थमय मूत्रपिंडदाह व वातोन्मादरोग. या भेदांत अतितृष्णा व बहुमूत्र हीं लक्षणें असतात; पण मूत्रांत शर्करा नसते. यावर उपचार म्हणजे अन्नपुरवठा भरपूर व पुष्टिदायक असावा. शक्तिवर्धक औषधें घेऊन शक्ति कायम ठेवीत जावी. व्हॅलेरियनची पूड ५ ग्रेन या प्रमाणांत पोटांत देतात. ( २ ) दुसरा भेद म्हणजे मधुमेह—यामध्यें लघवी पुष्कळ होऊन त्यांतून कमी अगर जास्त प्रमाणांत शर्करा जाते. हा रोग काळजी करण्यासारखा भयंकर आहे. याचें आनुवंशिक संस्कार हें एक मोठेंच कारण आहे. मोठाल्या शहरांत याचें प्रमाण अधिक असतें. चहाच्या निमित्तानें व अन्य तऱ्हेनें साखर पोटांत जाणें हेंहि कारण असावें. तसेंच स्थूल मनुष्यांना हा रोग बहुधा होतो. यहुदी लोकांत असे रोगी फार असतात. स्त्रियांपेक्षां दुपटीनें हा रोग पुरुषांत आढळतो. शरीरास येणारी अशक्तता व कृशता, वारंवार तहान लागणें व लघवीस जावें लागणें, हीं लक्षणें होतात. मोठ्या माणसास लघवी ४० ते ६० औंस अहोरात्रामध्यें होते, पण या रोगांत ती याच्या चौपट किंवा १०–१२ पटहि होते. तिचा रंग फिकट असून ती अमळ दाट असते. तिची चव गोड असल्यामुळें लघवीस किंवा रोग्याच्या मोरीस मुंग्या अगर मुंगळे येतात. या रोगांत लघवीचें विशिष्ट-गुरुत्व नेहमीं १०३० पासून १०५० पर्यंतहि असतें. त्यामुळें मूत्रमार्गांत दाह व कंड हीं बरींच होतात. लघवींतून एकदोन औंस अथवा एकदोन पौंड साखर जाते. रोग्यास तहान फार लागते. भूकहि जबर वाढलेली असते. बद्धकोष्ठता आणि नपुंसकत्व हे दोष अशा रोग्यांना बहुधा असतातच.

उपचार—तांदूळ, जोंधळा, बटाटे, रताळीं, तवकील, इत्यादि पिष्ट पदार्थ; तसेंच मुळे, गाजरें, बहुतेक प्रकारचीं फळें व निःसत्त्व गहूं हे पदार्थ वर्ज्य करावे. पुढील पदार्थ हितकर समजावेत—मांसाशन व मांसाचा रस्सा, हिरव्या शाकभाज्या, साय, दहीं, खवा, अंडीं, चहा, कॉफी, लोणी, सात्त्विक गहूं, बदाम, इत्यादि. पालेभाज्यांचा पाला तेवढा खावा. पायलोकारपीन हें औषध टोंचून घातल्यानें लाळ सुटून तोंडाची कोरड कमी होते. जांभळाच्या बिया, अगर त्यांचा अर्क, आस्पिरीन, सोडा सॅलिसीलिट हींहि बरींच गुणकारक औषधें आहेत.

**मधुर कवि**—मद्रास प्रांतांतील एक वैष्णव संतकवि ( आळवार ). अर्काट जिल्ह्यांतील तिरुवल्लूर येथें याचा जन्म झाला. सर्व ज्ञान प्राप्त करून घेऊन तो उत्तरेकडे तीर्थयात्रेला गेला. तेथें त्याला नम्माळवाराचा दैवी अंश प्रतीत होऊन तो परत आला व त्याचा शिष्य बनला. ( नम्माळवार पाहा ). यानें नम्माळवाराचीं गीतें संकलित केलीं. त्या काव्याला 'तिरुवोय मोळी' असें नांव आहे.

**मधुरवाणी**—सन १६१४–१६६२ या कालांत तंजावर येथें राज्य करणाऱ्या रघुनाथ नायक नामक राजाच्या पदरीं असलेली एक शीघ्र कवयित्री. हिचें काव्य संस्कृत व तेलंगी भाषेंत असून ही अष्टावधानी असे. नैषधकाव्य व कुमारसंभव यांवरील हिचे छायानुवाद सुप्रसिद्ध असून हिनें कांहीं चंपूहि लिहिले आहेत. तसेंच रघुनाथ नायककृत तेलंगी भाषेंतील

रामायणाचा हिनें संस्कृतमध्यें अनुवाद केला आहे. या अद्वैत-मताच्या स्त्रीच्या घराण्याबाबत मात्र कांहींच माहिती अद्यापि मिळूं शकत नाहीं. मधुरवाणी हें नांव हिला हिच्या काव्यामुळें प्राप्त झालें. हिचें मूळ नांव वेगळें आहे.

**मधुरा**—ज्या तापापासून शरीरावर पुटकुळया, पुरळ, फोड येतात त्यास सामान्यतः विस्फोटक ज्वर असें म्हणतां येईल. विस्फोटक ज्वरांत देवी, गोंवर, मधुरा अशा विशिष्ट जाती आहेत. मधुऱ्या तापाची मुदत बारा दिवसांपासून वीस दिवस, किंबहुना तीस दिवसपर्यंत देखील जाते. हा ताप बहुधा उन्हाळ्यांत येतो. हा सांथीनें येतो. या तापांत रोग्यास थोडासा घाम येतो, पण हिंवतापाप्रमाणें केव्हांहि हा अगदीं नाहींसा होत नाहीं. तापाच्या भरांत रोगी बडबडतो. रोग्यास उलटया होतात, हगवण लागते, तहान फार असते. तोंड, जीभ, नाक हीं लाल होऊन उतून येतात; अन्न खाण्याची इच्छा राहत नाहीं. कोरडी ढास लागते. रोग्यास कडू लिंबाच्या पाण्यानें स्नान घालणें हा एक उपचार होय. मनुका, पित्तपापडा, नागरमोथा, खारीक, गुळवेल अशा प्रकारच्या सौम्य जिनसांचा काढा सकाळ-संध्याकाळ द्यावा. स्वाभाविक गतीनें आपोआप मधुरा बाहेर पडतांच रोगी हुशार होतो.

**मधुसूदन सरस्वती** (१६५० चा सुमार)—एक संस्कृत ग्रंथकार. हा अद्वैत मताचा पुरस्कर्ता असून यानें द्वैताचें खंडन केलें. पुरुषोत्तम सरस्वतीचा हा गुरु. याचे गुरु विश्वेश्वर व श्रीधर सरस्वती. याचे 'अद्वैतसिद्धि', 'अद्वैतरत्नरक्षण', 'प्रस्थानभेद', 'सिद्धांततत्त्वबिंदु', वगैरे सुप्रसिद्ध ग्रंथ आहेत.

**मध्य अमेरिका**—या भौगोलिक विभागांत पनामाच्या संयोगभूमीपासून टेहुआनटेपेकच्या संयोगभूमीपर्यंतचा प्रदेश येतो. राजकीय विभागांत ग्वाटेमाला, हौंडुरस, सॅन साल्व्हाडोर, निकाराग्वा व कोस्टारिका हीं पांच लोकराज्यें समाविष्ट होतात. म्हणजे वायव्येस मेक्सिको व आग्नेयेस पनामा अशी मर्यादा पडते. याचें क्षे. फ. १,८८,९९९ चौ. मै. व लो. सं. ५३,७२,७९३. हा भाग बहुतेक डोंगराळ असून त्यांत पुष्कळ जिवंत ज्वालामुखीहि आहेत. हा चांगला सुपीक प्रदेश असूनहि फारसा वहित नाहीं. १९२१ सालीं येथें संघराज्य करण्याचा प्रयत्न झाला होता, पण तो सिद्धीस गेला नाहीं.

**मध्य आफ्रिका**—याची निश्चित मर्यादा सांगतां येत नाहीं. यात झांबेझीच्या उत्तरेकडचा मुलूख व उबंगीच्या दक्षिणेकडचा मुलूख येतो; व आल्बर्टाइन खोऱ्यापासून ते अॅटलांटिकपर्यंत हा पसरला आहे असें म्हणतां येईल. उत्तर ऱ्होडेशिया, न्यासालंड, पोर्तुगीज पूर्व आफ्रिकेचा कांहीं भाग, बेल्जिअन काँगो व अंगोला हे देश या विभागांत येतात.

**मध्य आशिया**—उत्तर अक्षांश ३०° आणि ४०° व पूर्व रेखांश ५५° आणि ८५° यांमधील प्रदेशाला म्हणतात. चीन, अफगाणिस्तान व कॅस्पियन समुद्र यांमधील रशियन मध्य आशियांत निरनिराळीं सोव्हिएट राष्ट्रें आहेत.

**मध्यदेश**—गंगा आणि यमुना या दोन नद्यांमधील प्रदेश. मानवधर्मशास्त्राप्रमाणें उत्तरेस हिमालय, दक्षिणेस विंध्य, पश्चिमेस विनशन देश आणि पूर्वेस प्रयाग (अलाहाबाद) हीं असलेला हा प्रदेश (म्हणजे जेथें सरस्वती अरण्यांत गुप्त होते आणि गंगा-यमुनांचा संगम होतो तेथपर्यंत पूर्वसीमा असलेला प्रदेश) होय. या प्रदेशांत कुरु, पंचाल, वश व उशीनर मागाहून अगदीं बेपत्ता झाले. मध्यदेश हा कुरु पंचालांचा देश होता व याच देशांत ब्राह्मणें व उत्तरकालीन संहितामंत्र रचिले गेले. संहितीकरणेंहि येथेंच झालीं असावींत. ह्याच्या पूर्वेस कोसल-विदेह असून पश्चिमेस ओसाड प्रदेश होता.

पौराणिक कालांत मध्यदेशाची मर्यादा सरस्वती नदी गुप्त होते त्या स्थळापासून म्हणजे भटनेरपासून अलाहाबादेपर्यंत होती. ही पूर्व-पश्चिम मर्यादा असून उत्तरेस हिमालय पर्वत व दक्षिणेस विंध्याद्रि पर्वत होता. यांमधील सर्व भाग मध्यदेशांत समाविष्ट होत होता. विद्या, कला, वगैरे दृष्टींनीं पाहतां एका वेळेला येथें ब्राह्मणांचें वर्चस्व कळसाला पोंचलें होतें. या भागाला हिंदु लोक 'पवित्र भूमि' समजून मान देतात. ६ व्या शतकांत होऊन गेलेल्या वराहमिहिरानें मध्यदेशाची मर्यादा पुढीलप्रमाणें दिली आहे: पश्चिमेस मारवाडपासून यमुनानदीच्या तीरावरचा भाग व विंध्याद्रि ही दक्षिण सरहद्द. अल्बेरुणीनें कनोजच्या सभोंवतालच्या प्रदेशाला मध्यप्रदेश म्हटलें आहे.

**मध्यप्रदेश (मध्यप्रांत व वऱ्हाड)**—हिंदुस्थानच्या मध्यभागांतला एक प्रांत. क्षेत्रफळ ९८,५७५ चौ. मै. व लो. सं. १,६८,२२,०००. उत्तरेस मध्य हिंदुस्थान आणि बिहार, नैर्ऋत्येस हैद्राबाद व आग्नेयेस ओरिसा आहे. मांडलिक संस्थानें या प्रांतांत जीं १५ होतीं तीं—बस्तर, जशपूर, कांकेर, खैरागड, राजनांदगांव, रायगड, सिरगुजा, सारंगगड, सक्ती, उदेपूर, कोरिया, चंगमखार, कवर्धा, मकाई व छुईखदान हीं होत. यांत वऱ्हाडचे अकोला, उमरावती, यवतमाळ व बुलढाणा हे चार जिल्हे, व सागर, जबलपूर, मंडला, छिंदवाडा, बैतुल, हुशंगाबाद, नेमाड, वर्धा, नागपूर, चांदा, भंडारा, बालाघाट, द्रुग, रायपूर व बिलासपूर असे १५ जिल्हे मिळून १९ जिल्हे आहेत. १९०३ सालीं निजामाकडून वऱ्हाड घेऊन या प्रांतास जोडला तेव्हां 'मध्यप्रांत व वऱ्हाड' असें जोडनांव पडलें. यानंतर १९०५ ते १९३५ पर्यंतच्या काळांत शेजारच्या बंगाल आणि ओरिसा प्रांताबरोबर किती तरी प्रादेशिक देवाण-घेवाण चालली

होती. येथील मुख्य धंदा शेती असून भात, गहूं, हरभरा, गळिताचीं धान्यें, कापूस, ज्वारी, वगैरे पिकें होतात. वऱ्हाडांत कापूस, पूर्व भागांत तांदूळ व उत्तर भागांत गहूं पिकतो.

मध्यप्रदेशाची हवा फार कोरडी आहे. फार थंडी किंवा फार उष्णता हा नेहमींचा प्रकार आहे. पावसाचें मान सरासरी ५० इंच आहे; वऱ्हाडांत मात्र ३२ इंच आहे. जंगल फार फायदेशीर आहे. संस्थानी मुलूख सोडून पाटबंधाऱ्यामुळें भिजलेली जमीन १९४४-४५ सालीं ७,२७,५३६ एकर होती. नागपूर हें सुताचें आणि कापडाचें केंद्र आहे. १९४४ सालीं या प्रांतांत सर्व प्रकारचे मिळून १२०८ कारखाने होते. जबलपूर जिल्ह्यांत मोठा सीमेंटचा कारखाना आहे. मँगेनीज धातु काढणें हा सर्वांत मोठा धंदा (७० खाणी) असून कोळशाच्या खाणी (४०) हा त्याच्याखालोखाल मोठा धंदा आहे. जबलपूर येथें संगमरवरी दगड, चुनखडी, भांड्यांची माती, शंखजिरे, वगैरेच्या खाणी आहेत. विड्या करण्याचा धंदाहि मोठा आहे; ५०,००० वर लोक यांत काम करतात. नागपूर आणि गोंदिया येथें कांचेचे कारखाने आहेत. नागपूर विद्यापीठ १९२३ सालीं स्थापन झालें. नेहमींच्या शाळा-कॉलेजांखेरीज स्थापत्य विद्यालय व धंदेशिक्षणाच्या कांहीं संस्था आहेत. १९४६ सालीं सागर येथेंहि एक विद्यापीठ निघालें.

१९३५ च्या कायद्याप्रमाणें हा गव्हर्नरचा प्रांत झाला असून याला स्वायत्तता इतर प्रांतांप्रमाणें मिळाली आहे. आज कॉंग्रेस पक्षाच्या धोरणानें मंत्री निवडले असून पहिले हिंदी गव्हर्नर ना. पक्वासा हे कॉंग्रेसपक्षीय आहेत. यांत एक विधिमंडळ आहे. सभासदांची संख्या ११२ असते. यापुढें नवीन भारतीय घटनेप्रमाणें राज्यकारभार चालेल. नागपूर हें राजधानीचें शहर आहे. त्याच्याखालोखाल जबलपूर मोठें व महत्त्वाचें आहे. प्रांताचें उत्पन्न सु. १७ कोटी रु. आहे. यांतील १५ संस्थानें १९४८ सालीं प्रांतांत विलीन झालीं.

आर्य लोक या प्रदेशांत येण्यापूर्वी येथें गोंड, भिल्ल, वगैरे आदिवासींची वस्ती होती व त्यांचींच राज्यें होतीं. भोंसल्यांचा अमल होईपर्यंत यांचें वर्चस्व होतें. पण पुढें हे लोक पुन्हां डोंगर-जंगलांच्या आश्रयास गेले. त्यांची लोकसंख्या प्रांताच्या लोकसंख्येच्या $\frac{1}{5}$ तरी आहे. सध्यांचे लोकविभाग भाषानुसारी आहेत. प्रांताच्या उत्तरेस आणि पूर्वेस हिंदी लोकांचा भरणा आहे तर मराठी बोलणारे लोक वऱ्हाडांत आणि प्रांताच्या पश्चिम आणि मध्य भागांत आहेत. शें. ५६ लोक हिंदी भाषिक, ३१ मराठी व ७ गोंडी भाषिक आहेत.

वऱ्हाडांत मुसलमान राजे होते तर मध्यप्रांतांत गोंड राजे होते. वऱ्हाडची मालकी पुढें निजामाकडे गेली तशी मध्यप्रांतावर सत्ता मराठ्यांची बसली. १८५३ सालीं इंग्रजांनीं भोसल्याचें राज्य खालसा केलें व १९०२ सालीं लांब भाडेपट्ट्यानें निजामाकडून वऱ्हाड मिळविला व अशा रीतीनें हा प्रांत बनला. १९५० च्या भारतराज्यघटनेप्रमाणें याचें नांव 'मध्यप्रदेश' असें ठेवण्यांत आलें.

**मध्यभारत**—१९४८ सालीं हिंदुस्थानांत संस्थानांचे निरनिराळे जे गट पडले त्यांत माळव्यांतील संस्थानांचा एक गट किंवा संघ बनला. उत्तर हिंदुस्थान आणि माळवा यांतील मराठी साम्राज्याचे अवशेष म्हणून जीं संस्थानें होतीं तीं सर्व यांत आलीं आहेत. अलीराजपूर, बरवाणी, देवास (थोरली व धाकटी पाती), धार, ग्वाल्हेर, इंदूर, जावरा, झाबुआ, खिलचीपूर, नरसिंगगड, राजगड, रतलाम, सैलाना, सीतामऊ, जोबात, काठेवाड, कुरवई, मठावर व पिपलोदा हीं लहानमोठीं संस्थानें या संघांत एकत्र झालीं आहेत. या राज्यसंघाचें क्षे. फ. ४६,२७३ चौ. मै. असून लो. सं. ७१$\frac{1}{2}$ लाख आहे. उत्पन्न सुमारें ८ कोटी रु. चें आहे. राजप्रमुख ग्वाल्हेरचे महाराज असून उपराजप्रमुख इंदूरचे महाराज आहेत. प्रांतांतल्याप्रमाणें राज्यकारभार लोकनियुक्त मंत्र्यांच्या हातीं आहे. राजधानी कांहीं काळ ग्वाल्हेर व कांहीं काळ इंदूर येथें असते.

**मध्य हिंदुस्थान**—या जुन्या एजन्सी भागांत बहुतेक देशी संस्थानेंच होतीं. क्षे. फ. ५२,०४७ चौ. मैल व लो. सं. (१९४१) ७५,०६,४२७. मध्य हिंदुस्थानांत मुख्य संस्थानें इंदूर, भोपाळ, धार, रेवा, जावरा, दतिया व ओर्च्छा हीं सात असून त्यांपैकीं भोपाळ आणि जावरा हीं दोन मुसलमानी व बाकीचीं हिंदु आहेत. यांशिवाय लहान लहान संस्थानें अनेक असून तीं वरील मोठ्या संस्थानांचीं मांडलिक आहेत. या संस्थानांची संख्या १५३ आहे. बाघेलखंड एजन्सी, हींत १२ संस्थानें (मुख्य संस्थान रेवा); भोपाळ एजन्सी, हींत १९ संस्थानें (मुख्य संस्थान भोपाळ); सदर्न स्टेट्स एजन्सी, हींत २१ संस्थानें (मुख्य संस्थान धार); बुंदेलखंड एजन्सी, हींत २२ संस्थानें (मुख्य संस्थानें दतिया व ओर्च्छा); इंदूर रेसिडेन्सी, हींत ९ संस्थानें (मुख्य संस्थान इंदूर); आणि माळवा एजन्सी, हींत ३८ संस्थानें (मुख्य संस्थान जावरा). मध्य हिंदुस्थानचे भूपृष्ठदृष्ट्या सपाटी, पठार व डोंगराळ प्रदेश असे तीन विभाग आहेत. आतां मध्यभारत, विंध्यप्रदेश यांसारखे राज्यसंघ होऊन मध्य हिंदुस्थान असें राहिलें नाहीं.

**मध्वमुनि** (समाधि १७३४)—एक मराठी संतकवि. हा नाशिकचा राहणारा. याचें मूळचें नांव त्र्यंबक होतें. याचे वंशज पैठणकडे आहेत. याची बरीच कविता पैठणास व औरंगाबादेस उपलब्ध आहे. गणेशस्तुति, गणेशाष्टक, गंगाष्टक, घनेश्वर-

चरित्र, प्रल्हादचरित्र, बिल्वाष्टक, वगैरे याचीं काव्यप्रकरणें आहेत. याचा शिष्य सुप्रसिद्ध अमृतराय होय. त्याला मध्वमुनीनें सन्मार्गावर आणिलें अशी आख्यायिका आहे. याची समग्र कविता आतां प्रसिद्ध झाली आहे.

**मध्वाचार्य**—द्वैतमताचे प्रस्थापक मध्वाचार्य ऊर्फ श्रीमदानंदतीर्थ यांचा जन्म शालिवाहन शक ११११ त उडुपीजवळ जरतपीठ येथें झाला. म्हणजे रामानुजांनंतर सुमारें पावणेदोनशें वर्षांनीं झाला. हे तुलुव देशांत राहणारे होते. यांच्या पित्याचें नांव मोधिजी भट्ट असें होतें. यांनीं अनंतेश्वर मठांत वेदाभ्यास करून, शांकरमतानुसार संन्यासदीक्षा घेतली. त्या वेळीं त्यांस पूर्णप्रज्ञ हें नांव देण्यांत आलें. पुढें यांचे गुरु अच्युतप्रेक्षाचार्य यांनीं आनंदतीर्थ हें नांव ठेवलें. मध्वाचार्य फार धर्मनिष्ठ व विद्वान् होते. त्यांनीं शंकराचार्य यांच्या मतांचा चौकस बुद्धीनें अभ्यास केला तेव्हां शंकराचार्यांचें अद्वैत मत त्यांच्या मनाला पटलें नाहीं. माया, मिथ्यात्ववाद खरा नसून वासुदेवभक्ति हीच मोक्षास कारणीभूत होते, असें त्यांनीं प्रतिपादिलें. रामानुजाचार्यांचा सिद्धांत जरी मध्वाचार्यांस खरा वाटला तरी परब्रह्म व जीव कांहीं अंशीं एक आणि कांहीं अंशीं भिन्न मानणें परस्पर विरुद्ध असून असंबद्ध आहे. यासाठीं जीव व परब्रह्म मानणें योग्य आहे. पूर्णपणें किंवा अंशतःहि त्यांचें ऐक्य होणें शक्य नाहीं—असें मध्वाचार्यांचें मत बनलें. त्यांनीं या मताचा नेटानें प्रसार केला. यास द्वैतमत, द्वैती संप्रदाय किंवा माध्वसंप्रदाय असें म्हणतात. मध्वाचार्यांनीं 'प्रस्थानत्रयी'वर जीं भाष्यें रचिलीं त्यांत व त्यांच्या सर्व ग्रंथांत द्वैतमतच व्यक्त होत आहे असें दाखविलें आहे. मध्वाचार्यांनीं विष्णु हाच जगन्नियंता आहे असें सांगितलें.

जीव हा विष्णूचा दास असल्यानें तो कधींहि परमात्म्याशीं—विष्णूशीं समानता पावणार नाहीं. जीवात्म्याचा परमात्म्यांत लय होतो हें संभवनीय नाहीं. जीवास कैवल्य प्राप्त होतें त्या वेळीं त्याचें तेज परमात्म्याच्या तेजापुढें फिक्कें पडतें. शैवांचा योग व वैष्णवांची सायुज्य मुक्ति यांहून मध्वाचार्यांचा मोक्ष भिन्न प्रकारचा आहे. त्यास वैकुंठ म्हणतात. वैकुंठनाथाचे गुण जाणल्यानें त्याची कृपा प्राप्त होऊन मुक्ति प्राप्त होते. विष्णुदेवतेच्या ठायीं अखंडित प्रेम हेंच मोक्षाचें कारण आहे. या प्रकारें ज्यास मोक्ष प्राप्त होतो त्याला पुनर्जन्म नाहीं. या प्रकारच्या मतांचा द्वैतपंथांत समावेश करण्यांत आला आहे. यांनीं आपल्या मताप्रमाणें ब्रह्मसूत्र, गीता व कांहीं उपनिषदें यांवर भाष्यें लिहिलीं आहेत. मध्वाचार्यांनीं शके १२०० च्या सुमारास बदरिकाश्रमीं प्रयाण केलें व गुप्त झाले म्हणतात.

विष्णूप्रीत्यर्थ शालिग्राम शिळेची व मूर्तीची पूजा यांनीं प्रचारांत आणिली. त्यांनीं सुब्रह्मण्य, उडुपी आणि मध्यतळ या तीन ठिकाणीं मठ स्थापन केले व त्यांत शालिग्रामाची प्रतिष्ठापना केली. मध्वाचार्यांनीं उडुपीशिवाय इतर आठ ठिकाणीं मठ स्थापन केले. त्यांत आठ ब्राह्मण संन्याशांस मठाधिपति केलें. पद्मनाभतीर्थ, नरहरितीर्थ, माधवतीर्थ व अक्षोभ्यतीर्थ हे मध्वाचार्यांचे चार प्रसिद्ध शिष्य होत.

मोक्षप्राप्तीसाठीं परमात्म्याचीं अंकनें मध्वानुयायानें आपल्या शरीरावर डागून घेतलीं पाहिजेत. भक्तिमार्गीतल्याप्रमाणें नामस्मरण व भजन संप्रदायांत असतें. यांत विष्णूच्या खालोखाल वायूला, वायुपुत्र भीमाला महत्त्व आहे. मध्वानुयायांची संख्या पाऊण लाख असावी.

**मन**—भारतीय दर्शनें, कामशास्त्र, वैद्यकशास्त्र, साहित्यशास्त्र, योगशास्त्र व अध्यात्म इतक्या निरनिराळ्या विद्या व शास्त्रें यांमध्यें मनासंबंधीं विचार केलेला आहे. अध्यात्मशास्त्रांत मन, बुद्धि व आत्मा हीं तीन पृथक् मानलीं आहेत. "...इंद्रियेभ्यः परं मनः। मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥" (गीता ३. ४२). वैशेषिक दर्शनांत (अ. ३ आन्हिक २ सू. १) "आत्मेंद्रियार्थसंनिकर्षे ज्ञानस्य भावोऽभावश्च मानसो लिंगम्।" असें मनाचें वर्णन केलें आहे. याचा अर्थ आत्म्याचा व इंद्रियार्थांचा संनिकर्ष झाल्यावर बाह्य वस्तूंचें ज्ञान आत्म्याला मनाच्या द्वारें होतें. तसेंच "व्यवसायात्मिका बुद्धिर्मनो व्याकरणात्मकम्।" म्हणजे बुद्धि हें व्यवसाय करणारें म्हणजे सारासार विचार करून निर्णय करणारें आणि मन हें व्याकरण म्हणजे अमलबजावणी करणारें, असा बुद्धि व मन यांत भेद केलेला आहे. आत्मा व मन यांत भेद असा कीं, आत्मा स्वयंभू, स्वायत्त, स्थिर, सर्वव्यापी व अमर आहे. मन हें शरीराबरोबर उत्पन्न होणारें व म्हणून शरीरतंत्र आणि शरीराबरोबर नाश पावणारें व प्रत्येक क्षणाला बदलणारें, अत्यंत अस्थिर व चंचल आहे. मनाला विकास व क्रमांकित लय आहे, आत्म्याला नाहीं. योगशास्त्र ही सर्वांशीं मानसशास्त्रात्मक कला आहे—"योगश्चित्तवृत्तिनिरोधः" अशी व्याख्या पतंजलीनें केली आहे.

मनासंबंधीं स्वतंत्र विवेचन बदलापूरचे चिकित्सक विद्वद्वर्य श्री. ना. गो. चापेकर यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहेः—

शरीरांत मेंदू म्हणून एक पदार्थ आहे. या मेंदूचींच मन व बुद्धि हीं अंगें आहेत. मस्तकाच्या पाठीमागल्या बाजूला मेंदूचें स्थान आहे. मेंदूचीं जीं निरनिराळीं कार्यें होतात त्यांवरून मन व बुद्धि हे भेद पाडण्यांत आले. मेंदूव्यतिरिक्त मन व बुद्धि

ह्यांना अस्तित्वच नाहीं. ह्या गोष्टी आतां शास्त्रीय दृष्ट्या सिद्ध झाल्या आहेत.

शरीर म्हणजे देह, मन व बुद्धि अथवा मेधा ह्यांच्या क्रिया व प्रतिक्रिया परस्परांवर होत असतात. आजारांत आपल्या बुद्धीची तरतरी मंदावते; तरुणपणीं करारी व दृढनिश्चयी असलेला मनुष्य वृद्धापकाळीं भेण्या बनतो, हा अनुभव सर्वांना आहे. शरीर दुर्बल झाल्यानें मन व बुद्धि दोन्ही दुर्बल होतात; उलट विकारी मन शरीर रोगी करतें; त्याचप्रमाणें निर्बुद्ध असलेलीं वन्य माणसें संख्येनें घटत आहेत अशी ओरड आपल्या कानांवर येते. ह्या क्रिया कधीं साक्षात् तर कधीं परोक्ष अशा रीतीनें घडतात. ह्या प्रकारामुळें गोंधळून सर्व एकच आहेत, हा भ्रम होऊं देतां कामा नये. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानांत–गाड्याबरोबर नळ्याची यात्रा होते तद्वत्–जीव आणि मन ह्यांची स्थिति झाली होती. जीवाला सोडून मनाचा विचार होत नसे. आजचे शास्त्रज्ञ मन व बुद्धि ह्यांची सांगड घालतात. ह्यांतून मनाची सुटका करणें अवश्य आहे. विवेक व आकलन हीं विशेषतः बुद्धीचीं कार्यें आहेत. म्हणून बुद्धीचा व मनाचा अभ्यास स्वतंत्रपणें केल्यानें मानसशास्त्राला मदत होईल, ह्यांत संशय नाहीं. मनाचें जें विशिष्ट कार्य असेल त्याचाच विचार मानसशास्त्रांत करणें युक्त होईल.

मनांत येणें, इच्छा होणें, हा मनाचा निरंतरचा व्यापार आहे. ह्यालाच वासना असे म्हणतात. श्वासोच्छ्वास हा जसा सारखा चालू असतो त्याप्रमाणें मनोव्यापार अव्याहतपणें चाललेला असतो. रितें मन कधींच नसतें असें म्हणतात. कांहीं तरी मनांत घोळत असतें. बुद्धीचा उपयोग मुळींच न करणारीं अथवा क्वचित् करणारीं माणसें आढळतील, परंतु निश्चल मनाचीं माणसें सांपडणें जवळजवळ अशक्य. सुखदुःखाचा अनुभव घेणें हा मनाचा दुसरा एक प्रमुख धर्म आहे. मनुष्य कधीं आनंदी असतो तर केव्हां खिन्न असलेला आढळतो. बाहेर जें कांहीं घडेल त्याच्या योगानें मनावर अनुकूल अगर प्रतिकूल आघात होतात. अनुकूल म्हणजे मनाला प्रिय असलेल्या आघातांनीं तो सुखी होतो. प्रतिकूल किंवा अप्रिय क्रिया त्याला दुःखी करतात. गांधीवधाची हकीकत कानीं पडतांच कित्येक माणसें पराकाष्ठेचीं दुःखी झालीं तर दुसऱ्या कित्येकांना हर्षातिरेक झाला म्हणतात. येथें मनाला अनुकूल कोणतें व प्रतिकूल कोणतें ह्याचा निर्णय बुद्धीनें केला होता हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. एकुलता एक मुलगा मूर्ख, व्यसनी किंवा वेडा असेल तर त्याच्या मृत्यूनें बापाला दुःख तर होणार नाहींच; उलट मुलाच्या जिवंतपणीं सतत होणाऱ्या दुःखाचा परिहार झाल्यानें थोडेंसें मनाला बरेंच वाटेल. ह्या ठिकाणीं मनाच्या सुखदुःखाचें वातावरण बुद्धि निर्माण करिते असें म्हणावयास हरकत नाहीं. बाह्य घटना व बुद्धि ह्यांच्या संयोगानें अनुकूल किंवा प्रतिकूल क्रिया घडते. बुद्धीप्रमाणें बुद्धीतर ज्ञानेंद्रियांचा बाह्य वस्तूशीं संबंध आला असतां वरीलप्रमाणेंच अनुभव येत असल्याचें आढळेल. त्वचेचा विस्तवाशीं प्रत्यक्ष संबंध येतो तो मनाला दुःखकारक होतो. कारण हा संयोग प्रतिकूल आहे. जे सूर श्रवणेंद्रियाशीं अनुकूल संयोग करतात त्यांच्या श्रवणानें मन आनंदित होतें. तात्पर्य, सुखदुःख हे मनाचे धर्म आहेत. ज्ञानेंद्रियांच्या द्वारां होणारीं सुखदुःखें सर्व मानवांना कमीअधिक प्रमाणानें सारखींच असतात. कोणाच्याहि शरीराच्या त्वचेला अग्निस्पर्श झाला तर भाजण्याचें दुःख सर्वांना होतें. ह्याच्या उलट बुद्धिप्राप्य सुखदुःख निरनिराळ्या माणसांत वेगवेगळें आढळून येईल. माणसांचीं पंचज्ञानेंद्रियें प्रायः सारखींच असतात. बुद्धीचें तसें नसतें. बुद्धीची विविधता सर्वांच्या परिचयाची आहेच, पण शिवाय तिच्या वाढींतसुद्धां कमी-अधिकपणा असतो. बुद्धि कमवावी लागते; ज्ञानेंद्रियें स्वयंसिद्ध असतात; हा दोहोंमधील फरक इंद्रियद्वारां होणाऱ्या संवेदना ज्या पशूंमधून मानव जन्मास आला असें शास्त्रज्ञ सांगतात त्या पशूंमध्यें व मानवामध्यें सारख्याच असतात. म्हणून त्यांना होणाऱ्या ह्या तऱ्हेच्या सुखदुःखांचें स्वरूप प्रायः सारखेंच असतें. पशूंचेंहि अंग भाजतें; त्यांच्या खाण्याच्या पदार्थासंबंधानेंहि कांहीं रुचकर, कांहीं अरुचिकारक असा भेद ते करतातच. मानव व पशु ह्यांत जो फरक आढळतो तो बुद्धिगम्य संवेदनांपुरता. ह्या संवेदनांचा पशूंच्या बाबतींत जवळजवळ अभाव असतो असें म्हटलें तरी चालेल. ह्यावरून सुखदुःख ही एक मनाची अवस्था आहे असें आपण म्हणतों तें बौद्धिक संवेदनांपुरतें खरें आहे.

वरील विवेचनावरून असें दिसेल कीं, संवेदना मनापर्यंत जाऊन पोंचल्यावांचून सुखदुःखाचा अनुभव येणार नाहीं. अर्थात् संवेदनांची जाणीव मनाला व्हावी लागते. ह्यास्तव हा जाणीवपणा हाहि एक तिसरा मनाचा धर्म मानण्यांत येतो. सारांश, ज्ञान, वासना व सुखदुःखानुभूति हा मनाचा स्वभाव ठरतो. ह्यापैकीं ज्ञान हा मनाच्या देहावर घडणारा परिणाम आहे म्हणून तो एकविध असतो. तसेंच सुखदुःखाचा अनुभव वेगळा असला तरी जो अनुभव येतो तो एकच. एक सुख तरी, नाहीं तर एक दुःख तरी. वासना मात्र अनेक असतात. वासनेला अंत नाहीं असें म्हणतात तें खरें आहे. मला पुत्र हवा; स्त्री हवी; संपत्ति हवी; लौकिक हवा; अधिकार हवा; ही वस्तु हवी; ती वस्तु हवी, इ. मनाचा हा प्रचंड हव्यास असतो. प्रचंड असतो इतकेंच नव्हे तर तो अविरत असतो. हें हव्यासाचें

आणखी वैशिष्ट्य आहे. अशा स्वरूपाच्या ह्या वासना हा मानसशास्त्राच्या अभ्यासाचा एक विषय आहे.

वासनांचें पृथक्करण केलें तर आपणांस आढळेल कीं, कांहीं वासना मूलभूत असून कांहीं तदवलंबी असतात. वर जो हव्यास वर्णिला तो हव्यास स्वतःच्या सुखाकरिता असतो. आत्मेतर सर्व वस्तू मात्र– त्या सचेतन असोत अगर जड असोत– आपल्याला हव्याशा वाटतात. आपली त्यांजवर प्रीति जडते ती आपल्यासाठीं; "आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति।" हें ऋषींनीं काढलेलें सार निरपवाद आहे. आपल्याकरितां म्हणजे आपण जगावें म्हणून माणसाला जिवंत राहण्याची तीव्र इच्छा असते. जिवंत राहण्याच्या इच्छेंतच सुखानें जगण्याच्या इच्छेचा अन्तर्भाव होतो. जगण्याची इच्छा असली कीं मृत्यु अप्रिय होणें स्वाभाविक आहे. तो शक्य तोंवर टळावा म्हणून आपण अटोकाट प्रयत्न करितों. हे सर्व व्यापार जगण्याच्या इच्छेमुळें होतात. मृत्यु आपोआप येतो तेव्हां आपला निरुपाय असतो. तथापि मनुष्याचा जीव घेणें हें मनुष्य करूं शकतो. ह्यास व दुसऱ्याकडून आपण मारलें जाऊं नये म्हणून आत्मसंरक्षणाचे उपाय योजावे लागतात. जेव्हां शत्रु आपल्याहून वरचढ असेल तेव्हां आपणांस त्याची भीति वाटते. सापाला आपण कां भितों तर त्यानें दंश केला असता तो आपला खात्रीनें प्राणघात करील म्हणून. सुखानें जगतां यावें म्हणून आपण तद्विषयक साधनें जुळविण्याच्या उद्योगाला लागतों. कारण अन्नपाणी, घरदार व वस्त्रप्रावरण ह्यावांचून प्राणधारणा होत नाहीं. आपत्कालीं सुद्धां अवश्य त्या साधनांचा तुटवडा पडूं नये म्हणून दक्षता घ्यावी लागते. ह्यांतूनच लोभाची वृत्ति उमटते. आपल्या जीवनाच्या आड जो येतो त्याच्याविषयीं आपल्या मनांत द्वेष उत्पन्न होतो. जो आपल्यापेक्षां वरचढ असतो त्याच्याविषयीं मत्सराची भावना आपल्या मनांत उद्भवते. ह्याप्रमाणें द्वेष व मत्सर ह्या विकारांची उत्पत्ति होते. ह्यावरून स्पष्ट दिसतें कीं, जिवंत राहण्याच्या एका वासनारूपी वृक्षाला लोभ, भीति, द्वेष, मत्सर, इ. विकाररूपी फळें लागतात. ह्या विकारानुरूप शरीरावर परिणाम घडतो. क्रोधानें चेहरा लालबुंद होतो. भीतीनें अंग थरारतें, इ.; हे प्रकार विकारजन्य आहेत. वासना व इच्छा ह्यांत थोडा फरक आहे. वासना पुसट असतात; इच्छा दृढ असते.

ह्याखेरीज आणखी एक वासना कीं, जिला मूलभूत म्हणतां येईल अशी आहे. ती म्हणजे विषयवासना होय. ही वासना नैसर्गिक आहे व तिची प्रजोत्पादनाकरितां आवश्यकता आहे. वैषयिक वासनेच्या अभावीं प्रजोत्पादन अशक्य आहे. कित्येक तर प्रजोत्पादनाची इच्छा हिलाच प्राधान्य देतात. संतत्युत्पादन व मैथुन ह्यांत कार्यकारणभाव आहे. परंतु उपर्युक्त दोन वासनांत तो आहे काय हें सांगणें कठिण आहे. प्रजोत्पादनाची ही मुख्य वासना धरली तर विषयवासना गौण मानणें भाग आहे. परंतु प्रजोत्पादनाची कल्पनाहि नसते, तेव्हां वैषयिक वासनेचा प्रादुर्भाव झालेला असतो. शिवाय पशुपक्ष्यांत ही वासना असते. असें असून त्यांच्या ठिकाणीं संततीची इच्छा असते असें कोणी म्हणत नाहीं. ह्या कारणानें विषयवासना मुख्य धरणें योग्य होईल.

मनुष्याच्या उन्नतीला अवश्य असल्याकारणानें हें वासनाद्वय निसर्गानेंच निर्माण केलें आहे. मनुष्याच्या, त्याचप्रमाणें समाजाच्या उत्कर्षाला ह्या वासना कारणीभूत होतात. परंतु केव्हां? त्या नियंत्रित असतील तर. वासना, इच्छा व हाव अशा ह्या वरच्या वरच्या पायऱ्या आहेत. ह्यांपैकीं, शेवटची हाव ही हानिकारक आहे. वासनेची मजल हावेपर्यंत जातां कामा नये. म्हणून मनाला लगाम घालणें भाग आहे. मन बेलगामी ठेवल्यास मनुष्याचा पशु अगर राक्षस होईल. हें लगाम घालण्याचें काम करण्यासाठीं निसर्गानें बुद्धींद्रिय निर्माण केलें आहे. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें विवेक हें बुद्धीचें कार्य आहे. विवेकाच्या योगानें मनोवासना मर्यादेत ठेवाव्या लागतात. विवेकाच्या अभावीं मन मोकाट सुटेल व मनुष्य चोऱ्या करील; दुसऱ्याला फसवील; बदफैली बनेल. ह्यावरून बुद्धींद्रियाचें महत्त्व व आवश्यकता किती आहे, हें ध्यानीं येईल. विवेकी माणसें थोडीं. आतां बहुजनसमाज बेफाम रीतीनें वागत नाहीं, ह्याचें कारण धर्म, कायदा व समाज ह्यांची भीति हें होय. परंतु जेथें ही त्रयी प्रकटपणें कार्य करण्यास असमर्थ असते तेथें अविवेकी माणूस घसरल्यावांचून राहत नाहीं.

मनाचे अभ्यासक स्मरणशक्तीचा विचार केल्यावांचून राहत नाहींत. आपणांला जें जें ज्ञान होतें अथवा अनुभव मिळतो, त्याचा कायमचा ठसा मेंदूवर उमटतो असें मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. कारण पूर्वानुभवाची आपणांस कालांतरानें जी आठवण होते तिची उपपत्ति अन्यथा लावतां येणार नाहीं. पूर्वज्ञान हा स्मृतीचा आधार. नूतनज्ञानागम म्हणजे स्मृति नव्हे. ज्ञान व त्याची स्मृति ह्यांत कांहीं काळ जावा लागतो. सकाळीं पाहिलेली गोष्ट संध्याकाळीं एखाद्यास सांगितली तर ती आठवणीनें सांगितली असें आपण समजत नाहीं. ज्ञानग्रहण व स्मरण ह्यांत जो काल लोटतो त्यांत ज्ञानाची आपणांला जाणीव नसते. तें ज्ञान अप्रकट रीतीनें दडून राहिलेलें असतें. कारणपरत्वें तें जागृत होतें. ह्याला आपण आठवलें अगर स्मरण झालें असें म्हणतों. जेव्हां त्या ज्ञानाचा जवळजवळ लोप होतो तेव्हां त्या अभावाला विस्मरण ही संज्ञा आपण देतों. ज्ञानाचा किंवा अनुभवाचा संग्रह करण्याची शक्ति जर निसर्गानें दिली नसती तर जीवन कंठणें अशक्य झालें असतें, व्यवहार बंद पडते, प्रगति

मुळींच झाली नसती. मानवाची जी आज प्रचंड सुधारणा दिसत आहे तिच्या श्रेयाचा बराच वांटा ह्या ज्ञानसंचयाला द्यावा लागेल, हें जितकें खरें तितकेंच विसरणें हेंहि मनुष्याच्या उन्नतीला पोषक असेंच आहे. विसरण्याची कला मनुष्याच्या स्थैर्याला, तशीच त्याच्या प्रगतीला उपकारक होणारी आहे. पंचेंद्रियांच्या द्वारां असंख्य घटनांचें ज्ञान मनुष्याला दररोज होत असतें. हें सर्व त्याच्या डोक्यांत सतत जाग्रत राहिलें तर त्याचें डोकें ठिकाणावर राहणार नाहीं. त्याला वेड लागेल. तात्पर्य, स्मृति व विस्मृति या दोहोंचें महत्त्व सारखेंच आहे. वस्तूचा इंद्रियाशीं संपर्क झाला म्हणजे त्याच्या संवेदना मनापर्यंत जाऊन पोंचतात व मनाला त्या वस्तूचें ज्ञान होतें. परंतु मेंदूच्या ज्या भागांत हें ज्ञान होतें तेथेंच त्या ज्ञानाचा सांठा होतो, कीं ह्या सांठ्याची जागा मनाहून निराळी आहे, हें अद्यापि निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं. एवढें खरें कीं, बुद्धीपेक्षां मनाशींच स्मरण-विस्मरणाचा अधिक निकट संबंध आहे. तल्लख बुद्धीचीं माणसें विसराळू असतात असा अनुभव आहे. स्मरण राहण्याला कोणते उपाय योजावेत ह्याचा विचार स्वतंत्र आहे. त्याचा ऊहापोह येथें करण्याचें कारण नाहीं.

वासनासातत्य अथवा नेहमीं व्याप्टत असणें हें मनाचें वैशिष्ट्य सांगितलें. परंतु हें वैशिष्ट्य जाग्रतावस्थेंतील मनाचें आहे. सुप्तावस्थेंत मनाचे व्यापार बंद पडतात. किंबहुना मन सुन्नें असणें हेंच निद्रेचें लक्षण समजतां येईल. झोंपेंत मन स्तब्ध असतें हें खरें; परंतु तें झोंप घेत असतें का जाग्रत असतें हा प्रश्न आपणांस सोडवावा लागेल. निर्व्यापार मन जाग्रत राहणें अशक्य नाहीं. जाग्रतावस्थेंतहि कांहीं थोड्या लोकांचीं मनें रितीं असूं शकतात असें म्हणतात. दिवसास ते अल्पकाळ का होईना पण शून्यमनस्क असतात. ही शक्यता जर ग्राह्य ठरली तर दुसऱ्या मनाची जरूरी कदाचित् उरणार नाहीं. मी पहांटेस चार वाजतां अभ्यासाला उठेन, असा संकल्प करून निजतो; आणि चमत्कार असा कीं, नेहमींचा सूर्यवंशी मनुष्य त्या दिवशीं नेमका चार वाजतां जागा होतो. ही जागा होण्याची सूचना त्याला कोण देते? जाग्रतावस्थेंत केलेला संकल्प ज्या मनानें सांठवून ठेविला त्याच मनाकडून वेळेवर जागा होण्याची सूचना मिळणें शक्य आहे. त्याकरितां निराळें मन मानण्याचें कारण नाहीं. मनाची विश्रांति म्हणजे निद्रा. दिवसभर थकलेल्या मनाला विसांवा पाहिजे. पुरेसा विसांवा मिळाल्यावर मन कामाला लागतें. ह्यालाच मनुष्य जागा झाला असें आपण म्हणतों. ह्यानें झोंपीं गेलेला माणूस जागा कसा होतो ह्याचें थोडेंसें उत्तर मिळतें. परंतु येथें विश्रांतीचा काल पुरा होण्याच्यापूर्वींच मनुष्य जागा होतो तो कसा? पहारेकऱ्याप्रमाणें शरीरांत कोणी तरी डोळ्यांत तेल घालून जपत असला पाहिजे. हा कोणी तरी म्हणजे मन किंवा सदैव जाग्रत असणारा जीव. जीवाकडून शरीरांतील घटकांना प्रेरणा मिळते असें ठरल्यास चार वाजतां उठण्याचा संकल्प झाला तो मनानें केला कीं जीवानें केला ह्याचा विचार पुनः करावा लागेल. मनानें संकल्प करून त्याची अमलबजावणी जीवावर सोंपवली गेली असाहि तर्क लढवितां येईल. पण मन-बुद्धीचीं सर्वच कामें जीव करतो असें म्हणावयास कोणती हरकत?

शतपथ ब्राह्मणांत झोंपेंत मन प्राणांत शिरतें व तें संकल्पशून्य असतें असें वचन आहे (न मनसः संकल्पयति।). हें जर खरें असेल तर दुसरें मन मानणें भाग पडेल. वैदिक कल्पना ही कीं, स्वप्नांत मन व बुद्धि स्वस्थ असून जीवाचे चाळे चालतात. अलीकडे जीवाला मनापासून विलग केला आहे. अर्वाचीन मानसशास्त्रज्ञ जीवाचा विचारच करीत नाहींत. आतां, सुषुप्तींत मन प्राणांत शिरून स्तब्ध राहतें असें मान्य केलें तरी स्वप्नावस्थेंत तें स्वतंत्रपणें वावरतें असेंहि म्हणतां येईल. कारण स्वप्न म्हणजे एक प्रकारची जाग्रतावस्थाच होय. शुद्ध जाग्रतीच्या पूर्वावस्थेंत स्वप्नें पडतात. स्वप्नानंतर मनुष्य जागा होतो. तेव्हां सुषुप्तीचा अमल कमी होतांच मनाचे व्यापार सुरू होणें स्वाभाविक आहे. मनाला दडपणारी एक सुषुप्तावस्थाच दिसते. दुसऱ्या मनाची कल्पना स्वीकारल्यास तें स्वप्नांत फक्त प्रकट होतें आणि जाग्रतींत निश्चेष्ट असतें असें म्हणावें लागेल. मात्र निश्चेष्ट म्हणजे निःसंवेदन नव्हे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. स्वप्न ही एक अतर्क्य घटना आहे. फ्राइडनें अपूर्व बुद्धिमत्ता खर्च करून आपल्या स्वप्नमीमांसेनें मानसशास्त्रांत जरी क्रांतिकारक शोध लावला असला तरी ती ह्या अफाट विषयाची केवळ अंशात्मक चर्चा आहे असें आतां वाटूं लागलें आहे. स्वप्नसंग्रहावांचून स्वप्नशास्त्र बनवितां येणार नाहीं. परंतु स्वप्नसंग्रहाच्या कल्पनेनेंच अजून मूळ धरलें नाहीं.

यानंतर वेडाचा विचार करावयास पाहिजे; वेडाचें मूळ बुद्धींत आहे. वेड म्हणजेच बुद्धिभ्रंश होय. (वेड पाहा.)

भावनांचा विचार केल्यावांचून मनाची मीमांसा पुरी होणार नाहीं. भावना शब्द प्रायः मराठी आहे आणि तो इंग्रजींतील 'फीलिंग' ह्या शब्दाऐवजीं वापरण्यांत येतो. ह्या अर्थानें त्याचा वापर कांहींसा अलीकडेच झाला आहे. संस्कृतमध्यें भावना शब्दाचा अर्थ अभिनिवेश, श्रद्धा, निष्ठा असा होतो. 'नचायुक्तस्य भावना' हें गीतावचन पाहा. मराठीमध्यें मनाला वाटणें-जें वाटतें तें-ह्या अर्थानेंच भावना शब्द वापरणें योग्य होईल. इच्छिणें, वासना होणें, हा जसा मनाचा धर्म, तद्वत् वाटणें हाहि एक आहे. ह्या वाटण्याला भावना असें म्हणावें. ईश्वर

आहे असें वाटणें ही ईश्वरविषयक भावना होय. मला माझा मुलगा संभाळील असें आईला वाटतें. ती तिची भावना. मात्र हें वाटणें तर्काधिष्ठित असतां कामा नये. बौद्धिक प्रक्रियेनें ईश्वराचें अस्तित्व पटणें किंवा मुलगा सांभाळ करील हें जर अनुमानाचें कार्य असेल तर ती भावना होणार नाहीं. भावनेशीं बुद्धीचा अथवा विवेकशक्तीचा चिलकुल संबंध असतां कामा नये. वाटण्याचा हा प्रकार श्रद्धा, विश्वास, निष्ठा ह्या शब्दांनीं व्यक्त केला जातो. वासना स्वार्थी असते; वाटणें स्वार्थनिरपेक्ष असतें. क्रोध, लोभ, भय, द्वेष, इत्यादिकांस भावना म्हणणें गैर आहे. हे मनाचे विकार म्हणून मानणें युक्त होईल. इच्छिणें, वाटणें ह्या क्रिया मनाला चिकटलेल्या असतात; त्या मनाच्या प्रकृतिरूप असतात. क्रोधादि मनाचे अंगभूत म्हणून मानतां येणार नाहींत. फुलांचा वास जसा फुलांपासून अलग करितां येत नाहीं, तो त्या फुलातच असतो, त्याप्रमाणें मन म्हणजेच इच्छिणें, वाटणें होय. भाव व भावना एकच समजूं नये. "कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धा अश्रद्धा धृतिः अधृतिः ह्रीः धीः भीः इति एतत् सर्वं मन एव।" (श. ब्रा. १४-४-३-९) ही कांटेकोर परिभाषा नव्हे. हे मनोविकार आहेत इतकाच त्याचा अर्थ. ह्याच्यापेक्षां साहित्यशास्त्रकार ह्यांना स्थायी भाव म्हणतात. तें अधिक पद्धतशीर दिसतें. उदा.--

रतिः शोकश्च निर्वेदक्रोधोत्साहाश्च विस्मयः।
हासो भयं जगुप्सा च स्थायी भावाः क्रमादमी ॥

(रसगंगाधर)

पाश्चात्य कल्पना.— प्राचीन ग्रीक पंडित प्लेटो यांचें मत असें कीं, आत्म्यांतील बुद्धीचा अंश डोक्यामध्यें, विकारांचा हृदयामध्यें आणि वासनांचा शरीराच्या अधोभागांत वास करतो. गेलेनचें मत असें कीं, मेंदूमार्फत सर्व शरीरभर चैतन्यशक्तीचा पुरवठा होतो, व आत्म्याचें स्थान मेंदूच्या पोकळींत आहे. अशाच तऱ्हेचीं मतें १७ व्या शतकापर्यंत युरोपांत होतीं. नंतर मेंदूच्या व्यवच्छेदनक्रियेमुळें व्हॅरोलियसनें व इतर शास्त्रज्ञांनीं मेंदूचे निरनिराळे भाग करून विशिष्ट भाग विशिष्ट मानसिक व्यापार करतो, असें मत पुढें मांडलें. बुद्धिभ्रंश होऊन वेड लागलेल्या इसमांना पशूपेक्षांहि अधिक क्रूरपणानें वागवण्यांत येत असे. सुमारें १२५ वर्षांपूर्वी अमेरिकेंत डॉ. बेंजामिन रुश, इंग्लंडमध्यें डॉ. विल्यम टुक व फ्रान्समध्यें डॉ. फिलिप पिनेल या तीन महात्म्यांनीं वेड्या लोकांना वागवण्याच्या परंपरागत पद्धतीविरुद्ध बंड उभारलें. जुनी पद्धत अशी होती कीं, वेड्या इसमांना भूतपिशाचाची बाधा आहे अशा समजुतीनें इतर समाजापासून दूर घाणेरड्या अंधारकोठड्यात हातापायांत बेड्या घालून चाबकाच्या धाकाखालीं ठेवीत असत. डॉ. पिनेलनें असें प्रतिपादन केलें कीं, मन, मेंदू व शरीर यांचा परस्पर निकट संबंध असून मनुष्य भूतपिशाचबाधेमुळें वेडा होतो हा समज चुकीचा असून, मेंदू बिघडल्यामुळें मनुष्य वेडा होतो. डॉ. फ्रान्झ जोसेफ गॉल, डॉ. कास्पर स्पुर्झहीम, डॉ. लुई अँटॉइन डेस्मौलिन्स, सर चार्लस बेल, फ्रँकॉय मॅगेंडी, मार्शल हॉल, क्लॉड बर्नार्ड, हेल्महोल्टझ, ब्वॉथरेमेंट, हर्मन लॉटझ, ई. एच्. वेबर, डॉ. हार्टले, डॉ. चार्कोट, मेरीजीन पेरी फ्लॉरेन्स, डॉ. पॉलब्रोका, डॉ. बॉइलार्ड, डॉ. कॅमिले गॉल्गी, डॉ. रॅमोनी, कजेल, वगैरे संशोधकांनीं मेंदू, मज्जातंतू व पृष्ठवंशरज्जु यांचे व्यापार व परस्परसंबंध निश्चित केले, आणि लघुमस्तिष्क, मध्यमस्तिष्क, पृष्ठवंशरज्जु या आद्य मज्जासंस्थांमार्फत जे संवेदनात्मक संस्कार विस्कळितपणें होत असतात, त्यांचें अखेर एकत्रीकरण महामस्तिष्काच्या द्वारें होतें, व म्हणून महामस्तिष्क हाच उच्च प्रतीच्या बौद्धिक शक्तींचें स्थान होय, हा सिद्धान्त प्रस्थापित केला. मूर्च्छनाशास्त्र (हिप्नॉटिझम), आणि समभावनोत्पादन (टेलेपथी), प्लँचेट (मृतात्म्यांचें संदेशलेखन यंत्र), हें या संशोधनाचेंच फल होय. १८८२ मध्यें स्थापन झालेली 'सायकिकल रीसर्च सोसायटी' आत्मा, मन किंवा चैतन्य यांसंबंधीं केवळ भौतिक शास्त्रानुसार संशोधन करीत आहे. डॉ. मॅग्डूगल, डॉ. फ्रॉइड, युंग, प्रो. जेम्स, हे मानसशास्त्रावरील अगदीं अलीकडील लेखक होत.

**मॅन, थॉमस** (१८७५- )—१९२९ सालीं 'नोबेल' पारितोषिक मिळविणारा एक विख्यात जर्मन साहित्यिक. जीवनांत कलेचें कितपत स्थान आहे या प्रश्नासंबंधीं त्यानें आपल्या लिखाणांत पुष्कळ विवेचन केलेलें आढळतें. त्याचें बहुतेक आयुष्यहि या कामींच खर्ची पडलें आहे. या बाबतींत त्याची गोएटेशीं तुलना करतां येते. मृत्यु आणि सौंदर्य यांचा संबंध हा त्याचा दुसरा आवडता विषय आहे. 'डेथ इन् व्हेनिस' या पुस्तकांत हेंच आढळेल. जर्मन वाङ्मयाची उत्कृष्ट परंपरा आणि उद्दिष्टें यांवर श्रद्धा ठेवूनहि आजच्या काळच्या प्रश्नांविषयीं जागरूक राहण्याची त्याची कुवत पाहून आश्चर्य वाटतें. पण नाझींनीं याचीं प्रकाशनें जाहीर रीतीनें जाळलीं. १९३८ सालीं तो अमेरिकेचा नागरिक बनला.

**मॅन बेट**—हें बेट आयरिश समुद्रांत असून त्याचें क्षे. फ. २२१ चौ. मैल आहे. दुभतीं जनावरें पाळणें हा धंदा येथें चालतो. शिवाय गहूं, ओट व बार्ली हीं पिकें येथें होतात. शिसें, जस्त, चुनखडी, ग्रॅव्हेल जातीचा दगड, चिकण माती व वाळू हीं द्रव्यें येथें सांपडतात. येथील मूळची केल्टिक भाषा, मॅंक्स या नांवाची, हल्लीं लुप्त झाली आहे. या बेटाची राजधानी डगलस असून रॅम्से, पील व कॅसलटाउन हीं मुख्य शहरें आहेत.

सुट्टीच्या दिवसांत हवा पालटण्यास जाण्याचें हें महत्त्वाचें ठिकाण आहे. लो. सं. (१९३१) ४९,३०८ आहे.

ज्यूलियस सीझरच्या नांवानें हें बेट प्रसिद्ध होतें, व तेथें ५१७ सालीं वेल्श लोकांनीं वस्ती केली. १०९८ सालीं मेन लोकांनीं तें बेट जिंकलें. १२६६ सालीं स्कॉटलंडचा राजा ३ रा अलेक्झांडर याच्या ताब्यांत तें बेट गेलें; आणि शेवटीं १३४४ सालीं इंग्लंडनें आपलें वर्चस्व तेथें स्थापलें. इंग्लंडच्या वर्चस्वाखालीं या बेटावर १४०६ पासून १७३६ पर्यंत स्टॅनले कुटुंबांतील डर्बीचे अर्ल यांनीं आपला अमल चालवला. त्या कुटुंबाचा निर्वंश झाल्यामुळें तें बेट अॅथॉलच्या ड्यूकांच्या ताब्यांत गेलें, व त्याच्यापासून १७६४ सालीं ब्रिटिश राजानें तें विकत घेतलें. या बेटाचा राज्यकारभार एक ले. गव्हर्नर कायदेमंडळाच्या साहाय्यानें चालवतो; व या बेटाकडून ब्रि. साम्राज्याला १०,००० पौंड खंडणी मिळते.

**मॅनग्रोव्ह**—[ वर्ग–र्‍हिझोफोरासी. हा मूळ मलायी शब्द आहे. ] हीं झाडें उष्ण प्रदेशांत समुद्रकांठीं वाढतात. यांच्या मुळांमध्यें चिखल व पानपाचोळा अडकून राहतो. त्यामुळें समुद्रकांठची जमीन वाहून जाऊं नये म्हणून किंवा नवी तयार व्हावी म्हणून यांची लागवड करण्यांत येते. यांचें लांकूड काळसर तांबडें, कठिण व टिकाऊ असतें आणि साल कातडें कमविण्याच्या कामीं उपयोगी पडते.

**मनमाड**—मुंबई, नाशिक जिल्ह्याच्या चांदोर तालुक्यांतील गांव. लो. सं. सुमारें १७,०००. हें ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वेवर जंक्शन असून येथून हैद्राबाद संस्थानी रेल्वेचा फांटा फुटतो. येथून ४ मैलांवर अंकाईटकाईचा किल्ला आहे. येथें खानदेश व मालेगांव यांकडून कापूस येतो. येथें नगरपालिका आहे. येथून मालेगांवास जाण्याचा रस्ता आहे.

**मॅनरहीम, बॅरन कार्ल गुस्टाफ एमिल** (१८७७– )—हा फिनिश फील्ड-मार्शल फिन्लंडमधील व्हिलनॉस गांवीं एका स्वीडिश कुळांत जन्मला. १८८९ सालीं त्यानें रशियन सैन्यांत नोकरी पत्करली. १९०४–१९०५ सालीं रूसो-जपानी युद्धांत भाग घेतला, आणि १९१४ सालच्या महायुद्धांतहि भाग घेतला; व १९१७ सालीं तो रशियन घोडदळाचा मुख्याधिकारी झाला. १९१७ सालच्या रशियन राज्यक्रांतीनंतर फिनिश श्वेत दलांचा प्रमुख झाला. जर्मन सैन्याच्या मदतीनें त्यानें रशियन व फिनिश लाल सैन्याचा टॅमरफोर्स व व्हिबोर्ग या दोन ठिकाणीं पराभव केला. १९१८ डिसेंबर ते १९१९ जुलैपर्यंत तो फिन्लंडचा रीजंट होता; व १९१९ सालीं फिन्लंडमधील अध्यक्षपदाची पहिली निवडणूक झाली, त्यांत तो उमेदवार होता; पण तो निवडून आला नाहीं. त्याच्या सूचनेनुसार कॅरेलियन संयोगीभूमीवर फिनिश संरक्षक पद्धतीप्रमाणें 'मॅनरहीम लाइन' नांवाची संरक्षक तटबंदी तयार करण्यांत आली. रूसो-फिनिश युद्धांत फील्ड-मार्शल मॅनरहीमला फिनिश सैन्याचा कमांडर नेमण्यात आलें, व याच्या युद्धकौशल्यामुळें कांहीं काळ फिन्लंडला जय मिळाला.

**मनरो, जेम्स** (१७५८–१८३१)—अमेरिकन सं. संस्थानांचा ५ वा अध्यक्ष. १७९९ ते १८०२ पर्यंत तो व्हर्जिनिया संस्थानचा गव्हर्नर होता व १८०३ मध्यें फ्रान्सला परराष्ट्रीय वकील म्हणून गेला होता; व त्याच्या प्रयत्नानें लुसियाना प्रदेश १,५०,००,००० डॉलर किंमतीला मिळाला. १८१६ सालीं डेमोक्रॅटिक रिपब्लिकन पक्षानें त्याला अध्यक्ष निवडून दिलें. १८२० सालीं त्याच मुद्यावर तो पुन्हां निवडला गेला; त्या वेळीं फक्त एकच मत विरुद्ध पडलें होतें. त्यानें स्पेनला फ्लॉरिडा बेट सोडून देण्यास लावलें, आणि निग्रो लोकांच्या गुलामगिरीचा प्रश्न मिझोरीच्या तडजोडीनें सोडवला; त्यामुळें त्याची अध्यक्षाच्या जागीं दुसऱ्यांदां बिनविरोध (फक्त एकमत विरुद्ध) निवड झाली.

**मनरोचें तत्त्व**—अमेरिकेच्या सं. संस्थानांच्या राजकीय धोरणांतील एका तत्त्वाला हें नांव आहे. हें तत्त्व असें कीं, अमेरिका खंडांतील राजकीय बाबतींत युरोपांतील राष्ट्रांनीं ढवळाढवळ करतां कामा नये. रशियाच्या ताब्यांत अलास्का असतांना रशियन सरकारनें १८२३ सालीं अमेरिकेच्या वायव्य किनाऱ्यावर रशियाखेरीज इतर जहाजांना मज्जाव करण्याचा प्रयत्न केला, आणि प्रशिया, ऑस्ट्रिया आणि रशिया यांचा पवित्र दोस्तसंघ (होली अलायन्स) बनवून द. अमेरिकेंत नवीन स्थापन झालेल्या लोकराज्यांत ढवळाढवळ करण्याचा विचार चालू केला त्या वेळीं यू. एस्. अमेरिकेचा अध्यक्ष मनरो यानें ता. २।१२।१८२३ रोजीं पुढीलप्रमाणें जाहीर निवेदन केलें : "उ. व द. अमेरिका हीं दोन्ही खंडें स्वतंत्र आहेत आणि या खंडांत युरोपांतील राष्ट्रांनीं वसाहत करण्याचा हेतु मनांत आणतां कामा नये. अमेरिका खंडांतील घडामोडींशीं आमचा निकट संबंध आहे. युरोपांतील दोस्त राष्ट्रांची राजकारणपद्धति अमेरिकेच्या पद्धतीहून अगदीं निराळी आहे; म्हणून युरोपांतील राष्ट्रांनीं अमेरिकेच्या राजकारणांत युरोपच्या धोरणाचा शिरकाव करण्याचा प्रयत्न केल्यास ते आमच्या देशाच्या शांततेस आणि सुरक्षिततेस धोका आणणारें कृत्य आहे असें आम्ही मानूं." ब्रिटिश फॉरिन सेक्रेटरी जॉर्ज कॅनिंग यानें सदर तत्त्वाची घोषणा इंग्लंड–अमेरिकेनें संयुक्तपणें करावी असें तत्पूर्वी सुचवलें होतें. पण ती सूचना प्रे. मनरोनें मान्य केली नाहीं. मनरोचें हें तत्त्व १८४० ते १८६० च्या दरम्यान मध्य अमेरिका

व पश्चिम अमेरिका यांसंबंधीं चाललेल्या लढ्याच्या वेळीं फार लोकप्रिय झालें, पण पुढें १८६० सालीं फ्रान्सनें मेक्सिकोंत मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला त्या वेळीं मनरोच्या तत्त्वाच्या कसोटीचा प्रसंग आला. या वेळीं यू. एस्. अमेरिकेंत यादवी युद्ध चालू असल्यामुळें मनरो तत्त्वाची अमलबजावणी करतां आली नाहीं. पण यादवी युद्ध संपल्यावर यू. एस्. अमेरिकन सरकारनें मनरो तत्त्वाचा जोरदार पुरस्कार केला आणि त्यामुळें फ्रान्सला माघार घ्यावी लागली. याप्रमाणें हें तत्त्व निश्चित प्रस्थापित झाल्यावर या तत्त्वाच्या अर्थाची व्याप्ति हळूहळू वाढवण्यांत आली. १८८० सालीं पनामा कालव्याच्या बाबतींत हें तत्त्व लागू करण्यांत आलें, आणि सदर कालव्यावर अँग्लो-अमेरिकन नियंत्रण असावें असा क्लेटन–बुलवर करार १८५० सालीं झाला होता तो करार रद्द करून पनामा कालव्यावर फक्त अमेरिकेचें नियंत्रण असावें असा हे–पोन्सफोत नांवाचा नवा करार करण्यांत आला. पुढें ब्रिटिश ग्वायना आणि व्हेनेझुएला यांच्यामध्यें सरहद्दीसंबंधीं तंटा उत्पन्न झाला. त्या वेळीं अमेरिकन प्रेसिडेंट क्लीव्हलंड यानें मनरो तत्त्वाच्या आधारें मध्यस्थी करून तो तंटा मिटवला. १९०२ सालीं व्हेनिझुएलाकडून येणें असलेलें कर्ज वसूल करण्याकरितां अँग्लो–जर्मन–इटालियन या तीन राष्ट्रांनीं व्हेनेझुएलाची नाकेबंदी केली. त्या वेळीं प्रे. थिओडोरा रूझवेल्ट यानें मनरो तत्त्वाची व्याप्ति अधिक वाढविली आणि यू. एस्. अमेरिकेनें जोरजोरानें तक्रारी केल्यावर वरील सरकारांनीं माघार घेतली आणि सॅन डॉमिंगो येथील आयात–निर्गत जकातीवर अमेरिकेनें आपला ताबा चालू केला. पुढें कॅरेबियन समुद्रावर आपली सत्ता प्रस्थापित करतांना यू. एस्. अमेरिकेनें मनरो तत्त्वाचाच आधार घेतला. लॅटिन–अमेरिकन संस्थानांमध्यें मनरो तत्त्व फारसें लोकप्रिय झालें नाहीं. मनरो तत्त्व हें आंतरराष्ट्रीय कायदा नव्हे तर तें यू. एस् अमेरिकेचें राष्ट्रीय धोरण आहे. तथापि मनरो तत्त्वाचा पुरस्कार इतर अमेरिकन लोकसत्ताक राष्ट्रांनीं १९४० सालीं 'हॅव्हाना डिक्लरेशन' द्वारें जोरदारपणें केला.

**मनसंतोषगड**— सावंतवाडीजवळच्या मनोहरगडापासून सुमारें २०० यार्डांवर हा किल्ला आहे. या दोहोंमध्यें एक मोठें खोरें आहे. क्षेत्रफळ १५ एकर आहे. या किल्ल्यावर जाण्याकरितां पूर्वी खडकांतून पायऱ्या खोदल्या होत्या पण आतां चढण्यास रस्ता नाहीं. मनोहरगडाबरोबर येथील लोकहि १८४४ च्या गडकऱ्यांच्या बंडांत सामील झाले होते. पण त्यांचा मोड झाला.

**मनसादेवी**—हिला बंगाल्यांत सर्पांची अधिष्ठात्री देवता मानितात. मनसा ही वासुकीची बहीण व जरत्कारु ऋषीची पत्नी होय. सर्पांपासून आपलें संरक्षण होण्यासाठीं लोक तिची आराधना करतात. हिला विषहारी असेंहि नांव आहे. हिच्या-संबंधीं कथा बंगाली वाङ्मयांतून बऱ्याच आढळतात. आपली उपासना रूढ करण्यासाठीं अभक्तांवर काय काय संकटें मनसादेवीनें आणलीं याचीं वर्णनें त्यांत आहेत.

**मॅनहीम**—हें शहर जर्मनींत ऱ्हाइन नदीच्या कांठीं आहे. हें नदीकांठचें मोठें व्यापारी बंदर आहे. येथें यंत्रें, साखर, रासायनिक द्रव्यें व तमाखू यांचे कारखाने आहेत. लो. सं. २,७६,००० आहे.

**मनाई हुकूम**—(गार्निशमेंट). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, सावकारानें आपल्या कर्जदारावर कोर्टांत दावा लावला असेल, आणि त्या कर्जदाराची कांहीं जंगम मिळकत एखाद्या तिऱ्हाईत इसमाच्या ताब्यांत असेल तर कोर्टानें त्या तिऱ्हाईत इसमास सदर जंगम मिळकत त्या कर्जदाराला देऊं नये असा केलेला हुकूम. ज्या तिऱ्हाईत इसमावर असा मनाई हुकूम बजावतात त्याला 'गार्निशी'–प्रतिबद्धऋणी असें म्हणतात. अशा तऱ्हेचा हुकूम काढण्याची तरतूद हिंदुस्थानांतल्या कायद्यांतहि केलेली आहे (सिव्हिल प्रोसीजर कोड पाहा).

**मॅनिला**—हें शहर फिलिपाइन्स राज्याची राजधानी आणि महत्त्वाचें बंदर आहे. ३३ फूट खोलीचीं जहाजें या बंदरांत जाऊं शकतात. मॅनिला येथें एक टांकसाळ असून तेथें फिलिपाइन राज्यांत चालणारीं नाणीं पाडण्यांत येतात. सिगार, सिगारेट, तमाखू, ताग, जहाजें व बोटी, आणि विणकाम यांचे कारखाने येथें आहेत. येथून साखर, तमाखू व ताग परदेशांत जातात. हें शहर १५७१ सालीं स्पॅनिश लोकांनीं स्थापन केलें. नंतर तें ब्रिटिश अमलाखालीं होतें (१७६२–१७६४) आणि १८९८ सालीं स्पॅनिश अमेरिकन युद्धानंतर तें अमेरिकन सं. संस्थानांच्या ताब्यांत गेलें. येथील लो. सं. (१९४१) ६,८४,८०० आहे.

मॅनिला मुलगी

**मनु**—एक अतिप्राचीन व्यक्ति. ऋग्वेदामध्यें, मनु अगर मनुस हा मनुष्यजातीचा आदिपुरुष होय, असें म्हटलें आहे. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र या नात्यानें त्याला 'स्वायंभुव' असें नांव दिलेलें आढळतें. त्याच्या मानुषी स्वरूपाचें वर्णन वेदादिकांत आलें आहे. मनूनें मानवजात कशी निर्माण केली, यासंबंधीं माहिती शतपथ ब्राह्मणांत आहे. जगाच्या प्रलयाच्या वेळीं एका माशाच्या उपदेशानें मनु हा एकटाच जिवंत राहिला; त्यानें संततीसाठीं उग्र तपश्चर्या व पाकयज्ञ केला, त्या यज्ञांत दिलेल्या हवीपासून इळा नांवाची स्त्री उत्पन्न झाली, व तिच्यापासून पुढें मनूचा वंश निर्माण झाला. मनुष्यजातींतील समाजव्यवस्था व धर्मव्यवस्था लावणारा मंत्रद्रष्टा, यज्ञसंस्थेचा निर्माता, इत्यादि विशेषणें मनूला लावलेलीं आढळतात. 'यन्मनुरब्रवीत् तद्भेषजम्' अशी मनूची योग्यता वर्णिली आहे. सं. मनुस्–मनुज व इं. मॅन यांची भाषाशास्त्रीय तुलना करण्यांत येते.

२. एका ब्रह्मकल्पांत चौदा मनू असून त्या प्रत्येकाच्या कालसत्तेस मन्वंतर म्हणतात. सांप्रत चालू असलेल्या श्वेतवाराहकल्पांत स्वायंभू, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत आणि चाक्षुष इतके मनू व मन्वंतरें होऊन गेलीं असून सांप्रत वैवस्वत मन्वन्तर चालू आहे. प्रत्येक मन्वंतरांत कृत, त्रेता, द्वापर व कलि अशीं चार युगें असतात. वैवस्वतानंतर पुढें सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि, आणि इंद्रसावर्णि हे मनू होतील. चौदा मन्वंतरें पुरीं झाल्यावर हा कलि संपून ब्रह्मदेवाची रात्र होईल म्हणजे प्रलय होईल.

मनु ही एक गादी आहे. एक अधिकार आहे. या गादीवर अनेक ज्ञानी पुरुष कालगत्या बसतात व ते अधिकार चालवितात, असें थिऑसफीय मत आहे. मनूच्या गादीवर जो पुरुष असतो त्याचें काम नवीन मानववंश पृथ्वीवर निर्माण करणें, प्रारंभीं त्याची जोपासना करणें, पुढें त्या वंशाचे उपवंश निर्माण करणें, कालगत्या त्या उपवंशींना नाना देशांत पाठवून तेथें निरनिराळ्या संस्कृती व निरनिराळीं राष्ट्रें स्थापणें, हें असतें. नीग्रो मनुष्य, चिनी मनुष्य, हिंदु मनुष्य यांचे चेहरे पाहिल्यास ते निरनिराळ्या वंशांचे आहेत हें दिसून येतें. हे सर्व मूलवंश निरानिराळ्या मनूंनीं पृथ्वीवर स्थापले आहेत. आपण जे आर्यवंशी लोक आहों त्यांचा संस्थापक वैवस्वत मनु आहे. जगाच्या पाठीशीं उत्क्रान्तीचीं सूत्रें हालविणारी जी सिद्ध संघ किंवा ऋषि संघ नांवाची संस्था आहे, त्या संस्थेंत मनूचा समावेश होत असतो. वैवस्वत मनु हा सध्यां हिमालयांत वास्तव्य करून आहे. त्यानें हजारों वर्षांपूर्वी आर्यवंश अस्तित्वांत आणला व हळूहळू त्याच्या शाखा निर्माण करून व त्यांना नाना देशांत पाठवून हल्लींचीं अनेक हिंदी व युरोपियन राष्ट्रें निर्माण केलीं आहेत. आर्यवंशांतील राष्ट्रांच्या राजकीय घडामोडी, लढाया, निरनिराळ्या राष्ट्रांच्या संघटना, वगैरे गोष्टी वैवस्वत मनूच्या अधिकारांत येत असतात, असा थिऑसफी पंथीयांचा समज आहे.

मनुस्मृति—हा मनूचा ग्रंथ प्रसिद्ध असून त्याला 'मानवधर्मशास्त्र' असें दुसरें नांव आहे. तो कृष्णयजुर्वेदाच्या मैत्रायणी शाखेच्या मानवधर्मसूत्राच्या आधारें रचिला आहे, असें दिसतें. भृगूनें मानवधर्मसूत्रांत भर घालून मनुस्मृति तयार केली, असें प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं 'भृगुप्रोक्तायां संहितायां' या उल्लेखावरून दिसते. मनुस्मृतीचा काल हा खि. पू. २०० ते इ. स. २०० यांमधील असावा असें कांहीं संशोधक मानतात. मनुस्मृतींत एकंदर बारा अध्याय आहेत, ते—(१) जगाची उत्पत्ति; (२) संस्कारविधी, व्रतचर्या, ब्रह्मचर्याश्रमाचे नियम; (३) विवाह, गृहस्थाश्रमांतील महायज्ञ व श्राद्धकल्प; (४) गृहस्थाश्रमांतील उपजीविकेचें साधन, व्रतें, नियम, दिनकृत्यें; (५) भक्ष्याभक्ष्यनिर्णय, आशौच व द्रव्यशुद्धि, स्त्रीधर्म; (६) वानप्रस्थ व यति यांचे धर्म; (७) राजधर्म; (८) न्यायनिरूपण; (९) स्त्रीपुरुषधर्म, दायविभाग, द्यूत, चोर, व वैश्यशूद्रधर्म; (१०) संकरजाती व आपद्धर्म; (११) प्रायश्चित्तविधी; आणि (१२) शुभाशुभकर्मफल. भृगुकृत ही मनुस्मृति खिस्तोत्तर दुसऱ्या शतकांत झाली असावी. मनुस्मृतीला विलक्षण लोकमान्यता मिळाली, हें, मनुस्मृतीवर मेधातिथि, सर्वज्ञ नारायण, कुल्लूकभट्ट, राघवानंद, नंदनाचार्य, इत्यादि पुष्कळांनीं टीका लिहिल्या, यावरून स्पष्ट दिसतें.

**मनुका, बेदाणा व खिसमिस**—(द्राक्षें पाहा). वेलांवरच पिकलेल्या व वाळलेल्या द्राक्षांस वरील नांवें देतात. द्राक्षांची लागवड हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं होते. परंतु काबूलकडे व पंजाबाकडे उत्तम द्राक्षें पिकतात व तिकडून काळीं व पांढरीं द्राक्षें लहान लहान पेट्यांतून पुष्कळ येतात. द्राक्षें पिकलीं म्हणजे तीं तोडून व पाला खुंटून त्यांचे घोस वेलांवरच वाळण्याकरितां ठेवितात. उन्हानें त्यांत शर्करा बनते व पाण्याचा अंश निघून जातो. नंतर वाळल्या द्राक्षांचे झुबके तोडून साफ करितात, आणि लांकडाची राख व चुना यांचा द्रव करून कढवितात व त्यांत वाळलेलीं द्राक्षें बुडवून काढितात. कित्येक ठिकाणीं या द्रवांत थोडें तेल घालतात. नंतर चिरम्या पडलेलीं वाळलेलीं द्राक्षें डाळयावर किंवा सुपांत १४–१५ दिवस उन्हांत वाळवितात. म्हणजे मनुका तयार होतात. जीं द्राक्षें सावलींत वाळवितात त्यांचा फिकट हिरवा रंग राहतो. त्यास खिसमिस

म्हणतात. त्यांत बीं नसतें अशा जातींचीं द्राक्षें वर सांगितल्याप्रमाणें वाळवून तयार केलीं म्हणजे त्यास बेदाणा म्हणतात.

**मनुष्यवध**—(होमिसाइड). कायद्यांत याचा अर्थ एका इसमानें दुसऱ्या इसमाला ठार मारणें असा आहे. या मनुष्यवधाचे कायद्यामध्यें तीन प्रकार केलेले आहेत ते—१. न्याय्य किंवा कायदेशीर हक्कानें केलेला मनुष्यवध; २. निर्हेतुक, अकल्पित, अकस्मात् घडलेला मनुष्यवध; आणि ३. मुद्दाम द्वेषबुद्धीनें केलेला अतएव शासनार्ह मनुष्यवध. पहिल्या प्रकारचा मनुष्यवध कायदेशीर जरूरीकरितां करावा लागतो. उदाहरणार्थ, फांशीची शिक्षा झालेल्या गुन्हेगाराला योग्य अधिकाऱ्यानें फांशी देणें, किंवा एखादा इसम अत्याचार करून घोर स्वरूपाचा गुन्हा करीत असेल तर तो गुन्हा घडूं नये म्हणून अशा आततायी इसमाला ठार मारणें; किंवा एखाद्या फरारी गुन्हेगाराला पकडतांना त्या अधिकाऱ्यावर तो गुन्हेगार हल्ला करील तर त्या अधिकाऱ्यानें त्या गुन्हेगाराचा केलेला मनुष्यवध; किंवा लोक बंडाळी करून अत्याचार करीत असतील तर अशा बंडखोर जमावाला हांकलून लावण्याकरितां करावा लागलेला मनुष्यवध; या सर्व प्रकारच्या मनुष्यवधांना कायद्यानें परवानगी दिली आहे (इंडियन पिनल कोड, कलमें ८७–८८ पाहा). दुसरा प्रकार—अकल्पित झालेला मनुष्यवध असा कीं, एखादा मनुष्य एखादें कायदेशीर कृत्य करीत असतांना अकस्मात् व त्या मनुष्याची कसूर चिलकूल नसतांना झालेला मनुष्यवध; किंवा प्रत्येक मनुष्याला कायद्यानें स्वसंरक्षणाचा म्हणजे स्वतःच्या व स्वतःचा जीव व स्वतःच्या बायकोचे, मुलांचे, आईबापांचे, नोकरचाकरांचे, वगैरे जीव बचावण्याचा हक्क दिलेला आहे, व कोणी गुन्हेगार मनुष्यवध करूं लागेल तर त्यांतून बचावण्याकरितां त्या गुन्हेगाराला जरूर तर ठार मारण्याचा हक्क प्रत्येक नागरिकाला आहे (इंडियन पिनल कोड, कलमें १००–१०३, १०६ पाहा). तिसरा प्रकार मनुष्यवधाचा अक्षम्य गुन्हा. अशा गुन्ह्याचे मनुष्यवध व खून असे दोन प्रकार असून या गुन्ह्यांना जास्तींत जास्त मोठी शिक्षा फौजदारी कायद्यांत सांगितलेली आहे (पिनल कोड ३०२–३०३–३०४ कलमें पाहा).

**मनूची** (१६३९–१७१७)—एक इटालियन प्रवासी. निकोलो मनूची हा व्हेनिसचा असून तो सन १६५६ पासून सन १७१७ पावेतों हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं फिरत होता. शिवाजीची व जयसिंगाची भेट झाली तेव्हां तो जयसिंगाजवळ तोफखाना-कामगार असून, संभाजी पोर्तुगीजांशीं लढत असतां, त्यांच्याकडील वकील म्हणून तो संभाजीकडे गेला होता. त्याचें बहुतेक आयुष्य मोंगलांच्या दरबारीं गेलें. औरंगजेबाचा वडील पुत्र शहाअलम याजपाशीं मनूची डॉक्टर म्हणून पुष्कळ वर्षें राहिला. ह्यानें मोंगल बादशाहीचा तत्कालीन वृत्तांत विस्तृत व खुलासेवार लिहिलेला आहे. संभाजीसंबंधानें जो सुमारें शें-पन्नास पानें मजकूर आहे त्यावरून संभाजीच्या पराक्रमाविषयीं आदर वाटूं लागतो. मनूची सर्व मराठ्यांना 'शिवाजी' हेंच नांव देतो.

**मनोदौर्बल्य**—१. (इंबेसिलिटी). एखाद्या मनुष्याच्या बुद्धीची वाढ बरोबर झाली नाहीं तर त्यास एक तर खूळ लागतें किंवा त्याच्या ठिकाणीं मनोदौर्बल्य उत्पन्न होतें. अशा रोग्यामध्यें कांहीं बाबतींत विलक्षण बुद्धि असल्याचें व विशेषतः ती बुद्धि एखाद्या खोडकर गोष्टीमध्यें उपयोगांत आणल्याचें आढळून येतें. अशा लोकांकरितां कांहीं देशांमध्यें स्वतंत्र कायदे असतात.

२. (हायपोकॉन्ड्रियासिस). उद्वेग रोग पाहा.

**मनोविश्लेपण**—मानसोपचार पाहा.

**मनोहरगड**—सावंतवाडीच्या ईशान्येस १४ मैलांवर रांगणा अथवा प्रसिद्धगड याच्या दक्षिणेच्या एका २५०० फूट उंचीच्या डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. हा पांडवांनीं बांधला असें सांगतात. आकार तिकोनी असून लांबी ४४० यार्ड व रुंदी २५० यार्ड आहे. वर जाण्यास खडकांत खोदलेल्या पायऱ्या आहेत. १८४४ मध्यें कोल्हापूर प्रांतांतील गडकरी लोकांनीं दंगा केला होता त्यांत येथील लोक सामील झाले होते व त्यांनीं दोन महिने हा किल्ला ताब्यांत ठेवला होता. अखेरीस पोर्फमनें त्यांचा पराभव केला व १८४५ मध्यें जनरल डिलामोटी यानें हा ताब्यांत घेतला व पुढें वाडीकरांस परत दिला.

**मॅन्टल**—ही कांहीं दिव्यांचा प्रकाश अधिक उज्वल करण्यासाठीं बसविण्याची एक जाळी असते. ही १८८५ मध्यें फॉन वेल्सबाक यानें शोधून काढली. ही जाळी कापूस, कृत्रिम रेशीम, वगैरेची बनविलेली असते. व ती थुरनात्रित (थोरियम नायट्रेट) व श्रीकनत्रित (सेरियम नायट्रेट) यांच्या ९९ : १ या प्रमाणांतील द्रावणांत भिजवून वाळविलेली असते. या जाळ्या वापरण्यापूर्वी त्या जाळून टाकण्यांत येतात, म्हणजे त्या धातूंचीं प्राणिदें फक्त शिल्लक राहतात. उलट्या जाळ्या १९०० पासून प्रचारांत आल्या.

**मॅन्सफील्ड, कॅथराइन** (१८९०–१९२३)—या इंग्रज लघुकथा-लेखिकेचा जन्म न्यूझीलंडमध्यें झाला. हिनें लहानपणींच ग्रंथलेखनास आरंभ केला. व हिची पहिली लघुकथा १९११ मध्यें प्रसिद्ध झाली. १९१३ मध्यें हिनें जॉन मिडल्टन म्युरी या टीकालेखकाबरोबर लग्न केलें; व तो संपादन करीत असलेल्या 'ॲथीनियम' या मासिकांत ग्रंथ-परीक्षणाचें काम करूं लागली. हिचे कांहीं लघुकथा-संग्रह प्रसिद्ध आहेत.

**ममी**—ईजिप्त देशांत वाळूमध्यें पुरलेलीं शवें दीर्घकालपर्यंत न सडतां तशींच राहत असत. यामुळें त्या लोकांच्या मनांत अशी कल्पना आली असावी कीं, मृत्यूनंतर पुन्हां केव्हां तरी जर एखाद्या व्यक्तीस पुन्हां जिवंत होण्याचा संभव असला तर त्याचें शरीर रक्षण करून ठेवणें अवश्य आहे. याकरितां ही शवरक्षणाची कला ईजिप्त देशांतील लोकांनीं खिस्तपूर्व ३५०० च्या सुमारास शोधून काढली असावी. शवरक्षणाकरितां मुख्य पदार्थ वापरण्यांत येत असे, तो मीठ होय. तथापि फार प्राचीन काळापासून कांहीं प्रकारची राळहि उपयोगांत आणण्यांत येत असे. तसेंच शरीराच्याभोंवतीं कापड गुंडाळण्यांत येत असे व तें केव्हां केव्हां ३०० वारांपर्यंत भरत असे. सर्वांत प्राचीन रक्षित शव दुसऱ्या राजघराण्याच्या काळचें आढळतें. परंतु हालवितां येईल असें रक्षित शव पिरॅमिड–मनोऱ्यांच्या कालांतलें म्हणजे पांचव्या राजघराण्याच्या कालातलें आढळून येतें. हें शव लंडनमध्यें 'रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स' मध्यें आहे. अगदीं दगडासारख्या घट्ट स्थितींत शवाचें रक्षण करतां येईल इतकी या कलेची वाढ खि. पू. १५०० पर्यंत झाली नव्हती. या कलेची विशेष माहिती १८ व्यापासून २२ व्या राजघराण्यांतील राजांचीं शवें थीबी शहराजवळ १८८० मध्यें उकरून काढण्यांत आलीं, त्या वेळेपासून होऊं लागली. अशा तऱ्हेचीं सुमारें ५० शवें कैरो येथील पदार्थसंग्रहालयांत आहेत. यांमध्यें थॉथ्मिस (तिसरा), सेती (पहिला) व रामेसिस (दुसरा) यांचीं शवें आहेत. खिस्तपूर्व सहाव्या शतकांत ही कला नष्ट होण्याच्या मार्गास लागली. तथापि खिस्ती शकाच्या सातव्या शतकापर्यंत पुष्कळसें मीठ घालून शवरक्षण करण्याची पद्धति चालू होती. अखेरीस महंमदीयांनीं ही चाळीस शतकें अस्तित्वांत असलेली पद्धति नामशेष करून टाकली.

खि. पू. ३००० या काळापासून रोमन काळापर्यंत ७३ कोटी तरी माणसांचीं शवें ईजिप्तमध्यें अशा तऱ्हेनें संरक्षिलीं असावींत असा हिशोब काढण्यांत आला आहे. ईजिप्शियनाची कल्पना अशी असे कीं, आत्म्याची चौकशी ऑसिरिस या यमदेवतेपुढें झाल्यावर तो देहांत शिरतो व माणूस पुन्हां मृत्युलोकीं नांदूं लागतो; तेव्हां आत्मा परत येईपावेतों देहाचें संरक्षण करणें अत्यावश्यक आहे. म्हणून तर मसाला भरून प्रेतांना पिरॅमिडसारख्या थडग्यांतून बंदोबस्तानें ठेवावें लागतें. अर्थात् ममीप्रमाणें शवरक्षणाची क्रिया अतिशय खर्चाची असे; व फार थोड्या लोकांना ती परवडे. तेव्हां कमी खर्चाचेहि कांहीं प्रकार करण्यांत आले होते.

१९२२ सालीं तुत्–आंख–आमेन या राजाचें थडगें ईजिप्तच्या राजदरींत सांपडलें. हा राजा खि. पू. १३५० त राज्यारूढ होता. याचें थडगें अगदीं प्रथम होतें तसें सांपडलें. शेजारच्या खोलींत अलाबास्टरचीं भांडीं, पलंग, खुर्च्या, रथ (सोन्यांत काम केलेले), पुतळे, सोन्याच्या अंगठ्या, पडदे, इ. अनेक वस्तू ठेवलेल्या मिळाल्या. राजाची ममी तीन पेट्यांच्या आंत होती. अगदीं आंतली पेटी तर भरीव सोन्याची होती. आठ दणगट माणसांना ती उचलत नव्हती. राजाचे जडावाचे भारी दागिने त्यांत होते.

कांहीं शवपेटिका आंतील माणसांप्रमाणेंच रंग आणि आकार देऊन बनवीत. या प्राचीन शवरक्षणाच्या कलेमुळेंच पांच हजार वर्षांपूर्वींचे पराक्रमी राजे आणि लोक आपणांस होते तसे पाहावयास मिळतात.

**मम्मट**—अलंकारशास्त्रावरील प्रसिद्ध संस्कृत ग्रंथकार. हा काश्मीर येथील राहणारा असून त्याच्या बापाचें नांव जय्यट होतें असें दिसतें. यानें 'काव्यप्रकाश' नांवाचा अलंकारशास्त्रावर सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला. तो इ. स. ११०० च्या सुमारास उदयास आला असावा असें दिसतें. या 'काव्यप्रकाश' ग्रंथाचे १० उल्लास आहेत व त्यांत एकंदर १४२ कारिका अगर सूत्रें आहेत. हा 'काव्यप्रकाश' ग्रंथ अलंकारावर प्रमाणभूत समजला जातो. त्याच्यावर सुमारें ७० टीका झाल्या आहेत. त्यांपैकीं माणिक्यचंद्राची 'संकेत' टीका, श्रीवत्सलांछनाची 'सारबोधिनी' टीका, भीमसेनाची 'सुधासागर' टीका व नागोजीभट्टाची 'लघु व बृहदुद्योत' टीका या प्रसिद्ध आहेत. व्याकरणभाष्यटीकाकार कैयट व चारी वेदांवर भाष्य लिहिणारा उवट हे याचे धाकटे बंधू होते, असें भीमसेनानें आपल्या 'सुधासागर' नांवाच्या 'काव्यप्रकाशा'वरील टीकेंत लिहिले आहे.

'काव्यप्रकाश' ग्रंथ पुरा न होतां मम्मट वारला तेव्हां अल्लट नांवाच्या कवीनें तो पुरा केला, असें कांहीं टीकाकार सांगतात. मम्मटाचा 'शब्दव्यापारविचार' नांवाचा दुसरा एक ग्रंथ असून त्यांत अभिधा व लक्षणा एवढ्यांचाच विचार केला आहे.

**मय लोक**—अमेरिकन इंडियन लोकांची एक जात. इंका या अमेरिकन इंडियन जातीचा उदय होण्यापूर्वीं मय लोक तेथें राहत होते. मय लोकांच्या संस्कृतीचे इ. स. ६ व्या शतकांतील अनेक अवशेष उपलब्ध झाले आहेत. हल्लींचे ग्वाटिमाला, हांडूरस, मेक्सिकन संस्थानें व युकॅटन द्वीपकल्प या मुलुखांत प्राचीन काळीं अनेक निरनिराळ्या लोकांच्या टोळ्या राहत असत; त्यांच्यांतील प्रमुख जे युकॅटनमधील लोक, त्यांच्या नांवावरून या मानववंशाला 'मय' असें नांव पडलें. यांच्या भाषा एकाच मय भाषावंशांतील आहेत. मध्य अमेरिकेंत प्रमुख प्राचीन स्मारकें आहेत, तीं या वंशांतील लोकांनींच तयार केलेलीं आहेत. ते मोठे ज्योतिर्विद् व गणिती असून दशलक्षा-

पेक्षां मोठ्या संख्या योजणें व लिहिणें त्यांना अवगत होतें. त्यांची चित्रलिपि मेक्सिकन लोकांपेक्षां सुधारलेली दिसते. वीस दिवसांचा महिना व अठरा महिन्यांचें वर्ष त्यांच्यांत असे. टिटिकाका सरोवराच्या दक्षिण किनाऱ्याजवळ अनेक दगडी पुतळे, व ३६×७ फूट इतक्या आकाराचे अखंड पाषाणस्तंभ आहेत. या स्तंभाच्या मध्यभागीं एक प्रतिमा व तिच्याभोंवतीं बरींच धार्मिक चिन्हें व आकृती, आणि हातांत पक्ष्यांचीं चित्रें असलेला राजदंड आहे. यांचे प्रार्थनाविधी, बलिदान, उपवास व देहदंड, वगैरे उपासनासंप्रदाय व एकंदर संस्कृति मेक्सिकन लोकांसारखी होती, हें उघड आहे. मय लोकांच्या पौराणिक कथा इंकांत शिरल्या, आणि मयसाम्राज्य जाऊन बराच काळ लोटल्यावर इंका लोक उदयास आले (इंका लोक पाहा). आज मयांचे वंशज मेक्सिकोंत आढळतात ते म्हणजे शिपाई पेशाचे कांहीं लोक होत.

**मयासुर**—हा असुरांचा शिल्पी असावा. हा इंद्रप्रस्थाजवळ देवगिरि पर्वतावर राहत असे. याचा भाऊ नमुचि. याची कन्या उपदानवी ही हिरण्याक्षास दिली होती. मयासुरास हेमा अप्सरेपासून दुंदुभि आणि मायावी हे दोन पुत्र आणि मंदोदरी नांवाची एक कन्या होती, तीच पुढें रावणास दिली. खांडववनदाहापासून अर्जुनानें मयासुराचें रक्षण केल्यामुळें यानें इंद्रप्रस्थास पांडवांकरितां एक विचित्र मयसभा तयार करून दिली. त्यापूर्वी यानें वृषपर्व्यास होमासाठीं एक सभा बांधून दिली होती. आपल्या तीन मित्रांसाठीं त्यानें सोनें, रुपें व लोखंड यांचीं तीन शहरें तयार केलीं. 'मयमत' नांवाचा एक वास्तुशिल्पावर संस्कृत ग्रंथ आहे.

**मयाळ**—हिचे वेल असतात. जाती दोन: वाळी व गंगाजळी (वाळी पाहा). गंगाजळीचीं पानें चाकवतासारखीं लहान व पातळ असतात. या वेलांत तांबडा व पांढरा असे दोन प्रकार आहेत. पानांची भाजी शीतल व पित्तशामक आहे. भजीं व पातवड्या होतात. मयाळीस काळ्या मिऱ्यांएवढीं लहान फळें येतात. यांचा तांबडा रंग होतो. मर्मावर अर्बुद झालें असतां मयाळ कांजी-ताक यांत वाटतात व त्यांत मीठ घालून त्याचा लेप देतात.

**मयूर**—एक प्रसिद्ध संस्कृत कवि. याचा धंदा जांगुलिकाचा म्हणजे सर्पवैद्याचा असावा असें हर्षचरितांत व इतर ठिकाणीं त्याला जांगुलिक हें विशेषण लावण्यांत येतें त्यावरून दिसतें. हा हर्षाच्या पदरीं होता. यानें मयूराष्टक, सूर्यशतक हे गौडी भाषापद्धतींत लिहिलें असून तें फार नांवाजलेलें आहे. *मयूर हा बाणाच्या बायकोचा भाऊ असून तिच्या शापानें* कुष्टरोगी बनला; त्यानें आपला रोग सूर्याची शंभर श्लोकांत प्रार्थना करून घालविला अशी दंतकथा आहे.

**मयूरध्वज**—रत्ननगरीचा दानशूर राजा. एका ब्राह्मणाच्या मुलाला वांचविण्यासाठीं स्वतःचें अर्धें शरीर देण्यास हा तयार झाला, अशी जैमिनि-अश्वमेधांत कथा आहे (४१-४६).'

**मयूरभंज संस्थान**—ओरिसामधील मांडलिक संस्थानांपैकीं हें एक अगदीं उत्तरेकडचें संस्थान असून याचें क्षेत्रफळ ४२४३ चौरस मैल आहे. लो. सं. (१९४१) ९,९०,९७७. येथील अरण्यांत व डोंगरांत हत्तींचे कळप दृष्टीस पडतात. संस्थानांत प्राचीन अवशेष अनेक आहेत. हें संस्थान जयपूरच्या राजाच्या एका नातलगानें सरासरी १३०० वर्षांपूर्वी वसविलें. या संस्थापकाच्या घराण्याचें नांव भंज असून तें नांव या घराण्यानें येथील मयूरध्वज नामक राजाचा पाडाव केल्यानंतर धारण केलें. तेव्हांपासून या संस्थानचें नांव मयूरभंज असें पडलें. राजचिन्ह मयूर आहे. १८०१ मध्यें हें इंग्रजी अमलाखालीं आलें. या संस्थानांतील बहुतेक सर्व लोक शेतकीवर आपली उपजीविका करतात. येथें लोखंड सर्वत्र व विशेषतः वामनघाटींत पुष्कळ सांपडतें. कोठें सोनें, अभ्रक व सूर्यकांत नांवाचे मौल्यवान् खडे सांपडतात. येथील अरण्यांत इमारती लांकूड, लाख, राळ, कुचला, मध हे जिन्नस होतात. यांत बारिपाडा नांवाचें एक गांव व ३५९३ खेडीं आहेत. बारिपाडा ही या संस्थानची राजधानी असल्यामुळें येथें संस्थानाधिपति राहतो. या संस्थानचें एकंदर उत्पन्न सु. ४७ लक्ष रुपये आहे. १०६८ रुपये इंग्रज सरकारास खंडणी दिली जात असे. सध्यांचे महाराज प्रतापचंद्र भंजदेव हे १९२८ सालीं गादीवर आले. संस्थान चांगलें सुधारलेलें आहे. याला पूर्वभारतांतील स्वित्झर्लंड असे महायुद्धांत म्हणण्यांत येत होतें. हें संस्थान आतां ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे.

**मयूरवर्मा** (राज्य. सन ३४०–६०)—पहिला कदंब राजवंशाचा मूळ पुरुष. हा आपणांस हारितीचे वंशज म्हणवीत असे. कांचीच्या पल्लवांवर स्वारी करून यानें वनवासीचें राज्य मिळवलें. याच्यापूर्वी वनवासी येथें चुटूशातकर्णी घराण्यांतील हारितीपुत्र, शिवस्कंद, वगैरे राजांचा अमल होता.

**मयूरशिखा**—या झाडास मण्यारशिखा किंवा मोरशेंडा असेंहि म्हणतात. हें झाड वीतभर असून ह्याला मोराच्या शेंडीप्रमाणें तुरा फुटतो. मूतखड्यावर याचें मूळ तांदुळाच्या धुवणांत वांटून देतात.

**मयूरसिंहासन**—शहाजहाननें हें प्रसिद्ध सिंहासन तयार करविलें. त्यानें मोंगल खजिन्यांतून सुमारें ८६ लाख किंमतीचीं चांगलीं रत्नें निवडून काढिलीं, आणि १ लक्ष तोळे सोनें

(किं. १४ लाख रुपये) खरेदी करून कसबी सोनार कामावर बसविले. सिंहासनाची लांबी सव्वातीन, रुंदी अडीच व उंची ५ यार्ड होती. त्याला बारा कोन व बारा खांब होते. वर मधोमध एक लहानसें झाड असून प्रत्येक खांबाच्या शिखरावर दोन दोन मोर होते. एवढ्यावरून त्यास मयूरसिंहासन नांव पडलें. वर जाण्यास तीन रत्नखचित पायऱ्या असून अकरा बाजू कठडे बसवून बंद केलेल्या होत्या. आंतल्या बाजूस एका फारसी कवीचीं २० कवनें कोरविलेलीं होतीं. ह्या सिंहासनास लागलेल्या साहित्याची किंमत एक कोट रुपये असून, त्याशिवाय मजुरी निराळी होती. ता. १२ मार्च स. १६३५ रोजीं ह्या सिंहासनावर शहाजहान प्रथम बसला. १७३९ त नादिरशहानें परत जातांना हें सिंहासन इराणांत नेलें. त्याच्यानंतरच्या शहांनीं कांहीं दिवसांनीं तें मोडलें. सांप्रत याच्यावरचीं कांहीं रत्नें इराणच्या राजाच्या कोषागारांत आहेत.

**मरवा**—हें सुगंधी झाड सुमारें वीतभर वाढतें. याचीं पानें मेथीच्या पानांसारखीं असून त्यांस चांगला वास असतो. तुरेहि येतात. यांत पांढरा व काळा असे दोन प्रकार आहेत. पांढरा औषधी आहे. गरमीवर मरव्याचा रस देतात.

**मराठी भाषा व वाङ्मय**—(अ) भाषा, उगम—आज आपण जी मराठी भाषा बोलतों ती आपले अत्यंत प्राचीन कालचे पूर्वज जे आर्य लोक ते जी भाषा बोलत असत तिचीं अनेक स्थित्यंतरें होत होत बनत आली आहे. या आर्य लोकांचें मूलगृह कोठें होतें त्याबद्दल आतांपर्यंत अनेक विद्वानांनीं भिन्न भिन्न मतें प्रदर्शित केलीं आहेत. सामान्यतः मध्य आशियामध्यें कोठें तरी हे लोक प्राचीन कालीं राहत असावे ही गोष्ट आतां सर्वत्र मान्य झालेली आहे. तेथून हे लोक हळूहळू भ्रमण करीत निरनिराळ्या दिशांस पसरत गेले. यांचें मूलगृहीं वास्तव्य असतांना प्रचलित भाषा कशी होती याचें निश्चित स्वरूप आज अज्ञात आहे. तथापि कांहीं पंडितांनीं तें स्वरूप कसें असावें हें मांडून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. अशांपैकीं श्लेशेर या नांवाचा एक पंडित प्रसिद्ध आहे. हे आर्य लोक आपल्या मूलगृहापासून जसजसे दूर दूर पसरत गेले तसतसे त्यांच्या बोलण्याच्या भाषेंत फरक होत गेले व त्यामुळें भाषेच्या अनेक शाखा होऊन तिचा वंशविस्तार वाढत गेला. यामुळें या मूळ भाषेस इन्डो-युरोपियन अथवा आर्यन असें म्हणतात. हिच्या प्रथम दोन शाखा होऊन एक युरोपमध्यें प्रचलित झाली व तीपासून ग्रीक व लॅटिन इत्यादि भाषा निघाल्या. दुसरी शाखा इन्डो-इराणी (पर्शु-भारतीय) म्हणून प्रसिद्ध आहे. या शाखेपासून इराणमध्यें प्रचलित असलेली अवेस्ता, पहेलवी व फारसी या भाषा निघाल्या व दुसऱ्या शाखेपासून संस्कृत भाषा उत्पन्न झाली.

ही संस्कृत भाषा बोलणारे लोक भरतखंडांत येऊन वसाहत करून राहिले. या संस्कृत भाषेंतील अत्यंत प्राचीन वाङ्मय म्हणजे वेद हे होत. या संस्कृत भाषेचें पूर्वी वर्णन केलेल्या अवेस्ता, पहेलवी व फारसी या भाषांशीं फार साम्य आहे ही गोष्ट आपणांस पारशांचे धर्मग्रंथ झेंदावेस्ता व त्यानंतर बेहीस्तुम येथील शिलालेख व बोगोझकुई येथील शिलालेख यांवरून दिसून येते. संस्कृत भाषेंतहि हळूहळू फरक पडत गेला. प्रत्यक्ष वैदिक वाङ्मयांतहि आपणांस या भाषेचा निरनिराळ्या कालांतील स्वरूपांत असलेला फरक दिसून येतो.

ज्या वेळीं आर्य लोक हिंदुस्थानांत आले त्या वेळीं हिंदुस्थानांत पूर्वींच वसाहत करून राहिलेले कांहीं लोक होते. त्यामध्येंहि दोन प्रकार दृष्टीस पडतात. एक अत्यंत प्राचीन कालापासून या देशांत राहिलेले परंतु फारशी सांस्कृतिक वाढ न झालेले निरनिराळे वन्य लोक; यांचे वंशज अद्यापहि आपणांस गोंड, कोरकू, संताळ, भिल्ल, कातकरी, वगैरे लोकांत आढळून येतात. हे लोक आपल्या व्यवहाराकरितां विशिष्ट बोली वापरीत होते. याखेरीज द्राविड या नांवानें संबोधले जाणारे एका भिन्न संस्कृतीचे लोक हिंदुस्थानांत आर्य येण्यापूर्वीं अनेक वर्षें स्थायिक झाले होते. त्याची स्वतंत्र भाषा असून त्यांमध्यें अनेक कलांची व संस्कृतीची बरीच वाढ झालेली होती. ह्यामुळें आर्य लोक जेव्हां हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांचा या दोन्ही लोकांशीं संबंध येऊन आर्यांच्या संस्कृत भाषेंत या दोन भाषांतील बरेचसे शब्द शिरले. आर्य लोकांचा सर्व भरतखंडांत प्रसार होण्यास दीर्घ काल लागला व कांहीं लोक फार दूरवर पसरत गेले. त्यामुळें निरनिराळ्या लोकांवर अन्य भाषांचा भिन्न भिन्न प्रमाणांत परिणाम झाला.

वेदकालीन भाषेवरहि तत्कालीन बोलींचा परिणाम झाल्याचें आपणांस पुढील उदाहरणांवरून दिसून येतें. वैदिक वाङ्मयांत शुद्ध संस्कृतरूपाऐवजीं भिन्न रूपें प्रचलित असल्याचीं उदाहरणें द्यावयाचीं तर ऋग्वेदादि ग्रंथांतील पुढील शब्द देतां येतील: वृंद–उंद, ऋतु – उउ, पृथिवी – पुहवी, दुर्लभ – दुलह, विश्राम–विताम, स्पर्श – फास, पश्चात् – पश्चा, उच्चात् – उच्या, निच्यात्–निच्या, स्वर्ग–सुवर्ग, स्वः–सुवाः, इ. याप्रमाणें संस्कृत भाषेच्या स्वरूपांत हळूहळू फरक पडत चालला होता. पिक, नेम व तामरस हे मूळचे म्लेंच्छ शब्द आहेत असें जैमिनी सूत्रांत म्हटलें आहे. मरची हा छान्दोग्योपनिषदांतील शब्द कानडी आहे. सर्व मूर्धन्यवर्ण संस्कृत भाषेनें द्राविड भाषांतून घेतले ही गोष्ट सर्वमान्य आहे. तसेंच कपि, करसार, कितव, कुट, गण,

हिम, मेघ, मयूर, वल्गु, इत्यादि शब्द संस्कृत भाषेनें परभाषेतून घेतले असल्याचें सर्व विद्वान् मान्य करतात. अर्थात् जेथें दोन भाषांचा संबंध येतो तेथें कोणत्या भाषेनें कोणत्या भाषांतून शब्द घेतले हें ठरविणें कठिण असतें ही गोष्ट मान्य करूनहि संस्कृत भाषेंत अन्य भाषांतील शब्द फार प्राचीन कालापासून शिरले आहेत ही गोष्ट आतां अनेक विद्वानांनीं मान्य केली आहे. संस्कृत आणि द्राविड भाषा यांचा संनिकर्ष बऱ्याच दीर्घकालापासून झाला असल्यानें त्यांमध्यें शब्दांची देवाणघेवाण बऱ्याच मोठ्या प्रमाणावर झाली असली पाहिजे यांत शंका नाहीं.

संस्कृत भाषा ही कधीं लोकांची सामान्य व्यवहाराची भाषा असेल काय, असा एक प्रश्न नेहमीं उपस्थित करण्यांत येतो. या बाबतींत एवढेंच म्हणतां येईल कीं, आज जें संस्कृत भाषेचें स्वरूप आहे तें अनेक लोकांच्या भाषा, बोली व व्याकरणपद्धती यांच्या संमिश्रणानें बनत गेलें आहे.

ही भाषा फार दीर्घकालपर्यंत सतत परंपरेनें फार मोठ्या प्रमाणांत व फार विस्तृत क्षेत्रांवर पसरलेली असल्यानें तिच्या प्रत्येक अंगांत भिन्न भिन्न प्रकारांनीं वाढ होत गेली आहे. ही निरनिराळ्या स्वरूपांत प्राचीन कालापासून बोलण्यांत असली पाहिजे यांत शंका नाहीं. परंतु या भाषेचें जसजसें वाङ्मय तयार होत गेलें तसतसें तिचें वाङ्मयीन स्वरूप व बोलभाषेंतील स्वरूप यांमध्यें हळूहळू अंतर पडत गेलें व हें अंतर एकसारखें वाढत गेलें. भिन्नभिन्नकालीन संस्कृत वाङ्मय घेतलें तरी त्याच्या स्वरूपांतहि फार मोठा फरक पडलेला दिसून येऊं लागला व जेव्हां व्याकरणकारास संस्कृत भाषेचें व्याकरण करण्याचा प्रसंग प्राप्त झाला तेव्हां त्यास भिन्नकालीन भाषेच्या स्वरूपाचें भिन्न भिन्न व्याकरण लिहिण्याची पाळी आली. संस्कृत भाषेचीं फार प्राचीन कालापासून अनेक व्याकरणें तयार झालीं. अत्यंत प्राचीन कालचीं व्याकरणें म्हणजे प्रातिशाख्य हीं होत. त्यानंतर अनेक व्याकरणकारांनीं व्याकरणें लिहिलीं. त्यांत पाणिनीचें सर्वमान्य व प्राचीन कालांतील जवळजवळ अखेरचें व्याकरण म्हणतां येईल. त्यासहि आपल्या व्याकरणांत छांदस् म्हणून वैदिक भाषेच्या व्याकरणास स्वतंत्र नांव व प्रकरण द्यावें लागलें.

पुढें व्याकरणांच्या ग्रांथिक भाषेस स्थिर स्वरूप प्राप्त झालें व त्यामुळें त्या भाषेचें बोलभाषेपासून अंतर वाढत गेलें व त्यामुळें बोलभाषांस स्वतंत्र रूपें व नांवें प्राप्त झालीं. यांसच प्राकृत भाषा असें म्हणतात. अर्थात् प्राकृत म्हणजे स्वाभाविक व संस्कृत म्हणजे कृत्रिम हे शब्द अन्वर्थकतेनें या भाषांच्या स्वरूपांस लागूं लागले.

हिंदुस्थान देश फार मोठा असल्यामुळें निरनिराळ्या प्रदेशांतील बोलभाषांत बराच फरक पडूं लागला व त्यामुळें त्यांस निरनिराळीं नांवें प्राप्त झालीं. अशा तऱ्हेनें प्रांतभेदानें या बोलभाषांस शौरसेनी, मागधी, पाली, अर्धमागधी, वगैरे नांवें प्राप्त झालीं. यांपैकीं महाराष्ट्री ही प्राकृत भाषा सर्वांत महत्त्वाची व श्रेष्ठ मानण्यांत येऊं लागली. वररुचीनें याच महाराष्ट्री भाषेचें व्याकरण विशेष विस्तारानें लिहिलें असून इतर भाषांस गौण स्थान दिलें आहे.

या प्राकृत भाषांचीहि पुढें बोलभाषांत हळूहळू रूपांतरें होऊं लागलीं व त्यांस अपभ्रंश अशीं नांवें देण्यांत आलीं. वरील सर्व प्राकृत भाषांचे निरनिराळे अपभ्रंश तयार झाले त्याप्रमाणें महाराष्ट्रीय भाषेचाहि अपभ्रंश तयार झाला व या अपभ्रंशापासून आजची मराठी भाषा तयार झाली.

भाषेची वाढ—या दृष्टीनें पाहिलें असतां, आपणांस महाराष्ट्री किंवा अपभ्रंश वाङ्मयानंतर पहिले मराठी ग्रंथ ज्ञानेश्वराच्या काळीं दृष्टीस पडतात. ज्ञानेश्वरानें श्रीमद्भगवद्गीतेवर मराठी भाषेंत केलेली टीका जी ज्ञानदेवी त्या ग्रंथांत आपणांस मराठीचें चांगलें प्रगल्भ व पूर्वकालीन भाषांपासून स्वतंत्र असें स्वरूप दृष्टीस पडतें. परंतु त्या स्वरूपाची प्रगल्भता प्राप्त होण्यास बराच दीर्घकाल लागला असला पाहिजे. एरवीं भगवद्गीतेसारख्या तत्त्वज्ञानप्रधान ग्रंथांतील उच्च कोटीप्रत पोहोंचलेले विचार इतक्या सुगमतेनें व विस्तारशः प्रगट करणें या नवीन भाषेस शक्य झालें नसतें. तेव्हां ज्ञानेश्वरकाल हा मराठीच्या तत्कालीन स्वरूपाचा पूर्ण वाढीचा अथवा वैभवकाल होता, असेंच म्हटलें पाहिजे व ज्या अर्थी ज्ञानेश्वरींतील मराठीचें स्वरूप अनेक अलंकारादि सामग्रीनें नटलेलें दृष्टीस पडतें, त्या अर्थीं असें परिणत स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी मराठीची पूर्णावस्था आपणांस माहीत करून घ्यावयाची असल्यास या कालाच्या मागें दीर्घकालपर्यंत आपणांस शोध केला पाहिजे.

जुने लेख—मराठी भाषेंतील सर्वांत जुना लेख म्हणून इतिहासाचार्य राजवाडे यांनीं शके ६५८ म्हणजे इ. स. ७३६ मधील चिकुर्डे येथील संपादन केलेल्या व ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेल्या ताम्रपटाकडेच बोट दाखवितां येईल. या लेखांत जरी कांहीं संस्कृत शब्द व रूपें आढळतात तरी भाषेची मोडणी मराठी आहे. परंतु या लेखाच्या कालाबद्दल निश्चित मत देतां येत नाहीं. कारण राजवाडे यांनीं शके ६५८ हा जरी या लेखाचा काल म्हणून दिला असला तरी त्यांतील भाषेचें स्वरूप पुढें जे या कालांतील किंवा पुढील शिलालेख आहेत, त्यांपेक्षां अधिक अर्वाचीन दिसतें. यापूर्वीचे व या सुमाराचे कांहीं शिलालेख, ताम्रपट, वगैरे पाहतां, पुढें दिलेल्या निरनिराळ्या लेखांत मधून मधून मराठी शब्द वापरलेले आढळून येतात.

(१) शके ६०२ मधला ताम्रपट—पन्नास, प्रिथिवी (पृथिवी). (२) शके ६२१ (चालुक्यांचा शिलालेख)—सुंक, बादावी, हित. (३) शके ६७५ (सामानगड ताम्रपट)—देऊळवाडे, पारगांव, आईतवार्डे. (४) शके ६८० चा ताम्रपट—दोसिराज (जोशिराज), भंडारगविठगे (भांडारकवडे). (५) शके ७२८ चा वणीचा ताम्रपट—वारिखेड (सध्यांचें वारखेड). (६) शके ७३५ चा ताम्रपट—खळखळ. (७) शके ७५७ चा ताम्रपट—येश (यश). (८) शके ८१० चा राष्ट्रकूटांचा ताम्रपट—न्हा, पुन्य, जो (सर्वनाम), सिंघ (सिंह), दह (दश), थिति (स्थिति), रिपु, इ.. (९) शके ८३२ चा ताम्रपट—वइरि (वैरी), निशेप, सिंघ. (१०) शके ९०० चा ताम्रपट—साम्राज्य. (११) शके ९२२ चा शिलालेख—करणिक, थीर. (१२) शके १०१६ चा ताम्रपट—कोंकण, रिषि, सोमण, संवतु, छेपाटी, भामण (चावण), नोर, राय. (१३) शके १०४९ चा शिलाहारांचा ताम्रपट—सकु (शक), संवतु, घोरपड, वरवली, ऊसर, मोर, मोवली, गाँडिमार्ग.

परप्रांतीय उल्लेख—याप्रमाणेंच मराठी भाषा ही याच सुमारास महाराष्ट्राशेजारील प्रांतांसहि 'मरहट्ट' म्हणून प्रचारांतील भाषा या नात्यानें परिचित होती. तसेंच प्राकृत पैंगलामध्यें 'मरहट्टा' म्हणून एक सवाईच्या चालीसारखें वृत्त दिलें आहे. यावरून मराठी भाषेंतील छंदाचा परिचय त्या काळीं इतर प्रांतीयांस झाला होता असें दिसतें. प्राकृत पैंगलाचा काल निश्चित नाहीं. तथापि त्यामध्यें आलेल्या कळचुरी राजघराण्याच्या उल्लेखांवरून तो कळचुरी सत्तेच्या सुमारास (दहावें, अकरावें शतक) झाला असावा असें वाटतें. याप्रमाणें या मरहट्ट भाषेचें ज्ञान महाराष्ट्राबाहेरच्या प्रांतांसहि बऱ्याच पूर्वीपासून असलें पाहिजे असें दिसतें.

चालुक्यवंशी दुसऱ्या विक्रमादित्याचा मुलगा सोमेश्वर हा इ. स. ११२७ ते ११३८ पर्यंत राजा होता. त्यानें मानसोल्लास अथवा 'अभिलषितार्थ चिंतामणि' या नांवाचा एक संस्कृत ग्रंथ शके १०५१ (इ. स. ११२९) मध्यें लिहिला. यांत ठिकठिकाणीं मराठी ठशाचीं रूपें व शब्द आढळतात व ग्रंथाचा अखेरचा थोडासा भाग तर मराठींत आहे. शिवाय महाराष्ट्रीय स्त्रियांच्या मराठी गाण्यांचा व जात्यांवरील ओव्यांचा उल्लेख केला आहे. इतकेंच नव्हे तर एका भागात मराठी पद्येंहि आलीं आहेत.

मराठी शिलालेख-ताम्रपट—शके ९०० च्या सुमारास अथवा खिस्ती शकाच्या दहाव्या शतकाच्या अखेरीस आपणांस प्रत्यक्ष मराठी भाषेंत खोदलेले शिलालेख वगैरे आढळूं लागतात. कालानुक्रमानें पाहूं गेल्यास आपणांस एकामागून एक पुढें दिलेले लेख आज उपलब्ध आहेत.

१. म्हैसूरजवळ श्रवणबेळगोळ येथील शिलालेख हा मराठींतील पहिला शिलालेख असल्यामुळें याचें विशेष महत्त्व आहे. हा लेख शके ९०५ (सन ९८३) म्हणजे ज्ञानेश्वरीच्यापूर्वी ३०७ या वर्षी कोरला.

२. चालुक्य खंभ याचा भोर ताम्रपट—हा शके १००१ (सन १०७९) मधील आहे. याची भाषा सामान्यतः अशुद्ध संस्कृत आहे. तीवर मराठी व कानडी या दोन्ही भाषांची छाया तर पडली आहेच, पण शुद्ध मराठी वाक्येंहि आहेत.

३. यानंतरचा शिलालेख म्हणजे शके १०७९ (सन ११५७) मधील पळसदेव येथील होय.

४. ह्यानंतरचा शिलालेख मोंगलाईंतील उस्मानाबाद जिल्ह्यांतील, तुळजापूर तालुक्यांतील सावरगांव येथील महामंडलेश्वर कदबकुलतिलक मायाडदेवानें दिलेल्या दानासंबंधीं आहे. ह्याचा काल '१०८६ शके आश्विन शु. १ गुरौ' असा आहे.

५. ह्यानंतरचा शिलालेख म्हणजे परळ येथील सरकारी बंगला बांधीत असतांना सांपडलेला. हा शके ११०९ (सन ११८७) मध्यें कोरलेला असल्यामुळें ज्ञानेश्वरीच्यापूर्वी १०३ वर्षांचा ठरतो. ह्यांतील प्रारंभींचा मजकूर संस्कृतांत असून शेवटच्या दोन ओळींतील शपथ मात्र मराठींत आहे. त्यावरून एक गोष्ट उघड आहे कीं, ह्या सुमारास शिष्टांची दरबारी भाषा जरी संस्कृत असली तरी सामान्य लोकांची भाषा सरसहा मराठी होती.

६. खानदेशांत चाळीसगांवापासून दहा मैलावर असलेल्या पाटण या गांवांतील श्रीभवानीच्या मंदिरांतील शिलालेख वरील लेखानंतरचा आहे. हा लेख ज्ञानेश्वरीच्यापूर्वी ८४ वर्षांचा म्हणजे शके ११२८ (सन १२०६) मधील आहे. हा लेख भाषेच्या दृष्टीनें अधिक स्पष्ट आहे. लीलावतीचे कर्ते प्रसिद्ध गणिती भास्कराचार्य यांच्या चागदेव नांवाच्या नातवानें हा लेख खोदविला आहे.

७. ह्यानंतरचा शिलालेख शके ११५० (सन १२२८) मधील आहे. म्हणजे ज्ञानेश्वरीच्यापूर्वी ६२ वर्षें ह्याचा काल येतो. हा लेख आंबेजोगाई येथें मिळाला असून ह्याला खोलेश्वराचा शिलालेख असें म्हणतात.

८. ह्या लेखानंतरचा शके ११६१ (सन १२३९) मधील नेवासें येथील शिलालेख होय. हा ज्ञानेश्वरीपेक्षां ५१ वर्षांनीं जुना आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्या खांबाला टेकून ज्ञानेश्वरी लिहिली, अशी समजूत आहे. तेथें कणेरेश्वराचें जुनें हेमाडपंती देऊळ होतें. त्या देवळाच्या एका दगडावरील हा लेख आहे.

९. यादवकृष्ण याच्या वेळचा तासगांव-ताम्रपट हा नेवासें येथील शिलालेखानंतरचा असावा; कारण यांत काळाचा स्पष्ट उल्लेख नाहीं.

१०. ज्ञानेश्वरीच्यापूर्वी १७ वर्षें म्हणजे शके ११९५ (सन १२७३) मध्यें कोरलेला पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाच्या मंदिरात एक शिलालेख आहे. ह्यालाच लोक भाविकपणें चौऱ्यायशींची शिळा म्हणतात. ह्या शिळेस पाठ लाविली म्हणजे मनुष्य चौऱ्यायशीं योनींतून मुक्त होतो अशी समजूत आहे. श्रीविठ्ठलाचें मंदिर बांधण्याकरितां वर्गणी गोळा करण्यांत आली त्या वेळेस ज्यानीं ज्यांनीं मदत केली त्यांचीं नांवें वर्णानुक्रमानुसार त्या शिळेवर आठ रकाने काढून त्यांत कोरलीं आहेत.

११. ह्यानंतरचा रामदेव जाधवाच्या राजवटींतील शके १२०७ म्हणजे ज्ञानेश्वरीच्या ५ वर्षें पूर्वीचा सासवड (पुणें जिल्हा) जवळ पूर गांवांत एक शिलालेख आहे.

१२. ज्ञानेश्वरीच्या एकच वर्ष पूर्वीचा म्हणजे शके १२११ (सन १२८९) मधील निझामशाहींतील उनकेश्वराचा शिलालेख आहे. यांत देवालयास दान दिल्याचा उल्लेख आहे. ह्या लेखांतील भाषा संस्कृतमिश्र मराठी आहे. कांहीं रूपें अस्सल मराठी शिक्याचीं आहेत.

१३. ज्ञानेश्वरकालीन गोमांतकी मराठी ताम्रपट—हा ताम्रपट फोंडें महालांतील वेरें गांवचा. याचा शक १२२१ असा प्रारंभींच दिलेला आहे. परंतु हल्लींच्या पद्धतीनें शके १२२२ या वर्षी सावरी म्हणजे शार्वरी संवत्सर येत असल्यानें हाच काल येतो.

लिखित व अलिखित वाङ्मय—शिलालेखांनीं व्यापलेल्या कालांत मराठी भाषा ही सामान्य जनतेची भाषा होती ही गोष्ट उघड होते., कारण शिलालेखांतील मजकूर सामान्य जनतेस, येणाऱ्या जाणाऱ्या कोणाहि मनुष्यास कळावा म्हणून लौकिक अथवा सामान्य जनांच्या भाषेंत लेखकानें खोदून ठेवलेला असतो. याप्रमाणें मराठी ही बोलीरूपानें या दीर्घकालांत वावरत होती. आतां या बोलींत कांहीं जानपदगीतें, कथा, वगैरे वाङ्मय तयार होत असलेंच पाहिजे. पण हें बहुधा अलिखित स्वरूपात व तोंडी परंपरेनें चाललें असलें पाहिजे व तें फारसें शिष्टस्वरूपांत असणें संभवत नाहीं. त्यामुळें त्याचें संशोधन करणें कठिण असतें व म्हणून अमुक काळाचें अमुक लौकिक वाङ्मय आहे असें निश्चितपणें सांगणें कठिण असतें.

भाषेचें बदलतें स्वरूप—कोणत्याहि भाषेंत देशकालानुसार बदल होत जात असतो व हा बदल होण्यास अनेक कारणें असतात. (१) वंश, (२) हवामान, (३) व्यवसाय, (४) घाणेंद्रियाची रचना, (५) व्यक्तिगत उच्चारभिन्नता, (६) ऐतिहासिक व सांस्कृतिक परिस्थिति, (७) उच्चारसुलभतेकडे प्रवृत्ति, (८) मानवस्वभाव, (९) अनुकरणप्रियता, (१०) परकीयांचा संसर्ग, (११) आनुवंशिक संस्कार, इत्यादि कारणांनीं भाषेच्या स्वरूपांत वरचेवर बदल होत असतो. तसेंच सामाजिक, राजकीय किंवा धार्मिक क्रांति अथवा दुष्काळ वगैरे सारखी राष्ट्रीय आपत्ति यामुळें समाजांत जी खळबळ होते तिचाहि भाषेच्या स्वरूपांवर परिणाम होतो. तेव्हां आतां आपण कालानुक्रमानें मराठी भाषेचें स्वरूप कसकसें बदलत गेलें तें पाहूं.

कालानुक्रमानें मराठी भाषेंत झालेले भेद—मराठीचा उत्पत्तिकाल ७ वें शतक हा आहे असें पूर्वी दाखविलें आहेच, परंतु ती ग्रंथनिविष्ट होण्यास आणखी पांच शतकें जावीं लागलीं. या पांच शतकांत मराठीमध्यें कांहीं तरी जानपद स्वरूपाचें वाङ्मय निर्माण झालें असावें. परंतु तें उपलब्ध नाहीं. या पांच शतकांतील भाषेचें स्वरूप आपणांस फक्त शिलालेख व ताम्रपट यातच दृष्टीस पडतें. ह्यातव्या शतकाच्या सुरुवातीपासून तों मुकुंदराज—ज्ञानेश्वरांच्या कालापर्यंत म्हणजे बाराव्या—तेराव्या शतकांपर्यंत ज्या ज्या शिलालेखांत किंवा ताम्रपटांत मराठी शब्द, रूपें अगर वाक्यें आढळतात त्यांवरून आपणास बाराव्या-तेराव्या शतकापर्यंतच्या मराठीच्या स्थितीची थोडीशी कल्पना येईल. या एवढ्या कालांतील ग्रंथ उपलब्ध नसल्यानें आपणांस बाराव्या शतकापर्यंतच्या वाङ्मयबद्ध मराठीची नक्की स्थिति कळणें कठिण झालें आहे. म्हणून तेराव्या शतकापासून पुढील कालातील या भाषेच्या अवस्था पाहूं.

बारावें शतक—मराठीचे आद्य कवि आज मुकुंदराज हे समजण्यांत येतात. त्यांचा काल इ. स. ११२८–११९८ हा आहे. यांनीं विवेकसिंधु व परमामृत असे दोन वेदान्तपर ग्रंथ लिहिले आहेत. हे ग्रंथ त्या वेळच्या भाषेंत जसे लिहिले गेले तसे मिळणें दुरापास्त झालें आहे. आज उपलब्ध असलेल्या विवेकसिंधूंतील मराठी भाषा ही शुद्ध बाराव्या शतकांतील आहे असें म्हणता येत नाहीं. मुकुंदराजानीं हा ग्रंथ शके १११० (सन ११८८) मध्यें रचिला.

तेरावें शतक—या शतकांतील मुख्य ग्रंथ म्हणजे ज्ञानेश्वरी. यांत आपणांस मराठीचा वाग्विलास पूर्ण रीतीनें पाहावयास मिळतो. यांतील उपमा, रूपकें, इ. अलंकारांची समृद्धि, विषयप्रतिपादनाची उत्कृष्ट हातोटी, शांतिरसाला मूर्धाभिषिक्त करून ग्रंथ वेदांतपर असला तरी शृंगाररसाचीहि उदाहरणरूपानीं दाखविलेली चुणूक, प्रसाद-प्रतिभादि गुणांची उज्वलता, इत्यादि पाहून मराठीची योग्यता व संपन्नता प्रत्ययास येते. वेदांतासारखे गहन विषय संस्कृतमधूनच सांगितले पाहिजेत हा दंडक

मोडण्याचें धारिष्ट ज्ञानेश्वरांनीं केलें तें उगाच नव्हे. त्या वेळीं मराठी भाषेला उन्नत व संपन्न स्वरूप आलें होतें. हें शतक हा मराठीचा वैभवकाल होता, असें ज्ञानेश्वरी ग्रंथ पाहून म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

ज्ञानेश्वराच्यापूर्वींपासून महानुभावीयांनीं ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली. लीलाचरित्र, चक्रधरसूत्रें, वत्सहरण, रुक्मिणी-स्वयंवर, धवळे हे ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या पूर्वीचे आहेत. या पंथाच्या लोकांनीं त्या वेळीं पद्याप्रमाणें गद्यांतहि ग्रंथरचना केली.

ह्या वेळेच्या महानुभावीय वाङ्मयांतील मराठीचें स्वरूप आपणांस निश्चित करण्यास कठिण झालेलें आहे. कारण या पंथाचें सर्व वाङ्मय संकेतलिपींत लिहिलें आहे. या लिपीचा जनक खळ व्यास एकनाथकालीन असल्यामुळें साहजिकच भाषेचें मूळचें वळण जाऊन त्याऐवजीं एकनाथकालीन वळण आलेलें आहे. ज्ञानेश्वरीची सुद्धां तीच स्थिति आहे. स्वतः एकनाथांनींच ज्ञानेश्वरी परिशुद्ध केली; परंतु, जशी ज्ञानेश्वरांनीं रचिली तशीच जरी नसली तरी एकनाथपूर्वकालीन राजवाडे यांनीं संशोधित करून छापलेली ज्ञानेश्वरीची एक प्रत उपलब्ध झाली आहे. त्यावरून आपणांस तेराव्या शतकांत मराठी भाषेचें स्वरूप कसें होतें तें कांहींसें पाहतां येतें.

वरील लेखकांशिवाय निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई, नामदेव आणि त्यांचें सर्व कुटुंब आणि इतर अनेक भक्त मंडळी यांचे अभंग वगैरे आज जरी उपलब्ध असले तरी ते नेहमींच्या पाठांत फार असल्यानें त्यांचें अर्वाचीनीकरण फार झालें आहे व यामुळें तेराव्या शतकांतील भाषेचें स्वरूप ठरविण्यास त्यांचा उपयोग नाहीं.

शिलालेख व ताम्रपट यांवरील लेखांत कोणाला ढवळाढवळ करणें शक्य नसल्यामुळें ह्या लेखांतील भाषा त्या काळीं जशी होती तशीच्या तशीच आपणांस पाहावयास मिळते व या भाषेवरून आपणांस त्या काळचें तिचें स्वरूप समजतें. तसें ग्रंथांचें नाहीं.

तेराव्या शतकांतील शिलालेख अनुक्रमानें पुढीलप्रमाणें उपलब्ध आहेत :—

(१) पाटण येथील भवानीच्या मंदिरांतील— सन १२०६. (२) आंबेजोगाई येथील— सन १२२८. (३) नेवासें येथील— सन १२३९. (४) पंढरपूर येथील चौऱ्यायशींच्या शिळेवरील— सन १२७३. (५) निझामशाहींतील उनकेश्वराचा शिलालेख— सन १२८९. (६) वेळापूर येथील— सन १३००.

राजवाडे यांनीं संपादिलेली ज्ञानेश्वरी व शिलालेख यांवरून या शतकांतील मराठी भाषेच्या स्वरूपाविषयीं सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, मराठी भाषेचें अस्सल व निष्कलंक असें स्वरूप आपणांस या कालांत पाहावयास मिळतें. त्या वेळचे यादव राजे हे विद्वान् ग्रंथकार व संतकवी यांची चांगलीच वास्तपुस्त करीत. म्हणजे मराठीला राजाश्रय मिळाल्यामुळें ती चांगलीच फोफावलेली एकदम दृष्टीस पडते. तिचे मूळचे अंकुर अदृश्य आहेत. या काळांत सौंदर्य, प्रसाद, गांभीर्य, अलंकार, प्रचुरता, इत्यादि गुण तिच्या ठिकाणीं चांगलेच दृष्टीस पडतात.

महानुभावी वाङ्मय कांहीं गद्यांतहि आहे. ज्ञानेश्वरी आदि-करून पद्य ग्रंथांत आपणांस भाषावैभव पूर्णत्वानें आढळून येतें; परंतु या महानुभावी गद्य ग्रंथांची भाषा अगदीं साधी, सुटसुटीत, सरळ, सुबोध अशी आहे. यांत लहान लहान व तुटक वाक्यें आढळतात. पांडित्याचें प्रदर्शन अजीबात टाळलें आहे.

मराठी संस्कृत-प्राकृतोद्भव असल्यानें तींत संस्कृत-प्राकृत शब्द येणें अपरिहार्य आहे; परंतु संस्कृतचा पगडा बसलेला मात्र कोठेंहि दिसत नाहीं. यावनी भाषांचा त्या वेळीं तिला विटाळहि झालेला नाहीं. नाहीं म्हणावयास मराठी भाषेच्या जन्माच्या वेळीं मराठीचा आणि कानडी, तेलगू ह्या द्राविडी भाषांचा अति निकट संबंध आल्यामुळें त्या भाषांच्या कांहीं खुणा मराठी भाषेवर उमटल्या आहेत. ज्ञानेश्वरींत कांहीं तेलगू शब्द आढळतात पण ते फारच थोडे.

चौदावें शतक—तेराव्या शतकांतील ज्ञानेश्वरानंतर चौदाव्या शतकांत अनेक कवी झाले. तथापि ते ज्ञानेश्वराच्या योग्यतेचे नव्हते. परंतु या कवि-ग्रंथकारांचें लिखाण जें उपलब्ध आहे, त्यांतील बऱ्याचशा भागांचें अर्वाचीनीकरण झालें आहे. ज्ञानेश्वर-समकालीन असलेला व ज्ञानेश्वरानंतरहि पुष्कळ वर्षे वैष्णव संप्रदायाचा धुरीण असलेला नामदेव व त्याच्या घरच्या जनी दासी-सह सर्व मंडळी आणि इतर भक्त मंडळी यांचे सध्यां आढळणारे अभंग हे चौदाव्या शतकांतील आहेत. परंतु आपणांस हल्लीं ते जसे पाहावयास मिळतात त्यापेक्षां त्यांचें मूळ स्वरूप फारच निराळें असलें पाहिजे. नामदेवानें १३५० सालीं समाधि घेतली. परंतु त्याच्या प्रभावळींतील इतर संतकवी यांनीं त्याच्यापूर्वींच आपले देह ठेविले. सेना न्हावी, परिसा भागवत, विसोबा खेचर (१३०९), नरहरि सोनार (१३१४), बंका महार (१३१९), जगमित्र नागा (१३३०), चोखा मेळा (१३३९), इ. वारकरी संप्रदायां-तील चौदाव्या शतकांतील संतकवींचे अभंग सतत पाठानें पार बदलून त्यांचें मूळ स्वरूप नाहींसें झालें आहे.

वरीलप्रमाणेंच अज्ञानकवि याच्या वरदनागेश या ग्रंथाची स्थिति आहे. सत्यामलनाथ आणि बहिरापिसा यांचे सिद्धांत-रहस्य, बहिरवी टीका, संकटहरणी, शिवग्रंथ, इत्यादि ग्रंथ हेहि या शतकाच्या उत्तरार्धांतील किंवा समाप्तिकालांतील आहेत. हे जरी अस्सल मिळालेले नसले तरी त्यांचें फारसें अर्वाचीनीकरण

झालेलें नाहीं. कांहीं शब्द व रूपें ज्ञानेश्वरींतल्यासारखीं आढळतात.

महासिद्ध चांगदेव याचे कांहीं अभंग आहेत. परंतु त्यांपेक्षां अधिक महत्त्वाचा असा त्याचा 'तत्त्वसार' नांवाचा ग्रंथ असून त्याचा कांहीं भाग उपलब्ध झाला आहे. याचा रचनाकाल 'शके चौतिसेबारा' (इ. स. १३१२) हा आहे. म्हणजे ज्ञानेश्वरीनंतर बावीस वर्षांनीं हा ग्रंथ लिहिला गेला. ज्ञानेश्वर-मुक्ताबाईला गुरु केल्यामुळें व त्यांच्या सान्निध्यांत असल्यानें या ग्रंथाची भाषा ज्ञानेश्वरीसदृश असावी यांत आश्चर्य नाहीं.

ज्याचें अर्वाचीनीकरण किमपिहि न होतां, मुळांतील अस्सल भाषा कायम आहे, असा या शतकांतील उपलब्ध ग्रंथ म्हणजे चोंभा कविकृत 'उपाहरण'. या ग्रंथाचा रचनाकाल अंतःप्रमाणांवरून व भाषेवरून राजवाडे शके १३०० ते १४०० असा देतात. भाषेच्या दृष्टीनें हा ग्रंथ ज्ञानेश्वरीला अगदीं जवळचा आहे. यांत ज्ञानेश्वरींतील शब्द, वर्णनशैली आणि रूपें जशींच्या तशींच आहेत. भाषा शुद्ध मराठी असून फारसीचा संपर्क नाहीं आणि संस्कृतहि कार्याकारण आहे. भाषेचा ओघ सहज असून कृत्रिमता मुळींच नाहीं; इत्यादि कारणांनीं या ग्रंथाला या शतकाचा आदर्श ग्रंथ मानण्यास हरकत नाहीं. या शतकांतील भाषेचें स्वरूप ठरविण्याला याचाच पुष्कळसा उपयोग आहे.

परशुराम पंडिताचा पर्शरामोपदेश हा ग्रंथ इ. स. १३५६ मधील आहे. याचीहि भाषेचें स्वरूप ठरविण्यास पुष्कळशी मदत होणार आहे.

महानुभावीयांना ज्याप्रमाणें 'महाराष्ट्रीं असावें' अशी चक्रधराची आज्ञा होती, त्याप्रमाणें त्याच्या पट्टशिष्यानें म्हणजे नागदेवाचार्यानें मराठीचा अभिमान बाळगून आपल्या केशवव्यास नामक शिष्यास संस्कृत रचनेपासून परावृत्त केलें. मराठी हीच आपल्या पंथाची भाषा महानुभावीयांनीं मुक्रर केली व अनेक गद्य-पद्य ग्रंथ मराठींत लिहिले. या शतकांत अनेक कवी व लेखक झाले. त्यांपैकीं नारोव्यास बहाळिये, वोपदेव-शिष्य पंडित भीष्माचार्य आणि मुनिव्यास हे मुख्य होत. पैकीं नारोव्यास बहाळिये याचा ऋद्धिपुरवर्णन हा ग्रंथ 'सातीग्रंथां' तील आहे व भीष्माचार्यांचें पंचवार्तिक हा ग्रंथ भाषाशास्त्रावरील असल्यामुळें महत्त्वाचा आहे.

सांकेतिक लिपि—या पंथाच्या वाङ्मयांतील या कालाची महत्त्वाची गोष्ट म्हणजे गुप्त लिपि. सह्याद्रिवर्णनकर्ता रवळोव्यास यानें 'सकल' लिपि काढली व या लिपीनंतर आणखीहि अशा गुप्त लिप्या निघाल्या. इतर लोकांपासून आपलें वाङ्मय गुप्त ठेवण्याची जरूरी या पंथीयांना वाटली व त्यामुळें या निरनिराळ्या सांकेतिक गुप्त लिप्या निघून यांतच त्यांचें वाङ्मय लिहिलें गेलें. यामुळें यांच्या वाङ्मयाचा इतर लोकांवर किंवा त्या काळांतील प्रमुख असलेल्या वारकरी संप्रदायावर कांहींच परिणाम झाला नाहीं. त्या लिप्यांमुळें निरनिराळ्या ग्रंथांतील पाठ मात्र शुद्ध राहिले आहेत. यामुळेंच महानुभावीय ग्रंथ भाषाभ्यासासाठीं आपल्या उपयोगी पडणारे आहेत.

परभाषासंपर्क—या शतकांतील मुख्य गोष्ट म्हणजे राज्यक्रांति. यादवांची सत्ता नाहींशी होऊन यवनांच्या अमलाखालीं महाराष्ट्र देश गेला. या राज्यक्रांतीचा परिणाम ज्याप्रमाणें धर्म आणि संस्कृति यांवर झाला, त्याप्रमाणें तो भाषेवरहि झाला; किंबहुना त्यापेक्षां अधिक झाला. कारण स्वराज्यस्थापनेनंतर आणि शिवाजीच्या स्वभाषाभिमानालाहि न जुमानतां फारसी, अरबी, इत्यादि यावनी भाषांनीं आपला पगडा मराठीवर कायम ठेविला. मुसलमान राज्यकर्ते असल्यामुळें यावनी भाषा ही दरबारी भाषा झाली आणि त्यामुळें ज्या लोकांचा सरकारदरबारशीं जास्त संबंध येई, त्यांच्या बोलण्यांत यावनी शब्द येऊं लागले. परंतु जितका सरकारदरबारीं या यावनी भाषेचा परिणाम लवकर झाला तितका सामान्य लोकांच्या भाषेवर किंवा आध्यात्मिक वाङ्मयावर झालेला दिसत नाहीं.

सारांश, चौदाव्या शतकांतील भाषा ही ज्ञानेश्वरींतील भाषेहून फारशी भिन्न अशी आढळणार नाहीं.

या चौदाव्या शतकांतील आध्यात्मिक मराठीवर फारसी इ. यावनी भाषांचा विशेष परिणाम झाला नाहीं, हें पूर्वींच सांगितलें. चोंभाकृत उपाहरणांत यावनी भाषेंतील शब्द मुळींच नाहींत. मुसलमानी राज्याच्या योगानें लोकांच्या बोलींत थोडे थोडे यावनी शब्द येऊं लागले. बहामनी राज्याच्या स्थापनेनंतर ५० वर्षांनीं म्हणजे पुढील पंधराव्या शतकांतील वाङ्मयांत फारसी शब्द आलेले दिसतात.

पंधरावें शतक—हें शतक मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें बरेंचसें कठिण गेलेलें दिसतें. कारण या कालांत ग्रंथकार व कवी फारच कमी झालेले दिसतात. दुर्गादेवीचा दुष्काळ इ. स. १४६८ ते १४७५ पर्यंत होता. ह्या दुष्काळांत अवर्षणामुळें जिकडे तिकडे अन्नान्नदशा होऊन लोक प्राणांस मुकले. या दुष्काळाची प्रत्यक्ष गांजणूक महाराष्ट्रास बारा वर्षें भोंवली. धान्याचा कण आणि पाण्याचा थेंब जिकडे सांपडेल तिकडे लोक धांव घेऊं लागले. असल्या आपत्तींत धर्म, भाषा व संस्कृति यांकडे लोकांचें लक्ष राहिलें नाहीं यांत आश्चर्य नाहीं. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या वेळीं मराठीचा भरमराटीचा काळ होता. त्यांच्या पश्चात् एक प्रकारची उतरती कळा मराठी वाङ्मयाला लागली ती एकनाथकालापर्यंत. ही उतरती कळा लागण्यास वरील गोष्टी कारणीभूत झाल्या असाव्या.

या शतकांत एकनाथाचे पणजोबा भानुदास हे होऊन गेले. यांचा काल इ. स. १४४८–१५१३ हा आहे. कान्होपात्रा इ. स. १४८० च्या सुमारास झाली व दामाजीपंतानें प्रसिद्ध दुर्गादेवीच्या दुष्काळांत सरकारी कोठार लुटविलें. या तिघांनींहि अभंग केले आहेत. या शतकांत महानुभावीय लेखक, चाल्हणशिष्य नृसिंह कवि, कवीश्वर आम्नाय दीक्षित, श्रीगोविंदराजगुरु बल्लाळ, आणि कृष्णमुनीश्वराम्नाय, इ. होऊन गेले. त्यांनीं अनुक्रमें संकेतगीता व रुक्मिणीस्वयंवर, भक्तिप्रबोध व ब्रह्मांडगोलक हे ग्रंथ लिहिले. हें शतक मराठीच्या स्वरूपाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. तेराव्या–चौदाव्या शतकांतील ज्ञानेश्वरीसारखी भाषा बदलून तिला निराळें स्वरूप येऊं लागलें होतें. तिच्यांत मुसलमानांच्या राज्ययंत्रामुळें फारसी-अरबी शब्द शिरत होते. तिचें शुद्ध मराठी रूप बदलून दुसरें जरा निराळें रूप येत होतें. फारसी भाषेच्या प्रवेशाविरुद्ध प्रतिक्रिया म्हणूनच कीं काय, संस्कृतचाहि परिणाम तिच्यावर जास्त होऊं लागला. प्राकृत किंवा अपभ्रष्ट शब्दांच्याऐवजीं शुद्ध संस्कृत शब्द घालण्याची जी पुढें सोळाव्या शतकांत प्रथा पडली तिची सुरुवात याच शतकांत झाली असावी. यावनी भाषाच्या प्रतिकारांत, तद्भव शब्दांना चाट मिळून तत्सम शब्द जास्त प्रचारांत येऊं लागले. ही प्रवृत्ति पुढील शतकांत जी जोरावलेली दिसते तिला सुरुवात याच शतकात झालेली असावी.

या वेळचें भाषेचें स्वरूप आपणांस फक्त महानुभावीय ग्रंथांवरून समजून घेतलें पाहिजे. कारण भानुदास, दामाजीपंत, इ. चे अभंग त्या काळच्या भाषेच्या स्वरूपांत न राहतां, फार बदलले आहेत. या शतकांत फारसी शब्द बोलण्यांत आणि सरकारी कामकाजांत लेखनांत येऊं लागले होते.

सोळावें शतक—तेराव्या शतकांत मुसलमानांची टोळधाड दक्षिणेंत आली व तिनें मराठी राज्य फस्त केलें. तेव्हांपासून सोळाव्या शतकापर्यंत मुसलमानी सत्तेला स्थिरस्थावर होण्यास काळ लागला. या शतकात महाराष्ट्राला राजकीय स्थैर्य प्राप्त झालें. हिंदूंचा धर्मच्छळ कमी होऊं लागला व मुसलमान राजांविषयीं हिंदूंच्या मनांत थोडाबहुत आदरभाव किंवा विश्वास वाटूं लागला. याचा परिणाम म्हणजे लोकांना धार्मिक व पारमार्थिक गोष्टींत मन घालतां येऊं लागलें व मध्यंतरींच्या दोन-तीन शतकांतील अंदाधुंदीमुळें वाङ्मयाला जी उतरती कळा लागली होती ती बदलून वाङ्मयाच्या गगनरेषेनें एकदम उच्च बिंदु गांठला. या शतकांत एकनाथ–दासोपंतासारखे प्रतिभाशाली संतकवी निर्माण झाले आणि त्यांनीं 'अर्णवा'सारखें वाङ्मय संपादिलें. दत्त सांप्रदायिकांचा वेदतुल्य ग्रंथ 'गुरुचरित्र' याच शतकांतला.

ज्याप्रमाणें हें शतक वाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीनें वरच्या दर्जाचें म्हणून एक प्रकारचें महत्त्व पावलें आहे त्याप्रमाणें या शतकाचा दुसरा विशेष म्हणजे जुन्या ग्रंथांचें संशोधन हा होय. एकनाथानें पूर्वीचा अति शुद्ध परंतु 'पाठांतरें शुद्धाबद्ध' झालेला ज्ञानेश्वरी ग्रंथ 'शोधून प्रतिशुद्ध' केला. महानुभावी वाङ्मयांतहि निष्कलंक, गीतगोविंदाची महाराष्ट्र टीका, इत्यादि ग्रंथांवरहि शोधकारांची लेखणी फिरून ते ग्रंथ नव्यानें प्रचारांत आले.

या शतकाचा आणखी एक विशेष म्हणजे मराठीची मुलूखगिरी. शिवाजीनें स्वराज्यस्थापना केल्यानंतर मराठे वीरांनीं अटकेस झेंडे जे लावले त्याच्या किती तरी अगोदरच मराठीनें मुलूखगिरी सुरू केली होती. याचें श्रेय महानुभाव पंथालाच आहे. या शतकांत महानुभाव पंथाचा प्रसार पंजाबांत झाला व तेथून पुढें तो सरहद्द प्रांत, काश्मीर आणि अफगाणिस्तान येथवरहि जाऊन पोहोंचला. या पंथानें आपली भाषा मराठी ही निश्चित केल्यामुळें व याच भाषेंत या पंथाचे ग्रंथ असल्यामुळें महाराष्ट्राबाहेरहि या पंथीयांनीं याच भाषेंतील आपल्या ग्रंथांचा प्रसार केला. काश्मीर, काबूल येथील मठांत आणि कृष्णमंदिरांत पूजास्तोत्रें इत्यादि मराठींतून होत असून मराठी ग्रंथांचा संग्रह प्रत्येक मठात व मंदिरांत असतो.

या शतकातील मराठीवर मुसलमानी सत्तेच्या योगानें झालेला फारसीचा परिणाम चांगल्या रीतीनें प्रत्ययास येतो. परमार्थपर अशा वाङ्मयांत फारसी शब्द सहसा येत नाहींत. तथापि एकनाथानें जीं रूपकें केलीं आहेत, त्यांपैकीं अर्जदस्त, ताकीदपत्र, जाबचिठी, कऊलपत्र, जमाखर्च, इ. सामान्य व्यवहारांवर जीं आहेत, त्यांमध्यें फारसी शब्द जवळजवळ निम्मे आहेत. राजसत्ता मुसलमानी असल्यामुळें सरकारदरबारांत फारसी भाषा सुरू झाली व हळूहळू सरकार कामासंबंधीं सर्व कागदपत्र फारसींत लिहूं लागले. पूर्वापार धर्मग्रंथांत आढळणाऱ्या संज्ञा नाहींशा झाल्या व त्यांच्या जागा मुसलमानी शब्दांनीं घेतल्या. या फरकाचें दृश्य आपणांस एकनाथाच्या रूपकांतून पाहावयास मिळतें. अशा रीतीनें फारसी–मराठीचा संबंध जो ह्या कालांत सुरू झाला तो पुढें मुसलमानी राजवटी होत्या तोंपर्यंत चालला, एवढेंच नव्हे तर पुढें पेशवाईमध्येंसुद्धां ढिलावला नाहीं व अजून इंग्रजी अमलांतसुद्धां विशेषतः कोर्टांत फारसी शब्दांनीं आपलें बस्तान कायम राखिलें आहे.

कानडी तेलगूचा परिणाम मराठीवर तिच्या जन्मापासून होत आहेच. पूर्वींच्या 'ल'बद्दल 'ळ' या कालांत अधिक येऊं लागला. याला उदाहरणें सिंहासनबत्तिशींत भरपूर दिसतील. 'न'ऐवजीं 'ण' घातलेला पुष्कळ ठिकाणीं आढळतो; उदा., तेणें (त्यानें), णाणा (नाना), कल्पणा,

संस्कृत शब्द पूर्वीच्या शुद्ध देशी शब्दांची जागा पटकावूं लागले. पहिले देशी शब्द अपभ्रष्ट वाटल्यानें त्यांच्याऐवजीं शुद्ध संस्कृत शब्द घालण्याची ऐट जास्त प्रचारांत आली असावी. या शतकांत पूर्वीचे जुने विभक्तिप्रत्यय बहुतेक गेले व हल्लींच्या रूपांना जवळ असलेलीं अशीं रूपें जास्त प्रचारांत येऊं लागलीं.

सतरावें शतक—सतरावें शतक म्हणजे महाराष्ट्राचा अभ्युदय-काल. याच कालांत छत्रपति शिवाजीनें स्वराज्यस्थापना केली. सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याचें वारें शिवाजीच्या नसानसांतून खेळत होतें. त्याच्या दिव्य चारित्र्यानें महाराष्ट्रांत नवचैतन्य निर्माण होऊन स्वातंत्र्याची लाट महाराष्ट्र देशभर उठली होती. स्वराज्याच्या स्थापनेबरोबर स्वधर्म व स्वभाषा यांच्या सुधारणेकडे लक्ष जाणें अपरिहार्य होतें. या शतकाच्या सुरुवातीला फारसीनें मराठीवर आपली मगरमिठी इतकी घट्ट मारली होती व तिला जबड्यांत इतकें ओढून धरलें होतें कीं, तिला गिळंकृत करावयाचीच फक्त ठेविली होती. सरकारी कामांतील कागदपत्र पाहिले म्हणजे याची साक्ष पटते. शिवाजीला प्रत्येक परकीय गोष्टीबद्दल अत्यंत तिटकारा व द्वेष असल्यानें, त्यानें फारसीवर टोला मारला आणि मराठीला तिच्या तडाख्यांतून सोडविण्याचा प्रयत्न केला. राजदरबारांत नेहमीं लागणाऱ्या शब्दांचा 'राज्यव्यवहार-कोश' करण्यास रघुनाथ पंडितास त्यानें आज्ञा केली व अशा रीतीनें मराठीच्या शुद्धीकरणाचा प्रथम उपक्रम केला. तेराव्या शतकानंतर मराठी वाङ्मयाचा प्रवाह क्षीण होत चालला होता. परंतु सोळाव्या शतकांत मराठी भाषारूप नदीला एकदम भरती आली आणि तिच्या पात्राची रुंदी व खोली वाढून तिला पूर्ववत् म्हणजे तेराव्या शतकांतील स्वरूपाप्रमाणें किंवा त्याहूनहि अधिक मोठें असें रूप प्राप्त झालें. हा प्रवाह अशाच स्वरूपांत या शतकांतहि वाहत होता. या शतकाच्या पूर्वभागांत फारसीच्या योगानें हिचा प्रवाह बराचसा गढूळ झाला होता तो पुढें निवळूं लागला; आणि तो स्वच्छ, आल्हाद-कारक, आणि नवचैतन्योत्पादक जीवनानें पूर्ण होण्याची चिन्हें दिसूं लागलीं. भाषिक उलाढाल आणि वाङ्मयीन खटा-टोप यांत शिवकाल कसा चिरस्मरणीय कालखंड आहे, हें पुढें दिलेल्या कवींच्या नांवांवरून कळून येईल : मुक्तेश्वर, रमावल्लभ-दास, शिवकल्याण, लोलिंबराज, शामराज, तुकाराम, बोधलेबुवा, निंबराज, मोरया गोसावी, गणेशनाथ, विठ्ठलदास, शेख महंमद, रामदास, गंगाधर, रंगनाथस्वामी, आनंदमूर्ति, केशवस्वामी, वामनपंडित, नागेश, विठ्ठल बिडकर, वगैरे. या संत मंडळींच्या कामगिरीनें शिवकाल म्हणजे वाङ्मयाच्या खटाटोपांत चिरस्मरणीय असा कालखंड झाला आहे. ह्याशिवाय रामदास, तुकाराम व इतर संत ह्यांचा शिष्यगण व वेणाबाई, आक्काबाई व बहिणाबाई या स्त्रिया आपापल्या परीनें हातभार लावीत होत्या. ह्या सर्वांचा समाजावर परिणाम झाल्यानेंच फारसीचा लोंढा थोपवितां आला.

पोर्तुगीजांचा उपसर्ग मराठीस पंधराव्या शतकापासून होऊं लागला होता. त्यांनीं तेव्हांपासून या कालापर्यंत आरमारी शब्द, हत्यारांचीं नांवें, खलाशांची भाषा, पोशाखांचे शब्द, सैन्यांतील हुकूम, धर्मासंबंधीं परिभाषा, कांहीं युरोपीय पदार्थांचीं नांवें, कांहीं पशुपक्ष्यांचीं नांवें, अशा पुष्कळ शब्दांचें लोण मराठींत आणून सोडिलें होतें.

या शतकांत मराठीच्या आयुष्यांतील एक महत्त्वाची गोष्ट घडली. फादर स्टीफन या एका इंग्रज मिशनरी गृहस्थानें मराठी भाषेंत लिहिलेलें खिस्तपुराण इ. स. १६१५ मध्यें छापलें गेलें ही ती गोष्ट होय. हेंच मराठी भाषेंतील छापलेलें पहिलें पुस्तक होय. मात्र हें देवनागरी लिपींत नाहीं, रोमन लिपींत आहे. या वेळच्या उच्चारांवर फारसी उच्चारांचा परिणाम झालेला दिसतो. फारसी भाषेंतून मराठीमध्यें जे जे व्यंजनान्त शब्द आले ते सर्व स्वरान्त झाले. स्वरांचा निभृत उच्चार करण्याचा एक नवीनच प्रकार मराठींत चांगल्या जाणत्यांच्या तोंडांत रूढ होऊन बसला. पुणें, नगर, नाशिक, खानदेश या जिल्ह्यांत, विशेषतः गांवढळ लोकांच्या भाषेंत हा निभृत उच्चाराचा प्रकार तितकासा रुज-लेला दिसत नाहीं. हे लोक शब्दांतील आंतर स्वर साघात उच्चार-तात. नागर भाषेप्रमाणें पड्ला, घेत्ला, जेव्तो, कर्तो, जाग्तो असे उच्चार ते करीत नाहींत. ह्यावरून नागर भाषेंतील उच्चारांवर जितका फारसीचा परिणाम झाला तितका ग्रामीण भाषेंतील उच्चारांवर झालेला दिसत नाहीं.

या कालच्या महानुभावीय वाङ्मयाकडे पाहिल्यास त्यांत जुने शब्द आणि रूपें वापरण्याचा शक्य तितका प्रयत्न केलेला दिसतो. इतर वाङ्मय आणि हें महानुभावीय वाङ्मय यांत यामुळें पुष्कळ फरक दिसतो.

मागील शतकांतील भाषेच्या स्वरूपांत आणि या शतकाच्या भाषिक स्वरूपांत विशेष फरक नाहीं. क्रियापदांचीं रूपें पुष्कळशीं अलीकडीलसारखीं भासतात. नामांचीं रूपें जुनीं व नवींहि आहेत. नामाला जीं विशेषणें लागलेलीं असतात, त्यांचीं रूपेंहि नामांप्रमाणेंच करण्याचा प्रघात दिसतो. संस्कृतच्या पद्ध-तीचा हा परिणाम असावा. शब्दयोगी अव्ययें वापरण्याचाहि प्रघात फार होता. नामाचें विभक्तीचें रूप घेऊन त्याला शब्द-योगी अव्ययें जोडलेलीं सांपडतात. क्रियापदांचीं रूपें या कालीं बहुधा ठरल्यासारखीं दिसतात. कारण हल्लींचीं क्रियापदांचीं रूपें व या काळचीं रूपें यांत विशेष फरक आढळत नाहीं. कांहीं जुन्या रीतीचीं रूपेंहि आढळतात. 'आहे' याऐवजीं 'असे' हें रूप आढळतें.

अठरावें शतक;—या अठराव्या शतकांत मागील शिवशाहीच्या वेळची एकंदर परिस्थिति बदलली. त्या वेळचें वातावरण पार बदललें. मुसलमानांविषयीं वाटणारा परकीयपणा बहुतेक नाहींसा झाला. दिल्लीपतीच्या मोहबतीनें आपण मुक्त झालों व त्याच्याच मोहबतीनें आपण तख्तनशीन झालों आहों; तेव्हां त्याच्या कृपाकटाक्षाप्रमाणें मराठ्यांचें राज्ययंत्र फिरलें पाहिजे अशी शाहूची कल्पना होती. मुख्य केंद्रवर्ती राजसत्तेची परकीयांबद्दल भावना ही अशा प्रकारची होती. हीच परकीयांबद्दल आत्मीयत्वाची भुरळ त्यांना भाषेसंबंधींहि पडली. हाच परानुवर्तित्वाचा ठसा शाहूकालीन किंवा पेशवेकालीन भाषेंत उमटल्यास नवल काय? मूळ समजूतच तशी असल्यानें मराठी भाषेच्याबाबत किंवा महाराष्ट्र धर्माच्याबाबत जितकी जाज्वल्य ज्योत शिव व शंभु या छत्रपतींच्या काळांत तेवली तशी शाहूकालीं तेवली नाहीं. भाषेची मगरमिठी जी बहामनी कालांत बसली ती शिवकालांत तशीच राहिली किंवा थोडीशी ढिलावली; परंतु पेशवाईंत मात्र ती जास्त जखडून आवळली गेली व शिवशाहींत भाषेसंबंधीं जे थोडेसे प्रयत्न झाले ते निरर्थक झाले. लेखक सुशिक्षित व संस्कृतज्ञ असला तरी त्याला फारसीच्या कचाट्यांतून मराठीला सोडवितां आलें नाहीं. काव्यांत मात्र फारसी शब्द फार कमी आढळतात. राजदरबार, गृहव्यवहार, बाजारहाट, सैन्यमुकाबला, वगैरे हरएक क्षेत्रांत फारसीमय मराठीच वापरली जात होती असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें. मराठी व फारसी यांचा संबंध दृढावण्यास आणखीहि एक कारण झालें. पेशवाईच्या प्रथमार्धांत मुलूखगिरीची परमावधि झाली. मुलूखगिरींत हर्षामर्षाचे प्रसंग यावयाचे ते महमदीयांशीं किंवा अन्य भाषीयांशीं. तेव्हां या धुमश्चक्रींत कोण कोणाचे किती शब्द घेतो, कोणाच्या भाषेचा परिणाम आपल्या भाषेवर झाला, याकडे लक्ष देण्यास कोणास फावत नव्हतें. म्हणूनच बहामनी कालांत मराठीच्याभोंवतीं जी एक फारसी भाषेची पोलादी चौकट घातली गेली, त्याच चौकटींत पेशव्यांच्या राजवटींतहि मराठी भाषा जखडलेली दिसते. शिवाय बहामनी बादशाही किंवा तिचीं झालेलीं उत्तरकालीन शकलें किंवा त्यांच्यानंतर आलेली निजामत ह्या सर्व राशियती महंमदी धर्माच्या होत्या तरी त्यांचा धर्माचा कडवेपणा इतका विकोपास न गेल्यामुळें इतर दृष्टीनें त्या स्थानिक लोकांत सामावून गेल्या. ह्या सत्तांबद्दल तेथील लोकांना परकेपणा वाटला नाहीं. यामुळें त्यांच्या भाषेवर महंमदीयांच्या सान्निध्याचा फार परिणाम झाला. मराठीवरील फारसीचा परिणाम दृढावण्याचें हें आणखी एक कारण म्हणजे फारसी शब्द मराठींत शिरून त्यांचा परकीपणा सामान्य लोकांच्या लक्षांत न येण्याइतके ते शब्द लोकांच्या अंगवळणीं पडले. परंतु मोरोपंतांसारखे विद्वान् संस्कृत पंडित त्यांना परकी म्हणून दूरच ठेवीत. मोरोपंत, महीपति, श्रीधर, इत्यादि कवींनीं वाङ्मयनिर्मिति करून मराठी भाषेला उत्कर्षाप्रत नेली व फारसीचा जोर आपल्या प्रांतांत तरी कमी केला आणि तिला एक निराळें वळण लाविलें. यामुळें मराठीचे निरनिराळे दोन प्रवाह झाले. दुसरा प्रवाह शाहिरी वाङ्मयांत व लोकप्रचारांतील भाषेंत पाहावयास मिळतो. या शतकाच्या उत्तरार्धांत लावण्या व पोवाडे यांच्या रचनेला जोर येत चालला व पुढील एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत तो तसाच असलेला दिसतो. हें शाहिरी वाङ्मय सामान्य लोकांनीं रचलेलें व सामान्य लोकांकरितांच असल्यामुळें त्यांत फारसी शब्द जरा अधिक आढळतात. ते शब्द त्या वेळीं सामान्य लोकांच्या प्रचारांत असले पाहिजेत. यावरून आपणांस असें दिसून येईल कीं, फारसी ही मराठीवर आपला अमल चालवीत होती व मोरोपंतांसारखे विद्वान् तिच्या प्रसाराला प्रतिकार करीत होते व मराठीला संस्कृत वळण लावीत होते. अशाच रीतीनें या कालांत कचेश्वर, निरंजन माधव, शामराज, कृष्णदयार्णव, मध्वमुनि, इत्यादि कवींनीं मराठी भाषेची उत्तम सेवा केली. ह्या त्यांच्या सेवेनें मराठीला एक सुसंस्कृत असें वळण लागलें. सामान्य भाषेहून किंवा राजदरबारच्या भाषेहून ही बरीच निराळी होती. या वेळीं फारसीचा उच्चारांवर झालेला परिणाम कंठ्य, दंततालव्य, महाप्राणमिश्रित वर्ण, इत्यादि वर्णांच्याबाबतींत जास्त दृग्गोचर होतो. शब्दांतील अ अर्धा किंवा तोकडा उच्चारण्याची फारसीची लकब मराठींत आली.

एकोणिसावें शतक—आधुनिक मराठी किंवा शिष्ट अभिजात मराठी या शतकांत बनली. या शतकांतील मराठीचीं दोन स्थित्यंतरें दिसतात. या शतकाच्या सुरुवातीला कांहीं वर्षें पेशवाई होती. त्या वेळीं पूर्वींची जुनी फारसीमिश्र मराठीच उपयोगांत होती. पेशवाईनंतरहि कांहीं वर्षें हा पूर्वीच्या भाषेचा परिणाम कायम होता. शाहिरी पोवाड्यांतून आणि लावण्यांतून फारसी शब्द आढळतात. अशा रीतीनें, साधारणमानानें, इ. स. १८१८ मध्यें पेशवाई बुडाल्यानंतरचीं आणखी ७–८ वर्षें मिळून या एकोणिसाव्या शतकाचीं पहिलीं पंचवीस वर्षें हा फारसीमिश्र मराठीचा किंवा जुन्या मराठीचा काल असें म्हणतां येईल.

इ. स. १८१८ पासून इंग्रजी अमल सुरू झाला. ही जी राज्यक्रांति झाली तिच्याबरोबर भाषेच्या स्वरूपांत आणि पेहेराव इत्यादि गोष्टींतहि फरक झाला. हिंदुस्थानला विद्यादान करणें हें आपलें श्रेष्ठ कर्तव्य आहे असें त्या वेळीं गव्हर्नर असलेल्या

एल्फिन्स्टनसाहेबाला वाटलें व त्याप्रमाणें विद्यादान करून हिंदुस्थानला सुधारण्याचें काम त्यानें हातांत घेतलें.

एल्फिन्स्टनसाहेबाची कारकीर्द सुरू होण्यापूर्वी ढाका, बंगाल प्रांतांत एक मोठें आंदोलन सुरू झालें होतें. याचें मुख्य ठिकाण श्रीरामपूर हें होय. येथें ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं देशी भाषेचीं कोशव्याकरणें तयार करून प्रसिद्ध करण्याचा उद्योग चालविला होता. डॉ. विल्यम केरे हा मिशनरी पंडित या मंडळींत अग्रेसर होता. त्यानें इ. स. १८१० मध्यें विद्यानाथ नांवाच्या पंडिताच्या साहाय्यानें मराठी-इंग्रजी कोश छापून प्रसिद्ध केला. या ग्रंथांत मराठी शब्द मोडी ठसे करून छापले आहेत. यानंतर आणखी सिंहासनबात्तिशी, रघूजी भोसल्यांची वंशावली, गीताभावचंद्रिका हीं पुस्तकें बाहेर पडलीं, आणि नंतर इंग्रजी कारकीर्द सुरू झाली, आणि पुस्तकें तयार करण्यास आणि छापण्यास सरकारांतून उत्तेजन मिळाल्यामुळें तीं पुष्कळच अधिकाधिक तयार होऊं लागलीं. छापण्याची कला मुंबईंत हळूहळू पसरत चालली आणि वरील पुस्तकांतील शेवटचें पुस्तक प्रसिद्ध आणि अत्यंत जुन्या अशा गणपत कृष्णाजीच्या छापखान्यांत छापलेलें आहे. अशा रीतीनें सरकारी उत्तेजनानें आणि छापण्याच्या कलेच्या प्रसारानें मराठींत ग्रंथाची वाढ झपाट्यानें होऊं लागली.

यापूर्वी मराठींत थोडीं पुस्तकें होतीं व जीं होतीं त्यांची माहितीहि फारशी कोणास असावी-असें दिसत नाहीं. गणितादि शास्त्रें किंवा व्याकरणकोश यांसारखीं पुस्तकें नसल्यानें तसलीं पुस्तकें तयार करण्याचा प्रयत्न सुरू झाला आणि अनेकविध विषयांवर पुस्तकें तयार होऊं लागलीं.

इंग्रजी अमदानीमुळें आणखी महत्त्वाचा फायदा म्हणजे इंग्रजी भाषेंतील वाङ्मयाचें भलें मोठें दालन महाराष्ट्रीयांना खुलें झालें. इंग्रजी ग्रंथांचें मराठींत भाषांतर करण्याचा एक नवीन प्रघात पडला. यापूर्वी सरकारी भाषा जशी फारसी होती व ज्याप्रमाणें मराठीवर तिनें जबरदस्त पगडा बसविला तशी यापुढें इंग्रजी राजभाषा झाली आणि तिनें मराठीच्या घरांत आपला चंचुप्रवेश करण्यास सुरवात केली. इंग्रजी पुस्तकांच्या भाषांतरांतून इंग्रजी तऱ्हेची वाक्यरचना आढळते.

मराठींत विरामचिन्हें या कालांतच उपयोगांत येऊं लागलीं. हीं इंग्रजींतूनच मराठींत आलीं. विरामचिन्हांच्या उपयोगानें अर्थबोध स्पष्ट होतो यांत शंका नाहीं. त्याप्रमाणेंच प्रत्येक शब्द तोडून लिहिण्याचीहि प्रथा पडली.

या शतकांत इंग्रजी भाषेच्या परिणामापेक्षां संस्कृत भाषेचाच परिणाम मराठीवर अधिक झालेला आहे. फारसी नामोहरम झाली ती इंग्रजीच्या परिणामामुळें नसून संस्कृतच्या परिणामामुळें. हा संस्कृतचा परिणाम संस्कृतज्ञ शास्त्री-पंडितांनीं मराठींत लिहिण्यास सुरवात केल्यामुळें झाला. सरकारनें ह्या शास्त्री-पंडितांच्या मदतीनें अनेक पुस्तकें तयार केलीं व तींच पुस्तकें छापल्यामुळें व त्यांचा प्रसार झाल्यामुळें तसलीच भाषा रूढ झाली. या शतकांत भाषेचें जें स्वरूप साधारण मानानें निश्चित झालें त्यांत शुद्ध देशीपणा दिसत नाहीं.

नवीन पादाक्रांत केलेल्या प्रदेशांत इंग्रजांनीं ज्या कांहीं सुधारणा सुरू केल्या त्या अर्थात् येथील लोकांच्याच सल्ल्यानें केल्या असल्या पाहिजेत. ह्या लोकांत मुंबईच्या आणि कोंकणच्या लोकांचा भरणा विशेष होता. त्यामुळें इंग्रजांनीं जें भाषाशिक्षण सुरू केलें त्यावर कोंकणी भाषेचा परिणाम झाला. पूर्वीचा शुद्ध देशीपणा जाऊन मराठीवर कोंकणी भाषेचा थोडा ठसा उमटला. ही स्थिति विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेपर्यंत होती. म्हणजे या शतकांत पहिलीं पंचवीस वर्षें जुन्या मराठीचीं आणि नंतरचीं पन्नास वर्षें हीं कोंकणी ठसा उमटलेल्या व शास्त्रीय वळण प्राप्त झालेल्या अशा मराठीचीं व नंतरचीं वर्षें आधुनिक मारदस्त आणि शिष्ट मराठीचीं. विष्णुशास्त्र्यांनींच भाषेला हें उच्च स्वरूप प्राप्त करून दिलें व त्यांची भाषा हीच शिष्ट किंवा मध्यवर्ती मराठी म्हणून मानली गेली. हे जे तीन भाग पाडले हे मराठीच्या या शतकांतील तीन अवस्थांस धरून पाडले. मात्र त्यांतील भेद सूक्ष्म आहेत. पहिल्या पाव शतकांतील भाषेचें स्वरूप पुढील दोन्ही भागांतील स्वरूपांपेक्षां निराळें आहे हें मात्र चटकन् लक्षांत येण्यासारखें आहे.

या शतकांत वाङ्मयनिर्मिति फार झाली. कोश, व्याकरणें, इत्यादि शास्त्रीय ग्रंथ; नाटकें, नावलें, कथा, इत्यादि ललित वाङ्मय; चरित्रें, निबंध, इतिहास, भूगोल, इत्यादि वाङ्मयाच्या प्रत्येक शाखेंतील ग्रंथ तयार झाले. बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, परशुरामपंत गोडबोले, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री, लोकहितवादी, बाबा पदमजी, विठोबा आण्णा, विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर, केशवसुत, इत्यादि अनेक ग्रंथकार या शतकांतील होत.

विसावें शतक—विसावें म्हणजे सध्यांचें चालू शतक असून आजकालची शिष्ट मराठी सर्वांस परिचित आहे. एकोणिसाव्या शतकांतील व विसाव्या शतकांतील भाषेंत फारसा फरक करतां येणार नाहीं. विशेषतः गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत विष्णुशास्त्री चिपळूणकर, प्रो. आगरकर, वगैरेसारख्या गद्य लेखकांनीं जी भाषा आपल्या लेखनांत वापरली तीच भाषा आजहि मान्य असून त्यांच्यानंतर हरि नारायण आपटे यांच्यासारखे कादंबरीकार, किंवा 'केसरी'सारखीं प्रमुख वर्तमानपत्रें यांनीं तेंच भाषेचें वळण कायम ठेवलें आहे. विसाव्या शतकांत अनेक गद्य-पद्य लेखक व वर्तमानपत्रें व मासिकें पुढें येऊन मराठी वाङ्मयांत

पुष्कळच भर पडली आहे व त्यामुळें आजच्या भाषेच्या स्वरूपास अधिक स्थिरता प्राप्त झाली आहे. विसाव्या शतकांतील दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे शिक्षणाचा प्रसार फार झपाट्यानें होत असून मासिकें व वर्तमानपत्रें वगैरेची वाढ महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत त्वरेनें होत आहे. यामुळें भाषेस लिखित स्वरूप प्राप्त झाल्यामुळें जशी स्थिरता तशी शिष्टता प्राप्त होत असते. याचा परिणाम निरनिराळे प्रांतिक विशेष कमी कमी होत जाऊन एकाच तऱ्हेचें शिष्ट स्वरूपाचें वळण सर्व प्रदेशांतील भाषेस येत चाललें आहे. त्याप्रमाणेंच दळणवळणाचीं साधनेंहि झपाट्यानें वाढत आहेत. आगगाड्या, मोटारी, वगैरेमुळें प्रवास अतिशय सुलभ झाल्यामुळें महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील लोकांचा संबंध अधिकाधिक येत जाऊन परस्परांशीं बोलणें, पत्रव्यवहार, वगैरे रूपांनीं विचारविनिमय वगैरे वाढत आहे आणि त्यामुळें या विचारविनिमयाचें साधन जी भाषा तिचें स्वरूप परस्परांस परिचित व त्यामुळें शक्य तितकें एकजिनसी व एकस्वरूपी होण्याकडे अधिक अधिक झुकत आहे.

अशा रीतीनें मराठी भाषा बोलणाऱ्या निरनिराळ्या गटांचा परस्पर व्यवहार वाढला म्हणजे निरनिराळे वाक्प्रचार व शब्दविशेष यांची देवाणघेवाण होऊन भाषेचें सर्वपरिचित व सर्वप्रांतीय विशेषांचें संग्राहक असें एक स्वरूप निश्चित होऊन त्यास शिष्टत्व येईल. आतां विद्यापीठासारखी सर्वमान्य संस्था महाराष्ट्रामध्यें स्थापन झाली आहे. तेव्हां तिनें अशा भाषेच्या शिष्ट स्वरूपास मान्यता दिली म्हणजे त्या स्वरूपांत ती भाषा सर्व महाराष्ट्रांत स्थिरत्व व मान्यता पावेल व महाराष्ट्रांतील कोणत्याहि भागांतील मान्य ग्रंथ घेतला तर तो याच भाषेंत लिहिलेला आढळेल व अशा तऱ्हेनें या भाषेस कोणतेंहि स्थानिक स्वरूप अथवा नांव प्राप्त न होतां, तिचें वास्तविक नांव जें मराठी तेंच नांव प्रचारांत राहील.

व्याकरण—मराठी भाषेचें व्याकरण संस्कृताहून फारसें निराळें नाहीं. मराठींत जेव्हां बाराव्या शतकापासून ग्रंथनिर्मिति होऊं लागली तेव्हां व्याकरणाची गरज उत्पन्न झाली असेल. प्रथम महानुभावांनीं केलेल्या व्याकरणविषयक प्रयत्नांचा उल्लेख येतो. सुभाष्य, लक्षणरत्नाकर, नामविभक्ति, पंचवार्तिक यांसारखे त्यांचे व्याकरणग्रंथ झाल्याचें दिसतें. पंचवार्तिक हें संस्कृत व्याकरणाला अनुसरून लिहिलें आहे. यानंतर एकदम इंग्रजी अमलांतील व्याकरणांशीं आपला परिचय होतो. मिशनऱ्यांनीं मराठी भाषा शिकण्यासाठीं लहान-मोठीं व्याकरणें व कोश तयार केले. नंतर शालेय व्याकरणें इंग्रजी व्याकरणाच्या धर्तीवर तयार होऊं लागलीं. दादोबा पांडुरंग, रामभाऊ जोशी प्रभृतींचीं व्याकरणें सुपरिचित आहेत. यांपैकीं मो. के. दामले यांचें 'शास्त्रीय मराठी व्याकरण' मात्र नवीन चिकित्सात्मक पद्धतीचें आहे. यानंतर व्याकरण-समिति व परिषद् यांद्वारें महाराष्ट्र साहित्य परिषदेनें मराठी व्याकरण नवीन रचण्याची इष्टता दाखवून दिली. तथापि मराठी भाषेचें शास्त्रशुद्ध आणि सुव्यवस्थित व्याकरण अद्यापि तयार झालें नाहीं.

प्रांतिक भेद—'बारा कोसांवर भाषा बदलते' या म्हणीप्रमाणें मराठी गोवें-कारवारपासून उत्तरेस दमणपर्यंत व पूर्वेस नागपूर-भंडाऱ्यावरून निजाम हद्दींतील कांहीं जिल्हे यांपर्यंत पसरली असल्यानें तिच्या स्वरूपांत थोडेफार फरक त्या त्या भागांत झाले आहेत. यांत कोंकणी हीच काय ती स्वतंत्र पोटभाषा म्हणतां येईल. मध्यवर्ती किंवा पुणेरी मराठी ही देशी मराठी धरली जाते. ही देशी भाषा शिष्ट लोकांची भाषा असून सर्व सुशिक्षित कोठेंहि असले तरी हीच वापरतात. बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर, वगैरे संस्थानांत व बृहन्महाराष्ट्रांत आजच्या मुंबई प्रांतांतल्या महाराष्ट्रांतून गेलेले लोक हीच देशी मराठी बोलतांना दिसतील. निजामशाहींतील मराठवाड्यांत व कांहीं वऱ्हाड भागांत व मुंबई शहरांत ही महाराष्ट्रांतील भाषा (देशी) चालते. यांत कांहीं थोडे फरक होत असतात व हें स्वाभाविक आहे. विजापूर, धारवाड, नगर, खानदेश, वगैरे भागांत हे फरक दिसतील.

राजापूरपासून खालीं खरी कोंकणी भाषा सुरू होते. उत्तर कोंकणी किंवा संगमेश्वरी व कुडाळी हे कोंकणीचे प्रांतभेद आहेत. गोवें प्रांतांतील कोंकणी यापेक्षां निराळी आहे. तिला गोमांतकी असें म्हणतां येईल. गोव्यांतील कोंकणींत एकदशांश शब्द पोर्तुगीज भाषेंतील आहेत. कारवारकडील कोंकणींत कानडीचें मिश्रण आढळतें. कोंकणीचे जातिपरत्वें भेद म्हणजे चित्पावनी, दालदी व कुडाळी हे होत. (कोंकणी भाषा पाहा).

चित्पावनी भाषा कोंकणांत रत्नागिरी तालुक्याच्या उत्तर सीमेपासून दक्षिणेकडे समुद्रालगतच्या चिंचोळ्या प्रदेशापर्यंत चालते. ही तेथील ब्राह्मणांची बोली आहे.

वऱ्हाडांत देशी मराठीहून वेगळी अशी जी भाषा बोलली जाते तिला वऱ्हाडी असें म्हणतात. प्रांत, जाती व धंदे यांवरून पडलेले हिचे उपभेदहि आहेत. हळवी हा पोटभेद वऱ्हाडीच्या शेवटच्या परिसरावर वापरला जातो. नागपुरी ही वऱ्हाडीसारखीच आहे व ती वऱ्हाडाबाहेरच्या मध्यप्रांतांत चालते. चांद्याकडील वऱ्हाडीला चंद्रपुरी असें नांव आहे. बालाघाट जिल्ह्यांत खालच्या जातीचे लोक जी भाषा बोलतात तिला मऱ्हेटी असें नांव आहे. उच्चार वऱ्हाडीप्रमाणेंच पण हिंदी शब्दांचा भरणा विशेष.

खानदेशांत अहीराणी नांवाची जी भाषा आहे ती चुकीनें गुजराथीची पोटभाषा म्हणून भाषापंडित डॉ. ग्रीयरसन मानतो व त्यामुळेंच कांहीं गुजराथ्यांकडून तशी मानण्यांत येते. पण या गोष्टीला भाषाशास्त्र व इतिहास यांचा आधार नाहीं. (अहीराणी पाहा.)

गणभाषा—हे मराठीचे मुख्य भाषाप्रांत झाले. याखेरीज गणभाषा किंवा जातिभाषा आहेत. कोळी, किरीस्तांव, कुणबी, आगरी, धनगरी, ठाकरी, भंडारी, दालदी, काथोडी, वारली, वाडवल, फुडगी, सामवेदी, महारी, झारपी, गोवारी, कोष्टी, कुंभारी, नटकानी, कथियाई, भुंजिया, नाहरी, कमारी, वगैरे जातिभाषा होत.

गणभाषा किंवा कारुभाषा म्हणजे धंदेवाइकांच्या भाषा. या लोकांत त्यांच्या कारागिरीचीं साधनें, क्रिया आणि तयार वस्तू यांना विशिष्ट संज्ञा असतात. चाभार, न्हावी, बुरूड, नाविक, सुतार, सोनार, लोहार, तेली, विणकर, इ. धंदेवाइक लोकांत या संज्ञा अंगवळणींच पडलेल्या असतात; व बोलतांना त्या वापरल्यामुळें भाषा निराळीच वाटते. नंदभाषा ही व्यापारी सांकेतिक भाषा आहे.

बालभाषा व बायकी भाषा याहि शिष्टभाषेहून निराळ्या आहेत. मुलें अनुकरणानें नवे शब्द बनवितात; व त्यांच्या उच्चारभिन्नतेमुळेंहि भाषा नवी तयार होते. सामाजिक निर्बंध, नैसर्गिक कोमलता, भावनाशीलता, परंपराभिमानता, इ. गुणांमुळें स्त्रियांची भाषा ही वेगळी बनते.

शब्दसंपत्ति—मराठी भाषेंत संस्कृतमधून जसेच्या तसे घेतलेले 'तत्सम' शब्द पुष्कळच आहेत. 'तद्भव' म्हणजे अपभ्रंश पावलेले शब्द त्यानंतर येतात. याशिवाय अरबी, फारसी, पोर्तुगीज, इंग्रजी व इतर भाषा यांतून मराठींत आलेले शब्द आहेतच. तसेंच सामासिक शब्दहि संस्कृतपेक्षां कांहीं निराळे आहेत. आधुनिक मराठी भाषेंतले म्हणून महाराष्ट्र शब्दकोशांत सुमारें सव्वा लाख शब्द दिले गेले आहेत. एवढी शब्दसंपत्ति दिसली तरी आणखी हींत भर पडण्यासारखी आहे. भाषेचे प्रांत अनेक असतात व भाषेंत रोज सारखी भर पडत असतेच. मराठींत शास्त्रीय परिभाषा संस्कृतहून वेगळी अशी फारशी नाहीं; सर्व शास्त्रीय विषय प्राथमिक शाळांपासून महाविद्यालयापर्यंत जेव्हां मराठी माध्यमांतून शिकविले जातील तेव्हां नवीन स्वतंत्र परिभाषा तयार होईल. आतां भारत सरकारनें हिंदी ही राजभाषा केल्यानें हिंदीचा मोठा परिणाम मराठी भाषेवर होणार आहे.

(आ) मराठी वाङ्मय—मराठींतील पहिला ज्ञात ग्रंथकार मुकुंदराज होय. याचा 'विवेकसिंधु' इ. स. ११८८ मध्यें लिहून झाला. 'परमामृत' हाहि ग्रंथ त्याचाच आहे, असें मानलें जातें. महानुभाव पंथीयांनीं बाराव्या व तेराव्या शतकांतच आपले महत्त्वाचे ग्रंथ लिहिले. भास्करभट्टाचा 'शिशुपालवध' व 'उद्धवगीता'; नरेंद्राचें 'रुक्मिणी स्वयंवर'; दामोदरभट्टाचें 'वच्छहरण', व महींद्रभट्टाचें 'चक्रधर-चरित्र' हे या पंथाचे कांहीं प्रसिद्ध ग्रंथ याच काळांत झाले. या सर्व ग्रंथांत विद्वत्व, कवित्व व पंथाचा अभिमान आहे. या पंथाविषयीं पुढें अनेक गैरसमज पसरल्यानें महानुभावांनीं आपले ग्रंथ सांकेतिक गुप्तलिपींत लिहिण्याची वहिवाट पाडली व इतिहासकार राजवाडे यांनीं ते उजेडांत आणीपर्यंत ते समाजास अज्ञात राहिले होते.

ज्ञानेश्वर (१२७१–१२९६)—हा संत, कवि, तत्त्वज्ञानी, नाथपंथाचा प्रमुख प्रणेता व भक्तिपंथाचा प्रचारक म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या 'ज्ञानेश्वरी'त काव्य, तत्त्वज्ञान आणि भक्तिप्रेम अत्युच्च कोटीस पोंचलें आहे. वारकरी संप्रदायाचा तो आधारभूत ग्रंथ आहे. त्यांतील ९,००० ओव्यांमध्यें उपमा, उत्प्रेक्षा, रूपकें पावलोंपावलीं भरलेलीं आहेत. ग्रंथाच्या प्रसादानें व माधुरीनें वाचक मंत्रमुग्ध होतो. त्याच्या 'अमृतानुभवा'त काव्य नाहीं पण आध्यात्मिक विचार व साक्षात्कार भरपूर आहेत. मराठी भाषेंतील दुसऱ्या कोणच्याहि ग्रंथानें ज्ञानेश्वरीच्या एकदशांशाहि छाप जनतेवर पाडली नाहीं.

नामदेव—हा विठ्ठलाचा अतिप्रेमळ भक्त असून त्याच्या अभंगांत विद्वत्ता कमी, पण भक्तिप्रेमाची परमावधि आहे. तो ज्ञानेश्वराचा समकालीन होता. त्यानें सर्व भारतांत स्वतः जाऊन भक्तिमार्गाचा प्रसार केला. शीखांच्या 'ग्रंथसाहेबा'मध्येंहि कांहीं नामदेवकृत अभंगांचा समावेश झाला आहे. कांहींच्या मतें हा नामदेव निराळा असावा. नामदेवाची दासी जनाबाई हिचे अभंग भक्तिरसानें परिपूर्ण आहेत. गोरा कुंभार, विठोबा खेचर, नरहरि सोनार, सांवता माळी हे कवि होते, पण संत म्हणूनच त्यांची योग्यता विशेष आहे. ज्ञानेश्वराची बहीण मुक्ताबाई हिचे 'ताटीचे अभंग' प्रसिद्ध आहेत.

एकनाथ—चौदाव्या शतकांत मुसलमानांच्या छळामुळें महाराष्ट्र संत व कवी यांच्या मालिकेंत खंड पडलेला दिसतो. पंधराव्या शतकाच्या शेवटीं संत भानुदास यानें विजयनगरहून विठ्ठलाची मूर्ति परत पंढरपुरास आणली. ही मूर्ति सुरक्षित राहावी म्हणून पूर्वीं कोणीं तरी विजयनगरास नेली होती. या भानुदासाचे कांहीं अभंग आहेत. याचा नातू एकनाथ (समाधि इ. स. १६००) याचे ग्रंथ 'भागवत' व 'भावार्थ रामायण' हे प्रत्येकीं ३०–४० हजार ओव्यांचे असून त्यांत लौकिक व पारमार्थिक विषयांच्या ज्ञानाचें अगाध भांडार भरलें

आहे. 'रुक्मिणी स्वयंवर' हा ग्रंथ याचाच असून तो फार रसाळ आहे. एकनाथाची भाषा बरीच अर्वाचीन परंतु विषयाच्या गांभीर्यामुळें थोडीशी कठिण आहे.

दासोपंत— दासोपंत हा महाराष्ट्र संतकवींमध्यें सर्वांत अति विस्तृत ग्रंथकार होता. याचा काल इ. स. १५५१–१६१५ असून समाधि आंबेजोगाईस आहे. याचा 'गीतार्णव' ग्रंथच एक लाखाहून अधिक ओंव्यांचा आहे. इतरहि लहान-मोठे ५०–६० संस्कृत व प्राकृत ग्रंथ आहेत. ते कधीं छापून निघतील अशी फारशी आशा नाहीं.

मुक्तेश्वर–वामन—मुक्तेश्वर हा एकनाथाचा नातू. याच्या महाभारताचीं ५ पर्वें उपलब्ध आहेत. मूळ संस्कृत भारतापेक्षांहि अनेक स्थलीं याचें मराठी भारत जास्त सरस व ओजस्वी आहे. संतमंडळाच्या बाहेरचा असा हा जवळजवळ पहिलाच कवि आहे. त्याचें भाषासौंदर्य व कल्पनाशक्ति फार उच्च प्रतीची आहे. याचा काळ १६००–१६५० हा आहे. रामायण व भागवत यांवरहि याची कांहीं ग्रंथरचना आहे. समाधि तेरवाड (कृष्णाकाठीं) येथें आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, कृष्णदयार्णव, दासोपंत, वगैरे सर्व प्राचीन कवी निजाम हद्दींतील मराठवाड्यांतीलच राहणारे होते. मुक्तेश्वरापासून पुढें संतांचा व कवींचा ओघ सध्यांच्या महाराष्ट्राकडे वळला. ज्ञानेश्वर व रामदास यांची जन्मभूमि मराठवाड्यांत व कर्मभूमि महाराष्ट्रांत. तुकाराम (समाधि इ. स. १६४९, देहू, येथें), रामदास (इ. स. १६०८–१६८१, समाधि सज्जनगड), व वामन (समाधि पांडववाडी, इ. स. १६७३) हे सतराव्या शतकांतील प्रमुख संतकवी होत. वामनाचीं शेंकडों पौराणिक भक्तिरसमय कथानककाव्यें फार लोकप्रिय आहेत. भाषा रेखीव नाहीं परंतु फार मधुर. त्याचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'यथार्थदीपिका'. भगवद्गीतेवर ही ज्ञानेश्वरीपेक्षां फार विस्तृत टीका आहे. पण हिच्यांत ज्ञानेश्वरीइतकें काव्यमाधुर्य नाहीं. परंतु मूळ गीताकारांचा आशय जास्त विस्तृत व शुद्ध स्वरूपांत सांगितला आहे.

रामदास–तुकाराम—रामदासाचें वैराग्य, तपःसामर्थ्य, विश्वनिरीक्षण फार तीव्र होतें. त्यानें लौकिक, आध्यात्मिक व पौराणिक विषयांवर शेंकडों प्रकरणें लिहिलीं आहेत. त्याचा ग्रंथराज म्हणजे 'दासबोध' हा ठसठशीत विवेचनाचा सागर आहे. त्याची भाषा तितकीशी व्याकरणशुद्ध नाहीं. परंतु आपला आशय स्पष्टपणें व्यक्त करण्याची रामदासाची शक्ति विलक्षण आहे. भाषाशुद्धीपेक्षां अर्थाच्या गंभीरपणाकडे त्याचा जास्त भर आहे. तुकारामाचे ४५०० अभंग प्रसिद्ध झाले आहेत. परंतु हा भाग त्याच्या एकंदर अभंगसंख्येपैकीं फारच थोडा आहे. संत म्हणून त्याची योग्यता अनन्यसाधारण आहे. त्याच्या अभंगांत पांडित्य फारसें दिसत नाहीं. परंतु भक्ति, अध्यात्म, व्यवहार, इ. विषयांवर सडेतोड व निर्भीड भाषेंत कवन करणारा दुसरा कवि त्याच्या बरोबरीला मराठींत नाहीं. वारकरी संप्रदायांत ज्ञानेश्वराची ओंवी व तुकारामाचा अभंग यांसच सर्वश्रेष्ठ स्थान आहे. या संप्रदायानेंच ५–६ शें वर्षें महाराष्ट्र समाजांत चैतन्य कायम ठेवलें आहे. उत्तर हिंदुस्थानांत तुलसीदास आणि कबीर यांनीं धर्माचें व नीतीचें अधिष्ठान कायम ठेवलें, तसेंच महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर, तुकाराम व रामदास यांनीं गेलीं ६०० वर्षें महत्कार्य केलें आहे.

पंडित कवींमधें आनंदतनय (अरणीचे), रघुनाथ पंडित (चंदावर), निरंजन माधव (पुणें, सुमारें १७५०) व सामराज (सुमारें इ. स. १७४०) यांचीं काव्यें संस्कृत वृत्तांत संस्कृत काव्यधर्तीवर व संस्कृत शब्दप्रचुर आहेत. रघुनाथ पंडितांचें नलदमयंती आख्यान मराठीमध्यें माधुर्य व अलंकार याकरितां फार प्रसिद्ध आहे. श्रीधर (पंढरपुरजवळ नाझरें, ग्रंथरचना इ. १७०२ ते १७२०) हा मराठींतलि अत्यंत लोकप्रिय कवि आहे. त्यानें भारत, रामायण, भागवत व इतर पुराणांतील कथा अत्यंत सुगम, गोड व सालंकार भाषेंत मराठींत आणल्या. त्याचे 'हरिविजय', 'रामविजय', 'पांडवप्रताप', 'शिवलीलामृत', 'अश्वमेध', इ. ग्रंथ सर्व आबालवृद्धांचे आवडते आहेत व प्राचीन संस्कृति व तत्त्वज्ञान समाजाच्या सर्व थरांमध्यें प्रसृत करण्याचें श्रेय या श्रीधर कवीस आहे. कृष्णदयार्णव (समाधि पैठण येथें इ. स. १७४०) याचा 'हरिवरदा' नांवाचा भागवत दशमस्कंधावरील ओंवीबद्ध टीकाग्रंथ ३०,००० ओंव्यांचा असून भक्ति व अध्यात्मज्ञान यांचा सागर आहे.

मोरोपंत (इ. १७२९–१७९४)—हा अठराव्या शतकांतील सर्वश्रेष्ठ पंडित कवि होय. त्याची संस्कृत काव्यरचना बरीच आहे. मराठीमध्यें त्याचें जें पाऊण लाख काव्य आहे, त्यांतील चार-पंचमांश तरी आर्यावृत्तांत आहे. 'आर्या भारत' (१७ हजार पद्यसंख्या), 'हरिवंश', 'मंत्र भागवत', 'कृष्णविजय', १०८ रामायणें (अनेक वृत्तांत), इ. मोठीं काव्यें प्रसिद्ध आहेत. तसेंच 'श्लोक केकावली', 'आर्या केकावली', 'संशयरत्नमाला', 'सन्मणिमाला', इ. शेंकडों लघुकाव्यें आहेत. काव्याच्या भाषेला अत्यंत व्याकरणशुद्ध व रेखीव स्वरूप मोरोपंतानें आणून दिलें. त्याच्यापूर्वीं किंवा त्याच्यामागून इतकी शुद्ध भाषा कोणच्याहि कवीनें लिहिली नाहीं.

पोवाडे—सतराव्या व अठराव्या शतकांत अशिक्षित लोकांच्या मनोरंजनाकरितां पोवाडे हा सुगम परंतु जोरदार काव्य-

प्रकार विशेष प्रचारांत होता. पोवाड्यांत अनेक चौक असत व त्यांचे विषय ऐतिहासिक घटना किंवा व्यक्ति, प्रचलित कथा, थोर लोकांचीं वर्णनें अशा प्रकारचे असत. हे पोवाडे रचणारे लोक बहुधा अशिक्षित असत. श्रोतेहि बहुधा अशिक्षितच असत. त्यांची म्हणण्याची धाटणी फार सुंदर व ठाशीव असे.

मध्वमुनीश्वरांची भक्तिरसयुक्त पदें सुंदर भाषेंत लिहिलेलीं आहेत (१६७९–१७३४). त्यांचा शिष्य अमृतराय (इ. स. १६९८–१७५३) याचे कटाव फार खोचदार भाषेंत लिहिलेले असून कीर्तनात रंग भरण्यास फार उपयोगी पडतात. महीपति (इ. स. १७१५–१७९०) यानें 'कथासारामृत', 'भक्तलीलामृत', 'संतलीलामृत', 'भक्तिविजय', 'संतविजय', 'पंढरी-माहात्म्य', इ. अनेक ग्रंथांमध्यें संतांचीं चरित्रें रसाळ व मधुर भाषेंत भाविक दृष्टीनें लिहिलीं आहेत. प्राचीन कवींमध्यें चरित्रवाङ्मय लिहिणारा हाच एक उल्लेखनीय कवि दिसतो.

लावण्या—लावणी हा वाङ्मयप्रकार समाजाच्या खालच्या थरामध्येंच विशेष प्रचलित आहे. त्याचे विषय, भाषा, म्हणण्याची पद्धति, हीं सर्व उत्तान शृंगारावर आधारलीं असल्यानें अशिक्षित समाजांत याचा प्रसार पूर्वीपासून आतांपर्यंत पुष्कळच आहे. कांहीं लावण्या भक्तिपरहि असतात, पण थोड्या. रामजोशाच्या (इ. स. १७६२–१८१२) लावण्या फार लोकप्रिय आहेत. लावण्यांचें गायन खेड्यांतून तमाशांतून सररास होत असतें.

अर्वाचीन काल—सन १८२० ते १८७४ हा अर्वाचीन वाङ्मयाचा पहिला कालखंड होय. या कालांत गद्य-लेखनास आरंभ झाला. मुद्रणकला सुरू झाली म्हणजेच गद्य-लेखनास भर येतो. त्याप्रमाणें जांभेकर, लोकहितवादी (गोपाळराव हरि देशमुख, १८२३–१८९२), इ. समाजनेत्यांनीं अनेक निबंधमय ग्रंथ लिहून लोकजागृति केली. तसेंच संस्कृतमधील चांगलीं नाटकें व काव्यें यांचीं मराठींत सरस भाषांतरें याच कालांत झालीं.

परशुरामपंत गोडबोले (१७९९–१८७४) व कृष्णशास्त्री राजवाडे (१८३५–१९०१) यांनीं 'वेणीसंहार', 'उत्तररामचरित', 'शाकुंतल', 'मृच्छकटिक', 'नागानंद', 'पार्वतीपरिणय', 'मुद्राराक्षस', 'मालतीमाधव' या संस्कृत नाटकांचीं भाषांतरें सुरस व शुद्ध मराठींत केलीं. कृष्णशास्त्री चिपळूणकर (१८२४–१८७८) यांचे व्याकरणावरील निबंध व मेघदूत आणि संस्कृत सुभाषितें यांचीं भाषांतरें प्रसिद्ध आहेत. यांची भाषा अत्यंत शुद्ध व सुगम आहे. महादेवशास्त्री कोल्हटकर यांनीं शेक्सपियरच्या ऑथेल्लोचें मराठी रूपांतर करून इंग्रजी नाटकांस मराठी वेष देण्याच्या कामास सुरुवात केली. १८४३ मध्यें अर्वाचीन पौराणिक नाटकाच्या प्रयोगास विष्णुदास भावे (सांगली) यांनीं सुरुवात करून दिली.

लोकहितवादींनीं ऐतिहासिक ग्रंथ पुष्कळच लिहिले. परंतु त्यांचीं 'शतपत्रें' हा संग्रह नवविचारांचा आद्य निबंधग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. ज्योतिराव फुले (१८२७–१८९०) यांनीं ब्राह्मणी संस्कृतीविरुद्ध प्रथम झेंडा उभारला. 'ब्राह्मणांचें कसब' (१८६९), 'गुलामगिरी' (१८७३), 'जातिभेद-विवेक-सार' (१८८१), वगैरे त्यांच्या ग्रंथांनीं समाजांत पुष्कळ खळबळ उत्पन्न केली. ख्रिश्चन मिशनऱ्यांनीं १८३० पासून १८८० पर्यंत हिंदु धर्मावर आपल्या पत्रांतून व पुस्तकांतून पुष्कळ हल्ले केले. त्यांपैकीं बाबा पदमजी (१८३१–१९०६) यांचे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. यांनीं इंग्रजी-मराठी, मराठी-इंग्रजी, संस्कृत-मराठी कोश प्रसिद्ध केले व धार्मिक विषयांवर अनेक पुस्तकें लिहिलीं. यांची भाषा साधी, चटकदार व प्रौढ असे.

इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी कोशांचें मोठ्या प्रमाणावर काम करणारे कँडी व मोल्स्वर्थ हे होत. या कोशांचें प्रथम प्रकाशन सरकारच्या आश्रयानें १८३०-१८५० या कालांत झालें. अद्यापहि हे कोश प्रमाणभूत मानले जातात. या कोश-कार्यांत त्यांना शास्त्री-पंडितांची पुष्कळच मदत असे. ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या हल्ल्यास जोरानें प्रतिहल्ला करणारे विष्णुबुवा ब्रह्मचारी (गोखले) (१८२५–१८७१) यांचा 'वेदोक्त धर्म-प्रकाश' (१८६०) हा ग्रंथ पुष्कळ दिवस लोकप्रिय होता. मुंबई युनिव्हर्सिटी १८५७ मध्यें स्थापन झाली. तिचे आरंभींचे पदवीधर रानडे (१८४२–१९००), भांडारकर (१८३७–१९२५), कुंटे (१८३५–१८८८), इ. विद्वानांनीं इंग्रजी व मराठी वाङ्मयांत चांगली भर घातली. रानडे, भांडारकर व वामन आबाजी मोडक यांचीं प्रार्थना-समाज या नवीन पंथाच्या प्रेमानें दिलेलीं 'धर्मपर व्याख्यानें' वाचनीय आहेत.

इ. १८७५ मध्यें निबंधमालायुग सुरू झालें. विष्णुशास्त्री चिपळूणकर (इ. स. १८५०–१८८२) यांनीं निबंधमाला मासिक १८७४ ते १८८१ पर्यंत चालवून मराठी भाषेंत व विचारांत विलक्षण क्रांति केली. ते आपणांस विनोदानें 'मराठी भाषेचे शिवाजी' म्हणवीत असत व ही त्यांची पदवी अद्यापपर्यंत सबंध महाराष्ट्र सार्थ मानीत आहे. 'बृहस्पति' मानलेल्या पित्याच्या सान्निध्यांत लहानपणापासून वाढल्यामुळें विष्णुशास्त्री यांनीं वयाच्या २५ व्या वर्षींच 'निबंधमाला' मासिक सुरू करून समाजांत स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांच्याविषयीं अभूतपूर्व प्रेम उत्पन्न केलें. वयाच्या ३२ व्या वर्षीं निबंधमाला संपविली. व लवकरच स्वतःची जीवनयात्राहि संपविली. ॲडिसन व

मेकॉले यांच्या अभ्यासानें त्यांनीं आपली मनोभूमिका तयार केली व राजकीय, सामाजिक व वाङ्मयविषयक विचारांत नव-चैतन्य निर्माण केलें. ह्यांच्याचकडून प्रत्यक्ष सान्निध्यानें प्रेरणा घेऊन दोन नवे युगप्रवर्तक निबंधकार तयार झाले.

टिळक-आगरकर—बाळ गंगाधर टिळक ( १८५६–१९२० ) व गोपाळ गणेश आगरकर ( १८५६–१८९५ ) या दोघांनीं वृत्तपत्रांत अनेक वर्षें अग्रलेख लिहून सर्व महाराष्ट्रांतच नव्हे तर सर्व भारतांत अपूर्व राजकीय व सामाजिक जागृति उत्पन्न केली. आगरकरांचे लेख निबंध-संग्रहरूपानें ३ भागांत एकत्र केले आहेत. टिळकांच्या लेखांचेहि अनेक भाग प्रसिद्ध झाले आहेत. टिळकांनीं 'गीतारहस्य' ( १९१५ ) लिहून भगवद्-गीतेचा एका नव्या दिशेनें विचार केला आहे. या ग्रंथाइतकी विद्वत्ता व तर्कशुद्ध विचारपद्धति फार क्वचित् दुसरीकडे सांपडेल. टिळकांच्या तालमींत तयार झालेले दोन प्रसिद्ध निबंधकार म्हणजे न. चिं. केळकर ( १८७२–१९४७ ) व शिवरामपंत परांजपे ( १८६४–१९२९ ) हे होत.

केळकर-परांजपे—केळकरांची बुद्धि अष्टपैलू होती व कोणत्या-हि विषयावर ते अधिकृतपणें बोलूं व लिहूं शकत असत. त्यांनीं 'केसरी'मध्यें १८९७ पासून १९३१ पर्यंत सतत व पुढें मधून मधून शेंकडों लेख अतिशय सफाईनें समतोल परंतु सुंदर भाषेंत लिहिले. 'टिळक-चरित्र' तीन भागांत यांनीं लिहून उत्कृष्ट चरित्रग्रंथाचा नमुना घालून दिला. शिवरामपंत परांजपे यांनीं १८९८ पासून १९१० पर्यंत 'काळ' पत्र चालवून त्या-करितां दोन वेळां तुरुंगवासहि भोगला. त्यांचे स्वदेशभक्तीनें भरलेले व उपरोधिक पण जळजळीत भाषेंत लिहिलेले लेख विलक्षण परिणामकारक व लोकप्रिय झाले व त्यामुळें काळांतील निबंधांचे दहाहि भाग १९४६ पर्यंत जप्त होते. त्यांचें वक्तृत्वहि अमोघ होतें. त्यांच्या ओघवती व ओजस्वी वाणीनें तासन् तास श्रोते तल्लीन होत असत. त्यांच्या जोडीचा वक्ता महाराष्ट्रांत क्वचित् सांपडेल.

नाटकें—इ. स. १८७४ पासून मराठी वाङ्मयांत झपाट्यानें प्रगतीस सुरुवात झाली. १८८०–१८८२ मध्यें किर्लोस्करांनीं ( १८४३–१८८५ ) 'शाकुंतल', 'सौभद्र', इ. अमर संगीत नाटकें लिहिलीं व रंगभूमीवर करून दाखविलीं. यांनीं स्थापन केलेली किर्लोस्कर नाटक मंडळी १९०० पर्यंत उत्तम स्थितींत व पुढें कशीबशी १९२५ पर्यंत चालू होती. गोविंद बल्लाळ देवल ( १८५४–१९१६ ) यांनीं अनेक गद्य व संगीत नाटकें लिहून व नाट्यकला शिकवून दीर्घकाल रंगभूमि गाजवली. संस्कृतवरून १. 'मृच्छकटिक', २. 'शापसंभ्रम', ३. 'विक्रमोर्वशीय'; गद्य नाटकें—इंग्रजीवरून १. 'दुर्गा', २. 'झुंझारराव', ३. 'फाल्गुनराव'; संगीत नाटकें—१. 'संशय कल्लोळ', २. 'शारदा'. इतकीं नाटकें सुगम, व चटकदार भाषेंत लिहून यांनीं आपलें नांव चिरस्थायी केलें. त्यानंतर कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर ( १८७२–१९४८ ) यांनीं आपल्या अलौकिक लेखनकौशल्यानें २५–३० वर्षेंपर्यंत रंगभूमि गाज-विली. 'केसरी'चे संपादक म्हणून १८९७ पासून १९२० पर्यंत व नंतर 'नवा काळ'चे संपादक म्हणून १९२३ पासून १९३३ पर्यंत राजकीय व युद्धविषयक निर्भीड व जोरदार लेखन करून त्यांनीं मोठी कीर्ति मिळविली. तसेंच १८९७ मध्यें 'कांचन-गडची मोहना' हें पहिलें नाटक लिहून नाट्यसृष्टींत पाऊल टाकलें. 'कीचकवध' ( १९०६ ), 'बायकांचें बंड' ( १९०७ ), 'भाऊबंदकी' ( १९०९ ), 'संगीत मानापमान' ( १९११ ), 'सं. विद्याहरण' ( १९१३ ), 'सं. स्वयंवर' ( १९१६ ), 'सं. द्रौपदी' ( १९२० ), 'सवती मत्सर' ( १९२७ ) हीं त्यांचीं प्रमुख नाटकें आहेत. त्यांचीं नाटकें हेतुप्रधान, व भारदस्त आहेत. त्यांची पद्यरचना प्रसन्न नसली तरी शास्त्रशुद्ध आहे. संध्या, सौर, रुद्र, ऐतरेय, ईशावास्य, इ. धार्मिक विषयांवरहि त्यांनीं श्रद्धा व चिकित्सा यांचा मेळ घालून ग्रंथरचना केली आहे. गडकरी यांनीं ( १८८५–१९१९ ) चार-पांचच नाटकें लिहून ( 'प्रेमसंन्यास', 'पुण्यप्रभाव', 'भावबंधन', 'एकच प्याला', इ. ) चिरस्थायी कीर्ति संपादन केली. यांनीं प्रवाही व व अलंकारिक भाषा, रहस्यपूर्ण कथानकें, करुण व हास्य यांचा परमोत्कर्ष साधणारे नाट्यप्रसंग, यांमुळें आपल्या पिढीचे डोळे दिपवून टाकले. कवि या नात्यानेंहि यांचें स्थान फार उच्च आहे. राजहंस, मुरली, घुंगुरवाळा, इ. कविता अतिशय लोक-प्रिय आहेत. या कालखंडांत नाटक हा साहित्याचा एक प्रमुख भाग होता. ( 'नाटकें' लेख पाहा ).

कादंबऱ्या—१८८५ पर्यंत कादंबरी अद्भुतरम्य नवलकथां-मध्येंच घुटमळत होती. हरि नारायण आपटे ( १८६४–१९१९ ) हे अर्वाचीन वास्तववादी कादंबरीचे जनक होत. यांनीं आपल्या विपुल कादंबरी-लेखनांत महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीयांचा स्वभाव व सुखदुःखें फार सूक्ष्म निरीक्षणानें व हळुवारपणें चित्रित केलीं आहेत. यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या इतिहासाच्या खोल अभ्यासानें व ध्येयप्रेरित होऊन लिहिल्या आहेत. सामाजिक कादंबऱ्यांत 'मधली स्थिति' ( १८८५ ), 'पण लक्षांत कोण घेतो ?' ( १८९३ ), 'मी' ( १८९५ ), 'मायेचा बाजार', 'जग हें असें आहे' ( १८९९ ), 'कर्मयोग' ( १९१७ ) या प्रमुख आहेत. ऐतिहासिक कादंबऱ्यांत 'उषःकाल' ( १८९७ ), 'सूर्योदय' ( १९०६ ), 'सूर्यग्रहण' ( १९०९ ), 'केवळ स्वराज्यासाठीं' ( १८९९ ), 'रूपनगरची राजकन्या'

(१९०२), 'चंद्रगुप्त' (१९०४), 'गड आला पण सिंह गेला' (१९०३), 'कालकूट' (१९११), 'वज्राघात' (१९१५) या प्रमुख आहेत. सुसंगत रचना, हुबेहूब वर्णनें, यथार्थ स्वभावरेखन, वगैरे दृष्टींनीं यांच्या कादंबऱ्या प्रथम श्रेणीच्या ठरतात. यांच्या स्फुट गोष्टीहि पुष्कळ व चटकदार आहेत. कांहीं कविता व २ नाटकेंहि यांच्या लेखणींतून उतरलीं आहेत. वामन मल्हार जोशी (१८८२–१९४३) यांच्या कादंबऱ्या तत्त्वज्ञान व अनेक विषयांवरील वादविवाद यांनीं भरलेल्या आहेत. वर्णनापेक्षां सूक्ष्म विचाराची यांना फार आवड. यामुळें बुद्धिप्रधान वाचकांमध्यें यांच्या कादंबऱ्या व इतर निबंधवाङ्मय यास जास्त लोकप्रियता आहे. 'नीतिशास्त्र-प्रवेश', 'विचार-विलास', 'सॉक्रेटिसाचे संवाद', 'रागिणी', 'आश्रमहरिणी', 'सुशीलेचा देव', 'इंदू काळे व सरला भोळे' हीं त्यांच्या ग्रंथनिर्मितीपैकीं कांहीं नांवें आहेत. हे ध्येयवादी व अतिशय मृदु स्वभावाचे लेखक होते ('कादंबरी' पाहा).

काव्य—सन १८८५पासून मराठी काव्याचें जुनें स्वरूप संपूर्ण-पणें पालटून गेलें. जुनीं संस्कृत गणवृत्तें जाऊन नवीन मात्राबद्ध जातिवृत्तें आलीं. पौराणिक व धार्मिक काव्यविषय नाहींसे होऊन ऐहिक भावना, विचार व कल्पना यांनीं त्यांची जागा घेतली. जुने काव्यविषय सोडून व जुने आचारविचार झुगारून देण्याच्या अट्टाहासानें प्रचार करणारें काव्य कृष्णाजी केशव दामले ऊर्फ केशवसुत (१८६६–१९०५) यांनीं १८८५ पासून १९०५ पर्यंत लिहिलें. यांनीं एकंदर सुमारें १३० कविता लिहिल्या. त्यांपैकीं तुतारी, झपूर्झा, वातचक्र, बुबुड, इ. विशेष प्रसिद्ध आहेत. जुन्या आचारविचारांचीं बंधनें तोडून पाश्चात्य आचारविचारांचा स्वीकार करा हें त्यांच्या सर्व काव्याचें सूत्र आहे. मराठी नवकाव्याचे हे जनक मानले जातात. गोविंदाग्रज (म्हणजे गडकरी), टिळक (१८६२–१९१९), विनायक (म्हणजे विनायक जनार्दन करंदीकर, १८७२–१९०९), माधवानुज (काशिनाथ हरि मोडक, १८७२–१९१६) हे या पिढींतील प्रमुख कवि होते. नारायण वामन टिळक जरी धर्मानें खिश्चन होते, तरी त्यांचें काव्य शुद्ध हिंदु संस्कृतीस पोषक असेंच होतें. विनायकाची कविता ऐतिहासिक असून स्वाभिमानानें रसरसलेली आहे.

केशवसुतांपासून मराठी काव्याला इंग्रजी वळण लागलें. या वळणांत खुद्द केशवसुत, दत्त, विनायक, माधवानुज, गडकरी, बालकवि, टिळक, हे कवी होते. १९२० नंतर हें वळण वेगवेगळ्या प्रणालींतून जाऊं लागलें. या वेळीं वि. वा. भिडे, वा. अ. भिडे, लेलेशास्त्री, वगैरे थोडी पंडिती पठडींतील मंडळी होती, तरी त्यांचा प्रभाव पडत नव्हता. याउलट गिरीश, यशवंत, माधव जूलियन्, मायदेव, अत्रे या नवीन कवींचा बोलबाला सुरू होता. १९३५ पर्यंत यांच्या काव्यरचनेला भरती होती ती पुढें ओसरूं लागली. ती ओहोटी अद्यापि कमी झाली नाहीं.

मागच्या तीस-पस्तीस वर्षांत अर्वाचीन कवींचे काव्यसंग्रह मात्र बरेच प्रसिद्ध झाले. सुनीत हा केशवसुतांनीं प्रसृत केलेला काव्यप्रकार या कालांत भरभराटीस आला. नाट्यगीतें, जानपदगीतें, शिशुगीतें, गज्जलें यांसारख्यांची काव्यप्रकारांत भर पडली. अन्यांनीं विडंबनाची जोड दिली. गद्यकाव्य निघालें व 'कणिका' दृढमूल झाली. 'मुक्तछंद' नको असतांहि पुढें सरसावत आहे. या बहुतेक काव्याचा विषय प्रणय हा असला तरी कांहीं गूढगुंजनहि आहे.

(काव्य, खंडकाव्य, विडंबनकाव्य, नाट्यगीतें, इ. विषयांवरील लेख पाहावे.)

१९२० नंतरचें काव्य रविकरण मंडळाच्या काव्यप्रभेनें प्रकाशित आहे. या मंडळांत सात कवि व एक कवयित्री होती. माधव जूलियन् (माधवराव पटवर्धन, १८९४-१९३९), राजकवि यशवंत (यशवंत दिनकर पेंढरकर), गिरीश (प्रो. शंकर केशव कानेटकर), श्री. बा. रानडे, माडखोलकर, इ. या मंडळाचे सदस्य होते. माधव जूलियन् यांचें काव्य विपुल, प्रसादपूर्ण, प्रतिभायुक्त व मौलिक विचार व कल्पना यांनीं परिपूर्ण आहे. 'सुधारक', 'नकुलालंकार, 'गज्जलांजली', 'स्वप्नरंजन', 'विरहतरंग', 'मधुलहरी', इ. काव्यें फार उच्च दर्जाचीं आहेत. यांचा 'छंदोरचना' हा ग्रंथ छंदःशास्त्रावर असून तो त्यांच्या सर्वव्यापी व्यासंगाचा निदर्शक आहे. गिरीश (जन्म १८९३) साक्षेपी व नवविचारयुक्त कवि आहेत. यांचे 'अभागी कमल', 'आंबराई', 'कांचनगंगा', 'फलभार', 'मानसमेघ', इ. कवितासंग्रह फार लोकप्रिय आहेत. यशवंत (जन्म १८९९) यांची कविता विपुल, भावनोत्कट, हृदयाच्या तळमळीची निदर्शक आहे. 'यशवंती', 'यशोधन', 'जयमंगला', 'बंदीशाळा', 'यशोगंध', काव्यकिरीट', 'यशोनिधि', इ. काव्यें व काव्यसंग्रह यांनीं प्रसिद्ध केले आहेत. भास्करराव तांबे (ग्वाल्हेर) (१८७४–१९४१) यांचें काव्य स्फुट कवितांमध्येंच आहे, पण तें अतिशय भावनामय व मधुर भाषेंत रचलेलें आहे. राजकवि चंद्रशेखर (चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे, १८७१–१९३७) हे जुन्या वळणाचे पण रेखीव भाषेचे आधुनिक कवि होते. त्यांनीं कित्येक इंग्रजी काव्यांचीं मराठींत सुंदर रूपांतरें केलीं आहेत. सुनीत या पद्य प्रकाराची केशवसुतांनीं सुरुवात केली व माधव जूलियननीं त्याची वाढ केली. आतां तो पुष्कळच रूढ झाला आहे. बालकवि (ठोंबरे) (१८९०–१९१८), लेंभे (१८५०–१९२०), रेंदाळकर

(१८८७-१९२०), मोगरे (१८५८-१९१५), आगाशे (१८५२-१९१९), गोविंदराव कानिटकर (१८५४-१९१८), टेकाडे, तिवारी, दत्त (घाटे), मिरजकर, बी (गुप्ते), विद्याधर वामन भिडे, मायदेव, अनंततनय (आपटे), साधुदास (मुजुमदार), विनायकराव सावरकर, इ. अनेक उत्तम व मध्यम प्रतीचे कवी गेल्या ५०-६० वर्षांत काव्यनिर्मिति करून गेले व करीत आहेत. निर्यमक व गद्य-काव्याचाहि प्रसार अलीकडे पुष्कळच होऊं लागला आहे.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे विनोदी वाङ्मयाचे आद्य लेखक. गडकऱ्यांनींहि विनोदी लेख पुष्कळ लिहिले. 'सुदाम्याचे पोहे' (कोल्हटकर) व 'संपूर्ण बाळकराम' (गडकरी) हे दोन्ही ग्रंथ विनोदप्रिय वाचकांस फार आवडतात. कॅप्टन लिमये, प्रल्हाद केशव अत्रे व चिं. वि. जोशी हेहि विनोदी लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत.

सिनेमाच्या आगमनामुळें नाटकें व रंगभूमि गेल्या २५ वर्षांत फारच मागें पडलीं. तथापि अत्रे यांचीं ७-८ विनोदी नाटकें व रागणेकर यांचीं लहान नाटकें यांनीं रंगभूमीवर कांहीं तरी सजीवपणा राखला आहे. पण हें नाट्यतंत्र इबसेनच्या वळणावर गेलें आहे.

आजकाल कादंबरी व लघुकथा यांची निर्मिति मोठ्या व वाढत्या प्रमाणांत आहे. डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्या सामाजिक प्रश्नांचा विचार करावयास लावतात. श्री. कवठेकर यांनींहि अशाच धर्तीच्या पण मनोविश्लेषणात्मक कादंबऱ्या व लघुकथा आकर्षक भाषेंत लिहिल्या आहेत. प्रो. ना. सी. फडके यांच्या ४०-५० कादंबऱ्यांतून संपन्न व सुशिक्षित समाजाचें चित्रण सुंदर, सफाईदार भाषेंत करण्यांत येत असतें. श्री. खांडेकर यांच्या कादंबऱ्या ध्येयवादी आहेत. श्री. माडखोलकर आपल्या कांहीं कादंबऱ्यांत राजकीय विषयावर भर देतात. लघुकथांचे संग्रह तर दरसाल ८-१० प्रसिद्ध होत आहेत. त्यांमध्यें प्रमुख फडके, खांडेकर, य. गो. जोशी यांचे संग्रह आहेत.

मराठी वाङ्मयाचा हा अगदीं धांवता आढावा आहे. मराठी साहित्यिकांचीं चरित्रें स्वतंत्रपणें या कोशांत आलेलींच आहेत. त्याचप्रमाणें कादंबरी, काव्य, कोश, नाटकें, इ. विषयावरच्या लेखांतून मराठी विभागाचा त्या त्या विषयांतील परामर्ष घेतलाच आहे.

बृहन्महाराष्ट्रांतील वाङ्मय—बृहन्महाराष्ट्रांत मराठी भाषा व वाङ्मय कशीं टिकून राहिलीं हें पाहण्यासारखें आहे. याचें एक उदाहरण तंजावरकडील पुढें दिलें आहे. तंजावरास व्यंकोजी भोसले यानें १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत राज्य स्थापल्यापासून तिकडे मराठी वाङ्मय निघूं लागलें. व्यंकोजींच्या कारकीर्दीत रामदास तिकडे गेले होते व त्यांनीं आपले कांहीं शिष्य या भागांत ठेवून दिले. या शिष्यांपैकीं भिकाजीबाबा शहापूरकर, मौनीबाबा व राघोदास यांचे संप्रदाय चांगले वाढून महाराष्ट्र संस्कृति तिकडे कायम राखण्याची कामगिरी त्यांनीं केली. भिकाजीबाबा ऊर्फ भीमस्वामी तंजावरला शके १५९९ त गेले. त्यांनीं तिकडे इतकी जागृति करून सोडली कीं, त्यांच्या मठाच्या तीन शाखा वाढल्या : (१) गोविंदबाबा स्वामी ऊर्फ भाऊ स्वामी मठ, (२) झोळीरामबाबा ऊर्फ देव गोस्वामी मठ, आणि (३) अण्णाजीबाबा ऊर्फ आत्माराम गोस्वामी मठ. भीमस्वामीच्या मठांत समर्थांची तसबीर जी आढळते ती खुद्द भीमस्वामींनींच काढल्याचें सांगतात. रामचक्र, मारुतीची मूर्ति, झोळी, योगदंड, इत्यादि समर्थांच्या वस्तू या मठांत राखून ठेविलेल्या आहेत. भीमस्वामींनीं रचिलेलें समर्थांचें चरित्र सुप्रसिद्धच आहे. शके १६६३ च्या सुमारास भीमस्वामी निवर्तले. त्यांची समाधि करूंथत्तंगुडी येथें आहे. यांनीं तंजावरच्या सहा राजवटी पाहिल्या. प्रतापसिंह राजानें त्यांना राजवाड्यांत आपल्याला उपदेश देण्यासाठीं बोलाविलें असतां ते गेले नाहींत म्हणून रागावून राजानें दुसरा सेतुबाळास्वामी मठ निर्माण केला अशी कथा आहे.

दुसरें समर्थशिष्य मौनीबाबा यांचें नांव फारसें झालें नाहीं, पण त्यांचे शिष्य अनन्त मौनीस्वामी व त्यांहून अनन्तांचे शिष्य जे मेरुस्वामी त्यांचा लौकिक मोठा आहे. मन्नारगुडीला मेरुस्वामी मठ आहे. 'भीमोपदेश', 'रामसोहळा', 'अवधूतगीता', 'अनंत वाल्मीकि' (नाटक), इत्यादि कृती तरी ग्रंथ स्वामींनीं रचिले आहेत; व ते इकडेहि प्रसिद्ध आहेत. तिसरे शिष्य राघवदास हेहि फारसे प्रसिद्ध नसून त्यांचे शिष्यच माधवस्वामी नांवाचे मोठे होऊन गेले. हे माधवस्वामी मुक्तेश्वराप्रमाणें एकनाथमहाराजांचे नातू आहेत असा नवीन शोध लागला आहे. एकनाथमहाराजांची दुसरी कन्या उमा ही नागनाथ नांवाच्या आत्रेय गोत्री ब्राह्मणाला दिली होती, तिचा दुसरा मुलगा माधव. या माधवस्वामींचें ग्रंथकर्तृत्व फार मोठें आहे. 'योगवासिष्ठ', 'रामायण' (सात सर्ग), 'भारत' 'गणेशपुराण', इत्यादि त्यांचीं काव्यें आहेत. गीतेवर एक प्राकृत टीकाहि त्यांनीं रचिली असून ती अद्याप अप्रसिद्ध आहे.

या माधवस्वामींना रामपंडित व कृष्णपंडित असे दोन विद्वान् पुत्र होते. 'रामामृततरंग', 'मदालसोपाख्यान', 'हरिवंश', 'भागवत टीका', 'श्रुतिगीता', इत्यादि रामपंडिताचे ग्रंथ आहेत. कृष्णपंडिताचा मुलगा वासुदेवपंडित हाहि विद्वान् ग्रंथकार होऊन गेला. त्यानें भागवताच्या नवमस्कंधावर एक टीका रचिली आहे. माधवस्वामींचें सर्व घराणेंच पंडिती होतें. कारण

त्यांच्या मुलीचा मुलगा अंबाजी पंडित यानेंहि 'भागवत' रचिलें आहे.

याखेरीज विरूपाक्ष नांवाचा एक कवि तंजावरकडे होऊन गेला. 'भक्तिविलास' व 'पञ्चनादमाहात्म्य' हे त्याचे ग्रंथ उपलब्ध आहेत. रुक्म गंगाधर हा दुसरा एक कवि 'श्रीनरसिंहपुराण', 'भारत', 'हरिवंश', 'शेषधर्मटीका', 'कृष्णामृत' यांसारख्या ग्रंथांचा लेखक म्हणून माहीत आहे. भीमस्वामींचा एक शिष्य गोविंदबाबास्वामी यांचाहि एक स्वतंत्र मठ तंजावरला आहे. त्यांचा पुतण्या मुकुंद म्हणून होता. त्याचाहि एक मठ करूंथत्तंगुडी येथें आहे. मुकुंदस्वामींचें आडनांव नरसिंहपुरकर असें आहे. 'श्रीरामकृपाविलास' व 'देवभक्तानुवाद' हे तीन मोठे ग्रंथ व अनेक कविता मुकुंदस्वामींनीं रचिल्या आहेत. इकडल्याप्रमाणेंच तंजावरकडेहि पोवाडे–लावणीकार होऊन गेले आहेत. उटके गोविन्दाचार्य आणि गंगाधरपंत हीं दोन नांवें त्यांमध्यें वेण्यासारखीं आहेत. वेणा, बहिणा यांप्रमाणेंच अम्बूबाई (पदुकोस्याची), गोजीबाई डबीर व बनुबाई क्षीरसागर या कवयित्री तिकडे होऊन गेल्या.

रघुनाथ पंडित, हुसेन अम्बर, आनन्दतनय, गोसावीनन्दन यांचा उल्लेख या दक्षिणेंतील कवींतच केला पाहिजे. शहाजींचे वंशज असलेल्या सातारच्या भोसले राजांपेक्षां तंजावरचे राजे जास्त विद्वान् आणि विद्वानांचे चहाते होते, यांत शंका नाहीं. तंजावरच्या बहुतेक राजांनीं काव्य आणि कला यांना आश्रय दिलेला आहे. शहाजीच्या पदरच्या कवींचें वर्णन 'राधामाधवविलासचम्पूं' त सविस्तर आहे. व्यंकोजीनें तेलगूंत 'द्विपाद' रामायण रचिल्याचें सांगतात. त्याची पत्नी दीपाबाई हीहि वेदान्त–भक्तिपर कवनें करी. मराठीप्रमाणेंच तेलगू, तामिळ, मल्याळी या भाषांनाहि मराठी दरबारांत आश्रय मिळे. व्यंकोजीनंतर त्याचा मुलगा शहाजी गादीवर आला. तो स्वतः उत्तम संस्कृतज्ञ व ग्रंथकार होता. 'शब्दरत्नसमन्वय' व 'शृंगारमञ्जरी' हीं त्याच्याच नांवावर मोडतात. विक्रम–भोजाप्रमाणें त्याचा दरबार शास्त्रीकवींनीं भरलेला असे. चिदानंद (चिंदड) शंकर, नाना जोशी, रंगस्वामी, दिगम्बर, त्र्यंबक जोतिर्विद हे मराठी कवी या दरबारचें उत्कृष्ट वर्णन करतात. सरफोजीनेंहि बापाचें नांव चालविलें; पण त्यापेक्षां त्याच्यामागूनचा राजा तुकोजी हा प्रख्यात भाषामिश्र होऊन गेला. 'धन्वन्तरीविलास' व 'संगीत सारामृत' हे त्याचे ग्रंथ आहेत. १७४१ त तंजावरच्या गादीवर बसलेला प्रतापसिंह हा चांगलाच मराठी ग्रंथकार होता. 'ऋषिपंचमीव्रत', 'ध्रुवचरित्र', 'प्रबोधचंद्रोदय', 'कृष्णजन्म', इत्यादि ग्रंथांचा तो कर्ता असून, कावेरी तीरावरील तिरुवन्दुर येथें त्यानें मराठी विद्यापीठच जणुं स्थापिलें होतें. याची रक्षा मधुपालनी हीहि तेलगू काव्यें करी. शृंगारपूर्ण भावगीतांबद्दल तिची ख्याति आहे. तुळाजी राजाच्या अमदानींत संगीताला बहर आलेला होता, कीर्तनाला रंग चढला होता व नृत्याला महत्त्व प्राप्त झालें होतें. या राजावर अनेक प्रशस्ति–काव्यें रचण्यांत आलीं आहेत.

तंजावरच्या मराठी अमलामुळें मद्रास प्रांतांत लेखनाची लिपि मोडी ठरून गेली. मोडींत लघु–लेखन होत असल्यानें दरबारी व न्यायमंदिरांतून तेलगू, तामिळ, इत्यादि मराठीतर भाषांतील कागदपत्रेंसुद्धां मोडी लिपींतच लिहिण्याची प्रथा पडली. शके १६३४ तील रामनाडच्या राजाचें दानपत्र मोडींत आहे. अलीकडेहि म्हणजे १९१० मध्यें मदुरेच्या देवळासंबंधीं नोंदलेलें एक खत मोडींत आहे. मजकूर तामिळ असून लेखक एक अय्यर आहे! आतां मात्र मोडी मागें पडली.

इंग्रजी अमदानींतहि तिकडे बरेच मराठी लेखक होऊन गेले. सुप्रसिद्ध दिवाण सर. टी. माधवराव हे चांगले मराठी कवि होते हें सर्वश्रुत आहेच. तंजावरजवळ तण्डालम् म्हणून एक लहान गाव आहे. तेथल्या एका महाराष्ट्रीय घराण्यात रामचंद्रराव कृष्णराव व गोपाळराव असे तिघे बंधु मराठी लेखक म्हणून पुढें आले. रामचंद्ररावाचा 'कवितासंग्रह' प्रसिद्ध झाला आहे. कृष्णरावाचीं कांहीं पदें असून गोपाळरावांनीं गोल्डस्मिथच्या 'हर्मिट' चें छन्दोबद्ध रूपान्तर केलें आहे. मल्हारीराव पुणतांबेकर, गांडेकर, इत्यादींच्या कविता प्रसिद्ध आहेत. अगदीं अलीकडे मराठी ग्रंथरचना फार कमी दिसते. याचें बहुंशीं कारण तिकडे मराठीचें रक्षण आणि संवर्धन मुळींच होत नसून, पुढारलेल्या महाराष्ट्रीय जनतेचें या गोष्टीकडे लक्ष नाहीं. आतां तर हिंदीचा अमल जारी आहे. राष्ट्रभाषेपुढें जुनी पुराणी मराठी टिकविणें व वाढविणें शक्य आणि इष्टहि वाटत नाहीं अशी परिस्थिति आहे.

मद्रास इलाखा, त्रावणकोर, कोचीन आणि म्हैसूर या भागांत मराठी बोलणाराची वस्ती सुमारें अडीच लाख आहे.

**मराठे**—एकंदर हिंदुस्थानांत सुमारें ५० लाख मराठे असून त्यांपैकीं सुमारें ३३ लाख मुंबई इलाख्यांत व १६ लाख हैद्राबाद संस्थानांत आहेत. महाराष्ट्र (पाहा) या शब्दापासून मराठा हा शब्द झाला आहे. मराठ्यांचीं ९६ कुळें आहेत. ह्या कुळींचे उल्लेख ताम्रपटांत व शिलालेखांत येतात. ९६ कुळांची यादी क्षत्रियोन्नति-दर्पणांत दिलेली आहे.

क्षत्रिय कुळांचे रीतरिवाज जे रजपुतांप्रमाणें दिसतात ते म्हणजे पुनर्विवाह न करणें, जानवें घालणें, पडदा पद्धत, न्हाव्यामार्फत लग्ननिश्चय, मेजवानीच्या प्रसंगीं न्हाव्यानें पाणी देणें, वगैरे. रजपूत राजघराण्यांचे शरीरसंबंध मराठे घराण्यांशीं

झालेले आहेत. मराठ्यांचा पिढीजात धंदा लढण्याचा असून त्यांच्यापैकीं कांहीं संस्थानिक बनले आहेत. जहागीरदार, सरंजामदार, जमीनदार, संस्थानी दरबारांतले अधिकारी, असे मराठे बरेच होते व आहेत. ब्रिटिश अमदानींत खालसा मुलुखांतील मराठ्यांचा धंदा बहुधा शेतकी आहे. कारण ब्रिटिश सरकारनें सैन्यांत मराठ्यांची भरती मुद्दाम जाणूनसवरून राजकीय धोरण म्हणून केली नाहीं आणि हत्यारबंदीचा कायदा कडकपणें अमलांत आणून मराठ्यांचा शिकारी पेशाहि नष्ट केला. १८१८ पर्यंत लढवय्ये असलेल्या लाखों मराठ्यांच्या वंशजांच्या हातांत गेलीं १००–१२५ वर्षें फक्त नांगर आलेला आहे. आतां ब्रिटिश सत्ता नष्ट होऊन हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यामुळें मराठे जातीला पुन्हां लष्करी धंद्याचें क्षेत्र खुलें झालें आहे. सैन्यभरतीच्या व होमगार्ड्सच्या योजना चालू करून लष्करी शिक्षण सार्वत्रिक व सक्तीचें शाळा-कॉलेजांतून देण्यास सुरवात झाली आहे. त्याबरोबरच वर्धा-शिक्षण योजनेप्रमाणें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याच्या योजना प्रांतिक सरकारें अमलांत आणीत असल्या-मुळें मराठे व इतर मागासलेल्या सर्व जातींचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे.

मराठ्यांमध्यें मुख्य दोन वर्ग आहेत: (१) अस्सल किंवा उच्च दर्जाचे. हे आपणास क्षत्रिय म्हणवितात; आणि (२) इतर कुळंबी, माळी, वगैरे. पण आज हे वर्गभेद जात चालले आहेत. (कुणबी पाहा). यांचा लग्नविधि इतर उच्च हिंदु जातींप्रमाणेंच होतो व सप्तपदी झाली कीं लग्नविधि पुरा कायदेशीर ठरतो. यांचे उपाध्याय ब्राह्मण व ब्राह्मणेतरहि असतात. घटस्फोट व पाट या चाली अस्सल मराठ्यांत नाहींत. दक्षिणेंतील मराठे लोकांत पंचायतसंस्था शिस्तवार चालू आहेत व जातींसंबंधीं पुष्कळ प्रश्नांचा निकाल पंचायतीमार्फत होतो. पंचायतीचा अध्यक्ष देशमुख अथवा गांवचा प्रमुख पाटील असतो. म्हैसूर, त्रावणकोर व कोचीन येथेंहि मराठ्यांची वस्ती असून ते सैन्यांत व पोलीस खात्यांत नोकरी, व्यापार व शेती हे धंदे करतात.

**मराठे साम्राज्य**—महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेर मराठ्यांचा अमल जेथें जेथें होता, त्या सर्व प्रदेशाला मिळून मराठे साम्राज्य म्हणतात. या सर्व प्रदेशावर साताऱ्याच्या छत्रपतींची अनियंत्रित सत्ता नव्हती आणि त्यांचे पंतप्रधान पेशवे यांच्या हातीं जरी राज्यकारभाराची मुख्य व्यवस्था होती, तरी साम्राज्यांतील निरनिराळ्या भागांत (कोल्हापूर, तंजावर, नागपूर, बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर, धार, देवास, इत्यादि ठिकाणीं) भोसले, गायकवाड, शिंदे, होळकर, पवार, इ. मराठे सरदारांनीं या साम्राज्याचें संरक्षण व विस्तार करण्याच्या कामीं लष्करी मदत करण्याच्या करारावर, अलीकडील ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींप्रमाणें आपापल्या प्रांतावर संपूर्ण स्वराज्याच्या हक्कानें राज्यकारभार चालविला होता.

१३४७ सालीं यादवांचें राज्य नष्ट होऊन महाराष्ट्रावर मुसलमानी अमल सुरू झाला व तो धार्मिक दृष्ट्या असह्य झाला. कारण मुसलमानांनीं देवळें पाडून मूर्ती फोडून त्या जागीं मशिदी बांधणें, आणि सक्तीनें हिंदूंना बाटवून मुसलमान करणें, असा इस्लाम धर्मप्रसार सर्व हिंदुस्थानांत चालविला होता. त्याला उत्तरेंत रजपूत राजांनीं प्रथम प्रतिकार केला. तथापि रजपूत राजांच्या अंतःकलहामुळें सर्व रजपुतांची एकजूट जमली नाहीं. इतकेंच नव्हे तर आपसांतील भांडणांत कांहीं रजपूत राजांनीं मुसलमानांची मदत घेऊन आपल्याच रजपूत-बांधवांविरुद्ध लढून मुसलमानांना वरचढ केलें. अखेर अकबरानें सर्व रजपूत राज्यें जिंकून मोठ्या मुत्सद्दीगिरीनें धर्मांतराची सक्ती न करतां रजपूत राजकन्यांशीं विवाह केले व रजपुतांना दिल्लीच्या साम्राज्यांत मोठ्या मानाच्या नोकऱ्या दिल्या, व त्याच रजपूत सेनापतींना दक्षिण देश जिंकण्याच्या कामगिरीवर पाठविलें. हें धोरण जहांगीर–शहाजहान–औरंगजेब यांनीं चालवून महाराष्ट्रांत मुसलमानी सत्ता व धर्मप्रसाराचें कार्य १७०७ पर्यंत चालू ठेवलें. या प्रबल इस्लामी सत्तेस यशस्वी प्रतिकार अखिल हिंदुस्थानांत फक्त मराठ्यांनीं केला. ज्ञानेश्वर–एकनाथ–तुकाराम–रामदासादि साधुसंतांनीं जनतेंत हिंदुधर्माभिमान प्रथम जागृत केला, आणि शहाजी–शिवाजी यांनीं महाराष्ट्राला स्वतंत्र करून स्वराज्य स्थापलें. शिवाजीच्या पश्चात् खुद्द औरंगजेब मोठ्या सैन्यानिशीं महाराष्ट्रांत तळ देऊन राहिला होता; त्याला सतत २५ वर्षें यशस्वी रीतीनें मराठे सरदारांनीं विरोध केला. औरंगजेब मृत्यु पावतांच शाहू व त्याचे चार पेशवे बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, बाळाजी बाजीराव, व माधवराव, यांनीं सतत चढाईचें धोरण धरून सर्व हिंदुस्थानचा ३।४ भाग मराठ्यांच्या साम्राज्य-सत्तेखालीं आणला.

शिवाजीच्या राज्याचें क्षेत्रफळ आरंभीं फक्त २३०० चौ. मैल होतें. तें १६८० सालीं १,२०,००० चौ. मैल झालें. त्यांत २६०० किल्ले होते व उत्पन्न दीड-पावणेदोन कोट रुपयांचें होतें. माधवराव पेशव्यांच्या वेळीं मराठी साम्राज्याचा वसूल २० कोटींपर्यंत होता, आणि १८०३ सालीं हा वसूल ५० कोटी ७३ लक्ष होता. त्यांत या मराठे साम्राज्यांत उत्तरेकडे १५ सुभे व दक्षिणेंत ६ सुभे मिळून २१ सुभे व त्यांचें एकूण क्षेत्रफळ ५,५०,००० साडेपांच लक्ष चौ. मैल होतें. म्हणजे शिवाजीच्या जहागिरीचें साम्राज्यांत जेव्हां रूपांतर पावलें तेव्हां क्षेत्रमर्यादेंत वाढ २३९ पट झाली.

हिंदुस्थानच्या इतिहासांत हें साम्राज्य मध्ययुगीन कालानंतर सर्वांत मोठें व प्रभावशाली असें म्हणावें लागेल. युरोपियनांची सत्ता येथें उद्भवली नसती तर हें अद्यापि टिकूनहि राहिलें असतें.

मराठ्यांचें एवढें मोठें साम्राज्य थोड्या काळांत साफ लयास कां गेलें याविषयीं अनेक तर्क लढविण्यांत येतात. सरदारांमध्यें ध्येयाची एकवाक्यता नसणें, त्यांनीं मध्यवर्ती सत्तेशीं एकनिष्ठ न राहणें, मध्यवर्ती सत्ता दुर्बल होणें, जनतेंत देशभक्ति किंवा राष्ट्रीय वृत्ति जागृत नसणें, राज्यांत कवायती शिस्तीची फौज नसणें किंवा प्रभावी हत्यारांचा अभाव असणें, राज्यव्यवस्थेची घडी नीट बसलेली नसणें, इत्यादि अनेक कारणें देतां येतात व यांपैकीं बहुतेक खरींहि आहेत. याशिवाय प्राच्य आणि पाश्चात्य लोक यांच्या संस्कृतींतील फरकहि लक्षांत घेणें जरूर आहे.

मराठे रियासतींत पुढील छत्रपति होऊन गेले—

१. शिवाजी ( राज्य. १६४६–८० ); २ संभाजी ( १६८०–८९ ); ३. राजाराम ( १६८९–१७०० ); ४. दुसरा शिवाजी ( १७००–१७०७ ); ५. शाहू ( १७०७–१७४९ ); ६. रामराजा ( १७४९–१७७७ ); ७. दुसरा शाहू ( १७७७–१८०८ ); ८. प्रतापसिंह (१८०८–१८३९); ९. शहाजी (१८३९–१८४८).

पुढील राज्यसूत्रधारी पेशवे होऊन गेले—

१. बाळाजी विश्वनाथ भट ( १७१३–२० ); २. बाजीराव बल्लाळ ( १७२०–१७४० ); ३. बाळाजी बाजीराव ( १७४०–१७६१ ); ४. माधवराव बल्लाळ (१७६१–१७७२); ५. नारायणराव बल्लाळ ( १७७२–१७७३ ); ६. रघुनाथ बाजीराव ( १७७३–१७७४ ); ७. माधवराव नारायण (१७७४–१७९५); ८. चिमणाजी नारायण (१७९५–१७९६); ९. बाजीराव रघुनाथ ( १७९६–१८१८ ).

या सर्वांचीं चरित्रें कोशांत त्या त्या जागीं दिलेलीं आहेत.

**मरीचि**—एक धर्मशास्त्रकार ऋषि. कोणी याला सप्तर्षींपैकीं मानतात. हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र व दक्षाचा जांवई होता. याचा मुलगा कश्यप नांवाचा होता. याच्या धर्मशास्त्रांत आह्निक, आशौच, श्राद्ध, प्रायश्चित्त व व्यवहार यांसंबंधीं नियम आहेत. मिताक्षरा, अपरार्क व स्मृतिचंद्रिका यांत यांतील उतारे घेतलेले आढळतात. प्रातःस्मरणांत याचें नांव येतें.

**मरीया**—कुमारी मेरी. ही येशू ख्रिस्ताची माता होय. ग्रेब्रिएल या देवदूताच्या मार्फत तिला परमेश्वराचा असा संदेश मिळाला कीं, तिची निवड येशूची जन्मदात्री म्हणून करण्यांत आली असून तिला परमेश्वरी शक्तीमुळें आपलें कौमार्य भंग न पावतां येशूचा गर्भ धारण करतां येईल. तिनें बेथ्लेहेम येथें येशू ख्रिस्तास जन्म दिला आणि नाझारेथ येथें त्यास वाढविला आणि अखेरपर्यंत त्याच्या दुःखांत सहभागी होऊन ती त्याच्या मानवजातीच्या तारणाकरितां झालेल्या देहान्तसमयीं क्रूसाच्या पायथ्याशीं उभी राहिली. मरीयासंबंधीं ख्रिस्ती संप्रदायामध्यें पुढील तत्त्वें म्हणून मानण्यांत येतात.

( १ ) मूलपापविरहित गर्भधारणा—म्हणजे तिच्या ठिकाणीं गर्भधारणा झाली तरी ती मूळ पातकाविरहित होती; कारण तिच्याकडे येशू ख्रिस्ताचें मातृपद यावयाचें होतें. तशीच ती सर्व आयुष्यभर निष्पाप राहिली.

( २ ) तिची कौमार्यावस्था—तिला मातृत्व प्राप्त झालें तरी तिच्या कौमार्याचा भंग झाला नाहीं. येशू ख्रिस्तास जन्म देऊनहि ती कुमारिका राहिली. शुभवर्तमानामध्यें ज्यांचा येशू ख्रिस्ताचे भाऊ म्हणून उल्लेख आढळतो ते त्याचे चुलत भाऊ होते.

( ३ ) ती देवमाता आहे—कारण तिनें येशू ख्रिस्तास जन्म दिला व येशू ख्रिस्त हा धन्यत्रयींतील दुसरी व्यक्ति होय.

( ४ ) सदेह स्वर्गारोहण—मृत्यूनंतर तिला केवळ आत्मरूपानेंच नव्हे तर सदेह स्वर्गांत घेण्यांत आलें व यामुळें जगाच्या अंताच्या वेळीं होणाऱ्या सार्वत्रिक पुनरुत्थानाची ही पूर्वकल्पना देण्यांत आली.

( ५ ) ती सर्व कृपेचें माध्यम आहे—ती येशूची माता आहे व येशूपासून सर्व कृपेची प्राप्ति होते त्या अर्थी तिच्या पुत्राची कृपा तिच्या मार्फतहि प्राप्त होत असते.

कॅथॉलिक संप्रदायामध्यें मेरीची भक्ति हा एक विशेष आहे. ती ख्रिस्ती पावित्र्याचें उदाहरण आहे आणि आपल्या अडचणीच्या वेळीं ती आपणाकरितां मोठ्या प्रेमानें व प्रभावशील मध्यस्थी करते. तिच्याप्रीत्यर्थ अनेक उत्सव करण्यांत येतात. तिची सर्वज्ञात अशी प्रार्थना म्हटली म्हणजे 'हेल मेरी!' (मेरीचा उदो असो!) अशी असून तिच्या भक्तीचा सर्वज्ञात मार्ग म्हणजे 'आंजेलस' (उपासना) आणि 'जपमाळ' हे होत.

**मरुटी**—एक झाड. यास पिवळीं फुलें येतात व तीं अक्कलकाढ्याऐवजीं वापरतात. त्याप्रमाणेंच या फुलानें जिभेस चुणचुण सुटते. लोकल्यावर चोंड विड्यांत घालून देतात. जिभेचा शेंडा सुजला असल्यास चोंड व मीठ एकत्र करून चोळतात, म्हणजे लाल सुटून सूज उतरते.

**मरुत्**—एक देवतागण. यांची संख्या ४९ आहे. ह्या ऋग्वेदांतील प्रधान देवता आहेत. मरुतांचीं सूक्तें तेहतीस असून सात सूक्तांत इंद्र व मरुत् यांचा, आणि एकेका सूक्तांत अग्नि व पूषन् आणि मरुत् यांचा एकत्र उल्लेख आहे. मरुत् हा देवतांचा एक गण असून त्यांचा फक्त बहुवचनीच उल्लेख येतो. पृथ्वी ही त्यांची माता म्हणून त्यांना पृश्निमातरः

( ऋ. १·२३·१७; अथर्व वे. ५·२१·२१ ), आणि अग्नि त्यांचा जनक ( ऋ. ६·३·८ ) असें वर्णन आहे. मरुत् हे सर्व भाऊ भाऊ समानवयस्क ( ऋ. १·१६५·१ ), अंतरिक्षांत व स्वर्गात वाढलेले ( ऋ. ५·५५·७ ), असें त्याचें वर्णन आहे. रोदसी ही त्यांची भार्या मानली जात होती, असें दिसतें ( ऋ. ५·५६·८; ६·६६·६ ). मरुत् पर्जन्याची वृष्टि करीत असतांना विद्युत्, आपल्या वासराच्या मागोमाग जाणाऱ्या गाईप्रमाणें, हंबरते ( ऋ. १·३८·८ ). मरुतांच्या रथाना जुंपलेले घोडे रक्त किंवा पिंगल वर्णाचे असतात ( ऋ. १·८८·२; ५·५·५७ ). मरुतांचें मुख्य कार्य पर्जन्यवृष्टि करणें हें असून सागरांतून वर जाऊन ते पर्जन्याचा वर्षाव करतात ( ऋ. १·३८·९ ). मरुतांचा विद्युत् मेघगर्जना, वारे व पर्जन्य यांच्याशीं वारंवार संबंध येतो. मरुत् ही वायुदेवता असून पुढील वाङ्मयांत मरुत् म्हणजे वायु हा अर्थ आहे.

**मरुत्त**—अविक्षित् राजाचा पुत्र. ऐतरेय ब्राह्मणांत संवर्तीकडून याला राज्याभिषेक झाल्याचा उल्लेख आहे. शतपथ ब्राह्मणांतहि याचा उल्लेख आहे. हा सम्राट्, महान् पराक्रमी, शूर व यज्ञकर्ता असा होऊन गेला. याच्या यज्ञांत विश्वेदेव सभासद व मरुद्गण परिवेष्टे ( अन्न वाढणारे ) होते. मरुत्त राजास दम नावाचा एकच पुत्र होता. देवपूजेनंतर मंत्राक्षताच्या वेळीं देवे म्हणतात त्यांत आविक्षित–मरुत्ताचें वर्णन असतें.

**मरुदेश**—( मरुधन्व ). अर्वाचीन मारवाड. मारवाड पाहा. 'म्रियन्तेऽस्मिन्भूतानीति मरुः'—निर्जल देश अशी या नांवाची उपपत्ति आहे. ऋग्वेदांत त्रितानें ( १०·४ ) मरुदेशांतील पाणपोईप्रमाणें तूं पुरूंना धनानें तोपविणारा आहेस अशी अग्नीची प्रार्थना केली आहे. राजसूययज्ञाच्या वेळीं नकुल दिग्विजयाला निघाला असतां इतर देशांबरोबर त्यानें मरुदेश जिंकल्याचा उल्लेख आहे. महाभारतांत उत्तंकानें मरुभूमींत पाणी आणल्याची कथा आहे.

**मॅरोनाइट**—या पंथाचे लोक मुख्यतः लेबानन पर्वताच्या सभोंवतीं आढळतात. ते सामान्यतः पश्चिम सीरियामधील अँटिऑक येथील पंथांत रूढ असलेले संस्कार पाळतात, परंतु त्यांत काहीं लॅटिन संस्कारांचेंहि मिश्रण आढळतें. हे सर्व कॅथॉलिक असून त्यांचा एक स्वतंत्र पॅट्रिआर्क आहे. ते आपण आतांपर्यंत सतत कॅथॉलिक पंथीय आहोंत असें सांगतात. ते आपल्या पंथाची स्थापना एका मॅरो नांवाच्या मनुष्यानें केली व त्यानेंच आपणांस सातव्या शतकामध्यें मोनोथेलाइट नांवाच्या पाखंडांत प्रवेश करण्यापासून परावृत्त केलें असें सांगतात.

**मर्कटग्रंथि**—( थायरॉइड ग्लँड ). याला कंठग्रंथि, ग्रैवेयक, काकलक अशींहि नांवें आहेत. ही एक वाहिनीविरहित ग्रंथि असून कंठनालाच्या खालच्या व मागच्या बाजूस श्वासनलिकेच्या पहिल्या वलयाजवळ असते. हिचा रंग लालसर असून हिची वाढ पुरुषांपेक्षां स्त्रियांत अधिक झालेली असते. कांहीं रोगांमध्यें हिची वाढ अतिशय होते. या ग्रंथींतून होणाऱ्या स्त्रावाचा परिणाम इतर ग्रंथींवर आणि संवादी मज्जातंतूंवर फार होतो. गलग्रंथिवृद्धि पाहा.

**मर्केटर, जेरार्ड** ( १५१२–१५९४ )—एक फ्लेमिश गणितशास्त्रज्ञ व भूगोलशास्त्रज्ञ. त्यानें नकाशांतील प्रत्यालेखपद्धति ( मेथड ऑफ प्रोजेक्शन ) शोधून काढली. ( 'नकाशे' हा लेख पाहा ) व त्या पद्धतीला त्याचेंच नांव दिलेलें आहे. त्याच्या पद्धतींतील तत्त्वांचा व्यावहारिक उपयोग करण्यास एडवर्ड राइट यानें १५९९ पासून सुरुवात केली.

**मर्गज**—हें एक रत्न असून यास इंग्रजींत जेड, नेफ्राइट असेंहि म्हणतात. हें खट व मग्न ( कॅल्शियम अँड मग्नेशियम सिलिकेट ) यांचें सिकतित आहे. याचा रंग थोडाफार हिरवा असतो व तें तेलकट किंवा राळेसारखें दिसतें व त्यास जिल्हई दिल्यास तें कठिण व घट्ट बनतें. चीनमध्यें याचे वर्तुळाकृति किंवा कंसाकृति अलंकार फार करण्यांत येतात. तसेंच न्यूझीलंड, मेक्सिको व पेरु देशांतहि याचा दागिने करण्याच्या कामीं उपयोग होतो.

**मर्फा**—लहान टिमकी. ह्यावर टिपरीनें ठोका मारून तालाची लय दाखवीत असतात. ह्या सर्व मेळास ताशा म्हणण्याचा हल्लीं प्रचार आहे. हें खास मुसलमानांचें वाद्य आहे.

**मर्यादवेल**—ही वेल बहुधा समुद्रकांठीं, वाळवंटांत वाढते. पानें जाड व सरळ असून आपट्याच्या पानांएवढीं असतात. हिच्यांत तांबडी व पांढरी अशा दोन जाती आहेत. वेलींचा कांदा, मूळ किंवा फळ मांडपुळीवर वाटून लावतात. खोकल्यावर काढा देतात. मर्यादवेल घरांत असली म्हणजे घरास आगीची भीति नसते अशी एक जुनी समजूत आहे.

**मर्यादित जबाबदारीची संयुक्त भांडवल संस्था**—( जॉइंट स्टॉक कंपनी ऑफ लिमिटेड लायाबिलिटी ). इंग्लंडांत १८५५ पूर्वी कंपनीच्या भागीदारांना कंपनी बुडल्यास आपल्या मिळकतींतून कर्ज फेडावें लागे. या कायद्यामुळें जेवढा भाग (शेअर) घेतला असेल तेवढ्या रकमेच्या फेडीची फक्त जबाबदारी भागीदारांवर पडते. म्हणजे जबाबदारी मर्यादित झाली. हिंदुस्थानांत १९१३ सालापर्यंत स्वतंत्र कंपनी कायदा नव्हता. यापूर्वींच्या भागीदारांच्या संस्था पार्लमेंट कायदे, हिंदुस्थान सरकारचे वेगवेगळ्या धंद्यांचे जे कायदे त्या कायद्यान्वयें नोंदल्या गेल्या होत्या. 'इंडियन कंपनीज ॲक्ट' अन्वयें खाजगी व सार्वजनिक असे दोन भेद कंपन्यांचे पाडले आहेत. खाजगीमध्यें दोन कमींत

कमी व जास्त पन्नासापर्यंत भागीदार घ्यावयाचे असतात. या कंपनीचे भाग बाहेर विक्रीस निघत नाहींत. सार्वजनिक कंपनींत कमींत कमी सात भागीदार पाहिजेत. जास्त कितीहि करावेत. मर्यादित जबाबदारीच्या पद्धतीखेरीज जिम्मेदारीनें मर्यादित झालेली दुसरी एक पद्धत आहे. तींत विशिष्ट रकमेपुरती जबाबदारी कंपनी बुडाली तर भागीदारांवर येऊन पडते. सार्वजनिक कंपनी 'मेमोरँडम' व 'आर्टिकल्स ऑफ असोसिएशन' (संघनियम पाहा) तयार करून सरकारांत नोंदतात व भाग विक्रीस काढतात. या कंपनीचे पुढील सर्व हिशेब आणि व्यवहार कंपनीच्या रजिस्ट्रारकडे वेळोवेळीं नोंदवावे लागतात.

**मर्व्ह**—हें आशियाटिक रशियांतील टर्कोमेन रिपब्लिक या राज्यांतील एक शहर आहे. हें एका फार विस्तृत ओलवणी प्रदेशांत वसलेलें आहे. येथें गहूं, बार्ली, भात, कापूस व खरबुजें हीं पिकें होतात. ट्रान्सकॅस्पियन रेल्वेवरचें हें स्टेशन असून येथून हिरातकडे सडक जाते. येथें गालिचे, रेशमी कापड, आणि रुप्याचे जिन्नस होतात. लो. सं. सुमारें १,००,००० आहे.

**मलई**—दूध फार वेळ तसेंच राहिल्यास त्यावर येणारा पापुद्रा. यांत मुख्यतः पाणी व लोणी असतें. उथळ भांड्यांत दूध ठेवून मलई काढतात किंवा त्यासाठीं यंत्रें (मलईयंत्र पाहा) असतात. मलईमध्यें जीवनसत्त्वें असल्यामुळें पौष्टिक अन्न म्हणून तिला फार महत्त्व आहे. पाश्चात्य देशांत मलई फार खपते. तिकडे लोणी वापरण्याचा प्रघात कमी. मलईतील साखर काढून ती मलई मधुमेह असणारांसाठीं वापरण्यांत येते. तिला 'डेव्हनशायर क्रीम' म्हणतात.

**मलईयंत्र**—(क्रीमसेपरेटर). एखाद्या दोरीला वजन बांधून ती जोरानें फिरवली असतां वजनाच्या जोरानें दोरी ताठ होते. याचें कारण तेथें एक जोर उत्पन्न होऊन त्या जोरानें वजन बाहेर फेकलें जात असतें व जवळची दोरी ताठ राखली जाते. हा जो जोर उत्पन्न होतो त्यालाच केंद्रोत्सारकशक्ति (सेंट्रिफ्यूगल फोर्स) असें म्हणतात. या जोरानें एकाच ठिकाणीं निरनिराळ्या वजनाचीं द्रव्यें असल्यास व तीं अशाच तऱ्हेनें जोरानें फिरत असल्यास वस्तु जेवढी अधिक जड तितकी बाहेर फेंकली जाते व हलकी वस्तु मधील भागाकडे येते. याच तत्त्वाचा उपयोग दुधापासून मलई वेगळी करण्याकडे केला जातो. मलई काढण्याचें यंत्र खूप जोरानें म्हणजे दर मिनिटास सुमारें १३,००० फेरे करीत असतें व त्यामध्यें दूध थोडें थोडें पण एकसारखें पडत असतें. मलई काढलेलें दूध मलईपेक्षां जड असतें. त्यामुळें अतिशय जोरानें फिरत असल्यामुळें दूध बाहेर फेंकलें जातें व मलई आंतील बाजूस जमा होते. दोघांनाहि बाहेर पडण्यास द्वारें असतात. त्यांतून दूध व मलई वेगवेगळी बाहेर पडत असतात. याच तत्त्वाचा उपयोग विशेषतः साखरेच्या कारखान्यांत आणि कापडाच्या गिरणीमधून करतात. साखरेच्या कारखान्यांत या यंत्रानें साखर व काकवी निराळी करतात. व गिरण्यांतून धुतलेलें सूत पिळण्यासाठीं याचा उपयोग करतात. कारखान्यांत वापरलेलें तेल शुद्ध करण्याकडे असल्याच यंत्राचा उपयोग केला जातो.

**मलकापूर**—वऱ्हाड, बुलढाणें जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ७९२ चौ. मैल. यांत ३३० खालसा आणि ९ जहागिरीचीं गांवें आहेत. लो. सं. सु. दोन लक्ष. पूर्णा नदीस या तालुक्यांतून तीन नद्या मिळतात. मलकापूर हें मुख्य ठिकाण. हें नळगंगा नदीतीरीं आहे. लो. सं. पंधरा हजार. गांवाला तट असून हें गांव फार जुनें दिसतें. ऐन-इ-अकबरींत हें नरनाळ्याच्या सरकारांतील परगण्याचें मुख्य ठिकाण आहे, असा उल्लेख आहे. १९ व्या शतकाच्या आरंभापासून वऱ्हाड ब्रिटिशाकडे जाईपर्यंत येथें जमीनदार, तालुकदार, रजपूत आणि मुसलमान यांमध्यें परस्पर लढाया नेहमीं होत असत. येथें सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने बरेच आहेत.

**मलकूप**—मोरीचा गाळ सांचण्याकरितां जी कुंडी बांधण्यांत येते तिला मलकूप असें म्हणतात. अशा तऱ्हेच्या कुंड्या सर्व प्रकारच्या सांडपाण्याकरितां बांधण्यांत येतात. खेड्यांतून या कामाकरितां नुसते खड्डे ठेवण्यांत आलेले असतात, परंतु ते अस्वच्छ असतात.

सामान्यतः मलकूप ६ ते ८ फूट खोल करण्यांत यावा. त्याच्या तळाशीं सहा इंच कॉंक्रिट घालून त्याच्या बाजू विटांनीं बांधून काढाव्या व त्यावर एक इंच सिमेंटचें प्लॅस्टर करण्यांत यावें. यावर लोखंडी किंवा लांकडी कड्या टाकून तोंड झांकून टाकावें व एक मनुष्य जाण्याइतकी वाट ठेवून आंत जाते वेळीं शिडीनें उतरावें.

कुंडींतून दुर्गंधयुक्त वायु घरांत येऊं नये म्हणून मध्यें एक वक्रनलिकाकार पडदा ठेवावा व वायु उंच जाण्याकरितां एक उंच नळी जोडून द्यावी. या कुंडींतून पाणी दूर नेऊन सोडावयाचें असल्यास आंत येणाऱ्या तोटींपेक्षां बाहेर जाणारी नळी दोन इंच खालीं असावी व ती जेथें सोडावयाची तेथें तोंड वांकवून सोडून देण्यांत यावी.

**मलंगगड**—यास बावा मलंग असेंहि म्हणतात. हा कल्याणच्या दक्षिणेस १० मैलांवर कल्याण व पनवेल यांच्या सीमेवर आहे. याचा चढाव चिकट आहे. ७०० वर्षांपूर्वीं नळ राजानें हा किल्ला बांधला व आपली मुलगी हाजी अबदुल रहिमान या साधूस दिली. त्याची कबर येथें आहे. तिची व्यवस्था काशीनाथपंत नांवाच्या ब्राह्मणाच्या वंशजाकडे आहे. याबद्दल मध्यंतरीं तंटा

उपस्थित झाला होता, तेव्हां निकाल ब्राह्मणाच्या तर्फेनेंच लागला. येथें मे महिन्यांत व फेब्रुवारी महिन्यांत ( माघ शुद्ध पौर्णिमेस ) अशी दोन वेळ मोठी जत्रा भरते व तीस हजारों हिंदु-मुसलमान येतात. १७८० मध्यें कर्नल ऑबिंग्टन यास येथें मराठ्यांनीं कांहीं काळ अडवून ठेवलें होतें. त्याची कॅप्टन जेमसन यानें मुक्तता केली.

हा किल्ला चढण्यास फार काठिण असून चढण तीन टप्प्यांची आहे. शेवटचा टप्पा फार अवघड आहे. पहिल्या टप्प्यावर १८०० फूट उंचीवर बाबा मलंगची कबर आहे.

**मलबार**—हा मद्रास इलाख्यांतील श्रीमंत, सुंदर व सुपीक जिल्हा असून याचें प्राचीन नांव केरल होतें. क्षे. फ. ५७९० चौ. मैल. पोनानी, बेयपोर व बल्लरपतनम् या यांतील महत्त्वाच्या नद्या आहेत. ताड, बांबू व फणस हीं झाडें व खालच्या भागांत देवदार, पाइन, फणस, शिसू, सागवान, इत्यादि इमारतीच्या उपयोगी अशीं पुष्कळ झाडें सांपडतात. वाघ, चित्ता, आस्वल, गवा, सांबर, हत्ती, इत्यादि श्वापदें यांत आहेत. पावसाचें मान ११६ इंच असून दुष्काळ बहुतेक पडत नाहीं.

येथें नायर व नंबुद्री जातींचे लोक आहेत. ते बहुधा आर्य लोकांची जी प्राचीन काळीं लाट पसरली, तींपैकीं असावेत. मलबारसंबंधीं शिलालेखांत कांहीं माहिती सांपडते. परशुरामानें हा प्रदेश उत्पन्न करून वस्ती करविली अशी कथा आहे. १७९२ सालीं श्रीरंगणपट्टणच्या तहान्वयें हा सर्व मुलूख ईस्ट इंडिया कंपनी सरकारास मिळाला. येथें फार ठिकाणीं प्राचीन काळचे अवशेष सांपडतात. लखदिव बेटें धरून मलबारची लो. सं. ( १९४१ ) ३९,२९,४२५ आहे. त्यांत शें. ६८ हिंदू व ३० मुसलमान आहेत. नंबुद्री ब्राह्मणांचें येथील लोकांत फार वजन आहे. या लोकांत 'मरमकत्तायम्' कायद्यानें म्हणजे मातृकन्यापरंपरेनें जिंदगीची व्यवस्था व लग्नें होतात. या जिल्ह्यांत ख्रिश्चन लोकांची वस्ती ५० हजारांवर आहे. त्यापैकीं बहुतेक मूळचे बाटे रहिवासी आहेत. या जिल्ह्यांत पावसाळा दोन वेळां येतो. त्या प्रत्येक वेळीं एक पीक काढतात. भात हें येथील लोकांचें मुख्य अन्न होय. याखेरीज सुपारी, केळीं, व मिरीं हीं पिकें महत्त्वाचीं आहेत. फणस, आंबे, विड्याचीं पानें, दालचिनी व भाजीपाले हें बागायतीचें मुख्य उत्पन्न होय. वेलदोडे वायनाडच्या भागांत होतात. कालिकत येथें पूर्वी मागावर चिटाचें कापड काढीत असत; तें युरोपांत 'कॅलिको' नांवानें प्रसिद्ध झालें. काथ्याच्या दोऱ्या करणें, शेती, ताडी काढणें, मासे खारवणें व नारळाचें तेल काढणें, लांकूड कापणें हे धंदे अजून लोक करतात. कौलें व विटा भाजण्याचे कारखाने आहेत. कालिकत, तेलचरी व फरोके या गांवीं युरोपियन लोकांनीं कॉफी, सिंकोना व आलें साफ करून वाळविणें यांचे कारखाने काढिले आहेत. किनाऱ्यावरील मुख्य बंदरें कोचीन, कालिकत, तेलेचरी, कनानोर, बेयपुर, बडगारा व पोनोनी हीं आहेत. १८३६ सालापासून मोपले लोक मधून मधून शांततेचा भंग दंगाधोपा करून करीत. १९२३ सालीं या लोकांनीं खिलापतच्या नांवाखालीं मोठें बंड केलें. हिंदु लोकांवर त्यांनीं फार जुलूम केला. स्त्रीपुरुषांवर अत्याचार करून त्यांना जुलमानें बाटविलें. पुष्कळ हिंदूंची कत्तल केली. त्यांच्या मालमत्तेचा नायनाट केला. हे लोक धर्मवेडे आहेत.

**मलबारी, बेहरामजी** ( १८५३–१९१२ )—एक पारशी लेखक व संपादक. यांचा जन्म बडोदें येथें झाला. वडील सरकारी नोकरींत असलेले एक गरीब पारशी गृहस्थ होते. १८७५ मध्यें यांनीं आपला गुजराती कवितासंग्रह प्रसिद्ध केला. १८७७ मध्यें त्यांनीं 'इंडियन न्यूज इन् इंग्लिश गार्ब' ( इंग्रजी पेहरावांत हिंदी वृत्त ) हा इंग्रजी कवितासंग्रह प्रसिद्ध केल्यामुळें त्यांची इंग्लंडमध्यें प्रसिद्धि झाली. १८८० मध्यें त्यांनीं 'इंडियन स्पेक्टेटर' हें पत्र ताब्यांत घेऊन तें सुमारें वीस वर्षें अव्याहतपणें चालविलें. १९०१ मध्यें हे 'ईस्ट ॲन्ड वेस्ट' या मासिकाचे संपादक झाले. यांचीं राजकीय मतें नेमस्त असत तरी ते बहुधा तटस्थ असत; पण सामाजिक बाबतींत हे फार निर्भीडपणें चर्चा करीत असत. यांनीं बालविवाहाविरुद्ध व पुनर्विवाहास अनुकूल अशी पुष्कळ चळवळ केली. यांची 'इंडियन आयु ऑन इंग्लिश लाइफ' व 'गुजरात ॲन्ड दि गुजरातीज्' हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. यांची गुजराथी भाषा शुद्ध वळणाची असे.

**मलमंगलम् नम्बूतिरी**— एक मल्याळी कवि. कोचीन संस्थानांतील पेरुमाणम् गांवचा हा विद्वान् कालिकतच्या झामोरीन राजाच्या पदरीं होता. हा 'शृंगार कवि' म्हणून प्रसिद्ध असून यानें संस्कृत व मल्याळी भाषेंत ग्रंथरचना केली आहे. 'भाषानैषधचम्पू', 'आशौचप्रायश्चित्तविधि', 'मलमंगलम्मानम्', 'कोटिविरहम्' हे याचे सुप्रसिद्ध ग्रंथ होत. कल्पना, भाषालंकार व खोल विचार या बाबतींत याचें लिखाण बरेंच वरच्या दर्जाचें आढळून येतें.

**मलमल**—( मस्लिन ). हें कापसाच्या सुताचें अत्यंत तलम कापड असतें. हें रेशीम किंवा वळीव लोंकरीच्या धाग्याचेंहि विणतात. यास मोसल या शहराच्या नांवावरून हें नांव पडलें आहे. मोसल येथील व्यापारी हें कापड प्रथम युरोपमध्यें घेऊन जात म्हणून त्या शहराचें नांव या कापडास मिळालें आहे. इंग्लंडमध्यें हें प्रथम १६७० मध्यें आणण्यांत आलें. हिंदुस्थानांत डाक्का शहर मलमलीकरितां प्रसिद्ध होतें. ( डाक्का पाहा. ) पण

युरोपियन व्यापाऱ्यांनीं तेथील ही कला मारून टाकली. सध्यां ग्लासगो येथें या प्रकारचें कापड निघतें.

**मलय**—मलय हें एका ठिकाणाचें नांव असून तें ठिकाण पश्चिम घाटाच्या अगदीं दक्षिणेकडील टोंकाजवळ आहे असें न्या. मू. तेलंगांचें मत आहे; परंतु केशवराव ध्रुव यांच्या मतें मलय हें ठिकाणाचें नांव नसून एका जातीच्या लोकांचें नांव आहे; व ते लोक हिंदुस्थानच्या उत्तर सरहद्दीवर व सातव्या शतकांतील काश्मीरच्या पूर्व मर्यादेवर कोठें तरी राहत असावे. महाभारत, रामायण, रत्नकोश, वगैरे संस्कृत ग्रंथांतहि मलय शब्दाचा उल्लेख आला आहे व त्यावरून नेपाळांत गंडकी व राप्ती यांच्या वरच्या बाजूला असलेला मलयभूमि नांवाचा जिल्हा हाच मुद्राराक्षसांतील व महाभारतांतील मलयांचा देश होय असें डॉ. जे. बर्जेस म्हणतात. कोणीं मलबारलाच मलय म्हटलें आहे.

अगस्त्य ऋषीचा आश्रम दक्षिणेंत मलय पर्वतावर होता, असे पुराणांतून उल्लेख येतात. मनु हा मलय पर्वतावर तपश्चर्येसाठीं गेला होता (मत्स्य पुराण १). या पर्वतापासून कृतमाला (वैगा) ही नदी निघाली आहे. मलय पर्वतावर चंदनाची समृद्धि आहे व तिकडून येणारा वारा विरही प्रेमिकाला संतापदायक होतो अशी रूढ कविकल्पना आहे. राहूला मलयज म्हणतात व दुर्गादेवीचें एक नांव मलयवासिनी असें आहे.

**मलयालम्(मल्याळी) भाषा व वाङ्मय**— भाषा— मलयालम् भाषा ही द्राविडी शाखेची एक भाषा असून दक्षिण हिंदुस्थानांतील सुमारें सव्वा कोटी लोक ही भाषा बोलतात. सर्वसाधारणतः कसरगोडूपासून ते त्रिवेंद्रम् व दक्षिण कानडाचा थोडासा भाग, मलबार, कोचीन, त्रावणकोरमधील बराच प्रदेश व म्हैसूर व नीलगिरि यांच्या आसपासचा प्रदेश, इत्यादि ठिकाणीं ही भाषा प्रचारांत आहे. मलयालम् याचा अर्थ डोंगराळ प्रदेश असा आहे. पण हें प्रादेशिक नांव भाषेलाहि लावण्यांत आलें आहे. प्राचीन काळीं तामिळ व मलयालम् अशा दोन स्वतंत्र भाषा आहेत अशी कल्पनाच नव्हती व आर्य लोक या दोन्ही भाषांना तामिळ हें एकच नांव देत असत; पण अलीकडे या दोन भाषा स्वतंत्र मानण्यांत येऊं लागल्या आहेत. मलयालम् भाषेचे दोन प्रकार आहेत: एक पुस्तकी भाषा व दुसरी व्यावहारिक भाषा. पुस्तकी भाषेंत व तामिळ भाषेंत बरेंच साम्य आहे. तामिळ भाषेपेक्षां मलयालम् ऊर्फ मल्याळी भाषेंत संस्कृत शब्द अधिक आहे.

मल्याळी भाषेंतील वर्णोच्चार तामिळ भाषेंतील वर्णोच्चारांप्रमाणेंच आहेत. तामिळी भाषेप्रमाणेंच मल्याळी भाषेंत मृदु व कठोर व्यंजनांची नेहमीं अदलाबदल होते. पुढें स्वर आला असतां, मागील व्यंजनाचें द्वित्व होतें. उदाहरणार्थ, मातम याचा मात्तम असा उच्चार होतो. तामिळप्रमाणेंच शब्दाचें शेवटचें अक्षर उच्चाररहित व्यंजन शब्दाच्या शेवटीं आल्यास त्याला उ हा स्वर जोडण्यांत येतो. तामिळप्रमाणें नव्या मल्याळीमध्यें पुरुषवाचक क्रियापदाचे प्रत्यय नाहींत. पण जुन्या भाषेमध्यें मात्र ते आढळतात. मल्याळी भाषेंत स्थानिक भाषाभेद बरेच आहेत. कुर्गमधील येरवा भाषा हा मल्याळीचाच एक पोटभेद आहे.

मलयालम् वाङ्मय—नवव्या शतकांतील मलबारच्या राजांनीं ज्यू व ख्रिस्ती लोकांना दिलेलीं दानपत्रें ताम्रपत्रावर कोरलेलीं अद्याप जपून ठेवलेलीं आहेत, त्यांत मलयालम् भाषेचें अगदीं प्राचीन रूप दृष्टीस पडतें. मलबारचे राजे कुलशेखर यांनीं 'तपती–संवरण' व 'सुभद्रा-धनंजय' नांवांचीं दोन संस्कृत नाटकें लिहिलीं आहेत. या राजाच्या दरबारांत तोलन नांवाचा एक मलयालम् कवि होता. त्याच्या कांहीं फुटकळ कविता असून मलबारांत प्रचारांत आहेत व मलबारी नटवर्ग अद्याप त्या म्हणत असतो. देवतांच्या पूजेच्या वेळीं पुष्कळ जुन्या काव्यांचा उपयोग करण्यांत येतो. परंतु त्या काव्यकर्त्यांची कोणासहि माहिती नाहीं.

चौदाव्या शतकाच्या पूर्वींचें कांहीं काव्य शिल्लक आहे. त्याची रचना संस्कृत वळणावर आहे. परंतु विषय व विचार मात्र त्या काळचे व स्थानिक आहेत. राजकन्यांचीं वर्णनें असलेलीं अशीं ३ काव्यें सांपडलीं आहेत. त्यांत संस्कृत व मलयालम् छंद आलटून पालटून वापरले आहेत. त्या वेळच्या वाङ्मयीन भाषेस 'मणि–प्रवालम्' अशी संज्ञा आहे. मोतीं व पोवळीं मिसळून माळ तयार केली म्हणजे जसें तिच्यांत एक प्रकारचें विशेष सौंदर्य येतें, तसेंच संस्कृत व मलयालम् शब्द एकमेकांत मिसळून वापरले म्हणजे त्या रचनेला विशेष सौंदर्य येतें अशी समजूत होती. या मणि–प्रवालम् वाङ्मयप्रकाराचें व्याकरण पंधराव्या शतकांत रचलेलें 'लीला तिलकम्' नांवानें प्रसिद्ध आहे. त्यांत मणि–प्रवालम् वाङ्मयाचा इतिहास दिला आहे. त्यावरून मणि–प्रवालम् वाङ्मयाची परंपरा फार मोठी व दीर्घकालीन होती असें दिसतें. पण हें वाङ्मय हल्लीं सबंध नष्ट झालें आहे.

'चंद्रोत्सव' नांवाचें एक संस्कृत छंदांत पंधराव्या शतकांत रचलेलें मल्याळी काव्य उपलब्ध आहे. त्याच काळांतील 'उणुनीली–संदेश' नांवाचें काव्य संस्कृत मेघदूताची नक्कल आहे. हीं काव्यें राजवंशीय कवींनीं रचलेलीं आहेत व त्यांत भारदस्तपणा आणण्याकरितां शेजारच्या तामिळ भाषेंतील शब्दांचा मुबलक उपयोग केला आहे. याच शतकांत भागवत

दशमस्कंध, अध्यात्म रामायण व भारत यांचीं मल्याळी भाषांतरें झालीं. कण्णश पणिक्कर व राम पणिक्कर यांनीं केलेलीं रामायणाचीं दोन भाषांतरें चौदाव्या शतकांतील आहेत. त्यांत तामिळ भाषेची छाप स्पष्ट दिसते. चेरूशेरी नांवाच्या मलबारी ब्राह्मणानें भागवताचें भाषांतर केलें व अध्यात्म रामायण व भारत यांना एझुत तशान कवीनें मल्याळी भाषेंत आणलें. दुसरीं दोन भाषांतरें निव्वळ मल्याळी छंदांत आहेत. त्यांची भाषा शुद्ध, मधुर, कोमल आहे व शैली भव्य आहे. मूळांतील अर्थ सहजपणानें भाषांतरांत उतरला आहे. मल्याळी भाषेंतील हे सर्वोत्कृष्ट ग्रंथ आहेत. भागवताच्या भाषांतरास 'कृष्णगाथा' हें नांव आहे. रामायण व भारत यांना 'किलिपाटू' (शुकगान) असें नांव दिलें आहे. या ग्रंथांचें अनुकरण करणारे 'एकादशी माहात्म्य', 'शिवपुराण', 'नलचरित्र', 'पंचतंत्र', 'चाणक्य-कथा', इ. ग्रंथ झाले.

चंपू हा काव्यप्रकार या भाषेंत फार रूढ झाला होता. संस्कृत चंपूमध्यें छंदोमय भागात कथानक असतें व गद्य भागांत वर्णनें असतात. मल्याळी भाषेंत चंपू काव्यांत संस्कृतप्रमाणें कांहीं भाग संस्कृत वृत्तांत मल्याळी भाषेंत असतो व बाकीचा भाग मल्याळी वृत्तांमध्यें असतो. रामायणचंपू व भारतचंपू हे सगळ्यांत मोठे व फार प्राचीन चंपू आहेत. बहुधा सोळाव्या शतकाच्या मध्यांतले ते असावेत. महिपमंगल या कवीनें नैषधचंपू, राजरत्नावलीय, कोटीविरहम्, इ. चंपूवाङ्मय निर्माण केलें. नीलकंठ कवीनें 'नाथोदय', 'तेनकैल नाथोदय' व 'नारायणीय' हे तीन चंपू तीन प्रसिद्ध देवालयाच्या वर्णनपर लिहिले आहेत.

कृष्णगाथा, अध्यात्म रामायण व भारत या ग्रंथांत प्रत्येक ओळीच्या दुसऱ्या अक्षरांतील यमक साधलें आहे. ही पद्धति तेलगू व कन्नड भाषांतून उचललेली आहे. ही पद्धति मलयालम् काव्यांत फार काळ टिकून होती. संस्कृत चंपूकाव्यांत मधून मधून गद्य भाग असतो. मल्याळ चंपूमधें गद्याऐवजीं मल्याळ वृत्तामधें काव्यरचना करीत असत. या वृत्तांमध्यें द्वितीयाक्षराचें यमक घालीत नसत. अशा काव्यभागास दंडकांचें स्वरूप येत असे. हे दंडक अर्धपद्य-अर्धगद्य स्वरूपाचे व गेय असत. मल्याळी भाषेंत हें दंडककाव्य विपुल व अत्यंत लोकप्रिय आहे.

अठराव्या शतकांत एक नवीन वाङ्मय-प्रकार सुरू झाला. तुल्लाळ (नृत्य) नांवाचें लोकगीतात्मक काव्य उत्सवप्रसंगीं गाण्याकरितां रचण्यांत येऊं लागलें. कुंचन नंबियार यानें या लोकगीतांस उत्कृष्ट कलापूर्ण वाङ्मयाचें रूप प्राप्त करून दिलें. हें लोकगीत सुमारें १००० ओळींचें असे. अशीं ७५ गीतें कुंचनाच्या नांवावर मोडतात. सोपे हावभाव व हालचाल असलेल्या नृत्य प्रकारास जोड म्हणून हीं लोकगीतें म्हणण्यात येतात. या तुल्लाळ लोकगीतांची रचना सर्वसाधारण माणसास कळेल व आवडेल अशी असते. त्यांत विनोद, दोषांचें विडंबन व मानवी भावना उद्दीपित करणारीं वर्णनें भरपूर आहेत. कुंचन नंबियार हा मलबारांतील अत्यंत लोकप्रिय कवि आहे.

चाकियार नांवाचे धंदेवाईक नट हे फक्त संस्कृत नाटकें देवळांतच करीत असत. तीं फक्त उच्चवर्णी लोकांसच पाहावयाला मिळत. सामान्य लोकांस कथाकली नांवाचीं ग्रामीण नाटकें आवडत. सतराव्या शतकांत या कथाकली नाटकांस वाङ्मयाचें स्वरूप मिळालें. या कथाकली नाट्यांत रंगभूमीवर फक्त हावभाव करण्यांत येतात. भाषणें पडद्यामागून गवई लोक गाऊन दाखवितात. कथाकली नाटकें पुष्कळशीं संस्कृतमध्येंच केलीं जातात.

एकोणिसाव्या शतकांत वाङ्मय-कार्याचें केंद्र कोचीनमधील क्रांगानूर येथें गेलें. वेणीमणी आणि त्याचा मुलगा यांनीं या शतकाच्या आरंभीं पुष्कळ लेखक व कवी आपल्याभोंवतीं जमविले. नडुवथ नांवाचे पितापुत्र यांनींहि वाङ्मय-सेवक एकत्र केले. या क्रांगानूर संप्रदायांत काटोलिल अच्युत मेनन, कुंटूर नारायण मेनन, कुन्ही कृष्ण मेनन, तोट्टेकाट इक्कावू अम्मा (एक उत्कृष्ट कवयित्री), इ. मंडळी प्रमुख होती.

केरल वर्मा वलिया कोइल तंपुरान (१८४५-१९१७) हे समकालीन कवींमध्यें पुढारी होते. ते संस्कृत व मल्याळी भाषेंत काव्य-लेखन करीत असत. त्यांचा पुतण्या प्रा. राजराज वर्मा हा मोठा पंडित व कवि होता. दक्षिणेकडील विद्वत्समूहांत राजघराण्यांतील केरल वर्मा, त्रिवेंद्रमचे केशव पिले, कोट्टारतील शंकुण्णी, उल्लूर परमेश्वर अय्यर, इ. लेखक उल्लेखनीय आहेत. या अर्वाचीन काव्यांमध्यें संस्कृत वृत्तेंच वापरतात. परंतु भाषा मात्र शुद्ध मलयालम् असते. साधी पण शुद्ध भाषा, व्याकरणशुद्धता, अनुप्रासासारखे शब्दालंकार, विपुल अर्थालंकार या सर्व गोष्टी जुन्या संस्कृत कवींप्रमाणेंच या अर्वाचीन कवींमध्यें आढळतात. धाकटा वेणीमणी हा अलौकिक प्रतिभेचा कवि होता. सद्यःकालीन घटना व व्यक्ती यांच्याविषयीं यानें काव्य केलें आहे. वेणीमणीचा सावत्र भाऊ कुन्हकुट्टन तंपाण यानें काव्य पुष्कळच विपुल लिहिलें आहे. त्याची रचना सामान्य माणसास सहज कळते. परंतु त्याचा चुलत भाऊ कोचुण्णी तंपाण याचें लेखन फक्त पंडितांसच कळतें.

दक्षिण संप्रदायांतील केरल वर्मा तंपुरान यांनीं संस्कृत काव्याचें अनुकरण केलें आहे. त्याच्या शाकुंतलाची मल्याळी भाषा मूळ संस्कृत कालिदासकृत शाकुंतलापेक्षाहि समजण्यास

मदुरा—कुंड (पृ. १८६८)

मादागास्कर—जंगलाचें दृश्य (पृ. १९५७)

मलबार—कालवा व नारळांची बाग (पृ. १९०८)

कठिण आहे. या वेळीं पुष्कळ संस्कृत नाटकाचीं भाषांतरें झालीं आहेत व संस्कृतच्या वळणावरच स्वतंत्र नाटकेंहि लिहिलीं आहेत.

कुन्हुकुट्टन तंपाण यांनीं महाभारताचें समवृत्त भाषांतर केलें आहे. वालातोलनीं रामायणाचेंहि तसेंच भाषांतर केलें आहे. अलीकडे इंग्रजीच्या संसर्गानें पुष्कळ नियतकालिकें प्रसिद्ध होत आहेत. वाङ्मयीन, शास्त्रीय, सामाजिक, धार्मिक, इ. विषयांवर निबंध व प्रबंध प्रसिद्ध होत आहेत.

चंटू मेननची 'इंदुलेखा' व 'शारदा', अप्पू नेडुंगाडी यांची 'कुंदलता' या मल्याळींतील प्रारंभींच्या कादंबऱ्या होत. कुन्ही रामन् नायनार, अप्पन् तंपुरान, कुन्हन् मेनन, नारायण पोडुवाल व अच्युत मेनन यांनीं सुंदर गद्यलेखनाची कला पूर्णत्वास नेली. १९२५ च्या सुमारास वालातोल यांनीं रवींद्रनाथांच्या नमुन्यावर काव्यरचनेस आरंभ केला. आतां जुनी लेखनशैली अप्रिय झाली. संस्कृत वृत्तें जाऊन त्यांच्या जागीं मल्याळी वृत्तें आलीं. समाजसुधारणेचा उपदेश काव्यांतून होऊं लागला. वालातोलमध्यें जुन्या रेखीव काव्यशैलीचें स्वरूप टिकून आहे. कुमारन् आशान यांनीं जातिसंस्थेच्या निर्मूलनार्थ काव्यें लिहिलीं. परमेश्वर अय्यर हे पूर्वीं संस्कृतनिष्ठ काव्य करीत असत, पण आतां ते वाङ्मयचर्चा व पुराणवाङ्मयसंशोधन करीत असतात. के. एम्. पणिक्कर हे मलबारांतील विद्यमान कवी व कादंबरीकार यांमध्यें अग्रस्थानीं आहेत.

उन्नीकृष्णन् नायर यांनीं टागोरांचें काव्य मल्याळीमध्यें आणलें आहे व स्वतंत्र भावगीतेंहि लिहिलीं आहेत. शंकर कुरुपचीं काव्यें तरुणांना फार आवडतात. कृष्ण पिले हे लढाऊ वृत्तीचे कवि आहेत व चालू विषयांवरच कविता करतात. बालमणि अम्मा ही प्रतिभायुक्त कवयित्री असून वालातोलची अनुयायिनी आहे.

कादंबऱ्या, लघुकथा, सामाजिक नाटकें, तसेंच शास्त्रीय, यांत्रिक व इतर विषयांवरील पुस्तकें विपुल झालीं आहेत. परंतु सध्यांच्या गद्यलेखनांत जुन्या काळचा नीटनेटकेपणा व रेखीव सौंदर्य राहिलें नाहीं. संस्कृतचें ज्ञान नाहींसें झालें आहे. संस्कृतनें पूर्वीं मलयालम् भाषेस कलापूर्ण सौंदर्य दिलें. इंग्रजीनें तिला विचार-वाहकता दिली.

के. एम्. पणिक्कर हे मलबारी साहित्यिकांचे मुकुटमणि आहेत. त्यांच्या काव्यांत रचनासौंदर्य, नादमाधुर्य, शैलीचा व भाषेचा रेखीवपणा आहे. संस्कृतच्या वळणावर त्यांनीं गद्यपद्य—चम्पू लिहिले आहेत. 'हैदर नायकम्' या चंपूमध्यें त्यांनीं मल्याळी गद्य अतिशय सोपें पण उत्तम अलंकारयुक्त असें लिहिलें आहे. त्यांच्या 'पंकी परिणयम्' या ग्रंथांत पंकी नांवाच्या मुलीच्या स्वयंवरसमारंभाच्या निमित्तानें मलबारी समाजांतील अनेक प्रसिद्ध व्यक्तींचीं उत्तम चित्रें काढलीं आहेत. वालातोल हे नवीन साहित्याचे प्रमुख प्रणेते आहेत. त्यांनीं आपल्या प्रारंभींच्या रचनेंत संस्कृतमधील भव्य काव्यांच्या धर्तीवर काव्यें केलीं. परंतु पुढें त्यांनीं मल्याळी छंदामध्येंच काव्यलेखन सुरू केलें. आजपर्यंतच्या मल्याळी काव्यरचनेवर संस्कृत भाषेची व वाङ्मयाची पूर्णपणें छाप होती. परंतु वालातोलनीं मल्याळी छंद अनेक वर्षांच्या प्रयत्नानें प्रचारांत आणले. नव्या कल्पना, नवे विचार, नवीं ध्येयें समोर ठेवून वालातोल व त्यांचे अनुयायी यांचें लेखन गेल्या पाव शतकांत चालू आहे.

रामन् पिले, कृष्ण पिले, केशव पिले, पद्मनाभ पिले यांनीं पाश्चात्य नाटककारांच्या नमुन्यावर सामाजिक नाटकें लिहिलीं आहेत. इब्सेन, मेटरलिंक, टागोर यांच्या नाटकांचीं रूपांतरें मल्याळीमध्यें झालीं आहेत. अच्युत मेनन यांनीं संस्कृत छंदांत पदें असलेलीं 'संगीत नैषध', 'हरिश्चंद्रचरित', इ. संगीत नाटकें लिहिलीं व तीं फार लोकप्रिय झालीं. कृष्ण तंपी यांनीं पुष्कळ हरिकथा म्हणजे कीर्तनें रचलीं आहेत. मल्याळी लोक रंगभूमीवर नाट्यदर्शन स्वभावतःच फार उत्तम करतात. लघुकथा, कादंबरी, चरित्रें, इ. भागांतहि अलीकडे पुष्कळच ग्रंथरचना झाली आहे. नारायण पणिक्कर यांचा चार भागांचा 'मल्याळ वाङ्मयेतिहास' फार महत्त्वाचा आहे. भारतांतील दुसऱ्या कोणत्याहि भाषेचा इतका सर्वांगपूर्ण इतिहास असेल असें वाटत नाहीं. अर्वाचीन लेखकांत ख्रिस्ती, एझावा, मुस्लिम, सर्व जातींचे हिंदू, म्हणजे राजघराण्यांतले लोक, नायर, ब्राह्मण हे सर्व सारख्याच उत्साहानें कार्य करीत आहेत. अलीकडे गद्य-वाङ्मय-लेखन सुरू झाल्यापासून इतिहास, भूगोल, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, अर्थशास्त्र व भौतिकशास्त्रें यांवर भरपूर ग्रंथरचना झाली आहे.

**मलाया द्वीपकल्प**—याला हिंदी किंवा पूर्व द्वीपकल्प असेंहि नांव आहे. हें समांतरभुज चौकोनाच्या आकाराचें असून याचा एक भाग चीनच्या समुद्रांत गेलेला आहे. याचें क्षे. फ. सुमारें ७०,००० चौ. मैल आहे. हें द्वीपकल्प म्हणजे अफाट जंगल असून त्यांत अगणित लहानमोठ्या नद्या आहेत. कौन्टन, रांपीन, केलॅन्टन व पेहांग या येथील मुख्य नद्या आहेत. स्ट्रेट्स-सेटलमेंटची वसाहत व संयुक्त मलाया संस्थानें; जोहोरचें स्वतंत्र संस्थान; संरक्षणाखालील विभक्त संस्थानें; व पेराग–पेहांगच्या उत्तरेकडील संस्थानें असे ४ भाग पडतात. या द्वीपकल्पाची लो. सं. सुमारें २०,००,००० आहे. पैकीं ८,५०,००० चिनी लोक

आहेत. येथील मसाल्यांचा व्यापार फार प्राचीन आहे. इराणांतील व अरबस्तानांतील मुसलमान व्यापाऱ्यांनीं हिंदूंचा कुलहक्क झुगारून सोळाव्या शतकाच्या आरंभास बहुतेक मसाल्याचा व्यापार आपल्या हातांत घेतला. हे व्यापारी मुसलमानी धर्माचे उपदेशक होते व त्यांच्या वजनामुळें मलायांतील लोकांनीं अनेकदेवतोपासना सोडून देऊन मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. पोर्तुगीजांनीं १५११ सालीं पुन्हां मलाका बेटाचा शोध लावण्यासाठीं तयारी केली व त्या वेळीं मलाका त्यांनीं घेतलें व तें नंतर कायमचें युरोपियन लोकांच्या ताब्यांत गेलें. लवकरच मसाल्याच्या व्यापाराचा कुलहक्क पोर्तुगीज लोकांस मिळाला व मलाका हें त्या व्यापाराचें मुख्य ठिकाण झालें. पुढें डच लोक मलायाचे मालक झाले. नंतर १७९५ त इंग्रजांनीं त्यांच्यापासून तें घेतलें. स. १८६७ पर्यंत स्ट्रेट्ससेटलमेंटचा राज्यकारभार हिंदुस्थानांतून पाहण्यांत येत असे. १८६७ सालीं ही राज(क्राउन) वसाहत करण्यांत आली. सिंगापूर हें स्ट्रेट्ससेटलमेंटच्या वसाहतीचें राजकीय, व्यापारी व राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे.

मलयु भाषा—मलाया द्वीपकल्पांत मलयु भाषा चालते. परंतु युरोपियन लोक मॅले असा त्याचा उच्चार करतात. ही भाषा वापरणाऱ्या मलायी लोकांस 'सयामी' लोक 'खेक' असें म्हणतात व ब्रह्मी लोक 'मासु' असें म्हणतात. या भाषेला तिच्या माधुर्यावरून युरोपीय लोक पूर्वेकडील इटालियन असें म्हणतात. व तिच्या प्रसारावरून पूर्वेकडील हिंदुस्थानी असें नांव देतात. हिचें एकाक्षरी भाषांशीं जरी बरेंच साम्य आहे तरी ती मूळची अनेकाक्षरी भाषा आहे. या भाषेची व्याप्ति फार मोठ्या प्रदेशावर असल्यामुळें व हिचें निरनिराळ्या प्रदेशांतील दस्य अथवा लोकभाषांशीं मिश्रण होऊन हिच्यापासून अनेक पोटभाषा किंवा उपभाषा निघाल्या आहेत. यामुळें मूळची मलयु भाषा कोणती हें शोधून काढणें बरेंच श्रमाचें झालें आहे. हा शोध करण्याकरितां प्रत्येक राज्यांतील भाषेची रचना व त्या राज्याचा इतिहास या दोहोंचाहि अभ्यास करावा लागतो. यद्यपि ही भाषा उपयोगांत आणणारें राष्ट्र बरेंच, अर्वाचीन आहे, तथापि त्या राष्ट्राच्या इतिहाससंशोधनास लागणारी अनेक प्रकारची सामग्री उपलब्ध असूनहि तिचें संशोधन न झाल्यामुळें त्या राष्ट्राचा इतिहास बराचसा अज्ञात राहिला आहे; आणि यामुळें मलयु भाषेची उत्पत्ति व वाढ यांच्यावरहि या अज्ञानांधकाराची छाया पडली आहे. बोलण्याच्या लोकभाषांत (बस ददंग) जरी निरनिराळ्या प्रदेशांत बराच फरक आहे तरी लिहिण्याची भाषा (बस जवि) बहुतेक सर्व राज्यांतून एकच आहे आणि यामुळें जी लोकभाषा लेखनभाषेशीं विशेष जुळते ती सर्वांत उच्च समजली जाते.

या भाषेंत देश्य, संस्कृत व अरबी शब्द आहेत. मलयु वाङ्मयांत रामायण आणि महाभारत व भारतीय पुराणें यांतील बऱ्याच कथा रूपांतरित झालेल्या आढळतात.

**मलाया संघराज्य**—१९४८ पूर्वी पेराक, सेलांगोर, नेग्री सेंबिलन व पेहांग हीं चारच संस्थानें या संघराज्यांत होतीं. याचें क्षे. फ. २७,५४० चौ. मै. असून लो. सं. २२,१२,०५२ इतकी होती. यामध्यें ४,६६,०५६ हिंदी होते. कुआला लंपूर हें संघराज्याचें मुख्य ठिकाण असे.

या संघराज्यांत त्या वेळीं समाविष्ट न झालेलीं संस्थानें म्हणजे जोहोर, केडाह, पेरालिस, केलानटन व ट्रेंगानू हीं पांच होत. १९४८ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या पहिल्या तारखेस हीं नऊ संस्थानें, मलाका आणि पेनांग मिळून एक संघराज्य प्रस्थापित झालें.

**मलायी लोक**—मलाया द्वीपकल्पांत व मलाया द्वीपसमूहांत राहणाऱ्या प्रबळ राष्ट्रजातीला मलायी हें नांव आहे. मंगोल लोकांशीं शरीररचनेंत बरेंच साम्य असल्यामुळें मंगोल महावंशांतले हे मलायी असावेत. तथापि मलयु भाषा भिन्न असल्यामुळें मलयु हा स्वतंत्र महावंश आहे हें मत हल्लीं सर्वमान्य होत आहे. मलायी लोक सुनी पंथी मुसलमान आहेत. हे लोक आदरशील व स्वाभिमानी परंतु आळशी, सुखलोलुप, स्वार्थी, अन्यायी, अदूरदर्शी व फार जुव्वेबाज असून पैशाच्या संबंधांत त्यांना प्रामाणिकपणाची कल्पना सुद्धां नसते, असें यांचें युरोपियन ग्रंथकार वर्णन करतात. मलायी लोक दरबारी व विलक्षण राजनिष्ठ आहेत. त्यांचें मुख्य अन्न भात असल्यामुळें येथील मुख्य पीक भात हें आहे. रेशमाचें व कापसाचें कापड तयार करणें हे त्यांचे मुख्य धंदे होत.

**मलिक अंबर** (मृ. १६२६)—निजामशाहींतील एक मंत्री. हा हबशी गुलाम निजामशाहींतील कारभारी चंगीजखान याच्या पदरीं होता. तो बुद्धिमान् असल्यामुळें हबशी सरदारांच्या तटाचा पुढारी बनला. अकबरानें अहमदनगर जिंकल्यावर मलिक अंबरनें मूर्तिझा निजामशहा (दुसरा) या अल्पवयी राजास गादीवर बसवून शहाजीराजे भोसले याच्या मदतीनें मोंगलांच्या लाटेस २०-२५ वर्षें

थोपवून धरलें आणि निजामशाही राज्याच्या बहुतेक भागावर आपली सत्ता पुन्हां चालू केली. १६०५ सालीं पांडे पेडगांवचा

मोकासा याजकडे होता. १६१०सालीं दौलताबादेजवळ खडकी (औरंगाबाद) नांवाचें शहर यानें वसविलें. मलिक अंबरचें नांव मुख्यतः त्याच्या जमाबंदीच्या नव्या पद्धतीमुळें प्रसिद्धीस आलें. त्यानें गांवें इजाऱ्यानें देण्याची पद्धत बंद केली आणि जमिनींतील उत्पन्नाची दरसाल पाहणी करून ऐनजिनसी सारा उत्पन्नाच्या ⅖ किंवा ⅓ घेण्यास सुरुवात करून कित्येक वर्षे धान्यांत महसूल गोळा केल्यावर, त्या अनुभवावरून मग तो महसूल पैशांत ठरवण्यांत आला. परंतु ही रक्कम पीक चांगलें आलें नाहीं तर कमी करण्यांत येत असे. त्यानें जुन्या ग्रामसंस्था ऊर्जितावस्थेस आणल्या व वसूल गोळा करण्यास ब्राह्मण अमलदार नेमले. तो ८० वर्षांचा होऊन मरण पावला. अंबरापूर (जि. नगर) येथें त्याची कबर आहे. त्याच्यानंतर शहाजीराजे भोसले यानें निजामशाहीचा कारभार चालविला.

**मलिक अहमदखान फरूकी** (१३८२–९९)—खानदेशांतील फरूकी राजांचा मूळ पुरुष. हा आपणांस खान म्हणवीत असे. तसेंच मलिकराजा किंवा राजा अहमद या नांवांनींहि हा प्रसिद्ध आहे. याच्या 'खान' या नांवावरूनच याच्या राज्यास 'खानदेश' हें नांव पडलें म्हणतात. बहामनी राज्याविरुद्ध बंड पुकारणाऱ्या बहरामखान माझंदराणीचा हा एक प्रमुख हस्तक होता. दक्षिणेंतून यास पळ काढावा लागल्यानें यानें तापी नदीच्या कांठीं थाळनेर या गांवीं येऊन सन १३८२ पर्यंत आसपासचा बराचसा मुलूख आपल्या अमलाखालीं आणला व तेथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापलें.

**मलिक काफूर** (मृत्यु १३१६)—एक मुसलमानी सरदार. सुलतान अल्लाउद्दिननें १२९७ मध्यें आपला सरदार नुस्रतखान यास खंबायतवर स्वारीस पाठवलें. त्या वेळीं झालेल्या लुटींत नुस्रतखानास हा गुलाम मिळाला. मलिक आपल्या हुशारीनें थोड्याच दिवसांत सुलतानाचा सेनापति झाला. अल्लाउद्दिननें यास गुजराथचा कर्ण राजा याची देवगिरीस असलेली मुलगी देवलदेवी हिला आणण्यासाठीं पाठवलें होतें. तसेंच देवगिरीचा राजा रामदेवराव यादव याजकडून थकलेली खंडणी वसूल करण्याच्या कामींहि याचीच नेमणूक झाली होती. यानें रामदेवरावावर चाल केली असतां तो शरण आल्यानें त्याच्या राज्यांत वसुलीकरितां एक मुसलमान कारभारी नेमून हा परत फिरला. तेलंगणाच्या तिसऱ्या प्रतापरुद्रदेव काकतीयावर स्वारी करून यानें त्यास सुलतानाचा मांडलिक बनवलें. तसेंच होयसळांच्या द्वारसमुद्रावर स्वारी करून व पांड्यांच्या मदुरा शहराची लूट करून यानें दिल्लीचा खजिना भरला. काफूरच्या दक्षिणेंत तीन स्वाऱ्या झाल्या. यानें अगणित संपत्ति उत्तरेंत नेली. अल्लाउद्दिनाचें बहुतेक राज्य याच्या कमाईचें होतें. अल्लाउद्दिनाचें त्याच्या पत्नीविषयीं व मुलांविषयीं यानेंच कान भरवले व त्यांना बंदींत टाकविलें. अल्लाउद्दिनाच्या पश्चात् यानें शिहाबुद्दिन उमर या मुलास गादीवर बसविलें व राजकुमार खिजरखान व शादीखान यांचे डोळे काढले. हा स्वतः नपुंसक असतांहि अल्लाउद्दिनाच्या पत्नीशीं लग्न लावून तिचे दागदागिने व जडजवाहीर यानें लुबाडलें. यानें मुबारक नांवाच्या अल्लाउद्दिनाच्या मुलाचे डोळे काढण्यासाठीं सैनिक पाठवले असतां मुबारकनें त्यांना आपल्या राजनिष्ठेची आठवण करून दिली. त्यांना जहागीर देऊन खुप केलें व उलट मलिकचा खून करण्याच्या कामगिरीवर परत पाठवलें. या सैनिकांनींच ता. ७ फेब्रुवारी १३१६ रोजीं मलिक काफूर यास ठार करून त्याच्या पापांचें त्यास योग्य प्रायश्चित्त दिलें.

**मलिक महंमद ज्यायसी** (१६ वें शतक, प्रथमार्ध)—एक हिंदी ग्रंथकार. हा फकीर होता व अमेठीचा राजा याचा भक्त असे. अमेठी येथें राजवाड्याच्या दरवाजाजवळ त्याचें थडगें आहे. त्यानें 'पद्मावत्' नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांत चितोडच्या पद्मिनीची हकीगत गौडी भाषेत पद्यमय दिली आहे. पण नायकाचें भीमसिंहाऐवजीं 'रतन' नांव ठेवणें, इत्यादि बरेच फेरफार मूळ हकीगतींमध्यें केलेले आहेत. त्यांत काव्यमाधुर्य व कल्पकता उत्तम आहे.

**मलुहा केदार**—हा राग बिलावल थाटांतून निघतो. याच्या आरोहांत ऋषभ आणि धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. हा राग मंद्र व मध्य सप्तकांत अधिक खुलतो. यांत शाम व कामोद यांचें मिश्रण दृष्टीस पडतें. हा एक केदाराचा प्रकार आहे.

**मलूकदास** (१५७४–१६८२)—एक हिंदी कवि. हा अलाहाबाद जिल्ह्यांतील कडा या गांवचा. हा गृहस्थाश्रमी असून घोंगडी विणण्याचा याचा धंदा असे. विठ्ठलदासाचा हा शिष्य असून 'रत्नखान' व 'ज्ञानबोध' हे याचे दोन ग्रंथ होत. यास एकशें आठ वर्षांचें आयुष्य लाभलें. याच्या पंथाचे लोक अजूनहि आढळतात.

**मॅलेट, सर चार्लस** (१७५२–१७९८)—मराठ्यांचें वर्चस्व कमी करून इंग्रजांची पाळेंमुळें खोलपर्यंत रुजविणारा एक इंग्रज मुत्सद्दी. प्रथम ईस्ट इंडिया कंपनींत कारकुनी करणारा हा गृहस्थ नंतर मुंबईच्या गव्हर्नरचा सेक्रेटरी व त्यानंतर पुणें दरबारीं रेसिडेंट झाला. महीवरील झालेल्या युद्धांत राघोबादादास अपयश आलें असतां यानें दादास साहाय्य देऊन

सुरतेस पोहोंचवलें. तसेंच पेशव्यांच्या गादीबद्दल बाळोबा-तात्या व शिंदे यांच्यामधील वादाचा निकाल लावण्याच्या कामीं यानें मदत केली. याचें दुसऱ्या बाजीरावावर चांगलेंच वजन होतें. याच्या स्वामिनिष्ठ कार्याबद्दल इंग्रज सरकारनें यास 'सर' हा किताब देऊन याचा गौरव केला. याचा पत्रव्यवहार 'रेसिडेन्सी रेकॉर्ड्स' या मालेंत प्रसिद्ध झाला आहे.

**मलेर कोटला**—पंजाब, एक संस्थान. ह्या छोट्याशा संस्थानचा मालक कुर्द पठाण मुसलमान आहे. येथील मूळ पुरुष प्रथम इराणच्या उत्तरेकडील शेरवाण प्रांताचा रहिवासी असून, तेथून तो काबुलास आला. नंतर मोगल बादशहांच्या पदरीं नोकरीस राहून सरहिंदमध्यें कामगिरी बजावीत होता. त्यानें मलेर येथें १४४२ त आपलें ठाणें घातलें. ह्या घराण्यानें मोंगलांच्या ऱ्हासकाळांत स्वतंत्र सत्ता स्थापिली. पण पुढें नव्या शीख राज्याशीं याचे तंटे होऊं लागले. १८०९ सालीं येथील नवाब इंग्रजांचा मांडलिक बनला. संस्थानचें क्षेत्रफळ १६७ चौरस मैल असून लो. सं. (१९४१) ८८,१०९ व उत्पन्न १६ लाख आहे. येथील विद्यमान नवाब ले. कर्नल अहमदअली खान बहादूर हे १९०८ सालीं गादीवर बसले. संस्थानांत कापूस, साखर, बडीशेप, अजमोदा, तंबाखू, व बहुतेक प्रकारचें धान्य उत्पन्न होतें. मलेरकोटला राजधानीची लो. सं. ३०,००० आहे. आतां हें संस्थान पतिआळा-पूर्व पंजाब संघांत सामील झालें आहे.

**मल्लखांब**—एक देशी व्यायामप्रकार. मल्लखांब म्हणजे मल्लास व्यायामाकरितां उपयोगी पडणारा खांब. हा साधारणपणें मनुष्याच्या उंचीचा व जमिनींत पुरलेला असतो. त्यावर अनेक प्रकारच्या उड्या करतात. या उड्या कुस्ती शिकतांना फार उपयोगी पडतात. कुस्तीला जरूर ती शरीराची तयारी यानें होते. म्हणून मल्लखांब हा कुस्तीला पोषक असा एक उत्कृष्ट व्यायामप्रकार आहे. यानें शरीर चपळ, लवचिक व मजबूत होतें व दम वाढतो. कुस्तीचे डाव करतांना शरीर जसें उडवावें, वळवावें लागतें, तसें करण्याची संवय या मेहनतीनें लागते. मल्लखांबाच्या उड्या येणारा मनुष्य स्वतःचा उत्तम बचाव करूं शकतो व आपण होऊन प्रतिपक्षावर डावहि करूं शकतो.

नुसता व्यायामप्रकार म्हणूनहि हा व्यायाम उपयुक्त आहे. यानें शरीरांतील इंद्रियांच्या क्रिया सुधारतात व प्रत्येक सांधा मजबूत होऊन लवूं शकतो.

मल्लखांबाच्या कुस्तीच्या उपयोगी उड्या विशेषतः पुढील होत : (१) अढ्या, (२) उड्या, (३) सलाम्या, (४) तिड्या, (५) बगल्या, (६) दसरंग, (७) फिरक्या, (८) उतरत्या, (९) वेल, व (१०) सुईदोरे.

अढीनें पायाच्या स्नायूंस व्यायाम होतो व खारीखोडा वगैरेस मदत होते. सलामीनें उखाड, कलाजंग, धोबीपछाड, नौदर, वगैरे डावांत बचाव करता येतो. तिडीनें टांगेच्या डावांत तोड करतां येते. बगलीनें टांगेच्या डावांत शरीर तडफेनें उडवतां येतें. दसरंग उडीनें कुस्तींतील दसरंगाचे डाव करण्यास मदत होते. अशा प्रकारें मल्लखांबाच्या उड्या कुस्तींत फार उपयुक्त आहेत.

मल्लखांबाच्या उपयुक्त उड्यांशिवाय दिखाऊ व्यायामप्रकार म्हणून अनेक उड्या बसविण्यांत आलेल्या आहेत.

मल्लखांबाचे जमिनींत पुरलेल्या प्रकाराशिवाय टांगता, वेताचा, अंतर पकडीचा, पाटावरील, बाटल्यावरील, वगैरे अनेक प्रकार आहेत.

**मल्लसिंदूर**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, रसकापूर, पांढरा सोमल हीं मुख्य औषधें आहेत.

घशांत घरघर होणें, बेशुद्धि, गुंगी, बडबड, सन्निपात, ज्वर, अशा वेळीं हें औषध दिल्यानें चांगला उपयोग होतो. हृदय, फुफ्फुसें यांना यामुळें शक्ति मिळते. पाळीच्या कांहीं तापावर रोग्याच्या जीर्णावस्थेंत याचा उपयोग होतो. पित्तप्रधान रोगांत व लहान मुलांना हें औषध देऊं नये. उपदंशावर याचा चांगला उपयोग होतो. ·१· ते १ गुंज वासावलेह, मध, तूप, साखर, आल्याचा रस, तुळशीचा रस, इत्यादींतून दिवसांतून तीन वेळां देतात.

**मल्लाप्पा वासकर**—वारकरी पंथांतील एक प्रसिद्ध फडकरी. जातीनें लिंगायत वाणी. याच्या स्पष्टवक्तेपणाची एक मजेशीर कथा सांगतात. महादजी शिंद्याचा मुक्काम एकदां पंढपुरास पडला असतां तो मल्लाप्पाच्या दर्शनास गेला. जातांना त्यानें आपणांबरोबर स्वतः लिहिलेले कांहीं अभंग व भगवद्गीतेवरील स्वतःच लिहिलेली 'माधवदासी' या नांवाची ओंवीबद्ध टीका अशीं दोन पुस्तकें मल्लाप्पास दाखविण्याकरितां बरोबर घेतलीं व अवलोकनार्थ म्हणून त्यानें तीं मल्लप्पापुढें ठेवलीं. मल्लाप्पानें तीं उघडून पाहतांच त्यांत तुकारामाचीं वाक्यें जशींच्या तशीं उतरून घेतल्याचें त्यास आढळून आलें. महादजीची ही चूक मल्लाप्पानें ताबडतोब त्याच्या नजरेस आणून दिली. या वेळे-पर्यंत महादजीनें अनेकवार आपलें लिखाण इतर जनांना दाख-वलें असतांहि सर्वांनीं तोंडपुजेपणाच दाखवला होता. परंतु मल्लाप्पाच्या स्पष्टवक्तेपणामुळेंच महादजीस आपली योग्यता कळून चुकली. पुढें मल्लाप्पाकडून महादजीनें उपदेश घेतला. वारकरी लोकांत याचाच फड प्रमुख समजला जातो.

**मल्लिनाथ**—एक संस्कृत काव्य टीकाकार. रघुवंश, किरात, माघ, नैषधीय चरित, विद्याधरप्रणीत एकावली, मेघदूत, वगैरे सुप्रसिद्ध ग्रंथांवर याच्या टीका आहेत. वरदराजकृत तार्किक

रक्षेवरहि यानें टीका लिहिली आहे. हा पंधराव्या शतकांत होऊन गेला. पेद्दार्य व कुमारस्वामिन्‌ सोमपीथी या नांवाचे यास दोन पुत्र होते. कुमारस्वामीनें प्रतापरुद्रियावर 'रत्नापण' नांवाची टीका लिहिलेली आहे.

**मल्हारगड**—(सोनोरी). मुंबई, पुणें जिल्हा. सासवडच्या उत्तरेस ६ मैलांवर व दिवे घाटापासून पश्चिमेस तीन मैलांवर हा किल्ला एका डोंगराच्या फांट्यावर सोनोरी गांवांत बांधलेला आहे. किल्ल्याला दुहेरी तट असून त्याचा घेर ७०० यार्ड आहे. किल्ल्यांत खंडोबा व महादेव यांची देवालयें आहेत. हा किल्ला १७७५ त भिवराव यशवंतराव पानसे व कृष्णाजी माधवराव पानसे यांनी बांधला.

**मल्हारराव गायकवाड** (मृ. १८९३)—बडोदें संस्थानचा एक राजा. खंडेरावमहाराज वारल्यानंतर त्याचा हा भाऊ, जो खंडेरावाच्या विरुद्ध केलेल्या कटामुळें कैदेंत पडला होता तो सुटला व गादीवर बसला (१८७०). याच्या हेकटपणामुळें व उधळपट्टीमुळें संस्थानांत कर वाढवावे लागले व राज्यव्यवस्था बिघडून गेली. म्हणून ब्रिटिश सरकारनें चौकशीकमिशन नेमलें; तेव्हां त्यांत अव्यवस्था असल्याचें शाबीत होऊन त्याबद्दल ताकीद देण्यांत आली. पुढें बडोद्याचा रेसिडेंट कर्नल फेअर यास मल्हाररावमहाराज विष घालण्याचा प्रयत्न करीत आहे असा सरकारला संशय आला. तेव्हां स. १८७५ च्या जानेवारींत हिंदुस्थान सरकारनें मल्हाररावास अटक करून व चौकशीकरितां कमिशन नेमून राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. मल्हाररावाची गैरवर्तणूक व गैरराज्यव्यवस्था शाबीत करून इंग्रज सरकारनें जाहीरनामा काढला व त्यास पदच्युत करून मद्रास येथें हद्दपार केलें. तेथेंच तो नजरकैदेंत असतां १८९३ सालीं वारला.

**मल्हारराव होळकर** (१६९३–१७६६)—इंदूर संस्थानचा संस्थापक व मराठेशाहींतील एक मोठा सरदार. हा मूळ जातीनें धनगर, नीरा नदीकांठच्या होळ गांवीं (जि. पुणें) राहणारा. बाजीराव पेशवा यानें पवार, शिंदे व मल्हारराव होळकर यांच्याकडे माळव्यातील चौथाई व सरदेशमुखी गोळा करण्याचें काम सोंपविलें व फौजेच्या खर्चाकरितां त्या मुलुखाच्या मोकासाबाबींत थोडी रक्कम तोडून दिली. यानंतर १७३१ (माळवा), १७३२ (तिरला), १७३५ (आग्रा व गुजराथ), १७३६ (अन्तर्वेद, दिल्ली), १७३८ (भोपाळ), १७३९ (कोंकण, वसई) या सालांच्या मोहिमांत मल्हारराव हजर होता, व त्यांपैकीं कांहीं स्वाऱ्या त्यानें स्वतः केल्या होत्या. बहुतेक माळवा सर झाल्यावर माळव्यांतील ८२ परगणे जहागीर होळकरास देण्यांत आली. यापूर्वींच रेवाकांठचा बराच प्रांत मल्हाररावानें जिंकला होता. त्यामुळें त्यानें आपलें मुख्य ठाणें महेश्वरास केलें. शाहूच्या मृत्यूनंतर पेशव्यांनीं जी माळव्याची व्यवस्था केली तींत माळव्याच्या एकंदर १॥ कोट वसुलापैकीं ७४॥ लक्षांचा प्रांत मल्हाररावास दिला. पुढें मल्हाररावानें रोहिल्यांविरुद्ध अयोध्येच्या सफदरजंगास मदत केली.

यानें पेशव्यांच्या आज्ञेवरून वजीर गाजीउद्दीन यास दक्षिणेंत आणलें (१७५२) व गाजीच्या मीर शहाबुद्दीन नांवाच्या मुलास जाटांविरुद्ध मदत करून, जाटांच्या मदतीस आलेल्या दिल्लीच्या बादशहाचा पराभव केला. राघोबादादा पेशव्याच्या उत्तरेकडील स्वाऱ्यांत मल्हाररावानें थोडाफार भाग घेतला होता. पण पहिल्यापासूनच मल्हारराव आपलें अंग राखून काम करणारा होता. आपला फायदा ज्यांत नाहीं त्यांत तो सहसा पडत नसे. शिंदे आपल्याहून वरचढ होऊं लागले हें पाहतांच यानें त्यांच्याविरुद्ध खटपटी सुरू केल्या. शिंद्यांच्या विरुद्ध त्यांच्या शत्रूस आंतून मदत केली. नजीबखानासारख्या मराठ्यांच्या कट्टया शत्रूस "पेशव्यांचीं धोत्रें बडवावीं लागतील यासाठीं" खळी म्हणून व पेशवे "नजीब हा बेमान, हरामखोर, अर्धा अब्दाली आहे" असें सांगत असतांहि त्याला मुद्दाम शेवटपर्यंत राखून ठेवला आणि पानपतच्या प्रसंगीं भाऊसाहेबांना जास्ती अडचणींत आणून शेवटच्या वेळीं रणांतून पाय काढला. यानंतर राक्षसभुवनच्या लढाईंत (१७६३), जाटानें दिल्लीस घातलेल्या वेढ्यांत (१७६६) व राघोबादादाच्या उत्तरेकडील मोहिमेंत (१७६६) मल्हाररावानें भाग घेतला होता. त्याचा मुलगा खंडेराव हा कुंभेरीच्या लढाईंत मारला गेला. खंडेरावाची बायको प्रसिद्ध अहल्याबाई होय. मराठे साम्राज्य ज्यांनीं वाढविलें, त्यामध्यें मल्हाररावाची प्रामुख्यानें गणना करावी लागेल.

**मॅसाच्युसेट्स**—हें अमेरिकन सं. संस्थानांतील १३ आद्य संस्थांनापैकीं एक संस्थान, अॅटलांटिक महासागराजीक किनाऱ्यालगत आहे. या संस्थानांत कनेक्टिकट व इतर नद्या आहेत. हें संस्थान शेतकीप्रधान होतें; परंतु आतां औद्योगिक कारखान्यांत त्याचें रूपांतर झालें आहे. तथापि अद्याप तेथें शेती, दुभतीं जनावरें व मेंढ्या पाळणें हे धंदे कांहीं प्रमाणांत चालतात. येथें बटाटे, मका व तमाखू हीं पिकें होतात. येथें मुख्य कारखाने बूट, चामड्याचे जिन्नस, कापसाचें व लोंकरीचें कापड, यंत्रें, कागद हे आहेत. बोस्टन, हारवर्ड, नॉर्थ-ईस्टर्न व क्लार्क हीं चार विद्यापीठें (यांपैकीं हारवर्ड प्रख्यात आहे) आणि अनेक विषयांचीं मिळून १३ कॉलेजें आहेत. येथें ७ ते १६ वर्षांपर्यंत शिक्षण सक्तीचें आहे. लो. सं. ४३,१६,७२१ असून त्यांत इंग्रज, फ्रेंच, इटालियन, आयरिश, रशियन, पोल, स्वीडिश, स्कॉट, पोर्तुगीझ, जर्मन आणि नीग्रो इतक्या जातींचे

लोक आहेत. क्षे. फ. ८,२५७ चौ. मैल आहे. येथला राज्यकारभार गव्हर्नर कायदेमंडळाच्या संमतीनें चालवतो. येथील सेनेटचे ४० आणि हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हचे २४० लोकनियुक्त सभासद आहेत.

१६२० मध्यें 'मे फ्लॉवर' जहाजावरील यात्रेकरू उतरले ते याच संस्थानच्या किनाऱ्यावर. त्या ठिकाणीं प्लायमाउथ कॉलनी झाली. वरील यात्रेकरूंची उतरण्याची जागा 'प्लायमाउथ रॉक' म्हणून निराळी राखून ठेवण्यांत आली आहे. १६२३ मध्यें केपआन येथें दुसरी एक वसाहत झाली व मागोमाग बऱ्याच वसाहती होऊन मॅसाच्युसेट्स हें प्यूरिटन लोकांचें एक निवासस्थानच झालें होतें व युरोपांतून ठिकठिकाणाहून छळवादाला कंटाळलेले प्युरिटन येथें येत असत. पुढें या संस्थानांत रेड इंडियनांचा बराच उपद्रव सुरू झाला; त्यांतून त्यांना फ्रेंचांची फूस व मदत मिळे. अठराव्या शतकांत इंग्लंडनें बसवलेले कर फार जाचक होते आणि त्यामुळें या संस्थानांत बरीच खळबळ उडून प्रकरण क्रांतियुद्धापर्यंत गेलें. ही परिस्थिति प्राप्त होण्यास झालेलीं कारणें म्हणजे १७७० ची बोस्टनची कत्तल, १७७३ चें बोस्टनचें चहाचें प्रकरण, लेक्झिंग्टन व कंकार्ड येथील लढाया (१७७५), बंकर हिलची लढाई (१७७५) हीं होत. याप्रमाणें स्वातंत्र्ययुद्धांतहि या संस्थानानें महत्त्वाचें स्थान मिळविलें होतें.

**मसानी, मिनोचेर रुस्तुम** (१९०५- )—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी. यांचें शिक्षण मुंबई येथील कॅथीड्रल व न्यू हायस्कूल यांमध्यें झालें व नंतर ते एल्फिन्स्टन कॉलेजमधून पदवीधर झाले. तेथून ते लंडन स्कूल ऑफ इकॉनमिक्समध्यें गेले. मजूर पक्षाच्या लंडन येथील अर्थशास्त्रीय विद्यालयाचे ते अध्यक्ष होते (१९२७-१९२८). १९२६-२७ मध्यें लंडनमधील इंडिया सोसायटीचे अध्यक्ष होते. त्याच वेळेस ते तेथील इंडियन मज्लीस या संस्थेचे उपाध्यक्ष होते. १९२६ ते १९२८ मध्यें ते हिंदी मजूर पक्षाचे सभासद होते. १९२९ मध्यें त्यांनीं मुंबई हायकोर्टांत वकिली सुरू केली. १९३२ च्या सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं भाग घेतला व मुंबईच्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या ५२ व्या इमर्जन्सी कौन्सिलचे ते अध्यक्ष होते. २ जानेवारी १९३३ रोजीं त्यांस पकडण्यांत येऊन एक वर्षाची शिक्षा झाली. १९३४ मध्यें यांनीं मुंबई इलाखा कॉंग्रेस सोशालिस्ट ग्रूप स्थापन करण्याच्या कामीं पुढाकार घेतला व त्याचे प्रधान मंत्री झाले. १९३४ च्या मार्च ते सप्टेंबर मध्यें हे मुंबईतील 'डेली सन' या पत्राचे संपादक होते. १९३४-३५ मध्यें ते मुंबई कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचे संयुक्त मंत्री होते. त्याच वर्षीं ते अखिल भारतीय कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचेहि संयुक्त मंत्री होते व १९३६ मध्यें प्रधान मंत्री झाले. १९३४-३५ मध्यें ते मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कार्यकारी समितीचे सदस्य होते. १९३५ मध्यें ते मुंबई कॉर्पोरेशनचे समासद झाले. १९४३-४४ मध्यें मुंबईचे मेयर. १९४६ सालीं मध्यवर्ती कायदेमंडळाचे सभासद; नंतर घटना समितीचे सभासद. यांना ब्राझीलमध्यें हिंदुस्थानचे वकील नेमण्यांत आलें होतें. यांनीं अर्थशास्त्र-समाजशास्त्र यावर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत.

**मासारिक, थॉमस गॅरिग** (१८५०-१९३७)—हा प्रसिद्ध झेक मुत्सद्दी आणि तत्त्ववेत्ता, आणि झेकोस्लोव्हाक लोकराज्याचा संस्थापक व पहिला अध्यक्ष दक्षिण मोरेव्हिआंतील गोएडिंग गांवीं जन्मला. व्हिएन्ना विद्यापीठांत पीएच्. डी. पदवी मिळविल्यावर तो १८७८ सालीं व्हिएन्ना येथील कॉलेजांत शिक्षक झाला. त्यानें बोस्टन येथील शार्लोटी गॅरिग नांवाच्या कुमारिकेशीं विवाह केला. तो १८८२ सालीं प्राग येथील झेक विद्यापीठांत तत्त्वज्ञान विषयाचा प्राध्यापक झाला. १८८९ सालीं त्यानें सुधारणादी झेक पक्ष स्थापन केला, व १८९१ सालीं तो व्हिएन्ना येथील पार्लमेंटांत सभासद निवडून आला. त्या वेळीं झेक लोकांचे प्रांत ऑस्ट्रियन साम्राज्याचे प्रांत असल्यानें त्या साम्राज्यांतील प्रांतांचें संघराज्य बनवावें, अशी मागणी त्यानें केली. ऑस्ट्रियाचें त्या वेळचें धोरण जर्मनानुकूल आणि स्लाव्हविरोधी होतें. त्या धोरणाला मासारिकनें विरोध केला.

१९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यावर मासारिकनें आपली चळवळ अधिक व्यापक केली, आणि ऑस्ट्रियन साम्राज्य पूर्ण नष्ट करण्याचें ठरविलें. १९१५ सालीं ऑस्ट्रियाविरुद्ध लढण्याकरितां झेक लोकांची तयारी ठेवावी म्हणून तो इतर देशांत गेला, व लंडनमधील किंग्ज कॉलेजांत स्लाव्ह संशोधन विषयाचा प्राध्यापक झाला, आणि 'लहान लहान जमातींचा प्रश्न' या विषयावर त्यानें व्याख्यानें दिलीं. १९१६ सालीं फ्रान्समध्यें जाऊन ऑस्ट्रियाचे निरनिराळे लहान देश बनवले पाहिजेत, याबद्दल फ्रेंच सरकारची खात्री पटविण्याचा प्रयत्न त्यानें केला. १९१७ च्या रशियन राज्यक्रान्तीनंतर रशियांत जाऊन तेथें त्यानें झेकोस्लोव्हाक सैन्याची उभारणी केली. १९१८ च्या मार्चमध्यें अमेरिकेंत जाऊन त्यानें प्रेसिडेंट विल्सन यांचें मत ऑस्ट्रियन साम्राज्याचे तुकडे करण्यास अनुकूल बनविलें; त्यामुळें दोस्त राष्ट्रांनीं पॅरिस शहरांत झेकोस्लोव्हाक नॅशनल कौन्सिल स्थापून त्या कौन्सिलचा अध्यक्ष मासारिकला केलें. १९१८ च्या ऑक्टोबर १८ तारखेस मासारिकनें वॉशिंग्टनमधील कॅपिटोल इमारतीच्या पायऱ्यांवर उभे राहून झेकोस्लोव्हाकिया देश स्वतंत्र झाल्याचें जाहीर केलें, आणि त्या देशाचा पहिला अध्यक्ष या नात्यानें तो स्वदेशीं परत आला. अध्यक्षाच्या

पदावर १९२०,१९२८ व १९३४ अशा तीन सालीं तीन वेळां तो निवडून आला. झेक लोकांवर त्यानें प्राचीन दंतकथांतल्या-प्रमाणें अधिकार चालविला. १९३५ मध्यें प्रकृति बिघडल्यामुळें त्यानें अध्यक्षपदाचा राजीनामा दिला, आणि दोन वर्षांनींच ८७ व्या वर्षी तो मरण पावला.

मासारिक हा बुद्धिवादी आणि मानवतावादी (ह्युमॅनिस्ट) तत्त्ववेत्ता होता. त्यानें व्यावहारिक नीतिनियमांचा जोरदार पुरस्कार केला. त्याच्या मतावर अँग्लो-सॅक्सन तत्त्ववेत्त्यांच्या मतांचा परिणाम झालेला होता, आणि तो जर्मनींतल्या उच्च ध्येयवादी तत्त्वज्ञानावर आणि मार्क्सवादावर कडक टीका करीत असे. राजकारणांत तो लोकशाहीचा पुरस्कर्ता होता, आणि स्वदेशाची सुधारणा पाश्चात्य गोष्टींना पौरस्त्य वळण देऊन करावी, असें त्याचें मत होतें. तो बोहेमियन इव्हान्जेलिक चर्च ऑफ ब्रदर्स या संस्थेचा सभासद होता.

**मसूर**—एक धान्य. हें पीक पुरातन काळापासून हिंदुस्थानांत होतें. तसेंच युरोप व आशिया या खंडांत सर्वत्र आढळतें. मसुरेचें झाड फूट दीड फूट उंच वाढतें. पानें व शेंगा बारीक असतात. दाण्याचा व डाळीचा रंग शेंदरी असतो. संयुक्तप्रांतात व मद्रास इलाख्यांतहि याची बरीच लागवड करतात. दर एकरी सरासरी उत्पन्न ४००-५०० पौंड असतें. उच्च हिंदु वर्गांत मसूर निषिद्ध मानलेली आहे. पण गरीब लोकांत या धान्याचा आमटीसाठीं फार उपयोग होतो. गुजराथेंत याचें मोठें पीक आहे. मसूर सर्वज्वरनाशक आहे. ज्वरांत मसुराच्या कोंड्याचा धूप देतात.

**मसूरी**—संयुक्त प्रांत (उत्तर प्रदेश), डेहराडून जिल्ह्यातील एक थंड हवेचें ठिकाण. मनसुरी फळावरून हें नांव पडलें असावें. हें हिमालयाच्या पायथ्याशीं समुद्रसपाटीवर ६००० ते ७,५०० फूट उंचीवर वसलेलें आहे. याच्या पूर्वेस गंगा व पश्चिमेस यमुना नदी वाहते. लो. सं. सुमारें ७०००. हें इ. स. १८२६ त थंड हवेचें ठिकाण म्हणून प्रसिद्धीस आलें. स. १९०० पर्यंत येथें सहारणपूरहून गाडीवाटेनें (५८ मैल) जात असत. परंतु 'हरिद्वार-डेहरा' गाडीचा फांटा सुरू झाल्यापासून येथें जाणें सुलभ झालें. डेहराडूनहून मोटारीनें दोन तासांत जातां येतें. येथें युरोपियन व युरेशियन मुलांकरितां बऱ्याच शाळा असून दोनतीन इस्पितळेंहि आहेत.

येथें सृष्टिसौंदर्य फार अप्रतिम दिसतें. हिमालय दृष्टीस पडतो. येथून बरेच धबधबे पाहण्यास मिळतात.

**मॅसेडोनिया**—बाल्कन द्वीपकल्पांतील एक प्रदेश. बल्गेरियाच्या पश्चिम सरहद्दीपासून सालोनिकाच्या आखातापर्यंतचा भाग यांत मोडतो. पश्चिम मॅसेडोनिया हा डोंगराळ आहे. त्यांत तीन मोठीं तळीं आहेत. पूर्व मॅसेडोनियांत दोन मोठाली खोरीं आहेत; त्यांतून वरदा व स्त्रुमा या नद्यांचें पाणी खेळतें. मुख्य धंदा शेतीचा. लोखंड व मग्नेसाइट यांच्या खाणी आहेत, परंतु अद्याप त्या धंद्यांची विशेषशी वाढ झालेली नाहीं. सालोनिका व ॲड्रिआनोपल हीं दोन मोठीं शहरें आहेत. ख्रिस्तपूर्व ३५९ या कालानंतर फिलिप व अलेक्झांडर यांच्या वेळीं मॅसेडोनियाची बळकटी चांगलीच होती. सुमारें दोनशें वर्षें अर्ध्या ग्रीसवर मॅसेडोनियाचें वर्चस्व होतें. ख्रि. पू. १६८ या वर्षी रोमनें हा भाग जिंकला. नंतर त्यांत स्लाव्ह वगैरे लोकांची वस्ती होत गेली. इ. स. ८०० ते १००० च्या दरम्यान हा बल्गेरियन साम्राज्याचा एक भाग होता. मध्यंतरीं कांहीं काळ सुमारें एक शतकावधि सर्व्हियन सत्ताहि येथें नांदली व १६८९ च्या सुमारास तुर्कांची सत्ता या ठिकाणीं प्रस्थापित झाली. १८७५ ते १९०३ च्या दरम्यान ख्रिस्ती बल्गेरियन व तुर्क यांच्या दरम्यान नेहमीं झटापटी व बंडाळ्या होत. १९०३ सालीं मोठी कत्तल घडून आली. बाल्कन युद्धाच्या वेळीं मॅसेडोनिया हें रणक्षेत्रच होतें. १९१३ नंतर ग्रीस व सर्व्हिया यांच्यामध्यें तो विभागला गेला. १९१४ मध्यें महायुद्ध सुरू झालें तेव्हां सालोनिका येथें दोस्त सैन्य पाठविण्यांत आलें होतें. त्या वेळीं बल्गेरियाचा पराभव झाला आणि १९१९ मध्यें ग्रीस व युगोस्लाव्हिया यांच्यांत मॅसेडोनिया वांटून देण्यांत आला. ग्रीसमध्यें मॅसेडोनियाचें क्षे. फ. १३,३६० चौ. मै. असून लो. सं. १६,८६,४७९ आहे. युगोस्लाव्हियांत २६,४९४ चौ. किलोमीटर इतका मॅसेडोनियाचा मुलूख आहे व लो. सं. ९,४९,९५८ आहे.

**मस्कत**—अरबस्तानच्या आग्नेय किनाऱ्यावर हें शहर वसलेलें असून मस्कत आणि ओमान या स्वतंत्र राज्याची राजधानी आहे. मस्कतचें बंदर गोदर हें ब्रिटिशांच्या ताब्यांत असून हिंदुस्थान-इराणच्या विद्युत्-संदेशाचें तेथील ठाणें इंग्रजांच्या हातीं आहे. येथें ब्रिटिश पोस्ट व तार ऑफिस आहे. जमिनीच्या बाजूनें स्वाऱ्या होऊं नयेत म्हणून भिंत घातलेली असून भिंतीवर मनोरे बांधलेले आहेत. समुद्राच्या बाजूला दोन मोडके किल्ले आहेत. खजुराची मोठ्या प्रमाणावर निर्गत होते. मस्कती डाळिंबें हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत. स. १५०८ पासून सतराव्या शतकाच्या मध्यापर्यंत मस्कत पोर्तुगीजांच्या ताब्यांत होतें. त्यानंतर बरींच स्थित्यंतरें होऊन अठराव्या शतकांत येमेनाइट घराण्यातील अहमद बीन सय्यदाच्या हातीं हें पडलें. याचेच वंशज आज सुलतान म्हणून येथें (ओमेन प्रांतावर) राज्य करीत आहेत.

पूर्वी मस्कतला मोठा व्यापार असे. पण आतां तो जवळच्या मात्रा गांवाकडे वळलेला आहे. मस्कतची लो. सं. ४,२०० आहे. तर मात्राची याच्या दुप्पट आहे.

मस्कत संस्थानचें क्षे. फ. ८२,००० चौ. मै. असून लो. सं. पांच लाखांवर आहे. मुख्य वस्ती अरबांची आहे. किनाऱ्यावर तुरळक नीग्रो लोक आढळतात. येथील हवा फार उष्ण आहे.

**मस्तकसामुद्रिक**— ( फ्रेनॉलॉजी ). डोक्याच्या रचनेवरून बुद्धीची परीक्षा करण्याची एक विद्या. गेल्या शतकांत गाल आणि स्पुर्झीम यांनीं या विद्येचा मोठा शोध लावून प्रसार केला. बौद्धिक किंवा भावनात्मक असे डोक्याचे ४२ विभाग पाडलेले असतात व त्या त्या ठिकाणच्या उंचवट्यांवरून बुद्धीची किंवा भावनेची उपस्थिति अजमावतात. इंग्लंड आणि अमेरिका या देशांतून या विद्येला कांहीं काळ मोठें प्रोत्साहन मिळालें होतें.

सर्व शारीरशास्त्रज्ञांनीं या विद्येला अगदीं कमी लेखलें आहे. कारण मेंदूच्या ठेवणीवर जो या विद्येचा आधार तोच मेंदू सामुद्रिक मानतात तसा नाहीं. मनुष्याचा स्वभाव किंवा शील डोक्यावरील उंचवट्यांवरून निश्चित करता येणार नाहीं. तेव्हां या विद्येला शास्त्राइतकें महत्त्व देतां येणार नाहीं. हस्तसामुद्रिकाप्रमाणें ही एक अनुमानविद्या म्हणतां येईल.

**मस्तानी** ( मृत्यु १७४० )—ही पहिला बाजीराव पेशवा याची रक्षा असून हिला बाजीरावापासून झालेला समशेरबहाद्दर नांवाचा मुलगा होता. बाजीरावास ही राजा छत्रसालाकडून किंवा निजामाकडून मिळाल्याच्या कथा सांगतात. हिची जातहि नक्की कळलेली नाहीं. ही फार स्वरूपसुंदर असून हिच्यामुळें बाजीराव पूर्णपणें प्रेमांध व विलासी बनला. हिचें मद्यप्राशनाचें व्यसन बाजीरावासहि जडलें. नृत्य व संगीत या कलांत ही प्रवीण होती. मात्र ही शेवटपर्यंत बाजीरावाशीं एकनिष्ठ राहिली. समशेरबहाद्दर व त्याचे वंशज पेशव्यांशीं शेवटपर्यंत असेच एकनिष्ठ होते. बाजीरावानें हिच्या राहण्याची सोय शनवारवाड्यांतच स्वतंत्र जागा बांधून केली होती. त्या (उत्तर) बाजूच्या दरवाजास अद्यापिहि 'मस्तानी दरवाजा' असें नांव आहे. बाजीरावाचा भाऊ चिमाजी आप्पा, आई राधाबाई व मुलगा नानासाहेब यांनीं अनेक युक्त्या व कारस्थानें करून हिच्यापासून बाजीरावास दूर करण्याचे प्रयत्न केले. परंतु ते निष्फळ ठरले. छत्रपति शाहूनें परिस्थिति ओळखून बाजीरावाला न दुखविण्याचा त्यांना सल्ला दिला. हिचा वंश बांदा संस्थानांत राज्य करीत आहे. पाबळ, केंदूर हीं गांवें हिला इनाम होतीं. बाजीरावाच्या पश्चात् ही लवकरच मृत्यु पावली. पाबळला हिची कबर आहे.

**मस्तिष्ककृच्छ्रमांद्य**—( एन्सेफॅलिटिस लेथार्जिका ). याला निद्रालु रोग असेंहि म्हणतात. १९१७ सालीं ऑस्ट्रियामध्यें या मज्जातंतुकेंद्रव्यूहास होणाऱ्या सांसर्गिक रोगाची सांथ उत्पन्न होऊन ती हळूहळू पश्चिमेकडे पसरत गेली व १९१९ मध्यें अमेरिकेंत पसरली. याच सांथीचा कदाचित् उद्भव १७१२-१३, १८४६,१८८९-९० मध्येंहि झाला असावा. या रोगामध्यें थोडासा ताप येऊन डोकें दुखूं लागतें व आळस येतो व क्वचित् झोंप लागत नाहींशी होते आणि त्यापासून पक्षघाताचे निरनिराळे प्रकार, विशेषतः डोळ्यांच्या स्नायूंस पक्षघाताचा विकार होतो. या रोगाचा उद्भव झाल्यापासून बहुधा तीन आठवड्यांत मृत्यु येतो. या रोगांतील मृत्यूचें प्रमाण २५ टक्के आहे. या रोगांतून रोगी उठला तरी कांहीं दिवस त्याच्या मनावर या रोगाचा परिणाम राहतो. परंतु तो कायमचा टिकत नाहीं.

**मस्तिष्करज्जु ज्वर**—( सेरेब्रो-स्पायनल फीव्हर ). हा एक संसर्गजन्य सांथीचा रोग आहे. यामध्यें शेंकडा ५० ते ७० पर्यंत मृत्यू होतात. या रोगाचा प्रादुर्भाव झाल्याबरोबर ४८ तासांपर्यंत त्याचें स्वरूप तीव्र असून त्यांत मृत्यु येण्याचा संभव फार असतो. जर इतका तीव्र रोग नसेल तर मृत्यु येण्याचा संभव कमी असतो. याचीं लक्षणें म्हणजे ओकारी येणें, डोकें दुखणें, मान ताठ होणें, आंचके येणें, ताप येणें, झोंप न लागणें, व चिडखोर बनणें हीं असून यांमध्यें अंगावर रक्ताच्या पुटकुळ्या किंवा डाग उठतात. यावर पृष्ठवंशामध्यें औषध टोंचून देण्यांत येतें व त्यानें गुण येतो.

**मस्तिष्काघात**—( कॉन्कशन ऑफ दि ब्रेन ). डोक्यावर एखादा आघात झाला असतां किंवा मनुष्य पडला असतां प्रत्यक्ष डोक्याची कवटी फुटली नाहीं तरी तीव्र दाब पडल्यामुळें मेंदूस इजा होते. त्यामुळें हा रोग उत्पन्न होतो. या रोगांत बेशुद्धि येणें, ग्लानि येणें, श्वासोच्छ्वास करतांना अडचण वाटणें, व नाडी बरोबर न चालणें हीं प्राथमिक लक्षणें होतात व हीं जरी हळूहळू कमी झालीं तथापि पुढें मेंदूचा दाह होण्याचा संभव असतो.

**मस्तिष्कावरणदाह**—( मेनिन्जायटिस ). हा रोग कांहीं जंतूंच्या संसर्गामुळें मेंदूवरील आवरणामध्यें अथवा पृष्ठवंशरज्जूमध्यें दाह उत्पन्न झाल्यामुळें होतो. या रोगाचे चार प्रकार आढळतात : १. पूयुक्त ( सेप्टिक )-यामध्यें प्रथम लक्षणें, डोकेंदुखी, ग्लानि, तापाची कणकण, नाडी जोरानें उडणें, अनियमित श्वासोच्छ्वास, वगैरे असतात. या प्रकारांत रोगी बरा होण्याचें प्रमाण फारच थोडें असतें. २. स्रावी ( सेरस )-याचीं लक्षणें बहुतेक वरच्यासारखींच असतात. परंतु जरा कमी

तीव्र असतात. ३. क्षययुक्त (ट्युबरक्युलस)–हा लहान मुलांत फार आढळतो व याचा प्रादुर्भाव मंद गतीनें होतो. याची मुदत ६ ते ८ आठवडे असते. आणि यांतून रोगी क्वचितच बरा होतो. ४. पृष्ठवंशमज्जातंतुगत (सेरेब्रोस्पायनल)—मस्तिष्क-रज्जुज्वर पाहा.

गेल्या महायुद्धांत असें दिसून आलें कीं, लष्करी बराकींत अतिशय गर्दी झाली कीं हा रोग उद्भवे व शिपायांचीं अंथरुणें लांब लांब घातलीं कीं रोग कमी होई.

**महबूबनगर**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. कृष्णा व भीमा या यांत मुख्य-नद्या आहेत. या जिल्ह्यांत मोठें जंगल आहे. पाऊस सरासरी ३४ इंच पडतो. एके काळीं हा मुलूख वरंगळच्या राजांच्या ताब्यांत होता. पुढें तो बहामनी राज्यांत मोडूं लागला. १८ व्या शतकांत जेव्हां निजामशाहीची स्थापना झाली तेव्हां त्या राज्यांत या जिल्ह्याचा अंतर्भाव झाला. जिल्ह्याची लो. सं. सु. आठ लक्ष असून ११८३ गांवें आहेत. मुख्य गांवें नारायणपेठ व महबूबनगर. एकंदर वस्तींत शें. ६७ हिंदू आहेत. ज्वारी, हरभरा, जवस, भात, तीळ, एरंडी हीं मुख्य पिकें असून या जिल्ह्यांत रयतवारी पद्धत आहे. नारायणपेठचीं लुगडीं, साड्या व धोतरें पूर्वीपासून प्रसिद्ध आहेत. शें. ३३ लोक साक्षर आहेत. जिल्ह्यांत तलाव पुष्कळ आहेत. वनपर्ती जहागीर याच जिल्ह्यांत आहे.

**महंमद** (पैगंबर) (५७०–६३२)—इस्लामी संप्रदायाचा संस्थापक. हा अरबवंशीय असून याचा जन्म इ. स. ५७० या वर्षाच्या सुमारास झाला असावा. याचा जन्म पित्याच्या मृत्यूनंतर झाला व त्याची माताहि लवकरच त्यास एकटा टाकून मृत झाली. तेव्हां त्याचें पालनपोषण त्याच्या चुलत्यानें केलें. मोठा झाल्यावर तो उंट व मेंढ्या राखीत असे. त्यानें व्यापाराकरितां एकदोन सफरीहि केल्या होत्या. याचा ५९५ या सालीं एका श्रीमंत विधवेबरोबर विवाह झाला. ६१० सालापासून यानें ईश्वराचे प्रेषित म्हणून आपल्या धर्मप्रचारास सुरुवात केली. तो एका गुहेमध्यें कांहीं दिवस राहत असे व त्या ठिकाणीं त्याला गेब्रिएल या देवदूताचा साक्षात्कार झाला. महंमदानें मूर्तिपूजेचा धिक्कार केला व परमेश्वर एक असून तो श्रेष्ठ आहे, म्हणजे परमेश्वर अल्ला असून महंमद हा त्याचा पैगंबर आहे अशी शिकवण देण्यास आरंभ केला. प्रथम तो व त्याचे अनुयायी यांस लोकांनीं त्रास दिला. त्याची पत्नी मरण पावली व सन ६२२ मध्यें तो मक्केहून मदिनेस पळून गेला. तेथें त्यानें आपल्या नवीन संप्रदायाची स्थापना केली व तेथून धर्मयुद्धास प्रारंभ झाला. त्यानें मोठें सैन्य उभारून विजय मिळविले व सन ६३० मध्यें मक्केमध्यें पुन्हां विजयी वीर म्हणून प्रवेश केला. नंतर त्यानें सर्व अरबस्तान देश पादाक्रांत केला. सन ६३२ मध्यें तो मरण पावला. त्याची कबर मदिना (पाहा) येथें आहे. त्यानें अयेषा हिच्याशीं व आणखी कांहीं स्त्रियांशीं विवाह केला होता, परंतु त्यास पुत्रप्राप्ति झाली नाहीं. अयेषेस फातिमा नांवाची मुलगी झाली. तिचा अलीशीं विवाह झाला. महंमदाचीं सर्व वचनें एकत्र करण्यांत आलीं व त्यांवरून कुराण या ग्रंथाची रचना करण्यांत आली (कुराण पाहा). याचे सर्व जगभर लाखों अनुयायी आहेत (मुसलमान पाहा).



**महंमद अली, मौलाना** (१८७८–१९३०)—हिंदुस्थानांतील एक मुसलमान पुढारी. यांचें शिक्षण रामपूर संस्थानी शाळा, बरेली हायस्कूल, अलीगड कॉलेज व लिंकन कॉलेज, ऑक्सफर्ड येथें झालें. पुढें रामपूर संस्थानांत प्रमुख शिक्षणाधिकारी (१९०२–३) व बडोदें सरकारच्या नोकरींत (१९०४–१०) होते. 'कामरेड' या इंग्रजी साप्ताहिकाचे (१९११–१४) व 'हमदर्द' या ऊर्दू दैनिकाचे (१९१३–१५) संपादक व संचालक होते. भारत संरक्षण कायद्याखालीं महरौली, लॅन्सडाउन व छिन्दवाडा (१९१५–१९) येथें स्थानबद्ध व (जून ते डिसेंबर १९१९) बैतुल तुरुंगांत अटकेंत होते. १९२० सालीं विलायतेस गेलेल्या खिलाफत शिष्टमंडळाचे प्रमुख होते. १९०६ सालीं अखिल भारतीय मुस्लिम लीग, १९१३ सालीं खुदम-इ-काबा सोसायटी व १९२० सालीं नॅशनल मुस्लिम युनिव्हर्सिटी (अलिगड) स्थापन केली. हे मुसलमान समाजाचे पुढारी असून खिलाफत चळवळीचे प्रमुख होते. हे १९२३ सालच्या काकीनाड येथील राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १९३० सालीं विलायतेस गोलमेज परिषदेस गेले असतां तेथेंच वारले.

खिलाफत प्रकरणापासून हे कॉंग्रेसमध्यें शिरले होते, व म. गांधींचे उजवे हात बनले होते. पण शेवटीं ते लीगशीं निगडित होऊन कॉंग्रेसला विरोध करूं लागले. यांचे बंधु शौकतअली यांचेंहि असेंच मतपरिवर्तन झालें होतें.

**महंमद आदिलशहा** (राज्य १६२६–५६)—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील एक कर्तबगार व यशस्वी राजा. इब्राहिम आदिलशहाचा हा मुलगा गादीवर येतांच यानें सुलेमानास कैद करून शहाजादा दर्वेशचे डोळे काढले. निजामशहानें याजवर आपला कारभारी फत्तेखान यास पाठवलें असतां यानें त्याचा पराभव केला. मुरार जगदेव (पाहा) नांवाच्या सरदाराच्या साहाय्यानें यानें शहाजींच्या ताब्यांत असलेला आदिलशाहीचा मुलूख परत मिळवला. शहाजहान बादशहानें यास आपलें मांडलिकत्व कबूल करण्याबद्दल लिहिलें असतां यानें युक्तीनें त्याचें मन वळवून त्याच्याशीं मित्रत्वाचें नातें जोडलें. मुल्ला नहुर बीन मुल्ला नहुरी

नामक एका मुसलमानाकडून यानें आपल्या कारकीर्दीचा एक तारीखवार ग्रंथ लिहून घेतला. तो ग्रंथ 'महंमदनामा' या नांवानें प्रसिद्ध आहे. यानें प्रजेच्या हिताकडे लक्ष ठेवून अनेक लोकोपयोगी सुधारणा अमलांत आणल्या. आपल्या आयुष्यांत यानें अनेक विलास व चैन उपभोगली.

**महंमद तुघ्लक** (१३२६-१३५१)— दिल्लीचा एक बादशहा. याचा बाप घियासुद्दिन तुघ्लक यानें यास 'उलूघखान' असा किताब दिला होता. यास आपल्या बापाच्या तख्तावर बसण्याची फार हांव सुटल्यानें यानें घियासुद्दिन तुघ्लक हा बंगालच्या मोहिमेवरून परत येत असतां त्याचा निजामुद्दिन अवलियाच्या संमतीनें सन १३०१ मध्यें खून केला. यानंतर आपल्या देखण्या व लोकप्रिय भावाचाहि त्यास ठार करून यानें कांटा काढला. सन १३२६ मध्यें बहाउद्दिन गुरुशास्पा नामक याच्या बहिणीच्या मुलानें सागरकडे बंड केलें असतां यानें तें मोडून त्यास त्याच्या अंगाचें कातडें सोलून अति अमानुषपणें ठार केलें व त्याचें मांस त्याच्या बायकामुलांकडे पाठवून आपल्या क्रौर्याची कमाल मर्यादा गांठली. गुरुशास्पाच्या बंडामुळें आपली राजधानी आपल्या राज्याच्या मध्यावर असावी म्हणजे सर्व राज्यावर व्यवस्थित देखरेख ठेवतां येईल असें यास वाटल्यानें यानें देवगिरी शहरास दौलताबाद असें नांव देऊन तेथें आपली राजधानी नेली. सन १३२८ मधील सुलतानचा सुभेदार मलीक ऐचा किश्लूखान यानें उठवलेली बंडाळी, सन १३२९ मध्यें मोंगलांनीं लाहोरवर केलेला हल्ला, तसेंच अयोध्येच्या सुभेदारानें केलेलें बंड, या सर्व आपत्तींचा यानें बीमोड केला. राज्यांत नाण्यांसाठीं सोन्यारुप्याचा तुटवडा आल्यानें यानें तांब्याचीं नाणीं पाडलीं. पण या नाण्यांस परदेशांत मुळींच किंमत नसल्यानें याच्या राज्यांत सगळीकडे अंदाधुंदी माजली. याच वेळीं याच्या राज्यांत दुष्काळानें कहर माजविला. या अडचणींतून पार पडण्यासाठीं यानें शेतीच्या वाढीसंबंधींची एक योजना आंखली. 'अमीर-इ-कुही' या नांवानें यानें या योजनेवर एका अधिकाऱ्याची जागा निर्माण केली. याच्या योजनेनुसार १८०० चौरस फुटांचा एक असे जमिनीचे विभाग पाडण्यांत येऊन त्यांत एक तसूभरहि जागा नापेर न राहावी अशी व्यवस्था करण्याचे प्रयत्न सुरू झाले. दरसाल जितकें जास्तींत जास्त धान्य पिकवतां येईल तितकें पिकवावयाचें या दृष्टीनें या योजनेची वाढ करण्यांत आली. या वेळीं याच्या हुकुमांची अमलबजावणी विशेष कडक रीतीनें केली जाई. चीन देशावर स्वारी करण्यासाठीं पाठवलेल्या याच्या एक लाख सैनिकांपैकीं फक्त दहाच लोक परत आले. बाकीचे वाटेंतील थंडीमुळें मरण पावले. यानें आपल्या कारकीर्दींत राज्यसुधारणेसाठीं जरी अनेक योजना आखल्या होत्या तरी त्या याच्या हेकड व क्रूर स्वभावामुळें यास नीट तडीस नेतां आल्या नाहींत. उलट त्यामुळें लोकांचे हालच झाले. खोल ज्ञानाच्या अभावामुळें यास कोणतीहि योजना साधली नाहीं. म्हणून यास 'वेडा महंमद' किंवा 'अचाट कल्पनांचा पुरुष' असे म्हणतात. सिंधच्या स्वारीवर निघाला असतां ठठ्ठा येथें हा मृत्यु पावला.

**महंमद बीन कासिम**—बगदादचा वलीद खलिफा याचा हा मुसलमान सेनापति. या खलिफाच्या राज्याची हद्द सिंधच्या उत्तर भागावर राज्य करणाऱ्या दाहीर नामक राजाच्या मुलुखास जोडून येत होती. त्यामुळें खलिफा व ब्राह्मण राजा दाहीर यांच्यांत वाद सुरू झाले. याचा निकाल लावण्यासाठीं खलिफानें कासिमला सैन्यानिशीं दाहीरवर पाठवलें (७१२). यानें प्रथम देवल येथील देवालय काबीज करून तेथील लोकांनीं डोकीं उडवलीं व नंतर तो दाहीरवर चाल करून गेला. यानें लढाईंत दाहीरचा पराभव करून त्याचा प्रदेश काबीज केला व त्याच्या दोन मुली सूर्यदेवी, व परमलदेवी यांना खलिफांकडे पाठवलें. (दाहीर पाहा.) या दोन्ही मुली सुंदर असल्यानें खलिफानें यांपैकीं सूर्यदेवीजवळ निका लावण्याचें बोलणें काढलें. तेव्हां सूर्यदेवीनें त्यास "महंमदानें आम्हांस भ्रष्ट केल्यानें आम्ही दोघीहि आपल्या राण्या होण्यास अपात्र आहोंत," असें खोटेंच सांगितलें. तेव्हां खलिफास महंमदाचा अतिशय संताप येऊन त्यानें त्यास देहान्ताची शिक्षा दिली. अशा प्रकारें या मुलींनीं खलिफास महंमदाविषयीं खोटेंच सांगून आपलें शील राखलें व आपल्या बापाचा पराभव करणाऱ्याचा सूड उगवला. पुढें खलिफास या मुलींची लबाडी उघड होतांच त्यानें या मुलींचा वध केला.

**महंमदाबाद**—मुंबई, खेडा जिल्ह्याचा एक तालुका. क्षे. फ. १७१ चौ. मै.. लो. सं. (१९४१) ८१,७१८. यांत ५९ खेडीं आणि महंमदाबाद व खेडा हीं दोन मोठीं गांवें आहेत. महंमदाबाद गांव या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. महंमदाबाद गुजराथचा महमूद बेगडा यानें इ. स. १७४९ मध्यें वसविलें. नंतर तिसऱ्या महमुदानें (१५३७-५४) येथें मृगयाभूमि तयार करून तिच्या चारहि कोपऱ्यांवर महाल बांधले. लो. सं. सुमारें ६,०००.

**महमुदाबाद इस्टेट**—संयुक्त प्रांत. ही एक तालुकदारी मिळकत सितापूर, बार, बंकी खेडी व लखनौ जिल्हा यांत आहे. क्षे. फ. ३९७ चौ. मैल आहे. येथील तालुकदार मुसलमान जातीचे आहेत. त्यांचा मूळ पुरुष नसरुल्ला हा होता. नंतर महंमद अमीर हसनखान यास तालुकदारी मिळाली. यानें फार लोकोपयोगी

कामें केलीं म्हणून यास राजा हा किताब व के. सी. आय. ई. ही बहुमानाची पदवी बादशहाकडून मिळाली. सध्यांचे महमुदाबादचे राजे सर अली महमदखान कांहीं काळ संयुक्त प्रांताचे गृहमंत्री असून एक जुने प्रसिद्ध मुसलमान पुढारी होते.

**महमूद गझनवी** (९६७-१०३०)—गझनीचा महत्त्वाकांक्षी सुलतान. सबक्तगिनाचा हा दासीपुत्र. हिंदुस्थानवर पंचवीस वर्षांत एकसारख्या यानें अकरा स्वाऱ्या केल्या व सर्व पंजाब प्रांत आपल्या अमलाखालीं आणून सन १०२४ मध्यें यानें प्रसिद्ध सोरटी सोमनाथावर स्वारी केली व तेथील अपार द्रव्य लुटलें. इराणवरहि याची स्वारी झाली. यानें इतकी संपत्ति मिळवली कीं, मरतेसमयीं या संपत्तीचें शेवटचें दर्शन घेत असतां यास रडूं कोसळलें म्हणतात. पैशाचा हा अतिशय लोभी असे, पण यास विद्येचीहि तितकीच आवड असून यानें अनेक पुस्तकालयें, पदार्थसंग्रहालयें उघडून विद्यावृद्धीस वाव दिला. तसेंच विद्वानांनाहि आश्रय दिला. विद्वान् मंडळींच्या उत्तेजनार्थ यानें तीस लाख रुपये मंजूर केले होते. हिंदुस्थानावरील याच्या सततच्या स्वाऱ्यांमुळें मुसलमानांना हिंदुस्थानची वाट पूर्ण परिचयाची झाली व त्यांच्यांत हिंदुस्थानवर आपला अमल बसविण्याची हांव निर्माण झाली. सन ९९८ मध्यें यानें आपणांस 'सुलतान' ही पदवी धारण केली. मधुमेहाच्या विकारानें ता. ३० एप्रिल सन १०३० रोजीं हा मरण पावला. (गझनी पाहा).

**महमूद गवान** (१४०३-८१)—बेदरच्या बहामनी राज्यांतील एक लोकहितदक्ष, निःस्वार्थी व एकनिष्ठ प्रधान. मूळचा हा इराणच्या राजघराण्यांतील होता. हा युद्धकुशल, परोपकारी व निःपक्षपातीपणानें प्रजेच्या हितास जागणारा असल्यानें यानें सर्वांकडून वाहवा मिळवली. आपल्या अगणित संपत्तीचा व्यय यानें गोरगरिबांना दानधर्म करण्यांत केला. याच्या अपूर्व गुणांमुळें हुमायूनच्या कारकीर्दींत यास 'मलिक-उत्-तुजार' ही पदवी मिळाली. तसेंच बहामनी राजा मुहम्मदशहा यानें यास 'खाजेखान' हा किताब देऊन याचा गौरव केला. हा कवि असून याच्या कवितांपैकीं 'रोझन-उल्-इनशा' ही कविता विशेष प्रसिद्ध आहे. यानेंच विजापूरचें राज्य स्थापन करणाऱ्या युसफ आदिलशहास एका व्यापाऱ्याकडून विकत घेतलें होतें. याच्या पश्चात् युसफ यासच बहामनी राजानें विजापूरचा सुभेदार नेमलें. महमूदनें बेदर येथें एक पाठशाळा बांधली. जोहर नांवाच्या हबशी गुलामानें महमूदशहा (बहामनी) याच्या आज्ञेवरून याचा खून केला.

**महमूद बेगडा** (१४५८-१५११)—गुजराथचा एक सुलतान. यानें गुजराथच्या इतिहासांत एक पराक्रमी व जुलमी राजा म्हणून नांव मिळविलें. ह्यास बेगडा असें टोपणनांव होतें. यानें स. १४६१ त माळव्याच्या राजापासून बहामनी राज्याचें संरक्षण केलें. पुढें (१४६८) त्यानें सौराष्ट्रावर स्वारी करून पुष्कळ प्रांत काबीज केला. पुन्हां एकदां हिंदु लोक बाटविण्यासाठीं त्यानें सौराष्ट्रावर स्वारी केली. गिरनारच्या राजानें आपल्या प्रजेस उपद्रव न होऊं देण्याबद्दल फार प्रयत्न केले. तेव्हां महमुदानें राजासच बाटवून मुसलमान केलें. अहमदाबादप्रमाणें जुनागड शहरास सुलतानच्या वास्तव्यामुळें नवीन वैभव प्राप्त झालें. जुनागडहून कच्छ, सिंध, बलुचिस्तान यांपर्यंत महमुदानें स्वाऱ्या केल्या. त्यानें हिंदूंस छळून अनेकांस जबरदस्तीनें मुसलमान केलें. द्वारका, खंबायत, सुरत, वगैरे ठिकाणीं चांचे लोकांचा विशेष उपद्रव असे. तो महमुदानें नाहींसा केला. या वेळच्या गुजराथेंतील प्रसिद्ध इमारती बहुतेक याच्याच वेळच्या आहेत. अहमदाबादेनजीक यानें महमुदाबाद म्हणून एक शहर वसविलें.

**महाकाव्य**—एखादी मोठी अचाट घटना, मोठ्या उदात्त आणि भारदस्त रीतीनें ज्यांत वर्णिलेली असते तें काव्य. जगांतील अत्यंत थोर महाकाव्यें म्हणजे होमरकृत 'ईलियड' आणि 'ओडिसे'; व्हर्जिलचें 'ईनीड'; जर्मन 'निबेलुंगेनलिएड'; 'बेवुल्फ' हें आंग्लो-सॅक्सन काव्य; फ्रेंचांचें 'सॉंग ऑफ रोलेंड'; जर्मन डान्टेचें 'डिव्हिना कॉमिडिआ'; इटालियन टासोचें 'जेरुसालेम लिबर्टी' व आरिओस्टोचें 'ओरलँडो फ्युरिओसो'; इंग्रज मिल्टनचें 'पॅरॅडाइज लॉस्ट'; व स्पेन्सरचें 'फेरी क्वीन'; पोर्तुगीज कॉमोएन्सचें 'लुसिआद्स्'; इराणच्या फिर्दुसीचा 'शाहनामा'; इ. भारतीयेतर महाकाव्यें होत. संस्कृत वाङ्मयांत रामायण आणि महाभारत हीं महाकाव्यें सर्वश्रुतच आहेत. आजच्या देशी भाषांतून महाकाव्याच्या दर्जाला शोभेसे ग्रंथ नाहींत, याला अनेक कारणें आहेत. महाकाव्यांत अपेक्षित असणाऱ्या अचाट अद्भुतरम्य कल्पना व दीर्घरचना हीं आजच्या सुधारलेल्या व वास्तववादी जगाला मानवणारहि नाहींत. पण आज 'शौर्ययुग', जें जुन्या काव्याला लागत असे तें गेलें असलें तरी 'संघर्षयुग' आहेच. महायुद्धें, जातिकलह, देशविभागणी, वगैरे विषय घेऊन मोठें लांबलचक काव्य करतां येणार नाहीं असें नाहीं. पण त्याची पूर्वीप्रमाणें चहा होणार नाहीं.

**महाचोहन**—चोहन ह्या नांवाचा बहुशः चव्हाण या शब्दाशीं संबंध असून 'श्रेष्ठविभूति' असा त्याचा अर्थ असावा. पृथ्वीवरील जीवांची उत्क्रांति नीट व्हावी म्हणून जो सिद्ध

ऋषिसंघ त्या उत्क्रान्तीचीं सूत्रें इतिहासाच्या पडद्यामागून हलवीत असतो, त्या ऋषिसंघांतल्या एका गादीला महाचोहन असें थिऑसफी पंथीय म्हणतात. असें समजतें कीं, पूर्वी या नांवाचा वेगळा अधिकार नसून तो अधिकार चालविणारी वेगळी व्यक्ति अधिकारारूढ नसे. पण हल्लीं या गादीवर एक स्वतंत्र व्यक्ति असते. मनु व बोधिसत्त्व या अधिकाराचा जो दर्जा तोच महाचोहनाचा आहे. मनूकडे मानववंशस्थापना व राष्ट्रांचे उदयास्त हें खातें असतें; बोधिसत्त्वाकडे धर्म व शिक्षण हें खातें असतें; व मानवी उद्योगाचीं इतर खातीं महाचोहनाच्या अधिकारांतील असतात. सध्यांचे महाचोहन वंशानें हिंदू आहेत.

**महाजन, गोविंद विठ्ठल** ( १८१५–९० )—एक जुने मराठी ग्रंथ-प्रकाशक. यांच्या घराण्याचें जुनें आडनांव कुंटे होय. मुंबई येथील अगदीं पहिल्या 'दर्पण' नांवाच्या वृत्तपत्राचे हे कर्ते होते. यांनीं 'दिग्दर्शन' नांवाचें एक शास्त्रीय विषयांचें मासिक, पुढें 'प्रभाकर' व 'धूमकेतू' नांवाचींहि पत्रें, नंतर 'ज्ञान-दर्पण' नांवाचें त्रैमासिक चालविलें होतें. शिवाय 'उपदेशचंद्रिका' नांवाचेंहि एक मासिक यांनीं चालविलें होतें. यांचें एक पुस्तक म्हटलें म्हणजे 'शब्दसिद्धि निबंध' होय.

**महाज्वरांकुश**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, वचनाग, धोत्र्याचें बीं, व सुंठ, मिरे, पिंपळी, हीं मुख्य औषधें असून आल्याच्या रसांत खल करतात. पाळीच्या व थंडी वाजून येणाऱ्या तापावर हें एक महत्त्वाचें औषध आहे. एक, दोन, तीन, अगर चार दिवसांनीं येणाऱ्या तापावर या औषधाचा चागला उपयोग होतो. अंग अतिशय दुखणें, सांधे ठणकणें, चक्कर येणें, ओकाऱ्या होणें, इत्यादि लक्षणें असतांना या औषधाचा उपयोग करावा. १ ते २ गुंजा आल्याचा रस, किंवा तुळशीचा रस, यांत देतात.

**महाड**—मुंबई, कुलाबा जिल्ह्यांतील दक्षिणेकडील एक तालुका. याचें क्षे. फ. ४६० चौरस मैल व लो. सं. ( १९४१ ) १,२८,६९५ आहे. यांत २४५ खेडीं असून तालुक्याचें मुख्य ठिकाण महाड आहे. तालुक्यांतून सावित्री नदी वाहत जाते. पावसाचें मान १३४ इंचांपर्यंत असतें. महाड गांव सावित्री नदीच्या उत्तर किनाऱ्यावर असून अलिबागपासून ५३ मैल दूर आहे. लो. सं. सुमारें ८ हजार आहे. मोठी भरती आली म्हणजे नावा महाडपर्यंत येतात. महाडच्या वायव्येस २ मैलांवर बौद्धांचीं लेणीं आहेत. शिवाजीची राजधानी रायगड येथून जवळच ( ८ कोस ) आहे. दुसरा बाजीराव, नाना फडणवीस व इंग्रज यांच्यामध्यें १७९६ सालीं येथें तह झाल्यावरून बाजीरावाला पेशवाई मिळाली. महाडचा दर्याग्यापार फार मोठा होता. येथें १८६६ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें एक हायस्कूल आहे.

**महाडिक**—एक मराठे सरदार घराणें. इतर मराठे घराण्यांप्रमाणेंच महाडिक ह्यांचें घराणें जुनें असून तें कोकणांत महाड येथें राहूं लागल्यावर त्यास महाडिक असें म्हणूं लागले. शिवाजीनें स्वराज्यासाठीं स्वतंत्र उद्योग सुरू केल्यावर महाडिक शिवाजीस सामील झालें आणि महाडिकांचा व शिवाजीचा लोभ जडला. परसोजी हा कर्नाटकांत शहाजीस साहाय्य करीत असतां मरण पावला. परसोजीचा मुलगा हरजीराजे ह्याच्यावर शहाजीची मर्जी विशेष होती. शिवाजीनें १६६८ च्या सुमारास आपली मुलगी हरजीराजे ह्यास दिली. तो कर्नाटकांत रघुनाथ नारायण हणमंते याच्याजवळ राहून तिकडील प्रांताचा बंदोबस्त करी. हरजी, गणोजी शिर्के व महादजी निंबाळकर हे शिवाजीचे तिन्हीहि जांवई राज्याच्या चांगले उपयोगी पडले. हरजीराजे कर्नाटकांत जिंजीच्या सुभेदारीवर पुष्कळ वर्षें होता. जिंजीच्या वेढ्यांत हरजीराजे मृत्यु पावला ( १६९४ ). धाकट्या शाहूजवळ दुर्गोजी व कुशाबा नांवाचे महाडिक सरदार होते.

**महादजीपंत पुरंदरे** ( मृत्यु १७६० )—सन १७४० ते १७५० या कालांतील पेशव्यांचा एक मुतालीक. अंबाजीपंताचा हा दुसरा मुलगा. नानासाहेबाच्याबरोबर हा नेहमीं स्वारीस जात असे. निजामावरील स्वारींतील याचें युद्धकौशल्य जाणून नानासाहेबानें यास फौजेंत सरदारी दिली. सन १७५० मध्यें सखारामबापूच्या मसलतींत यानें भाग घेतला होता. परंतु पुढें याचें मत पालटलें. नीळकंठ नांवाचा यास एक मुलगा होता.

**महादजी शिंदे** ( १७२७–१७९४ )—प्रसिद्ध मराठा वीर व मुत्सद्दी. हा राणोजीचा चिमाबाई नांवाच्या रजपूत बाईच्या पोटीं झालेला मुलगा. राणोजीच्या पश्चात् बरेच दिवस महादजी हा खुद्द पेशव्यांच्या खाजगी पागेंत होता. तो आपल्या भावांबरोबर लहानपणापासूनच मोहिमांवर जात असे; त्यामुळें त्याला युद्धशास्त्राचें शिक्षण तेव्हांपासून मिळालें होतें; तसेंच नानासाहेब पेशव्याच्या संगतीनें मुत्सद्दीपणांतहि महादजी तरबेज झाला.

महादजीनें प्रथम तळेगांव उंबरीच्या निजामावरील लढाईंत शौर्य गाजवून नांव मिळविलें. यानंतर औरंगाबाद ( १७५१ ), साखरखेडलें ( १७५६ ), पंजाब ( १७५९ ), वगैरे मोहिमांत तो जातीनें हजर होता. पानपतांत शेवटच्या दिवशीं जेव्हां उरलेले लोक पळाले, तेव्हां हाहि माघारा फिरला व फार कष्टानें दक्षिणेंत परत आला. या वेळीं हा लंगडा झाला. तेव्हां राणेखान

भिस्त्यानें याला फार मदत केली. महादजी राणेखानाचे हे उपकार फार स्मरत असे.

राघोबादादाच्या घालमेलीच्या कारकीर्दींत महादजी हा पटवर्धन, प्रतिनिधि यांच्याप्रमाणें निजामाकडे जाऊन मिळण्याच्या बेतात होता. गोहदच्या जाटावर राघोबादादानें स्वारी केली, तींत महादजीनें शिंद्यांच्या दौलतीतर्फे मुख्य म्हणून पहिल्यानें भाग घेतला होता.

मल्हारराव व मालूराव होळकर मेल्यावर त्यांची दौलत सरकारजमा करावी असा राघोबादादा याचा मानस होता. परंतु या वेळीं महादजीनें होळकरशाहीचा बचाव केला. यापुढें उदेपूरच्या गादीच्या तंट्यांत त्यानें आपला हात साधून ६० लक्षांची खंडणी व कांहीं प्रांत मिळविला. नंतर राघोबाच्या फितव्याचा बंदोबस्त थोरल्या माधवरावाच्याबरोबर राहून केल्यानें, पेशव्यांनीं महादजीस सर्व हुजुरपागेचा सेनापति करून जहागिरीहि दिली. पुढें पानपतचें अपयश धुवून काढण्यास पेशव्यांनीं बिनीवाले व कानडे यांना दिल्लीकडे पाठविलें. या मोहिमेंत महादजीनें नजीबखानाचा प्रांत लुटून फस्त केला व शहाअलम बादशहास इंग्रजांच्या हातून सोडवून दिल्लीस त्याची स्थापना केली.

बारभाईच्या कारस्थानांत कोणास मिळावें याबद्दल प्रथम महादजीचा निश्चय झाला नव्हता. पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांतील महादजीची कामगिरी मुत्सद्देगिरीची होती. सालबाईच्या तहानंतर महादजीनें ज्या रजपूत राजांनीं त्याचा मुलूख बळकाविला होता त्यांचा पराभव करून आपला प्रांत परत घेतला. आतांपर्यंत इंग्रजांशीं झालेल्या लढायांत त्यांच्याकडील कवायती पलटणींचा उपयोग पाहून, महादजीनें फ्रेंचांना चाकरीस ठेवून तोफा ओतण्याचे व हत्यारें तयार करण्याचे कारखाने काढून कवायती पलटणें तयार केलीं व मराठ्यांचें वर्चस्व पुन्हां प्रस्थापित केलें.

महादजीनें पातशहाकडून पेशव्यांस वकील-इ-मुतलकचें पद व स्वतःस त्या पदाची नायबगिरी मिळवून साऱ्या बादशाहींत गोवधाची मनाई करविली. बादशहास दरमहा ६५ हजारांची नेमणूक करून देऊन महादजीनें दिल्लीची सारी पादशाही आपल्या हातांत घेतली (१७८५). उ. हिंदुस्थानांत महादजीनें कडक अमल गाजविला, त्यामुळें मुसलमान सरदार व रजपूत राजे यांनीं त्याच्याविरुद्ध बंडाळी माजविली (१७८६-८७). लालसोटच्या लढाईंत तर बादशहाची सर्व फौजच रजपूत राजांना मिळाली, त्यामुळें महादजीस हार खावी लागली. महादजीनें धीर न सोडतां पुन्हां गेलेले प्रांत परत मिळविण्याचा प्रयत्न चालविला, नाना फडणीसाच्या मदतीनें महादजीनें पुन्हां राजपुताना व दिल्ली हस्तगत केली. उदेपूरचा राणा तर पाटीलबोवास सामोरा आला होता. हा मान त्या घराण्यानें खुद्द दिल्लीच्या बादशहासहि कधींच दिला नव्हता.

महादजीच्या कवायती फौजेंत मराठ्यांपेक्षां मुसलमान, रजपूत व युरोपियन यांचा भरणा जास्त होता. त्यानें आग्र्याच्या किल्ल्यांत युरोपीय हत्यारासारखीं हत्यारें तयार करण्याचे कारखाने काढले. या वेळीं नाना फडणिसाच्या मुत्सद्दीपणानें व महादजीच्या शौर्यानें सतलजपासून तुंगभद्रेपर्यंत मराठे साम्राज्य पसरून साऱ्या हिंदुस्थानभर त्याचा दरारा बसला होता. शके १७१५ माघ. शु. १३ रोजीं नवज्वर होऊन पुण्याजवळील वानवडी येथें वयाच्या ६७ व्या वर्षी महादजीचा अंत झाला. त्याची छत्री हल्लीं वानवडीस आहे.

महादजी हा कसल्याहि प्रसंगीं न डगमगणारा, शूर, मुत्सद्दी व राष्ट्रहित जाणणारा होता. तो कृष्णभक्त असे. सुदृढ, काळासांवळा, साध्या राहणीचा, परधर्मसहिष्णु, सुशिक्षित व राज्यकारभार उत्तम ठेवणारा असा तो होता. त्याच्या वेळीं उज्जनी ही शिंदे सरकारची राजधानी असून ग्वाल्हेर येथें लष्कर असे. महादजीचें सैन्य म्हणजे ३० हजार कवायती पायदळ, ५०० तोफा व एक लाख घोडदळ होतें. उत्तर पेशवाईंत महादजीइतका शूर व कर्तबगार पुरुष झाला नाहीं. तो वारल्यानंतर शिंदेशाहींत पोरवडा झाला व साम्राज्यनाशहि झाला.

**महादेवगड**—सह्याद्रीमधील पारपोली घाटाच्या माथ्यावर आंबवली नांवाच्या गांवापासून दीड मैलावर हा किल्ला बांधलेला आहे. किल्ल्याचा तट फारसा बळकट नाहीं. १८३० मध्यें कर्नल मॉर्डीन यानें सावंतापासून हा घेतला. किल्ल्याची उंची २५०० फूट व क्षेत्रफळ २० एकर आहे. येथून देखावा फार सुंदर दिसतो.

**महादेवभट गोविंदभट हिंगणे** (मृत्यु सन १७४४)—पेशव्यांचा नाशिक येथील तीर्थोपाध्य व दिल्लींतील मराठ्यांचा एक वकील. हा एका देशस्थ ब्राह्मण घराण्यांतील होता. बाळाजी विश्वनाथाच्या स्वारींत शंकराजी मल्हार सचीवाबरोबर हा दिल्लीस गेला. हा फारसी भाषा चांगली जाणत असून वक्तृत्व व बहुश्रुतपणा या आपल्या गुणांनीं यानें दिल्लीस सर्वांवर आपली छाप बसवली. सन १७३० पासून हा दिल्लीस मराठ्यांचा वकील म्हणून काम पाहत असे. दिल्लीस असतांना माळवा वगैरे प्रांतांच्या सनदा मिळवण्याच्या कामीं यानें केलेले परिश्रम ध्यानांत घेऊन बाजीरावानें यास वर्षासन सुरू केलें. पुढें यानें उत्तर हिंदुस्थानांत सावकारीचा धंदा सुरू करून त्यांत फायदा व प्रतिष्ठा दोन्हीहि मिळवलीं. सवाई जयसिंगाकडून पैसे मिळवून कर्जमुक्त होण्यास नानासाहेब पेशव्यास याचा चांगलाच

ऋषिसंघ त्या उत्क्रान्तीचीं सूत्रें इतिहासाच्या पडद्यामागून हलवीत असतो, त्या ऋषिसंघांतल्या एका गादीला महाचोहन असें थिऑसफी पंथीय म्हणतात. असें समजतें कीं, पूर्वीं या नांवाचा वेगळा अधिकार नसून तो अधिकार चालविणारी वेगळी व्यक्ति अधिकारारूढ नसे. पण हल्लीं या गादीवर एक स्वतंत्र व्यक्ति असते. मनु व बोधिसत्त्व या अधिकाराचा जो दर्जा तोच महाचोहनाचा आहे. मनूकडे मानववंशस्थापना व राष्ट्रांचे उदयास्त हें खातें असतें; बोधिसत्त्वाकडे धर्म व शिक्षण हें खातें असतें; व मानवी उद्योगाचीं इतर खातीं महाचोहनाच्या अधिकारांतील असतात. सध्यांचे महाचोहन वंशानें हिंदू आहेत.

**महाजन, गोविंद विठ्ठल** ( १८१५-९० )—एक जुने मराठी ग्रंथ-प्रकाशक. यांच्या घराण्याचें जुनें आडनांव कुंटे होय. मुंबई येथील अगदीं पहिल्या ‘ दर्पण ’ नांवाच्या वृत्तपत्राचे हे कर्ते होते. यांनीं ‘ दिग्दर्शन ’ नांवाचें एक शास्त्रीय विषयांचें मासिक, पुढें ‘ प्रभाकर ’ व ‘ धूमकेतू ’ नांवाचींहि पत्रें, नंतर ‘ ज्ञान-दर्पण ’ नांवाचें त्रैमासिक चालविलें होतें. शिवाय ‘ उपदेशचंद्रिका ’ नांवाचेंहि एक मासिक यांनीं चालविलें होतें. यांचें एक पुस्तक म्हटलें म्हणजे ‘ शब्दसिद्धि निबंध ’ होय.

**महाज्वरांकुश**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, वचनाग, धोत्र्याचें बीं, व सुंठ, मिरे, पिंपळी, हीं मुख्य औषधें असून आल्याच्या रसांत खल करतात. पाळीच्या व थंडी वाजून येणाऱ्या तापावर हें एक महत्त्वाचें औषध आहे. एक, दोन, तीन, अगर चार दिवसांनीं येणाऱ्या तापावर या औषधाचा चांगला उपयोग होतो. अंग अतिशय दुखणें, सांधे ठणकणें, चक्कर येणें, ओकाऱ्या होणें, इत्यादि लक्षणें असतांना या औषधाचा उपयोग करावा. १ ते ३ गुंजा आल्याचा रस, किंवा तुळशीचा रस, यांत देतात.

**महाड**—मुंबई, कुलाबा जिल्ह्यांतील दक्षिणेकडील एक तालुका. याचें क्षे. फ. ४६० चौरस मैल व लो. सं. ( १९४१ ) १,२८,६९५ आहे. यांत २४५ खेडीं असून तालुक्याचें मुख्य ठिकाण महाड आहे. तालुक्यांतून सावित्री नदी वाहत जाते. पावसाचें मान १३४ इंचांपर्यंत असतें. महाड गांव सावित्री नदीच्या उत्तर किनाऱ्यावर असून अलिबागपासून ५३ मैल दूर आहे. लो. सं. सुमारें ८ हजार आहे. मोठी भरती आली म्हणजे नावा महाडपर्यंत येतात. महाडच्या वायव्येस २ मैलांवर बौद्धांचीं लेणीं आहेत. शिवाजीची राजधानी रायगड येथून जवळच ( ८ कोस ) आहे. दुसरा बाजीराव, नाना फडणवीस व इंग्रज यांच्यामध्यें १७९६ सालीं येथें तह झाल्यावरून बाजीरावाला पेशवाई मिळाली. महाडचा दर्यायापार फार मोठा होता. येथें १८६६ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें एक हायस्कूल आहे.

**महाडिक**—एक मराठे सरदार घराणें. इतर मराठे घराण्यांप्रमाणेंच महाडिक ह्यांचें घराणें जुनें असून तें कोकणांत महाड येथें राहूं लागल्यावर त्यास महाडिक असें म्हणूं लागले. शिवाजीनें स्वराज्यासाठीं स्वतंत्र उद्योग सुरू केल्यावर महाडिक शिवाजीस सामील झालें आणि महाडिकांचा व शिवाजीचा लोभ जडला. परसोजी हा कर्नाटकांत शहाजीस साहाय्य करीत असतां मरण पावला. परसोजीचा मुलगा हरजीराजे ह्याच्यावर शहाजीची मर्जी विशेष होती. शिवाजीनें १६६८ च्या सुमारास आपली मुलगी हरजीराजे ह्यास दिली. तो कर्नाटकांत रघुनाथ नारायण हणमंते याच्याजवळ राहून तिकडील प्रांताचा बंदोबस्त करी. हरजी, गणोजी शिर्के व महादजी निंबाळकर हे शिवाजीचे तिन्हीहि जांवई राज्याच्या चांगले उपयोगी पडले. हरजीराजे कर्नाटकांत जिंजीच्या सुभेदारीवर पुष्कळ वर्षें होता. जिंजीच्या वेढ्यांत हरजीराजे मृत्यु पावला ( १६९४ ). धाकट्या शाहूजवळ दुर्गोजी व कुशाबा नांवाचे महाडिक सरदार होते.

**महादजीपंत पुरंदरे** ( मृत्यु १७६० )—सन १७४० ते १७५० या कालांतील पेशव्यांचा एक मुतालीक. अंबाजीपंताचा हा दुसरा मुलगा. नानासाहेबाच्याबरोबर हा नेहमीं स्वारीस जात असे. निजामावरील स्वारींतील याचें युद्धकौशल्य जाणून नानासाहेबानें यास फौजेंत सरदारी दिली. सन १७५० मध्यें सखारामबापूच्या मसलतींत यानें भाग घेतला होता. परंतु पुढें याचें मत पालटलें. नीळकंठ नांवाचा यास एक मुलगा होता.

**महादजी शिंदे** ( १७२७-१७९४ )—प्रसिद्ध मराठा वीर व मुत्सद्दी. हा राणोजीचा चिमाबाई नांवाच्या रजपूत बाईच्या पोटीं झालेला मुलगा. राणोजीच्या पश्चात् बरेच दिवस महादजी हा खुद्द पेशव्यांच्या खाजगी पागेंत होता. तो आपल्या भावांबरोबर लहानपणापासूनच मोहिमांवर जात असे; त्यामुळें त्याला युद्धशास्त्राचें शिक्षण तेव्हांपासून मिळालें होतें; तसेंच नानासाहेब पेशव्याच्या संगतीनें मुत्सद्दीपणांतहि महादजी तरबेज झाला.

महादजीनें प्रथम तळेगांव उंबरीच्या निजामावरील लढाईत शौर्य गाजवून नांव मिळविलें. यानंतर औरंगाबाद ( १७५१ ), साखरखेडलें ( १७५६ ), पंजाब ( १७५९ ), वगैरे मोहिमांत तो जातीनें हजर होता. पानपतांत शेवटच्या दिवशीं जेव्हां उरलेले लोक पळाले, तेव्हां हाहि माघारा फिरला व फार कष्टानें दक्षिणेंत परत आला. या वेळीं हा लंगडा झाला. तेव्हां राणेखान

भिस्त्यानें याला फार मदत केली. महादजी राणेखानाचे हे उपकार फार स्मरत असे.

राघोबादादाच्या घालमेलीच्या कारकीर्दीत महादजी हा पटवर्धन, प्रतिनिधि यांच्याप्रमाणें निजामाकडे जाऊन मिळण्याच्या बेतात होता. गोहदच्या आटावर राघोबादादानें स्वारी केली, तींत महादजीनें शिंद्यांच्या दौलतीतर्फे मुख्य म्हणून पहिल्यानें भाग घेतला होता.

मल्हारराव व मानूराव होळकर मेल्यावर त्यांची दौलत सरकारजमा करावी असा राघोबादादा याचा मानस होता. परंतु या वेळीं महादजीनें होळकरशाहीचा बचाव केला. यापुढें उदेपूरच्या गादीच्या तंट्यांत त्यानें आपला हात साधून ६० लक्षांची खंडणी व कांहीं प्रांत मिळविला. नंतर राघोबाच्या फितव्याचा बंदोबस्त थोरल्या माधवरावाच्याबरोबर राहून केल्यानें, पेशव्यांनीं महादजीस सर्व हुजुरपागेचा सेनापति करून जहागिरीहि दिली. पुढें पानपतचें अपयश धुवून काढण्यास पेशव्यांनीं बिनीवाले व कानडे यांना दिल्लीकडे पाठविलें. या मोहिमेंत महादजीनें नजीबखानाचा प्रांत लुटून फस्त केला व शहाअलम बादशहास इंग्रजांच्या हातून सोडवून दिल्लीत त्याची स्थापना केली.

बारभाईच्या कारस्थानांत कोणास मिळावें याबद्दल प्रथम महादजीचा निश्चय झाला नव्हता. पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांतील महादजीची कामगिरी मुत्सद्देगिरीची होती. सालबाईच्या तहानंतर महादजीनें ज्या रजपूत राजांनीं त्याचा मुलूख बळकाविला होता त्यांचा पराभव करून आपला प्रांत परत घेतला. आतांपर्यंत इंग्रजांशीं झालेल्या लढायांत त्यांच्याकडील कवायती पलटणींचा उपयोग पाहून, महादजीनें फ्रेंचांना चाकरीस ठेवून तोफा ओतण्याचे व हत्यारें तयार करण्याचे कारखाने काढून कवायती पलटणें तयार केलीं व मराठ्यांचें वर्चस्व पुन्हां प्रस्थापित केलें.

महादजीनें पातशहाकडून पेशव्यांस वकील-इ-मुतलकचें पद व स्वतःस त्या पदाची नायबगिरी मिळवून साऱ्या बादशाहींत गोब्राची मनाई करविली. बादशहास दरमहा ६५ हजारांची नेमणूक करून देऊन महादजीनें दिल्लीची सारी पादशाही आपल्या हातांत घेतली (१७८५). उ. हिंदुस्थानांत महादजीनें कडक अमल गाजविला, त्यामुळें मुसलमान सरदार व रजपूत राजे यांनीं त्याच्याविरुद्ध बंडाळी माजविली (१७८६–८७). लालसोटच्या लढाईत तर बादशहाची सर्व फौजच रजपूत राजांना मिळाली, त्यामुळें महादजीस हार खावी लागली. महादजीनें धीर न सोडतां पुन्हां गेलेले प्रांत परत मिळविण्याचा प्रयत्न चालविला, नाना फडणीसाच्या मदतीनें महादजीनें पुन्हां राजपुताना व दिल्ली हस्तगत केली. उदेपूरचा राणा तर पाटीलबोवास सामोरा आला होता. हा मान त्या घराण्यानें खुद्द दिल्लीच्या बादशहासहि कधींच दिला नव्हता.

महादजीच्या कवायती फौजेंत मराठ्यांपेक्षां मुसलमान, रजपूत व युरोपियन यांचा भरणा जास्त होता. त्यानें आग्र्याच्या किल्ल्यांत युरोपीय हत्यारासारखीं हत्यारें तयार करण्याचे कारखाने काढले. या वेळीं नाना फडणिसाच्या मुत्सद्दीपणानें व महादजीच्या शौर्यानें सतलजपासून तुंगभद्रेपर्यंत मराठे साम्राज्य पसरून साऱ्या हिंदुस्थानभर त्याचा दरारा बसला होता. शके १७१५ माघ. शु. १३ रोजीं नवज्वर होऊन पुण्याजवळील वानवडी येथें वयाच्या ६७ व्या वर्षी महादजीचा अंत झाला. त्याची छत्री हल्लीं वानवडीस आहे.

महादजी हा कसल्याहि प्रसंगीं न डगमगणारा, शूर, मुत्सद्दी व राष्ट्रहित जाणणारा होता. तो कृष्णभक्त असे. सुदृढ, काळासांवळा, साध्या राहणीचा, परधर्मसहिष्णु, सुशिक्षित व राज्यकारभार उत्तम ठेवणारा असा तो होता. त्याच्या वेळीं उज्जनी ही शिंदे सरकारची राजधानी असून ग्वाल्हेर येथें लष्कर असे. महादजीचें सैन्य म्हणजे ३० हजार कवायती पायदळ, ५०० तोफा व एक लाख घोडदळ होतें. उत्तर पेशवाईत महादजीइतका शूर व कर्तबगार पुरुष झाला नाहीं. तो वारल्यानंतर शिंदेशाहींत पोरवटा झाला व साम्राज्यनाशहि झाला.

**महादेवगड**—सह्याद्रीमधील पारपोली घाटाच्या माथ्यावर आंबवली नांवाच्या गांवापासून दीड मैलावर हा किल्ला बांधलेला आहे. किल्ल्याचा तट फारसा बळकट नाहीं. १८३० मध्यें कर्नल मॉर्डीन यानें सावंतापासून हा घेतला. किल्ल्याची उंची २५०० फूट व क्षेत्रफळ २० एकर आहे. येथून देखावा फार सुंदर दिसतो.

**महादेवभट गोविंदभट हिंगणे** (मृत्यु सन १७४४)—पेशव्यांचा नाशिक येथील तीर्थोपाध्य व दिल्लींतील मराठ्यांचा एक वकील. हा एका देशस्थ ब्राह्मण घराण्यांतील होता. बाळाजी विश्वनाथाच्या स्वारींत शंकराजी मल्हार सचीवाबरोबर हा दिल्लीस गेला. हा फारसी भाषा चांगली जाणत असून वक्तृत्व व बहुश्रुतपणा या आपल्या गुणांनीं यानें दिल्लीस सर्वांवर आपली छाप बसवली. सन १७३० पासून हा दिल्लीस मराठ्यांचा वकील म्हणून काम पाहत असे. दिल्लीस असतांना माळवा वगैरे प्रांतांच्या सनदा मिळवण्याच्या कामीं यानें केलेले परिश्रम ध्यानांत घेऊन बाजीरावानें यास वर्षासन सुरू केलें. पुढें यानें उत्तर हिंदुस्थानांत सावकारीचा धंदा सुरू करून त्यांत फायदा व प्रतिष्ठा दोन्हीहि मिळवलीं. सवाई जयसिंगाकडून पैसे मिळवून कर्जमुक्त होण्यास नानासाहेब पेशव्यास याचा चांगलाच

उपयोग झाला. सफदरजंग याच्या दरबारीं सवाई जयसिंगाच्या पश्चात् त्याच्या वकिलीच्या हक्कांबाबत बोलणीं करण्यासाठीं हा गेला असतां शिपायांमध्यें झालेल्या झटापटींत जखमी होऊन त्याच रात्रीं हा मरण पावला. बापू, दामोदर, पुरुषोत्तम व देवराव असे यास चार कर्तबगार पुत्र होते. महादजी शिंद्याचें वर्चस्व दिल्लीस होण्यापूर्वी या घराण्याचेंच वर्चस्व तेथें होतें.

**महानदी**—मध्यप्रांत, ओरिसामधील एक मोठी नदी. रायपूर जिल्ह्याच्या आग्नेयीस सिहाव गांवाजवळ एका लहानशा कुंडांतून हिचा उगम झालेला आहे. ओरिसा प्रांतांतून तिचा प्रवाह फार मोठा झाला असल्यामुळें हींत नावा चालतात. हिच्या प्रवाहांत मोठमोठीं इमारतींचीं लांकडें तशींच वाहात सोडून नेमक्या स्थळीं अडवून धरतात. ही नदी कटकजवळ अनेक मुखांनीं बंगालच्या उपसागरास मिळते.

महानदीवरील 'हिराकुड' धरण—ओरिसा प्रांतांत हें धरण व्हावयाचें असून याची लांबी ३ मैल व उंची १५० फूट राहील. धरण पुरें झाल्यावर ११ लक्ष क्षेत्रास दरसाल भरपूर पाणी मिळेल; व विजेचा पुरवठा पुष्कळ ठिकाणीं होऊन औद्योगिक वाढ चांगलीच होईल. हिराकुडाखेरीज टेकरपारा व माराज या ठिकाणींहि महानदीवर धरणें व्हावयाचीं आहेत. हिराकुड धरण संबळपूरहून ९ मैलांवर आहे.

**महानुभाव पंथ**—हिंदुधर्मांतील एक पंथ. संस्थापक चक्रधर यानें वऱ्हाडमधील ऋधपूर येथें या पंथाची मूळ स्थापना १२ व्या शतकांत केली. गुजराथ देशांत भरवस (भडोच) येथें हरपालदेव नांवाचा राजा होता, तोच पुढें चक्रधर नांवानें प्रसिद्धीस आला म्हणतात. त्यानें शके ११८५ मध्यें संन्यासदीक्षा घेतली व महानुभाव पंथाची स्थापना केली. त्याचे नागदेवाचार्य, महिंद्रभट्ट, जनार्दन, दामोदर, भांडारेकार, इत्यादि ५०० शिष्य असून त्याच्या पंथप्रचाराचें कार्य विशेषतः नागदेवाचार्य या शिष्यानें केलें. चक्रधरानें केलेल्या अनेक चमत्कारविषयक कथा लीलाचरित्रांत आहेत. चक्रधर स्वतः गुजराथी होता, तरी पंथप्रसाराचें कार्य महाराष्ट्रांत प्रथम होऊन नंतर हा पंथ गुजराथ, मध्यप्रांत, इंदूर, संयुक्त प्रांत व पंजाब या प्रांतांत पसरला, व त्याच्याहि पलीकडे काश्मीर, काबूल, वगैरे ठिकाणीं या पंथाचीं कृष्णमंदिरें असून या पंथाचे अनुयायी गझनी–कंदाहारपर्यंतहि पसरले आहेत. या पंथाचे मूळ धर्मग्रंथ मराठींत आहेत.

धार्मिक मतें—आद्य शंकराचार्यांनीं जैन, बौद्ध, इत्यादि धर्मांचें खंडन करून सनातन ब्राह्मणधर्माचें पुनरुज्जीवन केलें, तें सरासरी ४ शतकें अव्याहत राहिल्यामुळें हिंदु समाजामध्यें वर्णभेदाची असह्यता भासूं लागली. धर्मग्रंथ संस्कृतमधून असल्यामुळें इतर वर्णांना ब्राह्मणवर्गाचें श्रेष्ठत्व अवश्य मानावें लागत असे. अशा परिस्थितींत सर्व वर्णांच्या एकीकरणाचे आणि भेदभाव सौम्य करण्याचे प्रयत्न १२ शतकांत झाले. त्यांतीलच हा महानुभावीयांचा पंथ होय. या पंथास वेद प्रमाण असून चातुर्वर्ण्यव्यवस्था आणि वर्णाश्रमधर्महि मान्य आहेत. हा पंथ ब्राह्मणांनींच काढला असून तीनशें वर्षें त्याचा प्रसार बहुशः ब्राह्मण आचार्यत्वाखालीं होत होता. महानुभावांचे दोन वर्ग आहेत: एक उपदेशी व दुसरा संन्याशी. उपदेशी वर्ग चातुर्वर्ण्य, जातिधर्म व तदनुसार संस्कार पाळणारा आहे. त्यांचे लग्नव्यवहार पंथेतर इतर सजातियांशीं होतात. संन्यासदीक्षा घेतली म्हणजे मात्र जातिनिर्बंध पाळण्याची जरूरी नाहीं. स्त्री-शूद्रादि सर्वांना संन्यास घेतां येतो, व अशी दीक्षा घेतल्यावर जातिनिर्बंध पाळीत नाहींत, हा या पंथाचा विशेष आहे. हिंदु देवतांपैकीं श्रीकृष्ण आणि दत्तात्रय हे परमेश्वराचे पूर्ण अवतार व बाकीच्या देवता हे अंशावतार मानतात. पंथानें श्रीमद्भगवद्गीता हा मुख्य धर्मग्रंथ मानून तदंतर्गत अहिंसा इत्यादि तत्त्वांचा अवलंब जनतेस निवृत्तिमार्गास लावण्यासाठीं केला, व संन्यास, ब्रह्मचर्य व भिक्षोपजीवित्व इत्यादि साधनांनीं स्त्री-पुरुषादि सर्व वर्णांना मोक्षमार्गास लावण्याचा उपक्रम केला. परमेश्वर निर्गुणनिराकार आहे, पण कृपावशें तो साकार होतो. मनुष्य या देहांत आपल्या पूर्वकर्मानुसार फळें भोगतो, आणि कर्मानुसारच स्वर्ग, नरक, कर्मभूमि व मोक्ष या चतुर्विध कर्मफलास पावतो. दर युगास परमेश्वराचा अवतार होतो. हंस, श्रीदत्तात्रय, श्रीकृष्ण, प्रधान, व चक्रधर या अवतारांना पं. कृष्ण म्हणून महानुभाव मानतात.

वाङ्मय—चक्रधराच्या मुखांतून निघालेल्या वाक्यांस सूत्रें म्हणतात. तीं सूत्रें एकंदर १६०९ असून त्यांचीं प्रकरणें ११ आहेत, व या संग्रहास 'सिद्धांत सूत्रपाठ' म्हणतात. हा या पंथाचा मुख्य धर्मग्रंथ होय. या ग्रंथाच्या स्पष्टीकरणार्थ 'लापिका', 'भाष्य', 'महाभाष्य', 'व्याख्या', 'प्रमेय', वगैरे ग्रंथ झाले आहेत. शिवाय 'लीलाचरित्र' (चक्रधराचें चरित्र), गीतेवर ओवीबद्ध टीका, कृष्णचरित्र, रुक्मिणीस्वयंवर, शिशुपालवध, वत्सहरण, साठचौघ्या, इत्यादि चरित्रात्मक व स्थलवर्णनात्मक ग्रंथ, पुराणें, काव्यें, कोश, व्याकरण ग्रंथ, साहित्य व छंदःशास्त्रावरील ग्रंथ, इत्यादि महानुभावी ग्रंथभांडार फार मोठें असून अलीकडे उपलब्ध झालें आहे.

या पंथांत मूर्तिपूजा नव्हती. त्यांनीं कृष्ण, दत्तात्रय, इत्यादींच्या पवित्र स्थळीं मूर्तीऐवजीं नुसते ओटे बांधले; व मूर्तिपूजक हिंदूंहून आपण निराळे आहोंत अशी मुसलमान बादशहांची समज करून, आणि भगव्या वस्त्राऐवजीं काळीं वस्त्रें

धारण करून, जिझिया करमाफी व इनामाच्या सनदा मिळविल्या. कदाचित् या करणीमुळें सनातनी हिंदु समाज त्यांचा द्वेष व तिरस्कार करूं लागला असेल. तो एकनाथ–तुकारामादि संतांच्या काव्यांतहि दिसून येतो; या प्रकारचे भाषेंत कांहीं वाक्प्रचारहि रूढ झाले आहेत. तथापि या पंथानें काबूल–कंदाहारपर्यंत यावनी प्रदेशांत अहिंसा, मद्य–मांसनिवृत्ति या तत्त्वांचा व मराठी ग्रंथांचा प्रसार केला. ही या पंथाची कामगिरी स्पृहणीय आहे.

आपलें तत्त्वज्ञान व धर्मशास्त्र आपल्याच पंथांत राहावें यासाठींच बहुधा महानुभावी ग्रंथकारांनीं १३ व्या शतकाच्या उत्तरार्धांत सांकेतिक लिपी सुरू केल्या. सुंदर, पारमांडल्य, कवीश्वर, वज्र, सुभद्रा, सिंह, इत्यादि गुप्त लिपी निघाल्या. तथापि सकळ (सगळ) लिपींत बहुतेक महानुभावी ग्रंथ आहेत.

महानुभावांचें जें धार्मिक वाङ्मय आहे त्याचे १ श्रुति, २ स्मृति, ३ वृद्धाचार, ४ मार्गरूढी, व ५ वर्तमान असे विभाग पाडलेले आहेत. लीळाचरित्र व दत्तात्रेय–कृष्ण–चक्रपाणि–गोविंदप्रभु यांचीं चरित्रें व तदंतर्गत वचनें यांना 'श्रुति' म्हणतात. नागदेवाचार्यांच्या चरित्रग्रंथाला 'स्मृति' म्हणतात. नंतरच्या आचार्यांच्या ग्रंथांना 'वृद्धाचार' म्हणतात. संप्रदायासंबंधीं रूढींचें विवेचन असलेल्या ग्रंथास 'मार्गरूढी' व त्यानंतरच्या अर्वाचीन ग्रंथांना 'वर्तमान' असें नांव आहे. दा पंथाचे तेरा आम्नाय आहेत. पुन्हां या आम्नायांच्या उपशाखा आहेत.

अलीकडे या प्राचीन मराठी वाङ्मयाचा विद्यापीठांतून अभ्यास सुरू झाल्यानें या पंथाविषयींचे जुने अकारण गैरसमज बहुतेक गेले आहेत. मराठे साम्राज्य अटकेपार जाण्यापूर्वी मराठी भाषा या पंथानें अटकेपार नेली याचें महाराष्ट्रीयांस भूषण वाटेल. मुकुंदराज–ज्ञानेश्वराच्या आधींचें व नंतरचें मराठींत जें वाङ्मय नव्हतें व जी उणीव भासत होती ती या महानुभावी वाङ्मयानें चांगली भरून निघाली. हें वाङ्मय जतन करून ठेवणाऱ्यांचे महाराष्ट्रानें खरोखरी ऋणी असलें पाहिजे.

**महापूर्णचंद्रोदय मात्रा**—एक आयुर्वेदीय रसायन. गंधक, ताम्र, पारा, टांकणखार, नागभस्म, सुवर्णभस्म, तारमाक्षिक, मौक्तिक, कांत, वंग, अभ्रक, कस्तुरी, सुवर्णमाक्षिकभस्म, पोलादाचें भस्म, केशर, चंदन, कापूर ह्या औषधांचा मालतीच्या रसांत प्रहरभर खल करावा. आल्याच्या रसांत वालप्रमाण मात्रा योजावी. म्हणजे कास, श्वास, मेह, कुष्ठरक्तदोष, राजयक्ष्मा हे रोग दूर होऊन धातुवृद्धि होते.

**महाबतखान** (मृत्यु १६७२)—चितोडचा राणा प्रताप याचा भाऊ संगराजित याचा हा मुलगा. संगराजित प्रथमपासूनच मोंगलांना मिळाला होता. संगराजिताचा हा मुलगा सन १६११ मध्यें मुसलमान झाला. यानें जहांगीर, शहाजहान व औरंगजेब यांच्या कारकीर्दींत मोंगलांच्या हितासाठीं आपली काया झिजवली. सन १६३२ मध्यें दौलताबादचा किल्ला सर करून यानें दक्षिणेंत येऊन अहिवंत, मार्कंडा, औंढा, पट्टा, वगैरे किल्ल्यांचा ताबा घेतला. नंतर दिलेरखानानें चाकणचा व सालेरचा किल्ला वेढला. अशा रीतीनें मराठे व मोंगल यांमधील या लढाईचा शेवट मोंगलाच्या बाजूनें होईल असें प्रथम वाटलें. परंतु मराठ्यांकडून प्रतापराव गुजर व मोरोपंत पिंगळे यांनीं जोर धरल्यानें लढाईचें पारडें फिरलें व मराठेच विजयी ठरले (१६७२). तेव्हां यास बादशहानें परत बोलावून अफगाणिस्तानवर पाठवलें. तिकडेच हा सन १६७२ मध्यें आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी मरण पावला.

शहाजी हा कांहीं काळ आपला थोरला मुलगा संभाजी याच्यासह या महाबतखानाच्या पदरीं होता.

**महाबलिपुरम्**—मामल्लपुरम्. हें ठिकाण मद्रासजवळ आहे. येथें धर्मराजरथ किंवा 'सात पॅगोडा' नांवाचीं सुंदर व प्रचंड दगडी देवळें आहेत. तीं पल्लव राजाच्या आज्ञेवरून तयार करण्यांत आलीं. मामल्लपूर हें नांव पल्लवराजा पहिला नरसिंह वर्मा याला जी महामल्ल अशी पदवी होती तिच्यावरून पडलें. मामल्लपूर येथें तीन शिवाचीं व एक विष्णूचें अशीं चार मंदिरें आहेत. हीं देवळें ७ व्या शतकांतील आहेत.

**महाबळेश्वर**—१. देवस्थान. याला क्षेत्र महाबळेश्वर म्हणतात. हें सातारा जिल्हा, जावळी तालुका यांत आहे. माल्कमपेटपासून किंवा पांचगणीहून परस्पर येथें पोंचतां येतें. मध्यें ब्रह्मारण्य नांवाचें दाट जंगल लागतें. महाबळेश्वरास कृष्णा नदीचा उगम आहे. डोंगरावरून येणारे सात झरे एकत्र होऊन एका गायमुखांतून कुंडांत पडतात; या कुंडाला ब्रह्मकुंड म्हणतात. व तेथून देवळाबाहेर प्रवाह काढून दिला आहे. महाबळेश्वराचें देऊळ मोठें व जुनें आहे. शिवलिंग खडकावर दाखवितात. येथून शंकराच्या जटेंतून कृष्णा, कोयना, इत्यादि नद्या निघाल्या आहेत व पुढें गेल्या आहेत असें भाविक मानतात. या देवस्थानाला जुन्या काळीं उत्पन्नाच्या सनदा दिलेल्या प्रसिद्ध आहेत. शिवरात्रीखेरीज येथें वस्ती नसते. महरला येणारे प्रवासी येथें येऊन दर्शन घेऊन लगेच परततात. येथून प्रतापगड जवळच आहे. तसेंच कमलगड, मकरंदगड, पांडवगड व रायगड हे भोंवतालीं आहेत.

२. मालकम पेठ, महर. हें पूर्वी मुंबई इलाख्यांतील मुख्य सरकारी हवेचें ठिकाण होतें. सातारा जिल्ह्याच्या जावळी तालुक्यांत याचा समावेश होतो. समुद्रसपाटीपासून याची उंची

४५०० फूट व कित्येक ठिकाणीं ४७०० फूट देखील भरेल. महाबळेश्वरास जावयाचें असल्यास महाड, पुणें व वाठार असे तीन मार्ग आहेत; त्यांपैकीं पुण्याहून मोटारीनें जाण्याचा मार्ग विशेष रहदारीचा आहे. सर जॉन मालकम मुंबईचा गव्हर्नर असतांना १८२८ सालीं सातारच्या राजाकडून जरूर तेवढी जागा मिळवून त्यानें महाबळेश्वर हें हवेचें ठिकाण केलें. हें माथेरानपेक्षां अधिक उंच असल्यानें जास्त थंड आहे. येथील मुख्य प्रेक्षणीय स्थळें— आर्थर सीट (४४११ फूट), एल्फिन्स्टन (४१८४), सिडने (४०६७), बॉंबे, कॉर्न्योक, फॉकलंड, सासून व बाबिंग्टन (४२४५), इत्यादि. देखाव्याचीं स्थानें होत. जुनें महाबळेश्वर ४३८५ फूट उंच असून मालकम पेठपासून ३ मैल लांब आहे. येथें बटाटे फार होतात. कॉफी व ओक नांवाचें विलायती झाड यांची लागवड अलीकडे केलेली आहे. चिनी व मलायातील कैदी ठेवण्याकरितां येथें १२० कैदी राहतील इतका मोठा कैदखाना बांधण्यांत आला होता. त्या कैद्यांनींच बटाटे व विलायती भाजीपाल्याची लागवड ऊर्जितावस्थेस आणिली. १८६४ सालीं हा कैदखाना रद्द करण्यांत आला. आतां कॉंग्रेस पक्ष अधिकारारूढ झाल्यापासून उन्हाळ्यांतील या ठिकाणचा सरकारी मुक्काम बंद झाला. आतां सरकारी बंगले विद्यार्थी, शिक्षक, वगैरेंना सफरींच्या वेळीं राहावयास देतात.

**महाबोधी विहार**—गयेमध्यें हा बौद्ध विहार होता. सिलोनच्या एका राजानें महाबोधी संघाराम बांधला. या विहाराला सहा चौक असून तीन मजली दालनें व वर गच्च्या असत. भोंवतीं तीसचाळीस फूट उंचीचा तट होता. यांत एक हजार महायान पंथाचे धार्मिक अभ्यासू लोक राहत होते. विनयपिटकांत दिल्याप्रमाणें येथें गुरु आणि शिष्य यांचें आचरण असे.

**महाभारत**—भारतांतील हिंदूंचें हें एक पूज्य व प्राचीन महाकाव्य आहे. वीरकथांचा हा एक प्रचंड संग्रह असून प्राचीन ज्ञानाचें मोठें भांडार आहे असें याचें वर्णन करतात. महाभारत म्हणजे भरतांच्या महायुद्धाचा वृत्तान्त असा याचा मूळ शब्दार्थ आहे. कुरुक्षेत्रावर झालेल्या महायुद्धाचें हें वीरकाव्य आहे. मुख्य महायुद्धाच्या साग्र इतिहासाबरोबरच यांत अनेक उपकथा-दंतकथा यांचा मोठा समावेश आहे. प्राचीन राजे व वीरपुरुष यांच्या पराक्रमाच्या गोष्टी व कुलेतिहास अशा कथांतून दिलेले आढळतात. म्हणून जुन्या सूतांच्या काव्याचें हें मोठें भांडार आहे असें कांहीं पुराणपंडित म्हणतात तें अगदीं खरें आहे.

सूतांचीं जुनीं वीरकाव्यें ऋषींनीं चांगलीं सत्कारलीं; व त्यांत तत्त्वज्ञान, धर्म, परमार्थ, इ. विषयांच्या गोष्टी घालून सर्व हिंदूंना वेदसंहितांप्रमाणें पूज्य वाटेल असा हा महाभारताचा महाग्रंथ तयार केला. याला अनेकांचे हात लागले असले पाहिजेत व अनेक शतकें याचें संकलन-संपादन होत असलें पाहिजे, असा चिकित्सात्मक संशोधनाभ्यास करणाऱ्या पंडितांचें मत आहे. महाभारत रचलें गेलें त्याला पंधराशें वर्षांहून अधिक काळ लोटला असल्यानें मूळचा ग्रंथ कसा असावा याचें फार बारकाईनें संशोधन पुण्याच्या भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन मंदिरात चालू आहे व संशोधित पर्वांचें मुद्रण चालू आहे.

वेद आणि पुराणें रचणारा कृष्णद्वैपायन व्यास यानेंच महाभारत रचलें अशी जुन्या काळापासूनचीच समजूत आहे व तसे पुराणांतून उल्लेख आहेत. महाभारताच्या प्रस्तावनेंत असें सांगितलें आहे कीं, व्यासाचे तिन्ही पुत्र मरण पावल्यावर त्यानें हें आपलें काव्य लिहून तयार केलें. नंतर आपला शिष्य वैशंपायन यास तें शिकविलें. जनमेजय राजाच्या सर्पसत्राच्या वेळीं वैशंपायनानें तें सर्व म्हणून दाखविलें. त्या वेळीं सूत उग्रश्रवस् नांवाचा एक ऋषि तेथें उपस्थित होता. त्यानें तें ऐकलें होतें. व शौनकाच्या द्वादशवर्षीय सत्रात ऋषींच्या विनंतीवरून त्यानें तें काव्य त्यांना ऐकविलें. अशी ही कथनपरंपरा आहे.

महाभारतांतील मुख्य कथा म्हणजे धृतराष्ट्राचे पुत्र कौरव व पंडूचे पुत्र पांडव यांमधील आरंभापासून अखेरपर्यंतचे कलह यांचें सविस्तर वर्णन होय. महाभारताच्या १८ पर्वांतील अर्धा भाग यानें व्यापला आहे व बाकीच्या अर्ध्या भागांत उपदेशात्मक व इतर उपकथा आहेत. शकुंतलाख्यान, नलदमयंती-आख्यान, रामोपाख्यान, सावित्री-आख्यान, इत्यादि मोठ्या कथा व अनेक दृष्टांतपर व नीतिपर कथा यांत आढळतील. व्यवहारनीति, आचारधर्म व परमार्थज्ञान अशा कथांतून प्रतीत होतें. भगवद्गीता (पाहा) ही महाभारतांतीलच असून हिंदु धर्माचा एकमेव ग्रंथ म्हणून त्याकडे अचूक बोट दाखविलें जातें. तत्त्वज्ञानाप्रमाणेंच राजनीतीचीहि उत्कृष्ट शिकवण या महाभारत महाकाव्यांत आहे. हा दोन हजार वर्षांपूर्वीचा एक प्रचंड विश्व-ज्ञानकोशच म्हणतां येईल. याचीं १. आदि, २. सभा, ३. वन, ४. विराट, ५. उद्योग, ६. भीष्म, ७. द्रोण, ८. कर्ण, ९. शल्य, १०. सौप्तिक, ११. स्त्री, १२. शांति, १३. अनुशासन, १४. अश्वमेध, १५. आश्रमवासी, १६. मौसल, १७. महाप्रस्थानक, व १८. स्वर्गारोहण अशीं अठरा पर्वें आहेत. शिवाय हरिवंश म्हणून एक परिशिष्ट आहेच; यांतहि तीन पर्वें आहेत. यांत प्रामुख्यानें कृष्णकथा आहे. महाभारतांतील बहुतेक श्लोक अनुष्टुप् छंदांत आहेत. पुष्कळसा गद्यभागहि आहे. या काव्याचा काल खि. पू. ३०० ते इ. स. ४०० यामधला असावा असें आजचे चिकित्सक पंडित समजतात. एकाच वेळीं

हें रचलें गेलें नाहीं. या काव्यांतील कांहीं प्रसंग व घटना या मात्र त्याहून प्राचीन असाव्यात; कांहीं कथा वेदकालीनहि असतील.

भारतीय युद्धाचा काल व महाभारत ग्रंथाचा काल हे अर्थात् अगदीं निराळे असणार हें स्पष्ट आहे. भारतीय युद्धाच्या कालासंबंधींहि विद्वानांत एकवाक्यता नाहीं. (कुरुयुद्ध पाहा.)

महाभारतांतील ठळक व्यक्तींचीं चरित्रें या कोशांत स्वतंत्र आलेलींच आहेत.

**महामारी**—पटकी पाहा.

**महायान पंथ**—हा बौद्ध धर्मांतील महायान व हीनयान या दोन प्रमुख पंथांपैकीं मुख्य महत्त्वाचा पंथ असून त्याचे माध्यमिक व विज्ञानवादी असे दोन पोटपंथ आहेत. आर्यावर्तावर ग्रीक व बॅक्ट्रियन लोकांची सत्ता स्थापन झाल्यावर ग्रीकांच्या अनेकदेवतोपासनेचा बौद्धांवर परिणाम झाला; मोंगल लोकांच्या स्वाऱ्या व साम्राज्य झालें; त्या मोंगोलियनांच्या अनेकदेवतावादाची जोड मिळून बौद्धांनीं बुद्ध, बोधिसत्त्व, इत्यादिकांच्या ग्रीक पद्धतीवर मूर्ती उभारल्या. हिंदु धर्मीयांच्या निकटवर्तित्वामुळें हिंदु धर्मतत्त्वांचा परिणाम होतच होता. याप्रमाणें बौद्ध धर्मांत गोंधळ माजल्यामुळें दुसऱ्या शतकांत कनिष्क नांवाच्या महाप्रतापी राजानें मोठी धर्मसभा भरविली. त्या सभेंत जुन्या बौद्ध धर्मीयांचें कांहीं न चालून नवीन बौद्ध मतांना मान्यता मिळाली, व या नव्या पंथानें 'महायान' हें नांव धारण केल्यावर तदितर बौद्धांना 'हीनयान' हें नांव पडलें. हा महायान पंथ चीन, जपान, कोरिया इतक्या दूरवरच्या विस्तृत प्रदेशांत पसरला. महायान पंथाचा जनक व प्रमुख प्रसारक नागार्जुन यानेंच शून्यवाद व पारमिता हीं तत्त्वें शोधून काढलीं; आणि बुद्ध व बोधिसत्त्व यांची देवाप्रमाणें भक्ति व पूजा, इत्यादि भक्तिमार्गाचा प्रसार महायान पंथांत केला. महायान पंथाचें मुख्य वाङ्मय अष्टसहस्रिका, प्रज्ञापारमिता, सद्धर्मपुंडरीक, ललितविस्तर, लंकावतार, सुवर्णप्रभास, तथागतगुह्यक, समधिराज, दशभूमीश्वर, इत्यादि होय.

**महार**—एक हिंदु जात. लो. सं. सुमारें ३३ लाख असून त्यांची वस्ती महाराष्ट्र, कोंकण व मध्यप्रांत यांत आहे. राजस्थानांतील 'मेहेर' व महार यांचे पूर्वज एकच असावेत. महाराष्ट्र म्हणजे महारांचें राष्ट्र; महा + अरी म्हणजे मोठे शत्रू ते महार; मृत + हर म्हणजे मेलेल्या जनावरांना नेणारे ते महार; अशा उपपत्त्या 'महार' शब्दाच्या सुचविण्यांत आल्या आहेत. आर्य लोक येण्यापूर्वींची ही एक प्राचीन जात असावी. मराठेकुणब्यांप्रमाणें शिंदे, गायकवाड, चौहान, परमार, सोळंखी, इत्यादि आडनांवें महारांत आहेत. त्यांच्यात सोमवंशी महार ही पोटजात आपण पांडवांच्या वंशांतले आहोंत, असें म्हणते. ते हिंदु धर्मांतील विठोबा, खंडोबा, म्हसोबा, ज्ञानोबा, चोखोबा, भवानी, मरीआई, सटवाई, इत्यादि देवतांची पूजा करतात. ग्रामपंचायतींत बारा बलुतेदारांपैकीं महारहि बलुतेदार असून खेडेगांवच्या सरहद्दी संभाळणें, चौकीदारी व जासुदी, इत्यादि कामें त्यांच्याकडे असत. त्यांच्यांत विणकाम करणारे कांहीं आहेत. महार लोक मांग, चांभार, धेड, इत्यादि जाती आपल्या खालच्या मानतात व त्यांच्याशीं अन्नोदक व्यवहार करीत नाहींत. महारांना अतिशूद्र व अस्पृश्य मानण्यांत येतें. ख्रिस्ती अगर मुसलमान झाल्यास आपला सामाजिक दर्जा वाढतो, या समजुतीनें कांहींनीं धर्मांतर केलें आहे. या जातींतील डॉ. आंबेडकर हे त्यांचे थोर विद्वान् पुढारी हल्लींच्या कॉंग्रेस मंत्रिमंडळांत आहेत. महारासुद्धां सर्व अस्पृश्य जातींच्या सर्वांगीण उन्नतीचे प्रयत्न महात्मा गांधी, कॉंग्रेस, हिंदुमहासभा, वगैरे थोर पुढारी व राजकीय पक्ष करीत आहेत. अस्पृश्यतानिवारणाचा व मंदिर-प्रवेशाचा कायदा सरकारनें मंजूर केला आहे; आणि पंढरपूर, आळंदी, नाशिक, वगैरे क्षेत्रांतील मुख्य देवालयांत अस्पृश्य जाती सनातनी हिंदूंचा विरोध आहे तरीहि, हक्कानें दर्शनास जाऊं लागल्या आहेत.

पूर्वी गांवाला महार हा अत्यावश्यक असे. अद्यापिहि त्याचीं कामें फारशीं विभागलीं गेलीं नाहींत. महाराकडे पुष्कळ प्रकारचीं कामें असतात. गांवच्या व शेतांच्या हद्दींचें संरक्षण तोच करतो; व पिकाच्या हंगामांत जें जें पीक तयार होतें, त्याजवरहि त्यालाच देखरेख ठेवावी लागते. गांवांत कोणी आला, किंवा गांव सोडून कोणी परठिकाणीं गेला, तर त्याला वाट दाखविण्याचें काम ह्यालाच करावें लागतें. क्वचित् प्रसंगीं वेठबिगार देखील ह्याच्यावरच पडते; आणि तसें झालें म्हणजे आलेली पेंड तो आपल्या गांवच्या हद्दीबाहेर कशी तरी पोहोंचवितो. पाटील, कुलकर्णी, तलाठी, ग्रामशिक्षक म्हणजे गांव-पंतोजी आणि इतर सरकारी नोकर, ह्यांचें टपालहि त्यालाच पोहोंचवावें लागतें. असें काम तो बहुतकरून हजरपेंढावर करतो; म्हणजे आपल्या हद्दींतील कामगिरी दुसऱ्या गांवापर्यंत पोहोंचवून, त्या गांवच्या महारास ती अन्यत्र न्यावयास सांगतो. याप्रमाणें विवक्षित स्थलावर ती पेंड पोहोंचेपर्यंत, गांवोगांवचे महार तीस हातबोट लावितात. ज्या ठिकाणीं अशी कामगिरी करण्यास महार उपलब्ध नसतात, किंवा जातीसंबंधींच्या अडचणींमुळें दुसरी एखादी कामगिरी उठविण्यास महारांचा तादृश उपयोग नसतो, तेव्हां गांवचे अन्यजातीय वेठे देखील, येईल ती कामगिरी उठवून, आपल्या गांवांतून ज्या दुसऱ्या ठिकाणीं ती जाण्याची असेल तेथपर्यंत ती पोहोंचवितात; आणि अशा प्रकारें

गांवोगांवच्या साहाय्यानें पडेल तें काम उठविण्याची जी तजवीज होते, तिलाच हजरपेंड म्हणतात.

परंतु अशा तऱ्हेनें दुसऱ्याच्या मदतीनें होण्याचीं कामें थोडींच असतात. बहुतेक महाराला स्वतःच तीं उठवावीं लागत असून, अशीं कामें पुष्कळ असतात असें म्हटलें तरी चालेल. हरएक कामकाजासंबंधीं कोणास बोलवावयाचें असल्यास गांवमहार हजर असला पाहिजे. कारण, त्याला गांवची माहिती चांगली असल्यामुळें, प्रत्येक कामांत त्याची जरूर लागते; व तो नसला तर मोठी अडचण पडून कामाचा बोभाट होतो. लागवड, ओशिक व पिकाचा निमताना, जंगलतपासणी, पैमाष पाहणी, बिगरहुकमी कबजा, घराचा झाडा, अहवालाचा तपास, गुन्ह्याचा तलास, इत्यादि सर्व कामांत त्यालाच अवश्य हजर राहावें लागतें.

पैमाषीसंबंधीं सांखळी ओढण्याचें काम तोच करतो, व तत्संबंधीं खुणांवर चुना घालण्याचा बोजाहि त्याच्याच शिरावर असतो. गांवांत एखादें गुरूं मेलें तर तें त्याला न्यावें लागतें; आणि हरएक प्रकारची दवंडी तोच पिटतो. याशिवाय, गांवांत कोणी सरकारी नोकर अथवा संभावित गृहस्थ आला तर, स्वयंपाकासाठीं फाटीं, व घोडे, बैल, इत्यादिकांसाठीं गवत, वगैरे त्यालाच पुरवावें लागतें. गुजराथ प्रांतांत महार नसून, तिकडे अशा प्रकारची कामगिरी धेड उठवितात, व ते सर्व महारांप्रमाणेंच उपयोगी पडतात. महाराचे कांहीं विशिष्ट हक्क पूर्वापार चालत आलेले होते. पण आतां गांवांतील महारांचे विशिष्ट हक्क कोणी मानीत नाहींत व त्यांच्या वरील कामांतील पुष्कळशीं कमीहि झालीं आहेत.

छत्रपति राजाराम महाराजांच्या वेळचा (सन १७०० चा सु.) माहजूर सेठी बिन नागनाक महार नांवाचा पाटील होता. यानें नागेवाडीच्या नागवडसिद्ध या देवाची पूजा करण्यासाठीं म्हणून धांडेघर व गौडाली येथील मोरोजी व चिंतामणि या दोन गुरवांना नागेवाडीसच कायमचें ठेवून घेतलें. परंतु या गुरवांनीं हळूहळू याची पाटीलकी बळकावली. त्यामुळें या दोघांत वाद सुरू होऊन हें प्रकरण परशुरामपंताकडे गेलें, व त्यांत मिळालेल्या पुराव्यांवरून याचें पाटिलकीचें वतन यास परत मिळालें. परंतु मोरोजी व चिंतामणि या गुरुवांनीं परत हें प्रकरण उकरून काढून छत्रपतींकडे महार पाटलाविरुद्ध फिर्याद ठोकून दाद मागितली. तेव्हां मोंगलाच्या ताब्यांतील वैराटगड सोडवून घ्यावा व नंतर महारांनीं नागेवाडीचें पाटिलकीचें वतन घ्यावें असा राजारामानें निकाल दिला. तदनुसार नागेवाडीच्या महारांनीं मोंगलांकडून वैराटगड काबीज केला व पाटीलकीचें वतन मिळवलें. पाटिलकीच्या वतनाबाबत नागेवाडी गुरवांत व महारांत तीन वेळां तंटे निर्माण झाले व प्रत्येक वेळीं फिर्यादी ठोकल्या गेल्या. शेवटीं हें महारांचेंच वतन ठरलें. याप्रमाणें मागें महारांनीं पराक्रमहि गाजविले आहेत.

**महाराजमृगांक**—एक आयुर्वेदीय रसायन. शास्त्रोक्त रीतीनें गंधकाचें मारण करावें, नंतर हिऱ्याचें भस्म करावें, मग रससिंदूर तयार करून त्यानें सुवर्णाचें भस्म करून ताम्र, कांत, नाग, वंग आणि अभ्रक हीं समभाग घ्यावीं. नंतर मौक्तिक भस्म सर्वांच्या समान घ्यावें, आणि रससिंदूराच्या दुप्पट गंधक व चतुर्थांश-परिमित टांकणखार घालून जवांचें कांजी करून त्यांत तें तीन दिवस खलावें. नंतर त्याचा गोळा करून तो सावलींत वाळवावा. मग तो शरावांत घालून चार प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर खलून ठेवावा. क्षयरोगाच्या नाशार्थ हें औषध मोहरीप्रमाण मध अथवा तूप, आणि पिंपळी, सुंठ व मिरें यांच्या चूर्णाशीं देऊन वर गाईचें धारोष्ण, किंवा शेळीचें दूध द्यावें. याप्रमाणें बेचाळीस दिवस सेवन केलें असतां क्षयरोगाचा समूळ नाश होतो (माधव चंद्रोबा–शब्दरत्नाकर).

**महाराष्ट्र**—व्युत्पत्ति–महाराष्ट्र या शब्दाची वास्तविक सरळ व्युत्पत्ति महा + राष्ट्र म्हणजे मोठें राष्ट्र अशी उघडच दृष्टीस पडते. परंतु आतांपर्यंत महाराष्ट्र या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल पुष्कळच चर्चा झालेली आहे. ही चर्चा विस्तारशः येथें देण्याचें कारण नाहीं व अवकाशहि नाहीं. तसेंच या व्युत्पत्तीची विस्तृत चर्चा शब्दकोशाच्या तिसऱ्या विभागाच्या प्रस्तावनेंत करण्यांत आली आहे. तेथें वाचकांनीं पाहावी. आतांपर्यंत या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल जीं निरनिराळीं मतें व्यक्त करण्यांत आलीं आहेत तीं पुढीलप्रमाणें आढळतात : १ डॉ. विल्सन—महा + राष्ट्र ही संस्कृत पंडितांची भाषाशास्त्रीय व्युत्पत्ति खरी, पण ऐतिहासिक व भौगोलिक व्युत्पत्ति महार + राष्ट्र म्हणजे महारांचें राष्ट्र (जसें गुर्जर + राष्ट्र = गुजरात; सौर + राष्ट्र = सोरट त्याप्रमाणें) व यास आधार 'गांव तेथें महारवाडा' ही म्हण. २. डॉ. ओप्पर्ट—मल्लराष्ट्र व महाराष्ट्र हे दोन्ही शब्द लोकवाचक असून मल्ल म्हणजेच महार व मल्लराष्ट्र हा शब्द प्रचारांतून जाऊन महाराष्ट्र तेवढा उरला व याप्रमाणें महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र. मल्ल नांवाचे रानटी लोक कांहीं ठिकाणीं आढळतात. ३ डॉ. भांडारकर—महाराष्ट्रिक याचा अपभ्रंश महारट्ठ व त्यावरून महाराष्ट्र. भोज, महाभोज याप्रमाणें. ४. राजारामशास्त्री भागवत–महाराठोड यावरून मऱ्हाटा हा शब्द बनला व त्याचा देश तो महाराष्ट्र. ५. वि. का. राजवाडे–राष्ट्रिक व महाराष्ट्रिक व त्यांपासून रट्ट व महारट्ट व त्यावरून महाराष्ट्र. ६. पां. वा. काणे—महाराष्ट्र तीन राष्ट्रांचा अथवा महाराष्ट्रांचा समूह असल्यामुळें महा म्हणजे मोठें राष्ट्र होय व त्यामुळें मोठें राष्ट्र म्हणून महाराष्ट्र.

याप्रमाणें मोठें राष्ट्र म्हणून महाराष्ट्र ही शेवटची व्युत्पत्ति ग्राह्य दिसते व तसें शब्दकोश–प्रस्तावनेंत म्हटलेंहि आहे. परंतु डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं डॉ. विल्सन व ओप्पर्ट यांस उचलून धरून महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र अशी व्युत्पत्ति ग्राह्य धरली आहे व आदिवासींवरून प्रदेशास नांव मिळतें असा सिद्धान्त काढून अमेरिकन इंडियन लोकांच्या नांवावरूनच कांहीं उत्तर अमेरिकेंतील प्रदेशांस नांवें मिळाल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत. पण आदिवासींवरून जितकीं स्थलनामें तयार होतात त्यांपेक्षां अधिक स्थलनामें नवागतांकडून मिळतात ही गोष्ट त्याच उत्तर अमेरिकेंतील न्यू यॉर्क, न्यू जर्सी, बोस्टन, न्यू इंग्लंड, फिलाडेल्फिया, वॉशिंग्टन, पेन्सिल्व्हेनिया, इत्यादि नांवांवरून दिसून येईल व भरतखंडांतहि नद्या, पर्वत व स्थलें यांस किती तरी नांवें नवागतांनींच दिल्याचें दाखवितां येईल. या महाराष्ट्रांतीलच गोदावरी, कृष्णा, पयोष्णी, नर्मदा, विंध्य, सह्य, सोनगिरी, नासिक्य, त्र्यंबकेश्वर, गोवर्धन, भद्रावती, विदर्भ, कुंतल, अश्मक, कौंडिण्य, इत्यादि अनेक नांवांवरून दाखवितां येईल. तसेंच महार शब्दाची व्युत्पत्ति काय तें या वरील पंडितांनीं दिलें नाहीं. तसेंच महाराष्ट्र हा शब्द बृहत्संहितेंत म्हणजे सहाव्या शतकांत प्रत्यक्ष आढळतो. त्यापूर्वी महार शब्दाचा उल्लेख कोठें येतो तें दाखविणें आवश्यक होतें. मल्लवरून महार निघणें शक्य नाहीं. तसेंच महाराष्ट्रांतील सर्वच गांवांत महारवाडा आढळत नाहीं. अनेक गांवांतून महारांची वस्ती नाहीं, एवढेंच नव्हे तर वतन चालविण्यासहि महार नाहींत हें दाखवितां येईल. तेव्हां महार शब्दावरून महाराष्ट्र या शब्दाची व्युत्पत्ति सिद्ध करण्यापेक्षा महा + राष्ट्र म्हणजे मोठें राष्ट्र हीच व्युत्पत्ति आमच्या मतें अधिक ग्राह्य होय यांत शंका नाहीं. व ही व्युत्पत्ति महानुभावी ग्रंथकारांनीं आपल्या आचार महाभाष्यांत मान्य केली आहे व 'महाराष्ट्र म्हणजे महंत राष्ट्र : म्हणौन महाराष्ट्र :' असें म्हटलें आहे.

महाराष्ट्राच्या मर्यादा—महाराष्ट्राचें मुख्य क्षेत्र म्हणजे ज्या प्रदेशांत मराठी भाषा प्रचलित आहे तें क्षेत्र होय. त्या दृष्टीनें पाहता पश्चिम समुद्रकिनाऱ्यावरील पोर्तुगीज अमलाखालीं असलेल्या दमण गांवापासून सुरुवात केल्यास दमणगंगा नदी ही सह्य पर्वत व समुद्र किनारा यांमधील भागापुरती मराठी भाषेची उत्तर मर्यादा होय. तेथून पुढें घाटमाथ्याकडे जाऊं लागलें म्हणजे भिल्ल व कोळी यांचा प्रदेश अन्तर्भूत करून ही सीमारेषा नर्मदा नदीपर्यंत उत्तरेकडे जाते व तेथून पुढें गुजराती व नेमाडी भाषा लागतात. याप्रमाणें नर्मदा नदीच्या अनुरोधानें पूर्वेकडे सिवणी – बालाघाटपर्यंत ही सीमारेषा जाते. नंतर पूर्वेकडे भंडारा जिल्हा प्रांतांत घेऊन व महारी वगैरे बोलींचा अन्तर्भाव करून ही सीमारेषा दक्षिणेकडे वळून चांदा जिल्हा अर्धा अन्तर्विष्ट करून तिरप्या दिशेनें सोलापूर–विजापुरास स्पर्श करून दक्षिणेकडे गोव्याच्या दक्षिण दिशेस कारवारपर्यंत जाते व तशीच खालीं समुद्रकिनाऱ्याची एक अरुंद पट्टी व्यापून अरबी समुद्रास जाऊन मिळते.

या प्रदेशांत आपणांस परिचित असे पुढील भाग अन्तर्भूत होतात : गोकर्ण, गोवें प्रांत, कोंकण, खानदेश, वऱ्हाड, मराठी मध्यप्रांत व बालाघाट, सिवणी व रायपूर जिल्ह्यांतील कांहीं भाग व संस्थानें, मराठवाडा, मध्य–दक्षिण महाराष्ट्र. तसेंच जिल्हावार पाहावयाचें झाल्यास कारवार जिल्ह्याची समुद्रकाठची पट्टी, बेळगांव जिल्ह्याचा कांहीं भाग, रत्नागिरि, कुलाबा, ठाणें, पुणें, अहमदनगर, सोलापूर, कोल्हापूर, सांगली, वगैरे संस्थानी प्रदेश, पूर्व व पश्चिम खानदेश, वऱ्हाडचे बुलढाणा, अकोला, उमरावती व यवतमाळ हे जिल्हे, तसेंच मध्यप्रांतांतील चांदा, वर्धा, नागपूर, भंडारा हे जिल्हे, व बालाघाट, सिवनी, छिंदवाडा, द्रुग, रायपूर याचा कांहीं भाग, बस्तर व छत्तिसगडमधील संस्थानें, तसेंच निजामशाहींतील औरंगाबाद, बीड, परभणी, नांदेड हे जिल्हे, व उस्मानाबाद व बेदर यांतील कांहीं भाग इतक्या प्रदेशास महाराष्ट्र हें नांव अलीकडे पण बऱ्याच दीर्घकाळापासून चालत आलेलें आहे.

प्राचीन काळीं या निरनिराळ्या भागांस निरनिराळीं नांवें होतीं, परंतु आज मराठी भाषेच्या या क्षेत्रांत असलेल्या प्रचारामुळें यास महाराष्ट्र ही स्वाभाविक संज्ञा प्राप्त झाली आहे. महाराष्ट्र या नांवानें या प्रदेशाचा उल्लेख प्राचीन वाङ्मयांत आढळत नाहीं. तथापि महाराष्ट्रांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या प्रदेशांचा उल्लेख बऱ्याच प्राचीन काळच्या वाङ्मयांत आढळून येतो. या दृष्टीनें पाहूं गेलें असतां आपल्या दृष्टीस प्रथम ही गोष्ट येते कीं, वैदिक संहिता वाङ्मयांत महाराष्ट्रात अन्तर्भूत होणाऱ्या कोणत्याहि प्रदेशाचा उल्लेख आढळत नाहीं. याचें कारण असें कीं, वैदिक संहितेंत, विशेषतः ऋग्वेदांत आढळणाऱ्या बहुतेक मंत्रांची रचना आर्य लोक भरतखंडात प्रवेश करण्याच्या सुमारासच झालेली होती. ऋग्वेदामध्यें सप्तसिंधूंचा प्रदेश व तत्संबद्ध कांहीं प्रदेश यांचाच फक्त उल्लेख आढळतो. गंगा, यमुना, वगैरे नद्यांचा उल्लेख दहाव्या मंडळांत व तोहि फार थोड्या वेळां येतो. यावरून संहिताकालांत आर्यांची वस्ती पंजाबच्या पूर्व दिशेकडे फारशी झालेली नव्हती हें उघड होतें. ब्राह्मणग्रंथ-रचनेच्या कालांत हिमालयापासून विंध्य पर्वतापर्यंत आर्यांची वस्ती पसरलेली होती व याच प्रांतास आर्यावर्त म्हणत. ऋग्वेदामध्यें मगध अथवा मगंध (ऋ. ३·५३·१४) यास अयाजक म्हणजे अनार्य असें म्हटलें आहे व अथर्ववेदांत मगध

लोकांस मात्य समजून आल्याचीं वस्त्रें व आयुधें मगध देशीय मनुष्यास द्यावीं असें सांगितलें आहे. महाराष्ट्रांत अन्तर्भूत होणाऱ्या विदर्भ अथवा वऱ्हाड या प्रदेशाचाच उल्लेख सर्वांत प्राचीन आढळतो व तो म्हणजे ऐतरेय ब्राह्मणांत होय. ऐतरेय ब्राह्मणांत वैदर्भ भीम याचा उल्लेख सोमवल्लीऐवजीं क्षत्रियांनीं कोणत्या रसाचें पान करावें यासंबंधींच्या चर्चेत आढळतो (ऐ. ब्रा. ७·३४·९). यानंतर जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत आढळतो व तेथील माशल अथवा रानकुत्रे वाघास ठार मारतात असें म्हटलें आहे व अद्यापिहि वऱ्हाडांत ही गोष्ट सांगण्यांत येते. बृहदारण्यकोपनिषदांत वैदर्भी कौण्डिण्याचा उल्लेख येतो व प्रश्नोपनिषदामध्यें एका वैदर्भी भार्गवाचा उल्लेख आढळतो.

पाणिनीच्या सूत्रांत दक्षिणेंतील देशांचा उल्लेख आढळत नाहीं. परंतु त्याच्या सूत्रांवर वार्तिकें लिहिणारा कात्यायन पाण्डय, माहिष्मत् या देशांचा व नासिक्य या नांवाचा उल्लेख करतो.

पेरिप्लसमध्यें दक्षिणापथ याचा उल्लेख दक्षिणबदेस असा केलेला आढळतो व फाहियान 'तक्षिन' या नांवानें दक्षिणेचा उल्लेख करतो. फाहियान यास अजंठ्याचे विहार संघाराम माहीत असावे असें वाटतें. महावंसो व दीपवंसो या सिंहली बखरींत तिसऱ्या बौद्ध संगीतीचा अध्यक्ष मोग्गलिपुत्र यानें महारछ, अपरान्त व वनवासी या प्रदेशांत बौद्ध प्रचारक पाठविल्याचें नमूद केलेलें आढळतें. विनयपिटकांतहि या तीन प्रदेशांचा उल्लेख आढळतो. अशोकाच्या शासनांत रास्टिक, पेतनिक व अपरान्त या प्रदेशांत धर्मप्रचारक पाठविल्याचा उल्लेख आहे. यांतील रास्टिक व राष्ट्रिक व पर्यायानें रट्ठ अथवा महारट्ठ म्हणजेच महाराष्ट्र याबद्दल असण्याचा संभव आहे.

पाणिनीच्या सूत्रामध्यें जरी दक्षिणापथाचा उल्लेख नसला तरी अश्मक या महाराष्ट्रांतील एका भागाचा उल्लेख आहे व तो कलिंग शब्दाबरोबर आहे. अश्मक हा प्रदेश खानदेश अथवा अजंठ्याच्या आसपासच्या प्रदेशाबद्दल योजलेला आढळतो व कलिंग हा अर्थात् त्याच्या पूर्वेकडील गोदावरी व कृष्णा यांच्यामधील प्रदेश होय.

बौधायन स्मृतींत दक्षिणापथाचा उल्लेख अवन्ति, अंग, मगध, सुराष्ट्र यांच्याबरोबर उल्लेख करणाऱ्या एका गाथेमध्यें आढळतो. कौटिलीय अर्थशास्त्रांतहि हैमवतपथापेक्षां दक्षिणापथ श्रेष्ठ असें कौटिल्याचें मत आढळतें. महाभारतांत अर्थात् दक्षिणापथाचा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतो.

नाणे घाटांतील शिलालेखांत महारठींचा राजा वेदिश्री होता असें नमूद केलेलें आढळतें (खि. पू. २०७). यानंतर रामायणांत, पातंजल महाभाष्यांत, क्षत्रप रुद्रदामन् याच्या गिरनार शिलालेखांत, नाशिक येथील शिलालेखांत व समुद्रगुप्ताच्या शिलालेखांत दक्षिणापथाचा निर्देश केलेला दृष्टीस पडतो.

दण्डकारण्य—रामायणामध्यें राम वनवासास गेला असतां दंडकारण्यांत पंचवटी येथें राहिला होता असें म्हटलें आहे. हें दण्डकारण्य म्हणजे विन्ध्य पर्वताच्या दक्षिणेस कृष्णा नदीपर्यंत पसरलेलें जें घनदाट अरण्य होतें तें असावें. महाभारतांतील वनपर्वांतील वर्णनावरून मध्य हिंदुस्थानच्या दक्षिणेस व तापी आणि पयोष्णी या नद्यांच्या आसमंतात् दण्डकारण्य असावें असें दिसतें. विजापूर जिल्ह्यापैकीं ऐहोळ, बदामी, बागलकोट, वगैरे आठ स्थानें दण्डकारण्यांत असावीं असें मुंबई गॅझेटिअरमध्यें (ग्रंथ २३, पृ. ३५८) उल्लेखिलेलें आढळतें. मार्कण्डेय पुराणांत विदर्भ व दण्डक यांचा एकत्र उल्लेख असल्यामुळें हे दोन्ही प्रांत निकट असावे असें वाटतें. पेरिप्लसमध्यें दक्षिण भारताच्या किनाऱ्यापासून दूर आंत मोठीं अरण्यें व पर्वत असल्याचे उल्लेख आहेत. हेमाद्रीनें देवगिरि असलेला सेउणदेश दण्डकारण्यांत आहे असें म्हटलें आहे. समुद्रगुप्ताच्या प्रयाग येथील स्तंभलेखावर दक्षिणापथांतील महाकांताराचा उल्लेख आहे तें दण्डकारण्यच असलें पाहिजे.

अपरान्त अथवा कोंकण—कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत अपरान्त व हिमालय यांत फार पाऊस पडतो असें वर्णन आहे त्यावरून अपरान्त म्हणजे कोंकणचा प्रदेशच असला पाहिजे. महाभारतांत आदिपर्वांत अर्जुन-तीर्थयात्रेच्या वर्णनांत अपरान्त हा गोकर्ण व प्रभास यांच्या दरम्यान आहे असें वर्णन येतें. तसेंच रघुदिग्विजयांत केरळानंतर अपरान्त जिंकल्याचा उल्लेख आहे. त्यावरून अपरान्त म्हणजे कोंकण निश्चित होतें.

विदर्भ—विदर्भ या शब्दापासूनच जरी वऱ्हाड हा शब्द बनला असला तरी सध्यांचा वऱ्हाड हा प्राचीन विदर्भाचा केवळ एक भाग आहे असें विदर्भाच्या प्राचीन ग्रंथांतील वर्णनावरून व निरनिराळ्या स्थळांच्या उल्लेखावरून वाटतें. उदाहरणार्थ, वऱ्हाड हा शब्द जसा विदर्भ शब्दावरून बनला आहे त्याचप्रमाणें बेदर हा शब्दहि विदर्भाचाच अपभ्रंश आहे. परंतु आजच्या लोकांच्या कल्पनेप्रमाणें बेदर हें शहर व प्रांत वऱ्हाडांत मोडत नाहीं; कारण तो निजामाच्या अमलाखालीं आहे.

पूर्वींच्या सर्व विदर्भाचा अंतर्भाव महाराष्ट्रांत होत होता ही गोष्ट नलचंपूवरून सिद्ध होते. विदर्भाची राजधानी कुंडिनपुर ही होती ही गोष्ट अनेक ग्रंथात नमूद केलेली आढळते; व कुंडिनपुर या नांवाचें एक गांव वर्धा नदीच्या कांठीं उमरावती जिल्ह्यांत आहे व तेथें एक देवीचें देऊळ असून त्या ठिकाणीं दरवर्षी मोठी जत्रा असते व या ठिकाणीं कांहीं प्राचीन अवशेषहि आढळण्यासारखे आहेत. या कुंडिनपुरावरून कौंडिण्य हें

नाव बनलें व 'विदर्भी कौंडिण्य' या नांवाच्या ऋषीचा उल्लेख बृहदारण्यकोपनिषदांत आढळतो (बृह. २-६-२). यावरून हें गांव किती जुनें आहे याची कल्पना येते.

महाभारतांत विदर्भाचा उल्लेख अनेक ठिकाणीं आलेला आहे. दमयंती ही विदर्भाची राजकन्या होती व तिला वनवासामध्यें नलराजा माहेरची वाट दाखवीत असल्याचा उल्लेख प्रसिद्ध आहे. त्या उल्लेखावरून विदर्भ देश हा दक्षिणापथाच्या जवळच व विंध्य पर्वताच्या दक्षिणेस असावा हें स्पष्ट होतें.

रामायणांतहि विदर्भ देशाचे उल्लेख, सगराची स्त्री केशिनी ही विदर्भ राजकन्या म्हणून बालकांडांत सीताशुद्धि प्रकरणात किष्किंधा काण्डांत आलेले आहेत. मार्कंडेय पुराणांत विदर्भाचा अन्तर्भाव दक्षिणापथांतच केला आहे. या पुराणांत महाराष्ट्र, नासिक्य व विदर्भ या तिघांचाहि उल्लेख आहे (अध्याय ५८). नासिक्य (नाशिक) शहराचा उल्लेख पतंजलीनेंहि महाभाष्यांत केला आहे व येथील लेणीं अशोकाच्या शिलाशासनांच्या खालोखाल ऐतिहासिक महत्त्वाचीं आहेत व त्या लेण्यांत नासिक्य, सुपारग (सोपारा), कलियन (कल्याण), पतिठाण (पैठण, प्रतिष्ठान), चेमुल्क (चौल), इत्यादि शहराचा उल्लेख आहे. यानंतर कालिदासाचा रघुवंश, भागवत, दशकुमारचरित, इत्यादि अनेक ग्रंथांत विदर्भाचा अनेक ठिकाणीं उल्लेख आढळतो.

कुंतल—यानंतर महाराष्ट्रांत अन्तर्भूत होणारा व प्राचीन काळीं भिन्न नांवानें परिचित असलेला देश म्हणजे कुंतल हा होय. बालरामायणांत विदर्भ व कुंतल यांचा एकत्र व महाराष्ट्रामधील म्हणून उल्लेख आला आहे. कुंतल हा कृष्णा व तुंगभद्रा यांच्यामधील प्रदेश होय. या प्रदेशांतील लोक अर्वाचीन मराठ्यांप्रमाणेंच उत्तम भालाईत म्हणून प्रसिद्ध होते. राजशेखरानें याचा पांड्य, कांची, चोळ, कर्णाट यांबरोबर उल्लेख केला आहे. यावरूनहि वर निर्दिष्ट केलेला प्रदेशच दिग्दर्शित होतो.

याप्रमाणें महाराष्ट्रामध्यें अन्तर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या प्रदेशांचा उल्लेख निरनिराळ्या ठिकाणीं व निरनिराळ्या काळीं आढळतो. परंतु महाराष्ट्र या शब्दाचा उल्लेख प्रथम वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत आढळतो. यानंतर ऐहोळ येथील रविकीर्तीच्या शिलालेखांत (इ. स. ६३४) महाराष्ट्रांत तीन राष्ट्रें व नव्याण्णव हजार गांवें असल्याचा उल्लेख आहे. चिनी प्रवासी ह्यॉन त्र्यँग (ह्युएनत्संग) यानेंहि महाराष्ट्राचा विस्तार वगैरे दिला आहे. अल्बेरुणीनेंहि मरहट्ट देशाचा उल्लेख केला आहे. परंतु या काळांत कोंकण हा स्वतंत्र प्रांत मानीत असावे असें दिसतें व कोंकण किनाऱ्यावरील बंदरांतून इतर देशांशीं मोठ्या प्रमाणांत व्यापार चालत असावा असें दिसतें.

महाराष्ट्राची वसाहत—महाराष्ट्राच्या क्षेत्रविस्ताराचें येथपर्यंत वर्णन करण्यात आलें, त्यावरून ही गोष्ट लक्षांत येईल कीं, महाराष्ट्राचा एकंदर क्षेत्रविस्तार बराच मोठा असून तो आज जरी भाषादृष्ट्या एकजिनसी व सलग दिसत असला तरी त्यामध्यें भौगोलिक दृष्ट्या निरनिराळे व निरनिराळ्या प्रकारचे प्रदेश अन्तर्भूत झाले आहेत. उदाहरणार्थ, कोंकण व अपरान्त हे प्रदेश समुद्रकांठीं असून मुख्य महाराष्ट्रापासून सह्य पर्वताच्या रांगेनें थोडेसे अलग झालेले आहेत. त्याप्रमाणेंच दक्षिणापथ अथवा दख्खनचा भाग हा सातपुडा पर्वताच्या दक्षिणेस असून गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या मध्यभागीं पठारासारखा अलग झालेला आहे व त्यास पोंचण्याकरितां असीरगड, गाविलगड अथवा अजंठा या घाटांतून पार व्हावें लागतें. खानदेशाचा भाग हा सातपुड्यानें व्याप्त असून तापी व गोदावरी यांच्यामध्यें व पूर्णा नदीच्या खोऱ्यानें व्याप्त आहे. वऱ्हाड अथवा विदर्भ हा खानदेशाच्या पूर्वेस असून सातपुडा व विंध्य यांच्या मध्यभागीं वसलेला आहे. यामुळें या निरनिराळ्या प्रदेशांत मनुष्याची वस्ती निरनिराळ्या काळीं व भिन्न भिन्न सांस्कृतिक अवस्थांत होत गेली असली पाहिजे.

आपणांस एकंदर भरतखंडाच्या वसाहतीवरून असें दिसतें कीं, या अवाढव्य देशांत प्रथम एका अथवा अनेक जातींच्या व भिन्न भिन्न सांस्कृतिक अवस्थेंतील वन्य लोकसमूहांची वस्ती होती. यांस आज आपण आदिवासी असें म्हणतों. या समाजांचे अवशेष अद्यापहि आपणांस डोंगरांतून व जंगलांतून कोळी, वारली, भिल्ल, रामोशी, ठाकूर, कातकरी, वगैरेंच्या रूपानें आढळतात. यानंतर द्राविड लोकांनीं हा सर्व भरतखंड एका काळीं व्यापला होता व दक्षिणेमध्यें विशेषतः द्राविड लोकांची वस्ती अद्यापहि बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आढळते हें आपणांस दिसून येतेंच. ब्राह्मणांचें जें पंचगौड व पंचद्राविड या दोन वर्गांमध्यें वर्गीकरण करण्यांत येतें, तें जरी शास्त्रीय नसलें तरी त्यावरून लोकांची समजूत व्यक्त होते व त्या वर्गीकरणांत महाराष्ट्र ब्राह्मणांस पंचद्राविडांत वर्गीकृत केलें आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. असो.

याप्रमाणेंच प्राचीन वन्य जातीनंतर द्राविड लोकांनीं या भरतखंडांत व विशेषतः दक्षिणेंत वसाहत करून आपलीं राज्यें स्थापन केलीं. त्यानंतर आर्य लोक वायव्येकडून भरतखंडांत आपली वैदिक संस्कृति बरोबर घेऊन प्रवेश करते झाले. आर्य लोक जेव्हां भरतखंडांत प्रवेश करीत होते तेव्हां त्यांचा मार्ग कांहीं सुकर व मोकळा नव्हता. त्यांस पूर्वी येऊन राहिलेल्या लोकांच्या विरोधास तोंड देऊन व त्यांच्यावर जय मिळवूनच या देशात वसाहत करावी लागली. हे आर्य लोकहि

कांहीं एकाच काळीं व एकाच समूहानें भरतखंडात आले नाहींत तर ते निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या टोळ्या-टोळ्यानीं भरतखंडांत येत गेले. त्यामुळें मागाहून येणाऱ्या आर्य लोकांस पूर्वीच्या वसाहत केलेल्या आर्येतर लोकांप्रमाणेंच प्रथम आलेल्या आर्य लोकांशींहि टक्कर देऊन व त्यांस जिंकून वसाहत करावी लागली. ही गोष्ट आपणांस ऋग्वेदादि वैदिक वाङ्मयांत जे सुदासादि राजांचे दाशराज्ञ युद्धादिकांमध्यें विजय वर्णन केले आहेत त्यावरून दिसून येतें. त्या काळात आर्य लोक वायव्य दिशेकडून सप्त सिंधूच्या प्रदेशांत प्रवेश करीत व वसाहत करीत असलेले दृष्टीस पडतात व त्यांच्या इतर आर्य राष्ट्रांशीं व अनार्य दस्यु, असुर, राक्षस, पक्थ, भलानस, वगैरे अनेक लोकांशीं लढाया चालू असलेल्या दिसून येतात. आर्यांच्या संस्कृतीचा प्रसार उत्तर हिंदुस्थानांतच होण्यास बराच दीर्घ काळ लागला व तो मगधापर्यंतहि फारसा पोंचला नाहीं. मगध देशात त्या वेळीं आर्येतर व्रात्य लोक राहत होते व ते अयाजक होते. कलिंग देशांत तर ब्राह्मणांचें दर्शनहि होत नव्हतें. कर्मनाशा नदी ओलांडून जो पूर्वेस जाईल तो कर्मभ्रष्ट अथवा आचारहीन होत असे अशी समजूत अर्वाचीन कालापर्यंत प्रचलित होती. हिमालय व विंध्य यांच्यामधील प्रदेशासच केवळ आर्यावर्त समजत असत.

परंतु या आर्यावर्तांत जेव्हां लोकवस्तीची दाटी झाली तेव्हां या आर्यांपैकीं कांहीं साहसप्रिय व धैर्यवान् लोक दक्षिण भारताकडे यावयास निघाले. परंतु त्यांच्या मार्गांत विंध्य पर्वताची अडचण होती. हा पर्वत ओलांडण्याचें कार्य प्रथम अगस्त्य ऋषीनें केलें. या ऋषीनें प्रथम दक्षिण भारतांत प्रवेश करून आपला आश्रम स्थापन केला. अगस्त्य ऋषीनें आपलें भारतीय अथवा आर्य संस्कृतीच्या प्रसाराचें कार्य दक्षिण भारतांत बरेंच दूरवर केलें असलें पाहिजे. कारण दक्षिण हिंदुस्थानांत बऱ्याच दूरवरच्या प्रदेशांत त्याचें नांव धारण करणारीं तीर्थें, क्षेत्रें व अन्य स्थलें अनेक ठिकाणीं आढळतात. राम जेव्हां प्रथम दक्षिणेकडे आला तेव्हां त्यास अगस्त्य ऋषीचा आश्रय प्रथम लागला व नंतर अत्रि ऋषीचा आश्रम लागला. दक्षिण भारतांत अगस्त्यमलय, अगस्त्यतीर्थ हीं स्थानें वरील गोष्टीचें प्रत्यंतर देत आहेत.

अगस्त्य कुळाप्रमाणेंच ज्या दुसऱ्या एका महत्त्वाच्या आर्य कुलानें दक्षिण भारतांत आर्य संस्कृतीचा प्रसार केला तें म्हणजे भृगूंचें होय. भृगुगोत्रांतील ऋषी हे अत्यंत प्राचीन गोत्रांपैकीं एक होत. कारण यज्ञसंस्थेचे आद्य प्रणेते म्हणून ज्या आंगिरस ऋषींचा उल्लेख येतो त्यांच्या महत्त्वाच्या प्रथम दोन शाखा झाल्या. त्या भृग्वांगिरस व अथर्वांगिरस या होत. अथर्व यानें प्रथम अग्नीचें मंथन केलें ही उक्ति ऋग्वेदांत प्रसिद्ध आहे. हें अथर्वकुल इराणी व आर्य म्हणजे अवेस्तिक व वैदिक लोक एकत्र होते तेव्हांपासून यज्ञसंस्थेचें पुरस्कर्तें म्हणून प्रसिद्ध होतें. याचीच एक शाखा भृग्वांगिरस ही होय. या भृगुकुलांत असुरांचा प्रसिद्ध पुरोहित शुक्राचार्य हा आपल्या अद्वितीय ज्ञानानें सर्व वैदिक वाङ्मयांत प्रसिद्धच आहे. याच कुलाची एक शाखा कौशिक ही असून तीमध्यें विश्वामित्र हा प्रतिसृष्टिकर्ता ऋषि उत्पन्न झाला. आपल्या वैद्यकीय ज्ञानानें वार्धक्यांत तारुण्य प्राप्त करून घेणारा च्यवन भार्गव हाहि भृगुकुलांतच उत्पन्न झाला होता. या भृगुकुलांतील लोकांनीं विशेषतः पश्चिम किनाऱ्यावर आपल्या बऱ्याच वसाहती स्थापन केल्या. ही गोष्ट भृगुकच्छ अथवा भडोच या अत्यंत प्रसिद्ध अशा प्राचीन बंदराच्या नांवावरून आपणांस प्रतीत होते. याच कुलांत पुढें प्रसिद्ध परशुराम हा सहावा परमेश्वराचा अवतार मानला जाणारा पुरुष उत्पन्न झाला व त्यानें सह्य पर्वतापलीकडील सर्व किनाऱ्याच्या पट्टीवर वसाहती स्थापन केल्या. कोंकणास परशुराम क्षेत्र असेंच नांव आहे व त्याच्या दक्षिणेकडील मलबार किनाऱ्यावरील सर्व प्रदेश व केरळ प्रांत यांची वसाहत परशुरामानें केली ही गोष्ट सांगणारीं पुराणें दक्षिणेंत अनेक प्रचलित आहेत. परशुरामाचीं देवळेंहि या प्रदेशांत आहेत. परंतु परशुरामानें केवळ समुद्र किनाऱ्यावरच आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें असें नव्हे तर पूर्वेकडे महेन्द्र पर्वतापर्यंत आपला प्रभाव पाडला. त्यामुळें महेन्द्र पर्वतावर परशुरामाची वस्ती असून तेथून त्यानें पश्चिमेकडे आक्रमण केलें व सह्याद्रि ओलांडून पलीकडील किनाऱ्याची पट्टी मानववसाहतीस योग्य केली, अशा कथा प्रचलित आहेत. रामाची व परशुरामाची भेट महेन्द्र पर्वतावरच झाल्याचा उल्लेख आहे व रामानें दण्डकारण्यांत प्रवेश करतांना विन्ध्य पर्वत ओलांडून न जातां पूर्वेकडून त्याला वळसा घालून दक्षिणेंत प्रवेश केला असावा असें दिसतें. दक्षिणेकडून काशीयात्रेस जाण्याचा मार्ग नागपूरकर भोंसल्यांच्या अमदानीपर्यंत सरळ उत्तरेकडे विन्ध्य पर्वत ओलांडून न जातां बिलासपुराजवळील रतनपूर या तेथील प्राचीन राज्याच्या राजधानीवरून होता, ही गोष्ट ऐतिहासिक कागदपत्रांवरून सहज उघड होत आहे.

भृगुवंशीयांनीं महाराष्ट्रांत वसाहत केल्याचा पुरावा आपणांस भृगु अथवा भार्गव या नांवाशीं संबद्ध अशा अनेक ग्रामनामांवरून व तीर्थक्षेत्रांवरून मिळतो.

याप्रमाणें महाराष्ट्रांत, दक्षिणापथांत व दण्डकारण्यांत जी आर्यांची वसाहत झाली ती कांहीं आर्य समुद्रतीरावर समुद्रमार्गें येऊन स्थायिक झाले व कांहीं विन्ध्य पर्वतास वळसा घालून पूर्वेकडून येऊन स्थायिक झाले अशा दोन मार्गांनीं झालेली दिसते. हे आर्य ज्या काळांत दक्षिणेंत आले त्या काळांत बहुधा

शुक्ल यजुर्वेदाचा प्रादुर्भाव झाला नसावा; कारण तैलंगणात व महाराष्ट्रांतच विशेषतः तैत्तिरीय शाखी ब्राह्मण आढळतात. तसेंच शाकल संहितेचे व ऐतरेय ब्राह्मणाचे अनुयायी व त्याचा यज्ञविधीच्या वेळीं स्वीकार करणारे लोक तैत्तिरीय शाखेच्या अध्वर्यूंचें वरण करितात. उलट पक्षीं उत्तरेकडे विशेष प्रचलित असलेल्या वाष्कल शाखेचे व शांखायन ब्राह्मणाचे अनुयायी अध्वर्युत्वाकरितां शुक्ल यजुर्वेदानुयायी पण बहुधा माध्यंदिन ब्राह्मणाचें वरण करतात. यावरून शुक्ल यजुःशाखा निर्माण होण्यापूर्वी दक्षिण भारतांत व विशेषतः तैलंगण आणि महाराष्ट्र या भागांत आर्यांची वसाहत झालेली असावी. इतरहि कृष्णवेदाच्या चरक, मैत्रायणी, इत्यादि शाखा महाराष्ट्रांतच प्रचलित असलेल्या दिसतात, तशा इतरत्र आढळत नाहींत. यानंतर कांहीं कालानें शुक्ल यजुर्वेदाचे अनुयायी आर्य महाराष्ट्रांत वसाहत करण्याकरितां आले असावे.

ज्याप्रमाणें आर्यांचें आगमन भरतखंडांत एकाच वेळीं न होतां अनेकदां व एकामागून एक अनेक टोळ्यांनीं दीर्घकालपर्यंत होत होतें त्याप्रमाणें दक्षिणेमध्यें अथवा महाराष्ट्रांतहि आर्यांचें आगमन दीर्घकालपर्यंत व टोळ्याटोळ्यांनींच होत राहिलें. परंतु उत्तरेकडे आर्य ज्या प्रमाणांत आले तितक्या मोठ्या प्रमाणांत ते दक्षिणेकडे आले नाहींत. त्याप्रमाणें दक्षिण भारतांत विशेष विकास व प्रसार पावलेली द्राविड संस्कृति उत्तरेकडे त्या मानानें विशेष प्रसार पावली नसावी किंवा तितकी दृढमूल झाली नसावी. ज्याप्रमाणें आर्यांच्या संस्कृतीचा प्रसार उत्तरेकडून दक्षिणेकडे होत गेला त्याप्रमाणें द्राविड संस्कृतीचा प्रसार दक्षिणेकडून उत्तरेकडे होत गेला असला पाहिजे व आर्य संस्कृतीचा प्रसार भरतखंडामध्यें वायव्येकडील प्रांताकडून होत गेल्यामुळें त्या केन्द्रापासून जर पंख्यासारखी आकृति काढली तर त्या आकृतीप्रमाणें आर्य संस्कृतीचा प्रसार झालेला आपणांस दिसून येतो. त्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें मगध देश व त्यापलीकडील वंग, कालिंग, आसाम, वगैरे प्रदेश यांमध्यें आर्य संस्कृतीचा प्रसार फारसा झालेला नसून तेथील मूळ संस्कृतीचा प्रभावच तेथें कायम राहिला व अद्यापहि तो तेथें दिसून येत आहे. आसाममध्यें नाग, जैंतिया, खासी, वगैरे राष्ट्रजातींत अद्यापहि आर्यपूर्व आचारविचार प्रचलित आहेत. तेथें अद्यापि कांहीं जातींत मातृकन्यापरंपरा चालू आहे; त्याप्रमाणेंच दक्षिणेकडे महाराष्ट्र हा जवळजवळ आर्य-द्राविड संस्कृतीच्या संघर्षाचा सीमा प्रांत आहे. त्यामुळें महाराष्ट्रांत आर्य व द्राविड संस्कृतींचें मिश्रण आढळून येतें. याहून पूर्वेकडे तेलंगण व दक्षिणेकडे कर्नाटक, तामिळ, मलबार, वगैरे प्रदेश यांत द्राविड संस्कृतीचें वर्चस्व आढळतें. उत्तरेकडे ब्राहुई भाषा बोलणाऱ्या लोकांचा प्रदेश हा एका कालीं द्राविड संस्कृतीचा प्रसार झाल्याची सीमारेषा होय. महाराष्ट्रामध्यें द्राविड संस्कृतीच्या झालेल्या परिणामाचा विशेष अवशेष म्हणजे मातुलकन्या-परिणय हा होय. उत्तरकालीं आलेल्या आर्यांनींहि या चालीचा एका कालीं स्वीकार केला असला पाहिजे ही गोष्ट कांहीं जातींत बहीण भावाच्या मुलीकरितां मागणी घालते या चालींत दिसून येते. याच्याउलट नंतर आलेल्या शुक्लयजुःशाखीय ब्राह्मणांत याची प्रतिक्रिया अथवा द्राविड संस्कृतीपासून शक्य तों अलग राहण्याच्या वृत्तीमुळें मातुलगोत्र विवाहासहि वर्ज्य मानण्याची प्रथा दृष्टीस पडते. यावरून महाराष्ट्रामध्यें प्रथम आर्यांचा प्रवेश शुक्लयजुःशाखेच्या स्थापनेपूर्वी झालेला असून तो तेलंगणामार्फत झाला असावा व नंतर पूर्व व पश्चिम या दोन्ही दिशांकडून महाराष्ट्रांत वसाहत झाली असावी, असें दिसतें. अर्थात् या वसाहतकर्मांत उत्तरकालीं येणारे लोक वरचढ असून त्यांनीं पूर्वकालीन लोकांस चांगल्या सखल व सुपीक प्रदेशांतून रुक्ष, नापिक व डोंगराळ भागांत हांकून दिलें व स्वतः चांगल्या भूमीचे मालक बनले. अर्थात् या क्रमामध्यें अगदीं प्राथमिक अथवा वन्य संस्कृतीच्या लोकांस सर्वांत निकृष्ट स्थलीं जावें लागलें व तदनंतरच्या लोकांस त्यांच्या त्यांच्या आगमनकालाप्रमाणें अथवा बलाबलाप्रमाणें स्थान मिळालें.

याप्रमाणें महाराष्ट्राची वसाहत अत्यंत प्राचीन काळापासून प्रथम वन्य लोक, नंतर द्राविड लोक व त्यानंतर आर्य लोक यांच्या दीर्घकालपर्यंत पसरलेल्या व निरनिराळ्या काळीं झालेल्या आगमनानें होत गेली व या सर्व गोष्टींचा परिणाम त्यांचे आचार, विचार, चालीरीती, धार्मिक विधी व संप्रदाय आणि भाषा व पोषाख यांच्या बाबतींत दिसून येतात.

याप्रमाणें महाराष्ट्राची वसाहत होण्यास एकंदर बराच दीर्घकाल लागला असला पाहिजे. तसेंच महाराष्ट्राचे निरनिराळे भागहि निरनिराळ्या कालांत वसत गेले असले पाहिजेत, ही गोष्ट पूर्वी जे निरानिराळ्या भागांचे उल्लेख निरनिराळ्या काळच्या वाङ्मयांत आढळून येतात त्यांवरून उघड होईल. महाराष्ट्रापैकीं विदर्भ हा मात्र सर्वांत प्रथम वसला असला पाहिजे; कारण तो भाग सपाट असून तेथील जमीन सुपीक आहे व तो वर्धा, पूर्णा, वगैरे नद्यांमुळें शेतकी करून राहण्यास अनुकूल आहे. म्हणूनच वैदर्भ लोकांचे उल्लेख आपणांस प्राचीन वाङ्मयांत बरेच आढळतात. त्या मानानें दख्खन अथवा दण्डकारण्य किंवा दक्षिणापथ हा भाग त्यानंतर वसला असला पाहिजे; कारण तेथें बऱ्याच दीर्घकालपर्यंत दाट जंगल होतें व त्याचा बराचसा भाग सातपुडा या पर्वतानें व्यापलेला आहे. म्हणूनच याच्या कांहीं भागास अश्मक असें नांव पडलें असावें. या दण्डकारण्यांतहि

नाशिकजवळचा व गोदावरी नदीकांठचा भाग खानदेशपेक्षां अधिक लवकर सुसंस्कृत झाला असला पाहिजे. रामाचा वनवासांतील आश्रम नाशिकजवळच गोदावरीच्या उत्तर तीरावर पंचवटी येथें होता व तो त्या ठिकाणीं येत असतां वाटेंत त्यास कोणकोणत्या ठिकाणीं ऋषींचे आश्रम व शबरादिकांची वसती लागली, व खरदूषणादि राक्षसांपासून अथवा वन्य लोकांपासून कसा उपद्रव झाला याचें वर्णन रामायणांत आढळतें. स्वतः राम सीतेचें हरण होईपर्यंत गोदावरीच्या दक्षिणेकडे आला नाहीं व सीतेचा शोध करण्याकरितांच त्यास तुंगभद्रा नदीपर्यंत अथवा हंपी अथवा पंपा सरोवर व ऋष्यमूक पर्वत व किष्किंधा यांपर्यंत जावें लागून तेथील सुग्रीवादि वन्य लोकांच्या साहाय्यानें लंकेवर स्वारी करून सीतेस परत आणावें लागलें. या प्रसंगीं सीताशुद्धीच्या निमित्तानें दक्षिणेंतील स्थलांचा परिचय आपणांस होतो. यानंतर दक्षिण महाराष्ट्रामध्यें आर्यांची वस्ती वाढत जाऊन आर्यांच्या संस्कृत भाषेपासून निघालेल्या महाराष्ट्री, वगैरे प्राकृत भाषांचा प्रसार या भागांत होऊन वैदर्भी रीतीस व महाराष्ट्री प्राकृतास वाङ्मयांत अग्रस्थान मिळालें. याप्रमाणें एकभाषी महाराष्ट्र प्रांताची वसाहत दीर्घ कालानंतर स्थापन होऊन तीमध्यें एका विशिष्ट संस्कृतीचा जन्म झाला व त्या संस्कृतीचें वैशिष्ट्य आजहि आपणांस महाराष्ट्रांत दिसून येतें.

अर्थात् या दीर्घकालांत महाराष्ट्रभूमींत आर्य, द्राविड व इतर अनेक वंशीय व अनेक भिन्न भिन्न संस्कृतींतील लोकांचा संघर्ष झाला व त्या सर्वांचें मिश्रण होऊन एकजिनसी अशी महाराष्ट्र भाषी महाराष्ट्र संस्कृति निर्माण झाली. तीमध्यें अनेक राष्ट्रें, जाती व संस्कृतींचा अंश असला तरी संस्कृत भाषा व आर्य संस्कृति यांचें आधिक्य आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

महाराष्ट्रांतील प्राचीन समाजस्थिति—एकंदर भरतखंडामध्यें जी समाजव्यवस्था व सामाजिक चालीरीती व व्यवहार दृष्टीस पडतात त्यांपेक्षां महाराष्ट्रांत फारशी भिन्न समाजस्थिति आढळून येत नाहीं. महाराष्ट्रामध्यें पूर्वी सांगितल्याप्रमाणें तीन निरनिराळ्या भिन्न समाजांचें व भिन्न भिन्न सामाजिक कल्पनांच्या लोकांचें मिश्रण झालेलें आहे. अगदीं प्रथम येथें अत्यंत प्राचीन काळापासून वस्ती करून असलेले वन्य मानवसमाज, नंतर द्राविड वंशांतील व संस्कृतींतील कांहीं मानवसमाज व त्यानंतर आर्य मानववंशीय व आर्य संस्कृतीशीं एकजीव झालेले कांहीं समाज; असे या समाजांत तीन थर असून ते या प्रदेशांत एकामागून एक भिन्न भिन्न कालीं येऊन राहिले. कालांतरानें या सर्व समाजांचें एका सांस्कृतिक व सामाजिक समूहामध्यें संघटन झालें, परंतु त्या समाजांतील सर्व लोक एकरूप बनले असें नव्हे. विशेषतः सर्वांच्या नंतर आलेल्या आर्य लोकांनीं असें एक सामाजिक तत्त्वज्ञान निर्माण केलें कीं, या प्रदेशांत अथवा सर्व भरतखंडांत राहणाऱ्या अथवा पूर्वीपासून वसत असलेल्या व नंतर येऊन राहिलेल्या सर्व राष्ट्रजाती अथवा लोकसमूह हे मूळ एकाच मानववंशापासून उत्पन्न झाले असून ते भिन्न भिन्न कालीं भिन्न भिन्न कारणांमुळें परस्परांपासून अलग झाले व निरनिराळ्या सांस्कृतिक अवस्थांप्रत प्राप्त झाले. याकरितां त्यांनीं अनेक पौराणिक कथा उत्पन्न केल्या. उदाहरणार्थ, विश्वामित्रानें आपल्या पन्नास पुत्रांस शुनःशेपास आपल्यांत न घेण्याबद्दल चांडाल अथवा हीन योनीप्रत पावाल असा शाप दिला. ययातीचे यदु, पुरु, अनु, द्रुह्यु, तुर्वश असे पांच पुत्र असून त्यांपासून हे पांच लोक अथवा राष्ट्रें निर्माण झालीं.

अंध नांवाच्या ऋषीपासून अंग, वंग, कलिंगादि लोक निर्माण झाले. या सर्व गोष्टी निरनिराळ्या राष्ट्रांच्या वास्तविक उत्पत्तिविषयक नसून निरनिराळ्या लोकांस एका समाजांत निगडित करण्यासाठीं रचलेल्या एकवंशसंभव वर्णन करणाऱ्या पौराणिक कथा होत.

याप्रमाणें आर्य लोकांनीं निरनिराळ्या समाजांस एकवंशसंभवत्व देऊन, कोणास—उदाहरणार्थ, निषाद स्थपतीस—यज्ञामध्यें यजमान होण्याचा अधिकार देऊन, रथकार वगैरेसहि यज्ञामध्यें यजमानत्व देऊन, मात्यांस संस्कारार्ह करून अनेक लोकसमूहांस आपल्या समाजाचे घटक बनविलें.

अर्थात् हे निरनिराळे लोकसमूह निरनिराळ्या सांस्कृतिक अवस्थांतील होते. यामुळें त्यांस एकत्र निगडित करण्याकरितां एक प्रकारची कृत्रिम जातिपरंपरा निर्माण केली व ब्राह्मण व क्षत्रिय, क्षत्रिय व वैश्य, यांच्या किंवा यांच्या उलट विवाहामुळें निरनिराळ्या जातींची उत्पत्ति झाली असें तत्त्वज्ञान पुढें केलें.

या सामाजिक घटनेमध्यें प्रथम जसा यज्ञसंस्था व तदंगभूत गोष्टी यांचा उपयोग करण्यांत आला तसाच पुढें निरनिराळे पारमार्थिक संप्रदाय व निरनिराळे पंथ व त्यांच्या उपासनापद्धती यांचाहि उपयोग करण्यांत आला व निरनिराळ्या दैवतांस निरनिराळ्या देवतांचे कोठें अवतार तर कोठें अनुयायी अथवा गण, तर कोठें कांहीं तरी संबंध जोडून एकत्र निगडित करून एका परंपरेंत आणून बसविण्यांत आलें. या क्रियेमध्यें वैदिक, पौराणिक व ग्राम्य व क्षुद्र दैवतांचाहि अंतर्भाव करण्यांत आला. एवढेंच नव्हे तर बुद्धासहि विष्णूचा अवतार बनविण्यांत आलें.

याप्रमाणें अनेक निरनिराळ्या प्रकारच्या साधनांनीं व तत्त्वज्ञानानें व तत्त्वज्ञानाचा अर्थ उलगडून दाखविण्याच्या मिषानें भिन्न भिन्न लोकसमूहांस त्यांच्या त्यांच्या सांस्कृतिक

अवस्था व सामाजिक स्थानें यांस निगडित राहूनच एका मोठ्या समाजाचे घटक बनविण्यांत आलें. असा हा भिन्न भिन्न समूहांनीं बनलेला पण एकस्वरूपी समाज महाराष्ट्रांतहि बऱ्याच प्राचीन कालापासून अस्तित्वांत आला होता.

अर्थात् या समाजांतील चालीरीती व आचारविचार हे दीर्घकालापासून एकाच स्वरूपांत व भिन्न भिन्न समूहांत त्यांच्या त्यांच्या परंपरेप्रमाणें सतत चालत आलेले होते. त्यांमध्यें फारसा फरक पडलेला आढळत नाहीं. एवढेंच नव्हे तर इतक्या दीर्घकालानंतर व अनेक सामाजिक, धार्मिक व राजकीय क्रांती होऊन गेल्यानंतरहि फारसा फरक पडलेला अद्यापि दिसून येत नाहीं.

जातिभेद—याप्रमाणें महाराष्ट्रांतील सामाजिक स्थिति जवळजवळ आतांप्रमाणेंच होती. समाजांत चातुर्वर्ण्याच्या जागीं निरनिराळ्या जाती बनल्या होत्या व बौद्ध धर्माच्या परिणामामुळें चातुर्वर्ण्यविषयक संस्कारांचा लोप होऊन गेला होता. त्यामुळें समाजांतील क्षत्रिय व वैश्य या वर्गांचा बहुतेक लोप झाला होता. ब्राह्मणांपैकीं कांहीं लोक वेदाध्ययनादि करीत होते, परंतु बराचसा वर्ग गृहस्थ या नांवाखालीं मोडला जाऊन तो सरकारची सेवा व व्यापार करूं लागला होता. शेती व पशुपालन हे धंदेहि ब्राह्मण वर्ग बऱ्याचशा प्रमाणांत करीत होता व त्यास आनुषंगिक म्हणून सावकारीहि बऱ्याच वर्गांत प्रचलित झाली होती.

जैन वैश्यहि राजाच्या सेवेंत नोकरी करतांना आढळतात. तसेंच शूद्र लोकहि निरनिराळ्या व्यवसायांत गुंतलेले दिसून येतात. जरी जातिभेद प्रचलित होता तरी आंतरजातीय अनुलोम विवाह मान्य होते. परंतु पुढें पुढें असे आंतरजातीय विवाह हळूहळू अमान्य होत चालल्याचें दिसून येतें. आपस्तंब व बौधायन यांनीं भिन्नजातीय अन्नव्यवहार संमत मानला असला तरी पुढें पुढें तोहि अमान्य होत चालला असल्याचें दिसतें. एकत्रकुटुंबपद्धति त्या कालीं सर्वत्र रूढ होती; कारण तत्कालीन व्यवसाय बहुतेक कौटुंबिक व वंशपरंपरागत असत व त्यामुळें आर्थिक दृष्ट्या एकत्रकुटुंबपद्धति सोईची असे. तथापि हळूहळू या पद्धतीसहि फटी पडल्याचें दिसूं लागलें होतें व मिताक्षरेंतील दायभागाचे नियम या परिस्थितीचे द्योतक आहेत. पुत्राच्या अभावीं स्त्री व कन्या यांस वारसा मिळूं लागला होता; शिवाय स्त्रीस स्त्रीधनाचा हक्क असे.

चालीरीती—मुलगा सोळा वर्षांचा झाला म्हणजे प्रौढ व विवाहयोग्य समजण्यांत येई व मुलींचा विवाह बारा वर्षांपूर्वी होत असे. महाराष्ट्रांत मामेबहिणीशीं विवाह रूढ होता ही गोष्ट पूर्वी सांगितलीच आहे. स्त्रियांमध्यें पडद्याची चाल राज्यघराण्याखेरीज इतरत्र नव्हती. तसेंच सतीचीहि सक्ती नव्हती. विधवावपनाची चाल सतराव्या शतकापूर्वी नव्हती, पण टॅव्हर्नियरनें तिचा उल्लेख केला आहे यावरून ती त्या सुमारास रूढ झाली असावी. विधवाविवाह खालच्या जातींत होता व वरच्या जातींत तो शिष्टसंमत नव्हता.

जमिनीविषयीं वगैरे करारांवर साक्षी घालीत असत व ते सरकार दप्तरींहि ठेवण्यांत येत असत. मोठमोठीं इनामें वगैरेंचे लेख ताम्रपटांवर असत व हे पुराव्याकरितां जपून ठेवावे लागत; नाहीं तर हक्क मान्य केला जात नसे. तीन पिढ्यांच्या भोगवट्यानें मालकी हक्क उत्पन्न होत असे व नीलकंठाच्या मताप्रमाणें बहुतेक व्यवहार धर्मशास्त्रास अनुसरून होत असत.

मार्को पोलो व इब्न बतूता या प्रवाशांनीं या कालांतील लोकांच्या राहणीचें वर्णन केलें आहे त्यावरून त्यांचा पोशाख म्हणजे एक नेसण्याचें व एक पांघरण्याचें असें वस्त्र असे. शिवलेले कपडे फारसे प्रचारांत नसत. स्त्रिया मात्र शिवलेल्या चोळ्या घालीत.

इर्त्सिगनें बांबूच्या छत्र्या लोक वापरीत असें म्हटलें आहे, पण तीं बहुधा इरलीं असावीं. राष्ट्रकूट कालांत उपनाम म्हणून बहुतेक गोत्राचाच उल्लेख आढळतो. उत्तरकालीं यादवांच्या कालांत आडनांवें प्रचारांत आलीं असावीं व तींहि प्रथम विद्वत्वाच्या मर्यादेचीं निदर्शक असत; उदाहरणार्थ, पाठक, द्विवेदी, पंडित, दीक्षित, उपाध्याय, इ. .

राजांच्या दरबारीं व देवळांत सेवेकरितां नर्तिका असत. राम-नवमी, गोकुळ-अष्टमी, वगैरे उत्सवप्रसंगीं पौराणिक नाटकें करण्याची प्रथा होती. राजे लोक राखीव जंगलात शिकार करीत असत.

फलज्योतिष वगैरेंवर लोकांची श्रद्धा असे. देवतांस नवस करण्याचाहि प्रघात होता. तसेंच अपराध्यानें दिव्य करून आपलें निरपराधित्व सिद्ध करण्याचीहि प्रथा होती.

शिक्षण—त्या काळांत ब्राह्मण वेदशास्त्रादिकांचें अध्ययन करीत व वैश्य व व्यापारी लोक व्यवहाराकरितां लेखन-वाचन-गणितादि विषय शिकत असत. व्यावसायिक शिक्षण अनुभवानेंच प्राप्त होत असे. ब्राह्मणांस व्याकरणादि शास्त्रें अवगत असल्यास विद्वान् म्हणून मान असे. तसेंच धर्मशास्त्रादिकांचें ज्ञान असणारास न्यायाधीशासारख्या पदांवर नियुक्त केलें जात असे. देवालयें व मठ यांस जोडलेल्या विद्यापीठांतून तत्कालीं प्रचलित असलेल्या विषयांचें विशेष अध्ययन-अध्यापन चालत असे. या शिक्षकांचा योगक्षेम अशा देवालयादिकांतून चालत असे; व उत्सव, समारंभ, विवाह यांसारख्या प्रसंगीं त्यांची विशेष

संभावना करण्यांत येत असे. कांहीं विद्वान् वैद्यकी व दस्तऐवजादिकांचें लेखन यांवरहि अर्थप्राप्ति करून घेत असत.

व्यवसाय—त्या कालांत मुख्यतः शेती, वाणिज्य, उद्योगधंदे व मुलूखगिरी हेच अर्थसाधनाचे मार्ग होते. महाराष्ट्राची नैसर्गिक व भौगोलिक परिस्थिति त्या कालापासून आतांपर्यंत फारशी बदललेली नसल्यामुळें नैसर्गिक संपत्तीचीं साधनें आज आहेत तींच त्या वेळीं होतीं. अर्थात् कृषि व पशुपालन हेच मुख्य धंदे होते व कृषीमध्येंहि आज जीं निरनिराळ्या भागांत पिकें निघत आहेत तींच बहुतेक त्या काळांतहि निघत असत. भडोच हें त्या वेळीं व्यापाराकरितां प्रसिद्ध बंदर होतें व तेथून सूत, कापूस व कापड निर्यात होत असे. तसेंच, गुजरात व ठाणें या भागांतून नीळहि निर्यात होत असे. ठाणें व चेऊल येथून सुगंधी द्रव्यांची निर्यात होत असे. महाराष्ट्रांत बाजरी, ज्वारी व गळिताचीं धान्यें पिकत व कर्नाटकांत कापूसहि पिकत असे. कोंकणांत नारळ, सुपारी, वगैरे व म्हैसूरमध्यें चंदन, साग, वगैरे होत असत. महाराष्ट्राच्या बऱ्याच भागांत तांबें सांपडत असून त्यास पूर्वीं किंमतहि बरीच असे. सोनें व तांबें यांच्या किंमतींचें प्रमाण १ : ४८ असे. गोवळकोंडा, कडाप्पा, कर्नुळ, वगैरे ठिकाणीं हिऱ्याच्या खाणी होत्या. वस्त्रें विणण्याचा धंदा सार्वत्रिक असे व पेरिप्लुसच्या काळांत बरेंच कापड निर्यात होत असे. त्या वेळीं तगर, उज्जयिनी, पैठण व गुजरात हीं व्यापारधंद्याचीं मोठीं केन्द्रें होतीं. पैठणची पैठणी त्या वेळीं प्रसिद्ध होती.

महाराष्ट्रांत व दक्षिण गुजराथेंत कातडीं कमवण्याचा धंदाहि मोठ्या प्रमाणावर असून कमावलेलीं कातडीं व चामड्याच्या अनेक सुंदर वस्तू येथून निर्यात होत असत. पूर्वींच्या भडोच व कल्याण या बंदरांनंतर खंबायत, नवसरी, सोपारा, ठाणें, चौल, दामोळ, जयगड, देवगड, मालवण, वगैरे बंदरेंहि भरभराटीस आलीं व तेथून चालणाऱ्या व्यापारावर जकातीचें मोठें उत्पन्न होत असे.

व्यापार—भडोच बंदरामार्फत मोत्यें, खजूर, सोनें, गुलाम, शिसें, सुरमा, मद्यें, नाणीं, वगैरे अनेक वस्तू आयात होत असत. तसेंच बरेच घोडेहि तेथून येत असत. देशांतील सर्व मालाची ने-आण व प्रवास बैलगाड्यातून होत असे व त्या पाश्चात्य देशांतील गाड्यांपेक्षां अधिक सुखकर असत, असें टॅव्हर्निअरनेंहि म्हटलें आहे. याशिवाय बऱ्याच मालाची नेआण लमाण लोक बैल व घोडे यांच्या साहाय्यानें करीत. बहुतेक व्यवहार विनिमयरूपानें होत असे, पण नाण्याचाहि प्रचार हळूहळू वाढत होता. सरकारहि बहुतेक आपला वसूल मालाच्या रूपानें घेत असे. त्या काळांत द्रम्म, गद्याणक, कळंजु, कासु, सुवर्ण, इत्यादि नावाचीं सोन्याचीं व रुप्यांचीं नाणीं प्रचारांत आढळतात.

प्रत्येक धंद्याचें नियंत्रण त्या त्या धंद्याचें महाजन मंडळ करीत असे. अशीं महाजन मंडळें फार प्राचीन कालापासून अस्तित्वांत होतीं. हींच मंडळें धंद्यांतील उमेदवारांस शिकवून तयार करीत असत. सामान्यतः रोख व्यवहारांत व्याजाचा दर बारा ते पंधरा टक्के असे; पण धान्याच्या अथवा मालाच्या रूपांत पन्नास टक्केपर्यंत असे.

धर्म—मौर्यांच्या राजवटींत व अशोकानें केलेल्या पुरस्कारामुळें बौद्ध धर्माचा प्रसार जरी भरतखंडांत एका काळीं झाला होता तरी त्याच धर्माच्या अतिरेकी पालनामुळें प्रतिक्रिया होऊन बृहद्रथ राजाच्या कारकीर्दींत मौर्यांचा पाडाव होऊन शुंग, कण्वादि घराणीं स्थापन झालीं व त्यांनीं हिंदु धर्माचें पुनरुज्जीवन केलें. तथापि सामान्यतः दोन्ही धर्म दीर्घकालपर्यंत एकत्र नांदत होते. सामान्यतः पांचव्या शतकापासून परस्पराबद्दल सहिष्णुतेचा प्रचार होत चालल्याचें दृष्टीस पडतें व अनेक राजे एका धर्माचे अनुयायी असतांहि त्यांनीं इतर धर्मांस देणग्या दिल्याचा उल्लेख आढळतो. वाकाटक व चालुक्य घराण्यांतील राजांनीं हिंदु धर्माचा पुरस्कार करून अनेक अश्वमेधादि यज्ञ केल्याचे उल्लेख आहेत. बौद्ध धर्म सिंधमध्यें सातव्या शतकापर्यंत व बंगालमध्यें बाराव्या शतकापर्यंत प्रचलित असल्याचें दिसून येतें. दाक्षिणेंत जैन धर्महि बराच प्रभावी असलेला आढळतो. तथापि एकंदरींत परस्पर सहिष्णुतेच्या धोरणामुळें हे संप्रदाय जरी बरींच वर्षें टिकून राहिले तरी हळूहळू हिंदु धर्माच्या वर्चस्वामुळें ते मागें मागें पडत चालले व बौद्ध धर्म तर भारतांत नष्टप्रायच झाला; परंतु जैन धर्म कांहीं प्रमाणांत गुजराथ व महाराष्ट्राचा दक्षिण भाग यांत टिकून राहिला आहे. बौद्ध धर्माचा हळूहळू होत असलेला ऱ्हास चिनी प्रवासी फाहिआन, इत्सिंग व ह्युएनत्संग यांच्या प्रवासवृत्तांमध्यें दृष्टीस पडतो. जैन संप्रदायांत बरेच साधू व ग्रंथकार होऊन गेल्यामुळें व त्यांनीं लोकभाषेंत ग्रंथरचना केल्यामुळें त्यास अधिक स्थैर्य प्राप्त झालें.

भारतीयांची परमतसहिष्णुता यानंतर आलेल्या महंमदानुयायांच्या बाबतींतहि दृष्टीस पडते. पश्चिम किनाऱ्यावर व्यापारनिमित्तानें अनेक महंमदानुयायी बऱ्याच दीर्घकालापासून येत असत व तत्कालीन राजांनीं त्यांस प्रार्थनेसाठीं मशिदी बांधण्यास परवानगी दिलेली आढळते.

या मध्यकालीन हिंदु धर्माच्या पुनरुज्जीवनाचा परिणाम आपणांस उपासना, तत्त्वज्ञान व आचार यांवर झालेला दिसतो. कुमारीलभट्टानें यज्ञसंस्थेचा पुरस्कार केला. त्यापूर्वीं पतंजलीनेंहि असाच प्रयत्न केला होता व पुष्यमित्राकडून यज्ञ करविला होता. ही यज्ञाची परंपरा चालुक्य राजांच्या कालापर्यंत

चाललेली आढळून येते. परंतु पुढें बौद्ध व जैन यांच्या विशेष संसर्गामुळें श्रौत धर्म मागें पडून स्मार्त धर्माकडे लोक वळले. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांत रचलेल्या ब्रह्मसूत्रापासून तत्त्वज्ञानाची परंपरा विशेष वाढीस लागल्याचें दिसतें. या तत्त्वज्ञानाच्या अनुयायांनीं बौद्ध व जैन यांच्याशीं दीर्घकाल लढा चालविला होता. या पंथाचा अखेरचा पुरस्कर्ता श्रीशंकराचार्य हा होय. यानें संन्यासमार्गाचा पुरस्कार केला व आपल्या मतप्रतिपादनाकरितां चारी दिशांस मठ स्थापन केले. यांच्याकडे बऱ्याच उत्तरकालीं धर्मशास्त्राचे निर्णय देण्याचें काम आलें.

या कालांतील धर्माचें स्वरूप सामान्यतः स्मार्त, पौराणिक होतें व स्मृतिप्रणीत आचारांतहि बराच फरक झालेला होता. या कालांत व्रत व नियम यांची फार वाढ झालेली दिसून येते. या व्रतांस बहुतेक पुराणांचे आधार आढळतात. हेमाद्रीच्या व्रतखंडांत अनेक व्रतांची माहिती दिली आहे.

पुराणग्रंथांच्या लोकप्रियतेमुळें लोकांमध्यें सगुण उपासनेची वाढ झालेली दिसून येते. याबरोबरच भक्तिसंप्रदायहि वाढत गेलेला आढळतो. यामुळें अनेक देवतांचीं देवालयें बांधण्याची प्रथा वाढत चाललेली दृष्टीस पडते. पंढरपूरच्या विठोबाचें देऊळ या वेळीं बरेंच प्रसिद्ध असावें असें वाटतें. आतां-प्रमाणें त्या वेळींहि खालच्या वर्गांत ग्रामदेवतांची व क्षुद्र देवतांची उपासना चालू होती असें दिसतें. अर्थात् निर-निराळ्या देवतांप्रमाणें निरनिराळे पंथहि या वेळीं स्थापन झाले होते असें दिसतें. कांहीं देवालयांस जोडून विद्यालयें चालविण्यांत येत असत व गोरगरिबांस अन्नदान करण्यांत येत असे. या देवालयांत मधून मधून उत्सव-समारंभ होत असत व त्यांबरोबर लहानमोठ्या जत्राहि भरत असत.

पुराणग्रंथांतून निरनिराळ्या तिर्थींचें व क्षेत्रांचें माहात्म्य वर्णन केलेलें आढळतें. यावरून तीर्थयात्रा करण्याचा प्रघात या वेळीं विशेष असावा असें दिसतें. या दृष्टीनें महाराष्ट्रांतील नाशिक, पंढरपूर, इत्यादि क्षेत्रें प्रसिद्ध आहेत. महाराष्ट्रांत बौद्ध व जैन संप्रदायानंतर कलचुरी राजांच्या अमदानींत लिंगायत धर्माचा पुरस्कार झाल्याचें दिसून येतें व यादवांच्या राजवटींत चक्रधरानें आपला महानुभाव पंथ स्थापन केल्याचें प्रसिद्धच आहे. तथापि यांच्या अनुयायांची संख्या महाराष्ट्रामध्यें फारशा मोठ्या प्रमाणावर नाहीं. ज्ञानेश्वरादि संत मंडळींनीं भक्ति-संप्रदायाचा जोरानें पुरस्कार करून महाराष्ट्रांत भक्तिसंप्रदायाचें माहात्म्य पुष्कळच वाढविलें व वारकरी पंथाची स्थापना केली. या पंथाचे अनुयायी महाराष्ट्रांत आज फार मोठ्या प्रमाणावर असलेले आढळून येतात.

महाराष्ट्राचा इतिहास—महाराष्ट्राचा इतिहास हा भरत-खंडाच्या इतिहासाशीं निगडित आहे. प्राचीन कालीं महाराष्ट्रांत अगदीं असंस्कृत कालांत कोणतीं राज्यें होतीं तें समजण्यास साधन उपलब्ध नाहीं. परंतु त्या वेळच्या एकंदर सामाजिक व राजकीय इतिहासावरून व परंपरेवरून असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं कीं, त्या कालीं महाराष्ट्रांत एखादें मोठें साम्राज्य अस्तित्वांत नसून निरनिराळीं लहान लहान राज्यें अस्तित्वांत असावीं. हीं राज्यें सामान्यतः स्वतंत्र असून एखाद्या मोठ्या बलाढ्य सम्राटानें कधीं दिग्विजय केल्यास तेवढ्यापुरतीं त्या सम्राटाचीं मांडलिक म्हणून समजण्यांत येत असत व तात्पुरत्या कालापर्यंत खंडणीहि देत असत. अशा प्रकारें कदाचित् अशोकानें आपल्या वैभवकालीं या प्रदेशावर आपलें साम्राज्य प्रस्थापित केलें असावें; कारण अशोकाचीं शिलाशासनें महाराष्ट्राच्या सीमा-प्रदेशावर सर्व दिशांस आढळण्यांत येतात. तसेंच अशोकाचे अथवा बौद्ध धर्माचे धर्मप्रचारक मरहट्ट देशांत आले असल्याचा उल्लेख महावंसो वगैरे ग्रंथांत आढळतो; तसाच तो पेत्तनिक म्हणजे पैठण या राजधानीबद्दलहि आढळतो. अर्थात् मौर्यांची सत्ता कांहीं काळ महाराष्ट्रांत प्रस्थापित झाल्याचा संभव आहे. त्यानंतर होऊन गेलेल्या शुंग, कण्व व आन्ध्र यांच्या सत्तेविषयीं पाहूं गेल्यास पहिल्या दोन वंशांचा संबंध महाराष्ट्राशीं आलेला दिसत नाहीं.

आंध्र व आंध्रभृत्य— त्यानंतर आन्ध्र अथवा आन्ध्रभृत्य घराण्याचा मात्र महाराष्ट्राशीं निकटचा संबंध असून त्यांची राजधानी प्रतिष्ठान अथवा पैठण येथें होती ही गोष्ट निश्चित आहे. या वंशाचें राज्य ख्रि. पू. ७३ पासून इ. स. २१८ पर्यंत टिकलें; परंतु मध्यंतरीं सुमारें ५३ वर्षें या राज्याच्या सत्तेवर शकांनीं आक्रमण केलें होतें. हे शक क्षत्रप असून त्यांपैकीं क्षहरात नहपान व त्याचा जावई उपवदात हे प्रख्यात असून त्यांचीं नांवें नाशिक व जुन्नर येथील लेण्यांतील शिलालेखांत आढळतात. या आन्ध्रभृत्य घराण्यांत सिमुक, कृष्ण, शातकर्णी, गोतमीपुत्र, पुलुमायी, यज्ञश्री, माढरीपुत्र, इत्यादि राजांचा नाशिक वगैरे लेण्यांतील शिलालेखांत उल्लेख आढळतो. या शातवाहन राजांची कारकीर्द मोठी वैभवसंपन्न असून यांच्या काळांत विद्या व कला यांस बरेंच उत्तेजन मिळत असे. यांच्याच अमदानींत प्रसिद्ध गुणाढ्याचा 'बृहत्कथा' हा पैशाची भाषेंतील ग्रंथ प्रसिद्ध झाला. तसेंच 'सप्तशती' या प्रख्यात महाराष्ट्रीय काव्यगाथेचा जनक हाल हा याच राजवंशांत होऊन गेला.

राष्ट्रकूट—या आन्ध्रभृत्यांच्या राजवटीनंतर बहुधा राष्ट्रकूट या नांवाच्या घराण्यानें महाराष्ट्रावर आपली सत्ता प्रस्थापित केली असावी. परंतु हा काल फार धामधुमीचा असल्यामुळें या घराण्यां-

तील कांहीं राजांच्या नामावलीशिवाय ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाहीं. अशा नांवांपैकीं कांहीं शिलालेखांत आढळणारीं नांवें म्हटलीं म्हणजे दुर्गराज, गोविन्दराज, स्वामिकराज, इन्द्र, इत्यादि होत. या राष्ट्रकूट घराण्याचा अमल चालुक्यवंशी जयसिंह यानें नाहींसा करून आपली सत्ता प्रस्थापित केली, असें मिरज, थेऊर, वगैरे ताम्रपटांवरून दिसतें. या चालुक्यवंशांत सत्याश्रय पुलकेशी हा महापराक्रमी राजा होऊन गेला. त्यानंतर कीर्तिवर्मा, मंगलीश, विक्रमादित्य, वगैरे अकरा राजे होऊन गेले. त्यानंतर राष्ट्रकूट वंशानें पुन्हां उचल खाऊन सन ७४५ मध्यें दंतिदुर्गानें आपली राजवट प्रस्थापित केली. या दुसऱ्या राष्ट्रकूट घराण्याच्या हातांत ७४५ पासून ९७३ पर्यंत राजसत्ता टिकून राहिली. यांमध्यें दंतिदुर्ग, कृष्णराज, गोविन्दध्रुव, अमोघवर्ष, जगत्तुंग, खोटिक, कक्काल, वगैरे अनेक राजे होऊन गेले. यांपैकीं कृष्ण दुसरा याच्या कारकीर्दींत प्रसिद्ध वेरूळ येथील कैलास हें लेणें खोदण्यांत आलें. कक्काल याचा तैलप या चालुक्यवंशीय राजानें पराभव करून पुन्हां चालुक्यवंशाची स्थापना केली. या वंशांत ११८९ पर्यंत दहा राजे होऊन गेले. परंतु यांतील अखेरचे राजे दुर्बल असल्यामुळें चालुक्यांचे अनेक मांडलिक राजे स्वतंत्र झाले.

कल्चुरी व यादव— अशा मांडलिक राजांपैकींच एक कलचुरीवंशीय राजे होते. याचा मूळपुरुष जोगमाचा पुत्र पेरमादिया तिसरा, सोमेश्वर चालुक्य (सन ११२८) याचा मांडलिक होता. तसाच जगदेव मल्लाचा मांडलिक व पुढें तिसऱ्या तैलपाचा सेनापति विज्जल यानें सन ११६१ त स्वतंत्र होऊन कल्याणी येथें आपली राजधानी स्थापन केली. याची स्त्री पद्मावती हिचा भाऊ व लिंगायत धर्मप्रवर्तक बसव यानें याचा खून केला. यानंतर सोमेश्वर हा गादीवर आला व त्याच्यामागून संकम, आहवमल्ल व सिंघण या तीन भावांपासून होयसळ बल्लाळ दुसरा यानें (११८३) राज्य हरण केलें. चालुक्यांच्या कौटुंबिक कलहामुळें त्यांची सत्ता दुर्बल होत जाऊन अखेरीस यादववंशीय भिल्लम पांचवा यानें सन ११८९ मध्यें यादवांचें साम्राज्य स्थापन केलें. हा यादववंश यदुकुलोत्पन्न असून त्यांची मूळ सत्ता मथुरेमध्यें प्रस्थापित झाली होती. तेथून ते मगधादि राजांच्या त्रासामुळें द्वारकेस गेले होते. याच वंशांतील सुबाहु नांवाच्या राजाचा पुत्र दृढप्रहार यानें चंद्रादित्यपुर अथवा चांदवड येथें आपलें लहानसें राज्य सन ७५४ च्या सुमारास स्थापन केलें होतें. याचाच वंशज भिल्लम यानें चालुक्याचा पाडाव करून देवगिरि येथें आपली राजधानी स्थापन केली. दृढप्रहारापासून भिल्लमापर्यंत तेवीस राजे झाल्याचें दिसून येतें. भिल्लमाचा पुत्र जैत्रपाळ याच्या कारकीर्दींत मुकुंदराज होऊन गेले. याचा पुत्र सिंघण हा पराक्रमी निघून त्यानें सर्व महाराष्ट्रावर, एवढेंच नव्हे तर गुजराथवरहि आपली सत्ता स्थापन केली.

सिंघणानंतर त्याचे नातू कृष्ण व महादेव हे राजे झाले. महादेवानंतर त्याचा पुतण्या रामदेव हा सन १२७१ त गादीवर बसला. महादेव व रामदेव यांच्या काळांतच 'चतुर्वर्ग चिंतामणीचा कर्ता हेमाद्रि हा प्रधान होता. महानुभाव पंथहि याच कालांत प्रचलित झाला. रामदेवाच्या कारकीर्दींतच ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरी लिहिली व लवकरच समाधि घेतली. यानंतर सन १२९४ मध्यें अल्लाउद्दीन खिलजी यानें रामदेवरावास मांडलिक बनविलें व पुढें लवकरच यादवांची सत्ता नष्ट झाली.

त्रैकूटक—महाराष्ट्राचें क्षेत्र विस्तीर्ण असल्यामुळें वर उल्लेखिलेल्या निरनिराळ्या घराण्यांतील राजांच्या आधिपत्याखालीं प्रत्येक वेळीं हा सर्व प्रदेश होता असें नव्हे तर या काळांत मागेंपुढें निरनिराळ्या ठिकाणीं अनेक लहानमोठीं राज्यें थोड्याफार कालापुरतीं सत्ताधारी बनत असत. अशा राज्यांपैकींच पश्चिमेकडील भागावर विशेषतः कोंकण प्रांतांत एका राष्ट्रकूट अथवा त्रैकूटक राजघराण्याची सत्ता प्रस्थापित असावी, असें कान्हेरी येथील लेण्यांतील राज्याचा राजशक २४५ असलेल्या एका शिलालेखावरून दिसतें. या त्रैकूटक घराण्यानें महाराष्ट्राच्या कांहीं भागावर सन २५० ते ४५० पर्यंत राज्य केलें.

वाकाटक—तसेंच विदर्भावर तिसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंत वाकाटक नांवाच्या घराण्यानें आपली सत्ता स्थापन केली होती व आपल्या राज्याचा विस्तार महाराष्ट्राच्या बऱ्याच मोठ्या भागावर केला होता. या राजासंबंधीं कांहीं माहिती अजंठा येथील लेण्यांतील कांहीं लेखांवरून मिळते. या घराण्याची राजधानी चांदा शहराजवळील भद्रावती ऊर्फ भांदक येथें होती व त्या ठिकाणीं प्राचीन अवशेष बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आढळतात. या घराण्यांत विन्ध्यशक्ति, प्रवरसेन, गौतमीपुत्र, रुद्रसेन, पृथ्वीसेन, भद्रसेन, इत्यादि अनेक राजे होऊन गेले. या राजांपैकीं दुसरा रुद्रसेन यानें दुसऱ्या चन्द्रगुप्ताची बहीण प्रभावती गुप्ता हिच्याशीं विवाह केला होता. तिचीं कांहीं दानपत्रें उपलब्ध आहेत. तसेंच यांच्यापैकीं प्रवरसेन वगैरे राजांचे कांहीं ताम्रपटहि उपलब्ध आहेत. यांच्या कारकीर्दींतच समुद्रगुप्तानें दक्षिणेंतील दिग्विजय केला व तो देवराष्ट्र येथपर्यंत आला होता व तेथें त्यानें सागरेश्वराचें देऊळ बांधलें. रघुवंशांत केलेलें रघूचें दिग्विजय वर्णन याच्या आधारें केलें असावें असें म्हणतात. या राजवंशानंतर विदर्भावर राष्ट्रकूटांची व नंतर चालुक्यांची सत्ता प्रस्थापित झाली.

शिलाहार—दक्षिण महाराष्ट्रांत कोल्हापूर येथें शिलाहारांचें राज्य महत्त्वाचें होतें. यांच्यापैकीं भोज (१०९८) हा फार महत्त्वाचा राजा होऊन गेला. यांचा मूळ पुरुष जतिग हा असून त्यानंतर नायिवर्मा, चन्द्रराय, गोंक, नारसिंह, भोज, बल्लाळ, गंगारादित्य, विक्रमादित्य, इत्यादि राजे होऊन गेले.

मुसलमान व मराठे—यानंतर महाराष्ट्रांत यादवांचें साम्राज्य नष्ट झाल्यानंतर उत्तरेकडील महंमदीयांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या व हळूहळू त्यांनीं सर्व महाराष्ट्र आक्रमण केला. इ. स. १३४७ मध्यें गुलबुर्गा येथें बहामनी राज्याची स्थापना झाली व पुढें या राज्याचे विजापूरची आदिलशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही, अहमदनगरची निजामशाही, वऱ्हाडची इमादशाही व बेदरची बरीदशाही असे पांच विभाग झाले. यांपैकीं इमादशाही व बरीदशाही या फारशा महत्त्वाच्या नसून त्यांचा लवकरच अंत झाला व आदिलशाही, निजामशाही व कुतुबशाही या कांहीं वर्षे भरभराटींत राहिल्या व यांनीं एकदां सर्वांनीं एक होऊन दक्षिणेंतील विजयानगरच्या राजाचा तालिकोटच्या लढाईत पराभव करून तें साम्राज्य नष्ट केलें. पुढें याहि सत्ता हळूहळू दुर्बल होत चालल्या व त्यांस मराठ्यांनीं शहाजी व शिवाजी यांच्या पुढारीपणाखालीं बरेंच जर्जर केलें व शिवाजीनें तर आपल्या स्वतंत्र हिंदुपदपादशाहीची स्थापना केली. पुढें औरंगजेबानें दक्षिणेंत स्वारी करून या तिन्ही घराण्यांचा नाश केला, परंतु त्यास शिवाजीची सत्ता निर्मूल करतां आली नाहीं व त्याच्या मृत्यूनंतर मराठ्यांनीं राजारामाच्या नेतृत्वाखालीं एक होऊन आपल्या स्वराज्याची पुन्हां उभारणी केली. यानंतर दक्षिणेमध्यें मराठ्यांची सत्ता वाढत जाऊन त्यांनीं आपलें साम्राज्य सर्व महाराष्ट्रभर व त्याबाहेरहि वाढविलें. मोंगल दरबारांत माजलेल्या दुफळीचा फायदा घेऊन असफजाहा निजाम उलमुल्क यानेंहि आपली दक्षिणेंत स्वतंत्र सत्ता स्थापन केली व ही नवीन निजामशाही प्रथम औरंगाबाद येथें व नंतर भागानगर अथवा हैद्राबाद येथें इंग्रजी आक्रमणापर्यंत टिकून राहिली.

मराठ्यांची सत्ता शाहूच्या कारकीर्दीत कळसास पोंचली, पण पुढें पानपतनंतर तीस उतरती कळा लागून अखेरीस सन १८१८ मध्यें ती इंग्रजांनीं हस्तगत केली (मराठे साम्राज्य पाहा). त्या वेळीं महाराष्ट्र निरनिराळ्या प्रांतांत विभागला गेला. यानंतर १५ ऑगस्ट १९४७ मध्यें भरतखंडास स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर पुन्हां महाराष्ट्र भाषाभाषी प्रांत एक करण्याबद्दल चळवळ चालू असून तीस लवकरच यश येईल अशी खात्री आहे.

**महारूख**—हें झाड फार मोठें वाढतें. सह्याद्रीवर व खानदेशांत हीं फार आढळतात. याच्या सालीस दालचिनी-प्रमाणें वास असल्यानें तिच्यासारखाच उपयोग करतात. लांकूड हलकें असल्यानें इमारतीस उपयोगी पडत नाहीं. त्याचीं ढोलकीं, मृदुंग, इ. वाद्यें करतात. या झाडाची साल औषधी आहे. प्रसूतिवायु, नळबंद वायु, आमातिसार, वगैरेंवर देतात. पालाहि रस काढून देतात. धनुर्वातावर पाल्याचा वाफारा देतात.

**महारोग (कुष्ठ)**—या स्पर्शसंचारी रोगामध्यें त्वचा, श्लेष्मावरणत्वचा व मज्जातंतू यांच्या ठिकाणीं बारीक गांठींच्या रूपाची विकृति उत्पन्न होते. व्हॅन्सन यानें या रोगाच्या जंतूंचा शोध लावला आहे. दिसण्यांत ते क्षयाच्या जंतूंप्रमाणें पण अधिक दिसतात. हा रोग आपल्या देशांत बराच पाहण्यांत येत असून शिवाय ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान, आफ्रिकेचा ईशान्य भाग, केप ऑफ गुड होप, वेस्ट इंडीज बेटें, मध्य व दक्षिण अमेरिका, मेक्सिको व पॅसिफिक महासागरांतील कांहीं बेटें, इतक्या ठिकाणीं आढळतो. युरोपमध्यें नॉर्वेखेरीज दुसऱ्या कोणत्याहि देशांत हा आढळत नाहीं.

हा एक सततचा रोग असून त्याचें स्वरूप मधून मधून तीव्र असतें. हा सांसर्गिक रोग आहे, परंतु हा संसर्ग दीर्घ काल व निकटचा असल्यासच बाधक होतो. संसर्ग झाल्यानंतरहि अनेक वर्षें हा रोग प्रत्यक्ष दिसून येत नाहीं. हा रोग स्त्रियांपेक्षां पुरुषांत अधिक असतो व लहान मुलांत अधिक आढळतो. या रोगाच्या प्रथमावस्थेंत शरीराच्या कातडीवर गांठी दिसूं लागतात. तसेंच ताप येऊं लागतो व अस्वस्थता वाटूं लागते. या गांठी घट्ट व तंतुमय असतात. किंवा त्यांचीं गळवें बनतात. रोगाची जसजशी वाढ होत जाईल तसतसा त्याचा परिणाम डोळे, तोंड, नाक, घसा, इत्यादिकांवर हळूहळू दिसूं लागून चेहरा विद्रूप दिसूं लागतो. या रोगाच्या एका प्रकारांत मज्जातंतूवर परिणाम होतो. हा प्रकार दीर्घकालीन असून त्यापासून क्वचितच मृत्यु येतो. गांठी येणाऱ्या प्रकारामध्यें रोगी सामान्यतः वीस वर्षेंपर्यंत जगतो. यावर अनेक उपचार करून पाहण्यांत आले आहेत. परंतु त्या सर्वांत विशेष गुणकारी म्हणून वानस्पतिक तेलें पोटांत घेणें किंवा टोंचून घालणें हा होय. परंतु यावर अद्यापि निश्चित असा उपाय सांपडला नाहीं.

वस्तुतः हा रोग बरा होत नाहीं. म्हणून जेथें हा रोग नसेल अशा गांवापासून अमळ एकीकडच्या ठिकाणीं रोग्यास ठेवावें. मज्जातंतूंस पुष्टि आणण्यासाठीं कॉडमाशाचें तेल मिसळलेलीं औषधें द्यावीत. विल्यम्स या शोधक डॉक्टरानें एक लस तयार केली आहे व तीपासून चांगला गुण येण्याचीं चिन्हें दिसत आहेत.

आर्यवैद्यकांत कुष्ठ सात प्रकारचे आहेत. वात, पित्त, कफ, वातपित्त, कफपित्त, वातकफ व सन्निपात असे ते ७ प्रकार

आहेत. सर्व प्रकारच्या कुष्ठांत रोग्यानें प्रथम स्नेहपान करावें. कुष्ठी रोग्यानें ब्रह्मचर्य पाळून मध व रक्तयाबोळ यांच्याबरोबर गंधक खावा. कोड हें कुष्ठापेक्षांहि निंद्य असून त्यापेक्षां असाध्यहि लवकर होतें. यावर उत्तम रेचक म्हणजे चांबचाऱ्या काळ्यांतून त्रिधारी निवडुंगाचा चीक देणें हें आहे.

हिंदुस्थानांत १९३१ च्या खानेसुमारींत दीड लाख महारोग्यांची नोंद सांपडते. पण नोंद नसलेले कित्येक होते व त्यांची संख्या कमीजास्त प्रमाणांत दहा लाखांपर्यंत भरावी असा तज्ज्ञाचा अंदाज आहे. आसाम, बंगाल, बिहार, ओरिसा, मध्यप्रांत, मद्रास, हैद्राबाद व त्रावणकोर या भागांत हा रोग विशेष आढळला. मध्यवर्ती व प्रांतिक सरकार यांनीं हा हटविण्यासाठीं बरेच प्रयत्न अनेक वर्षांपासून केलेले आहेत. त्यापूर्वीं व आतांहि युरोपियन मिशनऱ्यांनीं केवळ भूतदयेनें अशा रोग्यांसाठीं निवासस्थानें व दवाखाने काढलेले आहेत. 'ब्रिटिश साम्राज्य महारोगनिवारण संस्थे'चें कार्य हिंदुस्थानांतहि चालू आहेच. वर्ध्याजवळ म. गांधींच्या प्रयत्नानें निघालेली एक संस्था चालली आहे.

महारोग्यांचा कायदा—हा कायदा १८९८ सालीं करण्यात आला व त्यांत १९०३ व १९२० सालीं दुरुस्त्या झाल्या. 'महारोगी' म्हणजे कोणत्याहि प्रकारचा कुष्ठरोग (लेप्रसी) झालेला असा अर्थ आहे. 'भिकारी महारोगी' (पॉपर लेपर) म्हणजे जो महारोगी जाहीरपणें आपल्या रोगाचें प्रदर्शन करून भिक्षा मागतो तो, किंवा ज्या महारोग्याला पोटगीचें साधन नाहीं तो, अशा इसमांचा समावेश सदर शब्दांत होतो. प्रांतिक सरकारनें महारोग्यांचे दवाखाने (लेपर्स असायलम), भरपूर औषधपाण्याची व रोग्यांची राहण्याची सोय असलेले स्थापन करावे (कलम ३). या महारोग्यांच्या तपासणीकरितां इन्स्पेक्टर नेमावा व तो सरकारी मेडिकल ऑफिसर किंवा इतर डॉक्टरीच्या विषयाचा पदवीधर असावा. शिवाय महारोगी इसमांच्या दवाखान्याचा सुपरिंटेंडंट नेमावा (कलम ४). अशा दवाखान्याकरिता किमान तीन इसमांचें बोर्ड नेमावें व त्यांपैकीं एक सरकारी मेडिकल ऑफिसर असावा. भिकारी महारोगी असतील त्यांना पोलिसांनीं पकडून पोलीसठाण्यावर आणावें, तेथील पोलीस अधिकाऱ्यानें त्यांना लेपर-इन्स्पेक्टरकडे न्यावें, व तो इसम महारोगी आहे असें इन्स्पेक्टरला वाटेल, तर तसें सर्टिफिकीट पोलीस-अधिकाऱ्याला द्यावें; नंतर प्रांतिक सरकार नेमील त्या मॅजिस्ट्रेटनें त्या महारोग्याची चौकशी करावी, व तो भिकारी गरीब आहे असें ठरल्यास त्याला सदर दवाखान्यांत ठेवण्याचा हुकूम पोलीसला देऊन त्याला त्या दवाखान्यांत अडकवून ठेवावा. महारोग्याला प्रांतिक सरकारनें पुढील गोष्टी किंवा धंदे-व्यवसाय करण्यास बंदी करावी—(अ) मनुष्याच्या उपयोगाचे खाण्यापिण्याचे पदार्थ, वापरण्याचे कपडे, किंवा औषधें; (च) सार्वजनिक विहीर किंवा तळें यांतून पाणी घेणें, स्नान करणें, किंवा कपडे धुणें; (क) रेल्वेखेरीज इतर सार्वजनिक वाहनांतून प्रवास करणें; (ड) इतर धंदा-व्यापार करणें. जो हे नियम मोडील त्याला २० रुपयांपर्यंत दंड करावा.

**महालनवीस, प्रशांतचंद्र** (१८९३- )—एक हिंदी आंकडेशास्त्रज्ञ. कलकत्त्यास प्रेसिडेन्सी कॉलेजांत बी. एस्सी. चें शिक्षण घेऊन हे केंब्रिजला गेले. तेथें गणित व पदार्थविज्ञान या शास्त्रांच्या उच्च पदव्या मिळवून कलकत्त्याला आले व प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें पदार्थविज्ञानाचे प्राध्यापक झाले (१९१५). पुढें वीस वर्षांनीं प्रिन्सिपल झाले. कॉलेजच्या कामाखेरीज हवामानखात्यांतहि ते काम करीत. १९२६ सालीं ते युरोपांत जाऊन अनेक देशांतील शास्त्रीय संस्था व प्रयोगालयें त्यांनीं पाहिलीं व कांहींत प्रत्यक्ष कामहि केलें. 'विश्वभारती' संस्थेशीं त्यांचा प्रारंभापासूनच चिटणीस म्हणून संबंध आला. 'संख्या' या आंकडेशास्त्रीय नियतकालिकाचे ते कांहीं काळ संपादक होते. कलकत्ता विद्यापीठांत आंकडेशास्त्राची शाखा १९४१ त निघाली तेव्हां हे तिचे प्रमुख होते. ते अनेक शास्त्रीय परिषदांच्या चालक मंडळांत असतात. १९४४ त ऑक्सफोर्ड विद्यापीठानें त्यांना वेल्डन पारितोषिक दिलें. पुढील सालीं त्यांना लंडनच्या रॉयल सोसायटीचे सभासद (एफ्. आर्. एस्.) करण्यात आलें. 'युनो' च्या आंकडेशास्त्रीय कमिशनचे ते एक सभासद आहेत. १९५० सालीं पुण्यास भरलेल्या भारतीय शास्त्र परिषदेचे ते अध्यक्ष होते. आंकडेशास्त्राच्या क्षेत्रांत त्यांचा अधिकार फार मोठा असून सरकार त्यांचा सल्ला महत्त्वाचा मानतें.

**महालक्ष्मीविलास रस**—एक आयुर्वेदीय रसायन. सुवर्ण, रौप्य, अभ्रक, ताम्र, वंग, मंडूर, लोह, नाग, मौक्तिक, या सर्वांबरोबर रसभस्म किंवा रससिंदूर घ्यावा. या औषधांची एकत्र कज्जली करून मध घालून खलावी. नंतर त्याचा गोळा करून तो तीन दिवस प्रखर उन्हांत वाळवावा आणि शरावात ठेवून पूट द्यावें. नंतर चित्रकाच्या काढ्यांत आठ प्रहर खल करावा म्हणजे हा तयार झाला. याच्या सेवनानें त्रिदोषजन्यक्षय, पंडुरोग, कामला, सर्व प्रकारचे वायू, शोफ, प्रमेह, नष्टवीर्यत्व, शूल, कुष्ठ, अग्निमांद्य, ज्वर, श्वास, कास, इत्यादि रोग दूर होतात.

**महालिंगदास** (१६ वें शतक, पूर्वार्ध)—एक मराठी ग्रंथकार. सिंहासनबत्तिशी (१५४४), शालिहोत्र (अश्वचिकित्साशास्त्र), पंचोपाख्यान व वेताळपंचविशी या पद्यग्रंथांचा कर्ता. गद्यावरूनच या ग्रंथांचें पद्यात रूपांतर केल्याचें दिसून येतें.

यानें चाणक्यनीतीवरहि एक टीका लिहिली आहे. हा पूर्व खानदेशांतील गिरणा नदीच्या कांठच्या वाडें गांवचा दिसतो.

**महावंसो**—(संस्कृत महावंश). पाली भाषेंतील एक प्रसिद्ध प्राचीन महाकाव्य. हें पांचव्या शतकाच्या चतुर्थ पादांत असलेल्या महानाम नामक एका कवीनें लिहिलें. या महाकाव्यांत, ख्रि. पू. ५ व्या शतकापासून तों ख्रिस्तोत्तर पांचव्या शतकापर्यंतचा सिंहलद्वीपाचा इतिहास आहे. अशोक राजाच्या चरित्रानें याचा बराच भाग व्यापिला आहे. महावंशाची ऐतिहासिक दृष्ट्या फारशी किंमत नाहीं. तथापि या काव्यग्रंथामुळें तत्कालीन इतिहासासंबंधीं बरीच माहिती मिळते. काव्यदृष्ट्या मात्र महावंशाची योग्यता निःसंशय मोठी आहे. यांतील भाषा सुंदर असून वृत्तरचनेंतहि कवीचें चातुर्य दिसून येतें. महावंशावर महावंशटीका नांवाची एक टीका प्रसिद्ध आहे.

**महावस्तु**—हा महत्त्वाचा ग्रंथ हीनयान पंथाचा आहे. त्यांतल्या त्यांत हीनयानमध्यें जो लोकोत्तरवाद्यांचा पंथ आहे त्या पंथाचें हें पुस्तक आहे. लोकोत्तरवाद्यांच्या मतें बुद्ध अतिमानुष होता, व या सिद्धान्ताला अनुसरून महावस्तु ग्रंथामध्यें बुद्धाचें समग्र चरित्र आलें आहे. याचें खरें महत्त्व म्हणजे बुद्धासंबंधींच्या व त्याच्या धर्माबद्दलच्या सर्व दंतकथांचा यांत संग्रह करण्यांत आला आहे हें होय. या निरनिराळ्या कथांच्या आधारें तत्कालीन समाजस्थितीविषयीं बरीच माहिती मिळते. दशभूमिका म्हणजे बोधिसत्त्वाला बौद्धपद प्राप्त होण्याकरितां ज्या निरनिराळ्या दहा अवस्थांमधून जावें लागतें त्यासंबंधींचें यांत वर्णन आहे. महावस्तु ग्रंथावर हिंदु पुराणांचीहि छाप बसलेली आपणास दिसून येते. या ग्रंथांत योगाचारांचा, हूण लोकांचा व होरापाठकांचा उल्लेख व चिनी भाषा व त्यांतील ग्रंथ यांचाहि उल्लेख आढळतो. यांतील भाषाहि पाली, प्राकृत व संस्कृत यांनीं मिश्र असलेली आढळते.

**महावीर**—१. जैन धर्माचा प्रवर्तक व चोविसावा तीर्थंकर. हा एक उच्च कुलांतील सरदाराचा मुलगा होता. मगध राजघराण्याशीं त्याचें नातें होतें असें दिसतें. त्याचें कुलनाम नातपुत्त होतें. पुढें त्याच्या अनुयायांनीं त्याला महावीर, जिन, वर्धमान, इत्यादि नांवें दिलीं. हा बुद्धाहून थोडासा अगोदर जन्मला असावा. पण तो बुद्धाचा समकालीन होता. त्याचा काळ ख्रि. पू. ५२७ होता असें प्रो. पाठक यांनीं ठरविलें आहे. नीगंठ-नातपुत्त (पाहा) व हा एकच व्यक्ति होत असें कांहींचें म्हणणें आहे. यानें बारा वर्षें तप करून इंद्रियदमन केलें. याला वस्त्राचीहि शुद्ध नसे. वयाच्या ४२ व्या वर्षीं याला केवलज्ञान झालें. याचा निर्वाणाचा काल आश्विन अमावास्या हा आहे. महावीर संवत् कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून धरतात. आचारांगादि बारा सूत्रें महावीरानें केलीं असें मानतात.

२. एक जैनधर्मीय ज्योतिषी. हा राष्ट्रकूट वंशांतला जो अमोघवर्ष (पहिला) राजा त्याच्या आश्रयाला असे. याचा 'सारसंग्रह' नांवाचा भास्कराचार्यांच्या लीलावतीसारखा एक ग्रंथ आहे. तो लीलावतीपेक्षा विस्तृत आहे.

**महासंघ**—अमेरिकेंत याला 'ट्रस्ट' असें नांव आहे. अनेक कंपन्यांच्या संघास महासंघ (कॉबाइन) हें नाव दिलें जातें. महासंघ केल्यामुळें जर धंद्यांत काटकसर उत्पन्न होते तर मजुरांना जास्त मजुरी देणें हें संघास परवडेल आणि किंमतीहि कमी होतील असें सकृद्दर्शनीं वाटतें; पण तसें झाल्याचें दिसत नाहीं. कांहीं दिवस मजुरीचे दर वाढले आणि यास कारण असें कीं, कामकरी लोकांचे देखील संघ तयार झाले आणि त्या संबंधानें कामकऱ्यांच्या हिताचें संरक्षण केलें. पण या महासंघास जवळजवळ मक्ता मिळाल्यामुळें त्यानें किंमती वाढविण्यास झपाट्यानें सुरुवात केली. अमेरिकेंत या महासंघांचें नियंत्रण करण्यासाठीं कायदे झाले आहेत. कारण हे महासंघ भांडवलदारांच्याच फायद्याचे झालेले असतात.

**महासागर**—मोठ्या समुद्राला महासागर म्हणतात (समुद्र पाहा.). पृथ्वीवरील महासागर एकमेकांपासून अगदीं वेगळे झालेले दिसत नसले तरी तात्त्विक दृष्ट्या निरनिराळ्या नांवांचे महासागर कल्पिले आहेत. पॅसिफिक महासागर आशिया आणि ऑस्ट्रेलिया या खंडाना अमेरिकेपासून अलग करतो, तर ॲटलांटिक महासागर युरोप आणि आफ्रिका या खंडांस अमेरिकेपासून दूर सारतो. हिंदी महासागर आफ्रिका आणि ऑस्ट्रेलिया या खंडांमध्यें पसरला आहे. आर्क्टिक आणि ॲन्टार्क्टिक महासागर अनुक्रमें उत्तर आणि दक्षिण ध्रुवांभोंवतीं वाहत आहेत. एक महासागर संपून दुसरा कोठें सुरू होतो याची सरहद्द सांगतां येणार नाहीं.

महासागरांत पृथ्वीवरच्याप्रमाणेंच दऱ्याखोरीं, मैदानें, डोंगर-पर्वत, ज्वालामुखी, जंगलें, इ. आहेत; पण तीं पृथ्वीवरील या गोष्टींपेक्षां जास्त पद्धतशीर वसलेलीं दिसतील. (समुद्रतल-संशोधन पाहा). महासागराची सर्वसामान्य खोली ११,५०० फूट धरण्यांत येते. सर्वांत जास्त खोली ३४,४१६ फूट आहे व ती फिलिपाइन्स द्वीपसमूहांत मिंडानाओ बेटाजवळ आहे; म्हणजे पृथ्वीवरील सर्वांत उंच एव्हरेस्ट शिखरापेक्षां ५००० फूट जास्त आहे. सर्व महासागरांत पॅसिफिक जास्त खोल आहे.

खोलीप्रमाणेंच महासागरांतील उष्णतामान भिन्न भिन्न असतें. ॲटलांटिक महासागरापेक्षां पॅसिफिक आणि हिंदी महासागर

हे जास्त उष्ण असतात. तसेंच महासागराच्या खोलीप्रमाणें उष्णतामान बदलत जातें.

महासागरांचें क्षेत्रफळ ( चौ. मै. )

| | |
|---|---|
| १. पॅसिफिक | ६,८६,३४,००० |
| २. ॲटलांटिक | ४,१३,२२,००० |
| ३. हिंदी | २,८३,५०,००० |
| ४. आर्क्टिक | ५४,४०,००० |
| ५. अन्टार्क्टिक | ७५,००,००० |

**महासागरशास्त्र**—( ओशिआनोग्राफी ). भूगोलशास्त्राची ही एक शाखा असून समुद्र आणि महासागर यांच्यासंबंधीं सर्व प्रकारची माहिती या शास्त्राच्या द्वारें होते. समुद्राच्या पाण्याचे भौतिक गुणधर्म, उष्णतामानाची विभागणी, कमीजास्त खारटपणा, तळाशीं असणारे पदार्थ, समुद्रकांठचे प्रदेश, सामुद्रजीवनाची स्थिति, इत्यादीसंबंधीं शोध शास्त्रज्ञांना लावावे लागतात. या शास्त्राचा व्यावहारिक उपयोगहि आहे. अन्नासाठीं माशांची पैदास, नौकानयनाचे प्रश्न, समुद्रकांठची झरणी; समुद्रांतून संदेशतारा घालणें, यांसारख्या गोष्टी राष्ट्राला महत्त्वाच्या आहेत. याप्रमाणें हें शास्त्र पदार्थविज्ञान, रसायन आणि भूस्तरशास्त्र यांशीं निकट संबद्ध आहे. या शास्त्रांतील उपकरणीं, नकाशे आजकाल चांगले कार्यक्षम आहेत. समुद्राची ठिकठिकाणची खोली व उष्णतामान हीं त्यांवरून अवगत झालीं आहेत. समुद्रांतील प्राण्यांची किती तरी माहिती या शास्त्रामुळें झाली आहे. समुद्रतल-संशोधन पाहा.

**महाळुंग**—हें झाड निंबोणीच्या जातीचें आहे. पानें लांबट व मोठीं असतात. याचें फळ मोठें व टोंकदार असतें. तें जितकें जून होतें तितकें जास्त गुणकारी होत जातें. याचा पाक शक्तीसाठीं देतात. याचा मुरंबा, सरबत व लोणचें करतात. जंतांवर शिळलेल्या सालीचा काढा देतात. रस पित्तशामक आहे. उचकीवर मध व पादेलोण यांत रस देतात. ओकारीवर मूळ उगाळून मधांत देतात.

**महिदपूर**—मध्य हिंदुस्थान, इंदूर संस्थानामधील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ८४० चौरस मैल असून लो. सं. एक लाखावर आहे. महिदपूर गांव हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. महिदपूर, झारडा, तरना, मकरन व सुंदरसी असे ५ परगणे केले असून प्रत्येक परगण्यावर एक अमीन नेमला आहे. या गांवाच्या नैर्ऋत्येस महिदपूरच्या लढाईचें रणक्षेत्र आहे. तेथें १८१७ सालीं होळकरसैन्य व इंग्रज यांमध्यें जी लढाई झाली, तींत सर जॉन माल्कम यशस्वी झाला. याच्या आसपास अफू फार होते; व ती उज्जयिनी येथें पाठविण्यांत येते.

**महिपतगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. खेडपासून १२ मैलांवर हातलोट घांट व मकरंदगड यांच्यासमोर हा किल्ला आहे. रस्ता पोलादपूर या गांवावरून जातो. चढण विकट असून माथा १२० एकर आहे. सभोंवार तुटलेला कडा आहे. तटबंदी ३० फूट उंच आहे. येथें पूर्वीं ७०० तबेले होते असें म्हणतात. परमेश्वर नांवाचें देवालय असून त्यास नेमणूक आहे. किल्ल्याचें बांधकाम शिवाजीनें सुरू केलें होतें असें सांगतात.

**महिमंडणगड**—मुंबई, सातारा जिल्हा. जावळी तालुक्यांत बामणोली गांवाच्या पश्चिमेस ११ मैलांवर शिंदी नांवाच्या खेड्याजवळ आहे. पायथ्यापासून उंची ६०० फूट. क्षेत्रफळ १० एकर. चढण सोपी आहे.

**महिमानगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. माण तालुक्यांत दहिवडी खेड्याच्या पश्चिमेस ५।। मैलांवर शिंदी बुद्रुक गांवांत हा किल्ला मोडतो. पायथ्यापासून उंची २५० फूट आहे. तट बराच मजबूत आहे. पूर्वेकडील बुरुजावर जगन्नाथ महादेवाचें लिंग आहे. तेथें वार्षिक जत्रा भरते. या किल्ल्याचे हवालदार, सबनीस, रामोशी, वगैरेंचीं वतनें अद्यापि चालू आहेत.

**महिषासुर**—हा रंभना दानवास महिषीपासून झालेला पुत्र होय. यानें हेमागिरीवर वायु भक्षण करून तप केलें तेव्हां "पुरुष व्यक्तीपासून तुला मृत्यु येणार नाहीं", असा ब्रह्मदेवानें वर दिला. पुढें त्यास अष्टादशभुजा देवीनें मारलें अशी कथा देवीभागवतांत आहे.

**मही**—ही नदी ग्वाल्हेर संस्थानांतील अमझेरा प्रांतांत उगम पावून धार, रतलाम, सैलाना, वगैरे संस्थानांतून वाहत जाऊन, पुढें उदेपूरच्या सीमेवरून निघून मेवाड टेकड्यांच्या बाजूनें गुजराथेंत शिरते. तेथून महीकांठा व रेवाकांठा संस्थानांतून व खेडा जिल्ह्यांतून वाहत जाऊन खंबायतच्या आखातास मिळते. हींत समुद्राचें पाणी २० मैलपर्यंत आंत जातें.

**महीकांठा**—हा एक मुंबई इलाख्यांतील कांहीं संस्थानांचा जुना संघ होता. क्षे. फ. ३,१२५ चौरस मैल. ईदरच्या संस्थानानें जवळजवळ याचा अर्धा भाग व्यापिलेला असे. याखेरीज दुसरीं अकरा संस्थानें साधारण महत्त्वाचीं आहेत. भिल्ल व कोळी हे येथील मूळचे रहिवासी होत. त्यांच्यामागून रजपूत लोक येथें आले. १५ व्या शतकांत महीकांठा अहमदाबादच्या सुलतानाच्या ताब्यांत गेला. १८२० सालीं महीकांठ्याची सर्व व्यवस्था इंग्रजांच्या हातीं गेली.

**महीपति** (समाधि सन १८२२)—ढोलीबुवा उज्जयिनीकर. एक संत कवि. हा पैठणचा राहणारा व जनार्दनस्वामींचा वंशज असून नरहरीचा शिष्य होता. काशीयात्रेच्या निमित्तानें पैठणाहून हा उत्तर हिंदुस्थानांत निघाला असतां यास उज्जयिनीच्या दत्ता-

त्र्यंबभाऊ नावाच्या एका संताविषयीं माहिती समजली. म्हणून हा दत्तभाऊस भेटण्यासाठीं उज्जनीस गेला. तेथून पुढें हा ग्वाल्हेरला गेला. तेथें याचें बरेंच माहात्म्य वाढलें. पौष शुद्ध १३ शके १७४४ रोजीं यानें ग्वाल्हेरला समाधि घेतली. उज्जनीस दत्तभाऊच्या मठांत याचें बरेंचसें अप्रकाशित काव्य व ग्रंथ आढळून आले. उज्जनी व ग्वाल्हेर येथें यास बराचसा शिष्यगण लाभला. ग्वाल्हेर संस्थानांत अजून याची गादी असून ग्वाल्हेर संस्थाननें मठास उत्पन्न नेमून दिलें आहे. याच्या तिथीस दरवर्षी तेथें उत्सव होत असतो.

**महीपतिबुवा ताराबादकर** ( १७१५-१७९० )—एक मराठी कवि व संत-चरित्रकार. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून याचें उपनांव 'कांबळे' असें होतें. हा नगर जिल्ह्यामधील राहुरी तालुक्यांतील ताराबाद गांवचा राहणारा. वयाच्या १६ व्या वर्षीच याचे वडील मृत्युमुखीं पडल्यानें संसाराचा सर्व भार याच्यावरच पडला. ताराबादेपासून जवळच असलेल्या तांभेर गांवच्या मोरोबा तांभेरकर या गृहस्थाश्रमी सत्पुरुषाच्या हाताखालीं याचें शिक्षण झालें. वडिलांच्या पश्चात् वडिलांची कुलकर्णीपणाची कामगिरी याच्याकडे आली. पंढरीच्या विठोबावर याची दृढ भक्ति असून वडिलांच्या हयातीपासूनच हा पंढरीची वारी करूं लागला होता. एकदां कांहीं व्यवहाराच्या कामांत सरकारी अधिकाऱ्यांशीं याचा खटका उडाल्यानें यानें आपल्या कुलकर्णीपदासाठीं घेतलेली लेखणी खालीं ठेवली ती कायमचीच. याचे भजनाचे कार्यक्रम नेहमींचेच ठरलेले असत. यानंतर यानें आपल्या ग्रंथरचनेस सुरवात केली. याला तुकाराममहाराजांनीं संतचरित्रें लिहिण्याबद्दल स्वप्नांत येऊन दृष्टांत दिला असें सांगतात. यानें आपला 'भक्तिविजय' हा ग्रंथ शके १६८४ मध्यें लिहून पुरा केला. यानंतर कार्तिकव्रत, माघमाहात्म्य, वैशाखव्रत, एकादशीमाहात्म्य व त्यांसंबंधीं पौराणिक कथा सांगणारा 'कथासारामृत' हा ग्रंथ शके १६८७ मध्यें लिहिला. यानंतर याचा तिसरा संतविषयक ग्रंथ म्हणजे 'भक्तिलीलामृत'. यांत तुलसीमाहात्म्य, गणेशपुराण, दत्तात्रयेचरित्र यांसारखीं चरित्रें व मुक्ताभरण, ऋषिपंचमी, अनंतचतुर्दशी यांसारख्या व्रतकथा आल्या आहेत. यानंतरचा याचा 'संतविजय' हा ग्रंथ होय. श्रीनामदेवचरित्र, चोखामेळाचरित्र, नरसिंह मेहता चरित्र, वगैरे चरित्रें यानें अभंग वृत्तात लिहिलीं आहेत. वयाच्या ७५ व्या वर्षी हा मरण पावला. विठोबा व नारायण असे याला दोन पुत्र होते.

**महीपाल** ( सन १०४४ )—१. दिल्लीचा एक पराक्रमी राजा. महमद गझनीच्या मृत्यूनंतर त्याच्या तख्तावर आलेला त्याचा मुलगा व नातू हे कमजोर आहेत असें पाहून यानें ठाणेश्वर व कांग्रा हीं ठाणीं आपल्या ताब्यांत आणलीं. कांग्रा येथील देवालयांतील महमदानें उखडून काढलेली मूर्ति यानें नवी करून बसवली व अशी वदंता उठवली कीं, महमदानें पळवलेली मूर्तिच आतां येथें परत आली आहे. यानें एकामागून एक असे अनेक जय मिळवले. पंजाबांतील जनतेवरील यावनी जोखड उखडून टाकण्याची महत्त्वाकांक्षा निर्माण करण्याचा यानें प्रयत्न केला व हा स्वतः लाहोरवर चाल करून गेला होता. परंतु यास तेथें यश आलें नाहीं.

२. ( राज्य १०१३-१०६५ )—बंगालचा एक राजा. हा दुसऱ्या विग्रहपालाचा मुलगा. यानें दुसऱ्यांनीं बळकावलेलें राज्य परत मिळविलें असें सारनाथ लेखांत म्हटलें आहे. हा फार लोकप्रिय दिसतो; कारण याचीं गाणीं अद्यापि लोकांच्या तोंडीं आहेत. याच्या अमदानींत बौद्ध धर्माचा उत्कर्ष होता.

३. ( ९१०-४० )—प्रतिहार घराण्यांतील एक राजा. महेंद्रपालाचा हा पुत्र. ह्याला क्षितिपाल असेंहि म्हणत. राजशेखराच्या नाटकांतून याचा उल्लेख येतो. हा फार पराक्रमी होता. राष्ट्रकूटांशीं याला लढावें लागे.

**महू**—इंदूर संस्थानांतील जुन्या ब्रिटिश लष्करी छावणीचें ठिकाण. लो. सं. सुमारें ३०,०००. ही छावणी १८१८ सालीं सर जॉन मालकम यानें मंडलेश्वराच्या तहान्वयें वसविली. १८५७ सालच्या बंडांत येथेंहि बंडाळी माजली होती. परंतु लवकरच ती मोडून शांतता प्रस्थापित करण्यांत आली. या छावणीची व्यवस्था इतर ठिकाणच्या ब्रिटिश लष्करी छावण्यांप्रमाणें आहे.

**महेंद्रगिरि**—या पर्वताचा उल्लेख पुराणांतून येतो. परशुराम या पर्वतावर तपश्चर्येसाठीं जाऊन राहत असे. मारुतीनें लंकेला जाण्यासाठीं समुद्र ओलांडतांना महेंद्र पर्वतावरून उडी घेतली असा रामायणांत उल्लेख आहे. ४ थ्या शतकांत समुद्रगुप्तानें गंजममधील कोट्टर व महेंद्रगिरि हे डोंगरी किल्ले घेतल्याचा इतिहास आहे. पूर्वसमुद्रकांठीं एक व पश्चिमसमुद्रकांठीं एक असे दोन महेंद्रपर्वत असावेत. मद्रास इलाख्यांत गंजम जिल्ह्यांत या नांवाचें एक शिखर आहे. तेथें मोठीं दगडांचीं चार देवळें असून त्यांवर शिलालेख आहेत. त्यांवरून असें कळतें कीं, राजेंद्र चोलानें १०१५-२२ च्या सुमारास येथें एक जयस्तंभ उभारला. या ठिकाणीं परशुराम राहत असल्याच्या स्थानिक आख्यायिका आहेत.

**महेंद्रप्रताप, राजा** ( १८८६- )—एक क्रांतिकारक हिंदी संस्थानिक. संयुक्त प्रांतांतील अलिगड जिल्ह्यांतील मुरसान या छोट्या संस्थानचे हे राजे आपल्या अल्पवयांतच हाथरसचे राजे श्री. हरनामसिंह यांना दत्तक गेले होते. हे बी. ए. च्या वर्गांत असतांना यांचे दत्तक वडील निवर्तले व त्यामुळे

संस्थानचा राज्यकारभार यांच्या शिरावर पडला. १९०७ सालीं पृथ्वीपर्यटनाच्या हेतूनें हे बाहेर पडले. प्रवासांत असतांनाच जगांतील शिक्षणाची थोरवी यांना पटली व त्यासाठीं यांनीं आपली बहुतेक सर्व मिळकत दान करून टाकली. यांतूनच वृंदावनाच्या प्रेममहाविद्यालयाची स्थापना करण्यांत आली आहे. हें महाविद्यालय एक नमुनेदार संस्था व्हावी यासाठीं युरोपांतील निरनिराळ्या संस्थांचा अभ्यास करण्यासाठीं हे पुनः युरोपला गेले. या वेळीं बाल्कन युद्ध सुरू होतें. त्यांत हे तुर्कस्तानच्या बाजूनें होते. युद्धसमाप्तीनंतर हे स्वदेशीं परतले व प्रेममहाविद्यालयाच्या कार्यांत यांनीं स्वतःस पुन्हां गुंतवून घेतलें. १९१४ सालीं पहिल्या महायुद्धास सुरुवात होतांच यांनीं पुन्हां युरोपला प्रयाण केलें. तिकडे हे जर्मन पक्षास मिळाले. अफगाणिस्तानला युद्धांत सामील करून घेण्याच्या हेतूनें हे तुर्कस्तान व जर्मनी यांच्या वतीनें अफगाणिस्तानकडे शिष्टमंडळ घेऊन गेले. १९१८ सालीं हे तिकडून परत येत असतां लेनिन सरकारकडून यांचें स्वागत करण्यांत आलें. सोव्हिएट शिष्टमंडळाबरोबर यांना पुन्हां अफगाणिस्तानांत पाठवण्यांत आलें होतें. यानंतर चीनचा व जपानचा प्रवासहि यांनीं केला. जपान-अफगाणिस्तानचे राजकीय संबंध जोडण्याची कामगिरी जपाननें यांच्यावर सोंपवली होती. यानंतर पुन्हा अफगाणिस्तानला येऊन नंतर हे अमेरिकेस गेले. १९२९ सालीं यांचें वास्तव्य कित्येक महिने रशियांत होतें. यानंतर हे बर्लिनला गेले. तेथून हे टोकिओस परतले व तेथेंच स्थायिक झाले.

यांनीं शत्रुराष्ट्रांशीं संबंध ठेवला असल्यानें हिंदुस्थान सरकारनें यांना गुन्हेगार ठरवलेलें होतें. पण आतां ते हिंदुस्थानांत परत आले असून वृन्दावनांत राहतात व 'वर्ल्ड फेडरेशन' नांवाचें एक नियतकालिक चालवितात. जग सुखी होण्यासाठीं प्रेम, न्याय, सेवा व आत्मसमर्पण या चार तत्त्वांचाच प्रत्येकानें अंगीकार केला पाहिजे असें यांचें सांगणें आहे.

**महेंद्रवर्मा पल्लव** ( राज्य. ६००-६३० )—मद्रासच्या दक्षिणेस तीस मैलांवर समुद्रकांठीं असलेल्या मामल्लपूर, माबलीपूर किंवा महाबलीपूर या लहानशा खेड्यांत पल्लवकालीन लेणीं डोंगरांत कोरलेलीं आहेत. येथेंच महेंद्रवर्मा व त्याचा बाप कांचीचा सिंहविष्णु यांच्या मूर्ती सांपडल्या आहेत. महेंद्रवर्माकृत 'मत्त विलास' नांवाचें प्रहसन त्रिवेंद्रम संस्कृत सीरीजमध्यें प्रसिद्ध झालें असून त्याच्या प्रस्तावनेंत याच्या वंशाची माहिती मिळते. कुडुमियमलै येथील संगीतशास्त्रासंबंधीच्या शिलाशासनावरून हा रुद्राचार्यांचा शिष्य असावा असें दिसतें. यानें महेंद्रवाडी, त्रिचनापल्ली, पल्लीवरम्, वगैरे ठिकाणीं डोंगरांत देवळें खोदविलीं. कांजीवरम् इर्दींतील पुल्ललूर येथें यानें दुसरा पुलकेशिन् या पश्चिम चालुक्यराजावर स्वारी करून विजय मिळवला. शैव साधु तिरूनावुक्करशु याचा द्वेष करत असूनहि यानें शेवटीं त्याचींच मतें ग्राह्य धरलीं. पण यानेंच या शैव साधूचा खून केला होता. भारवि हा विख्यात कवि याच्या बापाच्या पदरीं असल्यानें याचा त्याच्याशीं संबंध आला असावा.

**महेश्वर**—मध्य हिंदुस्थान, इंदूर संस्थान. नेमाड प्रांतांत नर्मदा नदीच्या कांठीं हें गांव वसलेलें आहे. लो. सं. ७,०४२. येथें पुष्कळ देवळें आहेत. येथील घाट व अहल्याबाईचा राजवाडा हीं प्रेक्षणीय आहेत. महेश्वरास प्राचीन काळीं माहिष्मती असें म्हणत असत. रामायणांत व महाभारतांत याचा उल्लेख आढळतो ( माहिष्मती पाहा ). या गांवीं फार प्राचीन काळीं कार्तवीर्यार्जुन राहत होता अशी लोकांची समजूत आहे. राजपिंपळा संस्थाननें येथें उत्खनन करून मौर्यपूर्वकालीन मृत्तिकावशेष बाहेर काढले आहेत. ही माहिष्मती संस्कृति आज अभ्यासाई झाली आहे. अहल्याबाईच्या कारकीर्दींत महेश्वर येथें १७६७ पासून होळकरांची राजधानी होती. त्या वेळीं याचें राजकीय व व्यापारी महत्त्व फार वाढलें होतें. येथें अहल्याबाईची छत्री व मोठा पुतळा आहे. यशवंतरावानें अहल्याबाईची छत्री व घाट बांधला. छत्री प्रेक्षणीय आहे व इतर बरींच देवळें येथें आहेत. महेश्वराला जुन्याकाळापासून लुगडीं फार चांगलीं होतात. याबद्दल हें गांव महाराष्ट्रीय स्त्रियांत प्रसिद्ध आहे.

परमारांच्या कारकीर्दींत महेश्वराला महत्त्व आलेलें दिसतें. महेश्वराजवळील चोळी गांवीं जें तळें आहे तें मुंजाच्या वेळचें असावें. महेश्वरांतील कांहीं देवळांवर अकबराच्या वेळचे शिलालेख आहेत ( उदा., काळेश्वर व मातंगेश्वर देवळांतील ). अकबराच्या वेळीं चोळी-महेश्वर महालाचें उत्पन्न ९,६३,२७० दाम होतें. महेश्वराचा किल्ला अकबरानें बांधलेला दिसतो. मल्हारराव होळकराच्या ताब्यांत हा किल्ला १७३४ त आला.

**महेश्वर**—एक प्रसिद्ध ज्योतिषी व 'सिद्धांतशिरोमणि' कार भास्कराचार्य याचा पिता. जन्म शके १००० च्या सुमारास असावा आणि याचे ग्रंथ १०३० च्या सुमाराचे असावेत. शेखर नांवाचा करणग्रंथ, लघुजातकटीका, प्रतिष्ठाविधिदीपक व वृत्तशत असे याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**महोगनी**—[ वर्ग-मेलियासी स्विएटेनिया महोगनी ]. हें झाड उंच व सुंदर असून मध्य अमेरिका, पश्चिमेकडील हिंदी द्वीपसमूह, वगैरे प्रदेशांत आढळतें. या झाडाचें लांकूड कठिण असून घट्ट असतें. याचा रंग तांबट पिंगट असून याला उत्तम तकाकी आणतां येते. घरगुती सामान करण्याच्या कामीं याचा

उपयोग सर्वत्र करण्यांत येतो. स्पेनमधील महोगनी लांकूड फार मौल्यवान् असतें. तथापि इतरहि देशांतील या लांकडांचा व्यापार

फार मोठ्या प्रमाणावर चालतो. उंची लांकडी सामानासाठीं या लांकडाला फार मागणी असते. हें फारसें उपलब्ध नसून याला फार किंमत पडते. तेव्हां साहाजिकच नकली महोगनी लांकडें तयार होत आहेत. उदा., मध्य अमेरिकेंतील सेड्रेला यासारखेंच दिसतें; पण तें हलकें असून कमी टिकतें.

**महोदधिरस**—एक आयुर्वेदीय रसायन. पारागंधक, लोह, बचनाग, दालचिनी, ताम्र, वंग, अभ्रक, त्रिकटू, तमालपत्र, नागकेशर, नागरमोथा, वावडिंग, रेणूकबीज, पिंपळीमूळ हीं सर्व औषधी द्रव्यें एकत्र करून त्यांना जलपिंपळीच्या रसाच्या तीन भावना द्याव्या व त्याच्या हरभऱ्याएवढ्या गोळ्या बांधाव्या. या रसायनाच्या सेवनानें श्वास, खोकला, मूळव्याध, भगंदर, हृदयशूल, पार्श्वशूल, कर्णरोग, संग्रहणी, सर्व प्रकारचे उदररोग, प्रमेहरोग, मूतखडा यांसारख्या व्याधी दूर होतात.

**मळणीचें यंत्र**—(थ्रॅशिंग मशिन). धान्याच्या कणसांपासून किंवा गवत-कोंड्यापासून दाणे काढणारें यंत्र. या यंत्रास घोडे, बैल, वारा, पाणी किंवा वाफ यांची शक्ति लावण्यांत येते. हें यंत्र प्रथम सन १७५८ मध्यें स्कॉटलंडमधील मायकेल्स स्टार्लिंग या गृहस्थानें शोधून काढलें. त्यानंतर अँड्र्यू मेकले यानें त्यांत १७७६ मध्यें कांहीं सुधारणा केल्या. त्यानंतर अलीकडे या यंत्रांत बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत. अलीकडे हीं यंत्रें घोड्यांच्याऐवजीं वाफेनें चालविण्यांत येतात व त्यांमध्यें पाखडण्याची, चाळण्याची व धान्यांतील तूस काढून टाकण्याची व्यवस्थाहि केलेली असते. हें यंत्र निरनिराळ्या तऱ्हेच्या इंजिनांनींहि चालवितां येतें.

पाश्चात्य शेतकऱ्यांना हें यंत्र अत्यावश्यक वाटतें. पूर्वी तिकडे आज आपल्याकडे करतात त्याप्रमाणेंच जनावरांकडून धान्य तुडवून मळणी करीत, पण आतां यंत्राखेरीज मोठ्या प्रमाणावर गहूं, ओट, बार्ली, तांदूळ, इ. धान्यें यांचीं पिकें काढतां येणारच नाहींत. एक यंत्र एका दिवसांत १२०० ते १५०० बुशेल गहूं मळून पाखडून टाकतें.

**मळसूत्र**—(स्क्रू). मळसूत्राचे आटे समप्रमाणांत करण्याचा पहिला प्रयत्न सर जोसेफ व्हिटवर्थ यानें सन १८४१ मध्यें केला. यानंतर अमेरिकेमध्यें अशा तऱ्हेचा प्रयत्न सेलर यानें २३ वर्षांनीं केला. मेट्रिक पद्धतीवर मळसूत्राच्या आट्यांची रचना करण्याची युक्ति प्रथम १८७३ मध्यें कार्लस्रूह येथील डिलाइल यानें काढली. मळसूत्राचा उपयोग शिल्पकामामध्यें अनेक ठिकाणीं (उदा., दाब, उच्चालक, सांधे मोजण्याचीं मापें, वगैरे कामांत) करण्यांत येतो. मळसूत्राचे आटे यंत्रावर निरनिराळ्या प्रकारें पाडण्यात येतात. या आटे पाडणाऱ्या यंत्रास फणी असें म्हणतात. तसेंच *नरमादीच्या साहाय्यानेंहि आटे पाडण्यांत येतात. आतां अमेरि*केंत मळसूत्रें चांगलीं होतात. त्यांना शेवटीं अणकुचीदार टोंक असल्यानें तीं लांकडांत लवकर घुसतात.

**मळसूत्री पंखा**—(स्क्रू प्रोपेलर). असे पंखे बोटींत व विमानांत बसविलेले असतात. या पंख्यांचीं पातीं मळसूत्राच्या आट्याप्रमाणें वळविलेलीं असतात. हा पंखा फिरूं लागल्यावर पातीं पाण्याला ढकलतात व बोट पुढें चालूं लागते.

**माईणमूळ**—हें झाड ओंव्याच्या झाडासारखें असतें व पानेंहि तशींच असतात. याच्या मुळास 'माईणमूळ' किंवा 'मायमूळ' म्हणतात. मुळ्यांचें लोणचें घालतात; व मूळ औषधीहि आहे.

**माओरी**—न्यू झीलंड देशांतील जुना असंस्कृत समाज. हे लोक पॉलिनेशियन मानववंशांतील आहेत.

इ. स. १३५० च्या सुमारास राराटोंगा येथून हे आले असावेत असें म्हणतात. यांची संख्या १९३२ सालीं ६९,८९३ होती. यांत ⅙ संकरज (हाफ-कास्ट) होते. उंच, बळकट, काळ्या केसांचे व उभट चेहऱ्याचे हे लोक कॉकेशियनांप्रमाणें वाटतात. यांच्यांत लवकर सुधारणा झाली. १८४० त ब्रिटिश सत्ता येथें प्रस्थापित झाली, तेव्हां पंचवीस-तीस वर्षे यांनीं तिला विरोध केला, पण नंतर ते ख्रिस्ती बनून सनदशीरपणें वागूं लागले. न्यू झीलंडच्या पार्लमेंटमध्यें यांचे कांहीं प्रतिनिधी घेण्यांत आले आहेत.

**माकड**—वानर. एक द्विहस्त प्राणिवर्ग. लेमूर व मनुष्य या दोन प्राण्यांच्या मधील सर्व अवस्थांतील प्राथमिक प्राण्यांस हें

**कोळी माकड**

[ याची शेपटी त्याचा पाचवा हातच की काय अशी उपयोगी पडते. ]

सामान्य नांव आहे. यांचे दोन मुख्य वर्ग पाडतां येतात. एक जुन्या भूखंडांत राहणारा. हा जरा उच्च प्रतीचा असून तो आशिया व आफ्रिका खंडात आढळतो. या वर्गांत एप, ओरांगउटांग, चिंपाझी, गोरीला, वगैरे माकडें येतात. दुसरा वर्ग अमेरिका या

**ऱ्हेसस माकड**

खंडांत आढळतो. यांच्या नाकपुड्या खोल असतात, व शेपट्या सहज वळणाऱ्या असून त्यांच्या योगानें त्यांस झाडाची फांदी वगैरे पकडतां येते. यांचे गाल फुगलेले नसतात, आणि यांच्या ढुंगणावर घट्टे नसतात. यांच्यामध्यें मार्मोसेट, कोळी माकड (स्पायडर), कॅपुचिन, वगैरे जाती आहेत.

गोरिला व चिंपान्झी या जातींच्या माकडांवर स्वतंत्र लेख आहेत ते पाहावेत.

ओरांगउटांग या उपमानव वानरवंशाची जास्त माहिती त्या नांवाखालीं सांपडेल. हीं अपुच्छ वानरें आहेत. गोरिला आणि चिंपान्झी यांचीं शरीरें बहुतेक माणसांसारखीं असतात. तसेंच

**ओरांगउटांग**

माणसें व माकडें यांचें रक्त एकमेकांशीं जमतें. तेव्हां अशासारख्या गोष्टींवरून माकडाचा माणूस झाला हें विकासवादांतील तत्त्व खरें ठरतें. ओरांगउटांग, विकासवाद पाहा.

**लंगूर माकड (हिमालयांतील)**

बबून—हा माकडाच्या जातीचा एक प्राणी आहे. यांचें तोंड कुत्र्यासारखें लांबट व एकदम पुढें आलेलें असतें. यांस सुळे दांत असतात, शेपटी आंखूड असते, गालांत पिशव्या असतात, डोळे लहान व खोल असून भिंवया मोठ्या असतात व कुल्यांवर घट्टे असून त्यांवर केंस असतात. त्यांचे मागचे व पुढचे पाय प्रमाणशीर असतात त्यामुळें ते चारी पायांवर पळूं शकतात, परंतु त्यांना फारसें उभें राहता येत नाहीं. यांचा आकार सामान्यतः कुत्र्याएवढा असतो, परंतु यांतील मँड्रिल (पाहा) जातीचा मोठा वानर उभा राहिला असतां जवळजवळ मनुष्याइतका उंच असतो. हे फळें, मुळें, अंडीं, किडे, वगैरेवर उपजीविका करतात. याच्या कांहीं जाती आहेत.

लेमूर ही जात मुख्यत्वें अमेरिकेंत सापडते. अपुच्छ वानर हिंदुस्थानांत दिसत नाहीं. आफ्रिका, सुमात्रा, मलाया, वगैरे भागांत अशीं वानरें आढळतात.

गिब्बॉन—पूर्वेकडील द्वीपसमूहांत आढळणाऱ्या माकडांच्या जातीला हें एक सामान्य नांव आहे. याचें शरीर कृश असून याचे हात फार लांब असतात. याचा रंग काळा असून याची दाढी करडी किंवा पांढरी असते.

गिब्बॉन माकड (पांढऱ्या हाताचा)

माकड आणि वानर या नांवात भेद केला जातो. माकड हें माणसाळलेलें व वानर हे जंगली असें समजतात. दरवेशी ही भिकाऱ्यांची जात माकडें पाळून त्यांचे खेळ करतात. माकडें हीं तांबूस-पिवळ्या रंगाचीं असतात. उंची साधारणपणें २ फूट व शेपूट दहापंधरा इंच लांब असते. हीं कळप करून राहतात. वानरें 'हुप्प' असा आवाज काढतात. त्यावरून त्यांना हुप्प्या म्हणतात. वानर शरीरानें मोठें व चळकट असतें. त्याची शेपूटहि फार लांब असते. रंग पिवळट किंवा उदी असतो; व पोटाची बाजू पांढुरकी असते. वानराचें तोंड व हातापायांचे तळवे काळे असतात. वानर सहसां माणसाळत नाहीं कीं माकडाप्रमाणें चटकन् शिकत नाहीं.

इंद्र आणि इंद्राणी यांच्या संवादांत वृषाकपि 'नर-वानर' अशा संबंधांत कपि हा शब्द ऋग्वेदात एकदां आलेला आहे. वानराचा रंग पिंगट असतो असें तेथें लिहिलें आहे. वानर केंसाळ असून, तो कुत्र्याचा शत्रु आहे, असें अथर्ववेदांत म्हटलें आहे. माकडें माणसाळवीत असत असें 'वृषाकपि' सूक्तांतील स्थलावरून आणि तैत्तिरीय संहितेंतील वनवासी मयु या त्याच्या उल्लेखावरून दिसतें.

रामायणांत तर वानरसैन्य व त्याचे पराक्रम पाहून अचंबा वाटूं लागतो. वाली, सुग्रीव, हनुमान, वगैरे वानरवीर व त्यांचे अनुयायी हे खरेच प्राणी होते कीं वानरचिन्ह धारण करणारें एक लोकराष्ट्र होतें याचा उलगडा होत नाहीं. किष्किंधेला वानरध्वज असणारें एक राष्ट्र असावें असें जैन रामायणावरून दिसतें. कांहीं पुराणसंशोधक पौराणिक वानरांना असंस्कृत किंवा अर्धसंस्कृत माणसेंच समजतात. 'वानर' या संज्ञेचाहि अर्थ तोच (वा नर) लावतात. रामायणांतील हनुमानामुळें वानरोपासना हिंदूंमध्यें सुरू झाली. जपान आणि आफ्रिका या देशांतहि वानरोपासना आढळते. सिलोनमध्यें माकडाचा दांत ठेवलेलें असें एक प्रख्यात देऊळ आहे.

**माकडी**—हें एक रानझाड आहे. हें लिंबुणीप्रमाणें व कांटेरीहि असतें. तशींच बारीक फळेंहि येतात. वायूवर पाल्याचा रस किंवा काढा देतात. पाल्यानें अंग शेकतातहि. पाला पाण्यांत कढवून त्यानें वातविकार झालेल्यास स्नान घालतात. गुरांच्या क्षतावर पाला वांटून लेप देतात.

**माका**—हें अत्यंत औषधी रोप आहे. हें दोन वीत लांब असून जमिनीवर पसरलेलें असतें. ओलसर जागेंत बाराहि मास माका उगवतो. श्राद्धास माका लागतो. कोंकणांत त्या दिवशीं याचें रायतें करतात. काळा व निळा अशा जाती आहेत. याच्या पाल्याच्या रसानें व्रण धुतात. मुलांच्या सर्दीवर मधांत याचे दोन थेंब देतात. पोटांतील डब्यावर याचा रस तुपाशीं देतात. मुखपाकावर पाला तंबाखूप्रमाणें चघळतात व पिंका टाकतात. कावीळ झाली असतां माक्याच्या रसांत मिरपूड ६ मासे घालून दह्याबरोबर देतात. याप्रमाणें याचे बरेच औषधी उपयोग आहेत. "नाय, निर्गुंड, माका, सर्व औषधांचा काका" अशी एक म्हण आहे.

**माकड**—वानर. एक द्विहस्त प्राणिवर्ग. लेमूर व मनुष्य या दोन प्राण्यांच्या मधील सर्व अवस्थांतील प्राथमिक प्राण्यांस हें

**कोळी माकड**

[ याची शेपटी त्याचा पाचवा हातच कीं काय अशी उपयोगी पडते. ]

सामान्य नांव आहे. यांचे दोन मुख्य वर्ग पाडतां येतात. एक जुन्या भूखंडांत राहणारा. हा जरा उच्च प्रतीचा असून तो आशिया व आफ्रिका खंडात आढळतो. या वर्गांत एप, ओरांगउटांग, चिंपाझी, गोरीला, वगैरे माकडें येतात. दुसरा वर्ग अमेरिका या

**र्‍हेसस माकड**

खंडांत आढळतो. यांच्या नाकपुड्या खोल असतात, व शेपट्या सहज वळणाऱ्या असून त्यांच्या योगानें त्यांस झाडाची फांदी वगैरे पकडतां येते. यांचे गाल फुगलेले नसतात, आणि यांच्या ढुंगणावर घट्टे नसतात. यांच्यामध्यें मार्मोसेट, कोळी माकड (स्पायडर), कॅपुचिन, वगैरे जाती आहेत.

गोरिला व चिंपान्झी या जातींच्या माकडांवर स्वतंत्र लेख आहेत ते पाहावेत.

ओरांगउटांग या उपमानव वानरवंशाची जास्त माहिती त्या नांवाखालीं सांपडेल. हीं अपुच्छ वानरें आहेत. गोरिला आणि चिंपान्झी यांचीं शरीरें बहुतेक माणसांसारखीं असतात. तसेंच

**ओरांगउटांग**

माणसें व माकडें यांचें रक्त एकमेकांशीं जमतें. तेव्हां अशासारख्या गोष्टींवरून माकडाचा माणूस झाला हें विकासवादांतील तत्त्व खरें ठरतें. ओरांगउटांग, विकासवाद पाहा.

**लंगूर माकड (हिमालयांतील)**

बघून—हा माकडाच्या जातीचा एक प्राणी आहे. यांचें तोंड कुत्र्यासारखें लांबट व एकदम पुढें आलेलें असतें. यांस सुळे दांत असतात, शेपटी आंखूड असते, गालांत पिशव्या असतात, डोळे लहान व खोल असून भिंवया मोठ्या असतात व कुल्ल्यांवर घट्टे असून त्यांवर केंस असतात. त्यांचे मागचे व पुढचे पाय प्रमाणशीर असतात त्यामुळें ते चारी पायांवर पळूं शकतात, परंतु त्यांना फारसें उभें राहता येत नाहीं. यांचा आकार सामान्यतः कुत्र्याएवढा असतो, परंतु यांतील मँड्रिल (पाहा) जातीचा मोठा वानर उभा राहिला असतां जवळजवळ मनुष्याइतका उंच असतो. हे फळें, मुळें, अंडीं, किडे, वगैरेवर उपजीविका करतात. याच्या कांहीं जाती आहेत.

लेमूर ही जात मुख्यत्वें अमेरिकेंत सापडते. अपुच्छ वानर हिंदुस्थानांत दिसत नाहींत. आफ्रिका, सुमात्रा, मलाया, वगैरे भागांत अशीं वानरें आढळतात.

गिब्बॉन—पूर्वेकडील द्वीपसमूहांत आढळणाऱ्या माकडांच्या जातीला हें एक सामान्य नांव आहे. याचें शरीर कृश असून याचे हात फार लांब असतात. याचा रंग काळा असून याची दाढी करडी किंवा पांढरी असते.

गिब्बॉन माकड (पांढऱ्या हाताचा)

माकड आणि वानर या नांवात भेद केला जातो. माकड हें माणसाळलेलें व वानर हे जंगली असें समजतात. दरवेशी ही भिकाऱ्यांची जात माकडें पाळून त्यांचे खेळ करतात. माकडें हीं तांबूस–पिवळ्या रंगाचीं असतात. उंची साधारणपणें २ फूट व शेपूट दहापंधरा इंच लांब असते. हीं कळप करून राहतात. वानरें 'हुप्प' असा आवाज काढतात. त्यावरून त्याना हुप्या म्हणतात. वानर शरीरानें मोठें व बळकट असतें. त्याची शेपूटहि फार लांब असते. रंग पिवळट किंवा उदी असतो; व पोटाची बाजू पांढुरकी असते. वानराचें तोंड व हातापायांचे तळवे काळे असतात. वानर सहसां माणसाळत नाहीं कीं माकडाप्रमाणें चटकन् शिकत नाहीं.

इंद्र आणि इंद्राणी यांच्या संवादांत वृषाकपि 'नर–वानर' अशा संबंधांत कपि हा शब्द ऋग्वेदात एकदां आलेला आहे. वानराचा रंग पिंगट असतो असें तेथें लिहिलें आहे. वानर केंसाळ असून, तो कुत्र्याचा शत्रु आहे, असें अथर्ववेदांत म्हटलें आहे. माकडें माणसाळवीत असत असें 'वृषाकपि' सूक्तांतील स्थलावरून आणि तैत्तिरीय संहितेंतील वनवासी मयु या त्याच्या उल्लेखावरून दिसतें.

रामायणांत तर वानरसैन्य व त्याचे पराक्रम पाहून अचंबा वाटूं लागतो. वाली, सुग्रीव, हनुमान, वगैरे वानरवीर व त्यांचे अनुयायी हे खरेच प्राणी होते कीं वानरचिन्ह धारण करणारें एक लोकराष्ट्र होतें याचा उलगडा होत नाहीं. किष्किंधेला वानरध्वज असणारें एक राष्ट्र असावें असें जैन रामायणावरून दिसतें. कांहीं पुराणसंशोधक पौराणिक वानरांना असंस्कृत किंवा अर्धसंस्कृत माणसेंच समजतात. 'वानर' या संज्ञेचाहि अर्थ तोच (वा नर) लावतात. रामायणांतील हनुमानामुळें वानरोपासना हिंदूंमध्यें सुरू झाली. जपान आणि आफ्रिका या देशांतहि वानरोपासना आढळते. सिलोनमध्यें माकडाचा दांत ठेवलेलें असें एक प्रख्यात देऊळ आहे.

**माकडी**—हें एक रानझाड आहे. हें लिंबुणीप्रमाणें व कांटेरीहि असतें. तशींच बारीक फळेंहि येतात. वायूवर पाल्याचा रस किंवा काढा देतात. पाल्यानें अंग शेकतातहि. पाला पाण्यांत कढवून त्यानें वातविकार झालेल्यास स्नान घालतात. गुरांच्या क्षतावर पाला वांटून लेप देतात.

**माका**—हें अत्यंत औषधी रोप आहे. हें दोन वीत लांब असून जमिनीवर पसरलेलें असतें. ओलसर जागेंत बाराहि मास माका उगवतो. श्राद्धास माका लागतो. कोंकणांत त्या दिवशीं याचें रायतें करतात. काळा व निळा अशा जाती आहेत. याच्या पाल्याच्या रसानें व्रण धुतात. मुलांच्या सर्दीवर मधांत याचे दोन थेंब देतात. पोटांतील डव्यावर याचा रस तुपाशीं देतात. मुखपाकावर पाला तंबाखूप्रमाणें चघळतात व पिंका टाकतात. कावीळ झाली असतां माक्याच्या रसांत मिरपूड ६ मासे घालून दह्याबरोबर देतात. याप्रमाणें याचे बरेच औषधी उपयोग आहेत. "नाय, निर्गुंड, माका, सर्व औषधांचा काका" अशी एक म्हण आहे.

**माखली**—( इं. कटल फिश. सेपिआ ). माकणी. हे प्राणी मृदु शरीराच्या प्राणिवर्गांपैकीं आहेत. हे समुद्रांत सांपडतात. माखलीचें कवच पाठीकडे हाडाप्रमाणें ( शरीरांत ) त्वचावरणांत असतें. हें कवच माखली वरचेवर टाकून देतो; पण आंतून लगेच दुसरें तयार होतें. हें कवच समुद्राच्या कांठीं पडलेलें नेहमीं सांपडतें; यासच 'समुद्रफेस' म्हणतात.

गोगलगाई व शिंपा यांप्रमाणें या प्राण्यांना मृदु शरीराचा बनलेला पाय नसतो. यांचें खालचें धड व वरचें तोंड असे दोन भाग स्पष्ट दिसतात. तोंडाच्या भागांस चोंचीप्रमाणें दिसणारे जबडे असतात, व डोळेहि चांगले स्पष्टपणें दिसतात. तोंडाच्या भागाभोंवतीं आठ किंवा दहा लांब लांब बोटांसारखीं किंवा सोंडेसारखीं गात्रें असतात. या गात्रांस शीर्षपाद असें म्हणतात. गात्रें दहा असल्यास त्यांपैकीं दोन फार लांब असतात. या प्राण्यांना भक्ष्य पकडण्यास हीं गात्रें फार उपयोगी पडतात. या गात्रांना शोषण करणाऱ्या लहान लहान वाट्या असतात; त्यांचा तुंबडीप्रमाणें उपयोग होतो. या गात्रांनीं माखली दुसऱ्या प्राण्यांना चिकटून राहतात; किंवा भक्ष्य तोंडाजवळ आणूं शकतात. यांतील कित्येक प्राणी इतके प्रचंड असतात कीं, ते या शोषण करणाऱ्या वाट्यांनीं मनुष्यांससुद्धां ओढून घेऊन पाण्यांत बुडवूं शकतात. हे प्राणी फार खादाड व मांसभक्षक असतात. माखलीची श्वसनक्रिया त्याच्या कपा( पेल्या )प्रमाणें दिसणाऱ्या शरीरांत असलेल्या कल्ल्यामार्फत चालते. हा प्राणी श्वासोच्छ्वास करताना जोरजोरानें पाणी आंत घेतो व त्यास यामुळें पोहण्यास मागें गति मिळते. त्यास पुढें भराभर पोहतां येत नाहीं. हा पोहतांना आपल्या सोंडांचाहि उपयोग करतो. ह्या प्राण्यांच्या पोटांत एक काळ्या ( सेपिआ ) रंगाची ग्रंथि असते. शत्रूपासून निभाव करून घेणें असल्यास हा या ग्रंथींतून काळा रंग सोडून पाणी काळेकुट्ट किंवा गढूळ करून टाकतो व ही संधि साधून आपण पळ काढतो. हाच काळा रंग पूर्वीं चितारी लोक वापरीत असत. या प्राण्यांत नर व मादी निराळे असतात. यांतील लिंग-भेद प्राण्याची पूर्ण वाढ झाल्यावरच ओळखूं येतो. ( अष्टपाद पाहा ).

**मांग**—महाराष्ट्रांतील एक अस्पृश्य जात. दक्षिण कर्नाटक, वऱ्हाड, नागपूर, गुजराथ, इत्यादि भागांतहि यांची वस्ती आढळते. याची लो. सं. सुमारें ७ लाख आहे. मातंग या शब्दापासून मांग हा शब्द आला असावा. यांच्यामध्यें भिसे, चव्हाण, जाधव, जगताप, इत्यादि आडनांवें आढळतात. यांचें व महारांचें नेहमीं भांडण असतें. हे देवी, सरस्वती, मरीआई, महादेव, खंडोबा, इत्यादि देवतांची पूजा करतात. यांचे बहुतेक सर्व संस्कार स्पृश्य हिंदूंप्रमाणेंच आहेत. पुण्याकडील मांग जातींत पुनर्विवाह नाहीं असें सांगतात. गुरें खची करणें, दोरखंड वळणें, संदल, चाबूक, तोबरे, इत्यादि चामड्याचीं कामें मांग करतात. वाजंत्री वाजविणें, झाडलोट करणें, शेतकी, इत्यादिहि धंदे हे करतात. गारुडी मांगांची जात गुन्हेगार जातींमध्यें मोडते. गुजराथेंत मांगेला नांवाची एक कनिष्ठ जात आहे. यांच्यांत शिक्षणाचें मान अद्यापिहि फारच कमी आहे.

**मागणी आणि पुरवठा**—अर्थशास्त्रांत या संज्ञा महत्त्वाच्या मानतात. या दोहोंमधील संबंधावर व्यापार अवलंबून असतो. विकत घेणारांची ती मागणी व विकणारे मालाचा करतात तो पुरवठा. यांवर मालाचा भाव ठरत असतो. जेव्हां पुरवठ्यापेक्षां मागणी अधिक असते तेव्हां मालाची किंमत चढते, व उलट जेव्हां मागणीपेक्षां पुरवठ्याचा माल अधिक होतो तेव्हां किंमत उतरते. जेव्हां झटपट माल निघून खपतो तेव्हां किंमत ठरविणारीं कारणें अनेक असतात; पण दीर्घ काळाच्या बाबतींत उत्पादनाला लागणाऱ्या खर्चाच्या मानानें किंमत ठरून त्या मानानेंच पुरवठा होत असतो.

**मांगरोल**—काठेवाड, जुनागड संस्थानांतील एक बंदर. टॉलेमीनें याला मोनोग्लॉसस म्हटलें आहे. या बंदराच्या ईशान्येस सरासरी दीड मैलावर मांगरोल नांवाचें गांव आहे. तेथील लो. सं. सुमारें १६ हजार आहे. या गांवाचा मालक मुसलमान सरदार असून तो जुनागडच्या नबाबास ११,५०० रु. खंडणी देत असे. येथें हस्तिदंताच्या व चंदनी लांकडाच्या जडावाच्या पेट्या तयार होतात.

**मांगेला**—ठाणें जिल्ह्यांतील एक जात. लो. सं. सुमारें १४,०००. ही स्वतंत्र जात असून हींत पोटभेद नाहींत. यांचा धंदा प्रायः मासे विकणें हा असतो. घरगुती भाषा मराठी असते. परंतु ती फारच अशुद्ध असून तींत गुजराथी शब्दांचा भरणा फार असतो. हे स्मार्त पंथी आहेत. यांचे उपाध्याय पळशे ब्राह्मण असतात.

**माघ** ( सातवें शतक )—एक प्रसिद्ध संस्कृत कवि. गुजराथमधील भीनमाळ गांवीं श्रीमाल जातींत याचा जन्म झाला. त्याचें काव्य वाचिलें असतां साहित्य, राजनीति, योग, वेदांत, पुराणें, महाकाव्यें, इत्यादिकांचेंहि त्यानें आलोडन केलेलें प्रत्ययाला आल्यावांचून राहत नाहीं. शिशुपालवध या काव्यावरच माघाची प्रसिद्धि अवलंबून आहे. 'शिशुपालवध' हें महाकाव्य असून कृष्णानें शिशुपालाचा वध केल्याची हकीकत यांत वर्णिलेली आहे. संस्कृतांतील पंचमहाकाव्यांमध्यें याची गणना होते. या महाकाव्यामध्यें उपमा, अर्थगौरव व पदलालित्य हे तिन्ही गुण दृष्टीस पडतात. शब्दांवरील कोट्या, प्रास, अलंकार, इत्यादि-

कांची सुंदर जुळणी यांत दृष्टीस पडते. प्रा. पाठक यांनीं माघाचा काल आठव्या शतकाचा उत्तरार्ध धरला आहे.

**मांचुरिआ**—चीनमधील उत्तरेकडील फेंगटीन, किरीन, किआंग हीलुंग या तीन प्रांतांनीं बनलेला प्रदेश. क्षे.फ. ५,०२,०१३ चौ मैल. व लो. सं. ४,३२,३३,९५४. मुकडेन हें मुख्य शहर आहे. यांत तांदूळ, गहूं व बाजरी यांचरोबरच सोयाबीनचें पीक होतें. या निसर्गदत्त संपत्तीनें भरलेल्या या मुलुखाबद्दल रशिया, जपान व चीन यांचा झगडा चालू होता. १८९८ मध्यें रशियानें तेथें आपलें प्रस्थ बसवून बऱ्याच सवलती मिळविल्या; आगगाडी घातली; पोर्ट आर्थर बंदर बांधलें. १९०० सालच्या बॉक्सर बंडाच्या वेळीं रशियन सैन्यानें हा प्रांत व्यापला. यामुळें रशियाला पायबंद घालणें जपानला अवश्य वाटून रूसो-जपानी युद्धापर्यंत पाळी आली. त्यांत जपान विजयी झाल्यानें रशियाचे सर्व हक्क व अधिकार जपानला प्राप्त झाले. पुढें जपानच्या मदतीनें व संमतीनें १९३१ सालीं मांचुकुओचें स्वतंत्र राज्य स्थापन करण्यांत आलें व त्यांत मांचुरिआचा समावेश झाला. १९४५ त चिनी-जपानी युद्ध संपल्यानंतर चीनचें यावरील वर्चस्व रशियानें मान्य केलें. नंतर याचे नऊ प्रांत करण्यांत आले.

**माचोल**—या झाडास पानें नसतात, तर डहाळयांस जाड सालीसारखा नरम हिरवा गीर असतो. हीं झाडें वाळवंटांत खाऱ्या जमिनींत उगवतात; तेव्हां साहजिकच त्यांच्या अंगीं खारटपणा असतो व भाजी करतांना तींत मीठ घालावें लागत नाहीं. डहाळया उकडून भाजी किंवा रायतें करतात.

**मांजर**—हा एक मांसाहारी प्राण्यांचा सामान्य वर्ग आहे.

यांत सिंह, वाघ, प्यूमा, रानमांजर, वगैरे प्राणी येतात. परंतु मांजर हा शब्द फक्त एका माणसाळलेल्या पाळीव प्राण्यास लावतात. यास प्रथम ईजिप्तमध्यें माणसाळविण्यांत आलें असें मानतात. ईजिप्ती लोक या प्राण्यांस पवित्र मानीत व त्यांची सुरक्षित शवें अद्यापिहि आढळतात. ग्रीक किंवा रोमन लोकांत मांजर पाळण्याचा फारसा प्रघात नव्हता व युरोपमध्येंहि हा प्रघात फारसा प्राचीन आढळत नाहीं. पाळीव मांजर हें रानमांजराच्याच जातींचें आहे असें कांहीं मानतात; पण या बाबतींत मतभेद असून पाळीव मांजर हें सिंह, वाघ, वगैरे जातींस अधिक जवळ दिसतें व त्यांच्याप्रमाणेंच याचा जबडा आखूड व बळकट असून दांत तीक्ष्ण असतात. तसेंच यांचा स्वभाव धूर्त असून हीं रात्रींच संचार करतात व त्यांचे डोळे या कामींच योग्य असतात. तसेंच हीं फार धिमेपणानें पाठलाग करतात. यांच्या मिशा स्पर्शेंद्रियाप्रमाणें यांना उपयोगी असतात. मांजर उंदीर धरून खातात त्यामुळें लोक यांना पाळतात. मांजरांना दूध फार आवडतें व त्यासाठीं तीं चोऱ्या करतात असें आपण पाहतों. पण यांचें अन्न सामान्यतः मांस व मत्स्य हें होय. हा प्राणी स्वच्छ असून आपल्या अंगावरील लव काळजीपूर्वक रक्षण करतो. यांचीं पिलें ६३ दिवस गर्भावस्थेंत असतात व एका वेळीं ३ ते ६ पिलें होतात व तीं प्रथम नऊ दिवस अंधळीं असतात.

अंगोरा अथवा इराणी मांजराचे केंस मऊ व लांब असतात. आइल ऑफ मॅन या बेटांतील मांजरास शेपटी नसते. स्कॉटलंड देशांत व युरोप आणि पश्चिम आशियाच्या कांहीं भागांत अद्यापि जंगलामध्यें रानमांजरें आढळतात. हीं झाडांच्या ढोलींत किंवा खडकामध्यें राहतात. हीं फार भयंकर असतात.

मांजर मारणें हें आपल्याकडे पाप समजतात व त्याच्या क्षालनासाठीं काशीयात्रा सांगितली आहे.

**मांजरी**—मुंबई, पुणें जिल्हा, हवेली तालुका. पुण्यापासून ९ मैल दूर आडरस्त्यावर मुळामुठेच्या कांठीं मांजरी खुर्द हें गांव वसलेलें आहे. या गांवचें क्षेत्रफळ २,९४६ एकर असून यांपैकीं २,२७२ एकर जमीन लागवडीस योग्य आहे. तींत ज्वारी व बाजरी हें पीक मुख्यतः येतें. गांवांत ८०० लोकवस्ती आहे. दवाखाना नाहीं. एक शाळा आहे. गांवांत विहीर नाहीं. या गांवाकडून सरकारकडे १,८८० रु. ९ आणे साऱ्याबद्दल वसूल जातो. लो. फंड २३७ रु. १४ आ. ६ पै आहे. इतर गांवाप्रमाणें याची स्थिति अगदीं निकृष्ट आहे. गांवाजवळ सरकारी शेतकी खात्याचीं प्रायोगिक शेतें आहेत.

**माझिनी, गिउसेप** (१८०५–१८७२)—एक इटालियन ग्रंथकार व देशभक्त. याचा जन्म जिनोआ येथें झाला. यानें चाळीस वर्षें सतत युरोपमध्यें राजकीय चळवळ केली; व इटलीमध्यें ऐक्याचें बीजारोपण करून तो देश स्वातंत्र्योन्मुख

केला. याला इटलीमधून १८३० मध्यें हद्दपार करण्यात आलें तेव्हां त्यानें मार्सेल्स येथें जाऊन 'तरुण इटली' या संस्थेची स्थापना केली. १८३७ मध्यें लंडन येथें येऊन इंग्लिश राष्ट्राची सहानुभूति मिळविण्याची त्यानें खटपट केली. १८४९ मध्यें स्थापन करण्यांत आलेल्या अल्पजीवी रोमन प्रजासत्ताकाच्या तो एक सत्ताधारी त्र्यींतील होता. त्यानें १८५९-१८६० मध्यें काव्हूर व गॅरिबॉल्डी यांस फार उत्साहानें साहाय्य केलें. याचा मृत्यु १० मार्च १८७२ या दिवशीं झाला. परंतु त्यापूर्वी इटली देशांत पूर्णपणें ऐक्य स्थापन झाल्याचें दृश्य त्यास पाहावयास सांपडलें. त्याचीं कांहीं पत्रें व निबंध प्रसिद्ध आहेत. बॅरिस्टर सावरकर यांनीं लिहिलेलें माझिनीचें मराठी चरित्र मागें अनेक महाराष्ट्रीय तरुणांना स्फूर्तिदायक झालें होतें व म्हणून सरकारनें त्यावर बंदी घातली होती.

**मॉंटगॉमेरी**—पाकिस्तान, पश्चिम पंजाब, मुलतान विभागामधील एक जिल्हा. याचें क्षे. फ. ४,२०४ चौरस मैल व लो. सं. (१९४१) १३,२९,१०३. जिल्ह्यांत एकंदर तीन शहरें व १८६५ खेडीं आहेत. आग्नेयीस सतलज व वायव्येस रावी नदी वाहत गेली आहे. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फार मागासला आहे.

**मॉंटेग्यू, एड्विन सॅम्युअल** (१८७९-१९१४)—एक इंग्रज मुत्सद्दी. १९०६ सालीं पार्लमेंटमध्यें निवडून आले. १९१० सालीं त्याना हिंदुस्थानचे दुय्यम सेक्रेटरी नेमण्यांत आलें. हाउस ऑफ कॉमन्समध्यें हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या प्रश्नासंबंधीं नेहमीं पुढाकार घेत असत. १९१६ सालीं युद्धसाहित्य खात्याचे ते मुख्य झाले. लाइड जॉर्जच्या साम्राज्यविषयक युद्धमंडळामध्यें त्यांना जागा मिळाली होती. नंतर ते हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी झाले. २० ऑगस्ट १९१७ रोजीं यांनीं क्रमाक्रमानें मिळावयाच्या हिंदी स्वराज्याचा जाहीरनामा काढला. हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीची माहिती व्हावी या उद्देशानें त्यांनीं हिंदुस्थानांत येऊन निरानिराळ्या राजकीय पक्षांच्या पुढाऱ्यांच्या मुलाखती घेतल्या. १९१९ सालीं हाउस ऑफ कॉमन्सनें राजकीय हक्कांचा मसुदा मंजूर केला. त्या योगानें हिंदुस्थानला वसाहतींच्या स्वराज्याबाबतचे कांहीं हक्क मिळाले. प्रांतांतून द्विदल राज्यपद्धति सुरू झाली व मध्यवर्ती विधिमंडळांत प्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व आलें.

**मॉंटेनिग्रो**—युरोपमधील एक पूर्वीचा देश. हल्लीं याचा समावेश युगोस्लाव्हिया (पाहा) यांत करण्यांत आला आहे. १३९० मध्यें हें एक अगदीं छोटेंसें संस्थान होतें. १६९७ मध्यें डॅनिलो घराण्याची सत्ता येथें सुरू झाली. १८७८ मध्यें तें स्वतंत्र झालें. तोंपावेतों तुर्कांची अधिसत्ता होती. १९०५ मध्यें नवीन राज्यघटना करण्यांत आली. १९१० मध्यें प्रिन्स निकोलस यानें आपणांला 'राजा' म्हणून संबोधून घेतलें. १९१४ च्या महायुद्धांत तो सर्व्हियाबरोबर होता. त्यामुळें ऑस्ट्रियन सैन्यानें १९१६ मध्यें तेथें आपला पूर्ण कबजा बसविला. १९१८ मध्यें ऑस्ट्रियन लोक गेले व त्यांची जागा सर्व्हियन लोकांनीं घेतली. त्यानंतर मॉंटेनिग्रोच्या लोकांनीं निकोलसला पदच्युत करून युगोस्लाव्हियांत मिसळण्याचें ठरवलें. हल्लीं मॉंटेनिग्रो हा युगोस्लाव्हियाचाच एक भाग आहे. क्षे. फ. ३,५३६ चौ. मैल. व लो. सं. ५,२५,०००. मुख्य शहर सेतिंजे. गुरें पाळण्याचा मुख्य धंदा आहे.

**मॉंटेसोरी, मराया** (१८७०- )—एक इटालियन शिक्षणशास्त्रज्ञ महिला. तिनें वैद्यकीचा अभ्यास करून त्याचा उपयोग लहान मुलांच्या बौद्धिक दुर्बलतेच्या संशोधनाकडे केला. १८९८ सालीं अशा लहान मुलांच्या शिक्षणासाठीं तिनें एक संस्था काढली. तिनें अशा बालशिक्षणासाठीं अवलंबिलेली पद्धति लवकरच मान्यता पावून इतर देशातून अशा शिक्षणसंस्था निघाल्या. हिंदुस्थानांतहि अशा संस्था चालू आहेत व मद्रासमध्यें एक केंद्रच स्थापन झालें आहे. १९२३ सालीं डरहॅम विद्यापीठाकडून हिला एल्‌एल्. डी. ही सन्मान्य पदवी मिळाली.

**मॉंटेसोरी पद्धति**—मॉंटेसोरी हिनें प्रथम व्यंग असणाऱ्या मुलांस शिक्षण देण्याचा रोम शहरांतील गलिच्छ वस्तीमध्यें आरंभ केला. तिच्या पद्धतीचा तिला इतका विलक्षण परिणाम दिसून आला कीं, तिनें ही पद्धति सर्वसामान्य मुलांच्या बाबतींत योजून पाहिली. आपल्या शिक्षणक्रमामध्यें उपयोगांत आणण्याकरितां तिनें जीं नवीन नवीन उपकरणें व साधनें शोधून काढलीं त्यामुळें मुलांचें साहजिकच कुतूहल जागृत होतें व त्यांस शिक्षणांत गोडी लागते. या पद्धतीनें शिकणारीं मुलें वाचन, लेखन, संख्यागणन आणि साधें अंकगणित इतके विषय वयाच्या सहाव्या वर्षापर्यंत शिकतात. बालशिक्षणक्षेत्रामध्यें या पद्धतीनें क्रांति घडवून आणली आणि अनेक देशांत या पद्धतीचा अवलंब करण्यांत आला.

ज्ञानेंद्रियांना वळण देऊन व विशेषतः स्पर्शज्ञानाची मदत घेऊन मंद बुद्धीच्या मुलांना सुधारतां येतें. वैयक्तिक शिक्षणावर या पद्धतींत सारा भर असतो. त्यामुळें शिक्षक किंवा पालक यांचें मुलांकडे सारखें लक्ष असावें लागतें. मुलांना शिक्षणसाहित्यांचा उपयोग करावयास सांगणें, त्यांत मदत करणें, चौकसबुद्धि

जागृत करणें व समज देणें या गोष्टी आवश्यक असतात. प्रत्येक मुलाची आवडनिवड, ग्रहणशक्ति, संवयी, वगैरे गोष्टी शिक्षकानें लक्षात घेऊनच त्यांना साधनें द्यावीं लागतात. या शिक्षण-पद्धतींत अनुक्रमहि असतो. या पद्धतीसंबंधीं बरेंच वाङ्मय उपलब्ध आहे.

**माठ**—हें भाजीचें झाड लावल्यापासून तीन आठवड्यांत भाजीच्या उपयोगास येतें. पांढरा व तांबडा असा याच्या दोन जाती आहेत. माठ औषधी आहे. खांडुक लवकर फुटण्यास भाजीचा सुकलेला देंठ जाळून त्याची राख व चुना एकत्र करून लावावें. मद्यावर उतार म्हणून देठाचा रस देतात.

**मांड**—हा राग बिलावल थाटाचा जन्य आहे. या रागाचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होत असल्यामुळें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. हा राग सार्वकालिक मानितात. आरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर दुर्बल आहेत. याचा अवरोह वक्र आहे. यांत निषाद स्वर कंपित होत असतो. मारवाडांत हा राग फार लोकप्रिय आहे. याची प्रकृति क्षुद्र आहे.

**माडखोलकर, गजानन त्र्यंबक** (१८९६-     )—एक मराठी ललित-लेखक, टीकाकार व वृत्तपत्रव्यवसायी. यांचें जन्मठिकाण मुंबई. ज्ञानप्रकाश (पुणें), महाराष्ट्र (नागपूर), इत्यादि पत्रांत कामें केल्यानंतर १९४३ सालीं हे नरकेसरी (अभ्यंकर) स्मारक मंडळातर्फें नागपूर येथें चालविण्यांत येणाऱ्या '*तरुण भारत*' *या दैनिकाचे प्रमुख संपादक झाले.* वाङ्मयीन व राजकीय टीकाकार म्हणून हे प्रसिद्ध आहेत. यांचे टीकालेख 'परामर्श', 'आधुनिक कविपंचक', 'माझे आवडते लेखक', इत्यादि नांवांखालीं प्रसिद्ध झाले आहेत. पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश'मध्यें असतांना यांनीं 'काव्यशास्त्रविनोद' हें सदर सुरू केलें व त्या वेळीं तें अत्यंत लोकप्रिय झालें होतें. यांनीं श्री. श्री. ना. बनहट्टी यांच्या सहकार्यानें विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें एक चरित्रहि लिहिलें आहे. यांचें 'दोन तपें' या नांवाचें आत्मचरित्र वाचनीय आहे.

मराठी वाङ्मयांत खऱ्या राजकीय कादंबऱ्या लिहिण्यास यांनींच सुरुवात केली. यांच्या कादंबऱ्यांतून स्थल, काल, व्यक्ति, इत्यादींचीं वर्णनें अचूकपणें केलेलीं आढळून येतात. या दृष्टीनें खरे(मध्यप्रांताचे पंतप्रधान)प्रकरणावर यांनीं लिहिलेली 'मुखवटे', किंवा (१९४२) नऊ ऑगस्टच्या चळवळीवरील 'प्रमद्वरा' या यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या आहेत. यांच्या कादंबऱ्यांतून उत्तान शृंगार बराच डोकावतो व त्यामुळें शिष्ट व शालोपयोगी वाङ्मयांत त्यांचा समावेश करण्यास कित्येक जण हरकत घेतात.

सन १९४६ मध्यें बेळगांव येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या तिसाव्या अधिवेशनाच्या (ललित विभागाच्या) अध्यक्षपदाचा मान यांना लाभला होता. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीनें ते एक आधारस्तंभ आहेत.

**मांडवगड**—मांडू. हा प्रेक्षणीय व ऐतिहासिक महत्त्वाचा गड मध्य भारतांतील माळवा प्रांतांत समुद्रसपाटीपासून २०७९ फूट उंचीवर विंध्य पर्वताच्या एका फांट्यावर आहे. लैला-मजनू व शिरीन-फरहाद या प्रेमी जोडप्याप्रमाणें रूपमती व बाजबहादूर या प्रेमी युगुलाची प्रेमकथा ज्यांत घडली तो हा इतिहासप्रसिद्ध दुर्ग आहे. मांडवगड ज्या फांट्यावर वसला आहे तो तुकडा विंध्याच्या विस्तारांत बेटासारखा अलगच आहे. अनेक सुंदर निसर्गनिर्मित सरोवरें व वृक्ष यांनीं युक्त असा एक समतल भाग विंध्याच्या दुर्गम शिखरसमुच्चयांत आहे. या सुंदर स्थानाच्या ५ मैल लांब व ४ मैल रुंद भागावर या दुर्गाची निर्मिति दोन हजार वर्षांपूर्वी झाली आहे. या दुर्गाच्या बाजूस 'काकडाखोह' व 'अंडाखोह' या प्रसिद्ध दऱ्या आहेत. काकडाखोह ही दरी तर हजार फुटांहून खोल असून बाराहि महिने तेथें वाघांची वस्ती असते. या दुर्गाचा परिघ सुमारें ३७ मैलांचा असून तो कृत्रिम व निसर्गनिर्मित तटांनीं युक्त आहे. या किल्ल्यांत प्रवेश करण्यासाठीं बारा मार्ग आहेत. पण उत्तरेचा फक्त एकच मार्ग गाडी येण्याच्या दृष्टीनें सुलभ आहे. हा उत्तरेचा मुख्य मार्गसुद्धां २०० फूट खोल दरीवर पूल बांधून तयार केला आहे.

मध्यभारताची राजधानी होण्याचें भाग्य कांहीं काल धार व मांडवगड यांच्या वांट्यास आलें होतें. दोन हजार वर्षांपूर्वी पहिल्या विक्रमादित्यानें या स्थळीं विहार केला होता. मांडवगडचें प्राचीन काळीं नांव 'मंडपदुर्ग' होतें. त्या प्राचीन काळच्या विशाल नगरीच्या अस्तित्वाचा आज मागमूसहि नाहीं. आज या स्थळीं उभ्या असलेल्या इमारती मुख्यतः मुसलमानांच्या वेळच्या आहेत. तरी पण त्यावर हिंदू शैलीची छाप सर्वत्र दिसून येते. माळव्यावर राज्य करणाऱ्या सम्राट् यशोधर्माच्या अमदानींत (इ. स. च्या सहाव्या शतकांत) मांडवनगरी अत्यंत समृद्ध होती, असे उल्लेख आहेत.

प्रतिहारानंतर परमार राजांचें आधिपत्य मांडवगडावर सुरू झालें. परमार राजे विद्या व कला यांचे उपासक होते. सम्राट् भोजाच्या कालांत मांडवगडावर संस्कृत महाविद्यालय स्थापन करण्याची आवश्यकता निर्माण झाली होती. मांडवगडांतील जामा मशिदीच्या पुढील अशरफी महालाच्या खालच्या भागास आजहि 'मदरसा' म्हणतात. याच स्थळीं उत्खननाच्या वेळीं एक शिलाखंड उपलब्ध झाला होता. त्यावर वाक्देवीच्या स्तुतिपर

एक लेख आहे. येथेंच निळ्या पाषाणाची सरस्वतीची एक भव्य मूर्तिहि मिळाली आहे. वीणाधारी स्वरूपाची ही मूर्ति अत्यंत सुंदर आहे. भोजानें स्थापन केलेलें संस्कृत महाविद्यालय या स्थानींच होतें, हें उत्खननानें सिद्ध केलें आहे. धारच्या सरस्वती मंदिरासारखेंच हें मंदिर असावें असें वाटतें. भोजकुंड व सोमवतीकुंड, हे दोन जलाशय आज मांडवगडांत आहेत. सोमवती ही भोजाची कन्या होती. जहाज महालाच्या मागचा तलाव आजहि मुंजतलाव याच नांवानें प्रसिद्ध आहे. परमार राजा तिसरा जयसिंहदेव ( इ. स. १२६१–८० ) याच्या मंत्र्यानें २०० जैन मंदिरांचा जीर्णोद्धार करून वर सोन्याचे कळस चढविले. १८ लक्ष रुपये खर्च करून 'श्रीशत्रुंजयावतार' नांवाचें विशाल मंदिर निर्माण केलें होतें. जयसिंहदेवाचा पुत्र झांझण यानें येथें अनेक धर्मशाळा, जैनमंदिरें, जैनपाठशाळा स्थापन केल्या. त्यानेंच एक फार मोठें ग्रंथसंग्रहालय स्थापन केल्याचाहि उल्लेख आढळतो. श्वेतांबरी जैनांचीं ७०० मंदिरें या कालांत येथें होतीं. मध्ययुगांत मांडवगड ही कुबेरनगरी होती. सहाव्या शतकापासून ते इ. स. १३१० पर्यंत मांडवगडांत हिंदु संस्कृतीचें अस्तित्व उज्ज्वल स्वरूपांत होतें. पण आज या कालांतील वास्तु व शिल्पवैभव यांचा आढळ मांडवगडांत होत नाहीं. मांडवगडाच्या लोहानी दरवाजाजवळ लोहानी गुंफा नांवाचें एक अत्यंत प्राचीन स्थान आहे. या गुंफेच्या शिल्पावरून ही हिंदु संस्कृतीची आहे असें दिसतें. मांडवगडाच्या वायव्येस तीन मैलांवर एक प्राचीन दुर्ग आहे. त्यास लोक बुढी मांडव या नांवानें संबोधितात.

चौदाव्या शतकाच्या सुरुवातीस अल्तमशनें इ. स. १३०५ मध्येंच माळवा जिंकला. त्याचें लक्ष मांडवगडाकडे गेलें व तेथें त्यानें आपलें स्वामित्व प्रस्थापित केलें. तेव्हांपासून दिल्लीच्या बादशहाची येथें हुकमत सुरू झाली. परंतु मांडवगडाचें नैसर्गिक व भौगोलिक अपूर्वत्व पाहून दिलावरखानानें योग्य संधि पाहून दिल्लीपतीचें स्वामित्व झुगारून दिलें व या अभेद्य मांडवगडावर दिलावरखान स्वतः सुलतान बनून माळव्याचें राज्य करूं लागला. त्याचा मुलगा होशंगशहा यानें मांडवगड ही माळव्याची कायमची राजधानीच करून टाकली. तेव्हांपासून राजधानीस शोभेल अशा वास्तुकृती निर्माण होऊं लागल्या. होशंगशहा इ. स. १४०५ मध्यें गादीवर बसला. त्यानंतर २०० वर्षे मांडवगडांत पठाणशैलीच्या अनेक वास्तुकृती निरनिराळ्या सुलतानांनीं निर्माण करून मांडवगडाचें वास्तुवैभव वाढविलें.

होशंगशहानें मांडवगडास आपली कायम राजधानी बनविल्यावर गडाच्या प्रचंड तटांची दुरुस्ती करविली. त्यानें बांधलेल्या राजप्रासादांनीं ४५० एकर जागा व्यापिली आहे. त्यानें बांधलेले हमामखाने (स्नानगृहें) २५० एकरावर पसरले आहेत. उत्तरेकडील दिल्ली दरवाजा पठाणशैलीचा असून त्याची बांधणी सुंदर आहे. या सुलतानानें स्वतःसाठीं एक मनोहर कबर बांधली होती. या मशिदीस प्रकाशासाठीं ज्या जाळ्या बसविल्या आहेत त्यांचें नक्षीकाम अत्यंत कौशल्यपूर्ण आहे. यानें आपल्या कारकीर्दींत आज प्रख्यात असलेल्या जामा मशिदीच्या बांधकामास प्रारंभ केला होता. ही एक अति उत्कृष्ट वास्तुकृति आहे. ती विशाल आकाराची नसली तरी अत्यंत डौलदार, सुंदर व जोमदार झाली आहे. पठाणशैलीचा नमुना म्हणून ती दाखविली जाते. पूर्व-पश्चिम २९० फूट लांब व दक्षिणोत्तर २७१ फूट रुंद आहे. ह्या मशीदींत मध्यंतरीं १६२ × १६२ फुटांचें एक खुलें चौरस प्रांगण आहे. प्रमुख सभामंडपावर तीन प्रमाणबद्ध घुमट आहेत. प्रत्येक घुमट १२ स्तंभांवर आधारलेला असून त्याचा व्यास प्रत्येकीं ४२ फुटांचा आहे.

हुशंगशहाचा मुलगा महमद गादीवर आल्यावर त्यानें आपल्या राजधानीचें नांव बदलून 'शाहियाबाद' ( आनंदनगर ) असे ठेवलें. हा अत्यंत क्रूर होता. त्याचा खून करून त्याचा मेहुणा महमुदशहा गादीवर आला. यानेंच जामा मशिदीचें बांधकाम पूर्णतेस नेलें. हा सुलतान अत्यंत पराक्रमी व धार्मिक वृत्तीचा होता. यानें आपले वकील दूरदूरच्या राष्ट्रांत पाठविले होते. फारशी साहित्याचा अभ्यास करण्यासाठीं यानें मांडवगडांत एक महाविद्यालय स्थापन केलें होतें. याच राजाचा मुलगा ग्यासुद्दीन हा शांतताप्रिय पण अत्यंत विलासी राजा होऊन गेला.

याच राजानें मुंज तलावाच्या कांठावर जहाज महाल निर्माण केला आहे. दोन्ही बाजूंस दोन तलाव व मध्यंतरीं जहाजाच्या आकाराचा हा महाल आहे. याची रुंदी ४० फूट असून लांबी ३६० फूट आहे. वरच्या मजल्यावर पाणी पोहोंचण्याची व्यवस्था आश्चर्यकारक आहे. सर्वत्र कारंजीं व हौद आहेत. या महालाचा जीर्णोद्धार जहांगिरानें करविला होता. वयाच्या ८० व्या वर्षीं हा सुलतान मुलाच्या हातून मरण पावला. या क्रूर व दुष्ट मुलामध्यें पित्याची वास्तुकलाप्रियता उतरली होती. रेवा कुंडाजवळील राजप्रासाद बांधण्यास यानेंच सुरुवात केली होती. तो पुढें बाझबहादूरनें पुरा करविला. उज्जनीचा कालिया देह या नाझीरनेंच बांधविला होता. रेवा कुंडाजवळील वर उल्लेखिलेला प्रासाद 'बाजबहादूर का महाल' म्हणून प्रसिद्ध आहे. या महालाच्या उत्तर बाजूच्या खिडकींत बसून जहांगिरानें आपल्या वाढदिवसाचा दरबार केला होता. या वेळीं इंग्लंडहून आलेला सर टॉमस रो उपस्थित होता. बादशहाच्या सोन्यानें, चांदीनें, नाण्यांनीं अशा निरनिराळ्या तुला करून ती सर्व

संपत्ति गरिबांना वांटण्यांत आली. सर टॉमस रोला ही संपत्ति लुटण्यास लाज वाटूं लागली. बादशहानें हें पाहून स्वतः हुकूम सोडला व साहेबाच्या पॅटच्या दोन्ही खिशांत भरपूर रुपये भरले. हा महाल एका उच्च कारागिरीचा नमुना आहे.

नाझीरउद्दीनच्या मृत्यूनंतर दुसरा महमूद खिलजी राज्यावर बसला. याच्या हातून मांडवगडावर कांहीं कलाकृती निर्माण झाल्या नाहींत. याच्यानंतर मांडवगड दिल्लीच्या बादशहाच्या अधिकाराखालीं गेला. लवकरच माळवा प्रांतावर सुजातखान याची सुभेदार म्हणून नेमणूक झाली. हा सरदार अत्यंत पराक्रमी व प्रजापालनदक्ष होता. यानें मांडवगडांतील हिंदोळा महाल बांधविला असें म्हणतात. कांहीं इतिहासकार गियासीउद्दीन यालाच या महालाचें श्रेय देतात. झुलणाऱ्या हिंदोळ्यासारखा हा महाल दिसतो. याची बांधणी भक्कम असून मधल्या उंचच उंच गॉथिक पद्धतीच्या अजस्र कमानी पाहून आश्चर्य वाटतें. यावर हत्तीवर बसून जाण्यासाठीं रस्ता आहे. या महालाच्या समोर मोठमोठीं तळघरें आहेत. तीं एकाखालीं एक आहेत. जवळची चंपावावडी साऱ्या मांडवगडांत सुप्रसिद्ध आहे. या बावडीच्या सभोंवतीं तीन मजले जमिनींत आहेत. पाणी अत्यंत गहरें आहे. जवळच उष्ण व थंड पाण्याचीं स्नानगृहें आहेत.

इ. स. १६१७ मध्यें जहांगीर आपल्या लाडक्या राणीसह-सम्राज्ञी नूरजहानसह-येथें विहार करण्यासाठीं आला होता.

सुजातखानाचा मुलगा बाजबहादूर (पाहा) यानें मांडवाचें वास्तुवैभव वाढविण्यांत हातभार लावला होता. रेवा कुंडाजवळील राजप्रासाद, रूपमतीचा महाल यानेंच तयार करविला. रूपमतीच्या महालांतून नर्मदा नदीचें दर्शन आजहि प्रेक्षक घेऊं शकेल. रूपमतीला रोज नर्मदेचें दर्शन घडावें म्हणून या उंच ठिकाणीं हा महाल बांधण्यांत आला होता. इ. स. १५६२ मध्यें बाजबहादूर पराभूत झाला आणि दिल्लीच्या बादशहाचें प्रभुत्व पुनः मांडवगडावर सुरू झालें; पण त्यानंतर मांडवगडाचें वास्तुवैभव अवनतीच्या मार्गास लागलें. आज मांडवगड म्हणजे एक उजाड, भग्नावशेषांनीं भरलेला, जंगलानें वेढलेला भाग बनला आहे. धार संस्थाननें येथल्या प्राचीन इमारतींचें संरक्षण करण्याचें महत्त्वाचें कार्य बजाविलें आहे. सर्व गडात उत्तम रस्ते तयार करून सर्व कलाकृती सुलभपणें पाहता याव्यात अशी सोय केली आहे.

**मांडव्य**—अणिमांडव्य पाहा.

**मांडूक्योपनिषद्**— दशोपनिषदांतील एक उपनिषद्. हें अथर्वणवेदाचें उपनिषद् असून याचीं चार प्रकरणें आहेत. या उपनिषदाच्या विवरणपर २१५ महत्त्वाच्या कारिका लिहिल्या गेल्यामुळें व त्या अद्वैतसिद्धांतप्रतिपादक असल्यानें या उपनिषदाला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. गौडपादाचार्यांनीं आपल्या कारिकांचीं आगम, वैतथ्य, अद्वैताख्य व अलातशांति अशीं चार प्रकरणें रचिलीं आहेत. पहिल्या प्रकरणात ब्रह्म ही सत्यवस्तु आहे; दुसऱ्या प्रकरणांत ब्रह्माशिवाय दुसरी कोणतीहि वस्तु सत्य नाहीं; तिसऱ्या प्रकरणांत ब्रह्म व आत्मा एकच होय; व चौथ्या प्रकरणांत आत्मवस्तूचें नित्यत्व व इतर सर्वांचें अनित्यत्व यांचें प्रतिपादन, असे विषय आहेत. यावर शंकराचार्यांची 'आगमशास्त्र' नांवाची टीका आहे.

**मांडूळ**—(ऑफिसबीना). अमेरिका खंडांतील उष्ण कटिबंधामध्यें आढळणारा गात्रहीन अस्त पालीच्या जातीचा सरपटणारा प्राणी. याचें शरीर वाटोळें असतें व त्यावर खवले नसतात व त्याचे अनेक कंकणाकृति भाग असतात. शेपटी जाड असते व ती डोक्यासारखीच दिसते. आपल्याकडे ही एक सापाची जात समजतात. (गांडूळ पाहा).

**माढें**—मुंबई, सोलापूर जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ६१५ चौरस मैल. तालुक्यांत ८९ खेडीं असून लो. सं. १,११,७३२ आहे. जमीन उत्तम नाहीं. हवा रुक्ष आहे. मार्चें ते मेपर्यंत उष्ण वारे सुटतात. पाऊस अनिश्चित असतो. माढें येथें एक किल्ला आहे.

**माण**—मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक पेटा. पूर्वीं हा तालुका होता. क्षे. फ. ६२९ चौरस मैल. लो. सं. ७७,४८९. यात म्हसवड नांवाचें एक गांव व ७६ खेडीं आहेत. दहिवाडी हें पेट्याचें मुख्य ठिकाण आहे.

**माणकजी** (मृत्यु १७९२)—एक हिंदी नौकाशिल्पी. मुंबईस जहाजें बांधण्यांत सुप्रसिद्ध असलेल्या लौजी नसरवानजीचा हा थोरला मुलगा. या पितापुत्रांनीं ९०० टन वजनाचीं दोन नवीं जहाजें ईस्ट इंडिया कंपनीच्या वापरासाठीं तयार करून दिलीं होतीं. युरोप खंडांतील कोणत्याहि बंदरांत होणाऱ्या जहाजांशीं हीं स्पर्धा करूं शकत असत. माणकजीच्या कामावर खुप होऊन कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं यास एक चांदीचा रूळ व एक मौल्यवान् शाल नजर केली होती (नौकानयन पाहा).

**माणगांव**—मुंबई, कुलाबा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ३५८ चौरस मैल. लो. सं. (१९४१) ९४,४७७. यात २२५ खेडीं असून गांव एकहि नाहीं. माणगांव हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. यांतील तळ्याचा डोंगरी किल्ला व मांदाडाजवळचीं लेणीं पाहण्यासारखीं आहेत.

**माणिक**—हें एक तांबड्या रंगाचें रत्न आहे. याचे पूर्वेकडील व स्पायनेल असे दोन प्रकार आहेत. पूर्वेकडील माणिक हें खरें माणिक असून तें पारदर्शक व तांबड्या रंगाचें असतें. हें कुरुंद व ॲल्युमिनम यांपासून बनलेलें असतें. हें सर्व रत्नांत

अतिशय मौल्यवान् आहे. हें ब्रह्मदेश आणि सयाम यांमध्यें आढळतें. उत्तर ब्रह्मदेशांत 'रुबी माइन्स' (माणिकाच्या खाणी) नांवाचा जिल्हाच आहे. यांत माणिकें काढण्याचे कारखाने आहेत. उत्तर अमेरिकेंत व ऑस्ट्रेलियांतहि याच्या कांहीं हलक्या जाती आढळतात. स्पायनल माणिक हें ॲल्युमिनम आणि मॅग्नेशियम यांचें बनलेलें असतें व तें ब्रह्मदेश, सिलोन आणि ऑस्ट्रेलिया यांमध्यें आढळतें. विजेच्या उष्ण प्रकाशांत अल्युमिना वितळविल्यास उत्तम माणकें तयार होतात.

संस्कृतांत माणिक्य, पद्मराग व लोहितक अशीं याला नांवें आहेत. पद्मरागाचें वर्णन बृहत्संहितेंत (अध्याय ८१) आलें आहे. शुक्रनीतींत पद्मराग हा माणिकांतील एक जात म्हटलें आहे. युरोप खंडांत हें रत्न हिंदुस्थानांतूनच प्रथम गेलें. पूर्वी आपल्याकडे हिऱ्यापेक्षां माणिकाचीच जास्त आवड असे व अलंकारांतून त्याला प्रमुख स्थान असे. माणकाचें तेज हिऱ्याच्या खालोखाल असतें. व याचा लाल रंग कमीजास्त वाटेल तितका असतो. लहान माणिकाला माणकी म्हणतात. आता खोटीं किंवा कृत्रिम माणकें मिळतात, पण त्यांस द्विकिरणीभवनाचें तेज नसतें व कठिणपणाहि कमी असतो.

नवग्रहांच्या अंगठींत माणिक मध्यभागीं असतें. रवीच्या प्रसन्नतेसाठीं हें रत्न वापरतात.

**माणिकगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. पनवेलच्या आग्नेयीस १५ मैलांवर माणिकगड खेड्याजवळ माणिक टेंकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. यास फक्त दक्षिणेकडून वाट आहे. हा आंगऱ्यांनीं बांधला असावा. १७१३ मध्यें शाहूनें तो कान्होजी आंगऱ्यास दिला.

**माणिकनगर**—निजाम राज्यांतील गुलबर्गा शहराच्या ईशान्येस चाळीस मैलांवर बेदर व कल्याणी या दोन गांवांच्या दरम्यान हें गांव आहे. साधुपुरुष माणिकप्रभु (पाहा) या ठिकाणीं १८४५ सालीं आल्यानंतर वीस वर्षांनीं समाधिस्थ झाले. त्यांच्यावरून या गांवास 'माणिकनगर' असें नामाभिधान प्राप्त झालें आहे. माणिकप्रभूंचें येथें वास्तव्य असतांना यास 'प्रभूचा कट्टा' असें म्हणत असत.

**माणिक प्रभु** (१८१७–१८६५)—एकोणिसाव्या शतकांत उदयास आलेल्या सत्पुरुषांमध्यें यांना स्थान आहे. यांचा जन्म शके १७३९ मार्गशीर्ष शुद्ध १४ मंगळवारीं कल्याणीनजीक लाडवंती या गांवीं झाला. मौजे हरकूड, तालुके कल्याणी येथील रहिवासी मनोहर नाईक हरकुडे यांचे हे द्वितीय पुत्र होत. मनोहर नाईक हे ऋग्वेदी, आश्वलायन, देशस्थ ब्राह्मण असून यांचा पूर्वार्जित व्यवसाय सराफी व सावकारीचा होता. परंतु हे अत्यंत रामभक्त असल्यामुळें सर्व द्रव्य परोपकाराकडे खर्च करून त्यांनीं ईश्वरभक्तींत सर्व आयुष्य घालविलें. माणिकप्रभूंची अगदीं बालवयापासून असामान्य पुरुष अशी ख्याति होती. अगदीं बालवयांत सहज स्फूर्तीनें त्यांनीं केलेलीं पदें अत्यंत रसाळ आहेत. पूर्ववयांत म्हणजे पंचवीस वर्षेंपर्यंत यांचा काल फिरण्यांत गेला. त्यांनीं 'सकलमत संप्रदाय' चालू करून श्रीदत्ताची गादी स्थापन केली व संप्रदायास मूर्तस्वरूप आणलें. हा सकलमत संप्रदाय वर्धमान स्थितींत आहे. हिंदू, मुसलमान, शीख, शैव, वैष्णव, वगैरे धर्मीय व मतानुयायी लोक प्रभूंना अत्यंत पूज्य मानीत असत. तत्कालीन मुसलमान यांना 'पिरानूपीर दस्तगीर' असें म्हणत; "जो गुरु नानक सोही गुरु मानक" ही शिखांची उक्ति अजूनहि संर्वतोमुखीं आहे. चतुर्थ दत्तावतार म्हणूनहि यांची सार्वत्रिक ख्याति आहे. यांनीं केलेले ग्रंथ: आत्मरूप-प्रतीति, मल्हारी–महात्म्य, हनुमंत जन्म, संगमेश्वर–महात्म्य, व वेदांतपर, भक्तिपर पदें, अष्टकें, आरत्या, वगैरे. माणिकप्रभूंनीं शके १७८७ मार्गशीर्ष शु॥ ११ स समाधि घेतली.

माणिकप्रभु महाराजांचे कनिष्ठ बंधु तात्यामहाराज यांचे ज्येष्ठ चिरंजीव मनोहर माणिकप्रभु हे या संस्थानच्या गादीवरील दुसरे पुरुष होत. यांनीं श्रीप्रभुसंप्रदायास नीटनेटकें स्वरूप देऊन पूजापद्धतीची शिस्त लावून दिली. यांच्या कारकीर्दीतच श्रीप्रभुसमाधीवरील भव्य व सुंदर मंदिर तयार झालें आहे. यांनीं पुष्कळ संस्कृत व मराठी पदें केलीं आहेत. यांनीं अल्पवयांतच म्हणजे वयाच्या एकोणिसाव्या वर्षीच समाधि घेतली. यांचा जन्म शके १७८० मध्यें झाला व समाधि शके १७९९ मध्यें घेतली. यांनीं केलेले ग्रंथ: १. श्रीमाणिकपंचरत्नगीता, २. पूजापद्धति, ३. संस्कृत स्तोत्रें, ४. माणिकप्रभाकर, व ५. पदें.

यांच्यानंतर मार्तंड माणिकप्रभु गादीवर आले. यांचा जन्म शके १७८३ मध्यें झाला. यांनींहि १. गुरुसांप्रदाय, २. महामौन शतक, ३. माणिक निर्विकल्प बोध, व ४. ज्ञानमार्तंड हे ग्रंथ रचले.

**माणिकराव** (१८७८– )— एक महाराष्ट्रीय मल्लविद्याविशारद, मल्लविद्याप्रचारक, अस्थिसंधाननिष्णात व व्यायामशास्त्रावरील लेखक. यांचें समग्र नांव गजानन यशवंत ताम्हणे असें आहे. हे आजन्म ब्रह्मचारी असून सुप्रसिद्ध हबशी मल्ल जुम्मामिया यांचे शिष्य होत. कलकत्ता येथील जागतिक सामन्यांत यांनीं अनेक खेळांत पहिला क्रम मिळवला. कांहीं काल सर्व हिंदुस्थानभर हिंडून यांनीं मल्लविद्या व निशाणबाजी यांचे प्रयोग करून दाखविले. १९२१ सालीं बडोदें येथें यांनीं व्यायाम-मंदिराची स्थापना करून तेथें सांघिक व्यायामपद्धति व हिंदी कवायत यांचें शिक्षण देण्यास सुरुवात

केली. कन्यारोग्यमंदिर, शिवाजी मंदिर व अस्थिसंधानालय यांच्या स्वतंत्र इमारती तयार होण्यास यांचेच परिश्रम कारणीभूत झाले आहेत. यांना प्राचीन शस्त्रांच्या संशोधनाचा व संग्रहाचा नाद असून यांच्याकडे अकबर, राणा प्रताप, शिवाजी, वगैरेंचीं दुर्मिळ शस्त्रें पाहावयास मिळतात. व्यायामशास्त्रावर हिन्दी, मराठी व गुजराथी भाषेत यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत.

बडोद्यावर १९२७ सालीं कोसळलेल्या महापुराच्या आपत्तीच्या समयीं यांनीं लोकांचे जीव वांचवण्यासाठीं जी खटपट केली तीमुळें बडोदें सरकारनें यांना 'राजरत्न' ही पदवी देऊन यांचा गौरव केला आहे.

**मातब्बरखान सय्यद** (अधिकार १६८८–१७०४)—एक अरब सरदार. हा औरंगजेबाच्या विश्वासांतील कल्याणचा सरदार प्रथम नाशिक जिल्ह्यांत ठाणेदार असून यास डोंगराळ मुलुखाची व त्यांत राहणाऱ्या मावळे, कोळी, भिल्ल या लोकांच्या मनोवृत्तीची चांगली माहिती होती. हरजी जाखरे हा याचा हस्तक होता. सन १६८८–१६८९ या कालांत संभाजीचा कारभार ढिला पडतांच यानें अनेक किल्ले हस्तगत केले. पुढें यास कल्याणचा सुभेदार नेमलें होतें.

**मातरिश्वन्**—एक वैदिक देवता. ही अंतरिक्षांतील अग्निदेवता आहे. हिच्या तेजापासून अग्नीची उत्पत्ति आहे. मातरिश्वा यानें मंथन करून दैदीप्यमान अग्नि उत्पन्न केला. तेव्हां अग्नीस जन्म देणारा मातरिश्वा आहे असें ऋग्वेदांत (मं. १, सू. ७१–४; १. १४८–१) सूचित केलें आहे. मातरिश्वाचें वसतिस्थान द्युलोक अर्थात् आकाश किंवा अंतरिक्ष आहे (मं. ३, सू. २–१३). त्यानें भृगूकरितां अग्नीस पृथ्वीवर आणिलें (मं. १, सू. ६०–१). वायु या अर्थीहि ही संज्ञा वापरली जाते.

**मातलि**—इंद्राचा सारथि म्हणून पुराणांतून याचा उल्लेख येतो. याची स्त्री सुधर्मा, पुत्र गोमुख व कन्या गुणकेशी होती. रामानें याच्या सारथ्याखालीं रथांतून रावणाचा वध केला.

**मातीचीं थडगीं**—(बॅरो). मृत मनुष्याच्या प्रेतावर मातीचा ढीग रचून त्याचें थडगें करण्याची रीत फार प्राचीन काळापासून प्रचलित असावी. कारण, असे मातीचे ढीग युरोप, उत्तर आफ्रिका, आशिया मायनर, अफगाणिस्तान, पश्चिम हिंदुस्थान या देशांत व अमेरिकेंतहि आढळतात. प्राचीन थडग्यांमध्यें फक्त नुसतें प्रेत ठेवून त्याच्याजवळ त्याचीं दगडांचीं किंवा हाडांचीं हत्यारें ठेवलेलीं आढळतात. त्यानंतर प्रेत एखाद्या दगडी पेटीसारख्या पात्रांत किंवा दगडाच्या कांहीं विशिष्ट रचनेंत ठेवण्यांत येत असे. कित्येक ठिकाणीं प्रेत दहन करून नंतर त्याचे अवशेष एखाद्या पात्रात किंवा दगडांमध्यें घालून अशा थडग्यांत ठेवीत. (प्रेतसंस्कार, ममी, शवरक्षण पाहा.)

**मातीचीं भांडीं**—(कुंभारकाम पाहा). चिखलापासून उष्णता देऊन कठिण केलेल्या सर्व प्रकारच्या भांड्यांचा अंतर्भाव मातीच्या भांड्यांत होतो. चिनी मातीचीं भांडीं म्हणून म्हणतात त्यांवर एक कांचेसारखा थर देण्यांत आलेला असतो व तो अर्धपारदर्शक असतो.

प्राचीन ईजिप्तमधील भांडीं त्यांच्यावरील रंगकामाकरितां फार प्रसिद्ध आहेत. विशेषतः त्यांवर तांब्यापासून बनविलेला एक प्रकारचा निळा रंग दिलेला आढळतो. ग्रीक भांडीं त्यांच्या आकारावरून प्रसिद्ध आहेत. त्यांच्यावर काळ्या किंवा तांबड्या रंगांत नक्षीकाम केलेलें आढळतें. इटलीमध्यें एट्रुस्कन लोकांचीं भांडींहि प्रसिद्ध आहेत, पण तीं जरा कमी दर्जाचीं आहेत. रोममधील भांडीं कलेच्या दृष्टीनें ग्रीक भांड्यांपेक्षां पुष्कळच कमी प्रतीचीं दिसतात.

मध्ययुगामध्यें ही कला पूर्वेकडील देशांत उत्कर्ष पावत होती. इराणमध्यें चांगलीं भांडीं तयार होत, पण या बाबतींत चीन देशानें सर्वांच्या वर ताण केली. या देशांत ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून दगडासारखीं दिसणारीं मातीचीं भांडीं तयार करण्यांत येत व मिंग घराण्याच्या कारकीर्दींत (१३६८–१६४३) ही कला कळसास पोंचली. जपानमध्यें ही कला चीनमार्फत सतराव्या शतकांत जाऊन वाढीस लागली. त्यांचे काकिएमोन, इमरी, जुनी इमरी, हिरादो, कागा, वगैरे प्रकार आहेत.

मध्यंतरीं युरोपमध्यें पुन्हां या कलेचें पुनरुज्जीवन झालें. चौदाव्या शतकांत स्पेनमध्यें हिस्पानोमोरेस्क नांवाचा एक प्रकार दृष्टीस पडतो. यानंतर पंधराव्या शतकांत इटलीमध्यें माजोलिका भांडीं दिसूं लागलीं. सतराव्या व अठराव्या शतकांत फ्रान्समध्यें फाएन्स भांडीं निघूं लागलीं. हीं टिनचीं एनामेल केलेलीं भांडीं असत. अशाच तऱ्हेचीं हॉलंडमध्यें डेल्फ्ट नांवाचीं भांडीं तयार होत (१६०७). हीं पुष्कळच बाहेरदेशीं पाठविण्यांत येत व यांची नक्कलहि बरीच होत असे. इंग्लंडमध्यें जास्पर नांवाचीं भांडीं जोशिया वेजवुड यानें प्रचारांत आणलीं. यांमध्यें ग्रीक व रोमन भांड्यांचें अनुकरण करण्यांत आलें होतें.

सॅक्सनीमध्यें १८ व्या शतकाच्या आरंभीं बोट्गिर यानें भांड्यांवर असा थर दिला कीं, तो चिनी मातीसारखा दिसत असे. या भांड्यांस मेसेन भांडीं (चुकीनें ड्रेसेन भांडीं) असें म्हणत. चांटिली येथें इमरी भांड्यासारखीं उत्कृष्ट भांडीं तयार होत. परंतु यानंतर १७४० मध्यें व्हिन्सेनीस येथें व नंतर सेव्हर्स येथें घातलेल्या कारखान्यांत मुख्यतः भांडीं तयार होऊ

लागलीं. १७६३ मध्यें खऱ्या पोर्सिलीन अथवा चिनी रोगणाचा शोध लागला व यानंतर इतर सर्व भांडीं मागें पडलीं व ही कलाहि अधोगतीस गेली.

इंग्लंडमध्यें प्रथम बौ व चेलसी येथें अस्सल चिनी मातीचीं भांडीं तयार होऊं लागलीं. हे कारखाने पुढें डर्बी येथील कारखान्यांत सामील झाले. वोर्स्टर येथें प्रथम प्रतिमुद्रण (ट्रॅन्स्फर प्रिंटिंग) प्रचारांत आलें. १८०० मध्यें स्पोड यानें प्रथम कांचेऐवजीं हाडांची राख वापरणें सुरू केलें व हीच पद्धति पुढें रूढ झाली. एकोणिसाव्या शतकांत हीं भांडीं करण्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत वाढला, पण तो यांत्रिक व एकमार्गी बनला व त्यांतील कला लयास गेली.

मातीच्या भाड्यांत साधीं मातीचीं भांडीं व चिनी मातीचीं भांडीं दोन्हीहि येतात; व तीं तयार करण्याची कृति जवळजवळ सारखीच आहे. मातीचीं अथवा अर्ध चिनीचीं भांडीं, बॉल माती, चिनी माती, गार (फ्लिंट) व कॉर्निश दगड यांचीं बनविण्यांत येतात. पहिलीं दोन द्रव्यें घटक म्हणून व दुसरीं दोन बळकटीकरितां वापरण्यांत येतात. चिनी भांड्यांत पहिली बॉल माती गाळण्यांत येते व तिच्याऐवजीं हाडांची पूड वापरण्यांत येते.

पहिल्या प्रथम गार शुद्ध करून घेण्याकरितां ती भाजण्यांत येते. नंतर तिची दळून पूड करण्यांत येते. कॉर्निश दगडहि दळून घेण्यांत येतो. नंतर बॉल माती व चिनी माती मळून घेण्यांत येतात. या सर्व जिनसा पुरेशा बारीक झाल्या म्हणजे पाणी घालून त्यांचें मिश्रण करण्यांत येतें व त्यांत थोडा कोबाल्ट टाकण्यांत येतो. या मिश्रणांतून नंतर पाणी काढून टाकण्यांत येतें व नंतर हा चिखल एका चक्कींत (पगमिल) मळून घेण्यांत येतो.

यानंतर या मातीच्या चाकावर भांडीं तयार करण्यांत येतात. व तीं वाळवून गुळगुळीत करण्यांत येतात; व त्यांस मुठी जोडण्यांत येतात. कांहीं भांडीं सांचांतून तयार करण्यांत येतात.

यानंतर हीं भांडीं भट्टींत घालून ५० तास त्यांस उष्णता देण्यांत येते. नंतर तीं थंड होऊं देतात. यांस बिस्किट म्हणतात. या अवस्थेंत तीं पांढरीं व सच्छिद्र असतात. नंतर अवश्य त्याप्रमाणें त्यांवर क्रिया करण्यांत येतात. पांढरीं भांडीं एका रसांत बुडविण्यांत येतात. चित्रविचित्र रंगांचीं भांडीं छापण्याकरितां पाठविण्यांत येतात. नंतर त्यांवर जिल्हई चढविण्यांत येते. या क्रियेंत मिश्रणांत बुडवून काढलेलीं भांडीं पुन्हां एका भट्टींत तीस तासपर्यंत ठेवण्यांत येतात; म्हणजे तीं पुरीं तयार होतात.

**मातृकन्यापरंपरा**—समाजांत ज्या अनेक प्रकारच्या कुटुंबपद्धती आढळतात, त्यांपैकीं अतिशय प्राचीन अशी ही पद्धति होय. या पद्धतीचा मुख्य विशेष असा आहे कीं, हींत पुरुषवंशगणना नसून स्त्रीवंशगणना असते. संमिश्र स्त्रीपुरुषव्यवहार जेव्हां प्रचारांत असतो, त्या वेळीं अनेक पुरुषांचे एकाच स्त्रीशीं व्यवहारसंबंध घडून येत असल्यानें त्या बाईपासून होणारी संतति कोणापासून झाली हें निश्चित सांगतां येत नाहीं. अर्थात् बाप जेव्हां अज्ञात असतो तेव्हां आईकडूनच संतति ओळखण्यांत येते व हल्लीं ज्याप्रमाणें अमक्याचा मुलगा असें आपण म्हणतों त्याऐवजीं अमकीचा मुलगा म्हणून म्हणण्याची चाल पडते. अशा प्रकारची पद्धति प्राचीन काळीं सर्वत्र अस्तित्वांत होती व अद्यापिहि ती क्वचित् (वेश्यावर्गांत) आढळून येते. प्राचीन काळीं आफ्रिका, सर्केशिया, हिंदुस्थान, तार्तरी, चीन, युरोप व अमेरिका या सर्व ठिकाणीं ही चाल होती असें आढळून येतें. उपनिषत्कालीं ही असावी असें जाबालीच्या उदाहरणावरून दिसतें. अमेरिकेमधील उच्च संस्कृतीचे इरोकुआइस व पुएब्लो या इंडियन लोकांमध्यें अद्यापिहि ही पद्धति आढळून येते. मातृकन्यापरंपरेमध्यें मुख्यतः सहा मूलभूत गोष्टींचा समावेश होतो: (१) या पद्धतीमध्यें आईच्या जातीवरून मुलाची जात निश्चित केली जाते. (२) स्त्रीवंशाकडून गणना होते. (३) मुलाला अगर मुलीला आईपासून वारसा मिळतो. (४) आईच्या समाजांतील दर्जावरून मुलाचा दर्जा ओळखला जातो. (५) कुटुंबामध्यें बापापेक्षां आईची सत्ता अधिक असते. व (६) बायको नवऱ्याच्या घरीं राहावयास न जातां नवरा बायकोच्या घरीं राहावयास जातो. मातृकन्यापरंपरा पद्धतीमध्यें वारसा हक्क मातेकडच्या वंशजांना मिळतात. ओशियानामध्यें मेलॅनेशियन, सुमात्रा बेट, फिजी, सेनेगाल, लोआंगो, कांगो, आसाममधील खासी, मलबारांतील नायर, इत्यादि लोकांत ही पद्धत आढळून येते.

कोचीन आणि त्रावणकोर राजघराण्यांत अद्यापिहि गादीचा वारसा राजाच्या मुलाला न मिळतां भाचाला मिळतो. आतां मातृशासित कुलपरंपरा बहुतेक मोडली आहे. हिचे अवशेष पितृशासनपद्धतींतहि मामाभाच्याच्या संबंधावरून दिसतात. 'मामाच्या घरीं भाचा कारभारी' यासारख्या म्हणी या दृष्टीनें सूचक आहेत. देशस्थांत मामेबहिणीशीं लग्न करण्याची जी वहिवाट आहे ती याच पद्धतीशीं संबद्ध आहे असें कांहीं समाजशास्त्रज्ञ समजतात.

**माथेरान**—मुंबई, कुलाबा जिल्हा, एक हवा खाण्याचें ठिकाण. नेरळ स्टेशनावरून लाइट रेल्वेनें माथेरानला जातां येतें. मुंबईहून हें साठ मैलांवर आहे. याच्या शिखरावर बंगले व घरें बांधलीं असून उन्हाळ्यांत या ठिकाणीं श्रीमंत लोक जाऊन राहतात. या ठिकाणचा एकंदर देखावा फारच मनोहर आहे. येथील अलेक्झांडर, गारबट, पॅनोरामा, पॉक्युपाइन, लुइसा व

चौक हे पाइंट (सपाट माथ्याचीं उंच शिखरें) पाहण्याजोगे आहेत. शार्लट सरोवर सुंदर आहे.

याचें महत्त्व युरोपियनांना १८५१ सालीं पटलें. १८५४ त लॉर्ड एल्फिन्स्टन तेथें गेला व त्यानें एक बंगला बांधला. तो अद्यापि दाखवितात. उन्हाळ्यांत सरकारी मुक्काम महाबळेश्वराऐवजीं येथें ठेवण्याची मागें एक योजना होती.

**मादण्णा ऊर्फ मदनपंत** (मृ. १६८६)—हा अबू हसन कुत्बशहाचा (१६५७–१६८७) मुख्य प्रधान होता. याचें आडनांव पिंगळे असून हा देशस्थ ब्राह्मण होता. रघुनाथपंत हणमंते यानें मादण्णाच्या मध्यस्थीनें कुत्बशहा व शिवाजी यांची मैत्री घडवून आणली. पुढें कुत्बशहानें तर शिवाजीस खंडणी दिली. त्यामुळें मोंगलांतर्फे दिलेरखानानें शिवाजी कर्नाटकांत असतां गोवळकोंड्यावर स्वारी केली. परंतु मादण्णानें मोंगल व विजापूरकर या दोन्ही फौजांचा पराभव केला. गोवळकोंड्याला शिवाजी आला असतां या भावांनीं त्याचें मोठें स्वागत केलें व घरीं नेऊन मोठा नजराणा दिला. हा न्यायी व दानशूर होता. औरंगजेब थेट हैदराबादेवर आला, तेव्हां स्वतः मादण्णा त्याच्यावर चालून गेला; परंतु या गडबडींत त्याच्या विरुद्ध असलेल्या पक्षानें त्याचा व अकण्णाचाहि खून केला (अकण्णा पाहा). मादण्णास मदरस व अकण्णास अकरस असें म्हणत.

**मादागास्कर**—दक्षिण आफ्रिकेच्या पूर्वेस, हिंदी महासागरांत असलेलें एक मोठें बेट. हवामान उष्ण. यांत उंच पर्वत, मोठ्या पश्चिमवाहिनी नद्या, मोठे जलाशय (सरोवरें), समृद्ध अरण्यें व खनिज पदार्थ हीं विपुल आहेत. मृतज्वालामुखीचीं शिखरें बरींच आहेत. माकडासारखे लेमूर प्राणी फार आढळतात. ॲन्टानानारिव्हो हें राजधानीचें शहर व टामाटान्हे, माजुंगा व टुलेआर हीं बंदरें आहेत. साखर, काकाव, कापूस, मुद्दमूग, इ. बराच पिकतो. लोकांचा मुख्य व्यवसाय शेतीचा आहे. क्षेत्रफळ २,४१,०९४ चौरस मैल. १९३६ सालीं लो. सं. ३७,९७,९३६ होती. यांपैकीं बहुसंख्याक मॅलागसी लोक आहेत.

प्रथम हें पोर्तुगीजांनीं १५०० मध्यें शोधून काढलें. नंतर दोनशें वर्षें हें चांचे लोकांचें चांगलें आश्रयस्थान बनलें होतें. नंतर देश्य राजेलोकांच्या वर्चस्वाखालीं होतें. १८९६ सालीं हें कायमचें फ्रेंचांकडे गेलें.

**मादिगा**—तेलंगी चांभारांची जात. यांची लो. सं. सु. वीस लाख असून मद्रास, हैदराबाद, म्हैसूर संस्थान यांतून विशेष भरणा आहे. यांचा वडिलोपार्जित धंदा चामड्याचें काम करण्याचा आहे. पण आज बहुतेक लोक शेती किंवा मजुरी करतात. यांच्यांत बसवीची चाल सरसकट दिसून येते. कांहीं लोक वैष्णवपंथी आहेत.

**माद्री**—मद्रदेशीय राजांच्या कन्यांस हें नांव साधारण देतात. सर्वांत प्रसिद्ध राजकन्या माद्री शल्य राजाची भगिनी होय. हिचा विवाह कुरुकुलांतील पंडु राजाशीं झाला होता. ही कुंतीहूनहि रूपानें फार सुंदर असे. त्यामुळें पंडुराजाला शापामुळें संभोग मृत्युदायक असतांहि, तो हिच्याशीं संभोगास प्रवृत्त होऊन मरण पावला. त्याचें हिला वाईट वाटून हिनें आपले दोघे पुत्र (नकुल आणि सहदेव) कुंतीच्या स्वाधीन करून सहगमन केलें.

**माधव** (सन १३४७–८९)—माधवामात्य, माधवाचार्य, माधवांक, मादरस, इ. नांवांनींहि हा प्रसिद्ध आहे. उपलब्ध झालेल्या शिलालेखांवरून असें दिसतें कीं, माधव हा सन १३४७ ते १३८९ पर्यंत ४२ वर्षें विजयनगरच्या दरबारांत मारप, पहिला बुक्क व दुसरा हरिहर यांचा मुख्य प्रधान होता. हस्तिनी नगरीचा राजा हरिहर याच्या मारप नांवाच्या भावानें पश्चिमेस राज्य स्थापल्यावर हा त्याचा प्रधान झाला. मारपरायाचा वडील भाऊ महाराजाधिराज व पूर्व-दक्षिण-पश्चिम समुद्राचा अधिपति पहिला बुक्क हा विजयनगरच्या राज्यावर आल्यावर हा त्याचा मंत्री झाला. सन १३६६ च्या अखेरीस यानें कोंकणांतील बरेच प्रांत जिंकून कोंकणची राजधानी गोवा आपल्या ताब्यांत आणली व तेथून तुर्कांच्या अमलाचें उच्चाटन केलें. हा शैव असून यानें आपल्या गुरूच्या आज्ञेनुसार आपली इष्टदेवता जो त्र्यंबकनाथ त्याची शुद्ध शैवाम्नाय पद्धतीनें एक वर्षभर आराधना करून त्याची सांगता काश्मीरहून सत्पात्र ब्राह्मण बोलावून आणून त्यांच्या हस्तें केली. या ब्राह्मणांना यानें कर्नाटकांतील नागर खंडांतर्गत कांहीं जमीन 'विद्येश्वरपूर' हें नांव ठेवून दिली. यावरून हा काश्मिरी सारस्वत ब्राह्मण होता असें कोणी अनुमान करतात. मारपरायाचा प्रधान असतांना यानें सूर्यसंहितेवर 'तात्पर्यदीपिका' ही टीका लिहिली असावी. यांत यानें स्वतःला वेदशास्त्रप्रतिष्ठाता व उपनिषन्मार्गप्रवर्तक असें म्हणवून घेतलें आहे.

हा यजुःशाखेंतील भारद्वाज गोत्रोत्पन्न बोधायनसूत्री ब्राह्मण होता. त्याच्या बापाचें नांव मायण व आईचें नांव श्रीमती असें होतें. सायण व भोगनाथ असे त्याचे दोघे भाऊ होते. दारिद्र्यानें वैतागून गेल्यामुळें त्यानें संन्यासाश्रम घेतला. संन्यासाश्रमींचें याचें नांव विद्यारण्यस्वामी होतें. विजयनगरचें राज्य स्थापण्यासाठीं त्यानें फार मदत केली. तसेंच वैदिक धर्माचें व वैदिक ग्रंथांचें पुनरुज्जीवन केलें. आपला भाऊ सायणाचार्य याच्या हातून स्वतःच्या देखरेखीखालीं संहिता, ब्राह्मणें, उपनिषदें,

स्मृति, वेदांगें, इत्यादि ग्रंथांवर भाष्यें प्रसिद्ध करविलीं. माधवाचार्यांचा हंपी येथें मठ असून तो शृंगेरी पीठाला जोडलेला आहे. माधवाचार्यांचा काल १४ व्या शतकांतला असावा, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**माधवनिदान**—एक सुप्रसिद्ध वैद्यक ग्रंथ. माधवाचार्यांनीं पुष्कळ ग्रंथांच्या आधारानें 'निदान' या विषयावर ग्रंथ करून त्यास आपलें नांव दिलें. हा ग्रंथ निदानांमध्यें श्रेष्ठ मानला आहे व हा सर्वत्र पाठ करतात. हा ग्रंथ होऊन सुमारें सहाशेंवर वर्षें झालीं असावीं. या ग्रंथाचें भाषांतर करून अरब लोक शिकत असत, आणि या ग्रंथाप्रमाणें चरक आणि सुश्रुत या दोन पुस्तकांचेंहि त्यांनीं भाषांतर करून नेलें होतें असें प्रोफेसर विल्सन यांनीं जे शोध केलेले आहेत त्यांवरून कळून येतें. अरबी भाषेंत यांचें भाषांतर होण्याच्या अगोदरच इराण देशांत या पुस्तकाचें भाषांतर झालें होतें.

या ग्रंथासंबंधानें कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, सायणाचार्य यांचा बंधु जो माधवाचार्य (विद्यारण्य) यांनींच हा ग्रंथ केला. परंतु तो त्यांनीं केला नसावा असें दुसरें कांहीं म्हणतात. कारण या ग्रंथावर 'आतंकदर्पण' म्हणून जी टीका आहे तींत हम्मीर राजाचें नांव आलें आहे. यावरून असें वाटतें कीं, आतंकदर्पणाचा कर्ता हम्मीर राजाच्या वेळेस असून, त्यानें हा ग्रंथ हम्मीर राजास अर्पण केला असावा. हा राजा चौदाव्या शतकांत होऊन गेला व याच शतकांत सायणाचार्यांचे बंधु माधवाचार्य बुक्क राजाचे प्रधान होते. यावरून माधवनिदान हा ग्रंथ त्याच वेळेस झाला नसून कांहीं वर्षें तरी त्यांच्या अगोदर झाला असावा, असें कांहीं संशोधक म्हणतात.

**माधवराव नारायण (सवाई माधवराव) पेशवे** (१७७४-१७९५)—मराठे साम्राज्याचा एक पेशवा. नारायणराव पेशवा मारला गेल्यावर त्याची गरोदर पत्नी गंगाबाई हिला राघोबा व आनंदीबाई यांच्या भीतीमुळें बारभाईंनीं पुरंदर किल्ल्यावर बंदोबस्तांत ठेविलें होतें. तेथें माधवरावाचा जन्म झाला (१८ एप्रिल) व नंतर ४० दिवसांनीं त्याला पेशवाईची वस्त्रें मिळालीं. सवाई माधवराव व गंगाबाई हे खासे, आणि नाना व बापू हे कारभारी या चौघांना कैद करण्याचा कट

राघोबाच्या पक्षानें केला, पण तो फसला. तेव्हां इंग्रजांच्या मदतीनें राघोबानें पेशव्यांशीं भांडण सुरू केलें. माधवराव सव्वातीन वर्षांचा असतां गंगाबाई वारली. यापुढें त्याचें संगोपन सदाशिवरावभाऊची बायको पार्वतीबाई व नाना फडणीस यांनीं केलें. १७७९ सालीं सवाई माधवरावाची मुंज पुणें येथें पर्वतीवर मोठ्या थाटानें करण्यांत आली. पुढें १७८३ च्या फेब्रुवारींत त्याचें पहिलें लग्न टोकेकर थत्ते यांच्या कन्येशीं होऊन तिचें नांव रमाबाई ठेवण्यांत आलें. या बालपेशव्यासाठीं पौराणिक व ऐतिहासिक बखरी रचण्यांत आल्या होत्या व भौगोलिक माहिती शिकविण्यासाठीं एक युरोपियन शिक्षकहि ठेवण्यात आला होता. तसेंच नाना तऱ्हेचे खेळ खेळण्याची व्यवस्था नाना फडणिसानें केली. कबुतरें, पोपट, मैना, बदकें, मोर, वगैरे पक्षी; ससे, हरणें, काळवीट, वाघ, गेंडे, एडके, वगैरे पशू; कुस्त्या खेळणारे पहिलवान, वज्रमुष्टि, मल्ल दांडपट्टा व तिरंदाजी खेळणारे इसम बाळगण्यांत आले. घोड्यावर बसणें, चोपाटी व लेजीम खेळणें, तिरंदाजी करणें, वगैरे गोष्टी पेशव्यास शिकविण्यांत आल्या. राघोबाचा मुलगा बाजीराव जुन्नर येथें बंदींत होता. त्यानें पेशव्याशीं कारवाईचा गुप्त पत्रव्यवहार सुरू केला होता. हें नाना फडणविसास समजतांच त्यानें पेशव्याचा निषेध केला. या व इतर प्रकरणांत पेशव्याचें नानांशीं जमत नाहींसें झालें. त्याचा परिणाम मनावर होऊन पेशवा ज्वर, वात यांनीं आजारी झाला. पुढें वाताच्या झटक्यांत अपघातानें त्याचा अंत झाला. इंग्रजांशीं यशस्वी युद्ध व खर्ड्यांच्या लढाईतील जय याच काय त्या याच्या कारकीर्दीतील मोठ्या महत्त्वाच्या गोष्टी होत. या पेशव्याच्या कारकीर्दींत सर्व कारभार नाना फडणवीस पाहत असे व पानपतानंतर मराठ्यांचें वैभव व वर्चस्व पुन्हां दिसूं लागलें होतें.

**माधवराव बल्लाळ पेशवे** (१७४५-१७७२)—मराठे साम्राज्याचा एक पेशवा. नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई यांचा हा दुसरा मुलगा सावनूर येथें जन्मला. मुंज १४।२।१७५२ आणि लग्न ९।१२।१७६१ रोजीं झालें. बायकोचें नांव रमाबाई असून त्याला पेशवाईचीं वस्त्रें २०।७।१७६१ रोजीं मिळालीं. अगदीं पोरवयांतच एवढा साम्राज्याचा कारभार अंगावर पडला, तथापि हा डगमगला नाहीं. प्रथम राघोबादादा कारभार पाहत असे. कारकीर्दीच्या आरंभींच निजामानें पुण्यावर स्वारी केली. तेव्हां पुण्याचे लोक पळाले. पेशव्यांची मंडळीहि सिंहगडावर जाऊन राहिली. बहुतेक पुणें जाळूनपोळून, देव मूर्ती फोडून निजाम परत फिरला. नंतर राक्षसभुवन व औरंगाबाद या दोन ठिकाणीं त्याचा पेशव्यांनीं पराभव केला. यापुढें साम्राज्याचा खर्च भागविण्याकरितां सर्व सरदारांपासून जहागिरींतील चौथाई उत्पन्न घेण्याचा करार पेशव्यानें सक्तीनें अमलांत आणला. कृष्णेच्या

दक्षिणेकडील मराठी साम्राज्य बुडविण्याचा उद्योग हैदरानें चालविला होता. त्याचा बंदोबस्त करण्याकरिता १७६२-१७७१ पर्यंत कर्नाटकांत मराठ्यांनीं हैदराबरोबर दोन युद्धें व त्यावर पांच स्वाऱ्या केल्या; व त्याकरितां एकंदर ५ मोहिमा झाल्या; त्यांपैकीं चार मोहिमांत स्वतः माधवराव हजर होता. १७७२ च्या तहानें शिवाजीच्या वेळचा सर्व मुलुख हैदरच्या हातून परत घेण्यांत आला.

गृहकलहाला आरंभ या पेशव्याच्या वेळेपासून झाला. माधवरावानें राघोबास उत्तरेकडे मोहिमेवर पाठविलें. तिकडे त्यानें अपयश घेऊन १७६७ त परत येऊन पुन्हां माधवरावाशीं युद्धाची तयारी केली; पण पेशव्याची फौज भारी हें पाहून पेशव्यांच्या अटी कबूल करून राघोबा आनंदवल्लीस राहिला. तेथून भोसले, इंग्रज, गायकवाड व निजाम यांच्याशीं कारस्थान करून त्यानें युद्धाची तयारी पुन्हां चालविली. अखेर धोडप येथें पेशव्यानें राघोबाचा पराजय करून त्याला शनवारवाड्यांत कैदेंत ठेविलें.

याच कारकीर्दींत पानपतावर पडलेल्या भाऊसाहेबाचा तोतया उत्पन्न झाला; पण माधवरावानें त्याची चौकशी करून तो खोटा ठरल्यावर त्यास पूर्ण बंदोबस्तानें कैदेंत ठेविलें. माधवरावानें दारूगोळा, तोफा, बंदुकी, वगैरे शस्त्रास्त्रें तयार करण्याचे कारखाने पुणें, ओतूर, नाशिक, बागलकोट, इत्यादि गांवीं काढले. माधवरावानें शिंदे, होळकर, कानडे, वगैरे सरदारांच्या मार्फत राजपुताना, बुंदेलखंड येथें मराठी अमल पुन्हां बसविला. त्यानें ७८ मोहिमा व ४-५ स्वाऱ्या जातीनिशीं केल्या. शिवाय राघोबानें त्याला फार त्रास दिला. तेव्हां या सर्वांचा परिणाम म्हणजे राजयक्ष्माच्या रोगानें दोन वर्षे तो आजारी पडला व थेऊर येथें मरण पावला (१८-११-१७७२). त्याची बायको रमाबाई सती गेली. यांचें स्मारक थेऊर येथें असून दरसाल उत्सव होत असतो.

माधवराव हा अत्यंत तेजस्वी, करारी, मुत्सद्दी, मानी, न्यायनिष्ठुर, अढळ वचनाचा, निःपक्षपाती, अप्रतिम सेनानायक, कडक शिस्तीचा, धाडसी, दूरदृष्टि, कर्तव्यनिष्ठ, भावनोत्कट, घरांतील दुहीचा फायदा बाहेरच्या शत्रूंस घेऊं न देणारा, राष्ट्राला झालेल्या एक कोट कर्जाच्या फेडीसाठीं स्वतःच्या खाजगींतून लाखों रुपयांची व जडजवाहिरांची संपत्ति अर्पण करणारा, पानपतचें अपयश धुऊन टाकणारा, राज्य आपलें नसून आपण त्याचे रक्षक आहों ही भावना पदोपदीं वर्तनांत उतरविणारा व ती राष्ट्रास शिकविणारा, असा अत्यंत कर्तबगार पेशवा होता. शिवाजीच्या मार्गे बऱ्याच अंशीं त्याचें अनुकरण करून राष्ट्र उन्नतीस नेणारा असा हा सर्व पेशव्यांत थोर पुरुष होऊन गेला.

**माधवराव, राजा सर टी. (तंजावर)** (१८२८-१८९१)—इंग्रजी अमदानींतील एक मुत्सद्दी. हे देशस्थ ब्राह्मण होते. यांचें शिक्षण मद्रास येथें झालें. १८४५ सालीं पदवीधर झाल्यावर कांहीं किरकोळ जागांवर नोकरी केल्यावर १८४९ मध्यें त्रावणकोरच्या महाराजांचे बंधु रामवर्मा यांच्या शिक्षकाच्या जागीं यांची नेमणूक झाली. हळूहळू सरकत १८५८ मध्यें हे त्रावणकोरचे दिवाण झाले. त्या संस्थानांत त्यांनीं बऱ्याच सुधारणा केल्या. १८६५ सालीं यास के. सी. आय्. ई. हा किताब मिळाला. १८७२ सालीं यांनीं दिवाणगिरीचा राजीनामा दिला. यांस व्हाइसरॉयच्या कायदेमंडळांत नेमण्यांत आलें, पण तो मान यांनीं नाकारला. १८७३ मध्यें हे इंदूर येथें दिवाण झाले व १८७५ मध्यें बडोदें येथें दिवाण व रीजंट झाले. त्या संस्थानांत यांनीं पुष्कळच सुधारणा केल्या. यांनीं महाराज सयाजीराव गायकवाड यांस शिक्षण देऊन त्यांस राज्यकारभारांत निपुण केलें. १८७७ मध्यें यांस 'राजा' हा किताब मिळाला. १८८२ सालीं हे सेवानिवृत्त झाले. हे चांगले लेखक होते. यांनीं कांहीं मराठींत काव्यरचनाहि केली आहे. हे सामाजिक बाबतींतहि सुधारणा घडवून आणणाऱ्यांपैकीं होते.

**माधवराव, व्ही. पी. (पाटणकर)** (१८५०-१९३५)—एक हिंदी पुढारी. शिक्षण कुंभकोणम् येथील सरकारी कॉलेजांत झालें. यांनीं म्हैसूर संस्थानांत सुमारें ३५ वर्षे मोठमोठ्या हुद्यांवर कामें केलीं. १८९८ ते १९०२ मध्यें हे रीजन्सी कौन्सिलचे सभासद होते. १९०२ ते १९०४ मध्यें कार्यकारी मंडळाचे सभासद होते. १९०४ ते १९०६ पर्यंत त्रावणकोरचे दिवाण होते. नंतर १९०६ ते १९०९ पर्यंत म्हैसूर संस्थानचे दिवाण होते. पुढें १९१४ ते १९१६ मध्यें हे बडोदे संस्थानचे दिवाण होते. १९१७ सालीं हे कडलोर येथें भरलेल्या मद्रास इलाखा परिषदेचे अध्यक्ष होते. हे राष्ट्रीय सभेचें शिष्टमंडळ घेऊन इंग्लंडमध्यें गेले होते व तेथें पार्लमेंटरी जॉइंट कमिटीपुढें यांनीं साक्ष दिली. १९२० सालीं धारवाड येथें भरलेल्या पहिल्या कर्नाटक परिषदेचे हे अध्यक्ष होते. थोर पदावरील राष्ट्रीय वृत्तीचे व स्वतंत्र बाण्याचे देशभक्त म्हणून यांना मान असे. संस्थानांचे दिवाण असतांना यांनीं त्यांत बऱ्याच लोकोपयोगी सुधारणा घडवून आणल्या.

**माधवस्वामी**—एकनाथाचा एक नातू व तंजावरकडील एक संतकवि. एकनाथाची दुसरी मुलगी कर्नाटकांत नागनाथ नांवाच्या ब्राह्मणास दिली होती. तिचा मुलगा हा माधव. माधव हा रामदासपंथीय राघवदासाचा शिष्य होता. यांचें वस्तीचें गांव

गौरमायोर (मायावरम्) हें होतें. यानें १८ पर्वें भारत व इतर अनेक ग्रंथ लिहिले. ते सर्व मराठींत आहेत. याला रामपंडित व कृष्णपंडित असे दोन विद्वान् मुलगे होते; त्यांनींहि अनेक ग्रंथ रचले आहेत. माधवस्वामींची नातवंडें-पतवंडेंहि या घराण्याची पंडिती परंपरा चालविणारीं होतीं.

**मांधाता**—इक्ष्वाकुवंशीय युवनाश्वाचा पुत्र. हा पित्याच्या उदरांतून बाहेर आला. यानें अंगार, मरुत्त, गय, बृहद्रथ, इ. राजे जिंकून मोठे मोठे यज्ञ केले. हा मोठा दानशूरहि होता. याला त्रसदस्यु असेंहि नांव आहे. कारण हा दस्यूपासून प्रजेचें रक्षण करी. याला उतथ्यानें जी राजनीति शिकविली ती उतथ्यगीता म्हणून प्रसिद्ध आहे. पुढें याला आपल्या पराक्रमाचा फार गर्व झाला. तेव्हां इंद्रानें लवणासुराकडून यास मारविलें.

**माध्यमिक**—बौद्ध धर्मांतील महायानपंथाच्या एका पोट-पंथाचे अनुयायी. या पंथाला मध्यमक असें नांव आहे. या पंथाचा संस्थापक नागार्जुन होय. यानें या पंथाच्या तत्त्वज्ञानाचा विवरणात्मक असा मूलमध्यमककारिका, अगर मध्यमिककारिका अगर मध्यमिक-सूत्रें नांवाचा ग्रंथ लिहिला. याशिवाय बुद्ध-पलित व भवविवेक यांच्याहि या कारिकांवर टीका आहेत. या पंथाचें मुख्य तत्त्व शून्यवाद होय. सत्, असत्, सदसत् व नसत् नासत् या चार कोटींनीं रहित असें शून्य हेंच अंतिम तत्त्व आहे असें या पंथाचें म्हणणें आहे. योगाचारपंथी बौद्ध बुद्धि अगर ज्ञान आहे असें तरी मानतात, पण माध्यमिक हे बुद्धि देखील नाहीं असें मानतात. बुद्धीच्या साहाय्यानें पदार्थाचें निश्चित अनुमान करतांच येत नाहीं व करण्याचा प्रयत्न केला तर हे पदार्थच नाहींसे होण्याचा संभव आहे. सर्वच ज्ञेयाभावा-त्मक असल्याकारणानें विज्ञानाचा भाव देखील उरत नाहीं. या शून्य भावनेनेंच शून्यतारूप परनिर्वाण प्राप्त होतें असें यांचें मत आहे.

**मानगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. माण तालुक्यांत बोर-वाडीच्या आग्नेयीस दीड मैलावर व माणगांवच्या आग्नेयीस आठ मैलांवर चाच व मसजितवाडी या गांवांच्या सीमेवर सह्या-द्रीच्या धानोई नांवाच्या फांट्यावर हा बांधलेला आहे. यास विंझईचा किल्ला असेंहि म्हणतात. वर जाण्यास मसजितवाडी-मधून किंवा उत्तरेकडून रस्ता आहे. वाटेंत एक भवानीशंकराचें पडकें देवालय आहे. एक मैल चढल्यावर विंझईचें देऊळ लागतें. वरून सृष्टिसौंदर्य फार उत्तम दिसतें. हा शिवाजीनें बांधला असें म्हणतात, पण यांत एक पीर आहे त्यावरून तो याहि पूर्वीचा मुसलमानकालीन असावा.

**मानचित्रलेखन**—(कार्टोग्रॅफी). पृथ्वीच्या पृष्ठभागाचा किंवा त्याच्या पोटभागांचे नकाशे काढण्याच्या शास्त्रास हें नांव आहे. भूगोल-नकाशांचे पुष्कळ प्रकार आहेत. 'राजकीय' नकाशांत देश, शहरें, बंदरें, इ. दिले असतात. 'प्राकृतिक' नकाशांत पृथ्वीवरील स्वाभाविक गोष्टी दाखविल्या असतात. 'पार्वतीय' (ओरोग्रॅफिकल) नकाशांत भूपृष्ठाच्या पातळींतील विविध विभिन्नता दिसून येते. यासाठीं उठावाचे नकाशेहि असतात. निरनिराळ्या रंगांनींहि खोली, उंची यांची कल्पना आणून देतात. समुद्रसपाटीपासून सारख्या उंचीचीं स्थळें एका समोन्नतिरेषे (कॉन्टूर लाइन)नें जोडतात; व अशा रेषांचा एक नकाशा विशिष्ट प्रदेशापुरता तयार करतां येतो.

**मानभूम**—बिहार, छोटानागपूर विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४,१३१ चौरस मैल. लो. सं. २०,३२,१४६. यांतून कासाई, दामोदर, बराकर, सुवर्णरेखा, ढालकिशोर व सिलाई ह्या नद्या वाहतात. यांत चुनखडी, पाटीचा दगड, अभ्रक व गोंडवन नांवाचा खडक सांपडतो. बराकर व राणीगंज विभागांत कोळसा सांपडतो. येथें कोठें कोठें गरम पाण्याचे झरे आढळतात. पाण्यास गंधकाचा वास येतो. नद्यांच्या कांठचा प्रदेश मळईचा असून त्यांत भाताचें पीक उत्तम येतें. येथील मूळचे रहिवासी भूमिज टोळींतले लोक होत. प्राचीन काळच्या जैन शिल्पांचे अवशेष पुरुलियाजवळ, आणि दामोदर व कासाई नद्यांच्या तीरांवर मोडकळीस आलेल्या देवळांच्या रूपानें असलेले दृष्टीस पडतात. पलम व चरी येथेंहि अवशेष सांपडतात. ब्राह्मणी संप्रदायाचें शिल्पकाम पार व कन्नास येथें सांपडतें. दुसरे महत्त्वाचे प्राचीन अवशेष दलमी, बोराम व प्राणचेट येथें सांपडतात. येथील लोकांत महारोग व डोळ्यांचे आजार फार दिसून येतात. राणीगंज व बराकर टापूंत कोळसा मुबलक सांपडतो. कोठें कोठें लोखंडहि सांपडतें. रघुनाथपुर ठाण्यांत 'टसर' रेशमी कापड तयार होतें. जाडेंभरडें सुती कापड जिल्ह्यांत सर्वत्र तयार होतें.

**मानवभ्रमणेतिहास**—मनुष्यभ्रमणाचा आणि मानवी संस्कृतीच्या वाढीचा इतिहास मनुष्य आणि माकड यांच्या प्राचीन अवशेषांवरून ठरविण्यांत येत असतो. मायोसीन कालांत मनुष्य आणि माकड यांची फारकत झालेली दिसते व पुढें प्लिओसीन कालाच्या अंतीं त्यांच्या मेंदूंत आणि बुद्धींत स्वतंत्र वाढ झाली असावी. माणसाला जी वाचाशक्ति लाभली तीमुळें त्याला आपलें ज्ञान आणि अनुभव हीं पुढच्या पिढ्यांना परंपरागत देतां आलीं. १८९१ त जाव्हामध्यें माणसाच्या कवटीचे जे प्रस्तराव-शेष सांपडले ते माकडमाणसाच्या वंशाचे असून अत्यंत जुने असे उपलब्ध असणारे मानवी कुटुंबाचे प्रतिनिधिभूत म्हणतां येतील. १९१२ त इंग्लंडमध्यें ससेक्स परगण्यांत सांपडलेले अव-शेष जास्त सुधारलेल्या मानववंशाचे दिसतात. हा 'प्रभातीचा मनुष्य' (डॉन मॅन) म्हणतां येईल. याचा मेंदू माणसाचा

आहे, पण चेहरा अद्याप माकडासारखाच दिसतो. निआंडरथाल आणि हायडेलबर्ग या भागात असेच मानवी कुटुंबांतील नष्ट झालेले वंशप्रकार पाहावयास मिळाले. निआंडरथाल माणूस युरोपांतला असून तो फार क्रूर दिसतो. त्याच्यांत नुसती पाशवी शक्ति होती, पण कलाकौशल्य नव्हतें. तें होमोसेपिएन माणसांत होतें. याची साक्ष फ्रान्स आणि स्पेन देशांतील लेण्याच्या भिंतीवरील रंगीत चित्रांवरून पटते. आजचे ऑस्ट्रेलियांतील आदिवासी या लोकांचेच नमुने म्हणतां येतील. एक वंश पश्चिमेकडे आफ्रिकेपर्यंत गेला व तेथें 'नीग्रो' होऊन राहिला. ही नीग्रोजात मानवी कुटुंबांत अगदीं निराळी पडते. बन्टू लोक नीग्रोच पण प्राचीन काळीं पूर्व आफ्रिकेंतील हॅमिटिक लोकांशीं त्यांचा संकर झाला.

अशा रीतीनें ऑस्ट्रेलियन आदिवासी आणि नीग्रो हे इतर जातींपासून फुटून बाहेर पडल्यानंतर आशिया खंड, आग्नेय आफ्रिका व युरोप यांतून जे मानववंश राहिले त्यांच्यांत पुन्हां हिमयुगामुळें फाटाफूट झाली व त्या प्रत्येकाचे स्वतंत्र निराळे पोटवंश बनले. पीत नदीच्या पात्रांत आद्य मोंगल वंश स्थायिक झाला. पूर्व आफ्रिका आणि आशियाचा पश्चिम भाग यांत भूमध्यसामुद्रिक पिंगटवर्णी जात निराळी भटकूं लागली. युरोपच्या उत्तरेस नॉर्डिक लोक राहिले. कॅस्पियन समुद्राच्या आग्नेयीस आद्य स्लाव्ह लोक उरले व वाढले. हिमयुग संपण्याच्या वेळेस स्थलांतराचे अडथळे दूर होऊन हे स्लाव्ह किंवा आल्पाइन आशियामायनर, सिरिया, मेसापोटेमिया या बाजूस सरकले. तसेच वरहि नॉर्डिक लोकांना जाऊन मिळाले.

यानंतर लवकरच मोंगल वंशाचे लोक सुद्धां बेहरिंग सामुद्रधुनी ओलांडून अमेरिकेंत जाऊन राहिले. आल्पाइन वंशापासून स्लाव्हखेरीज आर्मेनियन आणि उत्तर सेमाईट लोक निघाले. स्लाव्ह वंशशाखेनें तर नवपाषाणयुगापूर्वीच खुष्कीच्या आणि जलमार्गानें युरोपांत प्रवेश केला होता. मानवसमाजांत वंशसंकर तर आरंभापासून सुरू होता. याचें मोठें उदाहरण म्हणजे, हिंदुस्थानांतील द्राविड मानववंश. आद्य द्राविड (=आद्य ऑस्ट्रेलियन) यांचा संबंध पिंगटवर्णीयांशीं आला. आल्पाइन वंशाचे लोक पुढें आर्य म्हणून वायव्येकडून हिंदुस्थानांत घुसले व भारतीय आर्य म्हणून कायम राहिले. या घटनेपूर्वीच पिंगटवर्णी लोक आणखी पूर्वेकडे जाऊन तेथील स्थानिक ऑस्ट्रेलियन आणि नेग्राईड लोकांना खालीं दडपून आपण इंडोनेशियाचे मालक झाले. याच इंडोनिशियन लोकांत मलायांतील मोंगली रक्ताचें मिश्रण झालें.

मोंगोलियांत उगम पावून सायबेरियातून आर्क्टिक समुद्राला मिळणाऱ्या येनेसेई नदीच्या पाणथाळामुळें सायबेरियांत गेलीं पन्नास शतकें भांडणें चालू आहेत व बराच वर्णसंकरहि झाला आहे. ग्रीनलंड आणि आर्क्टिक अमेरिका यांतून वसाहत करणारे एस्किमो लोक इतर मोंगलशाखांहून फारच भिन्न आहेत. अमेरिकन इंडियन पुन्हां यांच्याहून निराळेच आहेत. तेहि मोंगल वंशाचेच आहेत. अमेरिकेंतील मेक्सिको, मध्यअमेरिका, पेरु, चिली, या संस्थानांतून हजार वर्षांपूर्वी उच्च संस्कृति नांदत होती व तेथील लोक पॉलिनेशिया आणि आशिया यांच्या मिश्रणाचे असल्यामुळें तर अमेरिकन लोकांहून अगदीं निराळेच आढळतील.

याप्रमाणें मानवाचें भ्रमण सर्व जगांत होऊन निरनिराळे प्रादेशिक वंश व पोटवंश निर्माण झाले. आर्य लोक उत्तरध्रुवावरून सरकत खालीं आले व पूर्व-पश्चिम खंडांतून पसरले हा लोकमान्य टिळकांचा सिद्धांत बहुतेक मान्य झाला आहे. (सुलभ विश्वकोश, भाग १-२ यांतील 'विश्वविकास' ही प्रस्तावना पाहा.)

**मानवशास्त्र**—(ॲन्थ्रोपॉलॉजी). मनुष्याचें सृष्टींतील स्थान म्हणजे सृष्टींतील इतर प्राणी व मनुष्य यांमधील सादृश्य व भेद; तसेंच मनुष्याच्या अंगच्या निरनिराळ्या गुणांचें आविष्करण कसें होत गेलें याचा इतिहास; तसेंच निरनिराळ्या मानववंशांतील भेद, त्यांच्या चालीरीती व त्यांच्या समजुती व प्रवृत्ती; पूर्वयुगांत होऊन गेलेल्या मानवांचे अवशेष, त्यांच्या जीवनासंबंधीं पुरावा, या सर्व गोष्टींचा अभ्यास करणारें शास्त्र. ज्या ज्या शास्त्राचा मनुष्यप्राण्याशीं संबंध येतो त्या त्या शास्त्राचा या शास्त्रांत अन्तर्भाव करण्यांत येतो; उदाहरणार्थ, शारीरशास्त्र, नष्टप्राण्यवशेषशास्त्र, मानसशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, इतिहास व तौलनिक धर्मशास्त्र. या सर्व शास्त्रांचा मानवशास्त्राशीं संबंध येतो. सध्यां पृथ्वीवर ज्या निरनिराळ्या मानवजाती दृष्टीस पडतात, त्यांच्यामध्यें बाह्यतः अनेक गोष्टींमध्यें फरक आढळून येतो. उदाहरणार्थ, कातडीचा रंग, केसांची रचना व स्वरूप, कवटीचा आकार, पेहराव, शरीर, शरीराचा बांधा, वगैरे. तरी त्या सर्व एकाच प्राणिजातींत (होमोसेपाइन्स) मोडतात. परंतु या प्राणिजातीच्या पूर्वींची एक मनुष्यजात निआंडरथाल नांवाची अस्तित्वांत असावी व ती आतां नष्ट झाली असावी, असें त्या मानवजातीच्या प्राण्यांचे जे अवशेष जर्मनी, बेल्जिअम, फ्रान्स, जिब्राल्टर व क्रोआशिया यांमध्यें आढळून येतात त्यांवरून वाटतें. याखेरीज आणखी तीन प्राचीन व प्राथमिक मानवजातींचे अवशेष ससेक्समधील पिल्ट डौन (एओनथ्रॉपस), हायडेलबर्गजवळील मॉएर (पॅलिएनथ्रॉपस) व जावा बेटांत मर्कट मनुष्यरूपानें (पिथेकन्थ्रॉपस) आढळले आहेत. पिल्टडौन येथील प्राणी हा जरी फार दूरचा असला तरी मनुष्य-

प्राण्याचा साक्षात् पूर्वज असावा. परंतु हायडेलबर्ग व जावा येथील प्राणी हे जरा निराळ्या प्रकारचे असून त्यांची परिणति मनुष्यप्राण्यामध्यें झाली नसावी.

शरीररचनेमध्यें गोरिला या वानराचें मनुष्याशीं अगदीं जवळचें नातें दिसतें व तो बहुधा मनुष्याच्या एका पूर्वजापासूनच उत्पन्न झाला असावा, व त्याच्या वंशजांमध्यें माओसीन युगांत फरक पडला असावा. आज हयात असलेल्या मानवजातींत ऑस्ट्रेलियांतील मानव हा अद्यापि प्राथमिक अवस्थेंत असून त्याचा विकास निअँडरथाल प्राण्यापासून लवकरच विभक्त होऊन होमोसेपाइन जातीमध्यें झालेला असावा. आफ्रिका खंडांतील उष्ण कटिबंधांत राहणारा नीग्रो हा कांहीं बाबतींत अद्यापि प्राथमिक अवस्थेंत आहे. परंतु कांहीं बाबतींत त्यामध्यें बरेंच वैशिष्ट्य उत्पन्न झालेलें दृष्टीस पडतें. याची कातडी काळी असून नाक चपटें, जबडा पुढें आलेला, ओठ बाहेर पडलेले व जाडे, आणि केंस लोंकरीसारखें कुरळे असतात. याची उंची निरानिराळ्या प्रदेशांत फारच भिन्न असलेली आढळते व यांमध्यें मनुष्यजातींतील सर्वांत उंच तसेंच सर्वांत खुजे नमुने पाहावयास सांपडतात. दक्षिण आफ्रिकेंतील ओसाड अरण्यांतील झुडुपांत राहणारे लोक 'बुशमेन' ही एक अगदीं स्वतंत्र जात आहे. याच्या कातडीचा रंग काळ्यापेक्षां पिवळट म्हणतां येईल; तथापि तो नीग्रोसारखाच दिसतो. पूर्व आशियांतील मनुष्यामध्यें म्हणजे मंगोलियन जातींत पिंवळी कातडी, राठ काळे केंस, विशिष्ट तऱ्हेचा चेहरा व शारीरिक रचना हे गुण स्वतंत्रपणें उद्भवले, व अमेरिकेंतील बहुधा याच जातीपासून उद्भवले असावे, पण त्यांमध्यें मंगोलियन जातीचे गुण विशेष परिणत झाले नसावे. श्वेतवर्णीय लोकांमध्यें मुख्यतः तीन वंश मोडतात: १. भूमध्यसामुद्रिक लोक–यांची उंची कमी असून चेहरा ऑलिव्ह रंगाचा व डोकें लांबट असतें. २. उत्तरीय लोक (नॉर्डिक)–हे उंच असून यांचे केंस पिंगट व डोकें लांबट असतें. ३. आल्प्स पर्वतावरील लोक (आल्पाइन)–हे ठेंगणे, घट्ट बांध्याचे असून यांचे केंस काळे व डोकें रुंद असतें. हे आशिया खंडांतून उत्तर कालांत युरोपांत आले. मनुष्याच्या निरानिराळ्या जातींमध्यें दीर्घकालापासून संकर होत आलेला आहे. यामुळें आज जगांत कोणताहि मानववंश शुद्ध स्वरूपांत अस्तित्वात नाहीं.

**मानवेतिहास**—उत्पत्तीचा इतिहास—पृथ्वीवर सर्व प्राणी आणि वनस्पती एकदम एकाच वेळीं निर्माण झालेल्या नाहींत. प्रथम समुद्रांत माशांसारखे प्राणी उत्पन्न झाले, मग जमिनीवर वृक्ष व वनस्पती आणि सरपटणारे प्राणी उत्पन्न झाले, व शेवटीं पक्षी आणि सस्तन प्राणी उत्पन्न झाले, असें शास्त्रज्ञ सांगतात. सस्तन प्राण्यांत सुद्धा मनुष्यप्राणी प्रथम निर्माण झालेला नव्हे तर बहुधा शेवटीं झाला असावा असें म्हणतात. हा मनुष्योत्पत्तीचा काल दहा लाख वर्षांपूर्वींचा तरी आहे खास. हें व यासारखींच पृथ्वीवरील अति प्राचीन जीवजंतूंच्या अस्तित्वाचीं अनुमानें काढण्याला खरेखुरे आधार सांपडले आहेत. हे आधार म्हणजे खडकांवरील प्राचीन प्राण्यांचे अवशेष व खुणा होत. यांखेरीज शिंपा, तंतू, फळें, पावलांचे ठसे, ओरखडे, वगैरे अनेक साधनांवरून संशोधक पृथ्वीवरील प्राचीन घटनांची कल्पना बांधीत असतात.

आद्य संस्कृति व सुधारणेचीं युगें—आज उपलब्ध असणाऱ्या अवशेषांवरून सुमारें चाळीस-पन्नास हजार वर्षांपूर्वींच्या मानवी संस्कृतीची कांहीं कल्पना येते. इतक्या प्राचीन काळींहि सर्व माणसें एकाच वंशाचीं किंवा वर्णाचीं नसावींसें वाटतें. आज ज्याप्रमाणें पांढरे (आर्य), काळे (नीग्रो), पिवळे (मंगोली), इत्यादि वर्णभेद आपण पाडतों त्याचप्रमाणें त्या वेळीं कांहीं दोन-तीन तरी वर्ण(वंश)भेद असावेत. त्या वेळचे लोक शिंपांच्या माळा करून गळ्यांत घालीत, हाडा-दगडांच्या मूर्ती करीत व रंगीत चित्रेंहि काढीत. यालाच संस्कृतीचा उदयकाल म्हणतां येईल. या वेळीं मनुष्य दगड तासून केलेलीं हत्यारें वापरीत असे, म्हणून या युगाला पाषाणयुग म्हणतात. या युगांतील माणसें पृथ्वीवर सर्वत्र पसरलेलीं आढळतात व सर्व मानवजातीची एक आद्य संस्कृतिच सर्वसामान्य आहे; पुढें वेगवेगळे मानवसमाज वेगवेगळ्या काळीं सुधारत गेले व त्यामुळें सर्वांची संस्कृति केव्हांहि एक राहिली नाहीं.

*पाषाणयुग: पुरातन व नूतन*—पाषाणयुग किंवा अश्मायुधयुग हें मानवी संस्कृतीचें आद्ययुग आहे. या युगाचे पुन्हां त्यांतील सुधारणांच्या अवस्थानुरूप दोन भाग पडतात: पुरातन पाषाणयुग व नूतन पाषाणयुग. पहिल्या युगांत मनुष्य शिकार करून राहत असे. त्याच्या शिकारीचीं हत्यारें म्हणजे दगड. धनुष्यबाण अद्याप त्याला करतां येत नव्हता. तसेंच जनावरें पाळण्याचें व त्यांचा उपयोग करण्याचें त्याला माहीत नसावेंसें दिसतें. त्या काळीं गवे व तट्टें असत, पण कुत्रे मात्र नव्हते. शेतकी करणें किंवा घरें बांधणें ही कला त्याला अवगत नव्हती, एवढेंच नव्हे तर स्वयंपाकाचीं भांडींसुद्धां त्याला करतां येत नसत; मग टोपल्या किंवा कापड विणणें कोठून येणार? तो कधीं पांघरावयास कातडीं घेई; एऱ्हवीं नागवाच फिरे. पुढें पुढें नद्या-सरोवरें अस्तित्वांत आल्यावर तो मासे मारून खाई. लवकरच त्याला इतर कलाकुसरीचीं कामेंहि थोडथोडीं येऊं लागलीं. त्यानें केलेल्या हाडाच्या सुया बऱ्याच पुढच्या कालांतील रोमन लोक करीत असलेल्या सुयांपेक्षां चांगल्या ठरतात. या पुरातन पाषाणयुगीन

लोकांप्रमाणेंच संस्कृतीच्या अगदीं बाल्यावस्थेंत असलेले लोक परवांपर्यंत टॅस्मानियांत दिसत असत. इतर सुधारत चाललेल्या जगापासून अनेक शतकें ते तुटकल्यामुळें गेल्या शतकापावेतों अगदीं रानटी अवस्थेंत तसेच राहून गेले होते.

नूतन पाषाणयुग व त्या वेळचा भूगोल—मागें पृथ्वीवर चार हिमयुगें होऊन गेलीं म्हणतात. त्यांपैकीं चौथ्या हिमयुगांत पुरातन पाषाणयुगाचा काल पडतो. यानंतर हिमयुग संपून नूतन पाषाणयुगाला आरंभ होतो. या युगांत मनुष्य बराच सुधारून शेतकी करावयास लागतो व जनावरेंहि पाळतो असें दिसतें. त्याचीं हत्यारें पूर्ववत् तासीव दगडाचीं असलीं तरी ते दगड घासून सुंदर व एकसारखे गुळगुळीत केलेले असत. टोपल्या विणणें, झाडांचे दोर काढून भरड का होईना पण कापड तयार करणें, ओबडधोबड भांडीं बनविणें, यांसारख्या कला त्याला अवगत झाल्या. पाषाणयुगांत मनुष्यवस्ती आरंभीं युरोप खंडाच्या आग्नेयभागांत असून हवामानांत इष्ट फरक जसजसा होत गेला तसतशी वस्ती पूर्वेकडे आणि उत्तरेकडे पांगत गेली. येथें असें एक लक्षांत घेणें जरूर आहे कीं, मागें पृथ्वीच्या पाठीवरील जमीन आणि पाणी यांची विभागणी व स्थानें नेहमीं एकसारखींच होतीं असें नसून ज्या ठिकाणीं आज जमीन दिसते त्या ठिकाणीं पूर्वी समुद्र होता; किंवा उलट ज्या ठिकाणीं आज समुद्र आहे त्या भागांत पूर्वी एकदां जमीन होती. अशीं अनेकदां अनेक स्थित्यंतरें झालीं आहेत. उदाहरणार्थ, पुरातन पाषाणयुगांत भूमध्यसमुद्राच्या ठिकाणीं एक मोठी दरी होती ती नूतन पाषाणयुगांत (सुमारें इ. स. पूर्वी १०,००० वर्षे) पाण्यानें भरून आजच्या समुद्राच्या स्थितीला पोहोंचली. कॅस्पियन समुद्र आजच्याइतका लहान नसून काळ्या समुद्राला जोडला गेला असला पाहिजे. म्हणजे त्या काळीं मध्य आशिया खंडांत एक मोठा समुद्र असून त्याच्या भोंवतालचा प्रदेश अत्यंत सुपीक असल्यानें मनुष्यवस्ती या क्षेत्रांत विशेष असावी. आशिया व अमेरिका हीं खंडें बेहरिंगच्या सामुद्रधुनीपाशीं जोडलेलीं असून या दोन्ही खंडांचें एकमेकांशीं दळणवळण होत असावें यांत शंका नाहीं.

मनुष्याचा बदलता व्यवसाय आणि राहणी—मनुष्याचा व्यवसाय जसजसा बदलत चालला तसतशी त्याची राहणीहि बदलूं लागली. ज्या वेळीं प्राण्यांची शिकार करून तो उदरनिर्वाह करी त्या वेळीं, ज्या ठिकाणीं पुष्कळ प्राणी आढळतील अशाच रानांवनांतून तो राहत असे व प्रत्येकाच्या वांट्याला भरपूर शिकार यावी म्हणून त्या वेळचीं माणसें एकमेकांपासून अतिशय दूर दूर राहत असलीं पाहिजेत. पुढें प्राणी मारून दिवस कंठण्याचें सोडून देऊन मनुष्य गवत खाणारे प्राणी पाळूं लागला व या पाळलेल्या प्राण्यांपासून तो आपल्या अडचणी दूर करून घेई. त्याच्या ग्रामपशूंना खाण्यास गवत लागे म्हणून तो माळरानावरच राहूं लागला. यानंतर त्याची प्रगति होऊन तो शेतकी करूं लागला. खाण्यापिण्यासाठीं व वस्त्रप्रावरणांसाठीं तो जमीन आणि हवापाणी पाहून निरनिराळ्या वृक्षवनस्पती वाढवूं लागला. पुढें या धंद्यांत सुधारणा करून तो कांहीं जातींच्या गवतापासून तांदूळ, गहूं, बाजरी, वगैरे धान्यें पिकवूं लागला. त्याचप्रमाणें फळझाडांवरहि प्रयोग करून मधुर रसाळ फळें तयार करूं लागला. बऱ्याच वर्षांच्या व बऱ्याच जणांच्या अनुभवांनीं कोणकोणत्या वृक्षवनस्पती मनुष्याच्या उपयोगी आहेत हें ज्ञान मनुष्यप्राण्याला प्राप्त झालें. यापुढची सुधारणेची पायरी म्हणजे जमिनींच्या पोटांतून धातू काढून त्यांच्या वस्तू बनविणें व त्यांची देवघेव करणें ही होय. त्याला या पायरीवर येण्यास किती तरी शतकांचा काळ लोटला असला पाहिजे. मनुष्येतर प्राण्यांसारखा जंगली अवस्थेंतून सुटून एकमेकांत व्यापारव्यवहार करण्यालायक संस्कृतीपर्यंत, म्हणजे आद्य पाषाणयुगाच्या प्रारंभापासून लोहयुगापर्यंत पोहोंचण्यास मनुष्याला किती तरी प्रयास पडले असले पाहिजेत व त्याच्या किती तरी पिढ्या या सर्व प्रयोगांत गारद झाल्या असतील याची आज बरोबर कल्पनाहि येणें कठिण आहे. तथापि इतकें तरी उघड होईल कीं, मनुष्यप्राणी आपल्या सुखासाठीं सुधारणेचा अवलंब करीत होता व तसें करतांना त्याला मूळची नैसर्गिक राहणी कष्टानें बदलावी लागत असे.

सामाजिक जीवन—मनुष्याचें सामाजिक जीवन कसें बनत गेलें हेंहि पाहणें आवश्यक व मनोरंजक आहे. ज्या वेळीं जनावरांसारखें राहण्याचें सोडून मनुष्य झोपडी बांधून राहूं लागला, त्या वेळेपासून कौटुंबिक जीवनास व मालमत्तेच्या कल्पनेस सुरुवात झाली. कुटुंबांत स्त्रियांनीं कोणतीं कामें करावीत व पुरुषांनीं कोणतीं उरकावींत यांसंबंधीं आपआपसांत सहकारितेच्या तत्त्वावरच वांटण्या झाल्या. प्रत्येकास कुटुंबाचा अभिमान या वेळीं जाणवूं लागला असला पाहिजे. कौटुंबिक राहणीमुळें माणसाच्या शरीरावर व मनावर सुखदायी परिणाम होऊं लागला व सुखाची आवश्यकता उत्पन्न झाली. पण हीच सुखलालसा भांडणतंट्याला मुख्य कारण होऊन बसली! तसेंच राहणी आणि वस्ती एकच असल्यामुळें सर्वांच्या चालीरीती आणि स्वभाव एकाच धर्तीचे बनून गेले. त्या वेळच्या समाजाच्या करमणुकीच्या गोष्टी म्हणजे गाणें आणि नाचणें होत. या बाबतींत लोकांकडून जास्त शाबासकी कोण मिळवितो, यासंबंधीं चढाओढ साहजिकच सुरू झाली. सर्वोनाच या कलांमध्यें सारखें नैपुण्य मिळवितां येणें शक्य नस-

त्यानें समाजांत विषमता उत्पन्न झाली व तिच्या मागोमागच गर्व, तिरस्कार, असूया यांसारखे दुष्ट विकार माणसाच्या मनांत शिरले. स्वतःची किंमत कळण्याइतका अहंकार उद्‌भूत झाला तेव्हां सभ्य वर्तणुकीची अपेक्षाहि आली. या सर्वांचा परिणाम म्हणजे भांडणें आणि सूड यांची अव्याहत परंपरा. अशी परिस्थिति असतांहि या वेळचें हें साधें सामाजिक जीवनच मानववंशाच्या आजतागायतच्या जीवनश्रेणींत अत्यंत सुखाचें म्हणतां येईल. कारण कोणी कोणावर अवलंबून नसे. प्रत्येक माणूस आपआपला धनी. पण हें स्वातंत्र्य संस्कृतीची वाढ होत गेली तसें कमी कमी होत चाललें. ज्या वेळीं दुसऱ्याची मदत घेणें श्रेयस्कर वाटलें व तसेंच दोन माणसांना पोसणें हें फायद्याचें दिसलें त्या वेळींच माणसामाणसांत कमजास्त दर्जा उत्पन्न झाला, मालमत्ता होऊं लागली व मजूरवर्ग निघाला. तथापि पूर्वी ज्या जागीं रान दिसत असे त्या जागीं आतां शेतें डुलूं लागलीं. पण या शेतांच्या पिकांबरोबर दास्याचेंहि पीक होऊं लागलें व माणसाच्या हीन दशेला प्रारंभ झाला.

सामाजिक बंधनें—कारण मनुष्याला धातू शोधून उपयुक्त जिन्नसा तयार करतां येऊं लागल्या व शेतकींतहि तो तरबेज झाला खरा, पण त्याच्या प्रगतीचा परिणाम मात्र अहितकर दिसूं लागला. तरी ही अहितता नाहींशी करण्यासाठीं सामाजिक बंधनें ऊर्फ कायदे निघाले. या सामाजिक कायद्यांमुळें नैसर्गिक स्वातंत्र्य मात्र पार गेलें व माणसामाणसांमधील विषमता जास्त जास्त वाढण्याला मदत झाली खरी; पण त्यास इलाज नव्हता.

राजकीय बंधनें—अशा रीतीनें सर्व जमातींतून सामाजिक बंधनें हळूहळू निर्माण झाल्यावर राजकीय बंधनांची आवश्यकता साहजिकच भासूं लागली. कारण एरव्हीं जमातीचें रक्षण करावयाचें कसें? तेव्हां जे जमातीचे पुढारी तेच राजे होऊन बसले व माणसांतील विषमतेचा कळस झाला! पुढें राजे जेव्हां अति जुलुमी होऊन त्यांना ज्यांनीं राजे केलें त्या माणसांनाच छळूं लागले, तेव्हां पुन्हां सामान्य माणसामाणसांत समता उत्पन्न होऊं लागली. पण ही समता केवळ त्यांची क्षुद्रता आणि दुर्बलता या बाबतींतच! तेव्हां साहजिकच माणसांनींच केलेले सामाजिक, राजकीय कायदे माणसें मोडूं लागलीं. बळी तो कान पिळी असें होऊं लागलें व जुलुमी राजांना गादीवरून खालीं ओढण्यांत माणसांची एकजूट दिसूं लागली. पुढील इतिहासांत अशा तऱ्हेचे प्रकार अनेक वेळां झालेले दिसतील. स्वातंत्र्य संपादणें आणि गमावणें या बाबतींत माणसामाणसांत झालेल्या चुरशी, लढाया व क्रांत्या यांनींच एकंदर जगाचा इतिहास भरून गेलेला आढळणार आहे. तो इतिहास वेगवेगळ्या नांवांखालीं दिलेला आहे.

**मानसशास्त्र**—हें मानसिक क्रियेसंबंधींचें भौतिकशास्त्र आहे. मनामध्यें ज्या क्रिया होतात त्यांचें संशोधन व विश्लेषण या शास्त्रामध्यें केलें जातें व त्यावरून कांहीं मनोविषयक सिद्धांत प्रस्थापित करून मज्जातंतुव्यूहामध्यें ज्या क्रिया चालतात त्यांच्याशीं त्यांच्या अनुरोधानें निरनिराळ्या मानसिक क्रियांचें स्पष्टीकरण करण्यांत येतें. ज्या अर्थी मानसशास्त्र हें मानसिक क्रियांचा केवळ क्रिया म्हणून विचार करतें तेव्हां सर्व मानसिक अनुभव—उदा., विचार, स्मरण, ओळख, स्मृति, इच्छा, वगैरे—सर्व गोष्टी मानसशास्त्राचे विषय होतात. वर वर दिसणाऱ्या सर्व मानसिक क्रियांचें परीक्षण केल्यानंतर मानसशास्त्र भ्रम, वृत्ति, भावना, सुख, दुःख, वगैरे सर्व मानसिक चमत्कारांचें आणि संवेदनांचें निरीक्षण करतें. सामान्यतः मानसिक क्रियांचे तीन प्रकार करण्यांत येतात: बोधक, भावक व प्रेरक; म्हणजेच मानसिक अनुभवाचीं जीं तीन स्वरूपें असतात तीं ज्ञान, भावना आणि यतन हीं होत. त्यांत त्या क्रियांचा अंतिम घटक श्राव्य, दृश्य, वगैरे प्रकारची एखादी संवेदना असते. प्रत्येक बौद्धिक क्रिया ही संवेदनेपासूनच आरंभ पावते. परंतु या संवेदनेची जाणीव वस्तुबोधनामुळें उत्पन्न होते. प्रेरणा याचा अर्थ मानसशास्त्रज्ञ अगदीं साध्या मानसिक क्रियेमध्येंहि जें एक प्रयत्नाचें मूळ असतें तें असा करतात. प्रो. डब्ल्यू. मॅक्डुगल यासारख्या अर्वाचीन मानसशास्त्रज्ञांनीं जीवशास्त्रास अनुसरून या प्रेरणांचें महत्त्व फार मानलें आहे. मनुष्य हा प्रवर्तनशील प्राणी आहे व त्याची ही प्रवृत्ति कांहीं वांशिक सहजप्रवृत्तीवरून व ठराविक नियमांनीं निश्चित होत असते. यामुळें प्रत्येक सहजप्रवृत्तीबरोबर एका विशिष्ट वस्तूची जागृति होऊन तीपासून विशिष्ट भावना उत्पन्न होते आणि तिच्याप्रमाणें विशिष्ट प्रकारची वर्तणूक अथवा स्वभावाची दिशा बनते.

मानसशास्त्राची पद्धति म्हणजे एक शास्त्रीय निरीक्षणपद्धति होय. जुन्या प्रणालींतील मानसशास्त्रज्ञ मानसशास्त्रीय पद्धति ही अंतर्निरीक्षणपद्धति आहे असें मानीत असत. परंतु या अंतर्निरीक्षणपद्धतीमध्यें एक अडचण अशी आहे कीं, मनुष्य हा स्वतःच निरीक्षक असतो व निरीक्ष्यहि असतो. परंतु ही अडचण वास्तविक नसून केवळ दिखाऊ आहे आणि अंतर्निरीक्षणामुळेंहि अनेक उत्तम सिद्धांत प्रस्थापित करण्यांत आले आहेत. तथापि अर्वाचीन मानसशास्त्रज्ञ या पद्धतीस तितकें महत्त्व देत नाहींत. वर्तनवादी (बिहेवियरिस्ट) पक्षाचें असें मत आहे कीं, कोणतेंहि शास्त्र मनुष्याच्या वैयक्तिक ज्ञानावर आधारलेलें असतां कामा नये व निरीक्ष्य वस्तुहि कोणाहि योग्य निरीक्षकाला निरीक्षण करतां येण्यासारखी असली पाहिजे. याकरितां तें मानसशास्त्र हें भौतिक शास्त्राचीच एक प्रायोगिक शाखा (एक्सपेरि-

मेंटल ) आहे असें मानतात व व्यक्तीच्या विशिष्ट परिस्थितींतील वर्तनाच्या निरीक्षणावरून या शास्त्राचे नियम ठरवितां येतात, असें मानतात. यामुळें अंतर्निरीक्षणाचा अगदींच उपयोग नाहीं असें नसून त्याचा तौलनिक अभ्यासासाठीं उपयोग करण्यांत येतो.

वर्तनवाद ( बिहेवियरिझम )—ही एक प्रायोगिक मानसशास्त्राची शाखा असून तिचे पुढें दिल्याप्रमाणें विभाग पाडण्यांत येतात : १ मानसभौतिकशास्त्र ( सायकोफिजिक्स ), २ ऐंद्रिय मानसशास्त्र ( फिजिऑलॉजिकल सायकॉलॉजी ), व ३ मनोविकृतिशास्त्र ( सायकोपॅथॉलॉजी ). या तिसऱ्या विभागांतच मानसोपचारशास्त्र आणि विकृतमानसशास्त्र हे विषय येतात. फ्राउड आणि त्याचे अनुयायी यांनीं अर्वाचीन कालांत उपबोधिक ( सबूकॉन्शस ) मन आणि त्याचे वर्तनावर परिणाम या गोष्टींसंबंधीं बरेंच संशोधन केलें असून मनोविश्लेषण शाखेमध्यें बरीच प्रगति केली आहे. याखेरीज मानसशास्त्राची एक शाखा विकासवादाच्या उपपत्तीच्या अनुषंगानें बरीच परिणत झाली आहे. यामुळें अलीकडे वैयक्तिक मानसशास्त्र, तौलनिक मानसशास्त्र, विकासात्मक मानसशास्त्र, इत्यादि मानसशास्त्राच्या शाखा पडत चालल्या आहेत. या शास्त्राचें महत्त्व अलीकडे वैद्यक शास्त्रासहि पटलें असून मानसिक रोगांचें निदान व चिकित्सा करण्याच्या कार्मी या शास्त्राचा बराच उपयोग करण्यांत येतो. त्याप्रमाणें ज्यांचीं मनें विकृत किंवा दुर्बल आहेत अशा व्यक्तींस शिक्षण देण्याच्या कामीं शिक्षणशास्त्रामध्येंहि मानसशास्त्राचा बऱ्याच मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येतो. गुन्हेगार लोकांच्या बाबतींतहि या शास्त्राचा उपयोग स्पष्टच आहे. विद्यार्थ्यांची बुद्धि तपासण्याकरितां आणि वैमानिकांच्या मज्जातंतूंवर कोणते परिणाम होतात यांची परीक्षा करण्याकरितां जीं तत्त्वें योजण्यांत येतात तीं वर्तनवादाचीं व्यावहारिक उदाहरणेंच होत.

आरिस्टॉटल यानें आपला 'डी ऑनिमा' हा ग्रंथ लिहून मानसशास्त्राचा पाया घातला असें मानण्यांत येतें. ग्रीक लोकांनीं मनाच्या स्वरूपाचा फार सूक्ष्म अभ्यास केल्याचें दिसून येतें. परंतु तो अभ्यास तत्त्वज्ञानात्मक स्वरूपाचा होता. मध्ययुगामध्यें या शास्त्राचा अभ्यास धार्मिक गोष्टींच्या अनुषंगानेंच होत असे. डेकार्टे यानें या शास्त्रास अर्वाचीन वळण दिलें, व त्याच्या अंतर्निरीक्षण व पृथक्करण पद्धतीचा पुरस्कार जॉन लॉक, बिशप बर्क्ले, ह्यूम, मिल पिता–पुत्र, बेन आणि स्पेन्सर यांनीं केला. फ्रान्समध्यें कॉंदीलॅक आणि लामित्रेये यांनीं मानसशास्त्राचा विशेष पुरस्कार केला. जर्मनीमध्यें लोट्झ, हर्बर्ट, फेक्नेर आणि वुंट हे प्रसिद्ध मानसशास्त्री होऊन गेले. फिच्टे, शेलिंग आणि हेगेल यांच्या तत्त्वज्ञानात्मक मानसशास्त्राविरुद्ध १९ व्या शतकामध्यें शास्त्रीय, ऐंद्रिय आणि प्रयोगात्मक मानसशास्त्राचा पुरस्कार करण्यांत येऊं लागला, व या कामांत जे. एफ्. हर्बर्ट, हरमन, लोट्झ आणि जी. टी. फेश्नेर हे पुढारी होते. सी. लॅंग आणि डब्ल्यू. जेम्स यांनीं भावनाप्रदर्शनाच्या उपपत्तीवर विशेष प्रकाश पाडला. अर्वाचीन काळचे महत्त्वाचे मानसशास्त्रज्ञ म्हटले म्हणजे जे. वार्ड, सी. लॉइड मॉर्गन, सिग्मन्ड फ्राउड, डब्ल्यू. मॅग्डुगल, आणि डब्ल्यू. एच्. आर्. रिव्हर्स हे होत.

आधुनिक शिक्षणक्रमांत विद्यार्थ्यांचें मानसशास्त्र हा एक मोठा महत्त्वाचा विषय शिक्षणशास्त्रांत आहे. त्याचप्रमाणें धंदा, कायदा, औषधोपचार, जाहिरात या सर्वांच्या पाठीमागें मानसशास्त्राचा संपूर्ण अभ्यास असल्याशिवाय त्यांत यश मिळणें कठिण आहे. याच मनोव्यापारांचा पूर्ण अभ्यास करून मानवांमध्यें गटागटांतील पुढारी समाजांतील त्या त्या गटावर आपलें वर्चस्व गाजवतात. रानटी अवस्थेंतून विसाव्या शतकापर्यंत सुधारत आलेल्या मानवी सुधारणेचें बरेंचसें श्रेय या मानसशास्त्राला दिलें पाहिजे. एक समाज स्वतःच्या फायद्याकरितां दुसऱ्याच्या मनांत विकृति उत्पन्न करतो आणि ती विकृति परमावधीला जातांच दुसऱ्या समाजाचें अधःपतन होतें. परंतु जर विकृति उत्पन्न न होतां त्या दुसऱ्या समाजानें पहिल्याशीं जोरदार सामना सुरू केला तर पहिल्या हुशार असलेल्या समाजाशीं सामना देऊन त्याच्यावर मात करण्यासाठीं दुसऱ्या समाजाला फार जोरदार रीतीनें तयारी करावी लागते. आणि याच झगड्यांतून प्रगति होत राहते.

शरीराचें जसें शारीरशास्त्र तसें मनाचें मानसशास्त्र होय. शरीर, मन, बुद्धि व जीव मिळून मनुष्य होतो. प्रत्येकाचें शास्त्र आहे. जीवाचा विचार करणारें जें शास्त्र त्याला अध्यात्मशास्त्र म्हणतात. भौतिक शास्त्राला चालना बुद्धीकडून मिळते. तत्त्वज्ञानाचाहि उगम बुद्धींतच आहे. शरीर, मन, बुद्धि व जीव ह्यांचा समुच्चय जो मनुष्य तो मानवशास्त्राचा विषय होतो. अध्यात्मशास्त्र हें बरेंचसें तर्काधिष्ठित आहे. भौतिकशास्त्र हें वस्तुनिष्ठ आहे. शरीराची रचना व शरीरांतर्गत अवयवांच्या क्रिया ह्यांचें ज्ञान आपणांस शरीरशास्त्रावरून होतें. कोणत्याहि शास्त्राचा विचार करण्याच्या पद्धतीचे नियम शोधणें हें त्या शास्त्राच्या तत्त्वज्ञानांत पडतें. तथापि संसारांत व समाजांत जीवन सुखानें व्यतीत करण्याचीं शास्त्रशुद्ध तत्त्वें निश्चित करणें ह्याला तत्त्वज्ञान ही संज्ञा प्रायः लावण्यांत येते. अनुभव व विवेक हीं ह्या शास्त्राचीं साधनें होत. मानसशास्त्राची उभारणी मनाचे व्यक्त व्यापार अथवा क्रिया ह्यांवरून करावयाची असते. मन हा काय

पदार्थ आहे हें जरी सांगतां आलें नाहीं तरी मनाचे व्यापार चालतात त्यांचें आपणांला स्पष्ट ज्ञान होत असतें (मन पाहा).

मानसशास्त्रांत प्रवृत्ति हा एक वादाचा विषय होऊन बसला आहे, पण कां तें समजत नाहीं. सहजप्रवृत्ति व प्रवृत्ति ह्यांमध्यें फरक करावा लागेल. लहान मूल जन्मतःच रडतें, स्तनपान करतें, पुढें रांगूं लागतें. हीं सहजप्रवृत्तींचीं उदाहरणें दिलीं जातात. आत्मसंरक्षणार्थ होणाऱ्या क्रियासुद्धां सहजप्रवृत्तींत मोडतात. लहान मूलसुद्धां कडू पदार्थ गिळीत नाहीं. दुसऱ्या जातीच्या प्रवृत्तींचा उल्लेख मागें केलाच आहे. जो विकार बलवत्तर असेल तदर्थ होणारी क्रिया हीसुद्धां प्रवृत्तीची निदर्शक आहे. ही एका अर्थानें सहजप्रवृत्ति होय. परंतु ह्या प्रवृत्त्या मनोविकार विकासित झाल्यानंतर उद्भवतात. त्यांचा प्रादुर्भाव उपजत होत नाहीं. तसेंच त्या मनोविकारांवर अवलंबून असतात. तथापि ह्यांत विवाद्य असें कांहीं नाहीं.

एकंदरींत मानसशास्त्राचा अभ्यास अद्यापि अपुरा आहे. वैयक्तिक मन व सामुदायिक मन ह्यांच्या क्रियाप्रतिक्रियांचा समाजशास्त्रीय दृष्ट्या विचार हाहि एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे.

मानसशास्त्रीय संशोधन—मानवी मनाचे जे गूढ व्यापार चालतात, त्यांचा उलगडा अद्याप झालेला नाहीं; तसेंच आत्मा (स्पिरिट) ज्याला म्हणतात त्या आत्म्याचें अदृश्य, अज्ञात व्यापारक्षेत्र यांचें संशोधन किंवा अभ्यास व्हावयास पाहिजे. अशा प्रकारचें संशोधन करण्याकरितां १८८२ सालीं प्रोफेसर सिजविक यांच्या अध्यक्षतेखालीं 'सायकिकल रीसर्च सोसायटी' स्थापण्यांत आली. या संस्थेच्या उद्देशपत्रकांत या संस्थेच्या संस्थापकांनीं असें जाहीर केलें होतें कीं, या संस्थेचा उद्देश, जे मानसिक व्यापार अद्यापि कार्यकारणभावानुसार उलगडलेले नाहींत, ते व्यापार आणि त्या व्यापारांसंबंधींचा प्रत्यक्ष पुरावा मुद्दाम प्रयोग करून व त्यांची संख्याबद्ध नोंद ठेवून त्यांचें पूर्वग्रहरहित मनानें व भौतिकशास्त्रीय पद्धतीनें संशोधन करणें, हा आहे. या संस्थेचें अध्यक्ष थोर भौतिकशास्त्रज्ञ व सुप्रसिद्ध तत्त्ववेत्ते होते; त्यांपैकीं कांहींचीं नांवें येणेंप्रमाणें : अँड्र्यू लँग, ए. जे. बाल्फोर, विल्यम जेम्स, बॉइड कार्पेंटर, सर डब्ल्यू. एफ्. बॅरेट, सर ऑलिव्हर लॉज, हेन्री बर्ग्सन, आणि प्रोफेसर डब्ल्यू. एम्. डुगल. या संस्थेनें कांहीं लबाड लोकांच्या लबाड्या उघडकीस आणल्या; तथापि या संस्थेने हेंहि निश्चित सिद्ध केलें आहे कीं, कांहीं विलक्षण आणि ज्यांचा कार्यकारणभाव सांगतां येत नाहीं, अशा घटना किंवा क्रिया प्रत्यक्ष घडतात, हें खरें आहे. उदा., चांगलें आरोग्य असणाऱ्या कांहीं माणसांच्या अनुभवास एकदम दृश्य आणि श्राव्य चमत्कार नेहमीं येतो. दूर असणाऱ्या एखाद्या माणसाचें मरणाच्या वेळचें चित्र त्यांना दिसतें. भौतिक जगाबाहेरच्या वस्तू किंवा गोष्टी त्यांच्यापुढें येतात.

या मानससंशोधन-संस्थेचें कार्य अद्याप बाल्यावस्थेंत आहे, तरीहि या संस्थेनें फार महत्त्वाचें कार्य केलें आहे, हें नाकबूल करणें शक्य नाहीं. आपल्या या जडदेहाखेरीज दुसरा सूक्ष्म-द्रव्यमय (इथेरिक) देह असतो काय, आणि हा दुसरा सूक्ष्म देह मरणोत्तर अस्तित्वांत राहतो काय, तसेंच शरीराखेरीज निराळें स्वतंत्रपणें मन अस्तित्वांत राहूं शकणार नाहीं, हें जीवशास्त्रज्ञाचें मत चूक आहे, या गोष्टी ही संशोधन-संस्था प्रस्थापित व पुराव्यानें सिद्ध करूं शकेल कीं नाहीं, हा प्रश्न संशयास्पद आहे.

**मानस सरोवर**—हिमालयांतील हें अष्टकोणी सरोवर आहे. याचे कोन आश्चर्य वाटण्याजोगे आहेत. याच्या वायव्येस कैलास पर्वत आहे. सर्वांत अधिक उंचीवर असलेल्या गोड्या पाण्याचें हें आगर आहे. चार नद्या या सरोवरांतून निघतात. याच्या दक्षिणेस 'दक्षिण झेनबू' नांवाचें द्वीप आहे. स्वर्गांतील पक्षी येथें येऊन गाणीं म्हणतात; पांचशें ऋषी कैलासावर असतात; येथें बुद्ध अमिताभाच्या स्वर्गांतील कमळासारखीं कमळें आहेत; अशीं कित्येक काव्यमय वर्णनें आहेत. जपानी बौद्ध पंडित डॉ. कावगुचि म्हणतो कीं, 'झेनबू' हें जंबुद्वीप असावें, आणि 'अनवतत' हें मानस सरोवर असावें. अनवततांतून निघणाऱ्या चार नद्या त्या सतलज, सिंधु, ब्रह्मपुत्रा, गंगा, या हिंदुस्थानांतील नद्या असाव्यात व या सरोवराचा परिघ २०० मैल असावा.

**मानसिंह** (सन १४९३ चा सुमार)—संगीतशास्त्रावरील 'मानकुतूहल' या ग्रंथाचा कर्ता व ग्वाल्हेरच्या तोमर ऊर्फ तुंवर वंशांतील राजा. हा संगीतशास्त्रांतील दर्दी असून आपल्या गुजरी राणी (मृगनयना)च्या नांवानें यानें गुजरी, बहुलगुजरी, मालगुजरी व मंगळगुजरी हे नवीन चार राग अस्तित्वांत आणले. यास संकीर्ण (मिश्र) रागांची विशेष आवड असून ध्रुपदाची गायकी याच्या वेळेसच जन्मास आली व अगदीं थोडक्याच अवधींत ती लोकप्रिय झाली. १४८६ च्या सुमारास मानसिंहानें ग्वाल्हेरच्या किल्ल्यांतील महाल बांधले.

**मानसोपचार व मनोविश्लेषण**—(सायकोथेरॅपी-सायकोॲनॅलिसिस). मानसिक व्याधींमुळें जे रोग उत्पन्न होतात ते बरे करण्याची ही वैद्यकशास्त्राची एक शाखा आहे. मनोविश्लेषण ही मानसोपचाराची एक उपचारपद्धति आहे व तिला आज बरेंच महत्त्व देण्यांत येत असतें. स्नायविक आणि

मानसिक रोगांचे दोन मुख्य वर्ग पडतात : एक आंगिक रोग—यात स्नायुतंतूंना हमखास इजा पोंचलेली असते. व दुसरा शरीरव्यापार रोग—यांत रोगाचीं लक्षणें दिसतात, पण कोठें रोग आहे हें कळत नाहीं. यांना नसाव्याधि (न्युरोसेस) म्हणतात. या रोगांमध्यें उन्माद, नसाक्षीणता (न्युरासथेनिया), चिंतानसाव्याधि, व अत्रमयाघातांत येणारे बहुतेक रोग येतात. तेव्हां मनोव्याधींवर मानसोपचाराचा मोठा उपयोग आहे. वेड लागलें असतां प्रथम हा उपचार करतात; पण वेड लागण्याचें मुख्य कारण समजणें फारच कठिण असतें. जेव्हां मनोव्याधि निवळ मानसिक कारणापासून असेल तेव्हांच मनोविश्लेषणापासून कांहीं इलाज होण्याचा संभव असतो (वेड पाहा). मनोविश्लेषणाचा चांगला अभ्यास असल्यावांचून नसाव्याधि, वेड, इ. रोगांवर लागलीच गुण येणें अशक्य असतें.

या उपचारांत चार मुख्य गोष्टी करण्यांत येतात. त्या म्हणजे रोग्याची समजूत घालणें, सूचना करणें, मनोविश्लेषण करणें व पुन्हां शिक्षण देणें. रोग्याला विश्वासांत घेऊन या गोष्टी करावयाच्या असतात. अंतर्मनांतील हालचाली ओळखून बाह्य कृतींची उपपत्ति लावावी लागते. रोगाचें कारण कळल्यावर मनाचे व्यापार पूर्ववत् होण्यासाठीं मनाला पुन्हां विसरलेलें सारें शिक्षण द्यावें लागतें. याच दोन गोष्टी महत्त्वाच्या व कठिण असतात.

गेल्या महायुद्धापासून मानसोपचारपद्धतीला विशेष प्राधान्य देण्यांत येतें. मनोविश्लेषणाचा उपाय मुख्यतः सिगमुंड फ्राउड यानें शोधून काढला. स्वप्नांचा उपयोग त्यानें दाखवून दिला. माणसाच्या सुप्त इच्छा, आकांक्षा झोंपेंत जागृत होतात. त्या स्वप्नांत दिसून आल्यावर, दोन मनांत चालणाऱ्या भावनांच्या झगड्यामुळें जी मनोव्याधि उत्पन्न झाली असते ती दूर करतां येणें शक्य असतें. फ्राउडच्या मतें बहुतेक सुप्त भावना दडपल्या गेलेल्या लैंगिक आवेगाशीं संबद्ध असतात. फ्राउडनंतर युंग आणि ॲडलर यांसारख्या शास्त्रज्ञांनीं या मानसोपचारपद्धतींत बऱ्याच सुधारणा केल्या.

**मानाजी आंगरे** (मृ. १७५८)—कान्होजी आंगऱ्यास गहिनीबाई नावाच्या उपस्त्रीपासून झालेला मुलगा. सेखोजीच्या कारकीर्दीत जंजिऱ्यावर मोहीम झाली (१७३३). सेखोजीच्या मरणानंतर त्याचा सावत्रभाऊ संभाजी हा येसाजीकडे कुलाब्याचा व यांच्याकडे आरमाराचा अधिकार सोंपवून सिद्दीवरील मोहिमेस गेला. मानाजीचें त्याच्या वडील भावाशीं भांडण होऊन त्यानें पोर्तुगीजांच्या मदतीनें कुलाबा हस्तगत केला व येसाजीचे डोळे काढून त्यास बंदींत टाकलें. पुढें १७३९ सालीं मानाजीनें समुद्राच्या बाजूकडून पोर्तुगीज लोकांचें



दळणवळण बंद पाडून चिमणाजी आप्पास वसई काबीज करून घेण्याच्या कामीं साहाय्य केलें. आंगरे हे पेशव्यांपेक्षां स्वतःस श्रेष्ठ समजून राज्यकारभारांत व्यत्यय आणीत. त्यामुळें त्यांस नरम करणें पेशव्यांना भाग होतें. त्यासाठीं पेशव्यांनीं मानाजीस हातीं धरलें होतें. १७५८ मध्यें मानाजीनें आरमार पाठवून हबशास जेर केलें व उंदेरी किल्ला घेतला आणि जलमार्गानें जाऊन राजपुरी लुटून जंजिऱ्याजवळ मोर्चा दिला. पुढें तो कुलाब्यास आला, व पांचव्या-सहाव्या दिवशीं मरण पावला (सप्टेंबर १७५८).

**मानाजी नरसिंगराव फांकडे** (मृ. १८००)—हा कण्हेरखेडच्या शिंद्यांपैकीं एक असून राघोबादादा पेशव्याचा पक्षपाती होता. शिंद्यांची सरदारी महादजीला न देतां ती याला द्यावी अशी दादाची खटपट होती. मराठेशाहींतील तीन प्रसिद्ध फांकड्यांपैकीं—ट्टुवर (स्टुअर्ट), कोन्हेर त्रिंबक व हा मानाजी—हा एक असून फार शूर व धाडसी असे. याच्या अंगावर पन्नास-साठ शस्त्राच्या जखमा होत्या व हा नेहमीं उघडा असे. हा कधींहि कोणास न दबणारा, परंतु थोरल्या माधवरावांना वचकत असे. पुढें पुरंदरच्या तहामुळें हा पुणें दरबारच्या सैन्यास येऊन मिळाला. यानें घाशीरामाचा अन्याय उघडकीस आणला. मानाजी फांकड्यास आनंदराव (शिंदे) नांवाचा एक पुत्र होता. यानेंच पुढें सर्जेराव घाटग्यास ठार करून दौलतराव शिंद्यास त्याच्या जाचांतून मुक्त केलें. याचे वंशज बडोद्यास असतात.

**मानोरचा किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा. मानोर हा गांव वैतरणी नदीच्या कांठीं पालघर स्टेशनच्या पूर्वेस १० मैलावर आहे. वैतरणीस भरती आली म्हणजे तेथपर्यंत पाणी चढतें. पोर्तुगीज लोकांनीं मानोरजवळ असाव येथें जो किल्ला बांधला त्यासच मानोरचा किल्ला म्हणत असावे व तो अशीरीइतकाच महत्त्वाचा होता. तथापि मानोर येथें उंचवट्यावर एक फार जुनी किल्ल्यासारखी दुमजली इमारत आहे व हीस लागून एक पूर्वीं मेढेकोट बांधलेला होता असें १६३४ मधील वर्णन आढळतें.

**मापक**—(गेज). निरनिराळ्या वस्तू मोजण्यासाठीं जीं मापें केलीं जातात त्यांचें नांव. उदा., फूटपट्टी, टेप. थर्मामीटर हें सुद्धां एक प्रकारचें मापक (गेज)च आहे. त्याचप्रमाणें वाफेच्या बॉयलरवर वाफ दाखविण्यासाठीं घड्याळासारखें जें असतें तें मापकच होय. त्याचप्रमाणें बॉयलरमधील पाण्याची पातळी दाखविणारी जी कांचेची नळी बसवलेली असते तिला 'साइट गेज' असें म्हणतात. हेंच गेज दुसऱ्याहि कांहीं ठिकाणीं बसविलेलें असतें. विजेचें व्होल्टमीटर जे असतात तेहि एक तऱ्हेचे मापकच होत. कोणत्याहि भांड्यांत दाब असल्यास तो

दाब दाखविणारें जें घड्याळ असतें त्याचें नांव भारमापक (प्रेशर गेज) व तेंच निर्वात (व्हॅक्युम) दाखविण्यास वापरलें असतांना त्याला निर्वात भारमापक म्हणतात. याप्रमाणें ज्या ज्या कामासाठीं तें मापक (गेज) वापरलेलें असतें त्या त्या नांवाचें तें मापक असें म्हणतात. आगगाडीच्या दोन रुळांमधील अंतराला गेजच म्हणतात. सामान्य ब्रिटिश गेज ४' ८½" असतें व हिंदी गेज ५' ६" असतें.

**मापनशास्त्र**—(मेन्सुरेशन). लांबी, क्षेत्रफळ, विस्तार (व्हॉल्यूम) काढण्याचें शास्त्र. त्रिकोणाचें क्षेत्रफळ = $\frac{\text{पाया} \times \text{उंची}}{२} = \sqrt{\{स(स-अ)(स-ब)(स-क)\}}$.

येथें अ, ब, क ह्या त्रिकोणाच्या बाजू आणि २ स=(अ+ब+क). अथवा त्रिकोण = ½ ब × क × ज्या बके. (बके=ह्या बाजूंमधील कोन).

(१) वर्तुळाचा परिघ = २ $\pi$ त्रिज्या. ($\pi$ = २२/७). वर्तुळाचें क्षेत्रफळ = $\pi$ (त्रिज्या)$^२$ लंब. (२) वर्तुळाचें क्षेत्रफळ = $\pi$ अ × ब. (लंब वर्तुळाचे अ, ब हे अर्ध अक्ष होत). (३) गोलाचा पृष्ठक्षेत्र = ४ $\pi$ (त्रिज्या)$^२$. (४) गोलाचा विस्तार = ४/३ $\pi$ (त्रिज्या)$^३$. (५) शंकू किंवा पिरॅमिड = ⅓ पाया × उंची.

**मॉमेलूक**—ईजिप्त देशांतील सुलतानाचे जे शरीरसंरक्षक असत त्यांस मॉमेलूक असें म्हणत. यांमध्यें बहुधा तुर्की व सर्क्यॅशियन गुलामांचा भरणा असे. यांची सत्ता हळूहळू इतकी वाढली कीं, १२५० मध्यें त्यांनीं आपल्याचपैकीं एकास गादीवर बसविलें व त्याच्या वंशजांनीं १२५० ते १५१७ पर्यंत सुलतान-पदाचा उपभोग घेतला. तुर्क लोकांनीं जेव्हां ईजिप्त देश जिंकला तेव्हां त्यांनीं मॉमेलूक लोकांस आपल्या चाकरीस ठेविलें. नेपो-लियननें ईजिप्त देशावर स्वारी केल्यानंतर कांहीं काळ मॉमेलूक लोकांनीं पुन्हां आपली सत्ता प्रस्थापित केली. परंतु सन १८११ मध्यें महमदअली यानें त्यांची सत्ता पूर्णपणें नष्ट केली.

**मॉम्सेन, थिओडोर** (१८१७–१९०३)—एक जर्मन इति-हासकार व पुराण-वस्तुसंशोधक. हा श्लेस्विगमधील गार्डिन्ज येथें जन्मला. त्यानें श्लेस्विग येथें एक वृत्तपत्र सुरू केलें. १८४८ सालीं लाइप्झिग येथें कांहीं दिवस तो दिवाणी कायद्याचा अध्यापक होता. नंतर मॉम्सेन हा स्वित्झर्लंडमध्यें झूरिच येथें अध्यापक झाला. स. १८५८ मध्यें पुन्हां त्याला बर्लिन येथें अध्यापकाची जागा मिळाली. जर्मनींतील सर्वांत वजनदार असें जें बातमीपत्र तें यानेंच अस्तित्वांत आणिलें. त्याचीं राज-कीय मतें ठाम होतीं. त्यानें रोमचा इतिहास व रोमन नाण्यांचा इतिहास लिहिला आहे.

**मायकेलचें आवण**—हें एक तऱ्हेचें आवण (बेअरिंग) आहे. एखादी लाट (शाफ्टिंग) फिरत असतां चालू गतीच्या लाटेवर ९० अंशानें जो जोर येतो त्या जोरानें लाट मागें जाऊं नये म्हणून जें आवण केलेलें असतें त्याला दाब आवण (थ्रस्ट बेअरिंग) असें म्हणतात. याकरितां लाटेवर पट्टे (कॉलर) पाडलेले असतात व आवणामध्यें असलेल्या पितळया-ला हेच कॉलर बसतील अशा खोबणी (ग्रूव्ह) पाडलेल्या असतात. लाट चालतांना तिच्यावर आडवा जोर आला म्हणजे लाट मागें सरूं नये म्हणून खोबणीला अडकते व त्यामुळें लाट मागें जात नाहीं. थ्रस्ट बेअरिंग सर्व बोटींत बसविलेलें असतात. (अंतर्ज्वलनयंत्र पाहा).

**मायकेलँजेलो** (१४७५–१५६३)—एक सुप्रसिद्ध इटा-लियन चित्रकार, शिल्पकलाकार, खोदकलाकार आणि कवि. त्याला दुसरा ज्यूलियन पोप यानें १५०५ सालीं रोम शहरीं राहण्याबद्दल सांगितलें. तेथें त्यानें सिस्टीने चॅपेलचा मनोरा (डोम) रंगविला आणि धार्मिक इतिहासांतील जगदुत्पत्ति व इतर मुख्य मुख्य घडामोडी यांचीं चित्रें काढलीं. १५३३ सालीं त्यानें आपलें सिस्टीने चॅपेलमधील सर्वांत मोठें चित्र 'दि लास्ट जजमेंट' (अखेरचा निकाल) हें काढण्यास सुरुवात केली, व तें चित्र पुरें करण्यास त्याला आठ वर्षें लागलीं. त्याचीं शेवटचीं दोन मोठालीं चित्रें 'दि कॉन्व्हर्शन ऑफ सेंट पॉल' (संत पालचें धर्मांतर) आणि 'दि क्रूसिफिकेशन ऑफ सेंट पीटर' (संत पीटरला क्रूसावर चढविणें) हीं पॉलीन चॅपेलमध्यें काढलेलीं आहेत. १५४६ मध्यें 'सेंट पीटर्स चर्च' या इमारतीचें काम पुढें आणखी वाढवण्यासाठीं त्याचीच योजना करण्यांत आली, आणि तदनुसार त्यानें त्या इमारतीचा प्रथम नकाशा काढल्या-नंतर बांधला. शिवाय त्यानें 'पिझाडेल कँपीडोग्लिओ' (कॅपिटोल), 'फार्नेसी पॅलेस' आणि इतर अनेक इमारतींचीं बांधकामें केलीं. त्याच्या शिल्पकलेचे मुख्य गुण भव्यपणा व भक्कमपणा हे आहेत. त्यानें करमणुकीखातर कांहीं कविता लिहिल्या आहेत त्यावरून तो फार मोठा बुद्धिवान् इसम होता, अशी खात्री पटते.

**मायक्रोफिल्म**—(सूक्ष्मपट). सिनेमा फिल्मप्रमाणें पुस्तकांचे, महत्त्वाच्या कागदांचे सुरक्षित फिल्मच्या गुंडाळयांवर फोटो काढून घेण्याची ही आधुनिक कला आहे. अशा गुंडाळया ५०० वर्षेंहि टिकतात. मूळ प्रतीच्या १/२० अंशाइतकी लहान आकाराची प्रत तयार करतां येते. यामुळें लहान जागेंत असंख्य कागद मजकुराचा संक्षेप किंवा खराबी न होतां ठेवतां येतात. एका लहानशा पेटींत मोठा ग्रंथसंग्रह मावतो. गेल्या महायुद्धांत या साधनाचा वैमानिक टपालाच्या कामीं फार उपयोग झाला. जीं

ऐतिहासिक कागदपत्रें अत्यंत खराब स्थितींत असून फार काळ टिकणारीं नसतात त्यांची या पद्धतीनें शाश्वती करतां येते. नकला किंवा आवृत्त्या करण्यासहि मायक्रोफिल्मचा फार उपयोग आहे. या फिल्मवरील मजकूर मुळाप्रमाणें वाचण्यास 'प्रोजेक्टर असतात. त्यामुळें कसलीच अडचण पडत नाहीं. बँका, विमा-कंपन्या, उद्योगधंद्याच्या कंपन्या, संशोधन-मंडळें, इ. ना या नवीन-फोटोसाधनाचा चांगला उपयोग होतो.

**मायने** ( पत्रांचे )—आजकाल पत्रें लिहितांना नुसतें नमस्कार, सप्रेम नमस्कार, साष्टांग नमस्कार, कृतानेक सा. न., किंवा विनंति विशेष ( वि. वि. ) असें कांहीं भेदाभेद न पाहतां लिहितात. इंग्रजींत पत्रांचे जसे मायने आहेत व जे शाळेंत मुलांना शिकविले जातात तसेच पूर्वी आपणांकडे होते; व त्यांचें अचूक परिपालन होत असे. सन १८५० मध्यें पुण्यास छापलेलीं मायन्यांचीं पुस्तकें आढळतात. त्यांतून सविस्तर मायन्यांचे अनेक प्रकार दिलेले आहेत.

आपण ज्यास पत्र लिहितों त्याची व आपली जात, योग्यता लक्षांत घेऊन त्याप्रमाणें गौरवयुक्त मायना लिहीत. ब्राह्मणानें ब्राह्मणास नमस्कार व इतरांस आशीर्वाद किंवा जातिपरत्वें शिरस्ता असेल त्याप्रमाणें लिहावें. इतर जातींनीं ब्राह्मणांस दंडवत, रामराम, जयगोपाळ, जयकृष्ण, इ., शिरस्त्याप्रमाणें लिहावें. आपणांपेक्षां कोणत्याहि प्रकारें श्रेष्ठ असेल तर त्यास 'विनंति' लिहिल्यानंतर पुढें 'उपरि' लिहूं नये. श्रेष्ठ जातींनीं अस्पृश्य जातींस आशीर्वाद, रामराम किंवा जोहार, भगवत्स्मरण, इ., लिहावें. स्वामी-संन्यासी यांस त्यांच्या मठाच्या संप्रदायानुरूप लिहावें. आईबाप यांस तीर्थरूप व इतर वडील माणसांस तीर्थस्वरूप लिहावें. लहानांस आशीर्वाद लिहितात. विधवांस 'गंगाभागीरथी' व सवाष्णींस 'सौभाग्यवती' लिहितात. साधुसंतांस 'हरिगुरुभक्तिपरायण', शास्त्र्यांस 'वेदशास्त्रसंपन्न' किंवा 'वेदमूर्ति', मुसलमानास किंवा साहेबास 'सलाम बाजद सलाम', या प्रकारचे साधे व गौरवाचे पुष्कळ मायने आहेत. (१) राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री—स्वामीचे सेवेसीं पोष्यांकित—. (२) श्रीमंत प्रौढ प्रताप शौर्यौदार्याद्यनेकगुणविराजित गोब्राह्मणप्रतिपालक निराधारी यांसी आधार—. (३) अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—इ. गौरवाचे किती तरी प्रकार योग्य वेळीं माणसांस लिहिण्याचे आहेत. फारसी मायने तर फारच मोठे व अतिशय गौरवाचे असत.

**मायफळ**—१. [ गाल, गालनट ]. मायफळें हीं एका कृमीच्या एका झाडाच्या सालींत किंवा पानांत घातलेल्या अंड्यापासून निघणाऱ्या वानस्पतिक निर्यास ग्रंथी होत. बाजारांत मिळणारीं मायफळें हीं ओक वृक्षाच्या एका जातीच्या (क्केर्कस इन्फेक्टोरिआ) कोंवळ्या ढिऱ्यामध्यें एका जातीच्या माशी (सिनिप्स)पासून उत्पन्न होतात (ओक पहा). हीं झाडें आशिया मायनर, सीरिया व इराण यांमध्यें होतात. याचा आकार व रंग निरनिराळा असतो. यांचा उपयोग रंगकामांत व शाई करण्याकरितां करतात. यांचा औषधी म्हणूनहि बराच उपयोग करण्यांत येतो. चिनी मायफळें (वू पैत्झे) हीं अगदीं निराळीं आहेत.

२. हिंदुस्थानींत याला 'माजूफल' म्हणतात. फळें साधारण सुपारीएवढीं किंवा बारीकहि असतात. त्यांना 'तुरटें म्हणतात. मायफळाची पूड नासारोगावर नाकांत घालतात. मुलांच्या अतिसारादि विकारांवर मायफळ दुधांत उगाळून देतात.

**मायराणी**—हा एक जुना कुळधर्म आहे. यांत विकेशा विधवेची पूजा करण्यांत येते. मायराणी ही एक क्षुद्रदेवता असल्याचे संतवाङ्मयांतून उल्लेख येतात.

**मायसिनियन संस्कृति**—ईजियन संस्कृति व ग्रीक संस्कृति यांमध्यें दुव्यासारखी असलेली ही संस्कृति होय. मायसिनियन लोकांचें लीडियन लोकांशीं बरेंच साम्य आहे. तथापि त्यांच्या मूळ उत्पत्तीबद्दल मतभेद आहेत. मापेच्या मार्फत या राष्ट्राचे आप्तसंबंध काढण्यास पुरेशी ऐतिहासिक माहिती अद्याप मिळाली नाहीं. मायसिनियन लोक मूळ थ्रेसमधून आले व त्याचा संबंध डॅन्यूब नदीच्या कांठच्या मायसियन लोकांशीं आहे असें कित्येक लेखकाचें म्हणणें आहे. ग्रीक लोकांनीं सर्व समुद्रकिनारा व्यापून त्यांनीं मायसिनियन लोकांना देशाच्या अंतर्भागांत हांकून दिलें. मायसिआ हा प्राचीन देश आशिया मायनरच्या अगदीं ईशान्य टोंकाला होता. मायसिनी हें प्राचीन ग्रीक शहर ट्रोजन युद्धापूर्वी म्हणजे सुमारें खि. पू. १४०० च्या काळांत प्रसिद्ध होतें. अर्गासच्या ईशान्येस ६ मैलावर हें असून खि. पू. ४६८ मध्यें आर्गाइव्ह लोकांनीं याचा नाश केला. मायसिनी हा देश ईजियन समुद्राच्या किनाऱ्याला लागून आहे. डोंगराळ भागांत राहूं लागल्यापासून पुढें मायसिनियन लोकांची सुधारणा झाली नाहीं. होमरच्या ग्रंथांत मायसिनी राष्ट्राचा उल्लेख ट्रॉयच्या पक्षाचा दोस्त म्हणून केला आहे. पुढें लीडिया येथील सत्तेनें त्यांना जिंकलें, त्यानंतर लीडियाबरोबरच मायसिनी इराणच्या साम्राज्यास जोडलें गेलें. अलेक्झांडरच्या मरणानंतर हा देश सीरियाच्या राज्याला जोडला.

गेल्या शतकाच्या अखेरीस मायसिनी येथें उत्खनन सुरू झालें तेव्हां या हेलेनिकपूर्व संस्कृतीचा शोध लागला. पैलूदार रत्नें, रंगीत भांडीं, नक्षीदार दगडी वस्तू व इतर कलाकृती सांपडल्या आहेत.

**माया**—सर्व बाह्य जग असत् असून या जगाच्या बुडाशीं असणारें ब्रह्मतत्त्व तेवढेंच सत् अगर खरें आहे असें प्रतिपादन करणारें भारतीय तत्त्वज्ञानांतील एक मत. ब्रह्मरूपी पदार्थालाच तेवढें खरें अस्तित्व आहे. दुसऱ्या कोणत्याहि पदार्थाला खरें अस्तित्वच नाहीं. या सर्व जगाचा ब्रह्मावरच भास होत आहे, असें मायावाद्यांचें म्हणणें आहे. व्यावहारिक दृष्ट्या या वस्तू जरी खऱ्या असल्या तरी परमार्थाच्या दृष्टीनें त्या केवळ भासात्मक आहेत. उपाधीचें अनृतत्व पटून ज्ञान झाल्यावर त्या ज्ञानी पुरुषाला देखील त्यांचें असत्यत्व पटून येतें. त्रिगुणात्मक अविद्येच्या प्रभावानें या सर्व वास्तविक मिथ्या असलेल्या वस्तू खऱ्या आहेत असें या मायावाद्यांचें थोडक्यांत म्हणणें आहे. या मायावादाचा पुरस्कार मुख्यतः अद्वैतमतवाद्यांनीं केलेला आहे. मायावादाची कल्पना खुद्द ऋग्वेदांत देखील अप्रत्यक्ष रीतीनें दृष्टीस पडते. माया हा शब्द ऋग्वेद, अथर्ववेद, इत्यादि ग्रंथांत पुष्कळ वेळां आलेला आहे. इंद्राला, मरुतांना अगर मित्राला मायावी हें विशेषण ऋग्वेदांत लावण्यांत आलेलें आहे. अथर्ववेदांत विराज्पासून माया उत्पन्न झाली व असुर लोक त्या मायेच्या कर्तृत्वावर अवलंबून राहतात असें म्हटलें आहे. श्वेताश्वतरोपनिषदामध्यें व गीतेंत माया शब्द वापरण्यांत आला आहे.

प्लेटोनें आपल्या अनुभवाला येणाऱ्या वस्तू खऱ्या नसून त्या खऱ्या वस्तूंच्या छाया असतात असें एके ठिकाणीं म्हटलेलें आहे, त्यांत मायावादाचेंच प्रतिबिंब दृष्टीस पडतें.

**मायावती**—१. शंकरानें मदनाला दहन केल्यावर रति ही त्याची पत्नी शंबरासुराकडे जाऊन राहिली. शंबरासुरानें या मायावतीच्या स्वाधीन सात दिवसांच्या चोरून आणलेल्या कृष्णपुत्र प्रद्युम्नाला केलें. मायावतीनें या लहान मुलास चांगलें शिक्षण देऊन त्याकडून शंबरासुराला मारविलें.

२. गौतमबुद्धाची माता. ही शुद्धोदन राजाची पत्नी. बुद्धजन्मानंतर सातव्याच दिवशीं मायावती आजारी पडून वारली. हिची सख्खी बहीण व सवत गौतमी हिनें नंतर बुद्धाचें लालनपालन केलें.

**मायावतरण**—(कॅमूफ्लाझ). दृष्टिभ्रम, दृग्भ्रम. कॅमूफ्लाझ हा मूळ फ्रेंच शब्द असून त्याचा अर्थ स्वतःचें वेषांतर करणें असा आहे. पहिल्या महायुद्धांत हा शब्द फार प्रचारांत आला. युद्धामध्यें शत्रूला अचानकपणें जाऊन गांठून त्याला चकित करणें ही यशाची गुरुकिल्ली आहे. अलीकडे विमानांतून निरीक्षण करण्यांत येऊं लागल्यापासून अशा रीतीनें अचानक हल्ला करणें दिवसेंदिवस कठिण होऊं लागलें आहे. याकरितां जर्मन लोकांनीं शत्रूस चकविण्याकरितां निरनिराळ्या युक्त्या योजल्या. त्यांपैकीं दृष्टिभ्रम उत्पन्न करणें ही प्रमुख होय. यामध्यें मुख्य कल्पना ही असते कीं, आपणांस जी गोष्ट शत्रूस दिसूं नये अशी इच्छा असते तिला अशा तऱ्हेचा रंग द्यावयाचा कीं, ती आजूबाजूच्या वस्तूंसारखीच दिसूं लागून तिचा वेगळेपणा नष्ट व्हावा.

जर्मन लोक आपल्या सडका व सैन्याचे तळ यांवर अशा तऱ्हेचीं आवरणें घालीत कीं, त्यामुळें वैमानिकाला मोठमोठे रस्ते किंवा हजारों सैनिकांचा तळ यांचा मागमूसहि लागूं नये. इंग्रज व फ्रेंच हे रस्त्यावरून मधून मधून पडदे सोडणें वगैरे गोष्टी करीत; पण तरी सुद्धां लोकांचें एकसारखें जाणें-येणें व सकाळ-संध्याकाळ पडणाऱ्या लांब सावल्या, यामुळें रस्ते ओळखूं येत. या बाबतींत जर्मनांची रस्ते झांकण्याची पद्धति विशेष परिणामकारक असे. त्याप्रमाणेंच समुद्रांतून जाणाऱ्या जहाजास अशा तऱ्हेचा रंग देण्यांत येत असे कीं, त्याच्या चकाकीमुळें जहाज शेजारच्या समुद्रासारखेंच दिसावें. तसेंच त्याचा आकार असा चमत्कारिक दिसेल असा बनविण्यांत येत असे कीं तें, कोणत्या दिशेकडे चाललें आहे तें ओळखतां येणें कठिण होत असे.

**मायावरम्**—मद्रास, तंजावर जिल्ह्याच्या ईशान्येकडील समुद्रकिनाऱ्यावरील एक तालुका. क्षे. फ. २८३ चौ. मैल. व लो. सं. सुमारें तीन लक्ष. हा तालुका कावेरी नदीच्या मुखाजवळील बेचक्यांत असून यांत ५० ते ५३ इंच पाऊस दरवर्षी पडतो. यांतील जमिनींत मुद्दमूग, तांदूळ, वगैरे जिन्नस होतात. यांत १८६ खेडीं व मायावरम् आणि त्र्यंबकेश्वर हीं दोन गांवें आहेत. दोन गांवांपैकीं मायावरम् हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे व दुसरें मोडकळीस आलेलें एक बंदर आहे. कावेरी नदीच्या मायावरम् गांवाची लो. सं. सुमारें २०,००० आहे. येथें पार्वतीनें मयुररूपानें श्रीशंकराची पूजा केली अशी आख्यायिका आहे. या गांवाच्या कोरनाड नामक उपनगरांत रेशमी कापड तयार होतें.

**मॉयोसिन स्तर**—भूस्तरशास्त्रामध्यें तृतीय युग (टर्शिअरी) कालीन थरांपैकीं हा एक पोटवर्ग आहे. थरामध्यें आढळणाऱ्या वनस्पतींच्या आणि शिंपल्यांच्या प्रास्तरावशेषांवरून त्या कालांत हवा स्थिर स्वरूपाची असून उष्ण होती असें दिसून येतें. या कालांत सस्तन प्राण्याचा उद्भव झालेला असून अर्वाचीन कालीं आढळणाऱ्या प्राण्यांचा उदय होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं असें दिसतें. नवनूतन स्तर पाहा.

**मारकीनाथ**—एक मराठी संतकवि. दर्यापूरचा बाबाजी नांवाच्या गृहस्थाचा वृद्धपणीं झालेला एकुलता एक पुत्र वारल्यामुळें त्यास उपरति झाली व स्थूलग्रामाजवळ पयोष्णीतीरीं खेड मारकी म्हणून गांव आहे (वऱ्हाड, उमरावती तालुका)

तेथें तो आला आणि त्यानें १२ वर्षें मौन धारण करून तप केलें. त्यानें अन्न वर्ज्य केलें होतें. मारकी हें पूर्वीचें त्याचें गुरुग्राम. याचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत.

**मारवा**—हा राग मारवा थाटाचा आश्रय राग आहे. यांत पंचम स्वर वर्ज्य आहे, म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी धैवत आहे. गानसमय दिवसाचा शेवटचा प्रहर मानितात. याच्या आरोहांत निषाद स्वर वक्र होतो. अवरोहांत जेव्हां ऋषभ स्वरावर अनेक ताना येऊन संपतात तेव्हां हा राग अधिक स्पष्ट होतो व खुलतो.

**मारवाड**—राजपुतान्यांतील जोधपूर संस्थानाचें दुसरें नांव मारवाड हें आहे (जोधपूर पाहा). मारवाड हा शब्द मरुवार या मरुस्थलवाचक शब्दाचा अपभ्रंश आहे.

मरुदेशामध्यें शाकल नगरास जाऊन नकुलानें आपला मामा जो शल्य त्यास वश करून घेतल्याचें महाभारतांत वर्णन आहे. त्या काळीं शाकलनगर प्रसिद्ध होतें व पुढें शक-यवन राजांनीं त्यावर राज्य केल्याचा इतिहास आहे.

**मारवाडी**—यांची हिंदुस्थानांतील एकूण लो. सं. (१९११) ४५,४१२ असून त्यांत निम्मे निमश्रावक व वैष्णव आहेत. यांची विशेष वस्ती मारवाड, मुंबई व हैद्राबाद संस्थान यांत आहे. हे मूळचे मारवाड प्रांतांतील असून यांचा धंदा व्यापाराचा आहे. यांचा स्वभाव थंड असून हे मेहनती व अत्यंत मितव्ययी आहेत व त्यामुळें ते बरेच श्रीमंत आहेत. मुंबईसारख्या शहरीं कांहीं मारवाडी सट्टयाचा व दलालीचा धंदा करतात. यांची भाषा मारवाडी असते. तूप व डाळरोटी हें त्यांचें मुख्य अन्न होय. पेशवाईत मारवाडी ब्राह्मण महाराष्ट्रांत आले. हे ब्राह्मण यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे आहेत. मारवाडी वाण्यांत यांची वृत्ति चालते. यांच्यांत जोशी, सोती, त्वाडी, उपाध्ये अशीं आडनांवें आढळतात. वाण्यांत ओसवाल, आगरवाल, मेश्री, ठाकूर, खंडेलवाल, पोरवाल असे भेद आहेत. ते एकमेकांच्या हातचें खातात, पण सोयरीक करीत नाहींत. क्षेत्रपाल व पारसनाथ हे जैन मारवाड्यांचे कुलदेव आहेत. वैष्णव मारवाड्यांचा देव बालाजी आहे. जाट मारवाडी म्हणून यांच्यात एक वर्ग आहे.

**मारिव्हो, पिएर कार्लेन** (१६८८-१७६३)—एक फ्रेंच नाटककार व कादंबरीकार. त्यानें पुष्कळ नाटकें लिहिलीं. त्याच्या दोन अपुऱ्या कादंबऱ्या आहेत.

**मॉरिशस**—हिंदी महासागरांतील एक बेट. आइल-द-फ्रान्स या नांवानेंहि हें ओळखलें जातें. हें मादागास्करपासून पूर्वेकडे ५०० मैलांवर आहे. बेट एकंदरींत डोंगराळ आहे. परंतु खोऱ्यांतून सुपीक जमीन पुष्कळ आहे. आणि त्यांत मुख्यतः साखरेकरितां ऊंसाची लागवड विशेष होते, व उष्ण कटिबंधांत होणारीं सर्व झाडें (फळझाडें वगैरे) लावलीं जातात. लो. सं. (१९४४) ४,२३,६२६. १९४६ सालीं २,७१,६३६ हिंदी होते. तेव्हां बहुसंख्य वस्ती हिंदी लोकांचीच आहे. त्यांत हिंदूच अडीच लाखपर्यंत भरतील. त्यांना नीट वागविण्याविषयीं हिंदुस्थान सरकार आणि स्थानिक सरकार यांमध्यें अनेक वेळीं बोलणीं व तडजोडी झाल्या. आतां हिंदी लोकांची स्थिति बरी आहे. पोर्ट लुई हें राजधानीचें शहर आहे. तेथील लो. सं. (१९४३) ७२,०००.

दहाव्या शतकापूर्वीच हें बेट अरब नाविकांना परिचित होतें. पोर्तुगीज व्यापाऱ्यांनीं १५०७-१५१२ या काळांत हें शोधून काढलें; पण पहिले वसाहतवाले डच होत (१५९८). १७१० त त हें डचांनीं सोडल्यावर फ्रेंचांच्या ताब्यांत आलें. १८१० त ब्रिटिशांची यावर मालकी झाली. यावर एक गव्हर्नर असतो. १९४९ सालापासून हिंदुस्थान सरकारचा एक कमिशनर येथें असतो. सध्यां श्री. धर्मयशदेव हे कमिशनर आहेत.

**मार्कंडेय पुराण**—अठरा पुराणांपैकीं एक. यांत मार्कंडेय ऋषि आणि कांहीं पक्षी यांनीं सांगितलेल्या कथा आहेत. याची श्लोकसंख्या सध्यां उपलब्ध असलेल्या प्रतींत अजमासें सात हजार आढळते. मार्कंडेय-पुराणांतील कथाभाग महाभारतांतील पांडवांच्या कथाभागास पोषक असा आहे. यांत वृत्रासुर, बलदेव, हरिश्चंद्र, वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्या कथा सुरस रीतीनें वर्णिल्या आहेत. बंगाल्यांतील कालिकादेवीचें वर्णन याच पुराणांत सांपडतें. यास दुर्गापुराण असें नांव आहे. या दुर्गापुराणांतील चंडिपुराण किंवा दुर्गामाहात्म्य या नांवाचा अध्याय अत्यंत रसभरित आहे. दुर्गेच्या देवालयांत याच पुराणाचें पठण होत असतें.

**मार्कोनी, ग्युलिएल्मो** (१८७४-१९३७)—एक प्रख्यात इटालियन शास्त्रीय संशोधक.

१८९६ त त्यानें बिनतारी संदेशयंत्र शोधून काढलें व १८९९ सालीं इंग्लंड व फ्रान्स यांच्या दरम्यान इंग्लिश खाडीवरून बिनतारी संदेश पाठवण्याची योजना प्रत्यक्ष चालू केली. १९०१ सालीं ही योजना इंग्लंडमधील कॉर्नवॉल व न्यू फौंडलंड बेटावरील सेंट जोन्स या शहराच्या दरम्यान (२१०० मैल), १९०२ सालीं इंग्लंड व कानडा यांच्या दरम्यान, व त्याच सालीं इंग्लंड व अमेरिकन संयुक्त संस्थानें यांच्या दरम्यान चालू केली. मार्कोनीला १९०९ सालीं पदार्थ-विज्ञानशास्त्राचें नोबेल

पारितोषिक अंशतः मिळालें. १९१२ सालीं मोटारच्या अपघातांत त्याचा एक डोळा गेला. १९१५ सालीं इटलींत सिनेटर व १९२९ सालीं मार्किस झाला. महायुद्धांत इटलीच्या सैन्यांत दाखल झाला व त्यानें मुसोलिनीला आपल्या शास्त्रीय शोधांची मदत दिली.

**मार्को पोलो** (१२५४–१३२४)—एक इटालियन प्रवासी. हा व्हेनिस शहराचा रहिवासी होता. १२७१ सालीं तो आपला बाप व चुलता यांच्याबरोबर चीन देशांत सफरीला गेला. मोंगोल लोकांचा थोर राजा कुबलाईखान याच्या दरबारीं गेल्यावर तेथील मोंगोल लोकांची भाषा व चालीरीती यांचें ज्ञान मार्कोनें लवकर मिळविलें; व त्यामुळें खानाची मार्कोवर मेहेरनजर वळली. खानानें मार्कोला आसपासच्या राजांकडे कामगिऱ्यांवर पाठवलें. नंतर मार्कोला पूर्व चीनमधील योंगचाऊ प्रांताचा गव्हर्नर नेमण्यांत आलें. तेथें तीन वर्षें काम केल्यावर ते तिघे प्रवासी व्हेनिसला १२९५ सालीं परत आले. या सर्व हकीगतीचें पुस्तक (बुक ऑफ मार्को पोलो) मार्कोनें प्रथम फ्रेंच भाषेंत लिहिलें, व नंतर त्याचें भाषांतर लॅटिन व इटालियन भाषेंत झालें. मार्कोच्या या पुस्तकाच्या पुष्कळ आवृत्त्या निघाल्या.

**मार्क्स, हीनरिच कार्ल** (१८१८–१८८३)—सुप्रसिद्ध जर्मन अर्थशास्त्रज्ञ, तत्त्ववेत्ता, समाजसत्तावादी आणि सार्वराष्ट्रीय

मजूरसंघाचा मुख्य चालक. त्यानें कायद्याचा, नंतर इतिहास विषयाचा व अखेर तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून १८४१ सालीं डॉक्टर ऑफ फिलॉसफी ही पदवी मिळविली. मार्क्स समाजसत्तावादाचा चांगला अभ्यास करण्याकरिता पॅरिसमध्यें जाऊन राहिला. फ्रेडरिक एंजल्स या समाजसत्तावाद्याशीं त्याची मैत्री होऊन ते दोघे मासिकांत कडक लेख लिहूं लागले. म्हणून फ्रेंच सरकारनें त्यांस हांकून लावलें. नंतर ब्रूसेल्स, कोलोन व शेवटीं इंग्लंडमध्यें तो राहिला. 'न्यूयॉर्क ट्रिब्यून'मध्यें तो लेख लिहीत असे. शिवाय त्यानें सार्वराष्ट्रीय मजूरसंघ स्थापला. मार्क्सनें 'डास कॅपिटल' हा अर्थशास्त्रीय ग्रंथ पुरा करण्याकरितां अनेक विषयांचा अभ्यास सुरू केला; पण ते श्रम सहन न होऊन तो वरचेवर आजारी पडून मरण पावला.

हल्लीं समाजसत्तावाद्यांची जी चळवळ जगभर चालू आहे तिचा आद्य प्रवर्तक मार्क्स हा होय. सर्व संपत्ति श्रमजीवी मजुरांनीं मिळविली असल्यानें ती सर्व त्यांचीच आहे, तेव्हां ती भांडवलवाल्यांकडून मजुरांनीं भांडून–झगडून मिळविली पाहिजे, असा हा थोडक्यांत मार्क्सवाद आहे. श्रम हा किंमत ठरविणारा एकच घटक आहे असें मार्क्सचें मत होतें. तें त्यानें ॲडम स्मिथ व रेकार्डो या अर्थशास्त्रज्ञांपासून घेतलें होतें. पण वास्तविक किंमत ठरविणारे घटक अनेक असतात. मूलभूत प्रमेय चुकीचें असलें तरी मार्क्सचे व इतर समाजसत्तावाद्यांचे अखेरचे सिद्धांत एकच आहेत (समाजसत्तावाद पाहा). लेनिनवाद हा मार्क्सवादांचा मोठाच पुरस्कर्ता आहे.

गेल्या सत्तर वर्षांत मार्क्सवादाचा परिणाम प्रत्येक राजकीय आणि आर्थिक विचारप्रणालीवर झालेला दिसून येईल. त्याचे प्रतिस्पर्धीहि थोड्याफार फरकानें मार्क्सचे विचार स्वीकारीत असतात. आतांपर्यंत त्याच्या विचारांची सत्यासत्यता पटून आली आहे व मजूरसंघ आणि सरकारी कायदे यांना योग्य वळण लागलेलें आहे. मजूर आणि भांडवलदार यांच्यांत कायमचा लढा राहणार नसून राष्ट्रीकरण आणि सुसंघटित भांडवलपद्धति यांमुळें पुष्कळ सुधारणा होत आहेत व होतील. तथापि लेनिनपक्ष आणि मार्क्सवादी यांचा अद्यापि सर्व भर जुन्या मार्क्सविचारांवरच आहे. बहुजनसमाजाचें हित वरील सुधारणामुळें फारसें होणार नाहीं असें त्यांना निश्चित वाटतें.

**मार्गच्युति**—(पर्टर्बेशन). ग्रहांच्या ज्या नेहमींच्या लंबवर्तुलाकार कक्षा असतात त्यांपासून होणारी च्युति. प्रधान ग्रहांच्या बाबतींत ही च्युति ग्रहांच्या परस्पराकर्षणामुळें होत असते; व चंद्रासारख्या उप-ग्रहांच्या बाबतींत जी होते तिला कारण म्हणजे सूर्याचें प्रधान आणि उपग्रह यांवर होणारें विषम प्रमाणांतलें आकर्षण होय.

**मार्जार वर्ग**—(फेलिडी). हा एक मांसाहारी प्राण्यांचा वर्ग असून यामध्यें विध्वंसक वृत्तीची वाढ फार मोठ्या प्रमाणावर झालेली आढळून येते. ज्याप्रमाणें पक्षिवर्गांत ससाण्यांचा वर्ग

विध्वंसक आहे त्याचप्रमाणें चतुष्पादामध्यें हा वर्ग आढळतो. या प्राण्यांचीं मुख्य शस्त्रें म्हणजे दांत आणि पंजे हीं होत. हे सर्व प्राणी आपल्या भक्ष्यांकडे चोरून आवाज न करतां येतात. व त्यांवर उडी मारून त्यांस पकडून ताजे असतांनाच खाऊन टाकतात. या वर्गांतील प्राणी ऑस्ट्रेलियामध्यें आढळत नाहींत. या वर्गांत सिंह, वाघ, चित्ता, बिचट, मांजर, इत्यादि अनेक प्राणी येतात.

**मार्जारिन**—नुकत्याच मारलेल्या गायी किंवा मेंढ्या यांपासून एक प्रकारचें जें तेल (ऑलिव्ह) निघतें त्यापासून मार्जारिन हा पदार्थ तयार करण्यांत येतो. हें लोण्यासारखें दिसतें. यामध्यें जीवनसत्त्वें (व्हिटॅमिन्स) कमी असल्यामुळें हें जरी एक प्रकारचें चांगलें अन्न असलें तरी तें कमी प्रतीचें मानण्यांत येतें. वरील तेलामध्यें मलई काढलेलें दूध मिसळण्यांत येतें व त्यामुळें याचें लोणी तयार होतें. हें उत्तम प्रतीचें बनवावयाचें असल्यास त्यांत दहा टक्के शुद्ध लोणी किंवा मलई घालण्यांत यावी. हें घुसळण्यास सुमारें एक तास लागतो. घुसळण्याच्या वेळीं उष्णमान वीस ते पंचेचाळीस अंश शतमान ठेवावें. ज्या प्रतीचें मार्जारिन तयार करावयाचें असेल त्या मानानें डुकराची चरबी, खोबरेल तेल, सरकीचें तेल अथवा दुसरें एखादें तेल मिसळावें. असें मिश्रण तयार झाल्यावर तें घुसळून एकाच दिशेनें फिरणाऱ्या दोन एकाशेजारीं एक ठेवलेल्या पिपांत फिरूं देतात. या पिपामध्यें १०° श. उष्णमान ठेवलेलें असतें. यामुळें मार्जारिन घट्ट होऊन त्यांतील निरुपयोगी पाण्याचा अंश निघून जातो. यामध्यें आरंभींच वाटल्यास थोडें मीठ व रंग टाकण्यांत येतो. मार्जारीनच्या डब्यावर मार्जारीनचें नांव न दिल्यास तो गुन्हा आहे.

**मार्टिनो, जेम्स** (१८०५–१९००)—एक इंग्रज युनिटेरियन आचार्य व तत्त्वज्ञानविषयक लेखक. तो १८६९ पासून १८८५ पर्यंत मँचेस्टर न्यू कॉलेजचा प्रिन्सिपल होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते : 'एन्डेव्हर्स आफ्टर दि ख्रिश्चन लाइफ' (ख्रिस्ती जीवनाचे प्रयत्न); 'स्टडीज ऑफ ख्रिश्चॅनिटी' (ख्रिस्ती पंथाचा अभ्यास); 'एसेज, फिलॉसॉफिकल ॲन्ड थिऑलॉजिकल' (तत्त्वज्ञानपर व धर्मपर निबंध); 'मॉडर्न मटीरिॲलिझम' (अर्वाचीन जडवाद); 'टाइप्स ऑफ एथिकल थिअरी' (नैतिक सिद्धांताचे प्रकार); आणि 'ए स्टडी ऑफ रिलिजन' (धर्माचा अभ्यास).

**मार्टे**—मुस्टेला प्राणिवर्गांतील मांसाहारी प्राण्यांच्या कांहीं जातींचें हें नांव आहे. यांपैकीं पाईन मार्टेन ही जात ब्रिटनमध्यें आढळते. यासारखेच सेबल मार्टेन म्हणून एका जातीचे प्राणी आहेत. ते सायबेरियामध्यें आढळतात. त्यांची लवयुक्त कातडी (फर) फार मौल्यवान् असते.

**मार्मागोवा**—(मुरगांव). गोवें प्रांत, सासष्टी जिल्ह्यांतील द्वीपकल्प, गांव व बंदर. हें द्वीपकल्प गोवें बंदराच्या दक्षिणेस आहे. यावर दाट जंगल असून समुद्राकडील बाजूनें तें फार भव्य दिसतें. सध्यां हें व्यापाराचें महत्त्वाचें ठिकाण आहे. येथूनच मुंबईचा माल बेळगांवास जातो. मुरगांवची कारकून मंडळी शेजारच्या वास्कोदगामा गांवीं राहतात. तेथेंच स्टँडर्ड ऑइल कंपनीची कचेरी आहे. बंदरगांव लोकवस्ती व उद्योगधंदे यांनीं समृद्ध व्हावें म्हणून पोर्तुगीज सरकार प्रयत्न करीत असतें; पण त्यात फारसें यश नाहीं. खुलें बंदर म्हणूनहि हें कांहीं वाढलें नाहीं.

**मॉर्मोन**—हा एक ख्रिस्ती पंथ आहे. पंथीयांना 'लॅटरडे-सेन्ट्स' (पुढील काळांतील संत) असें म्हणतात. या पंथाची स्थापना जोसेफ स्मिथ यानें न्यू यॉर्क संस्थानांत फायेट येथें ६ एप्रिल १८३० या दिवशीं केली. हे लोक असें मानतात कीं, त्यांचा पवित्र ग्रंथ जो 'बुक ऑफ मॉर्मोन' तो अमेरिकेंत आलेल्या कांहीं हिब्रू लोकांजवळ होता व त्यांस ख्रिस्तानें भेट दिली होती. यांचे विरोधक असें म्हणतात कीं, हा ग्रंथ 'स्पॉल्डिंग रोमान्स' या कल्पित कथानकावर आधारलेला आहे; परंतु ओहिओ संस्थानांतील ओबरलिन कॉलेजचा अध्यक्ष जेम्स एच्. फेअर चाइल्ड यानें १८८४ मध्यें होनोलुलू येथें जें एक हस्तलिखित शोधून काढलें त्यावरून तें असिद्ध ठरलें आहे. १८४४ मध्यें स्मिथ मृत्यु पावल्यानंतर त्याच्या सुमारें २ लक्ष अनुयायांची फाटाफूट झाली. याचे सध्यां दोन उपपंथ असून एकास रीऑर्गनाइझ्ड चर्च आणि दुसऱ्यास युटा चर्च असें म्हणतात. १८४७ मध्यें ब्रिगॅम यंग (१८०१–१८७७) हा यांचा पुढारी बनला. यानें बहुपत्नीत्वाचें तत्त्व प्रचलित केलें. परंतु अलीकडे मॉर्मोन पंथानें बहुपत्नीत्वाच्या मार्गाचा त्याग केला आहे. या पंथीयांची संख्या सुमारें पांच लक्ष आहे.

**मार्लबरो, जॉन चर्चिल** (१६५०–१७२२)—एक इंग्रज सेनापति व मुत्सद्दी. तो प्रथम फ्रान्समध्यें डच सैन्याविरुद्ध लढाईंत ड्यूक ऑफ मनमथबरोबर राहून १६७२ सालीं लढला, व त्यांत त्यानें इतकें शौर्य दाखविलें कीं, फ्रान्सच्या राजानें त्याचे जाहीर आभार मानले. तो इंग्लंडांत परत आल्यावर प्रथम लेफ्टनंट–कर्नल, नंतर कर्नल, व २ रा जेम्स राजा झाल्यावर जनरल नेमला गेला व ड्यूक ऑफ मनमथचें बंड त्यानें मोडलें. प्रिन्स ऑफ ऑरेंज इंग्लंडांत उतरल्यावर त्याच्या पक्षाला तो मिळाला व इंग्रज सैन्याचा मुख्य सेनापति झाला. १७०२ सालीं ॲन राणी गादीवर आल्यावर तो अधिकाधिक मानाच्या हुद्यावर

चढला आणि स्पॅनिश वारसा युद्धांत त्यानें ब्लेनहीम (१७०४), रॅमिलीज (१७०६), ओडेनार्ड (१७०८), व माल्पाक्रेट (१७०९) या लढायांत एकाहून एक सरस असे विजय मिळविले. १७११ सालीं त्याच्यावर सरकारी पैशाची अफरातफर केल्याचा आरोप ठेवण्यांत येऊन त्याला सर्व हुद्यांवरून काढून टाकण्यांत आलें. पण पुढें १ ला जॉर्ज गादीवर आल्यावर त्याला पुन्हां पूर्ववत् ते हुद्दे मिळाले.

**मार्लो, ख्रिस्तोफर** (१५६४-१५९३)— एक इंग्रज नाटककार व कवि. त्याचें शिक्षण केंब्रिज येथील बेनेट कॉलेजांत झाल्यावर लॉर्ड ॲडमिरलच्या नाटक कंपनींत तो सामील झाला व तो दारू प्यायलेल्या इसमांच्या भांडणांत १५९३ सालीं मारला गेला. याशिवाय त्याच्या चरित्राबद्दल अधिक माहिती उपलब्ध नाहीं. त्यानें नाटकें लिहिलीं तीं-'टॅम्बरलेन दि ग्रेट'; 'दि ट्रॅजिकल हिस्ट्री ऑफ डॉक्टर फॉस्टस' (डॉ. फॉस्टसचा शोकान्त इतिहास), 'दि फेमस ट्रॅजेडी ऑफ दि रिच ज्यू ऑफ माल्टा' (माल्टाच्या सधन ज्यूची प्रसिद्ध शोकान्तिका), 'एडवर्ड दि सेकंड', 'दि मॅसेकर ॲट पॅरिस' (पॅरिस येथील कत्तल) आणि 'डिडो, क्वीन ऑफ कार्थेज' (कार्थेजची राणी डिडो). निर्यमक पद्यात नाटकें लिहिणारा तो पहिला इंग्रज नाटककार असून डॉक्टर फॉस्टस या नाटकांतील फॉस्टसचीं भाषणें व त्या नाटकांतले शेवटचे प्रवेश हे इंग्लिश नाट्यवाङ्मयांत सर्वोत्कृष्ट आहेत.

**मार्शल, सर जॉन** (१८७६- )—हिंदुस्थानांतील पुराणवस्तुसंशोधनखात्याचे माजी प्रमुख व एक विद्वान् संशोधक. यांचें शिक्षण केंब्रिज येथील डुलविच व क्वीन्स कॉलेजमध्यें झालें. यानंतर यांनीं ग्रीसमध्यें पुराणवस्तुसंशोधनाच्या कार्यास सुरुवात केली. त्या वेळचे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांच्या शिफारसीवरून यांना हिंदुस्थानांतील पुराणवस्तुसंशोधनखात्याच्या प्रमुखाच्या जागेवर काम करण्यासाठीं पाचारण करण्यांत आलें. यांनीं सन १९०२-३१ या कालांत हिंदुस्थानांतील या संशोधनखात्याची यशस्वी कामगिरी करून दाखविली. यांच्या कारकीर्दींतच १९०६ सालीं हें खातें मध्यवर्ती सरकारला जोडून घेण्यांत आलें. यांनीं 'कॉन्झर्व्हेशन मॅन्युअल' प्रसिद्ध करून त्याप्रमाणें जुन्या इमारतींची व्यवस्था ठेवण्याची प्रथा पाडली. यांनीं चारसदा (जुनी पुष्कलावती), राजगृह, सारनाथ, तक्षशिला, इत्यादि प्राचीन बौद्ध क्षेत्रस्थानांच्या जागीं उत्खनन करून त्या काळचे बरेचसे अवशेष बाहेर काढले. विदिशा येथील सुप्रसिद्ध ग्रीक हेलिओडोरस याच्या गरुडस्तंभाचा शोध लावणारे हेच होत. हिंदुस्थानचें प्राचीन वैभव व संस्कृति यांवर प्रकाश टाकणाऱ्या सिंधमधील मोहन-जो-दारो येथील उत्खननाचें श्रेय यांनाच आहे. यांच्याच प्रोत्साहनामुळें भोपाळ, काश्मीर, म्हैसूर, हैद्राबाद यांसारख्या संस्थानांतून पुराणवस्तुसंशोधनखात्याची स्थापना करण्यांत आली. (१) मोहेंजो-दारो व सिंध संस्कृति, (२) प्राचीन हिंदुस्थानचीं स्मारकें, (३) तक्षिलाचें उत्खनन, (४) सांचीं स्मारकें, वगैरे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**मार्शल बेटें**—हा द्वीपसमूह पॅसिफिक महासागरांतील मायक्रोनेशियामध्यें आहे व या द्वीपसमूहाचे दोन प्रमुख गट आहेत. रॅटॅक गट (१३ बेटें) हा पूर्व बाजूस असून पश्चिम बाजूस रॅलीक (११ बेटें) हा गट आहे. या सर्वांचें मिळून क्षे. फ. १५० चौ. मैल आहे. येथें नारळाच्या झाडांची लागवड असून येथून खोबरें व फॉस्फेटयुक्त द्रव्यें परदेशीं जातात. मार्शल द्वीपसमूह १८८५ पासून जर्मनीच्या मालकीचा होता. पण १९१४ सालीं ऑस्ट्रेलियन सैन्यानें हीं बेटें आपल्या ताब्यांत घेतलीं. पुढें राष्ट्रसंघाच्या हुकमानें जपान या बेटावर राज्य करूं लागलें. ज्यालूट हें मुख्य बेट असून या द्वीपसमूहाची राजधानी आहे. या द्वीपसमूहाच्या लो. सं. त ९९५८ तद्देशीय, ४८१ जपानी, आणि ७ युरोपियन इसम आहेत. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं हीं बेटें १९४४ च्या फेब्रुवारींत अमेरिकेनें जिंकून घेतलीं.

**मार्स**—ही रोमन लोकांची युद्धदेवता असून तिचे ग्रीक लोकांच्या आरेस या युद्धदेवतेशीं साम्य आहे. रोम शहर स्थापणारे रोम्यूलस व रीमस हे ह्या पितृदेवतेचे मुलगे होते, असें रोमन लोक मानतात. या देवतेचीं मुख्य पूजा-मंदिरें थ्रेस व सिथिया या प्रांतांत होतीं.

**मार्सैये**—फ्रान्स, दक्षिण भागांतील दुसरें मोठें शहर व भूमध्यसमुद्रावरील मुख्य बंदर. लो. सं. (१९३६) ९,१४,२३२. येथें एक प्राणिसंग्रहालय व पदार्थसंग्रहालय आहे. येथील कांहीं मंदिरें फ्रान्स देशांत सर्वोत्कृष्ट गणलेलीं आहेत. येथें पहिल्या प्रतीच्या न्याय-कचेऱ्या व व्यापारी न्याय-कचेऱ्या, वणिक्सभा, दलालमंडळ व फ्रान्सच्या पेढीची शाखा ह्या मोठ्या संस्था आहेत. येथील विद्याखात्यांतील शास्त्रशाखा, औषधी व वैद्यक-शाळा व कायदेशाखा मिळून एक्स-मार्सैयेच्या विश्वविद्यालयाचा एक भाग होतो. याशिवाय गायन-शाळा, वगैरे इतर शाळाहि आहेत. येथें साबण तयार करण्याचे ७९ वर कारखाने असून त्यांस लागणाऱ्या तेलाचे कारखानेहि आहेत. येथें मेणबत्त्याहि तयार करतात व लोखंड गाळण्याची भट्टी, बाष्पयंत्रें व आगबोटी बांधण्याचे कारखाने असून आगपेट्यासारखे लहान लहान धंदेहि चालतात. फोनीशिअन वसाहतवाल्यांनीं ख्रि. पू. ६०० मध्यें हें शहर स्थापलें व अनेक स्थित्यंतरांनंतर १४८१ मध्यें हें फ्रान्सला जोडलें गेलें.

**मालकंस**—हा राग भैरवी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहांत ऋषभ व पंचम हे स्वर वर्ज्य आहेत म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गायनसमय रात्रीचा तिसरा प्रहर आहे. हा आलापाई राग असून फार मधुर आहे.

**मालकाईट**—तांब्याचा कर्बित (कार्बोनेट) आणि उज्जप्राणिद (हायड्रॉक्साइड). हा हिरव्या रंगाचा असतो. तसेंच हा तंतुमय, स्तरित व जड घडणीचा असतो. सायबेरियांतून येणारा मालकाईट सर्वांत चांगल्या प्रतीचा असतो. ॲझुराइट (नीलकर्बिता)लाच निळा मालकाईट असें बहुधा म्हणतात.

**मालकांगोणी**—या झाडाच्या वेली असतात व पावसाळ्यांत वेलींवर बारीक फळांचे मोठमोठे घोंस येतात. फळें पिकून पिंवळीं होतात व तीं उकलून फुटलीं म्हणजे आंत लाल भडक रंग दिसतो. फळांतील बियांचें तेल काढतात. तें बुद्धिवर्धक आहे. खरजेवर लावतात. उदररोगावरहि देतात. सर्पाच्या विषावर मूळ उगाळून लावतात.

**मालती**—एक फुलवेल. पानें लांबट असतात. फुलें पांढरीं व बारीक असतात. भर उन्हाळ्यांत असून वास फार सुटतो

**मालदिव बेटें**—हा १२ प्रवाल बेटांचा द्वीपसमूह हिंदी महासागरांत सिलोनच्या पश्चिमेस ४०० मैलांवर आहे. या बेटांवर एका सुलतानाचा अमल असून, तो सिलोनला खंडणी देतो. येथें नारळ, मका व फळफळावळ होतात, व मासे पुष्कळ सांपडतात. येथें इस्लामी धर्माला मान्यता आहे. लो. सं. ९३,००० आहे. लोक चांगले दर्यावर्दी व व्यापारी आहेत.

१९३२ सालीं राज्यकारभार लोकमतानुवर्ती करण्यासाठीं नवीन घटना करण्यांत आली. चार मंत्र्यांचें एक कार्यकारी मंडळ व ३३ सभासदांची एक लोकसभा आहे. या सभासदातून प्रधान मंत्री सुलतान निवडतो.

**मालपट्टी**—(इन्व्हॉइस). गिऱ्हाइकाकडे जेव्हां माल पाठविला जातो तेव्हां त्याबरोबर मालाचें वर्णन, माप, किंमत व इतर तपशील नोंदलेला कागद पाठविण्यांत येत असतो त्याला 'पट्टी' म्हणतात. या पट्टीच्या द्वारें दुकानदार गिऱ्हाइकाला मालाच्या विक्रीच्या अटी लिहून धाडतो असें समजण्यास हरकत नाहीं. गिऱ्हाइकानें माल व पट्टी हीं ठेवून घेतलीं म्हणजे त्याला त्या अटी मान्य आहेत असें झालें.

**मालवण**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. २३८ चौरस मैल. यांत खेडीं ५८ आहेत. लो. सं. सव्वा लाख आहे. देवगड, आचरें व मालवण हीं बंदरें तालुक्यांत आहेत. मालवण हें तालुक्याचें मुख्य गांव असून तें समुद्रकिनाऱ्यावर आहे. त्याजवळ पद्मगड नांवाचें एक बेट असून



त्यावर शिवाजीनें सिंधुदुर्ग नावाचा किल्ला बांधला. येथें शिवाजीची एक प्रतिमा आहे, तिची लोक पूजा करतात. १६६५ च्या फेब्रुवारी महिन्यांत शिवाजी बार्सेलोरच्या मोहिमेवर येथून गेल्याची इंग्लिश रेकॉर्डमध्यें नोंद आहे. मालवण हें चांचेगिरीचें आगर होतें. १८१२ सालीं कोल्हापूरकरांकडून मालवण इंग्रजांस मिळालें. त्या वेळीं चांचेपणास कायमचा आळा पडला. येथें चाकू, कात्र्या, वस्तरे, कुलुपें, टांक, वगैरे जिन्नस तयार होतात. म्युनिसिपालिटी, सरकारी दवाखाना, हायस्कुलें, छापखाने व पिठाच्या गिरण्या आहेत.

**मालवणचा किल्ला-सिंधुदुर्ग**—मालवणच्या किनाऱ्यापासून एक मैलावर एका बेटावर हा किल्ला बांधलेला असून याचा घेर दोन मैल आहे. तटाची उंची सुमारें तीस फूट आहे व रुंदी बारा फूट आहे. ४२ बुरूज आहेत. दरवाजा ईशान्य कोपऱ्यास आहे. क्षेत्रफळ ४८ एकर आहे. जुन्या इमारतींपैकीं आतां फक्त कांहीं देवालयें आहेत. शिवाजीनें बांधलेल्या जंजिऱ्यांत हा प्रमुख आहे. यांत एक शिवाजीचें देवालय आहे. त्यास कोल्हापूरकर यांची १,५२२ रुपयांची नेमणूक आहे. हा १६६५ सालीं बांधण्यांत आला. आंतल्या बाजूस पद्मगड नांवाचा दुसरा एक किल्ला असून खाडीच्या मुखाशींहि राजकोट व सर्जेकोट असे दोन किल्ले बांधलेले आहेत. १७१३ मध्यें हा किल्ला कोल्हापूरकरांकडे आला. १७६५ त तो इंग्रजांनीं घेऊन त्याचें नांव फोर्ट ऑगस्टस असें ठेवलें, परंतु तो पुढें कोल्हापूरकरांस परत दिला. १८१२ मध्यें कर्नल लायोनेल स्मिथ यानें हा किल्ला घेऊन चांच्यांचा उपद्रव नाहींसा केला.

**मालवी**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांचा असल्यामुळें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय सायंकाळ उचित आहे. याच्या आरोहांत निषाद दुर्बल व अवरोहांत धैवत दुर्बल आहे. हा राग विलंबित लयींत गायिल्यानें चित्ताकर्षक होतो. याचें मंडन श्रीरागाच्या अंगानें होत असतें.

**मालवीय, पं. मदन मोहन** (१८६१–१९४७)—एक थोर हिंदी पुढारी व राष्ट्रीय कार्यकर्ते. यांचें शिक्षण अलाहाबाद येथील सेंट्रल कॉलेजमध्यें झालें. १८८३ मध्यें हे पदवीधर झाले व १८८७ पर्यंत यांनीं सरकारी हायस्कुलांत शिक्षकाचें काम केलें. नंतर हे 'हिंदुस्थान' व 'इंडियन युनियन' या पत्रांचे संपादक झाले. याच वेळीं अभ्यास करून ते १८९१ मध्यें एलूएल्. बी. झाले. १८९३ मध्यें यांनीं अलाहाबाद हायकोर्टांत वकिली करण्यास सुरुवात केली. १९०२ ते १९१२ मध्यें ते संयुक्तप्रांत कायदेमंडळाचे सभासद होते. १९०८ मध्यें संयुक्तप्रांत राजकीय परिषदेचे अध्यक्ष होते. राष्ट्रीय सभेचे ते

१९०९, १९१८, १९३२, व १९३३ सालांमध्यें याप्रमाणें चार वेळां अध्यक्ष होते.

अखिल भारतीय हिंदु महासभेचे ते तीन वेळां अध्यक्ष होते. सनातन धर्ममहासभेचेहि ते एकदां अध्यक्ष होते. अलाहाबाद येथील सेवासमितीचे ते अध्यक्ष व त्या समितीच्या स्काउट संघाचे चीफ स्काउट होते. १९१० ते १९१९ पर्यंत ते मध्यवर्ती कायदेमंडळाचे सभासद होते व १९१९ मध्यें रौलट कायदा मंजूर *झाला म्हणून निषेधार्थ त्यांनीं राजीनामा दिला.* १९१६ ते १९१८ मध्यें ते इंडस्ट्रिअल कमिशनचे सभासद होते व त्यांनीं अल्पमतवाल्यांचा प्रसिद्ध अहवाल लिहिला. १९१९ मध्यें त्यांनीं बनारस हिंदु युनिव्हर्सिटी स्थापन केली व तिचे ते शेवटपर्यंत व्हाइस चान्सेलर होते. यांनीं अलाहाबाद येथें 'अभ्युदय' या नांवाचें एक पत्र काढलें. तसेंच बनारस येथें 'सनातन धर्म' नांवाचेंहि पत्र सुरू केलें. १९२४ ते १९३० मध्यें ते मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. तेथून त्यांनीं इंपीरिअल प्रेफरन्सच्या धोरणाविरुद्ध निषेध म्हणून राजीनामा दिला. सत्याग्रह चळवळींत यांस दोनदां तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३१ मध्यें हे दुसऱ्या गोलमेज परिषदेला उपस्थित होते. जातीय निवाड्याच्या प्रश्नाबाबत मतभेद झाल्यामुळें त्यांनीं पार्लमेंटरी बोर्डाच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला. १९३४ मध्यें यांनीं एका नव्या राष्ट्रीय पक्षाची स्थापना केली. दिल्ली येथील 'हिंदुस्थान टाइम्स' या पत्राच्या चालक मंडळाचे ते अध्यक्ष होते. यांचें आचरण अत्यंत धार्मिक व सात्त्विक असे. यांची हिंदी भाषा फार गोड असे.

**मालश्री**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य असल्यानें याची जाति औडुव–औडुव आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाच्या चौथ्या प्रहराचा प्रारंभ सर्वसंमत आहे. या रागांत निषाद व मध्यम हे स्वर दुर्बल होत असल्यानें षड्ज, गांधार आणि पंचम या तीन स्वरांनींच हा गायिला जातो, असा कांहीं लोकांचा समज आहे. परंतु पांच स्वरांपेक्षां कमी स्वरांनीं रागास अस्तित्व येत नाहीं, या शास्त्रमताच्या विरुद्ध वरील समज आहे म्हणून तो माह्य नाहीं.

**मालिगौरा**—हा राग मारवा थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागतात म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी धैवत आहे. हा राग सायंगेय आहे. मंद्र व मध्य सप्तकांत याचें गायन विशेष रक्तिदायक असतें. पूरिया व श्री या रागांचीं अंगें या रागांत दृष्टीस पडतात.

**मालिनीवसंत**—एक आयुर्वेदीय औषध. सुवर्ण, मोतीं, प्रवाल, रुपें, कलखापरी, हिंगुळ, गंधक, पारा, नीळभस्म, तारमाक्षिक, स्वर्णमाक्षिक, वंग, विष, नाग, वैक्रांत, लोह, हीं द्रव्यें समभाग घेऊन खलामध्यें खलून गुलाबपाणी, कांटेसावरीचा रस, उंसाचा रस, दूध, नागरमोथ्याचा काढा यांच्या सात सात भावना द्याव्या. नंतर कापराची भावना देऊन गोळ्या बांधाव्या. अनुपानपरत्वें या रसाचें सेवन केलें असतां *पित्तमेह, उग्रताप, बहुमूत्रता, मुतखडा, वांति, तृषा, मूत्रघात*-रोग आणि सर्व प्रकारचे प्रमेह रोग दूर होतात.

**मालीश**—चंपी. मालीश करण्याचे म्हणजे अंग चोळण्या–रगडण्याचे अनेक प्रकार आहेत. कांहीं जखमा बऱ्या करण्याकरितां अथवा मज्जातंतूंस इजा झाली असतां किंवा हिमदग्धव्रण पडले असतां ज्या अवयवास ही इजा झाली असेल त्या अवयवास बोटांच्या टोकांनीं हळूहळू दाबून इजा झालेल्या भागापासून शरीराच्या मुख्य भागाच्या दिशेनें मालीश करण्यांत येतें. एखाद्या ठिकाणीं रुधिराभिसरण जलद व्हावयास पाहिजे असेल किंवा एखाद्या ठिकाणच्या पेशीस चेतना द्यावयाची असेल तर तेल लावून चोळण्यांत येतें. शरीरांतील कांहीं पेशींस, चामडीस किंवा स्नायूंस उत्तेजन द्यावयाचें असेल तर तो भाग दोन्ही हातांच्या तळव्यांत धरून वाटोळा मळण्यांत येतो. याखेरीज थकवा घालवावयाचा असल्यास किंवा एखादा भाग ताठला असल्यास, तसेंच संधिवातामध्यें किंवा पक्षघाताच्या कांहीं प्रकारांमध्यें बोटांचीं टोकें विशिष्ट भागीं दाबून किंवा हाताचे तळवे अथवा मुठी यांनीं बुकलून मालीश करण्यांत येतें.

ही रोगनिवारणपद्धति पौरस्त्य असून चिनी लोकांत पूर्वीपासूनच आहे. ही इंग्लंडांत *१८ व्या शतकांत माहीत झाली*, पण पुढील शतकांत स्वीडनमध्यें या शास्त्रांत फार प्रगति झालेली दिसते. या शास्त्राचें शिक्षण देण्याच्या संस्था लंडनमध्यें राजमान्य असून शिक्षण पुरें झाल्यावर प्रशस्तिपत्रें दिलीं जातात. आपल्याकडे मात्र हा धंदा सुशिक्षितांनीं अद्यापि घेतलेला नाहीं. व्यायामाच्या प्रकारांत याचा समावेश केला आहे.

**मालेगांव**—मुंबई इलाखा, नाशिक जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ७७७ चौरस मैल व लो. सं. १,५९,९३५. हा तालुका सपाट असून यांत झाडी नाहीं. हवापाणी निरोगी आहे. मुख्य

नदी गिरणा. मालेगांव हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. गांवाची लोकसंख्या सुमारें ४० हजार असून येथें ३,००० वर हातमाग चालतात. येथें म्युनिसिपालिटी, हायस्कूल, वाचनालय हीं जुनींच आहेत. एक जुना किल्ला आहे.

**मालेगांवकर (जाधव)**—जाधव पाहा. हें मालेगांव बारामतीजवळ आहे.

**मालेरकोटला संस्थान**—पंजाब. जालंदर विभागकमिशनच्या देखरेखीखालीं हें संस्थान आहे. क्षे. फ. १६७ चौ. मैल. लो. सं. ८८,१०९. मालेरकोटल्याचे नबाब अफगाण जातीचे कुर्द वंशाचे आहेत. त्यांच्या पूर्वजांनीं अफगाणिस्तानांतून १४४२ सालीं मालेरला येऊन लोदी व मोंगल बादशहांचीं मोठ्या विश्वासाचीं कामें केलीं. येथील नबाबानें १८०५ सालीं इंग्रजांस होळकरांशीं लढतांना मदत केली, म्हणून १८०५ सालापासून त्यांनीं या संस्थानास आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. संस्थानांत कापूस, अफू, तंबाखू, लसूण व बडीशेप हीं पिकें होतात. संस्थानाचें उत्पन्न सुमारें १६ लाख आहे. संस्थानिकास ११ तोफांची सलामी मिळते. मालेरकोटला हें या संस्थानांतील मुख्य गांव असून लो. सं. २१,१२२ आहे. हें गांव मालेर व कोटला हीं दोन गांवें मिळून झालें आहे.

सध्यांचे नबाब सर अहमद अलीखान हे १९०८ सालीं गादीवर आले. पहिल्या महायुद्धांत हे ले. कर्नल झाले. हें संस्थान आतां पतियाळा-पूर्व पंजाब संघांत सामील झालें आहे.

**मालोजी घोरपडे**—१. आदिलशहास मिळालेला मुधोळ संस्थानांतील बाजीचा पुत्र. शिवाजीनें हैद्राबादेहून यास आपण आरंभिलेल्या राष्ट्रकार्यांत आपणांस मदत करण्यासाठीं येण्यास पत्रद्वारें लिहिलें (१६७७). परंतु यानें शिवाजीस मुळींच दाद दिली नाहीं. उलट नंतर हा औरंगजेबाचा नोकर बनला. याच्या पश्चात् याचा नातू पिराजी हा याच्या गादीवर आला.

२. हा पिराजीचा मुलगा (१७१६-१८०५). सबंध पेशवाई पाहिलेला व फार शूर असा होता. बारभाईच्या अमदानींतील इंग्रजांशीं झालेल्या युद्धांत यानें फार पराक्रम गाजवला (१७७९). याच्या फौजेच्या गोटासाठीं पुण्यास स्वतंत्र जागा दिली होती. ती घोरपडे पेठ होय (१७८२). पोल (संस्थान), रजपूत (काठेवाड), दक्षिणेंतील पवार व सोळंकी अशा चार निरनिराळ्या ठिकाणच्या चार बायका यानें केल्या होत्या.

**मालोजी भोसले (१५५०-१६२०)**—शिवाजीचा आजा. जन्म वेरूळ येथें झाला. बाप बाबाजी हा निजामशाही सरदार होता व त्याला राजा असा किताब होता. मालोजीला लखुजी जाधवरावाच्या दिमतींत सरदारकी मिळाली (१५७७). त्याचें लग्न फलटणचा वणगोजी निंबाळकर याच्या बहिणीशीं झालें. हिचें नांव दीपाबाई. सासरचें नांव उमाबाई होतें. मालोजीनें निजामशाहीच्या संरक्षणार्थ बराच पराक्रम गाजविला व त्यामुळें त्याला बरीच जहागिरीहि मिळाली होती. पुणें, चाकण, सुपें, इंदापूर हे परगणे त्याच्याकडे होते. शिवनेरी किल्लाहि त्याला राहावयास दिला होता. तेव्हां तो लखुजी जाधवाच्या तोलाचा सरंजामदार बनला व त्याच्या मुलाला लखुजीनें आपली मुलगी जिजा दिली. मालोजीनें बरींच परोपकाराचीं व धर्मादाय कृत्यें केलीं. शिंगणापूरचा तलाव, वेरूळच्या घृष्णेश्वराच्या देवळाचा जीर्णोद्धार या गोष्टी त्यांपैकींच होत.

**माल्टा**—भूमध्यसमुद्रांतलें एक बेट. हें सिसिलीच्या दक्षिणेस ५८ मैलांवर आहे. लांबी १७ मैल. क्षेत्रफळ सुमारें ९५ चौरस मैल. लो. सं. २,६८,६६८. ब्रिटिशांच्या आरमारी तळाचें हें महत्त्वाचें ठिकाण आहे. अंतर्भाग डोंगराळ आहे, परंतु सुपीक खोऱ्यांतून विविध प्रकारची फळफळावळ होते. जरकिनार, कापड, नक्षीकाम, सिगारेट, वगैरेंचे कारखाने आहेत. लष्करी दृष्ट्या हें महत्त्वाचें ठिकाण असल्यानें ग्रीक, फोनिशिअन, रोमन, वगैरे अनेक लोकांच्या अमलाखालीं तें वेळोवेळीं होतें. १८१४ पासून तें ब्रिटनकडे आलें. यावर एक गव्हर्नर असतो. दुसऱ्या महायुद्धांत जर्मनांच्या हल्ल्यांना माल्टानें दाद दिली नाहीं. १९४५ त माल्टाला जबाबदारीची राज्यघटना देण्यांत आली.

येथील हवा समशीतोष्ण व निरोगी असते. मुख्य शहर व्हॅलेरा आहे. लोक संकरज असून भाषाहि फार मिश्र स्वरूपाची आहे. या माल्टी भाषेंत अरबी आणि इटालियन शब्द फार आहेत. सरकारी भाषा इंग्रजी, शाळांतून माल्टी, तर कोर्टांतून इटालियन चाले. आतां इटालियनऐवजीं कोर्टाची भाषा माल्टी ठरविण्यांत आली. व्हॅलेटा येथें विद्यापीठ आहे.

**माल्डा**—पश्चिम बंगाल, राजशाही भागांतील एक जिल्हा. याचें क्षे. फ. २,००४ चौरस मैल आहे. महानंदा ही नदी यांतून वाहते. ह्या जिल्ह्यांत गौर व पडुआ या दोन प्राचीन राजधान्या आहेत. यास प्राचीन काळीं पौंड्र देश असें म्हणत असत. १६७६ सालीं ईस्ट इंडिया कंपनीची वखार माल्डा येथें स्थापन झाली. जिल्ह्याची लो. सं. (१९४१) १२,३२,६१८. यांत खेडीं ३,५५५ व मोठीं गांवें ३ आहेत. इंग्लिश बाजार हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होय. येथें हिंदू व मुसलमान यांचें प्रमाण अनुक्रमें शें. ५० व ४८ आहे. शें. ७४ लोक बंगाली भाषा बोलतात. शें. ५७ लोक शेतीवर उपजीविका करतात. मुख्य धंदा रेशमाचा चालतो. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा मागासलेला आहे.

**माल्थस, थॉमस रॉबर्ट (१७६६-१८३४)**— एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ. हा एका जमीनदाराचा मुलगा होता. प्राथमिक

शिक्षण घरींच झाल्यानंतर तो केंब्रिज विश्वविद्यालयांत दाखल झाला. गणित विषयांत त्यानें रँग्लरची पदवी संपादन केली. नंतर त्याला जीझस कॉलेजमध्यें शिष्यवृत्ति मिळाली. १७९८ सालीं त्याचा 'एसे ऑन पॉप्युलेशन' (लोकसंख्येवर निबंध) हा ग्रंथ बाहेर पडला. लोकसंख्या ही भूमितिश्रेढीनें वाढत असून, निर्वाहाचीं साधनें मात्र अंकगणितश्रेढीनें वाढत आहेत; तेव्हां वाढत्या लोकसंख्येला पुढें पोटापाण्याचीं साधनें भरपूर मिळणार नाहींत, असें त्यानें या ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे. माल्थस हा पुष्कळ वर्षें हेलींबेरी येथें राजनीतिशास्त्राचा प्राध्यापक होता. त्याचें खाजगी वर्तन अत्यंत चोख होतें.

**मावजी, पुरुषोत्तम विश्राम** (१८७८–१९२९)—इतिहास, राजकारण, साहित्य, कला, पुराणवस्तू, शिल्प, इत्यादि विषयांचे अभ्यासक व कलाविषयक वस्तूंचे संग्राहक. काठेवाडांतील वरवाला गांवीं यांचा जन्म झाला. हे एक सधन भाटिया असून व्यापार हा यांचा पेशा. द्वारका सिमेंट फॅक्टरीचे हेच संस्थापक होत.

महाराष्ट्राच्या इतिहासाबद्दल यांना विशेष औत्सुक्य असे. त्या दृष्टीनें यांना निरनिराळे दुर्मिळ असे ऐतिहासिक लेख, चित्रें, कलावस्तू यांसारख्या वस्तूंचा संग्रह करण्याचा नाद होता. यांच्या संग्रहांतील वस्तू पाहण्यासाठीं एतद्देशीय तसेंच परदेशीय लोकहि येत असत. यांच्या संग्रहाचा एक महत्त्वाचा भाग मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियममध्यें ठेवला असून दुसरा यांच्या मुलांजवळ आहे. चित्रकलेचा प्रसार करण्याच्या हेतूनें यांनीं मुंबई येथें 'लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग प्रेस' काढला. 'सुवर्णमाला' या नांवाचें चित्रांचें नियतकालिक सुरू करणारे हेच होत. तसेंच सचित्र पुस्तकें काढण्याची प्रथा यांनींच पाडली. रॉयल एशियाटिक सोसायटीचे हे एक प्रमुख सभासद असून अहमदाबादच्या सहाव्या गुजराथी साहित्य संमेलनाच्या वेळीं कलाप्रदर्शनाच्या अध्यक्षपदाचा मान यांनाच देण्यांत आला होता. बडोदें सरकारनें यांची कलाप्रियता जाणून यांना 'राजरत्न' ही पदवी दिली होती. (१) मानवधर्ममाला, (२) रजपुतानामां देशी राज्यो, (३) रणवीरसिंह, (४) प्रबोध भारत, (५) चार संन्यासी, (६) व्हॉट लिटरेचर डझ् वॉन्ट्, वगैरे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**मावळ**—१. घाटमाथा व सह्याद्रि यांच्यामधील घाटमाथ्याचा पश्चिमेकडील (मावळत्या दिशेकडील) जो खोऱ्यासारखा प्रदेश तो मावळ. हें नांव बरेंच जुनें आहे. जुन्नर व पुणें या प्रांतांत २४ मावळें आहेत (बारा मावळें पाहा).

२. मुंबई, पुणें जिल्ह्याचा एक तालुका. क्षे. फ. ३८५ चौरस मैल असून लो. सं. सुमारें ६५ हजार. यांत लोणावळें व तळेगांव दाभाडे हीं दोन गांवें व १६२ खेडीं आहेत. यांत जंगल साधारण बरें असून यांतून *इंद्रायणी व आंध्रा ह्या दोन नद्या* वाहतात. यांत मुख्य उत्पन्न भाताचें आहे. वडगांव हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. पाटबंधारे बांधून भाताचें पीक जास्त वाढविण्याचे सरकारी प्रयत्न चालले आहेत.

**मावळणकर, गणेश वासुदेव** (१८८८– )—भारत संसदेचे अध्यक्ष व गुजराथेंतील एक कार्यकर्ते. यांचें घराणें मूळचें कोंकणचें. वाडवडील अहमदाबादेस राहिले तेव्हां यांचें शिक्षण अहमदाबादमध्यें झालें. यांनीं तेथें १९१३ मध्यें वकिली सुरू केली. १९१६ मध्यें हे गुजराथ सभेचे चिटणीस झाले. १९१९ मध्यें ते अहमदाबाद म्युनिसिपालिटींत निवडून आले व तिचे ते अनेक वर्षें अध्यक्ष होते. अनेक सार्वजनिक चळवळींत यांनीं पुढाकार घेतला होता. हे एक काँग्रेसचे प्रसिद्ध पुढारी आहेत. यांस अनेक वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली आहे व कांहीं काळ यांस रत्नागिरी येथें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें. काँग्रेस मंत्रिमंडळ असतांना हे मुंबई प्रांतिक असेंब्लीचे अध्यक्ष होते, नंतर मध्यवर्ती मंडळाचे झाले (१९४७). गुजराथ विद्यापीठ समितीचे ते अध्यक्ष होते. यांनीं दोन वेळां युरोपांत प्रवास केला आहे व त्याचें वृत्त देणारी दैनंदिनी प्रसिद्ध केली आहे. यांची जन्मभूमि व कर्मभूमि गुजराथ असली तरी महाराष्ट्रियत्वाचा यांना मोठा अभिमान आहे. बृहन्महाराष्ट्र परिषदेचे ते एकदां अध्यक्षहि होते. दिल्लीस महाराष्ट्र समाजाला यांचा मोठा आधार आहे. यांची राहणी अत्यंत साधी व सात्त्विक असून वर्तन फार चोख असतें. यामुळें यांच्याविषयीं सर्व पक्षांना फार आदर वाटतो.

**मावा, मेकाडा**—हे एक प्रकारचे ढेंकूण अगदीं लहान आकाराचे असून नेहमीं संघ करून पानाच्या विशेषतः कोबीच्या किंवा भोपळा-कलिंगडाच्या खालच्या बाजूस असतात. ह्यांमध्यें दोन प्रकार असतात : पंखाचे व बिनपंखाचे. आकाश ढगांनीं भरलेलें असून कुंद हवा असली म्हणजे या माव्याच्या किड्यांच्या वाढीस फार जोर येतो. या किड्यांच्या पाठीमागच्या बाजूस दोन नळ्या असतात. त्यांतून गोड रस बाहेर येत असतो. तो गोड रस खाण्यास मुंग्या येतात. त्यामुळें माव्याजवळ नेहमीं मुंग्या दृष्टीस पडतात.

**माशामारी**—[ वर्ग-ड्रोसेरासी. ड्रोसेरा. इं. सन्‌-ड्यू ]. ही वनस्पति दलदलीच्या जागीं होते. हिच्या पानांवर तांबडसर केंस असतात. व त्यांवर ग्रंथी असतात. त्यांतून एक चिकट द्रव बाहेर येत असतो, तो द्रवाच्या बिंदूसारखा दिसतो म्हणून यास इंग्रजींत 'सन्‌ड्यू' म्हणतात.

याचें पान जवळजवळ वर्तुळाकृति असून त्याच्या एका बाजूवर मध्यबिंदूपासून परिधापर्यंत व परिधामोंवतीं देखील लालसर रंगाचे बारीक तंतू असून त्या प्रत्येकाच्या शेवटास एक गांठ असते. या ठिकाणीं स्वच्छ व चिकट पाण्याचे मोत्यें लावल्याप्रमाणें थेंब निघत असून ते दंवाच्या बिंदूसारखे चकाकत असतात. बटरवर्टच्या पानावरील गांठी जें किडे पकडण्याचें काम करतात तेंच काम या सन्‌ड्यूच्या तंतूंवरील गांठी करतात. सन्‌ड्यूच्या पानाकडे पाहिलें असतां एखाद्या गोल गादीला चौफेर कमजास्त लांबीच्या टांचण्या टोंचल्या आहेत असा भास होतो. मध्यमागीं असलेले तंतू सर्वांत आंखूड असून कडेचे सर्वांत लांब असतात. एका पानाला सरासरी दोनशें तंतू असतात. पाण्याच्या अथवा पावसाच्या धक्क्यानें तंतूंमध्यें चेतना उत्पन्न होत नाहीं. पानावर वाऱ्यानें रेतीचे कण उडाले असतां किंवा कांच, कोळसा, गोंद, वगैरे नायट्रोजनरहित पदार्थांचे बारीक तुकडे फेंकले असतां स्पर्श झालेल्या जागेंतून चिकट पाणी व अम्लरस निघूं लागतो. पण जाठररस मुळींच निघत नसून उभे असलेल्या तंतूंची स्थिति किंवा पानाच्या कांठाचा आकार बिलकुल बदलत नाहीं. परंतु गांठींतून निघणारे चिकट पाण्याचे थेंब हा मध आहे असें वाटून जर एखादा किडा पानांवर येऊन बसला अथवा मांसाचा एखादा लहानसा तुकडा पानावर टाकला तर तळहातावर ज्याप्रमाणें बोटें टेकवावीं त्याप्रमाणें ते तंतू त्या पदार्थावर वळले जाऊन त्याला दाबून धरतात. मग अम्लरस व जाठररस हे वाहूं लागतात. एखादी माशी सन्‌ड्यूच्या पानापासून सुटण्यासाठीं धडपड करूं लागली असतां गांठींतून जास्त चिकट पाणी निघून ती माशी जास्त अडकून पडते. नंतर या पाण्याचा पूर लोटल्यासारखा होऊन त्या माशीच्या श्वासनलिका बंद होतात आणि याप्रमाणें दम कोंडल्यामुळें ती प्राणास मुकते. ज्या तंतूला किड्याचा स्पर्श होतो तो तंतु प्रथम त्या किड्यावर पडतो; मग त्याच्या आजूबाजूचे तंतू एकामागून एक पडले जाऊन जवळजवळ तीन तासांच्या आंत सर्व तंतू पानाच्या तबकडीवर पडून हाताची मूठ झांकल्याप्रमाणें होऊन तो किडा आंत पकडला जातो. किड्यांचें फक्त मांस व रक्त पानांत शोषलें जाऊन त्याचा सांगाडा, पंख, डोळे, वगैरे टणक अवयव मागें शिल्लक राहतात, आणि जेव्हां तंतू पूर्ववत् उभे राहातात, तेव्हां त्यांशीं हे अवयव लटकलेले असतात. नंतर वाऱ्याच्या झुळकीबरोबर ते दूर फेंकले जाऊन तंतू मोकळे होतात व गांठींवाटे पहिल्याप्रमाणें चिकट पाण्याचे थेंब येऊन दुसरी शिकार धरण्यास पान पुनः तयार होतें. व्हीनस फ्लायट्रॅप या नांवाचें सन्‌ड्यूच्या वर्गापैकीं एक मांसाहारी झाड उत्तर अमेरिकेच्या पूर्वेकडील दलदलीच्या प्रदेशांत आढळतें.

**माशी**—पंख असलेले या नांवाचे अनेक जातींचे कीटक आहेत. यांचे पंख पारदर्शक असून त्यांवर आच्छादन नसतें. हाच टोळ, फुलपांखरें, वगैरेमध्यें व यांच्यामध्यें फरक आहे. घरांत आढळणाऱ्या माशा सर्वांच्या परिचयाच्या आहेत. माशीला दोन पंख असून बारीक केंसासारखे दोन तोलक असतात. या तोलकांमुळें ती आपली गति सांभाळते. पंखामध्यें शिरा असतात. माशीचे डोळे पैलूदार व डोकें वाटोळें असतें. या घाणीमध्यें आपलीं अंडीं घालतात. यांचे कीटक बनतात व आठ ते चौदा दिवसांत त्यांच्या माशा तयार होतात. कांहीं हंगामांत माशा फार होतात. त्या घाण पदार्थावर बसून आल्यानंतर अन्नावर बसल्यास अन्नांत रोगजंतू शिरतात व अन्न खाणाऱ्यांस रोग होतात. तेव्हां अन्नावर व जखमांवर माशा बसणार नाहींत याची फार काळजी घ्यावी लागते. अंधारांत माशांचा फार त्रास होत नाहीं. फॉर्मॅलिनच्या वासानें माशा मरतात. तेव्हां बशींत थोडें दूध ठेवून त्यांत या औषधाचे थेंब टाकावे. माशा चिकटून बसाव्यात म्हणून चिकट कागदहि असतात. गोमाशी, घोडमाशी, मधमाशी पाहा.

**मांसाहार**—वेदकालांत मांस खाणें अगदीं सामान्य गोष्ट असावी असें दिसतें; त्यांत कोठेंहि पुढील काळच्या 'अहिंसे'चा उल्लेख येत नाहीं. धार्मिक विधिप्रसंगीं, या मांसाची आहुति देव खावोत असें म्हणत. शिवाय ब्राह्मण तो पदार्थ स्वतः खात असत. आणि पाहुण्यांच्या पाहुणचाराप्रीत्यर्थ एक मोठा बैल ( महोक्ष ) किंवा बोकड ( महोज ) मारावा, असें स्पष्ट म्हटलेलें आहे. शिवाय अतिथिग्व याचा अर्थ अतिथिसत्कारार्थ गोहनन करणें हाच असावा. महर्षि याज्ञवल्क्य हा दुमत्या गायींचें किंवा बैलांचें ( धेन्वनडुह ) असल मांस खात असे. यज्ञांत अगस्त्यांनीं १०० बैल मारले म्हणून त्यांच्या नांवाचा गौरव केला आहे. लग्नप्रसंगीं खाण्याप्रीत्यर्थ म्हणून बैलांना मारीत असत. तथापि ऋग्वेदकालीं गायीला हळूहळू पावित्र्य येत चाललें होतें, असें बऱ्याच उताऱ्यांवरून दिसून येतें. कारण तिला अघ्न्या असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. परंतु एवढ्यावरून मांसभक्षण त्या काळीं मना होतें असें समजतां येत नाहीं. खाण्याव्यतिरिक्त गायीचे दुसरे पुष्कळ महत्त्वाचे उपयोग होते व त्यामुळें तिला पावित्र्य येणें अगदीं रास्त होतें. गायीच्या पावित्र्याचा उगम पाहूं गेलें असतां आपणांला तो

शोधण्यासाठीं इंडो-इराणियन व आर्यन् लोक (म्हणजे हिंदुस्थानांतील आर्य व इराणांतील आर्य हे जेव्हां एके ठिकाणीं राहत असत तेव्हांचे) यांच्या कालाकडे धांव घेतली पाहिजे. इतका तो जुना आहे. शिवाय प्रेतदहनप्रसंगीं तर गोमांस अवश्य लागत असे. कारण तेव्हां प्रेत मांसानें आच्छादण्याचा (अनुस्तरणी) प्रघात होता. वेदकालीन हिंदूंचें अन्न निदान यज्ञप्रसंगींच्या बलींच्या यादीवरून तरी काय असावें हें सहज ताडतां येतें. कारण जें मनुष्य खाई तें तो देवास अर्पण करी. ---म्हणजे अर्थात् बोकड, मेंढ्या, बैल यांचें मांस खाण्यांत येत असे. तथापि कधीं कधीं मांसाहाराचा निषेधहि आहे; उदाहरणार्थ, जेव्हां एखादा एखादें व्रत करीत असेल तर किंवा जेव्हां मांस त्याज्य मानलें असेल तर. कारण अथर्ववेदांत एका ठिकाणीं मांसाला सुरेच्या दावणींत बांधलें आहे व तेथें त्याला *मादक दारूप्रमाणें वाईट मानलें आहे. मधुपर्काच्या विधींत* प्रथम भोजनासाठीं गोदान करून नंतर अहिंसातत्त्वास अनुसरून गो-उत्सर्जन सांगितलें आहे. मोठा पाहुणा आल्यास त्याला बकरा भेट देण्याची वहिवाट असे. कोठें कोठें लग्नांत 'भेटबकरा' हा एक लौकिक प्रकारहि आहे.

आज जगांत मांसाहारी लोकांची संख्या बरीच आहे व हा आहार फार प्राचीन काळापासून म्हणजे मनुष्यप्राण्याच्या उत्पत्तीपासून चालत आलेला आहे. मांसामध्यें प्रोटीन, फॉस्फरस, चरबी, इ. पोषक द्रव्यांचें प्रमाण अधिक असल्यानें श्रमजीवी लोकांना तें खाणें आवश्यक वाटतें. मांस खाण्यानें अंगांत उष्णता व रग वाढते. पक्ष्यांमध्यें कोंबड्या, होले, कबूतरें, ससाणे; पशूंमध्यें गाय, बैल, डुकरें, हरणें, ससे; व पाण्यांतील कांहीं मासे हीं माणसाच्या खाण्यांत येतात. हिंदूंमध्यें गोमांस व मुसलमानांत डुकराचें मांस निषिद्ध मानलें आहे. कांहीं मांस लवकर पचतें व कांहीं फार जड असतें. मांस जास्त खाण्यानें रोग होतात. मांसाचे डबे दूरदूरच्या देशांत पाठविण्याचा विशेषतः अमेरिकेंत फार मोठा धंदा आहे. ऑस्ट्रेलियन लोक फार मांस खातात. प्रत्येक माणूस दरसाल सुमारें २४० पौंड मांस खातो. ग्रेट ब्रिटनमध्यें सुमारें १०० पौंड व त्याखालोखाल इतर युरोपियन राष्ट्रांत खपतें. हिंदुस्थानांत ब्राह्मणांना धर्मानें मांस निषिद्ध आहे; पण गौड ब्राह्मणांना मासे चालतात. इतर जातींना मांसाहार निषिद्ध नाहीं.

**मांसाहारी प्राणी**—(कार्निव्होरा). सस्तन वर्गांतील जे प्राणी दुसऱ्या प्राण्यांस खाऊन उपजीविका करतात त्यांस मांसाहारी प्राणी म्हणतात. यांचे मुख्यतः तीन वर्ग करण्यांत येतात: (१) तलचारी (प्लँटिग्राडा)— यामध्यें अस्वली, बजर, रॅकून, वगैरे प्राणी मोडतात. (२) अंगुलचर—पायाच्या बोटांवर चालणारे प्राणी (डिजिटिग्राडा)—यामध्यें सिंह, वाघ, मांजरें, कुत्रे, वगैरे प्राणी येतात. (३) पंखावर चालणारे पक्षपाद प्राणी (पिनिपेडिया किंवा पिनिग्राडा)—यामध्यें सील, वालरस, वगैरे प्राणी येतात. यांपैकीं पहिल्या दोन वर्गांस विभक्त (अंगुलि) पादवर्ग (फिसिपेडिआ) असेंहि म्हणतात. पहिल्या तलचारी वर्गांतील प्राणी पायाचा सर्व तळवा जमिनीवर टेंकून चालतात. तर दुसऱ्या अंगुलचर वर्गांतील प्राणी केवळ बोटांवर भार देऊन चालतात. तसेंच पहिल्या वर्गांतील प्राणी केवळच मांसाहारी नसून कांहीं झाडांचीं मुळें, फळें व मध यांवरहि उपजीविका करतात. तिसऱ्या वर्गांतील पक्षपाद प्राणी यांचें शरीर लांब असून माशाच्या आकाराचें असतें. यांच्या शरीराचा पुढील व शेवटील भाग आंखुड असून त्याचे पाय वल्ह्यासारखे, कातडीनें बोटें जोडलेलीं असे असतात. तसेंच मागील *पाय शरीराच्या फार पाठीमागील* बाजूस असून शेपटीला स्नायूंनीं जोडलेले असतात.

**मांसाहारी वनस्पती**—(कार्निव्होरस प्लँट्स). 'डायटमी'-सारख्या कांहीं वनस्पतीखेरीज करून साऱ्या वनस्पती अचर आहेत. त्यांचें भक्ष्यसुद्धां तशाच प्रकारचें असल्याकारणानें जमिनींत पुरलेलीं मुळें व वातावरणांत फडफडणारीं पानें यांच्याद्वारें वनस्पतींना आपलें अन्न बसल्या जागीं सहज मिळवितां येतें. मांसाहारी वनस्पतींनाहि स्थलांतर करण्याची शक्ति नसते. तथापि त्यांना आपल्या पोषणासाठीं इकडे तिकडे वावरणाऱ्या जंगम अशा प्राण्यांवर अवलंबून राहावें लागतें. प्राण्यांचा पाठलाग करून त्यांना धरण्याच्या साधनाच्या अभावीं, मांसाहारी वनस्पतींना आपल्या पानांवर उडून किंवा चालून येणाऱ्या लहान प्राण्यांना पकडून ठेवण्यासाठीं कांहीं युक्त्या योजाव्या लागतात. हीं बहुतेक झाडें याप्रमाणें धरून ठेविलेल्या प्राण्यांचा कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें आपल्या पोषणाकडे उपयोग करतात, हें प्रयोगावरून सिद्ध झालें आहे. जे प्राणी धरले जातात ते बहुतकरून किडे असतात, म्हणून या झाडांना 'कीटकभक्षक वनस्पती' अशी संज्ञा दिली गेली आहे. परंतु, धरलेल्या किड्यांच्या फक्त मांसाचाच हीं झाडें आपल्या पोषणाकडे उपयोग करीत असल्यानें, त्यांना 'मांसाहारी' वनस्पती म्हणणें जास्त सयुक्तिक आहे. या मांसाहारी वनस्पती ठोकळ मानानें पांचशाच्या जवळ जवळ असून त्यांमध्यें प्राणी धरून त्यांचें भक्ष्य करण्याच्या साधनांचे प्रकार फार भिन्न भिन्न आहेत.

यांचे मुख्य तीन वर्ग पडतात: पहिल्या वर्गांत पुष्कळ वेगवेगळ्या प्रकारच्या झाडांचा समावेश होत असून, त्या प्रत्येकांत किडे धरण्यासाठीं सांपळ्यासारखी कांहीं योजना केलेली असते. या सांपळ्यांत एखादा प्राणी जाऊं लागला असतां तो सहज

जाऊं शकतो; परंतु त्याला परत बाहेर मात्र येतां येत नाहीं. या वर्गातील झाडांचे प्राणी धरून गट्ट करण्याचे जे अवयव असतात, त्यांमध्यें बाह्य चलनवलन कांहीं नसतें. म्हणून विवक्षित चलनवलन असणाऱ्या दुसऱ्या वर्गातील वनस्पतींपासून हीं झाडें वेगळीं केलीं गेलीं आहेत. दुसऱ्या वर्गातील वनस्पती शक्य तितक्या जास्त पाचक रसानें भक्ष्याला भिजवून टाकण्याच्या हेतूनें एखादा किडा पानावर उतरून बसला असतां, त्याच्या हालचालीनें पानांतील पेशींना चेतना मिळतांच आपल्या अवयवांच्या द्वारें ठराविक हालचाल करूं लागतात. तिसऱ्या वर्गातील वनस्पतींना पहिल्या वर्गाप्रमाणें सांपळ्यासारखी योजना किंवा दुसऱ्या वर्गाप्रमाणें ठराविक चलनवलन करण्याचें सामर्थ्य नसून त्यांच्या पानांचें चिकट्यानें चोपडलेल्या फांदाऱ्यामध्यें रूपांतर झालेलें असून किडे सहज इकडे तिकडे वावरतांना त्यांवर चिकटून बसतात व मग ते त्या वनस्पतीच्या भक्ष्यस्थानीं पडतात. ब्लॅडवर्ट, पिचरप्लँट, निपेंथीस, बटरवर्ट, सनड्यू, व्हीनस, फ्लायट्रॅप व फ्लायकॅचर हीं मांसाहारी वनस्पतींचीं ठळक उदाहरणें आहेत. मांसाहारी पाहा.

**मासे**—सपृष्ठवंश प्राण्यांपैकीं अगदीं खालच्या जातींतील प्राणी. मासा हा नेहमीं पाण्यामध्यें राहतो. याचें डोकें मोठें असतें; मान अजीबात नसते. याचें शरीर डोकें व शेपूट या भागांकडे निमुळतें असतें व त्यामुळें त्याला अडथळ्यावांचून पाण्यांतून सहज फिरतां येतें. श्वासोच्छ्वासाकरितां कल्ले असणें हें माशाचें मुख्य लक्षण होय. हे कल्ले डोक्याच्या दोहीं बाजूंना खालीं असतात. पाण्यामध्यें जो प्राणवायु असतो तो कल्ल्यांतील रक्तवाहिन्यांच्या द्वारां मासे शोषून घेतात. मासे तोंडांत पाणी घेऊन तें

कॉड मासा

कल्ल्याच्या द्वारांनीं बाहेर सोडून देतात. माशांच्या कांहीं जातींमध्यें श्वासोच्छ्वासाकरितां हवेच्या पिशव्या असलेल्या आढळतात. माशांचें हृदय जबड्याखालीं असतें व त्याला दोन पोकळ्या असतात. शरीरांतील रक्त कल्ल्यांच्या द्वारां हृदयाकडे जातें व तेथून सर्व शरीरभर पसरतें. त्याचा मेंदू अगदींच लहान असतो; पण डोळे मोठे, वाटोळे व पापणीविरहित असतात. पाण्यांत पोहण्याकरितां पंखांच्या जोड्या असतात. याचे पाय वल्ह्याप्रमाणें असतात. माशाचें रक्त फिक्ट वांगूस असून थंड असतें. त्याच्या तोंडांत बारीक पण तीक्ष्ण दांत असतात. साधारणतः ज्या माशांमध्यें हाडें असतात त्यांचीं अंडीं बाहेरील उष्णतेनें उबून फुटतात व त्यांची वाढ होते. या कामीं मादीची जरूर नसते. हीं अंडीं प्रथम मादी घालते व त्या अंड्यांवर नर जीवद्रवाचा वर्षाव करतो. शार्क वगैरे माशांच्या जातींमध्यें शरीरामध्येंच गर्भधारणा होते. गर्भाशयामध्यें पिलांची वाढ होते.

भिंतीवर चढणारे मासे

[ यमुना कालव्यांतून वर यमुना नदीकडे हे जात आहेत. ]

माशांच्या सुमारें १२-१३ हजार जाती आहेत. कार्प, कॉट, फाइंडर, हेरिंग, पर्च, पाइक, रोच, लॉबस्टर, सोल, इत्यादि महत्त्वाच्या जाती आहेत. प्राणिशास्त्रवेत्त्यांनीं माशांचे मुख्य वर्ग पाडले आहेत. ते म्हणजे कूर्चमत्स्य (एलॅसमो ब्रँच), फुप्फुसमत्स्य (डिप्नोइ) व अस्थिमत्स्य (टेलेऑस्टोमी). कूर्चमत्स्यांना हाडें व हवेची पिशवी नसते. पाकटा, शिणगिणी व करवत मासा या वर्गातील होत. फुप्फुसमत्स्यांना मोठें फुप्फुस असतें व त्याचा संबंध अन्ननलिकेशीं असतो. घोट मासा या वर्गांत पडतो. अस्थिमत्स्य वर्गांत रांवस, सरंगा, बांब, मरळ, कॉड, हलवा, वगैरे मासे येतात. याच वर्गातील मासे नेहमीं बोचसे सांपडतात. देवमासा व सील मत्स्यवर्गांत मोडत नाहींत.

माशांचा उपयोग खाण्याकडे तर फार मोठा होतोच व त्यासाठीं मच्छीमारीचा धंदा चालतो ( मच्छीमारी पाहा ).

शिवाय त्यांच्या शरीरापासून तेल काढतात. 'कॉडलिव्हर' तेल प्रसिद्धच आहे. खवल्यापासून तावदानें, इसेन्स ऑफ ओरिएंट, वगैरे करतात. शहाबाद येथें महसीर माशांच्या खवल्यांचे खेळण्याचे पत्ते करतात. कातड्यापासून सँड पेपर, झाग्रिन, वगैरे होतें. माशांचें खत शेतकींत फार उपयुक्त आहे. अंडीं फार मौल्यवान् असतात. तीं वाळवून बाजारांत विकण्यास ठेवतात.

**मॉस्को**—जुन्या रशियन बादशाही साम्राज्याची व आजची राजधानी. येथील क्रेम्लिन नांवाचा झारचा मोठा तटबंदी राजवाडा १८३८–३९साली बांधण्यांत आला. येथील हवा थंड आहे. लो. सं. १९३९ सालीं ४१,३७,०१८ होती. येथें घरांचा प्रश्न पंचवीस-तीस वर्षांपासूनच फार बिकट झाला आहे. शें. १५ लोक तळघरांत राहतात. १४ व्या शतकापासून मॉस्को हें युरोप व आशिया खंडाची मालाची वखार व व्यापाराचें केंद्र आहे. चहा, साखर, कातडें, लोंकर, वगैरेंचा व्यापार येथें बराच आहे. येथील कोळशाची निपज मोठी आहे. मॉस्को येथें पुष्कळ शिक्षणसंस्था व शास्त्रीय संस्था आहेत. येथील विश्वविद्यालय स. १७५५ त स्थापण्यांत आलें.

**क्रेम्लिनमधील प्रचंड घंटा**

क्रेम्लिन मनोऱ्याखालीं झार कोलोकोल (घंटांचा राजा) नांवाची प्रचंड घंटा आहे. हिचा घेर ६५ फूट, उंची १९ फूट व वजन सुमारें २०० टन आहे. जगांत एवढी मोठी घंटा नाहीं. ही १७३७ त तयार करीत असतांनाच फुटली; त्यामुळें कधीं वाजलीच नाहीं! मॉस्कोमध्यें ४०० वर ख्रिस्ती देंवळें आहेत.

या शहराचा पहिला उल्लेख ११४७ सालीं येतो. १२३७ त हें मोंगलांच्या ताब्यांत होतें. १५७१ त तातार लोकांनीं हें जाळलें. १८१२ त फ्रेंच सैन्य क्रेम्लिनमध्यें शिरलें; पण लवकरच आगीचा भडका उठून फ्रेंचांना पळतां भुई थोडी झाली. १८१३ त हें शहर पुन्हां बांधण्यांत आलें.

**मास्ति, वेंकटेश आयंगार** (१८९२ )—एक कानडी साहित्यिक व कानडी लघुकथालेखनाचे प्रवर्तक. हे रामानुज पंथाचे वैष्णव असून मूळचे मास्ति या गांवचे होत. एम्. ए. झाल्यावर यांनीं सरकारी नोकरी धरली. नंतर एक्साइज कमिशनरच्या जागेपर्यंत चढत जाऊन हे सेवानिवृत्त झाले. कानडी भाषेंत विविध प्रकारचें लेखन यांनीं केलें आहे. हिंदुस्थानचा उत्कर्ष व्हावयाचा असल्यास हिंदुस्थानांतील प्रत्येकच भाषा समृद्ध असली पाहिजे व त्यासाठीं ती ती भाषा बोलणाऱ्या लोकांनीं प्रयत्न केले पाहिजेत अशी यांची व्यापक दृष्टि आहे. अनेक कानडी लेखकांना यांचें साहाय्य झालेलें आहे. श्रीकंठय्यांच्यानंतर कर्नाटक साहित्य परिषदेचें नेतृत्व यांच्याकडेच असे.

लघुकथा १–६ भाग, शाता व शिवछत्रपति हीं नाटकें, वाल्मीकि व रामकृष्ण परमहंस हीं चरित्रें, यांसारखें वाङ्मय कानडी भाषेंत यांनीं निर्माण केलें आहे. लघुकथा हा वाङ्मयप्रकार कानडी वाङ्मयांत सुरू करण्याचें श्रेय यांच्याकडेच जातें.

**माहदी**—१. हा महंमद पैगंबर याच्या वंशांतला बारावा इमाम. हा ८६८ सालीं जन्मला व ८७९ सालीं अदृश्य झाला. आणि तो पुन्हां अवतीर्ण होईल अशी शिया पंथीयांची समजूत आहे. त्यामुळें ज्यू धर्मांतील मेसाया याच्याशीं त्याचें साम्य आहे.

२. अलीकडील काळांतला सर्वांत महत्त्वाचा माहदी महंमद अहंमद (१८४८–१८८५) हा होय. त्यानें सुदानी लोकांनीं केलेल्या बंडाचा पुढाकार घेतला होता (१८८३–१८८५). याचें थडगें खार्टूमजवळ होतें तें १८९८ सालीं ब्रिटिश सैन्यानें उध्वस्त करून टाकलें.

**माहीम**—मुंबई, ठाणें जिल्हा. हें गांव २५ वर्षांपूर्वी तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें. पण तेव्हांपासून 'पालघर' हें मुख्य ठिकाण आहे व तालुकाहि पालघर आहे. येथील व्यापाराचे जिन्नस म्हणजे विड्याचीं पानें, केळीं, आलें, मिरच्या, ऊंस हे होत. इतर जिन्नस मात्र परप्रांतीं रेल्वेनें रवाना होतात. केळवे व माहीम या दोन गांवांमिळून केळवे–माहीम बनलें आहे.

केळव्याचा किल्ला समुद्रांत (पाण्यांत) अगदीं लहान पडक्या अवस्थेंत आहे. माहीम येथें भुईकोट किल्ला बऱ्या अवस्थेंत आहे; त्यावर जातां येतें. माहीमजवळ 'महिकावती' देवीचें पुराणप्रसिद्ध देऊळ आहे. या महिकावतीवरून पूर्वी माहीमला महिकावती नगरी म्हणत असत. पूर्वी माहीम येथें म्युनिसिपालिटी होती. मुंबईजवळहि माहीम म्हणून एक गांव आहे, तेव्हां त्यापासून निराळेपणा दाखविण्यासाठीं वरील 'माहीम' ला केळवे माहीम म्हणण्याचा प्रघात पडला आहे. फार पूर्वी माहीम येथें चाकू-कात्र्यांचा एक कारखाना होता.

**माहुंग-ची**—चीनमधील सिंघसिया या वायव्येकडील प्रांताचा अधिकारी. हा प्रांत केवळ मुसलमानांचा आहे व कम्यूनिस्ट लोकांना मोठा विरोध करणाऱ्यांपैकीं आहे. माहुंग हा या प्रांताचा सर्वाधिकारी असून त्याचा फार मोठा दरारा आहे. तो मोठा शूरहि आहे. जनरल माहुंगनें १९३२ सालीं जेव्हां आपला अमल सुरू केला तेव्हां ज्यांची सत्ता त्यानें हिसकावून घेतली त्या ३०० लुटारू नायकांचा त्यानें शिरच्छेद केला. हा या प्रांताचा जणुं सरंजामदारच आहे. तो लोकांकडून कर वसूल करतो व सैन्य ठेवतो. तो नांवाला राष्ट्रीय चिनी सरकारचें वर्चस्व कबूल करतो, पण त्याला कांहींहि करभार देत नाहीं. त्यानें आपल्या राज्यांत नवीन रस्ते, कालवे, शाळा, वगैरे सुधारणा केल्यामुळें लोक त्याचा जुलूम सहन करतात. त्याची शिस्त फार कडक आहे. तो आपल्या मुलांनाहि शिस्त न पाळल्याबद्दल राजरोस फटके मारण्यास कमी करीत नाहीं.

**माहुलीचा किल्ला**—ठाणें जिल्हा, शहापूर तालुक्यांत शहापूरच्या वायव्येस ४ मैलांवर माहुली नांवाच्या डोंगरावर हा बांधलेला आहे. उंची २८१५ फूट. रस्ता पूर्वेकडे माचीवरून जातो. हा मोंगलांनीं बांधला असें म्हणतात. हा अर्धा मैल लांब व तितकाच रुंद आहे. चढण फार अवघड आहे. १६६१ त शिवाजीनें हा मोंगलांकडून घेतला होता. पुढें हा जयसिंगाबरोबर झालेल्या तहांत मोंगलाकडे गेला. तो पुन्हां मोरोपंत पिंगळे यानें १६७० त घेतला. १८१७ त हा इंग्रजांकडे आला. तो आतां ओसाड आहे.

**माहे**—ही मद्रास इलाख्यांत मलबार प्रांतांत फ्रेंचांची एक वसाहत आहे. ही माही नदीच्या मुखाजवळ वसलेली आहे. लो. सं. १२,०००. ही वसाहत सध्यां भरभराटींत नाहीं. हा मुलूख डोंगराळ पण यावर नारळाचीं दाट झाडें आहेत. येथील जमीन सुपीक असून हवाहि निरोगी आहे. या वसाहतीचा मुख्य अधिकारी पांडिचेरीच्या गव्हर्नराच्या हाताखालचा असतो. येथें ब्रिटिश सरकारचें एक टपालघर आहे. कालिकतहून निघालेला आगगाडीचा फांटा अगदीं माहेजवळून जातो.

**माळवा**—याचा समावेश पूर्वी मध्य हिंदुस्थान-एजन्सीच्या पश्चिम भागांत होत असे. हिंदुस्थानच्या प्राचीन व मध्यकालीन इतिहासांत याला बरेंच मोठें महत्त्व आलें होतें. क्षे. फ. ७६३० चौ. मैल. यांतून चंबळा, क्षिप्रा, काली, सिंद आणि पार्वती या नद्या वाहतात. यांत गहूं, चणे, ज्वारी कापूस, अफू व खसखस यांचें उत्तम पीक येतें. पावसाची सरासरी २० इंच आहे. येथील अर्धे लोक माळवी अथवा रांगडी भाषा बोलतात. मालव लोक हे मूळ माळवा व आग्नेय राजपुताना येथील रहिवासी होत. गुजराथ आणि माळवा यांचा जुना संबंध आहे. हर्ष आणि भोज-विक्रम यांच्या काळीं मालव प्रांत प्रसिद्ध होता. गुलाम घराण्यांतील सुलतान अल्तमश यानें १२२६ सालीं माळवा प्रांत जिंकून दिल्लीच्या राज्यास जोडिला. महंमूद खिलजी यानें अनेक इमारती बांधल्या (मांडवगड पाहा). हिंदु लोकांस त्यानें त्रास दिला नाहीं. दिल्लीच्या मोंगल बादशाहींत हा मोठा सुभा होता. याचा ताबा आपल्याकडे घेण्यासाठीं पहिल्या बाजीरावानें अतिशय खटपट केली. नंतर कांहीं मराठे सरदार तेथें स्थायिक झाले. अजूनहि शिंदे, होळकर, वगैरे मराठे सरदारांच्या राज्यांत यांतील बराच भाग आहे. १७८० पासून जवळजवळ २५ वर्षे माळवा म्हणजे इंग्रज, मराठे व मुसलमान यांची समरभूमिच होऊन बसली होती. शेवटीं इ. स. १८१८ त येथें इंग्रजांचें आधिपत्य कायम झालें. आज माळवा मध्यभारतांत समाविष्ट आहे.

**माळशिरस**—मुंबई, सोलापूर जिल्ह्यांतील तालुका व गांव. तालुक्याचें क्षे. फ. २७४ चौ. मैल असून लोकसंख्या ९० हजारांवर आहे. यांत खेडीं ६९ आहेत. माळशिरस येथें सरकारी पाटबंधाऱ्याचीं कामें चालत असल्यानें गांवाला थोडें महत्त्व आहे.

**माळी**—या जातीचीं माळी, माळीयार, बागवान व मालाकार अशीं इतर नांवें असून यांची हिंदुस्थानांतील लो. सं. (१९११) २०,३५,८४३ आहे. त्यांत १९,१६,४९१ हिंदू, १,१७,१४१ मुसलमान व बाकीचे इतर धर्मांचे आहेत. यांची सर्वांत जास्त वस्ती (५,७२,८६४) मध्यप्रांत व वऱ्हाड या भागांत आहे. मराठी भाषा बोलणारे माळी सुमारें ७ लाख आहेत. हे लोक आपणांस क्षत्रिय म्हणवितात. यांचे धंदे मुख्यत्वें शेतकी, बागाईत व मजुरी हे आहेत.

मराठा माळी—यांचे फुलमाळी ऊर्फ फुले, हळदे, काचा, कडू, पदे, बावने, अधप्रभु, अधशेटी, जिरे, उंडे व लिंगायत असे भेद आहेत. धंद्यांवरून हीं नांवें पडलीं आहेत. उदा., काचे हे कापड विणणारे असतात. यांच्यांत जाती पंचायती आहेत.

गुजराथी माळी—हे धर्मानें, पोषाखानें व रूढीनें गुजराथी कुणब्याप्रमाणें आहेत. हे व्यापार, गुरवकी व घरनोकरी

करतात. कबीर, रामानुज, शैव, स्वामीनारायण, वल्लभ, यांसारख्या पंथाचे हे अनुयायी आहेत.

कानडी माळी—यांना कामठी किंवा कुंचगीवक्कल म्हणतात, कारण पावसाळ्यांत हे कुंचकी (कुंची) झगा वापरतात. यांच्यांत मद्यमांसाची बंदी आहे.

मध्यप्रांतांत यांना मरार म्हणतात. छत्तीसगडाकडे कोसाशिया म्हणून यांचा एक वर्ग आहे. बंगाल्यांत या लोकांची गणना नाबासक जातींत करतात. माळव्यांत अफूची लागवड बहुधा माळीच करतात. पहिली माळी-शिक्षण-परिषद् ही पुण्यास १९१० मध्यें भरली होती. माळी जातींतील अरणभेंडीचा रहिवासी संत सावंता माळी हा पंढरपूरच्या विठोबाचा विख्यात भक्त होऊन गेला.

**माक्षिक (चुंबकीय)**—(पायऱ्होटाइन). ब्राँझ रंगाचें एक खनिज. मॅग्नेटिक पायराइट असेंहि त्याला नांव आहे. यांत मुख्यतः लोहस गंधकिद (फेरस सल्फाइड) असतें. हें खनिज साधारणपणें निकेलच्या खनिज धातूबरोबर सांपडतें.

**मिंग युएन**—एक चिनी प्रवासी. चिहचाउचा हा कायदेपंडित होता. याचें संस्कृत नांव चिन्तादेव. कोचीन-चीनच्या एका जहाजांत चढून तो कलिंग देशास आला व तेथून सिंहलद्वीपास गेला. तेथील राजा एकदां पूजेंत गुंतला असतां यानें बुद्धाचा दांत उचलून तो आपल्या देशांत चोरून आणण्यासाठीं आपल्या हातांत लपवून ठेविला. परंतु तें कृत्य उघडकीस येऊन त्याला हद्दपार करण्यांत आलें. पुढें तो दाक्षिण हिंदुस्थानांत आला. तेथून तो महाबोधीकडे जात होता असें म्हणतात; परंतु रस्त्यांत तो एके ठिकाणीं थांबला असतां तेथें त्याच्या कोठ्याची पचनशक्ति बिघडून त्याचा अंत झाला. त्याचें त्या वेळीं वय काय होतें तें ठाऊक नाहीं.

मिंग युएननें जो दांत चोरण्याचा प्रयत्न केला तोहि आतां फारच काळजीपूर्वक एका गोपुरांत पहाऱ्यांत ठेविलेला असतो. त्याच्या कुलपावर पांच अमलदारांची मोहर असते. तो जेव्हां बाहेर काढतात तेव्हां वाद्यें वगैरे वाजवून चोहोंकडे बरीच गर्जना होते. रोज फुलें, धूप, वगैरेंनीं त्याची पूजा करतात. बाहेर काढल्यावर तो एका सुवर्णपुष्पावर ठेवतात व त्यामुळें त्याची प्रभा चोहोंकडे फांकते. हा बुद्धस्मृतिशेष नाहींसा झाल्यास एक राक्षस येऊन सर्वांना भक्षण करील असें म्हणतात. कोणी असेंहि म्हणतात कीं, कांहीं दैवी चमत्कारानें तो चिनांत जाणार आहे.

**मिचिगन**—हें अमेरिकन संयुक्त संस्थानांतील एक संस्थान असून मिचिगन सरोवरामुळें, त्याचे दोन भाग झाले आहेत. या प्रदेशांतून कालामाझू व इतर नद्या वाहतात. लान्सिंग ही या संस्थानची राजधानी असून डेट्राइट, ग्रँडरॅपिड्स, फ्लिंट व सॅगिना हीं मोठालीं शहरें आहेत. या संस्थानांत १९१ एकर जमिनीचा प्रदेश रेड इंडियन लोकांकरितां निराळा राखून ठेवला आहे (इंडियन रिझर्व्ह) व त्यांची लो. सं. सु. आठ हजार आहे. हें संस्थान कृषिप्रधान असून येथें ओट, गहूं, बटाटे, द्विदल धान्यें आणि साखरेचे बीट हीं पिकें होतात. दुभतीं जनावरें पाळण्याचा धंदा फार मोठा आहे व मेंढ्या पाळण्याचा धंदाहि वाढत आहे. येथें खनिज द्रव्यें विपुल सांपडतात. तीं म्हणजे, लोखंड, तांबें, रुपें, मीठ, कोळसा, चिकणमाती, ग्रफाइट दगड, जिप्सम व पेट्रोलियम. शिवाय मच्छीमारीचा धंदा येथील सरोवरांत चालतो. येथें यंत्रें व मोटारी यांचे कारखाने आहेत. कसाईखाने, व मांस, फळांचा रस, वगैरे डबेबंद ठेवण्याचे कारखाने येथें आहेत. येथें पहिली फ्रेंच वसाहत १६६८ सालीं झाली. १७६३ मध्यें ब्रिटिशांकडे ही वसाहत आली व पुढें अमेरिकनांकडे गेली. १८३७ सालीं हें संस्थान युनियनमध्यें सामील झालें. येथील राज्यकारभार गव्हर्नर हा ३२ लोकनियुक्त सभासदांचें सेनेट व १०० सभासदांचें कायदेमंडळ यांच्या मताप्रमाणें चालवतो. क्षे. फ. ५८,२१६ चौ. मैल व लो. सं. ५२,५६,१०६ आहे. येथें मिचिगन युनिव्हर्सिटी व अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. प्राथमिक शिक्षण ७ ते १६ वर्षांपर्यंतच्या मुलांना सक्तीचे आहे. येथें इंग्रज, स्कॉट, आयरिश, डच, जर्मन, पोल, बटालियन, राशियन असे विविध देशांचे लोक आहेत.

**मिचेलसन, आल्बर्ट आब्राहम** (१८५२-१९३१)—या अमेरिकन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञाचा जन्म प्राशियामध्यें स्ट्रेलनो या गांवीं झाला. १८९२ मध्यें शिकागो विद्यापीठांत तो पदार्थविज्ञान शाखेचा प्रमुख झाला. हा विशेषतः प्रकाशगतिमापनाबद्दल प्रसिद्ध आहे. यानें प्रकाशलहरींच्या व्यतिकरणाबद्दल बरेच प्रयोग केले आहेत. १९०७ मध्यें याला नोबेल बक्षीस मिळालें व तो मिळविणारा हा पहिलाच अमेरिकन शास्त्रज्ञ होय. हा 'अमेरिकन सोसायटी फॉर दि ॲडव्हान्समेंट ऑफ सायन्स' आणि 'नॅशनल ॲकडमी ऑफ सायन्स' या संस्थांचा अध्यक्ष होता.

**मिंटो, लॉर्ड-१.** (१८०७-१३)—हिंदुस्थानांतील एक गव्हर्नर जनरल. हा ग. ज. होण्यापूर्वी इंग्लंडांत 'बोर्ड ऑफ कंट्रोल'चा अध्यक्ष होता. प्रथम हा उदारमतवादी व बर्कचा मित्र असून वॉरन् हेस्टिंग्जच्या खटल्यांत याचा हात होताहि; परंतु लॉर्ड बनल्यावर याचीं मतें पालटलीं. युरोपांत नेपोलियननें आशिया खंडांतील राष्ट्रांत व खुद्द हिंदुस्थानांतहि इंग्रजांविरुद्ध चळवळ सुरू केली असतां मिंटोनें ती मोडून

काढली. आरमारी हल्ले करून व फ्रान्सचीं हिंदी महासागरांतील सर्व बेटें काबीज करून यानें पूर्व गोलार्धांत इंग्लंडास शत्रु ठेवला नाहीं. याच्या वेळीं स्वतंत्र इंग्रज व्यापाऱ्यांस हिंदुस्थानांत व्यापार करण्यास पुष्कळ सवलती मिळाल्या आणि कंपनीस पुन्हां २० वर्षांची सनद मिळाली. त्यानें हिंदुस्थानांत सरकारी पाद्र्यांची नेमणूक केली आणि हिंदी लोकांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ पहिली मोठी देणगी (१ लाख रु.) दिली.

२. (१९०५-१०)—हा पहिल्या मिंटोचा पणतू. याच्या आधींचा व्हाइसरॉय कर्झन यानें केलेल्या बंगालच्या फाळणी-मुळें देशांत फार खळबळ उडाली होती व अराजकता नाहींशी करण्यासाठीं सरकारनें दडपशाहीचे कायदे केले होते. तेव्हां भारतमंत्री लॉर्ड मोर्ले यांनीं पार्लमेंटांत सुधारणाकायदा मंजूर करून घेतला. याच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांत ठळक दोन गोष्टी झाल्या : एक हिंदी राष्ट्रीय चळवळ व दुसरी त्यामुळें सरकारनें दिलेल्या (मोर्ले-मिंटो) राजकीय सुधारणा. या सुधारणां-मुळें येथील कारभार लंडनच्या व्हाइट हॉलच्या हातीं इतका गेला कीं, त्या वेळच्या एका अंडर सेक्रेटरीनें "हिंदुस्थानचा व्हॉइसरॉय हा स्टेट सेक्रेटरीचा एक गुमास्ता (एजंट) होय", असे स्पष्ट उद्गार काढले होते. पण या सुधारणांमुळें विधिमंडळें विस्तृत होऊन लोकप्रतिनिधी राजशासनांत भाग घेऊं लागले.

**मिडल्टन, थॉमस** (१५७०-१६२७)—एक इंग्रज नाटककार. त्यानें इतर नाटककारांच्या विशेषतः रौले व डेक्कर यांच्या सहकार्यानें लेखनकार्य केलें. त्यानें नाटकें लिहिलीं तीं : 'ब्लर्ट', 'मास्टर कॉन्स्टेबल' (प्रहसन), 'दि फोनिक्स', 'ए ट्रिक टु कॅच दि ओल्ड वन्', 'दि फॅमिली ऑफ लव्ह', 'युवर फाइव्ह् गॅलंट्स', 'ए मॅड वर्ल्ड', 'माय मास्टर्स', 'दि रोअरिंग गर्ल', 'ए चेस्ट मेड इन् चीपसाइड', 'दि विच', 'दि चेंजलिंग', 'दि स्पॅनिश जिप्सी', आणि 'ए गेम ॲट चेस' (बुद्धिबळाचा खेळ), हीं होत. या नाटकांपैकीं एका प्रसंगामुळें (आलोन्झो याच्या खुनानंतर डी फ्लोरेस व बिॲट्रिस यांच्यामध्यें झालेल्या संवादामुळें) हा नाटककार शेक्स्पियरच्या तोडीचा असल्याचा प्रत्यय येतो.

**मितपान**—पाश्चात्य समाजांत दारू पिणें निषिद्ध मानीत नाहींत. तथापि त्याचे दोष जाणून त्यावर नियंत्रण ठेवण्यांत येत असतें. वाटेल त्यानें वाटेल तितकी दारू पिऊं नये म्हणून नियंत्रण घालण्याकरितां जे कायदे करतात त्यांना मितपानाचे कायदे (टेंपरन्स लेजिस्लेशन) म्हणतात. दारूबाजीला आळा घालण्याकरितां इंग्लंडांत प्रथम १५५१ सालीं 'लायसेन्सिंग ॲक्ट' हा कायदा करण्यांत आला. मितपानविषयक आणखी एक कायदा, जिन ॲक्ट १७३६ सालीं झाला. १९ व्या शतकांत मितपानासंबंधीं जे कायदे झाले त्यांचा पुरस्कार सर विल्फ्रेड लॉसन यानें केला. १८६४ सालीं सवलतीचा कायदा करण्याचें बिल (परमिसिव्ह बिल) पार्लमेंटांत लॉसन यानें आणलें, परंतु तें नामंजूर झालें. त्या बिलांत कोणत्याहि ठिकाणीं मद्यपानावर नियंत्रण असावें किंवा नाहीं, आणि तें नियंत्रण कसें असावें, तें ठरविण्याचा अधिकार स्थानिक मतदारांच्या ⅔ बहुमतवाल्यांना देण्यांत यावयाचा होता. १९३१ सालीं रॉयल कमिशन ऑन लायसेन्सिंग याचा अहवाल प्रसिद्ध झाला. पण दारूबंदीच्या दृष्टीनें तो निराशाजनकच होता. (दारूबंदी पाहा.)

**मित्र, राजेन्द्रलाल** (१८२४-१८९१)—एक बंगाली विद्वान् व संशोधक. घरची गरिबी असल्यामुळें यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण मोठ्या कष्टानें झालें व पुढें वैद्यकीय अभ्यास करीत असतां इतर मुलांबरोबर यांस बेशिस्त वर्तनाबद्दल काढून टाकण्यांत आलें. नंतर कायद्याची परीक्षा देण्याचा यांनीं प्रयत्न केला, पण या त्यांच्या परीक्षेची प्रश्नपत्रिका फुटल्यामुळें निकालच जाहीर झाला नाहीं. अखेरीस यांनीं नोकरी धरली. यांचा फारसी, ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, जर्मन, इत्यादि भाषांचा अभ्यास चांगला होता व त्यांची विद्वत्ता एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल या संस्थेच्या निदर्शनास आल्यामुळें तिनें त्यांस दुय्यम चिटणीस व ग्रंथपाल नेमलें. या ठिकाणीं असतांना त्यांनीं अनेक विषयांचा अभ्यास करून निरनिराळ्या मासिकांत सुमारें ११४ लेख लिहिले. १८५० मध्यें यांनीं 'विविधार्थसंग्रह' नांवाचें मासिक काढलें व तें सात वर्षें चालविलें. १८५६ मध्यें त्यांस श्रीमंत अज्ञान मुलांच्या कॉलिजवर डायरेक्टर नेमलें. येथें त्यांस भरपूर वेळ मिळाल्यामुळें त्यांनीं आपलें संशोधनकार्य चालू ठेवलें. याशिवाय ते युनिव्हर्सिटी, म्युनिसिपालिटी, जमीनदार सभा, राष्ट्रीय सभा, इत्यादि संस्थांच्या चळवळींत भाग घेत असत. ख्रिस्तदास पॉल यांच्या मृत्यूनंतर 'हिंदु पेट्रियट' या पत्राचें संपादन यांनीं केलें. सरकारनें यांस प्राचीन लेखांचे ठसे घेण्याकरितां नेमलें होतें. यांचे लेख 'ॲंटिक्विटीज् ऑफ ओरिसा'-मध्यें छापले आहेत. यांनीं बुद्धगया, व इंडोआर्यन हे ग्रंथ लिहिले. यांस कलकत्ता युनिव्हर्सिटीनें एल्एल्. डी. व सरकारनें सी. आय्. ई. हे किताब दिले.

**मिथिल अल्कहल**—(दारिल मद्य). काष्ठाचें ऊर्ध्वपातन करून बॉइल यानें १६६१ सालीं प्रथम हा तयार केला. याचा उत्कलनबिंदु ६६° आहे. या अल्कहलमध्यें राळ, स्थिर तेलें, डिंक, वगैरे लवकर विरघळतात. यांत लाख व राळ घालून व्हार्निशें तयार करतात. मिथिलेटेड् स्पिरिटमध्यें याचें प्रमाण $\frac{1}{10}$ असतें.

**मिथिला**—विदेह. उत्तर बिहार प्रांतांतलें एक प्राचीन राज्य. यांत हल्लींचा दरभंगा, चंपारण्य आणि उत्तर मुजफ्फरपुर जिल्हा यांचा समावेश होत असे. एके काळीं हें संस्कृत भाषेचें मोठें पीठ होतें. शतपथ ब्राह्मणांत याचा उल्लेख केलेला आहे. याची राजधानी नेपाळांतील जनकपुरांत असे. पुढें या राज्यांत पूर्णिया, मोंगीर व भागलपूर यांचाहि समावेश होऊं लागला.

मिथिला देशाचा इतिहास कमींत कमी चार हजार वर्षां इतका प्राचीन आहे. ब्राह्मणकाळाच्या पूर्वीपासून या प्रदेशांत आर्यांची वस्ती होती. शतपथ ब्राह्मणांत विदेह माधव राजाची कथा आहे. तो अग्नि घेऊन पूर्वेस चालला असतां सदानीर नदीच्या पुढें अग्नि जाईना. तेव्हां या नदीच्या पूर्वेस त्यानें वस्ती केली. यानंतर मिथिलेवर विदेह राजांचें साम्राज्य झालें. विदेह राजांच्या कथा रामायण, महाभारत व पुराणें यांत आलेल्या आहेत. जनक राजा व त्याची कन्या जी रामचंद्राची पत्नी सीता ती येथीलच. आधिभौतिक विद्येच्या उपासनेपेक्षां आध्यात्मिक विद्येकडेच मिथिलावासीयांची प्राचीन कालापासून स्वाभाविक प्रवृत्ति दिसून येते. अत्यंत संयमी म्हणून प्रसिद्ध असलेला शुक मुनि मिथिलेंतीलच. विदेह साम्राज्यानंतर काशी देशच्या राजांनीं मिथिलेवर राज्य केलें. त्यांच्यानंतर इ. स. पू. सहाव्या शतकांतील वज्जियन राज्यसंघाचें लोकशाही पद्धतीचें राज्य मिथिलेंत सुरू झालें.

वज्जियन राज्यसंघानें आपली राजधानी मिथिलेहून वैशाली येथें नेली. वैशाली म्हणजे सध्यांचें बसारा होय. वज्जियनांनंतर लिच्छवी राजे झाले. ते शूर योद्धे म्हणून प्रसिद्ध होते. बौद्ध धर्माच्या प्रचाराच्या कामीं त्यांचें मोठें साहाय्य झालें. लिच्छवी व गुप्त घराणें याच्या परस्पर वैवाहिक संबंधांमुळें मिथिला देश पुढें गुप्तांच्या आधिपत्याखालीं आला. गुप्तांनंतर सातव्या शतकांत मिथिलेवर हर्षवर्धनाचें राज्य होतें. यानंतर मिथिलेवर राज्य करणारा महत्त्वाचा राजवंश म्हणजे बंगालचें पाल घराणें होय.

पाल राजांनंतर कर्नाट देशांतील नान्यदेव राजानें अकराव्या शतकांत नवा राजवंश सुरू केला. त्याची राजधानी नेपाळांत सिमराव येथें होती. या राजवंशांत चौदाव्या शतकाच्या आरंभीं हरिसिंहदेव नांवाचा राजा होऊन गेला. वंशशुद्धीसाठीं वधूवरांचे कुलवृत्तांत नमूद करून ठेवण्याची 'पंजी' या नांवाची जी पद्धत मिथिलेंत अद्यापि रूढ आहे ती या राजानें सुरू केली. दिल्लीच्या ग्यासुद्दीन तुघ्लखानें हरिसिंहदेवाचा पराभव करून मिथिला जिंकली, पण फिरोज तुघ्लखानें ओईनिवार वंशाची मिथिलेच्या गादीवर स्थापना केली. या वंशांत शिवसिंह हा प्रख्यात राजा होऊन गेला. प्रख्यात मैथिल कवि विद्यापति हा याच्या दरबारीं होता. या वंशानें दोनशें वर्षें मिथिलेवर राज्य केलें. ओईनिवार वंशांतील राजांनीं अनेक तलाव खोदविले व विद्वानांना अनेक गांव इनाम दिले. मैथिल भाषेच्या वाङ्मयासहि या काळांत उत्तेजन मिळालें.

या राजवंशानंतर कांहीं काळ अंदाधुंदींत गेला व सोळाव्या शतकांत खंडवाल वंशांतील राजे मिथिलेवर राज्य करूं लागले. महामहोपाध्याय महेश ठाकूर यास अकबर बादशहाकडून मिथिलेची जमिनदारी मिळाली. सध्यांचे महाराज कामेश्वरसिंग हे याच वंशांतील होत. या ब्राह्मण वंशांतील राजे स्वतः विद्वान् होते व त्यांनीं साहित्य व कला यांना अतिशय उत्तेजन दिलें. अठराव्या शतकांत मिथिला देश ब्रिटिशांच्या वर्चस्वाखालीं येऊन बंगाल प्रांताचा एक भाग झाला.

मैथिल भाषा व वाङ्मय—मैथिल भाषा ही पूर्व हिंदुस्थानांतील महत्त्वाची बोलभाषा आहे. आसामी, बंगाली व उडिया या भाषांप्रमाणें मागधी प्राकृत भाषेंतून ती निघाली आहे. ही हिंदी अथवा बंगाली भाषेची एक पोटभाषा आहे असें पूर्वीं मानण्यांत येत असे. या दोन भाषांशीं तिचें कांहीं साम्य आहे हें खरें, परंतु मैथिल भाषेंत असे कांहीं खास विशेष आहेत कीं, जे हिंदी, बंगाली, इत्यादि कोणत्याहि उत्तरेकडील इंडो-आर्यन भाषेंत नाहींत. मैथिल वाङ्मय बरेंच जुनें आहे. अशी कोणतीहि ज्ञात शाखा नाहीं कीं, जींत मैथिल वाङ्मय नाहीं. पद्य व गद्य या दोन्ही प्रकारचें उच्च वाङ्मय मैथिलींत आहे. कलकत्ता व बनारस विश्वविद्यालयांत आज मैथिली ही अभ्यासविषयांतील भाषा म्हणून मान्य केली आहे. मैथिली लिपि वेगळी आहे; तिला 'तिरहुता' म्हणतात. बंगालीशीं तिचें साम्य आहे. संगीत, नृत्य व लोकगीतें यांत मिथिलेनें एक विशिष्ट परंपरा निर्माण केली आहे.

मिथिला विद्यापीठ—विदेह जनक राजाच्या वेळीं मिथिलेंत ब्राह्मणी विद्येला फार प्राधान्य होतें. कुरुपांचाल देशांतून जनकाच्या निमंत्रणावरून विद्वान् ब्राह्मण येथें येऊन ब्रह्मज्ञानावर पुष्कळ चर्चा करीत. रामायण, महाभारत व बौद्ध वाङ्मय यांच्या काळींहि मिथिलेनें वैदिक काळांतील आपलें नांव राखलें होतें. मिथिलेस कामेश्वर घराण्याच्या अमदानींत विद्यापीठाचा दर्जा प्राप्त झाला. सुप्रसिद्ध भाष्यकार जगद्धर याच काळांत होऊन गेला. यानंतर विद्यापति उदयास येऊन त्यानें आपल्या मैथिली गीतांनीं बंगालच्या वैष्णव साहित्यिकांना कित्येक पिढ्या स्फूर्ति दिली.

मिथिलेस गणेश उपाध्यायानें (१०९३-११५०) नव्य न्याय शाखा उघडली व आपली परंपरा सुरू केली. त्याच्या

सुप्रसिद्ध 'तत्त्वचिंतामणि' या सुमारें ३०० पृष्ठांच्या ग्रंथावर पुढील तीन शतकांत दहा लाख पृष्ठांच्या टीका तयार झाल्या. त्याच्यानंतर वर्धमान, पक्षधर, वासुदेव मिश्र, महेश ठाकूर, रघुनाथ राय, शंकर मिश्र, वाचस्पति मिश्र, वगैरे कित्येक न्यायविशारद या संप्रदायांत होऊन गेले व त्यांनीं मिथिलेचें नांव त्रिखंड गाजविलें. तेराव्या ते पंधराव्या शतकाच्या तीनशें वर्षांत प्राचीन नालंदाप्रमाणें मिथिलेनेंहि बाहेरच्या अनेक पंडितांना आकर्षण करून घेतलें. न्यायशास्त्राचें उत्कृष्ट अध्ययन त्या काळांत मिथिलेशिवाय इतरत्र होत नव्हतें.

नालंदा आणि विक्रमशिला या ठिकाणीं विद्यापीठांत प्रवेश होण्यापूर्वी ज्याप्रमाणें द्वारपंडित परीक्षा घेत त्याप्रमाणें मिथिलेस विद्या संपूर्ण झाल्याबद्दलची परीक्षा शलाका परीक्षेनें घेण्यांत येई. ग्रंथांत कोठेंहि सळई घालून पान उघडावयाचें व त्या पानावरील विषयासंबंधीं प्रश्न घालावयाचे, अशी ही परीक्षा असे.

**मिथेन वायु**—हा जळणाचा वायु हायासिंथ वनस्पतीपासून तयार करतात. हा वायु रंगहीन व गंधहीन आहे. यापासून कोळशाच्या वायूपेक्षां दुप्पट उष्णता मिळते. हायासिंथ वनस्पति दलदलीच्या प्रदेशांत पुष्कळ उगवते. यांतील सेल्युलोजपासून मिथेन तयार करण्याचें कार्य जंतू करतात हें विशेष आहे. या वायूचा संशोधक डोनाल्ड ॲरनॉट हा ब्रिटिश शास्त्रज्ञ आहे. (अनूपवायु पाहा).

**मिथ्या सूर्य**—(पॅरेहेलिअन). उंच वातावरणांत बारीक हिमस्फटिक तरंगत असतात व त्यांवरून सूर्याच्या प्रकाशाचें वक्रीभवन होऊन असा चमत्कार दिसतो. सूर्याच्या उंचीवर एक प्रकाशवलय आकाशांत तयार होतें व या वलयावर फार दीप्तिमान् प्रकाशाचे गोल सूर्यासारखे दिसतात.

**मिथ्र(स)**—प्राचीन इराणी लोकांचा हा देव आहे. याचें आपल्या वैदिक मित्र देवतेशीं बरेंच सादृश्य आहे. मिथ्रस ही सूर्य देवता मानली असून तिची खि. पू. ६८ च्या सुमारास इराणांत बरीच उपासना होत असलेली दिसते. पुढें रोमन लोकांत विशेषतः सैनिकांत मिथ्राची पूजा होऊं लागली व चार शतकेंपर्यंत ती टिकून होती. तरुण मिथ्र वृषभासुराला मारतो आहे अशा जुन्या मूर्ती व चित्रें आढळतात.

**मिथ्रिडेटीझ** (मृत्यु खि. पू. ६३)—हा पॉंटसचा एक राजा होता. बापाचा खून झाला तेव्हां हा १३ वर्षांचा होता. वयांत आल्यावर यानें दिग्विजयाच्या मोहिमा काढल्या व सबंध आशियामायनर आणि ग्रीस आपल्या अंकित ठेवला. तेव्हां रोमशीं वितुष्ट उद्भवलें व खि. पू. ८८ मध्यें सुल्ला यानें ग्रीसवर स्वारी करून तो देश पुन्हां रोमच्या सत्तेखालीं आणला. यानें उलट खि. पू. ६७ मध्यें रोमन सैन्याचा पराभव करून गेलेला प्रदेश परत मिळविला. पुढील सालीं पॉंपेनें मिथ्रिडेटीझचा पराभव केला. यानें नंतर आत्महत्या केली.

**मिदनापूर**—बंगाल, बरद्वान विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ५,२७४ चौ. मै. व लो. सं. ३१,९०,६४७. हुगळी व तिच्या शाखा आणि सुवर्णरेखा या नद्या या जिल्ह्यांतून वाहतात. पाऊस सरासरीं ६० इंच पडतो. कधीं भयंकर वादळें होतात. शें. ७५ लोक शेतकी करतात. उद्योगधंदे कमी आहेत. भात, ज्वारी, बाजरी, मका व गळिताचीं धान्यें होतात. जिल्ह्यांतून एक ७२ मैल लांब कालवा जातो व त्यांतून नावा चालतात. भांडीं, चटया व रेशमी कापड या भागांत तयार करतात. ताम्रलिप्त (तमूलक) या प्राचीन ठिकाणीं तांब्याचा मोठा व्यापार असावा. तें ठिकाण ऐतिहासिक महत्त्वाचें आहे.

पूर्वी यावर मयूरवंशी राजे राज्य करीत होते. त्यांच्यानंतर कैवर्तक आले. पांचव्या शतकांत हा प्रदेश कलिंग राज्यांत मोडूं लागला. चिनी प्रवासी येथें येऊन गेले होते. त्या काळांत बौद्ध धर्माची यांत चलती होती. शेवटीं मुसलमानांच्या ताब्यांत हा गेला. १७६० सालीं मीर कासिम यानें हा ईस्ट इंडिया कंपनीस दिला.

मिदनापूर (मेदिनीपूर) शहर कासै नदीकाठीं आहे. लो. सं. सु. चाळीस हजार. १८६५ सालीं नगरपालिका स्थापन झाली. बंगालच्या राजकीय इतिहासांत मिदनापूर गाजलें आहे.

**मिनँडर** (खि. पू. ३४२–२९१)—हा विनोदी नाटकें लिहिणारा ग्रीक नाटककार होता. आईबाप श्रीमंत असल्यामुळें तो अथेन्स शहरांत ऐटदार पद्धतीनें राहत असे. १९ व्या शतकाअखेरपर्यंत त्याचें वाङ्मय फार थोडें उपलब्ध होतें. नंतर १८९७ सालीं 'शेतकरी' आणि १९०६ सालीं 'केशकलापहीन महिला', 'दि सामीयन स्त्री' व 'भांडखोर' या प्रकारच्या नांवाच्या त्याच्या पुस्तकांचे कांहीं कांहीं भाग उपलब्ध झाले. त्याचें वाङ्मय नाट्यदृष्ट्या फारसें महत्त्वाचें नसून त्याच्या लेखनांत लहान लहान सूक्तिवजा वाक्यें आहेत व इतरांनीं अवतरणें घेण्यासारखा मजकूर आहे, म्हणून त्याच्या लेखनाला महत्त्व प्राप्त झालेलें आहे. हा बुडून मेला म्हणतात.

**मिनबु**—उत्तर ब्रह्मदेश, मगवे विभागांतील जिल्हा. याचें क्षे. फ. ३२०२ चौरस मैल. यांतून इरावती नदी व तिच्या शाखा वाहतात. यांत पॉंगलिन व वेछिंगन हीं सरोवरें आहेत. पाऊस २७ इंच पडतो. एकंदर लोकसंख्येपैकीं शें. ६५ लोक आपली उपजीविका शेतकीवर करतात. यांतील ब्रह्मी लोक बौद्ध धर्मानुयायी आहेत. मुख्य उत्पन्न भाताचें होत असून कांहीं ठिकाणीं तीळ, कडधान्यें, मका, ज्वारी, चणा, तंबाखू, थोडा कापूस, विड्याचीं पानें, आंबे, केळीं, नारळ हेहि जिन्नस होतात.

सागु व मिनवु भागांत रॉकेल तेलाच्या विहिरी आहेत. कोठें कोठें शिंपाचा खडू, अभ्रक आणि दगडी कोळसा हे पदार्थ सांपडतात. प्रमुख व्यापारी चिनी आहेत. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण मिनवु आहे.

**मिनर्व्हा**—प्राचीन रोमन लोकांची एक थोर देवता. ही जुपिटरची मुलगी असून तिला रोमन लोक सर्व कलांची व धंद्यांची अधिष्ठात्री देवता मानीत असत व तिचें ग्रीक लोकांच्या अथीना ( पाहा ) या देवतेशीं फार साम्य आहे.

**मिनेआपोलीस**—अमेरिकन सं. संस्थानें. हें मिनेसोटा संस्थानातील मिसिसिपी नदीच्या कांठीं सेंट अँथोनी या धबधब्या-नजीकचें शहर आहे. येथें युनिव्हर्सिटी, स्कूल ऑफ आर्ट्स, वगैरे अनेक सार्वजनिक इमारती आहेत. हें शहर धान्यांच्या व्यापाराचें मोठें केंद्र आहे व येथें एंजिनें, बॉयलर, शेतकीचीं हत्यारें, निरनिराळ्या प्रकारच्या गाड्या, आगगाडीचे डबे, वगैरे तयार करण्याचे कारखाने आहेत. लोकसंख्या ४,९२,३७० आहे. येथें असलेली मिनेसोटा युनिव्हर्सिटी १८६९ सालीं सुरू झाली व तींत १९४३–४४ सालीं ९,८७१ विद्यार्थी होते.

**मिनेजीस, ब्रागांझ सि. लुईजद** ( १८७८–१९३८ )—सुप्रसिद्ध पोर्तुगीज लेखक, वर्तमानपत्रकार व पुढारी. गोवा प्रांतांतील चांदूर गांव हें यांचें जन्मठिकाण. स्वतः हे खिस्ती ( क्षत्रिय ) असले तरी खिस्ती धर्म हे पाळीत नसत. उलट त्यांतील दोष व पोरकटपणा आपल्या तिखट लेखणींतून जगापुढें मांडीत. ' उ एव्हाल्द 'चे हे संस्थापक होत. यानंतर ' देवात ' हें पत्र त्यांनीं सुरू केलें. ' प्रकाश ' पत्रांतहि यांचें लिखाण असे. यांच्या जहाल व क्रांतिकारक लेखांमुळें सरकारनें त्या पत्रावर बंदीहुकूम बजावला. मरणोत्तर आपल्या प्रेतावर कोणताहि संस्कार न करतां तें गरिबांच्या स्मशानभूमींत पुरण्यांत यावें अशी इच्छा यांनीं प्रदर्शित केली होती. तदनुसार यांचें प्रेत पुरण्यांत आलें.

**मिनेसोटा**—हें अमेरिकन सं. संस्थानांपैकीं एक संस्थान आहे. यांतून रेडनदी, मिनेसोटा नदी व इतर नद्या वाहतात. सेंट पॉल हें राजधानीचें शहर असून, मिनेआपोलीस, डूलुथ व विनोना हीं मोठालीं शहरें आहेत. रेडइंडियन लोकांकरितां ८६५ चौ. मैल प्रदेश राखून ठेवला असून त्यांची संख्या १२,९६८ आहे. हें संस्थान शेतकीप्रधान असून तेथें मका, गहूं, बार्ली, ओट, जवस, वगैरे पिकें होतात. दुभतीं जनावरें व मेंढ्या पाळण्याचा धंदा वाढत आहे. येथें लोखंड, ग्रॅफाइट, चुनखडी, वाळूचा खडक हीं खनिज द्रव्यें सांपडतात. येथें चामडीं, कापड व यंत्रें यांचे मुख्य कारखाने आहेत. क्षे. फ. ८४,०६८ चौ. मैल व लोकसंख्या २७,९२,३०० असून त्यांत स्वीडिश, नॉर्वेजियन, जर्मन, नीग्रो या जातींचे लोक आहेत. येथें मिनेसोटा युनिव्हर्सिटी, हॅमलिन युनिव्हर्सिटी आणि सेन्ट जॉन्स युनिव्हर्सिटी, व अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. १९४४ सालीं या संस्थानचें उत्पन्न ५,६८,९७,३२० डॉलर्स आणि खर्च ५,७५,१४,९६८ डॉलर्स होता.

रॅडिसन व ग्रॉसेलर या फ्रेंच व्यापाऱ्यांनीं १६५६ सालीं प्रथम या संस्थानांत संचार व संशोधन केलें. फादर लुई हेनेपिन हा जेसुइट पंथाचा होता. यानें १६८० मध्यें या भागांत प्रवास केला. १७६६ मध्यें जोनाथन कार्व्हर या इंग्रज गृहस्थानें अगदीं आंत दूरवर पहिल्यानेंच प्रवेश केला. या संस्थानाचा ' लुसियाना पर्चेस '-मध्यें समावेश झाला होता व या ' पर्चेस 'नंतर अमेरिकन सरकारनें लेफ्टनंट पाइक यास मिनेसोटा व आजूबाजूचा प्रदेश यांतील अंतर्भागांत संचार करून संशोधन करण्यास मुद्दाम नेमलें होतें. १८५८ मध्यें मिनेसोटा युनियनमध्यें दाखल झालें.

**मिनोट, जॉर्ज रिचर्ड्स** ( १८८५– )—हा एक अमेरिकन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ असून १९२८ मध्यें हार्वर्ड विद्यापीठांत वैद्यक विषयाचा प्राध्यापक झाला. यानें रक्तविकारावर बरेंच संशोधन केलें असून जीर्ण रक्तक्षयामध्यें यकृताच्या औषधीदृष्ट्या उपयोगाबद्दल बरेंच संशोधन केलें आहे. याच्या संशोधनाबद्दल याला १९३४ नोबेल पारितोषिक विभागून मिळालें.

**मिनोर्का**—हें भूमध्य समुद्रांत दुसऱ्या क्रमांकाचें मोठें बेट आहे. येथील प्रदेश डोंगराळ असून गुरें पाळण्याचा धंदा येथें चालतो. दारू, जवस, अन्यधान्यें व फळफळावळ हीं पिकें येथें होतात. लोखंड, तांबें, संगमरवरी दगड, आलाबास्टर, वगैरे खनिज द्रव्यें येथें सांपडतात. पोर्ट मेहॉन हें बंदर व राजधानीचें शहर असून, आरमाराचें ठाणें आहे. हें बेट १८०२ सालीं आमीन्सच्या तहान्वयें स्पेननें ब्रिटनला दिलें. क्षे. फ. २९० चौ. मैल व लो. सं. सुमारें ४०,००० आहे.

**मिनौश्चेहर**—इराणचा एक प्राचीन राजपुरुष. फेरिदून मरण पावला, तेव्हां त्याचा नातू मिनौश्चेहर गादीवर आला. त्यानें न्यायानें व दयाळूपणानें राज्य केलें. त्याचा इराणमधील सीस्तान नामक प्रांताचा नेरिमनचा पुत्र साहम नांवाचा अधिकारी फार विश्वासू व पराक्रमी होता. त्याच्या झाल नांवाच्या पुत्रासंबंधानें एक मोठी कथा आहे. या कथेपैकीं महत्त्वाचा राजकीय भाग एवढाच आहे कीं, झाल वयांत आल्यावर त्याचें काबूलचा राजा मिहरब याच्या रुदाबेह नांवाच्या कन्येवर प्रेम बसून तिच्याशीं लग्न करण्याचें त्याच्या मनांत आलें, पण काबूलचा राजा हा इराणचा पूर्वीचा शत्रु झोहॉक याच्या वंशांतील असल्यामुळें झालच्या बापाला व खुद्द मिनौश्चेहरला हा शरीरसंबंध अनिष्ट वाटत होता. तथापि झालचें उत्कट प्रेम व अतुल पराक्रम यांबद्दल मिनौश्चेहरनें स्वतःची खात्री करून घेऊन

विवाहास आपली संमति दिली. पुढें या दांपत्यापासून इराणच्या पौराणिक कथांतील रुस्तुम हा सुप्रसिद्ध पुरुष जन्मास आला. हा रुस्तुम व त्याचा मुलगा सोराब यांच्या संबंधींच्या इराणी पौराणिक कथेच्या आधारें आर्नोल्ड नामक इंग्रज कवीनें आपलें 'सोराब आणि रुस्तुम' हें सुप्रसिद्ध काव्य रचलें आहे.

**मियानवाली**—पाकिस्तान, प. पंजाब, रावळपिंडी विभागांतील जिल्हा. क्षे. फ. ५४०१ चौरस मैल. या जिल्ह्यांतून झेलम, सिंधुनद व त्यांच्या शाखा वाहतात, त्यामुळें जमीन सुपीक आहे. येथें उन्हाळा व थंडी हीं कडक असतात. पावसाचें मान ७ ते ११३ इंच असतें. यांत २९६ खेडीं व चार शहरें असून एकंदर जिल्ह्याची लो. सं. ५,०६,३२१ आहे. मुसलमान लोकांचें प्रमाण अधिक आहे. जाट, पठाण, बलोच, अवान, रजपूत, खत्री, जुलाहा, मोची, तरखान या मुख्य जाती आहेत. मुख्य उत्पन्न गव्हाचें होय. मीठ, तुरटी, कोळसा व मातीचें तेल हे खानिज पदार्थ सांपडतात. लोखंडाचीं भांडीं व इतर लोखंडी सामान तयार होतें. लेह येथें सुती कापड विणलें जातें. कोठें कोठें शिंदीच्या टोपल्या व इतर उपयोगी वस्तू तयार होतात. मियानवाली मुख्य गांव आहे.

**मिरची**—[ वर्ग-सोलानासी. कॅप्सिकम ]. हीं एका जातीचीं एकवर्षायु झाडें आहेत. हीं मूळ मध्य व दक्षिण अमेरिकेमध्यें

आढळलीं, पण तेथून त्यांचा प्रसार सर्व उष्ण प्रदेशांत झाला आहे. यांचीं फळें किंवा शेंगा म्हणजे मिरच्या होत. यांच्याकरितां त्यांची लागवड करण्यांत येते. मिरच्या तिखट असतात. हा तिखटपणा त्यांतील 'कॅप्सिकिन' या द्रव्यामुळें त्यांच्यांत उत्पन्न होतो. हें द्रव्य बियांत असतें. यांचें लोणचें घालतात व तिखटपणाकरितां अनेक पदार्थांत यांची पूड मिसळतात. औषधाकरितांहि यांचा उपयोग होतो. यांच्यापैकीं कांहीं जातींत 'कायेन' मिरीं पडतात.

मिरची, बटाटा, वांगें व तंबाखू, हीं सर्व झुडपे वनस्पतिशास्त्रदृष्ट्या एका वर्गांत मोडतात. या सर्वांची लागवड बागाइतांत व जिराइतांत करतात. या सर्व पिकांस पालाश ( पोटॅश ) हें पोषक द्रव्य असणाऱ्या खतानें फायदा होतो. तें द्रव्य राख व सोरा यांत असतें. हिंदुस्थानांत मिरची सर्वत्र पिकते. मिरची ही अमेरिका खंडांतून येथें आली असें म्हणतात. मिरची लागवडीस येण्यापूर्वी मिरीं वापरण्यांत येत असावींत. या पिकाखालीं मुंबई इलाख्यांत दरवर्षी सुमारें दीड लाख एकर जमीन असते. मद्रास इलाख्यांत, म्हैसूर संस्थानांत व मोंगलाईत मिरचीचें पीक जास्त होतें. लांब ( खानदेशी ), ब्याडगी ( धारवाडी ) आणि गोव्याची असे वर्ग करतां येतात. गोव्यांतील मिरचीचें साल जाड असतें व ती तिखटपणाला कमी असते. आंखूड–लवंगी ही जात फार तिखट असते. भोपळी अगर भाजीची मिरची ही जात धारवाड–बेळगांव जिल्ह्यांत बरीच होते. मिरच्या विकण्यापूर्वी वाळवाव्या लागतात. मिरचीच्या बिवडांत ऊंस चांगला होतो. सरासरी दर एकरीं वाळलेल्या मिरच्यांचें उत्पन्न पाहतां जिराईत पीक ७५० ते १००० पौंड व बागाईत पीक १२०० ते २००० पौंड असतें. मिरचीचें उत्पन्न सरासरी तंबाखूच्या बरोबरीचें, उंसाच्या निम्म्यानें व हळदीच्या तिसऱ्या हिश्श्यानें येतें. मिरची जठराग्नि प्रदीप्त करते. औषधी आहे. थंडीपासून पोट दुखत असल्यास थोडें बीं ऊन पाण्याबरोबर गिळतात. पिसाळलेल्या कुत्र्याचा दंश झाल्यास जखमेंत लाल मिरच्या वाटून भरतात.

उत्तर हिंदुस्थानांत मिरच्या फार वापरीत नाहींत. पण द. हिंदुस्थानांत यांचा खप अतिशय आहे. पुष्कळांना तिखटाशिवाय जेवण जात नाहीं. युरोपियन लोक तिखटासाठीं मिऱ्यांचा उपयोग करतात.

**मिरज संस्थान**—१. मोठी पाती–याचें क्षे. फ. ३६८ चौरस मैल. लो. सं. ( १९४१ ) १,०८,५४७ व उत्पन्न ९,३६,००० रुपये. यांत गांवें ६२ असून हें इंग्रज सरकारास १२५५८ रुपये सालीना खंडणी देत असे. याचे कसबा मिरज, लक्ष्मेश्वर व मोडनिंब असे तीन अलग अलग तालुके आहेत. कृष्णा, वारणा व भीमा या मोठ्या नद्या संस्थानांतून वाहतात. हवा आरोग्यकारक व पाऊस सरासरी २० ते २५ इंच पडतो. मिरज व लक्ष्मेश्वर येथें हातमाग बरेच आहेत. मिरज ही संस्थानची राजधानी असून तिची लोकसंख्या २५ हजारांवर आहे. येथें

एक इंग्रजी हायस्कूल, दवाखाना, सरकारी कचेऱ्या, टाउन हॉल, वगैरे संस्था व इमारती आहेत. मिरजेचा किल्ला बहामनी राजांनीं स. १४९३ च्या पूर्वी बांधला. शिवाजीच्या पहिल्या धामधुमींत मिरज ही रुस्तुमजमान् याची जहागीर होती. विजापूरकराकडून औरंगजेबानें तो किल्ला घेतल्यावर त्याच्या पश्चात् निजामाकडे त्याची मालकी आली व पुढें पेशव्यांनीं तो घेऊन गोविंद हरि पटवर्धनास सरंजामांत नेमून दिला; तेव्हांपासून तो पटवर्धनांच्या ताब्यांत आहे.

पटवर्धनांचा मूळपुरुष हरभट हा होय. नारोपंत इचलकरंजीकरांतर्फे हरभटाच्या गोविंदराव या मुलास थोरल्या बाजीरावानें आपल्या ५२ पागांतील इंद्रोजी कदम याच्या पागेची फडणविशी दिली व पुढें इंद्रोजी वारल्यावर त्याची पागाच गोविंदरावास मिळाली. गोविंदरावानें कर्नाटकांत महत्त्वाच्या पुष्कळ कामगिऱ्या केल्या, त्यामुळें पेशव्यांनीं मिरजेचा किल्ला व आसपासचा प्रांत गोविंदराव व त्याचे पुतणे परशुरामभाऊ आणि नीळकंठ या तिघांच्या नांवें ८ हजार स्वार ठेवण्यासाठीं हा २५ लाखांचा प्रांत सरंजाम म्हणून दिला. गोविंदरावाचा मुलगा गोपाळराव (पाहा) हाहि फार पराक्रमी निपजला. गोपाळरावानें हैदर व भोसले यांच्या स्वाऱ्यांत प्रमुखत्वानें भाग घेतला. कर्नाटकांत त्याचा दरारा फार होता. तो मुत्सद्दी, शूर व करारी होता. सांप्रतचे विद्यमान मिरजेचे संस्थानिक यांचे वडील श्रीमंत गंगाधरराव बाळासाहेब यांना १८८७ त मुखत्यारी मिळाली. त्यांना मल्लविद्येची उत्कृष्ट माहिती असून कलाकौशल्याची व धंदेशिक्षणाची फार आवड असे. त्यांनीं प्रजेवरील निरनिराळ्या ३३ बाबींचे त्रासदायक कर माफ केले. त्यांनीं महाराष्ट्रांतील अनेक संस्थांना मदत केली आहे. हे १९३९ सालीं वारले. यांचे वडील चिरंजीव नारायणराव ऊर्फ तात्यासाहेब हे सुविद्य आहेत. आतां संस्थान मुंबई इलाख्यात विलीन झालें आहे.

२. छोटी पाती—याचें क्षे. फ. १९४ चौरस मैल आहे. लो. सं. (१९४१) ४६,२९५ व उत्पन्न ३,७७,००० रुपये असून हें इंग्रज सरकारास ७,३८९ रुपये खंडणी देत असे. बहुतेक प्रदेश सपाट असून जमीन सुपीक व काळी आहे. कृष्णा व वारणा या मुख्य नद्या आहेत. पावसाचें मान १५ इंच असतें. खनिज पदार्थांत इमारतीच्या उपयोगाचा काळा व कठिण दगड सांपडतो. शेती हा मुख्य धंदा असल्यानें ⅞ जमीन लागवडीखालीं आहे. बुधगांव व गुडगेरी येथें हातमाग बरेच असून, लुगडीं, धोतरें, वगैरे कापड तयार होतें. बुधगांव ही संस्थानची राजधानी असून तेथें सुमारें पांच हजार वस्ती आहे. संस्थानांत कोळ्याची वस्ती पुष्कळ आहे.

पटवर्धन घराण्यांतील माधवराव गंगाधर यानें मिरज किल्ला घेण्याचा प्रयत्न केला, पण तो साधला नाहीं तेव्हां तो मिरजेनजीक एका मळ्यांत राहूं लागला. त्यावरून या शाखेस मळेकर म्हणूं लागले. मागचे संस्थानिक माधवराव बाबासाहेब हे कुरुंदवाड घराण्यांतून इकडे दत्तक आले (१८९९). यांना व्यायामाचा व शिकारीचा शोक असे. हे नुकतेच (१९५०) वारले. संस्थान १९४८ सालीं मुंबई प्रांतांत विलीन झालें.

**मिराबाई**—एक सुप्रसिद्ध हिंदी कवयित्री व मेवाडची राणी. हिच्यासंबंधीं निरनिराळी माहिती आढळते. कोणी हिला कुंभराण्याची पत्नी समजतात. ही मेडत्याच्या राठोड रत्नसिंहाची कन्या. हिचा जन्म पंधराव्या शतकाच्या अगदीं अखेरीस झाला असावा. हिचें लग्न उदेपूरच्या भोजराज गुहिलोताशीं झालें व नवरा लग्नानंतर दोन वर्षांनीं वारला. तेव्हांपासून ही कृष्णभक्ति करूं लागली. या भक्तींत ही अत्यंत तल्लीन होऊन जात असे. हिचीं भक्तिपर पद्यें हिंदींत आहेत व गुजराथी भार्षेतहि आढळतात. 'मीराके प्रभु' असा चरण पदाच्या शेवटीं असतो. हिने जयदेवाच्या गीतगोविंदावरहि 'रागगोविंद' नांवाची टीका लिहिल्याचें सांगतात. हिचा गुरु रैदास दिसतो. ही वृंदावनास असे. ही राजकुलांतील होती तरी अगदीं साध्या संतिणीप्रमाणें राहत असे. हिच्यासंबंधीं अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. गवयी लोकांत हिच्या पदांची अतिशय आवड दिसून येते. हीं पदें अतिशय भावपूर्ण व रसाळ आहेत. हिंदी आणि गुजराथी वाङ्मयांत मिराबाईचा दर्जा फार मोठा आहे.

**मिराबाईचा मल्हार**—हा राग आसावरी थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतात म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. या रागांत दोन गांधार, दोन धैवत व दोन निषाद हे स्वर लावण्याचा गायकांचा परिपाठ आहे. प्रसिद्ध भगवद्भक्त मिराबाई हिनें हा राग प्रचलित केला अशी दंतकथा आहे. हा एक मल्हाराचा प्रकार आहे.

**मिराबेन** (जन्म सु. १९००)—(मिस् मॅडेलिन स्लेड). म. गांधींची पट्टशिष्या. या एका ब्रिटिश आरमारांतील ॲडमिरलच्या कन्या होत. आपल्या सौख्यमय आयुष्याचा व सर्वस्वाचा त्याग करून या महात्मा गांधी यांच्या आश्रमात येऊन राहिल्या व लवकरच महात्मा गांधींच्या अत्यंत विश्वासांतल्या अशा एक निष्ठावंत अनुयायी बनल्या. १९३० मध्यें महात्मा गांधी तुरुंगवासांत असतांना यांनीं 'यंग इंडिया' पत्राचें संपादन केलें. सत्याग्रहाच्या चळवळींत यांस दोन वेळा पकडण्यांत

आलें होतें. १९३१ मध्यें या महात्मा गांधींच्याबरोबर इंग्लंड-मध्यें गेल्या होत्या. यांनीं १९३४–३५ सालीं ब्रिटन व अमेरिका या देशांत हिंदुस्थानबद्दल तेथील लोकांस माहिती देण्याकरितां फार मोठा प्रवास केला व अनेक व्याख्यानें दिलीं.

**मिराबो, ग्राबिएल ओनोरे रिकेटी** ( १७४९–९१ )— एक फ्रेंच मुत्सद्दी व ग्रंथकार. लष्करी शाळेमधील शिक्षणक्रम आटोपल्यावर घोडेस्वाराच्या पथकांमध्यें यानें नोकरी धरिली. उच्छृंखलपणाबद्दल त्याला एक-दोनदां तुरुंगांतहि जावें लागलें. त्याचे कांहीं ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या ग्रंथांत फ्रेंच शासनपद्धतीचें सुंदर विवरण केलेलें आढळतें. त्यानें प्रशियासंबंधीं सर्व माहिती मिळवून एक ग्रंथ लिहिला. सन १७८० च्या राज्यक्रांतीच्या वेळींहि त्यानें महत्त्वाची कामगिरी बजावली. फ्रान्सच्या अंतर्गत राज्यकारभारांत इतर राष्ट्रांना ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं या मताचा तो होता. तो व्यावहारिक राजकारणपटु व मुत्सद्दी होता. लोकनायकांच्या अंगीं हवें असणारें वक्तृत्व त्याच्या अंगीं प्रामुख्यानें वसत होतें.

**मिराशी**—मुसलमान लोकांत गाणारे, जुन्या गोष्टी, वंशावळी आणि पूर्वजांचीं कृत्यें सांगणारे भाटांसारखे हे लोक असून जातिसंशोधक क्रुक्सच्या मतें हे डोम जातींतील असावेत. हे लोक पूर्वीं हिंदू होते. १२९५ सालीं अल्लाउद्दीन खिलजीच्या दरबारीं असलेल्या अमीर खुश्रू कवीनें यांना मुसलमान केलें असें म्हणतात. यांच्या बायका जनानखान्यांत नाचतात व तेथें असलेल्या बायकांचें इतर तऱ्हेनेंहि मनोरंजन करतात.

**मिरासदार**—महाराष्ट्रांतील लोकांची अशी समजूत आहे कीं, प्राचीन काळीं प्रत्येक शेत कोणाच्या ना कोणाच्या तरी मालकीचें असे. जोंपर्यंत शेताचा मालक सरकारांत नियमितपणें सारा भरतो तोंपर्यंत त्याजकडून शेत काढून घेण्याचा सरकारास कांहीं एक हक्क नाहीं. अशा प्रकारच्या शेतकऱ्यांस पुढें उपरी कुळांपासून वेगळे ओळखण्याकरितां मिरासदार ही संज्ञा देण्यांत आली. मिरासदारास आपली जमीन दुसऱ्या कोणासहि विकण्याचा हक्क आहे. परंतु उपरी कुळांस तसें करतां येत नाहीं. मिरासदाराची जमीन वंशपरंपरा त्याच्याच घराण्यांत राहते. मिरासदार हें मुसलमानी नांव असून थळकरी हा त्याच अर्थाचा मराठी शब्द आहे. मिराशीचे चार प्रकार : १ वतनदार; २ मिरासदार; ३ उपरी; व ४ ओवाडकरू. महारहि मिरासदार असतात.

**मिरीं**—[ वर्ग-पिपरनासी, नायग्रम. इं. पेप्पर ]. काळीं मिरीं हीं मूळ पूर्वेकडील बेटांत आढळतात. यांचा वेल असून यांचीं पानें रुंद, लांबट, वाटोळीं व विड्याच्या पानांप्रमाणें कळीदार टोंकाचीं असतात. यांना लहान वाटोळीं फळें येतात. तीं पिकलीं म्हणजे तांबडीं लाल दिसतात. मलाक्का, जावा व विशेषतः सुमात्रा बेटांतील मिरीं उत्तम असतात. यांची एक पांढरी जात

आहे व ती उत्कृष्ट असते. मिरीं पिकलीं म्हणजे तोडतात व त्यांची साल सोलून काढतात. नागवेल ही याच जातीची वेल आहे. कायेन व गिनी मिरीं हीं दुसऱ्याच एका जातीच्या रोपापासून ( कॅप्सिकम ) मिळतात.

हिंदुस्थानांत पूर्वीपासून मिरीं होतात. यांचे वेल कानडा जिल्ह्याच्या जंगलांत रानटी स्थितींत आढळतात. मिऱ्यांची लागवड उत्तर मलबार, वैनाड, त्रावणकोर, कारवार जिल्ह्यांतील शिरसी, सिद्दापूर व सुपें तालुका यांत बऱ्याच प्रमाणांत होते. आंबा व फणस या झाडांवरहि वेल सोडतात. त्यांची लागवड कारवारांतील सुपारी, वेलदोडे यांच्या बागांत कागदाळी जमिनींत करतात. मिऱ्यांची लागवड जून-जुलै महिन्यांत वेलांचीं कलमें अगर 'लेअरिंग' करून करतात. वेल लाविल्यापासून तिसऱ्या अगर चौथ्या वर्षी फळें येऊं लागतात. त्यांचीं डेखें चोळून काढतात व तीं उन्हांत वाळवितात. मिरीं वाळलीं म्हणजे तीं काळीं होतात व सुरकुततात. एक हजार घोंसांपासून काढलेलीं मिरीं वाळल्यावर सात शेर भरतात. दर एकरीं सरासरी उत्पन्न ३००–५०० पौंडांपर्यंत येतें.

पानवेलीप्रमाणें मिरवेलीची लागवड कोंकण या भागांत होत असते. मिरवेलीच्या शेंगांस गज पिंपळी म्हणतात व

मुळास 'चवक' म्हणतात. मिरी औषधी आहेत. वायूनें अंग धरल्यास मिरी वाटून लेप करतात. खोकल्यावर दुधांत मिरी कढवून देतात. ही काढयांत घालतात.

**मिर्झा, सर इस्माइल** (१८८३- )— एक हिंदी मुसलमान मुत्सद्दी व संस्थानी दिवाण. यांचें शिक्षण बंगलोर येथील वेस्लेयन मिशन हायस्कूल व पुढें म्हैसूरच्या महाराजांच्या बरोबर व नंतर सेंट्रल कॉलेजमध्यें झालें. हे प्रथम म्हैसूर संस्थानांत असिस्टंट पोलिस सुपरिंटेंडेंट म्हणून नोकरीस होते. १९१४ मध्यें हे महाराजांच्या खास दिमतीस राहिले व लवकरच हे महाराजांचे हुजूर चिटणीस झाले. १९२२ मध्यें खासगी चिटणीस झाले. व १९२६ मध्यें दिवाण झाले. दक्षिण हिंदुस्थानांतील म्हैसूर, कोचीन, त्रावणकोर व पदुकोट्टा या संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून पहिल्या गोलमेज परिषदेस हे गेले होते. दुसऱ्या गोलमेज परिषदेस म्हैसूर, जयपूर व जोधपूर या संस्थानांतर्फे गेले होते. तिसऱ्या गोलमेज परिषदेस व जॉइंट पार्लमेंटरी कमिटीस म्हैसूर संस्थानचे प्रतिनिधि म्हणून गेले होते. यांच्या कारकीर्दीत म्हैसूर संस्थानची अनेक बाबतींत प्रगति झाली. माजी दिवाण सर विश्वेश्वर अय्या यांनीं ज्या योजना आंखून ठेवल्या होत्या त्या यांनीं पुऱ्या केल्या. १९४१ सालीं यांनीं राजीनामा दिला. नंतर हैद्राबाद संस्थानांत थोडे दिवस दिवाण म्हणून गेले होते.

**मिर्झापूर**—सं. प्रांताच्या बनारस विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४,३२२ चौरस मैल. या भागांत गंगा नदीच्या दक्षिणेस विंध्य पर्वताच्या शाखा थेट कैमूरपर्यंत पसरल्या आहेत. यांत गंगा, शोण, कर्मनाशा व गराई या मुख्य नद्या आहेत. येथें सरासरी ४१ इंच पाऊस पडतो. जिल्ह्यांत ६ शहरें व ४,२५७ खेडीं असून लो. सं.(१९४१) ८,९९,६२३ आहे. येथें हिंदी भाषा प्रचलित आहे. जमिनींत तांदूळ, चणे, कोद्रा, गहूं, बाजरी, ज्वारी, मक्का, तीळ व अळशी हीं धान्यें होत असून ऊंसाचें पीक व खसखशीचीहि लागवड होते. उत्तरेकडील भागांत इमारतीला योग्य असा दगड सांपडतो. चुनारजवळ शिंदीच्या झाडापासून साखर तयार होते. मिर्झापूरमध्यें उत्तम पितळेचीं भांडीं होतात. येथें लाखेचा रंग व लोंकरीचें कापड तयार होतें. मिर्झापूर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. विंध्याचल धरून सुमारें ७१,००० आहे. जवळच विंध्याचल गांवीं विंध्येश्वरी देवीचें देऊळ आहे. तेथें मोठी यात्रा भरते. मिर्झापूर येथें गंगा नदीस घाट बांधिला आहे. या शहरांत पितळेचीं सुंदर भांडीं तयार होत असून लोंकरी व सुती कापडहि तयार होतें.

**मिलन**—इटली, लॉंबर्डी विभागांतील प्रसिद्ध शहर. लो. सं. सु. अकरा लक्ष आहे. जुन्या काळच्या कलाकौशल्याच्या निदर्शक अशा पुष्कळ इमारती आहेत. स्फारझेस्को नांवाच्या किल्ल्यांत प्राचीन वस्तूंचें संग्रहालय आहे. येथें एक विश्वविद्यालय व त्याच्याच योग्यतेच्या 'लिटररी ॲकॅडमी' व 'हायर टेक्निकल इन्स्टिटयूट ऑफ मिलन' नांवाच्या दोन शिक्षणसंस्था आहेत. गायनकलेकरितां हें शहर अत्यंत प्रसिद्ध आहे. येथें रेशमाचे, शस्त्रांचे व इतर सर्व लोखंडी सामानाचे कारखाने आहेत. इटलींत रेशमाच्या व्यापारासाठीं हें सर्वांत प्रसिद्ध शहर आहे. येथील एकंदर व्यापारहि फार मोठा आहे. तिसऱ्या शतकांत हें रोमनांच्या ताब्यांत असून रोमच्या खालोखाल याची प्रसिद्धि होती. ११०१ मध्यें येथें लोकसत्तेस आरंभ झाला.

**मिलर, ह्यूज** (१८०२-१८५६)—एक स्कॉटिश भूगर्भशास्त्रज्ञ. त्यानें प्रथम पाथरवटाचा धंदा सुरू केला; व वाङ्मयाचें वाचन चालू ठेवून लेखनकार्यहि तो करूं लागला, आणि पुढें एक उत्तम भूगर्भशास्त्रज्ञ बनला. 'दि ओल्ड रेड सँडस्टोन' (जुना तांबडा कुरुंद दगड) या त्यानें लिहिलेल्या पुस्तकाकडे शास्त्रज्ञांचें लक्ष वेधलें, व विद्वान् ग्रंथकार म्हणून त्याची प्रसिद्धि झाली. नंतर त्यानें ग्रंथ लिहिले, ते म्हणजे 'फर्स्ट इम्प्रेशन्स ऑफ इंग्लंड अँड इट्स पीपल' (इंग्लंड आणि त्याचे लोक यांविषयीं प्रथम होणारें मत); 'फूटस्टेप्स् ऑफ दि क्रिएटर' (स्रष्टयाचीं पावलें); 'माय स्कूल्स अँड स्कूलमास्टर्स' (माझ्या शाळा व शाळामास्तर— यांत त्याच्या पूर्ववयाची मनोरंजक हकीगत आहे); आणि 'दि टेस्टिमनी ऑफ दि रॉक्स' (खडकांचा पुरावा) हे होत.

**मिलिकन, रॉबर्ट अँड्र्यूज** (१८६८- )— हा एक अमेरिकन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ असून शिकागो विद्यापीठाचा १८९६ ते १९२१ पर्यंत वाङ्मयशाखेचा सभासद होता. १९२१ मध्यें तो कॅलिफोर्निया येथील इस्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी आणि नार्मन ब्रिज् लॅबोरेटरी यांच्या नियामक मंडळाचा प्रमुख झाला. १९२३ मध्यें याला विद्युत्कणाच्या विलगीकरणाबद्दल व त्यावरील विद्युत्भारमापनाबद्दल नोबेल पारितोषिक मिळालें. १९३२ मध्यें विश्वकिरणांच्या संशोधनाबद्दल यास रूझवेल्ट संस्थेचें पदक मिळालें.

**मिलिंद** (खि. पू. १५०)—याला मिनांडर असेंहि ग्रीक नांव आहे. उत्तर हिंदुस्थानच्या कांहीं भागांवर राज्य करणारा हा एक महापराक्रमी ग्रीक राजा होता. हिंदुकुश पर्वताजवळील अलेक्झांड्रियाच्या शेजारच्या अलसंद नगरांत याचा जन्म झाला. पुढें स्थविर नागसेनाच्या उपदेशानुसार यानें बौद्ध धर्म स्वीकारला. याचें राज्य राजपुतान्यावरहि असावें. काठेवाड व गुजराथ येथें याच्या वेळचीं नाणीं उपलब्ध झालीं आहेत. स्ट्रेबोच्या मतें यानें पातालन् (सिंध), सुराष्ट्रस् (सोरठ, दक्षिणी काठेवाड), व सागरडिस् (कच्छ) जिंकलें. प्रजेच्या हिताकडे लक्ष देऊन व

वागून यानें लोकांचा विश्वास संपादन केला. हा इतका लोकप्रिय होता कीं, याच्या मृत्यूनंतर याची राख लोकांनीं वांटून घेतली व आपल्या जागीं नेल्यावर तीवर स्तूप बांधले.

'मिलिंदपन्ह (प्रश्न)' नांवाचा एक तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ यानें लिहिला आहे. शुंग राजा पुष्यमित्र याच्याशीं याचें फार वैर होतें. दोघे एकमेकांचे मुलूख जिंकीत व पराभव पावल्यावर सोडीत. अशाच एका लढाईंत मिलिंद मारला गेला. सियालकोट हीं त्याची राजधानी होती.

**मिल्टन, जॉन** (१६०८–१६७४)—सुप्रसिद्ध इंग्रज कवि. सेंट पॉल्स व केंब्रिज येथील ख्राइस्ट कॉलेजमध्यें याचें शिक्षण झालें. लहानपणापासून त्याला गाण्याची व कविता करण्याची फार आवड असे. कॉलेजमध्यें असतांनाच त्यानें 'नेटिव्हिटी' वगैरे कविता व बऱ्याच चतुर्दशपदी कविता लिहिल्या. त्याचीं 'अर्केड्स' व 'कोमस' हीं छद्मवेषी नाटकें (मास्क्स) उत्कृष्ट असून तेवढ्यावर सुद्धां मिल्टनचें नांव अजरामर झालें असतें. लंडन येथें मिल्टननें सार्वजनिक चळवळींत आपलें पूर्ण लक्ष घातलें व तत्कालीन वादग्रस्त विषयांवर 'रिफॉर्म ऑफ डिसिप्लिन', 'डायव्होर्स', 'एज्युकेशन', 'एरोपॅजीटिका', 'डिफेन्शियो' हे महत्त्वाचे गद्य व पद्य ग्रंथ लिहिले. त्याचे बहुतेक पद्य ग्रंथ धार्मिक स्वरूपाचे आहेत. तो 'प्युरिटन' मताचा होता व यादवी युद्धांत तो लोकपक्षाच्या बाजूस होता. तेव्हां १६४५ मध्यें कॉमनवेल्थमध्यें लॅटिन चिटणीस व १६५५ त क्रॉम्वेलचा चिटणीस झाला. राजशाही परत आल्यावर तो निवृत्तच झाला. १६५२ पासून तो अंधळाच होता. पण पुढील काळांत त्यानें 'पॅरॅडाइज लॉस्ट' (१६५८–६४), 'पॅरॅडाइज रीगेन्ड' (१६७१) हे जगप्रसिद्ध ग्रंथ लिहिले. 'सॅमसन ॲगनिस्टस' हाहि ग्रंथ त्यानें लिहिला. इंग्लिश वाङ्मयांत शेक्स्पिअरच्या खालोखाल मिल्टनची गणना होते. विशाल कल्पना, सूचक व परिणामकारी भाषा व माधुर्य हे त्याच्या ग्रंथांतील तीन विशेष होत. 'पॅरॅडाइज लॉस्ट' या आपल्या ग्रंथानें त्यानें जगांतील महाकवींमध्यें आपलें स्थान कायम करून ठेवलें.

**मिल, जॉन स्टुअर्ट** (१८०६–७३)—एक इंग्रज तत्त्ववेत्ता व अर्थशास्त्रज्ञ. हा बेंथामच्या उपयुक्ततावादाचा पुरस्कर्ता होता. जॉन १५ व्या वर्षींच वाङ्मय, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र व गणित या विषयांत तरबेज झाला. बेंथामच्या अर्थशास्त्रविषयक सिद्धान्तांमध्यें त्यानें नैपुण्य संपादन केलें. 'इंडिया हाउस'मध्यें १८२३ सालीं त्यानें कारकुनीची जागा पत्करिली. १८२५ सालीं त्यानें बेंथामचें 'रॅशनल ऑफ ज्युडिशियल एव्हिडन्स' हें पुस्तक प्रकाशित केलें, नंतर त्यानें 'रॅडिकल' मासिकांत बरेच लेख लिहिले. त्यानें प्रसिद्ध केलेले ग्रंथ—'लॉजिक' (तर्कशास्त्र); 'प्रिन्सिपल्स ऑफ पोलिटिकल एकॉनमी' (अर्थशास्त्राचीं तत्त्वें); 'लिबर्टी' (स्वातंत्र्य); 'युटिलिटेरियानिझम्' (उपयुक्ततावाद); 'रेप्रेझेंटेटिव्ह गव्हर्मेंट' (प्रातिनिधिक राज्यपद्धति), 'दि सब्जेक्शन ऑफ विमेन' (स्त्रियांची परवशता); इ. आहेत. त्याचा एक आत्मवृत्तपर ग्रंथहि आहे. मिल्नें उपयुक्ततावादाचा फार जोराचा पुरस्कार करून विचारी लोकांत खळबळ माजवून सोडली. स्त्रियांच्या बाबतींतील त्याच्या प्रगमनशील विचारांची छाप आपल्याकडील सुधारकांवर पडलेली स्पष्ट दिसते. १९ व्या शतकांतील वैचारिक क्रांतीच्या इतिहासांत मिल्चें नांव प्रामुख्यानें येतें.

**मिशन**—ख्रिस्ताच्या आज्ञेप्रमाणें ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याच्या कार्यास मिशन म्हणतात. 'मला सर्व पृथ्वीवर व स्वर्गांत सर्व सत्ता देण्यांत आली आहे, तेव्हां तुम्ही जाऊन सर्व राष्ट्रांस उपदेश करा', अशा ख्रिस्तोपदेशाप्रमाणें झालेल्या या कार्याचा इतिहास, त्याचें स्वरूप व घटना यांची माहिती थोडक्यांत पुढें दिली आहे.

पहिल्या तीन शतकांत या कार्याचा प्रसार यरुशलेम शहरापासून रोमन बादशाही सत्तेकडून वरचेवर होणाऱ्या भयंकर जुलमास न जुमानतां सर्व रोमन साम्राज्यभर झाला. या पहिल्या कालाचा शेवट कॉन्स्टंटाइन हा बादशहा स्वतः ख्रिस्ती संप्रदायाचा स्वीकार करून त्यास साम्राज्याचा धर्म म्हणून मान्यता देतो त्या वेळीं होतो. कांहीं प्रचारक रोमन साम्राज्याच्या बाहेरहि दूरवर गेल्याचें आढळून येतें. ख्रिस्ताच्या बारा प्रेषितांपैकीं एक सेंट थॉमस हा हिंदुस्थानांत आल्याबद्दलची खात्रीलायक माहिती मिळते. दक्षिण हिंदुस्थानांतील कांहीं ख्रिस्ती मंडळी आपण त्या काळांत ख्रिस्ती झालों असें सांगतात. आर्मेनिया या देशानें रोमन साम्राज्यापूर्वींच कित्येक वर्षें व प्रथम ख्रिस्ती धर्मास आपल्या राष्ट्राच्या धर्माचें स्थान दिलें होतें.

यापुढील एक हजार वर्षांच्या काळांत रोमन साम्राज्यावर धाड घालणाऱ्या जर्मन टोळ्यांमध्यें ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराचें कार्य चालू असून त्याच वेळीं मध्य, उत्तर व पूर्व युरोपमध्यें धर्मप्रसाराचें कार्य सुरू होतें. इ. स. ४३० पासून सेंट पॅट्रिक यानें आयर्लंड देशांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार चालविला होता. आयर्लंडमधील मठवासी इंग्लंडमध्यें गेले व इंग्रज मठवासीयांच्या साहाय्यानें त्यांनीं मध्य युरोपांतील जर्मानिक टोळ्यांमध्यें ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. त्या वेळचे बेनेडिक्टाइन मठ हीं धर्मप्रसाराचीं केन्द्रें असून त्या मठांतील मठवासीयांनीं धर्मप्रसाराच्या कार्याबरोबरच जंगलांचें रूपांतर शेतजमिनींमध्यें करून व शिक्षणाचा प्रसार करून युरोपीय संस्कृतीचा पाया घातला,

जर्मनीमधून कांहीं व कॉन्स्टँटिनोपलहून कांहीं धर्मोपदेशक ईशान्य युरोप खंडांतील स्लाव्ह देशांत गेले व याप्रमाणें १३ व्या शतकाच्या अखेरीस सर्व युरोप खंड ख्रिस्ती मतानुयायी बनला. मध्ययुगाच्या उत्तरकालामध्यें बरेचसे धर्मप्रचारक विशेषतः मॉंटे कॉर्व्हो चीनपर्यंत गेले. अमेरिका, हिंदुस्थान व पूर्वेकडील देश इकडे जाणाऱ्या जलमार्गांचा शोध लागल्यानंतर या नवीन देशांत फार मोठ्या संख्येनें प्रचारक गेले. अठराव्या शतकामध्यें हें कार्य थोडें मंदावलें होतें. परंतु त्या शतकाच्या अखेरीपासून सर्व जगामध्यें धर्मप्रसाराचें कार्य फार मोठ्या प्रमाणावर व अधिक जोमानें चालू आहे. या कालांत विशेषतः आशिया व आफ्रिका खंडांत देश्य धर्मप्रचारकहि बरेंच कार्य करीत आहेत.

सामान्यतः या प्रचाराचें स्वरूप धार्मिक असून त्याचा आधार या प्रचारकांच्या येशू ख्रिस्तावरील श्रद्धेमध्यें असून त्याला ते सर्व जगाचा उद्धारकर्ता व आध्यात्मिक प्रभु मानतात. या प्रचाराचें मुख्य साधन प्रवचन व शब्दाचें सामर्थ्य हें असतें. तथापि प्रारंभीं कांहीं बाबतींत, उदाहरणार्थ, सॅक्सन लोकांतील 'शार्लेमनच्या धर्मांतरा'मध्यें अर्वाचीन वसाहती स्थापन करण्यामध्यें तरवारीचाहि उपयोग करण्यांत आलेला आहे. सर्व धर्मप्रसाराचा सर्व कालामध्यें मुख्य हेतु ख्रिस्तावर श्रद्धा व संस्कार यांच्या द्वारें सचेतन ऐक्य स्थापन करणें हाच होता.

सध्यांच्या धर्मप्रसाराच्या चळवळीचे दोन मुख्य भाग पडतात: १. प्रॉटेस्टंट, व २. रोमन कॅथॉलिक मिशन. सोळाव्या शतकामध्यें कॅथॉलिक पंथापासून जे वेगळे झाले ते प्रॉटेस्टंट पंथी मिशनमध्यें कार्य करतात. यांच्या पुष्कळ खासगी संस्था आहेत. या पंथांमध्यें अनेक पंथभेद असून त्यांची पूजापद्धतिहि निरनिराळी असते व त्यांचें सामाजिक सुधारणा व शिक्षण यांकडे विशेष लक्ष असतें.

कॅथॉलिक मिशननीं जुनेंच संप्रदायाचें कार्य पुढें चालविलें आहे. त्यांचा सर्व कारभार एका केंद्राकडून चालतो व पोपकडून धर्मप्रसारक मंडळामार्फत चालविला जातो. कॅथॉलिक मिशनचें काम बहुधा विशिष्ट धार्मिक सांप्रदायिक पंथीयांकडून चालविलें जातें व हे कार्यकर्ते 'निर्धनता, ब्रह्मचर्य व आज्ञापालन' या तीन प्रतिज्ञांनीं बद्ध असतात. सर्व मिशनरी लोक स्वयंप्रेरणेनें हें कार्य करीत असतात व या कार्यास लागणारा पैसा लोकांनीं स्वेच्छेनें दिलेल्या देणग्यांतून मिळतो व तो दर वर्षीं लक्षांवधि रुपयांइतका असतो.

'मिशन' संस्थेचा जन्म मुख्यतः ख्रिस्ती धर्मामधून झाला असला तरी असें धर्मप्रसाराचें तत्त्व फार प्राचीन काळापासूनच अस्तित्वांत आलें होतें. हिंदुस्थानांतील बौद्धांनीं हें तत्त्व प्रथम अमलांत आणलें होतें.

बौद्ध मिशन—अशोकानें हिंदुस्थानखेरीज चीन, तिबेट, इ. बाहेरच्या देशांतहि धर्मोपदेशक पाठविले होते. ख्रिस्ती शकाच्या ६७ व्या वर्षी बौद्ध धर्मानें चीनच्या दरबारांत प्रवेश केला होता. मध्य आशिया व पार्थिया या ठिकाणीं बौद्ध भिक्षूंनीं आपल्या धर्माचा प्रसार करण्यास सुरुवात केली होती. अनाथांना मदत करून, रोगग्रस्तांना दवापाणी देऊन व अनेक प्रकारांनीं त्यांनीं हें काम मोठ्या आस्थेनें चालविलें होतें. अवघ्या दीड शतकांत कोरिया राष्ट्रानें बौद्ध धर्माचा अंगीकार केला व जपानमध्यें कांहीं काळ बौद्ध धर्म हा राजधर्म म्हणून गाजला.

इस्लामी मिशन—इस्लामी धर्माचा जनक महंमद पैगंबर हा स्वतः मोठा धर्मप्रसारक होता; व धर्मोपदेशक कसे असावेत, यासंबंधीं त्यानें नियमहि करून ठेवले होते. सत्तेच्या व तरवारीच्या जोरावर त्यांनीं आपल्या धर्माचा बराच प्रसार केला होता.

१० व्या शतकांत त्यांनीं तुर्कांना व अफगाण लोकांना इस्लामाची दीक्षा दिली. जावा, सुमात्रा, चीन, मलाया द्वीपकल्प यांत इस्लामी धर्मोपदेशकांचा संचार व बाटविण्याची क्रिया सुरू झाली. हिंदुस्थानमध्यें शेक इस्मायल (१००५), सय्यद नादीरशहा (१०३९), अल्दअल्ला, नूर सतागर, मुइनअल्दीन, चिस्ती, वगैरे धर्मप्रसारकांनीं इस्लामी धर्माचा बराच प्रसार केला. धर्मोपदेशकांच्या संस्था मात्र १९ व्या शतकांत उदयास येऊं लागल्या.

पारशी मिशन—या धर्माचा पुरस्कर्ता झरथुष्ट्र यानें आपल्या हयातींत पुष्कळशा प्रदेशावर आपला धर्म प्रसृत केला. राजसत्तेच्या जोरावर आर्मेनिया, चीन, इत्यादि भागांतहि पारशी धर्माचा प्रसार झाला. सस्सानियन घराण्याच्या ऱ्हासानंतर धर्मप्रसाराचें कार्य समाप्तच झालें.

हिंदुस्थानांतील ख्रिस्ती मिशन— हिंदुस्थानांत अगदीं पहिल्या प्रथम नेस्टोरियन पंथाचे धर्मोपदेशक आले. १६ व्या शतकांतील जेसुइट पंथ व १८ व्या शतकांत 'डॅनिश कोस्ट मिशन' या संस्थेच्या धर्मोपदेशकांच्या परिश्रमामुळें हिंदुस्थानांत ख्रिस्ती धर्माचें बीं थोडेंफार रुजलें. १९ व्या शतकाच्या प्रारंभीं विल्यम कॅरे यानें बायबलचें सात भाषांमध्यें भाषांतर करविलें. गरिबांना मदत करण्यासाठीं शेतकी संस्था व बँका काढल्या. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत मिशनरी सोसायट्यांनीं आपलें जाळें हिंदुस्थानभर पसरलें. शिक्षण आणि आरोग्य या बाबतींत या मिशनरी लोकांनीं या देशांत महत्त्वाचें व चिरस्मरणीय कार्य केलें आहे.

हिंदु मिशन—सर्व धर्मांपेक्षां हिंदु धर्मोच्याच मिशनरी संस्था फार थोड्या आहेत. हिंदु धर्म हा अत्यंत उदार मताचा असल्यानें तो कोणत्याहि धर्माचा तिरस्कार करीत नाहीं. परधर्मांच्या लोकांमध्यें जाऊन तेथें आपल्या धर्माला अनुयायी मिळविण्याची त्यानें कधींच खटपट केली नाहीं. हल्लीं मिशनरी संस्थांच्या अनुकरणानें आर्यसमाज, ब्राह्मोसमाज, हिंदु मिशनरी सोसायटी, इत्यादि संस्था निघाल्या आहेत. त्यांची माहिती त्या त्या ठिकाणीं सांपडेल.

**मिशमी लोक**—मिशमी टेंकड्या आसाम प्रांताच्या उत्तर सरहद्दीवर आहेत. यांत मिशमी नांवाचे लोक राहतात. येथील मिशमी लोकांत पोट-जाती आहेत. हे लोक तिबेटी-ब्रह्मी रक्ताचे असून अंगापिंडानें ठेंगणे व मजबूत आहेत. यांचे चेहरे मंगोलियन लोकांच्या चेहऱ्यांसारखे आहेत. यांच्यांत पुष्कळ बायका व गुरेढोरें असणें हें श्रीमंतीचें लक्षण समजलें जातें. या लोकांचें तिबेटाच्या लोकांशीं दळणवळण आहे. हे लोक त्यांच्याजवळून गुरें, लोंकरी कापड, तरवारी, धातूचीं भांडीं, वगैरे सामान घेतात व उलट कस्तुरी, मिशमी, जहर व मिशमी टीटा त्यांना देतात.

**मिश्र, द्वारकाप्रसाद** ( १९०१– )—एक हिंदी साहित्यिक व मध्यप्रांताचे एक मंत्री. हे जबलपूर म्युनिसिपालिटीचे अनेक वर्षें अध्यक्ष होते. बॅ. अभ्यंकर यांच्याबरोबर मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. १९३० व १९३२ या वर्षांच्या सत्याग्रह चळवळीमध्यें यांस तुरुंगवासाची शिक्षा झाली. यांनीं १९२४ मध्यें 'शारदा' नांवाचें हिंदी मासिक व १९३० मध्यें 'लोकमत' नांवाचें दैनिक चालविलें होतें. यांनीं हिंदीमध्यें 'कादंबिनी', 'हिंदुओंका स्वातंत्र्यप्रेम', इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत. १९३७ मध्यें काँग्रेसपक्षीय उमेदवार म्हणून मध्यप्रांत असेंब्लींत निवडून आले व स्थानिक स्वराज्य खात्याचे दिवाण होते ( १९३७–३९ ). १९४६ सालीं पुन्हां हे मंत्री झाले असतां प्रौढमतदानाची सुधारणा प्रथमच हिंदुस्थानांत यांनीं अमलांत आणली. यांचें 'कृष्णायन' हें हिंदी महाकाव्य प्रख्यात असून सागर विद्यापीठानें त्यासाठीं 'डॉक्टरेट' पदवी त्यांना अर्पण केली ( १९४७ ).

**मिश्र, श्यामविहारी** ( १८७३– )—एक हिंदी साहित्यिक. अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे एम्. ए. झाल्यावर यांनीं सरकारी नोकरींत अनेक हुद्यांवर कामें केलीं. हे कांहीं काळ छत्रपूर संस्थानचे दिवाण होते ( १९१०–१४ ). हे अलाहाबाद, बनारस, लखनौ या विद्यापीठांच्या कोर्टाचे सभासद असून फॅकल्टी ऑफ आर्ट्स व हिंदी कमिटीचे सभासद आहेत. काशी नागरी प्रचारिणी सभेचे हे सहा वर्षें अध्यक्ष होते. हिंदी साहित्य संमेलनाच्या ग्वाल्हेर येथें १९३३ सालीं भरलेल्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. सिव्हिल सर्व्हिस असोसिएशनचे हे सभासद आहेत. हे एक प्रख्यात हिंदी लेखक असून यांचीं पुस्तकें युनिव्हर्सिटींत अभ्यासक्रमांत नेमण्यांत येतात.

यांचे बंधु गणेशविहारी व शुकदेव हेहि चांगले साहित्यिक म्हणून प्रसिद्ध आहेत. यांच्या 'हिंदी नवरत्न' या ग्रंथांत नऊ प्रसिद्ध कवींच्या काव्याचा परामर्श घेतलेला आहे. 'मिश्रबंधु विनोद', 'नेत्रोन्मीलन' ( नाटक ), 'वीरमणी' ( कादंबरी ), 'भारतवर्षका इतिहास', इ. यांचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत.

**मिश्रधातु**—दोन किंवा अधिक धातूंचें मिश्रण. हें त्या त्या धातू एकत्र वितळवून तयार करतात. मिश्रधातूंत रासायनिक संयोग होत नसून धातूंचें हें घनरूप विद्रवण होय. पुष्कळशा धातू एकमेकांत वाटेल त्या प्रमाणांत मिसळतात ( विरघळतात ); *तर कांहीं विशिष्ट प्रमाणांत व कांहीं तर मुळींच मिसळत नाहींत.* मिश्रणधातूचे गुणधर्म, रंग, द्रवांश, काठिण्य, भारवाहकशक्ति, विस्तारक्षमता हीं मूळ धातूपेक्षां निराळीं असतात. कांहीं धातू अगदीं थोड्या प्रमाणांत मिसळले तरी मूळ धातूंच्या गुणधर्मांत पुष्कळच फरक घडवून आणतात. सर्वांत लहान द्रवांश असणाऱ्या दोन धातूंच्या मिश्रणास सुद्राव ( युटेक्टिक ) म्हणतात.

मिश्रधातूंचे लोहप्रधान आणि लोहशून्य असे दोन भाग पडतात.

लोहप्रधान मिश्रधातू—यांत लोखंडाचा आणि पोलादाचा मुख्यतः उपयोग केला असल्यामुळें औद्योगिक दृष्ट्या त्यांचें महत्त्व फार मोठें आहे. शुद्ध लोखंडाचा फारसा उपयोग होत नाहीं. ओतीव लोखंडांत शें. ३ कर्ब असतो, व घिसाड्यांच्या नेहमींच्या घडीव लोखंडांत कर्बाचें प्रमाण शें. २५ च्या खालीं येतें. ओतीव लोखंड ठिसूळ असून त्यांत भार सहन करण्याची शक्ति नसते. शिवाय ठोकून वाटेल तो आकार त्याला देऊं म्हटलें तरी शक्य होत नाहीं. त्याच्या उलट घडीव लोखंडांत हे सर्व गुण असतात. तथापि ह्या दोन्हीहि लोखंडांपासून पोलाद तयार करतां येतें. निकेल, टंगस्टन, मोलिब्डेनम, क्रोमियम, आणि व्हॅनेडियम, ह्या धातू लहान प्रमाणांत मिसळल्या तरी पोलादाचे गुणधर्म पाहिजे त्या प्रमाणांत बदलतां येतात.

लोहशून्य मिश्रधातू—यांत मूळ धातु तांबें असतें. या मिश्रधातू हवेनें गंजत नाहींत.

नेहमींच्या पितळांत तांबें आणि जस्त असून त्यांचें प्रमाण साधारणपणें तांबें शें. ७० व जस्त शें. ३० असें असतें. क्वचित् प्रसंगीं थोडेंसें कथिल किंवा शिसें मिसळलेलें असतें. 'गन–

मेटल' मध्यें तांबें, जस्त आणि कथिल असतें. 'ब्राँझ' मध्यें तांबें आणि काथिल असतें (ब्रॉझ पहा).

'फॉस्फर ब्राँझ' चें प्रमाण तांबें शें. ८९.५, कथिल शें. १०, फॉस्फरस शें. ०.५. ह्याची भारवाहक शक्ति सर्वापेक्षां जास्त असते.

'डेल्टा मेटल' एका चौ. इंचावर ३०-५० टन वजन तोलूं शकतें. त्यांतील प्रमाण तांबें शें. ५७, जस्त ४०, लोखंड १, शिसें १, मँगेनिझ १. थंड किंवा उष्ण कोणत्याहि अवस्थेंत ह्या धातूंचे दाबून पत्रे तयार करतां येतात.

'मँगेनिझ ब्राँझ' डेल्टा मेटलप्रमाणेंच प्रबल भारवाहक आणि विस्तारक्षम आहे. आगबोटीचे गतिप्रेरक (प्रॉपेलर) तयार करण्यासाठीं ह्या धातूचा प्रामुख्यानें उपयोग करतात. हिच्यांत तांबें, जस्त, मँगेनिझ व अल्युमिनियम असतें.

'मोनेल मेटल' ह्यांत तांबें, निकेल, लोखंड आणि मॅगेनिझ असून ह्याचे गुणधर्म नरम पोलाद आणि तांबें ह्यांच्यासारखे आहेत.

'म्युंत्झ मेटल' ह्यांत शें. ६० तांबें व ४० जस्त. समुद्राच्या पाण्याचा ह्यावर कांहीं परिणाम होत नाहीं.

'ड्युराल्युमिन' ह्यात प्रमुख धातु अल्युमिनियम असून तिच्या जोडीला तांबें शें. ३-५, मॅगेनिझ शें. १, मॅग्नेशियम् शें. ०.५. ह्याचें विशिष्टगुरुत्व २.८ असून देखील नरम पोलादाइतकें शक्तिमान् असतें.

इंग्रजी रुप्याच्या नाण्यांत तांब्याचें प्रमाण शें. ७.५ असून सोन्याच्या नाण्यांत तें शें. ८.३ असतें.

पाऱ्याच्या मिश्रधातूस ॲमाल्गम असें म्हणतात. पाऱ्यामध्यें इतर धातूंस द्रवरूप देऊन त्यांच्याशीं मिश्र होण्याचा धर्म विशेष रीतीनें आढळतो. यामुळें पाऱ्याचा उपयोग सोनें व चांदी शुद्ध करण्याकडे विशेष करण्यांत येतो. सोन्याच्या खाणीमध्यें सुवर्णमिश्रित माती भरडून तिची पूड करण्यांत येते. नंतर ती पारा असलेल्या कांहीं यंत्रांमधून बाहेर काढण्यांत येते. त्या ठिकाणीं पारा सोन्याच्या कणाशीं मिश्र होतो व माती धुपून निघून जाते. नंतर उष्णता देऊन पाऱ्याची वाफ करून तो उडवून देण्यांत येतो. याच तऱ्हेची क्रिया चांदीच्या बाबतींतहि करण्यांत येते. सोन्याचा मुलामा चढविण्याकरितांहि सोनें आणि पारा यांच्या मिश्र धातूचा उपयोग करण्यांत येतो. आरशावर पारा चढविण्याकरितांहि पारा व कथील यांची मिश्रधातु वापरण्यांत येते.

**मिश्ररंग**—(डिस्टेंपर). अंड्याचा बलक व खळ यांशीं रंगाचें मिश्रण करून हा बनवितात. चित्रांना रंग देतांना व घरगुती वस्तूंना शोभा आणण्यासाठीं हा रंग मुख्यत्वें वापरतात. १५ व्या शतकांत तेलाचा उपयोग होऊं लागण्यापूर्वी ओल्या गिलाव्यावर पाणरंग (फ्रेस्को) आणि डिस्टेंपर हींच रंगचित्रकलेचीं मुख्य साधनें होतीं. हल्लीं युरोपांत भिंतींना रंगीत कागद चिकटविण्याऐवजीं डिस्टेंपरच लावतात. यामुळें स्वच्छता राहते. डिस्टेंपर वाटेल त्या रंगाचा मिळतो.

**मिसिसिपी नदी**—ही उ. अमेरिकेंत मुख्य नदी असून पृथ्वीवरील सर्वांत लांब नद्यांपैकीं ही एक आहे. हिचा उगम मिनेसोटा संस्थानांतील इटास्का सरोवरापासून होतो. नंतर ती दक्षिणेकडे वाहत जाते. मार्गांत आयोवा, इलिनॉईस, मिसोरी, ओव्हिओ, आर्कानसस व रेड ह्या नद्या तिला मिळतात. ह्या नदीची एकंदर लांबी ४,२०० मैल आहे. ही नदी मेक्सिकोच्या आखाताला मिळते.

**मिसिसिपी संस्थान**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील हें एक संस्थान असून मेक्सिको आखातानजीक आहे. ह्याचा मध्यवर्ती प्रदेश डोंगराळ आहे. याची राजधानी जॅक्सन असून मेरिडियन व व्हिक्सबर्ग हीं मोठीं शहरें आहेत. हें संस्थान शेतकीप्रधान असून कापूस, मका, भात, गहूं, ओट व बटाटे हीं मुख्य पिकें आहेत. जगांत सर्वांत अधिक कापसाचें पीक (३५,००० एकर) स्कॉट येथें होतें. क्षे. फ. ४७,७१६ चौ. मैल. लो. सं. २१,८३,७७६ असून तींत इटालियन, जर्मन, इंग्रज व श्वेतेतर लोक आहेत. येथें प्रथम वसाहत १७१६ त झाली आणि १८१७ सालीं हें संस्थान युनिअनमध्यें सामील झालें. येथला राज्यकारभार गव्हर्नर ४९ सभासदांचें सिनेट व १४० सभासदांचें प्रतिनिधि-सभागृह यांच्या मताप्रमाणें चालवतो. येथें सहा विद्यापीठें व अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. प्राथमिक शिक्षण सक्तीचें असून गोऱ्या लोकांकरितां व इतर वर्णांच्या लोकांकरितां निरनिराळ्या स्वतंत्र शाळा आहेत. या संस्थानचें १९४३ सालीं उत्पन्न ६,३६,०२,००० डॉलर आणि खर्च ५,६०,९७,००० डॉलर होता. कोलंबस शहरीं स्त्रियांकरितां स्वतंत्र कॉलेज असून त्यांत ९५० विद्यार्थिनी व ७५ अध्यापिका आहेत.

१५३९ मध्यें प्रथम डी सोटो (फ्रेंच) हा या विभागांत शिरला. पुढें ला सेलीनें (१६८२) ही जमीन फ्रान्सची असल्याचें जाहीर केलें. १६९८ मध्यें हल्लींच्या बिलोक्षीजवळ प्रथम फ्रेंच वसाहत झाली. मिसिसिपीचा दक्षिणेकडील भाग फ्रान्सनें इंग्लंडला दिला (१७६२). पुढें १७८१ मध्यें तो स्पेनकडे गेला. 'लुसियाना पर्चेज' प्रकरणांत तो युनायटेड स्टेट्सकडे आला. १७९८ मध्यें टेरिटरी ऑफ मिसिसिपी म्हणून निराळा काढण्यांत आला. १८५७ मध्यें अल्बामा संस्थानचा भाग अलग करण्यांत आला व त्याच वर्षी मिसिसिपी संस्थानात संयुक्त संस्थानांच्या गटांत दाखल करून घेण्यांत आलें.

**मिसोरी नदी**—अमेरिकन सं. संस्थानांतील ही नदी रॉकी पर्वतांत उगम पावून बहुतेक पूर्व आणि उत्तर बाजूंस वाहत जाते व सेंट लुईजवळ मिसिसिपी नदीला मिळते. जेफरसन, मॅडिसन, व गॅलॅटिन या नद्या हिला मिळतात. मिसोरीची लांबी २,९४५ मैल आहे.

**मिसोरी संस्थान**—हें अमेरिकन सं. संस्थानांतील एक संस्थान आहे. याची राजधानी जेफरसन असून सेंट लुई, कॅन्सस, सेंट जोसेफ आणि स्प्रिंगफील्ड हीं मोठालीं शहरें आहेत. हें संस्थान शेतकीप्रधान असून येथें मका, गहूं, ओट, बटाटे, कापूस, जवस, वगैरे पिकें होतात. शिवाय तमाखू व फळफळावळ होते. दुभतीं जनावरें व मेंढ्या पाळण्याचा धंदा वाढत आहे. खनिज द्रव्यें तांबें, चुनखडी, वाळूचा खडक, ग्रॅनाइट, तांबडें व पिंगट हेमॅटाईट, लोखंड, दगडी कोळसा, जस्त, शिसें, निकेल व कोबाल्ट हीं सांपडतात. येथें प्रथम वसाहत १७६४ सालीं झाली आणि १८२१ सालीं हें संस्थान युनियनमध्यें सामील झालें. क्षे. फ. ६९,६७४ चौरस मैल. लो. सं. (१९४०) ३७,८४,६६४ असून तींत जर्मन, इटालियन, रशियन व श्वेतेतर जातींचे लोक आहेत. येथील राज्यकारभार गव्हर्नर ३४ सभासदांचें सिनेट व १५० सभासदांची प्रतिनिधि-सभा यांच्या मताप्रमाणें चालवतो. येथें शिक्षण ७ ते १४ वर्षांपर्यंत सक्तीचें आहे. येथें कोलंबिया युनिव्हर्सिटी (१८३९), वॉशिंग्टन युनिव्हर्सिटी (१८५७), व सेंट लुई युनिव्हर्सिटी (१८१८), ह्या असून अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. १९४३ सालीं या संस्थानचें उत्पन्न १३,०४,७२,००० डॉलर आणि खर्च १२,४६,६६,००० डॉलर झाला.

प्रथम पहिले वसाहतवाले म्हणून फ्रेंचांकडे या विभागाची मालकी होती (१६८५). सेंट लुई हें १७६३ मध्यें वसविण्यांत आलें. लुसिआना विभागांतील बरीच मोठी जमीन १७६२ मध्यें स्पेनला देण्यांत आली होती ती १८०० मध्यें परत फ्रान्सकडे आली व १८१२ मध्यें लुसिआना पर्चेज-प्रकरणांत ती अमेरिकेनें (संयुक्त संस्थानानें) विकत घेतली. पुढें मिसोरी संस्थानची पुनर्घटना होऊन १८२० मध्यें तें संयुक्त संस्थानांत दाखल करून घेण्यात आलें. त्या वेळीं संस्थानांतील प्रचलित असणाऱ्या गुलामगिरीविरुद्ध बरीच चर्चा व वाद झाला. त्याबाबतचा तडजोडीचा निर्णय मिसूरी कंप्रोमाईज (तडजोड) म्हणून प्रसिद्ध आहे. त्या वेळीं कांहीं अटींवर मिसोरींतील गुलामगिरीला संमति देण्यांत आली होती आणि यापुढें ३६°·३०′ अक्षांशाचे उत्तरेकडे गुलामगिरीला कायमची बंदी केली होती.

**मिस्सा, मास**—पवित्रयाग. मूळ लॅटिन संज्ञा मिस्सा. मास हा कॅथॉलिक संप्रदायांतील याग होय. हा विधि म्हणजे ख्रिस्तानें क्रूसावर परमेश्वराकरितां जो आत्मयज्ञ केला त्याचीच पुरोहिताकडून करावयाची पुनरावृत्ति होय. या यागामध्यें प्रथम विधिपूर्वक नैवेद्य समर्पण करावयाचा असतो व या वेळीं पुरोहित भाकरी व द्राक्षारस यांचें ख्रिस्ताचें शरीर आणि रक्त यांमध्यें रूपांतर करीत असतो. या वेळीं तो ख्रिस्तानें अंतिम भोजनाच्या वेळीं उच्चारलेले शब्द उच्चारतो: 'हें माझें शरीर आहे, हें माझें रक्त आहे.' ज्या ख्रिस्तानें मानवजातीचा उद्धार व्हावा व त्यांच्या पापाचें क्षालन व्हावें म्हणून स्वतःचें क्रूसावर बलिदान दिलें त्याचेंच पुन्हां पुरोहिताच्या हातानें बलिदान देण्यांत येतें. या विधीबरोबर एक विधियुक्त भोजन करावयाचें असतें. त्यामध्यें या बलीचा अंश ग्रहण करावयाचा असतो. याप्रमाणें मास या विधीचीं तीन मुख्य अंगें म्हणजे (१) नैवेद्यसमर्पण, (२) संस्करण, आणि (३) प्रसादग्रहण हीं आहेत.

**मिहिरगुल** (राज्य. ५१०-५४०)— एक श्वेतहूणवंशी राजा. हूणराजा तोरमाण इ. स. ५१० मध्यें मरण पावल्यावर त्याचा मुलगा मिहिरगुल हिंदुस्थानांत राज्य करूं लागला. त्याची राजधानी पंजाबांत साकल (अर्वाचीन सिआलकोट) येथें होती. त्या काळीं हूणांचें साम्राज्य हिंदुस्थानाबाहेर इराणपासून खोतानपर्यंत दूरवर पसरलेलें होतें. या हूण बादशहाच्या दरबारीं सोंगयुन नांवाचा चिनी प्रवासी वकील इ. स. ५१९ मध्यें आला होता. या हूणांच्या राजाला एकंदर ४० देशांचे राजे खंडणी देत होते. याच सुमारास कॉस्मस इंडिकोप्लुस्टस नांवाच्या भिक्षूनें हिंदुस्थानांतील गोल्लस नांवाच्या पांढऱ्या हूण राजाचें वर्णन लिहून ठेवलें आहे. हा हूण राजा आपल्या सैन्यांतील दोन हजार लढाऊ हत्ती व घोडेस्वारांचें मोठें सैन्य यांच्या बळावर जुलमानें खंडणी वसूल करीत असे, असें तो लिहितो. हा हूण राजा मिहिरगुलच असला पाहिजे. युरोपांत हूणांचा पुढारी ॲटिला याची क्रूरपणाबद्दल जशी प्रसिद्धि आहे तशीच हिंदुस्थानांत मिहिरगुल याची आहे. परंतु हिंदु ग्रंथकारांनीं या रानटी हूणांच्या क्रूर कृत्यांचीं वर्णनें दिलीं नाहींत, तथापि हूणांचा जुलूम इतका असह्य झाला कीं, हिंदुस्थानांतील अनेक देश्य राजांनीं मगधाचा बालादित्य (नरसिंहगुप्त) आणि मध्य हिंदुस्थानचा राजा यशोधर्मन् याच्या नेतृत्वाखालीं एक संघ बनवून हूणांशीं लढण्याची तयारी केली व इ. स. ५२८ मध्यें मिहिरगुलाचा पूर्ण पराभव करून त्याला कैद केलें आणि हिंदुस्थान देशाला परकीयांच्या जुलमांतून सोडविलें. मिहिरगुलाला मात्र ठार न मारतां बालादित्यानें मोठ्या थोर मनानें सोडून देऊन उत्तरेकडे त्याच्या देशास सन्मानानें परत पाठविलें.

मध्यंतरीं मिहिरगुलाचें साकलाचें राज्य त्याच्या धाकट्या

भावानें बळकाविलें तें तो परत देईना; म्हणून मिहिरगुल काश्मीरच्या राजाच्या आश्रयास गेला. तेथें काश्मीरच्या राजानें मिहिरगुलाला लहानशा मुलुखाचा कारभार पाहण्यास सांगितलें. या संधीचा फायदा घेऊन मिहिरगुलानें आपल्या आश्रयदात्याच्याच विरुद्ध बंड केलें आणि त्याचें सिंहासन बळकाविलें. नंतर गंधारच्या राज्यावर हल्ला करून तेथील राजास विश्वासघातानें ठार मारिलें आणि राजघराणें व लोकसमाज यांची कत्तल केली. हा मिहिरगुल शिवाचा उपासक होता व त्यानें या विनाशक देवतेप्रमाणें क्रूरपणाचीं अनेक कृत्यें केलीं व विशेषतः शांतताप्रिय व अहिंसावादी बौद्ध लोकांचे मठ व स्तूप उध्वस्त केले व त्यांतील खजिना लुटून नेला. याप्रमाणें अनेक अनर्थ करून मिहिरगुल ५४० च्या सुमारास मरण पावला.

मिहिरगुलाच्या मृत्यूनंतर ऑक्झस नदीकडील पांढऱ्या हूणांची सत्ता फार दिवस टिकली नाहीं. ६ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास तिकडे तुर्क लोक चालून गेले व त्यांनीं इराणच्या राजाबरोबर दोस्ती करून पांढऱ्या हूणाचा नाश केला व पुढें तुर्क लोकांनीं हूणांचें सर्व साम्राज्य आपल्या ताब्यांत घेतलें.

**मिळकत**—कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, ज्याच्यावर पूर्ण मालकी हक्क आहे अशी स्थावर किंवा जंगम मालमत्ता. मालकी हक्क म्हणजे त्या मिळकतीचा उपभोग घेण्याचा आणि तिची विल्हेवाट करण्याचा संपूर्ण हक्क. नुसता ताबा किंवा कबजा (पझेशन) या हक्कापेक्षां मालकी (ओनरशिप्) हा वरिष्ठ प्रतीचा हक्क आहे. कारण मालकी हक्कांत सदर मिळकतीची विल्हेवाट (डिस्पोझल) करण्याचा हक्क अंतर्भूत असतो, पण विल्हेवाट करण्याचा असा हक्क केवळ कब्जेदाराला नसतो. शिवाय मालकी हक्क या शब्दानें इतर सर्व जगाच्या विरुद्ध ताबा ऊर्फ कबजा असण्याचा हक्क अवश्य गृहीत धरला जातो. मिळकतीची मालकी मिळविण्याचे मार्ग अनेक असतात, ते म्हणजे देणगी, वारसा, खरेदी, ज्या मिळकतीला कोणीच मालक नाहीं अशा मिळकतीचा कबजा घेणें, इत्यादि. मात्र वाहतें पाणी, नाविक वाहतूक चालणाऱ्या नद्या, आणि राजरस्ते यांवर खाजगी मालकी कोणाचीहि नसते.

**मीकतिला**—हा जिल्हा उत्तर ब्रह्मदेशांत असून याचें क्षे. फ. २१८३ चौरस मैल व लो. सं. सुमारें तीन लाख आहे. याचा भूप्रदेश साधारण खडकाळ आहे. मीकतिला गांवची लो. सं. सुमारें दहा हजार. जवळच मीकातिला सरोवर आहे. बौद्ध मंदिरें बरींच आहेत. येथें फक्त कातड्याचा व्यापार चालतो. सॅमॉन, थिनबॉस चॅंग व पॅन लॅग ह्या नद्या वाहतात. जंगलांत वाघ, चित्ता, हत्ती, सांबर व गवा हीं जनावरें दृष्टीस पडतात. पाऊस सरासरी २५।३० इंच पडतो. या जिल्ह्याचें पूर्वींचें नांव मतिल असून तें पगनासच्या अनव्रत नामक राजानें यास दिलें असें म्हणतात. इ. स. १८८५ त हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यांत आला. येथें प्राचीन बौद्ध मंदिरें सर्वत्र आढळतात. लोकसंख्येंत बौद्ध लोकांचें प्रमाण शें. ९८ आहे; व बहुतेक तितकेच लोक ब्रह्मी भाषा बोलतात. तांदूळ (सर्वांत जास्त), कापूस, टोमॅटो, कांदे, वाटाणे, चणे, ऊंस, सुपारी, तीळ व ताडी हे मुख्य उत्पन्नाचे जिन्नस आहेत. सुती कापड, टोपल्यां व चटया, आणि ओबडधोबड भांडीं तयार करण्यांत येतात. स्त्री-पुरुषांना लिहितां-वाचतां येतें.

**मीकीर**—आसाम. या नांवाच्या टेंकड्या व एक राष्ट्रजात. डोंगराळ भागात मीकीर नांवाचे लोक राहतात. हे लोक स्वभावतः आसामांतील कोणत्याहि पहाडी राष्ट्रजातीच्या लोकांपेक्षां भित्रे व शांत वृत्तीचे आहेत. हे लोक शांत वृत्तीचे कां बनले याचें कारण असें सांगण्यांत येतें कीं, तेथील त्या वेळच्या 'अहोम' सरकारनें आपण केव्हांहि हातांत शस्त्र धरणार नाहीं, अशी यांच्याकडून शपथ घेवविली. सध्यां हे लोक या टापूंतील लहान लहान खेड्यांत राहतात. येथील शेतांत तांदूळ, थोडा कापूस व मिरच्या पिकतात.

**मीठ**—मीठ या अर्थानें लवण हा शब्द ऋग्वेदांत मुळींच आलेला नाहीं. अथर्ववेदामध्यें फक्त एकदांच आलेला आहे. उत्तरकालीन ब्राह्मणग्रंथांत हा आलेला आहे व तो फार किंमतीचा आहे असें म्हटलें आहे. आर्य लोक प्रथम जेथें आले तीं ठिकाणें जर पंजाब व सिंधु नदीची थडी अशीं मानलीं—व तेथें तर मिठाच्या खाणी आहेत—तर मिठाचा उल्लेख पूर्वींच्या ग्रंथांत बिलकूल कसा नाहीं याचें आश्चर्य वाटतें. तथापि अशीहि कल्पना करणें शक्य आहे कीं, मिठासारख्या नित्याच्या वस्तूचा उल्लेख ज्या ठिकाणीं ती फार उपलब्ध आहे त्या ठिकाणीं ग्रंथांत नाहीं झाला तर त्यांत फारसें नवल नाहीं.

माणूस जेव्हां शिजविलेलें अन्न खाऊं लागला तेव्हां त्याला क्षाराची जरूरी भासूं लागली असली पाहिजे व तेव्हांपासून मिठाला फार महत्त्व प्राप्त झालें. होमर याला दैवी तर प्लेटो याला देवाचा आवडता पदार्थ मानतो.

याचा व्यापार फार प्राचीन आहे. १९३७ सालीं ३ कोटी ७० लक्ष मेट्रिक टन इतकें जगांत मिठाचें उत्पादन झालें. अमे. सं. संस्थानें (७,२८१), जर्मनी (४,५६१), चीन (४,०००), युनायटेड किंग्डम (३,१३३), फ्रान्स (२,३३७), हिंदुस्थान (१,८७८) व इटली (१,५५५) हे देश मोठ्या उत्पादनाचे आहेत.

हा पदार्थ सर्वत्र आवश्यक मानलेला असून यांत सिंधु-हरिद हें रसायन असतें. शेंदेलोण किंवा सैंधव या घन स्वरूपांत

हें खाणींतून निघतें तर द्रवस्वरूपांत खारीं सरोवरें आणि समुद्र यांतून विरलेलें असतें. खनिज मीठ काढण्यासाठीं खडकाला खोल भोंकें पाडून त्यांतून पाणी खालील मिठाच्या थरापर्यंत नेतात. नंतर पंपानें हें खारें पाणी वर काढून मोठ्या लोखंडी कढयांतून ठेवतात व उष्णता लावून सुकवितात. उष्ण कटिबंधांत समुद्राचें पाणी आगरांतून घेऊन सूर्यतापानें सुकवितात. ध्रुवप्रदेशांत समुद्राचें पाणी गोठवून मीठ काढतात. हें मीठ त्यामुळें जास्त खारट असतें. हिंदुस्थानांत तर स्वयंपाकांत मिठावांचून चालत नाहीं. गरिबांचें तें मुख्य पोषण असल्यानें त्यावर कर बसवूं नये अशी कॉंग्रेसनें चळवळ केली. मांस, लोणी, मासे, इ. टिकविण्यासाठीं मीठ वापरतात. कॉस्टिक सोडा व इतर सिंधुहरसंयुक्तें मिठापासून होतात.

देशी मीठ समुद्राच्या पाण्यांतून किंवा खारट झऱ्यांतून उन्हानें आटवून काढतात. कांहीं ठिकाणीं मिठाच्या खाणी असतात; ह्यांपैकीं कांहीं डोंगरासारख्या भूपृष्ठावर असतात, कांहीं कोळशासारख्या खोल जागीं असतात. खारट पाण्याचे झरेहि असेच पृष्ठावर अथवा खोलांत आढळतात. पंजाब, सिंध, खाराघोडा येथील झरे शुद्ध मीठ-पाण्याचे होत. समुद्राच्या पाण्यांत निरनिराळीं द्रव्यें असतात; म्हणून शास्त्रीय दृष्टया हें मीठ अशुद्ध होय. समुद्राच्या पांच शेर पाण्यांत १० तोळे मीठ असतें.

निरनिराळ्या अन्नपदार्थांतहि मीठ असतें. खालील कोष्टकांत १ गुंजभार मीठ किती तोळे अन्नपदार्थांत असतें, तें दिलें आहे :—

| धान्य | तोळे | फळें | तोळे | फळें | तोळे |
|---|---|---|---|---|---|
| गहूं | ८१ | लिंबू | ११९८ | सफरचंद | ७४९ |
| राय | ४ | पीच | ५८४ | अप्रिकट | ७४९ |
| मका | ६७ | पेअर | २९१ | केळें | ३१ |
| सपीटी | ५४ | अननस | ७३ | चेरी | ३१२ |
| ओट | ५६ | मनुका | ४७ | अंजीर | ११० |
| तांदूळ | ६३ | स्ट्रॉबेरी | ५८८ | द्राक्षें | ६२४ |
| | | कलिंगड | ५८४ | | |

दूध व तज्जन्य प्रकार—

| | | मासे | तोळे |
|---|---|---|---|
| ताक | ३८ | कॉड | २५ |
| लोणी | २९९७ | सामन | ४७ |
| चीज | २२ | | |
| अंडीं | ३१ | | |
| दूध | ३१ | | |

| भाज्या— | | मांस— | |
|---|---|---|---|
| शेंगा, गवारी | १४९८ | बेकन (डुकराचें) | २॥। |
| बीट | ५९ | कोंबडें | ३७ |
| कोबी | १४४ | यकृत् | ३॥ |
| गाजरें | ११७ | मांस | ३॥ |
| कॉलिफ्लावर | ९१ | इतर पदार्थ— | |
| सेलरी | २९ | गूळ | ४७ |
| वांगीं | १४५ | मध | १२६ |
| कांदे | १८० | कोको | ५९ |
| वाटाणे | १४५ | | |
| टोमाटो | ९१ | बदाम | ७७ |
| पांढरा भोपळा | ९१ | वॉलनट | ९० |
| स्पिनॅक | ४९ | भुईमूग | ५९ |

वरील कोष्टकावरून लोण्यांत नैसर्गिक मीठ अत्यंत कमी असतें व राय धान्यांत (गरिबाचें जें नाचणी धान्य यांत) मीठ मोठ्या प्रमाणांत असतें असें दिसून येईल.

पाश्चात्य देशांतील खाणीच्या मिठांत ९८। ते ९९॥ टक्के निव्वळ मीठ असतें. हिंदुस्थानांतील समुद्राच्या पाण्यापासून केलेल्या मिठांत ८८ टक्के मीठ व बाकीचीं इतर धातूंचीं लवणें असतात. आपल्या हिंदी मिठाचे गुणधर्म समजण्यासाठीं ह्या इतर लवणांचे गुणदोष लक्षांत घेणें आवश्यक आहे.

मिठानें लाळ सुटते व पिठाचें पचन करणारे मंड (फरमेंट) ओजित होतात. जर मीठ कमी खाल्लें तर शरीरांतील मिठाचा सांठा रक्षण करण्यासाठीं मूत्रांतून मुळींच मीठ बाहेर पडत नाहीं. फार खाल्लें, तर फार बाहेर पडतें. साधारणतः मूत्रपिंडांतून ४ तोळे मीठ मूत्रपिंडास (किडनीज्) अपाय न होतां बाहेर पडूं शकतें. दर १००० तोळे रक्तांत मीठ ४-५ तोळे असतें. एवढेंच नव्हे, पण निव्वळ ०.९ टक्के मीठ-पाणी रक्ताच्या बदला शरीरांत असलें तरी, कांहीं तास रक्ताप्रमाणेंच तें काम करूं शकतें. म्हणून अत्यंत रक्तस्राव झाला तरी रक्तांत मिठवणी योग्य प्रमाणांत घातलें तरी जीव रक्षण होतो. हिंदी मिठांत असलेलीं इतर लवणें जर ह्या मिठवणींत घातलीं तर जीवधारणा जास्त तास शक्य होते.

मिठाच्या योगानें प्रथिनां (प्रोटीन)चा योग्य विनियोग होतो व शरीरपोषणांत प्रथिनें उत्तम रीतीनें कामास येतात. तेव्हां शरीर-द्रवांत मिठाचा समतोलपणा राखण्यासाठीं निदान चहाचा अर्धा चमचा किंवा पाऊण तोळा मीठ रोजच्या आहारांत पाहिजे.

मिठामुळें इतर मूलद्रव्यांचे विषारी परिणाम फारसे भोंवत नाहींत व मूत्रपिंडांतून त्याज्य द्रव्यें बाहेर टाकण्यास सुलभ जातें. शरीरास सूज आली असल्यास मीठ कमी खाण्यानें सूज ओसरते व मीठ फार खाल्ल्यास सूज येण्याच्या प्रवृत्ती वाढतात. मिठामुळें अन्नाची चव व तृप्ति वाढतात; मिठामुळें अन्नपदार्थींच्या इतर चवी व स्वाद ठळकपणें लक्षांत येतात; जठररस लवकर सुटतो व थोड्याशा खाण्यानेंहि समाधान वाटतें. जठरांत आम्ल रस मिठापासूनच उत्पन्न होतो.

भूक मंद असेल, पचन नीट नसेल, तर मिठानें पचन वाढतें व भूक रसरसते. म्हणूनच अनादिकालापासून रानटी जनावरेंसुद्धां मिठाची चटक लागल्यास कोस कोस प्रवास करतात. सृष्टींत ९२ मूलद्रव्यें आहेत, पण ह्यांपैकीं एकच ( मीठ ) आपण अन्नांत मुद्दाम, अन्नपदार्थांत तें निसर्गतः असतें तरी, मिसळतो.

मीठ हें सिंधु व हर ( सोडियम आणि क्लोरीन ) ह्यांच्या संयोगानें झालें आहे. हराचा अंश पचनांत अम्लता उत्पन्न करतो. शरीरांतील एकंदर हराच्या सांठ्यापैकीं एक-तृतीयांश सांठा त्वचेंत असतो. म्हणून त्वचा चाटल्यास खारट लागते व घामाहि खारट असतो. अतिश्रम केल्यावर किंवा उन्हाळ्यांत घाम फार सुटतो व त्यांतून मीठ बाहेर फार जातें, त्यामुळें फार थकवा उत्पन्न होतो. हा थकवा घालविण्यास मुद्दाम मिठाचें पाणी प्यावें.

लोणचीं इत्यादि सांठवणीचे अन्नपदार्थ करण्यासाठीं मीठ फार उपयुक्त आहे. खारावलेले मासे, लोणी, चीज, मांस अनेक दिवस टिकतात. मिठवणींत ठेवलेलीं फुलेंहि अनेक दिवस राहतात. सृष्टींत मीठच नसतें तर जगांतील अनेक अन्नपदार्थ खाण्यास फार कठिण गेलें असतें.

मुडदूस ( रिकेट्स ) रोग मुलांत होतो व मोठ्यांत हाडें फार दुखावतात. इतर प्राण्यांत अशक्तता येते, अंग कांपतें व गात्रें मृतवत् ( पॅरॅलिसिसप्रमाणें ) होतात. मांसाहारी जनावरांस मीठ न लागण्याचें कारण मांसांत तें पुष्कळ असतें हें होय.

गायींना मीठ न मिळाल्यास त्यांची भूक जाते, त्वचा रुक्ष होते, त्या रोडावतात व दूध कमी देतात; गर्भधारणाहि नीट होत नाहीं. दुभत्या गायींना रोज दोन औंस मीठ निदान द्यावें म्हणजे त्या लवकर आटत नाहींत. मुलांस पाजणाऱ्या आईनेंहि हा नियम लक्षांत ठेवावा. माणसांना चहाचा दीड चमचा किंवा एक तोळा मीठ रोज पाहिजे. चहाच्या अर्ध्या चमच्यापेक्षां मीठ कमी खाल्लयास मूत्रांतून तें स्रवणेंच बंद होतें. ज्या माणसांना घाम येतो, फार घाम येण्याइतकीं श्रमाचीं कामें करावीं लागतात, त्यांनीं चहाचे चार चमचे मीठ निदान खावें. अति घाम असेल तर पिण्याच्याहि पाण्यांत मीठ टाकावें, म्हणजे लगेच हुशारी वाटते.

उपवासांत शरीरांतून मीठ बाहेर पडतें व त्याबरोबरच खट ( कॅल्शम ), मग्न ( मॅग्नीशियम ) व स्फुर ( फॉस्फरस ) हेहि मूत्रांतून फार प्रमाणांत बाहेर पडतात, हाडें कमकुवत होतात व वजन ६–७ टक्क्यांनीं घटतें.

शरीरातील कोणताहि भाग सुजल्यास तेथें मीठ सांचतें व लघवींतून जायचें कमी होतें. म्हणून फुप्फुसावरणदाह ( प्लूरिसी ), नवज्वर ( न्युमोनिआ ), विषम ( टायफॉइड ), हिंवताप, क्षय, हाडदुखी, तीव्र भ्रम ( डिलीरियम–ट्रेमेन्स ) ह्यांत व तीव्र सांसर्गिक रोगांत त्या त्या अवयवांत मीठ सांचतें, लघवींतून कमी होतें, व त्याबरोबरच खट–स्फुर वगैरेहि मूत्रांतून स्रवण्याचें कमी होतात.

आरोग्यावस्थेंत, आपण आहारांत रोज जें मीठ खातों त्यापैकीं ९५ टक्के २४ तासांत बाहेर पडून जातें; म्हणून आपणांस रोजच्या जेवणांत मीठ पाहिजे; जर मूत्रपिंडाचा रोगच असेल तर तें स्रवत नाहीं. म्हणून ह्या रोगांत मीठ कमी देणें अगत्याचें असतें.

हृदयाचे, मूत्रपिंडाचे व यकृताचे रोग असतील तर मीठ कमी द्यावें किंवा बंद करावें; अशाच कारणामुळें स्थूलता, मूत्रमेह ( डायाबेटिस इन्सिपिडस ), फेपरें ह्यांतहि मीठ तोडावें.

फार मीठ खाण्यास देऊन उलट्या करवितां येतात; म्हणून विषबाधा झाल्यास पुष्कळ मिठाचें पाणी पाजतात. मिठानें रक्तस्राव थांबतो, लाळ कमी सुटते, गुदांत असणाऱ्या 'ऑक्झियुरिस) कृमींस गुदावाटे मिठवणी दिल्यास तें त्यांना ... होतें. मिठाच्या योगानें अवयवांत असलेली सूज कमी

होते, कालिकज्वर जातात व जंतुघ्न म्हणून त्याचा उत्तम उपयोग होतो.

मानवशरीरांत एकंदर लवणें ७ पौंड आहेत, त्यांपैकीं पांच पौंड हाडांतच असतात. लवणांमुळें हाडांस बळकटी येते, व इतर ठिकाणच्या संचयामुळें आपत्कालीं त्यांचा उपयोग तावडतोब होऊं शकतो; म्हणून त्यांची आवश्यक अन्नपदार्थांत गणना करतात.

मिठाचें शोषण लहान आंतड्यांतच झपाट्यानें होतें. शौचावाटे अदमासें चहाचा पाव चमचा मीठ बाहेर पडतेंच.

मानवशरीरांत अदमासें ५० औंस (३ पौंड) मीठ असतें. रोजच्या आहारांतून मिळणाऱ्या नैसर्गिक चहाचा अर्धा चमचा या मिठांशिवाय रोज २॥–३ चमचे मीठ पाहिजे. शरीरांतून रोज चहाचे तीन चमचे मीठ मूत्रांतून, शौचांतून, घामावाटे, थुंकण्यांतून, अश्रूंतून, इत्यादि बाह्य स्रावांतून रोज बाहेर पडतेंच. मूत्राचा महत्त्वाचा भाग मीठ आहे. म्हणून रोज तीन चमचे मीठ खावें. ह्यापैकीं कांहीं जेवणांतील अन्नाच्या निरनिराळ्या प्रकारांत आपण घालतोंच. बाकीचें वरतीं चव वाढविण्यासाठीं घ्यावें. जास्त घेतल्यास शरीरास विनाकारण श्रम होतात व मूत्रपिंड दुखावतात.

मिठाचा कायदा—हिंदुस्थानांत हा कायदा मागील कायदे दुरुस्त करून १८८२ सालीं मंजूर झाला व त्यांत १८८४;१८९०, १८९१, १८९८, १९१६ या सालीं दुरुस्त्या करण्यांत आल्या. मीठ बनविण्याची क्रिया म्हणजे खाऱ्या पाण्यापासून मीठ तयार करणें, किंवा खाऱ्या मातींतून मीठ निराळें काढणें, किंवा मिठाच्या खाणींतून मीठ काढणें, किंवा इतर कोणत्याहि रीतीनें मीठ तयार करणें, असा अर्थ आहे. 'मिठागर' यामध्यें मीठ बनविण्याची जागा व अशा जागेंतील धक्के, भराव, टांकीं, इमारती, मोकळी जागा, कोठारें, इत्यादि सर्वांचा समावेश होतो. 'मिठागरचें लायसेन्स' याचा अर्थ मीठ बनवण्याचा, मीठ खणून काढण्याचा, गोळा करण्याचा व एका जागेवरून दुसरीकडे नेण्याचा परवाना असा आहे. 'बेकायदेशीर मीठ' (कॉन्ट्रावँड सॉल्ट) याचा अर्थ या कायद्यांतील कलमांचा भंग करून किंवा लायसेन्समधील शर्तींचा भंग करून जें मीठ किंवा खारी माती मिठागरांतून लांबवली, किंवा जें मीठ बनवलें, गोळा केलें, खणून काढलें, सांठवलें, इकडून तिकडे नेलें तें सर्व मीठ व खारी माती, असा आहे. वरिष्ठ मध्यवर्ती सरकारनें पुढील बाबींचे नियम करावे–(अ) मीठ बनविण्याच्या क्रियेला पूर्णपणें किंवा सशर्त बंदी करणें; (ब) लायसेन्सची फी व इतर शर्ती; (क) मिठावरील कराचा दर व तो वसूल करण्याची स्थल–काल–पद्धत व वसूल करणारे कामगार; (ड) मिठागराची जागा; आणि (ई) एका मिठागराभोंवतींच्या क्षेत्राचें वर्णन, यांबद्दल नियम करावे (नियम ६). मध्यवर्ती सरकारला (अ) मिठावरील कराचा दर ठरवण्याचा, (ब) ठरवलेला दर कमी करण्याचा किंवा रद्द करण्याचा, आणि तो दर पुन्हां वाढवण्याचा किंवा लागू करण्याचा, आणि (क) मीठविक्रीचा दर ठरवण्याचा अधिकार आहे, मात्र मिठावरील कर दर मणास तीन रुपयांहून अधिक असतां कामा नये. (मण = ८७–२–७ अव्हाईड्याझ पौंड). वरिष्ठ सरकारच्या नियमांना अनुसरून प्रांतिक सरकारला मीठ-विक्रीचा दर ठरवण्याचा अधिकार आहे. पंजाब प्रांतांतील कोहट जिल्हा या प्रदेशांतील सिंधु नदीच्या कांठचा कमाल पंधरा मैल रुंदीचा आणि जरूर तितक्या लांबीचा आणि सिंधु नदीपासून पंजाब प्रांताच्या पश्चिम सरहद्दीपर्यंतचा प्रदेश मर्यादित करून त्या प्रदेशांत सरकारी ठाणीं ठेवावीं आणि अशीं ठाणीं ठेवणें ही लँड ॲक्विझिशन ॲक्टप्रमाणें सार्वजनिक हिताची बाब आहे असें मानलें जाईल (कलम ८ अ). या मर्यादित क्षेत्रांत (अ) परवान्यावांचून कोहट क्षेत्रांतील मीठ जवळ बाळगण्याला मनाई करावी, आणि (ब) सदर क्षेत्रांतून बेकायदा मीठ बाहेर जाऊं नये म्हणून वाहतुकीवर नियंत्रण ठेवावें आणि उतारूंची व त्यांच्या सामानाची झडती घ्यावी, यासंबंधींचे नियम वरिष्ठ सरकारनें करावे (कलम ८ ब). या कायद्याचीं कलमें व नियम मोडणाराला ५०० रुपये दंड, किंवा सहा महिने कैद, किंवा दोन्ही शिक्षा कराव्या; आणि मीठ बनवण्याचीं साधनें, जागा व मीठ सरकारजमा करावें (कलम ९). सदर कायद्याच्या कलमांचा किंवा नियमांचा भंग करणाऱ्या इसमाची वर्दी, किंवा अशा गुन्ह्याची वर्दी प्रत्येक खेड्यांतील गांवकामगारानें मॅजिस्ट्रेटला, पोलिसला किंवा सॉल्ट अधिकाऱ्याला दिली पाहिजे (कलम १५). बेकायदा मीठ वाहून नेणारें वाहन गलबत, होडी, गाडी व गाडीचीं जनावरें व त्या वाहनांतील मीठ व मीठ काढण्याचीं हत्यारें, सामानसुमान व यंत्रें सरकारजमा करावीं (कलम ५०).

मिठाचें उत्पन्न ब्रिटिश अमलापूर्वीपासूनचें आहे. ब्रिटिश सरकारनें सरसकट ठराविक कर बसविला इतकेंच. १९२८ सालीं म. गांधींनीं मिठावरचा कर उठविण्याकरितां चळवळ सुरू करून कायदेभंगाचीहि उठावणी दिली. तेव्हां सरकारनें थोडें पडतें घेऊन व्यक्तीच्या उपयोगासाठीं मीठ तयार करण्याची परवानगी दिली. मिठावरचा कर १८८८ ते १९०३ पर्यंत मणाला (८२ पौंडांच्या) अडीच रुपये असे. १९०३ सालीं २ रु., १९०५ सालीं १॥ रु. व १९०७ सालीं १ रु. याप्रमाणें उतरविण्यांत आला. १९२३ सालीं तो जो पुन्हां २॥ रु. करण्यांत आला तो पुढल्याच वर्षी निम्मा उतरला. याप्रमाणें

मिठामुळें इतर मूलद्रव्यांचे विषारी परिणाम फारसे भोंवत नाहींत व मूत्रपिंडांतून त्याज्य द्रव्यें बाहेर टाकण्यास सुलभ जातें. शरीरास सूज आली असल्यास मीठ कमी खाण्यानें सूज ओसरते व मीठ फार खाल्ल्यास सूज येण्याच्या प्रवृत्ती वाढतात. मिठामुळें अन्नाची चव व तृप्ति वाढतात; मिठामुळें अन्नपदार्थांच्या इतर चवी व स्वाद ठळकपणें लक्षांत येतात; जठररस लवकर सुटतो व थोड्याशा खाण्यानेंहि समाधान वाटतें. जठरांत आम्ल रस मिठापासूनच उत्पन्न होतो.

भूक मंद असेल, पचन नीट नसेल, तर मिठानें पचन वाढतें व भूक रसरसते. म्हणूनच अनादिकालापासून रानटी जनावरेंसुद्धां मिठाची चटक लागल्यास कोस कोस प्रवास करतात. सृष्टींत ९२ मूलद्रव्यें आहेत, पण ह्यांपैकीं एकच ( मीठ ) आपण अन्नांत मुद्दाम, अन्नपदार्थांत तें निसर्गतः असतें तरी, मिसळतो.

मीठ हें सिंधु व हर ( सोडियम आणि क्लोरीन ) ह्यांच्या संयोगानें झालें आहे. हराचा अंश पचनांत अम्लता उत्पन्न करतो. शरीरांतील एकंदर हराच्या सांठ्यापैकीं एक-तृतीयांश सांठा त्वचेंत असतो. म्हणून त्वचा चाटल्यास खारट लागते व घामाहि खारट असतो. अतिश्रम केल्यावर किंवा उन्हाळ्यांत घाम फार सुटतो व त्यांतून मीठ बाहेर फार जातें, त्यामुळें फार थकवा उत्पन्न होतो. हा थकवा घालविण्यास मुद्दाम मिठाचें पाणी प्यावें.

लोणचीं इत्यादि सांठवणीचे अन्नपदार्थ करण्यासाठीं मीठ फार उपयुक्त आहे. खारावलेले मासे, लोणी, चीज, मांस अनेक दिवस टिकतात. मिठवणींत ठेवलेलीं फुलेंहि अनेक दिवस राहतात. सृष्टींत मीठच नसतें तर जगांतील अनेक अन्नपदार्थ खाण्यास फार कठिण गेलें असतें.

मिठाच्या अभावामुळें रोग-विकृती उत्पन्न होतात. जठरांत हराम्ल ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) स्रवण्याचें बंद झाल्यास, जठररसांतील दुसरा अंश–पेप्सीन–हा कितीहि जरी असला तरी व्यर्थ होय. या वेळीं कृत्रिम हराम्ल दिलें तरी पचन सुरू होतें. म्हणून रक्तक्षयांत हराम्ल कमी होतें व भूक जाते, तेव्हां हें दिल्यानें भूक वाढते व रक्तक्षयहि जातो. हराम्ल जास्त झाल्यास, बाहेर जसें अम्ला( ॲसिड )नें भाजतें, तद्वतच जठरांत होतें व तेथें क्षत ( अल्सर ) पडतें. मीठ कमी खालें किंवा बंद केलें कीं हराम्ल स्रवणें बंद होतें व क्षतहि बरें होतें. हा सोपा उपाय होय. अशाच परिस्थितींत ज्या अन्नपदार्थांत मीठ जास्त असतें ते घेतलेच नाहींत तर जास्त फायदा होतो.

मिठाच्या अभावीं हाडें वाढत नाहींत व पक्ष्यांत सशक्त पिलेंच निपजत नाहींत. सशांचें मीठ तोडलें तर त्यांच्यांत गर्भपात होतात. गवत खाणाऱ्या पशूंना मीठ मिळालें नाहीं तर त्यांची वाढ होत नाहीं व तीं खुरटतात; माणसांतहि असेंच होतें. मुडदूस ( रिकेट्स ) रोग मुलांत होतो व मोठ्यांत हाडें फार दुखावतात. इतर प्राण्यांत अशक्तता येते, अंग कांपतें व गात्रें मृतवत् ( पॅरॅलिसिसप्रमाणें ) होतात. मांसाहारी जनावरांस मीठ न लागण्याचें कारण मांसांत तें पुष्कळ असतें हें होय.

गायींना मीठ न मिळाल्यास त्यांची भूक जाते, त्वचा रुक्ष होते, त्या रोडावतात व दूध कमी देतात; गर्भधारणाहि नीट होत नाहीं. दुमत्या गायींना रोज दोन औंस मीठ निदान द्यावें म्हणजे त्या लवकर आटत नाहींत. मुलांस पाजणाऱ्या आईनेंहि हा नियम लक्षांत ठेवावा. माणसांना चहाचा दीड चमचा किंवा एक तोळा मीठ रोज पाहिजे. चहाच्या अर्ध्या चमच्यापेक्षां मीठ कमी खाल्ल्यास मूत्रांतून तें स्रवणेंच बंद होतें. ज्या माणसांना घाम येतो, फार घाम येण्याइतकीं श्रमाचीं कामें करावीं लागतात, त्यांनीं चहाचे चार चमचे मीठ निदान खावें. अति घाम असेल तर पिण्याच्याहि पाण्यांत मीठ टाकावें, म्हणजे लगेच हुशारी वाटते.

उपवासांत शरीरांतून मीठ बाहेर पडतें व त्याबरोबरच खट ( कॅल्शम ), मग्न ( मॅग्नीशियम ) व स्फुर ( फॉस्फरस ) हेंहि मूत्रांतून फार प्रमाणांत बाहेर पडतात, हाडें कमकुवत होतात व वजन ६–७ टक्क्यांनीं घटतें.

शरीरांतील कोणताहि भाग सुजल्यास तेथें मीठ सांचतें व लघवींतून जायचें कमी होतें. म्हणून फुप्फुसावरणदाह ( प्लूरिसी ), नवज्वर ( न्युमोनिआ ), विषम ( टायफॉइड ), हिंवताप, क्षय, हाडदुखी, तीव्र भ्रम ( डिलीरियम–ट्रेमेन्स ) ह्यांत व तीव्र सांसर्गिक रोगांत त्या त्या अवयवांत मीठ सांचतें, लघवींतून कमी होतें, व त्याबरोबरच खट–स्फुर वगैरेहि मूत्रांतून स्रवण्याचें कमी होतात.

आरोग्यावस्थेंत, आपण आहारांत रोज जें मीठ खातों त्यापैकीं ९५ टक्के २४ तासांत बाहेर पडून जातें; म्हणून आपणांस रोजच्या जेवणांत मीठ पाहिजे; जर मूत्रपिंडाचा रोगच असेल तर तें स्रवत नाहीं. म्हणून ह्या रोगांत मीठ कमी देणें अगत्याचें असतें.

हृदयाचे, मूत्रपिंडाचे व यकृताचे रोग असतील तर मीठ कमी द्यावें किंवा बंद करावें; अशाच कारणामुळें स्थूलता, मूत्रमेह ( डायाबेटिस इन्सिपिडस ), फेपरें ह्यांतहि मीठ तोडावें.

फार मीठ खाण्यास देऊन उलट्या करवितां येतात; म्हणून विषबाधा झाल्यास पुष्कळ मिठाचें पाणी पाजतात. मिठानें रक्तस्राव थांबतो, लाळ कमी सुटते, गुदांत असणाऱ्या ( ऑक्झियुरिस ) कृमींस गुदावाटे मिठवणी दिल्यास तें त्यांना मारक होतें. मिठाच्या योगानें अवयवांत असलेली सूज कमी

होते, कालिकज्वर जातात व जंतुघ्न म्हणून त्याचा उत्तम उपयोग होतो.

मानवशरीरांत एकंदर लवणें ७ पौंड आहेत, त्यांपैकीं पांच पौंड हाडांतच असतात. लवणांमुळें हाडांस बळकटी येते, व इतर ठिकाणच्या संचयामुळें आपत्कालीं त्यांचा उपयोग तावडतोच होऊं शकतो; म्हणून त्यांची आवश्यक अन्नपदार्थांत गणना करतात.

मिठाचें शोषण लहान आंतड्यांतच झपाट्यानें होतें. शौचावाटे अदमासें चहाचा पाव चमचा मीठ बाहेर पडतेंच.

मानवशरीरांत अदमासें ५० औंस (३ पौंड) मीठ असतें. रोजच्या आहारांतून मिळणाऱ्या नैसर्गिक चहाचा अर्धा चमचा या मिठांशिवाय रोज २॥–३ चमचे मीठ पाहिजे. शरीरांतून रोज चहाचे तीन चमचे मीठ मूत्रांतून, शौचांतून, घामावाटे, *थुंकण्यांतून, अश्रूंतून, इत्यादि बाह्य स्रावांतून* रोज बाहेर पडतेंच. मूत्राचा महत्त्वाचा भाग मीठ आहे. म्हणून रोज तीन चमचे मीठ खावें. ह्यापैकीं कांहीं जेवणांतील अन्नाच्या निरनिराळ्या प्रकारांत आपण घालतोंच. बाकीचें वरती चव वाढविण्यासाठीं घ्यावें. जास्त घेतल्यास शरीरास विनाकारण श्रम होतात व मूत्रपिंड दुखावतात.

मिठाचा कायदा—हिंदुस्थानांत हा कायदा मागील कायदे दुरुस्त करून १८८२ सालीं मंजूर झाला व त्यांत १८८४;१८९०, १८९१, १८९८, १९१६ या सालीं दुरुस्त्या करण्यांत आल्या. मीठ बनविण्याची क्रिया म्हणजे खाऱ्या पाण्यापासून मीठ तयार करणें, किंवा खाऱ्या मातीतून मीठ निराळें काढणें, किंवा मिठाच्या खाणींतून मीठ काढणें, किंवा इतर कोणत्याहि रीतीनें मीठ तयार करणें, असा अर्थ आहे. ‘मिठागर’ यामध्यें मीठ बनविण्याची जागा व अशा जागेंतील धक्के, भराव, टांकीं, इमारती, मोकळी जागा, कोठारें, इत्यादि सर्वांचा समावेश होतो. ‘मिठागरचें लायसेन्स’ याचा अर्थ मीठ बनवण्याचा, मीठ खणून काढण्याचा, गोळा करण्याचा व एका जागेवरून दुसरीकडे नेण्याचा परवाना असा आहे. ‘बेकायदेशीर मीठ’ (कॉन्ट्राबँड सॉल्ट) याचा अर्थ या कायद्यांतील कलमांचा भंग करून किंवा लायसेन्समधील शर्तींचा भंग करून जें मीठ किंवा खारी माती मिठागरांतून लांबवली, किंवा जें मीठ बनवलें, गोळा केलें, खणून काढलें, सांठवलें, इकडून तिकडे नेलें तें सर्व मीठ व खारी माती, असा आहे. वरिष्ठ मध्यवर्ती सरकारनें पुढील बाबींचे नियम करावे–(अ) मीठ बनविण्याच्या क्रियेला पूर्णपणें किंवा सशर्त बंदी करणें; (ब) लायसेन्सची फी व इतर शर्ती; (क) मिठावरील कराचा दर व तो वसूल करण्याची स्थल–काल–पद्धत व वसूल करणारे कामगार; (ड) मिठागराची जागा; आणि (ई) एका मिठागराभोंवतींच्या क्षेत्राचें वर्णन, यांबद्दल नियम करावे (नियम ६). मध्यवर्ती सरकारला (अ) मिठावरील कराचा दर ठरवण्याचा, (ब) ठरवलेला दर कमी करण्याचा किंवा रद्द करण्याचा, आणि तो दर पुन्हां वाढवण्याचा किंवा लागू करण्याचा, आणि (क) मीठविक्रीचा दर ठरवण्याचा अधिकार आहे, मात्र मिठावरील कर दर मणास तीन रुपयांहून अधिक असतां कामा नये. (मण = ८७–२–७ अव्हाईर्डुप्वाझ पौंड). वरिष्ठ सरकारच्या नियमांना अनुसरून प्रांतिक सरकारला मीठ-विक्रीचा दर ठरवण्याचा अधिकार आहे. पंजाब प्रांतांतील कोहट जिल्हा या प्रदेशांतील सिंधु नदीच्या कांठचा कमाल पंधरा मैल रुंदीचा आणि जरूर तितक्या लांबीचा आणि सिंधु नदीपासून पंजाब प्रांताच्या पश्चिम सरहद्दीपर्यंतचा प्रदेश मर्यादित करून त्या प्रदेशांत सरकारी *ठाणीं ठेवावीं आणि अशीं ठाणीं ठेवणें ही लँड ॲक्विझिशन* ॲक्टप्रमाणें सार्वजनिक हिताची बाब आहे असें मानलें जाईल (कलम ८ अ). या मर्यादित क्षेत्रांत (अ) परवान्यावांचून कोहट क्षेत्रांतील मीठ जवळ बाळगण्याला मनाई करावी, आणि (ब) सदर क्षेत्रांतून बेकायदा मीठ बाहेर जाऊं नये म्हणून वाहतुकीवर नियंत्रण ठेवावें आणि उतारूंची व त्यांच्या सामानाची झडती घ्यावी, यासंबंधींचे नियम वरिष्ठ सरकारनें करावे (कलम ८ ब). या कायद्याचीं कलमें व नियम मोडणाराला ५०० रुपये दंड, किंवा सहा महिने कैद, किंवा दोन्ही शिक्षा कराव्या; आणि मीठ बनवण्याचीं साधनें, जागा व मीठ सरकारजमा करावें (कलम ९). सदर कायद्याच्या कलमांचा किंवा नियमांचा भंग करणाऱ्या इसमाची वर्दी, किंवा अशा गुन्ह्याची वर्दी प्रत्येक खेड्यांतील गांवकामगारानें मॅजिस्ट्रेटला, पोलिसला किंवा सॉल्ट अधिकाऱ्याला दिली पाहिजे (कलम १५). बेकायदा मीठ वाहून नेणारें वाहन गलबत, होडी, गाडी व गाडीचीं जनावरें व त्या वाहनांतील मीठ व मीठ काढण्याचीं हत्यारें, सामानसुमान व यंत्रें सरकारजमा करावीं (कलम ५०).

मिठाचें उत्पन्न ब्रिटिश अमलापूर्वीपासूनचें आहे. ब्रिटिश सरकारनें सरसकट ठराविक कर बसविला इतकेंच. १९२८ सालीं म. गांधींनीं मिठावरचा कर उठविण्याकरितां चळवळ सुरू करून कायदेभंगाचीहि उठावणी दिली. तेव्हां सरकारनें थोडें पडतें घेऊन व्यक्तीच्या उपयोगासाठीं मीठ तयार करण्याची परवानगी दिली. मिठावरचा कर १८८८ ते १९०३ पर्यंत मणाला (८२ पौंडांच्या) अडीच रुपये असे. १९०३ सालीं २ रु., १९०५ सालीं १॥ रु. व १९०७ सालीं १ रु. याप्रमाणें उतरविण्यांत आला. १९२३ सालीं तो जो पुन्हां २॥ रु. करण्यांत आला तो पुढल्याच वर्षी निम्मा उतरला. याप्रमाणें

सारखी चढउतार होत आहे. हल्लीं मणाला १-९-० रु. इतका कर आहे. थोडा जरी कर वाढला तरी सरकारला बरेंच उत्पन्न मिळत असतें.

१९४५-४६ सालीं हिंदुस्थानांत ५ कोटी ४६ मण मीठ तयार झालें. यापैकीं एक कोटी मण मीठ पाकिस्तान भागांतलें आहे. मिठाचा धंदा सुधारण्यासाठीं भारत सरकारचे प्रयत्न चालले आहेत. राजपुतान्यांतील मिठाचे कारखाने सरकार चालवितें. सांभर सरोवर हें मिठाचें मोठें आगर आहे. पंजाबांत खनिज मीठ मिळतें. मुंबई आणि मद्रास या प्रांतांत समुद्राच्या पाण्यापासून मीठ काढतात.

**मीडिया**—हें इराणच्या वायव्य भागाचें प्राचीन नांव आहे. यांत सध्यांचे अझरबैजन, आर्देलन, इराक, अजेमी व कुर्दीस्तानचा कांहीं भाग येतो. मीडियाचा बराच भाग म्हणजे ३००० ते ५००० फूट उंचीचें एक पठार असून त्यांत कांहीं सुपीक मैदानें आहेत. हवा समशीतोष्ण आहे. सेफिद रुद (आमरर्देस) ही एकच नदी असून ती कास्पियन समुद्रास मिळते. वायव्य भागांत उरुमिया नांवाचें एक मोठें सरोवर आहे. मीड लोकांनीं असुरियाविरुद्ध सुमारें ख्रि. पू. ७१० या वर्षीं बंड केलें; व डायोसीस यानें हें राज्य स्थापलें. त्याचा मुलगा सायाक्सारीझ यावर प्रथम सिथियन लोकांनीं हल्ला केला. पुढें त्यानें निनेव्ह काबीज करून मीडियाची सत्ता वाढविली. आज खुद्द मीडियाच्या साम्राज्याचें एकहि स्मारक उपलब्ध नाहीं. असुरी राज्य मोडून मीडिया, बाबिलोन, ईजिप्त, सायलेशिया व लिडिया हीं राज्यें निर्माण झालीं. पैकीं मीडियाचें राज्य फार प्रबल होतें.

**मीना**—ही राजपुतान्यांतील प्रसिद्ध जात आहे. यांची एकंदर लो. सं. ६ लाखांवर आहे. पैकीं राजपुतान्यांत साडेपांच लाख असून मध्यहिंदुस्थानांत पाऊण लाखपर्यंत आहे. मध्यप्रांतांत यांची वस्ती ८००० आहे. जयपूरच्या राजास अभिषेक करतांना यांच्या अंगठ्याच्या रक्ताचा टिळा लावावा लागतो. रजपूत राज्यकर्ते झाल्यावर मीना बायकांचा व त्यांचा सर्रहा संबंध झाला असला पाहिजे. कारण पंजाबांत कोणा बाईस व्यभिचारिणी म्हणावयाचें असेल तर तिला 'मीना देन' म्हणतात. यांच्यांतील धेडिया मीना हे गोमांस खातात. हे मीना लोक कालीचे मोठे भक्त आहेत.

**मीमांसा**—हें प्रसिद्ध सहा दर्शनांपैकीं एक दर्शन आहे. मीमांसाशास्त्राला ख्रिस्ती शकापूर्वी चऱ्याच शतकांपासून मान्यता मिळाली होती व त्या शास्त्राला पूर्णत्व आलें होतें असें प्रत्ययाला येतें. मीमांसा या शब्दाचा वाच्यार्थ जरी चर्चा अथवा जिज्ञासा असा आहे तथापि मोक्ष, निर्वाण, इत्यादि शब्दांप्रमाणें याला एक विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे. पूज्य अशा वेदवाक्यांचे निरनिराळे अर्थ लावणें शक्य असल्यामुळें त्यांपैकीं खरा कोणता व खोटा कोणता हें ठरविण्याचें काम मीमांसेचें आहे. लौकिक व वैदिक वाङ्मयांत धर्म म्हणून जो रूढ शब्द आहे त्याचा विचार करण्याकरितां मीमांसाशास्त्राचा अवतार आहे. मीमांसा व वेदान्त हीं शास्त्रे अगदीं परस्परसंबद्ध आहेत व त्यामुळें काम्यकर्मविवेचक शास्त्राला पूर्वमीमांसा व वेदान्ताला उत्तरमीमांसा असें नांव पडलें आहे. तथापि प्राचीन कालापासूनच पूर्वमीमांसेऐवजीं मीमांसा या शब्दाचाच उपयोग केला जात होता. या मीमांसाशास्त्रावर सर्वांत जुना व प्रमाणभूत ग्रंथ म्हणजे जैमिनीचीं मीमांसासूत्रें होत. जैमिनीचा काळ अगदीं अलीकडे ओढला तरी तो ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकाअलीकडे आणतां येणार नाहीं असें महामहोपाध्याय काणे यांनीं 'पूर्वमीमांसा-पद्धतीचा इतिहास' यांत म्हटलें आहे.

या शास्त्रास पूर्वमीमांसा असेंहि म्हणतात. श्रुति आणि स्मृति यांच्यांतील विरोध नाहींसा करून विशेषतः श्रुतींतील कर्ममार्गाचें महत्त्व प्रस्थापित करणें आणि लोकहितावह असा धर्म सांगणें हें या मीमांसादर्शनाचें उद्दिष्ट आहे, म्हणून याला कर्ममीमांसा असें नांव पडलें आहे. वेदोक्त यज्ञादिक कर्मांची महती यांत प्रतिपादिली असून तीं केल्याच्या योगानें स्वर्गप्राप्ति होते असें सिद्ध केलें आहे.

वेदविहित कर्में न आचरणें व त्यांच्याविरुद्ध वर्तन करणें यांच्यामुळें संसारी जीव बद्ध होतो. वेद नित्य आहेत, परंतु वेद ईश्वरवाक्य आहे, हें मत कर्ममीमांसकांस मान्य नाहीं. ते निरीश्वरवादी असून जीवास कर्मानुसार फल प्राप्त होतें, यांत ईश्वरचा संबंध नाहीं, यज्ञयागकर्मेंच काय तीं आवश्यक आहेत, असें ते मानतात. याप्रमाणें पूर्वमीमांसा निरीश्वरवादी, ज्ञानमार्गाच्या विरुद्ध, व हिंसात्मक यज्ञयागादि कर्मप्रवर्तक असल्यामुळें या मताचा पगडा हिंदु धर्मावर दीर्घकाल टिकला नाहीं.

शबर हा जैमिनिसूत्रांवरचा प्रख्यात टीकाकार होय. शबराच्या व प्रभाकर व कुमारिल यांच्या दरम्यानच्या कालांत जैमिनि-सूत्रांवर व त्यांवरील शबर-भाष्यावरहि बरेच टीकाग्रंथ लिहिले गेले असावेत, असें कुमारिलाच्या ग्रंथांवरून दिसतें. तथापि शबरानंतर मीमांसाशास्त्रावर लिहिणारे प्रख्यात ग्रंथकार प्रभाकर व कुमारिल हेच होत. मीमांसकांमध्यें दोन महत्त्वाचे पक्ष उत्पन्न होऊन एकाला प्रभाकर अगर गुरुमत व दुसऱ्याला कुमारिल अगर भट्टमत असें नांव पडलें. प्रभाकराच्या संप्रदायापेक्षां कुमारिलाच्या संप्रदायांत मीमांसेवर लिहिणारे पुष्कळच प्रसिद्ध ग्रंथकार होऊन गेले.

मीमांसाशास्त्र वेदांना अपौरुषेय व अनादि मानतें व त्यामुळें कोणत्याहि वादांत वेदाला प्रमाण धरतें. तसेंच जग हें स्वयंभू आहे, त्याला कोणींच उत्पन्न केलें नाहीं असें मीमांसेचें म्हणणें आहे व यावरून हें शास्त्र निरीश्वरवादी असें म्हणण्यांत येतें. तथापि कुमारिलभट्टानें या आक्षेपाचें निरसन करण्याचा प्रयत्न केला आहे. आत्म्यासंबंधीं जैमिनीच्या सूत्रांमध्यें एकहि सूत्र आढळत नाहीं. तथापि तो आत्म्याचें अस्तित्व नाकबूल करतो असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. शबरानें आपल्या भाष्यांत आत्म्याचें विस्तारानें विवरण केलें आहे. तसेंच प्रभाकरानें व कुमारिलानें प्रत्येक शरीरांत निराळा आत्मा असून तो नित्य व सर्वव्यापी आहे असें म्हटलें आहे. तसेंच कुमारिल व प्रभाकर यांच्यामध्यें मोक्षाचेंहि विवेचन आहे. मनुष्याच्या शरीरांतील धर्माधर्म प्रकार नाहींसे झाल्यानंतर शरीराच्या अस्तित्वाचा कांहीं उपयोग नाहीं व अशी स्थिति प्राप्त होणें म्हणजेच मोक्ष, असें प्रभाकराचें मत आहे. मीमांसाशास्त्र ज्ञानाचें स्वतःप्रामाण्य मान्य करतें. मीमांसेनें सत्यानिर्णयासाठीं जी विशिष्ट पद्धत आंखली ती फारच सुंदर आहे व ती सर्वांनीं मान्य केली आहे. ही पद्धत विषय, संशय, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष व सिद्धांत अशी पंचांगी आहे. वाक्यामध्यें क्रियापद हें प्रमुख होय असें मीमांसेचें मत आहे.

आज इतर सर्व दर्शनांपेक्षां मीमांसादर्शन याचा अभ्यास पाठीमागें पडला आहे. तथापि मीमांसाशास्त्र अनेक दृष्टींनीं उपयोगी आहे यांत वाद नाहीं. प्रथमतः सत्यासत्यान्वेषणाच्या बाबतींत मीमांसकांनीं जी पद्धत घालून दिली आहे ती शास्त्रशुद्ध व निर्दोष आहे व या पद्धतीचा पुढील सर्व शास्त्रकारांनीं उपयोग केला आहे. अलीकडील कायद्याच्या शब्दांचा अर्थ लावण्यांत जी पद्धत अनुसरली जाते तींत व या पद्धतींत विलक्षण साम्य आढळतें. मीमांसाशास्त्र हें कायद्याचें पुस्तक नाहीं. तथापि त्यामध्यें कांहीं कांहीं ठिकाणीं कायद्याचीं तत्त्वें ग्रथित केलेलीं आढळतात. मीमांसाशास्त्र हें अनेक दृष्टींनीं उपयुक्त असें शास्त्र आहे व या शास्त्राचा अभ्यास जो मागें पडला आहे त्याला चालना मिळणें जरूरीचें आहे. जसजसा मीमांसेचा अधिक अभ्यास होत जाईल तसतसा तिचा उपयोग लोकांना अधिक कळत जाईल असें मानण्यास बरीच जागा आहे.

**मीयांमल्लार**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोह सात स्वरांनीं होतो. अवरोहांत धैवत स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति संपूर्ण-षाडव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय मध्यरात्र मानितात. कानडा व मल्लार या दोन रागांचें मिश्रण यांत होत असतें. हा राग मंद्र सप्तकांत खुलतो. मीयां तानसेन यानें हा राग प्रचलित करून अकबर बादशहास खुष केलें अशी दंतकथा आहे. हा एक मल्लारप्रकार आहे.

**मीयांसारंग**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत गांधार स्वर वर्ज्य असल्यामुळें याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ असून संवादी पंचम आहे. गानसमय मध्याह्न सर्वसंमत आहे. मंद्र व मध्य सप्तकांत हा राग फार रक्तिदायक होतो. मंद्र सप्तकांतील धैवत व निषाद तसेंच मध्य सप्तकांतील निषाद व पंचम या स्वरांच्या संगती या रागांत फार मधुर लागतात. यामुळें या रागांत मीयांमल्लार रागाची व कानडा रागाची झांक दृष्टीस पडते. मीयां तानसेनानें हा राग बनविला असें सांगतात. हा एक सारंगप्रकार आहे.

**मीर अमीरअल्ली सय्यद** ( १८७३- )—हिंदी भाषेंतील एक सुप्रसिद्ध कवि, लेखक व सार्वजनिक कार्यकर्ते. मध्यप्रांतांतील सागर हें यांचें जन्मठिकाण. व्हर्न्याक्युलर फायनल व ट्रेंड शिक्षकाची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर अंजुमेन इस्लामिया हायस्कूलमध्यें हे ड्रॉइंगच्या शिक्षकाचें काम करूं लागले; परंतु डोळ्यांच्या आजारामुळें यांना हा व्यवसाय सोडून आपल्या चुलत्याकडे देवरी गांवीं जाणें भाग पडलें. यांच्या काव्यलेखनास सुरवात झाली ती यानंतरच. शिष्यपरंपरा निर्माण होण्याइतकें यांचें काव्य वरच्या दर्जाचें निघालें. 'लक्ष्मी' मासिक व 'जैनमित्र' या पत्रांचे हे संपादक होते. तुलसीदासाचें रामायण हा ग्रंथ गृहजीवनाचा आदर्श म्हणून यांनीं डोळ्यांपुढें ठेवला होता. यांच्या हिंदी काव्याबद्दल यांना अनेक पारितोषिकें देण्यांत येऊन यांचा गौरव करण्यांत आला आहे. 'बुढेका ब्याह', 'नीतिदर्पणकी भाषाटीका', 'सदाचारी बालक', वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. प्लेग सुरू झाला असतांना लोकांच्या उपयोगी पडण्यांत यांना आत्मिक समाधान वाटे. गोरक्षणाचेहि हे पुरस्कर्ते होते.

**मीर कासीम** ( राज्य. १७६१-७७ )—हा मीर जाफरचा जांवई व बंगालचा एक नबाब होता. याची राजधानी मोंघीरला होती. तोफा, बंदुका, वगैरे शस्त्रास्त्रें तयार करण्याचे कारखाने यानें उभारले. राज्यांतील जकातीच्या वसुली संबंधांत त्याचें ई. इं. कंपनीशीं बितुष्ट आलें. सन १७६४ त इंग्रजांशीं झालेल्या युद्धांत हा पराभूत झाला व दिल्लीचा बादशहा शहाआलम व अयोध्येचा नबाब यांच्या आश्रयास गेला. बक्सारच्या लढाईंत या तिघांचा इंग्रजांनीं पराभव केला तेव्हां मीर कासीम देशोधडीस लागला ( १७६४ ).

**मीर जाफर** ( राज्य १७५७-१७६५ )—बंगालचा एक नबाब. याचें खरें नांव जाफर अलीखान. मीर जाफर हा नबाब सिराजचा सेनापति होता. सिराजशीं फितूर होऊन प्लासीच्या

लढाईंत इंग्रजांना हा मिळाला आणि त्याबद्दल त्याला इंग्रजांनीं मुर्शिदाबादेस सिराजच्या गादीवर बसविलें. त्याच्याजवळून क्लाइव्हनें सव्वा दोन कोटी रुपये उकळले. पुढें त्याला इंग्रजांचें खरें स्वरूप कळल्यावर त्यानें त्यांच्याविरुद्ध खटपट चालविली, तेव्हां कंपनीनें त्याच्यावर अव्यवस्थित राज्यकारभाराचा आरोप आणून त्याला पदच्युत केलें (१७६१). या कामीं त्याचा जांवई मीर कासीम हा इंग्रजांना फितूर होता. पुढें मीर कासीम इंग्रजांविरुद्ध उलटल्यावर इंग्रजांनीं पुन्हां १७६३ त या म्हाताऱ्या मीर जाफरास नबाब बनविलें. यानंतर जाफर हा दोन वर्षांनीं मेला. त्याची कबर मुर्शिदाबादेस आहे.

**मीर जुम्ला** (मृ. १७६३)—एक मोगल सरदार. इराणांतील इस्फाहान येथील तेल्याचा हा मुलगा. सन १६३० मध्यें गोवळकोंड्यास येऊन तेथें जव्हेरीचा धंदा करूं लागला. याचें नांव मुहमंद सय्यद (सैद). आपल्या कर्तबगारीवर हा अबदुल कुत्बशहाचा प्रधान झाला. आपल्या पदरीं युरोपियन सैन्य ठेवून यानें कडप्पा, गंडीकोट किल्ला, वगैरे बरींच ठिकाणें व हिऱ्याच्या खाणी यांवर आपली सत्ता प्रस्थापित केली व अशा रीतीनें अतिशय सधन होऊन हा राजाच्या तोलानें राहूं लागला. तेव्हां कुत्बशहास याचें ऐश्वर्य सहन न होऊन त्यानें याच्याशीं विरोध सुरू केला. म्हणून सन १६५५ मध्यें औरंगजेबाच्या मध्यस्थीनें यानें शहाजहानकडे नोकरी धरली. याचीं बायकामुलें कुत्बशहानें अडकवून ठेवलीं होतीं तीं औरंगजेबानें सोडवलीं. सन १६५७ मध्यें यास विजापूरच्या स्वारीच्या वेळीं औरंगजेबाच्या मदतीस पाठवण्यांत आलें. पुढें शहाजहान मरण पावल्यानें औरंगजेबानें यास आपल्याकडे ठेवून घेऊन याच्या साहाय्यानें कुचविहार व आसाम प्रांत जिंकले. या स्वाऱ्या करून परत येत असतां यास वाटेंत मृत्यु आला. सन १६६० मध्यें औरंगजेबानें यास बंगालची सुभेदारी दिली होती. मीर जुम्ला फार शहाणा व शूर होता. पण त्याच्या गुणांचें योग्य चीज झालें नाहीं, असें म्हणावें लागतें.

**मीर मुहंमद तकी** (१७११–१८०८)—एक ऊर्दू कवि व शिकारनामा, अजगरनामा व निकातुश्शुअरा या लोकप्रिय ग्रंथांचा कर्ता. अबदुल्ला मीरचा हा मुलगा. दिल्लीचा शहाअलम बादशहा व लखनौचे असफउद्दौला व सादतअली यांनीं याचा चांगला सत्कार केला होता.

**मीरत**—संयुक्त प्रांत, मीरत विभाग, एक जिल्हा. क्षे. फ. २३२३ चौ. मै.. लो. सं. (१९४१) १८,९६,५८२. यांत २० शहरें व ९४ गांवें आहेत. पावसाची सरासरी २० ते ४७ इंच आहे. प्राचीन काळीं या भागांत सोमवंशी राजे राज्य करीत होते. त्यांची राजधानी हस्तिनापूर येथें होती. कालांतरानें येथें अशोकाचा अमल सुरू झाला. त्यानंतर मुसलमानी सत्ता आली. १८ व्या शतकांत मराठ्यांचें वर्चस्व यावर होतें. १८०३ मध्यें शिंद्यानें हा जिल्हा इंग्रजांस दिला. जिल्ह्याची भाषा हिंदी आहे. शें. ४९ लोक शेतकीवर व बाकीचे इतर धंद्यावर उपजीविका करतात. येथील जमिनींत गहूं, चहा, ज्वारी, ऊंस व कापूस हे जिन्नस होतात. जिल्ह्यांत कोठें कोठें कातडें कमाविलें जातें व सुती कापडहि विणलें जातें. निरपुरगांवीं घोंगड्या होतात, व बहादुरगड येथें नक्षीदार पितळेचीं भांडीं होतात. उत्पन्न ४४,२१,००० रु. आहे. १८५७ च्या क्रांतियुद्धांत पहिला स्फोट या ठिकाणीं झाला. मीरत शहरीं गोऱ्या लोकांची छावणी असे. लो. सं. (१९४१) १,१७,१८२. येथें एक कॉलेज व नॉर्मल स्कूल आहे. हसन माहदी नामक वजिरानें स. १०१९ मध्यें बांधलेली जाममशिद, स. १६२८ मध्यें नूरजहाननें बांधलेला शाहपिराचा दर्गा, स. १७१४ मध्यें बांधलेलें सूर्यकुंड (सूरज कुंड), इत्यादि प्राचीन अवशेष अजून कायम आहेत.

**मीरपुरखास**— सिंध, थर व पारकर जिल्ह्याचा तालुका. क्षे. फ. ४१७ चौरस मैल. लो. सं. सु. अर्धा लाख. तालुक्यांत मीरपुरखास हें एकच मोठें गांव आहे. येथें बरेच पाटबंधारे आहेत; त्यांत जामराव नांवाचा पाटबंधारा प्रमुख आहे. मीरपुरखास हें गांव जोधपूर–बिकानेर रेल्वेच्या लुनी हैद्राबाद शाखेवर असून येथें मसाले, धान्य व कापूस यांचा व्यापार चालतो. इ. स. १९०० मध्यें बांधलेल्या जामराव कालव्यामुळें याला बरेंच महत्त्व आलें आहे.

**मीरव्हाइल निसव्हॉको**—एक रशियन वनस्पतिशास्त्रज्ञ. कडक थंडीला न जुमानणाऱ्या गहूं वगैरे वनस्पती त्यानें शोधून काढल्या आहेत. माळरानांत व बर्फाच्छादित प्रदेशांतहि सफरचंदांची लागवड करतां येण्याची युक्ति त्यानें शोधून काढली आहे. कलमें बांधून निरनिराळ्या गुणधर्मांच्या वनस्पती तयार करण्यांत त्याचा हातखंडा आहे. रशियन वनस्पति-संशोधकांच्या संस्थेचा तो कार्यवाह आहे.

**मुकडेन**—(चिनी नांव फेंगतिएनफू). चीन, मांचुरियाची राजधानी. ही हून–हो नदीवर वसलेली आहे. येथील लो. सं. २,५०,००० असून हें व्यापाराचें केंद्र आहे. पूर्वीं मुकडेन हें मांचु घराण्याचें राहण्याचें मुख्य ठिकाण होतें. शहराच्या मधोमध एक लहान राजवाडा आहे. येथें नॉर्थईस्टर्न (ईशान्य) युनिव्हर्सिटी आहे. रूसोजपानी युद्धांत (१९०५) मुकडेनच्या जवळ भयंकर रणकंदन झालें; त्याला मुकडेनची लढाई असें म्हणतात.

**मुकर्जी, सर अशुतोष सरस्वती** (१८६४–१९२४)—बंगाल्यांतील एक थोर कार्यकर्ते व कलकत्ता विद्यापीठाचे उद्धारक. यांचें शिक्षण सबर्बन स्कूल व प्रेसिडेन्सी आणि सिटी

कॉलेज, कलकत्ता यांत झालें. १८८९ सालापासून कलकत्ता विश्वविद्यालयाचे फेलो व सिंडिकेटमध्यें होते. हे बंगालयांतील निरनिराळ्या विद्वत्सभांचे सभासद व सदस्य होते. १९०४ सालीं कलकत्ता हायकोर्टांचे न्यायाधीश झाले व १९०६ पासून कलकत्ता विश्वविद्यालयाचे कुलगुरु होते. त्या विद्यापीठांत मुकर्जींनीं मोठी इष्ट क्रांति घडवून आणली. संशोधनात्मक अभ्यासाचें क्षेत्र वाढवून हिंदी पदवीधरांचा दर्जा वाढविला. मानववंशशास्त्राची शाखा प्रथमच हिंदुस्थानांत या विद्यापीठांत त्यांनीं उघडली. दुय्यम व उच्च शिक्षणांत बंगाली भाषेला यांनीं स्थान मिळवून दिलें. यांनीं शिक्षणक्षेत्रांतले अनेक कार्यकर्ते तयार केले.

**मुकर्जी, डॉ. राधाकुमुद गोपालचंद्र** (१८८९- )—हिंदुस्थानची संस्कृति व प्राचीन इतिहास यांचे अभ्यासक, लेखक व वक्ते. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमधून एम्. ए. झाल्यावर यांनीं पीएच्. डी. ही पदवी मिळवली. मध्यंतरीं १९०५ सालीं यांनीं कलकत्ता युनिव्हर्सिटीकडून ७००० रुपये किमतीची 'प्रेमचंद रायचंद' ही शिष्यवृत्ति मिळवून एक अपूर्व मान मिळवला. यानंतर रिपन कॉलेज, बिशप कॉलेज, (कलकत्ता), बनारस हिंदु युनिव्हर्सिटी व लखनौ युनिव्हर्सिटी यांत प्राचीन इतिहासाचे प्राध्यापक म्हणून यांनीं काम केलें. हे बंगाल कायदेमंडळाचेहि सभासद होते. बडोदा सरकारनें सात हजार रुपयांचें सयाजीराव गायकवाड पारितोषिक व 'इतिहास-शिरोमणि' ही पदवी देऊन यांच्या विद्वत्तेचा गौरव केला होता. हिंदुस्थानचें मूलभूत ऐक्य, प्राचीन भारतांतील व्यक्ती आणि विचार, प्राचीन काळापासूनचा भारताच्या नौकानयनाचा व दर्यावर्दी व्यापाराचा इतिहास, जातीय प्रश्नाचा विचार करण्याची एक नवीन दिशा, गुप्तसाम्राज्य, या विषयांवर यांचे अनेक ग्रंथ यांच्या थोर ज्ञानार्जनाची साक्ष देतात.

**मुकर्जी, शैलज** (१९०८- )—एक हिंदी चित्रकार. हे कलकत्त्याचे रहिवासी असून यांना शालेय शिक्षण फारसें नाहीं. कलकत्त्याच्या कलाविद्यालयांत पांच वर्षें होते. पण तेथील शिक्षणाचा फारसा फायदा करून घेतला नाहीं. पुढें स्वतःच्या मतानें अनेक व्यवसाय केले. १९३७ सालीं त्यांनीं आपल्या कलाकृतींचें पहिलें प्रदर्शन मांडलें. नंतर परदेशांत जाऊन पाश्चात्य कलांच्या विविध प्रवाहांचें निरीक्षण केलें. हिंदुस्थानांत आल्यानंतर आपल्या चित्रांचें दुसरें प्रदर्शन कलकत्त्यास उघडलें. कल्पनेची तरलता आणि चैतन्य यांचें प्रामुख्य त्यांच्या चित्रांत खेळतें. परंपरा आणि तंत्र यांना धरून चित्रसौंदर्य गांठण्याची त्यांची हातोटी विलक्षण आहे. आत्माविष्काराचे कोणतेहि नवीन प्रकार त्यांना चालतात. फारसी आणि रजपूत कलमांतील जानपद कला त्यांना मोहित करते. पाश्चात्यांचा हेत्वाभास आणि पौरस्त्यांची भावनात्मकता यांचा सुंदर मिलाफ ते घालतात त्यांचे रंग ते स्वतःच करतात व त्यांत ताजेपणा आणि तजेलाहि आणतात.

फ्रान्समध्यें असतांना संस्कारवादी (इंप्रेशनिझम्) कलेकडे त्यांचा ओढा होता; पण त्यांतील भावनाहीनता तसेंच रचना व पूर्णता यांचा अभाव यांमुळें ते नवीन वास्तववादी भावप्रकटतेकडे (एक्स्प्रेशनिझम्) वळले. आजच्या भारतीय भावप्रकटवादी चित्रकारांत ते अग्रेसर आहेत. 'स्वप्न', 'चुंबन', इ. त्यांचीं चित्रें प्रसिद्ध आहेत. 'फोक आर्ट ऑफ इंडिया' (हिंदुस्थानांतील लोककला) हें यांचें पुस्तक अर्वाचीन हिंदी कलेच्या इतिहासांत महत्त्वाचें गणलें जातें. भारतीय कृषिजीवनाचीं दृश्यें मुकर्जी उत्कृष्टपणें रंगवितात.

**मुकर्जी, श्यामाप्रसाद** (१९०१- )—बंगालमधील एक हिंदु पुढारी, राष्ट्रीय कार्यकर्ते, शिक्षणतज्ज्ञ व सुप्रसिद्ध कायदेपंडित. कलकत्ता युनिव्हर्सिटीचे संवर्धक अशुतोष मुकर्जी हे यांचे वडील होत. श्यामाप्रसाद हे कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमधून एम्. ए. झाल्यावर इंग्लंडला गेले व तिकडून १९२७ सालीं बॅरिस्टर होऊन स्वदेशीं आले.

बंगाल कायदेमंडळांत निवडून येऊन यांनीं आपल्या सार्वजनिक कार्याची मुहूर्तमेढ रोवली. त्यानंतर सन १९३४-३८ या कालांत कलकत्ता युनिव्हर्सिटीचे कुलगुरु, सन १९४१-४२ या कालांत बंगालचे अर्थमंत्री, यांसारख्या अनेक महत्त्वाच्या जागांवर कामें करून हे जनतेसमोर आले. १९४६ सालीं असेंब्लीच्या निवडणुकींत यांची निवडणूक बिनविरोध अशी झाली. यानंतर यांना राष्ट्रसभेनें हिंदी घटना समितीसाठीं निवडून दिलें.

सन १९४३ मध्यें भरलेल्या हिंदुमहासभेच्या बंगालमधील अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा व रॉयल एशियाटिक सोसायटीच्या अध्यक्षपदाचा मान यांना देण्यांत आला होता. नंतर नेहरू मंत्रिमंडळांत ते व्यापारमंत्री होते (१९४७); पण निर्वासितांसंबंधीं नेहरू आणि लियाकतअली यांमध्यें जो करार झाला तो यांस न आवडून त्यांनीं मंत्रिपदाचा राजीनामा दिला (१९५०).

**मुकुट**—राजे लोकांच्या शिरोभूषणास मुकुट असें म्हणतात. शिरोभूषणाची चाल फार प्राचीन काळापासून प्रचलित असून प्रथम देवांच्या मूर्तींच्या डोक्यांवर मुकुट कोरलेले आढळतात. तसेंच सुटे मुकुटहि देवांच्या मूर्तींस घालण्यांत येतात. राजे लोकहि मिरवणूक, दरबार, वगैरे प्रसंगीं व समारंभांतून मुकुट वापरतात. इंग्लंड वगैरे पाश्चात्य देशांत सरदार लोकांसहि ठराविक आकाराचे व पद्धतींचे मुकुट वापरण्याचा हक्क आहे.

असे मुकुट सोनें वगैरे मौल्यवान् धातूंचे केलेले असून त्यांवर नाना प्रकारची नक्षी काढलेली असते व त्यांत अनेक मौल्यवान् रत्नें बसविलेलीं असतात. इंग्लंडच्या राजमुकुटांतील कोहिनूर हिरा प्रसिद्ध असून तो हिंदुस्थानांतील गोवळकोंड्याच्या खाणींत सांपडलेला आहे. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या प्रकारचे मुकुट बनविलेले असतात.

**मुकुंद**—या नांवाचे अनेक संत व कवी होऊन गेले.

१. नृसिंहकृत मुकुंदचरित्राचा नायक. याचें नांव ब्रह्मानंद होतें. याचें एकनाथचरित्र, रुक्मिणीस्वयंवर हे ग्रंथ होत.

२. सारिपाट काव्याचा कर्ता.

३. एक प्रबंधकार.

४. मुकुंद म्हणून एक रामदासी होता. भीमस्वामींचा शिष्य जे गोविंदबावा त्यांचा हा पुतण्या. याचे ग्रंथ : देवभक्तानुवाद, रामकृष्णाविलास, गुरुबोधपंचक, पदें, वगैरे होत.

५. मुकुंद (दीन)—नेमाडांतील खांडव्यास याचा जन्म झाला. पित्याच्या मरणानंतर हा बागलाणांत जैतापुरीं गेला व तेथें यवनांची सेवा स्वीकारली. १६०८ सालीं स्वप्नांत त्याला सद्गुरुदर्शन झालें. त्याचे ग्रंथ : रामायण-सुंदरकांड (१६२३), रेणुकासत्त्वदर्शन (१६२८), दत्तजन्मदूतिप्रेषण, दानलीला (१६२८), यशोदा-गौळण संवाद (१६२८), छंदोरत्नाकर (१६२८), गुरुस्तुति (१६२४), अंगदशिष्टाई, सुदामचरित्र (१६२९), वेदान्त अंकुशपुराण (१६१५), श्रीशंकराचार्यस्तुति, श्रीमध्वाचार्य, दत्तस्तोत्र, इत्यादि आहेत.

**मुकुंदराज** (११२८-९६)—याला मराठी भाषेंतील आद्य कवि मानण्यांत येतें. याची गुरुपरंपरा आदिनाथ-हरिनाथ-रघुनाथ-मुकुंदराज अशी आहे. हे सर्व मध्यप्रदेशांतील दिसतात. मुकुंदराजाची समाधि बैतुलजवळ खेडलें गांवीं दाखवितात. दुसरी एक जोगाईच्या आंब्यास दाखवितात. पण पहिली खरी वाटते. विवेकसिंधु, परमामृत, पंचीकरण, मूलस्तंभ हे याचे मराठी ग्रंथ आहेत. यांपैकीं पहिला (विवेकसिंधु) फार प्रसिद्ध आहे. जयंतपाळ राजासाठीं हा रचला असें त्याच ग्रंथांत म्हटलें आहे. विवेकसिंधूच्या कांहीं प्रतींत जयंतपाळ याऐवजीं शारंगधर असें नांव येतें. विवेकसिंधु शक १११० त रचलेला आहे. विवेकसिंधूचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग असून दोन्ही मिळून १८ प्रकरणें व १६७१ ओवीसंख्या आहे. परमामृत लहान आहे. त्याच्या १४ प्रकरणांत मिळून ३०३ ओंव्या आहेत. हे दोन्ही ग्रंथ वेदान्तपर असून त्यांची मांडणी सुबोध व प्रासादिक आहे. कवीनें शांकर वेदान्ताचा म्हणजे *अद्वैत तत्त्वज्ञानाचा या ग्रंथांत* पुरस्कार केला आहे.

**मुक्तछंद काव्य**—यमक नसलेली कविता. इंग्रजी वाङ्मयांत शेक्स्पियर, मार्लो, मिल्टन, इ. कवींनीं आपलीं सुप्रसिद्ध गीतें मुक्तछंदांत लिहून या प्रकाराला अजरामर केलें. इंग्रजी मुक्तछंदाचा सर्वसामान्य प्रकार द्विमात्रृकात्मक आहे. मिल्टनचें 'पॅराडाइज लॉस्ट' किंवा शेक्सपियरचीं नाटकें याच वृत्तांत आहेत. मराठींत अलीकडे हा प्रकार प्रचारापर्यंत जाऊन रूढ होऊं पाहत आहे. ५ किंवा ६ अक्षरांचे गण, मात्राविचार लक्षांत न घेतां, सोईचे वाटतील तसे एकापासून तीनचारापर्यंत एका चरणांत म्हणजे ओळींत लिहून अर्थदृष्ट्या कोणत्याहि ओळीशीं थांबलें पाहिजे असा बंध न पाळतां, अर्थ संपला कीं, वाक्य व परिच्छेद संपवितां येतो अशी ही रचना आहे, असें प्रा. जोगांच्या शब्दांत सांगतां येईल. हिचे कट्टे पुरस्कर्ते विदर्भांतील कवी श्री. वा. ना. देशपांडे आणि श्री. आ. रा. देशपांडे होत. श्री. पु. शि. रेगे व श्री. ना. ग. जोशी यांनीं हिला चांगलें उचलून धरलें. गंभीर व विचारप्रधान विषयाला हा छंद शोभून दिसतो खरा, पण याची लोकांत फारशी आवड दिसून येत नाहीं हेंहि तितकेंच खरें आहे.

**मुक्ताबाई** (शक १२०१-१९)—आद्य मराठी कवयित्री. ही ज्ञानेश्वराची बहीण होय. हिचा आपेगांवीं जन्म झाला व भावांबरोबर ही पैठणास गेली. तेथून नेवाशाच्या रस्त्यानें आळंदीस येऊन राहिली. तेथें वटेश चांगदेवास उपदेश केला, व ज्ञानेश्वर व सोपान यांच्या समाधीनंतर (१२१८-१२१९) एदलाबादेजवळ माणगांवीं हिनें जलसमाधि घेतली (१२१९). हिची समाधि खानदेशांत तापीतीरावर मेहूण गांवींहि दाखवितात. हिचे ग्रंथ ज्ञानेश्वरीताटी, कल्याणपत्रिका, नमन, हरिपाठ हे होत. ही अविवाहित होती. हिचे कांहीं अभंग अप्रसिद्ध आहेत.

मुक्ताबाई ही योगामार्गी असून तिनें चांगदेवाला गुह्य तत्त्वज्ञान पढवून आत्मपदीं चढविलें. तिच्या नांवानें प्रसिद्ध असलेले ताटीचे अभंग कांहीं विद्वान् व वारकरीहि प्रक्षिप्त मानतात. या अभंगांत तिनें ज्ञानेश्वरासारख्या प्रबुद्ध भावाचा लटिकाळपणें रुसवा काढला आहे. "तुम्ही तरुनी विश्व तारा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा॥" हा बहिणीचा सदुपदेश फार थोर आहे यांत शंका नाहीं.

**मुक्तिफौज**—( साल्व्हेशन आर्मी ). एक धार्मिक आणि परोपकारी संघटना. जनरल बूथ यानें इ. स. १८७७ मध्यें ख्रिस्ती धर्मात सुधारणा करून बहुजनसमाजांत त्याचा प्रसार करण्यासाठीं ही लष्करी पद्धतीची संस्था काढली. १९०४ सालीं एडवर्ड बादशहानें प्रोत्साहन दिल्यावरून ही चांगली सरसावली. आज ९७ देशांतून व १०३ भाषांतून या संस्थेचें कार्य चालू आहे. प्रसूतिगृहें, बालसंरक्षकगृहें, औद्योगिकगृहें, अनाथगृहें, मजूरसंघ, शाळा, कारखाने, इ. किती तरी सामाजिक अंगांचीं कामें संस्थेनें चालविलीं आहेत. गुन्हेगारांची सुधारणा हें संस्थेचें कार्य प्रशंसनीय आहे. या मुक्तिफौजेचे आजचे प्रमुख जनरल आल्बर्ट ओसबोर्न आहेत.

हिंदुस्थानांत १८८२ मध्यें संस्थेनें कार्य सुरू केलें. कारभाराच्या सोईसाठीं पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, मद्रास आणि तेलगू प्रांत असे विभाग पाडले असून दर विभागांत शाळा, दवाखाने, वगैरे आहेत. ख्रिस्ती 'शुभवर्तमाना'चा उपदेश करण्याचें काम सर्वांत मोठें चालतें.

**मुक्तेश्वर** ( शक १५२१-१५७१ )—एक मराठी कवि. एकनाथाच्या गोदुबाई नांवाच्या मुलीचा हा मुलगा होय. कोणी गंगाबाईचा मुलगा समजतात. मुक्तेश्वर हा मूळ पैठणचा. हा कथाकीर्तनें करीत असे. याचें गोत्र अत्रि असून बापाचें नांव चिंतामणि ऊर्फ विश्वंभर होतें. याचें रामायण याच्या मोठाल्या काव्यांपैकीं प्रथम रचलेलें असावें. मुक्तेश्वराचीं सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें व कोणत्याहि मनोविकाराचीं भावांसह रेखाटलेलीं शब्दचित्रें मनोवेधक आहेत. याची रचना फार रसाळ व समजण्यास सोपी अशी आहे. पण याच्या काव्यांत कालविपर्यासाचा दोष आहे. याच्या महाभारताचीं पांचच पर्वें उपलब्ध आहेत. याशिवाय भागवत, हरिश्चंद्राख्यान, भविष्योत्तर पुराण, फुटकळ पदें व आरत्या यानें केल्या आहेत. हा दत्तभक्त होता. हा तेरवाड येथें वारला. तेथें त्याची समाधि आहे.

**मुखकोण**—( फेशिअल अँगल ). हा मुखकोण कोणता याविषयीं मस्तकविज्ञान्यांमध्यें मतभेद आहेत. कोणी म्हणतो, तोंडाचा आंस आणि कवटीचा आंस यांमधील कोण; तर कँपरसारख्याच्या मतें, कानापासून नाकपुड्यांपर्यंतची रेषा आणि नाकपुड्यांपासून कपाळापर्यंतची दुसरी रेषा यांमधील कोण हा मुखकोण होय. सामान्यतः मानववंशासंबंधीं असें सिद्धांतन करतां येईल कीं, मुखकोण जों जों विस्तृत असेल तों तों त्या लोकांची बुद्धिमत्ता अधिक असेल.

**मुखत्यार**—( ॲटर्नी ). एखाद्या इसमाकरितां त्याच्याऐवजीं आणि त्याच्या नांवानें एखादें कृत्य करण्याकरितां जो दुसरा इसम नेमतात त्याला मुखत्यार म्हणतात. मुखत्यार दोन प्रकारचा असतो: १. कुलमुखत्यार ( जनरल ॲटर्नी ) म्हणजे एखाद्या इसमाकरितां त्याचीं सर्व कामें करणारा दुसरा इसम; आणि २. विशिष्ट कामाचा मुखत्यार ( स्पेशल ॲटर्नी ) म्हणजे एक विशिष्ट कृत्य करण्याकरितां नेमलेला इसम. स्पेशल ॲटर्नी नेमण्याकरितां लेखी मुखत्यारपत्र करून त्यांत त्या विशिष्ट कृत्याचा उल्लेख करावा लागतो, आणि तें करण्याचा अधिकार दिला आहे, असा मजकूर लिहावा लागतो. कोर्टामध्यें एखाद्या दाव्यांत वादी किंवा प्रतिवादी यातर्फे हजर राहून काम चालविण्याकरितां जो वकील नेमतात त्याला ॲटर्नी ॲट लॉ असें म्हणतात. पूर्वी इंग्लंडांत कॉमन लॉच्या वरिष्ठ कोर्टांत काम चालविणाऱ्या वकिलांना ॲटर्नी ॲट लॉ म्हणत असत, आणि चॅन्सरी कोर्टातल्या वकिलांना सॉलिसिटर म्हणत असत. १८७३ नंतर सर्वांना सॉलिसिटर म्हणतात.

हिंदुस्थानांत मुखत्याराबाबतचा कायदा आहे ( सिव्हिल प्रोसीजर कोड पाहा ); शिवाय स्टँप ॲक्टच्या शेड्यूलमध्यें मुखत्यारपत्र ( पॉवर ऑफ ॲटर्नी ) या दस्तऐवजाला रु. २ चा स्टँप एका किंवा अनेक इसमांस एका व्यवहारापुरतें मुखत्यार नेमणें असल्यास, आणि रु. १५ चा स्टँप एक किंवा अनेक इसमांस हरएक बाबतींत मुखत्यार ( जनरल पॉवर ऑफ ॲटर्नी ) नेमण्याकरितां लागतो.

**मुखसामुद्रिक**—चेहऱ्यावरून माणसाच्या स्वभावाची, शीलाची परीक्षा करण्याची विद्या. वैद्यकशास्त्रांत रोगनिदानाच्या कामीं हिची फार आवश्यकता असते. तसेंच पोलिस अधिकाऱ्यांना गुन्ह्यांचा तपास करतांना वरील प्रकारचें चांगलें ज्ञान लागतें. चेहरा हा मनाचा आरसा आहे हें खोटें नाहीं. तथापि तो पाहण्याची विद्या संपादावी लागतेच. आरिस्टॉटलनें याविषयीं जो सिद्धांत काढला त्याची वाढ १६ व्या शतकांत बॅप्टिस्टा दे ला पोर्टा यानें केली व पुढील शतकांत लेब्रुन या फ्रेंच चित्रकारानें व टिशबीन या जर्मन चितान्यानें या विद्येला मोठी चालना दिली. तथापि मुखसामुद्रिकपद्धतीचा सविस्तर अभ्यास लाव्हातेरखेरीज दुसऱ्या कोणाचा होता असें म्हणतां येणार नाहीं.

**मुखस्नायुशूल**—हा एक चेहऱ्यावरील मज्जातंतूंचा विकार असून तो एक मज्जातंतुव्यथेचा प्रकार आहे. या विकारांत फार तीव्र वेदना व स्नायूंचें आकुंचन होऊं लागून याचा झटका कांहीं मिनिटांपासून कित्येक तासपर्यंत राहतो. हा विकार चेहऱ्याच्या एका बाजूस असतो व त्याचें कारण एखादा किडलेला दांत, कर्णविवराचा दाह, थंडी किंवा अपचन हें असूं शकतें.

**मुंगी**— हा प्राणी सर्वांच्या परिचयाचा आहे. यांच्या

**मुंगी—अवस्था व प्रकार**

[ १ अंडें, २ अळी, ३ कोश, ४ लहान मुंगी, ५ पुरुष मुंगी, ६ स्त्री मुंगी, ७ कामकरी मुंगी. ]

२००० जाती आहेत. मुंग्या समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांत आढळतात. या संघ करून राहतात व या संघांत असणाऱ्या प्रत्येक मुंगीकडे निश्चितपणें विशिष्ट काम नेमून दिलेलें असतें. यांच्या संघाचे नियम असतात. प्रत्येक संघांत कांहीं नर असतात, तसेंच कांहीं माद्या असतात. माद्या नरांपेक्षां थोड्या मोठ्या असतात. त्याप्रमाणेंच कांहीं वांझ माद्या असतात, त्यांस तृतीय पुरुषी किंवा कामकरी मुंग्या किंवा दाया म्हणतात. कामकरी मुंग्यांस पंख नसतात; फक्त स्त्री किंवा पुरुष मुंग्यांसच पंख फुटतात. पण हे पंख फक्त संयोगाच्याच वेळीं फुटतात. संयोगानंतर नर मरून जातात व माद्यांवर इतर प्राणी हल्ला करतात. त्यांतून ज्या वांचतात त्या आपलीं अंडीं टाकून देतात व पूर्वीच्या घरांत परत येतात किंवा नवीन घर तयार करतात. कामकरी मुंग्या वारुळांतलीं सर्व कामें करतात. त्या वारुळांची रचना करतात (वारूळ पाहा). अन्न जमवून आणतात व नवीन पिलांचें पोषण करतात. कांहीं संघांमध्यें सैनिक मुंग्या असतात; आपल्या जबड्यानें त्या भयंकर दंश करतात. लाल मुंग्यांसारख्या कांहीं जातींच्या मुंग्या दुसऱ्या संघांतील कामकरी मुंग्या पळवून आणण्याकरितां त्यांवर हल्ला करतात असें आढळून आलें आहे. या हल्ल्यांत त्या दुसऱ्या मुंग्यांचीं अंडीं पळवून आणून त्यांस आपल्या वारुळांत वाढवून त्यांस गुलामांसारखें वागवतात. समशीतोष्ण प्रदेशांत स्त्री–पुरुष मुंग्या वर्षाकाळापर्यंत किंवा फार तर हिंवाळ्यापर्यंत जगतात. कामकरी मुंग्या हिंवाळ्यांत सुस्त पडून राहतात व त्यांस त्या काळांत अन्न लागत नाहीं. त्यांस कामाच्या दिवसांत व पिलांस खाऊ घालण्याकरितां अन्न लागतें. कांहीं जातींस नांग्या असतात. कांहीं जातींत एक झोंबणारा द्रव ( फॉर्मिक ॲसिड-पिपीलिकाम्ल ) बाहेर टाकतात.

मोठ्या मुंग्यांना मुंगळे म्हणतात. त्यांचे जबडे फार तीक्ष्ण असतात व त्यांच्या कोणी वाटेस गेलें कीं ते चावतात. मुंग्यांना ओलसर जागा चालत नाहीं. त्या पावसाळ्यांत कोरड्या जागीं आपलीं अंडीं नेतात. मुंगीस फार बळ असतें. आपल्या वजनाच्या पंचवीस पट वजन ती सहज ओढते.

**मुंगीखाऊ**— मुंग्या खाणारे हे सस्तन वर्गातील अनेक

जातींचे प्राणी आहेत. यांचें डोकें बरेंच लांब असून, यांच्या जबड्यांत दांत नसतात व तोंडांत एक लांब जीभ असून तीवर सरसासारखी चिकट लाळ असते. या जिभेनें हे आपलें भक्ष्य पकडतात. हे सर्व प्राणी दक्षिण अमेरिकेमध्यें आढळतात.

**मुंगूस**—हा जवादी मांजराच्या जातीचा एक मांसाहारी प्राणी असून आफ्रिका व इतर पूर्वेकडील देश यांत आढळतो. हा

सापाचा शत्रु असल्यामुळें यास हिंदुस्थानांत पाळण्यांत येतें. याचा आकार मोठ्या उंदरापेक्षां थोडा मोठा असून याचा रंग काळसर करडा असतो. शेंपूट झुपकेदार असून अंगाइतकेंच लांब असतें. तोंड लहान व वाटोळें असतें. डोळे वाटोळे व गुंजेसारखे लाल असतात. मुंगूस जात्या धीट असतें. त्यास खचदाडांत राहणें आवडतें. हा हिंस्र प्राणी आहे. सरडे, पाली, ससे, पक्षी, वगैरेवर याची उपजीविका असते.

साप आणि मुंगूस यांचें वैर प्रसिद्धच आहे. यासंबंधीं संस्कृतांत ‘अहिनकुल-न्याय’ आहे.

अथर्ववेदामध्यें सर्पाचे दोन तुकडे करून पुनः जोडणारा असें याचें वर्णन आलेलें आहे. सर्पदंशावर असणाऱ्या उपायांचें त्याला ज्ञान आहे, ही गोष्ट उल्लेखिलेली आहे. अश्वमेधीय बलींच्या यादींत याचें नांव आलेलें आहे.

**मुचकुंद**—या झाडाचीं पानें पळसाच्या पानांसारखीं असतात. झाडावर एक वितीइतकें लांब पिवळें फूल येतें; व गोरख चिंचेसारखीं पण लहान फळें येतात. अर्धशिशीवर फुलें वांटून मस्तकावर लेप देतात. मलद्वार बाहेर येतें त्यावर मुचकुंदाच्या फुलांची राख लोण्यांत खलून लावतात.

**मुचकुंद**— मांधाता राजाचा कनिष्ठ पुत्र. हा फार गुणवान् व पराक्रमीहि होता. यानें पृथ्वीचें राज्य संपादन केलें होतें. देवांनीं दैत्यांविरुद्ध लढण्यास याची मदत घेतली होती. यानें त्या वेळीं देवांचें संरक्षण केलें. तेव्हां यास वर मागण्यास देवांनीं सांगितलें. 'माझी झोंप जो मोडील तो माझ्या अवलोकनानें जळून खाक व्हावा व त्याच वेळीं मला श्रीविष्णुदर्शन व्हावें', असा वर यानें मागितला. नंतर हा एका गुहेंत बरींच वर्षे निजून होता. कालयवनाच्या भीतीनें कृष्ण जेव्हां या गुहेंत आला तेव्हां त्यानें आपला शेला मुचकुंदाच्या अंगावर घातला. त्यावरून यवनाला हा कृष्ण आहे असें वाटून त्यानें याला लाथ मारली. जागा होऊन मुचकुंदानें त्याकडे पाहतांच तो जळून खाक झाला. अशा रीतीनें कृष्णानें याच्याकडून कालयवनास मारविलें. (कालयवन पाहा).

**मुंज**—उपनयन पाहा.

**मुंज**—या शब्दाचा अर्थ एक प्रकारचें तृण असा आहे. मुंज या तृणाची वाढ झपाट्यानें होते व त्याची उंची सरासरी दहा फूट असते. विषारी प्राण्यांच्या विसांव्याच्या जागा या अर्थानें याचा उल्लेख ऋग्वेदांत इतर तृणांबरोबर आलेला आहे. त्याच वेदांत मुंजतृण हें शुद्ध करण्याचें अर्थातच सोमरस गाळण्याचें साधन आहे असें म्हटलें आहे. इतर संहिता आणि ब्राह्मण या ग्रंथांतहि या तृणाचा उल्लेख आलेला आहे. हें तृण पोकळ (सुषिर) असून त्याचा उपयोग एखादें उच्च सिंहासन (आसन्दी) विणण्याकडे करीत असत, असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे. जमिनीचा मुंजेरी म्हणून एक प्रकार असतो. ज्या जागेवर माळरान असतें, जमीन नुसती गवताळ असते, ती जागा मुंजेरी म्हणून संबोधितात. याउलट 'माळी' ही संज्ञा आहे.

**मुंज परमार** (राज्य. ९७५–९५)—माळव्याच्या परमार घराण्यांतील एक राजा व हर्षाचा पुत्र. यानें अमोघवर्ष, पृथिवीवल्लभ, वाक्पतिराज, वगैरे बिरुदें धारण केलीं होतीं. रुद्रादित्य हा याचा मुख्य मंत्री होता. यानें कर्नाटक, लाट, केरळ, चोल, चेदि देशांच्या राजांच्यावर स्वाऱ्या करून त्यांना जिंकलें. शक्तिकुमार गुहिलोत राजाच्या वेळीं मेवाडवर याची स्वारी झाली. या स्वारींत यानें आघाटपूर (आहाड) लुटून चितोडगड व माळवा यांना जोडून असणारा प्रदेश आपल्या वर्चस्वाखालीं आणला. याच्या वेळचा कवि पद्मगुप्त (परिमल) यानें लिहिलेल्या 'नवसाहसांकचरित' व धनपालरचित 'तिलकमंजरी' या पुस्तकांवरून असें दिसतें कीं, मुंजाची आपला पुतण्या भोज याच्यावर प्रीति असल्यानें त्यास यानें तो सज्ञान झाल्यावर दत्तक घेऊन आपल्या गादीवर बसवलें. पुढें हा सन ९९३–९७ मध्यें सिंधुराजावर आपल्या राज्याचा भार सोंपवून कर्नाटकच्या दुसऱ्या तैलप चालुक्यावर चाल करून गेला. पण हाच तैलपाच्या हातीं सांपडला. तैलपानें याला हालहाल करून मारलें. हा स्वतः विद्वान् असून यानें नवसाहसांकचरितकर्ता पद्मगुप्त, दशरूपकाचा कर्ता धनंजय, धनपाल, पिंगलसूत्रावर 'मृत संजीवनी' नांवाची टीका लिहिणारा हलायुध यांसारख्या अनेक विद्वानांना आपल्या दरबारांत मानाचें स्थान दिलें होतें.

**मुजफरखान गारदी** (मृ. १७५९)—फ्रेंच सेनापति बुसी याच्या तालमींत तयार झालेला एक कवायती फौजेचा अधिकारी. प्रथम हा बुसीजवळ होता. पण पुढें याचें त्याच्याशीं न पटल्यानें यानें नानासाहेब पेशव्याच्या आग्रहाखातर त्याच्या कवायती फौजेंत नोकरी धरली. परंतु नानासाहेबाशींहि याचें न जमल्यानें व महादजी पुरंदरे याजबरोबर याचें भांडण झाल्यानें हा पेशव्यांना सोडून सावनूरच्या नबाबाच्या पदरीं राहिला. पुढें परत हा पेशव्यांकडे नोकरीसाठीं आला असतां सदाशिवरावभाऊनें यास घेण्यास नकार दिला; परंतु नानासाहेबानें मात्र यास पदरीं ठेवलें. त्यानंतर यानें सदाशिवरावभाऊचा खून करण्याचा प्रयत्न केला; परंतु तो फसला. खून करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल नानासाहेबानें याचा शिरच्छेद केला. याचें कोणाशीं पटत नसल्यानें यानें सतरा ठिकाणीं नोकऱ्या केल्या. याचा वचक मात्र सर्वांवर असे.

**मुझुमदार, बाबू अंबिकाचरण** (१८५१–१९२२)—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण बारिसाल व कलकत्ता येथें झालें. हे नाणावलेले वकील असून राष्ट्रीय चळवळींत एकसारखे धीमेपणानें भाग घेत असत. १९१६ सालीं लखनौ येथील अखिल भारतीय राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १९१९ च्या सुधारणा कायद्यान्वयें सुरू झालेल्या बंगाल प्रांताच्या कायदेमंडळांत निवडून आले होते (१९२१). यांचें 'हिंदुस्थानची राष्ट्रीय उत्क्रांति' हें एक उत्कृष्ट पुस्तक आहे. वक्तृत्वाबद्दल यांची ख्याति असे.

**मुझुमदार, नानी गोपाळ** (१८९७–१९३५)—एक हिंदी पुराणवस्तु-संशोधक व शिल्पकलातज्ज्ञ. यांनीं अमरी येथें उत्खनन करून खिस्तपूर्व ३५०० चा सुमार या कालांतील कांहीं अवशेष शोधून काढले आहेत. या अवशेषांवरून यांनीं मोहन-जो-दडो संस्कृतीच्यापेक्षांहि जुन्या संस्कृतीवर प्रकाश पाडला आहे. यांनीं केलेलें मातीच्या भांड्यांचें वर्गीकरण प्रमाणभूत

**मुंगी**— हा प्राणी सर्वांच्या परिचयाचा आहे. याच्या

मुंगी—अवस्था व प्रकार
[ १ अंडें, २ अळी, ३ कोश, ४ लहान मुंगी, ५ पुरुष मुंगी, ६ स्त्री मुंगी, ७ कामकरी मुंगी. ]

२००० जाती आहेत. मुंग्या समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांत आढळतात. या संघ करून राहतात व या संघांत असणाऱ्या प्रत्येक मुंगीकडे निश्चितपणें विशिष्ट काम नेमून दिलेलें असतें. यांच्या संघाचे नियम असतात. प्रत्येक संघांत कांहीं नर असतात, तसेंच कांहीं माद्या असतात. माद्या नरांपेक्षां थोड्या मोठ्या असतात. त्याप्रमाणेंच कांहीं वांझ माद्या असतात, त्यांस तृतीय पुरुषी किंवा कामकरी मुंग्या किंवा दाया म्हणतात. कामकरी मुंग्यांस पंख नसतात; फक्त स्त्री किंवा पुरुष मुंग्यांसच पंख फुटतात. पण हे पंख फक्त संयोगाच्याच वेळीं फुटतात. संयोगानंतर नर मरून जातात व माद्यांवर इतर प्राणी हल्ला करतात. त्यांतून ज्या वांचतात त्या आपलीं अंडीं टाकून देतात व पूर्वीच्या घरांत परत येतात किंवा नवीन घर तयार करतात. कामकरी मुंग्या वारुळांतलीं सर्व कामें करतात. त्या वारुळांची रचना करतात ( वारूळ पाहा ). अन्न जमवून आणतात व नवीन पिलांचें पोषण करतात. कांहीं संघांमध्यें सैनिक मुंग्या असतात; आपल्या जबड्यानें त्या भयंकर दंश करतात. लाल मुंग्यांसारख्या कांहीं जातींच्या मुंग्या दुसऱ्या संघांतील कामकरी मुंग्या पळवून आणण्याकरितां त्यांवर हल्ला करतात असें आढळून आलें आहे. या हल्ल्यांत त्या दुसऱ्या मुंग्यांचीं अंडीं पळवून आणून त्यांस आपल्या वारुळांत वाढवून त्यांस गुलामांसारखें वागवतात. समशीतोष्ण प्रदेशांत स्त्री–पुरुष मुंग्या वर्षाकाळापर्यंत किंवा फार तर हिंवाळ्यांपर्यंत जगतात. कामकरी मुंग्या हिंवाळ्यांत सुस्त पडून राहतात व त्यांस त्या काळांत अन्न लागत नाहीं. त्यांस कामाच्या दिवसांत व पिलांस खाऊ घालण्याकरितां अन्न लागतें. कांहीं जातींस नांग्या असतात. कांहीं जातींत एक झोंबणारा द्रव ( फॉर्मिक ॲसिड-पिपीलिकाम्ल ) बाहेर टाकतात.

मोठ्या मुंग्यांना मुंगळे म्हणतात. त्यांचे जबडे फार तीक्ष्ण असतात व त्यांच्या कोणी वाटेस गेलें कीं ते चावतात. मुंग्यांना ओलसर जागा चालत नाहीं. त्या पावसाळ्यांत कोरड्या जागीं आपलीं अंडीं नेतात. मुंगीस फार बळ असतें. आपल्या वजनाच्या पंचवीस पट वजन ती सहज ओढते.

**मुंगीखाऊ**— मुंग्या खाणारे हे सस्तन वर्गातील अनेक

जातींचे प्राणी आहेत. यांचें डोकें बरेंच लांब असून, यांच्या जबड्यांत दांत नसतात व तोंडांत एक लांब जीभ असून तीवर सरसासारखी चिकट लाळ असते. या जिभेनें हे आपलें भक्ष्य पकडतात. हे सर्व प्राणी दक्षिण अमेरिकेमध्यें आढळतात.

**मुंगूस**—हा जवादी मांजराच्या जातीचा एक मांसाहारी प्राणी असून आफ्रिका व इतर पूर्वेकडील देश यांत आढळतो. हा

सापाचा शत्रु असल्यामुळें यास हिंदुस्थानांत पाळण्यांत येतें. याचा आकार मोठ्या उंदरापेक्षां थोडा मोठा असून याचा रंग काळसर करडा असतो. शेंपूट झुपकेदार असून अंगाइतकेंच लांब असतें. तोंड लहान व वाटोळें असतें. डोळे वाटोळे व गुंजेसारखे लाल असतात. मुंगूस जात्या धीट असतें. त्यास खचदाडांत राहणें आवडतें. हा हिंस्र प्राणी आहे. सरडे, पाली, ससे, पक्षी, वगैरेवर याची उपजीविका असते.

साप आणि मुंगूस यांचें वैर प्रसिद्धच आहे. यासंबंधीं संस्कृतांत 'अहिनकुल-न्याय' आहे.

अथर्ववेदामध्यें सर्पाचे दोन तुकडे करून पुनः जोडणारा असें याचें वर्णन आलेलें आहे. सर्पदंशावर असणाऱ्या उपायांचें त्याला ज्ञान आहे, ही गोष्ट उल्लेखिलेली आहे. अश्वमेधीय बलींच्या यादींत याचें नांव आलेलें आहे.

**मुचकुंद**—या झाडाचीं पानें पळसाच्या पानांसारखीं असतात. झाडावर एक वितीइतकें लांब पिवळें फूल येतें; व गोरख चिंचेसारखीं पण लहान फळें येतात. अर्धशिशीवर फुलें वांटून मस्तकावर लेप देतात. मलद्वार बाहेर येतें त्यावर मुचकुंदाच्या फुलांची राख लोण्यांत खलून लावतात.

**मुचकुंद**— मांधाता राजाचा कनिष्ठ पुत्र. हा फार गुणवान् व पराक्रमीहि होता. यानें पृथ्वीचें राज्य संपादन केलें होतें. देवांनीं दैत्यांविरुद्ध लढण्यास याची मदत घेतली होती. यानें त्या वेळीं देवांचें संरक्षण केलें. तेव्हां यास वर मागण्यास देवांनीं सांगितलें. 'माझी झोंप जो मोडील तो माझ्या अवलोकनानें जळून खाक व्हावा व त्याच वेळीं मला श्रीविष्णुदर्शन व्हावें', असा वर यानें मागितला. नंतर हा एका गुहेंत बरींच वर्षे निजून होता. कालयवनाच्या भीतीनें कृष्ण जेव्हां या गुहेंत आला तेव्हां त्यानें आपला शेला मुचकुंदाच्या अंगावर घातला. त्यावरून यवनाला हा कृष्ण आहे असें वाटून त्यानें याला लाथ मारली. जागा होऊन मुचकुंदानें त्याकडे पाहतांच तो जळून खाक झाला. अशा रीतीनें कृष्णानें याच्याकडून कालयवनास मारविलें. (कालयवन पाहा).

**मुंज**—उपनयन पाहा.

**मुंज**—या शब्दाचा अर्थ एक प्रकारचें तृण असा आहे. मुंज या तृणाची वाढ झपाट्यानें होते व त्याची उंची सरासरी दहा फूट असते. विषारी प्राण्यांच्या विसांव्याच्या जागा या अर्थानें याचा उल्लेख ऋग्वेदांत इतर तृणांबरोबर आलेला आहे. त्याच वेदांत मुंजतृण हें शुद्ध करण्याचें अर्थातच सोमरस गाळण्याचें साधन आहे असें म्हटलें आहे. इतर संहिता आणि ब्राह्मण या ग्रंथांतहि या तृणाचा उल्लेख आलेला आहे. हें तृण पोकळ (सुषिर) असून त्याचा उपयोग एखादें उच्च सिंहासन (आसन्दी) विणण्याकडे करीत असत, असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे. जमिनीचा मुंजेरी म्हणून एक प्रकार असतो. ज्या जागेवर माळरान असतें, जमीन नुसती गवताळ असते, ती जागा मुंजेरी म्हणून संबोधितात. याउलट 'माळी' ही संज्ञा आहे.

**मुंज परमार** (राज्य. ९७५-९५)—माळव्याच्या परमार घराण्यांतील एक राजा व हर्षाचा पुत्र. यानें अमोघवर्ष, पृथिवीवल्लभ, वाक्पतिराज, वगैरे बिरुदें धारण केलीं होतीं. रुद्रादित्य हा याचा मुख्य मंत्री होता. यानें कर्नाटक, लाट, केरळ, चोल, चेदि देशांच्या राजांच्यावर स्वाऱ्या करून त्यांना जिंकलें. शक्तिकुमार गुहिलोत राजाच्या वेळीं मेवाडवर याची स्वारी झाली. या स्वारींत यानें आघाटपूर (आहाड) लुटून चितोडगड व माळवा यांना जोडून असणारा प्रदेश आपल्या वर्चस्वाखालीं आणला. याच्या वेळचा कवि पद्मगुप्त (परिमल) यानें लिहिलेल्या 'नवसाहसांकचरित' व धनपालरचित 'तिलकमंजरी' या पुस्तकांवरून असें दिसतें कीं, मुंजाची आपला पुतण्या भोज याच्यावर प्रीति असल्यानें त्यास यानें तो सज्ञान झाल्यावर दत्तक घेऊन आपल्या गादीवर बसवलें. पुढें हा सन ९९३-९७ मध्यें सिंधुराजावर आपल्या राज्याचा भार सोंपवून कर्नाटकच्या दुसऱ्या तैलप चालुक्यावर चाल करून गेला. पण हाच तैलपाच्या हातीं सांपडला. तैलपानें याला हालहाल करून मारलें. हा स्वतः विद्वान् असून यानें नवसाहसांकचरितकर्ता पद्मगुप्त, दशरूपकाचा कर्ता धनंजय, धनपाल, पिंगलसूत्रावर 'मृत संजीवनी' नांवाची टीका लिहिणारा हलायुध यांसारख्या अनेक विद्वानांना आपल्या दरबारांत मानाचें स्थान दिलें होतें.

**मुजफरखान गारदी** (मृ. १७५९)—फ्रेंच सेनापति बुसी याच्या तालमींत तयार झालेला एक कवायती फौजेचा अधिकारी. प्रथम हा बुसीजवळ होता. पण पुढें यांचें त्याच्याशीं न पटल्यानें यानें नानासाहेब पेशव्याच्या आग्रहाखातर त्याच्या कवायती फौजेंत नोकरी धरली. परंतु नानासाहेबाशींहि याचें न जमल्यानें व महादजी पुरंदरे याजबरोबर याचें भांडण झाल्यानें हा पेशव्यांना सोडून सावनूरच्या नवाबाच्या पदरीं राहिला. पुढें परत हा पेशव्यांकडे नोकरीसाठीं आला असतां सदाशिवरावभाऊनें यास घेण्यास नकार दिला; परंतु नानासाहेबानें मात्र यास पदरीं ठेवलें. त्यानंतर यानें सदाशिवरावभाऊचा खून करण्याचा प्रयत्न केला; परंतु तो फसला. खून करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल नानासाहेबानें याचा शिरच्छेद केला. याचें कोणाशीं पटत नसल्यानें यानें सतरा ठिकाणीं नोकऱ्या केल्या. याचा वचक मात्र सर्वांवर असे.

**मुजुमदार, बाबू अंबिकाचरण** (१८५१-१९२२)—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण बारिसाल व कलकत्ता येथें झालें. हे नाणावलेले वकील असून राष्ट्रीय चळवळींत एकसारखे धीमेपणानें भाग घेत असत. १९१६ सालीं लखनौ येथील अखिल भारतीय राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १९१९ च्या सुधारणा कायद्यान्वयें सुरू झालेल्या बंगाल प्रांताच्या कायदेमंडळांत निवडून आले होते (१९२१). यांचें 'हिंदुस्थानची राष्ट्रीय उत्क्रांति' हें एक उत्कृष्ट पुस्तक आहे. वक्तृत्वाबद्दल यांची ख्याति असे.

**मुजुमदार, नानी गोपाळ** (१८९७-१९३५)—एक हिंदी पुराणवस्तु-संशोधक व शिल्पकलातज्ज्ञ. यांनीं अमरी येथें उत्खनन करून खिस्तपूर्व ३५०० चा सुमार या कालांतील कांहीं अवशेष शोधून काढले आहेत. या अवशेषांवरून यांनीं मोहन-जो-दडो संस्कृतीच्यापेक्षांहि जुन्या संस्कृतीवर प्रकाश पाडला आहे. यांनीं केलेलें मातीच्या भांड्यांचें वर्गीकरण प्रमाणभूत

मानलें जातें. अनेक वर्षें हे पुराणवस्तु-संशोधनखात्याचे सुपरिंटेंडेंटहि होते. प्राचीन शिल्पकलांच्या अध्ययनावरील यांनीं लिहिलेल्या मार्गदर्शिका सुप्रसिद्ध आहेत. बंगालमधील प्राचीन लेख, हिंदी पदार्थसंग्रहालयांतील प्राचीन लेखांचे मार्गदर्शक, सिंधमधील उत्खनन, अशा विषयांवर यांचे विद्वन्मान्य इंग्रजी ग्रंथ आहेत. दादू येथें यांचें उत्खननकार्य सुरू असतां डूरांच्या टोळीकडून यांच्यावर हल्ला झाला व त्यांत हे मारले गेले.

**मुजुमदार, शंकर बापूजी** (१८६२–१९३८)—एक महाराष्ट्रीय नट व नाट्यवाङ्मयविषयाचे एक लेखक. पुणें हें यांचें जन्मठिकाण. यांचें शिक्षण पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें व नंतर यांनीं किर्लोस्कर नाटक मंडळींत प्रवेश केला. पुण्यांत शाकुंतल नाटकाचा जो पहिला प्रयोग झाला त्यांत यांनींच शकुंतलेची भूमिका केली होती. सौभद्र नाटकांत रुक्मिणीची भूमिकाहि हेच करीत. पण यांना गाण्याचें अंग नव्हतें. पुढें सन १८९२–१९२४ या कालांत हे किर्लोस्कर मंडळीचे व्यवस्थापक म्हणून काम करीत असत. गुणी लोकांची यांना चांगली पारख होती. बालगंधर्वादि प्रमुख नटांनीं कंपनी सोडल्यावर यांनीं हिंदी व ऊर्दू नाटकें बसवून सबंध हिंदुस्थानचा दौरा काढला. यांनींच आण्णासाहेब किर्लोस्करांच्या स्मरणार्थ पुण्यास किर्लोस्कर नाटकगृह बांधलें. तसेंच गॅरिक व भाऊराव कोल्हटकर यांचीं चरित्रें लिहिलीं. यांनीं आण्णासाहेब किर्लोस्करांचेंहि एक चरित्र लिहिलें आहे. यांचें नट, नाटककार व नाट्य यांसंबंधींचें वाङ्मय विपुल आहे. यांनीं 'रंगभूमि' हें मासिक काढून तें सुमारे बारा वर्षें चालविलें (सन १९०५–१९१७). निधनापूर्वी यांनीं १९ व्या शतकांतील पुण्याचा इतिहास लिहून छापावयासहि घेतला होता; पण तो पुरा झाला नाहीं.

**मुंजे, डॉ. बाळकृष्ण शिवराम** (१८७२–१९४८)—एक हिंदी पुढारी. यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण बिलासपूर व रायपूर शहरीं झालें. नंतर ते हिस्लॉप कॉलेजमध्यें होते. तेथून मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें जाऊन एल्. एम्. अँड एस्. झाले. यांनीं आपलें शिक्षण बरेंचसें स्वावलंबनानें केलें. पदवी घेतल्यावर हे मुंबई कॉर्पोरेशनमध्यें प्लेग-ऑफिसर म्हणून राहिले, यांस दक्षिण आफ्रिकेमध्यें बोअर

युद्धांत भाग घेण्यासाठीं जाण्यास रजा देण्यांत आली नाहीं म्हणून यांनीं राजीनामा दिला. नंतर हे दक्षिण आफ्रिकेंत गेले व तेथें त्या वेळीं दरबान येथें वकिली करीत असलेले बॅरिस्टर (महात्मा) गांधी यांच्याकडे उतरले. बोअर युद्धांत हे जनरल बुलरच्या हाताखालीं होते. हे अगदीं युद्धाच्या रणभूमीजवळच कामावर होते. या त्यांच्या कामाबद्दल त्यांना पदकें-प्रशस्तिपत्रें मिळालीं आहेत.

युद्धांतून परत आल्यावर त्याचा इरादा काबूल येथें जाऊन राहण्याचा होता, परंतु त्यांस अफगाणिस्तानच्या अमीराकडून कांहीं उत्तर न आल्यामुळें ते नागपुरास येऊन वैद्यकीचा धंदा करूं लागले. यांनीं मोतीबिंदु काढण्याची एक नवीन पद्धति बसविली. तिला स्मिथची शस्त्रक्रिया म्हणतात. १९०६ मध्यें हे लो. टिळकांचे राजकारणांत अनुयायी झाले व शेवटपर्यंत त्यांचा प्रतिसहकार तत्त्वावर विश्वास असे. १९०७ सालच्या कॉंग्रेसच्या लढ्यांत यांचा फार प्रामुख्यानें भाग होता. ती सभा नागपूर येथें भरावयाची होती ती अखेर सुरत येथें न्यावी लागली. लो. टिळक ६ वर्षें कारागृहांत असतांना यांनीं राजकीय चळवळ चालू राहण्याकरितां पुष्कळ खटपट केली. लो. टिळक यांची सुटका झाल्यानंतर कॉंग्रेसमधील दोन पक्षांमध्यें ऐक्य स्थापन करण्याच्या कामीं व लखनौ कॉंग्रेसच्या वेळीं यांनीं त्यांस फार साहाय्य केलें. या वेळीं हे स्वतः जरी मुसलमानांस स्वतंत्र मतदार संघ देण्याच्या विरुद्ध होते तरी तेथें हिंदु-मुसलमानांमध्यें 'लखनौ करार' या नांवानें प्रसिद्ध असलेला करार झाला.

१९२० मध्यें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन नागपूर येथें भरविण्यामध्यें यांचेंच मुख्य अंग होतें. हें अधिवेशन राष्ट्रीय सभेच्या इतिहासांत क्रांतिकारक झालें; कारण या वेळीं लो. टिळक यांच्या मृत्यूनंतर अवघ्या पांच महिन्यांत त्यांचें प्रतिसहकार तत्त्व मागें पडून अहिंसावाद, हिंदु-मुसलमान ऐक्य व अस्पृश्यतानिवारण, या गोष्टींस प्राधान्य मिळालें व महात्मा गांधी पुढें आले. यांस हिंदु-मुसलमान ऐक्य फक्त राष्ट्रीय भूमिकेवरुन झाल्यासच मान्य असल्यामुळें कॉंग्रेसमध्यें दोन पक्ष स्थापन होऊन हिंदु संघटनेच्या कामाकडे हे अधिक नेटानें वळले व यांनीं प्रतिसहकारवादी श्री. केळकर, डॉ. जयकर व लोकनायक अणे यांच्याबरोबर सहकार्य केलें. अशा वेळीं जें दोन पक्षांत द्वंद्व झालें त्यामध्यें यांनीं मध्यवर्ती असेंब्लीच्या १९२६ च्या निवडणुकींत कॉंग्रेस पक्षाचे बॅ. अभ्यंकर यांचा मोठ्या मताधिक्यानें पराजय केला.

असेंब्लीमध्यें यांनीं विशेषतः सैन्यासंबंधीं धोरणाच्या बाबतींत सरकारशीं चांगलाच सामना केला. १९३० सालीं महात्मा गांधी यांनीं दांडीस प्रयाण केल्यावर यांनीं आपल्या मित्रांच्या

मतास मान देऊन असेंब्लीचा राजीनामा दिला व लोकनायक अणे यांच्याबरोबर जंगल-सत्याग्रहांत भाग घेतला. त्यांत त्यांस शिक्षा झाली. नंतर त्यांची गोलमेज-परिषदेचे हिंदुमहासभेतर्फेचे प्रतिनिधि म्हणून नेमणूक झाली. अस्पृश्यतेच्या प्रश्नावर डॉ. मुंजे व डॉ. आंबेडकर यांच्या मतांत फारसा फरक दिसून येत नव्हता. हिंदी सैनिकीकरणाविषयींहि यांनीं कांहीं विधायक सूचना केल्या. दुसऱ्या गोलमेज परिषदेहून परत आल्यानंतर महात्मा गांधी व डॉ. आंबेडकर यांमध्यें मतभेद उत्पन्न होऊन ते मुसलमानांप्रमाणें स्वतंत्र-मतदार-संघवादी बनले. या वेळीं यांनीं अस्पृश्यांचे दुसरे वजनदार पुढारी एम्. सी. राजा यांच्याबरोबर प्रसिद्ध 'राजा-मुंजे' करार केला. यामध्यें संयुक्त-मतदार-संघच पण अस्पृश्यांसाठीं राखीव जागांची तजवीज करण्यांत आली होती. परंतु यानंतर लवकरच महात्मा गांधी यांच्या उपोषणामुळें अस्पृश्यांच्या बाबतींत 'पुणें-करार' घडून आला.

१९३३ मध्यें हे जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या बैठकीस हिंदुसभेचें शिष्टमंडळ घेऊन गेले होते. यांनीं नागपूर येथें रायफल असोसिएशन काढली ती अशा तऱ्हेची पहिलीच बिनसरकारी संस्था होती. नंतर यांनीं नासिक येथें भोसला लष्करी शिक्षण-संस्था स्थापन केली. या संस्थेस त्यांनीं व्हाइसरॉय, संस्थानिक, वगैरे अनेकांची सहानभूति व साहाय्य मिळविलें. नंतर राजकारण सोडून या लष्करी शिक्षण-संस्थेसच अखेरपर्यंत यांनीं आपणांला वाहून घेतलें.

**मुझफरगड**—पाकिस्तान, पंजाबमधील मुलतान विभागांतील जिल्हा. क्षे. फ. ५,६०५ चौ. मैल. लो. सं. ७,१२,८४९. पाऊस सरासरी ६ इंचांपेक्षांहि कमी पडतो. या जिल्ह्यांत ४ तहशिली आहेत. येथील लोकसंख्येपैकीं शें. ५८ लोक शेतकीवर उपजीविका करतात. मुख्य पिकें गहूं, जव, तांदूळ, बाजरी, ज्वारी, वगैरे होत. साक्षरतेचें प्रमाण शें. ३·६ आहे. सिंधु नदीपासून ११३८ मैल लांबी असलेले असे ८ कालवे काढले आहेत. मुझफरगड हें जिल्हा व तहशिली यांचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें ५,०००. हें शहर १७९४ त मुझफरखान नांवाच्या पठाणानें वसविलें. येथें नबाब मुझफरखानानें बांधलेला एक किल्ला आहे.

**मुझफरनगर**—संयुक्त प्रांत, मीरत विभागांतील जिल्हा. क्षे. फ. १६८२ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १०,५६,७५९. पाऊस सरासरी ३० ते ३३ इंच पडतो. पूर्वी हा पांडवांच्या राज्यांतील भाग होता. नंतर हा पृथ्वीराज चव्हाणाकडे होता. इ. स. १७८८ त हा भाग मराठ्यांकडे आला. स. १८०३ त शिवालिक पहाडापर्यंतचा सर्व मुलूख ब्रिटिशांना मिळाला. जिल्ह्यांत ९२९ खेडीं व १५ शहरें आहेत. येथील शेतकी करणारे लोक जाट होत. मुख्य पिकें म्हणजे गहूं, हरभरा, ऊंस, तांदूळ, कापूस व नीळ हीं होत. येथें कापसाचा व्यापार चालतो, कापडावर नक्षी-चित्रें छापलीं जातात, व कांचळीं व एक प्रकारचीं रंगीत भांडीं तयार होतात. शें. २·६ लोक साक्षर आहेत. मुझफरनगर हें जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण असून नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर आहे. लो. सं. सुमारें २५,०००. स. १६३३ मध्यें मुझफरखानाचा मुलगा खानजहान यानें हें नगर वसविलें. हल्लीं या गांवाला गव्हाच्या व कांबळ्याच्या व्यापारामुळें महत्त्व आहे.

**मुंडकोपनिषद्**—दहा प्रसिद्ध उपनिषदांपैकीं एक. हें अथर्वण वेदाचें मंत्रोपनिषद् आहे. याचीं तीन मुंडकें असून त्या प्रत्येक मुंडकाचे दोन खंड आहेत. अखिल भूतयोनींचें मूळ ब्रह्म असून त्याच्यापासून विश्वोत्पत्ति कशी होते, हें निरनिराळ्या दृष्टांतांनीं कथन केलें आहे. दुसऱ्या खंडांत अपराविद्येचा विषय जो संसार व पराविद्येचा विषय मोक्ष त्यांचें विवेचन केलें आहे. दुसऱ्या मुंडकांतील प्रथम खंडांत पुरुषच हें सर्व विश्व आहे व त्याला बुद्धीच्या साहाय्यानें जाणावें, असें सांगितलें आहे. ॐकार हें धनुष्य व सोपाधिक आत्मा हा शर असून त्याचें ब्रह्म हें लक्ष्य आहे, असें पुढें कथन केलें आहे. शेवटीं आत्मज्ञान अनन्यभावानें प्रार्थना केल्यानेंच प्राप्त होतें, असें सांगून ब्रह्मरूप होणें हाच मोक्ष होय असें म्हटलें आहे. शंकराचार्यांची या उपनिषदावर टीका आहे.

**मुंडा**—उत्तर हिंदुस्थानांतील एक मानववंश व जात. बंगाल, बिहार, ओरिसा, आसाम, इत्यादि प्रांतांत या जातीचे लोक आढळतात. या जातीची लो. सं. सुमारें ६ लाख असून मुख्य वस्ती छोटानागपूरमधील रांची जिल्ह्यांत आढळते. मुंडा याचा अर्थ 'खेड्यांतील मुख्य गृहस्थ' असा आहे. मुंडा जातींत देवपूजेचें फार माहात्म्य आहे. यांच्यावर ख्रिस्ती धर्माचा बराच परिणाम झालेला दिसतो. मुंडा नांवाच्या वर्गांतील भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या सुमारें ३० लाखपर्यंत आहे. मुंडा व द्राविडी हे दोन निरनिराळे भाषावर्ग आहेत, ही गोष्ट प्रथम मॅक्समुल्लरनें दाखवून दिली. मुंडा हा शब्द मुंडारी भाषा बोलणाऱ्या लोकांनाच फक्त लावतात. प्रस्तुत काळीं मुंडा भाषा छोटानागपूर प्रांतांत चालतात. मुंडावर्गांतील पोटभाषा संताळी, मुंडारी, भुमिज, बीरहार, कोडा, हो, तुरी, असुरी, कोरवा, कुरकू, जुआंग, इत्यादि आहेत. या भाषावर्गांतील खेरवारी हीच मुख्य भाषा असून शेजारच्या भाषांचा तिच्यावर परिणाम त्या मानानें मुळींच झालेला नाहीं.

**मृत्युंजय ब्राह्मणी** (१५२८–१५५८)—एक मराठी संतकवि. हा अनुभवसार, गुरुलीला, अद्वैतप्रकाश, स्वरूपसमाधान,

अमृतसार, वगैरे ग्रंथांचा कर्ता आहे. यास 'मुंतोजी' असेंहि म्हटलेलें आढळतें. महीपतीनें लिहिलेल्या हकीगतीवरून असें दिसतें कीं, हा उपरति होऊन पंढरपुरास आला असतां, यास कल्याणच्या सहजानंदाकडून उपदेश घेण्याचा स्वप्नांत दृष्टांत झाला. त्याप्रमाणें सहजानंदाकडून उपदेश घेऊन हा कल्याणपासून एक कोसावर असलेल्या नारायणपुरास जाऊन राहिला. याचें पूर्वीचें नांव शांतब्राह्मणी असें होतें तें सहजानंदानें बदलून मृत्युंजय असें ठेवलें. भक्तिलीलामृतांत याचा उल्लेख मृत्युंजय महायोगी या नांवानें केलेला आहे. 'प्रकाशदीप' व 'स्वरूपसिद्धि' हे याचे दोन ग्रंथ किंवा प्रकरणें 'महाराष्ट्र कवी'तून जनतेसमोर आलीं आहेत.

**मुदतीचा कायदा**—(लिमिटेशन ॲक्ट). इंग्लंडांतील कायद्यांत कोर्टांत दावे लावण्याला दाव्याच्या विषयाच्या स्वरूपानुसार ठराविक मुदत ठेवलेली आहे. ही मुदत जास्तींत जास्त साठ वर्षें व कमींत कमी सहा महिने असते. हिंदुस्थानांतहि हें कायद्याचें तत्त्व लागू असून तत्संबंधीं इंडियन लिमिटेशन ॲक्ट अमलांत आहे. हिंदुस्थानांतील या कायद्यानुसार कबजे गहाणाच्या दाव्याला मुदत ६० वर्षें, तारण गहाणाचा व स्थावर मिळकतीचा कबजा मागणें व अशा स्वरूपाचे इतर दावे यांना मुदत १२ वर्षें, प्रॉमिसरी नोट, कबुलायत किंवा पैशाच्या देवघेवीसंबंधीं इतर तोंडी करार यांना सामान्यतः मुदत तीन वर्षें, बेअब्रूबद्दल किंवा इतर अपकृत्या(टार्ट)बद्दल नुकसानभरपाईचा दावा लावण्याला मुदत एक वर्ष, वगैरे मुदती ठरलेल्या आहेत. अव्वल कोर्टांतील निकालावरील अपील करण्याला मुदत जास्तींत जास्त तीन महिने व कमींत कमी सात दिवस असते. फौजदारी खटल्यांना मुदतीचा कायदा लागू नाहीं.

**मुदलियार, सर ए. रामस्वामी** (१८८७-    )—एक हिंदी मुत्सद्दी. १९२४ मध्यें हे युरोपमध्यें फिरून आले. बेळगांव येथें भरलेल्या अ. भा. ब्राह्मणेतर परिषदेचे हे अध्यक्ष होते. मद्रास कॉर्पोरेशनचे हे अध्यक्ष होते. १९३० मध्यें कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें हे बिनविरोध निवडून आले. हे गोलमेज परिषदेचे सभासद होते. १९३६ मध्यें हे इंडिया कौन्सिलचे सभासद झाले. नंतर मद्रास सरकारमध्यें शिक्षणमंत्र्यांचे चिटणीस होते. तिकडील ब्राह्मणेतर चळवळीचे हे पुढारी आहेत. हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळाचे हे सभासद होते. १९३९-१९४२ मध्यें इंपीरियल वॉर कॅबिनेट व पॅसिफिक वॉर कौन्सिल यांत हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि होते. १९४५ सालीं सॅनफ्रॅन्सिस्कोला हिंदी शिष्टमंडळाचे पुढारी म्हणून गेले. 'युनो'मध्येंहि हे कांहीं काळ होते व आहेत. आर्थिक आणि सामाजिक समितीचे नेते म्हणून त्यांत भाग घेतात. १९४६-४९ या काळांत ते म्हैसूरचे दिवाण होते. आतां भारत सरकारचे ते एक सल्लागार व परदेश-प्रतिनिधि आहेत.

**मुद्देबिहाळ**—मुंबई इलाखा, विजापूर जिल्ह्याचा पूर्वेकडील तालुका. याचें क्षे. फ. ५६९ चौ. मैल असून लो. सं. (१९४१) ९१,९३० आहे. यांत मुद्देबिहाळ गांव व एकंदर १५० खेडीं आहेत. या तालुक्याचा उत्तर भाग चांगला सुपीक आहे. हें गांव सदर्न मराठा रेल्वेच्या अलिमत्ती स्टेशनापासून १८ मैलांवर आहे. इ. स. १६८० त हल्लींच्या चसरकोट येथील नाडगौडाच्या पूर्वजांपैकीं परमन्ना यानें वसविलें. याचा मुलगा हकप्पा यानें इ. स. १७२० त येथील किल्ला बांधिला. इ. स. १७६४ त हें पेशव्यांच्या अमलाखालीं जाऊन सरते शेवटीं इ. स. १८१८ त ब्रिटिश सरकारच्या सत्तेखालीं आलें. लो. सं. ४,८२४. येथें बरेच हातमाग आहेत.

**मुद्रण**—कागद, चामडें, कापड, वगैरे पदार्थांवर अक्षरें, आंकडे, आकृती, वगैरे उठविण्याच्या कलेस मुद्रण किंवा छपाई म्हणतात. प्रथम विशिष्ट आकृतीचा अथवा अक्षरांच्या गटाचा ठोकळा तयार करून त्यावरून छाप उठविण्याची कला फार प्राचीन काळापासून लोकांस माहीत होती व अद्यापि अशा पद्धतीनें चीनमध्यें मुद्रण करण्यांत येतें. युरोपमध्यें अशा तऱ्हेनें ठोकळ्यांवरून छापण्याची माहिती बाराव्या शतकामध्यें असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. पंधराव्या शतकामध्यें अशा तऱ्हेनें छापून पुस्तकें तयार करण्याचें काम जर्मनी, हॉलंड व बेल्जिअम या देशांत सर्रास चालू होतें. सुटे खिळे वापरून मुद्रण करण्याची कला प्रथम कोणीं शोधून काढली याबद्दल मतभेद आहेत. सध्यां गटेनबर्ग यानें ही कला प्रथम शोधून काढली असें मानण्यांत येतें; परंतु डच व जर्मन ऐतिहासिक व प्रत्यक्ष कागदी पुराव्यावरून ही कला प्रथम लॉरेन्स जॅन्सझून कॉस्टर या हारलेम येथील गृहस्थानें शोधून काढली असें दृष्टोत्पत्तीस आलें आहे. त्यानें १४२० ते १४३० मध्यें प्रथम खिळ्यांवरून मुद्रण केलें असें मानतात. या कलेचा खरा संशोधक कॉस्टर हा असून गटेनबर्ग व शॉफर यांनीं तींत सुधारणा करून फस्टच्या साहाय्यानें तिचा प्रसार केला. प्रथम मुद्रणाकरितां गॉथिक व जर्मन अक्षरें वापरीत. रोमन अक्षरें प्रथम स्ट्रासबुर्ग येथें १४६४ मध्यें वापरण्यांत येऊं लागलीं. इटालिक वळणाचे खिळे प्रथम व्हेनिस येथें आल्डुस मॅनुटिअस यानें १५०० मध्यें व्हर्जिलच्या ग्रंथामध्यें वापरले. यानंतर अनेक मुद्रकांनीं निरनिराळ्या वळणाचे खिळे प्रचारांत आणले. इंग्लंडमध्यें ही कला प्रथम विल्यम कॅक्स्टन यानें आणून वेस्ट मिन्स्टर ॲबेमध्यें १४७६ मध्यें एक छापखाना घातला.

हिंदुस्थानांत मुद्रणकला प्रथम पोर्तुगीज मिशनऱ्यांनीं उद्यमपूर येथें छापखाना घातल्यामुळें आली. त्यानंतर श्रीरामपूर येथील डच वसाहतींत विल्यम केरे यानें छापखाना चालविला. त्यानंतर मुंबई येथें छापखाने निघाले. देशी छापखान्यांत गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी, वगैरे नांवें आरंभींच्या कालांत प्रसिद्ध होतीं.

मुद्रणाचे खिळे म्हणजे चौकोनी शिशाचे लांबट तुकडे असून त्यांवर एका बाजूस उठावदार अक्षरें असतात. हे खिळे कांहीं मुके असतात त्यास सुटी म्हणतात. हे सर्व एका चौकटीमध्यें निरनिराळ्या घरांत ठेवलेले असतात. या चौकटी घडवंच्यांवर ठेवलेल्या असतात. यांतून खिळे घेऊन जुळारी मजकूर जुळवितो. अलीकडे हे खिळे जुळविण्याचें काम यंत्राच्या साहाय्यानें केलें जातें. हीं यंत्रें दोन प्रकारचीं असतात. एकामध्यें सुटीं एक एक अक्षरें पाडून जुळण्यांत येतात व दुसऱ्यांत एक सबंध ओळ जुळून पाडण्यांत येते. एकेरी खिळे जुळणाऱ्या यंत्राचे दोन भाग असतात. एक टंकयंत्रासारखा असून त्यांतील बटनें किंवा चाव्या दाबल्या असतां एका कागदाच्या पट्टीला विशिष्ट अक्षराच्या ठिकाणीं दोन भोकें पडतात व ही पट्टी नंतर खिळे पाडणाऱ्या यंत्रास जोडण्यांत आली म्हणजे त्या त्या छिद्रांस अनुसरून खिळे पडून ते एका ओळींत जोडले जातात. ही क्रिया दाबलेल्या छिद्राच्या ठिकाणीं बाहेर पडल्यामुळें घडून येते. यांतील अक्षरें एका चौकोनी तवकडीवर खोदलेलीं असतात. दुसऱ्या प्रकारच्या यंत्रांत अक्षरांच्या मातृका अथवा माद्या टंकयंत्राप्रमाणें चाव्या दाबल्या असतां एका पेटींतून निघून तारांच्या साहाय्यानें चालत जाऊन एका ओळींत जोडल्या जातात व ती ओळ तयार झाली म्हणजे ती पाडली जाते व अशा ओळी जुळल्या जातात व मातृका पुन्हां आपल्या घरांत जाऊन बसतात.

प्रत्यक्ष खिळ्यांवरून छापण्याच्याऐवजीं खिळे जुळलेल्या मजकुराचा धातूचा ठसा घेऊन त्यावरून छापलें असतां खिळे नवे राहून पुन्हां उपयोगांत अधिक दिवस आणतां येतात व मुद्रण अधिक जलद व अधिक संख्येनें करतां येतें. याकरितां असे ठसे बनविण्याकरितां प्रथम या खिळ्यांवरून एका चिवट कागदावर ठसा उठवून घेण्यांत येतो व त्यासहि मातृका म्हणतात व त्यांत शिसें किंवा तांबें ओतून त्याचे ठसे बनविण्यांत येतात व त्यावरून छापण्यांत येतें. तांब्याचा ठसा करावयाचा असल्यास तांबें फक्त बाहेरच्या बाजूस राहून आंत शिसें ओतण्याची तजवीज करण्यांत येतें. व हें तांबें विजेच्या प्रवाहानें खिळ्यांवर चढविण्यांत येतें.

खिळे जुळून झाले म्हणजे ते चौकटींत बसवून छापखान्यांत छापण्याकरितां पाठविण्यांत येतात. छापण्याच्या क्रियेंत प्रथम खिळ्यांच्या तोंडावर शाई लावण्यांत येते व त्यांवर कागद ठेवून तो दाबाखालीं दाबून त्यावर अक्षरें उठविण्यांत येतात. ही शाई मुख्यतः दिव्याची काजळी व अळशीचें तेल वगैरे घालून बनविलेली व चिकट असते. ही रबर किंवा सरस, ग्लिसरीन, वगैरेंपासून तयार केलेल्या रुळाच्या साहाय्यानें खिळ्यास लावण्यांत येते व नंतर दाबांत घालून छापून अक्षरें कागदावर उठवतात. या छापण्याच्या क्रिया तीन प्रकारच्या असतात. पहिलीमध्यें एका सपाट पृष्ठभागावर खिळे जुळलेली चौकट बसविण्यांत आलेली असते व दुसऱ्या सपाट चौकटीनें तीवर कागद आणून दाबण्यांत येतो. दुसऱ्या पद्धतींत खिळे सपाट चौकटींतच असून त्यावर कागद एका वाटोळ्या रुळाच्या साहाय्यानें दाबला जातो व खिळ्यांची चौकट मागें-पुढें फिरते. तिसऱ्या पद्धतींत खिळ्यांचा भागहि रुळासारखा असून कागदहि दुसऱ्या रुळाला लागून येऊन दोन्ही रुळांच्या साहाय्यानें छापण्याची क्रिया होते. पहिलीस सपाट (प्लॅटेन), दुसरीस रुळाची (सिलिंडर) व तिसरीस चक्राची (रोटरी) पद्धति म्हणतात.

हात-छापखान्यांत एका तासांत सुमारें २५० प्रती छापून निघत. विल्यम निकल्सन यानें १७९० मध्यें रुळाचें यंत्र शोधून काढलें. यानंतर कोनिग या सॅक्सनींतील मनुष्यानें लंडन येथें प्रथम सपाट छापण्याच्या पद्धतीचें व पुढें थॉमस बेन्सले याच्या साहाय्यानें रुळाचें यंत्र बनवून 'टाइम्स' वर्तमानपत्रवाल्यास दिलें (जॉन वॉल्टर). पहिला टाइम्सचा वाफेच्या यंत्रावर छापलेला अंक २८ नोव्हेंबर १८१४ रोजीं निघाला. तें यंत्र तासीं १,८०० प्रती छापीत असे. या यंत्रांत १८४८ मध्यें ॲपलगाथ यानें सुधारणा करून दर तासास १०,००० प्रती काढणारें यंत्र बनविलें. यानंतर न्यूयॉर्क येथील हो आणि कंपनी या कारखान्यांत तर तासास १८,००० प्रती काढणारीं यंत्रें बनूं लागलीं. यांत दहा छापणारे रुळ असत. यानंतर सुट्या कागदावर छापण्याच्याऐवजीं कागदाचा रुळच कारखान्यांतून येतो तसाच यंत्रास जोडून छापणारें यंत्र प्रथम अमेरिकेंत 'बुलक' (बैल) या नांवाचें तयार झालें, पण त्यास 'वॉल्टर प्रेस' या यंत्रानें लवकरच मागें टाकलें. यामध्यें चार मैल लांबीचा कागद दोन्ही बाजूंनीं छापला जात असे. पुढें तो कापून त्याच्या दोन घड्या घातल्या जाऊं लागल्या. अलीकडे जलद व अनेक रंगांत एकदम छापणारीं यंत्रें निघालीं असून तीं आठपानी वर्तमानपत्र दर तासास ९६,००० प्रती छापून काढून घड्या घालून बाहेर काढूं शकतात.

छपाईचे मुख्य प्रकार पुढीलप्रमाणें आहेत :—

[१] रिलीफ प्रिंटिंग (उत्थित मुद्रण)—उठावाची छपाई.

यांत छपाईचा भाग वर आलेला असतो व कागदावर कोरा राहणारा भाग छपाईच्या साधनांत— प्रिंटिंग सरफेसमध्यें— खालीं असतो. म्हणून शाईचे रूळ अशा सरफेस किंवा जागेवरून फिरले म्हणजे वर आलेल्या भागांना तेवढी शाई लागते व त्याचा छाप कागदावर ट्रेड्ल्समध्यें प्लॅटेनच्या किंवा सिलेंडर मशीनमध्यें सिलेंडरच्या दाबानें उठतो.

प्रकार : ( १ ) साधी टाइप छपाई.

( २ ) लांकडांवर कोरलेले ठसे—वुडकट.

( ३ ) जस्त किंवा तांबें यांवर उलटें ड्रॉइंग काढून किंवा फोटोग्राफीच्या साहाय्यानें--फोटोमेकॅनिकल प्रोसेसनें--केलेले ठसे किंवा ब्लॉक.

( ४ ) टाइपांवरून किंवा वरील प्रकारच्या ठशांवरून स्टीरिओ किंवा इलेक्ट्रो प्रोसेसनें केलेल्या 'प्रिंटिंग सरफेसेस'. या सर्व 'स्टीरिओ मेट्ल्'च्या किंवा तांब्याच्या असतात. छपाई पुष्कळ असल्यास या 'सरफेस' वर निकेल किंवा पोलाद— स्टील—हीं चढवितात.

( ५ ) रोटरी मशीनवर छपाईची सरफेस वर्तुलाकार असते व त्याकरितां सिलेंडरवर नीट बसवितां येईल अशी 'कर्व्हड्' वर्तुळाकार बांकाची स्टीरिओ मेटल्ची प्रिंटिंग सरफेस ओततात.

( ६ ) अलीकडे टाइप किंवा ब्लॉकवरून रबराच्या प्लेट्स ओततात व त्यांवरून पुष्कळ रंगांतहि चांगलें काम होऊं शकतें. सेल्युलाइडहि ठसे करण्याच्या कामीं उपयोगांत आणलें जातें.

[ २ ] सरफेस प्रिंटिंग ( तल मुद्रण )—पृष्ठभाग छपाई. या प्रकारांत छपाईच्या सरफेसमध्यें वरखालीं असे कांहींच भाग नसतात. अखेर छापला जाणारा व न छापला जाणारा भाग म्हणजे कोरा राहणारा भाग हे दोन्ही भाग एकाच पातळींत असतात. परंतु प्रिंटिंग सरफेसवरून शाईचे रूळ फिरले म्हणजे फक्त छापल्या जाणाऱ्या भागांनाच तेवढी शाई लागते व इतर भागांना लागत नाहीं. छपाईच्या शाया मुख्यतः जवसाच्या तेलापासून केलेल्या असतात आणि तेल व पाणी एकमेकांत मिसळूं शकत नाहीं, म्हणून वर-खालीं कांहीं भाग नसतां शाईचे रूळ प्रिंटिंग सरफेसवरून फिरले म्हणजे छापल्या जाणाऱ्या भागांनाच तेवढी रुळावरील तेलकट शाई लागते व इतर भागांवर पाणी असल्यामुळें तेथें ती लागत नाहीं. छपाईच्या या प्रकारांत हें मुख्य तत्त्व आहे. प्रिंटिंग सरफेस कोऱ्या जागीं ओलसर राहणारी व छापल्या जाणाऱ्या जागीं तेलकट राहणारी अशी तयार करण्याचे अनेक प्रकार आहेत.

( १ ) लिथोग्राफी ( शिला मुद्रण )—( लिथो म्हणजे धोंडा व ग्राफी म्हणजे लिहिणें, म्हणजे पर्यायानें छापणें ) धोंड्यावरून छापणें.

( २ ) झिंकोग्राफी व आलग्राफी— म्हणजे धोंड्याच्याऐवजीं झिंक म्हणजे जस्ताची प्लेट वापरतात किंवा ॲल्युमिनीयमचीहि प्लेट वापरतात.

( ३ ) फोटोलिथोग्राफी *( प्रतिमा शिला मुद्रण )*—लिथोग्राफीचा मुख्य उपयोग जाहिराती, नकाशे, तक्ते, चित्रें, इ. छापणें होय. डबल क्राउन किंवा क्वाड क्राउन जाहिरात टाइपाच्या मशीनवरहि छापतां येईल; पण तितका मोठा ठसा करणें फार खर्चाचें आहे. म्हणून छपाईचें असल्या प्रकारचें काम या पद्धतीनें स्वस्त होऊं शकतें. लिथोग्राफीमध्यें प्रथम चित्रकार ड्रॉइंग किंवा डिझाइन ट्रान्स्फर पेपरवर काढतो व तें छपाईच्या धोंड्यावर किंवा प्लेटवर दाबून उतरविलें जातें. साध्या जाहिरातींचींहि अक्षरें धोंड्यावर एकदम उलट लिहितां येणें कठिण, म्हणून ही योजना असते. चित्रकारानें छपाईचे प्रकार मुळींच ध्यानांत न घेतां पाणरंग ( वॉटर-कलर्स ) किंवा तैलरंग (ऑइल-कलर्स ) यांमध्यें काढलेलें चित्र लिथो आर्टिस्टला पांच, सात किंवा मुळाबरहुकूम काम होण्यास यापेक्षांहि जास्त रंगांत पृथक्करण करून करावें लागतें. रिलीफ प्रिंटिंग किंवा टाइप प्रिंटिंगच्या प्रकारांत जेव्हां ३ अगर ४ रंगांतील हाफटोन ( अर्ध-प्रकाश ) ब्लॉकवरून मूळ चित्राबरहुकूम काम होऊं लागलें, तेव्हां त्याचा फायदा घेऊन फोटो प्रोसेसनें केलेल्या हाफटोन कांचांवरून *'सरफेस प्रिंटिंग'च्या प्लेट्स प्रथम धोंड्यावर व नंतर झिंक आणि* ॲल्युमिनीयम् या धातू जेव्हां उपयोगांत येऊं लागल्या तेव्हां त्यांवर तयार होऊं लागल्या. फोटो-लिथोग्राफीनें हल्लीं थोड्या रंगांच्या छपाईत म्हणून स्वस्त अशीं विशेषतः चित्रें, कॅलेंडरें, लेबलें वगैरे कामें होऊं लागलीं.

( ४ ) कालो टाइप—जाड कांचेवर जेलेटिनचा थर देऊन त्यावर फोटोग्राफीनें घेतलेली साधी कांच ( हाफटोनची नव्हे ) छापली जाते. रासायनिक क्रियांनीं या जेलेटिनच्या थरांवर उतरलेल्या चित्रांतील कमी-अधिक पांढरे व काळे भाग-लाइट आणि शेडचें-कमी-अधिक प्रमाणांत पाणी शोषून ठेवतील असे तयार करण्यांत येतात व त्यांवरून लिथोसारख्या यंत्रावरून छापतां येतें. मुळाबरहुकूम जवळजवळ फोटो प्रिंटप्रमाणें काम होण्यास हाच एक छपाईचा प्रकार आहे.

( ५ ) टू टु स्केल ( परिमाणतुल्य ) किंवा व्हॅनडाईक—मूळ ड्रॉइंग ज्या कागदावर काढलें असेल तोच कागद झिंक किंवा ॲल्युमिनीयम प्लेटवर प्रकाशाच्या रासायनिक क्रियेनें छापतात; व त्या प्लेटवरून लिथो मशीनवर छापतां येतें. लाइम टाइप,

लिथो ग्रॅव्ह्यूअर हेलिओ, इंक फोटो प्रोसेस, वगैरे प्रकारभेद छपाईच्या या प्रकारांत पुष्कळच आहेत. पण ते दुय्यम होत.

[ ३ ] इंटाग्लिओ प्रिंटिंग ( खोदन मुद्रण )–रिलीफ प्रिंटिंगच्या अगदीं उलट हा प्रकार आहे. जे भाग छापले जावयाचे ते प्रिंटिंग सरफेसमध्यें खोल असतात व जे भाग अखेर छापलेल्या कागदांवर कोरे राहावयाचे ते, दुसरे भाग खोल असल्यामुळें वर आलेले दिसतात. व्हिजिटिंग कार्डे छापण्यास तांब्याचे पत्रे ( कॉपर प्लेट्स ) करतात, त्या सर्वांना अशा पत्र्यांवर घट्ट शाई कापडाच्या बोळ्यानें भरतात. नंतर पत्रा साफ पुसतात व पत्र्यावर कागद ठेवून दाब दिला म्हणजे तो खोदलेल्या भागांत जाऊन आंतील शाई घेऊन येतो. त्यामुळें छापलेल्या कागदांवर शाई वर आलेली हाताला लागते. डाय स्टँपिंगचा प्रकार हाच आहे. फोटोग्राफीनें तयार केलेल्या कांचेवरून फोटोग्राफीच्या ऑटो-टाइपनें किंवा कार्बन प्रोसेसनें जेलेटिनच्या थरांत असलेलें चित्र ( किंवा टाइप मजकूर ) तांब्याच्या पत्र्यांवर उलटें उतरवितात. —उलटें म्हणजे पांढरा तेथें काळा भाग व काळा तेथें पांढरा भाग—व तें रसायनांनीं खोदतात. अशा पत्र्यावरून शाईचे रूळ फिरले म्हणजे खोल गेलेल्या भागांत शाई शिरते व नंतर एका सुरीच्या पात्याची धार त्यांवरून फिरून वर आलेल्या भागांवरून शाई काढून टाकते. त्यामुळें कागद लावल्यावर सिलेंडरच्या दाबानें खोलगट भागांतील शाई कागदांवर येऊं शकते. हल्लीं छपाईचे सिलेंडर्स अशा पद्धतीनें खोदले जातात व छपाई फार झपाट्यानें होऊं शकते. चित्रें व ठसे या प्रकारानें फारच उत्तम येऊं शकतात. याला ऋणप्रकाशलेखन( फोटो ग्रॅव्ह्यूअर प्रोसेस ) म्हणतात. प्रिंटिंग सरफेस–छपाईची प्लेट–वर्तुलाकार असेल व सिलेंडरवर चढविलेली असेल तर त्याला रोटोग्रॅव्ह्यूअर असें म्हणतात. विलायतेंतील विंडसर मासिक, इलस्ट्रेटेड लंडन न्यूज, किंवा ग्रॅफिक, किंवा आपल्याकडे टाइम्स ऑफ इंडियाच्या इलस्ट्रेटेड वीकलीचें मलपृष्ठ (कव्हर) व आंतील कांहीं भाग याच पद्धतीनें छापतात.

[ ४ ] ऑफसेट प्रिंटिंग (पत्रमुद्रण)—छपाईच्या मूळ प्लेटवरून रबर ब्लँकेटवर प्रथम ठसा घेऊन नंतर त्याचा ठसा कागदांवर छापतां येतो. यालाच ऑफसेट प्रिंटिंग म्हणतात. चालू टाइपां-वरून ऑफसेट छपाई करणें असल्यास पहिल्या रबर ब्लँकेटवर सरळ वाचण्यासारखें काम येतें, त्यावरून दुसऱ्या एका ब्लँकेट-वर तें उलट होतें व नंतर कागद लावल्यावर पुन्हां तें सरळ वाचण्यासारखें येतें. हा द्राविडी प्राणायाम करण्यानें वर्तमान-पत्राच्या किंवा पुस्तकाच्या पुष्कळ प्रती काढण्यास फायदा होऊं शकतो. टाइप ऑफसेटचीं १० × १५ आकाराचीं पदमुद्रणयंत्रें ( ट्रेड्ल्स )हि असतात.



सरफेस प्रिंटिंग किंवा लिथो ऑफसेट प्रोसेसमध्यें छपाईच्या प्लेटवरून रबरावर चित्र येतें; व नंतर कागदांवर येतें. चित्रें, लेबलें, कॅलेंडरें या पद्धतीनें फार उत्तम छापलीं जाऊं शकतात.

रिलीफ प्रिंटिंग व सरफेस प्रिंटिंग यांचे मुख्य मुख्य पोटभेद सांगितले आहेत ते सर्व ऑफसेट प्रिंटिंगनें होऊं शकतात.

[ ५ ] टिनप्रिंटिंग ( वंगमुद्रण )—कागदांप्रमाणें कथला-( टिन )च्या पत्र्यांवर छापण्यास या पद्धतीचा सर्वांत मुख्य उपयोग होय. टिनच्याऐवजीं पितळ, तांबें, ॲल्युमिनियम किंवा सेल्युलाइडहि वापरतां येतें.

ऑफसेट प्रिंटिंग प्रथम टिनवरच सुरू झालें. पण टिनच्या-ऐवजीं कागद लावण्याची कल्पना वरींच वर्षे कोणाला सुचली नव्हती.

मुद्रणविषयक कायदा— छापखान्यांत छापल्या जाणाऱ्या मजकुरासंबंधानें कायदेशीर रीत्या सर्व जबाबदारी ज्याच्यावर असते त्यास 'कीपर' म्हणजे छापखाना राखणारा, संभाळ-णारा असें म्हणतात. कोणालाहि नवीन छापखाना सुरू करावयाचा असला म्हणजे त्या छापखान्याची कायदेशीर जबाबदारी जो कोणी पाहणारा असेल–मग तो मालकच असावा लागतो असें नाहीं–त्यानें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटपुढें मी छापखान्याचा 'कीपर' आहें, अशा प्रकारचें एक शपथपत्र ( डिक्लरेशन ) करावें लागतें. एकदां डिक्लरेशन केल्यानंतर जर छापखान्याची जागा बदलली तर पुन्हां दुसऱ्या जागेंत जातां क्षणीं त्यानें नवें डिक्लरेशन केलें पाहिजे. त्याप्रमाणें छापखान्याची जबाबदारी संभाळणारा इसम जर बदलावयाचा असला तर जो कोणी दुसरा येईल त्यानेंहि हें डिक्लरेशन केलें पाहिजे.

छापखान्यांत छापल्या जाणाऱ्या प्रत्येक छापकामाचा प्रिंटर म्हणजे मुद्रक 'कीपर' हाच असतो, व म्हणून त्यास प्रिंटर म्हणून वेगळें डिक्लरेशन करण्याची जरूरी नसते. कीपरचा छापलेल्या कागदावर 'कीपर' म्हणून कोठेंच उल्लेख होत नाहीं तर त्याचा प्रिंटर म्हणून उल्लेख करावयाचा असतो. कारण प्रत्येक छापकामाचा प्रिंटर तोच असतो. छापखान्यांत प्रत्येक पुस्तक, पत्रक किंवा मजकूर, इत्यादि जें जें छापलें जातें त्यावर त्याचें मुद्रक–' प्रिंटर '–म्हणून नांव, तसेंच छापखान्याचें नांव व पत्ता हें सर्व छापावयाचें असतें.

मुद्रकाबरोबर प्रकाशक हाहि त्या त्या पुस्तकांबद्दल कायदे-शीर रीत्या जबाबदार असतो. पण छापखान्यांत छापल्या जाणाऱ्या सर्व पुस्तकांबद्दल जसा प्रिंटर ( म्हणजेच कीपर ) जबाबदार असतो, तसा प्रकाशक नसतो. तो जें पुस्तक स्वतः प्रकाशित करील तेवढ्यापुरतीच त्याची जबाबदारी असते. मुद्रकाबरोबरच प्रकाशकाचेंहि नांव व पत्ता पुस्तकावर घालणें

अवश्य असतें. पुस्तकाच्या मुद्रकाला जसें स्वतंत्र डिक्लरेशन करावें लागत नाहीं तसें पुस्तकाच्या प्रकाशकालाहि डिक्लरेशन करावें लागत नाहीं. पुस्तकांवर त्यांचीं नांवें व पत्ते छापले म्हणजे झालें.

छापखान्यांत पुस्तकांव्यतिरिक्त इतर पुष्कळ प्रकारचें छापकाम होतें. व तें सर्व प्रसिद्ध होत असतें असें नाहीं. उदा., चिल बुकें, पावत्या, निमंत्रण कार्डें, खाजगी व व्यापारी सर्क्युलरें, इत्यादि. हें सर्व छापकाम व्यावहारिक या सदरांत पडतें. त्यावर नुसतें छापखान्याचें नांव छापलें तरी चालतें. प्रिंटरचें नांव छापण्याची जरूरी नाहीं.

याशिवाय स्टेशनरी जी छापली जाते, तिच्यावरहि मुद्रकाचें नांव वगैरे छापण्याची जरूरी नाहीं. नोट-पेपर, व्हिजिट कार्डें, इत्यादि कामांवर तर कांहींच उल्लेख नको. कारण नांव व पत्ता हें कांहीं मजकुरांत जमा होत नाहीं.

पण नियतकालिकांसंबंधानें मात्र मुद्रक व प्रकाशक यांच्यावर कायद्यानें अधिक नियंत्रण आहे. दररोजपासून दरमहापर्यंतच्या मुदतीनें जें नियमितपणें निघतें तें नियतकालिक होय. महिन्यापेक्षा अधिक अंतरानें जें प्रसिद्ध होतें तें म्हणजे द्वैमासिक, त्रैमासिक, इ.. तीं पुस्तकें या सदरांतच गणलीं जातात. अर्थात् त्यासंबंधानें डिक्लरेशन करण्याची जरूरी नसते. नियतकालिकांसंबंधानें मात्र मुद्रक व प्रकाशक या दोघानाहि डिक्लरेशन करावें लागतें.

वर्तमानपत्राचा 'मुद्रक' हा छापखान्याचा कीपर असावाच लागतो असें नाहीं. तर तो वेगळा असून चालतो. वर्तमानपत्रांच्या बाबतींत छापखान्याचा कीपर, मुद्रक, प्रकाशक व संपादक ह्या चार प्रकारच्या जबाबदाऱ्या असतात व त्या संभाळणारीं चार स्वतंत्र माणसें असलीं तरी चालतें किंवा एकच इसम असला तरीहि चालतें. संपादकाला तर डिक्लरेशन करावेंच लागत नाहीं. वर्तमानपत्रावर त्याचें संपादक म्हणून नांव छापलें म्हणजे झालें. मुद्रक व प्रकाशक यांना मात्र डिक्लरेशन करावें लागतें. मुद्रक व प्रकाशक जर एकच इसम असेल तर तो 'मुद्रक व प्रकाशक' असें जोड डिक्लरेशन एकाच फॉर्मवर करूं शकतो. मुद्रकाचें वेगळें व प्रकाशकाचें वेगळें असें त्यास वेगवेगळें स्वतंत्र डिक्लरेशन करावें लागत नाहीं. या डिक्लरेशनसाठीं मागें उल्लेखिलेल्या कीपरच्या डिक्लरेशनच्या फॉर्मप्रमाणें दोन फॉर्म तयार करून त्यांवर डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट समोर सही करावी लागते.

प्रत्येक महिन्यांत छापखान्यांत जीं जीं पुस्तकें छापलीं जातात त्या त्या प्रत्येक पुस्तकाच्या सध्यांच्या पद्धतीप्रमाणें तीन तीन प्रती डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे पाठवाव्या लागतात व त्यांबरोबर त्या त्या पुस्तकांच्या माहितीचा एक फॉर्म भरून पाठवावा लागतो. हीं पुस्तकें माहितीच्या फॉर्मसह छापून किंवा प्रसिद्ध झाल्यापासून एक महिन्याच्या आंत डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे रवाना करावीं लागतात. तीं पोहोंचल्याबद्दल त्यांजकडून पावती मिळते.

जर सदरहू पुस्तक फार चांगलें व संग्रहणीय असलें तर या तीन पुस्तकांपैकीं एक प्रत विलायतेस ब्रिटिश म्यूझियममध्यें पुस्तक-संग्रहालयांत पाठविली जाते व बाकीच्या प्रांतिक सरकारांकडे जातात. जर पुस्तक इतक्या महत्त्वाचें वाटलें नाहीं तर कांहीं महिन्यांनीं त्या पुस्तकाची एक प्रत सरकार ठेवून घेतें व उरलेल्या दोन प्रती परत करतें.

याशिवाय दर तीन महिन्यांनीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे छापखान्यांत छापलेल्या पुस्तकांची त्रोटक माहिती दर जानेवारी, एप्रिल, जुलै व ऑक्टोबर या महिन्यांच्या दहाव्या तारखेच्या आंत पाठवावयाची असते. या पुस्तकांची तपशीलवार माहिती आधींच गेलेली असते, म्हणून ही त्रोटक माहिती संकलित स्वरूपांत पाठवावयाची असते.

तीन रंगांतील ब्लॉकची छपाई—कोणतेंहि रंगीत चित्र, तें काढतांना चित्रकारानें कितीहि निरनिराळे रंग वापरून काढलें असलें तरी पिवळा, तांबडा व निळा या तीन रंगांच्या ब्लॉकच्या साहाय्यानें मूळ चित्राबरहुकूम तें छापतां येतें. या तीन रंगांना 'प्रायमरी' म्हणजे प्राथमिक रंग म्हणतात. हाफटोनचे ब्लॉक करतांना कोणत्याहि एका रंगांतील कमीअधिकपणा प्रमाणांत येऊं शकेल अशा फोटोच्या प्लेट्सवर मूळ चित्राचा फोटो घेण्यांत येतो. पिवळा, तांबडा व निळा या तीन रंगांत मूळ (ओरिजिनल) चित्राचें पृथक्करण लेन्सच्या मागें निळा हिरवट व तांबूस पडदा (फिल्टर) म्हणून ठेवून करण्यांत येतें.

राजा रविवर्मा यांनीं ऑइल पेंट केलेल्या चित्रांवरून रविवर्मा प्रेसनें लिथोग्राफीनें छापलेलें लक्ष्मीचें चित्र सर्वांना माहीतच आहे. तें चित्र ब्लॉक करण्याच्या कॅमेऱ्याच्या लेन्सपुढें ठेवून लेन्स व पॅन्क्रोमॅटिक प्लेट यांच्यामध्यें निळा पडदा (ब्ल्यू फिल्टर) ठेवून जी कांच किंवा निगेटिव्ह झाली तीवरून केलेल्या ब्लॉकचें चित्र काळ्या शाईत—पिवळ्या शाईत तें नीट दिसत नाहीं म्हणून—छापलें असतां या निळसर फिल्टरच्या योगानें चित्रांतील फक्त पिवळा रंग असेल तेवढाच पुढें झिंकवर किंवा कॉपरवर येईल. असा मूळ चित्रांतील पिवळा प्रकाश पलीकडे कांचेवर जाऊन त्याची तेथें क्रिया होते म्हणून या कांचेला पिवळा रेकॉर्ड (प्रतिकृति) म्हणतात.

तीन रंगी छपाईत प्रथम पिवळाच रंग छापावा लागतो, तो पिवळा छापतांना त्यांतील कमीअधिक छटा नीट दिसत नाहींत म्हणून फार काळजी घ्यावी लागते; म्हणून ग्रे किंवा काळ्या

शाईंत प्रूफ काढून, पिवळया शाईंत जवळजवळ तें तसें दिसतें कीं नाहीं हें डोळयांसमोर एक निळें फिल्टर ठेवून पाहिलें असतां समजतें. पिवळा रंग फिका अगर गडद किती असावा हें मूळ चित्रांत पिवळा किती आहे हें अजमावून ठरवावें लागतें. या गोष्टी अभ्यासानें व अनुभवानेंच ध्यानांत येणाऱ्या असतात.

दुसरा रंग तांबडा—या रंगाची कांच घेतांना लेन्स व प्लेट यांमध्यें हिरवें फिल्टर ठेवण्यांत येतें. त्यामुळें पांढऱ्या सूर्य-प्रकाशांतून हिरवा काढला असतां तांबडा राहतो. या प्रकाश-शास्त्राच्या नियमाप्रमाणें मूळ चित्रांत जेवढा मुख्यत्वें तांबडा रंग असतो तेवढाच अखेर कांचेवरून घेतलेल्या झिंक किंवा कॉपर प्लेटवर उठतो. तांबड्या प्लेटमध्यें फोटो-एन्ग्रेव्हरला हातानें बरेंच काम करावें लागतें. कारण या रंगाच्या मिश्रणांमुळें निर-निराळया रंगांच्या छटांत एकदम बराच मोठा फरक पडण्याचा संभव असतो.

मूळ चित्र काळजीपूर्वक पाहावें व त्यांत तांबडा किती प्रमा-णांत गडद (डीप) पाहिजे तें ठरवावें. मूळ चित्रावर पुष्कळदां सर्व चित्रांची अशी एकदम भासणारी हिरवी, तांबडी अगर निळी झांक असते. अशा जादा तांबड्या झांकेचें सर्व चित्र असेल तरच तांबडा गडद ठेवणें योग्य होतें. नाहीं तर हा थोडा फिका करूनच घ्यावा लागतो. चित्राच्या मानानें निळसर तांबडा, किंवा पिंवळ-सर तांबडा घेणें पुष्कळदां योग्य ठरतें.

तिसरा रंग निळा—या रंगाची कांच करतांना फोटोची पॅंक्रोमॅटिक प्लेट यामध्यें तांबडें फिल्टर ठेवतात. त्यामुळें चित्रां-तील निळा रंग जेवढा असेल तेवढाच मुख्यत्वें अखेरच्या ब्लॉकच्या झिंकच्या अगर कॉपरच्या पत्र्यावर उतरतो.

तीन रंगांतील या ब्लॉकवरून कांहीं रंगांतील छायांचे सूक्ष्म अंतर्भेद नीट येत नाहींत म्हणून चौथें पिवळें फिल्टर वापरून काळया रंगांतील प्लेट तयार करितात. ही चौथी प्लेट कमी-अधिक गडद अशा ग्रे किंवा काळया शाईंत छापली जाते व त्यामुळें चार रंगांत अशा रीतीनें छपाई होऊन मूळ चित्रांतील रंग बरेच साधले जातात.

निळया शाईचा तिसरा ब्लॉक छापतांनाहि तो कमीअधिक गडद किती असावा हें ठरवावें लागतें. हिरवा नीट येण्यास निळा जितका कमी गडद असेल तितका बरा हें मुख्यत्वें ध्यानांत ठेवावें लागतें. ब्लॉकमेकरनें ब्लॉक नीट काळजीपूर्वक केले असतील तर मुद्रकानें ब्लॉक मरूं न देतां साफ छापणें इकडेच मुख्य लक्ष पुरविलें तरी काम भागतें.

मुद्रणस्वातंत्र्य—मुद्रणाला प्रारंभ झाल्यापासून मुद्रणावर सर-कारी निर्बंध आले. इंग्लंडसारख्या स्वातंत्र्यप्रिय देशांतहि सोळाव्या शतकापासून कायदे केले जात होते. पण १६९३ पासून मात्र मुद्रणालयांना स्वातंत्र्य हळूहळू मिळूं लागलें व १८५६ त वर्तमानपत्रावरील स्टँपचा कर काढल्यापासून तर तीं माजी युद्धकाळापर्यंत अगदीं स्वतंत्रच होतीं. ब्रिटिश वसाहतींत इंग्लंडप्रमाणेंच मुद्रणस्वातंत्र्य आहे, पण हिंदुस्थानांत गव्हर्नरजन-रलला नियंत्रणाची पूर्ण सत्ता असे. अमेरिकन संस्थानांतून मुद्रण-स्वातंत्र्य जगजाहीर आहे व युरोपांतील स्पेन, पोर्तुगॉल, स्वीडन-नॉर्वे, स्वित्झर्लंड व रुमानिया या राष्ट्रांतून हें स्वातंत्र्य आधि-क्यानें दिसून येतें. जर्मनी आणि ऑस्ट्रिया देशांत उलट बरेंच सरकारी दडपण असून रशिया आणि इटली देशांत तर या दड-पणाला मर्यादाच नाहीं.

छापखान्यांचा कायदा—दि इंडियन प्रेस (इमर्जन्सी पॉवर्स) ॲक्ट हा कायदा १९३१ सालीं करण्यांत आला. या कायद्याचा उद्देश, खून किंवा अत्याचार यांना उत्तेजन देणारा मजकूर प्रसिद्ध होण्यास प्रतिबंध करणें, हा आहे. जो इसम एखाद्या छापखान्याबाबत १८६७ सालच्या प्रेस अँड रजिस्ट्रेशन ऑफ बुक्स ॲक्ट या कायद्याप्रमाणें डिक्लरेशन करील, त्या इसमाला त्याच वेळीं कमाल एक हजार रुपयेपर्यंत जामिनकीची रक्कम भरावी, असा हुकूम मॅजिस्ट्रेटनें करावा (कलम ३). ज्या छापखानेवाल्यांची जामिनकी रक्कम घेतली असेल, त्या छाप-खान्यांचा (अ) खून किंवा अत्याचाराचा गुन्हा करण्यास उत्तेजन देणारा मजकूर, (ब) असा गुन्हा ज्या इसमानें केला आहे अशा इसमाची स्तुति किंवा त्याच्या गुन्ह्याला पसंती दर्शविणारा मजकूर, असलेलें वृत्तपत्र, पुस्तक किंवा पत्रक छापण्यास किंवा प्रसिद्ध करण्यास उपयोग केला जाईल, तर प्रांतिक सरकारनें ती जामिन-कीची रक्कम सरकारजमा करण्याचा हुकूम करावा; आणि जामि-नकीची रक्कम घेतलेली नसेल तर तो छापखाना सरकारजमा करावा; आणि असा मजकूर असलेल्या वृत्तपत्राच्या किंवा पुस्त-काच्या किंवा पत्रकाच्या सर्व प्रती सरकारजमा कराव्या (कलम ४). एकदां जामिनकी सरकारजमा झाल्यावर त्या छापखान्या-कडून एक हजार ते दहा हजार रुपयेपर्यंत जामिनकी घ्यावी (कलम ५). पुन्हां वरील प्रकारचा मजकूर छापल्यास पुन्हां जामिनकीची रक्कम व प्रती सरकारजमा कराव्या (कलम ६). पुन्हां जामिनकीची रक्कम घ्यावी (कलम ९). पुन्हां सरकार-जमा करावी (कलम १०). सरकारजमा केलेल्या जामिनकी-बाबत व प्रतींबाबत छापखानेवाल्यानें हायकोर्टाकडे सदर सर-कारी हुकूम झाल्यापासून दोन महिन्यांच्या आंत अर्ज करावा, व हायकोर्टानें सदर मजकूर आक्षेपार्ह आहे कीं नाहीं त्याचा निकाल द्यावा (कलम २३).

**मुद्रा**—मुद्रा करण्याचा प्रघात फार प्राचीन असून बहुतेक अंगठीचा उपयोग मुद्रा करण्याकरितां किंवा शिक्का उठविण्या-

करिता करण्यांत येत असे. ईजिप्तमध्यें चांगल्या चिखलामध्यें मुद्रा उठवून त्या पापीरसवरच्या लेखांना पापीरसच्या तुकड्यांनीं जोडण्यांत येत असत. रोमन लोकांमध्यें शिक्के उठविण्याकरितां प्रथम ओली माती, नंतर मधमाशांचें मेण व पुढें साम्राज्याच्या काळीं शिसें उपयोगांत आणीत. कॉन्स्टंटाइनच्या कारकीर्दीत पातळ धातूच्या पत्र्यांचे शिक्के करण्यांत येत असत त्यांस 'बुली' म्हणत. नॉर्मन लोकानीं प्रथम इंग्लंडमध्यें मधमाशांच्या मेणाचा शिक्क्यांकरितां उपयोग सुरू केला. लाखेचे शिक्के सतराव्या शतकांत प्रचारांत आले.

भरतखंडांत प्राचीन काळीं ताम्रपट एका कडींत अडकवून तीवर राजमुद्रा कोरलेल्या आढळतात. नंतरच्या लेखांवरहि राजमुद्रा आढळून येतात. निरनिराळ्या व्यक्तींच्या मुद्रांमध्यें निरनिराळा मजकूर आढळतो.

शिवाजीची मुद्रा अष्टकोनी असून तीवर 'प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता। शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते॥' असा श्लोक आहे. संभाजीची पिंपळपानी मुद्रा असे. कांहीं मुद्रा गोल, चौकोनी, वगैरे निरनिराळ्या आकाराच्या असत. राजमुद्रा सांभाळणाऱ्या अधिकाऱ्याला शिक्केनवीस किंवा शिक्केनीस म्हणत. शिक्केबरदार म्हणूनहि एक अधिकारी असे. राजचिन्हांत व राज्याधिकारचिन्हांत शिक्केकटार असे.

**मुद्रासंच**—(फाउंट). छापण्याकरितां जे खिळे वापरण्यांत येतात त्यांचा विशिष्ट प्रमाणांत जो एक संच ठरविण्यांत येतो त्याला मुद्रासंच म्हणतात. सामान्य तऱ्हेच्या कामामध्यें जें खिळ्यांचें परस्पर प्रमाण असतें त्यावरून हा संच ठरविण्यांत येतो. इंग्रजी खिळ्यांत प्रकार कमी असल्यामुळें त्यांचा संच लहान प्रमाणांत बसूं शकतो व तो पन्नास रत्तलांचा सामान्यतः असतो. मराठीमध्यें अक्षरें, जोडाक्षरें, वेलांट्या, उकार, मात्रा, वगैरे अनेक प्रकार असल्यामुळें अगदीं लहान संचाचें वजनहि इंग्रजीपेक्षां बरेंच अधिक होतें. इंग्रजी संचांत e, a, c, हीं अक्षरें अधिक असतात तर K, x, y, z हीं फारच थोडीं असतात. मराठीमध्यें ण, र, क, प, व, वगैरे बरींच असतात तर छ, ळ, क्ष, झ, वगैरे कमी असतात. विशिष्ट प्रकारच्या कामांत हें प्रमाण कमीजास्त होतें.

**मुधोजी भोसले**—१. नागपूरकर भोसल्यांचा मूळपुरुष. परसोजी याचा बाप. हा व याचा भाऊ रूपाजी हे शिपाईगिरीचा धंदा करीत. यांच्या पूर्वजांनीं पुणें प्रांतांतील हिंगणीनजीकचा बेरडी हा वैराण झालेला गांव त्या वेळच्या सरकारांतून घेऊन तो वसवला. गव्हासारख्या धान्याची लागवड करून तेथें शेतीस सुरुवात केली व तेथील पाटिलकीचें वतन आपणांकडे घेतलें. त्यावरून यांना 'हिंगणीकर भोसले' असें नांव पडलें. शहाजी भोसल्यांचे हे समकालीन. हे सधन असून देवधर्माकडेहि यांची प्रवृत्ति असे. यांनीं खंडेराय व देवी अशा दोन मूर्ती प्रत्येकीं सव्वा-पांच मण सोन्याच्या तयार केल्या होत्या, असें सांगतात. मुधोजीस बापूजी, परसोजी व साबाजी असे तीन पुत्र होते.

२. (मृ. १७८८)—नागपूरच्या पहिल्या रघूजीचा मुलगा. याचा आणि भाऊ जानोजी याचा गादीच्या वारसाबद्दल तंटा लागला. नानासाहेब पेशव्यानें यास सेनाधुरंधर हा नवा किताब व जहागीर दिली; पण तंटा मिटला नाहीं. जानोजीच्या मृत्यूनंतर याचा मुलगा रघूजी यास सेनाखासखेल्याचीं वस्त्रें मिळालीं; पण यामुळें दुसरा भाऊ साबाजी याच्याशीं वितुष्ट आलें. १७७५ त साबाजी याच्याशीं लढतांना हा मेला. हेस्टिंग्जनें पुणें दरबारशीं बोलणें करण्यासाठीं याची मदत घेतली होती.

**मुधोळ संस्थान**—मुंबई इलाखा. हें एक दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थान असून याचें क्षे. फ. ३६८ चौरस मैल आहे. यांत ८१ गांवें आहेत. लो. सं. ७२,४४७. हें इंग्रज सरकारास सालीना २,६७२ रुपये खंडणी देत असे. उत्पन्न सुमारें पांच लाख रु. आहे. यावर कोल्हापूर येथील पोलिटिकल एजंटाचा ताबा असे. मोठी नदी घटप्रभा असून तिच्या दोन्ही तीरांवर ३६ गांवें आहेत. पावसाचें सालीना मान २४ इंच. खनिज पदार्थांत इमारतीचे तांबडे व काळे दगड व चुना निघतो. निंब, बाभूळ, चिंच, वड, आंबा, वगैरे झाडें होतात. ज्वारी, बाजरी, राळे, हरभरा, तूर, पावटा, कापूस, अंबाडी, करडी, ऊंस, विड्याचीं पानें, वगैरे शेतकी बागायतीचें पीक होतें. संस्थानांत तीन हजारांवर हातमाग आहेत. येथील लुगडीं प्रसिद्ध आहेत. मुंबई सरकारची दक्षीधरणाची योजना अमलांत आल्यास या भागाला फायदा मिळेल. बहुतेक खेड्यांत जुनीं देवळें व धर्मशाळा आहेत. मुधोळास एक इंग्रजी हायस्कूल आहे. संस्थानांत मुधोळ व महालिंगपूर हीं दोनच गांवें महत्त्वाचीं आहेत. मुधोळ ही संस्थानची राजधानी आहे. वस्ती ८ हजारांपर्यंत असते. गांवाभोंवतीं पडका तट व त्याबाहेर पेठ आहे. शुक्रवारचा बाजार भरतो. गांवाजवळ तळीं व गांवांत हौद आहेत. संस्थानिकाचा वाडा पाहण्यासारखा आहे.

इतिहास—येथील संस्थानिक घोरपडे हे कौशिक गोत्री क्षत्रिय असून त्यांचें मूळचें आडनांव भोसले होय. उदेपूरच्या शिसोदिया वंशाचे हे आहेत. त्यांच्या एका पूर्वजानें घोरपडीनें किल्ला सर केल्यानें हें नांव त्यांना मिळालें. मुधोळकर घोरपडे हे अद्याप घोरपडीस पवित्र मानतात. मुधोळकरांचा मूळ पुरुष चोलराव हा आदिलशाहींत सरदार होता. आदिलशहानें त्याला मुधोळची जहागीर, राजा हा किताब व मोरचेलाचा मान दिला. बाजीनंतर

त्याचा मुलगा मालोजी गादीवर बसला. यानें बहुतेक पेशवाई पाहिली आणि तींत घडलेल्या बऱ्याचशा महत्त्वाच्या गोष्टींत भाग घेतला. तो पेशव्यांची चाकरी नियमितपणें करी त्यामुळें पेशव्यांनीं त्याला आणखी सरंजाम तोडून दिले होते. व्यंकटराव यांचे चिरंजीव मालोजीराव (तिसरे) हे १९२७ सालीं वारल्यावर विद्यमान् श्रीमंत राजे भैरवसिंह गादीवर आले. हे चांगले सुशिक्षित आहेत. १९४८ सालीं हें संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें.

**मुधोळकर, रंगनाथ नरसिंह** (१८५७–१९२१)—मध्यप्रांताचे एक पुढारी. हे प्रथमपासून काँग्रेसचे कट्टाळू अनुयायी असून तिच्याकरितां फार खटपट करीत असत. १९१२ सालीं बांकीपूर काँग्रेसचे हे अध्यक्ष होते. शेतकऱ्यांची कर्जमुक्तता, दारिद्र्य, आर्थिक सुधारणा व औद्योगिक शिक्षण या विषयांचा त्यांचा अभ्यास चांगला होता. अलाहाबादचे सी. वाय्. चिंतामणि हे यांचे सहकारी होते. यांनीं औद्योगिक परिषद् स्थापन केली व हे तिचें कार्य अनेक वर्षें पाहत होते.

**मुनशी, कन्हय्यालाल** (१८८७–        )—एक गुजराथी साहित्यिक व राजकारणी पुरुष. यांचें शिक्षण बडोदा कॉलेज व मुंबई येथें झालें. १९१३ मध्यें हे ॲडव्होकेट झाले. १९१५ मध्यें हे 'यंग इंडिया' पत्राचे सहसंपादक होते. १९१९–२० मध्यें मुंबई होमरूल लीगचे सेक्रेटरी होते. १९२२ पासून ते मुंबई येथील साहित्यसंसद् या सभेचे अध्यक्ष होते. मुंबई युनिव्हर्सिटीच्या सीनेटचे व सिंडिकेटचे ते सदस्य होते. तसेंच १९२६ मध्यें ते बडोदा विद्यापीठ समितीचे सभासद होते. हे मुंबई कायदेमंडळाचे सभासद होते व कांहीं सरकारी समित्यांचे बिनसरकारी सभासद होते. २० एप्रिल १९३० रोजीं हे सत्याग्रहाच्या चळवळींत शिरले तेव्हां त्यांस अटक होऊन तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३१ मध्यें हे ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे सभासद झाले. पुढें काँग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर असतां हे गृहमंत्री होते. यांनीं गिरणी कामगारांचा व हिंदु-मुसलमानांचा दंगा शमविण्याकरितां तात्कालिक व कडक उपाय योजले. महायुद्धविषयक काँग्रेसच्या धोरणाबद्दल मतभेद झाल्यामुळें यांनीं राष्ट्रीय सभेपासून पृथक्त्व पत्करलें. नंतर सरकार व काँग्रेस यांच्यामध्यें समेट व्हावा म्हणून हे प्रयत्न करीत असत. यांनीं अखंड हिंदुस्थान नांवाची एक चळवळ मध्यंतरीं सुरू केली होती.

हे एक प्रथम श्रेणीचे गुजराथी साहित्यिक असून यांच्या अनेक कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. 'सोशल वेलफेअर' हें इंग्रजी साप्ताहिक यांच्या संपादकत्वाखालीं निघतें. हे १९४७–४८ मध्यें हैद्राबाद संस्थानांत भारत सरकारचे एजंट जनरल होते. यांनीं मुंबईस भारतीय विद्याभुवन नांवाची रवींद्रनाथ टागोरांच्या शांतिनिकेतनाच्या धर्तीवर एक उच्च व संशोधनविषयक शिक्षणसंस्था काढली आहे. यांच्या पत्नी श्रीमती लीलावती याहि राजकारण आणि समाजसेवा यांत प्रामुख्यानें भाग घेतात. या साहित्य-संसद् वसति सेवासंघाच्या चिटणीस आहेत. १९३० मध्यें यांनीं सत्याग्रह चळवळींत भाग घेतला तेव्हा त्यांस शिक्षा झाली होती. १९३० मध्यें यांनीं बॉंबे स्वदेशी मार्केटची योजना केली. १९३१ मध्यें या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या सभासद होत्या. भारतीय संगीत समितीच्या या उपाध्यक्ष आहेत. नर्मद शताब्दि उत्सव-समितीच्या या सभासद होत्या. यांनीं लघुकथा, निबंध, कादंबऱ्या, वगैरे ग्रंथरचना केली आहे.

श्री. कन्हय्यालाल मुनशी हे आतां भारत सरकारांत एक मंत्री नेमले गेले आहेत. यांच्याकडे शेतकी खातें आहे. देशांत सर्वत्र वृक्षारोपण करण्यास यांनीं बरीच चालना दिली आहे. गुजराथ प्रांताचा उद्धार करणाऱ्यांपैकीं श्री. मुनशी एक आहेत व सरदार पटेलांच्या खालोखाल तेथें यांना मान आहे.

**मुनशी, देवीप्रसाद** (१८४८–        )—एक हिंदी इतिहास-लेखक. यांचा जन्म जयपूरला गौड कायस्थ घराण्यांत झाला. हें घराणें टोंक संस्थानांतलें. देवीप्रसादहि फारशी-हिंदी शिकून याच संस्थानांत नोकरीस राहिले. १८६४–१८७८ पर्यंत नोकरी झाल्यानंतर राजाच्या अवकृपेमुळें त्याना संस्थान सोडावें लागलें. पुढें ते जोधपूर संस्थानांत शिरस्तेदार झाले व हळूहळू चढत गेले. १९०१ च्या खानेसुमारीचे ते सुपरिंटेंडेंट होते. मारवाडबद्दल त्यांनीं दिलेली माहिती फारच चांगली आहे. त्यांना 'मुर्वरिखे राजपुताना' म्हणजे राजपुतान्याचे इतिहासकार या पदवीनें संबोधितात. त्यांनीं काशीच्या नागरी प्रचारिणी सभेला एक मोठी देणगी इतिहासग्रंथ प्रसिद्ध करण्यासाठीं दिली आहे. मोंगल काळांतील ऐतिहासिक पुरुषांची चाळीसवर चरित्रें मुनशीजींनीं लिहिलीं आहेत. ऊर्दू भाषेंतहि त्यांचीं पुस्तकें आहेत व त्या भाषेंत त्यांनीं कांहीं काव्यरचनाहि केली आहे. पण हिंदी साहित्य समृद्ध करण्याकडे पुढील आयुष्यांत त्यांनीं विशेष लक्ष दिलें व आपलें नांव चिरस्मरणीय केलें.

**मुनि व्यास**—एक महानुभाव ग्रंथकार. शके १२७५ मध्यें लिहिल्या गेलेल्या 'स्थानपोथी' या गद्यग्रंथाचा हा कर्ता असून कुमाराम्नाय कोठी या नांवानेंहि हा प्रसिद्ध आहे. आपल्या स्थानपोथी या ग्रंथांत यानें आपल्या महानुभाव पंथांतील अवतारी विभूती श्रीदत्त, श्रीकृष्ण, श्रीचक्रपाणि, श्रीगोविंदप्रभु व श्रीचक्रधर यांच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील लीला व आठवणी दिल्या आहेत. ऋद्धिपूर, फलटण, पैठण, नाशिक, इत्यादि शहरांतील अनेक महत्त्वाच्या स्थलांचा या ग्रंथांत निर्देश आला

आहे. या ग्रंथरचनेपायीं यानें आपले बरेच परिश्रम खर्ची घातले. जुन्या भूगोलाच्या दृष्टीनेंहि हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

**मुफ्ती, ग्रँड**— जेरुशलेम येथील हा एक मोठा इस्लामी अधिकारी व अरबांचा राष्ट्रीय पुढारी आहे. त्याचें नांव हाज एमिन एफेंडी एल् हुसेनी असें आहे. त्याचें शिक्षण कायरो, जेरुशलेम व कॉन्स्टंटिनोपल येथें झालें, आणि तो आपल्या भावाच्या पश्चात् १९२१ सालीं मुफ्ती झाला. १९२३ सालीं तो वरिष्ठ मुस्लिम विधिमंडळाचा अध्यक्ष झाला, आणि १९३१ सालीं जेरुशलेम येथें भरलेल्या मॉस्लेम कॉंग्रेसचा अध्यक्ष तोच होता. पहिल्या महायुद्धांत त्यानें तुर्क लोकांविरुद्ध ब्रिटिशांना मदत दिली होती; परंतु नंतर पॅलेस्टाइनमध्यें ज्यू लोकांची वसाहत स्थापण्याच्या प्रश्नाबाबत तो ब्रिटिशांपासून फुटून निघाला. गेलीं २० वर्षें ज्यू लोकांच्या आगमनाला विरोध करणाऱ्या अरबांचा तो पुढारी आहे, आणि ब्रिटिश लोक व झिऑनिस्ट यांच्यावर चढाई करण्यास सर्व अरबांना उत्तेजन देणारा तोच आहे. याबद्दल त्याला दहा वर्षें कैदेची शिक्षा झाली होती, व नंतर त्याची सुटका करण्यांत आली. त्याच्या पॅलेस्टाइन अरब पक्षाला मुफ्ती पक्ष म्हणतात व पॅलेस्टाइनमध्यें हा अरबांचा सर्वांत मोठा पक्ष आहे. तो इस्लामी धर्माचा वरिष्ठ धर्माधिकारी असल्यामुळें त्यानें पॅलेस्टाइनच्या प्रश्नाला पॅनइस्लामिक प्रश्न असें स्वरूप दिलें आहे. १९३७ सालीं अरब हायर कमिटीचा तो अध्यक्ष झाला. त्याला व इतर अरब पुढाऱ्यांना पॅलेस्टाइन-मध्यें राहण्यास बंदी करण्यांत आल्यावर तो सीरिआंत राहूं लागला.

**मुंबई-प्रांत**—हा हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. पश्चिमेस अरबी समुद्र, सौराष्ट्र आणि कच्छ; पूर्वेस मध्य भारत, मध्य प्रदेश, आणि हैद्राबाद; उत्तरेस राजस्थान; आणि दक्षिणेस म्हैसूर आणि मद्रास येथपर्यंत पसरला आहे. या इलाख्यांत १७६ संस्थानें १९४८-४९ सालीं विलीन झालीं. याचें क्षे. फ. सु. १,१८,००० चौ. मैल आणि लो. सं. ३,१४,६२,००० आहे. या प्रांतांत २१,६५७ लहान-मोठीं गांवें आहेत. उत्तर, दक्षिण व मध्य असे या प्रांताचे तीन विभाग असून त्यांत एकंदर २९ जिल्हे आहेत. उत्तरेस नर्मदा आणि तापी, व दक्षिणेस गोदावरी आणि कृष्णा या मुख्य नद्या आहेत. यांतील गुजराथ प्रदेश सपाट व फार सुपीक असून नर्मदा व तापी या नद्यांच्या पाण्यानें भिजणारा असल्या-मुळें त्याला 'हिंदुस्थानची बाग' हें नांव बऱ्याच पूर्वीपासून मिळालेलें आहे. या इलाख्यांतील मध्य भागाचे ऊर्फ महाराष्ट्राचे सह्य पर्वतामुळें कोंकण व देश असे दोन भाग पडले आहेत. सह्याद्रीच्या पायथ्यापासून समुद्रापर्यंतच्या प्रदेशाला कोंकण म्हणतात, व त्यांत मुख्यतः भाताचें उत्पन्न होतें. या भागांत खाड्या अनेक आहेत. गुजराथी लोक जगांतील अत्यंत हुशार अशा व्यापारी जातीच्या लोकांत गणना करण्यास योग्य असे आहेत. महाराष्ट्रांत शेतकरीवर्ग प्रमुख असून तो दारिद्र्यपीडित आहे. कर्नाटकांत व्यापारी लिंगायतांची वस्ती विशेष आहे. कोंकणा-मध्यें ख्रिस्ती लोकांची वस्ती बरीच आहे. या इलाख्यांत रानटी जाती सुद्धां एकंदर हिंदू लोकांच्या जाती सुमारें पांचशें आहेत.

उत्तरेस आणि दक्षिणेस पाऊस सरासरी ३० इंच पडतो; व मध्यभागांत १०० इंच पडतो. शेतकी हा या इलाख्यांतील मुख्य धंदा असून शेंकडा ६४ लोक त्यावर उपजीविका करतात. महाराष्ट्रांतील देश या भागांतली जमीन काळी असून तींत कापूस, गहूं, हरभरा, मका आणि कांहीं भागांत उत्तम ऊंस वगैरे पिकें होतात. कोंकणांत पाऊस पुष्कळ पडतो, त्यामुळें तेथें भाताचें उत्पन्न चांगलें होतें. जंगलाखालची जमीन १६ टक्के आहे व ती पश्चिम घाट, सातपुडा आणि विंध्य पर्वतराजि या भागांत पसरली आहे. या इलाख्यांत बहुतेक ठिकाणीं जमीन-धाऱ्याची रयतवारी पद्धति आहे. इमारती दगड, समुद्राच्या पाण्याचें मीठ, बॉक्साइट आणि मँगेनीज हींच काय तीं खनिज द्रव्यें येथें सांपडतात. हात-कामाचे धंदे मात्र सर्वत्र फार पसरलेले आहेत. अहमदाबाद व सुरत येथें उत्तम किनखाची कापड तयार होतें. मुंबईस होणारें चांदीचें काम, आणि पुणें व नाशिक येथें होणारें पितळेचें काम विशेष प्रसिद्ध आहे. मुंबई, अहमदाबाद आणि सोलापूर या शहरीं कापडाच्या अनेक गिरण्या आहेत. एकंदर भारतांतील निम्म्याहून अधिक कापड या प्रांतांत होतें. आयात व्यापारापैकीं शें. ५२ मुंबईचा आहे. पश्चिम किनाऱ्यावरील सुरत, भडोच, खंबायत व मांडवी हीं बंदरें प्राचीन काळीं प्रसिद्ध होतीं.

या प्रांतांत किनारी वाहतूक बरीच आहे. आगगाडी रस्ता ३,००० मैलांचा असून १३,००० मैल इतर चांगले केलेले रस्ते आहेत. नुकतीच विमान-वाहतूक सुरू झाली आहे. बडोदा, मुंबई, अहमदाबाद व पुणें या शहरांमध्यें वैमानिक दळण-वळण चालू आहे.

लोकसंख्येंत ८० टक्के हिंदू आहेत. पारशी जात संख्येनें फार थोडी असली तरी फार महत्त्वाची आहे. एकट्या मुंबई शहरांत हिंदुस्थानांतील एकंदर पारशी लोकांच्या संख्येपैकीं निम्मी आहे. सर्व प्रांतापेक्षां या प्रांतांत शहरांतून जास्त वस्ती आहे. मुंबई शहर हें अखिल भारताचें व्यापारी केंद्र आहे. मुंबईखालो-खाल अहमदाबाद आणि पुणें हीं मोठीं शहरें आहेत.

१९४९ पावेतों या प्रांतांत एकच विद्यापीठ (मुंबई) होतें. त्यानंतर पुणें, कर्नाटक, गुजराथ व बडोदें हीं विद्यापीठें निघालीं. महिला विद्यापीठ शिवाय आहेच. १९४६-४७ सालीं एकंदर

शिक्षणसंस्था २३,९९१ असून त्यांत वीस लाखांहून अधिक विद्यार्थी शिकत होते. यांतील उच्च शिक्षणाच्या कॉलेजांची संख्या ६० वर असून सुमारें १,२९० दुय्यम व १९,००० प्राथमिक शिक्षणसंस्था होत्या.

राज्यकारभार इतर प्रांतांप्रमाणेंच चालतो. स्थानिक कारभार नगरपालिका आणि लोकल बोर्डें पाहतात. एकूण १३० नगरपालिका व २० लोकल बोर्डें गेल्या महायुद्धापूर्वी होतीं. मुंबई प्रांताचें उत्पन्न सुमारें चाळीस कोटी आहे. या प्रांतराज्याचे सर महाराजसिंग हे पहिले हिंदी गव्हर्नर होत.

पाषाणयुगीन अवशेष या प्रांतांत अद्यापि सांपडले नाहींत. अशोकाचे शिलालेख व भाजें, मेडसा, कार्लें, जुन्नर आणि कान्हेरी येथील लेणीं प्राचीन आहेत. खंबायत, अहमदाबाद, चंपानेर, इ. ठिकाणीं मशिदी प्रेक्षणीय आहेत. अंबरनाथ येथील देवालय १२ व्या शतकांतील भारतीय-आर्य (इंडो–आर्यन) शिल्पपद्धतीचें आहे.

शहर—मुंबईला हिंदुस्थानचें प्रवेशद्वार हें नांव अन्वर्थक आहे. अगदीं जुन्या काळांत हें शहर निरनिराळ्या सात बेटांचें बनलें होतें. याचे मूळचे रहिवासी कोळी लोक होत. त्यांची देवता जी 'मुंबा आई' तिच्यावरून गांवाला मुंबई हें नांव पडलें. इ. स. ८१०–१२६० या काळांत शिलाहारांची या बेटावर सत्ता होती. याच काळांत वाळकेश्वर देवालय बांधण्यांत आलें. याच टेंकडीला 'मलबार हिल्स' हें इंग्रजी नांव मिळालें. १२६० त भीमराजानें महिकावती ऊर्फ माहीम वसविलें. त्याच्याबरोबर पळशे ब्राह्मण, पाताणे प्रभु, वगैरे जातींचे लोक या भागांत राहावयास आले. १३४८ नंतर मुसलमानी वर्चस्व होतें तें जाऊन १६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत यावर पोर्तुगीज अमल बसला व खिस्ती लोक राहूं लागले. १६६१ त इंग्लंडच्या राजाला पोर्तुगीज राजाकडून हीं बेटें आंदण देण्यांत आलीं. तेव्हांपासून यांवर इंग्रजांचें स्वामित्व आलें. १६६८ त ईस्ट इंडिया कंपनीकडे मुंबई आल्यावर तिची भरभराट होत गेली. हा गव्हर्नरचा एक प्रांत बनला. पेशवाई गेल्यानंतर जास्त वाव मिळून वैभव वाढलें. १८३३ त टाउन हॉल बांधण्यांत आला व १८५३ सालीं जी. आय्. पी. रेल्वे मुंबई ते ठाणें या दरम्यान फेरे करूं लागली. पुढें १८६० पासून ही कापसाच्या व्यापाराची मोठी पेठ बनली. आज लोकवस्ती सु. तीस लाख आहे.

मुंबई बंदर जगांतील अति विस्तृत व सुरक्षित बंदरांतील एक प्रमुख बंदर आहे. सुमारें ७४ चौ. मै. बंदरविभागानें व्यापला आहे. व कोटल्याहि मोसमांत बोटी राहूं शकतात. तीन बंदिस्त ओल्या गोद्या व दोन कोरड्या गोद्या आहेत. या गोद्यांखेरीज उघडीं बंदरें किंवा धक्के अनेक आहेत. पोर्ट ट्रस्टची स्वतःची रेल्वे आहे. मुंबईत बंदरामार्गे कापसाच्या वखारींनीं १२७ एकर जागा अडविली आहे. दाण्याच्या वखारीहि ८० एकर जागेवर आहेत. यांखेरीज कोळसा, गवत, मॅंगॅनीज, बांधकामाचें सामान, व्यापारी माल, इ. ठेवण्याच्या जागा किती तरी आहेत. पोर्ट ट्रस्टच्या ताब्यांतील एकंदर जागा याप्रमाणें १,१८० एकरांवर आहे. बंदरांत निर्यातीसाठीं आणलेल्या मालांत कोळसा, कापूस, कातडीं, सूत, लोखंडी सामान, धातु, यंत्रें, तेल, लांकूड, वगैरे असतात.

मुंबई शहराचे दोन मुख्य भाग पडतात : १ शहर, व २ कोट. कोटांत सरकारी कचेऱ्या, पेढ्या व व्यापारी मालाचीं मोठीं दुकानें आहेत. शहरभागांत गिरगांव, भायखळा, परळ, दादर, इ. विभाग पाडले आहेत. जी. आय्. पी. आणि बी. बी. सी. आय्. या दोन आगगाड्यांचे फांटे कोटांतून शहरच्या दुसऱ्या टोंकापावेतों गेले आहेत. कॉर्पोरेशननें या शहराचे १९ पोटभाग (वार्ड) पाडले आहेत. कॉर्पोरेशनचें उत्पन्न सु. ६ कोटी रु. आहे.

मुंबई विद्यापीठ हें जुनें १८५७ सालीं स्थापन झालेलें आहे. १९४९ पर्यंत मुंबई प्रांतांत हें एकच सरकारमान्य विद्यापीठ होतें. याला दहा–बारा कॉलेजें जोडलेलीं आहेत. प्राथमिक शिक्षण मुंबई कॉर्पोरेशनकडे आहे. रॉयल एशियाटिक सोसायटी, म्यूझियम, भारतीय विद्याभुवन, स्कूल ऑफ आर्ट, महिला विद्यापीठ, वगैरे इतर शिक्षणसंस्था अनेक आहेत.

मुंबई उपनगर जिल्ह्याचें क्षे. फ. सु. १४२ चौ. मै. आहे. लो. सं. (१९४१) २,५१,००० होती ती सध्यां ६,००,००० तरी आहे. वांद्रें (खार, सांताक्रूझ धरून), पार्ले–अंधेरी, जुहू कुर्ला व घाटकूपर-किरोळ हे म्युनिसिपल प्रदेश या उपनगर जिल्ह्यांत मोडतात. मुंबई शहर व उपनगर जिल्हे यांवर एकच कलेक्टर आहे. आतां मुंबई शहर आणि उपनगर जिल्हे यांची एक बृहन्मुंबई करण्यांत आली आहे.

मुंबई म्हणजे अतिशय मोठें व्यापारी व उद्योगधंद्यांचें शहर होय. यांत १६६ कापडाच्या (रेशमी–लोकरी धरून) गिरण्या, ३७३ यांत्रिक कारखाने, १०६ खाद्यपेयांचे कारखाने, १०६ रासायनिक कारखाने, ५१ कातड्याचे कारखाने व १२१ इतर मालाचे कारखाने आहेत. कलकत्त्याच्या खालोखाल हें संपन्न आहे. अनेक पेढ्या व विमाकंपन्या चालतात. येथून सर्व जगाशीं दळणवळण चालतें. १७ वैमानिक रस्ते आहेत.

इतिहास—मौर्यवंशीय अशोकाच्या सत्तेखालीं म्हैसूरपर्यंत सर्व मुलूख होता त्या वेळीं पश्चिम भाग उज्जनीच्या सुभ्याकडे होता. या वेळीं पश्चिम भागांत आर्य संस्कृतीची छाप लोकांच्या चालीरीतींत दिसून येत होती व येथील लोक हिंदू झाले होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच काळीं ग्रीक साम्राज्याशीं

हिंदुस्थानचा व्यापार चालू होता. अशोकामागून बॅक्ट्रियन, ग्रीक, अपोलोडोटस व मिन्यांडर यांचें राज्य सिंध व काठेवाड भागांत असावें, असा इतिहासकारांचा तर्क आहे. मौर्यांमागून पैठणच्या (गोदावरीच्या कांठच्या) सातवाहनांच्या राज्यांत नाशिक व पश्चिम घाटापर्यंतचा मुलूख मोडत असे (ख्रिस्तपूर्व १५०). हे राजे आंध्र या नांवानें प्रसिद्ध आहेत. ख्रिस्तपूर्व २०९ च्या सुमारास सातवाहनांचें राज्य फार भरभराटींत होतें. याच सुमारास सिथियन लोक उत्तर व पश्चिम हिंदुस्थानांत आले.

इ. स. ४० च्या सुमारास रोम शहराशीं पश्चिम हिंदुस्थानचा व्यापार सुरू झाला. इ. स. १२० ते ३०० पर्यंत गुजराथेंत व उज्जनी येथें क्षत्रपांचें राज्य होतें. दक्षिणेंत दमणगंगेपासून तों बनवासीपर्यंत व पूर्व किनाऱ्यापासून तों पश्चिम किनाऱ्यापर्यंत सातवाहनांचें राज्य होतें. त्याचा लय २१० च्या सुमारास झाला. या वेळीं या राज्यांत धरणकटक (सध्यांचें धरणीकोट), तेर व पैठण हीं प्रसिद्ध शहरें होतीं. क्षत्रप व सातवाहन यांचें जोंपर्यंत सख्य होतें तोंपर्यंत जिकडे तिकडे शांतता नांदत होती व व्यापाराची भरभराट होत होती. याच वेळीं मोठमोठ्या रस्त्यांवर लेणीं कोरण्यांत आलीं. पैठणच्या घराण्याचा ऱ्हास झाल्यावर भडोच हें युरोपाशीं चालणाऱ्या व्यापाराचें केंद्रस्थान झालें व क्षत्रपांनीं आपल्या राज्याचा विस्तार कल्याणपर्यंत नेऊन भिडविला.

गुजराथेंत क्षत्रपांचीं लहान लहान राज्यें होतीं त्यांचा ऱ्हास होऊन मगधचे गुप्त वंशांतले राजे राज्य करूं लागले. देशावर व कोंकणांत अशींच लहान लहान राज्यें असावींत, असें तज्ज्ञांचें अनुमान आहे. पांचव्या शतकाच्या उत्तरार्धांत श्वेतहूणांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या व नर्मदेपर्यंतचा सर्व प्रदेश त्यांनीं व्यापला. काठेवाडांत गुप्तांचें राज्य मोडून तेथें वलभी घराण्यानें आपली सत्ता स्थापन केली (५०० ते ७७०). अगदीं दक्षिणेंत त्रैकुटांचें राज्य होतें. हे नवीन लोक पुढें हिंदूंमध्यें मोडूं लागले. पुढें हिंदु धर्माचें वर्चस्व होऊन बौद्ध धर्माच्या ऱ्हासास सुरुवात झाली. इराणी व अरबी संस्कृतीचा ठसा या देशांतील संस्कृतीवर युरोपियन संस्कृतीपेक्षां अधिक पडूं लागला. उत्तर कोंकणांत मौर्य राज्य या कालीं पुरी (मुंबईजवळ) येथें भरभराटींत होतें. दक्षिणेंत किनाऱ्यावरच्या भागीं बनवासीचे कदंब होते. दक्षिण महाराष्ट्रांत चालुक्यवंशीय राजे व राष्ट्रकूट यांच्यामध्यें झगडा चालला होता, गुर्जर लोक हूणांबरोबर आले असावेत. त्यांनीं पंजाब, राजपुताना, काठेवाड हे प्रांत जिंकून (५७५–७४०) भडोच येथें राज्य स्थापिलें. हे रजपुतांचे पूर्वज होत असें कांहींचें म्हणणें आहे. इ. स. ६०० च्या सुमारास चालुक्यांनीं राष्ट्रकूटांचा व त्रैकूटांचा पराभव करून आपल्या राज्याचा विस्तार वाढविला. यांच्या ताब्यांत सातव्या शतकांत घाटावरचा प्रदेश (दक्षिण पठार) व कोंकण हे भाग होते.

चालुक्य जरी शिव–विष्णुपूजक होते तरी दक्षिणेंत जैन धर्म चालू होता. वेरूळ व अजेठा येथें बौद्ध संघ होते. आठव्या शतकांत मुसलमानांनीं हिंदुस्थानांत प्रवेश केला (७११). ७५० मध्यें चालुक्यांच्या राज्यास उतरती कळा लागली. नंतर मुसलमानांनीं गुजराथेंत स्वारी करून (७७०) वल्लभी शहराचा नाश केला.

राष्ट्रकूटांनीं चालुक्यांचा पाडाव करून (७५०) गुर्जरांच्या तोडीचें नवें राज्य निर्माण केलें. हीं दोन्हीं राज्यें २०० वर्षें अस्तित्वांत होतीं (७५०–९५०). राष्ट्रकूटांनीं मालखेड (सोलापूर जिल्ह्यांतील) येथें आपली राजधानी केली. राष्ट्रकूट शैवमतानुयायी होते. ७७५ सालीं पारशी लोक हिंदुस्थानांत आले. ९४१ अथवा ९६१ च्या सुमारास मूळराज सोळंकी नामक गुर्जराधिपतीनें अनहिलवाडचें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. गुजराथेंत या मूळराजाच्या वंशजांनीं अनहिलवाड येथें ११०३ पर्यंत राज्य केलें.

महाराष्ट्रांत ९७३ ते ११५५ पर्यंत कल्याणीचे चालुक्य राजे राज्य करीत होते. यांनीं प्रत्येक प्रांतावर जो सुभा नेमला त्याजकडे तो प्रांत वंशानुवंश ठेवण्याची पद्धत स्वीकारल्यामुळें हे सुभेदार बलिष्ठ होऊन चालुक्यांच्या राज्यास उतरती कळा लागली. उत्तर महाराष्ट्रांत यादवांचें प्रस्थ माजलें. होयसळ वंशांतील राजपुरुषांनीं कलचुरी व चालुक्य यांचा पराभव करून नंतर यादवांचा पाडाव केला. यादवांच्या सिंघण राजानें म्हैसूराधिपतीचा पराभव करून महाराष्ट्राचें आधिपत्य मिळविलें (१२१२). पुढें अल्लाउद्दिन खिलजीनें १२९४ सालीं रामचंद्र यादव राजाचा पराभव करून त्यास खंडणी देण्यास भाग पाडिलें. १३१८ त यादव कुळाचा समूळ नाश होऊन दख्खनच्या भागांत मुसलमानांचें प्राबल्य माजलें (महाराष्ट्र पाहा).

गुजराथ व काठेवाड— गुजराथवर राज्य करण्यासाठीं दिल्लीहून सुभे येत असत. त्या वेळीं या राज्यांत पाटण, बडोदें, खंबायत, तापी व भडोचच्या लगतचा मुलूख मोडत होता. या राज्यांत त्या वेळीं मोगलांच्या व काठेवाडांतील हिंदू राजांच्या धामधुमीमुळें शांतता नव्हती. दिल्लीची सत्ता जेव्हां कमकुवत झाली तेव्हां येथील जाफरखान नामक सुभेदारानें स्वातंत्र्य जाहीर करून तो गुजराथचा राजा बनला (१४०७). हें राज्य १४०७ पासून तो १५७२ पर्यंत अस्तित्वांत होतें. १५७२ सालीं अकबर बादशहानें तें जिंकून घेतलें. अकबरानें हें राज्य जिंकण्यापूर्वी व ऐन भरभराटीच्या काळांत यांत उत्तर गुजराथ (अबूपासून तों नर्मदेपर्यंत), काठेवाड, तापीच्या लगतचा मुलूख

व सुरतेपासून मुंबईपर्यंतचा भाग (घाट व समुद्र यांमध्यें असलेला) हा सर्व प्रदेश येत असे. अहमदनगरच्या निजामशाहीचा उगम ब्राह्मणांपासून झालेला असल्यामुळें त्यांत साहजिक ब्राह्मणाचा फार भरणा होता. चौल हें त्यांत मुख्य बंदर होतें. गोदावरीच्या पाणवठ्याचा प्रदेश नांदेडपर्यंत या राज्यांत मोडत असे. सध्यांच्या नाशिक, सोलापूर, पुणें व नगर या जिल्ह्याच्या बऱ्याच भागांचा त्यांत समावेश होत असे.

१६ व्या शतकाअखेर सिंध, गुजराथ व खानदेश यांचा मोगलांच्या राज्यांत समावेश होत होता. पण राज्यकारभारांत शिस्त चांगली नव्हती. जमिनीच्या वसुलापैकीं ⅓ भाग कर म्हणून सरकारांत जमा होत असे. गुजराथेंत १७०७ पर्यंत शांतता होती. या प्रांतांतून मोंगलांस दोन कोट रुपये उत्पन्न होत असे.

१७०५ पासून नर्मदेच्या उत्तर भागांत मराठ्यांनीं स्वाऱ्या करण्यास आरंभ केला. चांपानेर (१७२३) व बडोदें (१७३४) येथें त्यांनीं आपली सत्ता स्थापित केली. पुढें मराठ्यांनीं चौथाईचा व सरदेशमुखीचा हक्क या भागांत शाबीत केला. गायकवाडांनीं १७३८ त अहमदाबाद मोंगलांच्या सुभ्यासह व्यापला.

अहमदनगर मोंगलांनीं घेतल्यावर मलिकंबरानें खडकी (औरंगाबाद) येथें निझामशाही स्थापन केली व हें राज्य त्याच्या मृत्यूपर्यंत दख्खनच्या प्रदेशांत अबाधित राहिलें. १६३० त निझामशाही कायमची बुडविण्यांत आली. याचा विजापूकरांनीं फायदा घेऊन आपल्या ताब्यांत भीमा व नीरा यांमधील मुलूख व उत्तर कोंकण घेतलें. या धामधुमीच्या काळांत मराठ्यांना राजकारणाचें व शिपाईगिरीचें शिक्षण मिळालें. त्यांना शिवाजीसारखा पुढारी मिळाल्याबरोबर त्यांनीं राज्य स्थापन करण्यास सुरवात केली. शिवाजीनें (१६४६ ते १६४८) भीमा व नीरा यांमधील मुलूख घेतला. मोंगलांच्या व विजापूरकरांच्या मुलुखांत स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. आदिलशहाच्या मरणानंतर सातारा, फोंडा व पन्हाळा हा भाग आपल्या राज्यास जोडला. कारवार व अंकोला (१६७२–७६) सर केला. कोपळ व बल्लारी आपल्याकडे घेतली (१६७६–१६७७). मोंगलांनींहि स्वाऱ्या करून सोलापूर व त्यालगतचा मुलूख विजापूरकरांकडून आपल्या राज्यास जोडिला.

शिवाजीचा अंत होतांच दक्षिण जिंकण्याची संधि आली आहे असें औरंगजेबास वाटलें. तो मराठ्यांची व विजापूरकरांची सत्ता कमी होण्याची वाट पाहत होता. औरंगजेब १७०७ सालीं मरण पावला व लागलीच सर्व मोंगल सैन्य दिल्लीस परत बोलावण्यांत आलें. या वेळीं कोल्हापूर व सातारा येथें दोन मराठी राज्यें स्थापन झालीं.

बाळाजी विश्वनाथ हा शाहूचा पेशवा झाला. त्यानें मोंगल बादशहांपासून भीमेच्या दक्षिणेचा पंढरपुरापर्यंतचा मुलूख मराठ्यांच्या राज्यास जोडला व दक्षिणेंतील इतर मुलुखांत चौथाई व सरदेशमुखी यांचे हक्क मिळविले. पुढें मराठ्यांची सत्ता पश्चिम भागांत दिवसेंदिवस प्रबळ होत चालली. इंग्रजांनीं १७७२ सालीं भडोच घेतलें. निजाम १७४८ मध्यें मरण पावल्यानंतर पेशव्यांनीं त्याच्या एका मुलापासून तापी व गोदावरी यांमधील वऱ्हाडच्या पश्चिमेस असलेला मुलूख घेतला; नंतर लवकरच अहमदनगर पेशव्यांकडे आलें. १७६३–१७६६ या अवधींत पेशव्यांस विजापूर सुभा व मोंगलांनीं दक्षिणेंत जिंकून घेतलेला मुलूख मिळाला.

सन १७७८ ते १८०३ या अवधींत मराठे व इंग्रज यामध्यें युद्धें झालीं. या कालांत मराठ्यांची जूट फुटली. १८०० मध्यें इंग्रजांनीं सुरत घेतलें. १७९० सालच्या म्हैसूरच्या युद्धांत पेशव्यांस वर्धा नदीच्या उत्तरेचा मुलूख मिळाला. १७९६ सालीं बाजीराव पेशवा झाला. १८०२ सालीं पेशव्यानें वसईचा तह केला. या वेळीं मुंबई इलाखा फारच लहान होता. यांत साष्टी, सुरत व बाणकोट हीं शहरें, मुंबई बेट व बंदर यांचा समावेश होत होता. इ. स. १८०३ ते १८२७ या कालाच्या दरम्यान या इलाख्याच्या सरहद्दी आंखण्यांत आल्या. गुजराथ १८०५ सालीं मुंबई सरकारकडे आला व त्याचा १८१८ सालीं विस्तार करण्यांत आला. हळूहळू पेशव्यांचें राज्य या इलाख्यांत सामील झालें. काठेवाड व महिकांठा या इलाख्यास जोडला (१८०७–१८२०).

एल्फिन्स्टनच्या कारकीर्दीनंतर या प्रांताची सुधारणेची गति मंद झाली. संस्थानें खाल्सा करून त्यांचा समावेश इंग्रजी मुलुखांत करण्यांत आला. एडन (१८३९), सिंध (१८४७), हे या इलाख्यात सामील झाले. १८५३ सालीं पंचमहालचा मुलूख ठेक्यानें मुंबई सरकारनें आपल्याकडे घेतला. १८४७ सालीं जमीनमहसूल आकारण्याची तऱ्हे जाहीर करण्यांत आली. इनाम व जहागीर यांची चौकशी करण्यासाठीं कमिशन बसविण्यात आलें. १८६८ त अवर्षण पडलें. १८७६, १८७७ व १८७८ या वर्षी दुष्काळ पडला. तेव्हां दुष्काळ टाळण्यासाठीं आगगाडीच्या रस्त्यांची वाढ जारीनें करण्यांत आली. पुढें सुमारें १० वर्षें सुबत्ता होती. पण १८९१ त अवर्षणास सुरवात झाली. याच सुमारास संमति वयाचा कायदा जारी करण्यांत आला. गोवधासंबंधानें हिंदू व मुसलमान यांमध्यें दंगे झाले. १८९५–१८९६ सालीं पुन्हां दुष्काळ पडला. १८९६ सालीं ऑगस्ट महिन्यांत मुंबईत प्लेग प्रथम सुरू झाला. या वेळीं उद्योगधंद्यांची स्थिति बरीच खालावली.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत मुंबई प्रांतांत स्वदेशीची लाट उसळली व राजकीय स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं आंदोलनें सुरू झालीं. प्रथम या कामांत महाराष्ट्र पुढें होता. त्यानंतर म. गांधी यांच्या हातीं कॉंग्रेसच्या राजकारणाचीं सूत्रें आल्यानंतर गुजराथ आणि कर्नाटक हे भाग राजकारणांत जास्त लक्ष देऊं लागले. ब्राह्मण–ब्राह्मणेतर चळवळ व अस्पृश्यतानिवारण या गोष्टींनींहि समाजांत अस्वस्थता माजली होती. १९३६ सालीं मुंबईपासून सिंध अलग करून तो एक स्वतंत्र प्रांत बनविण्यांत आल्यामुळें या प्रांताचें क्षेत्र कमी झालें व उत्पन्नहि घटलें. पण १९४७ मध्यें हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळालें तेव्हां त्यांतील संस्थानें कांहीं शेजारच्या प्रांतांत विलीन झालीं तर कांहीं संघ करून राहिलीं. मुंबई या प्रांतांत महाराष्ट्रांतील–दक्षिण महाराष्ट्रांतील–१७ व गुजराथेंतील १९ मोठीं संस्थानें विलीन झालीं. कोल्हापूर व बडोदें हीं दोन महत्त्वाचीं संस्थानें या प्रांतांत येऊन पडल्यानें उत्पन्नाबरोबर खर्चहि फार वाढला.

आतां नवीन राज्यघटनेप्रमाणें मुंबई हें 'अ' वर्गाचें एक राज्य (स्टेट) झालें असून, गव्हर्नर, मंत्रिमंडळ व विधिमंडळें यांच्याकडून त्याचा राज्यकारभार चालावयाचा आहे.

**मुरदारशिंग**—(लिथार्ज). ही वनस्पति नसून शिशाचें एक प्राणिद (लेडमोनोक्साइड) आहे. याचा रंग पिवळा असतो. याचा रंगकामांत उपयोग करतात. विशेषतः तांबडा रंग (रेड लेड) यापासून तयार करतात. तसेंच कांच तयार करण्याकरितां, जिल्हई देण्याकरितां व झाळकामांत ह्याचा उपयोग करण्यांत येतो.

**मुरबाड**—मुंबई, ठाणें जिल्ह्याचा आग्नेयीकडील तालुका. क्षे. फ. ३५२ चौ. मैल. लो. सं. सुमारें ६३ हजार. यांत एकंदर १७० खेडीं आहेत. हा तालुका खडकाळ असून येथें बरेंच जंगल आहे व जमीन निकस आहे. येथें बहुतेक ठाकूर, कोळी व मराठा जातीचे लोक राहतात.

**मुरली**—मुरली, बांसरी व पावा हीं सर्व वाद्यें अलगुजाच्याच वर्गांतील असून यांची बनावटहि सामान्यतः तशीच असते. अलगुजापेक्षां ही थोडी अधिक लांब असते, व ती आडवी धरून वाजवितात. गुराख्याचें हें मोठें आवडतें वाद्य आहे. कृष्णकथेंतून कृष्णाच्या मुरलीवाद्याचा प्रभाव फार वर्णिला असतो. हल्लीं हीं वाद्यें धातूचींहि केलेलीं दृष्टीस पडतात. अलगूज पाहा.

**मुरळी**—यासारख्याच देवाला वाहिलेल्या 'देवदासी', 'भाविणी व देवळी' यांच्याविषयीं स्वतंत्र माहिती दिली आहे. देवाला मुलगी वाहण्याचे हे प्रकार मद्रास इलाख्यांत फार आहेत. कर्नाटकांतील यासारख्या वर्गास बसवी म्हणतात. पुढील कोष्टकावरून या चालीचा प्रसार कसा व कोठें आहे हें दिसेल.

| वर्गाचें नांव | देव | देवस्थान |
|---|---|---|
| मुरळी | खंडोबा | जेजूरी, जिल्हा पुणें. |
| ,, | जोतिबा | जोतिबा डोंगर, कोल्हापूर. |
| जोगवीण | अंबाबाई | तुळजापूर–मोंगलाई. |
| भावीण | रवळनाथ | खानापूर, जि. बेळगांव. |
| नायकीण | भूतनाथ | मालिगांव, कोंकण. |
| कलावंतीण | महाबळेश्वर | गोकर्ण, कारवार. |
| बसवी | दारेश्वर | कुमठें, ,, |
| देवदासी | गुड्डम्मा | शिरसी, कानडा. |
| देवळी | यल्लम्मा | सौंदत्ती, बेळगांव. |
| जोगतीण | दुर्गव्वा | कणकेटी, बल्लारी. |
| मातंगी | धामव्वा | गुड्डूर, गदग. |
| शरणी | मारुती | गुड्डूर, गदग. |

इंडियन पिनल कोडाचीं ३७२ व ३७३ हीं कलमें या चालीच्या प्रतिकारार्थ केलेलीं आहेत. मुलींप्रमाणेंच मुलगेहि देवांना वाहण्याची चाल आहे. खंडोबाचा वाघ्या, अंबाबाईचा आराध्या, धामव्वाचा पोतराज, यल्लम्माचा जोग्या, वगैरे पुरुष असेच वाहिलेले असून त्यांना लग्न करण्याची सक्त मनाई असते. हा प्रकार भंडारी, कुणबी, धनगर, नाईक, कोळी, बेडर, डासर, कबलीगार, तळवार, महार, मांग, वगैरे जातींत आढळतो. औरंगजेबानें औरंगाबादजवळच्या सातारें गांवाच्या खंडोबास मुरळ्या वाहण्याची चाल बंद केली होती.

मूल झालें तर तुला वाहीन असा नवस जेजुरीच्या खंडोबास आईबाप जेव्हां करतात तेव्हां मुलगा झाला तर वाघ्या व मुलगी झाली तर मुरळी बनून तीं मुलें देवाची आराधना करतात. मुलीला हळद फांसून सोमवतीच्या दिवशीं देवाकडे आणतात व अंतर्पाट धरून लग्न लावून देतात. नंतर तिच्या गळ्यांत कवड्यांची माळ घालतात. यानंतर मुलगी मुरळी म्हणून वावरते. तिला दुसरा नवरा करतां येत नाहीं. या मुरळ्या देवाचीं गाणीं म्हणून भिक्षा मागतात.

**मुरादाबाद**—संयुक्त प्रांत, रोहिलखंड विभागांतील जिल्हा. क्षे. फ. २२८५ चौ. मैल. सरासरी पाऊस ४० इंच पडतो. या भागांत संबळ व अमरोहा या नांवाचीं दोन शहरें आहेत. तीं शहरें व त्यांच्या आसमंतांतील प्रदेश मिळून हा मुरादाबाद जिल्हा बनला आहे. रोहिलखंड १८०१ सालीं इंग्रजी राज्यास जोडण्यांत आलें. अमरोहा व संबळ येथें सुंदर मशिदी व बौद्ध मंदिरें आहेत. या जिल्ह्यांत १४ शहरें असून २४९ खेडीं आहेत. मुसलमानांपेक्षां हिंदु लोकांचें प्रमाण जास्त आहे. येथील मुख्य उत्पन्न गव्हाचें व उंसाचें आहे. मध्यभागांत गहूं, ज्वारी,

बाजरी व ऊंस होतो. सालर करणें, कोठें कोठें सुती व लोकरीचें कापड विणणें हे धंदे चालतात. अमरोहाला पितळेचीं उत्तम भांडीं होतात. आग्नेय भागांत कांच तयार करतात.

शहर—जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. १,४२,४१४. येथें नदीच्या कांठीं जुम्मा नांवाची फार सुंदर मशीद आहे. येथें पोलिस लोकांना शिक्षण देण्याची संस्था आहे. येथें उत्तम नक्षीदार पितळेचीं भांडीं तयार होतात. रुस्तुमखान नांवाच्या काटेरिया सुभेदारानें १६२५ त हें शहर वसविलें.

**मुरार जगदेव**—हा ब्राह्मण सरदार आदिलशाहींत स. १६२८ पासून सुमारें २५ वर्षें मुख्य प्रधानकीच्या कामावर होता. पण त्यापूर्वी यानें आदिलशाहीतर्फें पुण्यावर स्वारी करून तें जाळलें व पुणें परगणा जप्त करून भुलेश्वर डोंगरावर दौलतमंगल किल्ल्याच्या पायथ्याशीं नवें शहर वसवून तेथें राहूं लागला (१६३०). हा आदिलशाहीच्या वतीनें शहाजहानास दक्षिणेंतील शाह्या जिंकण्यास मदत करीत होता. हा घोमचा राहणारा होता असें म्हणतात. यानें भीमाकांठच्या नागर गांवीं स्वतःची तुला करवून गांवाचें नांव तुळापूर ठेविलें (१६३२). शहाजीचा विजापुरीं शिरकाव होण्यास मुख्य कारण हा मुरारपंत होय. मराठे सरदारांच्या जोरावर त्यानें अनेक राजकीय कामें तडीस नेलीं. त्याच्या वेळेस मराठे व मुसलमान सरदारांत चांगली जूट वसत होती. कांहीं बिकट प्रसंगीं शहाजीनें त्यास मदत केल्यामुळें त्यानेंहि शहाजीचा स्नेह अव्याहत कायम राखिला. निजामशहास मदत करून शहाजहान बादशहाचें फार दिवस इकडे कांहीं चालूं दिलें नाहीं. महंमद आदिलशहानें स. १६३५ त हा फार डोईजड झाला म्हणून याची धिंड काढून याचा वध करविला असें म्हणतात. मुरारपंताचा वचक फार असे. त्याचा पत्रांवरील मायना महाराज-राजाधिराज मुरारीपंडितसाहेब, असा आहे.

**मुरारराव घोरपडे**—एक शूर मराठा सरदार. राजाराम छत्रपतीचा प्रसिद्ध सेनापति जो संताजी घोरपडे यास बहिरजी नांवाचा भाऊ होता त्याचा मुलगा शिदोजी व त्याचा मुलगा हा मुरारराव होय. मुरारराव हा पेशवाईच्या कालांत ३० वर्षें स्वतंत्रपणें वागून हैदर, फ्रेंच, इंग्रज, अर्काटचे नबाब, सावनूर व कडाप्याचे नबाब यांना एकमेकांविरुद्ध मदत करून आपला फायदा करून घेत असे. त्याच्याजवळ ८–१० हजार घोडदळ असून तें उत्कृष्ट दर्जाचें असे. नानासाहेब पेशव्यानें प्रथम त्याला आपल्या बाजूस वळवून घेऊन, त्याच्याकडून कर्नाटकांत स्वराज्यप्रसाराचें काम करविलें. १७४१ च्या कर्नाटकाच्या मोहिमेंत हा होता व याच्या कामगिरीबद्दल शाहूनें यास त्रिचनापल्लीची सुभेदारी दिली होती. अर्काटच्या वेढ्यांत मुराररावानें क्लाइव्हला मदत देऊन जय मिळवून दिला होता. याचा बराचसा प्रांत हैदरानें घेतल्यानें (१७६२) थोरल्या माधवरावाच्या हैदरावरील पहिल्या स्वारींत हा सामील झाला, तेव्हां माधवरावानें त्याला सेनापतिपद दिलें व त्याचा मुलूख हैदराजवळून जिंकून त्याला दिला. बारभाईंच्या कारकीर्दींत हा गुत्तीस तटस्थ राहिला होता. पुढें हैदरानें विश्वासघात करून किल्ला घेऊन मुराररावास कपालदुर्ग किल्ल्यावर चांदीची बेडी घालून ठेविलें व तेथेंच त्याचा अंत झाला. गुत्ती संस्थान मुराररावानें उत्तम रीतीनें राखलें आणि कृष्णेपासून रामेश्वरापर्यंत सर्व राजे–रजवाड्यांवर आपला दरारा बसविला. स. १७०४ पासून १७७६ पर्यंत अव्वल व उत्तर मराठेशाही पाहिलेला असा हा एकच दीर्घायुषी पुरुष दिसतो.

**मुरारि** (सन १०५०–११३५)— या संस्कृत कवीनें 'अनर्घराघव' नांवाचें एक सात अंकी नाटक लिहिलें असून त्या नाटकांतील वर्णनावरून हा माहिष्मतीच्या कलचुरी राजाच्या पदरीं असावा असें दिसतें. हा मौद्गल्य गोत्री असून भट श्रीवर्धमान व तंतुमती यांचा पुत्र. याचा काल भवभूतीच्या मागून झाला असें उपलब्ध पुराव्यावरून दिसतें. हा आपणांस 'महाकवि' असें म्हणवीत असे व बालवाल्मीकि हा किताब लावून घेई. याच्या 'अनर्घराघव' नाटकांत राम विश्वामित्राकडे गेल्यापासून रावणाचा पराभव करून अयोध्येस परत येईपर्यंतचा कथाभाग आलेला आहे. याची नाटकरचनापद्धति भवभूतीप्रमाणेंच दिसून येते. वस्तुस्थितीच्या मजकुरापेक्षां वर्णनांस यानें आपल्या नाटकांत प्राधान्य दिलें आहे. याचा ग्रंथ कळण्यास बराच अवघड असल्यानें टीकेचें साहाय्य घ्यावें लागतें.

**मुरी**—पाकिस्तान, पश्चिम पंजाब, रावळपिंडी जिल्ह्यांतील उत्तरेकडील तहशील. क्षे. फ. २५८ चौरस मैल. लो. सं. (१९२१) ६०,९६९. मुरी हें मुख्य ठिकाण रावळपिंडीपासून ४० मैलांवर असून त्या ठिकाणीं उन्हाळ्यांत श्रीमंत लोक राहावयास जातात. समुद्रसपाटीपासून उंची ७,५०० फूट आहे. काश्मीर पॉइंट, पिंडी पॉइंट, पन्हेपाड्ड बाग हीं प्रेक्षणीय स्थळें आहेत. येथून हिमालयाची शोभा सुंदर दिसते. देशविभागणीपूर्वी या ठिकाणीं खेळण्यासाठीं व मोठ्या लोकांच्या गांठीभेटीसाठीं बरीच गर्दी होत असे.

**मुरूम**—(तोंडावरला). हा एक त्वचारोग आहे. यामध्ये चेहऱ्यावर कठिण अशा बारीक पुटकुळ्या उठतात. हा रोग सामान्यतः तारुण्याच्या आरंभींच्या अवस्थेंत होतो, व अनेक उपाय करूनहि तो पुष्कळदां आवरत नाहीं. याकरितां तोंडावर वाफारा घ्यावा व प्रत्येक पुटकुळीवरची काळी खपली काढून टाकावी आणि थंडगार मलम किंवा औषध लावावें. पाठीवर व

छातीवरहि या पुटकुळ्या येतात. मलावरोध, बैठें काम, मिष्ट व पिष्टमय पदार्थांचें जास्त सेवन यांमुळेंहि हा विकार होतो. मलशुद्धि व चांगलें अन्न हा मुख्य उपाय असून ऊन घेण्यानेंहि उपयोग होतो.

**मुर्शिदकुलीखान** (मृ. १७२५)— बंगालचा पहिला नबाब. याचें पहिलें नांव जाफरखान असून हा मूळचा दक्षिणेंतील एका ब्राह्मणाचा मुलगा होता. हा प्रथम वऱ्हाडमध्यें मुलकी खात्यांत नोकरीस होता. औरंगजेबानें त्याची कर्तबगारी व हुशारी पाहून त्यास 'कुर्तुलचखान' अशी पदवी देऊन बंगालचा दिवाण नेमिलें. मुर्शिदकुलीखाननें मुक्सुदाबाद येथें आपली राजधानी स्थापन केली व तिचें नांव मुर्शिदाबाद असें ठेविलें. तेथें त्यानें उत्तम रीतीनें राज्यकारभार चालवून वसुलीची व्यवस्था उत्तम ठेविली आणि हिंदु लोकांस मोठमोठ्या जागा दिल्या. तो स्वतः फार शांतवृत्तीचा असा असून त्यानें एकपत्नीव्रत चालविलें होतें. इंग्रज व्यापाऱ्यांचा कावा त्यानें ओळखला होता, पण बादशाही हुकुमामुळें त्यांना व्यापारी सवलती त्याला द्याव्या लागल्या.

**मुर्शिदाबाद**—बंगाल्यांतील प्रेसिडेन्सी विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,०६३ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १६,४०,५३०. भागीरथी नदी या जिल्ह्यांतून वाहत जाते. तेलकरबील व मोतीझील असे दोन मोठे तलाव आहेत. पावसाचें मान सरासरी ५३ इंच आहे. बऱ्हामपूर, मुर्शिदाबाद, अझीमगंज, जंगीपूर व कांदी हीं मुख्य शहरें होत. तांदूळ, गहूं, जवस, ऊंस, नीळ हीं पिकें आहेत. टसर व मतका या प्रकारचेंहि रेशीम येथें तयार होतें. येथें जरीचें काम चांगलें होतें व कोठें कोठें हस्तिदंती कामहि क्वचित् करतात. शहर हें भागीरथी नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलें आहे. क्लाइव्हला हें लंडनसारखें शहर वाटलें होतें. १८८२ सालीं ही फक्त नबाबाची राहण्याची जागा होती. भागीरथीच्या कांठीं असलेला हजारद्वारी नांवाचा भव्य राजवाडा; इमामवाडा किंवा प्रार्थनामंदिर; राजवाड्यापासून पूर्वेस १½ मैलावर असणारा तोफखाना; मोतीझीलेच्या ईशान्येस दीड मैलावर कटरा येथें असलेली मशीद; मोतीझील तलावाच्या समोर पूर्व किनाऱ्यावर खुशबाग नांवाची बाग हीं व आणखीहि बरींच पाहण्यासारखीं स्थळें आहेत. येथें फक्त हस्तिदंताचें कोरीव काम, हुक्के, वगैरे राजविलासी जिन्नस होतात.

**मुलकी कायदा**—प्रत्येक नागरिकाला त्याच्या स्वतः- (परसन)बद्दल आणि त्याच्या मिळकतीबद्दल सरकारी कायद्यानें कांहीं हक्क दिलेले असतात. शिवाय त्या व्यक्तीच्या धर्मग्रंथानुसार किंवा त्याच्या समाजांतील रूढींना अनुसरून हक्क प्राप्त झालेले असतात. अशा हक्कांची न्यायालयांत दाद लावून घेऊन अमलबजावणी करतां यावी म्हणून सरकार जे अनेक बाबींचे कायदे करतें त्याला दिवाणी कायदा (सिव्हिल लॉ) म्हणतात. प्रत्येक व्यक्तीला विवाह, घटस्फोट, संततीसंबंधीं पाल्य व पालक वगैरे बाबतींत व्यक्तिविषयक हक्क आणि व्यक्तीच्या मालकीची स्थावरजंगम मिळकतीची तबादिली करणें (ट्रॅन्सफर ऑफ प्रापर्टी), वगैरेसंबंधीं हक्क असतात. त्या सर्व हक्कांबद्दलच्या कायद्यांचा दिवाणी कायद्यांत अंतर्भाव होतो. युरोपांत प्राचीन रोमन लोक अशा कायद्यांना 'ज्युस सिव्हिल' असें म्हणत असत व अलीकडे त्यांनाच 'सिव्हिल लॉ' असें म्हणतात. या कायदेपद्धतीला अनुसरून रोम येथील पोप यांनीं धार्मिक बाबतींत कायदे केले. त्यांना 'पेपल डिक्रीज' असें म्हणत. हिंदूंच्या जुन्या मनुस्मृति वगैरे ग्रंथांत कायद्याचे दिवाणी व फौजदारी असे दोन प्रकार आहेत. ब्रिटिश अमदानींत दिवाणी कायदा व फौजदारी कायदा हे अगदीं पृथक् केले. शिवाय दिवाणी कायद्यांच्या न्यायदानपद्धतीच्या सोयीकरितां दिवाणी कोर्टें आणि मुलकी ऊर्फ मामलेदार कोर्टें (रेव्हेन्यू) असे दोन प्रकार केले.

**मुलकी नोकरी**—लष्कर आणि आरमार हीं दोन खातीं वगळून बाकीच्या सर्व सरकारी खात्यांतील नोकरवर्गाला सिव्हिल सर्व्हिस म्हणतात. ग्रेटब्रिटनमध्यें सिव्हिल सर्व्हिस या शब्दांत होम ऑफिस, फॉरिन ऑफिस, ट्रेझरी, वॉर ऑफिस, ॲड्मिरॅल्टी, पोस्ट ऑफिस, कस्टम्स, इन्लंड रेव्हेन्यू आणि इतर खात्यांचा समावेश होतो. पूर्वीं या सर्व खात्यांतील नोकरांच्या नेमणुकी एक्झीक्यूटिव्ह गव्हर्नमेंट करीत असे. १८५५ सालीं सरकारी नोकरींत शिरणाऱ्या उमेदवारांची लायकी ठरविण्याकरितां निरनिराळ्या परीक्षा घेण्याची पद्धति सुरू करण्यांत आली आणि १८७० पासून सर्व नोकरांच्या नेमणुका परीक्षाद्वारें खुल्या चढाओढीच्या (ओपन कॉंपिटिशन) पद्धतीनें करण्यांत येऊं लागल्या. इंडिअन सिव्हिल सर्व्हिसमध्यें हीच परीक्षापद्धति अगोदरच सुरू झालेली होती. सर्व सरकारी खात्यांतील सामान्य कारकुनांचे दोन वर्ग किंवा दोन दर्जे (ग्रेड) ठरविण्यांत येऊन वरच्या वर्गांत २२ ते २४ वर्षें वयाचे इसम, आणि खालच्या वर्गांत १७ ते २० वर्षें वयाचे इसम नेमण्यांत येत. वरच्या वर्गांतील इसमांची परीक्षाहि अधिक अवघड असे. आणि त्यांच्या पगाराचें मान बरेंच चांगलें असे. शिवाय या नोकरांना भत्ताहि देण्याची पद्धत असे. आय्. सी. एस्. पाहा.

**मुलतान**—पाकिस्तान, पश्चिम पंजाबांतील मुलतान विभागांतील जिल्हा. क्षे. फ. ५,६५२ चौरस मैल. पाऊस सरासरी ४ ते ७ इंच पडतो. पूर्वी मुलतानाचें नांव कादयपपूर

असावें. थावणमल नांवाच्या एका सरदारानें मुलतानमध्यें बरीच सुधारणा घडवून आणली. १८४९ साली हा प्रांत ब्रिटिशांच्या ताब्यांत आला. जिल्ह्याची लो. सं. ( १९४१ ) १४,८४,३३३. यांत ३ शहरें व १६४७ खेडीं आहेत. मुख्य पिकें गहूं, हरभरा, जव, ज्वारी, बाजरी, कडधान्यें हीं होत. येथील जंगलांत शिसूं सांपडतें व खजुराचीं झाडें पुष्कळ आहेत. येथें भांडीं, चांदीचे दागिने, भांड्यांवर रंगीत काम, तसेंच गालिचे, रेशमी व कापसाचें किंवा मिश्र कापड यांचा मोठा व्यापार चालतो. लो. सं. ( १९४१ ) १,३३,२६६. शहरांत बऱ्याच मुसलमान साधूंच्या मशिदी आहेत. येथें गालिचे व कापड तयार होतें. येथील भांड्यांवरील नक्षीकाम फार प्रसिद्ध आहे. व एकंदर व्यापार फार मोठा आहे.

शहरांत दोन महत्त्वाचीं हिंदु मंदिरें आहेत. एक नृसिंहाचें व दुसरें प्रह्लादाचें. नृसिंहमूर्ति लांकडाची ( चंदनी ? ) असून ती कांहीं वर्षांनीं बदलावी लागते. हें स्थान फार जागृत असल्याची प्रसिद्धि आहे. प्रह्लादाचें मंदिर शहराबाहेर एका टेंकडीवर आहे. ज्या खांबांतून हिरण्यकशिपु दैत्याला मारण्यासाठीं नृसिंह अवतरला तो खांब दाखवितात. शहरापासून दोनतीन मैलांवर सूर्यकुंड, चंद्रकुंड व ताराकुंड अशीं तीन तीर्थें आहेत. यांवर कर आहे.

**मुलतानी**—हा राग तोडी थाटाचा जन्य आहे. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत वर्ज्य होतात व अवरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गायनसमय दिवसाचा चौथा प्रहर मानितात. मध्यम व गांधार यांची संगति या रागांत पुनरावृत्त होत असते. ऋषभ, धैवत व गांधार या स्वरांचा या रागांत अयोग्य उपयोग झाल्यास तोडी राग होण्याचा संभव आहे.

**मुलाणा**—हा बारा बलुत्यांपैकीं एक असून तो जातीनें मुसल्मान असतो. गांवांतील मशिदी व पीर यांची व्यवस्था, मुसलमान लोकांचीं लग्नें व इतर धर्मकृत्यें याच्याच देखरेखीखालीं होतात. देवांस किंवा स्थलदेवतांच्या शांत्यर्थ बकऱ्याला बळी द्यावयाचें असतें, तेव्हां बकरा मारण्याचा हक्क पूर्वीपासून हिंदु लोकांच्या मतानें देखील मुलाण्याचा समजला जात आहे. त्याचप्रमाणें खाटकांकरितां बकरा मारण्याचें कामहि मुलाण्यालाच करावें लागत असे व त्याला प्रत्येक बकऱ्यामागें दोन पैसे व त्या बकऱ्याचें काळीज देण्याची वहिवाट होती. कारण मुलाण्यानें नैत किंवा प्रार्थना म्हणून मारल्याशिवाय बकऱ्याचें मांस हलाल ( खाण्यास पवित्र ) होत नाहीं अशी धर्मभोळ्या हिंदु लोकांची पूर्वापार समजूत आहे.

**मुलामा** ( सोन्याचा )—( गिल्डिंग ). निरनिराळ्या वस्तूंना निरनिराळ्या प्रकारें हा मुलामा देतात. धातूवर रासायनिक, पारद किंवा वैद्युतिक मुलामा चढवितात किंवा सोन्याचा वर्ख लावून मुलामा करतात. लांकूड, कातडें, कागद, इ. वर यांत्रिक पद्धतीचा मुलामा करतात. कागद किंवा चर्मपत्र यावर प्रथम डिंकाचें पाणी किंवा पातळ खळ लावून वर सोन्याचा वर्ख बसवितात. कातड्यावर मुलामा चढविणें झाल्यास त्यावर वर्ख ठेवतात व वरून तापलेल्या पितळी ठशांनीं दाबतात. पुस्तकांच्या पुठ्ठ्यांवर सोनेरी अक्षरें याप्रमाणेंच बठवितात. खऱ्या सोन्याच्या वर्खाऐवजीं बेगडी वर्ख मिळतो तो ' जर्मन मुलामा ' म्हणून हलक्या कामाला वापरतात. कांच व चिनीमातीचीं भांडीं यांवर मुलामा करण्यासाठीं प्रथम सोन्याची पूड बसवून झाळतात.

**मुल्ला दोपियाझा** ( मृत्यु १६०० )—अकबराच्या दरबारांतील नवरत्नांपैकीं एक. हा अरबस्तानांतील तैक या गांवीं जन्मला. आपल्या बापाच्या शोधार्थ हा इराणांतून हिंदुस्थानात आला. याचा स्वभाव विनोदी असून कुराण वाचून हा आपली उपजीविका करी. दक्षिणेंतील स्वारीच्या वेळीं हा बादशहाबरोबर होता. नर्मदातीरावरील हंडिया येथें हा मरण पावला. तेथेंच याची कबर आहे. याचीं विनोदी चित्रें चित्रसंग्रहालयांतून आढळतात.

**मुष्टियुद्ध**—( बॉक्सिंग ). स्वसंरक्षणार्थ मुष्टियुद्ध खेळतां आलें पाहिजे, अशी जाणीव ब्रिटनमध्यें अठराव्या शतकापासून होऊं लागल्याचें दिसतें. पुढल्या शतकांत तर मोठमोठे मुष्टियोद्धे प्रसिद्धीस आले. १८६३ पासून हातमोजे घालूनच मुष्टियुद्धें खेळलीं पाहिजेत असा कायदा झाला. या खेळाचे नियम करण्यांत आले. रंगण विशिष्ट आकाराचें असावें व प्रत्येक फेरी किंवा पाळी ३ मिनिटांची असावी. योद्धा खालीं पडून दहा सेकंदाच्या आंत वर उठला नाहीं तर तो डाव हरला. साधारणतः एका खेळांत वीस पाळ्या होतात. वजनावरून खेळाडूंच्या जोड्या निवडतात. आपल्याकडेहि वज्रमुष्टीचा प्रकार असे.

**मुसलमान**—यांची जगांतील एकुण लोकसंख्या सु. बावीस कोटी आहे. हिंदुस्थानांतील एकंदर लो. सं. ( १९४१ ) सु. नऊ कोटी वीस लक्ष असून हिंदुस्थानांत त्यांची विशेष वस्ती बंगाल (तीन कोटी तीस लक्ष) व पंजाब (एक कोटी बासष्ट लक्ष) या प्रांतांत आहे. या लोकांत १०० वर निरनिराळे पंथोपपंथ निघाले आहेत. त्यांचीं कांहीं नांवें पुढीलप्रमाणें : अफताही, अजारीद, बैहासीद, बुनानी, घाली, हफसी, हाशीमी, इमामी, इस्मायली, जाहीझी, जारुदी, कामीली, करामी, खय्याती मैमुनी, मझ्रली, मनसूरी, नावीसी, नइझामी, राफीदी, रशीदी,

सचाई, शालीही, शैबानी, सुलेमानी, उबैदी, वाशीली, यझीदी, झियादी, इ. इ.. कांहीं मुसलमानी कायद्यांची माहिती कायद्यांतील निरनिराळ्या विषयांच्या (उदा. वारसा, लग्न, अन्नवस्त्र, इ.) नांवाखालीं देण्यांत आली आहे. महाराष्ट्रांत यांच्या वेगवेगळ्या ११ जाती आढळतात.

साधारणपणें हलके मुसलमान हे कडवे, शिक्षणांत मागासलेले, धर्मवेडे व क्षुल्लक कारणावरून एकेरीवर येणारे असतात. त्यांच्यांतील खोजे, मेमन, बोहरी हे वर्ग व्यापारी व श्रीमंत असून त्यांचीं घरेंदारें मोठमोठीं असतात. बहुतेक सर्व मुसलमान लोक गोमांस खातात. सुन्नी, शिया व वाहाबी अशा मुसलमानी धर्माच्या तीन प्रमुख शाखा आहेत. कोंकणी, मेमन दाक्षिणी व सय्यद हे लोक धार्मिक नियम कडक रीतीनें पाळतात. कसाई, हजाम, घोची, वगैरे कनिष्ठ जातींची धर्मश्रद्धा थोडीशी शिथिल असते. एतद्देशीय मुसलमानांत प्रायः पांच धर्माधिकारी असतात. काजी याच्याकडे मुसलमानी राज्यांत दिवाणी व फौजदारी न्यायाचें काम असे. मुल्लाकडे मशिदीची व्यवस्था, तींत प्रार्थना चालविणें व और्ध्वदेहिक संस्कार करणें आणि कुराण पढविणें हीं कामें असतात. मौलवी हा मुसलमानी कायदा जाणणारा व उपदेशक असून, सामाजिक बाबींवर याचें मत निर्णयात्मक मानण्यांत येतें. खतीब हा दर शुक्रवारीं व रमजान आणि बकर-ईद या सणांत मशिदींत उपासना करतो. मुजावर हा कनिष्ठ दर्जाचा धर्माधिकारी असून मशिदीची व्यवस्था ठेवून भिक्षेवर निर्वाह करतो. मुसलमानी फकिरांत बेशारा व बाशारा असे दोन वर्ग आहेत. प्रत्येकांत एक गुरु (सरगीरो), एक व्यवस्थापक (इझनी ऊर्फ नकीब) व एक खजिनदार (भंडारी) असतो. शिकविण्याचें काम मुरशद नांवाचा पंतोजी करतो. विद्यार्थ्यांस खादीम अथवा बलाका म्हणतात. मूल सहा महिन्यांचें झाल्यावर अकीका नांवाचा व पांचव्या वर्षी बिस्मिल्ला नांवाचा धार्मिक विधि करतात. बिस्मिल्लानंतर सुंता होते.

कोंकणी मुसलमान हे शेख व पठाण यांच्या मिश्रजातीचे सुन्नी पंथाचे आहेत. यांचा धंदा तांदुळाचा व्यापार व सावकारी असून हे भरभराटलेले आहेत. बाटग्या हिंदूंचें मिश्रण यांच्यांत आहे असें त्यांच्या कांहीं आडनांवांवरून दिसतें. यांचा सांप्रतचा धंदा शेती, खोती व तांदूळ आणि इमारती लांकडें यांचा व्यापार होय. आतार हे अत्तरें व सुगंधी द्रव्यें विकतात. बागवान हे औरंगजेबानें बाटविलेले मराठी कुणबी होत. घोचीहि मूळचे हिंदू होत. यांना मुसलमानांत हलके समजतात. यांचीहि प्रवृत्ति बागवानांप्रमाणें हिंदुधर्माकडे विशेष दिसते. अनहिलपट्टणच्या हिंदु राजांनीं शिया धर्मोपदेशकांना फार सहानुभूतीनें वागविलें. मेमन वर्गासंबंधीं माहिती 'कच्छी मेमन' लेखांत आढळेल. मुसलमानांत नायकिणीचा धंदा करणाऱ्या कांहीं बायका असतात. नाशिककडील या बाया सुन्नी पंथाच्या असून त्यांचा पोषाख व भाषा हीं मराठ्यांसारखीं असतात. मुसलमानी देशांत कायद्यांचे तीन प्रकार असतः एक शुद्ध मुसलमानी कायदा; दुसरा जिंकलेल्या लोकसमाजांतील रूढ कायदा; व तिसरा मुसलमानेतरांचा स्वदेशीय कायदा.

धर्म—"अल्लाखेरीज दुसरा देव नाहीं व महमद हा त्याचा पैगंबर आहे", हें मुसलमानांचें धार्मिक ब्रीदवचन आहे. (१) देवाच्या ठिकाणीं श्रद्धा—हा देव अनाद्यंत असून अखिल विश्वाचा निर्माता आहे व त्याचा अधिपति आहे. (२) देवदूतांवर श्रद्धा—हे देवदूत प्रकाशापासून उत्पन्न झाले असून ते अगदीं निर्दोष असतात. (३) दुष्ट व दुष्ट असुरांवर श्रद्धा—हे असुर धूमरहित अग्नीपासून उत्पन्न झाले असून ते मरणाधीन आहेत. (४) कुराणावर श्रद्धा—कुराण हा धर्मग्रंथ मागील सर्व अपौरुष ग्रंथांपेक्षां श्रेष्ठ आहे व यामुळें मागील ग्रंथ रद्द झाले आहेत. (५) देवाचे पैगंबर आणि प्रेषित यांवर श्रद्धा—यांत आदाम, नोहा, आब्राहाम, मोझेस, जीझस व महमद हे प्रमुख होत. तथापि या सर्वांत महमद सर्वश्रेष्ठ, देवानें निर्माण केलेला पुरुषोत्तम व शेवटचा पैगंबर आहे. (६) सामान्य पुनरुत्थान व अंतिम निर्णय, तसेंच भविष्यकालांत मिळणाऱ्या शिक्षा व बक्षिसें यांवर विश्वास. (७) दैववाद, प्राक्तन यांवर विश्वास. याप्रमाणें या मुसलमान धर्मांतील विशेष सांगतां येतील.

आचाराच्या मुख्य चार गोष्टी आहेतः पहिली प्रार्थना, दुसरी दानधर्म, तिसरी उपवास व चौथी एकदां तरी मक्केची यात्रा करणें. खलीफ हे मुसलमानांचे सर्वांत वरिष्ठ असे जगद्गुरु होत. महमदानंतर चार खलीफ होऊन गेले.

खलीफत व इस्लामचा प्रसार—पहिल्या चार खलीफांच्या अमदानींत मुसलमानी सत्ता सिंधूपासून अटलांटिक महासागरापर्यंत पसरली होती व अंतःकलहालाहि सुरुवात झाली होती. उमईद घराण्याच्या अमदानींत इस्लामी बावटा पूर्वेस चीनच्या सरहद्दीवर तर पश्चिमेस स्पेनभूमीवर रोवण्यांत येऊन खलीफतीचा लौकिक दूरवर पसरला. तथापि ती दुर्बल व वियुक्त होत चालली होती. अब्बासी खलीफांत हरून अल्रशीद प्रख्यात आहे. याच्या कारकीर्दींत ईजिप्त व स्पेन येथें नवीन खलीफती निर्माण झाल्या. इस्लामी सत्ता कळसास पोहोंचून खालीं उतरूं लागली. फातिमाईद खलीफांच्या काळीं साम्राज्य बगदादपुरतेंच होतें. इतर मुलूख स्वतंत्र झाला. १२५८ त चेंगीझखानाच्या भावानें खलीफत बुडविली. ईजिप्तची खलीफतीची गादी तुर्कस्तानकडे येऊन

ती पहिल्या महायुद्धापर्यंत तेथें नांवापुरती होती. तिसऱ्या खलीफाच्या खुनापासून अरबस्तानचें राजकीय महत्त्व गेलें. फक्त धार्मिक बाबतींत अद्याप त्याला महत्त्व आहे. उमईद घराण्याच्या वेळीं सीरिया अरब संस्थानांत श्रेष्ठ बनला. तेथील खिस्ती मुसलमानांच्या बरोबरीनें वागत; पण पुढें त्यांच्यांत धर्मयुद्धें झालीं. मेसापोटेमिया धर्मद्रोही व राजद्रोही म्हणून खलीफतींत प्रसिद्ध असे. अब्बासी घराण्याच्या कालीं त्याला महत्त्व आलें. इस्लामी संप्रदायांत तुर्कस्तानचा भाग व्यावहारिक आहे. हल्लीं तुर्कस्तानला पाश्चात्य वळण—मुसलमानी कायद्यां-विरुद्ध लागत चाललें आहे. इराणांत मुसलमानी धर्मपंथ पुष्कळ असून तें पूर्ण लोकसत्ताक आहे. मध्य आशिया अति मागासलेला आहे. तेथें महमदाच्या आज्ञा सरकार जबरीनें पाळावयास लाविते. हिंदुस्थानांत मुसलमानी सत्ता १२–१९ व्या शतकापर्यंत टिकली. येथील फारच थोडे मुसलमान शुद्ध अरबी वंशाचे आहेत. त्यामुळें त्यांच्यांत सोंवळेपणा कमी आहे. तिबेटमध्यें इस्लाम धर्म फारच थोडा असून प्रसरणशील नाहीं. तार्तरींत अदमासें दीड कोटी मुसलमान आहेत. चीनमध्यें इ. स. ६२८ मध्यें इस्लामी धर्म शिरला. कातसू व शेनसी प्रांतांतून बरेच मुसलमान आहेत. चिनी मुसलमानांची भाषा चिनी; पण त्यांचे आचरण थोडें निराळें असतें. ते शेतकी व व्यापार करतात. मुसलमानी अधिकारीहि चीनमध्यें आहेत. या मुसलमानांत अनेक पंथ आहेत. या लोकांना स्वतंत्र राजकीय अस्तित्व नाहीं. ईजिप्तनें इस्लामी धर्माला श्रेष्ठपणा मिळवून दिला व सध्यांहि त्याला सुधारण्याचें काम नेटानें चालू आहे. तेथील अझहर विद्यापीठाची कीर्ति जगभर पसरली आहे. उत्तर आफ्रिकेंतील मुसलमान बर्बर जातीचे असून त्यांचे कायदे कोड भलीकी आहे. ते धर्मसुधारक दिसतात. मध्य आफ्रिकेंत मलिकाइट पंथाचे मुसलमान आहेत. महाराष्ट्रांतील मुसलमान अलीकडे म्हणजे गेल्या २–३ शतकांत बाटलेले असून महाराष्ट्रांत १७ व्या १८ व्या शतकांत मराठेशाही-पेशवाई राजसत्ता असल्यामुळें हे बाटलेले मुसलमान आपल्याभोंवतीं असलेल्या व पूर्वी आप्तइष्ट असलेल्या हिंदू शेजाऱ्यांप्रमाणेंच वागतात. हिंदूंप्रमाणेंच दत्तक मुलगा घेतात.

मुसलमानी कायदा—ब्रिटिश अमदानींत या कायद्यालाहि महत्त्व, हिंदुस्थानांत मुसलमानधर्मी प्रजाजन बरेच असल्या-मुळें, ब्रिटिश न्यायकोर्टांत प्राप्त झालें, आणि मुसलमानी कायद्याचे सर्व प्रकारचे आधारग्रंथ, रूढी आणि न्यायनिवाडे (केस लॉ) या सर्वांनीं मुसलमानी कायद्याला निश्चित स्वरूप प्राप्त होऊन लॉ कॉलेजांत 'मुहामिडन लॉ' हा विषय परीक्षेला नेमला गेल्यामुळें शिकवण्यांत येऊं लागला व या कायद्याचे ग्रंथहि इंग्रजी भाषेंत तयार झाले. या ग्रंथांत 'मुसलमान' याची व्याख्या, जो धर्मानें मुसलमान आहे, म्हणजे जो महमद पैगंबराचा धर्म मानतो तो मुसलमान होय, मग तो जन्मतः मुसलमान असो किंवा मागाहून महमदी धर्माचा स्वीकार केल्यामुळें मुसलमान झालेला असो. या दोन्ही प्रकारच्या मुसल-मानांना हा कायदा लागू आहे. मुसलमानांचे शिया व सुन्नी असे दोन मुख्य पंथ असून विवाह, वारसा, वगैरे बाबींत या दोन पंथांच्या कायद्यांत थोडा थोडा फरक आहे. परंतु इस्लामी कायद्यामध्यें फार महत्त्वाची बाब म्हणजे मुंबईचे खोजे व कच्छी मेमन, तसेंच गुजराथेंतील सुन्नी, बोहरी व पोरबंदरचे हलाई मेमन हे धर्मानें मुसलमान असले तरी वारसाच्या बाबतींत हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें वागण्याच्या रूढी त्यांच्यांत आहेत. कारण ते मूळचे हिंदू असून नंतर मुसलमान झालेले आहेत.

मुसलमानी कायद्याचे आधार मुख्य चार आहेत-(१) कुराण, (२) हदी म्हणजे महमद पैगंबराचीं बोधवचनें, (३) इज्मा म्हणजे महमद व त्याचे शिष्य व मित्र यांनीं दिलेले निकाल किंवा निवाडे, आणि (४) किया म्हणजे वरील तीन प्रकारच्या आधारांवरून निघणारीं अनुमानें किंवा सिद्धान्त. मुसलमानी कायद्यावर टीकाग्रंथ लिहिणारे ग्रंथकार अबू हनीफा व त्याचे दोघे शिष्य अबू यूसफ व इमाम महंमद हे होत. त्यांनीं केलेल्या टीकाग्रंथांना 'हनफी कायदा' अशी संज्ञा आहे.

इस्लामी कायद्यांत (१) विवाह, (२) घटस्फोट, (३) वारसाहक्क, (४) आंदण व देणग्या, व (५) वक्फ, हे मुख्य विषय असून त्यांची माहिती त्या त्या नांवाच्या स्वतंत्र लेखांत दिलेली आहे.

**मुसळीकंद**—काळी मुसळी. याचीं लहान लहान झाडें पावसाळ्यांत उगवतात. याचे कंद बोटाएवढे जाड व पांचसहा बोटें लांब असतात. हे कंद पौष्टिक आहेत. धातुवृद्धीसाठीं याचा पाक करून घेतात. हा कंद खाल्ल्यानें मूतखडा विरून जातो. संग्रहणीवरहि हा ताकांत उगाळून देतात.

**मुसोलिनी, बेनिटो** (१८८३–१९४५)— हा इटलीचा हुकूमशहा व फॅसिझमचा संस्थापक फोर्ली प्रांतांत प्रेडाप्पिओ येथें जन्मला. ह्याचा बाप लोहार होता. मुसोलिनी सोशॅलिस्ट पक्षाचा सभासद झाला, त्यामुळें १९०२ सालीं त्याला इटलींतून हद्दपार होऊन स्वित्झर्लंडमध्यें आश्रय घ्यावा लागला. तेथून १९१२ सालीं तो इटलींत परत आला आणि तो सोशॅलिस्ट पक्षाच्या एका पत्राचा संपादक झाला. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यावर मुसोलिनी राष्ट्रीय पक्षाचा पुरस्कार करून महायुद्धांत इटलीनें सामील व्हावें असें प्रतिपादन करूं लागला, म्हणून त्याला सोशॅलिस्ट पक्षांतून काढून टाकण्यांत आलें. १९१५ सालीं इटली महायुद्धांत सामील झाल्यावर मुसोलिनीनें इटालियन सैन्यांत शिरून कार्पोरलचा

हुद्दा मिळवला. १९१७ सालीं तो युद्धांत जखमी झाला. महायुद्ध संपल्यावर विजयाचा फायदा इटलीस फारसा मिळाला नाहीं त्यामुळें इटालियन लोकमत प्रक्षुब्ध झालें. त्या संधीचा फायदा घेऊन मुसोलिनीनें कम्यूनिझमविरोधी स्वतःचा राष्ट्रीय पक्ष जोरदार बनवला. १९२१ सालीं इटालियन चेंबरमध्यें त्याच्या पक्षाला ३८ जागा मिळाल्या. मुसोलिनीनें आपल्या पक्षाला फॅसिस्ट पक्ष असें नांव दिलें आणि इटलीच्या राजानें त्याला पंतप्रधान नेमलें. १९२४ सालच्या निवडणुकींत त्याचा पक्ष फार मोठ्या संख्येनें निवडून आला. कम्यूनिस्ट, सोशॅलिस्ट, लिबरल व क्लेरिकल या चार पक्षांनीं मुसोलिनीच्या प्रधानमंडळाला विरोध केला. तथापि फॅसिस्ट पक्षाच्या बहुमताच्या जोरावर मुसोलिनीनें १९२५ सालीं सर्वाधिकारित्व आपल्याकडे घेतलें आणि विरोधी पक्षांना दडपून टाकलें. त्यामुळें विरोधी पक्षाचे बरेच पुढारी परदेशीं पळून गेले.

नंतर मुसोलिनीनें लोकांना राष्ट्रीय शिक्षण देण्याचा, लष्कराची पुनर्रचना करण्याचा आणि आर्थिक सुधारणा करण्याचा कार्यक्रम चालू केला. त्याच्या फॅसिस्ट पक्षानें जर्मनींतील हिटलरच्या नॅशनल सोशॅलिस्ट पक्षाशीं मैत्रीचे संबंध जोडले. तथापि हिटलरच्या नाझी सैन्यानें ऑस्ट्रिया देश व्यापल्यावर हिटलरला विरोध करण्याकरितां मुसोलिनीनें ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवर इटालियन सैन्य सज्ज केलें होतें.

१९३५ सालीं मुसोलिनीनें ॲबिसिनिया देशावर स्वारी केली व त्या युद्धाला हिटलरची मान्यता मिळविली आणि ॲबिसिनिया संपूर्ण जिंकून तो देश इटलीच्या साम्राज्यास जोडला. १९३८ सालीं हिटलरनें ऑस्ट्रिया देश जर्मन साम्राज्यांत सामील केला, त्यास मुसोलिनीनें मान्यता दिली. यामुळें हिटलर व मुसोलिनी यांची राजकारणांत दृढ मैत्री जमली. हिटलरला खुष करण्याकरितां मुसोलिनीनें ज्यूविरोधी कायदे केले. १९३८ सालीं झेकोस्लोव्हाकियावर हिटलरनें आक्रमण केलें त्यालाहि मुसोलिनीनें पाठिंबा दिला. १९३९ च्या मे महिन्यांत इटली व जर्मनी यांच्यामध्यें लष्करी दोस्तीचा तह झाला.

दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर मुसोलिनीनें तटस्थ राहूनहि शक्य तितकी मदत हिटलरला केली आणि १९४० च्या जून महिन्यांत फ्रान्समध्यें निकराचें युद्ध चालू असतांना मुसोलिनीनें दोस्त राष्ट्राविरुद्ध युद्ध पुकारलें. कारण त्या वेळीं जर्मनी सर्वत्र विजयी होणार असा रंग दिसत होता. त्या महायुद्धाच्या वेळीं तो मुख्य प्रधान असून शिवाय गृहमंत्री, युद्धमंत्री, आरमारमंत्री, वैमानिकदलमंत्री इतके निरनिराळे अधिकार त्याच्याकडे होते. मुसोलिनीचा विवाह डोना रचिली हिच्याबरोबर झालेला असून त्यांना व्हिटोरिया व ब्रूनो असे दोन मुलगे आणि एडा या नांवाची मुलगी अशीं तीन अपत्यें आहेत. एडा हिचा विवाह इटालियन परराष्ट्रमंत्री काउंट सियानो याच्याबरोबर झाला.

दुसऱ्या महायुद्धांत मुसोलिनी हा हिटलरच्या हातांतील बाहुलें बनला होता. त्याच्या सैन्याचा कमकुवतपणा उघडच दिसत होता. अंतर्गत बंडाळी त्याला आवरतां येत नव्हती; एकदां तर त्याला कैदेंत टाकण्यांत आलें होतें. पण तेथून हिटलरनें त्याला युक्तीनें सोडविलें. पुढें जर्मनीचा सारखा पराभव होत असतां इटलींतील राष्ट्रभक्त (पेट्रिअट) पक्षानें त्याचा भर रस्त्यांत खून पाडला व अशा रीतीनें त्याचा वाईट अंत झाला.

**मुळा**—ही भाजी सर्वत्र माहीत आहे. याच्या अनेक जाती आहेत. याचा आकार गोळ्यापासून तों फूटभर लांब व २ इंच जाडीपर्यंत नाना प्रकारचा असतो. रंग पांढरा, पिवळा, तांबडा, गुलाबी, काळा व दुरंगीहि असतो. मुळ्याच्या कित्येक जातींत तिखटपणा कमी असतो. मुळा 'द्विवार्षिक' वनस्पतींपैकीं आहे. सामान्यतः थंडी संपल्यावर लाविलेल्या बियांस मुळे चांगले पोसतात. परंतु कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत थंडीच्या दिवसांतच मुळे होतात. पावसाळ्यांत अगर उन्हाळ्यांत मुळीच होत नाहींत असा अनुभव आहे. मुळ्याची, पाल्याची व शेंगांचीहि भाजी होते. मुळा फार पाचक आहे. उचकीवर वाळलेल्या मुळ्याचा काढा देतात. मूळव्याधीवर याचा रस देतात. अम्लपित्त झाल्यास मुळा खडीसाखरेबरोबर चावून खातात. इतर अनेक रोगांवर मुळा औषधी आहे.

**मुळाक्षरें**—लेखनांतील मुळाक्षरें हीं विशिष्ट ध्वनींचीं चिन्हें आहेत. फार प्राचीन काळीं चित्रें काढून हे ध्वनी प्रकट करीत. ईजिप्तमध्यें अशी जुनी चित्रलिपि त्या वेळच्या थडग्यांतील चित्रांतून पाहावयास मिळते. यानंतर पाचरीच्या आकृतीचीं अक्षरें आलीं. तीं असीरियांतील प्राचीन लेखांत दृष्टीस पडतात. ख्रि. पू. दोन हजार वर्षांपूर्वीं सीरियांत चालू असलेलीं सेमिटिक मुळाक्षरें उपलब्ध झालेलीं आहेत. तीं अर्वाचीन युरोपियन लिपींच्या उगमस्थानीं बसतील. तीं २२ व्यंजनांचीं मुळाक्षरें असून फोनिशियन लोकांमार्फत ग्रीकांना मिळालीं. नंतर ग्रीक मुळाक्षरांवरून लॅटिन, कॉप्टिक, गॉथिक, स्लाव्हिक, वगैरे मुळाक्षरें तयार झालीं. लॅटिनवरून अर्वाचीन युरोपियन मुळाक्षरें (इटालियन, फ्रेंच, इंग्लिश, जर्मन, डच, इ.) निघालीं. आशिया खंडांतील अरबी मुळाक्षरांवरून फारसी, तुर्की, हिंदुस्तानी (ऊर्दु), वगैरे मुळाक्षरें तयार झालीं व संस्कृत किंवा देवनागरी मुळाक्षरें ब्राह्मीपासून निघालीं. संस्कृतोत्पन्न भारतीय भाषांना देवनागरी मुळाक्षरें वापरतात. द्राविडी भाषांचीं मुळाक्षरेंहि ब्राह्मीपासूनच बनलीं आहेत. लिपिशास्त्र पाहा.

**मूकनाट्य**—(पॅन्टोमाइम). नुसत्या हावभावांनीं मनांतले विकार व विचार प्रगट करण्याचा एक करमणुकीचा प्रकार. प्राचीन रोमन लोकांत ही नाट्यकला असे. नंतर फ्रान्समध्यें सतराव्या-अठराव्या शतकांत तिचा चांगलाच उत्कर्ष झाला. विदूषकाची आजची सर्कशींतील भूमिका त्यांतीलच होय. पॅन्टालून, हार्लेक्विन व कोलंबाइन हीं नेहमींचीं या नाटकांतील पात्रें होत. इंग्लंड-मध्यें १७५८ मध्यें ग्रिमाल्डीनें ड्रुरीलेनमध्यें हा प्रयोग सुरू केला व पुढें त्याची परंपरा जोरानें चालली. या नाट्याचीं कथानकें 'सिंड्रेला', 'चाळीस चोर' यांसारखीं लोककथा-वाङ्मयांतील असत. यांत गाणीं व नाच असतात व आज त्याचें स्वरूप संगीतगृहांतील विविध करमणुकीचें बनलें आहे.

**मूग**—हें कडधान्य हिंदुस्थानांत सर्वत्र होतें. मुंबई प्रांतांत मुगाचें पीक इतर ठिकाणांपेक्षां धारवाड, विजापूर जिल्ह्यांत फार महत्त्वाचें आहे. अहमदाबाद, खानदेश, अहमदनगर आणि सातारा येथें विशेष पेरा होतो. देशावर व कर्नाटकांत याचें स्वतंत्र पीक शाळू व गहूं यांपूर्वीं घेण्याची बऱ्याच ठिकाणीं चाल आहे. मूग खरीप व रब्बी या दोन्ही हंगामांत पेरतात. कुलाबा व कारवार जिल्ह्यांत हें पीक कार्तिकांत घेतात. भात कापून घेतल्यावर जमीन दोन वेळा नांगरून ती चार-पांच दिवस तापल्यावर मूग हातानें फेंकून पेरतात; नंतर नांगरानें बीं मिसळून त्यावर फळी फिरवितात. बियाचें दरएकरीं प्रमाण देशावर स्वतंत्र लागवडीस ६–८ पौंड; कोंकणांतील रब्बी पीक १॥ – २ पौंड. खरीप पीक जून महिन्यांत पेरल्यास तें ऑक्टो-बरांत तयार होतें व रब्बी पीक ऑक्टोबरांत पेरून जानेवारी-फेब्रुवारींत तयार होतें. हें धान्य दरएकरीं ५००–६०० पौंड स्वतंत्र व १५०–२०० पौंड मिसळीचें आणि भूस (गुळी) ३००–४०० पौंड होतें. मुगाची डाळ पथ्यकर समजतात. उडदाप्रमाणेंच त्याचें भूस गुरांना घालतात. मुगाची खिचडी चांगली होते. उसळ, वरण व लाडू हे पदार्थहि करतात.

**मूगवेल**—*मुगणवेल किंवा रानमूग. या वेली झाडांवर चढ-तात.* कोंकण व गोवें या भागांत फार होतात. याच्या शेंगांत चवळीप्रमाणें बिया असतात. त्यांचें तेल काढतात. खरूज वगैरे त्वग्विकारावर हें तेल गुणकारी आहे. तेलाला 'मरशिंगी' असेंहि नांव आहे.

**मूठमाती**—मृत मनुष्याच्या शरीरास पुरण्याच्या विधीस मूठमाती देणें असें म्हणतात. फार प्राचीन काळीं मृत मनुष्याचें शरीर तसेंच टाकून देऊन तें पशुपक्ष्यांस भक्ष्य म्हणून देण्याची चालहि अनेक देशांत प्रचलित असलेली आढळते व अद्यापिहि पारशी लोकांत जवळजवळ तीच चाल प्रचलित आहे. ईजिप्त-मधील लोक मृताच्या शरीरांत कांहीं रासायनिक द्रव्यें घालून तें सुरक्षित करून पुरीत असत; ही एक विशेष प्रकारची मूठ-माती देण्याची पद्धति होय (ममी पाहा). यहुदी वगैरे बहुतेक सर्व प्राचीन राष्ट्रांतील लोक मृतांचीं शवें पुरीत असत. ग्रीक व रोमन लोकांत मृतांचीं शवें जाळण्याची व पुरण्याची अशा दोन्ही चाली होत्या. ख्रिस्ती संप्रदायामध्यें कांहीं विशिष्ट जागा मंत्रविधीनें शवें पुरण्याचीं स्मशानें म्हणून निश्चित कर-ण्याची पद्धति रूढ झाली. अशा रीतीनें पुरलेल्या शवावर थडगें बांधण्याची व मृतलेख लिहिण्याची रोमन लोकांत रूढ असलेली प्रथा पुढेंहि चालू ठेवण्यांत आली. मुसलमानांत प्रेतें पुरतात. हिंदु लोकांत कांहीं अगदीं खालच्या जातींत व लिंगा-यतांत मात्र प्रेतें पुरतात. बाकी प्रेतदहनाची वहिवाट सर्रहा आहे. दफन, प्रेतदहन, प्रेतसंस्कार, मृत्यु पाहा.

**मूतखडा**—(सं. मूत्राश्मरि). मूत्रांतील क्षार वगैरे द्रव्यें कांहीं कारणांनीं एकत्र जमून त्यांचा दगडाप्रमाणें एक घट्ट गोळा बनतो. या विकारांत पुष्कळ लक्षणें होतात. मुख्य म्हणजे लघवीची स्थिति बदलणें व लघवीवाटें कधीं कधीं रक्त येणें हीं होत. यावर उपाय मूत्रपिंडाला छेद करून मूतखडा काढणें, किंवा मूत्रमार्गांत शस्त्र घालून खडा फोडणें, हा होय.

**मूत्र**—मूत्रपिंडापासून निघणारा स्राव मूत्रवाहिनीद्वारां मूत्रपिंडांत जमून तेथून मूत्रनलिकेच्या द्वारें बाहेर पडतो. यास एक प्रकारचा वास येतो व तें अम्लयुक्त असतें. निरोगी माणसाच्या मूत्राचें विशिष्टगुरुत्व १०१० पासून १०२५ पर्यंत असतें व त्याचें परिमाणाशीं व्यस्त प्रमाण असतें. सामान्यतः एका मनुष्याच्या शरीरांतून २४ तासांत ५० औंस मूत्र बाहेर पडतें. त्यांत दीड औंस घनद्रव्यें असतात. निरोगी मनुष्याच्या मूत्रांत पाणी, मूत्रसत्त्व (युरिआ) आणि सिंधुहरिद (सोडियम क्लोराईड – मीठ) असतें.

**मूत्रकृच्छ्र**—मूत्रपिंड रोग, वृक्कदाह. मूत्रपिंडाच्या रोगाच्या निरनिराळ्या प्रकारांस हें नांव आहे. इंग्रजींत ब्राइट्स डिसीज म्हणतात. कारण लंडन येथील डॉक्टर ब्राइट यानें प्रथम या रोगाचें वर्णन केलें. हा वृक्कदाह असून तो निरनिराळ्या प्रकारांत तीव्र अथवा स्थिर स्वरूपांत आढळतो. तीव्र स्वरूपामध्यें मूत्रपिंडाच्या नलिकांमध्यें व त्याच्या पेशींत दाह उत्पन्न होतो. याचीं पूर्व-चिन्हें मूत्रामध्यें दिसून येतात. उदा., मूत्राचें विशिष्टगुरुत्व फार वाढणें, मूत्र कमी होणें, त्याला गडद रंग येणें, किंवा त्यांतून रक्त अथवा श्वेत बलक बाहेर येणें, अशा तऱ्हेचीं लक्षणें दिसूं लागतात. तसेंच पाठींत कळा येणें, रक्तक्षय, अपचन, उदर, वगैरेहि विकार मूत्रपिंडाच्या रोगापासून उत्पन्न होतात.

या रोगाचें भय उत्पन्न झाल्यास अल्कलाइन औषधें देण्याची वहिवाट आहे. यामुळें मूत्राशयाला सूज येत नाहीं; पण रोग झालाच असेल तर पूर्ण विश्रांति देऊन मूत्राशयावर दाब पडणार नाहीं असें खाणें देतात; व शरीरांतून निरुपयोगी पदार्थ बाहेर पडतील असे उपाय करतात.

आयुर्वेदाच्या मतें या रोगांत वातादिक दोष स्वकारणानें वेगळे वेगळे किंवा एकत्र मिळून कुपित होऊन बस्तीच्या ठायीं प्रवेश करून मूत्रमार्गास पीडा करितात. त्या योगें आडसंधी, बस्ति आणि शिश्न यांच्या ठायीं अत्युग्र पीडा होऊन रोग्यास थोडी थोडी वारंवार लघ्वी होते. व्यायाम, तीक्ष्ण औषधाचें भक्षण, रूक्ष पदार्थ, मद्य आणि निद्रा यांचें सेवन, शीघ्रगामी वाहनावर बसून जाणें, विशिष्टमत्स्यभक्षण, भोजनावर लागलेंच पुनः भोजन करणें, अजीर्ण, इत्यादि कारणांनीं हा रोग उत्पन्न होतो.

**मूत्रपिंड**—( किडनीज्). उदरामध्यें या दोन ग्रंथी असतात. त्यांचें कार्य रक्तांतील मूत्र घेऊन त्यांचा संचय करणें व तें बाहेर टाकून देणें हें असतें. या दोन ग्रंथी पृष्ठवंशाच्या दोन्ही बाजूंस एकेक अशा उदराच्या पाठीमागच्या बाजूस असतात. या ग्रंथींचा अंतर्गोल भाग पृष्ठवंशाच्या बाजूकडे असतो. याच्या आंतील बाजूस असलेल्या खोलगट भागास 'मुख' ( हिलम ) असें म्हणतात; आणि या खोलगट भागापासून मूत्रवाहिनी ( युरेटर ) निघते; व याच बिंदूपासून मूत्राशयाच्या रक्तपेशी आंत येतात व बाहेर जातात. पुरुषाच्या प्रत्येक मूत्रपिंडाचें

मूत्रपिंड

१ मेदस द्रव्य.
२ मुख.
३ मूत्रवाहक.
४ मूत्रनलिका.
५ मज्जापृष्ठभागीय द्रव्य.
६ लघुशंकु मार्ग.
७ शंकु.
८ बृहत्शंकु मार्ग

वजन सुमारें पांच औंस असतें; व स्त्रियांच्या मूत्रपिंडाचें वजन थोडें कमी असतें. मूत्राच्या घटकद्रव्याचें रक्तापासून निःसारण अथवा पृथक्करण कंदुक ( ग्लोमेरुलि ) या भागांत लहान लहान नलिकांच्या द्वारां होतें; व त्या ठिकाणीं रक्तांतील पातळ द्रव एकीकडे गाळून घेतला जातो, व घन भाग वेगळा केला जातो. हळूहळू या नलिकांत जमलेला मूत्रद्रव मूत्रपिंडाच्या कटिरांत जमतो. तेथून मूत्रवाहिनींत जाऊन नंतर मूत्रपिंडांत जातो. याप्रमाणें थेंब थेंब मूत्र एकसारखें मूत्राशयांत जमत असतें. मूत्रपिंडदाहास इंग्रजींत नेफ्रायटिस असें म्हणतात. मूत्रांतून निघणाऱ्या वाळूसारखे कण मूत्रपिंडांत जमून त्यांचे लहान लहान खडे बनतात, आणि त्यामुळें तीव्र वेदना होतात; त्यास मूतखडा ( पाहा ) म्हणतात.

**मूत्रपिंडोपरिस्थ कोष**—( सुप्रा-रेनल कॅप्सूल्स ). प्रत्येक मूत्रपिंडाच्या वरच्या टोंकाशीं एकेक लहान पिवळी ग्रंथि असते, तीस म्हणतात. हीस वाहिनी जोडलेली नसून तिचा संबंध मूत्रपिंडाशीं केवळ पेशीरज्जूनें जोडलेला असतो. यांच्याशीं बरेच मज्जातंतू जोडलेले असतात व त्यांस रक्ताचा पुरवठा निरनिराळ्या रक्तवाहिन्यांपासून होतो व मूत्रपिंडावर असणाऱ्या शिरेच्या द्वारें हें रक्त परत जातें. ह्या कोषांचें निश्चित कोणतें कार्य असतें, याचें ज्ञान अजून झालें नाहीं.

**मूत्रसत्व**—( युरिया ). हा एक मूत्रांत आढळणारा स्फटिकमय व विरघळणारा पदार्थ आहे. शरीरांतील नत्रयुक्त संयुक्त द्रव्यांचें *प्राणिदीकरण* झाल्यामुळें हा पदार्थ उत्पन्न होतो. कृत्रिम रीतीनें तयार करण्यांत आलेला हा पहिला पदार्थ होय.

**मूत्राम्ल**—( युरिक ॲसिड ). स्तन्य प्राण्यांच्या मूत्रांत हें सामान्यतः पण थोड्या प्रमाणांत सांपडतें. शरीरांतील नत्र बाहेर टाकण्याचें हें एक साधन आहे. पक्ष्यांत आणि सरपटणाऱ्या प्राण्यांत ह्याचें प्रमाण जास्त असतें. ह्या अम्लाचें प्रमाण वाढूं लागलें म्हणजे मूत्रपिंड ( किडनी ) आणि मूत्राशय ( ब्लॅडर ) ह्यांमध्यें खडे होऊं लागतात.

**मूत्राशय**—( ब्लॅडर, युरिनरी ). मूत्राशय ही एक स्नायूंची आंतून श्लेष्मल आवरण असलेली पिशवी आहे. तीमध्यें शरीरांतील मूत्राचा संचय होतो. मूत्राशय कटिरामध्यें मध्याच्या मागील बाजूस असतो. पुरुषाच्या शरीरात तो गुदद्वाराच्या पुढें वरच्या बाजूस जंघास्थींच्या मागें असतो. स्त्रियांच्या शरीरांत तो वरच्या बाजूस व योनीच्या व गर्भाशयाच्या पुढें असतो. यामध्यें दोन नलिकांच्या द्वारें मूत्राचा संचय होतो. त्यास मूत्रवाहिनी ( युरेटर ) म्हणतात, व एका नळीच्या द्वारें तें बाहेर पडतें. तीस मूत्रनलिका ( युरेथ्रा ) म्हणतात.

**मूर, थॉमस** ( १७७९-१८५२ )—एक आयरिश कवि. १८०६ त याचा पहिला कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. 'आयरिश मेलोडीज' हा संग्रह फार लोकप्रिय आहे. 'लाला रुख' हें त्याचें काव्यहि प्रसिद्ध आहे. त्यानें बायरन, शेरिडन, व लॉर्ड फिट्झजेराल्ड यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. त्याच्या भाषेंत उपरोध, विनोद आणि जाज्वल्य अभिमान असे.

**मूर लोक**—अरबी भाषा बोलणारी ही मुसलमानी जात मिश्रवंशाची आहे. उत्तर आफ्रिकेंतील मॉरिटानिया या प्रदेशांतील प्राचीन मौरी लोकांच्या नांवावरून मूर नांव पडलें,

बर्बरवंशाची अमाझिर्ग म्हणून जी शाखा आहे ती मूळ शुद्ध वंशाची मानण्यांत येते. बार्बरी देशातील मूळ लोक आणि अरब लोक यांच्या मिश्रणापासून अर्वाचीन मूर लोकांची उत्पत्ति आहे. आठव्या शतकांत स्पेन जिंकणारे अरब जेव्हां उत्तर आफ्रिकेंतून आले तेव्हां त्यांना चुकीनें मूर म्हणूनच युरोपियन लोक म्हणूं लागले. हे मूर फ्रान्समध्यें उत्तरेस जात जात शेवटीं स्पेनमध्यें स्थायिक झाले. तेथें त्यांच्यांत कला, शास्त्रें, वाङ्मय आणि क्षात्रधर्म हीं वाढीस लागलीं; पण त्यांचें स्पेनमधून उच्चाटण झालें (१६ वें शतक) तेव्हां ते उत्तर आफ्रिकेंत जाऊन तेथें त्यांनीं राज्यें स्थापिलीं. या मूर लोकांचें युरोपियन राष्ट्रांना गेल्या शतकापर्यंत मोठें भय वाटत होतें.

**मूर शिल्प**—ही शिल्पपद्धति ज्या मुसलमान लोकांनीं स्पेन देश जिंकला त्यांनीं आपल्या मशिदी व राजवाडे बांधतांना प्रचारांत आणली. या पद्धतीचें विशेष म्हणजे या पद्धतींतील कमानी घोड्याच्या नालाच्या आकाराच्या असतात व मधून मधून तिपानी, पांचपानी किंवा इतर प्रकारच्या कमानी असतात. यांच्या आंतील बाजूस पुष्कळच नक्षीकाम केलेलें असतें व त्यांत अनेक प्रकारची रंगीबेरंगी वेलपत्ती, वगैरे किंचित् उठावदार पद्धतीची व मधून मधून मुलामा वगैरे दिलेली आढळते. तसेंच त्यांत मधून मधून भूमितीच्या आकृतीचें रंगीत चिनीमातीच्या विटांचें जडाव काम केलेलें दृष्टीस पडतें. या इमारतींत खांब त्या मानानें बारीक वाटतात. तसेंच चौकोनी आकाराच्या भिंतीपासून वर मधून मधून लोंबत्या कमानी ठेवून पुढें घुमटाची रचना केलेली असते ती फार चमत्कारिक असते. अशा तऱ्हेची भव्य व सुंदर इमारत म्हटली म्हणजे ग्रानाडा येथील अल्हाम्ब्रा (पाहा) ही होय.

**मूर्च्छनाशास्त्र**—(हिप्नॉटिझम्). ही मूर्च्छना म्हणजे एक प्रकारची झोंप असून ती झोंप म्हणजे एक मनुष्य विशिष्ट शब्दोच्चारांनीं उत्तेजन देऊन किंवा कांहीं कृत्रिम हावभाव करून त्याच्यापुढील मनुष्याला 'तूं झोंपीं जाशील' अशी खात्री पटवीत पटवीत खरोखरीच झोंप आणतो. या असल्या झोंपेंत आणि नेहमींच्या स्वाभाविक झोंपेंत एक मूलभूत महत्त्वाचा फरक असतो तो असा कीं, या मूर्च्छनारूप झोंपेंतला मनुष्य मूर्च्छना आणणाऱ्या मनुष्यानें केलेल्या सूचना ग्रहण करतो, व त्याप्रमाणें क्रियाहि करतो.

या मूर्च्छनाविद्येची एक विलक्षण फलनिष्पत्ति अशी आहे कीं, मूर्च्छना आणणारा इसम मूर्च्छित इसमाकडून त्यानें अनुभवलेल्या गोष्टी वदवितो; इतकेंच नव्हे तर, ज्या गोष्टी मनांत खोल दडवून गुप्त ठेवलेल्या असतात त्या सुद्धां वदवूं शकतो.

या मूर्च्छनाविद्येचा उपयोग औषधोपचाराप्रमाणेंहि कांहीं रोगांवर करतां येतो. निद्रानाश झालेल्या रोग्याला झोंप आणणें, शस्त्रक्रिया करण्याला आवश्यक ती बधिरता शरीराला आणणें, तसेंच अफू, दारू, वगैरेंच्या व्यसनी इसमांना त्या व्यसनाबद्दलचा तिटकारा उत्पन्न करून निर्व्यसनी बनविणें, स्मृतिनाश झालेल्या इसमांची स्मरणशक्ति पुन्हां निर्माण करणें, मज्जातंतुव्यथा झालेल्या रोग्यांच्या वेदना कमी करणें, इत्यादि उपयोग या विद्येचा होतो.

अशी मूर्च्छना आणून त्या मूर्च्छित इसमाला सर्वस्वीं नियंत्रणाखालीं आणतां येईल, असे इसम फार थोडे मिळूं शकतात, ही या विद्येंतील मोठी अडचण आहे. हिप्नॉटिझम् हा शब्द प्रथम मँचेस्टर येथील शास्त्रज्ञ ब्रेड (१७९६-१८६०) यानें उपयोगांत आणला. तथापि ही मूर्च्छना तत्पूर्वी बरींच वर्षें 'मेस्मेरिझम्' व 'ॲनिमल मॅग्नेटिझम्' या नांवांनीं ज्ञात होती.

**मूर्तिजापूर**—वऱ्हाड, अकोला जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ६१० चौ. मैल. लो. सं. सुमारें दीड लक्ष. गांवें ३१८ आहेत. मुख्य शहर मूर्तिजापूर असून लो. सं. सुमारें आठ हजार आहे. येथून मुंबईकडे लोणी फार रवाना होतें.

**मूर्तिपूजा**—परमेश्वराची, देवदेवतांची किंवा थोर पुरुषांची भक्ति करण्यासाठीं सामान्य माणसांस मानसिक ध्यानधारणा वगैरे उपयोगी पडत नाहीं. त्यांना साकार, सगुण मूर्तीच लागतात. मूर्तिपूजा सुधारलेल्या समाजांत देखील आहे. वन्यधर्मीयांची वस्तुपूजा किंवा सृष्टिपूजा यांपेक्षां मूर्तिपूजा उच्च प्रकारची आहे. मूर्तिपूजेचा पुरस्कार आपल्या साधुसंतांनीं केलेला आहे. बौद्ध संप्रदायांत यामुळें मूर्ति-शिल्पाची चांगली वाढ झाली. ख्रिस्ती धर्मांत मूर्तिपूजा नाहीं, तथापि रोमन कॅथॉलिक देवळांतून ख्रिस्त, मेरी व संत यांच्या मूर्ती पूजण्यांत येतात. ज्यू आणि मुसलमान देवमूर्ती करीत नाहींत. हिंदुस्थानांत तर सर्वत्र मूर्तींचीं देवळें आढळतील. त्यांचा शिल्पशास्त्रीय अभ्यास महत्त्वाचा समजला जातो.

उपास्य परब्रह्माचें चिन्ह, खूण, अवतार, अंश किंवा प्रतिनिधि म्हणून उपासनेसाठीं जरूर लागणाऱ्या नामरूपात्मक वस्तूस वेदान्तशास्त्रांत प्रतीक असें म्हणतात. प्रतीक (प्रति + इक) म्हणजे आपल्याकडे (प्रति) वळलेला, असा धात्वर्थ असून एखाद्या वस्तूची जी बाजू प्रथम आपणास गोचर होऊन तीमुळें पुढें सदर वस्तूचें ज्ञान होतें त्या बाजूस किंवा भागास प्रतीक असें म्हणतात. या न्यायानें सर्वव्यापी परमेश्वराचें ज्ञान होण्यास त्याची कोणतीहि प्रत्यक्ष बाजू, भाग किंवा अंशरूप विभूति प्रतीक होऊं शकते. जगांतील प्रत्येक वस्तु अंशतः परमेश्वराचेंच रूप असल्यामुळें परमेश्वराचें सर्वव्यापी रूप

ज्यांच्या एकदम लक्षांत भरत नाहीं त्यांनीं हें अव्यक्त व शुद्ध रूप ओळखण्याचें साधन किंवा प्रतीक म्हणून जगांतील अनेक वस्तूंपैकीं कोणतीहि वस्तु प्रथमतः उपासनेसाठीं घेण्यास हरकत नाहीं. कोणी मनाची उपासना करतील, तर कोणी द्रव्ययज्ञ अगर जपयज्ञ करतील. कोणी गरुडांची भक्ति करतील, तर कोणी ॐ या मंत्राक्षराचाच जप करीत बसतील. कोणी विष्णूचें तर कोणी शिवाचें, आणि कोणी गणपतीचें तर कोणी भवानीचें भजन करील. कोणी मातापितरांच्या ठायीं परमेश्वरबुद्धि ठेवून त्यांची सेवा करील तर कोणी त्याहून व्यापक अशा सर्वभूतात्मक विराट पुरुषाची उपासना पसंत करील. कोणी म्हणेल, सूर्याला भजा, तर कोणी म्हणेल कीं, सूर्यापेक्षां कृष्ण किंवा रामचंद्र श्रेष्ठ. पण सर्व विभूती मुळांत एकच होत हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

तसेंच हीं प्रतीकें म्हणजे सर्वव्यापी परमेश्वराची ओळख पटण्यासाठीं घेतलेलीं केवळ साधनें होत हेंहि विसरतां कामा नये. मन घ्या, आकाश घ्या किंवा व्यक्तोपासनामार्गाप्रमाणें शालिग्राम घ्या, शिवलिंग घ्या, श्रीकृष्णाची किंवा साधुपुरुषाची व्यक्त मूर्ति मनांत आणा, अथवा शिलामय अगर धातुमय देवाची मूर्ति असलेलें देवालय किंवा बिनमूर्तीचें मंदिर अगर मशीद घ्या. हीं सर्व लहान पोराच्या पांगुळगाड्याप्रमाणें मन स्थिर करण्याची म्हणजे चित्ताची प्रवृत्ति परमेश्वराकडे वळविण्याचीं साधनें होत. ज्याच्या त्याच्या हौसेप्रमाणें घेतलेल्या साध्या, रंगीत, चंदनी किंवा डफ अगर घागऱ्या लावलेल्या पांगुळगाड्याप्रमाणें अधिकारानुरूप उपासनेसाठीं घेतलेलीं हीं प्रतीकें किती जरी आवडतीं असलीं तरी खरा परमेश्वर या प्रतीकांत नाहीं— "न प्रतीके न हि सः" (वे. सू. ४. १. ४.)—त्यापलीकडे आहे हें अखेर ओळखलें पाहिजे. प्रतीक म्हणजे एक प्रकारचें साधन. खरा सर्वव्यापी व नित्य परमेश्वर कोणत्याहि प्रतीकांत असूं शकत नाहीं असें वेदान्तसूत्राप्रमाणें गीतेंतहि स्पष्ट सांगितलें आहे. नामरूपात्मक व्यक्त म्हणजे सगुण अशी कोणती वस्तु घेतली तरी ती मायाच असून खरा परमेश्वर ज्याला पाहावयाचा असेल त्यानें आपली दृष्टि अखेर असल्या सगुण रूपापलीकडे पोहोंचवली पाहिजे. भक्तिमार्गांत मनुष्याला तारण्याची जी शक्ति आहे ती सजीव अगर निर्जीव मूर्तींत किंवा दगडाच्या इमारतींत नसून, या प्रतीकांपेक्षां श्रेष्ठ अशी जी ईश्वरभावना सदर प्रतीकाच्या ठायीं उपासक आपल्या सोयीसाठीं ठेवीत असतो तीच खरी तारक होय. प्रतीक दगडाचें, धातूचें किंवा दुसरें कसलेंहि असो, प्रतीकापेक्षां त्याची योग्यता कधींहि अधिक होऊं शकत नाहीं. प्रतीकाच्या ठिकाणीं जशी तुमची भावना असेल तसें तुमच्या भक्तीचें फल परमेश्वर तुम्हांस देत असतो. खुद्द प्रतीक इच्छित फल कधींहि देऊं शकत नाहीं. कारण कोणतीहि वासना मनांत धरून तुम्ही कोणत्याहि देवतेची आराधना करा, सदर आराधनेचें फल देण्याचें काम सर्वव्यापी परमेश्वराचें आहे; देवतांचें नव्हे, असा अध्यात्मशास्त्राचा कायम सिद्धांत आहे. शालिग्राम हा एक दगड आहे. त्याच्या ठिकाणीं विष्णूचा भाव ठेवाल तर विष्णुलोकाला जाल; आणि त्याच प्रतीकाच्या ठिकाणीं यक्षराक्षसादि भूतांची भावना ठेवून त्याला भजाल तर त्या त्या यक्षराक्षसादि भूतांचाच लोक तुम्हांस प्राप्त होईल. फल तुमच्या भावाचें आहे, प्रतीकाचें नाहीं; आणि व्यवहारांतहि मूर्तीची पूजा करण्यापूर्वीं तिची प्राणप्रतिष्ठा करण्याचा जो प्रघात आहे त्यांतील मर्म हेंच होय. ज्या देवतेच्या भावनेनें मूर्तीची पूजा करावयाची त्या देवतेची प्राणप्रतिष्ठा तींत करीत असतात. मूर्तीच्या ठायीं परमेश्वराची भावना न ठेवतां, मूर्ति म्हणजे कांहीं विशिष्ट प्रकारच्या आकाराची माती, दगड अगर धातु समजून तिची कोणी पूजा करीत नाहीं; आणि केली तर गीतेंतील व दासबोधांतील वर दिलेल्या सिद्धांताप्रमाणें त्याला मातीची किंवा दगडाचीच गति प्राप्त होईल हें निर्विवाद आहे.

प्रतीक आणि प्रतीकांत ठेविलेला भाव यांचा याप्रमाणें भेद केल्यावर प्रतीक कोणतेंहि असलें तरी त्याबद्दल तंटा करण्याचें कारणच उरत नाहीं. कारण, प्रतीक म्हणजेच देव ही बुद्धि आतां राहत नाहीं. सर्वकामाचें फल देणाऱ्या सर्वसाक्षी परमेश्वराची दृष्टि भक्तांच्या भावाकडे असते. म्हणून "देव भावाचा भुकेला", प्रतीकाचा नव्हे, असें तुकोबांनींहि म्हटलें आहे. भक्तिमार्गाचें हें तत्त्व ज्याला कळलें त्याच्या मनांत, "मी ज्याची उपासना करतों तेंच ईश्वरस्वरूप किंवा प्रतीक खरें असून इतर प्रतीकें खोटीं" हा दुराग्रह न राहतां, कोणाचें प्रतीक कसेंहि असो, तद्द्वारा परमेश्वराचें भजन करणारे एका परमेश्वरालाच पोहोंचतात अशी उदार बुद्धि उत्पन्न होते. (गीतारहस्य, पृ. ४१४–४२१ पाहा).

**मूर्तिशिल्प**—दगड, माती, धातु, अथवा लाकूड यांच्या वाटोळ्या सर्व बाजूंनीं अथवा एखाद्या पृष्ठभागांत उठावदार पद्धतीनें कोरून तयार करावयाच्या चित्रपद्धतीस मूर्तिशिल्प म्हणतात. ही कला चित्रकलेपेक्षां लवकर पूर्णावस्थेस पोंचली. ईजिप्तमध्यें या कलेची बरीच वाढ झाली. तथापि तिची गति मधून मधून धार्मिक व सामाजिक निर्बंधांमुळें कुंठित होत असे. परंतु या धार्मिक विशिष्ट नियंत्रित पद्धतीच्या शिल्पाबरोबरच एक स्वाभाविक व्यक्ति-चित्रकला वाढत होती. तिचे कांहीं उत्कृष्ट नमुने पाहावयास सांपडतात. मेसापोटेमियामध्यें प्राचीन काळच्या शिल्पामध्यें ईजिप्तमधील शिल्पाशीं बरेंचसें साम्य आढळतें. परंतु सुमारें ख्रि. पू. ३००० वर्षांच्या सुमारास असुराची सत्ता स्थापन झाल्यापासून तेथील शिल्पाची वाढ

नैसर्गिकपणें होत गेलेली आढळते. इराणी शिल्पपद्धतींतहि या असुरी शिल्पकलेचीच वाढ होत गेलेली दृष्टीस पडते व तिचा ठसा हिटाइट, फ्रिजिअन, लिडियन व कॅरियन या आशिया मायनरमधील शिल्पपद्धतींवर पडलेला दिसतो. मध्यंतरींच्या काळांत क्रीट बेटामध्यें मेसापोटेमिया व ईजिप्त यांच्याच धर्तीवर पण थोडीशी निराळी व विशेष सुंदर आणि दिखाऊ अशी एक शिल्पपद्धति प्रचारांत आली होती. याच पद्धतीपासून निघालेली मायसीनी पद्धति पुढें ग्रीक शिल्पपद्धतींत परिणत झाली. सिसिलीमध्यें सेलिनसच्या देवळांतील मेटोपपद्धती(वर्तुळाकार व चौकोनी आकृतींची मिश्र पट्टीदार रचना)-वरून त्या बेटांतहि शिल्पकलेमध्यें प्रगति होऊन नवीन नवीन पद्धतींची रचना प्रचारांत येत होती असें दिसतें.

एजिना येथील देवळांतील शिल्प ( हें आतां म्युनिक येथें आहे ) व ऑलिंपस येथील झ्यूसचें देवालय (खि. पू. ४०० ) यांमध्यें यानंतरची शिल्पपद्धतींतील प्रगति दिसून येते. यानंतर ग्रीस देशांतील अर्गाइव्ह व ॲटिक शिल्पपद्धतीचा काळ येतो. या पद्धतीचे प्रणेते मायरोन व पॉलिक्लिटस हे होत. परंतु ग्रीक शिल्पकलेची परिणतावस्था आपणांस फिडियस याच्या कृतींत आढळते. अथेन्स येथील पार्थेनॉन या देवळांतील शिल्प त्याच्या कृतींचें गमक आहे. हें सध्यां ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे. यानंतर खिस्तपूर्व चौथ्या शतकांतील शिल्पकलेमध्यें वैयक्तिक शिल्पकाराच्या मनोरचनेचें व भावनांचें प्रतिबिंब उठलेलें दिसून येतें. यामध्यें व्यक्तिमत्त्व विशेष स्पष्टपणें दृग्गोचर होतें व शिल्पाच्या पृष्ठभागाकडे व कलाकुसरीकडे विशेष लक्ष पुरविलेलें आढळून येतें. याचा नमुना प्राक्सिटेलीस याच्या कृतींत आढळतो. अलेक्झांडरच्या पदरीं असलेला लिसिपस हा अखेरचा ग्रीक शिल्पकार म्हणतां येईल. यानंतर शिल्पकलेची प्रगति आशियामायनरमध्यें होऊं लागली. पगगामस व ऱ्होड्स बेटांतहि ग्रीक शिल्पकलेचे कांहीं उत्कृष्ट नमुने आढळतात. खिस्तपूर्व कालांत इटलीमध्यें ग्रीक शिल्पपद्धतीचेंच वर्चस्व होतें व रोमन शिल्पावर ग्रीक पद्धतीचा ठसा पूर्णपणें उठलेला दिसून येतो. रोममध्यें कांहीं व्यक्तिचित्रें व कांहीं अर्धपुतळे प्रजासत्ताक अमदानींतील जोमदारपणा चांगला व्यक्त करितात. यानंतर बायबलांतील निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें खोदण्याचा प्रघात पडला. हीं बहुधा नीच किंवा किंचित् उठावदार पद्धतीचीं असून त्यांमध्यें ग्रीक व पौरस्त्य शिल्पपद्धतीचें मिश्रण व अनुकरण केलेलें दिसतें. या कालांतील कलेचे उत्कृष्ट नमुने बायझंटाइन पद्धतींत आढळतात.

यानंतर आपणांस गॉथिक शिल्पकला व बायझंटाइन शिल्पकला यांचें मिश्रण झालेलें दृष्टीस पडतें. गॉथिक शिल्पपद्धति ही केल्टिक व स्कँडिनेव्हियन देशांत प्रथम प्रचलित असलेली आढळते. या पद्धतींत भूमितींतील आकृतींची व अमूर्त अशा कल्पनांची सजावट विशेष आढळते. ही शिल्पपद्धति अकराव्या व बाराव्या शतकांत फ्रान्स व इंग्लंड यांमधील रोमानेस्क पद्धतीमध्येंहि मिश्रित झालेली व विशेष प्रचलित दिसते. रोमानेस्क पद्धतीनंतर गॉथिक पद्धतीचा वैभवकाल येतो. ही फ्रान्समध्यें तेराव्या शतकांत विशेषतः दृष्टीस पडते. इटलीमध्येंहि पिसा व सायेना येथील धर्मोपदेशकांचीं पीठें ( पुलपिट्स ) हीं निकोला पिसानो यानें बांधलीं. त्यांत रोमन कलेचा उत्कृष्ट नमुना पाहावयास सांपडतो व हींच आगामी पंधराव्या शतकांतील पुनरुज्जीवन कालांतील शिल्पकलेचीं पूर्वगामी चिन्हें होत. रोमानेस्क कलेचें मुख्य आगर फ्लॉरेन्स हें शहर होय. येथील आद्य शिल्पकार घिबर्टी यानें फ्लॉरेन्स येथील बॅप्टिस्ट्रीचे जे कांशाचे दरवाजे केले आहेत त्यांमध्यें गॉथिक कलेची थोडी झांक आढळते. डोनाटेलो यानें गॉथिक पद्धतींतील वास्तवता व अभिजात कलेंतील कल्पकता यांचें सुंदर मिश्रण केलें आहे. ल्युकाडेला रोब्बिया हा खरें पाहतां भाजलेल्या मातीच्या मूर्तींकरितां प्रसिद्ध आहे, पण त्यानेंहि कांहीं संगमरवरी व कांशाचें उत्तम शिल्पकाम केलें आहे. रोमानेस्क कलेंतील उत्कृष्ट नमुने आपणांस मायकेलांजेलो यानें ज्या फ्लॉरेन्स येथील मेडिसी घराण्याच्या कबरी बांधल्या आहेत त्यांमध्यें दृष्टीस पडतात. बर्निनि हा बरोक अथवा वैचित्र्यपूर्ण शिल्पाचा प्रमुख प्रणेता होऊन गेला. याचे अनुयायी बरेच झाले व फ्रान्समध्यें ही पद्धति प्रचारांत आली. तसेंच फ्रान्समध्यें जीन गौजॉ व जर्मेनपिलॉ यांच्या कृतींत रोमानेस्क शिल्पामध्यें गॉथिक शिल्पाचे कांहीं अवशेष दिसतात.

यानंतर सतराव्या शतकांतील जिरार्डन, कॉयसेव्हो, आणि पुगेट हे शिल्पकार दृष्टीस पडतात. यानंतर अठराव्या शतकांत ही वैचित्र्यपूर्ण शिल्पपद्धति मागें पडून अतिशय नक्षीदार म्हणजे रोकोको पद्धति प्रचारांत आली. ही बौशार्डन, पिगाले, फाल्कोनेट व क्लोडिअन यांच्या कामांत आढळते. तथापि इतर पद्धती अगदीं मागें पडल्या होत्या असें नाहीं. हौडन यानें या काळीं कांहीं उत्तम पुतळे व अर्ध पुतळे तयार केलेले दिसतात. अठराव्या शतकाच्या अखेरीस इटलीमध्यें नवअभिजात पद्धति अस्तित्वांत आली. या पद्धतींतील कामें इटलीमध्यें कानोव्हा व थोर वॉल्डन यांचीं, फ्रान्समध्यें शौटेड आणि प्राडियेर यांचीं, व इंग्लंडमध्यें फ्लॅक्समन व शांट्रे यांचीं दृष्टीस पडतात. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं कल्पनावादी (रोमॅंटिक) चळवळ सुरू झाली व तिनें ही पद्धति मागें पाडली. या कल्पनावादी शिल्पकारात फ्रान्समध्यें रूडे आणि कार्पो व इंग्लंडमध्यें

ज्यांच्या एकदम लक्षांत भरत नाहीं त्यांनीं हें अव्यक्त व शुद्ध रूप ओळखण्याचें साधन किंवा प्रतीक म्हणून जगांतील अनेक वस्तूंपैकीं कोणतीहि वस्तु प्रथमतः उपासनेसाठीं घेण्यास हरकत नाहीं. कोणी मनाची उपासना करतील, तर कोणी द्रव्ययज्ञ अगर जपयज्ञ करतील. कोणी गरुडांची भक्ति करतील, तर कोणी ॐ या मंत्राक्षराचाच जप करीत बसतील. कोणी विष्णूचें तर कोणी शिवाचें, आणि कोणी गणपतीचें तर कोणी भवानीचें भजन करील. कोणी मातापितरांच्या ठायीं परमेश्वरबुद्धि ठेवून त्यांची सेवा करील तर कोणी त्याहून व्यापक अशा सर्वभूतात्मक विराट पुरुषाची उपासना पसंत करील. कोणी म्हणेल, सूर्याला भजा, तर कोणी म्हणेल कीं, सूर्यापेक्षां कृष्ण किंवा रामचंद्र श्रेष्ठ. पण सर्व विभूती मुळांत एकच होत हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

तसेंच हीं प्रतीकें म्हणजे सर्वव्यापी परमेश्वराची ओळख पटण्यासाठीं घेतलेलीं केवळ साधनें होत हेंहि विसरतां कामा नये. मन घ्या, आकाश घ्या किंवा व्यक्तोपासनामार्गाप्रमाणें शाळिग्राम घ्या, शिवलिंग घ्या, श्रीकृष्णाची किंवा साधुपुरुषाची व्यक्त मूर्ति मनांत आणा, अथवा शिलामय अगर धातुमय देवाची मूर्ति असलेलें देवालय किंवा बिनमूर्तीचें मंदिर अगर मशीद घ्या. हीं सर्व लहान पोराच्या पांगुळगाड्याप्रमाणें मन स्थिर करण्याची म्हणजे चित्ताची प्रवृत्ति परमेश्वराकडे वळविण्याचीं साधनें होत. ज्याच्या त्याच्या हौसेप्रमाणें घेतलेल्या साध्या, रंगीत, चंदनी किंवा डफ अगर घागऱ्या लावलेल्या पांगुळगाड्याप्रमाणें अधिकारानुरूप उपासनेसाठीं घेतलेलीं हीं प्रतीकें किती जरी आवडतीं असलीं तरी खरा परमेश्वर या प्रतीकांत नाहीं— "न प्रतीके न हि सः" (वे. सू. ४. १. ४.)—त्यापलीकडे आहे हें अखेर ओळखलें पाहिजे. प्रतीक म्हणजे एक प्रकारचें साधन. खरा सर्वव्यापी व नित्य परमेश्वर कोणत्याहि प्रतीकांत असूं शकत नाहीं असें वेदान्तसूत्राप्रमाणें गीतेंतहि स्पष्ट सांगितलें आहे. नामरूपात्मक व्यक्त म्हणजे सगुण अशी कोणती वस्तु घेतली तरी ती मायाच असून खरा परमेश्वर ज्याला पाहावयाचा असेल त्यानें आपली दृष्टि अखेर असल्या सगुण रूपापलीकडे पोहोंचवली पाहिजे. भक्तिमार्गांत मनुष्याला तारण्याची जी शक्ति आहे ती सजीव अगर निर्जीव मूर्तींत किंवा दगडाच्या इमारतींत नसून, या प्रतीकांपेक्षां श्रेष्ठ अशी जी ईश्वरभावना सदर प्रतीकाच्या ठायीं उपासक आपल्या सोयीसाठीं ठेवीत असतो तीच खरी तारक होय. प्रतीक दगडाचें, धातूचें किंवा दुसरें कसलेंहि असो, प्रतीकापेक्षां त्याची योग्यता कधींहि अधिक होऊं शकत नाहीं. प्रतीकाच्या ठिकाणीं जशी तुमची भावना असेल तसें तुमच्या भक्तीचें फल परमेश्वर तुम्हांस देत असतो. खुद्द प्रतीक इच्छित फल कधींहि देऊं शकत नाहीं. कारण कोणतीहि वासना मनांत धरून तुम्ही कोणत्याहि देवतेची आराधना करा, सदर आराधनेचें फल देण्याचें काम सर्वव्यापी परमेश्वराचें आहे; देवतांचें नव्हे, असा अध्यात्मशास्त्राचा कायम सिद्धांत आहे. शाळिग्राम हा एक दगड आहे. त्याच्या ठिकाणीं विष्णूचा भाव ठेवाल तर विष्णुलोकाला जाल; आणि त्याच प्रतीकाच्या ठिकाणीं यक्षराक्षसादि भूतांची भावना ठेवून त्याला भजाल तर त्या त्या यक्षराक्षसादि भूतांचाच लोक तुम्हांस प्राप्त होईल. फल तुमच्या भावाचें आहे, प्रतीकाचें नाहीं; आणि व्यवहारांतहि मूर्तीची पूजा करण्यापूर्वी तिची प्राणप्रतिष्ठा करण्याचा जो प्रघात आहे त्यांतील मर्म हेंच होय. ज्या देवतेच्या भावनेनें मूर्तीची पूजा करावयाची त्या देवतेची प्राणप्रतिष्ठा तींत करीत असतात. मूर्तीच्या ठायीं परमेश्वराची भावना न ठेवता, मूर्ति म्हणजे कांहीं विशिष्ट प्रकारच्या आकाराची माती, दगड अगर धातु समजून तिची कोणी पूजा करीत नाहीं; आणि केली तर गीतेंतील व दासबोधांतील वर दिलेल्या सिद्धांताप्रमाणें त्याला मातीची किंवा दगडाचीच गति प्राप्त होईल हें निर्विवाद आहे.

प्रतीक आणि प्रतीकांत ठेविलेला भाव यांचा याप्रमाणें भेद केल्यावर प्रतीक कोणतेंहि असलें तरी त्याबद्दल तंटा करण्याचें कारणच उरत नाहीं. कारण, प्रतीक म्हणजेच देव ही बुद्धि आतां राहत नाहीं. सर्वकामाचें फल देणाऱ्या सर्वसाक्षी परमेश्वराची दृष्टि भक्तांच्या भावाकडे असते. म्हणून "देव भावाचा भुकेला", प्रतीकाचा नव्हे, असें तुकोबांनीहि म्हटलें आहे. भक्तिमार्गाचें हें तत्त्व ज्याला कळलें त्याच्या मनांत, "मी ज्याची उपासना करतों तेंच ईश्वरस्वरूप किंवा प्रतीक खरें असून इतर प्रतीकें खोटीं" हा दुराग्रह न राहतां, कोणाचें प्रतीक कसेंहि असो, तद्द्वारा परमेश्वराचें भजन करणारे एका परमेश्वरालाच पोहोंचतात अशी उदार बुद्धि उत्पन्न होते. (गीतारहस्य, पृ. ४१४-४२१ पाहा).

**मूर्तिशिल्प**—दगड, माती, धातु, अथवा लाकूड यांच्या वाटोळ्या सर्व बाजूंनीं अथवा एखाद्या पृष्ठभागांत उठावदार पद्धतीनें कोरून तयार करावयाच्या चित्रपद्धतीस मूर्तिशिल्प म्हणतात. ही कला चित्रकलेपेक्षां लवकर पूर्णावस्थेस पोंचली. ईजिप्तमध्यें या कलेची बरीच वाढ झाली. तथापि तिची गति मधून मधून धार्मिक व सामाजिक निर्बंधांमुळें कुंठित होत असे. परंतु या धार्मिक विशिष्ट नियंत्रित पद्धतीच्या शिल्पाबरोबरच एक स्वाभाविक व्यक्ति-चित्रकला वाढत होती. तिचे कांहीं उत्कृष्ट नमुने पाहावयास सांपडतात. मेसापोटेमियामध्यें प्राचीन काळच्या शिल्पामध्यें ईजिप्तमधील शिल्पाशीं बरेंचसें साम्य आढळतें. परंतु सुमारें खि. पू. ३००० वर्षांच्या सुमारास असुराची सत्ता स्थापन झाल्यापासून तेथील शिल्पाची वाढ

नैसर्गिकपणें होत गेलेली आढळते. इराणी शिल्पपद्धतींतहि या असुरी शिल्पकलेचीच वाढ होत गेलेली दृष्टीस पडते व तिचा ठसा हिटाइट, फ्रिजिअन, लिडियन व कॅरियन या आशिया मायनरमधील शिल्पपद्धतींवर पडलेला दिसतो. मध्यंतरींच्या काळांत क्रीट बेटामध्यें मेसापोटेमिया व ईजिप्त यांच्याच धर्तीवर पण थोडीशी निराळी व विशेष सुंदर आणि दिखाऊ अशी एक शिल्पपद्धति प्रचारांत आली होती. याच पद्धतीपासून निघालेली मायसीनी पद्धति पुढें ग्रीक शिल्पपद्धतींत परिणत झाली. सिसिलीमध्यें सेलिनसच्या देवळांतील मेटोपपद्धती(वर्तुळाकार व चौकोनी आकृतींची मिश्र पट्टीदार रचना)-वरून त्या बेटांतहि शिल्पकलेमध्यें प्रगति होऊन नवीन नवीन पद्धतीची रचना प्रचारांत येत होती असें दिसतें.

एजिना येथील देवळांतील शिल्प (हें आतां म्युनिक येथें आहे) व ऑलिंपस येथील झ्यूसचें देवालय (खि. पू. ४००) यांमध्यें यानंतरची शिल्पपद्धतींतील प्रगति दिसून येते. यानंतर ग्रीस देशांतील अर्गाइव्ह व ॲटिक शिल्पपद्धतीचा काळ येतो. या पद्धतीचे प्रणेते मायरोन व पॉलिक्लिटस हे होत. परंतु ग्रीक शिल्पकलेची परिणतावस्था आपणांस फिडियस याच्या कृतींत आढळते. अथेन्स येथील पार्थेनॉन या देवळांतील शिल्प त्याच्या कृतींचें गमक आहे. हें सध्यां ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे. यानंतर खिस्तपूर्व चौथ्या शतकांतील शिल्पकलेमध्यें वैयक्तिक शिल्पकाराच्या मनोरचनेचें व भावनांचें प्रतिबिंब उठलेलें दिसून येतें. यामध्यें व्यक्तिमत्त्व विशेष स्पष्टपणें दृग्गोचर होतें व शिल्पाच्या पृष्ठभागाकडे व कलाकुसरींकडे विशेष लक्ष पुरविलेलें आढळून येतें. याचा नमुना प्राक्सिटेलीस याच्या कृतींत आढळतो. अलेक्झांडरच्या पदरीं असलेला लिसिपस हा अखेरचा ग्रीक शिल्पकार म्हणतां येईल. यानंतर शिल्पकलेची प्रगति आशियामायनरमध्यें होऊं लागली. पर्गामस व ऱ्होड्स बेटांतहि ग्रीक शिल्पकलेचे कांहीं उत्कृष्ट नमुने आढळतात. खिस्तपूर्व कालांत इटलीमध्यें ग्रीक शिल्पपद्धतीचेंच वर्चस्व होतें व रोमन शिल्पावर ग्रीक पद्धतीचा ठसा पूर्णपणें उठलेला दिसून येतो. रोममध्यें कांहीं व्यक्तिचित्रें व कांहीं अर्धपुतळे प्रजासत्ताक अमदानींतील जोमदारपणा चांगला व्यक्त करितात. यानंतर बायबलांतील निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें खोदण्याचा प्रघात पडला. हीं बहुधा नीच किंवा किंचित् उठावदार पद्धतीचीं असून त्यांमध्यें ग्रीक व पौरस्त्य शिल्पपद्धतींचें मिश्रण व अनुकरण केलेलें दिसतें. या कालांतील कलेचे उत्कृष्ट नमुने बायझंटाइन पद्धतींत आढळतात.

यानंतर आपणांस गॉथिक शिल्पकला व बायझंटाइन शिल्पकला यांचें मिश्रण झालेलें दृष्टीस पडतें. गॉथिक शिल्पपद्धति ही केल्टिक व स्कँडिनेव्हियन देशांत प्रथम प्रचलित असलेली आढळते. या पद्धतींत भूमितींतील आकृतींची व अमूर्त अशा कल्पनांची सजावट विशेष आढळते. ही शिल्पपद्धति अकराव्या व बाराव्या शतकांत फ्रान्स व इंग्लंड यांमधील रोमानेस्क पद्धतीमध्येंहि मिश्रित झालेली व विशेष प्रचलित दिसते. रोमानेस्क पद्धतीनंतर गॉथिक पद्धतीचा वैभवकाल येतो. ही फ्रान्समध्यें तेराव्या शतकांत विशेषतः दृष्टीस पडते. इटलीमध्येंहि पिसा व सायेना येथील धर्मोपदेशकांचीं पीठें (पुलपिट्स) हीं निकोला पिसानो यानें बांधलीं. त्यांत रोमन कलेचा उत्कृष्ट नमुना पाहावयास सांपडतो व हींच आगामी पंधराव्या शतकांतील पुनरुज्जीवन कालांतील शिल्पकलेचीं पूर्वगामी चिन्हें होत. रोमानेस्क कलेचें मुख्य आगर फ्लॉरेन्स हें शहर होय. येथील आद्य शिल्पकार घिबर्टी यानें फ्लॉरेन्स येथील बॅप्टिस्ट्रीचे जे कांशाचे दरवाजे केले आहेत त्यांमध्यें गॉथिक कलेची थोडी झांक आढळते. डोनाटेलो यानें गॉथिक पद्धतींतील वास्तवता व अभिजात कलेंतील कल्पकता यांचें सुंदर मिश्रण केलें आहे. ल्युकाडेला रोब्बिया हा खरें पाहतां भाजलेल्या मातीच्या मूर्तींकरितां प्रसिद्ध आहे, पण त्यानेंहि कांहीं संगमरवरी व कांशाचें उत्तम शिल्पकाम केलें आहे. रोमानेस्क कलेंतील उत्कृष्ट नमुने आपणांस मायकेलांजेलो यानें ज्या फ्लॉरेन्स येथील मेडिसी घराण्याच्या कबरी बांधल्या आहेत त्यांमध्यें दृष्टीस पडतात. बर्निनि हा बरोक अथवा वैचित्र्यपूर्ण शिल्पाचा प्रमुख प्रणेता होऊन गेला. याचे अनुयायी बरेच झाले व फ्रान्समध्यें ही पद्धति प्रचारांत आली. तसेंच फ्रान्समध्यें जीन गौजाँ व जर्मेनपिलाँ यांच्या कृतींत रोमानेस्क शिल्पामध्यें गॉथिक शिल्पाचे कांहीं अवशेष दिसतात.

यानंतर सतराव्या शतकांतील जिरार्डेन, कॉयसेव्हो, आणि पुगेट हे शिल्पकार दृष्टीस पडतात. यानंतर अठराव्या शतकांत ही वैचित्र्यपूर्ण शिल्पपद्धति मागें पडून अतिशय नक्षीदार म्हणजे रोकोको पद्धति प्रचारांत आली. ही बौशार्डेन, पिगाले, फाल्कोनेट व क्लोडिअन यांच्या कामांत आढळते. तथापि इतर पद्धती अगदीं मागें पडल्या होत्या असें नाहीं. हौडन यानें या काळीं कांहीं उत्तम पुतळे व अर्ध पुतळे तयार केलेले दिसतात. अठराव्या शतकाच्या अखेरीस इटलीमध्यें नवअभिजात पद्धति अस्तित्वांत आली. या पद्धतींतील कामें इटलीमध्यें कानोव्हा व थोर वॉल्डन यांचीं, फ्रान्समध्यें शौडेड आणि प्राडियेर यांचीं, व इंग्लंडमध्यें फ्लॅक्समन व शांट्रे यांचीं दृष्टीस पडतात. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं कल्पनावादी (रोमँटिक) चळवळ सुरू झाली व तिनें ही पद्धति मागें पाडली. या कल्पनावादी शिल्पकारांत फ्रान्समध्यें रूडे आणि कार्पो व इंग्लंडमध्यें

ज्यांच्या एकदम लक्षांत भरत नाहीं त्यांनीं हें अव्यक्त व शुद्ध रूप ओळखण्याचें साधन किंवा प्रतीक म्हणून जगांतील अनेक वस्तूंपैकीं कोणतीहि वस्तु प्रथमतः उपासनेसाठीं घेण्यास हरकत नाहीं. कोणी मनाची उपासना करतील, तर कोणी द्रव्ययज्ञ अगर जपयज्ञ करतील. कोणी गरुडांची भक्ति करतील, तर कोणी ॐ या मंत्राक्षराचाच जप करीत बसतील. कोणी विष्णूचें तर कोणी शिवाचें, आणि कोणी गणपतीचें तर कोणी भवानीचें भजन करील. कोणी मातापितरांच्या ठायीं परमेश्वरबुद्धि ठेवून त्यांची सेवा करील तर कोणी त्याहून व्यापक अशा सर्वभूतात्मक विराट पुरुषाची उपासना पसंत करील. कोणी म्हणेल, सूर्याला भजा, तर कोणी म्हणेल कीं, सूर्यापेक्षां कृष्ण किंवा रामचंद्र श्रेष्ठ. पण सर्व विभूती मुळांत एकच होत हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

तसेंच हीं प्रतीकें म्हणजे सर्वव्यापी परमेश्वराची ओळख पटण्यासाठीं घेतलेलीं केवळ साधनें होत हेंहि विसरतां कामा नये. मन घ्या, आकाश घ्या किंवा व्यक्तोपासनामार्गाप्रमाणें शालिग्राम घ्या, शिवलिंग घ्या, श्रीकृष्णाची किंवा साधुपुरुषाची व्यक्त मूर्ति मनांत आणा, अथवा शिलामय अगर धातुमय देवाची मूर्ति असलेलें देवालय किंवा विनमूर्तीचें मंदिर अगर मशीद घ्या. हीं सर्व लहान पोराच्या पांगुळगाड्याप्रमाणें मन स्थिर करण्याचीं म्हणजे चित्ताची प्रवृत्ति परमेश्वराकडे वळविण्याचीं साधनें होत. ज्याच्या त्याच्या हौसेप्रमाणें घेतलेल्या साध्या, रंगीत, चंदनी किंवा डफ अगर घागऱ्या लावलेल्या पांगुळगाड्याप्रमाणें अधिकारानुरूप उपासनेसाठीं घेतलेलीं हीं प्रतीकें किती जरी आवडतीं असलीं तरी खरा परमेश्वर या प्रतीकांत नाहीं—"न प्रतीके न हि सः" (वे. सू. ४. १. ४.)—त्यापलीकडे आहे हें अखेर ओळखलें पाहिजे. प्रतीक म्हणजे एक प्रकारचें साधन. खरा सर्वव्यापी व नित्य परमेश्वर कोणत्याहि प्रतीकांत असूं शकत नाहीं असें वेदान्तसूत्राप्रमाणें गीतेंतहि स्पष्ट सांगितलें आहे. नामरूपात्मक व्यक्त म्हणजे सगुण अशी कोणती वस्तु घेतली तरी ती मायाच असून खरा परमेश्वर ज्याला पाहावयाचा असेल त्यानें आपली दृष्टि अखेर असल्या सगुण रूपापलीकडे पोहोंचवली पाहिजे. भक्तिमार्गांत मनुष्याला तारण्याची जी शक्ति आहे ती सजीव अगर निर्जीव मूर्तींत किंवा दगडाच्या इमारतींत नसून, या प्रतीकांपेक्षां श्रेष्ठ अशी जी ईश्वरभावना सदर प्रतीकाच्या ठायीं उपासक आपल्या सोयीसाठीं ठेवीत असतो तीच खरी तारक होय. प्रतीक दगडाचें, धातूचें किंवा दुसरें कसलेंहि असो, प्रतीकापेक्षां त्याची योग्यता कधींहि अधिक होऊं शकत नाहीं. प्रतीकाच्या ठिकाणीं जशी तुमची भावना असेल तसें तुमच्या भक्तीचें फल परमेश्वर तुम्हांस देत असतो. खुद्द प्रतीक इच्छित फल कधींहि देऊं शकत नाहीं. कारण कोणतीहि वासना मनांत धरून तुम्ही कोणत्याहि देवतेची आराधना करा, सदर आराधनेचें फल देण्याचें काम सर्वव्यापी परमेश्वराचें आहे; देवतांचें नव्हे, असा अध्यात्मशास्त्राचा कायम सिद्धांत आहे. शालिग्राम हा एक दगड आहे. त्याच्या ठिकाणीं विष्णूचा भाव ठेवाल तर विष्णुलोकाला जाल; आणि त्याच प्रतीकाच्या ठिकाणीं यक्षराक्षसादि भूतांची भावना ठेवून त्याला भजाल तर त्या त्या यक्षराक्षसादि भूतांचाच लोक तुम्हांस प्राप्त होईल. फल तुमच्या भावाचें आहे, प्रतीकाचें नाहीं; आणि व्यवहारांतहि मूर्तीची पूजा करण्यापूर्वी तिची प्राणप्रतिष्ठा करण्याचा जो प्रघात आहे त्यांतील मर्म हेंच होय. ज्या देवतेच्या भावनेनें मूर्तीची पूजा करावयाची त्या देवतेची प्राणप्रतिष्ठा तींत करीत असतात. मूर्तीच्या ठायीं परमेश्वराची भावना न ठेवतां, मूर्ति म्हणजे कांहीं विशिष्ट प्रकारच्या आकाराची माती, दगड अगर धातु समजून तिची कोणी पूजा करीत नाहीं; आणि केली तर गीतेंतील व दासबोधांतील वर दिलेल्या सिद्धांताप्रमाणें त्याला मातीची किंवा दगडाचीच गति प्राप्त होईल हें निर्विवाद आहे.

प्रतीक आणि प्रतीकांत ठेविलेला भाव यांचा याप्रमाणें भेद केल्यावर प्रतीक कोणतेंहि असले तरी त्याबद्दल तंटा करण्याचें कारणच उरत नाहीं. कारण, प्रतीक म्हणजेच देव ही बुद्धि आतां राहत नाहीं. सर्वकामाचें फल देणाऱ्या सर्वसाक्षी परमेश्वराची दृष्टि भक्तांच्या भावाकडे असते. म्हणून "देव भावाचा भुकेला", प्रतीकाचा नव्हे, असें तुकोबांनींहि म्हटलें आहे. भक्तिमार्गाचें हें तत्त्व ज्याला कळलें त्याच्या मनांत, "मी ज्याची उपासना करतों तेंच ईश्वरस्वरूप किंवा प्रतीक खरें असून इतर प्रतीकें खोटीं" हा दुराग्रह न राहतां, कोणाचें प्रतीक कसेंहि असो, तद्द्वारा परमेश्वराचें भजन करणारे एका परमेश्वरालाच पोहोंचतात अशी उदार बुद्धि उत्पन्न होते. (गीतारहस्य, पृ. ४१४–४२१ पाहा).

**मूर्तिशिल्प**—दगड, माती, धातु, अथवा लाकूड यांच्या वाटोळ्या सर्व बाजूंनीं अथवा एखाद्या पृष्ठभागांत उठावदार पद्धतीनें कोरून तयार करावयाच्या चित्रपद्धतीस मूर्तिशिल्प म्हणतात. ही कला चित्रकलेपेक्षां लवकर पूर्णावस्थेस पोंचली. ईजिप्तमध्यें या कलेची बरीच वाढ झाली. तथापि तिची गति मधून मधून धार्मिक व सामाजिक निर्बंधांमुळें कुंठित होत असे. परंतु या धार्मिक विशिष्ट नियंत्रित पद्धतीच्या शिल्पाबरोबरच एक स्वाभाविक व्यक्ति-चित्रकला वाढत होती. तिचे कांहीं उत्कृष्ट नमुने पाहावयास सांपडतात. मेसापोटेमियामध्यें प्राचीन काळच्या शिल्पामध्यें ईजिप्तमधील शिल्पाशीं बरेंचसें साम्य आढळतें. परंतु सुमारें खि. पू. ३००० वर्षांच्या सुमारास असुरांची सत्ता स्थापन झाल्यापासून तेथील शिल्पाची वाढ

जाण्यास भाग पाडलें. यानें तैलप सोळंकीच्या बारप या सेनापतीस युद्धांत ठार केलें. यानंतर याजवर काठेवाडांतील सोरठच्या चूडासमा ( यादव ) महरिपु राजावर स्वारी करण्याचा प्रसंग आला. महरिपूनें आपला मित्र कच्छचा जाडेजा यादव याच्या साहाय्यानें यास तोंड दिलें. परंतु या लढाईंत महरिपू याच्या ताब्यांत सांपडला व जाडेजा यादव म्हणजे राजा लाखा फुलाणी हा मारला गेला. यानें सिद्धपूर येथें रुद्रमहालय नांवाच्या शिवालयाची स्थापना करून त्याची प्रतिष्ठापना कनोज-ठाणेश्वरहून विद्वान् ब्राह्मण बोलावून त्यांच्याकडून करवली. या ब्राह्मणांच्या उपजीविकेकरितां कांहीं गांवें इनाम देऊन त्यांना यानें तेथेंच स्थायिक केलें. याच्या पूर्वीची माहिती अद्यापि मिळूं शकत नाहीं. याच्या पित्याचें नांव राजि असें होतें.

प्रबंधचिंतामणि व कुमारपालप्रबंध या ग्रंथांवरून असें दिसतें कीं, कान्यकुब्ज देशांतील कल्याणकटक नगरचा राजा भूदेवा ( भूयगडदेवा )चा वंशज मुंजाळदेव याचे तीन पुत्र राज, बीज, व दंडक यांनीं चावडा वंशांतील शेवटचा राजा भूयडदेव ( सामंतसिंह ) याची अश्वविद्यानिपुणता पाहून आपली बहीण लिलादेवी त्यास दिली. पुढें लिलादेवी गर्भार असतांना मृत्यु पावली व तिचें पोट चिरून मूल बाहेर काढण्यांत आलें. या मुलाचा मूळ नक्षत्रावर व पुरते दिवस भरण्यापूर्वीं जन्म झाल्यानें यास 'मूळराज' म्हणूं लागले.

**मृगजल**—हा एक दार्शनिक भास आहे. वेगवेगळया घनतेच्या वातावरणांतून प्रकाशकिरण जाऊं लागले असतां ते वांकडे होतात व उलटा देखावा दिसतो. सहारासारख्या वाळवंटांत एखाद्या झाडापासून निघणारा प्रकाशकिरण जमिनीकडे येत असतां वांकडा होत वर पाहणाराकडे पोंचतो व याचा परिणाम म्हणजे पाहणाराला खालीं शेंडा व वर बुंधा असें झाड दिसूं लागतें—जणुं पाण्यांत झाडाचें प्रतिबिंबच पडलें आहे. बर्फाच्या पाण्यावर वरचे किरण इतके खालीं वांकडे होत जातात कीं, पाण्यावरची एखादी होडी आकाशांत उलटलेली दिसेल. अगदीं रखरखीत किंवा अगदीं थंड प्रदेशांत हवा शांत असली म्हणजे असे चमत्कार दिसतात.

**मृगशृंग भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें औषध हृदयाला शक्तिदायक असें आहे. क्षयाच्या प्रथमावस्थेंत या औषधाचा चांगला उपयोग होतो. बारीक ताप येणें, थोडासा खोकला असणें, हृदयांतून कळा निघणें, हृदय अशक्त असणें, अतिशय मानसिक परिश्रम होणें, हृदयाची धडधड होणें, इत्यादि विकारांवर हें औषध उत्कृष्ट आहे. १ ते ३ गुंजा मध किंवा दूध-खडीसाखर यांबरोबर घेतात.

**मृतसंजीवनी रस**—एक आयुर्वेदीय रसायन. ४ पारा, ३ जेपाळ, २ टांकणखार, १ बचनाग, ह्या सर्वांची सूक्ष्म कज्जली करून ठेवावी म्हणजे ही मात्रा तयार झाली. ही आल्याच्या रसांत अथवा त्रिकटु ( सुंठ, मिरे, पिंपळी ), चित्रक आणि सैंधव ह्यांच्याबरोबर द्यावी आणि कापूर व चंदन यांची उटी लावावी. पथ्यास ताकभात. या रसायनाच्या सेवनानें सन्निपातज्वर, विषमज्वर, आमवात, वातशूल, गुल्म, प्लीहा, जलोदर, शीतपूर्व आणि दाहपूर्व असा विषमज्वर, अग्निमांद्य, इत्यादि रोग दूर होतात. याच रसायनाचा दुसरा प्रकार असा आहे कीं, १ पारा आणि २ गंधक या दोहोंची कज्जली, १ अभ्रक भस्म, १ लोहभस्म, १ ताम्रभस्म, १ बचनाग, १ हरताळ, १ कंकुष्ठ, १ मनशीळ, १ हिंगूळ, १ चित्रक, १ अतिविष, १ त्रिकटु, ३ सुवर्णमाक्षिक भस्म, १ भांग, १ निर्गुंडी, १ तांदुळजा या सर्व औषधांचें चूर्ण आल्याच्या रसांत तीन दिवस मर्दन करून नंतर निर्गुंडी, विजया, निंबू आणि करंजाची साल यांच्या रसांत निरनिराळा एकेक दिवस खल करावा. नंतर तें कांचेच्या शिशींत घालून वालुकायंत्रांत दोन प्रहर मध्यम अग्नि द्यावा. आपोआप थंड झाल्यावर काढून पुनः आल्याच्या रसांत एक दिवस खलून त्याच्या गुंजाप्रमाणें मात्रा कराव्या. या मात्रेच्या सेवनानें अंतकसन्निपात दूर होतो. पथ्यास दूधभात भक्षावा.

**मृतसमुद्र**—( डेड सी ). हा समुद्र ख्रिस्ती धर्मग्रंथांत 'सॉल्ट सी' (क्षार समुद्र), 'सी ऑफ दि प्लेन्स' (मैदानांतील समुद्र ), व 'ईस्ट सी' ( पूर्व समुद्र ) या नांवांनीं उल्लेखिलेला असून तो पॅलेस्टाइन प्रांताच्या दक्षिण सरहद्दीजवळ आहे. या समुद्राचा उत्तर किनारा जेरुशलेमच्या पूर्वेस २५ मैलांवर आहे. या समुद्राची लांबी ४६ मैल व रुंदी ९ ते १० मैल आहे. हा समुद्र खोलगट प्रदेशांत असून त्या प्रदेशांतून जॉर्डन नदी वाहते आणि ती या समुद्राच्या उत्तर बाजूस येऊन मिळते. या समुद्राला आणखीहि लहान लहान नद्या येऊन मिळतात. या समुद्राभोंवतालचा प्रदेश अगदीं निर्जन असून, तेथें चुनखडीचे खडक, वाळूचीं मैदानें, मिठाच्या टेंकड्या, गंधक, ज्वालामुखींतील स्फोटकद्रव्य यांनीं युक्त आहे. या समुद्राचें पाणी दुर्गंधियुक्त व खारट आहे. या समुद्राच्या उत्तरेकडील भागाची खोली १३०८ फूट, दक्षिणेकडील भागाची खोली १२ फूट, आणि इतर ठिकाणीं कांठानजीक ३ फूट आहे. या समुद्रांत कोणतेच प्राणी जगत नाहींत. या समुद्रांत लहान लहान बोटी चालतात.

**मृत्तिका(पात्र)लेखन**—बौद्ध लोक शिलांप्रमाणेंच विटांवर व मृत्तिकापात्रांवरहि आपली धर्मसंबंधीं सूत्रें खोदवून ठेवीत असत. मथुरेच्या पदार्थसंग्रहालयांत अजमासें ख्रिस्तपूर्व पहिल्या

आल्फ्रेड स्टीव्हन्स हे प्रमुख दिसतात. यानंतर बार्ये, दलौ व रॉडिन हे शिल्पकार या पद्धतीचे प्रणेते आढळतात. रॉडिन याच्या कलेचा परिणाम फ्रान्समधील बोर्डेले व इंग्लंड-मधील एप्स्टेन यांच्या कामांवर आढळून येतो. फ्रान्समध्यें सिकार्ड व मायलो यांच्या कृतींत अद्यापि अभिजात शिल्प-कलेचे अवशेष आपणांस पाहावयास सांपडतात. इंग्लंडमध्यें हार्वर्ड थॉमस हा याच पद्धतीचा पुरस्कर्ता आहे.

भारतीय—भारतीय मूर्तिशिल्पांत गांधारशिल्प व दाक्षिणात्य शिल्प हे दोन मुख्य प्रकार आहेत. हिंदुस्थानच्या वायव्य सर-हद्दीवरील देशास गांधार हें प्राचीन नांव आहे. या भागांत विहार, स्तूप व प्रतिमा असंख्य सांपडतात. त्यांना गांधारशिल्प हें नाव आहे. या शिल्पाची कालमर्यादा पहिल्या पांच ख्रिस्ती शतकांची आहे. या शिल्पावर ग्रीक, रोमन व ख्रिस्ती शिल्पपद्ध-तींची मोठी छाप आहे. यांतील शिल्पप्रतिमांमध्यें गौतमबुद्धाची प्रतिमा फार महत्त्वाची व अभ्यसनीय आहे. यांतील पोषाख आणि प्रभावलय हीं ग्रीक वळणाचीं निःसंशय दिसतात. ब्रह्मा, शक्र, वज्रपाणि, मार, सरस्वती, नाग लोक, इ. च्या प्रतिमा गांधारशिल्पांत ज्या दिसतात त्या सर्वांत पाश्चात्य वळण स्पष्ट ओळखूं येतें. राजे लोक, स्त्री-पुरुष, सैन्य यांच्या पेहरावांत हिंदु-ग्रीक पद्धतींचें मिश्रण दिसेल. बुद्धनिर्वाणाचीं शिल्पें फार असून तीं गमतीदार वाटतात. बौद्धकथांतील प्रसंग शिल्पांत काढलेले आढळतात. या गांधार शिल्पाचें वळण चीन, जपान व तिबेट यांमधील बौद्ध शिल्पांतूनहि दृग्गोचर होतें. उत्तरकालीन भार-तीय शिल्पाचा उगम या गांधारपद्धतींत आहे यांत शंका नाहीं.

दाक्षिणात्य शिल्पांत अगस्तीला पहिलें स्थान आहे. अगस्तीनें अनेक शास्त्रांची शिकवण या द्राविड प्रदेशांत दिल्यामुळें त्याचें नाव प्रत्येक ठिकाणीं आरंभीं घेण्यांत येतें. अगस्तीच्या नंतर कश्यप, मय, नग्नजित्, जय, परजय आणि विजय या मूर्ति-शिल्पाच्या अध्वर्यूंना स्थान द्यावें लागतें. प्रथम दक्षिणेंत शैवकला वाढीस लागली. वेरूळ व मामल्लपुरम् येथील शैव देवालयें महत्त्वाचीं आहेत. चोल राजांनीं वास्तु आणि मूर्ति-शिल्पकलेला प्रोत्साहन दिलें. देवालयांतील उत्सव-मूर्ती फार सुंदर असून कलाप्रतिमा म्हणूनहि भक्तांना आनंदित करतात. देवांना दान केलेल्या दीपलक्ष्मी इ. स. १ ल्या शतका-पासूनच्या उपलब्ध आहेत. या द्राविड पद्धतीच्या पंचलोहाच्या मूर्ती कलाकौशल्याचे उत्कृष्ट नमुनेच होत.

दक्षिणेंतील शिल्पकर्म हें अगदीं शास्त्रशुद्ध व नियमबद्ध असतें. यासंबंधीं महत्त्वाचे ग्रंथ आहेत. मूर्तींतील वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे अंगविक्षेप होत. दुसरें वैशिष्ट्य म्हणजे हातां-पायांची ठेवण. ही इतरत्र आढळत नाहीं. वरदहस्त हा देव-शिल्पांतील विशेष होय. मूर्तींच्या अंगावरील दागदागिनेहि मोठ्या कौशल्यानें बनविलेले आढळतील. शिवाचें नटराज स्वरूप हें दक्षिणेंतील आवडतें ध्यान आहे. दक्षिण भारतांतील स्त्री-प्रतिमांत एक प्रकारचें निराळेंच वैशिष्ट्य आहे. तें उत्तर हिंदुस्थानांतल्या मूर्तींत दिसणार नाहीं. धातुमूर्ती या आठव्या ते पंधराव्या शतकांपर्यंतच ओतल्या गेल्या असाव्यात. पाषाण-मूर्तिशिल्पकला शिखरास पोंचलेली मदुरेंतील देवालयांत दिसेल. बेलूर, हळेबीड, सोमनाथ, वगैरे देवालयांवरील मूर्ती पाहून मन थक्क होऊन जातें. गोमटेश्वरासारख्या प्रचंड मूर्तीपासून अगदीं नखाएवढ्या मूर्तीपर्यंत सर्व प्रकार या शिल्पांत दिसतील.

आज भारतांतील अर्वाचीन मूर्तिकला पाश्चात्य वळणाची आहे. शिल्पकर्म-विद्यालयांतून ग्रीको-रोमन पुतळ्यांचें अनुकरण शिकवितात. इकडे आपले देशी कारागीर ओबडधोबड मूर्ती करून देवळांत बसविण्यास देतात. प्राचीन भारतीय मूर्तिशिल्प अभ्यास-ण्यास व सुधारण्यास पुढें येणारे कलावंत फार थोडे सांपडतील.

**मूळव्याध**—गुदद्वाराच्या जवळपासच्या शिरा फुगल्या असतां ही व्याधि होते. हा रोग तीव्र नसेल तर तो अगदीं सामान्य स्वरूपाचा असतो. परंतु याचें स्वरूप तीव्र असल्यास अतिशय वेदना होतात व अस्वस्थता उत्पन्न होते आणि ती दूर करण्याकरितां शस्त्रक्रिया करावी लागते. या रोगाचीं मूळ कारणें बैठा व्यवसाय, मद्यासक्ति व कायमचा अवष्टंभ हीं होत. गुदद्वाराशीं या रोगामध्यें मोड येतात. ते आंतल्या बाजूस किंवा बाहेरच्या बाजूस किंवा दोन्ही बाजूंस असतात. जेव्हां हे मोड आंतील बाजूस असतात तेव्हां बहुधा शौचास रक्त होतें व स्राव अधिकाधिक व तीव्र होत जातो. या रोगाचीं कारणें दूर करून बद्धकोष्ठावर उपाय केल्यास हा रोग वाढत नाहीं. व्यायाम-हि उपयुक्त आहे. तीव्र स्वरूपांत मात्र शस्त्रक्रिया आवश्यक आहे.

**मूळराज सोळंकी** (राज्य. सन ९६०–९९५)—गुज-राथेंत सोळंकी राज्याची प्रस्थापना करणारा एक शूर पुरुष. वि. सं. १०४३ (सन ९८७) च्या दानपत्रांत यानें स्वतःला महाराजाधिराज श्रीराज याचा पुत्र असें म्हटलें आहे. गुजराथें-तील अनहिलवाड येथें राज्य करणारा चावडा वंशांतील राजा सामंतसिंह याचा हा भाचा. सन ९६० मध्यें यानें आपल्या मामास ठार करून त्याचें राज्य बळकावलें. यानंतर गुजराथच्या उत्तरेस आपलें राज्य वाढविण्याचें धोरण यानें आंखलें. अबूच्या धरणीवराह परमारावरील स्वारीच्या वेळीं यास जोधपूर राज्यां-तील हथुंडीच्या राष्ट्रकूट धवल राजानें साहाय्य केलें. पुढें जोधपूरच्या परमारांचेंहि राज्य यानें आपल्या ताब्यांत घेतलें. तेव्हां सांभरच्या विग्रहराज (वीसलदेव) चौहानानें याजवर स्वारी करून यास कच्छांतील कंथदुर्ग (कंथकोट) येथें पळून

जाण्यास भाग पाडलें. यानें तैलप सोळंकीच्या बारप या सेनापतीस युद्धांत ठार केलें. यानंतर याजवर काठेवाडांतील सोरठच्या चूडासमा ( यादव ) महरिपु राजावर स्वारी करण्याचा प्रसंग आला. महरिपूनें आपला मित्र कच्छचा जाडेजा यादव याच्या साहाय्यानें यास तोंड दिलें. परंतु या लढाईंत महरिपू याच्या ताब्यांत सांपडला व जाडेजा यादव म्हणजे राजा लाखा फुलाणी हा मारला गेला. यानें सिद्धपूर येथें रुद्रमहालय नांवाच्या शिवालयाची स्थापना करून त्याची प्रतिष्ठापना कनोज-ठाणेश्वरहून विद्वान् ब्राह्मण बोलावून त्यांच्याकडून करवली. या ब्राह्मणांच्या उपजीविकेकरितां कांहीं गांवें इनाम देऊन त्यांना यानें तेथेंच स्थायिक केलें. याच्या पूर्वीची माहिती अद्यापि मिळूं शकत नाहीं. याच्या पित्याचें नांव राजि असें होतें.

प्रबंधचिंतामणि व कुमारपालप्रबंध या ग्रंथांवरून असें दिसतें कीं, कान्यकुब्ज देशांतील कल्याणकटक नगरचा राजा भूदेवा ( भूयगडदेवा )चा वंशज मुंजाळदेव याचे तीन पुत्र राज, बीज, व दंडक यांनीं चावडा वंशांतील शेवटचा राजा भूयडदेव ( सामंतसिंह ) याची अश्वविद्यानिपुणता पाहून आपली बहीण लिलादेवी त्यास दिली. पुढें लिलादेवी गर्भार असतांना मृत्यु पावली व तिचें पोट चिरून मूल बाहेर काढण्यांत आलें. या मुलाचा मूळ नक्षत्रावर व पुरते दिवस भरण्यापूर्वी जन्म झाल्यानें यास 'मूळराज' म्हणूं लागले.

**मृगजल**—हा एक दार्शनिक भास आहे. वेगवेगळ्या घनतेच्या वातावरणांतून प्रकाशकिरण जाऊं लागले असतां ते वांकडे होतात व उलटा देखावा दिसतो. सहारासारख्या वाळवंटांत एखाद्या झाडापासून निघणारा प्रकाशकिरण जमिनीकडे येत असतां वांकडा होत वर पाहणाराकडे पोंचतो व याचा परिणाम म्हणजे पाहणाराला खालीं शेंडा व वर बुंधा असें झाड दिसूं लागतें—जणुं पाण्यांत झाडाचें प्रतिबिंबच पडलें आहे. बर्फाच्या पाण्यावर वरचे किरण इतके खालीं वांकडे होत जातात कीं, पाण्यावरची एखादी होडी आकाशांत उलटलेली दिसेल. अगदीं रखरखीत किंवा अगदीं थंड प्रदेशांत हवा शांत असली म्हणजे असे चमत्कार दिसतात.

**मृगशृंग भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें औषध हृदयाला शक्तिदायक असें आहे. क्षयाच्या प्रथमावस्थेंत या औषधाचा चांगला उपयोग होतो. बारीक ताप येणें, थोडासा खोकला असणें, हृदयांतून कळा निघणें, हृदय अशक्त असणें, अतिशय मानसिक परिश्रम होणें, हृदयाची धडधड होणें, इत्यादि विकारांवर हें औषध उत्कृष्ट आहे. १ ते ३ गुंजा मध किंवा दूध-खडीसाखर यांबरोबर घेतात.

**मृतसंजीवनी रस**—एक आयुर्वेदीय रसायन. ४ पारा, ३ जेपाळ, २ टांकणखार, १ बचनाग, ह्या सर्वांची सूक्ष्म कज्जली करून ठेवावी म्हणजे ही मात्रा तयार झाली. ही आल्याच्या रसांत अथवा त्रिकटु (सुंठ, मिरे, पिंपळी), चित्रक आणि सैंधव ह्यांच्याबरोबर द्यावी आणि कापूर व चंदन यांची उटी लावावी. पथ्यास ताकभात. या रसायनाच्या सेवनानें सन्निपातज्वर, विषमज्वर, आमवात, वातशूल, गुल्म, प्लीहा, जलोदर, शीतपूर्व आणि दाहपूर्व असा विषमज्वर, अग्निमांद्य, इत्यादि रोग दूर होतात. याच रसायनाचा दुसरा प्रकार असा आहे कीं, १ पारा आणि २ गंधक या दोहोंची कज्जली, १ अभ्रक भस्म, १ लोहभस्म, १ ताम्रभस्म, १ बचनाग, १ हरताळ, १ कंकुष्ट, १ मनशीळ, १ हिंगूळ, १ चित्रक, १ अतिविष, १ त्रिकटु, ३ सुवर्णमाक्षिक भस्म, १ भांग, १ निर्गुंडी, १ तांदुळजा या सर्व औषधांचें चूर्ण आल्याच्या रसांत तीन दिवस मर्दन करून नंतर निर्गुंडी, विजया, निंबू आणि करंजाची साल यांच्या रसांत निरनिराळा एकेक दिवस खल करावा. नंतर तें कांचेच्या शिशींत घालून वालुकायंत्रांत दोन प्रहर मध्यम अग्नि द्यावा. आपोआप थंड झाल्यावर काढून पुनः आल्याच्या रसांत एक दिवस खलून त्याच्या गुंजाप्रमाणें मात्रा कराव्या. या मात्रेच्या सेवनानें अंतकसन्निपात दूर होतो. पथ्यास दूधभात भक्षावा.

**मृतसमुद्र**—( डेड सी ). हा समुद्र ख्रिस्ती धर्मग्रंथांत 'सॉल्ट सी' (क्षार समुद्र), 'सी ऑफ दि प्लेन्स' (मैदानांतील समुद्र), व 'ईस्ट सी' ( पूर्व समुद्र ) या नांवांनीं उल्लेखिलेला असून तो पॅलेस्टाइन प्रांताच्या दक्षिण सरहद्दीजवळ आहे. या समुद्राचा उत्तर किनारा जेरुशलेमच्या पूर्वेस २५ मैलांवर आहे. या समुद्राची लांबी ४६ मैल व रुंदी ९ ते १० मैल आहे. हा समुद्र खोलगट प्रदेशांत असून त्या प्रदेशांतून जॉर्डन नदी वाहते आणि ती या समुद्राच्या उत्तर बाजूस येऊन मिळते. या समुद्राला आणखीहि लहान लहान नद्या येऊन मिळतात. या समुद्राभोंवतालचा प्रदेश अगदीं निर्जन असून, तेथें चुनखडीचे खडक, वाळूचीं मैदानें, मिठाच्या टेंकड्या, गंधक, ज्वालामुखींतील स्फोटकद्रव्य यांनीं युक्त आहे. या समुद्राचें पाणी दुर्गंधियुक्त व खारट आहे. या समुद्राच्या उत्तरेकडील भागाची खोली १३०८ फूट, दक्षिणेकडील भागाची खोली १२ फूट, आणि इतर ठिकाणीं कांठानजीक ३ फूट आहे. या समुद्रांत कोणतेच प्राणी जगत नाहींत. या समुद्रांत लहान लहान बोटी चालतात.

**मृत्तिका(पात्र)लेखन**—बौद्ध लोक शिलांप्रमाणेंच विटांवर व मृत्तिकापात्रांवरहि आपली धर्मसंबंधीं सूत्रें खोदवून ठेवीत असत. मथुरेच्या पदार्थसंग्रहालयांत अजमासें ख्रिस्तपूर्व पहिल्या

शतकातील लिपीच्या अशा कित्येक विटा ठेविल्या आहेत. ह्या विटा पूर्वी भिंतींत ओळीनें एकापुढे एक लाविलेल्या असतील. इसवी सनाच्या तिसऱ्या-चौथ्या शतकांतील अशाच प्रकारच्या दुसऱ्या कांहीं विटा गोरखपूर जिल्ह्यांत गोपाळपूर गांवीं व नैनिताल जिल्ह्याच्या तराई परगण्यात काशीपूरजवळील उज्जैन नांवाच्या किल्ल्यांत सांपडल्या आहेत. मृत्तिकापात्रांवरील लेख दोन प्रकारचे असतात. यांतील पहिला प्रकार म्हटला म्हणजे खोदविलेल्या अक्षरांचे मामुली लेख होत. परंतु मुद्रिकांचे ठसे उमटविलेले जे लेख असतात त्यांतील अक्षरें उठावदार असतात. हे सर्व लेख विटा किंवा मृत्तिकापात्रें भट्टीत घालून भाजण्यापूर्वीच त्यांवर काढलेले असतात.

निनेव्हे येथील असुर बनिपालाच्या ग्रंथालयांतील पुस्तकें म्हणजे अक्षरें कोरलेल्या विटा होत.

**मृत्यु**—जीवाचा अंत. ऋग्वेदांत वारंवार याविषयीं उल्लेख आलेला आहे आणि नंतर भीतिदायक स्थिति अशा अर्थी हा शब्द योजिला आहे. मृत्यूचे प्रकार १०१ आहेत. पैकीं वृद्ध होऊन मरणें हें स्वाभाविक आहे. बाकीचे शंभर प्रकार टाळतां येण्यासारखे आहेत. वृद्ध होण्याच्या अगोदर (पुरा जरसः) मरण येणें म्हणजे अकालीं (पुरा आयुषः) मरणें होय. आयुष्याची सर्वसाधारण मर्यादा शंभर वर्षें असल्याचे वैदिक वाङ्मयांत उल्लेख आहेत. शारीरिक शक्ति गेल्यामुळें वृद्धपणांत होणाऱ्या हालचालींचीहि स्पष्ट कल्पना दाखविली गेली आहे. अथर्ववेदांत मृत्यु टाळण्याबद्दल आणि आयुष्य वाढविण्याच्या प्रकाराबद्दल पुष्कळ मंत्र आहेत. मृतशरीराची विल्हेवाट लावण्याच्या दोन तऱ्हा होत्या. एक पुरणें व दुसरी दहन करणें. वैदिक काळांत या दोनहि तऱ्हा ग्रीक देशांतल्याप्रमाणें प्रचलित होत्या. परंतु पुरण्याच्या पद्धतीविषयीं विशेष पसंती दर्शविली जात नव्हती. दग्ध केलेल्या अगर अदग्ध अशा मृतांचीं हाडें पुरून त्यावर छत्र्या (श्मशान) बांधीत. या छत्र्या कशा तऱ्हेच्या असाव्या याबद्दल शतपथ ब्राह्मणांत बरेंच विवेचन आहे. वेदकालीन आर्य लोकांस मृत्यूनंतरचें जीवन म्हणजे या जगांतील आयुष्याची पुनरावृत्तिच असें वाटत असे. मनुष्य मृत्यूनंतर सर्व देहासहित (सर्वतनुः सांगाः) स्वर्गांत जातो व पृथ्वीवरचीं सर्व सुखें भोगतो अशी त्यांची समजूत असे. ऋग्वेदांत वाईट कृत्य करणारांचे मृत्यूनंतर हाल होतील असा संदिग्ध निर्देश आहे. परंतु अथर्ववेदांत आणि शतपथ ब्राह्मणांत मात्र शिक्षेदाखल नरकाची कल्पना आली आहे. त्या ग्रंथांतच असें म्हटलें आहे कीं, या जन्मांतील सत्कृत्यें अगर दुष्कृत्यें मृत्यूनंतर स्वर्गप्राप्तीस अगर नरकवासास कारण होतात. पुढील पुराणवाङ्मयांतून तर मृत्यूनंतर मिळणाऱ्या स्वर्ग-नरकप्राप्तीचीं वर्णनें भरपूर आहेत.

ऋग्वेदमंत्ररचनाकालीं दहन करणें व जमिनींत पुरणें या दोन्ही प्रकारांनीं प्रेताची व्यवस्था करण्याची वहिवाट रूढ होती. अग्नीच्या धुराबरोबर मृत मनुष्य दिव्य लोकांत जातो अशी त्या वेळची समजूत होती. मृत मनुष्याबरोबर वस्त्रें-भूषणें दिलीं जात. पतीच्या शवाबरोबर त्याच्या पत्नीला व शस्त्रास्त्रांना जाळण्याची पद्धत होती असें दिसतें. मृताचा आत्मा अमर्त्य आहे व मरणोत्तर स्थिति ही देहयुक्त स्थिति असते अशी समजूत होती. आत्मा शरीरांतर करतो ही कल्पना केवळ बीजरूपानेंच ऋग्वेदांत सांपडते. मृताचा आत्मा शाश्वत प्रकारच्या लोकांत जातो; आत्मा द्युलोकांत गमन करतो, तेव्हां तो आपल्या घरीं परत येतो अशी तेथें कल्पना आहे.

पितर आणि यम राहतात ती जागा आकाशाच्या मध्यभागीं आहे; कडक तपश्चर्या करणारे, लढाईत प्राण देणारे वीर व यज्ञांत उदारपणानें दक्षिणा देणारे दाते यांना स्वर्ग मिळतो; स्वर्गामध्यें मृताला आनंदमय जीवनक्रम लाभतो.

इहलोकीं केलेल्या दुष्कर्माबद्दल पुढच्या लोकीं शिक्षा मिळते ही कल्पना ब्राह्मणकालापूर्वी स्पष्टपणें व्यक्त झालेली नाहीं. नरक म्हणजे पृथ्वीखालीं असणारा अंधकाराचा खड्डा आहे अशी कांहीं तरी तत्कालीनांची कल्पना असावी. नरकांत यातना भोगण्यास जाण्यासंबंधीं कल्पना भारतांत उत्तरकालीं उद्भवली.

जे पुण्यशील मृत लोक तिसऱ्या स्वर्गांत असतात त्यांना पितर हें नांव आहे. पितरांचें अन्न म्हणजे त्यांना दिलेले बली होत. पितर हे अमर आहेत. देवांचा मार्ग व पितराचा मार्ग हे वेगळे आहेत. सुखसंपन्न मृतांचा मुख्य यम होय. त्याला मृतांचा राजा म्हटलें आहे, देव म्हटलें नाहीं. ऋग्वेदकालीं यमाची थोडीफार भीतिच वाटत असावी. (यम पाहा.)

**मरणोत्तर स्थिति**—आधुनिक काळांत चमत्कार संशोधन (सायकिकल रीसर्च), परलोकविद्या व थिऑसफी या तीन क्षेत्रांत या विषयाचें संशोधन झालेलें असून मृत्यूनंतर जीवाचें अस्तित्व शाबूत असतें, असें दाखविणारा पुष्कळ पुरावा पहिल्या दोन क्षेत्रांत उपलब्ध झाला आहे. थिऑसफीच्या संशोधनांत मरणोत्तर स्थितीची तपशीलवार माहिती संपादित झालेली आहे. माणसाला जसा दृश्य देह असतो तसे विरळ द्रव्याचे अतएव अदृश्य असे दुसरे कित्येक देह असतात, असे हिंदु धर्म शिकवितो. थिऑसफीच्या संशोधनांत हे देह अनुभवास आलेले आहेत. जिवंतपणीं हे सारे दृश्य व अदृश्य देह एकास एक जोडलेले असून त्यांचें गांठोडें बनलेलें असतें, असें म्हटलें तर चालेल. या गांठोड्यांतून मृत्यूच्या क्षणीं दृश्य देह बाहेर पडतो व त्यामुळें तो मरतो.

कांहीं तासांनीं त्या गांठोड्यांतील दुसरी एक चीज ( प्राणमय कोष ) बाहेर पडून ती वितळून नाहींशी होते. कित्येक वर्षांनीं त्या गांठोड्यांतील आणखी एक चीज ( वासनादेह ) बाहेर पडून वितळून नाहींशी होते. एकेक चीज अशी क्रमानें नाहींशी झाली कीं माणसाची जाणीव, त्याचें मन त्या चिजांतून बाहेर निघून गांठोड्यांतील उरलेल्या चिजांपैकीं एकांत येतें. हें होत असतांना माणसाच्या मनांत, परिस्थितींत मोठें स्थित्यंतर होत असतें, त्या वेळीं मृत माणूस वेगळ्या भूमिकेवर गेला, वेगळ्या लोकांत गेला असें आपण म्हणतों. अशा रीतीनें मरणोत्तर स्थितींचे अनेक टप्पे होत असतात. एका टप्प्यास नरक म्हणतात, दुसऱ्यास स्वर्ग म्हणतात, वगैरे माहिती थिऑसफीय संशोधनांत मिळालेली आहे.

परलोकविद्या व चमत्कारसंशोधन या दोन क्षेत्रांत कित्येक शास्त्रज्ञांनीं संशोधन करून मृत्यूनंतर जीवास अस्तित्व असतें असें दर्शविणारा पुष्कळ पुरावा गोळा केलेला आहे. त्याचे पुढील प्रकार होऊं शकतात : ( १ ) सत्यमूलक आभास ( व्हेरिडिकल हॅल्युसिनेशन ) म्हणजे मृत माणसानें जिवंत माणसाच्या स्वप्नांत येऊन कांहीं माहिती सांगावी व ती नंतर खरी ठरावी अशीं उदाहरणें. ( २ ) विविध मनस्कता ( मल्टिपल पर्सनॅलिटी ) म्हणजे माणसाच्या मनांत स्थित्यंतर होऊन ( अथवा त्याच्या अंगांत येऊन ) मी अमुक एक मृत मनुष्य आहें असें त्यानें सांगावें व त्या स्थितींत त्यानें सांगितलेल्या माहितीवरून त्या मृत माणसाची ओळख पटावी अशीं उदाहरणें. ( ३ ) मृतांचे फोटोग्राफ. कॅमेऱ्यासमोर फक्त एक माणूस असतांना त्याच्या सन्निध दुसऱ्या एखाद्या मृत व्यक्तीचा फोटोग्राफ येणें व त्या फोटोवरून त्या मृत व्यक्तीची ओळख पटणें यांचीं उदाहरणें. ( ४ ) निर्जीव वस्तूंची सुबुद्धपणें आपोआप हालचाल झाल्याचीं उदाहरणें. ( ५ ) भूत अथवा जेथें कांहीं नाहीं अशा ठिकाणीं द्रव्य गोळा होऊन हळूहळू त्यांतून एखाद्या माणसाची आकृति प्रकट झाल्याचीं उदाहरणें ( एक्टोप्लॅझम ). ह्या सर्व पुराव्याचा साकल्यानें विचार करून जीवास मरणोत्तर अस्तित्व असतें. असें कांहीं शास्त्रज्ञांनीं ठरविलें आहे; पण बऱ्याच इतर शास्त्रज्ञांस हा पुरावा अद्याप पुरेसा वाटत नाहीं व कांहीं शास्त्रज्ञांस तर तो तितकासा श्रद्धेयहि वाटत नाहीं.

**मृत्युंजय**—एक आयुर्वेदीय औषध. यांत बचनाग, मिरे, टंकणलाही, पिंपळी, गंधक व हिंगूळ, हीं मुख्य औषधें असून आल्याच्या रसांत खल करतात. पडसें, ज्वर, घसा सुजणें, तोंड चिकट होणें, अंग अतिशय जड होणें, डोकें अतिशय दुखणें, ओकाऱ्या होणें, इत्यादि विकारावर या औषधाचा चांगला उपयोग होतो. फुफ्फुसाचे विकार, छातींतून घरघर असा आवाज होणें, बेडका न पडणें, इत्यादि लक्षणें असतांना हें औषध दिल्यानें फार फायदा होतो. १ ते २ गुंजा आल्याचा रस, मध, तुळशीचा रस किंवा आर्द्रकावलेह यांबरोबर देतात.

**मृत्युन्यायाधीश**—( कॉरोनर ). इंग्लंडमध्यें हा एक अधिकारी असून त्याचें मुख्य काम कोणी मनुष्य आकस्मिक मरण पावला किंवा मारला गेला, तर त्याच्या मरणाला काय कारण झालें त्याबद्दल चौकशी करणें हें असतें. १९२६ सालीं ' दि कॉरोनर्स अॅमेंडमेंट अॅक्ट ' हा कायदा मंजूर होऊन असें ठरविण्यांत आलें कीं, अशा प्रकारच्या चौकशीच्या कांहीं खटल्यांमध्यें ज्यूरी न बोलावतां चौकशी करावी. ज्यूरी बोलावून चौकशी झाल्यावर जर ज्यूरीनें असा निर्णय दिला कीं, खून किंवा मनुष्यवध या प्रकारचा गुन्हा झाला आहे; तर त्या निकालानुसार कॉरोनरनें वॉरंट काढून अपराध्याला कैद करावा आणि कैदेंत ठेवावा.

हिंदुस्थानांत १८७१ सालीं ' दि कॉरोनर्स अॅक्ट ' होऊन कलकत्ता व मुंबई या दोन शहरांतच फक्त कॉरोनर नेमण्याचें ठरलें ( कलम ३ ). कॉरोनरची नेमणूक प्रांतिक सरकार करतें व तो सरकारी पगारी अधिकारी असतो. एखादा अपघातानें मृत्यु झाल्यास, किंवा खून किंवा आत्महत्या किंवा कोणत्याहि अज्ञात कारणानें मृत्यु झाल्यास त्या मृत्यूच्या कारणाची चौकशी ज्यूरीच्या मदतीनें आणि साक्षी-पुरावा घेऊन करणें, व मृत्यूचें कारण आणि त्याबाबत गुन्हेगार इसम तपास लागल्यास कोण आहे तें नमूद करून निकाल लिहिणें, आणि त्या निकालाची प्रत पोलिस कमिशनरकडे पाठवणें, आणि आरोपीला वॉरंटानें पकडून मॅजिस्ट्रेटकडे पाठवणें हीं कामें कॉरोनर करतो.

**मृत्युपत्र**—( विल, टेस्टॅमेंट ). कायद्यांत याचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या इसमानें आपल्या इस्टेटीची व्यवस्था आपल्या मृत्यूनंतर कशी केली जावी याबद्दल कायदेशीर केलेलें निवेदन ( डिक्लरेशन ). इंग्लंडांत, ब्रिटिश वसाहतींत व संस्थानांत असा कायदा आहे कीं, स्थावर किंवा जंगम मिळकतीचें मृत्युपत्र लेखी असलें पाहिजे आणि त्यावर मृत्युपत्र करणारानें स्वतः केलेली, किंवा त्याच्या सांगण्यावरून त्याच्या समक्ष दुसऱ्यानें केलेली सही असली पाहिजे. त्याला अपवाद एखादा सैनिक, नाविक, किंवा वैमानिक यांचें मृत्युपत्र लेखी नसेल, त्यानें तोंडीं सांगितलेलें असेल, तरी तें कायदेशीर होय. लेखी मृत्युपत्रावर तें करणारानें आपली सही दोन किंवा अधिक साक्षीदारांसमक्ष केलेली असली पाहिजे व त्यावर साक्षीदारांच्या सह्या असल्या पाहिजेत. याप्रमाणें केलेलें मृत्युपत्र करणारानें तें फाडून टाकलें, जाळून टाकलें, किंवा शेरा मारून रद्द केलें, किंवा दुसरें

मृत्युपत्र करून त्यांत पूर्वीचें रद्द केल्याचा उलेख केला, किंवा त्यांत विरोधी मजकूर लिहिला तर अगोदर केलेलें मृत्युपत्र रद्द होतें. मृत्युपत्र केल्यावर विवाह केला तर मृत्युपत्र रद्द होतें.

मृत्युपत्र-व्यवस्थापक—याचा अर्थ मृत्युपत्र करून ठेवणाऱ्या इसमानें त्याच्या मृत्यूनंतर त्या मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें मयताच्या इस्टेटीची व्यवस्था करण्याकरितां नेमून ठेवलेला जो इसम तो 'एक्झीक्युटर' म्हणजे मृत्युपत्राचा व्यवस्थापक होय. वयांत आलेल्या व बुद्धीला कसला विकार नसलेल्या कोणाहि इसमाला असा व्यवस्थापक नेमतां येतें. इंग्लंडांत व हिंदुस्थानांत यासंबंधींचा कायदा सारखा आहे ('इंडियन सक्सेशन ॲक्ट' पाहा).

मृत्युपत्र-पुरवणी—मृत्युपत्राला मागाहून जोडलेल्या पुरवणीला कायद्यामध्यें 'कॉडिसिल' हें नांव आहे. अशी पुरवणी कायद्यानें मृत्युपत्राचाच भाग मानतात आणि अशा पुरवणींत मूळ मृत्युपत्रांतील संदिग्ध किंवा अपुऱ्या मजकुराबद्दल अधिक खुलासा करणें, किंवा मूळ मृत्युपत्रांत कांहीं बदल करणें, किंवा मूळच्या मजकुरांत अधिक भर घालणें, किंवा मूळच्या मजकुरांतील कांहीं भाग अजीबात काढून टाकणें, इतक्या प्रकारांनीं फेरबदल करण्यास कायद्याची परवानगी असते. अशी पुरवणी मूळच्या मृत्युपत्राला अधिक कागद जोडून लिहिली तरी चालते, किंवा अशी पुरवणी स्वतंत्रपणें लिहून निराळ्या ठिकाणीं ठेवली तरी चालते. मृत्युपत्र व त्याची पुरवणी यांसंबंधीं कायद्याचीं कलमें दोघांनाहि तींच लागू असतात आणि मृत्युपत्र करणाराची सही व इतर साक्षीदारांच्या सह्या कोर्टांत शाबीत करण्याबद्दलचीं कलमें दोन्ही बाबतींत तींच असतात. कोणाहि माणसाला एक मृत्युपत्र केल्यानंतर त्याला एक किंवा अनेक पुरवण्या त्याच्या मर्जीप्रमाणें लिहून ठेवतां येतात आणि त्या पुरवण्यांतील मजकूर परस्परविरुद्ध नसेल तर सर्व पुरवण्यांतील मजकूर कायदेशीर मानला जातो. 'दि इंडियन सक्सेशन ॲक्ट', कलमें २।५९।७० यांत वरीलप्रमाणें कायदा आहे.

**मृदुकाय प्राणिवर्ग**—(मोल्युस्का). हा एक लिबलिबित शरीराच्या प्राण्यांचा वर्ग असून त्यांमध्यें गोगलगाई, कालवें, वगैरे येतात. या प्राण्यांचे सामान्यतः पांच वर्ग करण्यांत येतात: १. शीर्षपाद (सेफॅलोपोडा)—डोक्यानें चालणारे प्राणी. हे सर्व समुद्रावर आढळतात. २. उदरपादप्राणी (गॅस्टेरोपोडा)—गोगलगाय, पिकळी, वगैरे. ३. शिंपले (लामेलीब्रांचीआटा). ४. सुळेशंख (स्कॅफोपोडा). ५. प्राथमिक मृदुकाय (ॲफीन्युरा).

या वर्गांत कांहीं जलचर व कांहीं स्थलचर असतात. बहुतेक प्राण्यांच्या अंगावर कवच असतें. या प्राण्यांत कांहीं लिंगभेद नसून दोन्ही लिंगें-इंद्रियें एकाच प्राण्यांत असतात.

**मेकॉले, थॉमस बॅबिंग्टन** (१८००-१८५९)—एक इंग्रज इतिहासकार, निबंधकार व मुत्सद्दी. हा कॉलेजपासूनच फार हुशार होता. १८२६ मध्यें वकिली करूं लागला व १८३० मध्यें पार्लमेंटचा सभासद झाला. नंतर कलकत्त्यास हिंदुस्थान सरकारचा कायदेमंत्री म्हणून राहिला. तो शिक्षण आणि मुद्रणस्वातंत्र्य यांचा मोठा पुरस्कर्ता असे. हिंदुस्थानांत पाश्चात्य पद्धतीनें व इंग्रजी माध्यम ठेवून शिक्षण देण्याची कल्पना त्याचीच. इंग्लंडांत मेल्बोर्नें मंत्रिमंडळांत तो युद्धखात्याचा १८३९-१८४१ पर्यंत चिटणीस होता. त्याची ख्याति विशेषतः लेखक म्हणून आहे. त्यानें पांच भागांत जो इंग्लंडचा इतिहास लिहिला त्यामुळें तो फार प्रसिद्धीस आला. १८५७ त त्याला बॅरन करण्यांत आलें. त्याची लेखनशैली फार उत्कृष्ट व मनोवेधक असे.

**मेक्सिको**—उत्तर अमेरिका खंडांतील अगदीं दक्षिणेचा देश. याच्या उत्तरेस संयुक्त संस्थानें व दक्षिणेस मध्य अमेरिका आहे. क्षेत्रफळ ७,६३,९४४ चौ. मैल. लोकसंख्या १,९४,७३,७४१. मेक्सिको शहर हें राजधानीचें ठिकाण आहे. मेक्सिको देश हाहि यू. एस्. ए. अमेरिकेप्रमाणेंच एक संस्थानांचा संघ आहे व त्यांत २८ संस्थानें आहेत व ३ इतर विभाग आहेत. मध्यवर्ती प्रदेश हा उंचावरचें पठार असून हवामान समशीतोष्ण व आल्हादकारक असतें. उंची ५००० ते ८००० फूट आहे. सिएरा माद्रे नांवाचा पर्वत पॅसिफिक महासागराच्या बाजूनें दक्षिणोत्तर पसरला आहे. त्यांत कांहीं सुप्त ज्वालामुखी आहेत. कॅलिफोर्नियाचें आखात आंत घरेंच घुसल्यामुळें खालचा (लोअर) कॅलिफोर्निया ही एक द्वीपकल्पाची चिंचोळी पट्टी तयार झाली आहे. हा लोअर कॅलिफोर्निया सुद्धां मेक्सिकोंतच समाविष्ट होतो.

मेक्सिकोमधील लोकांचा मुख्य धंदा म्हणजे शेती करणें व जनावरें बाळगणें. अद्याप पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीनेंच बहुधा हे धंदे होतात. गहूं, मका, तांदूळ, कापूस, तंबाखू, बटाटे, कॉफी, ऊंस, वगैरे नानाविध पिकें, फळफळावळ, भाजीपाला व इतर वनस्पति-पदार्थ विपुल निघतात. खनिज उत्पादनांत सोनें, रुपें, तांबें, शिसें, जस्त, कोळसा, पारा, पेट्रोलियम, वगैरे अनेक पदार्थांचा समावेश होतो. मेक्सिकोंतील राष्ट्रीय विद्यापीठ १५५३ त स्थापन झालेलें आहे.

कोलंबसाच्या काळापूर्वी मेक्सिकोमध्यें दोन फार मोठाल्या संस्कृती नांदल्या: एक मय संस्कृति व दुसरी अझटेक संस्कृति. (या दोन्ही संस्कृतींवर स्वतंत्र लेख दिले आहेत. अझटेक, मयलोक पाहा). क्यूबामधून गेलेल्या स्पॅनिश प्रवाशांनीं प्रथम मेक्सिकोचा शोध लावला व १५२१ मध्यें तो स्पेननें आपल्या

राज्यास जोडून टाकला. कोर्टेझ हा एक स्पॅनिश संशोधक होता. त्यानें मेक्सिकोचा विस्तार वाढवला.

येथील मूळचे रेड इंडियन लोक नाहींसे झालेले नाहींत. आजहि त्यांच्या कित्येक जाती विद्यमान आहेत. स्पॅनिश लोकांनीं त्यांचें आर्थिक रक्तशोषण केलें आणि त्याचे दुष्परिणामहि घडून आले. युरोपमध्यें फ्रेंच राज्यक्रांति झाल्यावर आणि नेपोलियननें स्पेनवर स्वारी केल्यावर मेक्सिकोमध्येंहि स्पॅनिश लोकांविरुद्ध उठावणी झाली. तींत आयतुरविदे हा प्रमुख होता व तो कांहीं काल मेक्सिकोचा बादशहा झाला. परंतु लोकसत्तावाद्यांनीं त्याचें उच्चाटन केलें. तथापि नित्याची यादवी व अंदाधुंदी सुरू झाली. क्षणाक्षणाला नवे नवे प्रमुख येऊं-जाऊं लागले. अमेरिके(यू. एस्. ए.)नें दडपण आणून बंडाळीचा कांहीं कालापुरता मोड केला. या प्रकरणांत मेक्सिको देशाला आपला बराच मुलूख सोडावा लागला. पुढेंहि अंतर्गत अव्यवस्था चालूच होती. फ्रान्सच्या मदतीनें पुन्हां नवी घडी जमविण्यांत आली व नवें लोकसत्ताक राज्य प्रेसिडेंट डिआझ याच्या अध्यक्षत्वाखालीं स्थापन झालें. नंतर मधून मधून शांतता नांदे. तथापि बंडें अजीबात थांबलीं नव्हतीं. मॅडेरो याच्या प्रमुखत्वाखालीं बंडखोर लोकांच्या बंडाळ्या चालू होत्या. क्रमानें ह्युएर्टा, करंझा, व्हिला व झपाट यांच्या आधिपत्याखालीं चार क्रांतियुद्धें होऊन नवीन सरकारें स्थापन झालीं व लय पावलीं.

१८३६ त टेक्सस स्वतंत्र झालें. पुढें यू. एस्. ए. नें मेक्सिकोचा कांहीं मुलूख जिंकून व विकतहि घेतला. १९१६ मध्यें युनायटेड स्टेट्सनें पुन्हां बंदोबस्ताकरितां आक्रमण केलें. १९२० ते २४ या काळांत ओबरगोन यानें एक लोकराज्य स्थापन करून चालवलें. त्याच्यामागून कॅलेस नांवाचा प्रेसिडेंट (१९२४–२८) आला. त्यानें शांतता-प्रस्थापनेचे बरेच प्रयत्न केले व बरेंचसें यशहि संपादन केलें. परंतु पुढें कॅथॉलिक चर्चशीं मतभेद उत्पन्न झाले व इतर कारणांनींहि स्वास्थ्य राहिलें नाहीं. १९३४ पावेतों ४-५ प्रेसिडेंट होऊन गेले व १९३४ मध्यें जुन्या पद्धतीचा नाश होऊन समाजसत्तावादी लोकांच्या हातीं धुरीणत्व गेलें. दुसऱ्या महायुद्धांत मेक्सिकोनें इटली-जर्मनीच्या विरुद्ध शस्त्र उचललें होतें.

मेक्सिकोची प्राचीन संस्कृति—मेक्सिको हें नांव मेक्सिका किंवा अझटेका या नांवाच्या लोकांवरून पडलें आहे. सोळाव्या शतकांत स्पॅनिश लोकांनीं तेथें प्रवेश केला. त्या वेळीं त्यांना तेथें एक सुधारलेलें राष्ट्र आढळलें. या राष्ट्राचें सैन्य, न्यायकोर्टें, तसेंच इतर राज्यकारभाराचीं खातीं आणि सुधारलेली शेतकी व इतर अनेक प्रकारच्या शिल्पकला चांगल्या स्थितींत होत्या. स्पॅनिश लोकांना विशेष आश्चर्याची गोष्ट आढळली ती अतिशय मोठाल्या दगडी इमारती ही होय. या इमारतींचें नक्षीकाम युरोपांतील तत्कालीन शिल्पकारांनीं तोंडांत बोट घालावें असें होतें. त्यामुळें मेक्सिकोंतील प्राचीन राष्ट्राची माहिती मिळवण्याचा अनेक संशोधकांनीं प्रयत्न केला आहे. मेक्सिकोंतील मूळच्या अझटेक व इतर भाषांचा युरोपांतील किंवा अमेरिकेच्या इतर भागांतील भाषांशीं मुळींच संबंध नाहीं. यावरून मेक्सिकोंतले मूळचे लोक फार फार काळापूर्वीं जेव्हां अमेरिका व आशिया हीं खंडें एकमेकांना जोडलेलीं होतीं तेव्हांपासूनच तेथें राहत असले पाहिजेत, असें अगदीं अलीकडील संशोधकांचें मत झालें आहे. तथापि मेक्सिकन लोकांची संस्कृति फार प्राचीन नसून ती अलीकडे आशियांतील व अमेरिकेंतील इतर राष्ट्रांबरोबरच्या परिचयामुळें तयार झाली आहे असें दिसतें. उदाहरणार्थ, राशींचीं नांवें, महिन्यांचीं नांवें व साठ वर्षांचें युग मोजण्याची पद्धति हीं मेक्सिकन लोकांनीं मोंगल, तिबेटी व चिनी लोकांतील उंदीर, बैल, वाघ, ससा, ड्रेगन (कल्पित सपक्ष सर्प), सर्प, घोडा, बोकड, माकड, कोंबडा, कुत्रा, डुक्कर, या बारा प्राण्यांच्या नांवांवरून घेतलीं आहेत. हिंदु लोकांतील चार युगांची कल्पना मेक्सिकन लोकांत आढळते. तसेंच ब्राह्मण व बौद्ध धर्मांतील नऊ लोक व नरक या कल्पनाहि मेक्सिकन लोकांच्या धर्मकल्पनांत आहेत.

मेक्सिकन राष्ट्राच्या इतिहासाची माहिती १२ व्या व १३ व्या शतकापासून मिळते, व त्यापूर्वींच्या कांहीं शतकांची त्रोटक दंतकथात्मक माहितीहि उपलब्ध आहे. सहाव्या शतकांत टोल्टेक नांवाचे लोक मेक्सिकोंत येऊन राहिले. या लोकांच्या राजधानीचें शहर टोलन म्हणजेच हल्लींचें टुलन किंवा टुलां हें शहर होय. या लोकांनींच मेक्सिकोंत मका व कापूस हे पदार्थ प्रथमतः आणले. सोन्यारुप्याचें काम करण्यांत व इमारती बांधण्यांत हे लोक कुशल होते. या टोल्टेक लोकांचें राष्ट्र ११ व्या शतकांत अवर्षण, दुष्काळ व रोगांच्या सांथी यांमुळें नष्ट झालें. यानंतर मेक्सिकोंत अझटेक लोकांनीं वसाहत केली. या लोकांचा टेनॉक या नांवाचा एक पुढारी होता त्याच्या नांवावरून टेनॉकटिटलन या नांवाचें राजधानीचें शहर १३२५ मध्यें स्थापण्यांत आलें. या अझटेक लोकांच्या शेजारच्या आकोलहूवा व टेपानेक या लोकांबरोबर अनेक वर्षें लढाया होऊन अखेर तिघांची १४३० च्या सुमारास दोस्ती झाली व एक राष्ट्र बनलें. अझटेक राष्ट्रानें आपली संस्कृति बऱ्याच उच्च दर्जाप्रत नेली. (अझटेक पाहा.)

**मेगॅस्थेनीज**—एक युरोपियन ग्रंथकार. हा अलेक्झांडरबरोबर हिंदुस्थानांत आला होता व त्याच्या पश्चात् तो चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारीं वकील म्हणून असे. त्यानें हिंदुस्थानचें वर्णन

आपल्या 'इंडिका' नांवाच्या पुस्तकांत लिहिलें आहे त्यावरूनच पुढील ग्रीक ग्रंथकारांनीं हिंदुस्थानविषयीं माहिती दिलेली आढळते.

**मेघगर्जना**—वीज चमकल्यानंतर जो गडगडाट होतो तो. विजेच्या प्रवाहामुळें उष्ण हवेचें एकदम प्रसरण होतें व नंतर लगेच संकोचन होतें, त्यामुळें असा ध्वनि उत्पन्न होतो. अशा विद्युद्विसर्जनाच्या वेळीं पुढील गुणधर्मांची मोजदाद एका शास्त्रज्ञानें केली आहे: (१) स्थानीय चढ (potential gradient) एका फुटास ५०,००० व्होल्ट. (२) ढगांतील विसर्जनबिंदूमधील स्थानीय भिन्नता ५,००,००,००० व्होल्ट. (३) प्रवाह १०,००० अँपीयर. (४) काळ ०.००००५ सेकंद. (४) आवृत्ति ५,००, ००० वर्तुळें दर सेकंदास. (५) शक्ति १०,००० किलोवॅट तास.

**मेघमल्लार**—हा राग काफी थाटांतून निघतो. या रागांत गांधार स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर षड्ज असून संवादी पंचम आहे. गान-समय मध्यरात्र मानितात. या रागांत दोन निषादांचा प्रयोग होतो. ऋषभ स्वरावर आंदोलन असतें. मध्यमावरून ऋषभ स्वर घेणें कुशलतेचें आहे. कारण, हें कृत्य रागवाचक व रक्तिदायक आहे. या रागाची प्रकृति गंभीर असून विलंबित लयींत गाण्यास योग्य असा हा राग आहे. हा मोसमी राग असल्यामुळें वर्षाकाळांत सदागेय आहे.

**मेघरंजनी**—हा राग भैरव थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत पंचम व धैवत हे स्वर वर्ज्य होत असल्यानें याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर मानितात. तीव्र मध्यम स्वराचाहि प्रयोग यांत दृष्टीस पडतो. शुद्ध मध्यम सुटा सोडल्यानें ललित रागाचा भास यांत बराच होतो. हा दुर्मिळ रागांपैकीं एक आहे.

**मेघाणी, झवेरचंद कालीदास** (१८९७- )—गुजराथेंतील एक साहित्यसेवक व कवि. बी. ए. पर्यंत शिक्षण झाल्यावर यांनीं कलकत्त्यास एका अॅल्युमिनियमच्या कारखान्यांत नोकरी धरली. परंतु यांच्या स्वभावधर्मास ही नोकरी न परवडल्यामुळें हे परत काठेवाडांत आले व सौराष्ट्र कार्यालयांत काम करूं लागले (१९२१). या वेळेपासूनच यांच्या साहित्यसेवेस सुरवात झाली. गुजराथी लोकसाहित्य, लोकगीतें व लोकवार्ता यांचें संकलन करून त्या लोकप्रिय करण्याची महत्त्वाची कामगिरी यांनीं बजावली आहे. या यांच्या कार्याबद्दल रणजीतरामस्मारक समितीनें यांना सुवर्णपदक अर्पण करून यांचा गौरव केला आहे. गद्य व पद्य लेखनाबद्दलहि हे सुप्रसिद्ध आहेत. आपलीं काव्यें हे स्वतः लोकप्रिय पद्धतीनें गाऊन दाखवितात. यांचा 'सिंधुडा' हा ग्रंथ व 'सोहीनी मेहेरे' ही प्रेमकथा हीं यांच्या उत्कृष्ट वाङ्मयाचीं दोन उदाहरणें होत.

**मेझोटिंट**—ही एक ठशावरून मुद्रण करण्याची कला आहे. या कलेचा शोध लुडविग फॉन सायगेन (१६०९-१६७६) यानें लावला. या पद्धतीनें तांब्याच्या पत्र्यावर एखाद्या कोरणीच्या साहाय्यानें कोरून एखादी आकृति प्रथम त्या तांब्याचा भाग वर उठवून काढण्यांत येते. या आकृतीवर कांहीं छापल्यास ही आकृति छापली जाते. परंतु नंतर या आकृतींतून कांहीं भाग पुन्हां कोरणीनें कोरून काढून मधून मधून पांढरी जागा तयार करण्यांत येते व अशा तऱ्हेनें योग्य तो छायाप्रकाशाचा परिणाम साधतां येतो. अलीकडे फोटोग्रेव्हूर (छायाचित्रखोदन) पद्धति निघाल्यापासून ही कला मागें पडत चालली आहे. तथापि सर फ्रँक शॉर्ट हा या पद्धतीचा एक उत्कृष्ट कलाकार होऊन गेला.

**मेटकॉफ, सर चार्लस** (मृ. १८४६)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. हा प्रथम वायव्य प्रांताचा ले. गव्हर्नर होता. नंतर लॉर्ड बेंटिंक गेल्यावर एक वर्षभर (१८३५-३६) हा त्याच्या जागीं ग. जनरल झाला. बेंटिंकनें मुद्रणस्वातंत्र्यावर जी गदा घातली होती ती यानें उचलली; पण त्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीचा याच्यावर रोष होऊन याला राजीनामा द्यावा लागला. पुढें हा जमेका व कानडा या प्रांतांचा गव्हर्नर जनरल झाला होता.

**मेट्श्निकॉफ, इलिआ** (१८४५-१९१६) एक रशियन प्राणिशास्त्रज्ञ. त्यानें श्वेतरक्तगोलक (व्हाइट ब्लड कॉर्पुस्कल्स) यासंबंधीं संशोधन केलें, त्यामुळें त्याची प्रसिद्धि झाली. १९०९ सालीं त्यानें अशी उपपत्ति पुढें मांडली कीं, नासलेल्या दुधांत कृमी असतात व ते कृमी पोटांत गेल्यास त्यांच्यामुळें पचनेंद्रियें सडत जातात व त्यामुळें पचनशक्ति कमकुवत बनते. त्याला व पॉल एहर्लिच या संशोधकाला वैद्यकशास्त्राचें १९०२ सालचें नोबेल पारितोषिक विभागून देण्यांत आलें.

**मेंडेल, जॉर्ज योहान** (१८२२-१८८४)—एक ऑस्ट्रियन प्राणिशास्त्रज्ञ. त्यानें वनस्पतींच्या आनुवंशिक गुणांबद्दलच्या नियमांसंबंधीं पुष्कळ प्रयोग केले आणि आपला महत्त्वाचा ग्रंथ १८६६ सालीं प्रसिद्ध केला. पण बरींच वर्षें या ग्रंथाकडे शास्त्रज्ञांकडून दुर्लक्ष केलें गेलें. पुढें १९०० सालापासून कित्येक वनस्पतिशास्त्रज्ञांनीं त्याच्या ग्रंथाचें महत्त्व विद्वानांच्या नजरेस आणून दिलें.

**मेंडेल सिद्धांत**— ही एक अनुवंशशास्त्राची उपपत्ति आहे. या उपपत्तीमध्यें कांहीं वनस्पतींच्या व प्राण्यांच्या सामा-

न्यतः सारख्या परंतु कांहीं विशेष गोष्टींमध्यें फरक असणाऱ्या जातींचा संकर करून त्यापासून पुढील पिढ्यांमध्यें काय फरक होतात यासंबंधीं नियम बसविलेले असतात. उदा., मेंडेल यानें सामान्य वाटाण्याच्या एका उंच आणि एका खुरट्या जातींचा संकर करून पाहिला. त्यापासून उत्पन्न झालेल्या पहिल्या पिढींतील सर्व वाटाणे उंच जातीचे निघाले. पुढल्या पिढीमध्यें ¼ खुरट व ¾ उंच निघाले. यांपैकीं ¾ च्या प्रजेमध्यें उंच आणि खुरट यांचें प्रमाण दुसऱ्या पिढीसारखेंच दिसून आलें. ⅓ च्या प्रजेंत सर्व उंच जातीची प्रजा आढळली. यावरून उंचपणा हा बलवान् धर्म असून खुरटपणा हा दुर्बल धर्म असावा असें वाटतें. यावरून असें अनुमान निघतें कीं, जेव्हां उंच व खुरट यांच्या संकरापासून गर्भधारणा होते तेव्हां उंचपणा हा बलवान् गुणधर्म असून तो खुरटपणास मागें टाकतो. या दोहोंच्या संकरानें दोन्ही गुणांचें मिश्रण होऊन मध्यम उंच जातीची प्रजा निर्माण होत नाहीं. म्हणजे सर्व प्रजा उंच तरी होते किंवा खुरट तरी होते. उंच आणि खुरट यांचा संकर केल्यास गणिताच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे असा परिणाम दृष्टोत्पत्तीस येतो कीं, ¼ प्रजा पूर्णपणें उंच होईल, ¼ पूर्णपणें खुरट होईल व बाकीच्या अर्ध्यामध्यें कांहीं उंच व कांहीं खुरट अशी मिश्र प्रजा होईल. या ठिकाणीं उंचपणा हा प्रबल गुणधर्म असल्यामुळें ह्या अर्ध्या भागांतील प्रजा उंचच होईल आणि यामुळें एकंदर ¾ प्रजा उंच व ¼ प्रजा खुरट होईल. या उंच आणि खुरट मिश्रण असणाऱ्या अर्ध भागापासून होणाऱ्या प्रजेंतहि उंच आणि खुरट यांचें प्रमाण ३:१ हें राहील. या गोष्टीवरून आनुवंशिक शास्त्रामध्यें आपणांस एक असा नियम ठरवितां येईल कीं, प्रत्येक व्यक्ति ही आपल्या पूर्वजांच्या गुणधर्मांचें मिश्रण होऊन तयार झालेली असून प्रत्येक व्यक्ति हा एक स्वतंत्र प्रकार बनतो.

मेंडेलच्या सिद्धांतानें पूर्वजसादृश्य अथवा पूर्वपरिवर्तन (रिव्हर्शन), परिवर्तन (व्हेरिएशन) आणि लिंगभेद या गोष्टींवर बराच प्रकाश पाडलेला आहे. अमेरिकेमध्यें फळांवरील माशांवर अनेक प्रयोग करून एक नवीन रंजक सिद्धांत (क्रोमोझोम थिअरी) प्रस्थापित करण्यांत आलेला आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं, वंशपरंपरा ही एक अनेक गुणधर्मांची अखंड सांखळी असून अनेक गुणधर्म निरनिराळ्या आकाराच्या संघामध्यें वंशपरंपरेनें प्राप्त झालेले असतात, या गोष्टीचें पूर्ण स्पष्टीकरण होतें. हे रंजक परमाणू (क्रोमोझोम) जोड्यांनीं राहतात आणि त्या जोडीपैकीं एकाची अदलाबदल होऊं शकते व त्यामुळें निरनिराळ्या गुणधर्मांची उत्पत्ति होऊं शकते. अशा तऱ्हेनें आनुवंशिक गुणासंबंधीं बरेंचसें स्पष्टीकरण या उपपत्तीनें मिळूं शकतें. आनुवंशिकता पाहा.

**मेंडेलेजेफ, डिमट्री इव्हॅनोव्हिश** (१८३४–१९०७)— एक रशियन रसायनशास्त्रज्ञ. त्याची प्रसिद्धि नियतांतरिकत्वाच्या सिद्धांता(पीरिऑडिकल लॉ)विषयीं आहे. या सिद्धांताचीं नवीन मूलद्रव्यें शोधून काढण्यास मदत झाली.

**मेंढी**—हा एक रवंथ करणारा प्राणी आहे. याच्या अनेक जाती आहेत. याच्या तोंडामध्यें व खुरांच्यामध्यें विशिष्ट ग्रंथी

असतात. यांच्या रानटी व पाळीव दोन्ही प्रकारच्या जाती आहेत. याचे मुख्यतः तीन वर्ग करतां येतात. पहिली डोंगरी मेंढी—ही सर्वांत लहान पण चळकट जात आहे व ती अगदीं रुक्ष जमिनींतहि राहूं शकते. ही जात हवामानाप्रमाणें आपल्या जीवनांत फरक करून राहते व यांचें मांस चांगलें असतें.

यांची लोंकर बहुधा लांब व रांठ असते. यांची वाढ

मेंढी (सायबेरियन)

पूर्ण होण्यास जरा अधिक दिवस लागतात. दुसरी लांब

आपल्या 'इंडिका' नांवाच्या पुस्तकांत लिहिलें आहे त्यावरूनच पुढील ग्रीक ग्रंथकारांनीं हिंदुस्थानविषयीं माहिती दिलेली आढळते.

**मेघगर्जना**—वीज चमकल्यानंतर जो गडगडाट होतो तो. विजेच्या प्रवाहामुळें उष्ण हवेचें एकदम प्रसरण होतें व नंतर लगेच संकोचन होतें, त्यामुळें असा ध्वनि उत्पन्न होतो. अशा विद्युद्विसर्जनाच्या वेळीं पुढील गुणधर्मांची मोजदाद एका शास्त्रज्ञानें केली आहे: (१) स्थानीय चढ (potential gradient) एका फुटास ५०,००० व्होल्ट. (२) ढगांतील विसर्जनबिंदूमधील स्थानीय भिन्नता ५,००,००,००० व्होल्ट. (३) प्रवाह १०,००० अँपीयर. (४) काळ ०·०००0५ सेकंद. (४) आवृत्ति ५,००, ००० वर्तुळें दर सेकंदास. (५) शक्ति १०,००० किलोवॅट तास.

**मेघमल्लार**—हा राग काफी थाटांतून निघतो. या रागांत गांधार स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर षड्ज असून संवादी पंचम आहे. गान-समय मध्यरात्र मानितात. या रागांत दोन निषादांचा प्रयोग होतो. ऋषभ स्वरावर आंदोलन असतें. मध्यमावरून ऋषभ स्वर घेणें कुशलतेचें आहे. कारण, हें कृत्य रागवाचक व रक्तिदायक आहे. या रागाची प्रकृति गंभीर असून विलंबित लयींत गाण्यास योग्य असा हा राग आहे. हा मोसमी राग असल्यामुळें वर्षाकाळांत सदागेय आहे.

**मेघरंजनी**—हा राग भैरव थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत पंचम व धैवत हे स्वर वर्ज्य होत असल्यानें याची जाति औडुव–औडुव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर मानितात. तीव्र मध्यम स्वराचाहि प्रयोग यांत दृष्टीस पडतो. शुद्ध मध्यम सुटा सोडल्यानें ललित रागाचा भास यांत बराच होतो. हा दुर्मिळ रागांपैकीं एक आहे.

**मेघाणी, झवेरचंद कालीदास** (१८९७– )—गुजराथेंतील एक साहित्यसेवक व कवि. बी. ए. पर्यंत शिक्षण झाल्यावर यांनीं कलकत्त्यास एका ॲल्युमिनियमच्या कारखान्यांत नोकरी धरली. परंतु यांच्या स्वभावधर्मास ही नोकरी न परवडल्यामुळें हे परत काठेवाडांत आले व सौराष्ट्र कार्यालयांत काम करूं लागले (१९२१). या वेळेपासूनच यांच्या साहित्यसेवेस सुरुवात झाली. गुजराथी लोकसाहित्य, लोकगीतें व लोकवार्ता यांचें संकलन करून त्या लोकप्रिय करण्याची महत्त्वाची कामगिरी यांनीं बजावली आहे. या यांच्या कार्याबद्दल रणजीतरामस्मारक समितीनें यांना सुवर्णपदक अर्पण करून यांचा गौरव केला आहे. गद्य व पद्य लेखनाबद्दलहि हे सुप्रसिद्ध आहेत. आपलीं काव्यें हे स्वतः लोकप्रिय पद्धतीनें गाऊन दाखवितात. यांचा 'सिंधुडा' हा ग्रंथ व 'सोहीनी मेहेरे' ही प्रेमकथा हीं यांच्या उत्कृष्ट वाङ्मयाचीं दोन उदाहरणें होत.

**मेझोटिंट**—ही एक ठशावरून मुद्रण करण्याची कला आहे. या कलेचा शोध लुडविग फॉन सायगेन (१६०९–१६७६) यानें लावला. या पद्धतीनें तांब्याच्या पत्र्यावर एखाद्या कोरणीच्या साहाय्यानें कोरून एखादी आकृति प्रथम त्या तांब्याचा भाग वर उठवून काढण्यांत येते. या आकृतीवर कांहीं छापल्यास ही आकृति छापली जाते. परंतु नंतर या आकृतींतून कांहीं भाग पुन्हां कोरणीनें कोरून काढून मधून मधून पांढरी जागा तयार करण्यांत येते व अशा तऱ्हेनें योग्य तो छायाप्रकाशाचा परिणाम साधतां येतो. अलीकडे फोटोग्रेव्हूर (छायाचित्रखोदन) पद्धति निघाल्यापासून ही कला मागें पडत चालली आहे. तथापि सर फ्रँक शॉर्ट हा या पद्धतीचा एक उत्कृष्ट कलाकार होऊन गेला.

**मेटकॉफ, सर चार्लस** (मृ. १८४६)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. हा प्रथम वायव्य प्रांताचा ले. गव्हर्नर होता. नंतर लॉर्ड बेंटिंक गेल्यावर एक वर्षभर (१८३५–३६) हा त्याच्या जागीं ग. जनरल झाला. बेंटिंकनें मुद्रणस्वातंत्र्यावर जी गदा घातली होती ती यानें उचलली; पण त्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीचा याच्यावर रोष होऊन याला राजीनामा द्यावा लागला. पुढें हा जमेका व कानडा या प्रांतांचा गव्हर्नर जनरल झाला होता.

**मेट्च्नीकॉफ, इलिआ** (१८४५–१९१६) एक रशियन प्राणिशास्त्रज्ञ. त्यानें श्वेतरक्तगोलक (व्हाइट ब्लड कॉर्पुस्कल्स) यासंबंधीं संशोधन केलें, त्यामुळें त्याची प्रसिद्धि झाली. १९०९ सालीं त्यानें अशी उपपत्ति पुढें मांडली कीं, नासलेल्या दुधांत कृमी असतात व ते कृमी पोटांत गेल्यास त्यांच्यामुळें पचनेंद्रियें सडत जातात व त्यामुळें पचनशक्ति कमकुवत बनते. त्याला व पॉल एहर्लिच या संशोधकाला वैद्यकशास्त्राचें १९०३ सालचें नोबेल पारितोषिक विभागून देण्यांत आलें.

**मेंडेल, जॉर्ज योहान** (१८२२–१८८४)—एक ऑस्ट्रियन प्राणिशास्त्रज्ञ. त्यानें वनस्पतींच्या आनुवंशिक गुणांबद्दलच्या नियमांसंबंधीं पुष्कळ प्रयोग केले आणि आपला महत्त्वाचा ग्रंथ १८६६ सालीं प्रसिद्ध केला. पण बरींच वर्षें या ग्रंथाकडे शास्त्रज्ञांकडून दुर्लक्ष केलें गेलें. पुढें १९०० सालापासून कित्येक वनस्पतिशास्त्रज्ञांनीं त्याच्या ग्रंथाचें महत्त्व विद्वानांच्या नजरेस आणून दिलें.

**मेंडेल सिद्धांत**— ही एक अनुवंशशास्त्राची उपपत्ति आहे. या उपपत्तीमध्यें कांहीं वनस्पतींच्या व प्राण्यांच्या सामा-

न्यतः सारख्या परंतु कांहीं विशेष गोष्टींमध्यें फरक असणाऱ्या जातींचा संकर करून त्यापासून पुढील पिढ्यांमध्यें काय फरक होतात यासंबंधीं नियम बसविलेले असतात. उदा., मेंडेल यानें सामान्य वाटाण्याच्या एका उंच आणि एका खुरट्या जातीचा संकर करून पाहिला. त्यापासून उत्पन्न झालेल्या पहिल्या पिढींतील सर्व वाटाणे उंच जातीचे निघाले. पुढल्या पिढीमध्यें ¼ खुरट व ¾ उंच निघाले. यांपैकीं ⅓ च्या प्रजेमध्यें उंच आणि खुरट यांचें प्रमाण दुसऱ्या पिढीसारखेंच दिसून आलें. ⅓ च्या प्रजेंत सर्व उंच जातीची प्रजा आढळली. यावरून उंचपणा हा चलवान् धर्म असून खुरटपणा हा दुर्बल धर्म असावा असें वाटतें. यावरून असें अनुमान निघतें कीं, जेव्हां उंच व खुरट यांच्या संकरापासून गर्भधारणा होते तेव्हां उंचपणा हा चलवान् गुणधर्म असून तो खुरटपणास मागें टाकतो. या दोहोंच्या संकरानें दोन्ही गुणांचें मिश्रण होऊन मध्यम उंच जातीची प्रजा निर्माण होत नाहीं. म्हणजे सर्व प्रजा उंच तरी होते किंवा खुरट तरी होते. उंच आणि खुरट यांचा संकर केल्यास गणिताच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे असा परिणाम दृष्टोत्पत्तीस येतो कीं, ¼ प्रजा पूर्णपणें उंच होईल, ¼ पूर्णपणें खुरट होईल व बाकीच्या अर्ध्यामध्यें कांहीं उंच व कांहीं खुरट अशी मिश्र प्रजा होईल. या ठिकाणीं उंचपणा हा प्रबल गुणधर्म असल्यामुळें ह्या अर्ध्या भागांतील प्रजा उंचच होईल आणि यामुळें एकंदर ¾ प्रजा उंच व ¼ प्रजा खुरट होईल. या उंच आणि खुरट मिश्रण असणाऱ्या अर्ध भागापासून होणाऱ्या प्रजेंतहि उंच आणि खुरट यांचें प्रमाण ३:१ हें राहील. या गोष्टींवरून आनुवंशिक शास्त्रामध्यें आपणांस एक असा नियम ठरवितां येईल कीं, प्रत्येक व्यक्ति ही आपल्या पूर्वजांच्या गुणधर्मांचें मिश्रण होऊन तयार झालेली असून प्रत्येक व्यक्ति हा एक स्वतंत्र प्रकार बनतो.

मेंडेलच्या सिद्धांतानें पूर्वजसादृश्य अथवा पूर्वपरिवर्तन (रिव्हर्शन), परिवर्तन (व्हेरिएशन) आणि लिंगभेद या गोष्टींवर बराच प्रकाश पाडलेला आहे. अमेरिकेमध्यें फळांवरील माशांवर अनेक प्रयोग करून एक नवीन रंजक सिद्धांत (क्रोमोझोम थिअरी) प्रस्थापित करण्यांत आलेला आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं, वंशपरंपरा ही एक अनेक गुणधर्मांची अखंड सांखळी असून अनेक गुणधर्म निरनिराळ्या आकाराच्या संघामध्यें वंशपरंपरेनें प्राप्त झालेले असतात, या गोष्टीचें पूर्ण स्पष्टीकरण होतें. हे रंजक परमाणू (क्रोमोझोम) जोड्यांनीं राहतात आणि त्या जोडीपैकीं एकाची अदलाबदल होऊं शकते व त्यामुळें निरनिराळ्या गुणधर्मांची उत्पत्ति होऊं शकते. अशा तऱ्हेनें आनुवंशिक गुणासंबंधीं बरेंचसें स्पष्टीकरण या उपपत्तीनें मिळूं शकतें. आनुवंशिकता पाहा.

**मेंडेलेजेफ, डिमट्री इव्हॅनोव्हिश** (१८३४–१९०७)— एक रशियन रसायनशास्त्रज्ञ. त्याची प्रसिद्धि नियतांतरिकत्वाच्या सिद्धांता(पीरिऑडिकल लॉ)विषयीं आहे. या सिद्धांताचीं नवीन मूलद्रव्यें शोधून काढण्यास मदत झाली.

**मेंढी**—हा एक रवंथ करणारा प्राणी आहे. याच्या अनेक जाती आहेत. याच्या तोंडामध्यें व खुरांच्यामध्यें विशिष्ट ग्रंथी

असतात. यांच्या रानटी व पाळीव दोन्ही प्रकारच्या जाती आहेत. याचे मुख्यतः तीन वर्ग करतां येतात. पहिली डोंगरी मेंढी—ही सर्वांत लहान पण बळकट जात आहे व ती अगदीं रुक्ष जमिनींतहि राहूं शकते. ही जात हवामानाप्रमाणें आपल्या जीवनांत फरक करून राहते व यांचें मांस चांगलें असतें.

यांची लोंकर बहुधा लांब व रांठ असते. यांची वाढ

**मेंढी (सायबेरियन)**

पूर्ण होण्यास जरा अधिक दिवस लागतात. दुसरी लांब

लोंकरीची मेंढी–ही जात सर्वांत मोठी असून चांगल्या कुरणांत राहते. हिची वाढ लवकर होते व प्रजोत्पत्तिहि पुष्कळ होते. यांची लोंकर जड, लांब व तकतकीत असते. तिसरी आंखूड लोंकरीची–ही जात सखल प्रदेशांत व शेत-जमीनीमध्यें राहते. यांची वाढ झपाट्यानें होते व यांचें मांस फार खपतें. यांची लोंकर फार मौल्यवान् असते. या मेंढ्या कमी कणखर असून इतर हवामानांत जगत नाहींत.

कांहीं मेंढ्यांना शिंगें नसतात. शिंगांनीं एडके टकरा खेळतात. शेळ्याच्या मागोमाग मेंढ्या जातात. यामुळें मेंढ्यांच्या कळपांत दोन-चार शेळ्या बाळगाव्या लागतात. मेंढीच्या पिलास कोंकरूं म्हणतात. अंगोरा जातीच्या मेंढ्याच्या लोंकरीच्या शालजोड्या चांगल्या करतात. इटलींतील 'मरीना' जातीची लोंकर उंची कापडासाठीं उपयोगी पडते. लोंकरीखेरीज मेंढ्यांचा शेतास खत पुरविण्याच्या कामीं फार उपयोग होतो.

ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यांत अज याच्याबरोबर मेंढ्यांचाहि वारंवार उल्लेख आहे. त्यांचा मोठा शत्रु लांडगा हा होय. म्हणून मेंढपाळ त्यांची फार काळजी घेत असत. शत्रूकडून मेंढ्या आणि गायी जिंकून आणीत असत. सोमरस गाळण्याकरितां जीं गाळणीं करीत असत तीं मेंढ्यांच्या लोंकरीचीं असत असा उल्लेख पुष्कळ वेळां केलेला आढळतो ( अविभेपी, अव्य, अव्यय ). मेंढ्यांचा मुख्य उपयोग म्हटला म्हणजे त्यांची लोंकर म्हणूनच. 'उर्णावती' (लोंकरयुक्त) हा शब्द मेंढ्यांचा द्योतक आहे. वाजसनेयी संहितेंत ( १३,५० ) मेंढ्याला ( तो आपल्या लोंकरीनें मनुष्याचें शीत निवारण करतो म्हणून ) मनुष्यें व इतर प्राणी यांचें संरक्षक प्रावरण आहे असें म्हटलें आहे. मेंढ्यांच्या लोंकरीचे कपडे पूषन् तयार करतो असें एक ऋग्वेदांत ( १०, २६,६ ) वचन आहे. मेंढ्या बहुधा कुरणांतच असत. गाधार मेंढ्या लोंकरीकरितां प्रसिद्ध आहेत. लोंकर पाहा.

**मेण**—मेण हा शब्द वनस्पतिज व प्राणिज अशा दोन्ही जातींच्या एका चिकट पदार्थास लावण्यांत येतो. उदाहरणार्थ, पॅराफिन व मधमाशीचें मेण. मधमाशीचें मेण हें चरबी व तेल यांपासून निराळें आहे. कारण चरबी व तेलें हीं ग्लिसरीन-संयुक्तें असतात, तर मधमाशीचें मेण हें अल्कहलसंयुक्त आहे. मधमाशीचें मेण पांढरें किंवा पिवळें या दोन रंगांचें असतें. याचा उपयोग मलमें व लेप करण्याकरितां करतात. याचें विशिष्टगुरुत्व अनुक्रमे ०·९५८ व ०·९७० असें आहे. तसेंच वितळण्याचा बिंदु ६१° व ६४° शतमान आहे. हें मेण पाण्यांत विरघळत नाहीं; परंतु उकळत्या अल्कहलमध्यें किंवा ईथरमध्यें विरघळतें. तसेंच उष्ण टरपेंटाइन तेलांत तावडतोब विरतें. मेणाचे उपयोग अनेक आहेत.

**मेणकापड**—लिनोलियम पाहा.

**मेणबत्ती**—एका जागेहून दुसऱ्या जागीं दिवा घेऊन जाण्यास सोयीस्कर पडावें म्हणून एखाद्या चरबीसारख्या पदार्थाच्यामध्यें दोऱ्यांची विणलेली वात घालून तयार केलेल्या वाटोळ्या कांडीस मेणबत्ती म्हणतात. मेणबत्ती तयार करण्याकरितां वापरण्यांत येणारा मुख्य पदार्थ म्हटला म्हणजे चरबी हा होय. ही शुद्ध स्वरूपांत किंवा खोबरेल, मेण किंवा स्पर्मासेटी, वगैरे पदार्थांशीं मिश्रण करून वापरण्यांत येते. वातीभोंवतीं चरबी सांचांत ओतून किंवा वाती चरबींत बुडवून मेणबत्त्या तयार करण्यांत येतात.

मेणबत्त्या करण्याची कला फार जुनी असून आतां अत्यंत मोठ्या प्रमाणावर त्यांची निर्मिति होत आहे. अमेरिकेंत एक मोठा मेणबत्त्यांचा कारखाना आहे. त्यांत यंत्राच्या साहाय्यानें दररोज नऊ लाख मेणबत्त्या तयार होतात. त्यांचा आकार ³⁄₁₆ ईंच व्यासापासून तीन ईंच व्यासापर्यंत असतो व लांबी अर्ध्या ईंचापासून सहा फुटांपावेतों असते. वाढदिवसाच्या वेळच्या केकवरील अगदीं लहान मेणबत्त्यांपासून शोभेच्या मोठ्या बादशाही मेणबत्त्यांपर्यंत सर्व प्रकारच्या तयार होतात. उदा., आभारप्रदर्शनाचे तुर्की दिवे, चार तास पाण्यावर जळणाऱ्या फुलपाकळ्यासारख्या मेणबत्त्या, हातानें रंगविलेल्या सॅन्टा क्लाज मेणबत्त्या, विविध सणांसाठीं मेणबत्त्या, इ..

**मेथॉडिस्ट पंथ**—जॉन वेस्ले यानें स्थापलेला ख्रिस्ती धर्मीयांचा एक संघ. या मेथॉडिस्ट पंथीयांची पहिली जाहीर परिषद् १७४४ सालीं भरली आणि १७८४ सालीं ती कायदेशीर रजिस्टर संस्था बनवण्यांत आली. त्यांचीं धर्ममतें चर्च ऑफ इंग्लंडच्या मतांप्रमाणेंच आहेत. या मुख्य पंथांतून कॅल्व्हिनिस्टिक मेथॉडिस्ट, प्रिमिटिव्ह मेथॉडिस्ट, वेस्लेयन रिफॉर्म युनियन, युनायटेड मेथॉडिस्ट चर्च, वगैरे उपपंथ निघाले. उत्तर अमेरिकेंत मेथॉडिस्ट लोकांची संख्या बरीच मोठी असून सं. संस्थानांत तो एक प्रमुख धर्मपंथ आहे. जगांत मेथॉडिस्टांची एकूण संख्या एक कोटी आहे.

**मेथी**—एक पालेभाजी. ही सर्वत्र होते. गुजराथेंत हिची फार लागवड होते. भाजीप्रमाणें चाऱ्यासाठींहि मेथी पेरतात. तिला मेथा म्हणतात. जून शेंगांत बिया म्हणजे मेथ्या असतात. मेथ्या मसाल्यांत घालतात व औषधींहि आहेत. आंवेवर व बहुमूत्रावर भाजीचा रस देतात. उन्हाळीवर मेथीचें पाणी देतात.

**मेद**—चरबी. हें एक कर्ब उज्ज व प्राण यांचें संयुक्त द्रव्य असून तें प्राण्यांच्या शरीरांत पेशीमय अंतस्त्वचेंत असतें. चरबीची घटना निरनिराळ्या प्रकारची असते. त्यामध्यें

ग्लिसरीनची ईथरसारख्या द्रव्याशीं झालेलीं संयुक्तें व इतर अम्लें असतात. यांत विशेषेंकरून स्टिॲरिन नांवाचें द्रव्य असतें. हें मेणासारखें घट्ट असतें. दुसरें पामिटिन नांवाचें द्रव्य असतें. तें जरा नरम असून घट्ट असतें व तिसरें ओलीन नांवाचें तेल असतें. चरबी पाण्यांत विरघळत नाहीं. कोणत्याहि चरबीची घटना यावरील तीन घटकांच्या प्रमाणावर अवलंबून असते. शरीरामध्यें चरबीचा उपयोग शरीरांतील उष्णता कायम टेवणें हा असतो. तथापि तिचें मुख्य कार्य शरीराचें पोषण करणें हें आहे. चरबीपासून साबण तयार करतात.

**मेदक**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. क्षे. फ. ८५६ चौ. मै.. यांतून मांजरा नदी वाहते. जिल्ह्यांत अरण्य पुष्कळ आहे. पूर्वी हा वरंगळ राज्यांत मोडत असे. पुढें गोवळकोंडा व मोंगल राज्य यांत हा समाविष्ट झाला. हैद्राबाद संस्थान स्वतंत्र झाल्यावर त्याचा भाग बनला. लो. सं. सु. सहा लक्ष. मुख्य भाषा तेलगू आहे. भात व ऊंस फार पिकतो. मेदक शहर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. येथें रंगीत जाजमें व पडदे चांगले होतात. ऐतिहासिक स्थळें पुष्कळ आहेत.

**मेदाम्ल**—चरबी आणि तेलें यांच्यापासून हीं प्रथम स्वतंत्र करतां आल्यामुळें ह्या जातीच्या अम्लांना हें नांव मिळालें आहे. तेलाचे प्रथम साबण करून, किंवा त्याचें खनिज अम्ल, किंवा अति उष्ण वाफ ह्यांची क्रिया करून हीं अम्लें तयार करतां येतात. उदा., ब्यूटिरिक अम्ल लोण्यापासून, स्टिरिनमधून स्टिरिक अम्ल, खोबरेल तेलापासून पामिटिक अम्ल हीं अम्लें पिपीलिका ( फॉर्मिक ) आणि अशीतिक ( असेटिक ) अम्ल ह्यांशीं समधर्मीय आहेत.

**मेंदी**—[ लॅ. लाझोनिआ आल्बा. इं. हेना ]. एक वनस्पति. हिच्या पानांचा उपयोग बोटें, नखें, इ. रंगविण्याकडे करतात. मेंदीच्या फुलांचें अत्तर काढतात. त्यास हीना म्हणतात. झाडा-वरच्या फळांच्या बोसांना ' इसबंद ' म्हणतात. मुलांची दृष्ट काढावयास ते घेतात. उष्णतेच्या रोगांवर मेंदीचा पाला हें चांगलें औषध आहे.

**मेंदू**—मनुष्य व इतर उच्च जातींचे प्राणी यांमध्यें जाणीव आणि इच्छाशक्ति यांचें आधान असणारा व मज्जातंतुव्यूहांतील अत्यंत महत्त्वाचा असा हा भाग आहे. घ्राण, दृष्टि, श्रवण आणि रुचि यांचे मज्जातंतू आपापल्या इंद्रियांस मिळालेल्या संवेदना मेंदूस पोंचवितात आणि त्यामुळें निरनिराळ्या प्रकारच्या संवेदना व जाणिवा उत्पन्न होतात; आणि त्यामुळें नाक, डोळे, कान आणि जीभ यांस चेतना मिळते व त्या चेतनांस अनुसरून मेंदू त्या त्या इंद्रियांकडून कार्य करून घेतो. याप्रमाणेंच मेंदूस शरीराच्या कातडीपासून व निरनिराळ्या भागापासून स्पर्श, उष्णता, दाब, अवकाश, स्नान, हालचाल, वगैरे सर्व गोष्टींचें शारीरिक बाबींचें ज्ञान होत असतें. मनुष्याच्या मेंदूचा बहुतेक भाग त्याच्या डोक्यांतील वरच्या भागात असलेल्या मज्जामय वर्तुलार्धांत असतो. या मज्जेचा पृष्ठभाग एका तऱ्हेच्या करड्या रंगाच्या द्रव्याचा बनलेला असतो. या मज्जेची पिधानत्वचा ( सेरेब्रल कॉर्टेक्स ) हाच सर्व संवेदनांची नोंद करणारा अवयव असून तेंच स्मरणशक्तीचें व विवेकशक्तीचें इंद्रिय आहे. एका बाजूची पिधानत्वचा शरीराच्या दुसऱ्या बाजूकडे स्नायूंचें नियमन करीत असते. आणि त्याच्या योगानेंच मनुष्याच्या निरनिराळ्या कौशल्यपूर्ण हालचाली होत असतात. जर मेंदूच्या उजव्या बाजूच्या अर्धभागास इजा झाली किंवा त्याचा आणि पृष्ठवंशरज्जूचा संबंध तुटला तर शरीरांतील डाव्या बाजूचे स्नायू लटके पडतात. अपस्मार वगैरे झटक्यामध्यें मेंदूच्या डाव्या बाजूस इजा होते व त्यामुळें शरीराची उजवी बाजू लुली पडते. या मेंदूच्या अर्धवर्तुळाच्या मागच्या बाजूच्या खालीं मुठीच्या अर्ध्या इतक्या जाडीचा एक लघुमस्तिष्क ( सेरेबेलम ) असा अवयव असतो. हा कवटीच्या पाठीमागच्या बाजूच्या खालच्या भागांत असतो. याच्या योगानें शरीरांतील अनेक स्नायूंच्या हालचालींमध्यें समतोलपणा व सुसंगति राखली जाते. बृहन्मस्तिष्काकडून सुरू होणाऱ्या क्रियांचें हें लघु-मस्तिष्क नियमन व नियंत्रण करीत असतें. आपण स्वेच्छे-नुसार ज्या कांहीं गोष्टी करतो त्यांखेरीज कांहीं क्रिया आपल्या हातून सहजप्रवृत्तीनें व सहज होत असतात. या सर्व क्रियांसहि कारण मेंदूच होय. या क्रियांचें कांहींसें नियंत्रण आपणांकडून होत असतें. या सर्व मेंदूवर तीन अंतस्त्वचामय आवरणें असतात.

मस्तकावर आघात होऊन त्यांतील अस्थी फुटतात व मेंदूवर दाब पडतो व मेंदूला फार दुखापत होते. यामुळें रोगी निश्चेष्ट पडतो. या दबलेल्या अस्थी वर उचलून सारख्या करण्यासाठीं शस्त्रप्रयोग करावे लागतात.

**मेदोमय क्षय**—ही एक प्राण्याच्या शरीरांतील पेशींची असाधारण स्थिति आहे. अशा स्थितीमध्यें शरीरांतील निरोगी रक्तगोलकांची जागा चरबीचे कण घेतात. ह्या घटनेचें मुख्य कारण अयोग्य पद्धतीचें शरीरपोषण होय. अशी अवस्था बहुधा वृद्धावस्थेमध्यें उत्पन्न होते. याचा परिणाम स्नायु, हृदय, रक्त-वाहिनी, मूत्राशय, वगैरेंवर होतो.

**मेधातिथि** (८२५-९०० सुमार)—मनुस्मृतीवरील एक टीकाकार. याच्या बापाचें नांव वीरस्वामी. याच्या टीकेचें भाषांतर इंग्रजींतहि झालेलें आहे. यानें धर्मविषयक अशा बऱ्याचशा श्लोकबद्ध गोष्टी लिहिल्या असून ' स्मृतिविवेक ' नांवाचा एक ग्रंथहि लिहिला आहे.

**मेन**—हें अमेरिकन सं. संस्थानांत ईशान्येकडील समुद्रालगतचें संस्थान आहे .व मेन आखातालगतचा सुमारें २५०० मै. समुद्रकिनारा या संस्थानच्या हद्दींत आहे. या संस्थानचा उत्तरभाग डोंगराळ असून, समुद्रकिनाऱ्यानजीक अनेक बेटें आहेत. येथें नाविक वाहतूक असलेल्या कित्येक नद्या आहेत. येथें शेती, इमारती लांकूड, मच्छीमारी व दगडाच्या खाणी हे मुख्य धंदे आहेत. ओट, मका, गहूं व बटाटे हीं मुख्य पिकें होतात. ओरोनो येथें १८६८ सालीं स्थापलेलें विद्यापीठ आहे. ऑगस्टा ही संस्थानची राजधानी आहे. पण पोर्टलंड हें महत्त्वाचें बंदर व सर्वांत मोठें शहर आहे. या संस्थानचें क्षे. फ. ३३०४० चौ. मैल आणि लो. सं. ८,४७,२२६ असून त्यापैकीं ११३०४ नीग्रो, १२५१ रेड इंडियन, आणि १२८ एशियाटिक लोक आहेत. १६०७ मध्यें येथें प्रथम इंग्रजांनीं वसाहत केली. १८२० सालीं हें संस्थानी संघांत सामील झालें.

**मेन, हेन्री जेम्स समनर** (१८२२–१८८८)—एक इंग्रज कायदेपंडित. १८६२ सालीं व्हाइसरॉयच्या मंत्रिमंडळांत कायदेमंत्री म्हणून त्याची नेमणूक झाली. १८६७ त तो परत गेल्यावर ऑक्सफोर्ड येथें तौलनिक न्यायशास्त्राचा प्राध्यापक झाला. पुढें केंब्रिज येथें आंतरराष्ट्रीय कायद्याचा प्राध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली. जुना कायदा, खेड्यांतील (प्राच्य आणि पाश्चिमात्य) जमाती, संस्थांचा जुना इतिहास, इ. त्याचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत.

**मेनका**—'अप्सरा' पाहा.

**मेनका**—एक हिंदी नृत्यकलाभिज्ञ महिला. या रॉय नांवाच्या एका बंगाली जमीनदाराच्या कन्या असून यांनीं वादनकला इंग्लंडमध्यें चांगली शिकून घेतली. नंतर हिंदुस्थानांतील नृत्यांचा सशास्त्र अभ्यास करून एक नृत्यताफा तयार केला. हा ताफा युरोपांत नेऊन तिकडे चांगली कीर्ति मिळविली. आंतरराष्ट्रीय नृत्याच्या चढाओढींत यांना प्रथम श्रेणीचीं पारितोषिकें मिळालेलीं आहेत. विश्वामित्र-मेनका, कृष्णलीला, उषा, नागकन्या, देवविजय, इ. त्यांचीं नृत्यें प्रसिद्ध आहेत. यांनीं मुंबईस एक नृत्यशिक्षणसंस्थाहि काढली आहे. हॉफकिन्स इन्स्टिटयूटचे डायरेक्टर कर्नल सोखे यांच्या या पत्नी होत.

**मेनन, व्ही. के. कृष्ण** (१८९७– )—एक हिंदी लेखक व मुत्सद्दी. यांचें शिक्षण मद्रास व लंडन या ठिकाणीं झालें.-हे उत्कृष्ट वृत्तपत्रसंपादक व ग्रंथकार आहेत. प्रसिद्ध 'पेलिकन' ग्रंथमालेचे पहिले संपादक हे होते. इंग्लंडमध्यें यांनीं काँग्रेसमतांचा प्रचार केला व हिंदुस्थानासंबंधीं बरींच पुस्तकें प्रसिद्ध केलीं. इंग्लंडमध्यें अनेक संस्थांशीं यांचा संबंध असे. १९२९–४७ पर्यंत हे इंडिया लीग या संस्थेचे चिटणीस होते. १९४६ सालीं 'युनो'तील हिंदी प्रतिनिधि म्हणून यांस हिंदुस्थान सरकारनें नेमलें होतें. १९४७ पासून हे भारताचे ग्रेट ब्रिटनमधील हायकमिशनर आहेत.

**मेपल**—[वर्ग–असेरासी किंवा सांपिंडासी.जाति–असेर]. सामान्यतः समशीतोष्ण व उत्तरेकडील प्रदेशांत हीं झाडें वाढतात. यांच्या सुमारें पन्नास जाती माहीत आहेत. अमेरिकेमध्यें या झाडाची एक जात (ए. सॅकॅरिनम) आहे तीपासून मेपल साखर तयार होते.

**मेंफिस**—हें ईजिप्तमधील प्राचीन शहर नाइल नदीच्या डाव्या किनाऱ्यावर कायरो शहराच्या दक्षिणेस २० मैल अंतरावर आहे. मेनेस राजानें हें शहर वसविलें. हें शहर फार मोठें, श्रीमंत व शोभिवंत असून ईजिप्तची राजधानी व व्यापाराचें मोठें केंद्र होतें. पुढें अलेक्झांड्रिया शहराचें महत्त्व वाढल्यावर या शहराचें महत्त्व कमी झालें आणि सातव्या शतकांत अरब लोकांनीं हें शहर नष्ट केलें. येथें साकारा नांवाचें पिरॅमिड (मनोरा) आणि दुसरा रामेसस याचा फार मोठा पुतळा या महत्त्वाच्या गोष्टी आहेत.

**मेयो, लॉर्ड** (१८६९–७२)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. यानें हिंदुस्थान देशांत बऱ्याच सुधारणा करण्याची खटपट केली. हा उदारमतवादी होता. यानें अजमीर, लाहोर व राजकोट या ठिकाणीं राजपुत्रांसाठीं शिक्षणसंस्था स्थापन केल्या. हिंदुस्थानची सरहद्द बळकट केली. हा १८७२ सालीं अंदमान बेटांत कैद्यांच्या वसाहतीची पाहणी करण्यास गेला असतां त्याला एका कैद्यानें ठार केलें.

**मेरगुई**—१. ब्रह्मदेश, तेनासरिम विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ९,७८९ चौ. मैल. लो. सं. (१९३१) १,६१,९८७. शें. ८७ लोक बौद्ध धर्मी आहेत. दोन-तृतीयांश लोक शेतीवर राहतात. भाताचें पीक मुख्य आहे. मच्छीमारीचा धंदा मोठा आहे. समुद्रांत मोतीं सांपडतात.

पूर्वी हा प्रदेश सयाम भागांत मोडत असे. १६८३ पासून युरोपियन व्यापारी राहूं लागले. १८५९ त ब्रह्मदेशाच्या राजानें मेरगुई घेतलें. तें १८२४ त इंग्रजांकडे आलें. मेरगुई हें व्यापारी बंदर आहे. गांवची लो. सं सुमारें वीस हजार.

२. द्वीपसमूह. यांत ८०० बेटें आहेत. पैकीं किंग बेट सर्वांत मोठें आहे. कांहीं बेटांजवळ मोतीं सांपडतात. बेटें बंगालच्या उपसागरांत असून इंग्रजांच्या ताब्यांत आहेत.

**मेरिआ थेरेसा** (१७१७–१७८०)—ही हंगेरी व बोहेमिया देशाची राणी, ऑस्ट्रियाची आर्च डचेस आणि जर्मनीची सम्राज्ञी. तिचा बाप ६ वा चार्लस् १७४० सालीं वारल्यावर होली रोमन साम्राज्यावर ती अधिष्ठित झाली; तेव्हां वारसाहक्क

सुरू झालें. सायलेशिआ प्रदेशासाठीं फ्रेडरिक दि ग्रेट बादशहानें तिच्याशीं युद्ध केलें. तो प्रांत तिला गमवावा लागलाच. एला–शापेलचा तह झाल्यावर (१७४८) तिनें आपल्या राज्यांत मोठ्या आर्थिक सुधारणा केल्या; शेतकी, उद्योगधंदे व व्यापार भरभराटीस आणला; व त्यामुळें राष्ट्राचें उत्पन्न पुष्कळ वाढलें.

**मेरी**—या नांवाच्या इंग्लंडच्या गादीवर दोन राण्या बसल्या. पहिली (१५१६–१५५८) आठव्या हेन्री राजाची मुलगी होती. हिनें गादीवर बसतांच पुन्हां रोमन कॅथॉलिक पंथाला मोठा आश्रय देण्यास सुरुवात केली; व पोपशीं समझोता करून पाखंडी लोकांची कत्तल उडविली. क्रॅन्मर, लॅटिमर व रिडले हे धर्मसुधारक या वेळीं बळी पडले. हिचें लग्न स्पेनच्या फिलिप राजाशीं झालें होतें.

दुसरी (१६६२–१६९४) दुसऱ्या जेम्स राजाची मुलगी असून तो पदच्युत झाल्यावर नवरा विल्यम (ऑरेंजचा राजा) यासह गादीवर बसली. नवऱ्याच्या गैरहजेरींत ही चांगला राज्यकारभार हांकीत असे.

**मेरी, कुमारी**—मरीया पाहा.

**मेरी स्टुअर्ट** (१५४२–१५८७)—स्कॉटलंडची एक राणी. ही स्कॉटलंडचा ५ वा जेम्स याची मुलगी असून एका आठवड्याची असतांनाच स्कॉटलंडच्या राज्यपदावर आली. तिचा विवाह १५५८ सालीं फ्रान्सचा राजा २ रा फ्रॅन्सिस याच्याबरोबर झाला; पण राज्यावर आल्यावर तो राजा सतरा महिन्यांनींच १५६१ च्या ऑगस्टांत वारला; व ही विधवा राणी स्कॉटलंडांत परत आली. ती रोमन कॅथॉलिक पंथाची होती, पण स्कॉटलंडमध्यें तर प्रेस्बिटेरियन पंथाचें वर्चस्व होतें. आरंभीं तिची कारकीर्द लोकप्रिय झाली व तिच्या दरबारीं मंत्रीहि युरोपांत सर्वांत मोठे हुशार गणण्यासारखे होते. परंतु लवकर मेरीनें आपला नातेवाईक लॉर्ड डार्नले याच्याबरोबर पुनर्विवाह केला (१५६५); व तेव्हांपासून तिच्यावरील आपत्तींना सुरुवात झाली. डार्नले हा नालायक व व्यसनी होता व तो १५६७ फेब्रुवारींत मारला गेला. पण तत्पूर्वीच मेरी बॉथवेल नांवाच्या मंत्र्यावर ती प्रेम करूं लागली होती, व १५६७ च्या मे महिन्यांत तिनें त्याच्याशीं दुसरा पुनर्विवाह केला. लवकरच बॉथवेलविरुद्ध इतर सरदारांनीं बंड केल्यामुळें तो पळून गेला; तेव्हां मेरीला आपल्या मुलाच्या नांवानें राज्य चालवण्यास सरदारांनीं भाग पाडलें; व तिला लॉक लेव्हन येथें कैदेंत ठेवलें. तेथून १५६८च्या मे महिन्यांत पळून जाऊन तिनें सैन्य उभारलें, पण तिचा पराजय झाल्यामुळें ती इंग्लंडांत पळून गेली. तेथें एलिझाबेथ राणीनें तिला कैदेंत ठेवलें, व त्या स्थितींत मेरी १८ वर्षें होती. पुढें एलिझाबेथला ठार मारण्याच्या कटांत सामील असल्याचा आरोप तिच्यावर शाबीत झाल्यामुळें तिला १५८७ त फांशीं देण्यांत आलें.



**मेरीलँड**—हें अमेरिकन सं. संस्थानांतील १३ आद्य संस्थानांपैकीं एक संस्थान समुद्रकिनाऱ्यालगत आहे. तो समुद्रकिनारा ॲटलांटिक महासागरावर सुमारें ३५ मैल आहे. या संस्थानची राजधानी ॲनापोलिस हें शहर आहे; पण बाल्टिमोर हें मुख्य बंदर आणि व्यापारी केंद्र आहे. येथील मुख्य धंदा शेती हा असून गहूं, मका, बटाटे, भाजीपाला, फळफळावळ आणि तमाखू हीं पिकें येथें होतात. मच्छीमारीचा धंदा येथें अतिशय महत्त्वाचा आहे. येथें फळांचे मोरंबे बनवणें, लोखंडी काम, जहाजें बांधणें व तमाखू करणें यांचे कारखाने आहेत. येथें दोन विद्यापीठें व एक शेतकीचें कॉलेज आहे. या संस्थानचें क्षे. फ. १०,५७७ चौ. मैल व लो. सं. १८,२१,२४४ आहे. या संस्थानची मूळ वसाहत १६३४ सालीं झाली. या संस्थानचा राज्यकारभार गव्हर्नर कायदेमंडळाच्या संमतीनें चालवतो. येथील विधिमंडळ २९ लोकनियुक्त सभासदांचें आणि प्रतिनिधिसभा १२३ लोकनियुक्त सभासदांची आहे. येथें ७ ते १३ वर्षांपर्यंत मुलांना शिक्षण सक्तीचें आहे.

**मेरु**—हा सप्तद्वीपांच्यामध्यें किंवा इलावृताच्या मध्यभागीं असून पुराणांतून याची उंची चौऱ्यायशीं हजार योजनें म्हणजे तीन लक्ष छत्तीस हजार कोस व पृथ्वींत खोली सोळा हजार योजनें आहे, असें वर्णिलें आहे. याची आकृति चतुष्कोणी व याला चार रंगांचीं चार मुखें, म्हणजे पूर्वेकडील पांढरें, दक्षिणेकडील तांबडें अशीं आहेत. याच्यावर देव राहतात. या पर्वताला तीन शिखरें असून त्यांवर महादेव, विष्णु आणि ब्रह्मदेव यांचीं पुरें आहेत. त्याच्या अष्टदिशांस दिक्पालांचीं पुरें आहेत. या मेरु पर्वताला मंदर, सुगंध, विपुल आणि सुपार्श्व हे चार आधार पर्वत आहेत, आणि या चार पर्वतांवर क्रमानें कळंब, जांभूळ, वड आणि पिंपळ असे चार केतुवृक्ष आहेत. या मेरूवर भागीरथी नदी पतन पावून तिचे चार भाग चार दिशांस वाहतात. मेरूच्या दक्षिणेस भरतखंडांत (हिंदुस्थानांत) अलकनंदा नामक भाग वाहतो; उत्तर दिशेस तार्तरी देशांत भद्रा, पूर्व दिशेस सीता, आणि पश्चिमेस चक्षुसंज्ञक गंगाप्रवाह वाहतो. याच्या नऊ मुलींनीं आग्नीध्राच्या नऊ मुलांशीं लग्नें केलीं.

**मेरेडिथ, जॉर्ज** (१८२८–१९०९)—एक ब्रिटिश कवि व कादंबरीकार. हा पहिल्या श्रेणींतील कादंबरीकार जरी आहे तरी त्याच्या कादंबऱ्या फार थोडे 'शिष्ट' लोक वाचतात. 'दि ॲडव्हेन्चर्स ऑफ हॅरी रिचमाँड' (हॅरी रिचमांडचीं साहसें), 'ब्यूचॅम्प्स करीयर', (ब्यूचॅम्पचा आयुष्यक्रम), 'दि इगोइस्ट' (आत्महितलक्षी), यांसारख्या त्याच्या कादंबऱ्या फार वरच्या

दर्जाच्या आहेत. हा कवि म्हणून फारसा प्रख्यात नाहीं, पण टेनिसननंतर त्यालाच साहित्यिकांमध्यें उच्च मानमरातब मिळालें. विनोद, सूक्ष्म निरीक्षण, स्वभावपरिपोष व शब्दप्रभुत्व या बाबतींत त्याचा हातखंडा असे.

**मेलकोटे**—म्हैसूर संस्थान, श्रीरंगपट्टण तालुक्यांतील एक क्षेत्रस्थान. यदुगिरि डोंगरावर रामानुजाचार्यांचा मठ आहे. येथें उत्तम कापड व वाळयाचे पंखे होतात. १७७९ त मराठ्यांनीं हैदरावरील स्वारींत हें लुटलें होतें.

श्रीनारायणस्वामीचें देवालय मोठें व प्रेक्षणीय आहे. याला अनेक राजांनीं व धनिकांनीं देणग्या दिलेल्या आहेत. कल्याणी नांवाचें स्नानकुंड आहे. येथील पांढरी माती वैष्णव नामासाठीं वापरतात.

**मेलबोर्न**—हें ऑस्ट्रेलियांतील मोठें शहर व्हिक्टोरिया प्रांताची राजधानी असून यारा नदीच्या कांठीं आहे. या शहराला जोडून अनेक उपनगरें आहेत. मेलबोर्न बंदर शहरापासून अडीच मैल दूर आहे. येथें पुष्कळ सार्वजनिक इमारती आहेत: उदा., जुनीं पार्लमेंटचीं सभागृहें, गव्हर्नमेंट हाउस, युनिव्हर्सिटीची इमारत, वगैरे. येथें अनेक सार्वजनिक बागा, एक वनस्पतिशास्त्रविषयक बाग व अनेक शर्यतींचीं मैदानें आहेत. येथून मोठा व्यापार चालतो, त्यांत लोंकर हा माल मुख्य आहे. येथें कमावलेलीं कातडीं, कापड, लांकडी सामान, दारू, सिगार, लोखंडी सामान आणि लोंकरीचें कापड हे मुख्य धंदे आहेत. येथें प्रथम १८३५ सालीं वसाहत झाली. ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थच्या पार्लमेन्टचा उद्‌घाटन-समारंभ ड्यूक ऑफ कॉर्नवॉल अँन्ड यॉर्क ( नंतरचे पांचवे जॉर्ज राजे ) यांच्या हस्तें ता. ९ मे १९०१ रोजीं झाला होता. लो. सं. ११,७०,००० आहे.

**मेव**—मेवाटी. एक जात. या लोकांचा देश तो मेवाड होय. हे लोक मूळचे राजपुतान्यांतील मीना जातीचे असावेत. यांची आज मोठी वस्ती पंजाबांत आहे. लो. सं. सुमारें सव्वा लाख. हे धर्मानें आतां मुसलमान आहेत.

**मेवाड**—मध्यवाड म्हणजे मध्यदेश. पण आज उदेपूर राज्याला मेवाड म्हणतात. उदेपूर पाहा.

**मेसफील्ड, जॉन** ( १८७८- )—एक ब्रिटिश कवि व नाटककार. त्यानें आपलें पूर्ववय बोटीवर नोकरी धरून प्रवासांत घालवलें आणि नंतर सं. संस्थानांत अनेक धंदे करण्यांत घालवलें. त्यानें आपलीं 'सॉल्ट वॉटर बॅलड्स' आणि 'ए मेनसेल हॉल' हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. नंतर तो इंग्लंडमध्यें लेखनव्यवसाय पत्करून कायमचा राहिला. 'रेनार्ड दि फॉक्स', 'राइट रॉयल', 'एन्स्लेव्हड्' हे त्याचे इतर ग्रंथ असून 'दि कॅंपडेन वंडर', 'नॅन', 'दि कंडेम्ड् सेल', 'ए किंग्ज डॉटर', 'ट्रायल ऑफ जीझस' हीं नाटकें आहेत.

**मेसापोटेमिआ**—इराक पाहा.

**मेस्तक**—हिशेब, पत्रव्यवहार, वगैरे लिहिण्यासंबंधींचे जुने नियम. हेमाडपंतानें हे नियम घालून दिले असें मानतात. अशीं जुनीं मेस्तकें इतिहाससंशोधनांत सांपडतात. मराठ्यांची महालनिहाय हिशेबाची पद्धत, खातीं, अलुत्याबलुत्यांचे हक्क, जमीन-महसुलाची रीत, पत्रलेखन, वगैरेसंबंधीं माहिती मेस्तकांतून असते.

**मेस्मेर, फिडरिश अँन्टन** ( १७३३-१८१५ )—एक जर्मन वैद्यकशास्त्रज्ञ. त्यानें मेस्मेरिझमचें ऊर्फ प्राणिविषयक मोहनविद्येचें ( ॲनिमल मॅग्नेटिझम )चें तत्त्व शोधून काढलें. मूर्च्छनाशास्त्र ( हिप्नॉटिझम ) पाहा.

**मेस्मेरिझम**—या मोहनविद्येच्या प्रयोगांत एक माणूस दुसऱ्यास निद्रावश करतो. त्या निद्रित स्थितींत तो माणूस ऐकूं शकतो. डोळे उघडून पाहूं शकतो. देहाची हालचाल करूं शकतो. ही स्थिति नेहमींच्या झोंपेपेक्षां वेगळी असते. त्या निजलेल्या माणसाचें अगोदर जर डोकें दुखत असलें व तूं जागा झाल्यावर तुझें डोकें दुखण्याचें बंद होईल असें जर त्यास प्रयोगकारानें सांगितलें तर पुष्कळदां डोकें दुखणें थांबतें असा अनुभव येतो. अशा रीतीनें माणसाला मेस्मेरिक स्थितींत नेऊन व योग्य ते आदेश ( सजेशन्स ) देऊन कित्येक रोग बरे करतां येतात. या स्थितींत असतांना माणसाला सांगितलें कीं, तुझा हात बधिर झाला आहे तर तो खरोखरच बधिर होतो व सुई टोंचली तर ती त्यास जाणवत नाहीं. मेस्मेरिक स्थितींत माणसावर डॉक्टरनें शस्त्रक्रिया केल्याचीं अनेक उदाहरणें उपलब्ध आहेत. अलीकडे क्लोरोफॉर्मसारखीं औषधें प्रचलित झाल्यामुळें शस्त्रक्रियेसाठीं मेस्मेरिझमचा उपयोग फारसा कोणी करीत नाहीं. या स्थितींत माणसाच्या मनाला भूलहि पाडतां येते. त्याच्या हातांत हिरवा बटाटा देऊन हें सफरचंद आहे असें सांगितल्यास तो तो बटाटा मोठ्या आवडीनें खातो!

मेस्मेरिझम व हिप्नॉटिझम हे दोन्ही शब्द जवळजवळ समानार्थकच आहेत. मेस्मेरिझम ही संज्ञा उपयोगांत आणणाऱ्या लोकांची उपपत्ति हिप्नॉटिझम शब्द योजणाऱ्या लोकांपेक्षां निराळी आहे. माणसाच्या अंगांत एक अदृश्य शक्ति असते व प्रयोगांच्या वेळीं ती शक्ति प्रयोग करणाऱ्याच्या अंगांतून हाताच्या अथवा डोळ्याच्या द्वारानें दुसऱ्या माणसाच्या अंगांत शिरल्यामुळें हे प्रयोग होऊं शकतात, अशी मेस्मेरिस्ट लोकांची उपपत्ति आहे; तर अशी कोणतीहि शक्ति अस्तित्वांत नाहीं, पण प्रयोग करणाऱ्या माणसाच्या बोलण्याचा परिणाम होऊन हे

प्रयोग यशस्वी होतात, असें हिमॅटिस्ट लोक म्हणतात. हल्लीं बहुतेक सर्व लोकांस ही दुसरी उपपत्ति मान्य होत चालली आहे.

**मेहकर**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्ह्यांतील तालुका. क्षे. फ. १०२७ चौ. मै.. लो. सं. सुमारें दीड लाख. यांत ३३३ खेडीं व मेहकर शहर आहे. मेहकर पैनगंगेच्या कांठीं असून तेथें प्रसिद्ध बालाजीचें देवस्थान आहे. लो. सं. सुमारें पांच हजार. अकबराच्या कारकीर्दींत हें प्रसिद्ध ठिकाण होतें.

**मेहता, जमनादास माधवदास** (१८८४– )—एक हिंदी राजकारणी पुरुष. यांचें शिक्षण जामनगर, जुनागड, मुंबई व लंडन येथें झालें. १९२३ ते १९२९ पर्यंत मुंबई म्युनिसिपल कार्पोरेशनचे सभासद व मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. हे जी. आय्. पी. रेल्वे अकौंट स्टाफ युनियनचे अध्यक्ष आहेत, त्याप्रमाणेंच ऑल इंडिया रेल्वे मेन्स फेडरेशन, बॉंबे ट्रामवेज् युनियन, पोर्ट ट्रस्ट एम्प्लॉइज युनिअन, ऑल इंडिया सॅलरिड एम्प्लॉइज फेडरेशन, वगैरे अनेक संस्थांचे अध्यक्ष व सल्लागार आहेत. १९२६ ते १९३० पर्यंत हे बॉंबे प्राव्हिन्शिअल कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. १९२१ ते १९३१ पर्यंत हे ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद होते. १९२९ मध्यें कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीचे सभासद होते. एशिअन ॲशुअरन्स कंपनीचे हे चेअरमन आहेत. मुंबई प्रांतिक असेंब्लीचे हे सभासद व कूपर मंत्रिमंडळांत मंत्री होते व कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर असतांना विरोधी पक्षाचे पुढारी होते. ते मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद व प्रतिसहकार पक्षाचे व लोकशाही स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष होते. हिंदुमहासभा व महाराष्ट्रांतील टिळकपक्ष यांचे हे कार्यकर्ते व नेते आहेत.

**मेहता, नंदशंकर तुलजाशंकर** (१८३५–१९०५)—एक गुजराथी साहित्यिक. गुजराथी वाङ्मयांत कादंबरी–लिखाणास सुरुवात करण्याचें श्रेय यांनाच आहे. हे जातीनें नागरब्राह्मण असून सुरत येथें जन्मले. यांचें गुजराथी व इंग्रजी शिक्षण झाल्यावर प्रथम शिक्षक व नंतर ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल, असिस्टंट पोलिटिकल एजन्ट, ॲड्मिनिस्ट्रेटर व कच्छचे दिवाण इतक्या वरच्या हुद्यांपर्यंत हे चढत गेले; मात्र साहित्यिकांत हे 'मास्तरसाहेब' याच नावानें ओळखले जात. 'करण घेलो' ही कादंबरी लिहून यांनीं गुजराथी वाङ्मयांत कादंबरी–लिखाणाला चालना दिली. ही यांची पहिलीच कादंबरी असली तरी ती अत्यंत लोकप्रिय झाली असून इतर अनेक भाषांत तिचीं भाषांतरें झालेलीं आहेत. आकर्षक घटना व रसपरिपोष हे यांच्या कादंबरीचे गुणविशेष होत.

**मेहता, सर फिरोजशाह मेरवानजी** (१८४५–१९१५)–एक थोर हिंदी पुढारी. युनिव्हर्सिटीचें शिक्षण झाल्यावर इंग्लंडमधून बॅरिस्टर होऊन आले. पुढें वकिलीमध्यें चांगलें यश संपादन केलें. टिळक व आगरकर यांजवरील पहिल्या कोल्हापूरच्या दिवाणांच्या बेअब्रूसंबंधींच्या खटल्यांत टिळक-आगरकरांच्या बाजूचे वकील होते. गुजराथ व काठेवाड यांमधील अनेक संस्थानांचे ते कायद्याचे सल्लागार होते. यांस हायकोर्ट जज्जाची जागा अनेकवार देण्यांत आली होती, पण ती त्यांनीं नाकारली. यांची आकृति भव्य, आवाज दांडगा, वक्तृत्व जोरदार, आणि खोंचदार प्रत्युत्तरें देण्याबद्दल प्रसिद्धि होती. त्याप्रमाणेंच त्यांची राजकारणांतील प्रश्नासंबंधींची बुद्धीची तीव्रता व मुत्सद्दीगिरीहि अलौकिक होती. यामुळें सुमारें चाळीस वर्षें त्यांचें तेज सर्व हिंदुस्थानावर पडलें होतें व राजकारणांत ते एक मोठे पुढारी बनले होते. ना. गोखले यांस पुढें आणण्यास हे बरेचसे कारण झाले व मवाळ अथवा प्रागतिक पक्षाचे ते अखेरपर्यंत प्रमुख पुढारी मानले जात. त्या वेळीं राजकारणांत पडलेल्या लोकांस अनेक गोष्टींत लक्ष घालावें लागत असे, त्याप्रमाणें सर फिरोजशाह हेहि अनेक सार्वजनिक कार्यांत भाग घेत असत. ते मुंबई कॉर्पोरेशनचे पस्तीस वर्षें सभासद होते व ते नेहमीं जे. पी. तर्फे निवडून येत. तीन वेळां ते मुंबईचे मेयर होते. मुंबईच्या कायदे कौन्सिलांत लोकनियुक्त प्रतिनिधी घेण्यास सुरुवात झाल्यापासून (सन १८९३ सालापासून) त्यांस सतत मुंबई कॉर्पोरेशनकडून निवडून देण्यांत येत असे. कौन्सिलमध्यें ते केवळ मुंबईचे प्रतिनिधि नसून सर्व जनतेचे प्रतिनिधी म्हणून कार्य करीत व सरकारविरोधी पक्षाचे नेते तेच होते. लोकनियुक्त सभासदांस तुच्छतेनें वागविण्याची जी प्रथम प्रथम सरकारी सभासदांमध्यें वृत्ति होती तिला यांनीं आपल्या जोरदार व मुद्देसूद वक्तृत्वानें व समयसूचक व अचूक उत्तरें देण्यानें बराच आळा घातला व सरकारी सभासदांवर चांगला वचक बसविला. बॉंबे युनिव्हर्सिटीमध्येंहि ते चाळीस वर्षें सीनेटचे सभासद होते. मात्र ते पूर्वींच्या परंपरेंतील असल्यामुळें शिक्षणांत नावीन्य आणि वैशिष्ट्य आणणें वगैरे सुधारणांस ते प्रतिकूल असत. ते एक पुढाऱ्यांचे पुढारी म्हणतां येतील.

**मेहता, वैकुंठलाल लल्लुभाई** (१८९१– )—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ. यांचें शिक्षण मुंबई एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. १९११–१२ मध्यें यांनीं दुष्काळ–निवारण समितीवर काम केलें. १९१२ ते १५ पर्यंत बॉंबे सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँकेचे मॅनेजर होते व नंतर मॅनेजिंग डायरेक्टर म्हणून काम करीत होते. ते 'सोशल सर्व्हिस क्वार्टर्ली'चे संपादक व मुंबईच्या सोशल सर्व्हिस लीगचे सेक्रेटरी होते. १९२९ मध्यें ते बॉंबे प्रॉव्हिन्शिअल बँकिंग इन्क्वायरी कमिटीचे सभासद होते. ते बॉंबे प्रॉव्हिन्शिअल को-ऑपरेटिव्ह इन्स्टिट्यूटचे

सभासद होते. अखिल भारतीय ग्रामोद्योग संघाच्या व्यवस्थापक मंडळाचे ते सभासद व ट्रस्टी आहेत. मुंबई प्रांतांत सहकारी चळवळ फैलावण्यास त्यांची खटपट बरीच कारण आहे. हिंदुस्थानांतील सहकारी चळवळीवर त्यांनीं कांहीं ग्रंथ लिहिले आहेत. सध्यां हे मुंबई प्रांताचे फडणीस आहेत.

**मेहता, हंसा** ( १८९७- )—एक सामाजिक कार्यकर्त्या हिंदी विदुषी. या मुंबई व पुणें विद्यापीठ सीनेटच्या तसेंच भारत महिला विद्यापीठाच्या सीनेटच्याहि सभासद आहेत. १९३० मध्यें मुंबईच्या युद्ध मंडळाच्या त्या अध्यक्ष होत्या. मुंबई इलाखा महिला परिषदेच्या त्या कार्यकारी मंडळाच्या अध्यक्ष आहेत. १९३०-३१ मध्यें त्या मुंबई इलाखा स्त्री पदवीधर संघाच्या अध्यक्ष होत्या. वनिता विश्राम संस्थेच्या शिक्षणसमितीच्या त्या सभासद आहेत. अनेक वर्षें मुंबई विधिमंडळाच्या त्या सभासद आहेत. आंतरराष्ट्रीय परिषदांस हिंदी महिलांच्या प्रतिनिधि म्हणून त्या अनेक वेळां गेल्या आहेत. मानवी हक्क व स्त्रियाचा दर्जा यांसंबंधींच्या राष्ट्रसंघानें नेमलेल्या समितीच्या त्या सभासद होत्या. १९४८ सालीं कॉमनवेल्थ पार्लमेंटरी कॉन्फरन्समध्यें या हिंदी प्रतिनिधि म्हणून होत्या. बडोद्याच्या नवीन सयाजीराव विद्यापीठाच्या त्या व्हाइस चॅन्सेलर आहेत. यांचे पति डॉ. जीवराज मेहता हे सध्यां मुंबई सरकारचे एक मंत्री आहेत.

**मेहता, सर होरमसजी माणेकजी** ( १८७१- )—एक हिंदी व्यापारी. यांचें शिक्षण मुंबई येथें झालें. हे १८८८ मध्यें टांकसाळींत नोकरीस राहिले. १८९६ मध्यें यांनीं स्वतः व्यापार-धंदा सुरू केला. एच्. एम्. मेहता आणि कंपनी स्थापन करून तिचे मुख्य भागीदार झाले. अनेक कंपन्यांचे हे मॅनेजिंग एजंट झाले. १९०४ मध्यें यांनीं व्हिक्टोरिया मिल विकत घेतली व पुढें अनेक गिरण्या विकत घेतल्या. यांनीं १९१२ मध्यें झेनिथ अॅश्युअरन्स कंपनी स्थापन केली व तिचे अध्यक्ष झाले. १९१९ मध्यें इंडिया जनरल अॅश्युअरन्स कंपनी काढली. १९१६ मध्यें पुणें इलेक्ट्रिक सप्लाय कंपनी काढली. त्याप्रमाणेंच नवसरी, नाशिक, देवळाली, टी. आर्. प्रॅट कंपनी, एम्. टी. लि. युगांडा कमर्शिअल कंपनी, नडियाद इलेक्ट्रिक सप्लाय कंपनी, वगैरे अनेक कंपन्या स्थापन केल्या. लीग ऑफ नेशन्सचे हे एक बदली प्रतिनिधि होते. १९३५ मध्यें अ. भा. इन्शुअरन्स परिषद मुंबई येथें भरली होती त्या वेळीं हे स्वागताध्यक्ष होते. हे रिझर्व बँकेचे सरकारनियुक्त डायरेक्टर होते.

**मेहांतक रसायन**—एक आयुर्वेदीय रसायन. वंग, बचनाग, अभ्रक, लोह, कांत, पारद, ताम्र, तीक्ष्ण, हिंगूळ, गंधक, टंकण, कलखापरी हीं औषधें खलांत घालून लिंबाच्या रसानें भावना द्यावी. नंतर त्या द्रव्याची चकती करून शरावसंपुटांत घालून पुट द्यावें. थंड झाल्यावर त्यांत कापूर, केशर, दालचिनी, तमालपत्र, एलची दाणे, नागकेशर, सुंठ, जायफळ, जायपत्री हीं सर्व वरच्या औषधांच्या बरोबर घेऊन मिळवावीं. नंतर लिंबाच्या अंतरसालीच्या रसांत तीन दिवस खल करून त्या द्रव्याच्या गोळ्या बांधून सांवलींत वाळवाव्या. ही गोळी खडीसाखर आणि लोणी यांत घेतली असतां वीस प्रकारचे प्रमेह रोग दूर होतात व शरीरास पुष्टि येते.

**मेहेरअली, युसुफ** ( १९००-१९५० )—एक हिंदी राजकारणी कार्यकर्ते. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेज व सरकारी लॉ कॉलेजमध्यें झालें. १९२५ ते १९२८ मध्यें हे मुंबई येथील स्टूडंट्स ब्रदरहूडचे चिटणीस होते. १९२५ मध्यें मुंबईत यांस वक्तृत्वकलेंत पहिलें बक्षीस मिळालें होतें. मद्रास येथें १९२७ मध्यें झालेल्या अखिल भारतीय वक्तृत्व चढाओढींत यांस पहिलें बक्षीस व सुवर्णपदक मिळालें होतें. १९२८ मध्यें यांनीं मुंबई येथें तरुणसंघा( यूथ लीग )ची स्थापना केली. तसेंच सायमन कमिशनवरील बहिष्काराच्या चळवळींत काम केलें. १९२८ मध्यें हॉलंडमध्यें भरलेल्या जागतिक तरुण-शांतता-परिषदेस गेलेल्या भारतीय तरुणसंघाच्या प्रतिनिधि मंडळाचे हे प्रमुख होते. १९२९ पासून कलकत्ता येथील अखिल भारतीय तरुणसंघाचे प्रधान मंत्री होते. मुंबई येथील भारतीय स्वातंत्र्यसंघाचे हे मंत्री होते. मुंबई हायकोर्टानें यांस वकिलीची सनद देण्याचें नाकारलें, हें अशा तऱ्हेचें हायकोर्टाच्या इतिहासांत पहिलेंच उदाहरण आहे. १९२९ ते १९३३ पर्यंत हे 'व्हॅनगार्ड' या पत्राचे संपादक होते. १९३० मध्यें हे मुं. प्रांतिक कॉंग्रेस स्वयंसेवक मंडळाचे प्रमुख झाले. यांनीं राष्ट्रीय सेनेची संघटना केली. सत्याग्रह-चळवळीमध्यें १९३०-३१-३२-३३ या वर्षी त्यांस एकंदर चार वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३१ मध्यें कराची येथें भरलेल्या अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९३४ मध्यें मुंबई इलाखा कॉंग्रेस सोशालिस्ट ग्रुप स्थापन करण्याच्या कामीं यांनीं पुढाकार घेतला. १९३४ मध्यें मुंबईस भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या वेळीं हे स्वयंसेवक दलाचे प्रमुख होते. मुंबई कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचे हे संयुक्त मंत्री होते. तसेंच अखिल भारतीय कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचेहि हे संयुक्त मंत्री होते. हे अनेक तरुण, विद्यार्थी व सोशालिस्ट परिषदांचे अध्यक्ष झाले होते. १९४२ मध्यें हे मुंबईचे मेयर झाले. १९४२ च्या चळवळींत बेपत्ता होते. १९४७ सालीं हे अमेरिकेला गेले होते. यांच्या अकालीं निधनानें जगांतील अनेक स्वातंत्र्य-भक्तांना हळहळ वाटली.

**मेहेंदळे घराणें**—पेशवाईंतलें एक सरदार घराणें. मूळ-पुरुष बहिरवभट कोंकणांतील हरिहरेश्वराचा. याची आई ती बाळाजी विश्वनाथ पेशव्याची बहीण. बहिरवाच्या दोन मुलांना पेशव्यांनीं आपल्याजवळ ठेवलें. नातू बळवंत यानें बरीच मर्दुमकी गाजविल्यामुळें त्याला सरंजाम मिळाला. हा पानपतच्या लढाईंत प्रथमच शौर्य गाजवून कामास आला. त्याचा मुलगा आप्पा बळवंत यानें पेशवाईची पुढील कारकीर्द पाहिली. हाहि शूर व मुत्सद्दी होता. याचे वंशज पुण्यास 'आप्पा बळवंताचे गेटा'जवळ राहतात. आप्पा बळवंत पाहा.

**मेळ घाट**—वऱ्हाडांत उत्तरेकडे सातपुड्याच्या ज्या रांगा पसरल्या आहेत त्या भागास हें नांव आहे. यांत नरनाळा व गाविलगड असे दोन प्रसिद्ध किल्ले आहेत. वस्ती कोरकू आणि गोंड यांची आहे. लहान लहान गोंड राजे आपल्या जहागिरींत राज्यें करतात. थोडे भिल्लहि आहेत. ख्रिस्ती मिशनरी लोक या प्रदेशांत आपल्या धर्मप्रसाराचीं कामें करतात. मेळघाटांतील व्यापार म्हणजे इमारती लांकडांचा होय.

**मैत्रेय बोधिसत्त्व**—संस्कृत ग्रंथांत अनेक ठिकाणीं मैत्रेय नांवाच्या ऋषीचा उल्लेख आलेला आहे. बौद्ध ग्रंथांत त्यास मैत्रेय बोधिसत्त्व म्हटलें असून तो गौतम बुद्धाच्यामागें त्या गादीवर आला व पुढें तो बुद्ध पदवी मिळवील असें म्हटलें आहे. थिऑसफीय पंथाच्या मतें पृथ्वीवरील जीवांच्या उत्क्रांतीचा योगक्षेम चालविणारी जी ऋषिसंघ नांवाची संस्था आहे तींत बोधिसत्त्व नांवाचा एक अधिकार आहे; एक गादी आहे. हिंदुधर्मांत या गादीस 'व्यास' असें नांव आहे. व्यास हें नांव व्यक्तीचें नसून एका अधिकाराचें आहे. जगांत निरनिराळे धर्म स्थापणें, त्या धर्मामध्यें स्फूर्तीचे व सुधारणेचे नवीन प्रवाह सोडणें, जनतेस सुविद्य व सुसंस्कृत करणें हें या अधिकाऱ्याचें काम होय. तें काम करण्याकरितां तो नाना देशांत स्वतः जन्म घेऊन येतो अथवा आपल्या शिष्यांस पाठवितो. थिऑसफीय शिकवणीप्रमाणें गौतम बुद्धाच्या-नंतर मैत्रेय ऋषीकडे बोधिसत्त्वाचा अधिकार आला व पुढें तो हिंदुस्थानांत श्रीकृष्ण म्हणून व पॅलेस्टाइनमध्यें ख्राइस्ट म्हणून स्वतः आला व पायथॅगोरस, प्लेटो, रामानुज, मध्व, महमद, लाओत्से वगैरे आपल्या शिष्यांना निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या देशांत त्यानें धर्मप्रसारार्थ पाठविलें. सध्यां मैत्रेय बोधिसत्त्व वैवस्वत मनूच्या आश्रमाजवळ हिमालयाच्या दक्षिण उतरणीवर वास्तव्य करून राहत आहे व त्याचा देह पाश्चात्य वंशाचा आहे, असें थिऑसफी पंथ मानतो.

**मैत्रेयी**—याज्ञवल्क्य ऋषींची एक विदुषी पत्नी. ही ब्रह्म-वादिनी होती. हिचा पतीशीं अनेकदां विद्वत्तापूर्ण संवाद होत असे (बृहदारण्यकोपनिषद् २·४·१·२; ४·५·१५; इ.). सुलभा-मैत्रेयी ही निराळीच दिसते.

**मैदालकडी**—हें झाड मोठें वाढतें. साल तांबूस रंगाची असते व तीच औषधी आहे. पुष्टतेस ही चूर्ण करून दूध-साखरेबरोबर घेतात. अतिसार व प्रमेह यांसाठीं शिळ्या पाण्यांत वाटून देतात. उष्णतेवर ओलीं पानें कुसकरून भिजत ठेवून नंतर देतात.

**मैनपुरी**—संयुक्त प्रांत, आग्रा विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १६७९ चौ. मै., प्रदेश सपाट पण दक्षिणकडे यमुनेचीं खोरीं आहेत. लो. सं. (१९४१) ८,७२,६०१. शें. ९३ हिंदू आहेत. शें. ७० लोक शेतकीवर राहतात. गहूं, ज्वारी, अफू, कापूस हीं मुख्य पिकें होत. ११९४ सालापासून मुसलमानांची सत्ता चालू झाली. १८ व्या शतकांत मराठ्यांकडे कांहीं काळ हा प्रदेश होता. १८०१ पासून इंग्रजांकडे होता.

मैनपुरी हें मुख्य ठिकाण ईस्ट इंडियन रेल्वेवर आहे. मैनपुरी व मुखमगंज हीं दोन्हीं गांवें मिळून शहर बनलें आहे. येथें एक किल्ला आहे. लांकडावरील नक्षीकामाबद्दल गांव प्रसिद्ध आहे.

**मैना**—साळुंकी. एक गाणारा पक्षी. याच्या अनेक जाती आहेत. सामान्यतः नेहमीं पाहण्यांत येणाऱ्या मैनेची चोंच पिवळी असून डोळ्याचीं बुबुळें पिंगट असतात. पिसांचा रंग तपकिरी अगर हिरवा असतो. झाडाच्या ढोलींत किंवा वळ-चणींत मैना घर करते. पोपटांप्रमाणें मैना पाळतात.

**मैनाक**—मेनकेचा वंशज. तैत्तिरीय आरण्यकांत हिमालयांतील एका पर्वताचें हें नांव आहे. मैनाग असाहि एक पाठ आहे. सुदर्शन व क्रौंच यांचरोबर याचा उल्लेख आलेला आहे. हिमालय व मेनका यांचा हा पुत्र असून इंद्र इतरांप्रमाणें आपले पंख तोडील या भयानें हा समुद्रांत दडून बसला होता. मारुतीनें सीताशुद्धीसाठीं समुद्र उल्लंघिला त्या वेळीं समुद्राच्या विनंती-वरुन यानें बाहेर येऊन मारुतीला आपल्या शिखरावर विश्रांति घेण्यास सांगितलें, अशी रामायणांत कथा आहे.

**मैनाबाई पवार**—धारच्या आनंदराव पवाराची पत्नी. हिच्या तरुणपणींच आनंदरावाचा मृत्यु झाल्यानें हिला आपलें सर्व आयुष्य वैधव्यांत काढावें लागलें. ही बडोद्याच्या गायकवाड घराण्यांतील होती. हिनें नवऱ्याच्या पाठीमागें राज्याचें मोठ्या शहाणपणानें रक्षण केलें. ही फार हिंमतबाज होती. श्री. नारायण गणेश शिरसाळकर यांनीं हिच्या आयुष्या-वर 'मैनाचरित्र' नांवाचा काव्यग्रंथ लिहिला आहे. शूर, कर्तबगार अशा ऐतिहासिक स्त्रियांत हिला स्थान देण्यांत येतें.

**मैनुद्दीन चिश्ती, ख्वाजा**—चिश्ती घराण्यांतील लोक हे हिंदुस्थानांतील सर्वांत प्रसिद्ध मुसलमान साधु पुरुष होत;

अजमीरमध्यें मैनुद्दीन चिश्ती (११४३–१२४५) याचें थडगें आहे. तो ११६६ मध्यें अजमीरला आला. त्याचे वडील ख्वाजा उस्मान हे इराणमधील संजार शहरचे रहिवासी होते. या शहराच्या कांहीं भागास चिश्ती असें म्हणत, त्यावरून हें चिश्ती आडनांव आलें. बाबा फरीद शाकरगंज, ख्वाजा निजामुद्दीन आणि कुत्बुद्दीन, ख्वाजा शेख सलीम, वगैरे साधु पुरुष या घराण्यांत झाले. ख्वाजा मैनुद्दीन याला अफ्तब–इ–मुल्ल–इ–हिंद म्हणजे 'हिंद राज्याचा सूर्य' असें म्हणतात. अकबर दर वर्षी याच्या कबरेचें दर्शन घेत असे. यासाठीं अजमीरच्या रस्त्याचा नेहमीं उपयोग होत असल्यामुळें मैलाचे दगड म्हणजेच कोशमिनार त्या रस्त्यावर उभे केले होते. पुष्कळ वर्षेपर्यंत बादशहानें अनेक विजय मिळविले आणि जगांत त्याला कोणीहि शत्रु राहिला नाहीं. नंतर बादशहा ख्वाजाच्या शिष्यांसमवेत राहून ईश्वराचे शब्द व साधूचे शब्द यांवर चिकित्सा करण्यांत बराच वेळ घालवीत असे. तसेंच तो ईश्वराची स्तुति करण्यांत रात्र घालवीत असे, असें सांगतात. अशा प्रकारें अकबरावर मैनुद्दीन चिश्तीचें मोठें वजन होतें.

याच्या दर्ग्याच्या दरवाजाशीं दोन मोठीं लोखंडी भांडीं आहेत. यात्रेकरू त्यांतील भात, तूप, वगैरे पदार्थ विकत घेत. अन्न तयार झाल्यावर ते आसपासच्या गरीब लोकांस वांटलें जाई. मैनुद्दीनच्या पुण्यतिथीस हिंदुस्थानांतील सर्व भागांतून मुसलमान त्याच्या दर्ग्याच्या ठिकाणीं यात्रेस जातात. याच्या दर्ग्यास दोन दरवाजे असून पैकीं एकास चांदीची कमान आहे. जवळच साधूची मुलगी बिबी हफिझ व शहाजहानची मुलगी चिम्नी बेगम ह्यांचीं थडगीं आहेत. हीं सर्व थडगीं दाट छायेच्या वृक्षाखालीं आहेत.

**मैमतगड**—रत्नागिरि जिल्ह्यांत संगमेश्वर तालुक्यांत सह्याद्रीच्या अतिशय उंच अशा एका अवघड शिखरावर हा बांधलेला आहे. तो निगुडवाडी खेड्यांत मोडतो. तो कुंडी घाटाच्या दक्षिणेस २॥ मैलांवर देवरूखपासून सुमारें ६ मैलांवर आहे. क्षेत्रफळ ६० एकर आहे. पाणीपुरवठा नाहीं.

**मैमनसिंग**—बंगाल, पूर्व पाकिस्तान, डाक्का विभागांतील एक जिल्हा. जिल्ह्याचें क्षे. फ. ६,१५६ चौ. मैल. लो. सं. (१९४१) ६०,२३,७५८. मधुपूर जंगलानें दोन भाग केले आहेत. यांत नद्या पुष्कळ आहेत व बोटींतून दळणवळण चालतें. पाऊस सुमारें ८६ इंच पडतो. ⅘ लोक शेतकीवर राहतात. मुख्य पिकें तांदूळ, ताग, विड्याचीं पानें, ऊंस, इ. होत. कांहीं ठिकाणीं मलमल चांगली होते.

प्राचीन काळीं हा प्रदेश कामरूप राज्यांत होता. पुढें सेन राजे नांदत होते. ११९९ त मुसलमानांनीं प्रवेश करून, कांहीं थोडा काळ भुइया राजाचा अमल सोडल्यास, १७६५ पर्यंत राज्य केलें. नंतर इंग्रजी सत्ता आली.

मैमनसिंग शहर जुन्या ब्रह्मपुत्रेच्या किनाऱ्यावर वसलें आहे. लो. सं. (१९४१) ५२,९५०. येथें एक कॉलेज व बरींच हायस्कुलें आहेत.

**मोकल गुहिलोत** (राज्य. १३९८–१४१९)—मेवाडचा राणा लक्ष्मणसिंह ऊर्फ लाखा याचा हंसाबाईपासून झालेला पुत्र. लक्ष्मणसिंहाच्या पहिल्या पत्नीचा मुलगा चुंडा यानें आपला गादीवरील हक्क सोडल्यामुळेंच लक्ष्मणसिंहास हंसाबाईशीं लग्न करतां आलें व मोकलला मेवाडची गादी मिळाली. इतकेंच नव्हे तर लक्ष्मणसिंहाच्या मृत्यूनंतरसुद्धां चुंडानें मोकल हा अल्पवयी असल्यानें त्याच्यातर्फें राज्याचा सर्व भार संभाळला. परंतु राज्यकारभारांतील चुंडाचें वर्चस्व मोकलचा मामा रणमल्ल व हंसाबाई यांना सहन न होऊन त्यांनीं त्याच्यावर मोकलला ठार करण्याचा बेत केल्याचा आळ घेतला व त्यास मेवाड सोडण्यास लावलें. मोकलनें जालंदरवाल्यांच्यावर दहशत बसवली व नागोरचा जहागिरदार फिरोझखां व गुजराथचा सुलतान पहिला अहमदशहा यांचा पराभव केला. तसेंच बम्बावदाच्या हाडांच्या ताब्यांतील जहाजपूरचा किल्लाहि यानें आपल्या ताब्यांत घेतला. यानें चितोडला जलाशय व द्वारकानाथ (विष्णु) यांचीं मंदिरें उभारलीं व गौरांबिका नांवाच्या आपल्या स्वर्गवासी राणीची आठवण म्हणून शृंगीऋषीच्या जागीं एक कुंड बांधलें. तसेंच आपला बंधु वाघसिंह याच्यासाठीं वाघेला तलाव बांधला. यानें सोनें व चांदी यांनीं आपल्या पंचवीस तुला केल्या. शेतकरी ब्राह्मणांच्या शिक्षणाची यानें व्यवस्था केली. सन १४३३ मध्यें अहमदाबादचा सुलतान पहिला अहमदशहा यानें झीलवाड्यावर चाल करून तेथील मंदिरें फोडण्यास सुरुवात केली, ही बातमी कळतांच हा महाराणा खेताच्या उपपत्नीचे पुत्र मेरा व चाचा यांच्यासह तिकडे निघाला. एकदां मेरा व चाचा यांच्याशीं कांहीं क्षुल्लक कारणामुळें याची बाचाबाची झाली व या भांडणांचा शेवट याचा खून होण्यांत झाला. कुंभा, खोवा (क्षेमकर्ण), शिवा (सुत्रा), सत्ता, नाथसिंह, वीरमदेव व राजधर या याच्या पुत्रांपैकीं वडील कुंभा हा याच्या पश्चात् याच्या गादीवर आला.

**मोकासा**—आदिलशाहींत काळीचे अधिकारी मोकासदार असत. सरदेशमुखी सोडून जो राज्यांत वसूल होत असे त्याला मोकासा हें नांव असे. यांत राजाच्या बाबतीचा चौथा हिस्सा घालीत. म्हणजे चौथाईपैकीं तृतीयांश किंवा तीन आण्यांचा मोकासा राही. मोकाशाचा हक्क मराठे सरदारांस फौजेच्या खर्चा-

साठीं दिला जाई. लष्करी नोकरीची अट घालून गांवें, जमिनी, इ. इनाम देत, त्यालाहि मोकासा म्हणत.

**मोगरा**—एक फुलवेल. याच्या कांहीं जाती आहेत. अनेक पाकळ्यांच्या झुबकेदार मोगऱ्याला 'बटमोगरा' म्हणतात. याचे वेल लांब वाढत नाहींत. फुलांचा रंग पांढरा सफेत असून त्यांस वास चांगला येतो. यांचें अत्तर काढतात. वेलास मोगरी म्हणतात. वाट सरल्यास पाल्याचा रस गाईच्या दुधांतून देतात.

**मोंगल**—मोंगल लोक आशिया खंडाच्या ईशान्येकडील असून चेंगीजखानाच्या वेळेपासून त्यांचें सामर्थ्य या खंडांत फार वाढलें. सोळाव्या शतकाच्या आरंभीं त्यांच्यांत फार फाटाफूट होऊन पुढें जगाच्या इतिहासांत फारसें महत्त्व राहिलें नाहीं. मोंगोलिया हा चिनी प्रांत मूळचा त्यांचा असला तरी बहुतेक मोंगल लोक या प्रांताबाहेरच आढळतात. मानववंशशास्त्रज्ञ या लोकांचा एक वेगळाच वंश दाखवितात.

दिल्लीचें मोंगल घराणें—हिंदुस्थानांत येऊन दिल्लींत राज्य करणारें शेवटचें मुसलमान घराणें मोंगल होय. संस्थापक बाबरपासून शेवटचा बाहादूरशहा म्हणजे १५२६ ते १८५८ पर्यंत सुमारें सव्वातीनशें वर्षें इतका दीर्घकाळ या घराण्यानें बादशाहीचा उपभोग घेतला. या घराण्यांतील बादशहांचीं चरित्रें स्वतंत्र दिलेलींच आहेत. औरंगजेबानंतर या घराण्यांत कोणी कर्तबगार बादशहा झालाच नाहीं. मोंगली अमदानी आरंभीं प्रजेला फार सुखी असे. व्यापार मोठा चाले. धान्य, कापूस, लोंकर, रेशीम, इ. व्यापाराचे जिन्नस असत. जमीनधारा व जकात या मुख्य उत्पन्नाच्या बाबी होत्या. या काळांत संस्कृत, हिंदी व उर्दू या भाषांत ग्रंथरचना पुष्कळ झाली. गृहकलह, हिंदुधर्मीयांचा छळ, बाहेरून स्वाऱ्या व दुर्बळ बादशहा यांमुळें मोंगल घराणें नाश पावलें.

**मोंगल लिपि**—ही लिपि नेस्टोरियन मिशनऱ्यांच्या एस्ट्रांघेलो लिपीपासून निघालेल्या उइगर लोकांच्या वर्णमालेंत तिबेटी वर्णमालेंतील पांच वर्णांची भर घालून तयार केलेली आहे. काश्गर हें या मिशनऱ्यांचें धर्मप्रसाराच्या कामाचें केंद्रस्थान असून तेथें ते ७ व्या शतकांतच गेलेले होते. १२ व्या व १३ व्या शतकांत उइगर लिपीचा सर्व मंगोलियन साम्राज्यांत प्रसार झाला. १३ व्या शतकाच्या पूर्वार्धानंतर उइगरपासून मोंगोलियन लिपि बनली. तिच्यापासून पुढें कालमूक व मांचू या असंस्कृत लोकजातींच्या लिपीचा उद्भव झाला. मोंगोलियन व तत्संभव सर्व लिपी वरून खालीं व डावीकडून उजवीकडे लिहितात. हल्लीं ही लिपि गोबीमैदानाच्या उत्तरेकडील मोंगोलियन बौद्ध व खाल्का लोक वापरतात.

**मोगली एरंड**—[वर्ग-युफोर्बिआसी, जत्रोफा कुर्कास] मोगली एरंडाचें झाड मूळ पूर्वेकडील व पश्चिमेकडील हिंदी द्वीपसमूह व इतर उष्ण कटिबंधाजवळील देश यांत आढळतें. हें एक झुडुप असून याच्या बियांपासून तेल मिळतें. हीं झाडें कुंपणास लावतात. याच्या तेलास 'जत्रोफा' तेल म्हणतात. याचीं पानें कांहींशीं एरंडाच्या पानांप्रमाणेंच असतात. लांकूड फार हलकें असतें. मोगली एरंड औषधी आहे. पटकी, जुलाब, ओकारी यांवर मूळ ताकांत वांटून देतात. चीक विंचवाच्या दंशाच्या जागीं लावतात. तेल व्रणावर फार उपयोगी आहे. मोगली एरंडाच्या ओल्या काडीनें दांत घासल्यास बळकट होतात व दंतरोग जातात.

**मोंगोलिया**—चीन, उत्तरेकडील एक प्रांत. याच्या उत्तरेस रशियाचा सायबेरिया प्रांत आहे. क्षे. फ. सु. १८,७५,००० चौ. मैल व लो. सं. ८,५०,०००. लामांचा वर्ग फार महत्त्वाचा आहे. शें. ३० पुरुष लामा आहेत. या प्रांताच्या मध्यमार्गी गोबीचें मैदान आहे. शेतकी बहुतेक नाहींच. आतां चिनी लोक येऊन शेतकीला लागले आहेत. उर्गा हें मुख्य शहर आहे. त्याची लो. सं. सु. एक लाख असावी. या प्रांतांतून जनावरें बाहेर पाठविण्यांत येतात. तसेंच लोंकर, कातडीं, शिंगें, इ. त्यांच्यापासून काढलेले जिन्नसहि निर्यात होतात. पूर्वी मोंगोलिया चीन साम्राज्यांत होता. पण १९१५ सालीं बाह्य मोंगोलिया स्वतंत्र झाला व आतां दोन्ही (अंतर् आणि बाह्य) मोंगोलिया रशियाच्या संरक्षणाखालीं आहेत. १९२८ सालीं बाह्य मोंगोलियांत क्रांति होऊन तेथें रशियाच्या धर्तीवर प्रजासत्ताक राज्य सुरू झालें. १९४६ सालीं चीननें ह्या लोकशाहीला मान्यता दिली.

बाह्य मोंगोलिया—हें एक स्वायत्त लोकसत्ताक राज्य आहे. राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण उर्गा हें आहे. क्षेत्रफळ ४,९५,००० चौ. मैल. याच्या राजकारणांत चीन व सोव्हिएट रशिया यांची बरीचशी छाप असते. अंतर्मोंगोलिया हा बाह्य मोंगोलियाच्या दक्षिणेस आहे. हें एक चिनी लोकसत्ताक राज्य आहे. क्षेत्रफळ ३,२८,०६५ चौ. मैल. जेहोल प्रांत हा पूर्वी अंतर्मोंगोलियाचाच एक भाग होता, परंतु तो हल्लीं मॅंचुकुओ प्रांतांत सामील झालेला आहे.

**मोघॅम, विल्यम सॉमरसेट** (१८७४-        )—एक इंग्रज कथालेखक व नाटककार. याचा जन्म पॅरिसमध्यें झाला असून यानें वैद्यकीचें शिक्षण घेतलें होतें. तथापि वैद्यकी न करतां तो वाङ्मयाकडे वळला व त्यानें लवकरच नांव मिळविलें. त्याची पहिली कादंबरी 'लिझा ऑफ लॅंबेथ' (१८९७) हींत घाणेरड्या गरीब वस्तीचें चित्र रंगविलें आहे. नाटकांतून त्यानें

कांहीं लोकाचारांवर आइन टीका केली आहे. त्याला मनुष्य-स्वभावाचें ज्ञान उत्तम असून वक्रोक्तीनें पात्रांची उठावणी करण्यांत तो कुशल आहे. 'केक्स ॲंड एल' यांतील कांहीं पात्रांचें साम्य इंग्रज लेखकांशीं उतरल्यामुळें त्याच्यावर फार टीका झाली. प्राच्य देशांत प्रवास केल्यामुळें त्यांतील अनुभव त्याला कथांतून घालतां आला. १९३७ सालीं 'थिएटर' (रंगभूमि) ही त्याची कादंबरी प्रसिद्ध झाली.

**मोंघीर**—बिहार, भागलपूर विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३९७५ चौ. मैल. गंगा नदीमुळें जिल्ह्याचे दोन भाग पडतात. गंगेच्या कांठीं भात चांगलें पिकतें. जंगलचें उत्पन्न बरेंच येतें. लो. सं. (१९४१) २५,६४,५४४. बहुतेक लोक शेतकीवर राहतात. शें. ९० लोक हिंदू आहेत. यांत मैथिली व मागधी भाषा चालते. शस्त्रास्त्रें करण्यासाठीं पूर्वीपासून जिल्हा प्रसिद्ध आहे. विणकामाचा धंदा मोठा आहे. वाहतूक आगगाडी व नावा यांच्या द्वारें चालते.

मोंघीर शहर गंगेच्या कांठीं आहे. लो. सं. (१९४१) ६३,११४. हें प्राचीन काळीं अंगराज्यांत मोडत असे. येथें बौद्ध अवशेष पुष्कळ सांपडतात. कांहीं काळ पाल घराण्याचें स्वामित्व या भागावर होतें. ११९८ च्या सुमारास हें मुसलमानांकडे गेलें. नंतर १७६५ सालीं क्लाइव्हनें हा प्रदेश ईस्ट इंडिया कंपनीकडे घेतला. येथें पुराणा किल्ला आहे. बंगालकडील सुंदर शहरांत याची गणना होते. येथें कॉलेज व हायस्कुलें आहेत.

**मोझँबिक**—पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका पाहा.

**मोटकी**—हा राग भैरवी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागत असल्यानें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. याच्या आरोहांत ऋषभ स्वर दुर्बल व अवरोहांत धैवत दुर्बल ठेवितात. या रागांत दोनहि धैवतांचा प्रयोग होतो. या रागांत बागेसरी रागाचा थोडासा भास होतो. हा राग दुर्मिळ रागांपैकींच आहे.

**मोटारगतिमापक**—(टॅक्सिमीटर). एखादी भाड्याची गाडी जितकें अंतर प्रवास करील त्या मानानें ठराविक दरानें त्या अंतराचें होणारें भाडें दाखविणारें यंत्र. गाडीच्या पुढच्या चाकापासून एका लवचिक दांड्याच्या साहाय्यानें गति मिळणाऱ्या एका चक्राच्या योगानें निरनिराळ्या चक्रांस गति देण्यांत येऊन हें अंतर व भाडें दर्शविलें जातें.

**मोटार गाडी**—ब्रिटनमध्यें अंतर्ज्वलनानें चालणारी पहिली गाडी बटलरची तिचाकी गाडी होय (१८५०). यानंतर कांहीं मोटार गाड्या मंदगतीनें लंडन शहरांत फिरूं लागल्या. त्यांच्यापुढें तांबडीं निशाणें धरलेले लोक असत, त्यामुळें बरीच करमणूक होत असे. १८९६ मध्यें मोटार गाड्यांवरील बरींच नियंत्रणें दूर करण्यांत आलीं. १९०३ मध्यें जास्तींत जास्त ताशीं २० मैल वेग ठरविण्यांत आला. मोटार गाड्यांचे बरेच प्रकार आहेत. त्यांच्या बांधणींत कांहीं फरक असलेले आढळतात.

मोटारींच्या बाबतींत अमेरिका सर्वांत पुढें आहे. तेथें दोन-तीन माणसागणिक एक मोटार पडते. फोर्ड कंपनीचा स्वस्त व टिकाऊ मोटार तयार करण्याचा डेट्राइट येथील कारखाना सुप्रसिद्धच आहे. दररोज सहासात हजार मोटारी कारखान्यांतून बाहेर विकावयास पाठविल्या जातात. (फोर्ड पाहा.)

१९३८ सालीं जगांत ४०,२१,००० मोटारी तयार झाल्या. त्यांपैकीं एकट्या अमेरिकेंत २४,९०,००० (म्हणजे ६५.५ टक्के) तयार झालेल्या होत्या. अमेरिकेच्या खालोखाल युनायटेड किंग्डमचा क्रम येतो. त्या वर्षी तेथें ४,४५,००० मोटारी तयार करण्यांत आल्या होत्या.

हिंदुस्थानांत मोटारी तयारी करण्यासाठीं प्रयत्न चाललेले आहे. बंगलोर येथें विमानाच्या कारखान्यांत प्रयोग चाललेले आहेत.

मोटारींचा कायदा—हा कायदा १९१४ सालीं मंजूर होऊन त्यांत १९१६, १९२०, १९२४ व १९२७ या सालीं दुरुस्त्या झाल्या. 'मोटार' यांत जें वाहन विजेच्या शक्तीनें किंवा अन्य यांत्रिक शक्तीनें चालविलें जातें, अशा कोणत्याहि वाहनाचा समावेश होतो. अठरा वर्षांच्या आंतील कोणाहि माणसानें सार्वजनिक जागेंत मोटार चालवतां कामा नये. मोटार-मालकानें मोटार रजिस्टर केली पाहिजे व मोटार-ड्रायव्हरनें लायसेन्स घेतलें पाहिजे. त्यावांचून मोटार सार्वजनिक जागेंत चालवतां कामा नये. पुढील बाबतींत सरकार नियम करते-- (१) मोटार रजिस्ट्रेशनची फी; (२) मोटारींचे दिवे, घंटा, शिंग, पोंगा, ब्रेक, वगैरे बाबी; (३) भाड्याच्या मोटारींबाबत शर्ती व शुल्क व भाड्याचे दर; (४) मोटारीचा वेग; (५) मोटारीपासून इजा, नुकसान, धोका किंवा दुखापत होऊं नये म्हणून तजविजी; इ.. वरील कलमांना भंग केल्यास पहिल्या गुन्ह्यास १०० रुपयेपर्यंत दंड, आणि पुढें प्रत्येक गुन्ह्याबद्दल २०० रुपयांपर्यंत दंड आहे. गुन्हा शाबीत झाल्यास एक वर्षपर्यंत लायसेन्स रद्द करण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटला आहे, व तसा शेरा लायसेन्सवर मारतात.

**मोडक, बाळाजी प्रभाकर** (१८४७-१९०६)—महाराष्ट्राचे एक शास्त्रज्ञ व शास्त्रग्रंथकार. यांचा जन्म कोंकणांत पण शिक्षण सांगली-बेळगांवास झालें. बी. ए. पावेतों शिक्षण झाल्यानंतर कोल्हापुरास राजाराम हायस्कुलांत शिक्षक म्हणून राहिले ते शेवटपर्यंत कोल्हापुरासच होते. यांनीं रसायन-

शास्त्राचा विशेष अभ्यास करून राजाराम कॉलेजांत शास्त्रीय शिक्षणाला विशेष चालना दिली. वरेच शास्त्रीय ग्रंथ नवीन संज्ञा तयार करून मराठींत लिहिले व इतिहासावरहि संशोधनपर ग्रंथ लिहिले. रसायन आणि पदार्थविज्ञान या शास्त्रांखेरीज आरोग्य, शिक्षण आणि प्राणिशास्त्र यांवरहि त्यांचे ग्रंथ आहेत. कोल्हापूर आणि दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें यांचे इतिहास त्यांनीं मराठींत प्रसिद्ध केले. उच्च विश्वविद्यालयीन शास्त्रीय शिक्षण मातृभाषेंतून देण्यासाठीं त्यांनीं भूमिका तयार केली, हें त्यांचें कार्य संस्मरणीय होय.

**मोडी लिपि**—जलद लिहिण्याची एक महाराष्ट्रीय लिपि. ही प्रथम कोणीं, कोठून शोधून काढिली यांविषयीं बराच वाद आहे. यादव राजांचा प्रधान हेमाड पंडित यानें ही तयार केली असें मानण्यांत येतें, कारण तेराव्या शतकापासून हिचा प्रचार आहे. अशोक मौर्यांची ब्राह्मी लिपि तीच मोडी असें प्रतिपादिणारे कांहीं संशोधक आहेत. शिवाजीच्या पूर्वींचे शें-दीडशें वर्षांचे कागद जे सांपडतात त्यांतील मोडीचें वळण सफाईदार नाहीं. पुढें पुढें त्याला सुरेखपणा प्राप्त झाला. पेशवाईच्या अखेरचें मोडी वळण तर फारच सुंदर दिसेल. चिटणिसी, महादाजीपंती, चिपळूणकरी, वंडूनाना रानडी, वगैरे वळणें प्रसिद्ध आहेत. मराठ्यांचें साम्राज्य जसें उत्तर आणि दक्षिण हिंदुस्थानांत पसरत गेलें तशी मोडीहि तिकडे गेली. भाषा मराठी नसली तरी या शीघ्र लिपींतून लिखाण, विशेषतः हिशेब ठेवण्याची परंपरा पडून गेली. म्हैसूर, मद्रास या भागांत शंभर वर्षांपूर्वीपर्यंत सरकारी दप्तरें मोडींतच असत. अलीकडे मोडी दुर्बोध म्हणून मुंबई सरकारच्या व्यवहारांतूनहि अजीबात गेली. तिचा पुन्हां प्रसार व्हावा म्हणून मधून मधून खटपट होते, पण ती पुन्हां पूर्ववत् लेखनांत येण्याची आशा दिसत नाहीं.

**मोतीं**—समुद्रांतील प्राण्यांपासून तयार झालेली मौल्यवान् वस्तु. कालवें राहत असलेल्या शिंपांत त्यांच्या अंगांतून निघणाऱ्या चकचकीत रसाचीं वेष्टणें एखाद्या कणाभोंवतीं बसून मोतीं तयार होतें. हा रस शिंपाच्या आंतील बाजूस लागून त्याहि मोत्यासारख्या चमकतात. हा रस खटकर्बिताचा असतो. याचा इंद्रधनुष्यासारखा रंग हा वेष्टणांच्या पातळपणामुळें प्रकाशाला जो अडथळा येतो त्यामुळें असतो. मोत्यांचे रंग निरनिराळे–पांढरा, गुलाबी, काळा, इ. असतात व त्यांची किंमत आकार आणि रंग यांवरून ठरते. जगांत सर्वांत मोठा मोती लंडनच्या व्हिक्टोरिया–आल्बर्ट म्यूझियममध्यें असून त्याचें वजन तीन औंस आहे. इराणी आखातांत फार चांगलीं मोतीं सांपडतात. यांखेरीज ऑस्ट्रेलिया, सुलू द्वीपसमूह, लोअर कॅलिफोर्निया हीं ठिकाणें प्रसिद्ध आहेत. गोड्या पाण्यांतील मोत्यांचा व्यापार अमेरिकेंत फार मोठा आहे. मोत्यांप्रमाणें मोत्यांच्या शिंपांचा गुंड्या, मुठी, मांडी, इ. च्या कामीं उपयोग होतो.

हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांना मोत्यांचा संग्रह करण्याची हौस फार प्राचीन काळापासून आहे. खि. पू. ४ थ्या शतकांतील इराणच्या एका राजकन्येचें थडगें शुशान येथें उघडून बघण्यांत आलें, त्या वेळीं एक टपोऱ्या मोत्यांची माळ सांपडली. धोलपूरच्या राजाकडे एक मोत्यांचा हार होता, त्यासंबंधीं मॉंटेग्यूनें आपल्या अहवालांत म्हटलें आहे कीं, त्यांपैकीं एकेक मोतीं बटाट्याएवढें आहे. ग्वाल्हेरच्या महाराजांकडे जगांतील उत्तमोत्तम मोत्यांपैकीं निदान निम्मीं तरी मोतीं असलीं पाहिजेत असें म्हणतात. बडोद्याच्या खंडेराव गायकवाडानें फर्मावल्यावरून जो एक गालिचा तयार करण्यांत आला, त्याची किंमत कोटींनींच मोजावी लागेल, इतक्या असंख्य उंची मोत्यांनीं तो बनविलेला आहे.

सिंहलद्वीपांत मानारच्या आखातांतून मोतीं काढण्याचे धंदे फार प्राचीन काळापासून आहेत. हिंदुस्थानांत तिनेवल्लीजवळ एक मोतीं काढण्याचा कारखाना आहे. गुजरायेंत मोत्यांचा मोठा व्यापार चालतो. तेथून पॅरिसला माल जातो. मोत्यांत मुख्य प्रकार दोन : बसराई (चोखा) व बदला (ढबदार). पहिलें मोतीं अगदीं तजेलदार असतें. दुसरा प्रकार हलक्या मोत्यांचा आहे. आपोआप होणाऱ्या मोत्यांखेरीज कृत्रिम रीतीनें केलेलीं 'कल्चर्ड' किंवा संवर्धित मोतीं असतात. आज त्यांचाच फार खप आहे.

फार प्राचीन काळीं मोत्याच्या बाबतींत आशियांतील राष्ट्रें अधिक संपन्न होतीं. मोतीं काढण्याची कल्पना प्रथम नक्की केव्हां सुचली गेली तें जरी सांगतां येत नसलें तरी हिंदुस्थान, चीन, सिलोन व इराणचें आखात येथें मोत्यांचा शोध फार पूर्वींच लागला होता असें दिसतें. संस्कृत पुराणग्रंथांत मोत्यांचे उल्लेख अनेक आढळतात. राजाला द्यावयाच्या नजराण्यांत मोत्यांची गणना प्रामुख्यानें केलेली असे. पाली भाषेंतील जुन्या पुस्तकांत अशा प्रकारचे उल्लेख अनेक सांपडतात. जुन्या काळच्या अलंकारांच्या वर्णनांत मोत्याच्या अलंकारांचीं फार वर्णनें आढळतात. चीन देशामध्यें तीन हजार वर्षांपूर्वी 'कँगह्यु' याच्या राज्यांत एकदां असें एक मोतीं सांपडलें म्हणतात कीं, सूर्यास्त झाल्यानंतरहि अनेक मैलपर्यंत त्या मोत्याचा प्रकाश दृश्यमान होत असे! 'बगदादचा चोर' जसा प्रख्यात आहे तसें बेहेरिनमध्यें सांपडलेलें 'यातिमा' नांवाचें एक अमोल मौक्तिक देखील प्रसिद्ध आहे. खलिफाची मर्जी ज्या नर्तिकेवर बसेल तिला हें मोतीं परंपरेनें नजर करण्यांत येत असे. आपल्या अनेक मंदिरांतून

मोत्यांचे दागदागिने अनेक वर्षांपासून जतन केलेले असतात. दक्षिणेंत असलेल्या देवदासी समाजांत मोत्यांचे अलंकार प्रचलित आहेत. प्राच्य विद्यापंडित मोनियर विल्यम्स यानें असें लिहून ठेवलें आहे कीं, तंजावर येथील मंदिरांत नृत्य करणाऱ्या देवदासींच्या अंगावरील तो मोत्यांच्या व रत्नांच्या अलंकाराचा संभार पाहून विदेशी माणसें अगदीं थक्क होऊन जात असत.

राजेरजवाड्यांना, नर्तिकांना, राजकन्यांना आणि धनिकांना स्वतःची दौलत संपन्न करण्यासाठीं ज्या अनेक मौल्यवान वस्तूंचा हव्यास असतो, त्यांत मोत्यांचें स्थान अत्यंत उच्च आहे. त्यांचें पाणी, त्यांचें तेज, त्यांची रंगछटा आणि त्यांचा आकार सगळेंच निसर्गसिद्ध असतें. अशा मोत्यांच्या प्राप्तीसाठीं पैशापेक्षांहि मौल्यवान असें आपलें आयुष्य, मोतीं काढणारे खलाशी वेंचीत असतात. हृदय, डोळे, कान आणि फुप्फुसें यांवर अनिष्ट परिणाम झाल्यामुळें पाणबुडे अल्पायुषी होतात. पाणबुड्याची कामगिरीच जशी जोखमीची, तशीच ती आरोग्य-विघातक असते.

मोतीं खरेदी करणारा मनुष्य तासन् तास मोत्यांची पारख करीत असतो. परंतु मोतीं काढणारा पाणबुड्या शक्य तितक्या लवकर पाण्याच्या वर येण्यासाठीं धडपडत असतो. हें काम साधारणतः मार्च महिन्यापासून सुरू होतें. हंगामाप्रमाणें चार ते सहा आठवडे हें काम चालतें. बोटींचा तांडा मध्यरात्रीं निघून सूर्योदयाच्या सुमारास पोहोंचतो. प्रत्येक बोटींत बहुधा दहा पाणबुडे असतात. ठिकाणावर पोहोंचल्यावर खुणेची तोफ होते व पाणबुड्यांच्या बुडण्याला प्रारंभ होतो. ज्या दोरीनें पाणबुड्याला खालीं सोडतात, तिला २० शेर वजनाचा दगड बांधलेला असतो. पाणबुडे जोडीजोडीनें काम करीत असतात. एक मनुष्य बुडाला असतां दुसरा दोरीकडे पाहत राहतो व खूण झाल्याबरोबर प्रथम दगड, नंतर खडपांनीं भरलेल्या टोपल्या व शेवटीं पाणबुड्या यांना वर काढतो. सरासरी मानानें पाणबुड्या पाण्यांत ५० ते ८० सेकंद राहतो. अशा प्रकारें बुड्या मारण्याचें काम मध्याह्नापर्यंत चालतें व पुन्हां तोफ होते. नंतर सगळे शिंपले किनाऱ्यावर आणले जातात. त्यापूर्वी त्यांचे वांटे करतात. यांपैकीं एक ह्मा पाणबुड्याला मिळतो. आतां पाणबुडी घंटा (पाहा), पाणबुडी पोषाख हीं साधनें झालीं असल्यानें सावकाशपणें पाण्याखालीं काम करतां येतें (पाणबुडे पाहा).

मोतीं खडपांतून काढलीं जातात. ज्या शिंपा आकारानें ओबड-धोबड असून ज्यांची वाढ खुंटलेली असते अशा शिंपांत बहुधा मोतीं सांपडतात असा अनुभव आहे. उत्तम पाणीदार मोत्यांवर सर्वत्र एक प्रकारचा पापुद्रा असून त्याला एक प्रकारची चकाकी असावी लागते. या तेजावरच मोत्याची किंमत अवलंबून असते. आपल्याकडे 'चवी'वरून किंमत काढतात. 'मौक्तिक प्रकाश' या नांवाच्या पुस्तकांत मोत्यांचे 'रती' व 'चव' यांचीं कोष्टकें दिलीं आहेत. पाश्चात्य देशांत मोतीं 'कॅरट' वजनानें घेतात.

मोतीं मिळणारीं दर्यावरील ठिकाणें पूर्वी थोडीं होतीं, आतां त्यांत बरीच भर पडली आहे. सुलू समुद्र, ऑस्ट्रेलियाचा किनारा, मध्य अमेरिकेचा किनारा, दक्षिण पॅसिफिक महासागरांतील कांहीं बेटें, सिलोन, हिंदुस्थानांतील त्रिनेवल्ली-जवळील किनारा आणि इराणचें आखात यांमध्यें मोतीं काढण्याचें काम चालतें. यावर सरकारचा ताबा असून सरकारी नियंत्रणाखालीं सगळीं कामें चालत असतात. वेगवेगळ्या पाण्यांतून काढलेले मासे जसे चवीनें निराळे लागतात त्याप्रमाणें मोत्यांचा रंग, आकार व तेज हीं वेगवेगळीं असतात. इराणच्या आखातांतील मोतीं स्वच्छ पांढरें असतें व त्याचें तेज जगांतील मोत्यांत अलौकिक आहे. मद्रासी मोत्यांत एक प्रकारचा कठिणपणा आहे. तहिटी बेटांतील मोत्यें काळीं असतात. महाराष्ट्रांत हुरमुजी रंगाचें मोतीं खपतें.

मोत्यांप्रमाणें शिंपल्यांचाहि मोठा व्यापार चालतो. मोत्याचे शिंपले उष्ण कटिबंधांतील समुद्रांत आढळतात. त्या समुद्रांतील कालवें असले शिंपले तयार करतात. यांच्या आंतील भाग मोत्यासारखा चकाकतो व त्यांत निरनिराळ्या रंगांची विशेषतः जांभळ्या व निळसर रंगाची झांक मारते.

कृत्रिम पद्धतीनें मोतीं तयार करण्याचा धंदा जपाननें फार मोठ्या प्रमाणावर दुसऱ्या महायुद्धापूर्वी चालविला होता. मोठे मोठे तलाव बांधून त्यांत मासे किंवा मोतीं तयार करणारे किडे टाकून त्यांच्याकडून पाहिजे तशीं मोत्यें तयार करून घेतां येतात. या कृत्रिम किंवा संवर्धित (कल्चर्ड) मोत्यांत कमीअधिक गुणांच्या श्रेणी असतात.

**मोतीबिंदु**—हा एक नेत्ररोग आहे. यामध्यें बुबुळाची पारदर्शकता नष्ट होते. याचें पूर्वचिन्ह म्हणजे बुबुळाचा स्वाभाविक रंग हळू हळू नष्ट होतो व जसजसा रोग वाढत जातो तसतसें तें मोत्यासारखें चकचकीत व दुधासारखें पांढरें होतें. हा रोग बहुधा उतार वयांत होतो. परंतु डोळ्यांस अपघातानें इजा झाली असतां किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें डोळ्यास इजा झाली असतां तरुण वयांत हा रोग होतो. मोतीबिंदूची पूर्ण वाढ होऊन मनुष्यास मुळींच दिसत नाहींसें झालें तरी त्यास प्रकाश व अंधकार यांचें ज्ञान असतें. यावर शस्त्रक्रिया करून हा रोग बरा करतां येतो.

**मोदी, सर होरमसजी पेरोशा** (१८८१- )—एक हिंदी व्यापारी व राजकारणी पुरुष. यांचें शिक्षण सेंट झेविअर स्कूलमध्यें व कॉलेजमध्यें झालें. १९२१ पासून हे म्युनिसिपल कॉर्पोरेशनमध्यें असून १९२३ सालीं अध्यक्ष होते. १९२८-२९ मध्यें हे इंडियन मर्चंट्स चेंबरचे अध्यक्ष होते. १९२७ ते १९३२ मध्यें मिल ओनर्स असोशिएशनचे अध्यक्ष होते. हे मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. पहिल्या गोलमेज परिषदेचेहि सभासद होते. यांनीं 'पोलिटिकल फ्यूचर ऑफ इंडिया', 'फेरोजशहा मेथांचें चरित्र', इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत. १९४१-४३ या काळांत व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांत ते होते. १९४७ सालीं मुंबईचे गव्हर्नर झाले. आतां १९४९ पासून संयुक्त प्रांताचे गव्हर्नर आहेत. टाटा अँड सन्स, असोसिएटेड सीमेंट कंपनीज, वगैरे मोठमोठ्या धंद्यांचे एक संचालक म्हणून ते असतात.

**मोदीखाना**—(कमिसरिएट). सैन्याकरितां खाद्यपेय पदार्थ आणि घोडे वगैरे जनावरांकरितां घासदाणा, वैरण पुरविण्याचें काम ज्या खात्याकडे असतें त्याला म्हणतात. ब्रिटिश सैन्यामध्यें १८८८ सालापासून सदर पुरवठा करणें व त्याची वाहतूक करणें यांवर सर्व नियंत्रण करण्याचें काम रॉयल आर्मी सर्व्हिस कोअरकडे देण्यांत आलें. हिंदुस्थानांतील सैन्यांतहि असेंच एक खातें असतें.

**मोनख्मेर भाषा**—ही भाषा ऑस्ट्रो-एशियाटिक भाषावर्गांतील एक आहे व अतिभारतीय पूर्व प्रांतांत बोलली जाते. या मोनख्मेर भाषेंत मोन, ख्मेर व चाम या तीन सुसंस्कृत भाषा व अनाम-आसामपासून मलाया द्वीपकल्पापर्यंत पसरलेल्या अनेक असंस्कृत भाषा मोडतात. सयाम आणि इंडोचीन यांतील ख्मेर भाषा महत्त्वाची आहे. तींत जुने शिलालेख आहेत. मोनख्मेर भाषा बोलणारांची लोकसंख्या ७,२६,५७८ आहे. या भाषेंत प्रत्येक शब्द एकाक्षरी आहे. मुंडा किंवा मलाक्का भाषा व मोनख्मेर भाषा यांमध्यें जें कांहीं साम्य दिसतें तें यांचें मूळ कदाचित् एकच असल्यामुळें असेल.

**मोने, क्लोद** (१८४०-१९२६)—एक फ्रेंच चित्रकार. त्यानें 'इम्प्रेशन' या नांवाचें एका विशिष्ट पद्धतीचें चित्र १८६३ सालीं प्रदर्शनात ठेवलें, व तेव्हांपासून ही चित्रपद्धति 'इम्प्रेशनिस्ट मूव्हमेंट' या नांवानें रूढ झाली. त्यानें 'हेस्टॅक्स' व 'रोएन कॅथेड्रल' या दोन विषयांचीं अनेक चित्रें प्रकाशाची निरनिराळी स्थिति दाखविणारीं या प्रकारचीं काढलीं. चित्रकला पाहा.

**मोन्टाना**—अमेरिका, संयुक्त संस्थानातलें ईशान्य भागांतलें एक संस्थान. उत्तरेस हें कानडाला अगदीं लागून आहे. याला डोंगराळ संस्थान असेंहि म्हणतात. कारण याच्या पश्चिम भागांत रॉकी पर्वत पसरला आहे व पश्चिमेकडून पूर्वेकडे जमीन उतरत जाते व या उतरणींत कित्येक मैदानें आणि कित्येक खोरीं आहेत. क्षेत्रफळ १,४७,१३८ चौरस मैल. लो. सं. ५,५९,४५६. अमेरिकन संस्थानांत क्षेत्रमानानें मोठेपणांत याचा तिसरा क्रम लागतो. ग्रॅनाइट पीक नांवाचें शिखर १२,८३४ फूट उंच आहे. मिसौरी व पीताश्मका (दि यलो स्टोन) या दोन महत्त्वाच्या नद्या आहेत. पर्वताचा उंचावरचा भाग सोडून हवा बहुधा शुष्क आहे. हेलेना हें राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. बुट्टे हें सर्वांत मोठें शहर आहे. शेतीचा धंदा महत्त्वाचा आहे. शेतीकरितां कालवे सर्वत्र काढले आहेत. गहूं, साखर, बीट, ओट, बार्ली, राय्, वगैरे पिकें व जिन्नस व्यापाराचे मुख्य पदार्थ आहेत. जनावरांची पैदास चांगली आहे. खनिज पदार्थांत तांब्याच्या बाबतींत हें संस्थान सर्व अमेरिकेंत अग्रेसर आहे. सोनें-चांदी, शिसें, कोळसा, पेट्रोल, मॅंगॅनीज, वगैरेंच्याहि खाणी आहेत. इमारती व इतर अनेक प्रकारचें व अनेक जातींचें लांकूड मोठ्या प्रमाणावर देणारीं विस्तीर्ण जंगलें आहेत. अनेक प्रकारचे कारखानेहि आहेत. मिसोला येथें संस्थानाचें विद्यापीठ आहे.

या भागांत वरेंद्राय नांवाचा फ्रेंच संशोधक १८ व्या शतकांत येऊन गेला होता. त्याच्यामागून अनेक प्रवासी व लोंकरीचे व्यापारी या भागांत आले व हा प्रदेश फ्रान्सच्या मालकीचा म्हणून धरला गेला. नंतर फ्रान्सकडून स्पेनकडे व पुन्हां स्पेनकडून फ्रान्सकडे अशी याची सत्तांतर व्यवस्था झाली व १८०३ मध्यें 'लुइसियाना पर्चेज' प्रकरणांत हा अमेरिकेकडे आला. १८६० मध्यें यांतील सोन्याच्या खाणींचा शोध लागला. १८८९ मध्यें याला युनायटेड स्टेट्समध्यें दाखल करून घेण्यांत आलें.

**मोपासाँ, हेन्री रने आल्बर्ट गायद्** (१८५०-१८९३)—एक फ्रेंच कादंबरीकार. प्रथम त्यानें लघुकथा लिहिण्याची कला सुधारली आणि लवकरच तो १९ व्या शतकांतील लघुकथालेखकांमध्यें एक सर्वश्रेष्ठ लेखक म्हणून यथार्थपणें गणला जाऊं लागला. त्यानें सहा मोठाल्या कादंबऱ्या व अनेक लघुकथा लिहिल्या. 'पिएर ए जीन' या कादंबरीच्या प्रस्तावनेंत त्यानें कादंबरीकाराच्या उद्देशाबद्दलच्या स्वतःच्या अनेक उपपत्ती सविस्तर स्पष्ट केल्या आहेत. वेड लागून तो अकालीं वारला. जीवनाकडे उपहासगर्भ व्याजोक्तीनें पाहूनहि तो त्याचें चित्रण कडवटपणानें किंवा निष्ठुरतेनें करीत नसे; तर तिऱ्हाईतपणानें उत्कृष्ट तऱ्हेनें तें रंगवीत असे. कथालेखकांना तो गुरुस्थानीं आहे असें म्हणणें गैरवाजवी होणार नाहीं.

**मोबदला**—भरपाई. ' कॉंपेन्सेशन ' या शब्दाचा अर्थ इंग्रजी व स्कॉटिश कायद्यांत असा आहे कीं, कोणत्याहि सरकारी खात्यानें, किंवा सार्वजनिक किंवा स्थानिक अधिकाऱ्यांनीं पार्लमेंटच्या कायद्याप्रमाणें सार्वजनिक कामाकरितां वगैरे म्हणजे रेल्वे, बंदरें, गोद्या, कालवे, सडका, इत्यादि बांधणें व अधिक मोठ्या करणें, अशा प्रकारच्या कोणत्याहि सार्वजनिक स्वरूपाच्या कामाकरितां खासगी मालकीच्या जमिनी सक्तीनें घेतल्या, तर त्यांच्या किंमतीबद्दल जी योग्य मोबदल्याची रक्कम दिली जाते, ती रक्कम. इ. स. १८४५ पूर्वीं असा मोबदला किती द्यावा, तें ठरवणारीं कलमें त्या कायद्यांत नमूद केलेलीं असत. परंतु अलीकडे मालकाबरोबर तडजोडीनें मोबदल्याची रक्कम ठरवावी, पण तडजोड न होईल, तर पंचांमार्फत किंमत ठरवावी, अशी तरतूद कायद्यांत होती. १९१९ सालीं ' दि अॅक्विझिशन ऑफ लँड (असेसमेंट ऑफ कॉंपेन्सेशन) अॅक्ट ' मंजूर होऊन त्यांत मोबदला ठरवण्याकरितां लवाद मंडळ (पॅनेल ऑफ ऑफिशियल आर्बिट्रेटर्स) नेमावें, आणि जमिनीची किंमत खुल्या बाजारांत विक्री केल्यास जी येईल तितकी लवादांनीं मान्य करावी, अशीं कलमें आहेत. शिवाय सदर कायद्यांत 'मोबदला' (कॉंपेन्सेशन) या शब्दात पुढील प्रकारच्या मोबदल्याचा समावेश होतो: (१) दंगाधोपा उद्भवल्या (रायट ऑर सिव्हिल कमोशन) मुळें झालेल्या खाजगी मालमत्तेच्या नुकसानीबद्दल सरकारनें दिलेली नुकसानभरपाईची रक्कम; (२) मजुरांना कामावर असताना झालेली दुखापत याबद्दल दिलेली रक्कम; (३) कुळांनीं खतें वगैरे घालून शेतसुधारणा केल्याबद्दल भरपाई; (४) कुळांनीं ठरलेली मुदत संपल्यावर शेत-जमिनींत केलेली सुधारणा, घातलेलें खत, वगैरेबद्दल जमीनमालकानें द्यावयाची रक्कम.

हिंदुस्थानांत १८९४ सालचा ' लॅंड अॅक्विझिशन अॅक्ट ' लागू आहे. या कायद्यानें सरकारला एखाद्या सार्वजनिक हिताच्या कामासाठीं एखाद्या ठिकाणची खासगी मालकीची जमीन सक्तीनें घेतां येते (कलम ४). अशा जमिनीबद्दल मालकाला योग्य रक्कम मोबदला सरकार देईल (कलम ५). सदर रक्कम अपुरी वाटल्यास मालकाला कोर्टांत दावा लावून योग्य किंमत कोर्टाकडून ठरवून घेतां येईल (कलम १८). जमिनीची बाजारभावानें जी योग्य किंमत ठरेल त्या किंमतीवर शेंकडा १५ टक्के जादा रक्कम सक्तीनें जमीन घेतल्याबद्दल देण्यांत येईल.

हिंदुस्थानांत १९२३ सालचा 'कामगारांच्या नुकसानभरपाईचा कायदा ' (वर्कमेन्स कॉंपेन्सेशन अॅक्ट) झाला आहे. मजूर म्हणजे अंगमेहनतीच्या किंवा हातानें करण्याच्या कामावर लावलेला इसम, किंवा ज्याची मजुरी महिना तीनशें रुपयांहून जास्त नसते असा इसम (कलम २ एम.). अपघातानें मृत्यु आल्यास १५ वर्षांहून अधिक वयाच्या इसमाला तीस महिन्यांची मजुरी किंवा पगार, अथवा दोन हजार रुपये (जी रक्कम या दोहोंत कमी असेल ती) मिळतील. लहान मुलांस (१५ वर्षांपर्यंतच्या) फक्त दोनशें रुपये मिळतील. अपघातानें कायमचा पंगूपणा आल्यास मोठ्या इसमास बेचाळीस महिन्यांचा पगार किंवा साडेतीन हजार रुपये (या दोहोंत जी रक्कम कमी असेल ती) मिळतील. लहान मुलांस चौऱ्यांशीं महिन्यांचा पगार किंवा साडेतीन हजार रुपये (जी रक्कम कमी असेल ती) मिळतील (कलम ४). 'ट्रान्सफर ऑफ प्रॉपर्टी' कायद्यांत असें कलम आहे कीं, कुळानें ऊर्फ खंडकऱ्यानें जमिनींत मालकाच्या संमतीवांचून कायम स्वरूपाची इमारत किंवा ताली, धरणें, वगैरे बांधकामें करूं नयेत. शेतलागवडीला जरूर तेवढीच दुरुस्ती करावी. कायम स्वरूपाचें बांधकाम मालकाच्या संमतीनें केल्यास त्याचा मोबदला मालकानें कुळाला दिला पाहिजे (कलम १०८).

**मोंबासा**— पूर्व आफ्रिका, केनिया वसाहतींतील एक मुख्य बंदर. हें एका प्रवाळ बेटावर आहे. युगांडा रेल्वेचें हें शेवटचें स्टेशन आहे. हस्तिदंत, रबर, खोबरें, कातडीं व धान्य हीं बाहेर जाणाऱ्या मालपैकीं आहेत. लो. सं. सुमारें सदतीस हजार; पैकीं ६५६ गोरे लोक आहेत. अरब व हिंदू लोक जास्त आहेत. बेटाचें क्षे. फ. ९ चौ. मै. आहे. ११ व्या शतकांत येथें इराणी—अरब या मिश्र जातीची वस्ती होती. १४९८ त येथें वास्को-द-गामा आला त्या वेळीं येथें कालिकतचे व्यापारी त्याला आढळले. १८८७ त हें ब्रिटिशांकडे आलें. येथें महाराष्ट्रीयांची बरीच वस्ती असल्यानें एक महाराष्ट्रीय मंडळ स्थापन झालें आहे.

**मोर**—जमिनीवरील एक पक्षी. ' मयूर ' हा शब्द सामासिक शब्दांत ऋग्वेदांत येतो. तेथें त्याचा अर्थ इंद्राचे घोडे (मयूर-रोमन् म्हणजे मोराच्या पिसाप्रमाणें केंस असलेले, किंवा मयूर-शेप्य = मोराच्या शेपटीसारखे असलेले) असा आहे. यजुर्वेद संहितेंतील अश्वमेध प्रसंगींच्या दिलेल्या बळींच्या यादींत मोरांचाहि समावेश झाला आहे. लांडोरी (मयूरी) चा अथर्ववेद व ऋग्वेद यांतून उल्लेख केला आहे व तोहि तिचा विषावर कांहीं उतारा म्हणून केला आहे. मोरांच्या पिसाबद्दल सांप्रत काळींहि कांहीं लोकांत एक प्रकारचा तिटकारा दिसतो.

हा एक मोठा व सुंदर पक्षी आहे. हा हिंदुस्थान व दक्षिण आशिया यांमध्यें आढळतो. याच्या पिसाऱ्यामुळें हा फार प्रसिद्ध आहे. पिसाऱ्यामुळें मोर सुंदर दिसतो. त्याला तो वाटेल तेव्हां वर करतां येतो. पिसांवर डोळे असतात. पिसाचा रंग हिरवा—

पिवळा असतो. मोराचा गळा निळा असून उन्हांत तो चकाकित दिसतो. याच्या मादीस लांडोर म्हणतात. ही एका वेळेस

मोर

जंगलामध्यें असल्यास पंचवीस ते तीस अंडीं घालते. पाळीव लांडोर इतकीं घालीत नाहीं. पहिल्या दोन वर्षांपर्यंत पिलांस—नरमादीस सारखींच पिसें असतात; नंतर मोरास पिसारा येतो, पण लांडोरीस येत नाहीं. जावामध्यें एक मोराची जात आढळते, पण ती अगदीं निराळी आहे.

**मोरचंग**—एक वाद्य. ह्याचा बाह्याकार शाळुंकेसारखा असतो. हें वाद्य लोखंडाच्या सळईचें केलेलें असतें. सामान्यतः ह्या शाळुंकेची लांबी तीनचार बोटें व रुंदी गोल भागाकडे अडीच-तीन बोटें व दुसऱ्या टोंकाशीं दीडदोन बोटें असते. ह्या शाळुंकेच्या बरोबर मध्यावर गोल भागावर एक तार खिळविलेली असते व ती शाळुंकेच्या दुसऱ्या टोंकाशीं आल्यावर काटकोन होईल अशी वळविलेली असते. हें वाद्य एका हातानें दांतांत धरून दुसऱ्या हातानें त्या तारेच्या उभ्या टोंकाशीं बोटाचा आघात करून वाजवितात.

**मोरया गोसावी** (१३७५-१४६१)—महाराष्ट्रांतील एक सत्पुरुष. मूळचें यांचें घराणें कर्नाटकांतील शाली गांवचें असून यांचें उपनांव शालिग्राम असें होतें. पुढें या घराण्यांत बरेच सत्पुरुष निपजल्यानें या घराण्यास 'देव' या उपनांवानेंहि संबोधण्यांत येऊं लागलें. या घराण्यांतील वामनभट्ट व पार्वतीबाई या जोडप्याच्या पोटीं श्रींच्या अनुग्रहानें मोरया गोसावी यांचा जन्म झाला. शके १२९७ माघ शु. ४ हा यांचा जन्मदिवस होय. वयाच्या आठव्या वर्षीं उपनयनसंस्कार पार पडल्यावर यानें जटाघनापर्यंत साग्र वेदाचें अध्ययन केलें. यानंतर योगिराज नामक सिद्धाकडून गुरुपदेश घेऊन यानें थेऊरास कडक तपश्चर्या केली व मंगलमूर्तीस प्रसन्न करून घेतलें. यानंतर हा चिंचवडला आला असतां तेथील गोविंदराव कुलकर्णी यांची कन्या उमाबाई हिच्याबरोबर याचा विवाह झाला. पुढें याला मुलगा झाला त्याचें नांव चिंतामणि असें ठेवण्यांत आलें. याला कऱ्हा नदींत एक गणपतीची मूर्ति सांपडली. ती चिंचवडास आणून यानें आपल्या वाड्यांत तिची स्थापना केली. यानंतर हळूहळू याच्यावर लोकांची दृढ भक्ति बसली. पुढें एकांताची जरूरी भासूं लागल्यानें या महायोग्यानें शके १३८३ मार्गशीर्ष वद्य ६ या दिवशीं जिवंत समाधि घेतली. यानें गणपतीवर अनेक भक्तिरसपूर्ण पदें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं 'सासूर', 'माहेर' व 'कामधेनू' हीं विशेष प्रसिद्ध आहेत. मराठेशाहींत या चिंचवडच्या देव घराण्यांतील पुरुषांना सर्व मान देत असत. आदिलशहा, संभाजी, राजाराम, शाहू, वगैरेंनीं याच्या वंशजांना अनेक इनामें दिलीं होतीं. चिंचवडला दरसाल मार्गशीर्ष कृ. ६ ला मोरया गोसावी यांची पुण्यतिथि साजरी होते.

**मोरवी संस्थान**—काठेवाड. क्षे. फ. १०७२ चौ. मै.. लो. सं. (१९४१) १,४१,८१७. कापूस आणि ऊंस हीं मुख्य पिकें होत. संस्थानच्या मालकीची आगगाडीहि आहे. संस्थानिक कच्छच्या राजघराण्यांतील आहेत. १८०७ सालीं ब्रिटिशांशीं तह होऊन संस्थान मांडलिक बनलें. नवलाखी हें मुख्य बंदर असून युरोपच्या बोटी तेथें लागतात. कापडाच्या, धातूंच्या, कांचेच्या व इतर गिरण्या व हाडें, आगकाड्या, रंग, इ. चे बरेच कारखाने संस्थानांत आहेत. मोरवी येथें व्यवसायात्मक विद्यालय असून संस्थानांत प्राथमिक आणि दुय्यम शिक्षण मोफत मिळतें. सध्यांचे महाराज श्रीलुखधीरजी बाहादूर १९२२ सालीं गादीवर बसले. यांना ११ तोफांच्या सलामीचा मान आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें साठ लक्ष रुपये आहे. मोरवी ही संस्थानची राजधानी आहे. आतां हें संस्थान सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे.

**मोरवेल**—[ वर्ग-राननक्युलासी; इं. क्लेमॅटिस ]. ही एक जाड देंठ व पानें असणाऱ्या वेलीची फार मोठी जात आहे. या जातीचीं सुमारें दीडशें झाडें आहेत. या वेलीची एक जात इंग्लंमडध्यें आढळते तीस 'कुमारीचा मंडप' किंवा 'प्रवाशाचा आनंद' म्हणतात. हिला पुष्कळ पांढऱ्या फुलांचे गुच्छ येतात व नंतर फळें येतात. त्यांस पिसासारखे तंतू जोडलेले असतात. कांहीं जातींच्या फुलांस फार सुंदर वास येतो. कांहींचीं फुलें मोठीं

हिरवट-पांढरीं तर कांहींचीं गुलाबी किंवा जांभळ्या रंगाचीं घंटेसारखीं असतात. सामान्य जातीच्या या वेलीचीं फळें तुरट व चिकट असतात.

मोरवेलाचें पान तिखट असतें. खरूज, चट्टे, वगैरे त्वचा-रोगांवर पानें वाटून लावतात. वायूवर पोटांत रस देतात.

**मोरस**—हीं झुडपें समुद्राच्या आसपास वाळवंटावर होतात. पानांची भाजी व भजीं करतात. पानांचा रंग हिरवट, तांबूस व अस्मानी असा मिश्र असतो.

**मोरावळा**—आंवळा चोंचवून साखरेच्या पाकांत मुरवतात. पित्तामुळें चक्कर येणें, डोकें दुखणें, आंबट ओकाऱ्या होणें, इत्यादि पित्तजन्य विकारांवरील हें एक घरगुती औषध आहे. इतर औषधांचे अनुपान म्हणूनहि वापरतात.

**मोरेव्हियन**—हा एक धार्मिक पंथ असून या पंथांतील लोक आपणांस संघबंधु असें म्हणतात. प्रथम यांस बोहेमियन असें म्हणत व ती एक हुसाइट पंथाची शाखा मानण्यांत येत असे. जेव्हां कॅलिक्स्टाइन पंथांतील लोकांनीं १४३३ मध्यें बचेझेल येथील परिषदेचें म्हणणें मान्य केलें, तेव्हां त्या वेळीं ठरलेल्या कांहीं ठरावास मोरेव्हियन लोकांनीं अनुमति दिली नाहीं आणि त्यांनीं आपला स्वतंत्र पंथ स्थापन केला. १५२२ मध्यें त्यांनीं लूथरशीं सहकार्य केलें; परंतु अखेरीस त्यांनीं प्रभु-भोजनाच्या बाबतींत कॅल्व्हिनचीं मतें मान्य केलीं. या पंथाची शिस्त फार कडक आहे. जरी यांची एकंदर संख्या कमी असली तरी १८ व्या शतकाच्या अखेरीस व १९ व्या शतकाच्या प्रारंभीं इतर कोणत्याहि पंथापेक्षां यांचीं परदेशांत अधिक मिशनें होतीं.

**मोरोक्को**—उत्तर आफ्रिकेंतला भूमध्यसमुद्र व ॲड्रिॲटिक समुद्र यांच्या कांठचा एक देश. अल्जेरिया याच्या पश्चिमेस आहे. क्षे. फ. २,३१,५०० चौ. मैल. लो. सं. ५२,०४,३४४. याचे तीन विभाग असून ते तीन राष्ट्रांच्या ताब्यांत आहेत: १ फ्रेंच, २ स्पॅनिश, व ३ टँजिएर (इंटरनॅशनल). वस्ती बहुधा मूळचे बर्बर लोक व अरब यांची आहे. ज्यू लोकहि बरेच आहेत. युरोपियनांत फ्रेंच लोकांचीच कांहीं वस्ती आहे. कासाब्लँका व टँजीर्स या दोन ठिकाणीं इंग्रजांची वसाहत आहे. सर्व भागांतून शेती हाच मुख्य धंदा आहे. खाणीहि आहेत. पण अद्याप फॉस्फेटशिवाय दुसरा महत्त्वाचा खनिज पदार्थ निघत नाहीं. फेझ, मारकेश व रबट हीं शहरें आहेत. मोरोक्को-वर फ्रेंच संरक्षणाखालीं एक सुलतान राज्य करतो. आजचे सुलतान सिद्दी महंमद १९२७ सालीं गादीवर आले. मोरोक्को शहर विशिष्ट चामड्याविषयीं प्रसिद्ध आहे.

हें एक तऱ्हेचें बकरीचें कातडें सुमाक झाडाच्या पाल्याच्या योगानें विशिष्ट तऱ्हेनें कमावलेलें असतें. त्यास निरनिराळ्या तऱ्हेचे रंग चढविलेले असतात व त्यावर निरनिराळ्या तऱ्हेचे उठावदार ठिपके असतात. याचा उपयोग पुस्तकें बांधण्याच्या, सामानावरील गाद्या वगैरे करण्याच्या व स्त्रियांचे जोडे इत्यादि करण्याच्या कामीं करण्यांत येतो. अशा तऱ्हेचें दिसणारें पण कृत्रिम मोरोक्को चामडें मेंढ्यांचें कातडें किंवा दाबलेले कागद यां-पासून बनवितात. त्याप्रमाणें कृत्रिम रेशीम बनविण्यासारख्याच एका पद्धतीनें काष्ठद्रव्या(सेल्युलोज)पासून कृत्रिम मोरोक्को चामडें तयार करण्यांत येतें.

मोरोक्कोंत रोमन संस्कृतीचा पगडा खि. पू. १ लें शतक ते इ. स. ५ वें शतक या काळांत होता. नंतर व्हँडाल, बायझंटाइन व सॅरासेन अरब यांनीं एकामागून एक या प्रकारें हा प्रदेश आपल्या ताब्यांत ठेवला. अरबांच्या राजवटींत १३ व्या शतकांत मोरोक्को फार प्रबळ होतें. १८३० सालीं फ्रेंचांनीं यावर वर्चस्व ठेवलें. त्या वेळेपासून फ्रेंचांविरुद्ध येथील लोकांच्या उठावण्या चालूच आहेत.

स्पॅनिश मोरोक्को हा भाग जिब्राल्टरच्या आखातासमोरच आहे. क्षे. फ. १८,००९ चौ. मै. असून लो. सं. सुमारें ७½ लक्ष आहे. फ्रेंच मोरोक्कोचें क्षे. फ. १,५३,८७० चौ. मै. असून लो. सं. सुमारें ८० लक्ष आहे. टँजिएर झोन २२५ चौ. मै. आहे.

**मोरो तानदेव होनप**—मराठेशाहींतील एक अधिकारी. हा कर्यात मावळांतील ३६ गांवांचा देशकुलकर्णी व पुण्याचा देशपांडे होता. मलिक अंबरच्या मृत्यूमुळें निजामशाहीस आलेल्या कमकुवतपणाचा फायदा घेऊन कांहीं शिपाई व स्वार यांच्या साहाय्यानें यानें चाकणचा किल्ला घेतला व बंडखोरीस सुरुवात केली. सन १६३० मध्यें याचें बंड मोडण्यासाठीं आदिलशाहीतर्फे आलेल्या मुरार जगदेवानें याच्या वाड्यास आग लावून याच्या ताब्यांतील चाकणचा कोट जमीनदोस्त केला व रायाराव यास शिरवळ परगण्याचा अधिकारी नेमलें. तेव्हां हा लपून बसला. पण मोठ्या सायासानें यास पकडून अडक-वून ठेवण्यांत आलें. कैदेंतून सुटल्यावर हा कांहीं दिवस स्तब्ध होता. पुढें वरील प्रदेश शहाजीच्या ताब्यांत आल्यावर शहा-जीचा कारभारी दादाजी कोंडदेव यानें यास बोलावणें पाठवलें. परंतु हा न आल्यानें दादाजीनें याजवर शस्त्र धरलें. तेव्हां रंगभट मळेकराकडे हा लपून बसला. रंगभटाची आई फुलाई हिनें सहा महिनेपर्यंत कुणालाच याची दाद लागूं दिली नाहीं. हिचा शिवाजीच्या पदरीं असलेला नातू अनाजी रंगनाथ यानें यास शिवाजीकडे नेलें. शिवाजीनें यास क्षमा करून पुण्याचें देशपांडे-पण दिलें. याचे वंशज पुण्यास आहेत.

**मोरो त्रिमल पिंगळे** (मृ. १६८०)—शिवाजीचा प्रधान. हा देशस्थ ब्राह्मण पूर्वी शहाजीच्या पदरीं होता. शिवाजीनें त्याला पुरंदर किल्ल्याचा कारभार सांगितला व पुढें तर त्याच्या सल्ल्यानें शिवाजी चालत असे. शिद्दीचा पराभव केल्यावर शिवाजीनें त्याला पेशवा केला. त्यानें बरेच किल्ले मोंगलांपासून जिंकून घेतले. शिवाजी आग्र्यास गेला असतां मागें मोरोपंतानें राज्य सांभाळलें होतें. तसेंच कर्नाटकांत गेला तेव्हांहि मोरोपंतच कुलअखत्यारी होता. पंतानें पुष्कळ किल्ले व मुलूख जिंकून शिवाजीच्या मृत्यूपर्यंत स्वराज्य वाढविलें. हा सोयराबाईच्या पक्षास मिळाला म्हणून संभाजीनें कांहीं दिवस कैदेंत ठेवलें होतें. शिवाजीच्या मृत्यूनंतर ६ महिन्यांनीं तो वारला. हा जसा शूर तसा राज्यकारभारालाहि चांगला होता. पहिली जमीनधारापद्धति यानें अमलांत आणली. मोरोपंतानंतर त्याचे मुलगे निळोपंत व बहिरोपंत हे एकामागून एक पेशवे झाले. नंतर शाहूनें बाळाजी विश्वनाथ भट याच्या घराण्यांत पेशवाई दिली. या पिंगळ्यांचा वंश सातारा जिल्ह्यांत आहे.

**मोरोपंत** (१७२९-१७९४)—एक विख्यात मराठी कवि. आडनांव पराडकर, कऱ्हाडे ब्राह्मण. लहानपणीं मोरोपंतानें संस्कृत विद्या चांगली हस्तगत केली; काव्य, अलंकार, नाट्य, इ. चें चांगलें अध्ययन त्यानें केलें होतें. वडील रामाजीपंत प्रथम पन्हाळगडास होते. ते पुढें बारामतीस बाबूजी नाईक यांच्या आश्रयास राहिले, त्यामुळें मोरोपंताचें सर्व आयुष्य बारामतीसच गेलें. पंताची कविता एक लाखाजवळ असावी; तीपैकीं सुमारें साठ हजार आज उपलब्ध आहे. महाभारत, रामायण, हरिवंश, कृष्णविजय, मंत्रभागवत, इ. मोठीं काव्यें असून स्फुट काव्यें व कथानकें किती तरी आहेत. बहुतेक कविता आर्या वृत्तांत आहे; त्यामुळें आर्या वृत्त फार प्रसिद्धीस आलें. मोरोपंताची ख्याति यमकाबद्दल आहे. त्याच्या काव्यांत कोट्या व शब्दचमत्कृति यांवर फार भर; तसेंच अनुप्रासामुळें तें मनोरम झालें आहे. ओज, प्रसाद आणि माधुर्य यांमुळें मोरोपंताचें काव्य सुरस वाटतें. जागजागीं मनुष्यस्वभावाचें यथार्थदर्शन घडविलें आहे. संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांवरचें त्याचें प्रभुत्व स्पृहणीय आहे. तथापि संस्कृत शब्दांचा भरणा फार केल्यामुळें काव्य साधारण माणसाला दुर्बोध झालें आहे. पंडित कवि म्हणून मोरोपंताची योग्यता मोठी आहे; मराठी वाङ्मयांतील एक प्रथम श्रेणींतील कवि म्हणून त्याचें स्थान चिरकाल राहील यांत शंका नाहीं.

**मोरोबादादा फडणीस** (१७४०-१८०३)—पेशवाईंतील एक मुत्सद्दी. हा बाबुराव फडणिसाचा मुलगा व नाना फडणिसाचा चुलत भाऊ. सन १७६३ मध्यें पहिल्या माधवरावानें यास आपला फडणीस नेमलें. या वेळीं नाना पुण्यांत राहून राज्यकारभार पाही व हा स्वारीवर जात असे. त्यामुळें नानापेक्षां आपण वरचढ झालों अशा समजुतींत हा वागूं लागला. पुढें माधवराव पेशव्यानें मरतेसमयीं यास न बोलावतां नाना व बापू यांना बोलावून त्यांच्यावर राज्याचा हवाला टाकला. तेव्हां याचा गर्व उतरला. परंतु पुढें यास नानाविषयींच्या द्वेषानें पछाडलें. विशेषतः बारभाईच्या कारस्थानांत नाना व बापू प्रामुख्यानें चमकले, तें याला सहन झालें नाहीं. तेव्हां दादास पेशवा करून यानें नानास कैद करण्याचा डाव रचला. परंतु त्यांत यास यश न येऊन यालाच नाना व महादजी यांनीं पकडून बंदींत टाकलें. नगरच्या किल्ल्यांत बंदींत असतांना यानें फितुरी करण्याचा केलेला प्रयत्न फसला. नानाच्या मृत्यूनंतर दुसऱ्या बाजीरावानें यास आपल्या बाजूस घेतलें. परंतु बाजीरावासच पदच्युत करण्याचें कारस्थान आरंभल्यामुळें सन १८०२ मध्यें यास परत घनगडला कैदेंत टाकण्यांत आलें. कैदेंतच हा मरण पावला.

**मोर्य** (मोरया, मास्टर एम.)—थिऑसफी पंथाच्या मतें जगाच्या उत्क्रांतीचीं सूत्रें एका ऋषिसंघाच्या हातीं असून त्यांत जे एक अधिकारी आहेत त्यांस मोर्य, मोरया, मास्टर एम. अशीं नांवें आहेत. मौर्य घराण्यावरून हें नांव पडलें असावें. हे अधिकारी पुरुष सध्यां तिबेटमध्यें शिगॅटझी शहरानजीक राहत असतात. १८८४ च्या सुमारास ते हिंदुस्थानांत प्रवासार्थ आलेले होते. या जन्मीं ते जातीनें रजपूत आहेत. त्यांचा व हिंदी राष्ट्रीय सभेचे जनक मि. ह्यूम यांचा बराच पत्रव्यवहार होता व अलीकडे तो प्रसिद्ध झाला आहे. ह्यूम यांस काँग्रेस स्थापण्याची जी स्फूर्ति झाली तिचे उगम हे पुरुष होत असें मानण्यास बळकट कारणें आहेत. थिऑसफिकल सोसायटी ज्या दोन ऋषितुल्य पुरुषांनीं मूलतः स्थापिली, त्यांपैकीं मास्टर मोरया हे एक होत. दुसऱ्या ज्ञानी पुरुषाचें नांव 'देवापि' अथवा मास्टर कुठुमी असें आहे. यांचीहि सध्यांची राहण्याची जागा मास्टर मोर्य यांच्या जागेशेजारींच आहे. भविष्यकाळीं जो मानववंश निर्माण व्हावयाचा आहे त्याचे मास्टर मोर्या 'मनु' होणार आहेत. थिऑसफिकल सोसायटीचे पुढारी कर्नल ऑलकॉट, मॅडम ब्लॅव्हट्स्की, डॉ. बेझंट, वगैरेंचे हे गुरु होते. यांचा सध्यांचा जन्म रजपूत राजकुलांत झालेला असून ते राज्यत्याग करून तिबेटांत गेले असें समजतें. संस्कृत ग्रंथांत त्यांचें नांव 'मरु' असें दिलेलें आहे. याप्रमाणें थिऑसफी पंडितांचें म्हणणें पडतें.

**मॉर्ले, जॉन** (१८३८-१९२३)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व ग्रंथकार. हा प्रथम 'लिटररी गॅझेट', 'फॉर्टनाइटली रिव्ह्यू', वगैरे

नियतकालिकाचा संपादक होता. 'इंग्लिश मेन ऑफ लेटर्स सीरीज' (आंग्ल साहित्यिक चरित्रमाला) याचाहि तो संपादक असून त्या मालेंतील त्यानें लिहिलेलें बर्कचें चरित्र फार उत्कृष्ट वठलें आहे. व्होल्टेअर, रूसो, वालपोल, ग्लॅडस्टन, इ. वरहि त्यानें ग्रंथ लिहिले असून 'रिकलेक्शन' (आठवणी) हा ग्रंथ फार वाचला जातो. १८८६ व १८९२-९५ मध्यें तो आयर्लंडचा मुख्य चिटणीस व नंतर हिंदुस्थानचा चिटणीस १९०५-१९१० पर्यंत होता. हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधीं मोर्ले-मिंटो सुधारणा याच काळांतील होत. पुढें १९१०-१४ पर्यंत तो लॉर्ड प्रेसिडेंट ऑफ दि कौन्सिल या हुद्यावर होता. पण पहिल्या महायुद्धांत ग्रेट ब्रिटन पडलें तेव्हां मोर्ले यानें राजीनामा दिला. यानें आपला मोठा ग्रंथसंग्रह केंब्रिज विद्यापीठास अर्पण केला.

**मोर्शी**—वऱ्हाड, उमरावती जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ६२३ चौ. मैल व लो. सं. सुमारें दीड लाख आहे. वर्धा ही मोठी नदी तालुक्यांत आहे. मोर्शी हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून तेथें धनगरी घोंगड्या होतात.

**मोर्स, सॅम्युएल फिन्ले ब्रीझ** (१७९१-१८७२)—एक अमेरिकन संशोधक. यानें विद्युच्चुंबकाचा उपयोग तारायंत्राकडे करण्याचे बरेच प्रयोग करून शेवटीं १८३५ सालीं तसें एक चांगलें यंत्र तयार केलें. अमेरिकन काँग्रेसनें १८४३ सालीं त्याच्याकडून वॉशिंग्टन आणि बाल्टिमोर या शहरांमध्यें असें तारायंत्र सुरू करविलें व पुढें युरोप आणि अमेरिका या खंडांतून सर्वत्र त्याचें यंत्र सर्रहा वापरण्यांत येऊं लागलें.

मोर्स लेखन-पद्धति—या पद्धतीमध्यें टिंबें व लहान रेघा यांचा उपयोग केलेला असतो व त्यांच्या वेगवेगळ्या समुच्चयांच्या साहाय्यानें वर्णमालेंतील निरनिराळीं अक्षरें दाखविण्यांत येतात. परंतु तारायंत्र-पद्धतीमध्यें यंत्राच्या आवाजावरूनच बहुधा हीं अक्षरें ओळखण्यांत येतात. संदेश पाठविण्याच्या ठिकाणीं यंत्रावर विशिष्ट प्रकारचे ध्वनी काढण्यांत येतात व संदेश घेणाऱ्या ठिकाणीं तसेच ध्वनी उमटतात व त्यावरून संदेश घेणारा अक्षरांमध्यें लेखन करतो.

**मोल**—हे एक लहान कीटकभक्षी सस्तन प्राणी असून टाल्पीडी जातीमध्यें मोडतात. हे जमिनीखालीं बिळें करून राहतात. सामान्यतः हे पांच ते सहा इंच लांब असून त्यांचें डोकें मोठें असतें. डोळे बारीक असतात. त्यांचे कान लहान असून ते लपलेले असतात. यांची लव बारीक असून फार नरम असते.

**मोलद्**—(मोलिबडेनम). पांढऱ्या रुपेरी रंगाचा एक धातु. हा फारसा प्रसिद्ध नाहीं. तथापि विशिष्ट जातीचें पोलाद तयार करण्यासाठीं त्याचा उपयोग होतो. याचें विशिष्टगुरुत्व ८.६ ते ९.० असून परमाणुभारांक ९६ आहे. विजेचे दिवे, रेडिओंतील व्हॉल्ह, इ. त तंतूंना आधार म्हणून याच्या तारेचा उपयोग करतात.

**मोलिएर** (१६२२-१६७३)—एक फ्रेंच नाटककार. त्यानें १६५९ पासून नाटकें लिहिण्यास सुरुवात केली. तो नाटककार म्हणूनच नव्हे तर नट म्हणूनहि चांगला प्रसिद्धीस आला. त्याच्या नाटकांतून बुद्धीची चमक तर दिसते, पण समाजाचें सूक्ष्म अवलोकनहि प्रतीत होतें. 'लमिझान्थ्रोप' हें त्याचें नाटक सर्वोत्कृष्ट गणलें जातें. तथापि त्याच्या सर्वच नाटकांतून उद्बोधक विनोद व विडंबन दृष्टीस पडतें. आधुनिक समाजांत जी झब्बूशाही शिरली आहे तीवर उतारा म्हणून त्याचीं नाटके अद्यापिहि उपयुक्त आहेत. मराठी नाटककार माधवराव जोशी यांनीं कांहीं मोलिएरचीं नाटकें रूपांतरित करून प्रसिद्धि मिळविली आहे. मोलिएर हा विनोद-विडंबन यांचा उपयोग संयम राखून करी. आरिस्टोफेनीज आणि शेक्स्पियर यांच्या पंक्तीला तो बसतो व फ्रान्समध्यें तर तो प्रति-शेक्स्पियरच आहे.

**मोलोटोव्ह, व्याटशेस्लाव्ह मिखैलोविश** (१८९०- )—सोव्हिएट यूनियनच्या पीपल्स कॉमिसर्सच्या कौन्सिलचा अध्यक्ष व परराष्ट्रमंत्री. तो प्रथम राजकीय लेख लिहूं लागला. १९०७ सालीं तो बोल्शेव्हिक पक्षांत सामील झाला. १९०९ सालीं त्यानें स्वतःचें मूळ नांव स्क्रॅबिन बदलून मोलोटोव्ह हें नवें नांव धारण केलें. १९२४ सालीं कम्यूनिस्ट पक्षाच्या राजकीय मंडळाचा (पोलिटिकल ब्यूरोचा) सभासद झाल्यावर त्याची नेमणूक १९३० सालीं अध्यक्षाच्या जागीं झाली. १९३८ सालीं परराष्ट्र खात्याचा अधिकारी लिटव्हिनॉफ याला सरकारनें बडतर्फ केल्यावर त्या कामावर मोलोटोव्हला नेमलें. पुढें तो रशियाचा परराष्ट्रमंत्री झाला. स्टॅलिनच्या खालोखाल मोलोटोव्हला रशियन राजकारणांत स्थान आहे.

**मोल्ट्के, हेलमथ कार्ल बर्नहार्ड** (१८००-१८९१)—एक जर्मन फील्ड-मार्शल. ह्यानें १८५८ सालीं फॉन रून व बिस्मार्क यांच्या सहकार्यानें जर्मन सैन्याची फार मोठ्या प्रमाणावर पुनर्रचना केली. डॅनिश युद्ध (१८६४), ऑस्ट्रो-प्रशियन युद्ध (१८६६), आणि फ्रॅंको-प्रशियन युद्ध (१८७०-७१)

या तिन्ही युद्धांतील विजयांचें श्रेय मोल्ट्के याच्या युद्धकौशल्याला देण्यांत येतें.

**मोसमी वारे**—(मॉन्सून). वातावरण एकदम थंड किंवा ऊन झालें म्हणजे असे वारे वाहतात. आशिया खंडांत हिंवाळ्यांत महासागराचा भाग उष्ण (म्हणजे हवेचा दाब कमी) व उन्हाळ्यांत थंड (हवेचा दाब जास्त) अशी स्थिति असते. विषुववृत्ताजवळ समुद्राचें साधारण उष्णतामान जमिनीपेक्षां कमी असतें; पण अक्षांशांत वाढ होत गेली म्हणजे हें उष्णतामान चढत जाऊन जमिनीच्या उष्णतामानाला मागें टाकतें. यामुळें जमिनीवरून पाण्याकडे व पाण्यावरून जमिनीकडे वारे वाहत असतात. हिंवाळ्यांत ईशान्य वारे चिनी समुद्र, कोचीनचीन आणि हिंदी महासागर यांवरून वाहतात, तर उन्हाळ्यांत हिंदी महासागरावरून नैर्ऋत्य वारे हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्याकडे वाहत जातात; हेच पावसाळी वारे होत. हे नैर्ऋत्य पावसाळी वारे गंगाखोऱ्यावरून वाहतांना ईशान्य दिशा पत्करतात व यामुळें आसामकडे भयंकर पाऊस होतो.

मध्य अमेरिका, ब्राझील आणि आफ्रिका यांचा नैर्ऋत्य किनारा व ऑस्ट्रेलियाचा उत्तर किनारा या भागांतहि असे मोसमी वारे वाहतात; पण ते आशिया खंडांतल्याप्रमाणें जोरदार व महत्त्वाचे नसतात. हिंदुस्थानांत अशा मोसमी वाऱ्यांचें फार महत्त्व आहे.

**मोसल**—इराकमधील एक शहर. हें टायग्रीस नदीवर वसलें असून प्राचीन निनेव्हे शहराचे अवशेष समोरच दिसतात. बगदाद, सीरिया, कुर्दिस्तान व कॉन्स्टॅन्टिनोपल यांकडे जाणाऱ्या व्यापारी मार्गावर मोसल असल्यामुळें भरभराटलेलें दिसतें. मलमल (मसलिन हा शब्द मोसलवरून आला) आतां येथें होत नाहीं, तथापि कापडी माल पुष्कळ होतो. लो. सं. सुमारें ८०,०००.

**मोस्ले, सर ओसवॉल्ड** (१८९६— )—ब्रिटिश यूनियनचा पुढारी. सदर संस्था फॅसिस्ट पद्धतीची चळवळ करणाऱ्या ब्रिटिशांनीं चालविली होती. मोस्लेचें शिक्षण विंचेस्टर व सँढर्स्ट येथें झाल्यावर पहिल्या महायुद्धांत त्यानें फ्रान्समध्यें लष्करी नोकरी केली. १९१८–१९२२ पर्यंत तो कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षातर्फे मिडलसेक्स मतदार संघाच्या हॅरो विभागाचा समासद म्हणून पार्लमेंटांत निवडला गेला. नंतर १९२२–१९२४ सालीं इंडिपेंडंट पक्षाचा समासद म्हणून पार्लमेंटांत गेला. नंतर १९२४ सालीं मजूर पक्षांत तो सामील झाला व १९२५–१९३१ पर्यंत तो स्मेथविकतर्फे पार्लमेंटचा समासद होता. १९२९–३० सालीं मॅकडोनल्डचें प्रधानमंडळ पुन्हां अधिकारावर असतांना तो डची ऑफ लँकॅस्टरचा चॅन्सलर या अधिकारपदावर होता. त्यानें १९३१ सालीं 'ब्रिटिश यूनियन मूव्हमेंट' या नांवाची स्वतंत्र संस्था स्थापण्याकरितां मजूर पक्षाचा त्याग केला.

ब्रिटिश यूनियन चळवळ—सर ओसवॉल्डच्या या ब्रिटिश यूनियन नामक संस्थेचा कार्यक्रम, ब्रिटिश राज्यकारभारांत 'लीडरशिप'चें तत्त्व अमलांत आणणें हा होता. या 'लीडरशिप' च्या तत्त्वाचा अर्थ असा कीं, सदर 'ब्रिटिश यूनियन' ही संस्था सार्वजनिक निवडणुकींत विजय मिळवून अधिकारारूढ होण्याचा प्रयत्न करणार; अधिकार प्राप्त झाल्यावर 'जनरल पॉवर्स बिल' म्हणजे सर्वसामान्य अधिकारांचें बिल मंजूर करून घेऊन त्या कायद्यान्वयें राज्यकारभार चालवणार; ब्रिटिश यूनियन पक्षाचे सभासद यांना स्थानिक स्वराज्य संस्थांचे अध्यक्ष नेमण्यांत येईल आणि त्या संस्थांना प्रत्यक्ष अमलबजावणीचें काम करावें लागेल. पूर्वीचें केवळ वादविवाद करणारी संस्था हें या संस्थांचें स्वरूप नष्ट करण्यांत येईल. या स्थानिक स्वराज्य संस्थांचें अधिकारक्षेत्र विस्तृत करण्यांत येईल. हल्लींची पार्लमेंटरी लोकशाही पद्धत ही 'आर्थिक लोकशाही' (फायनॅन्शिअल डेमॉक्रसी) असल्यामुळें ती खरी लोकशाही नाहीं म्हणून ती नष्ट केली पाहिजे; आणि हल्लींचे भौगोलिक विभाग पाडून बनवलेले मतदार संघ रद्द करून धंदेवार मतदारसंघ बनवावयाचे आणि पार्लमेंटला 'टेक्निकल पार्लमेंट' असें स्वरूप द्यावयाचें. अशा या सरकारवर लोकमताचें नियंत्रण राहावें, म्हणून ठराविक मुदतींत सार्वजनिक मतदान घ्यावयाचें व राजाबद्दल राजनिष्ठा ठेवावयाची, हीं दोन्ही तत्त्वें या पक्षाला मान्य होतीं; पण सरकारविरोधी पक्ष मात्र नष्ट करावयाचे; तसेंच लॉर्डांची सभाहि नष्ट करावयाची; आणि त्या सभेऐवजीं कार्पोरेशन्सचें नॅशनल कौन्सिल स्थापून त्यांत इतर समासदांचीहि नेमणूक करावयाची. मुद्रणस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य यांवर निर्बंध घालून फक्त खरीखरी बातमी छापावयाची आणि औद्योगिक संस्थांना भाषणस्वातंत्र्य द्यावयाचें. समाजसत्तावाद, परराष्ट्रांना कर्ज देणें, आंतरराष्ट्रीय व्यापार यांना या पक्षाचा विरोध असून ब्रिटन व ब्रिटिश साम्राज्य यांनीं आपल्या बाजार-पेठांकरितां कच्चा व पक्का माल यांची वाढ करावयाची. ज्यू लोकांना परके मानून ज्यूंना व त्यांचे कैवारी असतील त्या लोकांना ब्रिटनमधून हांकलून द्यावयाचें. या ब्रिटिश यूनियन-पक्षाचें परराष्ट्रीय धोरण हिटलरशीं सलोखा करून जर्मन वसाहती जर्मनीला परत करण्याच्या मागणीला मान्यता द्यावयाची व महायुद्धाला विरोध करावयाचा, असें होतें. या पक्षाचें प्रचारकार्य व प्रचारतंत्र जर्मनींतल्या नाझी व इटालींतल्या फॅसिस्ट पद्धतीचें आहे. या

पक्षाचे सभासद काळे शर्ट वापरतात. नाझी फॅसिस्टांप्रमाणें दोन्ही हात वर करून सलामी देतात.

या पक्षाचा नेता मोस्ले व त्याचे कित्येक अनुयायी यांना ब्रिटिश सरकारनें १९४० च्या मे महिन्यांत अटकेंत ठेवलें होतें.

**मोह**—[ वर्ग–सापोटासी, इं. बेसिआ ]. पूर्वेकडील बेटें व ऑस्ट्रेलिया यांमध्यें आढळणारा एक वृक्ष. हिंदुस्थानांत याचीं फुलें खातात. याच्या फळांतील बियांचें तेलहि खातात किंवा त्याचा साबण व मेणबत्त्या करण्याकरितां उपयोग करतात. मोहाच्या फुलांची दारू करतात. साखरहि होते. पानांच्या पत्रावळी होतात. घटसर्पावर बी पाण्यांत उगाळून पाजतात. सर्पाच्या विषावरहि बी उगाळून लेप करतात.

**मोहनसिंग, कॅप्टन**—एक हिंदी क्रांतिकारक. सिंगापूर येथें उभारण्यांत आलेल्या पहिल्या आझाद हिंद सेनेचे सेनापति. आझाद हिंद सेनेचा उपयोग जपान्यांच्या कारवायांसाठीं होऊं नये म्हणून यांनीं प्रयत्न सुरू करतांच यांना सन १९४२ डिसेंबरमध्यें जपान्यांनीं अटक केली. युद्ध संपेपर्यंत हे जपानी लोकांच्या कैदेंतच होते. युद्धाच्या समाप्तीनंतर यांची मुक्तता झाल्यावर हे काँग्रेस सोशालिस्ट पक्षास येऊन मिळाले.

**मोहमंद प्रदेश**—जुन्या हिंदुस्थानची–आतां पाकिस्तानची वायव्यसरहद्द व पेशावर जिल्ह्याच्या वायव्येकडील प्रदेश. क्षे. फ. १२०० चौ. मैल. या प्रदेशांत मोहमंद लोक राहतात. यांच्यांत वरचे आणि खालचे असे दोन वर्ग आहेत. पश्चिमेकडील भाग अफगाणिस्तानाशीं व पूर्वेकडील पाकिस्तान-हिंदुस्थानशीं राजकीय दृष्ट्या संलग्न आहे. त्यामुळें वरचेवर या दोन वर्गांत तंटे होत असतात. मोहमंद लोकांचें दुसरें नांव डोकरा ( म्हणजे दोन घरें असणारे ) असें आहे. हे लोक उन्हाळ्यांत दुसऱ्या ठिकाणीं राहावयास जातात यावरून हें दुधऱ्ये नांव पडलें. या लोकांवर वर्चस्व ठेवणें कठिण जातें. इंग्रज सरकारनें १८८० सालापासून या लोकांना आपल्या कह्यांत ठेवण्याचा प्रयत्न चालविला. १९३३ सालीं या लोकांनीं हिंदुस्थानांतील राजकीय चळवळींत भाग घेऊन बंडखोरी केली होती. आतां हिंदुस्थानच्या विभागणीनंतर पाकिस्तानशीं स्वतंत्रतेबद्दल तंटा आहे.

**मोहरम**—हा ताबुतांचा सण मुसलमानी मोहरम महिन्यांत येतो. मुसलमानांचे पहिले पुढारी किंवा धर्मवीर हसन आणि हुसेन हे मारले गेले म्हणून शोक करण्याचा वास्तविक हा काल. ताबूत हे म्हणूनच थडग्याप्रमाणें असतात व हाय हाय करीत मुसलमान ते थंड करतात.

**मोहरी**—[ वर्ग–क्रूसिफेरी, जाति–सिनापिस ; इं. मस्टर्ड ]. क्रूसिफेरी हा द्विदल वनस्पतींचा फार मोठा वर्ग आहे. या वर्गांतील वनस्पतींस सहा पुंकेसरयुक्त फुलें येतात. मोहरी, कोबी, मुळा, वगैरे या वर्गांत मोडतात. मोहरीचें झाड सर्वांच्या परिचयाचें आहे. याच्या बिया मसाल्यामध्यें, लोणच्यांत वगैरे वापरतात. मोहरीचा औषधांतहि उपयोग करतात. मोहरीचें तेलहि काढतात. तें चवीला फार तिखट असून त्याचा वासहि तिखट येतो व तें कातडीस लावल्यास फोड येतो. पानांची भाजी करतात. हिच्या अनेक जाती आहेत.

हिंदुस्थानांत हिचे तीन प्रकार आहेत : १. शिरसू, २. तोरिया, व ३. राई. तसेंच पांढरी व काळी मोहरी हिंदुस्थानांत होते. शिरसू उत्तर हिंदुस्थानांत अधिक पिकते, तर राई बंगाल आणि आसाम यांमध्यें होते. राईची भाजी होते. मोहरीचें तेल व अर्क काढतात. पेंड गुरांना घालतात. स्वयंपाकांत व औषधाच्या कामीं मोहरी वापरतात. वायूनें अंग धरल्यास मोहरीचें पोटीस बांधतात. वातविकारावर तेल लावतात. विषबाधा असल्यास चमचाभर मोहरीचें पीठ पाण्यांत कालवून पाजतात; म्हणजे उलटी होऊन विष उतरतें.

बाजारांत मोहरीचें तेल म्हणून जें विकतात तें 'कोल्झा ऑइल' [ ब्रासिका कँपेस्ट्रिस ] असून कोबीच्या एका जातीच्या झाडाच्या बियांपासून काढण्यांत येतें. हे यंत्रामध्यें वंगण घालण्याकरितां वापरतात. तसेंच दिव्यांत जाळण्याच्या कामीं व साबण करण्याकरितांहि वापरतात.

**मोहानी, हजरत**—एक हिंदी मुसलमान पुढारी. हे १९१३ मध्यें पदवीधर झाल्यावर त्यांनीं काँग्रेसमध्यें प्रवेश केला व 'उर्दू अमुअलता' नांवाचें पत्र सुरू केलें. १९०९ मध्यें यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन त्यांत दोन वर्षें सक्तमजुरी व ५०० रुपये दंडाची शिक्षा झाली. यांनीं दंड भरावयाचें नाकारल्यामुळें पोलिसांनीं यांचा हजारों रुपयांचा ग्रंथसंग्रह जप्त केला. तुरुंगांतून सुटल्यावर यांनीं एक स्टोअर काढला व 'ताजकराय सुआरा' या नांवाचें एक त्रैमासिक सुरू केलें. यांस पुन्हां एकदां शिक्षा झाली. सुटून आल्यावर यांनीं पुन्हां राजकारणांत भाग घेण्यास सुरुवात केली. १९२१ मध्यें हे मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते. १९२२ मध्यें यांस पुन्हां तुरुंगवासाची शिक्षा झाली. हे कायदेमंडळांत निवडून आले होते व तेथें आपल्या जहाल भाषणांनीं प्रसिद्ध झाले होते.

**मोहेंजो डारो**—सिंधमधील एक अत्यंत प्राचीन शहर. याचें जेव्हां हिंदुस्थानच्या पुराणवस्तुसंशोधन खात्यानें १९२४ सालीं उत्खनन केलें तेव्हां खि. पू. ३३००–२७०० या काळांतील अवशेष आढळून आले. सुमारें २४० एकर जागेवर या शहराची रचना दिसून आली व एकावर-दुसरें अशीं अनेक निरनिराळ्या काळचीं शहरें वसलीं असावींत असें अनुमान करण्यास पुरावे मिळाले. मोहेंजो डारो (मृतांचा प्रदेश) या

अत्यंत प्राचीन शहरांत रुंद रस्ते, प्रशस्त व चांगल्या बांधणीचीं घरें; चांगला पाणीपुरवठा व सांडपाण्याची अर्वाचीन काळालाहि साजेल अशी तरतूद वगैरे गोष्टी पाहून त्या काळच्या नगररचनेची कल्पना येते. मोठीं स्नानगृहेंहि त्या वेळीं चांगल्या प्रकारें केलेलीं आढळतात. मातीचीं लहान-मोठीं सुंदर आकाराचीं भांडीं, खेळणीं, मणी व अलंकार, सचित्र ठसे, धातूंच्या मूर्ती, इत्यादि अनेक संसारांतील वस्तूंचीं दृश्यें पाहून मन थक्क होतें. घरें दुमजली असून जिने बाहेरून असत. अंगण मात्र लहान असे. मोऱ्या जमिनीखालून नेलेल्या दिसतात, वर मलकूपहि (मॅनहोल) मोठे ठेवलेले आहेत. प्राण्यांच्या चित्रांत एकशिंगी बैल आढळतो. मोहेंजो डारो येथील अवशेषांवरून सुमेरी संस्कृतीचे लोक येथें असावेत असा संशोधकांचा तर्क आहे. आतां पाकिस्तान सरकारनें पुन्हां उत्खनन चालविलें आहे.

**मोहोळ**—मुंबई, सोलापूर जिल्हा, माढें तालुक्यांतील एक गांव. हें माढ्याच्या आग्नेयीस सुमारें २० मैलांवर पुणें–सोलापूर रस्त्यावर आहे. गांव जुनें असून दोन-तीन किल्ले आहेत. भानेश्वर व नीलकंठेश्वर अशीं दोन हेमाडपंती देवळें आहेत. मराठे अमदानींत येथें सुभ्याची कचेरी असे.

**मोक्ष**—जीव अज्ञानानें उपाधीच्या जाळ्यांत सांपडून जन्ममृत्यूचें दुःख भोगीत आहे. वास्तविक तो ब्रह्मच आहे. हें आपलें खरें स्वरूप जीवानें ओळखलें कीं त्याला पुनः जन्म येत नाहीं. ह्या अवस्थेचें नांव मोक्ष अथवा मुक्ति. ही मोक्षाची कल्पना विचारांचे पुष्कळ टप्पे गांठल्यानंतर आलेली आहे. प्राकृत मनाला भौतिक सुखानेंच आनंद होतो म्हणून तो देवाजवळ धनसंपत्ति, पुत्रपौत्र ह्यांची सारखी मागणी करीत असतो. ऋग्वेदकालीन ऋषींनीं भौतिक सुखप्राप्तीकरितांच इन्द्रादि देवांना आळविलें. ह्यानंतर स्वर्ग–नरकाची कल्पना सुचली. मेल्यावर इहजन्मीं सत्कृत्यें केलीं तर सुख मिळेल आणि हें मिळण्याचें स्थान म्हणजे स्वर्ग. स्वर्गप्राप्ति हेंच कांहीं काल लोकांचें ध्येय झालें. परंतु हें सुख चिरकालीन नसल्यानें ध्येय बदलावें लागलें. स्वर्गांत गेलें तरी पुण्य सरल्यावर जन्म आहेच. संसार दुःखमय आहे तो टाळावयाचा उपाय म्हणजे कर्म न करणें. कारण कर्मांमुळेंच जन्म घ्यावा लागतो हा सिद्धांत. सांख्यांनीं सर्व प्रकारचें कर्म टाळण्याची शिकवण दिली. परंतु हें अशक्य असल्याचें दिसून आल्यावर काम्य कर्में मात्र त्यागावीं, नियत कर्म अथवा निष्काम कर्म केलें असतां तें बंधनकारक होत नाहीं, म्हणजे जन्माला कारणीभूत होत नाहीं, असें प्रतिपादन होऊं लागलें. शेवटीं नियत कर्म झालें तरी तें जडच. त्यानें जन्मबंध तुटणार नाहीं, ज्ञानानेंच तुटेल, हें वेदांती मत फैलावलें. मी दुसरा कोणी नसून प्रत्यक्ष ब्रह्म आहें हें तें ज्ञान. हें शाब्दिक ज्ञान पुरें होत नाहीं. साक्षात् अनुभव येण्यानेंच जन्ममृत्यूपासून सुटका होते. हा अनुभव म्हणजे ब्रह्मानंदाचा अनुभव.

थिऑसफीच्या शिकवणीप्रमाणें पाहिल्यास मोक्ष ही सर्वांगपरिपूर्णतेची अवस्था होय. उत्क्रांतिदृष्ट्या माणसाची जेवढी वाढ होणें शक्य आहे तेवढी झाली. पृथ्वीवरील क्षेत्रांत जेवढे धडे शिकावयाचे तेवढे शिकून झाले. सर्व गुणांची, सर्व सामर्थ्यांची सर्वांगीण व परमावधीची वाढ झाली, सर्व दोष नष्ट झाले म्हणजे त्या स्थितीला मुक्ति किंवा मोक्ष म्हणतात. ही स्थिति येईपर्यंत माणूस पुनः पुनः जन्म घेत घेत आपल्या उत्क्रांतिपथावरून वाटचाल करीत असतो. सर्वांगपरिपूर्णतेच्या मुक्कामावर तो आला म्हणजे मग त्याला जन्म घेऊन येणें भाग असत नाहीं. त्याची इच्छा असल्यास तो जगामध्यें जगदुद्धारासाठीं जन्म घेतो. श्रीकृष्ण, बुद्ध, ख्राइस्ट, वगैरे पुरुष या पदवीपर्यंत पोहोंचले असून जगाला ज्ञान देण्यासाठीं आपल्या खुषीनें जन्म घेऊन आलेले होते. प्रयत्नतः ही स्थिति माणसाला प्राप्त करून घेतां येते. सर्वांगपरिपूर्णता हें माझें ध्येय आहे, असें निश्चयानें ठरवून तें मिळविण्याचा त्याला अनेक जन्म प्रयत्न करावा लागतो. तेव्हांच ही स्थिति त्याला प्राप्त होत असते. इतर अनेक गुणाबरोबर या स्थितींत लोकसंग्रह व जनसेवा करण्याची इच्छाहि उत्कट झालेली असते. समाधि, योगसिद्धि, वगैरे गोष्टीहि अशा माणसाला हस्तगत झालेल्या असतात. मोक्ष मिळविलेल्या अनेक व्यक्तींचा आपल्या पृथ्वीवर हल्लीं एक संघ असून जगाच्या उत्क्रांतीचीं खरीं सूत्रें या संघाच्या हातीं आहेत, असें थिऑसफीचें म्हणणें आहे.

**मौक्तिक भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें औषध अतिशय शीतवीर्य आहे. हातापायाची आग होणें, डोळ्यांची आग होणें, उन्हाळे लागणें, मूत्रमार्गाचा दाह, नेहमीं डोळे येणें, उष्णतेमुळें डोकें दुखणें, पित्तामुळें जुलाब होणें, योनिमार्गांतून रक्तस्राव होणें, मूळव्याधींतून रक्त पडणें, इत्यादि उष्णताजन्य विकारांवर हें भस्म अमृतासारखें काम करतें. हें औषध पुष्टिदायक, वृष्य व आयुष्य वाढविणारें आहे. ·।।· ते १ गुंज, दाडिमावलेह किंवा दूध-खडीसाखर यांतून देतात.

**मौनीबाबा** (समाधि १६८६)—रांगणा ऊर्फ प्रसिद्धगड किल्ल्याजवळील पाटगांव या गांवीं राहणारा एक साधु. सन १६७६ त शिवाजीनें याची भेट घेतली. शिवाजीची याच्यावर भक्ति असून दक्षिण दिग्विजयास निघण्यापूर्वीं सात तास उभा राहून त्यानें याचा आशीर्वाद मिळवला अशी आख्यायिका आहे. सिंधुदुर्ग किल्ल्यांतील शिवाजीच्या मंदिराच्या बाहेरच्या गाभाऱ्यांत याची मूर्ति आहे. पाटगांवला याची समाधि असून तेथें दर वर्षीं रथसप्तमीपासून सहा दिवस बाबांच्या पुण्यतिथीचा

पक्षाचे सभासद काळे शर्ट वापरतात. नाझी फॅसिस्टांप्रमाणें दोन्ही हात वर करून सलामी देतात.

या पक्षाचा नेता मोस्ले व त्याचे कित्येक अनुयायी यांना ब्रिटिश सरकारनें १९४० च्या मे महिन्यांत अटकेंत ठेवलें होतें.

**मोह**—[ वर्ग–सापोटासी, इं. बेसिआ ]. पूर्वेकडील बेटें व ऑस्ट्रेलिया यांमध्यें आढळणारा एक वृक्ष. हिंदुस्थानांत याचीं फुलें खातात. याच्या फळांतील बियांचें तेलहि खातात किंवा त्याचा साबण व मेणबत्त्या करण्याकरितां उपयोग करतात. मोहाच्या फुलांची दारू करतात. साखरहि होते. पानांच्या पत्रावळी होतात. घटसर्पावर बी पाण्यांत उगाळून पाजतात. सर्पाच्या विषावरहि बी उगाळून लेप करतात.

**मोहनसिंग, कॅप्टन**—एक हिंदी क्रांतिकारक. सिंगापूर येथें उभारण्यांत आलेल्या पहिल्या आझाद हिंद सेनेचे सेनापति. आझाद हिंद सेनेचा उपयोग जपान्यांच्या कारवायांसाठीं होऊं नये म्हणून यांनीं प्रयत्न सुरू करतांच यांना सन १९४२ डिसेंबरमध्यें जपान्यांनीं अटक केली. युद्ध संपेपर्यंत हे जपानी लोकांच्या कैदेंतच होते. युद्धाच्या समाप्तीनंतर यांची मुक्तता झाल्यावर हे कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षास येऊन मिळाले.

**मोहमंद प्रदेश**—जुन्या हिंदुस्थानची–आतां पाकिस्तानची वायव्यसरहद्द व पेशावर जिल्ह्याच्या वायव्येकडील प्रदेश. क्षे. फ. १२०० चौ. मैल. या प्रदेशांत मोहमंद लोक राहतात. यांच्यांत वरचे आणि खालचे असे दोन वर्ग आहेत. पश्चिमेकडील भाग अफगाणिस्तानाशीं व पूर्वेकडील पाकिस्तान-हिंदुस्थानशीं राजकीय दृष्ट्या संलग्न आहे. त्यामुळें वरचेवर या दोन वर्गांत तंटे होत असतात. मोहमंद लोकांचें दुसरें नांव डोकरा ( म्हणजे दोन घरें असणारे ) असें आहे. हे लोक उन्हाळ्यांत दुसऱ्या ठिकाणीं राहावयास जातात यावरून हें दुसरें नांव पडलें. या लोकांवर वर्चस्व ठेवणें कठिण जातें. इंग्रज सरकारनें १८८० सालापासून या लोकांना आपल्या कह्यांत ठेवण्याचा प्रयत्न चालविला. १९३३ सालीं या लोकांनीं हिंदुस्थानांतील राजकीय चळवळींत भाग घेऊन बंडखोरी केली होती. आतां हिंदुस्थानच्या विभागणीनंतर पाकिस्तानशीं स्वतंत्रतेबद्दल तंटा आहे.

**मोहरम**—हा ताबुतांचा सण मुसलमानी मोहरम महिन्यांत येतो. मुसलमानांचे पहिले पुढारी किंवा धर्मवीर हसन आणि हुसेन हे मारले गेले म्हणून शोक करण्याचा वास्तविक हा काल. ताबूत हे म्हणूनच थडग्याप्रमाणें असतात व हाय हाय करीत मुसलमान ते थंड करतात.

**मोहरी**—[ वर्ग–क्रूसिफेरी, जाति–सिनापिस ; इं. मस्टर्ड ]. क्रूसिफेरी हा द्विदल वनस्पतींचा फार मोठा वर्ग आहे. या वर्गांतील वनस्पतींस सहा पुंकेसरयुक्त फुलें येतात. मोहरी, कोबी, मुळा, वगैरे या वर्गांत मोडतात. मोहरीचें झाड सर्वांच्या परिचयाचें आहे. याच्या बिया मसाल्यामध्यें, लोणच्यांत वगैरे वापरतात. मोहरीचा औषधांतहि उपयोग करतात. मोहरीचें तेलहि काढतात. तें चवीला फार तिखट असून त्याचा वासहि तिखट येतो व तें कातडीस लावल्यास फोड येतो. पानांची भाजी करतात. हिच्या अनेक जाती आहेत.

हिंदुस्थानांत हिचे तीन प्रकार आहेत : १. शिरसू, २. तोरिया, व ३. राई. तसेंच पांढरी व काळी मोहरी हिंदुस्थानांत होते. शिरसू उत्तर हिंदुस्थानांत अधिक पिकते, तर राई बंगाल आणि आसाम यांमध्यें होते. राईची भाजी होते. मोहरीचें तेल व अर्क काढतात. पेंड गुरांना घालतात. स्वयंपाकांत व औषधाच्या कामीं मोहरी वापरतात. वायूनें अंग धरल्यास मोहरीचें पोटीस बांधतात. वातविकारावर तेल लावतात. विषबाधा असल्यास चमचाभर मोहरीचें पीठ पाण्यांत कालवून पाजतात; म्हणजे उलटी होऊन विष उतरतें.

बाजारांत मोहरीचें तेल म्हणून जें विकतात तें ‘कोल्झा ऑइल’ [ ब्रासिका कँपेस्ट्रिस ] असून कोबीच्या एका जातीच्या झाडाच्या बियांपासून काढण्यांत येतें. हें यंत्रामध्यें वंगण घालण्याकरितां वापरतात. तसेंच दिव्यांत जाळण्याच्या कामीं व साबण करण्याकरितांहि वापरतात.

**मोहानी, हजरत**—एक हिंदी मुसलमान पुढारी. हे १९१३ मध्यें पदवीधर झाल्यावर त्यांनीं कॉंग्रेसमध्यें प्रवेश केला व ‘ उर्दू अमुअलता ’ नांवाचें पत्र सुरू केलें. १९०९ मध्यें यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन त्यांत दोन वर्षें सक्तमजुरी व ५०० रुपये दंडाची शिक्षा झाली. यांनीं दंड भरावयाचें नाकारल्यामुळें पोलिसांनीं यांचा हजारों रुपयांचा ग्रंथसंग्रह जप्त केला. तुरुंगांतून सुटल्यावर यांनीं एक स्टोअर काढला व ‘ताजकराय सुआरा’ या नांवाचें एक त्रैमासिक सुरू केलें. यांस पुन्हां एकदां शिक्षा झाली. सुटून आल्यावर यांनीं पुन्हां राजकारणांत भाग घेण्यास सुरुवात केली. १९२१ मध्यें हे मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते. १९२२ मध्यें यांस पुन्हां तुरुंगवासाची शिक्षा झाली. हे कायदेमंडळांत निवडून आले होते व तेथें आपल्या जहाल भाषणांनीं प्रसिद्ध झाले होते.

**मोहेंजो डारो**—सिंधमधील एक अत्यंत प्राचीन शहर. याचें जेव्हां हिंदुस्थानच्या पुराणवस्तुसंशोधन खात्यानें १९२४ सालीं उत्खनन केलें तेव्हां ख्रि. पू. ३३००–२७०० या काळांतील अवशेष आढळून आले. सुमारें २४० एकर जागेवर या शहराची रचना दिसून आली व एकावर-दुसरें अशीं अनेक निरनिराळ्या काळचीं शहरें वसलीं असावींत असें अनुमान करण्यास पुरावे मिळाले. मोहेंजो डारो (मृतांचा प्रदेश) या

अत्यंत प्राचीन शहरांत रुंद रस्ते, प्रशस्त व चांगल्या बांधणीचीं घरें, चांगला पाणीपुरवठा व सांडपाण्याची अर्वाचीन काळालाहि साजेल अशी तरतूद वगैरे गोष्टी पाहून त्या काळच्या नगररचनेची कल्पना येते. मोठीं स्नानगृहेंहि त्या वेळीं चांगल्या प्रकारें केलेलीं आढळतात. मातीचीं लहान-मोठीं सुंदर आकाराचीं भाडीं, खेळणीं, मणी व अलंकार, सचित्र ठसे, धातूंच्या मूर्ती, इत्यादि अनेक संसारांतील वस्तूंचीं दृश्यें पाहून मन थक्क होतें. घरें दुमजली असून जिने बाहेरून असत. अंगण मात्र लहान असे. मोऱ्या जमिनीखालून नेलेल्या दिसतात, वर मलकूपहि (मॅनहोल) मोठे ठेवलेले आहेत. प्राण्यांच्या चित्रांत एकशिंगी बैल आढळतो. मोहेंजो डारो येथील अवशेषांवरून सुमेरी संस्कृतीचे लोक येथें असावेत असा संशोधकांचा तर्क आहे. आतां पाकिस्तान सरकारनें पुन्हां उत्खनन चालविलें आहे.

**मोहोळ**—मुंबई, सोलापूर जिल्हा, माढें तालुक्यांतील एक गांव. हें माढ्याच्या आग्नेयीस सुमारें २० मैलांवर पुणें–सोलापूर रस्त्यावर आहे. गांव जुनें असून दोन-तीन किल्ले आहेत. भानेश्वर व नीलकंठेश्वर अशीं दोन हेमाडपंती देवळें आहेत. मराठे अमदानींत येथें सुभ्याची कचेरी असे.

**मोक्ष**—जीव अज्ञानानें उपाधीच्या जाळ्यांत सांपडून जन्ममृत्यूचें दुःख भोगीत आहे. वास्तविक तो ब्रह्मच आहे. हें आपलें खरें स्वरूप जीवानें ओळखलें कीं त्याला पुनः जन्म येत नाहीं. ह्या अवस्थेचें नांव मोक्ष अथवा मुक्ति. ही मोक्षाची कल्पना विचारांचे पुष्कळ टप्पे गांठल्यानंतर आलेली आहे. प्राकृत मनाला भौतिक सुखानेंच आनंद होतो म्हणून तो देवाजवळ धनसंपत्ति, पुत्रपौत्र ह्यांची सारखी मागणी करीत असतो. ऋग्वेदकालीन ऋषींनीं भौतिक सुखप्राप्तीकरितांच इन्द्रादि देवांना आळविलें. ह्यानंतर स्वर्ग–नरकाची कल्पना सुचली. मेल्यावर इहजन्मीं सत्कृत्यें केलीं तर सुख मिळेल आणि हें मिळण्याचें स्थान म्हणजे स्वर्ग. स्वर्गप्राप्ति हेंच कांहीं काल लोकांचें ध्येय झालें. परंतु हें सुख चिरकालीन नसल्यानें ध्येय बदलावें लागलें. स्वर्गांत गेलें तरी पुण्य सरल्यावर जन्म आहेच. संसार दुःखमय आहे तो टाळावयाचा उपाय म्हणजे कर्म न करणें. कारण कर्मामुळेंच जन्म घ्यावा लागतो हा सिद्धांत. सांख्यांनीं सर्व प्रकारचें कर्म टाळण्याची शिकवण दिली. परंतु हें अशक्य असल्याचें दिसून आल्यावर काम्य कर्में मात्र त्यागावीं, नियत कर्म अथवा निष्काम कर्म केलें असतां तें बंधनकारक होत नाहीं, म्हणजे जन्माला कारणीभूत होत नाहीं, असें प्रतिपादन होऊं लागलें. शेवटीं नियत कर्म झालें तरी तें जडच. त्यानें जन्मबंध तुटणार नाहीं, ज्ञानानेंच तुटेल, हें वेदांती मत फैलावलें. मी दुसरा कोणी नसून प्रत्यक्ष ब्रह्म आहें हें तें ज्ञान. हें शाब्दिक ज्ञान पुरें होत नाहीं. साक्षात् अनुभव येण्यानेंच जन्ममृत्यूपासून सुटका होते. हा अनुभव म्हणजे ब्रह्मानंदाचा अनुभव.

थिऑसफीच्या शिकवणीप्रमाणें पाहिल्यास मोक्ष ही सर्वांगपरिपूर्णतेची अवस्था होय. उत्क्रांतिदृष्ट्या माणसाची जेवढी वाढ होणें शक्य आहे तेवढी झाली. पृथ्वीवरील क्षेत्रांत जेवढे धडे शिकावयाचे तेवढे शिकून झाले. सर्व गुणांची, सर्व सामर्थ्यांची सर्वांगीण व परमावधीची वाढ झाली, सर्व दोष नष्ट झाले म्हणजे त्या स्थितीला मुक्ति किंवा मोक्ष म्हणतात. ही स्थिति येईपर्यंत माणूस पुनः पुनः जन्म घेत घेत आपल्या उत्क्रांतिपथावरून वाटचाल करीत असतो. सर्वांगपरिपूर्णतेच्या मुक्कामावर तो आला म्हणजे मग त्याला जन्म घेऊन येणें भाग असत नाहीं. त्याची इच्छा असल्यास तो जगामध्यें जगदुद्धारासाठीं जन्म घेतो. श्रीकृष्ण, बुद्ध, ख्राइस्ट, वगैरे पुरुष या पदवीपर्यंत पोहोंचले असून जगाला ज्ञान देण्यासाठीं आपल्या खुषीनें जन्म घेऊन आलेले होते. प्रयत्नतः ही स्थिति माणसाला प्राप्त करून घेतां येते. सर्वांगपरिपूर्णता हें माझें ध्येय आहे, असें निश्चयानें ठरवून तें मिळविण्याचा त्याला अनेक जन्म प्रयत्न करावा लागतो. तेव्हांच ही स्थिति त्याला प्राप्त होत असते. इतर अनेक गुणाबरोबर या स्थितींत लोकसंग्रह व जनसेवा करण्याची इच्छाहि उत्कट झालेली असते. समाधि, योगसिद्धि, वगैरे गोष्टीहि अशा माणसाला हस्तगत झालेल्या असतात. मोक्ष मिळविलेल्या अनेक व्यक्तींचा आपल्या पृथ्वीवर हल्लीं एक संघ असून जगाच्या उत्क्रांतीचीं खरीं सूत्रें या संघाच्या हातीं आहेत, असें थिऑसफीचें म्हणणें आहे.

**मौक्तिक भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें औषध अतिशय शीतवीर्य आहे. हातापायाची आग होणें, डोळ्यांची आग होणें, उन्हाळे लागणें, मूत्रमार्गाचा दाह, नेहमीं डोळे येणें, उष्णतेमुळें डोकें दुखणें, पित्तामुळें जुलाब होणें, योनिमार्गातून रक्तस्राव होणें, मूळव्याधींतून रक्त पडणें, इत्यादि उष्णताजन्य विकारांवर हें भस्म अमृतासारखें काम करतें. हें औषध पुष्टिदायक, वृष्य व आयुष्य वाढविणारें आहे. ·।।· ते १ गुंज, दाडिमावलेह किंवा दूध-खडीसाखर यांतून देतात.

**मौनीबाबा** (समाधि १६८६)—रांगणा ऊर्फ प्रसिद्धगड किल्ल्याजवळील पाटगांव या गांवीं राहणारा एक साधु. सन १६७६ त शिवाजीनें याची भेट घेतली. शिवाजीची याच्यावर भक्ति असून दक्षिण दिग्विजयास निघण्यापूर्वी सात तास उभा राहून त्यानें याचा आशीर्वाद मिळवला अशी आख्यायिका आहे. सिंधुदुर्ग किल्ल्यांतील शिवाजीच्या मंदिराच्या बाहेरच्या गाभाऱ्यांत याची मूर्ति आहे. पाटगांवला याची समाधि असून तेथें दर वर्षी रथसप्तमीपासून सहा दिवस बाबांच्या पुण्यतिथीचा

उत्सव होतो. यानें समाधि घेतल्यानंतर संभाजीनें याचा शिष्य तुरुगिरी यास त्याच्या गादीवर बसवलें.

**मौबिन**—दक्षिण ब्रह्मदेश, इरावती विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १६४८ चौ. मैल. हा इरावती नदीच्या मुखाजवळील बेचक्यांत वसला आहे. लो. सं. सुमारें सवातीन लक्ष. बहुतेक लोक बौद्ध धर्मी आहेत. ब्रह्मी भाषा प्रचारांत आहे. मुख्य पीक भात असून तंबाखू आणि मिरची होते. मच्छीमारीचा धंदा मोठ्या प्रमाणांत आहे. १८५२ सालीं ब्रह्मी युद्धांत इंग्रजांनीं येथील किल्ला सर केला. १८७५ सालीं हा जिल्हा बनविण्यांत आला. मौबिन गांव इरावती-कांठीं असून चांगलें व्यापारी ठिकाण आहे.

**मौर्य घराणें** ( खि. पू. ३२२–१८५ )—हिंदुस्थानावर ग्रीकांनीं स्वारी केल्या वेळीं गंगेच्या खोऱ्यांत एक नंद नांवाचें राजघराणें अस्तित्वांत होतें. या घराण्यांतील शेवटच्या नंद राजाला पदच्युत करून चंद्रगुप्त पाटलीपुत्राच्या सिंहासनावर बसला. चंद्रगुप्त फार कर्तबगार व शूर राजा होता. त्यानें बहुतेक हिंदुस्थान पादाक्रांत केला. त्याचा मुलगा बिंदुसार याच्याविषयीं फारशी माहिती नाहीं, पण त्याचा मुलगा अशोक यानें मात्र त्रिखंड कीर्ति मिळविली व आपलें नांव अजरामर करून ठेवलें. त्याचे शिलालेख ठिकठिकाणीं आहेत. कलिंगाशीं झालेल्या युद्धांत जी भयंकर प्राणहानि झाली त्यामुळे त्याला अहिंसेची मोठी उपरति झाली व त्यानें बौद्ध धर्माचा स्वीकार करून त्याचा प्रसार करण्याचें कार्य आमरण केलें. अकबराच्या पूर्वी हिंदुस्थानांत सर्वश्रेष्ठ असा हा एकच राजा होऊन गेला. त्या काळची राज्यव्यवस्था कशी पद्धतशीर आणि प्रगतिपर होती हें कौटिलीय अर्थशास्त्र नांवाच्या ग्रंथावरून चांगलें कळून येतें. अशोकानंतर त्याचें साम्राज्य फुटलें व शेवटचा राजा बृहद्रथ याला सेनापति पुष्यमित्र शुंग यानें ठार मारून मगधाचें मौर्य घराणें बुडविलें. इतर मौर्य मांडलिक राजे वेगवेगळ्या भागांत लहान लहान राज्यें करून होते. देवगिरीच्या यादवांचा एक मांडलिक मौर्य राजा १०७० च्या सुमारास होता.

कोंकणांतहि चालुक्यांचें माडलिक असलेलें मौर्य घराणें होतें. पंधराव्या–सोळाव्या शतकांत मोरे नांवाचें एक मराठे घराणें महाराष्ट्रांत प्रसिद्धीस आलें. तें मौर्यांपैकींच असावें. जावळीचे चंद्रराव मोरे या घराण्यांतील होत. (चंद्रगुप्त, बिंदुसार व अशोक यांचीं चरित्रें पाहा.)

**मौलमीन**—ब्रह्मदेश, तेनासरीम विभागांतील एक मोठें शहर. हें बंदर असून येथून रंगूनला बोटी जातात. लोकसंख्या साठ हजारांवर आहे. या ठिकाणीं दागिने व हस्तिदंती जिन्नस चांगले होतात. लांकडाचा व्यापार फार मोठा आहे. युरोपियन वस्ती बरीच आहे.

**म्यिंग्यन**—वरचा ब्रह्मदेश, म्यिकतिल विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३१०७ चौ. मै.. लो. सं. ४,४१,९०५. यांतून इरावती नदी वाहते. पागनच्या इतिहासांत याला बरेंच स्थान आहे. प्रदेश डोंगराळ आहे. दागिने व भांडीं तयार करण्याचे धंदे महत्त्वाचे आहेत. म्यिंग्यन शहर इरावती नदीच्या कांठीं आहे. येथें एक तलाव आहे. पूर्वी लष्करी छावणी होती. लो. सं. १६,३७९.

**म्यिताक्यिन**—वरचा ब्रह्मदेश, मंडाले विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १०,९९७ चौ. मै. लो. सं. ८५,८७७. इरावती या जिल्ह्यांतील मुख्य नदी आहे. इंदावगयी हें ब्रह्मदेशांतील मोठें सरोवर या जिल्ह्यांतच आहे. इरावतीच्या कांठचा प्रदेश सुपीक आहे. बांबू पुष्कळ होतो. या ठिकाणीं पूर्वी शान लोकांचें राज्य होतें. नंतर हें ब्रह्मी अमलाखालीं गेलें. त्यानंतर गेल्या शतकांत काचीन लोकांचें बंड मोडून ब्रिटिशांनीं आपलें राज्य सुरू केलें. तांदूळ, तंबाकू, कापूस, इमारती लांकूड हे जिन्नस होतात व सोनें आणि रत्नेंहि सांपडतात. चिनी लोकांचा येथें व्यापार चालतो. म्यिताक्यिन शहरची लो. सं. सुमारें सहा हजार आहे.

**म्युनिक**—जर्मनींतील तिसरें मोठें शहर. ही बव्हेरियाची राजधानी इसार नदीवर वसली आहे. शास्त्रीय उपकरणें, बंदुका, यंत्रें, इ. तयार होतात. रेखाकला, खोदकला, व्यावहारिक कला मोठ्या प्रमाणावर येथें पाहावयास मिळतात. या ठिकाणीं अनेक संस्था आहेत व एक विद्यापीठहि आहे. हें शहर हेन्री दि लायन यानें ११५८ त स्थापिलें. पहिल्या लुड्विगनें याला मोठ्या महत्त्वाला चढविलें. लो. सं. ६,३०,७११.

**म्यौंगमय**—खालचा ब्रह्मदेश, इरावती विभागांतील नदीच्या मुखाजवळील जिल्हा. क्षे. फ. २६४२ चौ. मै.. लो. सं. सुमारें साडेतीन लक्ष. जमीन गाळाची बनलेली आहे. पाऊस ७० इंच पडतो. दोन शहरें व ६३५ खेडीं आहेत. तांदूळ, ऊंस, नारळ हीं मुख्य पिकें होत. मच्छीमारीचा धंदा मोठा आहे. मातीचीं भांडीं व मीठ यांचाहि मोठा व्यापार चालतो. पेगूचे राजे या प्रदेशावर राज्य करीत होते. 'म्यौंगमय' शब्दाचा अर्थ सुखी कालवा असा आहे. गांवाची लो. सं. ६५६१ आहे. १८५३ सालीं करेण लोकांनीं येथें मोठें बंड केलें होतें.

**म्लेंछ**—किंवा म्लेच्छ. या संज्ञेनें परदेशी लोक असा बोध होतो. म्लेंछ म्हणजे वेदबाह्य अशा पुंड किंवा नैतिक बंधनें नसलेल्यांची जात असा जुना अर्थ होता. यवनांना म्लेंछ म्हटलें आहे व यवन म्हणजे नुसते मुसलमानच नव्हे तर त्यांत पाश्चिमात्य लोकहि येतात. हिंदुस्थानांतील बहिष्कृत जातींसहि

ही संज्ञा लावतात. हिंदुस्थानच्या आसमंतांतील प्रदेशांना, तेथील लोकांना, वस्तूंना, व्यवहारांना म्लेंछ शब्द स्मृतिपुराणांतून लावलेला आढळतो.

**म्वासान, हेन्री** (१८५२-१९०७)—हा फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ पॅरिसमध्यें जन्मला व तेथेंच त्याचें शिक्षण झालें. तो १८८६ सालीं रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. स. १८८६ तच त्यानें पालाशप्लविदा (पोटॅशियम फ्लुओराइड)चें विद्युत्पृथक्करण करून प्लविन द्रव्य निराळें काढलें. कर्बाचें ग्रॅफाइट व हिरा यांत रूपांतर करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती व त्याचप्रमाणें कृत्रिम हिरा त्यानें तयार केलाच. या शोधामुळेंच त्याला विजेच्या भट्टीचा शोध लागला, व तिच्या साहाय्यानें कर्बिदें, शैलिदें, इ. अनेक पदार्थ तयार केले. प्लविनचा शोध लावल्याबद्दल त्याला लेकेस पारितोषिक (१८८७) मिळालें व १९०६ सालीं त्याला रसायनशास्त्रांतील नैपुण्याबद्दल नोबेल पारितोषिक मिळालें.

**म्हणी**—जीवनांतील अनुभवांचें सार थोड्या शब्दांत मजेदार रीतीनें म्हणींमध्यें आणलेलें आढळतें. पृथ्वीवर जल, अन्न, आणि सुभाषित अशीं तीन रत्नें आहेत असें एका संस्कृत सुभाषितांत म्हटलें आहे तें खोटें नाहीं. सुभाषितांत अनेक शतकांचे अनेक लोकांचे अनुभव सांठविलेले असतात. सर्व राष्ट्रांतून हें लोकवाङ्मय आढळतें. सुशिक्षितांपेक्षां अशिक्षितांत, पुरुषांपेक्षां बायकांत म्हणी वापरण्याची फार चाल आहे. मोठ्या प्रवचनांनें जें पटवितां येईल तें एका म्हणीच्या वाक्यानें सहज मनावर ठसविलें जातें. अशा जुन्या म्हणींचे संग्रह करण्याची प्रथाहि जुनीच आहे.

ग्रीक आणि लॅटिन म्हणींचे संग्रह एरॅसमसनें 'अॅडेजिया'-मध्यें केलेले आढळतात. इंग्रजी म्हणी कॅमडेन, हॉवेल, बोहन, इ. नीं संग्रहित केल्या असून स्कॉटिश, फ्रेंच, जर्मन, अरबी, वगैरे भाषांतील म्हणीहि पुस्तकांत ग्रथित केल्या आहेत. संस्कृत सुभाषितांचे संग्रह 'सुवचनानि', 'सुभाषितरत्नभांडागारम्' यांसारख्या ग्रंथांत पाहावयास मिळतात. मराठींत असा सर्वांत मोठा प्रयत्न 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' या नांवानें दोन मोठ्या विभागांत महाराष्ट्र कोश मंडळानें केलेला आढळेल.

**म्हापसें**—गोवें, बारदेश जिल्ह्याचें ठिकाण. गांव चांगलें मोठें व व्यापारी आहे. वस्ती सुमारें दहा हजार आहे. येथें मराठी शाळा, वाचनालय व इंग्रजी शाळाहि आहे. म्युनिसिपालिटी व सेशन कोर्ट आहे.

**म्हैस**—गोवर्गांतील हा एक सस्तन सखुर रवंथ करणारा प्राणी असून बैलापेक्षां थोडा मोठा व बळकट असतो. म्हशी हिंदुस्थानांत पुष्कळ आढळतात. पूर्ण वाढलेला रेडा धीट व बळकट असतो. म्हशीपासून दूध, लोणी, तूप, वगैरे मिळतें व तिच्या कातड्यापासून चांगलें चामडें तयार होतें. यांची एक जात आरगे म्हणून आहे ती सर्वांत मोठी असते. केप ऑफ गुडहोपमध्यें एका जातीची म्हैस आढळते तिचीं शिंगें निराळीं असतात व त्या म्हशी जरा मोठ्या असतात. गाईंपेक्षां म्हशी पुष्कळ दूध देतात म्हणून दुधासाठीं हिंदुस्थानांत आज सर्वत्र म्हशीच बाळगतात.

हिंदुस्थानांतील म्हशींच्या जाती:—

१. मुर्रा—ही फार प्रसिद्ध आहे. हिची पैदास मुख्यतः दक्षिण पंजाबांत होते. रोहटक, कर्नाळ व दिल्ली या टापूंत या म्हशी होतात. मुर्रा हें नांव म्हशींच्या शिंगावरून पडलें आहे. ही म्हैस साधारणपणें वर्षास १२०० ते १५०० पौंड दूध देते.

२. नीली—माँटगॉमेरी, मुलतान व फिरोझपूर या भागांत ही जात होते. दूध १००० ते १२०० पौंड.

३. रावी— स्थान लायलपूर जिल्हा. साधारणपणें ही म्हैस सहा हजार पौंड दूध देते.

४. जाफराबादी—काठेवाडांत हिची पैदास होते. रोज ३० ते ३५ पौंड दूध निघतें.

५. सुरती—गुजराथेंत आनंद व बलसाड तालुक्यांत या म्हशी होतात. दररोज २० ते २५ पौंड दूध देतात.

६. नागपुरी—या म्हशी रोज १५ ते २८ पौंडांपर्यंत दूध देतात. 'गुरें' पाहा.

**म्हैसाणा**—बडोदें संस्थान, कडी प्रांताचें मुख्य ठिकाण. हें अहमदाबादेच्या उत्तरेस ४० मैलांवर असून आगगाडीचें जंक्शन स्टेशन आहे. लो. सं. सुमारें चौदा हजार, मुख्य वस्ती जैन व हिंदू यांची आहे. महाराष्ट्रीय मंडळीहि सुमारें पांचशें असून त्यांच्या कांहीं सार्वजनिक संस्था आहेत. बडोदें सरकारचा राजवाडा व जैन देवळें, अंधळे-बहिरे-मुके यांसाठीं शाळा, सार्वजनिक ग्रंथालय, वगैरे इमारती आहेत.

उत्सव होतो. यानें समाधि घेतल्यानंतर संभाजीनें याचा शिष्य तुरुगिरी यास त्याच्या गादीवर बसवलें.

**मौबिन**—दक्षिण ब्रह्मदेश, इरावती विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १६४८ चौ. मैल. हा इरावती नदीच्या मुखाजवळील बेचक्यांत वसला आहे. लो. सं. सुमारें सवातीन लक्ष. बहुतेक लोक बौद्ध धर्मी आहेत. ब्रह्मी भाषा प्रचारांत आहे. मुख्य पीक भात असून तंबाखू आणि मिरची होते. मच्छीमारीचा धंदा मोठ्या प्रमाणांत आहे. १८५२ सालीं ब्रह्मी युद्धांत इंग्रजांनीं येथील किल्ला सर केला. १८७५ सालीं हा जिल्हा वनविण्यांत आला. मौबिन गांव इरावती-कांठीं असून चांगलें व्यापारी ठिकाण आहे.

**मौर्य घराणें** ( ख्रि. पू. ३२२–१८५ )—हिंदुस्थानावर ग्रीकांनीं स्वारी केल्या वेळीं गंगेच्या खोऱ्यांत एक नंद नांवाचें राजघराणें अस्तित्वांत होतें. या घराण्यांतील शेवटच्या नंद राजाला पदच्युत करून चंद्रगुप्त पाटलीपुत्राच्या सिंहासनावर बसला. चंद्रगुप्त फार कर्तबगार व शूर राजा होता. त्यानें बहुतेक हिंदुस्थान पादाक्रांत केला. त्याचा मुलगा बिंदुसार याच्याविषयीं फारशी माहिती नाहीं, पण त्याचा मुलगा अशोक यानें मात्र त्रिखंड कीर्ति मिळविली व आपलें नांव अजरामर करून ठेवलें. त्याचे शिलालेख ठिकठिकाणीं आहेत. कलिंगाशीं झालेल्या युद्धांत जी भयंकर प्राणहानि झाली त्यामुळें त्याला अहिंसेची मोठी उपरति झाली व त्यानें बौद्ध धर्माचा स्वीकार करून त्याचा प्रसार करण्याचें कार्य आमरण केलें. अकबराच्या पूर्वीं हिंदुस्थानांत सर्वश्रेष्ठ असा हा एकच राजा होऊन गेला. त्या काळची राज्यव्यवस्था कशी पद्धतशीर आणि प्रगतिपर होती हें कौटिलीय अर्थशास्त्र नांवाच्या ग्रंथावरून चांगलें कळून येतें. अशोकानंतर त्याचें साम्राज्य फुटलें व शेवटचा राजा बृहद्रथ याला सेनापति पुष्यमित्र शुंग यानें ठार मारून मगधाचें मौर्य घराणें बुडविलें. इतर मौर्य मांडलिक राजे वेगवेगळ्या भागांत लहान लहान राज्यें करून होते. देवगिरीच्या यादवांचा एक मांडलिक मौर्य राजा १०७० च्या सुमारास होता.

कोंकणांतहि चालुक्यांचें मांडलिक असलेलें मौर्य घराणें होतें. पंधराव्या-सोळाव्या शतकांत मोरे नांवाचें एक मराठे घराणें महाराष्ट्रांत प्रसिद्धीस आलें. तें मौर्यांपैकींच असावें. जावळीचे चंद्रराव मोरे या घराण्यांतील होत. ( चंद्रगुप्त, बिंदुसार व अशोक यांचीं चरित्रें पाहा. )

**मौलमीन**—ब्रह्मदेश, तेनासरीम विभागांतील एक मोठें शहर. हें बंदर असून येथून रंगूनला बोटी जातात. लोकसंख्या साठ हजारांवर आहे. या ठिकाणीं दागिने व हस्तिदंती जिन्नस चांगले होतात. लांकडाचा व्यापार फार मोठा आहे. युरोपियन वस्ती बरीच आहे.

**म्यिंग्यन**—वरचा ब्रह्मदेश, म्यिकतिल विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३१०७ चौ. मै.. लो. सं. ४,४१,९०५. यांतून इरावती नदी वाहते. पागनच्या इतिहासांत याला बरेंच स्थान आहे. प्रदेश डोंगराळ आहे. दागिने व भांडीं तयार करण्याचे धंदे महत्त्वाचे आहेत. म्यिंग्यन शहर इरावती नदीच्या कांठीं आहे. येथें एक तलाव आहे. पूर्वी लष्करी छावणी होती. लो. सं. १६,३७९.

**म्यितक्यिन**—वरचा ब्रह्मदेश, मंडाले विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १०,९९७ चौ. मै. लो. सं. ८५,८७७. इरावती या जिल्ह्यांतील मुख्य नदी आहे. इंदावगयी हें ब्रह्मदेशांतील मोठें सरोवर या जिल्ह्यांतच आहे. इरावतीच्या कांठचा प्रदेश सुपीक आहे. वांबू पुष्कळ होतो. या ठिकाणीं पूर्वी शान लोकांचें राज्य होतें. नंतर हें ब्रह्मी अमलाखालीं गेलें. त्यानंतर गेल्या शतकांत काचीन लोकांचें बंड मोडून ब्रिटिशांनीं आपलें राज्य सुरू केलें. तांदूळ, तंबाकू, कापूस, इमारती लांकूड हे जिन्नस होतात व सोनें आणि रत्नेंहि सांपडतात. चिनी लोकांचा येथें व्यापार चालतो. म्यितक्यिन शहरची लो. सं. सुमारें सहा हजार आहे.

**म्युनिक**—जर्मनींतील तिसरें मोठें शहर. ही बव्हेरियाची राजधानी इसार नदीवर वसली आहे. शास्त्रीय उपकरणें, बंदुका, यंत्रें, इ. तयार होतात. रेखाकला, खोदकला, व्यावहारिक कला मोठ्या प्रमाणावर येथें पाहावयास मिळतात. या ठिकाणीं अनेक संस्था आहेत व एक विद्यापीठहि आहे. हें शहर हेन्री दि लायन यानें ११५८ त स्थापिलें. पहिल्या लुड्विगनें याला मोठ्या महत्त्वाला चढविलें. लो. सं. ६,३०,७११.

**म्यौंगमय**—खालचा ब्रह्मदेश, इरावती विभागांतील नदीच्या मुखाजवळील जिल्हा. क्षे. फ. २६४२ चौ. मै.. लो. सं. सुमारें साडेतीन लक्ष. जमीन गाळाची बनलेली आहे. पाऊस ७० इंच पडतो. दोन शहरें व ६३५ खेडीं आहेत. तांदूळ, ऊंस, नारळ हीं मुख्य पिकें होत. मच्छीमारीचा धंदा मोठा आहे. मातीचीं भांडीं व मीठ यांचाहि मोठा व्यापार चालतो. पेगूचे राजे या प्रदेशावर राज्य करीत होते. 'म्यौंगमय' शब्दाचा अर्थ सुखी कालवा असा आहे. गांवाची लो. सं. ६५६१ आहे. १८५३ सालीं करेण लोकांनीं येथें मोठें बंड केलें होतें.

**म्लेंछ**—किंवा म्लेच्छ. या संज्ञेनें परदेशी लोक असा बोध होतो. म्लेंछ म्हणजे वेदबाह्य अशा पुंड किंवा नैतिक बंधनें नसलेल्यांची जात असा जुना अर्थ होता. यवनांना म्लेंछ म्हटलें आहे व यवन म्हणजे नुसते मुसलमानच नव्हे तर त्यांत पाश्चिमात्य लोकहि येतात. हिंदुस्थानांतील बहिष्कृत जातींसहि

ही संज्ञा लावतात. हिंदुस्थानच्या आसमंतांतील प्रदेशांना, तेथील लोकांना, वस्तूंना, व्यवहारांना म्लेंछ शब्द स्मृतिपुराणांतून लावलेला आढळतो.

**म्वासान, हेन्री** (१८५२–१९०७)—हा फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ पॅरिसमध्यें जन्मला व तेथेंच त्याचें शिक्षण झालें. तो १८८६ सालीं रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. स. १८८६ तच त्यानें पालाशप्लविदा (पोटॅशियम फ्लुओराइड)चें विद्युत्पृथक्करण करून प्लविन द्रव्य निराळें काढलें. कर्बाचें ग्रॅफाइट व हिरा यांत रूपांतर करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती व त्याचप्रमाणें कृत्रिम हिरा त्यानें तयार केलाच. या शोधामुळेंच त्याला विजेच्या भट्टीचा शोध लागला, व तिच्या साहाय्यानें कर्बिदें, शैलिदें, इ. अनेक पदार्थ तयार केले. प्लविनचा शोध लावल्याबद्दल त्याला लेकेस पारितोषिक (१८८७) मिळालें व १९०६ सालीं त्याला रसायनशास्त्रांतील नैपुण्याबद्दल नोबेल पारितोषिक मिळालें.

**म्हणी**—जीवनांतील अनुभवांचें सार थोड्या शब्दांत मजेदार रीतीनें म्हणींमध्यें आणलेलें आढळतें. पृथ्वीवर जल, अन्न, आणि सुभाषित अशीं तीन रत्नें आहेत असें एका संस्कृत सुभाषितांत म्हटलें आहे तें खोटें नाहीं. सुभाषितांत अनेक शतकांचे अनेक लोकांचे अनुभव सांठविलेले असतात. सर्व राष्ट्रांतून हें लोकवाङ्मय आढळतें. सुशिक्षितांपेक्षां अशिक्षितांत, पुरुषांपेक्षां बायकांत म्हणी वापरण्याची फार चाल आहे. मोठ्या प्रवचनानें जें पटवितां येईल तें एका म्हणीच्या वाक्यानें सहज मनावर ठसविलें जातें. अशा जुन्या म्हणींचे संग्रह करण्याची प्रथाहि जुनीच आहे.

ग्रीक आणि लॅटिन म्हणींचे संग्रह एरॅसमसनें 'अडॅजिया'-मध्यें केलेले आढळतात. इंग्रजी म्हणी कॅमडेन, हॉवेल, बोहन, इ. नीं संग्रहित केल्या असून स्कॉटिश, फ्रेंच, जर्मन, अरबी, वगैरे भाषांतील म्हणीहि पुस्तकांत ग्रथित केल्या आहेत. संस्कृत सुभाषितांचे संग्रह 'सुवचनानि', 'सुभाषितरत्नभांडागारम्' यांसारख्या ग्रंथांत पाहावयास मिळतात. मराठींत असा सर्वांत मोठा प्रयत्न 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' या नांवानें दोन मोठ्या विभागांत महाराष्ट्र कोश मंडळानें केलेला आढळेल.

**म्हापसें**—गोवें, बारदेश जिल्ह्याचें ठिकाण. गांव चांगलें मोठें व व्यापारी आहे. वस्ती सुमारें दहा हजार आहे. येथें मराठी शाळा, वाचनालय व इंग्रजी शाळाहि आहे. म्युनिसिपालिटी व सेशन कोर्ट आहे.

**म्हैस**—गोवर्गांतील हा एक सस्तन सखुर रवंथ करणारा प्राणी असून बैलापेक्षां थोडा मोठा व बळकट असतो. म्हशी हिंदुस्थानांत पुष्कळ आढळतात. पूर्ण वाढलेला रेडा धीट व बळकट असतो. म्हशीपासून दूध, लोणी, तूप, वगैरे मिळतें व तिच्या कातड्यापासून चांगलें चामडें तयार होतें. यांची एक जात आरणे म्हणून आहे ती सर्वांत मोठी असते. केप ऑफ गुडहोपमध्यें एका जातीची म्हैस आढळते तिचीं शिंगें निराळीं असतात व त्या म्हशी जरा मोठ्या असतात. गाईंपेक्षां म्हशी पुष्कळ दूध देतात म्हणून दुधासाठीं हिंदुस्थानांत आज सर्वत्र म्हशीच पाळगतात.

हिंदुस्थानांतील म्हशींच्या जाती:—

१. मुर्रा—ही फार प्रसिद्ध आहे. हिची पैदास मुख्यतः दक्षिण पंजाबांत होते. रोहटक, कर्नाळ व दिल्ली या टापूंत या म्हशी होतात. मुर्रा हें नांव म्हशीच्या शिंगावरून पडलें आहे. ही म्हैस साधारणपणें वर्षास १२०० ते १५०० पौंड दूध देते.

२. नीली—मॉंटगॉमेरी, मुलतान व फिरोझपूर या भागांत ही जात होते. दूध १००० ते १२०० पौंड.

३. रावी— स्थान लायलपूर जिल्हा. साधारणपणें ही म्हैस सहा हजार पौंड दूध देते.

४. जाफराबादी—काठेवाडांत हिची पैदास होते. रोज ३० ते ३५ पौंड दूध निघतें.

५. सुरती—गुजराथेंत आनंद व बलसाड तालुक्यांत या म्हशी होतात. दररोज २० ते २५ पौंड दूध देतात.

६. नागपुरी—या म्हशी रोज १५ ते २८ पौंडांपर्यंत दूध देतात. 'गुरें' पाहा.

**म्हैसाणा**—बडोदें संस्थान, कडी प्रांताचें मुख्य ठिकाण. हें अहमदाबादेच्या उत्तरेस ४० मैलांवर असून आगगाडीचें जंक्शन स्टेशन आहे. लो. सं. सुमारें चौदा हजार. मुख्य वस्ती जैन व हिंदू यांची आहे. महाराष्ट्रीय मंडळीहि सुमारें पांचशें असून त्यांच्या कांहीं सार्वजनिक संस्था आहेत. बडोदें सरकारचा राजवाडा व जैन देवळें, अंधळे-बहिरे-मुके यांसाठीं शाळा, सार्वजनिक ग्रंथालय, वगैरे इमारती आहेत.

**म्हैसूर संस्थान**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक मोठें संस्थान. उत्तरेस मुंबई इलाखा व बाकीच्या बाजूंस मद्रास इलाखा (फक्त नैर्ऋत्येस कुर्ग) अशी या संस्थानची मर्यादा आहे. पश्चिमेस मलनाड हा डोंगराळ भाग व पूर्वेस मैदान आहे. क्षे. फ. २९,४८३ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ७३,२८,८९६ आहे. सहासष्ट लक्षांवर लोक हिंदू आहेत व संस्थानची भाषा कानडी आहे. तीन-चतुर्थांश लोक शेतकीवर राहतात. मुख्य पिकें म्हणजे रागी, तांदूळ, बाजरी, हरभरा व ऊंस हीं होत. अंबाडी आणि कापूस दोर आणि कापड यांना उपयोगी पडतात. रेशमाचा धंदा संस्थानांत फार मोठ्या प्रमाणावर चालतो. सरकार शेतकी आणि उद्योगधंदे यांकडे विशेष लक्ष पुरवीत असल्यानें याबाबत पुष्कळ संस्था आणि प्रयोगालयें आहेत. साबण, चिनीमातीचीं भांडीं, रेशमी कापड, वीज, इ. चे कारखाने सरकारी आहेत. लोखंडाचा मोठा कारखाना भद्रावतीला जो सरकारनें चालविला आहे तो ब्रिटिश साम्राज्यांत दुसरा मोठा कारखाना म्हणतां येईल. या ठिकाणींच कागदाचाहि कारखाना आहे. साखर, कागद, रासायनिक द्रव्यें आणि खतें, प्लायवुड, रेशीम, कॉफी, तेलें, कांच, इ. अनेक धंदे खासगी भागीदारी मंडळ्यांनी चालविलेले आहेत. असे मोठ्या प्रमाणावरचे कारखाने व धंदे ४०० वर आहेत व त्यांतून पाऊण लाख मजूर काम करतात. लंडन येथें संस्थानचा व्यापारी प्रतिनिधि ठेवला आहे.

शिवसमुद्रम् येथें कावेरीला धरण बांधून जी वीज तयार केली जाते ती कोलारच्या सोन्याच्या खाणी, म्हैसूर आणि बंगलोर हीं शहरें व इतर गांवें यांना पुरविली जाते. कृष्णराजसागर, सिमशा, गिरसप्पा (जोग) या ठिकाणीं धरणें बांधून आणखी वीज तयार करून उद्योगधंद्यांना पुरविण्याचा प्रयत्न केला आहे. धरणांचें पाणी कालव्यांतून शेती, बागा यांनाहि पुरविलें जातें.

संस्थानांत एक विद्यापीठ, ४६ मुलांच्या व १४ मुलींच्या दुय्यम शाळा, २६१ मुलांच्या व ५५ मुलींच्या माध्यमिक शाळा व अनेक प्राथमिक शाळा आहेत. उद्योगधंदे शिकविण्यासाठींहि शिक्षणसंस्था आहेत. स्थापत्य, वैद्यक, शास्त्रीय आणि वाङ्मयीन महाविद्यालयें आहेत.

संस्थानचें स्वतःचें लष्कर व आगगाडी आहे. संस्थानचा कारभार एक दिवाण व पांचपर्यंत मंत्री दोन प्रातिनिधिक मंडळांच्या सल्ल्यानें चालवीत. आतां नुकते लोकशाही तत्त्वानुसार लोकांनीं निवडलेले मंत्री राज्यकारभार पाहूं लागले आहेत. नवीन राज्यकारभाराची घटना तयार होत आहे. संस्थानचें एकंदर उत्पन्न सुमारें सहा कोटी रुपये आहे.

संस्थानचा इतिहास अशोककालापासून निश्चित करतां येतो. नैर्ऋत्य भाग अशोकाच्या साम्राज्यांत मोडत असे. पुढें आंध्र, पल्लव, गंग, चोल व होयसळ घराण्यांनीं सत्ता गाजविली. चौदाव्या शतकाच्या आरंभीं विजयानगरच्या राज्यांत हा भाग समाविष्ट झाला होता, तो या शतकाच्या अखेरीस एका मांडलिक राजाकडे गेला. याच राजाचा वंश आज गादीवर आहे. १५६५ त विजयानगरचें राज्य बुडाल्यानंतर म्हैसूर राज्य स्वतंत्र झालें. या राजघराण्यांतील कंठीरवनरसु (१६३८–५९) यानें आदिलशाहीची स्वारी परतविली व स्वतःचें नाणें पाडलें. शहाजीला कर्नाटकांत जहागिरी असल्या वेळीं त्यानें संस्थानांत बराच दरारा ठेवला होता व तो बंगळूरला राजाप्रमाणें राहत असे. चिक्कदेव (१६७२–१७०४) यानें शहाजीचा मुलगा व्यंकोजी याजपासून बंगळूर विकत घेतलें व आणखी मुलूख मिळवून राज्य वाढविलें. पुढें जेव्हां हैदर आणि टिपू म्हैसूरचे राजे झाले तेव्हां हा राजवंश नामशेष होता. पण टिपूनंतर ब्रिटिशांनीं कृष्णराज याला राजा केलें; पण त्याचा कारभार नीट नव्हता म्हणून १८३१–१८८१ या काळांत ब्रिटिशांनींच राज्य केलें; पण तें संस्थानच्या सर्वांगीण सुधारणेस चांगलें कारणीभूत झालें. पुढले राजे चांगले होऊन गेले. सध्यांच्या महाराजांचे चुलते कृष्णराज हे फार सात्त्विक व प्रगमनशील होते. सर विश्वेश्वरय्या दिवाण असताना त्यांनीं मोठ्या औद्योगिक योजना करून त्यांतील कांहीं तडीस नेल्या. त्यामुळें संस्थानची संपत्ति व कीर्ति वाढली. सध्यांचे महाराज जय चामराज वडेयर बहादूर हे १९४० सालीं गादीवर आले. हे पदवीधर आहेत. संस्थानांतील कॉंग्रेस चळवळीमुळें लोकांना आतां सर्व अधिकार द्यावे लागले आहेत. संस्थान भारत सरकारशीं जोडलेलें आहे.

---

# य

**य**—या वर्णाची पहिली व दुसरी अवस्था गिरनार शिलालेखांत, तिसरी मथुरा लेखांत (इ. स. १-२ रें शतक) व शेवटची इ. स. ५८८ च्या बुद्ध-गया लेखांत पाहावयास मिळते. आजचें स्वरूप ११ व्या शतकांतील उज्जनी लेखांत दिसतें.

**यकृत्**—(लिव्हर). हें महत्त्वाचें इंद्रिय काळसर तांबूस असून उदरामध्यें उजव्या बाजूस फांसळ्यांच्या आंतील बाजूस असतें. यकृत् ही शरीरांतील सर्वांत मोठी ग्रंथि असून हिचें वजन ५० ते ६० औंस भरतें. यकृताची सूक्ष्मदर्शक-यंत्रानें तपासणी केली असतां याचे घटक म्हणजे रक्तगोलकांनीं भरलेल्या अनेक बाजू असलेल्या पेशी होत असें दिसून येतें. यांचे पुंजके पुंजके असतात. व हे पुंजके एकमेकांस पेशीयुक्त तंतूंनीं आणि रक्तगोलकांच्या व वाहिन्यांच्या जाळ्यांनीं जोडलेले असतात.

ह्या रक्तवाहिन्या यकृतशिरेच्या शाखा असतात. यकृतामधील पित्त पित्तवाहिन्यांमार्फत शरीरांत पोंचविलें जातें. जेव्हां यकृतांतील पेशींपासून पित्तरस बाहेर पडतो तेव्हां तो एका पित्तवाहिनी-(हेपॅटिक डक्ट)तून लघुअंत्रामध्यें जातो व तेथें त्याचें अन्नाबरोबर मिश्रण होतें. जेव्हां आंतड्यांतील पचनक्रियेत अडथळा होतो तेव्हां पित्तवाहिनींतून पित्त वाहून नेण्याची क्रिया बंद होते व त्या वेळीं उत्पन्न होणारें पित्त पित्ताशयामध्यें जमा होतें. हा पित्ताशय म्हणजे यकृताच्या खालीं असलेला पित्तसंचय हा होय.

यकृताचें कार्य तीन प्रकारचें असतें : १. पित्तशिरेमार्फत जठरांतून व आंतड्यांतून जें अन्न येतें त्यांतील पिष्टसत्त्वमय भागाचा संचय करून त्याचें साखरेंत रूपांतर करणें आणि ही साखर जसजशी लागेल तसतशी शरीरास पुरविणें; २. जे रक्तकण जीर्ण झाले असतील त्यांचा नाश करणें आणि लोहविरहित रंजक द्रव्यें पित्ताचा भाग म्हणून काढून टाकून लोहाचा अंश राखून ठेवणें; व ३. आतड्यांत जमा होणारें पित्त बाहेर टाकून देणें. यकृतास अनेक प्रकारचे विकार होण्याचा संभव असतो; उदा., व्रण, गळूं, स्तंभन, किंवा अवष्टंभ होणें, चरबी वाढणें, वगैरे.

**यकृत्-कीटक**—(डिस्टोमम). हें एक प्रकारचें परोपजीवी कृमी आहेत. यांतील सर्वांत प्रसिद्ध असा यकृत् कृमि हा मेंढ्यांच्या पित्ताशयावर बसून किंवा यकृत्वाहिकावर बसून पित्ताचें शोषण करतो व त्यांच्या ठिकाणीं रोग उत्पन्न करतो. हा रोग इतर प्राणी व मनुष्य यांसहि होतो. याच्या अळ्या पाण्यांतील लहान गोगलगाईमध्यें राहतात व तेथून त्या गवतावर जाऊन गवताबरोबर मेंढीच्या पोटांत जातात. यांच्याच इतर जातीचे कांहीं कृमी निरनिराळ्या प्रकारचे मासे, कृमी, सस्तन प्राणी, वगैरेंवरहि आढळून येतात.

**यंग, एडवर्ड** (१६८३–१७६५)—एक इंग्रज कवि. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झाल्यावर तो ऑल सोल्स या संस्थेचा फेलो झाला. त्यानें प्रथम पद्यलेखनास आरंभ केला. नंतर १७१९ सालीं 'बुसिरिस' हें त्याचें दुःखान्त नाटक ड्रुअरीलेन नाट्यगृहांत रंगभूमीवर आलें. नंतर त्याच ठिकाणीं १७२१ सालीं त्याच्या 'रिव्हेंज' (सूड) या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. १७२५ पासून त्यानें उपरोधिक कविता लिहिण्यास सुरुवात केली व पुढें १८२८ सालीं तो कवितासंग्रह 'दि युनिव्हर्सल पॅशन' या नांवानें प्रसिद्ध झाला. १७२८ सालापूर्वीच तो धर्मोपदेशकाचें काम करूं लागला आणि त्या सालीं तो दुसऱ्या जॉर्ज राजाचा चॅपलेन झाला. १७३१ सालीं लीचफिल्डच्या उमरावाच्या मुलीबरोबर त्याचा विवाह झाला. ती त्याची बायको १७४१ सालीं मरण पावली. या दुःखद घटनेनें स्फूर्ति मिळून त्यानें जें काव्य लिहिलें तें त्याचें सर्वोत्कृष्ट काव्य होय. तें 'दि कम्प्लेन्ट, ऑर नाइट थॉट्स ऑफ लाइफ, डेथ अॅन्ड इम्मॉर्टॅलिटी' हें होय (१७४२–१७४४). हें काव्य तात्काल अत्यंत लोकप्रिय होऊन त्याचें भाषांतर फ्रेंच, जर्मन, इटालियन, स्पॅनिश, पोर्तुगीज, स्वीडिश व माग्यार या भाषांत झालें. या काव्यांत म्हणीवजा अनेक ओळी आहेत. याशिवाय त्याचे ग्रंथ आहेत ते : 'दि ब्रदर्स' व 'रेसिग्नेशन' हे होत.

**यंग मेन्स ख्रिश्चन असोसिएशन**—(वाय्. एम्. सी. ए.). ही संस्था लंडन येथें जॉर्ज विल्यम्स यानें १८४४ सालीं स्थापली. एका बायबल क्लासमधून या संस्थेची कल्पना निघाली आणि या संस्थेचा उद्देश संस्थेच्या तरुण सभासदांच्या आध्यात्मिक, सामाजिक, बौद्धिक व भौतिक जीवनाचा परिपोष करणें हा आहे. या संस्थेच्या शाखा बहुतेक शहरांत स्थापन झाल्या असून या शाखा धार्मिक व सामाजिक कार्याचें केंद्र बनल्या आहेत. १९३२ सालीं नुसत्या अमेरिकेंत (सं. संस्थानांत) १४३५ केंद्रें असून दहा लाखांवर सभासद होते. युनायटेड किंग्डममध्यें ८१४ शाखा मिळून एक लाखावर सभासद होते. या संस्थेच्या मोठाल्या शहरांतून वसतिगृहें, व्यायामशाळा, शिक्षणकेंद्रें, वगैरे असतात. सभासदांस अनेक प्रकारें मदत देण्यांत येते. युद्धकालांत सरकारला या असोसिएशनचें सहकार्य चांगलें मिळतें. हिंदुस्थानांत मोठाल्या शहरांतून वाय्. एम्. सी. ए. संस्था जुन्याच आहेत.

**यंग वीमेन्स ख्रिश्चन असोसिएशन**—(वाय्. डब्ल्यू. सी. ए.). ही संस्था वरील उद्देशासाठीं १८५५ त स्थापन झाली. हिचीं ब्रिटनमध्यें ३५० केंद्रें व पस्तीस हजारांवर सभासद आहेत. मध्यवर्ती संस्था स्वित्झर्लंडमध्यें जिनेव्हा येथें असून तिला पन्नासाहून अधिक देशांतील वाय्. डब्ल्यू. सी. ए. जोडल्या आहेत.

**यजुर्वेद**—चार वेदांपैकीं दुसरा. हा यज्ञकर्मासाठीं आहे. याचे दोन भेद आहेत : १. कृष्ण यजुर्वेद, व २. शुक्ल यजुर्वेद. या वेदाच्या कर्मकांडांत नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध अशा चार कर्मांचें प्रतिपादन आहे. कठ, कपिष्ठल, मैत्रायणी, तैत्तिरीय, खांडिकेय, इ., कृष्णयजुर्वेदाचे पुन्हां पुष्कळ भेद आहेत. तैत्तिरीय संहिता दक्षिण हिंदुस्थानांत चालते. या संहितेचीं सात कांडें आहेत. प्रत्येक कांडांत प्रश्न किंवा प्रपाठक असून या प्रपाठकांचे अनुवाक असतात. आत्रेयानें या वेदाचीं पदें केलीं तर बौधायन, आपस्तंब, सत्याषाढ व हिरण्यकेशी यांनीं सूत्रें रचिलीं. तैत्तिरीय ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषद्हि

आहे. ऋग्वेदांतले सर्व देव या वेदांत आहेत. अग्नि, प्रजापति, ब्रह्मा, बृहस्पति, सूर्य, वायु, इंद्र, यम, वरुण, इ. देवांसंबंधीं यजनकर्मे सांगितलीं आहेत. कठ आणि मैत्रायणी शाखा उत्तर हिंदुस्थानांत चालू आहेत. यांचीं ब्राह्मणें नाहींत, पण उपनिषदें आहेत.

शुक्ल यजुर्वेद याज्ञवल्क्यानें रचिला. यांत कृष्णयजुर्वेदाप्रमाणें मंत्र आणि ब्राह्मण एकत्र नाहींत. या संहितेंत केवळ मंत्रच आहेत. या वाजसनेय संहितेचे ४० अध्याय आहेत. या वेदांत देवता आणि ऋषी पुष्कळ आहेत. काण्व आणि माध्यंदिन या दोन मुख्य शाखा आहेत. यांचीं ब्राह्मणें आहेत.

**यंत्रशास्त्र**—यंत्रांच्या रचनेसंबंधीं सिद्धांत ज्यांत विवेचिले असतात तें शास्त्र, असा मूळ अर्थ असे. पण आतां बल किंवा प्रेरणा आणि गति यांच्या नियमांसंबंधीं केवळ तात्त्विक ऊहापोह करणारें शास्त्र असा अर्थ आला आहे. यामुळें याचे गतिशास्त्र (डायनॅमिक्स) व स्थितिशास्त्र (स्टॅटिक्स) असे दोन भाग पाडण्यांत आले आहेत. (गतिशास्त्र, स्थितिशास्त्र पाहा).

यंत्रांमध्यें अनेक प्रकार आहेत; उदा., (१) शक्ति तयार करणारीं यंत्रें (इंजिनें, बायलर, इ.); (२) शक्ति एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणारीं यंत्रें (पुली); (३) वस्तूचें रूपांतर करणारीं यंत्रें; (४) स्थलांतर करणारीं यंत्रें; (५) नियामक यंत्रें; (६) प्रत्यक्षाचा विस्तार करणारीं यंत्रें (दुर्बीण, रेडिओ, इ.).

धातुकाम करण्याचीं किंवा यंत्रें तयार करण्याचीं यंत्रें जीं असतात, त्यांमध्यें मुख्यतः चरक, सामता, रंधा, आकारयंत्र (शेपिंग मशिन) व दांते पाडण्याचें यंत्र हीं आहेत. यांतहि लेथ हा सर्वांत मुख्य आहे. कारण त्यावर सर्व कामें करतां येतात. याच्याखालोखाल दांतेयंत्र. या यंत्रांशिवाय इतर अनेक तऱ्हेचीं यंत्रें आहेत. तीं जरी हत्यारें या सदरांत आलीं तरी तीं एखाद्या विशिष्ट क्रियेसाठींच वापरलीं जातात.

तरफ (लीव्हर), चाक व कणा (व्हील अँड ॲक्सल), कप्पी (पुली), उतार (इन्क्लाइन्ड प्लेन), पाचर (वेज), व मळसूत्र (स्क्रू) या सहा यांत्रिक शक्ती आहेत.

**यथादर्शक**—(स्टेरिओस्कोप). दोन्ही डोळ्यांनीं ज्यांतून पाहतां येईल असें एक दृग्यंत्र. आपण जर एखाद्या देखाव्याचे दोन एकमेकांजवळ असलेल्या दोन ठिकाणांहून स्वतंत्र फोटो घेतले आणि ते एकाशेजारीं एक चिकटवून या यंत्रांतून पाहिले तर दोन्ही मिळून आपणांस एकच चित्र दिसतें. मात्र तें सपाट न दिसतां घनाकृति दिसतें. या दोन चित्रांमध्यें विभागणी केलेली असते, त्यामुळें एका डोळ्यांतून एकच चित्र दिसतें. अशा तऱ्हेचीं दोन चित्रें एकाच वेळीं एका विशिष्ट कॅमेऱ्यांतून घेतां येतात.

**यथादर्शनकला**—(परस्पेक्टिव्ह). सपाट फलकावर घन पदार्थांचें चित्र ते पदार्थ जसे डोळ्यांना दिसतात तसे दिसतील अशा रीतीनें काढण्याची चित्रकलेची एक शाखा. प्रत्येक दृश्य पदार्थापासून प्रकाशकिरण प्रेक्षकाच्या डोळ्यांकडे येत असतात. अशा तऱ्हेनें एखाद्या पदार्थाकडून येणारे किरण एखाद्या उभ्या पातळीमध्यें कापले तर ते किरण ज्या बिंदूंत कापले जातील त्या बिंदूंनीं त्या पदार्थाची आकृति त्या फलकावर प्रक्षेपित केली जाईल. ही आकृति त्या पदार्थाचा प्रक्षेप (प्रोजेक्शन) होय. या प्रक्षेपाच्या आकृतीवरून आपणांस मूळ पदार्थाची यथार्थ कल्पना होते. उदाहरणार्थ, एखादी वस्तु एका उभ्या कांचेच्या मागें ठेवली आणि त्या पदार्थाची त्या कांचेतून जशी दिसेल तशी आकृति त्या कांचेवर काढली तर ती आकृति त्या पदार्थाचें चित्र होईल. ज्या पृष्ठभागावर त्या पदार्थाचें चित्र यावयाचें त्यास चित्रपृष्ठ म्हणतात आणि हें नेहमीं उभें लंबरूप असतें. प्रेक्षक हा एका समतल पृष्ठभागावर अमित अंतरावर उभा आहे असें धरून चालावयाचें असतें. आणि ज्या रेषेनें हा समतल पृष्ठभाग चित्रपृष्ठानें कापला जातो, त्या रेषेस भूरेषा असें म्हणतात. जर या चित्रपृष्ठांतून अमित अंतरापर्यंत जाणाऱ्या कांहीं समांतर रेषा असतील तर त्या सर्व रेषा चित्रपृष्ठावरील ज्या बिंदूंत डोळ्यांपासून अशा रेषांना समांतर काढलेली रेषा मिळेल त्या बिंदूंत मिळालेल्या दिसतील. या बिंदूस अदृष्टमान बिंदु असें म्हणतात. तसेंच चित्रपृष्ठाला छेदणारीं अनेक समांतर पृष्ठें असतील आणि तीं सर्व अमित अंतराकडे जाणारी असतील तर तीं सर्व या सर्व पृष्ठांना समांतर असें जें पृष्ठ डोळ्यांतून जात असेल त्या पृष्ठास येऊन मिळाल्यासारखीं दिसतील व तीं ज्या रेषेंत येऊन मिळाल्यासारखीं दिसतील त्या रेषेस अदृष्टमान रेषा असें म्हणतात. अशा तऱ्हेची सर्व समांतर पृष्ठांची अदृष्टमान रेषा प्रेक्षकाच्या डोळ्यांच्या पातळीशीं समतल पृष्ठावर असते व तिला क्षितिज म्हणतात. आणि या क्षितिजावरील डोळ्यांच्या समोरील बिंदूस दृष्टिबिंदु म्हणतात.

**यदु**—एक वैदिक-पौराणिक व्यक्ति. हा ययातीचा देवयानीपासून झालेला मुलगा. यानें पित्याची जरा घेतली नाहीं म्हणून याला फारसें मोठें राज्य मिळालें नाहीं. या यदूच्याच वंशांत कृष्णाचा जन्म झाला. यादवकुल यदूपासून आहे.

**यंदे, दामोदर सांवळाराम** (१८६१-१९४४)—एक सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय छापखानदार व प्रकाशक. प्रथम १८७८ सालीं हे मुंबईच्या ट्राम्वे कंपनींत नोकरीस होते. जोतिराव फुले वगैरेंच्या व्याख्यानांचा परिणाम यांच्या मनावर झाला व एखादें

मुंबई—गेट वे ऑफ इंडिया (पृ. २०२१)

मुंबई—ब्रेबर्न स्टेडिअम (पृ. २०२१)

मोहेंजोडारो—स्नानगृहांचे अवशेष (पृ. २०६४)

वर्तमानपत्र काढण्याकडे यांच्या मनाचा कल झुकला. यानंतर १८८३ सालीं हे बडोद्यास गेले व तेथें यांनीं 'सयाजी विजय' नांवाचें पत्र सुरू केलें. १८९९ सालीं हे पुन्हां मुंबईस परत आले व 'इंदुप्रकाश' हें पत्र चालवूं लागले. कांहीं वर्षांनींच 'इंदुप्रकाश' व 'सयाजी विजय' हीं पत्रें बंद पडल्यानंतर यांनीं 'दामोदर सांवळाराम आणि मंडळी' स्थापून 'आर्यधर्म ग्रंथमाला' सुरू केली व अनेक महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध केले. सार्थ महाभारत काढण्याचें मोठें कार्य अंगावर घेतलें पण तें पुरें झालें नाहीं. यांनीं बरेच लेखक पुढें आणले. यांची 'वीरमती' ही कादंबरी अतिशय लोकप्रिय झाली होती. तिच्या चार आवृत्त्या निघाल्या होत्या. शिवाय गुजराथी व हिंदी भार्षेत तिचीं भाषांतरेंहि झालीं होतीं. महाराष्ट्रांतील मागच्या पिढींतील मोठ्या ग्रंथ-प्रकाशकांमध्यें यंदे यांना मानाचें स्थान द्यावें लागेल.

**यम**—एक वैदिक देव. याला धर्मराज म्हणतात. व याच्याकडे प्राण्याच्या मृत्यूनंतर त्याच्या पापपुण्याप्रमाणें त्याला गति देण्याचें काम असतें. हा दक्षिण दिशेचा स्वामी आहे. याची बहीण यमी नांवाची होती. पुराणांतून यम हा यमुनेचा भाऊ म्हणून वर्णन आहे. यमद्वितीया (भाऊबीज) ही दिवाळींत पाळली जाते. यम व त्याचा दूत यांचा जो एक संवाद आहे, त्याला यमगीता असें नांव आहे. एक संहिता व स्मृति याच्या नांवावर आहे.

**यमक**—दोन चरणांतील, विशेषतः शेवटचीं कांहीं अक्षरें एकाच ध्वनीचीं किंवा तींच असलीं तर हा अलंकार होतो. पूर्व खंडांत प्राचीन भारतीय, चिनी, अरब, इ. लोकांना यमकाची माहिती होती पण पश्चिम खंडांत ग्रीक-रोमन लोकांनाहि नव्हती. तिकडे चौथ्या शतकांत लॅटिन काव्यांत यमक दृष्टीस पडतो. पुढें या अलंकारांत प्राच्य साहित्याप्रमाणें पुष्कळ फरक झाले. स्पॅनियर्ड आणि इटालियन साहित्यिकांनीं त्याला चांगलें सजविलें. आपल्या मराठींत आद्ययमक, अंत्ययमक, चरणयमक, पूर्णयमक, दामयमक, अश्वधाटी यमक, पुष्पयमक, संदष्टयमक, संयुतावृत्तियमक, पंक्तियमक यांसारखे यमकालंकाराचे प्रकार आढळतात. वामन आणि मोरोपंत हे कवी यमकाविषयीं प्रसिद्ध आहेत.

**यमन**—हा कल्याण थाटाचा आश्रयराग आहे. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी गांधार व संवादी स्वर निषाद आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर आहे. याची प्रकृति गंभीर असून हा आलापाई आहे. या रागांत थोड्या प्रमाणानें कोमल मध्याचा प्रयोग केल्यास यास ''यमनकल्याण'' हें नांव प्राप्त होतें.

**यमनी बिलावल**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागतात म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय सकाळचा पहिला प्रहर आहे. आरोहांत तीव्र मध्यम लागत असल्यानें यमन रागाचें स्वरूप यांत दिसतें, यामुळें याचें 'यमनी बिलावल' हें नांव यथार्थ पडलें आहे. अवरोहांत शुद्ध मध्यमाच्या प्रयोगानें बिलावल स्पष्ट होतो. हा एक बिलावलाचा प्रकार आहे.

**यमाजी शिवदेव मुतालिक** (मृत्यु १७६३)—मराठेशाहींतील एक मुत्सद्दी. हा मूळचा सातारा जिल्ह्यांतील जावळी तालुक्यामधील चामणोली या गांवचा राहणारा. पुढें यानें राजारामाच्या कारकीर्दींत परशराम त्रिंबक प्रतिनिधीकडे कारकुनी पत्करली व आपल्या कर्तबगारीनें यानें प्रतिनिधीची मुतालिकी मिळविली. शाहूच्या पूर्वी मराठेशाहींत कर्तबगारी गाजवलेल्या लोकांना पेशव्यांच्या कारकीर्दींत त्यांच्यापुढें नमतें घेणें कमीपणाचें वाटे. हाहि अशा लोकांपैकींच असून पेशव्यांना विरोध केल्यामुळें यास कांहीं दिवस बंदींत अडकून पडावें लागलें होतें. नानासाहेब मरण पावल्यावर यानें आपला व्याही विठ्ठल सुंदर याच्या द्वारां निजामाकडून पेशव्यांवर स्वारी करविली परंतु त्यांत विठ्ठल सुंदरला यश न येतां तो स्वतः मृत्युमुखीं पडला.

**यमुना नदी**—उत्तर हिंदुस्थानांतील एक मोठी नदी. हिला पुराणकालापासून पावित्र्य आहे. जुळी मुलगी या अर्थाचें हें नांव त्या नदीस ती गंगानदीच्या बाजूनें तिच्याबरोबर वाहत जात होती म्हणून पडलें. हिचा ऋग्वेदांत तीनदां उल्लेख आलेला आहे. आणि उत्तरकालीन वाङ्मयांतहि बऱ्याच वेळां आलेला आहे. ही हिमालयाच्या एका २०,७३१ फूट उंचीच्या शिखराच्या पश्चिम बाजूस उगम पावते. जम्नोत्री येथें उगमाचें तीर्थस्थान आहे. उगमापासून ८६० मैल वाहत येऊन अलाहाबादेजवळ ही गंगेस मिळते. हिच्या कांठीं दिल्ली, वृंदावन, मथुरा, आग्रा, इटावा, काल्पी, इ. मोठीं गांवें आहेत. नदीवर पुष्कळ ठिकाणीं पूल बांधले आहेत. हिचे कालवेहि बरेच आहेत. पंजाबमध्यें फिरोझ तुघ्लखनें १३७६ सालीं एक कालवा बांधला. हा ३४ मैल लांबीचा असून त्याचे १७९६ मैलांचे फांटे आहेत.

**यमेथिन**—उत्तर ब्रह्मदेश, एक जिल्हा. क्षे. फ. ४,२५५ चौ. मैल. लो. सं. सुमारें साडेतीन लक्ष. यमेथिन व फिनमना हीं दोन शहरें आहेत. बहुतेक लोक शेतकीवर राहतात. तांदूळ व ऊंस हीं मुख्य पिकें होत. जंगलांत साग पुष्कळ आहे

यज्ञ—यज्ञ शब्द 'यज्' धातूपासून निघाला आहे. पूजा करणें, अर्पिणें, देणें हे या धातूचे अर्थ आहेत. यांत पूजा करणें हा प्राचीन अर्थ असावा. यजन, याजन, यजमान, यज्ञ ह्या शब्दांपलीकडे 'यज्' धातूचा विस्तार झालेला फारसा आढळत नाहीं. यज्ञ ही संस्था प्राचीन काळीं जगभर लहान-मोठ्या सर्व समाजांत होती. यज्ञाचीं मुख्यांगें म्हणजे अग्नि व हविर्दान. प्रचलित अर्थानें अग्नीशिवाय यज्ञ करतां येत नाहीं. हा अग्नि अरणिमंथनानें उत्पन्न करावयाचा असतो. या मंथनजन्य अग्नीचा शोध अथर्वा यानें लावला; यावरून अथर्वा ऋषीच्या पूर्वी ही यज्ञ-संस्था अस्तित्वांत नसावी, असें दिसतें. अशा वेळीं 'यज्' धातूचा अर्थ पूजा करणें एवढाच असावा. जपयज्ञादि शब्दांत यज्ञ शब्द लक्षणेनें योजलेला दिसतो. देवाला जें अर्पण करावयाचें त्याला हवि म्हणतात. देवाला अग्नींतून अर्पण करणें याचें नांव यज्ञ. कोणत्या तरी ऐहिक अथवा पारलौकिक कामनासिद्ध्यर्थ यज्ञ केले जातात. परमेश्वराला कांहीं दिल्याशिवाय तो मनुष्याची इच्छा सफल करणार नाहीं ही समजूत यज्ञसंस्थेला अंशतः कारणीभूत झाली असावी. बलिदानाशिवाय कोणतेंच, मोठें कार्य सिद्धीस जात नाहीं, ह्या विश्वासानें तलाव वगैरे बांधतांना कोणाचा तरी प्राण खर्ची घालण्याची वहिवाट पडली. पूर्वी देवतांना मनुष्य बळी देत त्याला नरमेध (पाहा) म्हणत. पुढें यज्ञांत हविर्दानाकरितां पशु आला. आतां यज्ञ-संस्था लुप्त झाली आहे. क्वचित् यज्ञ होतात हें खरें, पण ते केवल कुतूहल म्हणून. एके वेळीं यज्ञ ही एक बलाढ्य व उपयुक्त संस्था होती. धार्मिक, सामाजिक, राजकीय व व्यवसायात्मक अशा अनेक दृष्टींनीं महत्त्वाची अशी एकमेव संस्था म्हणजे यज्ञ. ह्या संस्थेनें शैक्षणिक कार्यहि पुष्कळ केलें आहे. पण ह्यापुढें यज्ञाचें पुनरुज्जीवन करणें अनुचित ठरेल.

आपल्या भरतखंडांत वैदिक काळीं यज्ञकर्मांचें तंत्र फार विचारपूर्वक व बारकाव्यानें अवलंबिलेलें दिसतें. या यज्ञाच्या अनुषंगानें अनेक कलाकौशल्यें पुढें येतात व समाजांतील सर्व थरांच्या लोकांचा यांत भाग दिसून येतो. यज्ञकर्मांच्या दृष्टीनें मंत्रब्राह्मणात्मक यजुर्वेदासच प्राधान्य दिलें जातें. कृष्णयजुर्वेदांत यज्ञांचा एका दृष्टीनें उत्तान काल दिसतो. परंतु कृष्णयजुर्वेदापेक्षां श्रौतसूत्रांत ब्रह्म्याचें काम अधिक विस्तृत दिलें आहे. यज्ञशास्त्र हें क्रमाक्रमानेंच वाढलें. सोमयागाच्या वर्णनांत अनेक यागांची माहिती येते.

यज्ञांतील बहुतेक क्रियांची जबाबदारी अध्वर्यूवर पडते. तो यजमान व ब्रह्म यांच्या अनुज्ञेनें इतर सर्व ऋत्विजांस प्रैष देतो. त्याचे मंत्र यजुर्वेदांतील मंत्रविभागांपैकीं व क्रियासंबंधी वाक्यें ब्राह्मणविभागांपैकीं असतात. यज्ञांतील सर्व ऋत्विजांच्या क्रियांवर नजर ठेवून अनुष्ठान प्रमादरहित करण्याची काळजी ब्रह्म्यास घ्यावी लागते. त्यास वेदत्रयीचें संपूर्ण ज्ञान असावें लागतें. त्याच्या कर्तव्यांचें संपूर्ण स्पष्टीकरण मुख्यतः अथर्ववेदाच्या ग्रंथांत केलेलें आहे.

यज्ञांतील देवतांचा होता हा एक स्तुतिपाठक व आमंत्रक होय. सोमयागाच्या अलीकडील यागांतील त्याचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें मुख्यतः यजुर्वेद ग्रंथांत व सोमयागापासून सत्रापर्यंतच्या यज्ञांतील त्याचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें ऋग्वेदग्रंथांत आलीं आहेत. उद्गात्याचें मुख्य कर्तव्य यज्ञांतील मुख्य देवतांची गायनानें आळवून स्तुति करणें हें होय. या गायनास साम असें म्हणतात. अध्वर्यू वगैरे ऋत्विजांप्रमाणें यास हविःशेष भक्षावयाचे नसून त्याजकडे फक्त सोमपान करण्याचें कर्तव्य असतें.

ह्या चार मुख्य ऋत्विजांशिवाय अध्वर्यूंच्या हाताखालीं प्रतिप्रस्थाता, नेष्टा व उन्नेता, ब्रह्म्याच्या हाताखालीं ब्राह्मणाछंसी, आग्नीध्र व पोत्ता, होत्याच्या हाताखालीं मैत्रावरुण, अच्छावाक् व ग्रावस्तुत, आणि उद्गात्याच्या हाताखालीं प्रस्तोता, प्रतिहर्ता व सुब्रह्मण्य असे एकूण बारा ऋत्विज असतात. यांतील ब्रह्म्याच्या हाताखालच्या ऋत्विजांचा उपयोग ब्रह्म्याच्याऐवजीं होत्यासच होत असतो. कधीं कधीं ब्रह्म्याचा मदतनीस होत्यास मदत करितो. याशिवाय सदस्य नांवाचा एक सतरावा आग्नीध्र हा अध्वर्यूंचा व अध्वर्यूंचा मदतनीस नेष्टा हा ऋत्विज असतो. त्याचा दर्जा श्रेष्ठ प्रतीचा असून त्यास प्रसंगविशेषीं ब्रह्म्यास अभियुक्तपणें सूचना करण्याचा अधिकार असतो. वरील शिष्ट अधिकाऱ्यांशिवाय परिचर्यास्वरूपी कर्म करणारे दहा किंवा अकरा चमसाध्वर्यू, चार किंवा त्याहून अधिक उपगाते, ध्रुवगोप, पशुपाल, कांहीं प्रेष्य, दोग्धा, शमिता व हविष्कृत् असे आठ प्रकारचे उपऋत्विज लागतात.

यज्ञांमध्यें अग्निमंथन, कृषि, श्मश्रुकर्म, दारू तयार करणें, स्वयंपाक करणें, सोनारकाम, सुतारकाम, कुंभारकाम, चांभारकाम, कोष्टीकाम, लोहारकाम, शिवणकाम, पशुपालन, सोमक्रय, गवंडीकाम, दळणकांडण, दोऱ्या वळणें, गवत कापणें, लांकडें तोडणें, रथारोहण, खड्डे करणें, वाद्यें वाजविणें, वगैरे अनेक प्रकारचीं कर्में गोंविलीं गेलीं आहेत. शमीगर्भ पिंपळाच्या एका जाड फांदीच्या खालच्या भागाच्या फळीतून अधरारणी व वरच्या भागाच्या फळीतून उत्तरारणी करून त्यांच्या साहाय्यानें अग्निहोत्रांसाठीं धारण करावयाचा अग्नि मंथन करून प्रदीप्त केला जातो. अरणीपासून अथर्वा नामक ऋषीनें प्रथम अग्नि उत्पन्न केला. यज्ञांत खाटकाचें काम असतें. त्यास बलि

घावयाच्या पशूचें प्रत्येक अंग छिन्नविछिन्न न हाऊं देतां समग्र काढावें लागतें.

चातुर्मास्यनामक यागांत प्रत्येक पर्व संपल्यावर काखा, मिशा व डोकें या क्रमानें हजामत करवावयाची असून त्यानंतर डाव्या व उजव्या हातांचीं व पायांचीं नखें करंगळीकडून अंगठ्यांकडे काढीत जावयाचीं असतात. सौत्रामणि नामक यज्ञांत सुरेचें हवन आहे. या प्रसंगीं पैष्टी, गौडी व माध्वी या तीन प्रकारांपैकीं तीन दिवस आंबत ठेवून बनविलेली तांदुळाच्या रसाची दारू वापरतात. यज्ञांमध्यें हुतशेष सुरेचें पान करावयाचें नसतें. यज्ञांतील हवनीय द्रव्यांत पुरोडाश, चरु, धाना, करंभ, परिवाप, आमिक्षा, वाजिन्, इत्यादि द्रव्यें आहेत. भाजीपाले, कोशिंबिरी व इतर पक्वान्न, वगैरे प्रकार वेदांत आढळत नाहींत. यज्ञांतील शिजविण्याचें काम अध्वर्यु अगर नियोजित ऋत्विजच करतो. सोनारांनीं बनविलेले पदार्थ यज्ञांत अनेक वेळां उपयोगांत आणण्याचें कारण पडतें. मंचक, झोपाळा, विणलेली घडवंची, उखळ, मुसळ, पळी, पाळें, उलथनें, मंडप, सांडस, ग्रह, स्फ्य, रथ, गाडे, वगैरे सुतारकामाचें लांकडी सामान यज्ञप्रसंगानें वेदांत उपयोगांत आणलेलें आढळतें.

श्रौत कर्मांत, निरनिराळ्या आकारांच्या विटा, शेगड्या, उतरंडीच्या आकाराचीं बोळकीं, मडकीं, घागरी, माठ व परळ अशा प्रकारचें कुंभारकामाचें सामान लागतें. यांपैकीं अग्निचयनांत लागणाऱ्या तीन शेगड्या आणि मंडला व ऋषभा नामक विटा एवढें सामान तयार करून भाजण्याचें काम स्वतः अवध्र्यूसच करावें लागतें. इतर नमुन्यांप्रमाणें कुंभारांकडून करवून घेतात.

यज्ञांमध्यें चांभारानें तयार केलेल्या जोडे वगैरे वस्तू वापरावयाच्या असतात. वेम, शलाकोपधान, प्राचीन तान, ओतु, वगैरे विणकामासंबंधीं शब्द, दर्भाचीं, गवताचीं, कापसाचीं, तागाचीं व क्षौम वस्त्रें, रंगविलेलीं धोतरें व पागोटीं, वगैरे गोष्टींचा उल्लेख यज्ञांगानें वेदांत अनेक ठिकाणीं आला आहे. यज्ञकर्मांत अप्रत्यक्ष रीतीनें शिवणकलेचा उल्लेख आलेला आढळतो. लोहारानें तयार केलेल्या नांगराचा फाळ, वस्तरा, लोखंडी झांकण्या, सुया, लोखंडी कमंडलू, चिमटे, पळी, बाणाचें फळ, सुरी, वगैरे जिनसा यज्ञांमध्यें उपयोगांत आणण्याचे अनेक प्रसंग आहेत. यज्ञकालांत पशुपालन हा एक स्वतंत्र धंदाहि लोक करीत असावेत.

सोम खरेदी करतांना सोमवल्लीची किंमत यजमानाच्या ऐपतीवर अगर यज्ञांच्या लहान-मोठ्या प्रमाणांवर गायींच्या व इतर वस्तूंच्या रूपांत देण्यांत येई. ठरलेल्या जास्तींत जास्त किंमतींतहि सोमविक्या सोमवल्ली देण्यास कुरकुरेल तर ती त्याच्यापासून बळजबरीनें घेऊन त्यास हांकून लावीत. सोमयागांत सोमवल्ली वरवंट्यानें कुटून तिच्यापासून रस काढतात.

श्रौत कर्मांत निरनिराळ्या आकृतींच्या वेदी व चिती करण्यांत गवंडीकामाची गरज लागते. घरें बांधण्याचा प्रकार श्रौत कर्मांत कोठें आढळत नाहीं.

पीठ करावयाचें तें जात्याच्या साहाय्यानें दळून करण्यांत येत नसून पाट्यावरवंट्याच्या साहाय्यानें करण्यांत येतें. कांडावयास घेतलेलें उखळ व मुसळ हीं लांकडीच असतात. मुसळास वेढणी म्हणजे लोखंडी पट्टी मात्र नसते.

त्रिसंधी दोरी ऊर्फ शुल्ब वळण्याचा विधि यज्ञकर्मांत दृष्ट आहे. दोऱ्या, शिंकीं व दावीं हीं मात्र धंदेवाईक लोकांनीं तयार केलेलींच उपयोगांत घेतल्याचें दिसतें. प्राचीन काळीं दर्भ कापण्याकरितां घोड्याच्या बरगडीची अस्थि उपयोगांत आणीत. पुढें सुरीचा उपयोग करूं लागले. यूपांकरितां लांकूड तोडण्याचें काम व झाडें तोडून यज्ञभूमि साफसूफ करण्याचें काम लांकूडतोड्या धंदेवाइकांकडून करवीत असत असें दिसतें.

यज्ञांगानें रथ वापरण्याचें काम पुनराधान–प्रसंगीं, चयनप्रकरणांमध्यें, वाजपेय यज्ञांत, आधानप्रयोगांत व अश्वमेध यज्ञांत आलेलें आहे.

यज्ञांमध्यें खड्डा करण्याच्या प्रसंगीं त्याची आंखणी अगोदर केली जाते. खळगा करण्यास कळकाच्या काठीचा उपयोग केलेला आढळतो.

यज्ञांमध्यें वाद्यांचें वादन विहित आहे. तत म्हणजे तंतुवाद्यांपैकीं वीणा, वाण, अलाबुवीणा, वक्रावीणा, कपिशीर्षी, महावीणा, शीलवीणा, पिच्छोरा, कांडवीणा, व तुंबरुवीणा; घन वाद्यांपैकीं उखळी; सुषिर म्हणजे पोकळ वाद्यांपैकीं नाळी, तूवन व शंख; आणि नद्ध म्हणजे चामड्यांनीं मढविलेल्या वाद्यांपैकीं दुंदुभि, भूमिदुंदुभि व पणव ऊर्फ मृदंग या वाद्यांचा उल्लेख आलेला आहे. यज्ञांमध्यें गायनवादनांखेरीज रथाच्या शर्यती वगैरे दुसरीहि कित्येक करमणुकीचीं साधनें असत.

अश्वमेध व पुरुषमेध यागांत अनेक देवतांचें आवाहन केलें जातें व त्याच्यासाठीं नानाविध पशू मारले जातात किंवा धरून सोडले जातात.

याप्रमाणें भारतीय यज्ञसंस्थेचा परिणाम समाजाच्या विकासाकडे झाला. यज्ञसंस्थेच्या वाढीमुळेंच वेदग्रंथांचें साहित्य जमा होऊन त्याचें वर्गीकरण झालें. तेव्हां या यज्ञसंस्थेकडे निराळ्या दृष्टीनें पाहण्यास शिकलें पाहिजे. पाश्चात्य पंडितांस हिचें महत्त्व कळलेंच नाहीं.

**यज्ञश्री शातकर्णि** ( राज्य. १६६–२०२ )—गौतमीपुत्र यज्ञश्री या नांवानें हा प्रसिद्ध आहे. कोल्हापूर येथें सांपडलेल्या

यज्ञ—यज्ञ शब्द 'यज्' धातूपासून निघाला आहे. पूजा करणें, अर्पिणें, देणें हे या धातूचे अर्थ आहेत. यांत पूजा करणें हा प्राचीन अर्थ असावा. यजन, याजन, यजमान, यज्ञ ह्या शब्दांपलीकडे 'यज्' धातूचा विस्तार झालेला फारसा आढळत नाहीं. यज्ञ ही संस्था प्राचीन काळीं जगभर लहान-मोठ्या सर्व समाजांत होती. यज्ञाचीं मुख्यांगें म्हणजे अग्नि व हविर्दान. प्रचलित अर्थानें अग्नीशिवाय यज्ञ करतां येत नाहीं. हा अग्नि अरणिमंथनानें उत्पन्न करावयाचा असतो. या मंथनजन्य अग्नीचा शोध अथर्वा यानें लावला; यावरून अथर्वा ऋषीच्या पूर्वी ही यज्ञ-संस्था अस्तित्वांत नसावी, असें दिसतें. अशा वेळीं 'यज्' धातूचा अर्थ पूजा करणें एवढाच असावा. जपयज्ञादि शब्दांत यज्ञ शब्द लक्षणेनें योजलेला दिसतो. देवाला जें अर्पण करावयाचें त्याला हवि म्हणतात. देवाला अग्नींतून अर्पण करणें याचें नांव यज्ञ. कोणत्या तरी ऐहिक अथवा पारलौकिक कामनासिद्ध्यर्थ यज्ञ केले जातात. परमेश्वराला कांहीं दिल्याशिवाय तो मनुष्याची इच्छा सफल करणार नाहीं ही समजूत यज्ञसंस्थेला अंशतः कारणीभूत झाली असावी. बलिदानाशिवाय कोणतेंच, मोठें कार्य सिद्धीस जात नाहीं, ह्या विश्वासानें तलाव वगैरे बांधतांना कोणाचा तरी प्राण खर्ची घालण्याची वहिवाट पडली. पूर्वी देवतांना मनुष्य बळी देत त्याला नरमेध (पाहा) म्हणत. पुढें यज्ञांत हविर्दानाकरितां पशु आला. आतां यज्ञ-संस्था लुप्त झाली आहे. क्वचित् यज्ञ होतात हें खरें, पण ते केवल कुतूहल म्हणून. एके वेळीं यज्ञ ही एक बलाढ्य व उपयुक्त संस्था होती. धार्मिक, सामाजिक, राजकीय व व्यवसायात्मक अशा अनेक दृष्टींनीं महत्त्वाची अशी एकमेव संस्था म्हणजे यज्ञ. ह्या संस्थेनें शैक्षणिक कार्यहि पुष्कळ केलें आहे. पण ह्यापुढें यज्ञाचें पुनरुज्जीवन करणें अनुचित ठरेल.

आपल्या भरतखंडांत वैदिक कालीं यज्ञकर्मांचें तंत्र फार विचारपूर्वक व बारकाव्यानें अवलंबिलेलें दिसतें. या यज्ञाच्या अनुषंगानें अनेक कलाकौशल्यें पुढें येतात व समाजांतील सर्व थरांच्या लोकांचा यांत भाग दिसून येतो. यज्ञकर्मांच्या दृष्टीनें मंत्रब्राह्मणात्मक यजुर्वेदासच प्राधान्य दिलें जातें. कृष्णयजुर्वेदांत यज्ञाचा एका दृष्टीनें उत्तान काल दिसतो. परंतु कृष्णयजुर्वेदापेक्षां श्रौतसूत्रांत ब्रह्याचें काम अधिक विस्तृत दिलें आहे. यज्ञशास्त्र हें क्रमाक्रमानेंच वाढलें. सोमयागाच्या वर्णनांत अनेक यागांची माहिती येते.

यज्ञांतील बहुतेक क्रियांची जबाबदारी अध्वर्यूवर पडते. तो यजमान व ब्रह्म यांच्या अनुज्ञेनें इतर सर्व ऋत्विजांस प्रैप देतो. त्याचे मंत्र यजुर्वेदांतील मंत्रविभागांपैकीं व क्रियासंबंधी वाक्यें ब्राह्मणविभागांपैकीं असतात. यज्ञांतील सर्व ऋत्विजांच्या क्रियांवर नजर ठेवून अनुष्ठान प्रमादरहित करण्याची काळजी ब्रह्यास घ्यावी लागते. त्यास वेदत्रयीचें संपूर्ण ज्ञान असावें लागतें. त्याच्या कर्तव्यांचे संपूर्ण स्पष्टीकरण मुख्यतः अथर्ववेदाच्या ग्रंथांत केलेलें आहे.

यज्ञांतील देवतांचा होता हा एक स्तुतिपाठक व आमंत्रक होय. सोमयागाच्या अलीकडील यागांतील त्याचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें मुख्यतः यजुर्वेद ग्रंथांत व सोमयागापासून सत्रापर्यंतच्या यज्ञांतील त्याचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें ऋग्वेदग्रंथांत आलीं आहेत. उद्गात्याचें मुख्य कर्तव्य यज्ञांतील मुख्य देवतांचीं गायनानें आळवून स्तुति करणें हें होय. या गायनास साम असें म्हणतात. अध्वर्यू वगैरे ऋत्विजांप्रमाणें यास हविःशेष भक्षावयाचे नसून त्याजकडे फक्त सोमपान करण्याचें कर्तव्य असतें.

ह्या चार मुख्य ऋत्विजांशिवाय अध्वर्यूच्या हाताखालीं प्रतिप्रस्थाता, नेष्टा व उन्नेता, ब्रह्याच्या हाताखालीं ब्राह्मणाछंसी, आग्नीध्र व पोत्ता, होत्याच्या हाताखालीं मैत्रावरुण, अच्छावाक् व ग्रावस्तुत, आणि उद्गात्याच्या हाताखालीं प्रस्तोता, प्रतिहर्ता व सुब्रह्मण्य असे एकूण बारा ऋत्विज असतात. यांतील ब्रह्याच्या हाताखालच्या ऋत्विजांचा उपयोग ब्रह्याच्याऐवजीं होत्यासच होत असतो. कधीं कधीं ब्रह्याचा मदतनीस होत्यास मदत करितो. याशिवाय सदस्य नांवाचा एक सतरावा आग्नीध्र हा अध्वर्यूचा व अध्वर्यूचा मदतनीस नेष्टा हा ऋत्विज असतो. त्याचा दर्जा श्रेष्ठ प्रतीचा असून त्यास प्रसंगविशेषीं ब्रह्यास अभियुक्तपणे सूचना करण्याचा अधिकार असतो. वरील शिष्ट अधिकाऱ्यांशिवाय परिचर्यास्वरूपी कर्म करणारे दहा किंवा अकरा चमसाध्वर्यू, चार किंवा त्याहून अधिक उपगाते, ध्रुवगोप, पशुपाल, कांहीं प्रेष्य, दोग्धा, शमिता व हविष्कृत् असे आठ प्रकारचे उपऋत्विज लागतात.

यज्ञांमध्यें अग्निमंथन, कृषि, श्मश्रुकर्म, दारू तयार करणें, स्वयंपाक करणें, सोनारकाम, सुतारकाम, कुंभारकाम, चांभारकाम, कोष्टीकाम, लोहारकाम, शिवणकाम, पशुपालन, सोमक्रय, गवंडीकाम, दळणकांडण, दोऱ्या वळणें, गवत कापणें, लांकडें तोडणें, रथारोहण, खड्डे करणें, वाद्ये वाजविणें, वगैरे अनेक प्रकारचीं कर्में गोंविलीं गेलीं आहेत. शमीगर्भ पिंपळाच्या एका जाड फांदीच्या खालच्या भागाच्या फळींतून अधरारणी व वरच्या भागाच्या फळींतून उत्तरारणी करून त्यांच्या साहाय्यानें अग्निहोत्रांसाठीं धारण करावयाचा अग्नि मंथन करून प्रदीप्त केला जातो. अरणीपासून अथर्वा नामक ऋषीनें प्रथम अग्नि उत्पन्न केला. यज्ञांत खाटकाचे काम असते. त्यास बलि

घावयाच्या पशूचें प्रत्येक अंग छिन्नविछिन्न न होऊं देतां समग्र काढावें लागतें.

चातुर्मास्यनामक यागांत प्रत्येक पर्व संपल्यावर काखा, मिशा व डोकें या क्रमानें हजामत करवावयाची असून त्यानंतर डाव्या व उजव्या हातांचीं व पायांचीं नखें करंगळीकडून अंगठ्यांकडे काढीत जावयाचीं असतात. सौत्रामणि नामक यज्ञांत सुरेचें हवन आहे. या प्रसंगीं पैष्टी, गौडी व माध्वी या तीन प्रकारांपैकीं तीन दिवस आंबत ठेवून बनविलेली तांदुळाच्या रसाची दारू वापरतात. यज्ञांमध्यें हुतशेष सुरेचें पान करावयाचें नसतें. यज्ञांतील हवनीय द्रव्यांत पुरोडाश, चरु, धाना, करंभ, परिवाप, आमिक्षा, वाजिन्, इत्यादि द्रव्यें आहेत. भाजीपाले, कोशिंबिरी व इतर पक्वान्न, वगैरे प्रकार वेदांत आढळत नाहींत. यज्ञांतील शिजविण्याचें काम अध्वर्यु अगर नियोजित ऋत्विजच करतो. सोनारांनीं बनविलेले पदार्थ यज्ञांत अनेक वेळां उपयोगांत आणण्याचें कारण पडतें. मंचक, झोपाळा, विणलेली घडवंची, उखळ, मुसळ, पळी, पाळें, डलथनें, मंडप, सांडस, ग्रंह, स्फ्य, रथ, गाडे, वगैरे सुतारकामाचें लांकडी सामान यज्ञप्रसंगानें वेदांत उपयोगांत आणलेलें आढळतें.

श्रौत कर्मांत, निरनिराळ्या आकारांच्या विटा, शेगड्या, उतरंडीच्या आकाराचीं बोळकीं, मडकीं, घागरी, माठ व परळ अशा प्रकारचें कुंभारकामाचें सामान लागतें. यांपैकीं अग्निचयनांत लागणाऱ्या तीन शेगड्या आणि मंडला व ऋषभा नामक विटा एवढें सामान तयार करून भाजण्याचें काम स्वतः अवर्ध्यूसच करावें लागतें. इतर नमुन्यांप्रमाणें कुंभारांकडून करवून घेतात.

यज्ञांमध्यें चांभारानें तयार केलेल्या जोडे वगैरे वस्तू वापरावयाच्या असतात. वेम, शलाकोपधान, प्राचीन तान, ओतु, वगैरे विणकामासंबंधीं शब्द, दर्भाचीं, गवताचीं, कापसाचीं, तागाचीं व क्षौम वस्त्रें, रंगविलेलीं धोतरें व पागोटीं, वगैरे गोष्टींचा उल्लेख यज्ञांगानें वेदांत अनेक ठिकाणीं आला आहे. यज्ञकर्मांत अप्रत्यक्ष रीतीनें शिवणकलेचा उल्लेख आलेला आढळतो. लोहारानें तयार केलेल्या नांगराचा फाळ, वस्तरा, लोखंडी झांकण्या, सुया, लोखंडी कमंडलू, चिमटे, पळी, बाणाचें फळ, सुरी, वगैरे जिनसा यज्ञांमध्यें उपयोगांत आणण्याचे अनेक प्रसंग आहेत. यज्ञकालांत पशुपालन हा एक स्वतंत्र धंदाहि लोक करीत असावेत.

सोम खरेदी करतांना सोमवल्लीची किंमत यजमानाच्या ऐपतीवर अगर यज्ञांच्या लहान-मोठ्या प्रमाणांवर गायींच्या व इतर वस्तूंच्या रूपांत देण्यांत येई. ठरलेल्या जास्तींत जास्त किंमतींतहि सोमविक्या सोमवल्ली देण्यास कुरकुरेल तर ती त्याच्यापासून बळजबरीनें घेऊन त्यास हांकून लावीत. सोमयागांत सोमवल्ली वरवंट्यानें कुटून तिच्यापासून रस काढतात.

श्रौत कर्मांत निरनिराळ्या आकृतींच्या वेदी व चिती करण्यांत गवंडीकामाची गरज लागते. घरें बांधण्याचा प्रकार श्रौत कर्मांत कोठें आढळत नाहीं.

पीठ करावयाचें तें जात्याच्या साहाय्यानें दळून करण्यांत येत नसून पाट्यावरवंट्याच्या साहाय्यानें करण्यांत येतें. कांडावयास घेतलेलें उखळ व मुसळ हीं लांकडीच असतात. मुसळास वेढणी म्हणजे लोखंडी पट्टी मात्र नसते.

त्रिसंधी दोरी ऊर्फ शुल्ब वळण्याचा विधि यज्ञकर्मांत दृष्ट आहे. दोऱ्या, शिंकीं व दावीं हीं मात्र धंदेवाईक लोकांनीं तयार केलेलींच उपयोगांत घेतल्याचें दिसतें. प्राचीन काळीं दर्भ कापण्याकरितां घोड्याच्या बरगडीची अस्थि उपयोगांत आणीत. पुढें सुरीचा उपयोग करूं लागले. यूपांकरितां लांकूड तोडण्याचें काम व झाडें तोडून यज्ञभूमि साफसूफ करण्याचें काम लांकूडतोड्या धंदेवाइकांकडून करवीत असत असें दिसतें.

यज्ञांगानें रथ वापरण्याचें काम पुनराधान-प्रसंगीं, चयनप्रकरणांमध्यें, वाजपेय यज्ञांत, आधानप्रयोगांत व अश्वमेध यज्ञांत आलेलें आहे.

यज्ञांमध्यें खड्डा करण्याच्या प्रसंगीं त्याची आंखणी अगोदर केली जाते. खळगा करण्यास कळकाच्या काठीचा उपयोग केलेला आढळतो.

यज्ञांमध्यें वाद्यांचें वादन विहित आहे. तत म्हणजे तंतुवाद्यांपैकीं वीणा, वाण, अलाबुवीणा, वक्रावीणा, कपिशीर्षी, महावीणा, शीलवीणा, पिच्छोरा, कांडवीणा, व तुंबरुवीणा; घन वाद्यांपैकीं उखळी; सुषिर म्हणजे पोकळ वाद्यांपैकीं नाळी, तूणव व शंख; आणि नद्ध म्हणजे चामड्यांनीं मढविलेल्या वाद्यांपैकीं दुंदुभि, भूमिदुंदुभि व पणव ऊर्फ मृदंग या वाद्यांचा उल्लेख आलेला आहे. यज्ञांमध्यें गायनवादनांखेरीज रथाच्या शर्यती वगैरे दुसरींहि कित्येक करमणुकीचीं साधनें असत.

अश्वमेध व पुरुषमेध यागांत अनेक देवतांचें आवाहन केलें जातें व त्याच्यासाठीं नानाविध पशू मारले जातात किंवा धरून सोडले जातात.

याप्रमाणें भारतीय यज्ञसंस्थेचा परिणाम समाजाच्या विकासाकडे झाला. यज्ञसंस्थेच्या वाढीमुळेंच वेदग्रंथांचें साहित्य जमा होऊन त्याचें वर्गीकरण झालें. तेव्हां या यज्ञसंस्थेकडे निराळ्या दृष्टीनें पाहण्यास शिकलें पाहिजे. पाश्चात्य पंडितांस हिचें महत्त्व कळलेंच नाहीं.

**यज्ञश्री शातकर्णि** ( राज्य. १६६–२०२ )—गौतमीपुत्र यज्ञश्री या नांवानें हा प्रसिद्ध आहे. कोल्हापूर येथें सांपडलेल्या

याच्या वेळच्या तांब्याच्या व शिशाच्या नाण्यांवरून याचें नांव गोतमीपुतसा वीलीवायकुरसा असें असावें असें दिसतें. याच्या नाण्यांवर जहाजाचें चित्र खोदलेलें असे. त्यावरून समुद्रावरील बराचसा प्रदेश याच्या ताब्यांत होता असें म्हणण्यास जागा आहे. दुसऱ्या पुलुमायीनें घालविलेले सर्व मुलूख परत मिळवून यानें त्यांची व्यवस्था नीट ठेवली. सन १७२ पर्यंत महाराष्ट्रांतील पैठणवर याचें राज्य होतें. यानंतर तेलंगणावरहि हा राज्य करीत होता.

**याक**—तिबेट व हिमालयांतील उंच डोंगर यांत राहणारा हा एक बैलांच्या वर्गातील प्राणी आहे. या प्रदेशांत राहणारे लोक यास गाय-बैलासारखें पाळतात. दूध, मांस व ओझें वाहणें या

कामांस याचा उपयोग करण्यांत येतो. याचे पाय आंखूड असून अंगावर लांब केंस असतात. नर याकची खांद्यापावेतों उंची ५½ फूट असते. कांहींना शिंगें असतात. रानटी याक काळे व माणसाळलेले पांढरे असतात. केंस आणि कातडी यांपासून टोप्या, कोट, पांघरुणें, दोर, इ. बनवितात.

**याकुतस्क**—हें यू. एस्. एस्. आर्. रशियापैकीं एक लोकराज्य सैबेरियाच्या पूर्वभागांत आहे. लेना नदीकांठच्या बहुतेक प्रदेशाचा यांत अन्तर्भाव होतो. क्षे. फ. १४,५७,०७० चौ. मैल व लो. सं. (१९३९) ४,००,५४४ असून त्यांपैकीं ८३ टक्के लोक याकुत जातीचे आहेत. शिकार करणें आणि सोनें काढणें हे येथील मुख्य धंदे आहेत. लेना नदी हीच दळणवळणाचें मुख्य साधन असून या नदींत मच्छीमारीचा धंदा विशेष महत्त्वाचा आहे. येथें सोनें, लोंकर व मीठ हें मुख्य उत्पादन होय. याची राजधानी याकुतस्क असून त्याची लो. सं. १२,००० आहे. याकुतस्क व इर्कुतस्क यांमध्यें विमानांची वाहतूक आहे.

**याकुति (माजूम)**—गांजाचा पाला पाण्यांत तूप घालून तो उकळवितात व पाणी आटवून झाल्यानंतर जें तूप राहतें तें साखरेच्या पाकांत घालून वड्या बनवितात. अशा गांजाच्या वड्या याकुति किंवा माजुम म्हणून विकल्या जातात. ह्या फार शक्तिवर्धक असतात.

**याकूत**—एक रत्न. हें सिकिता (सिलिकेट)चें बनलें असून याचा रंग जांभळा असतो. हें हिंदुस्थान, सिलोन, इराण, ब्राझील, इ. देशांत सांपडतें. जयपूर हें या रत्नाविषयीं प्रसिद्ध आहे.

**याकोबी, कार्ल गुस्टाव्ह जेकब** (१८०४–१८५१)—एक जर्मन गणितशास्त्रज्ञ. तो कोनिग्जबर्ग येथें १८२९–१८४२ पर्यंत प्रोफेसर होता. त्याचें मुख्य संशोधन दैर्घ्यफलां(एलिप्टिक फंक्शन्स)बद्दल आहे. याबद्दलचा सिद्धांत प्रथम एबेल आणि लेजेंडर या विद्वानांनीं मांडला, परंतु त्यामध्यें याकोबीनें इतर कोणत्याहि गणितशास्त्रज्ञांपेक्षां अधिक भर घातली. या सिद्धांताविषयींचा त्याचा एक सुप्रसिद्ध निबंध आहे.

**याकोबी, फ्रेडरिक हेनरिक** (१७४३–१८१९)—एक तत्त्वज्ञानी. हा व्यापाऱ्याचा मुलगा होता. पण राजकारणांत पडून यानें बरींच लोकोपयोगी कृत्यें केलीं. नंतर तत्त्वज्ञानी लेखक म्हणून प्रसिद्धि मिळविली. वोल्डेमार ही त्याची तत्त्वज्ञानविषयक कादंबरी आहे. मानसशास्त्रांतील यथार्थज्ञाना(कॉग्निशन)वरचे त्याचे लेख चांगले आहेत.

**याकोहामा**—जपान, टोकियो उपसागरांतील होन्शु बेटांवरील बंदर. हें टोकियोपासून १५ मैलांवर आहे. बंदर चांगलें मोठें व आधुनिक यंत्रसामुग्रीनें सज्ज आहे. रेशीम, कोळसा, तांबें, चहा, वगैरे पुष्कळ माल निर्यात होतो. १९२३ सालीं भूकंपामुळें याचा बराच नाश झाला; पण दुरुस्ती करून हें चांगलें वाढविण्यांत आलें व त्यामुळें जपान राष्ट्राचें हें प्रमुख बंदर बनलें. लो. सं. (१९४०) ९,६८,०९१

**यांगत्झी कियांग**—ही चीनमधल्या दोन मोठ्या नद्यांपैकीं एक नदी आहे. तिचा उगम पूर्व तिबेटांत होऊन नंतर चीनच्या युनान प्रांतांत ती शिरते व अनेक वळणें घेऊन अखेर पीत समुद्राला मिळते. तिची एकंदर लांबी २९०० मैल असून या नदींत समुद्रापासून ६०० मैल आंत मोठाल्या बोटी आणि १००० मैलपर्यंत लहान बोटी जाऊं शकतात. होकाऊ व नानकिंग हीं महत्त्वाचीं शहरें या नदीकांठीं आहेत. ही नदी एका मोठ्या कालव्यानें हांगहो नदीला जोडलेली आहे.

**यांत्रिक नांगर**—(ट्रॅक्टर). पेट्रोलच्या साहाय्यानें चालणारा हा नांगर आहे. हे नांगर प्रथम १९ व्या शतकांत उपयोगांत आले. त्यापूर्वी वाफेच्या इंजिनाच्या साहाय्यानें नांगर चालविण्यांत येत असत. पण असें करणें फार खर्चिक व त्रासदायक असे. याकरितां 'ट्रॅक्टर'चा शोध लावण्यांत आला.

प्रथम यांचा उपयोग ओझीं ओढण्याकडे करण्यांत येत असे. तो पुढें नांगरण्याकरितां करण्यांत येऊं लागला. अंतर्ज्वलन इंजिनें पूर्णत्वास पोंचल्यानंतर या यांत्रिक नांगराचे अनेक प्रकार तयार झाले. स्वयंगतिक तत्त्वावर यांची उभारणी असून वरील सांगाडा सोयीप्रमाणें बनविलेला असतो. ज्यांत कमी खर्चाचें जळण लागतें तो नांगर बहुधा शेतकरी पसंत करतात. अमेरिकेंत 'कॅटरपिलर' पद्धतीचा ट्रॅक्टर पुष्कळ शेतकरी पसंत करतात. कारण हा टँकप्रमाणें अडथळे न जुमानतां उडत जातो.

**यांत्रिक बंदूक**—(मशीन गन). ही एक लहान छिद्राची बंदूक असून ती एखाद्या घडवंचीवर, गाडीवर किंवा तिपायीवर बसविलेली असते. हिची रचना अशी केलेली असते कीं, तींतून फार जलद गोळया सोडण्यांत येतात. सध्यां ब्रिटिश सैन्यांत 'व्हिकर्स', 'हॉचकिस' व 'ल्युइ' नांवाच्या यांत्रिक बंदुका असतात. यांपैकीं पहिली उत्कृष्ट आहे. दुसऱ्या दोन केवळ आपोआप उडणाऱ्या बंदुका आहेत. यांचे मुख्यतः दोन प्रकार असतात. पहिल्या प्रकारामध्यें गोळया उडाल्यावर जो मागें उलट धक्का मिळतो त्याच्या योगानें ती चालविण्यांत येते व दुसऱ्या प्रकारामध्यें गोळया उडण्यानें जे वायू तयार होतात त्यांच्या साहाय्यानें ती चालते. सध्यांची व्हिकर्स बंदूक ही मागच्या धक्क्यानें चालणारी आहे व दुसऱ्या दोन दुसऱ्या प्रकारांत मोडतात.

यांत्रिक बंदुका १८६२ पूर्वी उपयोगांत नव्हत्या. त्या वर्षी अमेरिकेमध्यें प्रथम गॅटलिंग बंदूक बनविण्यांत आली. यानंतर फ्रेंच-जर्मन युद्धापूर्वी फ्रेंच लोक 'मित्रेल्यु' नांवाच्या बंदुकीवर प्रयोग करीत होते. पहिली 'मित्रेल्यु' बंदूक अवजड ३७ नळयांची असे, पण अलीकडील 'मित्रेल्यु' म्हणजे सुधारलेली हॉचकिस बंदूक होय. ब्रिटिश सैन्यांत प्रथम गॅटलिंग बंदूक वापरण्यांत आली व तीनंतर नॉर्डेन फेल्ट आणि गार्डनर या बंदुका आल्या. या बंदुकांस दोन ते दहा नळया असत व त्या एका दांड्यानें किंवा उचालकानें चालवीत. यानंतर हिराम मॅक्झिम यानें एक सुधारलेली बंदूक प्रचारांत आणली. या बंदुकींत घोड्यावर सारखा दाब ठेवला असतां एका मिनिटांत ७०० पर्यंत गोळया उडवितां येत असत. यांस काडतुसांचा पट्टा जोडण्याची व्यवस्था केलेली असे. सध्यांची व्हिकर्स ही मॅक्झिमसारखीच पण हलकी असते.

या बंदुकीची नळी पाण्याच्या आवरणांत बसविलेली असते. त्यामुळें ती एवढ्या शेंकडों गोळया सुटल्या तरी तापत नाहीं. यामध्यें साध्या बंदुकीच्या काडतुसासारखींच काडतुसें असतात. हॉचकिस बंदुकीचें वजन २७ पौंड असून ती घोडदळ किंवा रणगाडे यांमध्यें वापरतात. या बंदुकींतून एकच गोळी किंवा एकामागून एक अनेक गोळया सोडण्याची योजना असते. ही सामान्यतः घोड्यावरून नेण्यांत येते, पण सायकलवरूनहि नेतां येईल. ल्युई बंदूक ही बेल्जिअन सैन्यांतील एका शिपायानें १९०१ मध्यें बनविली. या बंदुकीच्या नळीभोंवतीं एक ॲल्युमिनमचा उष्णता-विसर्जक बसविलेला असतो, त्यामुळें ही हवेच्या योगानें थंड राखतां येते. ही स्टँडसह वजनाला फक्त ३२ पौंड भरते. ही विमानांवर मारा करण्याकरितांहि उपयोगी पडते. विमानामध्यें दोन व्हिकर्स व कित्येक ल्युई बंदुका बसविलेल्या असतात.

**यादव राजवंश**—यादव घराणें मूळचें मथुरेचें. तेथून गुजराथ व महाराष्ट्र या प्रांतांत आलें. यादवांचे दोन वंश होते. एक नाशिकजवळ चांदवड येथें व दुसरा दौलताबाद (देवगिरी) येथें होता. पहिल्या यादवांची राजधानी सिन्नर ही सेऊण देशांत होती. या घराण्यांतील पांचव्या भिल्लमनें चालुक्यांचें राज्य जिंकून देवगिरी येथें स्वतंत्र राज्य स्थापन केलें (११८७). हा भिल्लम (पाहा) महापराक्रमी होता. याचा मुलगा जैत्रपाळ तसाच होता. त्याच्याच कारकीर्दींत मुकुंदराज कवि होऊन गेला. जैत्रपाळाचा मुलगा सिंघण (पाहा) याचें नांव महाराष्ट्रांत शिंगणापुरामुळें कायम आहे. हा जसा पराक्रमी तसा पंडितहि होता. सिंघणानंतर दुसरा पराक्रमी व वाङ्मयाचा पुरस्कर्ता राजा म्हणजे रामदेवराव (१२७१–१३०९) होय. याच्या अमदानींत ज्ञानेश्वरादि संतकवी होऊन गेले. महाराष्ट्राचा शेवटचा वैभवशाली सम्राट् हाच होय. पण अल्लाउद्दिन खिलजीनें याच्यावर स्वारी करून याला मांडलिक बनविलें. याचा मुलगा शंकरदेव हा मुसलमानांशीं लढतांना पडला व नंतर यादव घराणें नष्ट झालें. या यादव (जाधव) घराण्याविषयीं महाराष्ट्राला फार आपलेपणा वाटतो. जाधव घराणीं पाहा.

यादवकालांतील देवळांची रचना विशिष्ट प्रकारची आहे. तिला हेमाडपंती म्हणतात. या बांधणींत चुना वापरीत नसत. या देवळांतील शिखरांची बांधणी विशिष्ट प्रकारची असते (काळ सुमारें १००० ते १३००).

दक्षिणेंतील यादवकालीन (हेमाडपंती) देवळें—

(अ) ठाणें जिल्हा—
१ अंबरनाथ

(आ) पुणें जिल्हा—
१ पूर
२ बेल्हे

(इ) पश्चिम खानदेश—
१ बालसाने

(उ) नाशिक जिल्हा—
१ झोडगा
२ देवलण
३ चांदोर
४ अंजनेरी
५ सिन्नर
६ त्रिंगलवाडी

(ऋ) सातारा जिल्हा—
१ सिंघणपूर
२ खटाव

(ए) सोलापूर जिल्हा—
१ माळशिरस
२ वेळापूर
३ पंढरपूर

| (ई) पूर्व खानदेश– | (ऊ) अहमदनगर– | (ऐ) वऱ्हाड– |
|---|---|---|
| १ एरंडोल | १ कोकमठाण | १ बारशी टाकळी |
| २ संगमेश्वर | २ अकोला | २ सातगांव |
| ३ घर्रखेड | ३ टाक्री | ३ साकेगांव |
| ४ चांगदेव | ४ पेडगांव | ४ मेहकर |
| ५ वाघली | ५ कर्जत | ५ शिरपूर |
| ६ पाटणा | ६ श्रीगोंदे | ६ लोणार |
| | ७ मांडगांव | ७ घोत्रा |
| | ८ रत्नवाडी | (ओ) निजाम हद्द– औंध |

**यानान**—मद्रास इलाखा, गोदावरी जिल्ह्यांतील एक फ्रेंच वसाहत. ही १७५२ पासून फ्रेंचांकडे आहे. दोन वर्षांपूर्वी त्यांनीं येथें वखार स्थापिली होती. क्षे. फ. ५ चौ. मैल व लो. सं. (१९४१) ५,७११. पांडिचरीच्या गव्हर्नराच्या अमलाखालीं हिचा कारभार चालतो.

**यापान**—खालचा ब्रह्मदेश, इरावती नदीच्या भागांतील एक जिल्हा. जिल्ह्यांत कालवे पुष्कळ आहेत. जंगल पुष्कळ असून त्यांत हिंस्र पशू आहेत. पाऊस ९५ इंच पडतो. लो. सं. पन्नास हजारांवर आहे. मच्छीमारीचा धंदा बराच चालतो. यापान हें मोठें गांव आहे.

**याब्लोनोई**—स्टानोव्होइ. आशियाच्या ईशान्येकडील एक पर्वताची रांग. मांचूरिया आणि सैबेरिया यांच्या सरहद्दीवर हा पर्वत असून पुढें बेहरिंगच्या सामुद्रधुनीपर्यंत गेला आहे. लांबी सुमारें ३००० मैल असून सर्वांत उंच शिखर ८००० फूट आहे.

**याम्योत्तर**—(मेरिडियन). दोन ध्रुव आणि विशिष्ट स्थल यांमधून जाणारी जी काल्पनिक रेषा तिला म्हणतात. पृथ्वी गोल आहे असें धरल्यास ही अर्धमहावर्तुल रेषा होईल. खस्थ याम्योत्तर रेषा विशिष्ट स्थलाचे खस्वस्तिक आणि क्षितिजाचे उत्तर-दक्षिण बिंदू यांमधून जाते. प्रत्येक नक्षत्र आणि सूर्य रोज दोनदां याम्योत्तर वृत्त ओलांडतो. एकाच याम्योत्तर वृत्तावर असणाऱ्या स्थलांची स्थानिक वेळ एकच असते.

**यारमाउथ**—(ग्रेट). हें बंदर व मच्छीमारीचें मोठें ठिकाण इंग्लंडांतील नॉर्फोक परगण्यांत आहे. हेरींग व माकेरेल या दोन जातींचे मासे पकडण्याचें हें मोठें ठिकाण आहे. व्हाइट-फिश या जातीचे मासेहि येथें मोठ्या प्रमाणांत सांपडतात. पहिल्या महायुद्धांत या शहरावर जर्मन लढाऊ क्रूझरांनीं व टार्पेडो-बोट विनाशिकांनीं (डिस्ट्रॉयरांनीं) भडिमार केला होता. लो. सं. सुमारें ५७,०००.

**यारी**—(क्रेन). जड वस्तु उचलण्यासाठीं जी यांत्रिक रचना केलेली असते तिला साधारणतः यारी म्हणतात. गोदीमध्यें बोटीवरील माल काढण्यासाठीं, रेल्वेच्या मालाच्या डब्यांतील माल उतरविण्यासाठीं व मोठमोठ्या कारखान्यांतून लोखंडी वस्तू उचलण्यासाठीं या यारीचा उपयोग केला जातो. बोटीवरील माल यारीनें खूप उंच उचलावा अशी योजना केलेली असते. या याऱ्या एका जागीं स्थिर बसविलेल्या असून त्या कोणत्याहि दिशेस वळवितां येतात. रेल्वेच्या धक्क्यावर बसविलेल्या याऱ्या बऱ्याचशा याच पद्धतीच्या असतात. बोटीवरील सामान काढणाऱ्या याऱ्या दाबलेल्या पाण्याच्या दाबानें वा अलीकडे विजेच्या साहाय्यानेंहि चालतात. रेल्वेच्या गाड्यांवरहि कांहीं याऱ्या बसविलेल्या असतात. लहान असल्यास हातांनीं आणि मोठ्या असल्यास वाफेच्या एंजिनाच्या योगानें चालवितात. मोठमोठ्या कारखान्यांतून खांबावर रूळ बसवून त्यावर चालणाऱ्या याऱ्या असतात. त्या बहुतेक सर्व विजेनें चालतात. लहान असल्यास हातांनींहि चालविण्याची व्यवस्था असते.

**यॉर्क**—इंग्लंड, यॉर्कशायर परगण्यांतील एक मोठें शहर. हें रोमन लोकांच्या वेळीं (खि. पू. ९८३) वसलें असावें. पुढें डेन्स लोकांकडे होतें. येथील देवस्थान जुनें आहे. लोखंड ओतण्याचे कारखाने, छापखाने व चाकोलेट आणि कोको यांचे धंदे येथें चालतात. लो. सं. सुमारें ९४,०००.

**यार्कंद**—चिनी तुर्कस्तान, एका मोठ्या ओलवणांतील शहर. हें यार्कंददर्या नदीवर वसलें आहे. येथें रेशीम, गालिचे, वगैरे होतात. वस्ती दोन लाखांपर्यंत आहे. पण बहुतेक मुसलमानी धर्माचे यार्कंदी लोक आहेत. या ठिकाणीं हिंदूंना फार वाईट रीतीनें वागविलें जातें असें युरोपियन प्रवाशांनीं लिहून ठेवलें आहे (१८७३).

**यावल**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. २५० चौ. मैल. तालुक्यांत यावल व फैजपूर हीं दोन मोठीं गांवें व ७५ खेडीं आहेत. लो. सं. (१९४१) १,०६,८३३. यावल गांवची लो. सं. (१९४१) १३,७०५ आहे. पूर्वीं हें गांव शिंदे सरकारकडे असे. येथें एक किल्ला व जुन्या हिंदुमुसलमानी इमारती आहेत. पूर्वीं कागद आणि नीळ यांविषयीं यावलची प्रसिद्धि असे.

**यासी**—हें याच नांवाच्या रुमानियाच्या भागाचें मुख्य ठिकाण असून, बहलुइ नदीच्या कांठीं आहे. यासीचें गॅलॅट व किशीने यांच्याशीं आगगाडीनें दळणवळण आहे. ही मोल्डेव्हियाच्या राज्यकारभाराची व रोमन कॅथॉलिक धर्माच्या मुख्य अध्यापकाची जागा आहे. येथें स. १८६० मध्यें प्रिन्स कुझानें एक विश्वविद्यालय स्थापिलें. याशिवाय येथें लष्करी शिक्षणाची शाळा, गायनशाळा व व्यापारी शाळा आहेत. येथें पेट्रोलियम,

मीठ, धातू, इमारतीचें लांकूड, फळें, वगैरेंचा व्यापार आहे. लो. सं. सुमारें एक लाख आहे.

**यास्क**—निरुक्ताचा कर्ता व वैदिक भाषाशास्त्रज्ञ. याचा काळ खि. पू. ८०० ते ७०० यांमधील असावा असें संशोधक म्हणतात. वेदविवरणासाठीं यास्कानें निरुक्त (पाहा) हा व्याकरण ग्रंथ रचिला. निघंटु हा वैदिक शब्दकोश कोणी याच्या नांवावर घालतात. तौलनिक भाषाशास्त्राचा हा आद्य पंडित म्हणतां येईल.

**याज्ञवल्क्य**—एक वैदिक ऋषि व स्मृतिकार. यानें आपला गुरु वैशंपायन याच्याबरोबर भांडून स्वतंत्र शुक्लयजुर्वेद निर्माण केला अशी आख्यायिका आहे. हा फार शीघ्रकोपी होता म्हणतात; पण त्यामुळेंच त्याच्या हातून नवीन ग्रंथनिर्मिति झाली असावी. शुक्लयजुर्वेदाखेरीज बृहदारण्यकोपनिषद्, योगसूत्रें, शतपथब्राह्मण, स्मृति, इ. चें कर्तृत्व याचें असें मानलें जातें. हा जनक राजाच्या दरबारीं होता. याची पत्नी मैत्रेयी (पाहा) ही चांगली विदुषी होती.

याज्ञवल्क्यस्मृति मनुस्मृतीच्या खालोखाल आजहि प्रमाणभूत मानतात. हिचे आचार, व्यवहार व प्रायश्चित्त असे तीन अध्याय असून एकूण श्लोकसंख्या १००९ आहे. ही खिस्ती शकाच्या ११ व्या शतकांत रचिली गेली असावी असें कांहीं संशोधक पंडित समजतात. तीवर बऱ्याच टीका झाल्या आहेत. त्यांपैकीं विज्ञानेश्वरानें केलेली 'मिताक्षरा' टीका प्रसिद्ध व चांगली आहे.

**याज्ञिक इंदुलाल**—गुजराथेंतील एक सार्वजनिक कार्यकर्ते. कायद्याची पदवी घेतल्यावर हे प्रथम सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे उमेदवार समासद झाले व पुढें कायम सभासद झाले. हे गुजराथींमध्यें प्रसिद्ध होणाऱ्या 'नवजीवन' पत्राचे पहिले संपादक होते. १९१७ मध्यें होमरूल चळवळीबद्दलच्या धोरणाबद्दल सोसायटीशीं मतभेद झाल्यामुळें यांनीं सभासदत्वाचा राजीनामा दिला. नंतर होमरूल चळवळीच्या प्रसारामध्यें प्रत्यक्ष भाग घेऊन विशेषतः गुजराथ प्रांतांत तिचा प्रचार केला. नंतर ते महात्मा गांधींच्या साबरमती आश्रमांत जाऊन राहिले. तेथें त्यांनीं केळवणी मंडळ स्थापन करून त्याच्या कार्याचा जोरानें प्रसार केला व त्यामार्फत सर्व गुजराथ प्रांतांत शाळा सुरू केल्या. रौलट कायद्याविरुद्ध झालेल्या चळवळींत व सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं विशेष भाग घेतला व त्यांस राजद्रोहाबद्दल शिक्षा झाली. सुटकेनंतर गांधींजींशीं मतभेद झाल्यामुळें यांनीं साबरमती आश्रम सोडून दिला. नंतर ते 'प्रजामित्रने हिंदुस्थान' या पत्राचे संपादक झाले. पण तीहि जागा सोडून देऊन ते चित्रपटांच्या धंद्यांत शिरले. तो सोडून ते १९३०–१९३६ पर्यंत इंग्लंड-युरोपमध्यें राहिले. तेथून ते हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांस लेख पाठवीत असत. तेथून परत हिंदुस्थानांत आल्यावर ते गुजराथमध्यें भिल्लसुधारणा कार्यामध्यें पडले.



**यिडिश भाषा**—हें नांव रशिया, पोलंड व अमेरिका येथें प्रचलित असलेल्या एका ज्यूडो-जर्मन बोलभाषेला दिलेलें आहे. जर्मनींत ज्यू लोकांचा छळ होऊं लागल्यावर ते ज्यू लोक पूर्व दिशेला बोहेमिया, पोलंड व लिथुआनिया या प्रदेशांत जाऊन राहिले. तेथें त्यांची जन्मभाषा वाढत गेली. त्या वेळीं त्या भाषेंत हिब्रू व इतर अनेक परकीय भाषांचे पुष्कळ शब्द समाविष्ट झाले. त्यामुळें ती भाषा जर्मन भाषेहून निराळी बनली. अमेरिकेंत या भाषेंत वृत्तपत्रेंहि निघतात व ह्या यिडिश भाषेंत अलीकडे पुष्कळ गद्य व पद्य वाङ्मय निर्माण झालें आहे. यिडिश वाङ्मयावर अनेक परकीय गोष्टींचा परिणाम झालेला असला तरी हें वाङ्मय ज्यू लोकांचा आत्मा व आध्यात्मिक बल दर्शवितें.

**यित्र**—(इट्रिअम). एक मूलधातु. आत्रेय पाहा.

**यीट्स, विल्यम बटलर** (१८६५–१९३९)—एक आयरिश कवि व नाटककार. कांहीं विद्यापीठांनीं त्याला सन्मान्य 'डी. लिट्' पदवी दिली होती. त्याला १९२३ सालीं वाङ्मयाबद्दलचें नोबेल पारितोषिक मिळालें. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते: 'दि शॅडोई वॉटर्स', 'दि लँड ऑफ हार्ट्स डिझायर' (मनीषा भूमि), 'दि सीक्रेट रोझ (गुप्त गुलाब)' (१९००), 'रेव्हेरीज' (विचारतरंग), 'लेटर पोएम्स' (पत्रकाव्य), आणि 'ए व्हिजन' (एक कल्पना). १९२२ सालीं स्वतंत्र आयरिश लोकराज्याचा तो एक सिनेटर होता.

**युआनताइ**—एक कोरियन कायदेपंडित व प्रवासी. याचें संस्कृत नांव सर्वज्ञानदेव होतें. यंगहिवाइ वर्षी म्हणजे इ. स. ६५० मध्यें तो तिबेटांतील रस्त्यानें नेपाळमधून हिंदुस्थानांत आला. तेथें त्यानें बोधि वृक्षाजवळच्या वस्तूंचें दर्शन घेतलें. नंतर तरखार देशास गेल्यावर त्याला ताउहि (पाहा) भेटला आणि त्याबरोबर तो तहसिओ (महाबोधि) देवळास परत आला. पुढें त्यानें चीन देशाकडे प्रयाण केलें व त्यानंतर त्याच्या संबंधांत पुन्हां कांहीं ऐकूं आलें नाहीं.

**युआन शिकाई** (१८५९–१९१६)—हा १९१२ ते १६ या काळांत चिनी लोकराज्याचा अध्यक्ष होता. हा पूर्वीच्या विधवा बादशाहिणीचा आवडता मंत्री असून त्यानें तिच्या मृत्यूपूर्वी बरींच मोठमोठीं सरकारी हुद्यांचीं कामें केलीं होतीं. १९११ सालीं ज्या वेळीं क्रांति झाली त्या वेळीं त्यानें प्रथम मांचु घराण्यास मदत केली. परंतु पुढें लोकराज्य स्थापन झाल्यावर त्यास अध्यक्ष निवडण्यांत आलें.

**युआवलुई**—हा चिनी कायदेपंडित असून एका सेनापतीचा मुलगा होता. तो उत्तर हिंदुस्थान सोडून काश्मीर येथें राहिला

होता. राजाचे सर्व हत्ती त्याच्या ताब्यांत होते. या देशाच्या राजास निरनिराळ्या मंदिरांत जाण्याचा फार नाद होता. मकर-हद-मंदिर व कुंगयंग मंदिर हीं यांपैकींच दोन मंदिरें आहेत. येथें ५०० अर्हतांना दानधर्म होत असे. मध्यन्तिकाचा शिष्य आनंद यानें राजास दीक्षा दिली ती याच ठिकाणीं. एकदां काश्मीरच्या राजानें १००० लोकांना फांशीची शिक्षा फर्माविली असतांना यानें राजाला उपदेश करून सर्व लोक वांचविले. येथें कांहीं दिवस राहून तो दक्षिणेकडे बोधि देवळांत गेला. तेथें बोधि-वृक्षाची पूजा करून मुचीन (मच्छालिंग) सरोवर पाहून गृध्र-शिखरावर व इतरत्र गेला आणि शेवटीं नेपाळास जाऊन तेथेंच वारला.

**युकॅटन**—अमेरिकेंतील एक द्वीपकल्प. मेक्सिकोचा आग्नेय भाग, क्विंटाना रू, कँपेश आणि युकॅटन हीं राज्यें व ब्रिटिश होंडुरस आणि ग्वाटामाला यांचे थोडे भाग मिळून हें द्वीपकल्प होतें. मेक्सिकोचें आखात व कॅरिबियन समुद्र यांमध्यें हें आहे. क्षे. फ. २३,९२६ चौ. मैल. किनाऱ्यावर जंगल पुष्कळ आहे. मका, ऊंस, कापूस, कॉफी, तंबाखू हीं पिकें आहेत, पण मुख्य व महत्त्वाचें 'हेनेक्वेन' पीक असून त्यापासून सिसल वाख निघतो. हा सुमारें पंचवीस कोटी पौंड दरसाल निर्यात होतो. येथील मय संस्कृति इ. स. ५ व्या शतकापासून आहे. पुढें ती एक हजार वर्षेंपर्यंत वाढत गेली. युकॅटनमध्यें नगरराज्यें होतीं. (मय लोक पाहा). स्पॅनियर्ड लोक प्रथम १५१२ त येथें आले व त्यांनीं प्रदेशाचा ताबा घेतला. १८२१ त मेक्सिको स्वतंत्र झाल्यावर याचीहि त्यासाठीं चळवळ सुरू झाली. नंतर युकॅटनचें एक वेगळें संस्थान मेक्सिकोच्या अधिराज्याखालीं निर्माण झालें. लो. सं. ४ लाख.

**युकॅलिप्टस**—[वर्ग मिर्टासी]. ही एक वृक्षांची जात आहे. यांचें मूलस्थान बहुतेकांचें ऑस्ट्रेलिया हें आहे. यांचा आकार फार मोठा असून कांहींची उंची ४८० पासून ५०० फुटांपर्यंत भरते. ऑस्ट्रेलियन वसाहतींत यांस गोंदाचीं झाडें म्हणतात. कारण यांच्या खोडांपासून एक प्रकारचा गोंद निघतो. यांपैकीं कांहींचें लांकूड इमारतीच्या कामीं व इतर कामाकरितां फार उत्कृष्ट असतें. निळ्या गोंदा(इं. ग्लयोब्युलस)-च्या झाडापासून एक प्रकारचें तेल निघतें. तें स्वेदोत्पादक म्हणून, दम्यावर उपाय म्हणून व झटके येण्यावर आणि कृमिघ्न म्हणूनहि वापरण्यांत येतें. तसेंच श्वासनलिकासंकोचक म्हणूनहि त्याचा उपयोग करण्यांत येतो. दलदलीच्या जागीं जेथें हिंवतापाचा जोर असतो अशा ठिकाणीं त्यावर उपाय म्हणून या निळ्या गोंदाच्या झाडाची व दुसऱ्या एका जातीची (इं. ॲमिग्डालिना) लागवड करण्यांत येते. यांच्या दुसऱ्या कांहीं जातींपासून (इं. मॅनिफेरा, वगैरे) एक प्रकारचा गोड दुग्धरस (मॅना) मिळतो. त्याचा अन्न म्हणून उपयोग करण्यांत येतो. याची लागवड हिंदुस्थान, पॅलेस्टाइन, आल्जिअर्स व दक्षिण फ्रान्स यांमध्यें करण्यांत आली आहे.

१. न उमललेल्या फुलाचा छेद.
२. पराग पेटिका.
३. फळाचा छेद.

**युक्रेन**—रशियन सोशिआलिस्ट सोव्हिएट रिपब्लिक संघांत दक्षिण भागांत हें स्वायत्त संस्थान आहे. क्षेत्रफळ १,७०,९९८ चौ. मैल आणि लोकसंख्या ३,०९,६०,२२१ असून त्यांत ८० टक्के युक्रेनियन ऊर्फ लघु रशियन लोक आहेत. राजधानी खारकोव्ह. इतर कीव्ह, एकाटरिनोस्लाव्ह, निकोलीव्ह, पोल्टावा आणि टागांरॉग हीं मुख्य शहरें आहेत. या प्रदेशांत नीस्टर, बग, नीपर, डोनट्झ या नद्यांमुळें विपुल पाणीपुरवठा आहे व त्यामुळें रशियन साम्राज्यांत सर्वांहून अधिक संपत्तिमान असा हा प्रांत आहे. येथील काळी जमीन अत्यंत सुपीक असल्यामुळें गहूं व इतर सर्व प्रकारचीं धान्यें होतात. फळबागा, घोडे-गायी-मेंढ्या, पाळीव जनावरें यांचें संवर्धन हे फार महत्त्वाचे उद्योगधंदे असून साखरेच्या कारखान्याचें केंद्र कीव्ह शहर हें आहे. दारू व इतर अर्क काढणें हाहि मोठ्या किफायतीचा धंदा येथें चालतो. हा प्रदेश खनिज पदार्थांनीं समृद्ध असून दगडी कोळसा, लोखंड, हीं मुख्य खनिज द्रव्यें आहेत. पारा या धातूचा युरोपला मुख्य पुरवठा येथून होतो. काळा समुद्र, नीपर व डॉन नद्या यांत मच्छीमारीचा धंदा महत्त्वाचा आहे.

युक्रेन लोकराज्याची स्थापना होऊन तें स्वतंत्र व्हावें असें उत्तेजन जर्मनीनें १९१७ मध्यें लघु रशियाच्या बऱ्याच भागाला दिलें. १९१७–१८ सालीं या नव्या संस्थानावर जर्मनीनें चढाई केली; आणि नंतर बोल्शेव्हिस्ट सैन्यानें हा प्रदेश पादाक्रान्त केला. १९२० मध्यें रशियन संघराज्य आणि युक्रेन यांचा लष्करी व आर्थिक बाबतींत दोस्तीचा तह झाला. १९२१ मध्यें पोलंड सोव्हिएट संघ यांच्यामध्यें रिगाचा तह होऊन त्यांनीं युक्रेनचें स्वातंत्र्य मान्य केलें.

**युगें**—विश्वाचा काल मापण्याचें मोठें परिमाण तें युग. हिंदुस्थानांत प्राचीन काळीं युगें, मन्वंतरें आणि कल्पें या परिमाणांनीं जगाच्या आरंभापासूनचा काल मोजण्यांत येई. युगें चार:–कृत, त्रेता, द्वापर व कलि; हीं धर्म आणि संस्कृति या दृष्टीनें उतरतीं होत गेलेलीं आहेत. कृत किंवा सत्ययुग या

काळांत माणूस सुखाच्या शिखरावर होता; त्याच्या उलट स्थिति कलियुगांत आहे. त्रेतायुगाच्या आरंभीं राम होऊन गेला व द्वापरयुगाच्या शेवटीं भारतीय युद्ध झालें. कृतयुगाचीं ४८००, त्रेताचीं ३६००, द्वापराचीं २४०० व कलियुगाचीं १२०० संवत्सरें धरतात. चार युगांचें एक महायुग होतें. चालू युग हें चालू वराहकल्पाचें ४५७ वें व चालू वैवस्वत मन्वंतराचें २८ वें युग आहे.

निरनिराळया धर्मांत युगाच्या कल्पना निरनिराळया आहेत. पारशी धर्मांतहि चार युगें आहेत. ख्रिस्ती धर्म सत्ययुग किंवा सुवर्णयुग भविष्यकाळांत येणार आहे असें मानतो.

**युगांडा**—पूर्वमध्य आफ्रिकेंतील एक ब्रिटिशसंरक्षित देश. क्षेत्रफळ ९८,९८१ चौ. मैल. कंपाला मुख्य ठिकाण. व्हिक्टोरिया व आल्बर्ट न्यांझा या सरोवरांच्या सभोंवतीं हा प्रदेश आहे. हवा अत्यंत उष्ण आहे. उष्ण प्रदेशांतील जंगलें व दलदलीचे प्रदेश यांतून शिकारी जनावरें आढळतात. लो. सं. ३९,३०,७२४. यांपैकीं ३९,०१,४४० आफ्रिकन, २६,५३७ एशियाटिक व २,७४७ युरोपियन आहेत. आफ्रिकन लोक बहुतेक बगांडा जातीचे आहेत. येथें कापसाचें पीक फार महत्त्वाचें आहे. कॉफी, मिरच्या, कातडीं, हस्तीदंत, तंबाखू, इ. दुसरीं पिकें आहेतच. हा प्रदेश ब्रिटिशसंरक्षणाखालीं १८९० पासून आहे; यावर एक गव्हर्नर असतो.

**युगोस्लाव्हिया**—हें युरोपच्या आग्नेय भागांत एक राज्य आहे. हा प्रदेश आड्रियाटिक समुद्रालगत पसरलेला आहे. क्षे. फ. ९६,१३४ चौ. मैल व लो. सं. (१९४०) १,५७३,००० आहे. याची राजधानी बेलग्रेड आहे. येथें स्लोव्हेन, मॅसेडोनिया व सर्वो-क्रोट या तीन भाषा सरकारमान्य आहेत. हें राज्य १ ल्या महायुद्धानंतर सर्बिया व मॉन्टेनेग्रो, व युगोस्लाव्हचा बहुतेक प्रदेश मिळून बनलेलें आहे. १८०४ पूर्वी या प्रदेशापैकीं एक लहानशा भागावर मॅंटेनेग्रो या नांवाचें स्वतंत्र राष्ट्र होतें. आणि बाकीच्या प्रदेशापैकीं कांहीं भागावर ऑटोमन साम्राज्यांत आणि कांहीं भाग हॅप्सबर्ग सत्तेखालीं होता. सदर सालीं सर्व लोकांनीं पुढारी जॉर्ज प्रेट्रोव्हिच याच्या नेतृत्वाखालीं बंड केलें व अखेर १८६६ सालीं सर्बिया हें स्वतंत्र राष्ट्र म्हणून मान्य करण्यांत आलें. पुढें बाल्कन युद्धानंतर १९१३ सालीं ह्या राज्याचा अधिक विस्तार झाला. १९२३ सालीं युगोस्लाव्हियाला ग्रीसकडून सालोनिका बंदरांत ३,५१,००० चौ. मीटर इतकें क्षेत्र मिळालें. दुसऱ्या महायुद्धानंतर १९४५ सालीं युगोस्लाव्हिया हें फेडरल पीपल्स रिपब्लिक-लोकसंघराज्य असें जाहीर करण्यांत येऊन त्यांत सहा लोकराज्यें [ सर्बिया, क्रोशिया, स्लोव्हेनिया, मॅंटेनेग्रो, मॅसेडोनिया (दक्षिण सर्बिया), आणि बोस्निया-हर्झेगोव्हिना ], शिवाय दोन स्वायत्त प्रांत (व्होल्होडिना व कोसोव्हो-मेथोहिया) इतक्यांचा समावेश झालेला आहे. येथलें राज्यकारभार अध्यक्ष पार्लमेंटच्या मतानुसार चालवतो. हें पार्लमेंट 'फेडरल असेंब्ली' व 'पीपल्स हाउस' या दोन सभांचें बनलेलें आहे. येथें सर्बियन-ऑर्थोडॉक्स, कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, मुसलमान, ज्यू, वगैरे धर्मांचे लोक आहेत. येथें शिक्षण पहिलीं आठ वर्षें सक्तीचें व मोफत आहे. ३४ ट्रेनिंग कालेजें व शेतकी व इतर अनेक उद्योगधंद्यांचें शिक्षण देणाऱ्या संस्था आहेत. येथें मका, गहूं, ओट, तमाखू व फळफळावळ होतात. खनिज द्रव्यें लोखंड, तांबें, सोनें, शिसें, अँटिमनी, क्रोम, दगडी कोळसा, वगैरे सांपडतात. येथें दारू, कापड, चामडीं, गालिचे, वगैरेंचे कारखाने आहेत. येथें लष्करी शिक्षण सक्तीचें आहे. आज युगोस्लाव्हियाचा प्रधान मंत्री मार्शल टिटो (पाहा) हा खंबीर मुत्सद्दी व वीर पुरुष आहे. हें राष्ट्र कम्युनिस्ट मताचें आहे तरी केवळ रशियाच्या तंत्रानें चाललेलें नाहीं. रशियाचा आक्रमकवाद याला मान्य नाहीं. यामुळें संयुक्त राष्ट्रसंघांत युगोस्लाव्हियाला मानाचें स्थान आहे.

**युटाह**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील अगदीं पश्चिमेकडील डोंगराळ संस्थान. क्षेत्रफळ ८४,९१६ चौ. मैल. लो. सं. ५,५०,३१०. संस्थानांतील सर्व जमीन ६००० फूट उंचीवर आहे. सर्वांत उंच शिखर (किंग्जमाउंटन) १३,४९८ फूट उंच आहे. जमीन रुक्ष असून काल्व्याच्या पाण्यानें शेतकाम होतें. याच संस्थानांत प्रसिद्ध ग्रेट सॉल्ट लेक हें क्षारजलसर आहे. हें ४,२१८ फुटांवर असून यांतील पाण्याला कोठेंच बहिर्द्वार नाहीं. यांत शेंकडा २० प्रमाणांत मीठ आहे. हवा कोरडी, उत्साहदायक व आरोग्यप्रद असते. सरासरी वार्षिक पर्जन्यमान १२ इंच. शेती व खाणकाम हे दोन्ही मुख्य उद्योग आहेत. मेंढ्या पाळणें व लोंकर काढणें हाहि एक प्रधान व्यवसाय आहे. संस्थानांत दोन विद्यापीठें आहेत. १८४८ च्या मेक्सिकन युद्धानें हा भाग अमेरिकेकडे आला. १८४७ मध्यें येथें कांहीं लोक वसाहतीकरतां गेले होते. त्यांनीं वसाहत वाढवून प्रदेश वस्तीलायक केला. १८६९ मध्यें रेल्वे झाल्यानें संवर्धनकार्यास मदत झाली. १८९६ मध्यें हें युनियन मध्यें सामील करून घेण्यांत आलें.

**युटोपिया**—ही एक काल्पनिक आदर्श-राज्यपद्धति आहे. हिच्यामध्यें सर्व गोष्टी पूर्णावस्थेस गेलेल्या असून तेथील शासनसंस्था व जीवितक्रम अत्यंत उच्च कोटींतील व सर्वगुणसंपन्न असतात अशी कल्पना आहे. जरी प्रत्यक्ष युटोपिया हा शब्द सर टॉमस मूर याच्या ग्रंथांत एका काल्पनिक प्रदेशास लाविलेला असून त्याचेंच नांव या काल्पनिक प्रदेशास देण्यांत येतें तरी याच्या

होता. राजाचे सर्व हत्ती त्याच्या ताब्यांत होते. या देशाच्या राजास निरनिराळ्या मंदिरांत जाण्याचा फार नाद होता. मकर-हद-मंदिर व कुंगयंग मंदिर हीं यांपैकींच दोन मंदिरें आहेत. येथें ५०० अर्हतांना दानधर्म होत असे. मध्यन्तिकाचा शिष्य आनंद यानें राजास दीक्षा दिली ती याच ठिकाणीं. एकदां काश्मीरच्या राजानें १००० लोकांना फांशीची शिक्षा फर्माविली असतांना यानें राजाला उपदेश करून सर्व लोक वांचविले. येथें कांहीं दिवस राहून तो दक्षिणेकडे बोधि देवळांत गेला. तेथें बोधि-वृक्षाची पूजा करून मुचीन (मच्छालिंग) सरोवर पाहून गृध्र-शिखरावर व इतरत्र गेला आणि शेवटीं नेपाळास जाऊन तेथेंच वारला.

**युकॅटन**—अमेरिकेंतील एक द्वीपकल्प. मेक्सिकोचा आग्नेय भाग, क्विंटाना रू, कँपेश आणि युकॅटन हीं राज्यें व ब्रिटिश हाँडुरस आणि ग्वाटामाला यांचे थोडे भाग मिळून हें द्वीपकल्प होतें. मेक्सिकोचें आखात व कॅरिबियन समुद्र यांमध्यें हें आहे. क्षे. फ. २३,९२६ चौ. मैल. किनाऱ्यावर जंगल पुष्कळ आहे. मका, ऊंस, कापूस, कॉफी, तंबाखू हीं पिकें आहेत, पण मुख्य व महत्त्वाचें 'हेनेकेन' पीक असून त्यापासून सिसल वाख निघतो. हा सुमारें पंचवीस कोटी पौंड दरसाल निर्यात होतो. येथील मय संस्कृति इ. स. ५ व्या शतकापासून आहे. पुढें ती एक हजार वर्षेंपर्यंत वाढत गेली. युकॅटनमध्यें नगरराज्यें होतीं. (मय लोक पाहा). स्पॅनियर्ड लोक प्रथम १५१२ त येथें आले व त्यांनीं प्रदेशाचा ताबा घेतला. १८२१ त मेक्सिको स्वतंत्र झाल्यावर याचीहि त्यासाठीं चळवळ सुरू झाली. नंतर युकॅटनचें एक वेगळें संस्थान मेक्सिकोच्या अधिराज्याखालीं निर्माण झालें. लो. सं. ४ लाख.

**युकॅलिप्टस**—[वर्ग मिर्टासी]. ही एक वृक्षांची जात आहे. यांचें मूलस्थान बहुतेकांचें ऑस्ट्रेलिया हें आहे. यांचा आकार फार मोठा असून कांहींची उंची ४८० पासून ५०० फुटांपर्यंत भरते. ऑस्ट्रेलियन वसाहतींत यांस गोंदाचीं झाडें म्हणतात. कारण यांच्या खोडांपासून एक प्रकारचा गोंद निघतो. यांपैकीं कांहींचें लांकूड इमारतीच्या कामीं व इतर कामाकरितां फार उत्कृष्ट असतें. निळ्या गोंदा(ई. ग्लयोब्युलस)-च्या झाडापासून एक प्रकारचें तेल निघतें. तें स्वेदोत्पादक म्हणून, दम्यावर उपाय म्हणून व झटके येण्यावर आणि कृमिघ्न म्हणूनहि वापरण्यांत येतें. तसेंच श्वासनलिकासंकोचक म्हणूनहि त्याचा उपयोग करण्यांत येतो. दलदलीच्या जागीं जेथें हिंवतापाचा जोर असतो अशा ठिकाणीं त्यावर उपाय म्हणून या निळ्या गोंदाच्या झाडाची व दुसऱ्या एका जातीची (ई. ॲमिग्डालिना) *लागवड करण्यांत* येते. याच्या दुसऱ्या कांहीं जातींपासून (ई. मॅनिफेरा, वगैरे) एक प्रकारचा गोड दुग्धरस (मॅना) मिळतो. त्याचा अन्न म्हणून उपयोग करण्यांत येतो. याची लागवड हिंदुस्थान, पॅलेस्टाइन, आल्जिअर्स व दक्षिण फ्रान्स यांमध्यें करण्यांत आली आहे.

१. न उमललेल्या फुलाचा छेद.
२. पराग पेटिका.
३. फळाचा छेद.

**युक्रेन**—रशियन सोशिआलिस्ट सोव्हिएट रिपब्लिक संघांत दक्षिण भागांत हें स्वायत्त संस्थान आहे. क्षेत्रफळ १,७०,९९८ चौ. मैल आणि लोकसंख्या ३,०९,६०,२२१ असून त्यांत ८० टक्के युक्रेनियन ऊर्फ लघु रशियन लोक आहेत. राजधानी खारकोव्ह. इतर कीव्ह, एकाटरिनोस्लाव्ह, निकोलीव्ह, पोल्टावा आणि टागांरॉग हीं मुख्य शहरें आहेत. या प्रदेशांत नीस्टर, बग, नीपर, डोनट्झ या नद्यांमुळें विपुल पाणीपुरवठा आहे व त्यामुळें रशियन साम्राज्यांत सर्वांहून अधिक संपत्तिमान असा हा प्रांत आहे. येथील काळी जमीन अत्यंत सुपीक असल्यामुळें गहूं व इतर सर्व प्रकारचीं धान्यें होतात. फळबागा, घोडे-गायी-मेंढ्या, पाळीव जनावरें यांचें संवर्धन हे फार महत्त्वाचे उद्योगधंदे असून साखरेच्या कारखान्याचें केंद्र कीव्ह शहर हें आहे. दारू *व इतर अर्क काढणें हाहि मोठ्या किफायतीचा धंदा येथें* चालतो. हा प्रदेश खनिज पदार्थांनीं समृद्ध असून दगडी कोळसा, लोखंड, हीं मुख्य खनिज द्रव्यें आहेत. पारा या धातूचा युरोपला मुख्य पुरवठा येथून होतो. काळा समुद्र, नीपर व डॉन नद्या यांत मच्छीमारीचा धंदा महत्त्वाचा आहे.

युक्रेन लोकराज्याची स्थापना होऊन तें स्वतंत्र व्हावें असें उत्तेजन जर्मनीनें १९१७ मध्यें लघु रशियाच्या बऱ्याच भागाला दिलें. १९१७–१८ सालीं या नव्या संस्थानावर जर्मनीनें चढाई केली; आणि नंतर बोल्शेव्हिस्ट सैन्यानें हा प्रदेश पादाक्रान्त केला. १९२० मध्यें रशियन संघराज्य आणि युक्रेन यांचा लष्करी व आर्थिक बाबतींत दोस्तीचा तह झाला. १९२१ मध्यें पोलंड सोव्हिएट संघ यांच्यामध्यें रिगाचा तह होऊन त्यांनीं युक्रेनचें स्वातंत्र्य मान्य केलें.

**युगें**—विश्वाचा काल मापण्याचें मोठें परिमाण तें युग. हिंदुस्थानांत प्राचीन काळीं युगें, मन्वंतरें आणि कल्पें या परिमाणांनीं जगाच्या आरंभापासूनचा काल मोजण्यांत येई. युगें चार :—कृत, त्रेता, द्वापर व कलि; हीं धर्म आणि संस्कृति या दृष्टीनें उतरतीं होत गेलेलीं आहेत. कृत किंवा सत्ययुग या

कालांत माणूस सुखाच्या शिखरावर होता; त्याच्या उलट स्थिति कलियुगांत आहे. त्रेतायुगाच्या आरंभीं राम होऊन गेला व द्वापरयुगाच्या शेवटीं भारतीय युद्ध झालें. कृतयुगाचीं ४८००, त्रेताचीं ३६००, द्वापराचीं २४०० व कलियुगाचीं १२०० संवत्सरें धरतात. चार युगांचें एक महायुग होतें. चालू युग हें चालू वराहकल्पाचें ४५७ वें व चालू वैवस्वत मन्वंतराचें २८ वें युग आहे.

निरनिराळया धर्मांत युगाच्या कल्पना निरनिराळया आहेत. पारशी धर्मांतहि चार युगें आहेत. ख्रिस्ती धर्म सत्ययुग किंवा सुवर्णयुग भविष्यकाळांत येणार आहे असें मानतो.

**युगांडा**—पूर्वमध्य आफ्रिकेंतील एक ब्रिटिशसंरक्षित देश. क्षेत्रफळ ९८,९८१ चौ. मैल. कंपाला मुख्य ठिकाण. व्हिक्टोरिया व आल्बर्ट न्यांझा या सरोवरांच्या समोंवतीं हा प्रदेश आहे. हवा अत्यंत उष्ण आहे. उष्ण प्रदेशांतील जंगलें व दलदलीचे प्रदेश यांतून शिकारी जनावरें आढळतात. लो. सं. ३९,३०,७२४. यांपैकीं ३९,०१,४४० आफ्रिकन, २६,५३७ एशियाटिक व २,७४७ युरोपियन आहेत. आफ्रिकन लोक बहुतेक बगांडा जातीचे आहेत. येथें कापसाचें पीक फार महत्त्वाचें आहे. कॉफी, मिरच्या, कातडीं, हस्तीदंत, तंबाखू, इ. दुसरीं पिकें आहेतच. हा प्रदेश ब्रिटिशसंरक्षणाखालीं १८९० पासून आहे; यावर एक गव्हर्नर असतो.

**युगोस्लाव्हिया**—हें युरोपच्या आग्नेय भागांत एक राज्य आहे. हा प्रदेश आड्रियाटिक समुद्रालगत पसरलेला आहे. क्षे. फ. ९६,१३४ चौ. मैल व लो. सं. (१९४०) १,५७३,००० आहे. याची राजधानी बेल्ग्रेड आहे. येथें स्लोव्हेन, मॅसेडोनिया व सर्बो–क्रोट या तीन भाषा सरकारमान्य आहेत. हें राज्य १ ल्या महायुद्धानंतर सर्बिया व मॉन्टेनेग्रो, व युगोस्लाव्हचा बहुतेक प्रदेश मिळून बनलेलें आहे. १८०४ पूर्वी या प्रदेशापैकीं एक लहानशा भागावर मॅंटेनेग्रो या नांवाचें स्वतंत्र राष्ट्र होतें. आणि बाकीच्या प्रदेशापैकीं कांहीं भागावर ऑटोमन साम्राज्यांत आणि कांहीं भाग हॅप्सबर्ग सत्तेखालीं होता. सदर सालीं सर्व लोकांनीं पुढारी जॉर्ज प्रेट्रोव्हिच याच्या नेतृत्वाखालीं बंड केलें व अखेर १८६६ सालीं सर्बिया हें स्वतंत्र राष्ट्र म्हणून मान्य करण्यांत आलें. पुढें बाल्कन युद्धानंतर १९१३ सालीं ह्या राज्याचा अधिक विस्तार झाला. १९२३ सालीं युगोस्लाव्हियाला ग्रीसकडून सालोनिका बंदरांत ३,५१,००० चौ. मीटर इतकें क्षेत्र मिळालें. दुसऱ्या महायुद्धानंतर १९४५ सालीं युगोस्लाव्हिया हें फेडरल पीपल्स रिपब्लिक–लोकसंघराज्य असें जाहीर करण्यांत येऊन त्यांत सहा लोकराज्यें [ सर्बिया, क्रोशिया, स्लोव्हेनिया, मॉंटेनेग्रो, मॅसेडोनिया (दक्षिण सर्बिया), आणि बोस्निया–हर्झेगोव्हिना ], शिवाय दोन स्वायत्त प्रांत (व्होव्होडिना व कोसोव्हो–मेथोहिया) इतक्यांचा समावेश झालेला आहे. येथला राज्यकारभार अध्यक्ष पार्लमेंटच्या मतानुसार चालवतो. हें पार्लमेंट 'फेडरल असेंब्ली' व 'पीपल्स हाउस' या दोन सभांचें बनलेलें आहे. येथें सर्बियन–ऑर्थोडॉक्स, कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, मुसलमान, ज्यू, वगैरे धर्मांचे लोक आहेत. येथें शिक्षण पहिलीं आठ वर्षें सक्तीचें व मोफत आहे. ३४ ट्रेनिंग कालेजें व शेतकी व इतर अनेक उद्योगधंद्यांचें शिक्षण देणाऱ्या संस्था आहेत. येथें मका, गहूं, ओट, तमाखू व फळफळावळ होतात. खनिज द्रव्यें लोखंड, तांबें, सोनें, शिसें, अँटिमनी, क्रोम, दगडी कोळसा, वगैरे सांपडतात. येथें दारू, कापड, चामडीं, गालिचे, वगैरेंचे कारखाने आहेत. येथें लष्करी शिक्षण सक्तीचें आहे. आज युगोस्लाव्हियाचा प्रधान मंत्री मार्शल टिटो (पाहा) हा खंबीर मुत्सद्दी व वीर पुरुष आहे. हें राष्ट्र कम्युनिस्ट मताचें आहे तरी केवळ रशियाच्या तंत्रानें चाललेलें नाहीं. रशियाचा आक्रमकवाद याला मान्य नाहीं. यामुळें संयुक्त राष्ट्रसंघांत युगोस्लाव्हियाला मानाचें स्थान आहे.

**युटाह**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील अगदीं पश्चिमेकडील डोंगराळ संस्थान. क्षेत्रफळ ८४,९१६ चौ. मैल. लो. सं. ५,५०,३१०. संस्थानांतील सर्व जमीन ६००० फूट उंचीवर आहे. सर्वांत उंच शिखर (किंग्जमाउंटन) १३,४९८ फूट उंच आहे. जमीन रुक्ष असून काल्व्याच्या पाण्यानें शेतकाम होतें. याच संस्थानांत प्रसिद्ध ग्रेट सॉल्ट लेक हें क्षारजलसर आहे. हें ४,२१८ फुटांवर असून यांतील पाण्याला कोठेंच बहिर्द्वार नाहीं. यांत शेंकडा २० प्रमाणांत मीठ आहे. हवा कोरडी, उत्साहदायक व आरोग्यप्रद असते. सरासरी वार्षिक पर्जन्यमान १२ इंच. शेती व खाणकाम हे दोन्ही मुख्य उद्योग आहेत. मेंढ्या पाळणें व लोंकर काढणें हाहि एक प्रधान व्यवसाय आहे. संस्थानांत दोन विद्यापीठें आहेत. १८४८ च्या मेक्सिकन युद्धानें हा भाग अमेरिकेकडे आला. १८४७ मध्यें येथें कांहीं लोक वसाहतीकरतां गेले होते. त्यांनीं वसाहत वाढवून प्रदेश वस्तीलायक केला. १८६९ मध्यें रेल्वे झाल्यानें संवर्धनकार्यास मदत झाली. १८९६ मध्यें हें युनियन मध्यें सामील करून घेण्यांत आलें.

**युटोपिया**—ही एक काल्पनिक आदर्श–राज्यपद्धति आहे. हिच्यामध्यें सर्व गोष्टी पूर्णावस्थेस गेलेल्या असून तेथील शासनसंस्था व जीवितक्रम अत्यंत उच्च कोटींतील व सर्वगुणसंपन्न असतात अशी कल्पना आहे. जरी प्रत्यक्ष युटोपिया हा शब्द सर टॉमस मूर याच्या ग्रंथांत एका काल्पनिक प्रदेशास लाविलेला असून त्याचेंच नांव या काल्पनिक प्रदेशास देण्यांत येतें तरी याच्या

मागची मूळ कल्पना फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे. प्लेटोचें 'टिमियस' आणि 'रिपब्लिक' हीं याचीं दोन महत्त्वाचीं उदाहरणें आहेत. मूरच्यानंतर अशा तऱ्हेचें काल्पनिक सुराज्य वर्णन करणारे ग्रंथ म्हटले म्हणजे फ्रॅन्सिस बेकनचा 'न्यू ॲटलँटिस', कॅम्पानेलाचा 'सिटी ऑफ दि सन' (सूर्यनगर), सॅम्यूअल बटलरचा 'एरेव्हॉन,' आणि एडवर्ड बेलॅमी याचा 'लुकिंग बॅकवर्ड' हे होत. सध्यां युटोपिया या शब्दानें कोणतीहि काल्पनिक परंतु असाध्य योजना ध्वनित होते व नवीन यांत्रिक युगास हा शब्द लावण्यांत येतो.

**युट्रेक्ट**--नेदर्लँड्स, युट्रेक्ट प्रांताची राजधानी. हें एक मोठें व्यापारी ठिकाण आहे. धान्य, गुरें, गालिचे, मखमल, कापड, रासायनिक द्रव्यें, इ. चा व्यापार चालतो. हॉलंडमधील हें अत्यंत जुनाट शहर आहे. येथें एक विद्यापीठ आहे. लो. सं. १,४०,९००. स्पेन-वारसायुद्धानंतरचा तह १७१३ मध्यें येथें झाला.

**युति**--(कॉन्जंक्शन). जेव्हां दोन खगोलांचे, दोन ग्रहांचे किंवा एक ग्रह आणि सूर्य यांचे भोग (रेखांश) किंवा क्रांतिवृत्तावरील त्यांच्या प्रलंबनाच्या दिशा एकच असतात तेव्हां ही युति होते. दोन खस्थ पदार्थ पृथ्वीच्या भिन्न अंगांस येऊन युति झाल्यास तिला प्रतियुति म्हणतात. युतीमध्यें हे खस्थ पदार्थ एका आड एक असे झाल्यास भेदयुति किंवा ग्रहण असें म्हणतात.

**युद्ध**—दोन राष्ट्रांत किंवा एखाद्या राष्ट्रांतील दोन पक्षात शस्त्रास्त्रानें जो लढा होतो त्यास युद्ध म्हणतात. बहुशः आरंभीं जमिनीच्या मालकीबद्दल किंवा सरहद्दीबद्दल तंटे, एखाद्या राष्ट्रांतील प्रजेशीं दुसऱ्या राष्ट्रानें अन्यायी व्यवहार ठेवणें, आर्थिक स्पर्धा व जुलूम-जबरदस्ती, वंश आणि भावना यांसंबंधीं प्रश्न, लष्करी पतीसाठीं मत्सर किंवा केवळ जिंकण्याची लालसा यांपैकीं एखाद्या किंवा अनेक कारणांनीं एखादें युद्ध उद्भवतें. दोन पक्षांतील यादवी युद्धाला कारण बहुतेक राज्यांतील वरिष्ठ सत्ता आपल्या हातीं पाहिजे किंवा राजकीय, धार्मिक किंवा नागरिक स्वातंत्र्यासंबंधीं कांहीं महत्त्वाचा मुद्दा प्रस्थापित करण्यासाठीं म्हणून असतें. युद्धाचा हेतु प्रतिपक्षाला उखडून टाकणें किंवा नामोहरम करणें हा असतो. त्यासाठीं त्याचें सैन्य किंवा आरमार याचा पराभव किंवा नाश करणें, त्याचा देश पादाक्रांत करणे, त्याचा व्यापार बुडविणें व ज्यामुळें तो पुन्हां वर येऊं शकेल तीं सर्व साधनें बंद करणें, या गोष्टी प्रत्येक युध्यमान पक्ष करीत असतो. शत्रूची ज्यामुळें अगदीं नाचक्की होईल असा प्रचार पण करण्यांत येत असतो.

युद्धकालापर्यंत मित्र असणाऱ्या राष्ट्राच्या मुलखांत जेव्हां लढाई सुरू करण्यांत येते तेव्हां तिला आक्रमक किंवा चढाईची लढाई म्हणतात. पण जेव्हां असें शत्रुपक्षाचें आक्रमण किंवा चढाई थोपविण्यांत येत असते तेव्हां तिला संरक्षक किंवा बचावाची लढाई म्हणतात. दोन राष्ट्रांमध्यें युद्ध सुरू होण्यापूर्वी आक्रमक राष्ट्र युद्धाचा एक जाहीरनामा काढीत असतें. त्यांत प्रतिपक्षाच्या चुका व युद्धाचीं कारणें दाखविण्यांत येत असतात. सत्यासाठीं हें युद्ध आहे, असें इतरांना दाखविण्याचा हेतु असतो हें उघडच आहे. पुष्कळदां लढाई सुरू करून नंतर हा जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत येतो. प्रतिपक्षाला अखेरचा इशारा (अल्टिमेटम) देण्याची वहिवाट असते. याला कांहीं उत्तर न आलें तर निश्चितपणें प्रतिपक्ष दोन हात करण्यास सिद्ध आहे असें ठरतें.

युद्ध चालू असतांना दोन्ही पक्षांनी कांहीं रूढी, नियम किंवा युद्धधर्म पाळावयाचे असतात. सशस्त्र शत्रूंना कैद करणें किंवा ठार मारणें, त्यांना उपयोगी पडेल अशा मालमत्तेचा नाश करणें, त्यांच्या व्यवहाराचे व दळणवळणाचे मार्ग बंद करणें, आक्रमक सैन्याला जिची मदत होईल अशी शत्रूच्या मुलखांतली प्रत्येक गोष्ट हिरावून घेणें या सर्व कृत्यांना युद्ध-कायद्यांनीं मोकळीक असते. यांच्या उलट हकनाक शत्रूकडील लोकांना क्रूरपणें वागविणें, निःशस्त्र लोकांना मारणें किंवा इजा करणें, असंरक्षित शहरावर तोफा डागणें, विषप्रयोग करणें, शत्रूच्या बातम्या काढण्यासाठीं आलेल्या माणसांचा छळ करणें, हीं कृत्यें बेकायदेशीर व निषिद्ध मानलीं आहेत. शत्रूच्या मुलखांतील शांततेच्या काळांतील उद्योगधंदे व कलाकौशल्याचीं प्रतीकें यांचा नाश करूं नये असें सांगितलें आहे. पण हे विधिनिषेध महायुद्धांत क्वचितच पाळण्यांत येतात असा अनुभव आहे. खरें धर्मयुद्ध आजकाल होऊं शकत नाहीं.

जेव्हां युध्यमान राष्ट्रांना परस्परांशीं कांहीं विचारविनिमय करावयाचा असेल तेव्हां एखाद्या तटस्थ राष्ट्राला मध्यस्थी करावी लागते. तह करावयाचा झाला तरी प्रथम कोणी मध्यस्थ पाहावा लागतोच. एकाचा पूर्ण पराजय झाला म्हणजे युद्ध आपोआप थांबतेच. नंतर तहाचीं बोलणीं होतात. तहामध्ये तंट्याचे कारण उरूं नये अशीं कलमें घालण्यांत आलीं असतात. तरी त्यांतूनच दुसरें युद्ध सुरू होत असतें. याला दाखला दुसऱ्या महायुद्धाचा ताजा आहे.

जगाच्या आरंभापासून युद्धें चालू आहेतच. पण बहुतेक जगाला ज्यांची दुःखद जाणीव झाली व कांहींना ना कांहीं संबंध आलाच अशीं आजवर दोन महायुद्धें झालीं. पहिलें १९१४-१९१९ पर्यंत व दुसरें १९३९-१९४५ पर्यंत चाललें

होतें. दोन्हीमध्यें जर्मनी हा एक प्रमुख पक्ष होता व त्याच्या विरुद्ध पक्षाला अमेरिका होती. दोन्ही वेळीं जर्मनीचा पराभव होऊन त्याला निकृष्ट शरणागति पत्करावी लागली. या दोन्ही महायुद्धांत लाखों लोक प्राणांस मुकले, जाया झाले व कायमचे आपत्तींत सांपडले. जगाची मोठी उलथापालथ झाली व युद्धाचे अनिष्ट परिणाम फार जाणवले व अद्यापि जाणवत आहेत. तेव्हां युद्धेंच होऊं नयेत यासाठीं थोर मुत्सद्यांनीं राष्ट्रसंघाच्या योजना आंखल्या व संघाचें कार्य चालू केलें. तथापि भावी युद्ध थांबण्याचा रंग दिसत नाहीं. एकंदर मनुष्यस्वभावांतच सात्त्विकता व अहिंसा बाणली तरच युद्धें टळतील असे विचार म. गांधींसारख्या राजकीय तत्त्वज्ञान्यांनीं पुष्कळदा पुष्कळ रीतीनें मांडलेलेहि आहेत. पण भौतिक संस्कृतीऐवजीं आध्यात्मिक संस्कृतीची वाढ झाल्याखेरीज हें होणें शक्य नाहीं.

आजकालच्या लढायांत जीं शस्त्रास्त्रें वापरण्यांत येतात तीं फार भयंकर हानिकारक असतात. परमाणु (ॲटम) बाँब किंवा उज्ज (हैड्रोजन) बाँब यांनीं शहरेंच्या शहरें एकदम क्षणांत बेचिराख होतात. तेव्हां हा विनाश थांबविण्याचा उपाय मनुष्यप्राण्यांत सात्त्विक साधुवृत्तीची वाढ जास्त जास्त करण्याच्या प्रयत्नांतच आहे.

इ. स. १४८० ते १९४५ या काळांत निरनिराळीं राष्ट्रें किती युद्धें खेळलीं याचे आंकडे उपलब्ध आहेत. ते उद्बोधक वाटतील.

| | | | |
|---|---|---|---|
| ग्रेट-ब्रिटन | ७८ | इटली | २५ |
| फ्रान्स | ७१ | हॉलंड | २३ |
| स्पेन | ६४ | जर्मनी | २३ |
| रशिया | ६१ | डेन्मार्क | २० |
| ऑस्ट्रिया | ५२ | अमेरिकन सं. संस्थानें | १३ |
| तुर्कस्तान | ४४ | चीन | ११ |
| स्वीडन | २६ | जपान | ९ |

वेदकाल—वैदिक कालाच्या युद्धाविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं, पण त्या वेळचीं युद्धें साधीं होतीं. प्रत्येक सैन्यांत पायदळ व रथी हे असत. हे दोघे एकत्र असत व पदाति लोकांचा पाडाव नेहमीं रथी लोकांकडून होई. हे रथी लोक क्षत्रिय किंवा त्यांचे पहिल्या प्रतीचे उत्तम अनुयायी असत. पदाति लोकांजवळ चिलखत फारसें नसे व लढाईच्या वेळीं धनुष्याचा उपयोग करीत. हें वर्णन क्सरक्षीसनें ज्या हिंदुस्थानांतल्या सैन्याच्या मदतीनें ग्रीसवर चाल केली अशा ज्या सैन्याचें हिरोडोटसनें वर्णन केलें आहे त्या वर्णनाशीं जुळतें. जे सरदार असत त्यांच्याजवळ उरस्त्राण असे; शिरस्त्राण (शिप्रा) व हस्तघ्न (हें धनुष्याच्या दोरीच्या घर्षणापासून रक्षण करण्याकरितां) असत. रथावर सारथी बसे व त्याच्या डाव्या बाजूस योद्धा (सारथी सव्यष्ठा) बसे. लढाईत घोड्यावर बसण्याची चाल नव्हती व ही घोड्यावर बसण्याची कल्पना वैदिक काळच्या कल्पनेला विसंगत झाली असती. कारण त्या वेळचे वीर धनुष्यावरच सर्व मदार ठेवीत व घोड्यावर बसून धनुष्याचा उपयोग करणें सोयिस्कर नसे. त्या वेळचें लढण्याचें साधन म्हणजे धनुष्य. भाला, तरवार व परशु ह्यांचा क्वचितच उपयोग केला जाई. सैन्याची जातवार संघटित व्यवस्था होती कीं नाहीं (जी व्यवस्था होमरच्या कवितेंत वर्णन केलेली आहे व जिचें अस्तित्व जर्मनीमध्यें टॅसिटसनें आहे असें म्हटलेलें आहे तीं) हें सांगणें कठिण आहे; पण महाभारतांत ज्ञाती एकत्र लढत असत व हीच स्थिति वैदिक काळांतहि कमीजास्त प्रमाणांत होती हें निश्चित आहे. शहरांना वेढा पडत असे व लष्करी चौकी बसवून नाकेबंदी केली जाई, असें ऐतरेय ब्राह्मणावरून दिसतें (उपसद्, प्रभिद्). कारण त्या वेळचीं हल्ला करण्याचीं जीं साधनें होतीं त्यांच्या योगानें छापा घालून व हल्ला करून एखादें शहर घेणें हें त्रासदायक व खर्चाचें होतें.

वेदकालांत भरतखंडांत आर्य लोक हे आपला आर्यधर्मप्रसार करण्याच्या हेतूनें पंजाब, सिंध व राजपुताना या भागांत राहणाऱ्या अनार्य लोकांशीं युद्धें करीत. आर्यांच्या सैन्याच्या निरनिराळ्या तुकड्या आपआपल्या सेनानींच्या नेतृत्वाखालीं शत्रूंवर हल्ला करीत. सैन्याचे घोडदळ व पायदळ असे दोन भाग असत. अनार्यांचा प्रदेश पादाक्रांत करून आर्य लोक तेथें आपली सत्ता स्थापीत व अनार्यांना डोंगरांत पिटाळून लावीत अगर नोकरांतून दूर कोठें तरी त्यांची रवानगी करीत. कधीं कधीं आर्य लोकहि आपापसांतील मत्सरामुळें अगर महत्त्वाकांक्षेमुळें युद्धाला प्रवृत्त होत व दाशराज्ञयुद्धासारखीं युद्धेंहि आर्यांआर्यांमध्यें होत.

महाभारत काल—या कालात आर्य लोकच आपापसात युद्धें करीत. आर्य हे सुधारलेले असल्यानें त्यांच्या युद्ध करण्याच्या पद्धती सुधारलेल्या व धर्मास अनुसरून असत. शत्रूचा पाडाव करण्यासाठीं जें कपटाचरण करावें लागे त्याला राजनीति हें नांव देत.

आर्यांच्या सैन्याचे मुख्य विभाग चार असत: पदाति, अश्व, गज व रथ. या चार विभागांनीं मिळून झालेल्या सेनेस चतुरंग दल म्हणत. अशा या चार विभागांत प्रत्येक दहा असामींवर एक, शंभरावर एक व हजारावर एक असे अधिकारी नेमलेले असत. हजारावरचा अधिकारी राजपूज्य असा असे. सैनिकांस सरकारी कोठींतून वेळच्या वेळीं धान्याच्या स्वरूपांत पगार मिळे. एखाद्या सैनिकास रणक्षेत्रावर मरण आलें तर त्याच्या कुटुंबाचें पोषण राजाकडून होई. पदाति, अश्व, गज व रथ या

चतुरंगाशिवाय फौजेचीं आणखीहि चार अंगें असत : (१) विष्टि म्हणजे वाहतुकीचें खातें—लढाईस लागणारी सामुग्री, नौका वगैरे वाहून नेण्याची कामगिरी या खात्याकडे असे. (२) नौका—नौकांतूनहि लढाया होत. (३) हेर—शत्रूच्या बातम्या काढण्याची कामगिरी या खात्याकडे असे. (४) देशिक—यांच्याकडे वाटाड्यांचीं कामगिरी असे. पदातीजवळ ढाल, तलवार, प्रास, परशु, भिंडिपाल, तोमर, ऋष्टि, शुल्क, इत्यादि आयुधें असत. घोडेस्वारांजवळ तलवार व भाला असे. गजारूढ योद्धयाच्या अंगांत कवच असे. रथीयोद्धे हे धनुष्यबाणांच्या साहाय्यानें शत्रूस अजिंक्य होत. बाणांसारख्या आयुधांवर अग्न्यस्त्रें, वाय्वस्त्रें यांसारख्या दैवी मंत्रांची योजना करून रथी शत्रूचा पुरा निःपात करीत.

धर्मयुद्धाच्या नियमांप्रमाणें विषदिग्धबाणांचा उपयोग करूं नये, उलटीं टोकें असलेले कर्णी बाण घेऊं नयेत, रथीनें रथीवर, हत्तीनें हत्तीवरच चालून जावें. पराजित अगर भयभीत झालेल्यांवर शस्त्र उचलूं नये असें सांगितलें आहे. कूटयुद्धें सुरू झाल्यावर या नियमांकडे दुर्लक्ष होऊं लागलें.

भारतकालांत सैन्य मोजण्याचें परिमाण अक्षौहिणी हें असे. एक अक्षौहिणी म्हणजे २१,८७० रथ, तितकेच हत्ती, १,०९,३५० पायदळ व ६५,६१० घोडे असत. शत्रूवर मगरमिठी बसविण्यासाठीं क्रौंचव्यूह, गरुडव्यूह, अर्धचंद्रव्यूह, चक्रव्यूह, यांसारख्या व्यूहांची सैन्यरचना करीत.

सैन्याबरोबर सामानाचे खटारे, व्यापारी, वेश्या, त्यांचीं वाहनें, हत्ती, घोडे, पंगू व फालतु लोक हेहि असत.

चंद्रगुप्तकाल—खडी फौज हें चंद्रगुप्ताच्या कारभारांतील एक प्रधान अंग होतें. आनुवंशिक सैन्य, भाडोत्री सैन्य, मित्र सैन्य, सैनिक संघ, इत्यादि सैन्याचे निरनिराळे प्रकार असत. यांशिवाय ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्याहि तुकड्या असत. मात्र शेतकरी वर्ग हा सैन्यांतून वगळलेला होता व त्याजकडे जमिनीची उत्तम मशागत करून लोकांना आवश्यक ते धान्यपदार्थ पुरवण्याची जबाबदारी टाकली जाई व त्याचें लढाईपासून संरक्षण करण्यांत येई. सैन्याच्या प्रत्येक अंगांतील दहा माणसांवर एक पदिक नांवाचा अधिकारी असे, दहा पदिकांवर एक सेनापति, दहा सेनापतींवर एक नायक व या सर्वांवर सेनाध्यक्षाचा अधिकार चाले. राजा जातीनें सैन्यावर देखरेख ठेवी. राजाइतकाच दर्जा सेनाध्यक्षालाहि असे.

राज्यांतील सैन्याचा कारभार पाहण्याची कामगिरी तीस अधिकारी असलेल्या एका संघाकडे सोंपवलेली असे. आरमार, वाहतूक, पायदळ, घोडदळ, रथ व गज या सैन्य विभागांची व्यवस्था पाहण्यासाठीं या तीस अधिकाऱ्यांतून पांच-पांच अधिकाऱ्यांचें एक अशीं सहा मंडळें स्थापलेलीं असत. चंद्रगुप्तानें पूर्वीच्या चतुरंगदलसेनेंत आरमारी व मोदी या खात्यांची भर घालून आपल्या सैन्यास बळकटी आणली. याखेरीज किल्ल्यांच्या तटबंदीकडेहि यानें जास्त लक्ष घातलें.

हर्षकाल—या कालांत पायदळ, घोडेस्वार व हत्ती अशीं सैन्याचीं मुख्य तीनच अंगें होतीं. हत्तींना युद्धोपयोगी शिक्षण देऊन त्यांच्या साहाय्यानें शत्रूस जेरीस आणीत. हर्षाच्या सैन्यांत भाडोत्री सैन्य नव्हतें. मनापासून राज्याचें संरक्षण करूं इच्छिणारे राजाचे आप्त, मांडलिक, प्रजेपैकीं कनिष्ठ दर्जाचे लोक यांचेंच बहुधा सैन्य बनलेलें असे. सैन्याचा खर्च राजाच्या खासगी उत्पन्नांतून चाले. सैनिकांचा पगार धान्य व नगदी रूपांत वर्षांतून एकदांच दिला जाई.

मोंगलकाल—मोंगल हे आपला देश सोडून राज्यस्थापनेच्या हेतूनेच हिंदुस्थानांत आले. त्यामुळें त्यांच्या राज्यव्यवस्थेच्या प्रत्येक बाबीचें लष्करीकरण झालेलें दिसतें. मुलकी नोकर, न्यायाधीश, टपाल, अबकारी, जकात, वगैरे खात्यांवरचे अधिकारी, वरिष्ठ दर्जाचे कारकून, हिशेबनवीस हे सर्व सैन्यांतील घटक समजले जात. सैन्याचा पगार देण्याची कामगिरी बक्षी नांवाच्या अधिकाऱ्याकडे सोंपविली असे. अकबराच्या लष्कराची व्यवस्था नमुनेदार होती. रजपुतांस त्यानें आपल्या सैन्यांत अधिकाराच्या जागा दिल्या होत्या. ज्याच्याकडे पांच हजार फौज असे त्यास अमीर व ज्याच्याकडे त्याहून कमी फौज असे त्यास मनसबदार म्हणत. हिंदुस्थानांतील मुसलमानांस फौजेंत वरिष्ठ प्रतीच्या जागा दिल्या जात नसत. अस्सल मोंगलांसच बादशहा अशा जागा देई. सैन्याच्या हालचालीमुळें शेतकऱ्यांचें जें नुकसान होई तें भरून देण्याबद्दल अकबर बादशहाचा हुकूम असे. तोफखान्याच्या कामांत तुर्की किंवा फिरंगी गोलंदाज हे वाकबगार असल्यानें त्यांची भरती केली होती.

शिवकाल—शिवाजीचें पायदळ घाटमाथ्यावरचे मावळे व घाटांखालील कोंकणांतील हेटकरी यांचें बनलेलें होतें. या प्रत्येकाजवळ ढाल, तरवार व बंदूक हीं हत्यारें असत. दहा माणसांच्या एका गटास दाहिजा म्हणत. यांत एक नाईक असे. पांच दाहिज्यांवर एक हवालदार, दोन हवालदारांवर एक जुमलेदार, दहा जुमलेदारांवर एक हजारी, हजारी व पंचहजारी सरदारांवर एक सरनोबत अशी व्यवस्था असे. बारगीर व शिलेदार असे घोडदळांत दोन प्रकार असत. शिलेदारांस स्वतःच्या खर्चानें घोडें बाळगावें लागे. घोडेस्वारांजवळ भाला व बंदूक असे. पंचवीस बारगीर किंवा शिलेदार यांवर एक हवालदार, पांच हवालदारांवर एक जुमलेदार, पांच जुमलेदारांवर एक सुभेदार व दहा सुभे-

दारांवर एक पंचहजारी व या सर्वांवर सरनोवत नांवाचा एक अधिकारी असे.

किल्ल्यांची निगा राखण्याकडे विशेष लक्ष पुरविलें जाई. हवालदार हा किल्ल्याचा अधिकारी असून त्याच्याकडे किल्ल्याच्या संरक्षणाची जबाबदारी असे. हवालदाराच्या मदतीस एक सरनोवत असे. किल्ल्यावर एक सुभेदार, एक सबनीस, एक फडणीस व एक कारखानीस यांच्याहि नेमणुका असत. सुभेदारांकडे मुलकी काम, सबनिसांकडे दप्तर, फडणिसांकडे जमाखर्च, कारखाननीसांकडे दारूगोळा, किल्ल्यांची दुरुस्ती वगैरे कामें असत. किल्ल्याच्या बंदोबस्ताकरितां रामोशी, महार, मांग, बेरड यांची योजना असे व यांच्यावर किल्लेदाराची देखरेख असे. रात्रीं हवालदारहि किल्ल्याचा बंदोबस्त ठीक आहे कीं नाहीं हें स्वतः जातीनें हिंडून पाहत असे. किल्ल्यांत चार वर्षें पुरेल एवढा दाणागोटा व दारूगोळा ठेवला जाई. शिपायांच्या अतुल कामगिरीबद्दल त्यांना गडाच्या अमलदारीसारख्या वरच्या जागा दिल्या जात.

किल्ल्यांवर तोफा जय्यत तयार असत. लष्कराबरोबरच्या तोफखान्यांत सुतार, लोहार, चांभार, तलफदार, गोलंदाज, वगैरे लोकांचा भरणा असे. तसेंच तोफेबरोबर गारदी पायदळ असे.

पेशवेकालीन—पेशव्यांच्याकडे खडी फौज जरी कमी होती तरी लढाईच्या वेळीं त्यांना एक लाखपर्यंत फौज जमवितां येत असे. पेशव्यांच्याकडे असलेली मुख्य फौज म्हणजे हुजरात व खासपागा. शिंदे, होळकर, भोसले यांसारखे पेशव्यांचे सरदार नेहमीं फौज बाळगून असत व त्याबद्दल पेशव्यांच्याकडून त्यांना एक कोटीची जहागीर देण्यांत आली होती. मराठ्यांची लढण्याची पद्धत गनिमी काव्याची असल्यानें फौजेंत पायदळापेक्षां घोडदळाचाच जास्ती उपयोग होई. परंतु पुढें इंग्रजांशीं संबंध आल्यावर सैन्यांत पायदळ व तोफखाना हे विभागहि सुरू करण्यांत आले. सैन्यांत ब्राह्मण, रजपूत, मराठे, मुसलमान, हिंदुस्थानी, अरब, इत्यादि लोकांचा भरणा असे. भाऊसाहेब पेशव्याच्या वेळेपासून कवायती पायदळाचा व तोफखान्याचा उपयोग करण्यांत येऊं लागला. महादजी शिंद्यानें फ्रेंच सेनापति डिबॉइन याच्या मदतीनें वीस हजार पायदळ, दहा हजार नजीब, तीन हजार तुर्कस्वार व मोठा तोफखाना तयार केला. युरोपियनांच्या कवायती फौजेच्या धर्तीवरच ही फौज तयार करण्यांत आली होती. यानंतरच मराठ्यांच्या लष्करांत युरोपियन घेण्याचा प्रघात सुरू झाला.

मराठ्यांच्या आरमारांत सुधारणा करून तें शत्रूस अजिंक्य करण्याची कामगिरी कान्होजी आंग्र्यानें केली. मराठ्यांच्या आरमारांत चारशें टन वजनापर्यंतचीं जहाजें असत. सन १६९० तें १७५६ पर्यंत आंग्र्यांनीं आपली कारकीर्द गाजवली. आपल्या दर्याकौशल्यानें त्यांनीं फिरंग्यांचा पाय कोंकण किनाऱ्यावर पडूं दिला नाहीं. आरमाराचें मुख्य ठिकाण विजयदुर्ग हें होतें. आंग्र्यांनंतर धुळप, विचारे, सुर्वे, कुवेसकर, जावकर, वगैरे अनेक सरदार मराठ्यांच्या आरमारावर होते. आरमाराचा खर्च दर वर्षास सुमारें दीड-दोन लाखांपर्यंत होई. या खात्याच्या व्यवस्थेसाठीं दिवाण, फडणवीस, मुजुमदार, दप्तरनीस, वगैरे दरकदार नेमलेले असत. (आरमार पाहा.)

धनुष्यबाण, तोफा, बंदुका, आरमार, सैन्य, वगैरे विषयांवर स्वतंत्र लेख आहेत ते पाहावे.

**युद्धलूट**—युध्यमान राष्ट्रांचे जे हक्क असतात तदनुसार युद्ध चालू असतांना शत्रुपक्षाची जी मालमत्ता जिंकून घेण्यांत येते, तिला 'प्राइझ'–बक्षिसी किंवा लूट असें म्हणतात. भूमीवरील युद्धांत जिंकलेल्या मालमत्तेस 'बूटी' म्हणतात. आणि समुद्रावरील युद्धांत जिंकलेल्या मालमत्तेस 'प्राइझ' म्हणतात. याप्रमाणें जिंकल्या गेलेल्या मालमत्तेची चौकशी न्यायकोर्टामार्फत व्हावी, हें तत्त्व आंतरराष्ट्रीय कायद्यानें मान्य केलें आहे. इंग्लंडांत अशा जिंकलेल्या मालाची चौकशी ॲडमिरॅल्टी कोर्टामार्फत होते, शत्रूचें हस्तगत केलेलें जहाज कोर्टाच्या ताब्यांत देण्यांत येतें, आणि सदर लूट कायदेशीर आहे असें कोर्टानें ठरविल्यास तें जहाज विकून येईल ती रक्कम तें जहाज युद्धांत हस्तगत करणाऱ्या सर्व नाविक दलांत त्यांच्या दर्जानुसार बक्षीस म्हणून वांटण्यांत येतें.

**युधिष्ठिर**—कुरुवंशांतील एक महान् राजा. हा पंडु राजाचा वडील मुलगा. याच्यांत यमधर्माचा अंश होता म्हणून याला धर्मराज म्हणत. हा फार दयाळू, पापभीरु व सर्वांवर प्रेम करणारा म्हणून हा अजातशत्रु नांव पावला. याचे चौघे भाऊ (पांडव) याचा फार मान ठेवीत. हा द्यूतांत हरल्यावर सर्व पांडव व द्रौपदी वनवास व अज्ञातवास पत्करून राहिली. यानें राजसूय यज्ञ व अश्वमेघ हे मोठाले यज्ञसमारंभ केले. सत्यवचननासाठीं याची प्रसिद्धि आहे. द्रौपदीखेरीज याला देवकी नांवाची दुसरी बायको होती. यानें परीक्षितास राज्यावर बसवून, आपण सर्व बंधू व द्रौपदी यांसह स्वर्गास निघाला. वाटेंत इतर सर्व गळाले. तेव्हां एकट्यानें स्वर्गांत राहणें न आवडून हा परतला व गंगेंत यानें देहविसर्जन केलें.

**युधिष्ठिरशक**—कलियुगसंवतासच भारतयुद्ध संवत् किंवा युधिष्ठिर संवत् म्हणतात. याचा आरंभ ख्रि. पू. ३१०२ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या १८ व्या तारखेस झाला असें मानतात.

**युनान**—हा चीनमध्यें अगदीं वायव्येकडला प्रांत आहे. येथें खनिज द्रव्यें विपुल सांपडतात तीं तांबें, शिसें, कथील व

जरत हीं होत. येथें चहा, तमाखू, रेशीम, वगैरें होतात. या प्रदेशांत साल्वीनी व मेकाँग या मुख्य नद्या आहेत. या प्रांताची राजधानी कुन्मिग आहे. क्षे. फ. १,२३,५३९ चौ. मैल व लो. सं. १,१९,९४,५४९ आहे.

**युमा इंडियन**--ही एक उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांची जात असून गोरे लोक येण्यापूर्वी फार प्राचीन काळापासून ते कोलोरॅडो आणि गिला या नद्यांच्या दरम्यान वस्ती करून राहिले होते. तशीच यांची वस्ती ॲरीझोना संस्थानाच्या नैर्ऋत्य भागांत, कॅलिफोर्निया संस्थानच्या आग्नेय भागांत व सोनोरा आणि दक्षिण भाग यांत होती. हे लोक इतर अमेरिकन इंडियन लोकांपेक्षां थोडे अधिक सुसंस्कृत असून प्रागैतिहासिक कालीं जे लोक ॲरीझोना प्रदेशांत वस्ती करून राहिले त्यांचे वंशज असावे. १८३३ सालीं संयुक्त संस्थानांच्या सरकारनें त्यांच्याकरितां राखीव क्षेत्रें निर्माण केलीं. युमा हेच या सर्व जातीस सर्वसाधारण नांव असून त्यामध्यें कोकोपा, हवासुपाई, मारि कोपा, मोहावे, वालापाई, दिएग्वेनो, इत्यादि जाती आढळतात. सेरी इंडियन लोकांसहि युमामध्येंच अंतर्भूत करण्यांत येतें.

**युरुग्वे**—दक्षिण अमेरिकेतील एक लोकसत्ताक संस्थान. क्षेत्रफळ ७२,१५३ चौरस मैल. लो. सं. २१,४६,५४५. ब्राझिलच्या दक्षिणेस आणि ॲटलांटिक महासागराच्या कांठीं हें संस्थान आहे. याच्या पश्चिमेस युरुग्वे नदीच्या पलीकडे अर्जेंटिना आहे. सर्व देशभर विद्रुम गवताळ मैदानें आहेत. पण नद्यांमुळें सर्व देशभर पाणी विपुल आहे. युरुग्वे नदी १,००० मैल लांब असून १०० मैलांच्या विशिष्ट भागांत कोठें कोठें तिची रुंदी ६ ते ९ मैलांची आहे. संस्थानची मुख्य भाषा स्पॅनिश आहे. उत्तम चराऊ कुरणांनीं हा देश समृद्ध आहे व मुख्य उद्योगधंदे कातडीं, लोंकर, मांस यांसंबंधींचे आहेत. सोनें, चांदी, तांबें, शिसें, वगैरे खनिजें उत्पादनांत प्रमुख आहेत.

मॉटेव्हिडेव येथें विद्यापीठ आहे. प्रथम हा प्रदेश चारुआ इंडियनांनीं वसविला. १५१५ त युरोपियन आले. पूर्वी कांहीं काळ हा प्रांत स्पॅनिश व्हाइसरॉयच्या अमलाखालीं असे. पुढें तो ब्राझिलमध्यें सामील झाला होता. १८२५ सालीं तो स्वतंत्र व लोकसत्ताक झाला. तथापि पुढें बरींच यादवी युद्धें चाललींच होतीं. कोलोरॅडो व ब्लॅंको या पक्षांमध्यें तीं होतीं. दोन्ही महायुद्धांत युरुग्वे जर्मनीच्या विरुद्ध बाजूस होता.

**युरोप**—जगातील पांच खंडांत हें खंड सर्वांत लहान असूनहि सर्व दृष्टींनीं महत्त्व पावलेलें आहे यांत शंका नाहीं. हें आशिया खंडाला पूर्वेस जोडलें गेलें आहे. त्याची या बाजूची सरहद्द उरल पर्वत आणि नदी व कास्पियन समुद्र आहे. दक्षिणेस समुद्राची सारखी मर्यादा आहे. तसेंच पश्चिम आणि उत्तर बाजूंसहि पाणीच आहे. ग्रीसमधील मातापान भूशिरापासून तों वर लॅपलंडमधील उत्तर भूशिरापर्यंत लांबी २,३७५ मैल व पूर्वपश्चिम रुंदी जास्तींत जास्त ३,४५० मैल आहे. एकंदर क्षेत्रफळ ३८,६५,००० चौ. मै. आहे. समुद्रकिनारा सुमारें पन्नास हजार मैलांचा असून तो फार वेडावांकडा आहे. त्यामुळें द्वीपकल्पें आणि उपसागर अनेक झाले आहेत. श्वेत, उत्तर, बाल्टिक, भूमध्य, ॲड्रियाटिक, एजियन व कास्पियन असे समुद्र व ग्रेटब्रिटन, आयर्लंड, आइसलंड, कॉर्सिका, सार्डिनिया, सिसिली, क्रीट, वगैरे बेटें या खंडांत आहेत. हिमालयासारखे अत्युच्च पर्वत नसले तरी आल्प्स, ॲपेनाइन्स, पिरेनीज, सीरा नेव्हाडा, कार्पेथियन, इ. लहानमोठे पर्वत व व्हेसुव्हियस ( इटली ), एट्ना ( सिसिली ) व हेक्ला ( आइसलंड ) हे तीन जिवंत ज्वालामुखी आढळतात. सपाट मैदानेंहि फ्रान्स, जर्मनी यांच्या उत्तरेस व रशियांत आहेत. लॉंबर्डीचें मैदान सुपीक म्हणून प्रसिद्ध आहे. नद्यांमध्यें व्होलगा ही सर्वांत मोठी आहे. हिची लांबी २,४०० मैल भरेल. ऱ्हाइन, ऱ्होन, पो व डॅन्युब याहि नद्या मोठ्याच आहेत. बहुतेक नद्या नौकानयनाला उपयोगी असून ऱ्हाइन, डॅन्युब यांसारख्या नद्यांचें पाणी काल्व्यांनीं दूरवर नेलेलें आहे. लॅडोगा आणि ओनेगा हीं सर्वांत मोठीं सरोवरें खंडाच्या उत्तर विभागांत आहेत. ल्युसर्न, जिनेव्हा, कॉन्स्टन्स, इ.ना आल्पाइन सरोवरें म्हणतात. तीं आल्प्सच्या उत्तरेस आहेत व दक्षिणेस माग्वार, कोमो, यार्डा, इ. आहेत. सौंदर्याविषयीं हीं प्रसिद्ध आहेत.

युरोपची हवा जी चांगली आहे त्याला कारण म्हणजे हें खंड समशीतोष्ण कटिबंधांत असून बहुतेक भूभाग समुद्रानें वेढलेला आहे व उत्तरेकडेसुद्धां उष्ण प्रवाहांमुळें बर्फ सांचून राहत नाहीं. दक्षिणेकडील भाग अर्धवट उष्ण कटिबंधांत असल्यामुळें त्या ठिकाणीं द्राक्षें, मोसंबीं, अंजीर, वगैरे फळें व गहूं, मका, इ. धान्यें होतात. आल्प्स पर्वतांच्या आसमंतात् ओक, बीच, द्विदल धान्यें होत असून चांगल्या गुरांची निपज आढळते. अगदीं उत्तरेकडे फर आणि बर्च झाडें यांची समृद्धि दिसते, पण शेती फार थोडी आहे. लोकवस्तीहि कमीच आहे. अर्वाचीन युरोपांतील हिंस्र व जंगली जनावरें म्हणजे लांडगे, कोल्हे, अस्वलें, कांहीं जंगलीं हरणें, शमाय, सैगा, इ. होत.

युरोपमधील दाट वस्तीचे भाग म्हणजे इंग्लंड, बेल्जिअम, दक्षिण हॉलंड, मध्य जर्मनी, बोहेमिया, गॅलिशिया, उक्रेन व डॉन खोरें हे होत. या भागांत कोळसा व इतर मालाचीं मोठीं महत्त्वाचीं केंद्रें आहेत. तथापि युरोपांतील बहुतेक लोक

शेतकीच्या व्यवसायांत गुंतलेले आढळतील. कारण जगातील १/२ गहूं, २/३ ओट, ३/४ बार्ली, १/६ मका व सर्व रायधान्य युरोप खंडांत पिकतें. जगांतील निम्मी साखर युरोपांत तयार होणाऱ्या बीट-पासून निघते. मच्छीमारीचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत उत्तर समुद्र व नॉर्वेचे किनारे या भागांत चालतो. भूमध्यसमुद्रांत ट्यूनी मासे सांपडतात व त्यांचा मोठा व्यापार आहे.

अतिशय महत्त्वाच्या ज्या कोळशाच्या खाणी त्या अगदीं दाट वस्तीच्या भागांत आहेत. याच भागांत लोखंडहि सांपडतें; पण कमी. जास्त लोखंड स्पेन आणि स्वीडन या देशांत होतें. फ्रान्समधून बॉक्साइट व जिप्सम, बव्हेरियामधून शिसें, स्पेन आणि जर्मनी या देशांतून तांबें व पालाश (पोटॅश), स्पेनमधून पारा, सिसिलींतून गंधक व पोर्तुगालमधून तुंगस्थ (टुंगस्टेन) हीं खनिजें बाहेर निघतात. उरल पर्वतांत सोनें आणि प्लाटिनम सांपडतें तर रुमानिया आणि गॅलिशिया देशांत पेट्रोल मिळतें. कथील आणि जस्त हे धातूहि कोठें कोठें सांपडतात.

युरोपचा प्राचीन इतिहास खि. पू. आठव्या शतकापासून जो आढळतो तो ग्रीसचा होय. जगाच्या इतिहासांत ग्रीकांनीं आपलें नांव गाजविलें व कायम ठेविलें. त्यानंतर रोमन आले व त्यांची संस्कृति अर्वाचीन युरोपच्या संस्कृतीला मूलभूत आहे. रोमन लोकांचा पाडाव उत्तरेकडील टोळ्यांनीं केला व युरोपचा राज-कीय इतिहास बदलून टाकला. नंतर शार्लमेनच्या नेतृत्वाखालीं जर्मन साम्राज्य इ. स. आठव्या शतकांत तयार झालें व त्याच वेळीं स्लाव्ह लोकांनीं बोहेमिया, पोलंड, रशिया, उत्तर जर्मनी या प्रदेशांतून आपलीं राज्यें स्थापिलीं. हंगेरींत मग्यार राहिले तर इकडे नॉर्मन लोकांनीं इंग्लंड आणि फ्रान्स या देशांत आपली सत्ता रुजविली. बारावें ते पंधरावें या तीन शतकांत खिस्ती धर्मयुद्धें (क्रुसेड) आणि इस्लामी सत्तेची वाढ यांमुळें युरोपांत बऱ्याच नवीन घटना झाल्या. १४५३ सालीं तुर्कांनीं कॉन्स्टँटिनोपल घेऊन ग्रीक पंडितांना घालवून दिलें, तेव्हां पश्चिम युरोप खंडाचा फायदाच झाला. कारण वाङ्मयाला मोठें उत्तेजन मिळून मुद्रण आणि इतर सुधारणा जोरानें चालू झाल्या. अमेरिका खंडाचा शोध लागून स्पेन आणि फ्रान्स यांचें युरोपांत वर्चस्व वाढलें व त्यानंतर रशिया आणि इराण यांनीं हातपाय पसरले. फ्रेंच राज्यक्रांतीमुळें व त्यानंतर नेपोलियनशीं झालेल्या युद्धामुळें जुनीं साम्राज्यें खिळ-खिळीं झालीं. पुढें ग्रीससारखे देश स्वतंत्र झाले. पण पोलंड हें स्वतंत्र राष्ट्र राहिलें नाहीं. इटलीचें संघटित साम्राज्य बनलें. फ्रान्सशीं झालेल्या युद्धानंतर प्रशियाच्या नेतृत्वाखालीं लहान जर्मन राज्यांचें एकीकरण झालें व तुर्की साम्राज्यांतील कांहीं भाग कमी झाले. ही स्थिति १९१४ पर्यंतची झाली. नंतर चार वर्षांच्या महायुद्धामुळें नवीन क्रांति जी घडली तीमुळें युरोपचा पहिला नकाशा पार बदलला. जर्मनी आणि रशिया हीं लोक-सत्ताक राष्ट्रें बनलीं; व रशिया, जर्मनी आणि ऑस्ट्रिया-हंगेरी यांच्यांतील प्रदेशांपासून पुढील नवीन राज्यें निर्माण झालीं: एस्टोनिया, फिन्लंड, लाटव्हिया, लिथुआनिया, चेकोस्लोव्हा-किया, युगोस्लाव्हिया व पोलंड. तुर्कस्तान आणि बल्गेरिया सोडून इतर देश प्रादेशिक दृष्ट्या वाढले.

दुसऱ्या महायुद्धानंतर जो फरक झाला तो असा: युगो-स्लाव्हिया १९४५ सालीं प्रजासत्ताक झाला. बेल्जिअममध्यें जुन्या लिओपोल्ड (तिसरा) राजाला गादीवर न बसवितां त्याच्या मुलाला आतां नुकतेंच बसविलें. रशिया, अमेरिका, ग्रेट ब्रिटन व फ्रान्स या चार राष्ट्रांच्या सत्तेखालीं जर्मनी विभागला गेला आहे. त्याच्या पश्चिम भागांत लोकराज्याला सुरुवात झाली आहे, पण पूर्व भाग रशियाच्या मगरमिठींत आहे. इटली हा आतां प्रजासत्ताकच म्हणतां येईल. रशियानें युरोपच्या पूर्व-भागावर आपलें बरेंच वर्चस्व ठेवलें आहे व तें पश्चिम राष्ट्रांना मानवत नाहीं. आयर्लंड पूर्णपणें स्वतंत्र झाला. स्पेनमधील यादवी थंडावलेली दिसते. फ्रेंचांच्या आशियांतील वसाहती लोकसत्ताक होऊं पाहत आहेत. डचांच्या हातून इंडोनेशियन वसाहती गेल्याच. ग्रेट ब्रिटननें हिंदुस्थान, सीलोन व ब्रह्मदेश यांना स्वातंत्र्य दिलें. पण त्या वसाहती अद्यापि स्वेच्छेनें ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें नांदत आहेत.

आजचा युरोप—आशिया आणि पूर्व युरोप यांतून मोठ्या प्रमाणांत कच्चा माल आणून त्याचा पक्का माल बनवून तो परत या बाजारपेठात विकून त्यावर पश्चिम युरोपांतील राष्ट्रांची पूर्वीं कारखानदारी चाले. आतां ती देवघेव शून्यावर आली आहे. पोलंडमध्यें नवें औद्योगिक केंद्र रशिया निर्माण करीत असून, पूर्व युरोपची गरज पोलंड आणि चेकोस्लोव्हाकिया भागवूं शकतील, इतकेंच नव्हे तर चीनपर्यंत त्यांचे हात पोंचतील. जर्मनीचे दोन तुकडे झाले तेव्हां पश्चिम भागांत बहुतेक जर्मन कारखानदारी राहिली. पूर्व भागांत म्हणजे रशियाच्या बाजूला गेलेल्या जर्मनींत शेती आणि अन्नधान्य प्रामुख्यानें पिकविणारा मुलूख गेला. याचा परिणाम असा झाला कीं, पश्चिम जर्मनीची पूर्वेकडील स्वतःची निम्मी बाजारपेठ जाऊन शिवाय पोटासाठीं दुसरीकडे पाहिलें पाहिजे अशी वेळ आली. त्यांतच अन्नाला महाग झालेल्या पश्चिम जर्मनींत पूर्व जर्मनींतून नव्वद लाख निर्वासित गेले. तेथें दहा लाख बेकार आहेत. त्यांना काम द्यावयाचें म्हणजे कारखानदारी मोठ्या प्रमाणांत वाढविली पाहिजे. आज तयार केलेला माल विकावा कोठें अशी चिंता असतां आणखी उत्पादन कसें वाढवा-वयाचें हा प्रश्नच आहे. कारण पश्चिम युरोपांतील कारखानदारीची

वाढ म्हणजे आपसांत आणि ब्रिटनशीं वाढती चढाओढ असें समीकरण बनत चाललें आहे. पूर्व युरोपच्या पेठा मिळाल्या-खेरीज जर्मनीला वाव नाहीं किंवा पूर्वीची भरभराट येणार नाहीं. पूर्वी जगाचा माल व उतारू वाहून नेऊन जर्मन बोटी आपल्या राष्ट्राला १० कोट डॉलरचें दरसाल उत्पन्न आणून देत असत. आतां त्या पुन्हां बांधूं द्यावयाला ब्रिटनची हरकत आहे. कारण समुद्रावर ब्रिटिश वाहतुकीला धक्का बसेल व जर्मनीची स्पर्धा उत्पादनांत होईल. परंतु जर्मनीच्या आयातीपेक्षां आज निर्यात कमी असल्यानें तो व्यापारांतला फरक अमेरिका स्वतःची पदर-मोड करून भागवते.

जी स्थिति जर्मनीची तीच नेमकी ऑस्ट्रियाची. निम्मी अन्न-सामुग्री त्याला अमेरिका स्वतःच्या पैशानें फुकट पुरविते. पहिल्या महायुद्धानंतर ऑस्ट्रियापासून हंगेरी वेगळा केल्यानंतर तो खालावत चालला. या युद्धानंतर जर्मनीप्रमाणें ऑस्ट्रियाचीं दोन छकलें करण्यांत आल्यानें त्याच्या दुःस्थितींत आणखी भर पडली आहे. त्यांत भर म्हणून कीं काय, साडेतीन लाख निर्वा-सित ऑस्ट्रियांत आहेत. बव्हेरियापासून ऑस्ट्रियांतून ट्रीस्टपर्यंत ८० ते ९० लाख निर्वासित आतां पुन्हां लढाई आल्यास कोठें जावयाचें, अशा चिंतेंत काळ काढीत आहेत. एका काळीं ऑस्ट्रिया-हंगेरीचें संयुक्त राज्य आणि जर्मनी हीं दोन राष्ट्रें मध्य युरोपांत किती बलाढ्य होतीं व त्यांचा वचक एकीकडे रशिया आणि दुसरीकडे इंग्लंड-फ्रान्स असा पूर्व-पश्चिम दोन्ही-कडे कसा होता हें ध्यानांत धरलें म्हणजे युरोपची घडी कशी मोडून पडली आहे आणि रशियाला प्रतिकार करण्याला इंग्लंड किंवा बाकी युरोप कसा दुबळा बनला आहे याची प्रचीति येईल. पूर्व युरोपचा एक सलग राजकीय गट, व्यापारी पेठ आणि लष्करी संघटना स्टालीन बनवीत आहे. पश्चिम युरोप वेगळा बाजूस पडला असून जवळचा बाकीचा युरोप आणि लांबचा आशिया दोन्ही त्याला पारखे होत आहेत. अशा स्थितींत स्वतःच्या पायावर उभा राहून आत्मसंरक्षण करण्याला तो असमर्थ बनला आहे.

अशा या पश्चिम युरोपला त्याच्या पायावर उभें करण्याला तीन हजार मैलांवरून अमेरिका आली पाहिजे. लष्करी दृष्ट्या हें शक्य असलें, तरी औद्योगिक दृष्ट्या युरोप-अमेरिकेंत देवघेव फारशी शक्य नाहीं. कारण कारखानदारी माल अमेरिकेजवळ भरपूर आहे. युरोपचे गिऱ्हाईक अमेरिका होऊं शकत नाहीं. यावर तोड म्हणून पश्चिम युरोपीय राष्ट्रांच्या राजकीय सरहद्दी कांहीं असल्या तरी त्यांची आर्थिक घटना एक असावी, त्यांच्या दरम्यान जकात काढून टाकावी, एका देशाचा माल दुसऱ्या देशांत बिनहरकत जावा-यावा आणि आपसांत स्पर्धा होऊं नये म्हणून एक मध्यवर्ती नियंत्रक मंडळ नेमून त्यांनीं कोणत्या भागांत कोणतें उत्पादन अधिक स्वस्तांत व सोयीचें होईल हें ठरवून त्याप्रमाणें कारखानदारीला दिशा लावून द्यावी व तिचें नियंत्रण करावें, अशी एक योजना आहे. पैकीं तूर्त कोळसा आणि पोलाद एवढ्यापुरतीच संघटना करावी, अशी फ्रेंच परराष्ट्रमंत्री मि. शूमन यांची खटपट असून त्याला 'शूमन प्लॅन' असें नांव आहे.

गेल्या दोन महायुद्धांतील हानीमुळें ब्रिटन आणि पश्चिम युरोपीय राष्ट्रें दुबळीं बनलीं, एवढेंच नव्हे तर ती हानि भरून काढण्याचीं त्यांचीं साधनें हिसकून घेण्याचें काम गेल्या पांच वर्षांत स्टालिनच्या आर्थिक थंड्या युद्धानें पद्धतशीरपणें केलें. कच्चा माल पुरविणारे देश आपल्या ताब्यांत ठेवून त्यांच्या जिवावर युरोपीय राष्ट्रांनीं आपले ऐश्वर्य कमावलें होतें. आतां ही बाजू उलटली. युरोप दुभंगून त्यांतील मागासला भाग स्वावलंबी होत चालला. इतकेंच काय पण शंभर कोट लोकांचें गिऱ्हाईक एका वेगळ्या आणि विरोधी राजकीय व आर्थिक संघटनेंत गेल्यानें उरलेल्या चिमुकल्या जागांत परस्परांत स्पर्धा करून जगावें, कीं जुटीनें आपली घडी बसवण्याचा प्रयत्न करावा असा प्रश्न एका वेळच्या वैभवसंपन्न युरोपीय राष्ट्रांपुढें येऊन पडला आहे.

**युसफ आदिलशहा** (१४३५-१५१०)—विजापूरच्या आदिलशाही घराण्याचा प्रस्थापक. तुर्कस्तानच्या आघा मोवाडा नांवाच्या एका सुलतानाचा हा पुत्र. याच्या थोरल्या भावाच्या भयामुळें याची आई यासह तुर्कस्तानांतून हिंदुस्थानांत आली. याची हुशारी पाहून खाजा महंमद गुरजीस्तानिया या व्यापा-ऱ्यानें यास बेदर शहरीं महंमद गवानला विकलें. पुढें आपल्या कर्तबगारीवर यानें विजापूरला आदिलशाहीची स्थापना करून हा स्वतंत्र राजा झाला. सन १४८९ मध्यें अहमद निजाम-शहाच्या प्रोत्साहनानें यानें आपणांस शहा ही पदवी धारण केली. याच्या पत्नीचें नांव बुबूजीखानुम असें असून ती मूळची हिंदु होती. याच्या मरणानंतर सन १५१० मध्यें याचा मुलगा इस्माइल हा याच्या गादीवर आला. युसफ हा शियापंथीय मुसलमान होता.

**युसोल**—उज्ज हरसाम्ल (हैड्रोक्लोरस ॲसिड). हें एक जंतुनाशक द्रावण आहे. हें शुभ्रक (ब्लीचिंग पॉवडर) आणि बोरॅसिक ॲसिड यांच्या पाण्यांत मिश्रण करून बनविण्यांत येतें. याची शक्ति विशेषतः उष्ण हवेमध्यें लवकर कमी कमी होत जाते. जेथें जंतुनाशक द्रव वापरावयाचा असेल अशा ठिकाणीं याचा उपयोग चांगल्या रीतीनें करण्यांत येतो. हें डोळ्यांत गेल्यास डोळ्यांची आग होते. परंतु घशावर याचा

फवारा सोडण्यास हरकत नाहीं. डाकिन सोल्युशन म्हणून याच जातीचें एक औषध आहे. तें जास्त दिवस टिकतें.

**येझ्द**—इराण, येझ्द प्रांत. ओलवणांतील एक शहर. हें इस्फाहानच्या ईशान्येस १९० मैलांवर आहे. रेशीम आणि मखमल यांविषयीं हें प्रसिद्ध आहे. यांत बरेच पारशी लोक राहतात. लो. सं. ४५,०००. येझ्द प्रांत खोरासानच्या दक्षिणेस आहे. क्षे. फ. २०,००० चौ. मै. व लो. सं. एक लक्ष.

**येमेन आणि आसीर**—हीं दोन अरबस्तानांतील संस्थानें, अरबस्तानच्या वायव्य भागांत आहेत. तेथील राजाला इमाम म्हणतात. येमेनचें क्षे. फ. ७५,००० चौ. मैल व लो. सं. ३५,००,००० आहे. हा प्रदेश एडन प्रोटेक्टरेटपर्यंत पसरला आहे. याची राजधानी साना असून होडीडा व मोका हीं दोन महत्त्वाचीं बंदरें आहेत. येथील इमाम झैदी जातीचा असून तो नेहमीं ब्रिटनला विरोध करणारा असे. पण १९३४ सालीं तह झाला. येझ्दच्या सुलतानाच्या खालोखाल हा इमाम अरबस्तानांत अत्यंत बलाढ्य आहे.

आसीर संस्थानचें क्षे. फ. ३५,००९ चौ. मैल व लो. सं. सुमारें १०,००,००० आहे. हें संस्थान येमेनला लागून उत्तरेस हेजाझपर्यंत पसरलेलें आहे. या संस्थानांतील डोंगराळ भाग १९२० सालीं नेज्दच्या इब्न सौद या सुलतानानें जिंकून घेतला आणि सपाट प्रदेश इद्रिसी इमाम याच्या ताब्यांत आहे व तो नेहमीं येमेनच्या इमामाला त्रास देतो. इद्रिसी इमामानें १९१५ सालीं ब्रिटनबरोबर मैत्रीचा करार केला, आणि पहिलें महायुद्ध संपल्यावर येमेन संस्थानावर स्वारी करून होडीडा जिंकून घेतलें. पुढें १९२५ सालीं हें बंदर येमेनच्या इमामानें परत जिंकून घेतलें. १९३३ त आसीर प्रदेश इब्न सौदनें आपल्या राज्याला जोडला. १९३४ सालीं इब्न सौद व येमेनचा इमाम यांमध्यें लढाई सुरू झाली. पण लवकरच समेट झाला. तथापि आसीर सौदकडेच राहिला.

**येलवट्टी किल्ला**—मुंबई, दक्षिण महाराष्ट्र. हा किल्ला शिरहट्टीच्या ईशान्येस ७ मैलांवर आहे. १८४४ मध्यें कोल्हापूरमधील किल्ल्यांतील गडकऱ्यांनीं बंड केलें होतें तें मोडण्याच्या कामीं सांगलीकरांनीं कंपनी सरकारास जी मदत केली तीबद्दल १८४६ मध्यें हा किल्ला ईस्ट इंडिया कंपनीनें सांगलीकर चिंतामणराव पटवर्धन यास इनाम दिला. क्षेत्रफळ ६०० चौरस फूट. तटाला १२ बुरूज आहेत. तट २० फूट उंच व १० फूट रुंद आहे. हा शिरहट्टीचे देसाई खानगवंडे यांनीं सुमारें २५० वर्षांपूर्वी बांधला असावा. येलवट्टी येथें सुमारें दोन हजार वस्ती आहे. येथील गणेश्वराचें देवालय प्रसिद्ध आहे. देवालयाच्या दरवाजावर चालुक्य राजा विक्रम चक्रवर्ती त्रिभुवनमल्ल वीर गंगदेव याचा एक शिलालेख आहे.

**येल्लापूर**—मुंबई, उत्तर कानडा जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ७६० चौ. मै., लो. सं. (१९४१) १५,२२७. जमीन चांगली आहे. तांदूळ, ऊंस, सुपारी व नारळ होतात. मोठें गांव येल्लापूर. लो. सं. (१९४१) १,९२६. जंगल पुष्कळ आहे.

**येवलें**—मुंबई, नाशिक जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ४१० चौ. मै., लो. सं. (१९४१) ७१,७५३. जमीन डोंगराळ आहे. मुख्य ठिकाण येवलें. हें दौंड-मनमाड आगगाडीच्या फाट्यावर आहे. लो. सं. (१९४१) १७,९९०. येथें रेशमी व सुती कापड चांगलें होतें. निम्मी वस्ती विणकामावर जगते. सरकारी विणकामशाळा आहे. दोन हायस्कुलें चालतात. पूर्वी दिल्लीच्या बादशहाकडे हें गांव होतें. नंतर पेशवाईंत विंचूरकरांकडे होतें. किनखाबी व जरीचें कापड यांविषयीं येवलें पूर्वी प्रसिद्ध होतें. लांकडावर नक्षीकामहि उत्कृष्ट होत असे. याचे नमुने जुन्या इमारतींत पाहावयास सांपडतात.

**येसाजी कंक**—शिवाजीच्या विश्वासू मित्रांपैकीं एक व पायदळाचा पहिला सरनोबत. स्वराज्य-संपादनाच्या कामीं शपथा घेऊन शिवाजीला साहाय्य करणाऱ्यामध्यें येसाजी होता. अफझलखानाच्या भेटीच्या प्रसंगीं शिवाजीचे जे निवडक दहा अंगरक्षक होते त्यांत येसाजी होता. अफझलच्या वधानंतर हा त्याच्या सैन्यावर तुटून पडला. पुण्यांतील शिवाजीच्या वाड्यांत शाहिस्तेखानावर रात्रीं जेव्हां शिवाजीनें सिंहगडाहून येऊन छापा घातला तेव्हां बरोबरच्या निवडक मंडळींत येसाजी होताच. शिवाजीनें आग्र्यास जातांनाहि याला बरोबर घेतलें होतें. पायदळावरचा सरनोबत या नात्यानें कर्नाटकाच्या स्वारींत शिवाजीस याची बहुमोल मदत झाली. संभाजीच्या कारकीर्दींत मराठ्यांची पोर्तुगीजांशीं जी फोंड्यास लढाई झाली तींत हा व याचा मुलगा जखमी झाले. राजारामाच्या वेळेसहि मराठेशाहीस याचा चांगलाच उपयोग झाला.

**येसूबाई भोसले** (१६५७–१७२० नंतर)—शिवछत्रपति घराण्यांतील एक वीरपत्नी व वीरस्त्री. पिलाजी शिर्के याच्या या मुलीचें लग्न सन १६६७ मध्यें म्हणजे हिच्या वयाच्या दहाव्या वर्षी संभाजीशीं झालें. सन १६८० च्या डिसेंबरमध्यें हिला पुत्र झाला तोच शिवाजी ऊर्फ शाहू या नांवानें पुढें प्रसिद्धीस आला. संभाजीच्या नादिष्टपणामुळें हिला प्रथमपासूनच राजकारणाच्या भानगडींत लक्ष घालणें भाग पडलें. संभाजीनें बाळाजी आवजीला हत्तीच्या पायीं देऊन ठार केल्यावर हिनेंच खंडोजी बल्लाळला आपल्या नवऱ्यापासून वांचवून आपल्या विश्वासांत घेतलें. तसेंच कलुषा व संभाजी शिर्क्याचा

दुरुपयोग करतील अशी शंका येतांच हिनें शिक्का आपल्या ताब्यांत ठेवून प्रत्येक आज्ञापत्र आपल्या नजरेखालून घालण्यास सुरुवात केली. संभाजीच्या मृत्यूनंतर ही रायगडास असतांना किल्ल्यास वेढा पडला. तेव्हां हिनें किल्ला धैर्यानें लढवला (१६८०). परंतु सूर्याजी पिसाळाच्या फंदफितुरीमुळें ही व शाहू औरंगजेबाच्या हातीं सांपडलीं. मोंगलांच्या कैदेंत असतांना हिचे फार हाल झाले. तरी हिनें मोठ्या चातुर्यानें वागून आलेल्या प्रसंगाला धैर्यानें तोंड दिलें. सन १७०७ मध्यें जरी शाहूची सुटका झाली तरी त्यानें बाहेर कांहीं गडबड करूं नये म्हणून हिला व हिच्या कांहीं विश्वासू माणसांना बादशहानें अटकेंत ठेवलें होतेंच. पुढें सन १७१९ मध्यें बाळाजी विश्वनाथ पेशवा यानें हिच्या माणसांसह हिला दिल्लीहून सोडवून आणलें. हिला जिऊबाई या नांवानेंहि ओळखतात. संभाजी व शाहू यांच्यावर हिचा वचक असे व तेहि हिला आदरपूर्वक मानीत असत. आपल्या आयुष्यांत हिला अनेक आपत्तींतून मार्ग काढावा लागला. ही फार कर्तबगार व धोरणी होती.

**योग—१.** योग म्हणजे बेरीज. चंद्र-सूर्यांच्या गतींची बेरीज १३ अंश २० कला होण्यास जो काळ लागतो तितक्यांत एक योग होतो. हे योग २७ आहेत. तिथि-नक्षत्रांचा आकाशांतल्या स्थितीशीं संबंध आहे तसा योगांचा कांहीं दिसत नाहीं. शक ५५० पूर्वी हे नव्हते. त्यानंतर ते पंचांगांत आले असें ज्योतिर्विद शं. बा. दीक्षित यांचें मत आहे. चंद्र आणि सूर्य यांची क्रांति समान होते तेव्हां व्यतिपात आणि वैधृति हे योग होत असतात. त्यांस महापात म्हणतात. हे पंचांगांत निराळे दिलेले असतातच. हे मात्र प्राचीन आहेत. हे सुमारें १३ दिवसांच्या अंतरानें होतात.

२. योग हा शब्द 'युज्' जोडणें या धातूपासून निघाला असून त्याचा धात्वर्थ 'जुळणी', 'संगति' असा होतो. अमरकोशांत योग याचे संहनन, उपाय, ध्यान, संगति, युक्ति असे अर्थ दिले आहेत. योग हा शब्द संस्कृत वाङ्मयांत दोन तऱ्हांनीं वापरण्यांत आला आहे. त्यांपैकीं योगाचा पहिल्या तऱ्हेनें अर्थ लाविला असतां, कर्मयोग (पाहा) असा अर्थ होतो. पण पातंजल सूत्रोक्त समाधि अगर ध्यानयोग असाहि योगाचा अर्थ रूढ आहे. या दोन्ही अर्थी योग हा शब्द प्राचीन संस्कृत वाङ्मयांत वापरलेला आढळतो. महाभारतामध्यें व गीतेमध्यें योग हा शब्द कांहीं ठिकाणीं पातंजल योगवाचक असून पुष्कळदां कर्मयोग या अर्थी वापरलेला आहे. 'योगः कर्मसु कौशलम्' अशी गीतेंत याची व्याख्या दिली आहे तर 'प्रवृत्तिलक्षणो योगः' असें महाभारतांत म्हटलें आहे. त्यावरून योग म्हणजे कर्मे करण्याचें कौशल्य असा त्याचा अर्थ होतो. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांख्य मताचा उपन्यास करून मग योगाचें म्हणजे कर्मयोगाचें विवेचन भगवंतानें केलें आहे. गीतेंत सहाव्या अध्यायांत पातंजल योगाचेंहि वर्णन आलें आहे.

योगांतील प्रमुख अंगांमध्यें हठयोगाचा समावेश होतो. हठ याचा अर्थ ह म्हणजे सूर्य व ठ म्हणजे चंद्र असा केला आहे. या योगांत प्राण व अपान यांना प्राणायामानें ताब्यांत घेण्याचे कार्य मुख्य असतें. हठयोगाची उत्तमावस्था म्हणजे राजयोग व प्रथमावस्था म्हणजे मंत्रयोग होय. मंत्र, हठ व राज यांप्रमाणें एकंदर १८ योग आहेत. राजयोग म्हणजे सहजसमाध्यवस्था होय. तिच्या प्राप्तीस्तव प्रथम हठयोगाचा अभ्यास करावा लागतो. राजयोगानें कैवल्य-मोक्षप्राप्ति होते. ज्ञानाच्या पुढील सात भूमिका योगवासिष्ठांत दिल्या आहेत:—(१) समुदाहृता, (२) तनुमानसा, (३) सत्त्वापत्ति, (४) संसक्तिनामिका, (५) *परार्थभाविनी*, (६) *शुभेच्छा* व (७) *तुर्यगा*. या हठयोगानें प्राप्त होतात. सातव्या अवस्थेंत मनुष्य जीवन्मुक्त होतो.

शंकर ऊर्फ आदिनाथ हा या योगाचा प्रवर्तक असून त्यानें ही विद्या पार्वतीस शिकविली. त्याच वेळीं मत्स्येंद्रनाथानें या विद्येचें ग्रहण करून तिचा प्रसार केला. नाथपंथांत हठयोगाचें महत्त्व विशेष आहे. अणिमा, गरिमा, महिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशत्व व वशित्व या आठ सिद्धी हठयोगानें मिळतात. हा योग आचरण्यास देशांत सुराज्य, धर्माचरण व सुभिक्ष्य असावें लागतें. ज्या ठिकाणीं आसनाची जागा असेल त्याच्या आसपास चार हात शिला, अग्नि व पाणी नसावें आणि जागा एकांताची असावी. अत्याहार, प्रयास, फार बोलणें, जनसंग व चंचलता टाकून उत्साह, साहस, धैर्य, तत्त्वज्ञान, निश्चय, जनसंगपरित्याग या अंगांच्या अभ्यासानें हठयोगाची सिद्धि लवकर करून घ्यावी. हठाचीं मुख्य चार *अंगें आहेत*: आसन, कुंभक, मुद्राकरण व नादानुसंधान. तसेंच अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, क्षमा, धृति, दया, आर्जव, मिताहार व शौच हे दहा नियम हठयोगांत पाळावे लागतात. हठयोग तरुण, वृद्ध, रोगी व दुर्बल यांनाहि उपयोगी आहे.

योगशास्त्रांत यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि याप्रमाणें आठ अंगें असून पहिलीं पांच अंगें बहिरंग आणि इतर तीन अंतरंग योगाचीं साधनें असल्याचें सांगितलें आहे. या अष्टांगसाधनांत अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणें), ब्रह्मचर्य, शौच, संतोष, तपस्या, ईश्वरप्रणिधान, इंद्रियनिरोधन, इत्यादि गुणांचा अंतर्भाव होतो. ८४ प्रकारच्या आसनांनीं शारीरिक कष्टांचें निरसन करून मनाची निश्चलता प्राप्त करून घेतां येते आणि सुखासन नांवाची शेवटची आसनाची पायरी गांठतां येते आणि जेव्हां

ध्येयाकारामध्यें ध्यानाचा लय होतो, चित्तवृत्ति आहेत किंवा नाहींत हा भासहि राहत नाहीं त्या स्थितीला समाधि असें नांव देण्यांत आलें आहे.

**योगदर्शन**—षड्दर्शनांपैकीं एक. योगदर्शनाचा प्रवर्तक पतंजलि आहे. पतंजलीनें सांख्य दर्शनांतील सिद्धांत ग्रहण केलेले आहेत. तत्त्वें सांख्य सिद्धांताप्रमाणें २५ मानिलीं असून त्यांशिवाय आणखी एक तत्त्व पतंजलीनें मानिलें आहे. तें तत्त्व म्हटलें म्हणजे ईश्वरतत्त्व होय. सांख्यांत ज्याला पुरुष ही संज्ञा दिली आहे तो हा ईश्वर नव्हे. ईश्वर हा पुरुषाहून विशेष असा आहे.

**योगराजगुग्गुळ**—एक आयुर्वेदीय औषध. गुग्गुळ, मिरी, ओवा, चित्रक, देवदार, चडीशेप, सज्जीखार, पिंपळमूळ, लोध्र, सुंठ, जिरे, पिंपळी, हिरडा, आंवळकाठी, गुळवेल, धने, सराटे, कोष्ठ, वाळा, लवंग, तालिसपत्र, दालचिनी, अजमोदा, सैंधव, वावडिंग, चवक, वेलदोडे, जवखार, आस्कंद, कचोरा, शतावरी, नागरमोथा, लोहभस्म हीं यांत मुख्य औषधें आहेत.

वातव्याधीवरील हें एक प्रमुख औषध आहे. हातापायाला मुंग्या येणें, सर्वांगांतून चमका येणें, शरीर रुक्ष होणें, शौचाला खडा होणें, आमवात, सांधे दुखणें, उदावर्त, आर्तव, शूळ, इत्यादि विकारांवर याचा अतिशय चांगला उपयोग होतो. १ ते २ गोळया मध, दूध यांबरोबर घेतात.

**योगवाही क्रिया**—( कॅटॅलिसिस ). पुष्कळ वेळां रासायनिक क्रियांचा वेग एखादा तिऱ्हाईत पदार्थ घालून वाढवितां येतो. हा तिऱ्हाईत पदार्थ शेवटापर्यंत पूर्वस्थितींतच राहत असल्यामुळें त्याच्या केवळ अस्तित्वामुळें क्रियेचा वेग वाढतो. अशा पदार्थांना कॅटॅलिस्ट म्हणजे प्रेरक म्हणतात. असल्या प्रेरक पदार्थांचा उद्योगधंद्यांत अतिशय उपयोग होतो. अमोनियापासून नत्राम्ल ( नायट्रिक ॲसिड ) तयार करण्यासाठीं, कृत्रिम तूप, गंधकाम्ल ( सॅल्फ्युरिक ॲसिड), वगैरे पदार्थ तयार करतांना असल्या प्रेरक द्रव्यांचा उपयोग करावा लागतो.

हे प्रेरक पदार्थ मधून मधून बदलावे लागतात. कारण रासायनिक क्रियेच्या मिश्रणांतील कांहीं पदार्थांचा त्यांच्यावर अनिष्ट परिणाम होतो व वेग वाढविण्याची त्यांची शक्ति कमी होते. जणुं त्यांना विषबाधा होते. ह्याच्या उलट प्रेरकांचें बळ वाढविणारेहि कांहीं उत्तेजक पदार्थ आहेत. प्रत्येक प्रेरकाचीं विषें आणि उत्तेजकें हीं निराळीं असतात. एखाद्या प्रेरकाच्या क्रियेसंबंधींचें विवेचन करणारा एखादा व्यापक सिद्धांत अद्यापि निघालेला नाहीं.

**योगिनी**—दुर्गादेवीला हें नांव असून तिच्या पुढील आठ परिचारिकांनाहि योगिनी (अष्टयोगिनी) म्हणतात : (अ) मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा आणि संकटा. पाठभेद—( आ ) मार्जनी, कर्पूरतिलका, मलयगंधिनी, कौमुदिका, मेरुंडा, माताली, नायकी आणि जया ( शुभाचारा ). कधीं यांत सुलक्षणा, सुनंदा हींहि नांवें अंतर्भूत झालेलीं दिसतात.

भाद्रपद अमावास्येच्या दिवशीं ज्या चौसष्ट योगिनींची पूजा करतात त्यांचीं नांवें 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोशां'त दिलेली आढळतील.

**योजनापत्रक**—( प्रॉस्पेक्टस ). व्यापारी संस्थेनें आपलें योजना-पत्रक काढण्याचा उद्देश असा असतो कीं, तें वाचून नवीन भागीदार, ठेवीदार पुढें यावेत. प्रत्येक सरकारांत नोंदल्या जाणाऱ्या संस्थेनें असें पत्रक काढून तें नोंदवावें लागतें. या पत्रकांत मेमोरॅडम आणि आर्टिकल्स यांमध्यें असलेली माहिती लोकांना करून द्यावयाची असते. हें योजनापत्रक फार काळजीपूर्वक व व्यवस्थित करावें लागतें. कारण यावरच संस्थेचें भांडवल आणि महत्त्व वाढणार असतें.

**योजनीयता**—( व्हॅलेन्सी ). रासायनिक मूलद्रव्यांतील परमाणूंची संयोजक शक्ति. एका मूलद्रव्याचा एक परमाणु उज्जाच्या जितक्या परमाणूंशीं संयुक्त होऊं शकेल ती परमाणूंची संख्या त्याची योजनीयता ( व्हॅलेन्सी ) ठरते. कर्बाचा एक परमाणु उज्जाच्या चार परमाणूंशीं संयुक्त होतो तेव्हां कर्बाची योजनीयता चार असते. रासायनिक संयोगांत अशा योजनीयतेला फार महत्त्व आहे. परमाणूची योजनीयता त्यांतील कांहीं स्वतंत्र अतिपरमाणूं( विद्युत्कणां )नीं नियंत्रित असते असें परमाणुघटनेच्या अलीकडच्या सिद्धांतानें ठरत आहे.

---

## र

**र**—या वर्णाच्या चार अवस्था आहेत. पहिली गिरनार शिलालेखांत, दुसरी मंदसोर लेखांत ( इ. स. ४३२ ), तिसरी कुंडेश्वर लेखांत ( ६६१ ), व शेवटची जोधपूर लेखांत ( ८३७ ) पाहावयास मिळते. तिसऱ्या अवस्थेपासून आजचा र ओळखूं येतो.

**रँकीन, विल्यम जॉन** ( १८२०–१८७२ )—एक स्कॉटिश सिव्हिल एंजिनिअर. तो ग्लासगो युनिव्हर्सिटींत १८५५ सालीं एंजिनिअरिंग विषयाचा प्रोफेसर झाला. यानें 'सिव्हिल एंजिनिअरिंग', 'दि स्टीम एंजिन', 'अप्लाइड मेकॅनिक्स' आणि 'शिप्बिल्डिंग' ( नौकाबंधन ) हीं स्थापत्यशास्त्रावरचीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

**रॅकून**—हा आस्वलाप्रमाणें पण लहानसाच प्राणी आहे. हा अमेरिकेंत कानडापासून खालीं उष्ण कटिबंधापर्यंत आढळतो. हा जंगलांत राहत असून मांजरापेक्षां जरा मोठा असतो. हा फार केंसाळ असून याचा रंग भुरकट पण केंसांच्या टोंकांशीं काळा असा असतो. चेहरा कोल्ह्यासारखा निमुळता व लबाड दिसणारा असतो. हा प्राणी वाटेल तें खातो. पण विशेषतः याला गोड आवडतें. तेव्हां रात्रीच्या वेळीं चोरून येऊन हा गोड मक्याचा फडशा पाडतो. हे प्राणी झाडाच्या ढोलींतून राहतात. यांची लोंकर झगे, कोट, गळपट्टे, वगैरेसाठीं वापरतात. कातड्यांना पांच-सात डॉलर इतकी किंमत येते. चरबीचें तेलहि विकलें जातें. मांस चांगलें स्वादिष्ट म्हणून खाण्यांत येतें. याच्या कांहीं जाती आहेत. हिमालयांतील जातीला पांडा म्हणतात.

**रँके, लिओपोल्ड फॉं** (१७९५–१८८६)— एक जर्मन इतिहासकार. हा बर्लिनमध्यें इतिहासाचा प्राध्यापक होता. त्यानें बरेच ऐतिहासिक ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं पोपांचा इतिहास, धर्मसुधारणेच्या काळांतील जर्मनीचा इतिहास, १७ व्या व १८ व्या शतकांतील प्रशियाचा इतिहास, १७ व्या शतकातील इंग्लंडचा इतिहास, जगाचा इतिहास, हे प्रमुख होत. अर्वाचीन काळांतील इतिहासकारांत हा अग्रणी होता.

**रक्त**—मनुष्याच्या व इतर प्राण्यांच्या शरीरामध्यें जें एक प्रवाही द्रव्य रक्तवाहिनी व धमनी यांच्यामध्यें फिरत असतें त्यास रक्त म्हणतात. असें रक्ताचें अभिसरण होणें हें प्राण्याच्या जीवनास आवश्यक असतें. कारण या रक्ताच्या साहाय्यानें अन्नांतील पोषक द्रव्यें पचनेंद्रियापासून सर्व शरीरभर पोंचविलीं जातात. तसेंच फुफ्फुसांतील प्राणवायु शरीराच्या सर्व भागास पुरविला जातो आणि निरुपयोगी व बाहेर टाकून देण्यासारखीं द्रव्यें उत्सर्ग–इंद्रियांच्या द्वारां बाहेर टाकलीं जातात. रुधिराभिसरणांतील मुख्य केंद्रस्थानीं असलेलें इंद्रिय म्हणजे हृदय होय.

रक्त हें एक अपारदर्शक द्रव आहे. शुद्ध रक्त-वाहिनींतील रक्ताचा रंग लाल असतो, व अशुद्ध रक्त-वाहिनीतील अथवा शिरांतील रक्ताचा रंग जांभळा असतो. कारण त्यांतील प्राणवायूचा व्यय झालेला असतो. रक्त हें रक्तगोलकांचें व जीवाणूंचें बनलेलें असते व तें रक्तपेशींतून बाहेर पडल्याबरोबर थिजतें किंवा घट्ट होतें. एखाद्या पात्रांत दहा मिनिटें रक्त ठेवून दिल्यास तें घट्ट व काळें होतें आणि त्या भांड्यांत एक पिवळट द्रव लसीसारखा दिसूं लागतो. याचें कारण रक्तांतील एका फायब्रिन नांवाच्या रक्ताची क्रिया हें होय.

रक्तगोलक दोन जातींचे असतात : एक लाल व दुसरे पांढरे. लाल रक्तगोलक हे वाटोळ्या तबकडीच्या आकाराचे असून यांचें प्रमाण अधिक असतें. मनुष्य आणि सस्तन प्राण्यांमध्यें त्यांचा आकार वाटोळा असतो आणि इतर सपृष्ठ प्राण्यांत लांबट वाटोळा असतो. त्यांचा व्यास $\frac{1}{3200}$ इंच असतो. त्यांचें काम प्राणवायु आणि पोषक द्रव्यें पोंचविण्याचें असतें. श्वेत रक्तगोलक हे थोडे मोठे असून वर्णहीन असतात आणि त्यांचा आकार व आकृती निरनिराळ्या असतात. यांचें काम इतर बाह्य द्रव्यें भक्षण करण्याचें असतें. यांचा संबंध दाह आणि रोगप्रतिकारक सामर्थ्य यांच्याशीं आहे. प्रत्येक श्वेत रक्तगोलकामागणिक ५०० तांबडे रक्तगोलक असतात. मनुष्याच्या शरीरांतील रक्ताचें विशिष्टगुरुत्व १.०५० पासून १.०६६ पर्यंत असतें. रक्त हें नेहमीं क्षारमय असतें आणि त्यांत ७० ते ७५ टक्के पाणी आणि २० ते २५ टक्के घन द्रव्य असतें. मनुष्याच्या शरीरांत त्याच्या वजनाच्या $\frac{1}{20}$ रक्त असतें.

**रक्तकाष्ठ**—( रेडवुड ). अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत ऑरेगॉनपासून कॅलिफोर्नियापर्यंतच्या पॅसिफिक किनाऱ्यावरील प्रदेशांत या जातीचें लांकूड पुष्कळ होतें. या झाडांची उंची ३०० फूटपर्यंत असते व त्यांचें आयुष्य फार दीर्घ म्हणजे हजारों वर्षेंहि असतें. या झाडांचीं पानें लांबट व कोनाकृति असतात. सध्यां या झाडांचा प्रदेश ३१८ मैल लांब आहे. यांतून दर वर्षी ३२ कोटी फूट लांकूड निघतें व याप्रमाणें तें १५० वर्षें पुरेल इतकें लांकूड तेथें उपलब्ध आहे. वनस्पतिशास्त्रांत यास सेकोइआ सेंपेर व्हिरेन्स असें म्हणतात. अशाच तऱ्हेचें दुसरें एक लांकूड सेकोइआ जायगान्टा हें सायरा, नेव्हाडा, वगैरे भागांत ४ हजार फूट उंचीच्या खालीं आढळतें. हे दोन्ही वृक्ष आकारानें सारखेच असतात, परंतु दुसऱ्या प्रकारचें लांकूड जरा हलकें असतें. या लांकडावर झिलई चांगली देतां येते. आपल्याकडे रोहिडा याच जातींतील असतो व तो तापावर देतात.

**रक्तचंदन**—हें झाड दक्षिण हिंदुस्थानांत होतें. याच्या खोडाचा रंग रक्ताप्रमाणें लाल असतो व पूर्वी याचा रंगविण्याकडे उपयोग होई. याचे खांब, औतें, तसेंच पेट्या, मूर्ती, खेळणीं, वगैरे करतात. हें शीतळ असल्यानें औषधांत वापरतात. लहान मुलांच्या अंगावर पुटकुळ्या येतात त्यांवर रक्तचंदन उगाळून लावतात.

**रक्तज मूर्च्छा**—( ॲपोप्लेक्सी ). मेंदूंतील रक्तपेशी फुटल्यामुळें किंवा रुद्ध झाल्यामुळें मेंदूचें कार्य बंद पडून चालण्याची

शक्ति व संवेदना प्रथम नाहींशी होऊन पुन्हा वरचेवर ही क्रिया होऊन पूर्णपणें बेशुद्धि उत्पन्न होणें, या विकारास रक्तज मूर्च्छा असें म्हणतात. अशी पूर्ण मूर्च्छा आली म्हणजे मनुष्य एकदम खालीं पडतो. त्यास आपलीं गात्रें हालविण्याची किंवा बोलण्याची शक्ति राहत नाहीं. त्यास पाहतां, ऐकतां किंवा स्पर्श करतां येत असल्याचीं चिन्हें नाहींशीं होतात. श्वास घोर लागल्यासारखा निघूं लागतो. ज्या मनुष्याचें डोकें मोठें असून मान आंखूड असते, छाती भरदार असून शरीर लठ्ठ असतें अशा मनुष्यास हा विकार होण्याचा संभव असतो. परंतु विशेषतः ज्याच्या रक्तवाहिन्यांमध्यें जास्त रक्त होतें आणि त्याचा हृदयावर परिणाम होतो त्यास हा विकार हटकून होतो. या रोगाच्या पहिल्या व दुसऱ्या झटक्यांतून मनुष्य बचावूं शकतो, परंतु तिसरा झटका आला असतां बहुतेक मृत्यु येतो.

**रक्तजलत्वचा**—(सेरस मेंब्रेन). शरीरांतील कांहीं इंद्रियांच्या आंतील बाजूस एक प्रकारचें दुहेरी अंतस्त्वचामय आस्तरण असतें त्यास ही संज्ञा देतात. याचें मुख्य कार्य इंद्रियाची क्रिया व चलनवलन घर्षणरहित चालूं देणें हें असतें. या दुहेरी आवरणाच्या मध्यंतरीं कांहीं रक्तजलाचा स्राव होत असतो, त्यामुळें याच्या क्रियेस मदत होत असते.

**रक्तदाव**—रक्तदाव हा कांहीं विकार नव्हे. तो जीवनाला अत्यावश्यक आहे. या दाबामुळेंच रक्ताभिसरण शक्य होतें. सरासरी निरोगी मनुष्य घेतला तर त्याचें हृदय सर्व शरीरभर रक्त पसरविण्याचें काम रक्तवाहिन्यांच्या द्वारें नेहमींच करीत असतें. निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या परिस्थितींत रक्ताचा रक्तवाहिन्यांतून वाहण्याचा जोर कमीअधिक असतो. रक्त वाहत असतांना रक्तवाहिन्यांवर त्याचा कांहीं तरी दाब पडतोच. तरुणांच्या शरीरांतील किंवा निरोगी मनुष्याच्या शरीरांतील रक्तवाहिन्या प्रवाहाच्या दाबाच्या अनुरोधानें संकुचित वा विस्तृत होत असतात. त्यामुळें रक्तदाब खालील चार गोष्टींवर अवलंबून असतो:—

(अ) प्रत्यक्ष हृदयाची स्थिति किंवा अवस्था, (आ) रक्ताचें शरीरांतील प्रमाण आणि रक्ताचें वजन, (इ) रक्तवाहिन्यांची परिस्थिति, व (ई) रक्तवाहिन्यांच्या आवरणाचा लवचिकपणा.

साधारणतः पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या वयाला पंचेचाळीस ते पंचावन वर्षें झालीं कीं रक्तवाहिन्या थोड्याबहुत बिघडतात. म्हणजे त्यांचा लवचिकपणा कमी होतो. तरुणपणीं जितक्या त्वरेनें रक्तदाबानुसार त्या संकुचित वा प्रसृत होतात तितकें त्वरित कार्य वृद्धाच्या किंवा रोगी मनुष्याच्या रक्तवाहिन्यांकडून होत नाहीं; म्हणजेच त्या कठिण झालेल्या असतात. शरीरांतल्या सर्व रक्तवाहिन्यांच्या बाबतींत हेंच घडतें. त्यामुळें रुधिराभिसरणाच्या जरूर त्या कार्यासाठीं हृदयाला जास्त काम करावें लागतें. कारण कीं, रक्तवाहिन्यांचें काम पूर्वाइतकें क्षमतेनें होत नाहीं. अशामुळें मनुष्याच्या जीविताला अनेकविध धोके निर्माण होतात.

रक्तवाहिन्यांचा लवचिकपणा मंदावला, त्या कठिण झालेल्या असल्या आणि अशा वेळीं रक्ताचा दाब जास्त आला तर मग जीविताला धोका निर्माण होतो आणि हा दाब एकदम वाढलेला असला तर तो फारच धोक्याचा असतो. अशा वेळीं रक्तवाहिनीचें आवरण ज्या ठिकाणीं कमकुवत झालें असेल तेथें रक्तस्राव सुरू होतो. असा रक्तस्राव होणें फार वाईट असतें. विशेषतः हा रक्तस्राव मेंदूंतल्या शीर्ण रक्तवाहिनींत झाला तर अनर्थपरंपरा सुरू होते. त्यांना डॉक्टर लोक 'स्ट्रोक' म्हणतात. एका पाठीमागून दुसरा स्ट्रोक बहुधा येतो. कारण रक्तवाहिन्या शरीरांत सर्वत्रच कठिण व दुर्बल झालेल्या असतात.

रक्तवाहिन्यांना अशी स्थिति प्राप्त होणें अपरिहार्य असतें कीं काय, हें पाहिलें पाहिजे. साधारणतः समज असा असतो कीं, मनुष्य मध्यम वयाकडे झुकला कीं त्याच्या रक्तवाहिन्या कठिण होऊन रक्तदाब हा वाढवावयाचाच. पण हा समज खरा नाहीं. मनुष्य उतारवयाकडे झुकूं लागला म्हणजे रक्तदाब वाढलाच पाहिजे असें नाहीं. पन्नास वर्षें पुरीं झालेल्या लोकांतहि कित्येक व्यक्ती अशा सापडतात कीं, त्यांना रक्तदाबाची व्यथा अजीबात नसते. तेव्हां फाजील रक्तदाब उतार वयांतसुद्धां स्वाभाविक किंवा अपरिहार्य नाहीं.

तेव्हां याचें कारण आहारविषयक जे प्रमाद घडतात त्यांमुळें शरीरांत जे क्षार किंवा विषें भिनतात त्यांचा परिणाम म्हणून रक्तवाहिन्या कठिण होतात. रक्तवाहिन्यांवर परिणाम झाला असला तरी योग्य काळजी घेतल्यास कोणालाहि पूर्ण वृद्धावस्थेपर्यंत जगतां येईल. यांत मुख्य काळजी ही घ्यावयाची कीं, रक्तप्रवाह एकाएकीं जोरानें वाहील असे प्रसंग आणूं द्यावयाचे नाहींत. त्याकरिता पुढील गोष्टी प्रत्येकानें लक्षांत ठेवाव्यात:

(१) मांसाहाराचा अतिरेक वर्ज्य करून तें मितप्रमाणांत घ्यावें. (२) चिनकोंड्याचा पाव व साखर हीं खाण्यांत कमी करावींत. (३) तंबाखूचें कोणत्याहि स्वरूपांत सेवन करूं नये. (४) मसाले खाऊं नयेत. (५) मद्यपान करूं नये. (६) अतिशय थंड किंवा अतिशय कढत पाण्यानें स्नान न करतां कोमट पाण्यानें स्नान करावें. (७) मनःप्रक्षोभ होऊं देऊं नये आणि प्रक्षुब्ध मनःस्थितींत जेवूं नये.

हृदयदौर्बल्यामुळें किंवा लहान शिरा विस्तृत झाल्यानें कमी रक्तदाबाची व्यथा होत असते. कफक्षयांत अशी अवस्था

असते. पाश्चात्य देशांतील एका विमा कंपनीनें साधारणपणें निरनिराळया वयाच्या माणसाचा रक्तदाब काय असावा याचें प्रमाण पुढीलप्रमाणें बसविलें होतें : चाळीस वर्षें वयाच्या आंत १२५ ; चाळीस ते चवेचाळीस १२८ ; पंचेचाळीस ते एकूणपन्नास १३० ; पन्नास ते चौपन्न १३२ ; पंचावन ते साठ १३४.

**रक्तपित्त**—१. (स्कर्व्ही). मनुष्यास ताजें अन्न, विशेषतः शाकान्न न मिळाल्यामुळें त्यांतील कांहीं आवश्यक द्रव्यांची न्यूनता उत्पन्न होऊन शरीरांत हा रोग उत्पन्न होतो. आहारांत क (सी) जीवनसत्त्व कमीजास्त असल्यास रक्तपित्त उद्भवतें. हा रोग लहान मुलांत बराच आढळतो. याच्या प्रथमावस्थेंत मुलास अशक्तता वाटून फिकटपणा येतो आणि तोंडास चव नाहींशी होते. याबरोबरच हिरड्या सुजून नरम होतात व त्यांतून रक्त वाहूं लागते आणि दांत हालूं लागतात. मुलांस अशक्तता फार वाटूं लागते. ज्या मुलांस कृत्रिम डब्यांतील वगैरे अन्नावर वाढविण्यांत येतें अशा मुलांस हा रोग विशेष होतो. तसेंच नाविकास हा रोग होण्याचा संभव फार असतो. मोसंबी आणि लिंबू यांचा रस, टोमाटो यांत क जीवनसत्त्व असतें. तेव्हां त्यांचा भरपूर उपयोग केल्यास हा रोग नाहींसा होतो.

२. आयुर्वेदीय—ऊच, अग्नीचा शेक, परिश्रम, शोक, मार्गक्रमण, मैथुन, इत्यादिकांच्या बहुत सेवनानें व तीक्ष्ण, उष्ण, क्षार, अम्ल, इत्यादि पदार्थांच्या सेवनानें पित्त कुपित होऊन तें रक्ताला क्षुभित करून ऊर्ध्वभागीं मुखादिकांवाटें व अधोभागीं गुदादिकावाटें पाडतें. असा हा रोगविशेष आहे. हा रोग होण्याच्या पूर्वीं शरीरास ग्लानि, थंड पदार्थावर इच्छा, कंठांतून धूर निघाल्यासारखी वेदना आणि लोहगंधि श्वास हीं लक्षणें होतात. हें रक्तपित्त ऊर्ध्वगामी, अधोगामी आणि दोहों मार्गांनीं पडतें. या रोगानें ज्वर, अन्न न पचणें, वांति, श्वास, तृषा, खोकला, बलहानि, पांडुता, भोजन केलें असतांहि दाह, भ्रम, मस्तक तापणें, क्षुधानाश, अतिसार, मादक पदार्थ भक्षिल्यासारखा उन्मत्तपणा हे उपद्रव होतात.

**रक्तबोळ**—(मर्‍ह). अरबस्तान व अबिसिनिया या देशांतील एका (बाल्समोडेंड्रॉनमिरा) झाडापासून जो राळेसारखा चीक निघतो त्याला रक्त्याबोळ म्हणतात. प्राचीन काळीं याचा गेल्यावर भस्म राहतें. पाऱ्याचे समभाग गंधक घालून भस्म करावें ; तें रोगांचा नाश करतें. द्विगुणित गंधक घालून करावें ; तें क्षयरोगाचा नाश करतें. पाऱ्याचें त्रिगुणित गंधक घालून भस्म करावें ; तें पौष्टिक होतें. चतुर्गुणित गंधक घालून करावें ; तें तेज वाढवितें. पंचगुणित गंधक घालून करावें ; तें मृत्यूस जिंकितें, म्हणजे अपमृत्यूला दूर करितें. याचा दुसरा मुख्य प्रकार असा आहे कीं, पाऱ्याचे अष्टमांश किंवा षोडशांश अथवा बत्तिसांश सुवर्ण घालून खलून लोण्याप्रमाणें गोळा करावा आणि वर सांगितल्याप्रमाणें भस्म करावें.

**रक्तमूत्ररोग**—१. हा एक गुरांस होणारा रोग आहे. यामध्यें रोगी जनावरांस तांबडें किंवा जांभळट किंवा पूर्णपणें काळें मूत्र होऊं लागतें. हा विकार मुख्यतः यकृतास झाल्यामुळे अशी अवस्था होते व तो बहुधा गोचड्यांमुळें उत्पन्न होतो. यावर उपचार करण्याच्या बाबतींत बराच मतभेद आहे. परंतु मुख्यतः रोगी गुरास इप्सम खाराचे रेचक देणें हा उपचार सर्वमान्य आहे. कांहीं शेतकरी साधें मीठ एक गॅलन पाण्यामध्यें एक पौंड या प्रमाणांत घालून किंवा दोहोंचें समभाग मिश्रण करून गुरांस पाजतात व त्याचा उपयोग होतो असें म्हणतात. ज्या प्रदेशांत पाण्याचा निचरा नीट होत नाहीं अशा प्रदेशांत हा रोग होतो. तेव्हां चारा स्वच्छ असून तो कुजलेला नसेल अशी काळजी घेणे व तसेच गाईचे दूध काढण्याच्या वेळीं गोचीड नसतील अशी काळजी घेणें, आवश्यक असते.

२. (हेमॅच्युरिआ). या रोगांत लघवींतून रक्त पडतें. मूत्रमार्गांत किंवा मूत्रपिंडांत कांहीं विकार उद्भवल्यामुळें असें होतें. हृदयविकार, पांडुरोग व कांहीं रक्तविकार यांत लघवींतून रक्त जात असतें. यावर निश्चित असा उपचार नाहीं. चांगलें निदान करवून औषध घ्यावयाचें असतें.

**रक्तवाहिनी**—(आर्टेरीज). शरीरांत हृदयापासून शरीराच्या सर्व भागांस रक्ताचा पुरवठा ज्या नलिकांमार्फत होतो त्यास रक्तवाहिनी म्हणतात. या रक्तवाहिनी जाड नळया असून त्या लवचिक व स्नायुमय घटकां(टिशू)च्या बनलेल्या असतात. यांना शाखा फुटतात व त्या पुढें पुढें अगदीं लहान लहान होत जातात. या केशाकार रक्तवाहिनी रुधिराभिसरणाचें कार्य करीत असतात. रक्तवाहिनींमध्ये दोन मुख्य असतात. त्यांतील एकीस महाधमनी (एओर्टा) असें नांव असून ती हृदयाच्या डाव्या भागापासून निघते व तिला मोठमोठ्या शाखा फुटून त्या सर्व शरीरभर पसरलेल्या असतात. दुसऱ्या नळीस पल्मनरी आर्टरी म्हणजे श्वासनलिका असें म्हणतात व ती सर्व शरीरांतील रक्त हृदयाच्या उजव्या भागांतून फुफ्फुसांकडे नेते.

**रक्तसंचय**—(कॉन्जेशन). शरीरामध्यें एखाद्या भागांत जेव्हां रक्ताचा वाजवीपेक्षां अधिक संचय होतो, तेव्हां हा रोग होतो. याचे तीव्र व मंद असे दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारामध्यें रक्तवाहिन्यांतून एखाद्या भागांत वाजवीपेक्षां अधिक रक्त येतें व दुसऱ्या प्रकारामध्यें त्या भागांतील रक्त शिरामधून फार मंद गतीनें वाहून नेलें जातें. पहिला प्रकार एखाद्या ठिकाणीं दाह किंवा इजा झाली असतां किंवा एखादें औषध घेतल्यानें किंवा घट्ट दाब पडल्यानें उत्पन्न होतो. दुसऱ्या प्रकारामध्यें शरीराचा तो भाग काळा पडतो. जेव्हां असा रक्तसंचय होऊन फार वेळ जातो तेव्हां त्या ठिकाणीं सूज येते व ती हळूहळू पसरत जाते, आणि छाती किंवा उदर वगैरे भागांत द्रव सांचूं लागतो.

**रक्तस्तंभन, रक्तरोध**—(एंबोलिझम्). जेव्हां शरीराच्या एखाद्या भागांत रक्त सांखळल्यामुळें किंवा रक्तप्रवाहामध्यें एखादा पदार्थ आल्यामुळें रुधिराभिसरणाच्या क्रियेंत अडथळा येतो, तेव्हां त्यास रक्तस्तंभन किंवा रक्तरोध असें म्हणतात. जर एखाद्या मर्मस्थानीं किंवा नाजुक इंद्रियामध्यें असा रक्तरोध झाला तर त्यापासून भयंकर विकार उत्पन्न होऊन तावडतोब मृत्यु येण्याचाहि संभव असतो. इतर वेळीं एखादा शरीराचा भाग नासणें किंवा पू होणें व तो शरीरांत पसरणें, इत्यादि विकार होण्याचा संभव असतो. हा रोग बहुधा मेंदू, फुप्फुसें, पानथरी, मूत्रपिंड, यकृत् व आंतडीं या ठिकाणीं होत असतो.

**रक्तक्षय**—(ॲनीमिआ). मनुष्याच्या शरीरांतील रक्तामध्यें जेव्हां रक्तकण किंवा रक्तकणांतील रंजक द्रव्यें वाजवीपेक्षां कमी असतात तेव्हां त्या अवस्थेस रक्तक्षय म्हणतात. याच्या प्राथमिक व द्वितीय अशा दोन अवस्था असतात. याचीं कारणें रक्तस्राव वगैरे अनेक असूं शकतात व तीं दुसऱ्या एखाद्या रोगाचीं पूर्वसूचकेंहि असण्याचा संभव असतो.

सामान्य निरोगी माणसाच्या रक्तांत ५०,००,००० रक्तगोलक व ४,००० ते १२,००० पर्यंत श्वेतगोलक एका घनमिलिमीटर जागेंत असतात. जर रक्तगोलक फार कमी असतील किंवा रक्तरंजक द्रव्य (हेमोग्लोबिन) पुरेसें नसेल तर शरीर धातूं (टिशू)ना कमी प्राणवायु मिळेल व त्यामुळें त्यांचें कार्य नीट चालणार नाहीं व हा रोग उत्पन्न होईल. या रोगांत माणूस फार अशक्त होतो. थोड्या श्रमानें धाप लागते व छाती धडधडूं लागते. त्याला चक्कर व मूर्च्छाहि येऊं लागते.

या रोगांत अन्नांतून अर्धा पौंड ह्लीहारस देणें चांगलें. त्यामुळें रक्त वाढतें. पांडुरोग हा एक रक्तक्षयाचाच विकार आहे. पांडुरोग पाहा.



**रक्ताधिक्य**—(प्लेथोरा). या रोगामध्यें मनुष्याचा चेहरा लालभडक दिसूं लागून कातडीहि लाल दिसूं लागते. रक्तपेशी सुजतात. आणि नाकांतून वरचेवर रक्तस्राव होऊं लागतो. रोग्यास आळस येऊन शरीर जड वाटूं लागतें व नाडी जोरानें उडूं लागते. फार उत्तेजक अन्न (मांस वगैरे) खाल्ल्यानें किंवा अतिशय अन्न खाल्ल्यानें, अतिशय मद्य प्याल्यानें किंवा फार झोंप घेतल्यानें, किंवा सामान्यतः शरीरांत रक्ताची फार वाढ होईल अशा कोणत्याहि गोष्टीमुळें हा रोग होण्याचा संभव असतो.

**रंग**—आंदोलनाच्या निरनिराळ्या गती असलेला प्रकाश ज्यामुळें डोळ्यावर परिणाम करतो त्या विविध भावना ओळखण्यासाठीं रंगाची संज्ञा आहे. त्याचप्रमाणें असा परिणामकारी प्रकाश उत्पन्न करण्याला भावनांना भाग पाडणारे पदार्थांचे जे गुणधर्म त्यांनाहि रंग म्हणतात. आपण ज्याला पांढरा रंग म्हणून समजतों त्यांत मुख्य सात रंग असतात. तांबडा, नारिंगी, पिंवळा, हिरवा, निळा (आकाशी), निळी (इंडिगो) व जांभळा. यांखेरीज पांढऱ्या प्रकाशांत असंख्य रंगांच्या छटा असतात. वरील सात रंगहि तीन प्रधान रंगांपासूनच आहेत. ते म्हणजे—तांबडा, हिरवा व निळा (जांभळा). या तिन्हींचा योग्य संयोग झाल्यास पांढरा रंग तयार होतो. या तिहींपैकीं कोणत्याहि दोहोंचा संयोग केल्यास तिसऱ्याचा पूरक (कॉम्प्लिमेंटरी) निघतो. तांबडा व हिरवा मिसळल्यास पिवळा रंग होतो व तो निळ्या (जांभळ्या) रंगाचा पूरक आहे. जर एखादा पदार्थ एका विशिष्ट रंगाखेरीज इतर रंग शोषून घेत असेल तर तो पदार्थ त्या विशिष्ट रंगाचा दिसेल. उदा., एखादा पदार्थ इतर रंग शोषून फक्त तांबडा परावर्तित करीत असेल तर तो पदार्थ तांबड्या रंगाचा दिसेल. जर तो पदार्थ कोणताच रंग शोषीत नसेल तर तो पांढरा व सर्व रंग शोषीत असेल तर काळा दिसेल.

रंगद्रव्यांत तांबडा, निळा व पिवळा हे रंग आद्य समजतात. यांचें मिश्रण वरील प्रकाशवर्णलेखांतील रंगमिश्रणापेक्षां निराळे रंग उत्पन्न करील. उदा., तांबडा आणि पिवळा मिळून नारिंगी, पिवळा आणि निळा मिळून हिरवा, इ.. पण तांबडा, निळा आणि पिवळा हे रंग कोणत्याहि रंगांच्या कसल्याहि मिश्रणापासून तयार होऊं शकत नाहींत. प्रकाशलेखांतील त्रिवर्णसिद्धांत हा फार महत्त्वाचा आहे.

**रंगांचें प्रकाशशोषण**—भिंतींना दिलेले निरनिराळे रंग कोणत्या प्रमाणांत प्रकाशाचें शोषण करतात व त्यामुळें उजेड कसा कमी पडतो याची माहिती खालील आंकड्यांवरून कळेल.

असते. पाश्चात्य देशांतील एका विमा कंपनीनें साधारणपणें निरनिराळया वयाच्या माणसाचा रक्तदाब काय असावा याचें प्रमाण पुढीलप्रमाणें बसविलें होतें : चाळीस वर्षें वयाच्या आंत १२५ ; चाळीस ते चवेचाळीस १२८ ; पंचेचाळीस ते एकूणपन्नास १३०; पन्नास ते चौपन्न १३२; पंचावन ते साठ १३४.

**रक्तपित्त**—१. (स्कर्व्ही). मनुष्यास ताजें अन्न, विशेषतः शाकान्न न मिळाल्यामुळें त्यांतील कांहीं आवश्यक द्रव्यांची न्यूनता उत्पन्न होऊन शरीरांत हा रोग उत्पन्न होतो. आहारांत क (सी) जीवनसत्त्व कमीजास्त असल्यास रक्तपित्त उद्भवतें. हा रोग लहान मुलांत बराच आढळतो. याच्या प्रथमावस्थेंत मुलास अशक्तता वाटून फिकटपणा येतो आणि तोंडास चव नाहींशी होते. याबरोबरच हिरड्या सुजून नरम होतात व त्यांतून रक्त वाहूं लागते आणि दांत हालूं लागतात. मुलांस अशक्तता फार वाटूं लागते. ज्या मुलांत कृत्रिम डब्यांतील वगैरे अन्नावर वाढविण्यांत येतें अशा मुलांस हा रोग विशेष होतो. तसेंच नाविकास हा रोग होण्याचा संभव फार असतो. मोसंबीं आणि लिंबू यांचा रस, टोमाटो यांत क जीवनसत्त्व असतें. तेव्हां त्यांचा भरपूर उपयोग केल्यास हा रोग नाहींसा होतो.

२. आयुर्वेदीय—ऊन, अग्नीचा शेक, परिश्रम, शोक, मार्गक्रमण, मैथुन, इत्यादिकांच्या बहुत सेवनानें व तीक्ष्ण, उष्ण, क्षार, अम्ल, इत्यादि पदार्थांच्या सेवनानें पित्त कुपित होऊन तें रक्ताला क्षुभित करून ऊर्ध्वभागीं मुखादिकांवाटे व अधोभागीं गुदादिकावाटें पडतें. असा हा रोगविशेष आहे. हा रोग होण्याच्या पूर्वी शरीरास ग्लानि, थंड पदार्थावर इच्छा, कंठांतून धूर निघाल्यासारखी वेदना आणि लोहगंधि श्वास हीं लक्षणें होतात. हे रक्तपित्त ऊर्ध्वगामी, अधोगामी आणि दोहों मार्गांनीं पडतें. या रोगानें ज्वर, अन्न न पचणें, वांति, श्वास, तृषा, खोकला, बलहानि, पांडुता, भोजन केलें असतांहि दाह, भ्रम, मस्तक तापणें, क्षुधानाश, अतिसार, मादक पदार्थ भक्षिल्यासारखा उन्मत्तपणा हे उपद्रव होतात.

**रक्तबोळ**—(मन्ह). अरबस्तान व आबिसिनिया या देशांतील एका (बालसमोडेंड्रॉनमिरा) झाडापासून जो राळेसारखा चीक निघतो त्याला रक्त्याबोळ म्हणतात. प्राचीन काळीं याचा उपयोग मलम किंवा लेप यासारखा व सुगंधि पदार्थ म्हणून करण्यांत येत असे. सध्यांहि धुपासारखा जाळण्याकरितां किंवा सुगंधी पदार्थ म्हणून त्याचा उपयोग करण्यांत येतो. याचा औषधात उपयोग होतो. यांतील उत्कृष्ट प्रकारच्या बोळास तुर्की बोळ म्हणतात. बोळ पाहा.

**रक्तभस्म**—पाऱ्याचें भस्म. पळींत गंधक घालून तो पातळ झाला म्हणजे त्यांत पारा घालून तो घोटावा, म्हणजे गंधक जळून गेल्यावर भस्म राहतें. पाऱ्याचे समभाग गंधक घालून भस्म करावें ; तें रोगांचा नाश करतें. द्विगुणित गंधक घालून करावें; तें क्षयरोगाचा नाश करतें. पाऱ्याचें त्रिगुणित गंधक घालून भस्म करावें ; तें पौष्टिक होतें. चतुर्गुणित गंधक घालून करावें ; तें तेज वाढवितें. पंचगुणित गंधक घालून करावें ; तें मृत्यूस जिंकितें, म्हणजे अपमृत्यूला दूर करितें. याचा दुसरा मुख्य प्रकार असा आहे कीं, पाऱ्याचे अष्टमांश किंवा षोडशांश अथवा बत्तिसांश सुवर्ण घालून खलून लोण्याप्रमाणें गोळा करावा आणि वर सांगितल्याप्रमाणें भस्म करावें.

**रक्तमूत्ररोग**—१. हा एक गुरांस होणारा रोग आहे. यामध्यें रोगी जनावरांस तांबडें किंवा जांभळट किंवा पूर्णपणें काळें मूत्र होऊं लागतें. हा विकार मुख्यतः यकृतास झाल्यामुळें अशी अवस्था होते व तो बहुधा गोचड्यांमुळें उत्पन्न होतो. यावर उपचार करण्याच्या बाबतींत बराच मतभेद आहे. परंतु मुख्यतः रोगी गुरास इप्सम खाराचे रेचक देणें हा उपचार सर्वमान्य आहे. कांहीं शेतकरी साधें मीठ एक गॅलन पाण्यामध्यें एक पौंड या प्रमाणांत घालून किंवा दोहोंचें समभाग मिश्रण करून गुरांस पाजतात व त्याचा उपयोग होतो असें म्हणतात. ज्या प्रदेशांत पाण्याचा निचरा नीट होत नाहीं अशा प्रदेशांत हा रोग होतो. तेव्हां चारा स्वच्छ असून तो कुजलेला नसेल अशी काळजी घेणें व तसेंच गाईचें दूध काढण्याच्या वेळीं गोचीड नसतील अशी काळजी घेणें, आवश्यक असतें.

२. (हेमॅच्युरिआ). या रोगांत लघवींतून रक्त पडतें. मूत्रमार्गांत किंवा मूत्रपिंडांत कांहीं विकार उद्भवल्यामुळे असें होतें. हृदयविकार, पांडुरोग व कांहीं रक्तविकार यांत लघवींतून रक्त जात असतें. यावर निश्चित असा उपचार नाहीं. चांगलें निदान करवून औषध घ्यावयाचें असतें.

**रक्तवाहिनी**—(आर्टेरीज). शरीरांत हृदयापासून शरीराच्या सर्व भागांस रक्ताचा पुरवठा ज्या नलिकांमार्फत होतो त्यास रक्तवाहिनी म्हणतात. या रक्तवाहिनी जाड नळया असून त्या लवचिक व स्नायुमय घटकां(टिशू)च्या बनलेल्या असतात. यांना शाखा फुटतात व त्या पुढें पुढें अगदीं लहान लहान होत जातात. या केशाकार रक्तवाहिनी रुधिराभिसरणाचें कार्य करीत असतात. रक्तवाहिनींमध्यें दोन मुख्य असतात. त्यांतील एकीस महाधमनी (एओर्टा) असें नांव असून ती हृदयाच्या डाव्या भागापासून निघते व तिला मोठमोठ्या शाखा फुटून त्या सर्व शरीरभर पसरलेल्या असतात. दुसऱ्या नळीस पल्मनरी आर्टरी म्हणजे श्वासनलिका असें म्हणतात व ती सर्व शरीरांतील रक्त हृदयाच्या उजव्या भागांतून फुफ्फुसांकडे वाहून नेते.

**रक्तसंचय**—(कॉन्जेशन). शरीरामध्यें एखाद्या भागांत जेव्हां रक्ताचा वाजवीपेक्षां अधिक संचय होतो, तेव्हां हा रोग होतो. याचे तीव्र व मंद असे दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारामध्यें रक्तवाहिन्यांतून एखाद्या भागांत वाजवीपेक्षां अधिक रक्त येतें व दुसऱ्या प्रकारामध्यें त्या भागांतील रक्त शिरामधून फार मंद गतीनें वाहून नेलें जातें. पहिला प्रकार एखाद्या ठिकाणीं दाह किंवा इजा झाली असतां किंवा एखादें औषध घेतल्यानें किंवा घट्ट दाब पडल्यानें उत्पन्न होतो. दुसऱ्या प्रकारामध्यें शरीराचा तो भाग काळा पडतो. जेव्हां असा रक्तसंचय होऊन फार वेळ जातो तेव्हां त्या ठिकाणीं सूज येते व ती हळूहळू पसरत जाते, आणि छाती किंवा उदर वगैरे भागांत द्रव सांचूं लागतो.

**रक्तस्तंभन, रक्तरोध**—(एंबोलिझम). जेव्हां शरीराच्या एखाद्या भागांत रक्त सांखळल्यामुळें किंवा रक्तप्रवाहामध्यें एखादा पदार्थ आल्यामुळें रुधिराभिसरणाच्या क्रियेंत अडथळा येतो, तेव्हां त्यास रक्तस्तंभन किंवा रक्तरोध असें म्हणतात. जर एखाद्या मर्मस्थानीं किंवा नाजुक इंद्रियामध्यें असा रक्तरोध झाला तर त्यापासून भयंकर विकार उत्पन्न होऊन तावडतोब मृत्यु येण्याचाहि संभव असतो. इतर वेळीं एखादा शरीराचा भाग नासणें किंवा पू होणें व तो शरीरांत पसरणें, इत्यादि विकार होण्याचा संभव असतो. हा रोग बहुधा मेंदू, फुप्फुसें, पानथरी, मूत्रपिंड, यकृत् व आंतडीं या ठिकाणीं होत असतो.

**रक्तक्षय**—(ॲनीमिआ). मनुष्याच्या शरीरांतील रक्तामध्यें जेव्हां रक्तकण किंवा रक्तकणांतील रंजक द्रव्यें वाजवीपेक्षां कमी असतात तेव्हां त्या अवस्थेस रक्तक्षय म्हणतात. याच्या प्राथमिक व द्वितीय अशा दोन अवस्था असतात. याचीं कारणें रक्तस्राव वगैरे अनेक असूं शकतात व तीं दुसऱ्या एखाद्या रोगाचीं पूर्वसूचकेंहि असण्याचा संभव असतो.

सामान्य निरोगी माणसाच्या रक्तांत ५०,००,००० रक्तगोलक व ४,००० ते १२,००० पर्यंत श्वेतगोलक एका घनमिलिमीटर जागेंत असतात. जर रक्तगोलक फार कमी असतील किंवा रक्तरंजक द्रव्य (हेमोग्लोबिन) पुरेसें नसेल तर शरीर धातूं(टिशू)ना कमी प्राणवायु मिळेल व त्यामुळें त्यांचें कार्य नीट चालणार नाहीं व हा रोग उत्पन्न होईल. या रोगांत माणूस फार अशक्त होतो. थोड्या श्रमानें धाप लागते व छाती धडधडूं लागते. त्याला चक्कर व मूर्च्छाहि येऊं लागते.

या रोगांत अन्नांतून अर्धा पौंड प्लीहारस देणें चांगलें. त्यामुळें रक्त वाढतें. पांडुरोग हा एक रक्तक्षयाचाच विकार आहे. पांडुरोग पाहा.



**रक्ताधिक्य**—(प्लेथोरा). या रोगामध्यें मनुष्याचा चेहरा लालभडक दिसूं लागून कातडीहि लाल दिसूं लागते. रक्तपेशी सुजतात. आणि नाकांतून वरचेवर रक्तस्राव होऊं लागतो. रोग्यास आळस येऊन शरीर जड वाटूं लागतें व नाडी जोरानें उडूं लागते. फार उत्तेजक अन्न (मांस वगैरे) खाल्ल्यानें किंवा अतिशय अन्न खाल्ल्यानें, अतिशय मद्य प्याल्यानें किंवा फार झोंप घेतल्यानें, किंवा सामान्यतः शरीरांत रक्ताची फार वाढ होईल अशा कोणत्याहि गोष्टीमुळें हा रोग होण्याचा संभव असतो.

**रंग**—आंदोलनाच्या निरनिराळ्या गती असलेला प्रकाश ज्यामुळें डोळ्यावर परिणाम करतो त्या विविध भावना ओळखण्यासाठीं रंगाची संज्ञा आहे. त्याचप्रमाणें असा परिणामकारी प्रकाश उत्पन्न करण्याला भावनांना भाग पाडणारे पदार्थांचे जे गुणधर्म त्यांनाहि रंग म्हणतात. आपण ज्याला पांढरा रंग म्हणून समजतों त्यांत मुख्य सात रंग असतात. तांबडा, नारिंगी, पिंवळा, हिरवा, निळा (आकाशी), निळी (इंडिगो) व जांभळा. यांखेरीज पांढऱ्या प्रकाशांत असंख्य रंगांच्या छटा असतात. वरील सात रंगहि तीन प्रधान रंगांपासूनच आहेत. ते म्हणजे—तांबडा, हिरवा व निळा (जांभळा). या तिन्हींचा योग्य संयोग झाल्यास पांढरा रंग तयार होतो. या तिहींपैकीं कोणत्याहि दोहोंचा संयोग केल्यास तिसऱ्याचा पूरक (कॉम्प्लिमेंटरी) निघतो. तांबडा व हिरवा मिसळल्यास पिवळा रंग होतो व तो निळ्या (जांभळ्या) रंगाचा पूरक आहे. जर एखादा पदार्थ एका विशिष्ट रंगाखेरीज इतर रंग शोषून घेत असेल तर तो पदार्थ त्या विशिष्ट रंगाचा दिसेल. उदा., एखादा पदार्थ इतर रंग शोषून फक्त तांबडा परावर्तित करीत असेल तर तो पदार्थ तांबड्या रंगाचा दिसेल. जर तो पदार्थ कोणताच रंग शोषीत नसेल तर तो पांढरा व सर्व रंग शोषीत असेल तर काळा दिसेल.

रंगद्रव्यांत तांबडा, निळा व पिवळा हे रंग आद्य समजतात. यांचें मिश्रण वरील प्रकाशवर्णलेखांतील रंगमिश्रणापेक्षां निराळे रंग उत्पन्न करील. उदा., तांबडा आणि पिवळा मिळून नारिंगी, पिवळा आणि निळा मिळून हिरवा, इ.. पण तांबडा, निळा आणि पिवळा हे रंग कोणत्याहि रंगांच्या कसल्याहि मिश्रणापासून तयार होऊं शकत नाहींत. प्रकाशलेखांतील त्रिवर्णसिद्धांत हा फार महत्त्वाचा आहे.

रंगांचें प्रकाशशोषण—भिंतींना दिलेले निरनिराळे रंग कोणत्या प्रमाणांत प्रकाशाचें शोषण करतात व त्यामुळें उजेड कसा कमी पडतो याची माहिती खालील आंकड्यांवरून कळेल.

| भिंतीचे रंग | प्रकाशशोषणाची शेंकडेवारी |
|---|---|
| गडद चाकोलेट | ·९६ |
| कोबाल्ट | ·८८ |
| निळा-हिरवा | ·८८ |
| किरमिजी | ·८८ |
| पिंगट काळा | ·८७ |
| पाचू हिरवा | ·८२ |
| गुलाबी | ·६४ |
| पिवळा | ·६० |
| नारिंगी | ·५० |
| क्रोम पिवळा | ·३८ |
| पांढरा | ·३० |

रंगद्रव्यें—रंग तयार करण्याकरितां जीं कोरडीं पुडीच्या स्वरूपाचीं द्रव्यें असतात त्यांस रंगद्रव्यें म्हणतात. तैल रंगामध्यें मुख्यतः चार घटक असतात : १. मूळ रंग ( बेस ), २. माध्यम ( व्हेइकल ), ३. द्रावक ( सॉल्व्हंट ), व ४. शोषक ( ड्रायर्स ). उदाहरणार्थ, मूळ रंगद्रव्य एखादी सफेता, शेंदूर, लोहप्राणिद, वगैरेसारखें असतें. ही पूड अळशीच्या तेलासारख्या एखाद्या माध्यमांत खलून त्याची चिकट पूड ( पेस्ट ) करण्यांत येते; नंतर टर्पेंटाइनसारखें एखादें द्रव्य ( द्रावक ) घालून ती पातळ करण्यांत येते व अखेरीस तो रंग लवकर वाळावा म्हणून त्यांत लिथार्ज, जशद गंधकित किंवा मँगनीजचें बोरेट वगैरेसारखें एखादें शोषक द्रव्य मिसळण्यांत येतें. यांतील टर्पेटाइन हें बाष्पभावी असल्यामुळें त्याच्या योगानें रंग सर्वत्र सारखा पातळ थरांत पसरतो. चित्रकारांचें तैलरंग हे सामान्य रंगाप्रमाणेंच असतात, पण अधिक काळजीपूर्वक तयार केलेले असतात. पाणरंग हे तैल रंगापेक्षां निराळे असण्याचें कारण त्यांमध्यें तेलाऐवजीं माध्यम म्हणून गोंद, डेक्स्ट्राइन किंवा इसिंग्लास हें वापरलेलें असतें.

इतर रंगांपेक्षां हीं द्रव्यें निराळीं असतात; कारण तीं बहुतेक खनिज असून अद्रावक असतात; हीं रंगद्रव्यें बहुधा धातूंचीं प्राणिदें, कर्बितें, सिकितें, गंधकितें किंवा क्रुमितें, वगैरे असतात. या धातू म्हटल्या म्हणजे शिसें, जस्त, पारा, कॅडमियम, लोह, क्रुम, भार ( बेरियम ), इत्यादि असतात. काळ्या रंगाचा मुख्य घटक कर्ब असतो. झिंक व्हाइट, क्रोमियम ग्रीन, रेड लेड, कोबाल्ट ब्लॅक, मँगनीज ग्रीन आणि अँटिमनी व्हाइट हीं सर्व त्या धातूंचीं प्राणिदें आहेत. गेरूच्या रंगाचा मुख्य घटक लोहप्राणिद आहे. अशाच प्रकारच्या बऱ्याचशा रंगांतील मुख्य घटक कोणत्या तरी धातूचें प्राणिद असतें. उदाहरणार्थ, जाळलेला अंबर ( लोह व मग्न ), कोबाल्ट निळा ( कोबाल्ट व अल्युमिनियम ), कोबाल्ट हिरवा ( कोबाल्ट व जस्त ). प्राशियन निळा हें लोहाचेंच प्राणिद असून तें प्रशियन निळा रंग लाल होईपर्यंत तापवून तयार करतात. श्वेत शिसें हा रंग शिशाच्या कर्बनितापासून तयार करतात. व्हर्मिलियन हा पाऱ्याचें गंधकिद आहे. कॅल्शियम पिवळा व अँटिमनी तांबडा हीं गंधकिदें आहेत. सोमलाच्या गंधकिदापासून राजपीत ( किंग्ज यलो ), रिअलगार किंवा तांबडा ऑर्पिमेंट ( मनशीळ ) हे रंग मिळतात. भार गंधकित ( बेरियम सल्फेट )पासून स्थिरश्वेत ( पर्मनंट व्हाइट ) रंग मिळतो. शिशाच्या क्रुमितांपासून क्रोमचे पिवळा, तांबडा व नारंगी हे रंग मिळतात. निंबक्रोम हा बेरियम-(भार)च्या क्रुमितापासून तयार करतात व तो फार स्थिर असतो. गुइग्नेटचा हिरवा रंग हा बोरिक अम्ल व पालाशद्वि क्रुमिता-( पोट्याशियम डायक्रोमेट )पासून तयार करतात. समुद्रपार निळा ( अल्ट्रामरीन ब्ल्यू ) हा सोडा, गंधक व चिखल एकत्र उष्णतेनें मिसळून तयार करतात. ब्रुन्स्विक हिरवा हा एक तांब्याचें प्राणहरिद आहे. श्रील हिरवा व श्वेवनफुर्ट हिरवा हेहि तांबें व सोमल यांचे संयुक्त पदार्थ आहेत. हे विषारी आहेत. प्राशियन निळा हा लोहाचें लोह सायनिद ( फेरिक फेरो सायनाइड ) आहे.

प्राणिज व वानस्पत्य रंगांमध्यें मुख्यतः सेपिया ( कटल माशापासून ), कोचिनील ( कोचिनील किड्यांपासून ) व पिवळा ( फारसी फळांपासून ), नीळ, गांबोज, तांबडी, मॅडर व पिवडी हे प्रसिद्ध आहेत.

अजंठ्याच्या लेण्यांमध्यें जीं चित्रें काढलीं आहेत तीं वानस्पत्य रंगांनीं काढलेलीं असून वनस्पतींपासून निरनिराळे रंग बनविण्याची कला एका काळीं पूर्णावस्थेस गेली होती. गेरू, हिंगुळ, शेंदूर, वगैरेसारखे खनिज रंगहि हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून परिचित होते. व त्या काळीं रंगविलेलीं अनेक चित्रें आज अगदीं ताज्याप्रमाणें दिसतात. अनेक लेण्यांतून व ग्रंथांतून प्राचीन रंगांनीं रंगविलेलीं चित्रें आढळतात, पण या कलेसंबंधीं वाङ्मय अथवा लेख कोठें आढळत नाहींत व ती कला हळूहळू नष्ट होत गेली आहे. अलीकडे कृत्रिम रंगांमुळें परवां परवांपर्यंत हयात असलेले आल, नीळ, वगैरे रंगहि आज बाजारांतून गेले आहेत.

कृत्रिम रंग—कृत्रिम रंगांच्या बाबतींत पहिला महत्त्वाचा शोध १८५६ सालीं डब्ल्यू. एन्. पर्किन यानें लावला व मोठी क्रांति करून सोडली. निरनिराळ्या प्रकारच्या रंगछटा संयोगात्मकपद्धतीनें आज सहज तयार करतां येतात. प्रथम नीलीन ( ॲनिलीन ) पद्धतीनें व नंतर कोलटारपासून कृत्रिम रंग तयार होऊं लागले व नैसर्गिक आणि कृत्रिम रंगांत

मोहकता, टिकाऊपणा, वगैरे बाबतींत मुळींच फरक राहिला नाहीं. आज पाश्चात्य देशांत कृत्रिम रंगांचा व्यापार फार मोठा आहे व तो इतर अनेक धंद्यांना पोषक आहे. रासायनिक द्रव्यें आणि औषधें, युद्धोपयोगी वस्तू, वगैरे रंगाच्या कारखान्यांचीं उपांगें असतात. प्रथम जर्मनी, नंतर अमेरिका व नंतर जपान या राष्ट्रांनीं रंगाच्या धंद्यांत फारच प्रगति केली आहे. हिंदुस्थानांत कोळसा विपुल आहे, पण कोलटार फारसा निघत नाहीं. त्यामुळें कृत्रिम रंगाचा धंदा विशेष नाहीं.

**रंगकला**—वस्त्रांना व वस्तूंना रंग देण्याची कला प्राचीन आहे. प्रथम वनस्पतींपासून रंगाची कल्पना आली व नंतर प्रत्यक्ष वनस्पतीचेच रंग इ. स. १८५६ पर्यंत वापरले जात. या सालीं पर्किननें प्रथम कोळशाच्या डांबरापासून कृत्रिम रंग तयार करण्याचा शोध काढला. रंगकामाचें मुख्य तत्त्व असें असतें कीं, रंगद्रव्यें विरघळलेल्या अवस्थेंत लावलीं पाहिजेत व तीं तंतुमय मालाला लावल्याबरोबर द्राव्य बनलीं पाहिजेत. म्हणजे तीं तंतूंत किंवा तंतूंवर पक्कीं बसलीं गेलीं पाहिजेत. रंगविण्याच्या प्रकारांवरून रंगांचे वर्ग पाडले आहेत. जसें, द्रावरंजक (ॲसिड डाईज), मूलरंजक (बेसिक डाईज), सरलरंजक (डायरेक्ट डाईज), विकसितरंजक (डेव्हेलप्ड डाईज), बंधकरंजक (मॉर्डंट डाईज), द्रोणीरंजक (वाट डाईज), इ.. रंगांत पुन्हां विशेष्य (सब्स्टंटीव्ह) व विशेषण (ॲडजेक्टिव्ह) असे दोन भेद आहेत. जो रंग तंतूला प्रत्यक्षपणें रंगवितो तो 'विशेष्य' व जेव्हां रंग बसण्याच्या कामीं दुसरा एखादा बंधक पदार्थ लागतो तेव्हां तो रंग 'विशेषण' समजतात.

प्राणिज तंतू रंगविण्यास (उदा., लोंकर, रेशीम, कातडें, इ.) द्रावरंजक लागतात. हे डांबरापासून तयार केलेले असून अनेक रंगछटा उठवितात. मूलरंजकांतील मुख्य घटकद्रव्यें सेंद्रिय भस्में असतात व या रंगांच्या ऊन पाण्यांत लोंकर, रेशीम व इतर प्राणिज पदार्थ नुसते बुडवून काढल्यास त्यांना रंग चढतो. कापूस आणि ताग यांना मात्र प्रथम बंधकाम्लांत बुडवावें लागतें. सरलरंजकामुळें कोणा बंधकाच्या मदतीशिवाय कापसाला रंग चढतो. विकसितरंजक तंतूंवरच दोन किंवा अधिक द्रव्यें लावून तयार होतात. बंधकरंजकांत उद्भिज रंगद्रव्यें व कृत्रिम रंगद्रव्यें दोन्ही येतात. धातूंचीं क्षारें वापरून रंगांची विविधता निर्माण करतां येते.

मंजिष्ट, पतंग (लांकूड), फुस्तुक, इ. उद्भिज रंगद्रव्यें फार महत्त्वाचीं आहेत. कृत्रिम रंग येण्यापूर्वी मंजिष्ठ हा 'तुर्की तांबडा' रंग करण्यास अत्यंत उपयुक्त असे. त्याचप्रमाणें 'कोचिनील' हाहि रंग आज कामांतून गेला. काताचाहि रंगाच्या कामीं फार उपयोग करतात. निळीचा रंग हा द्रोणीरंजकाचें एक मोठें उदाहरण सांगता येईल. द्रोणीरंजक हे पाण्यांत विरघळत नाहींत. पण जलमय अल्कांत यांपासून केलेलीं रंगद्रव्यें विरघळतात. उदा., नीळपांढर (इंडिगोव्हाइट).

खनिज रंग (उदा., पिवळा क्रोम, प्रशियन निळी, मँगनीज तपकिरी, इ.) विकसितरंजकांच्या सदरांत पडतात. हे प्रकाशामुळें फिक्के पडत नाहींत.

**रगतरोडा**—रक्तरोडा. याचीं झाडें डोंगराळ प्रदेशांत विशेष होतात. झाड बरेंच मोठें होतें. पानें मोकरीच्या पानांसारखीं व फळें गोल तांबड्या रंगाचीं असतात. हा औषधी आहे. मार लागलेल्या जागेवर याचा लेप देतात. छातींत दुखत असेल किंवा छातींतील रक्त बिघडलें असेल तर रगतरोड्याचें चूर्ण करून तें साजुक तुपाबरोबर देतात. यापासून रोहितारिष्ट करतात. हा अरिष्ट मूळव्याध, संग्रहणी, पानथरी, गुल्म, वगैरे रोगांवर देतात.

**रंगनाथ**—हा कानडी कवि रंगावधूत व श्रीरंग या नांवांनींहि प्रसिद्ध आहे. यानें आपली ग्रंथरचना श्रीशैल्य मल्लिकार्जुन देवापाशीं केली. यानें आपल्या ग्रंथांत नीतीला विशेष प्राधान्य दिल्याचें दिसून येतें. याच्याच ग्रंथाच्या आधारावर चिदानंदावधूत यानें आपला 'ज्ञानसिंधु' हा ग्रंथ लिहिला. रंगनाथ हा 'अनुभवामृत' या ग्रंथामुळें लोकप्रिय झाला. हा सहवासी वंशांतील महालिंगदेवाचा पुत्र व सहजानंदांचा शिष्य. हा १६७५ च्या सुमारास होऊन गेला.

**रंगनाथस्वामी निगडीकर** (१६१२-१६८४)—रामदास पंचायतनांतील एक संतकवि. आडनांव खडके. वयाच्या चौदाव्या वर्षापासून घर सोडून विद्या संपादन केली. नंतर निगडी येथें मोठ्या ऐश्वर्यानें राहूं लागला. यानें भगवद्गीता, योगवासिष्ट, सुदामचरित्र, रंभाशुकसंवाद, इ. कवितावद्ध ग्रंथ व शेंकडों पदें केलीं आहेत. यानें केलेला 'गजेंद्रमोक्ष' बायकांच्या नेहमीं पठणांतला असतो.

**रंगपूर**—पूर्व बंगाल, पाकिस्तान, राजशाही भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३६०६ चौ. मैल. जिल्हा दलदलीचा आहे. जंगल मुळींच नाहीं. लो. सं. (१९४१) २८,७७,८४७. शें. ६४ मुसलमान आहेत. भाषा रंगपुरी किंवा राजबन्सी आहे. तांदूळ, ताग, मोहरी व तंबाखू हीं मुख्य पिकें होत. कापड, भांडीं, यांचा मोठा व्यापार चालतो. रंगपूर हें प्राचीन कामरूप देशाचें मुख्य ठिकाण होतें. १५ व्या शतकापूर्वी चार निरनिराळ्या घराण्यांनीं या प्रदेशावर राज्य केलें. १४९८ त नीलांबर राजाला गौरचा अफगाण राजा अल्लाउद्दीन यानें कैद केलें. १५८४ त रंगपूर मोंगल साम्राज्यास जोडलें गेलें. १७६५ त ईस्ट इंडिया कंपनीकडे कारभार गेला.

| भिंतीचे रंग | प्रकाशशोषणाची शेंकडेवारी |
|---|---|
| गडद चाकोलेट | ·९६ |
| कोबाल्ट | ·८८ |
| निळा-हिरवा | ·८८ |
| किरमिजी | ·८८ |
| पिंगट काळा | ·८७ |
| पाचू हिरवा | ·८२ |
| गुलाबी | ·६४ |
| पिवळा | ·६० |
| नारिंगी | ·५० |
| क्रोम पिवळा | ·३८ |
| पांढरा | ·३० |

रंगद्रव्यें—रंग तयार करण्याकरितां जीं कोरडीं पुडीच्या स्वरूपाचीं द्रव्यें असतात त्यांस रंगद्रव्यें म्हणतात. तैल रंगामध्यें मुख्यतः चार घटक असतात: १. मूळ रंग (बेस), २. माध्यम (व्हेइकल), ३. द्रावक (सॉल्व्हंट), व ४. शोषक (ड्रायर्स). उदाहरणार्थ, मूळ रंगद्रव्य एखादी सफेता, शेंदूर, लोहप्राणिद, वगैरेसारखें असतें. ही पूड अळशीच्या तेलासारख्या एखाद्या माध्यमांत खलून त्याची चिकट पूड (पेस्ट) करण्यांत येते; नंतर टर्पेटाइनसारखें एखादें द्रव्य (द्रावक) घालून ती पातळ करण्यांत येते व अखेरीस तो रंग लवकर वाळावा म्हणून त्यांत लिथार्ज, जशद गंधकित किंवा मँगनीजचें बोरेट वगैरेसारखें एखादें शोषक द्रव्य मिसळण्यांत येतें. यांतील टर्पेंटाइन हें बाष्पभावी असल्यामुळें त्याच्या योगानें रंग सर्वत्र सारखा पातळ थरांत पसरतो. चित्रकारांचें तैलरंग हे सामान्य रंगाप्रमाणेंच असतात, पण अधिक काळजीपूर्वक तयार केलेले असतात. पाणरंग हे तैल रंगापेक्षां निराळे असण्याचें कारण त्यांमध्यें तेलाऐवजीं माध्यम म्हणून गोंद, डेक्स्ट्राइन किंवा इसिंग्लास हें वापरलेलें असतें.

इतर रंगांपेक्षां हीं द्रव्यें निराळीं असतात; कारण तीं बहुतेक खनिज असून अद्रावक असतात; हीं रंगद्रव्यें बहुधा धातूंचीं प्राणिदें, कर्बितें, सिकितें, गंधकितें किंवा क्रुमितें, वगैरे असतात. या धातू म्हटल्या म्हणजे शिसें, जस्त, पारा, कॅडमियम, लोह, क्रुम, भार (बेरियम), इत्यादि असतात. काळ्या रंगाचा मुख्य घटक कर्ब असतो. झिंक व्हाइट, क्रोमियम ग्रीन, रेड लेड, कोबाल्ट ब्लॅक, मँगनीज ग्रीन आणि अँटिमनी व्हाइट हीं सर्व त्या धातूंचीं प्राणिदें आहेत. गेरूच्या रंगाचा मुख्य घटक लोहप्राणिद आहे. अशाच प्रकारच्या बऱ्याचशा रंगांतील मुख्य घटक कोणत्या तरी धातूचें प्राणिद असतें. उदाहरणार्थ, जाळलेला अंबर (लोह व मग्न), कोबाल्ट निळा (कोबाल्ट व अल्युमिनियम), कोबाल्ट हिरवा (कोबाल्ट व जस्त). प्रशियन निळा हें लोहाचेंच प्राणिद असून तें प्रशियन निळा रंग लाल होईपर्यंत तापवून तयार करतात. श्वेत शिसें हा रंग शिशाच्या कर्बनितापासून तयार करतात. व्हर्मिलियन हा पाऱ्याचें गंधकिद आहे. कॅल्शियम पिवळा व अँटिमनी तांबडा हीं गंधकिदें आहेत. सोमलाच्या गंधकिदापासून राजपीत (किंग्ज यलो), रिअलगार किंवा तांबडा ऑर्पिमेंट (मनशीळ) हे रंग मिळतात. भार गंधकित (बेरियम सल्फेट)पासून स्थिरश्वेत (पर्मनंट व्हाइट) रंग मिळतो. शिशाच्या क्रुमितांपासून क्रोमचे पिवळा, तांबडा व नारंगी हे रंग मिळतात. निंबक्रोम हा बेरियम-(भार)च्या क्रुमितापासून तयार करतात व तो फार स्थिर असतो. गुइग्नेटचा हिरवा रंग हा बोरिक अम्ल व पालाशद्वि क्रुमिता-(पोट्याशियम डायक्रोमेट)पासून तयार करतात. समुद्रपार निळा (अल्ट्रामरीन ब्ल्यू) हा सोडा, गंधक व चिक्कण एकत्र उष्णतेनें मिसळून तयार करतात. ब्रुन्स्विक हिरवा हा एक तांब्याचें प्राणहरिद आहे. श्रील हिरवा व श्वेनफुर्ट हिरवा हेहि तांबें व सोमल यांचे संयुक्त पदार्थ आहेत. हे विषारी आहेत. प्रशियन निळा हा लोहाचें लोह सायनिद (फेरिक फेरो सायनाइड) आहे.

प्राणिज व वानस्पत्य रंगांमध्यें मुख्यतः सेपिया (कटल माशापासून), कोचिनील (कोचिनील किड्यांपासून) व पिवळा (फारसी फळांपासून), नीळ, गांबोज, तांबडी, मॅडर व पिवडी हे प्रसिद्ध आहेत.

अजंठ्याच्या लेण्यांमध्यें जीं चित्रें काढलीं आहेत तीं वानस्पत्य रंगांनीं काढलेलीं असून वनस्पतींपासून निरनिराळे रंग बनविण्याची कला एका काळीं पूर्णावस्थेस गेली होती. गेरू, हिंगुळ, शेंदूर, वगैरेसारखे खनिज रंगहि हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून परिचित होते. व त्या काळीं रंगविलेलीं अनेक चित्रें आज अगदीं ताज्याप्रमाणें दिसतात. अनेक लेण्यांतून व ग्रंथांतून प्राचीन रंगांनीं रंगविलेलीं चित्रें आढळतात, पण या कलेसंबंधीं वाङ्मय अथवा लेख कोठें आढळत नाहींत व ती कला हळूहळू नष्ट होत गेली आहे. अलीकडे कृत्रिम रंगांमुळें परवां परवांपर्यंत हयात असलेले आल, नीळ, वगैरे रंगहि आज बाजारांतून गेले आहेत.

कृत्रिम रंग—कृत्रिम रंगांच्या बाबतींत पहिला महत्त्वाचा शोध १८५६ सालीं डब्ल्यू. एन्. पर्किन यानें लावला व मोठी क्रांति करून सोडली. निरनिराळ्या प्रकारच्या रंगछटा संयोगात्मकपद्धतीनें आज सहज तयार करतां येतात. प्रथम नीलीन (ॲनिलीन) पद्धतीनें व नंतर कोलटारपासून कृत्रिम रंग तयार होऊं लागले व नैसर्गिक आणि कृत्रिम रंगांत

मोहकता, टिकाऊपणा, वगैरे बाबतींत मुळींच फरक राहिला नाहीं. आज पाश्चात्य देशांत कृत्रिम रंगांचा व्यापार फार मोठा आहे व तो इतर अनेक धंद्यांना पोषक आहे. रासायनिक द्रव्यें आणि औषधें, युद्धोपयोगी वस्तू, वगैरे रंगाच्या कारखान्यांचीं उपांगें असतात. प्रथम जर्मनी, नंतर अमेरिका व नंतर जपान या राष्ट्रांनीं रंगाच्या धंद्यांत फारच प्रगति केली आहे. हिंदुस्थानांत कोळसा विपुल आहे, पण कोलटार फारसा निघत नाहीं. त्यामुळें कृत्रिम रंगाचा धंदा विशेष नाहीं.

**रंगकला**—वस्त्रांना व वस्तूंना रंग देण्याची कला प्राचीन आहे. प्रथम वनस्पतींपासून रंगाची कल्पना आली व नंतर प्रत्यक्ष वनस्पतींचेच रंग इ. स. १८५६ पर्यंत वापरले जात. या सालीं पर्किननें प्रथम कोळशाच्या डांबरापासून कृत्रिम रंग तयार करण्याचा शोध काढला. रंगकामाचें मुख्य तत्त्व असें असतें कीं, रंगद्रव्यें विरघळलेल्या अवस्थेंत लावलीं पाहिजेत व तीं तंतुमय मालाला लावल्याबरोबर द्राव्य बनलीं पाहिजेत. म्हणजे तीं तंतूंत किंवा तंतूंवर पक्कीं बसलीं गेलीं पाहिजेत. रंगविण्याच्या प्रकारांवरून रंगांचे वर्ग पाडले आहेत. जसें, द्रावरंजक (ॲसिड डाईज), मूलरंजक (बेसिक डाईज), सरलरंजक (डायरेक्ट डाईज), विकसितरंजक (डेव्हेलप्ड डाईज), बंधकरंजक (मॉर्डंट डाईज), द्रोणीरंजक (वाट डाईज), इ.. रंगांत पुन्हां विशेष्य (सब्स्टंटीव्ह) व विशेषण (ॲडजेक्टिव्ह) असे दोन भेद आहेत. जो रंग तंतूला प्रत्यक्षपणें रंगवितो तो 'विशेष्य' व जेव्हां रंग बसण्याच्या कामीं दुसरा एखादा गंधक पदार्थ लागतो तेव्हां तो रंग 'विशेषण' समजतात.

प्राणिज तंतू रंगविण्यास (उदा., लोंकर, रेशीम, कातडें, इ.) द्रावरंजक लागतात. हे डांबरापासून तयार केलेले असून अनेक रंगछटा उठवितात. मूलरंजकांतील मुख्य घटकद्रव्यें सेंद्रिय भस्में असतात व या रंगांच्या ऊन पाण्यांत लोंकर, रेशीम व इतर प्राणिज पदार्थ नुसते बुडवून काढल्यास त्यांना रंग चढतो. कापूस आणि ताग यांना मात्र प्रथम बंधकाम्लांत बुडवावें लागतें. सरलरंजकामुळें कोणा बंधकाच्या मदतीशिवाय कापसाला रंग चढतो. विकसितरंजक तंतूंवरच दोन किंवा अधिक द्रव्यें लावून तयार होतात. बंधकरंजकांत उद्भिज रंगद्रव्यें व कृत्रिम रंगद्रव्यें दोन्ही येतात. धातूंचीं क्षारें वापरून रंगांची विविधता निर्माण करतां येते.

मंजिष्ठ, पतंग (लांकूड), फूस्तुक, इ. उद्भिज रंगद्रव्यें फार महत्त्वाचीं आहेत. कृत्रिम रंग येण्यापूर्वी मंजिष्ठ हा 'तुर्की तांबडा' रंग करण्यास अत्यंत उपयुक्त असे. त्याचप्रमाणें 'कोचिनील' हाहि रंग आज कामांतून गेला. काताचाहि रंगाच्या कामीं फार उपयोग करतात. निळीचा रंग हा द्रोणीरंजकाचें एक मोठें उदाहरण सांगता येईल. द्रोणीरंजक हे पाण्यांत विरघळत नाहींत. पण जलमय अल्कांत यांपासून केलेलीं रंगद्रव्यें विरघळतात. उदा., नीळपांढर (इंडिगोव्हाइट).

खनिज रंग (उदा., पिवळा क्रोम, प्रशियन निळी, मॅंगनीज तपकिरी, इ.) विकसितरंजकांच्या सदरांत पडतात. हे प्रकाशामुळें फिके पडत नाहींत.

**रगतरोडा**—रक्तरोडा. याचीं झाडें डोंगराळ प्रदेशांत विशेष होतात. झाड बरेंच मोठें होतें. पानें भोकरीच्या पानांसारखीं व फळें गोल तांबड्या रंगाचीं असतात. हा औषधी आहे. मार लागलेल्या जागेवर याचा लेप देतात. छातींत दुखत असेल किंवा छातींतील रक्त बिघडलें असेल तर रगतरोड्याचें चूर्ण करून तें साजुक तुपाबरोबर देतात. यापासून रोहितारिष्ट करतात. हा अरिष्ट मूळव्याध, संग्रहणी, पानथरी, गुल्म, वगैरे रोगांवर देतात.

**रंगनाथ**—हा कानडी कवि रंगावधूत व श्रीरंग या नांवांनींहि प्रसिद्ध आहे. यानें आपली ग्रंथरचना श्रीशैल्य मल्लिकार्जुन देवापाशीं केली. यानें आपल्या ग्रंथांत नीतीला विशेष प्राधान्य दिल्याचें दिसून येतें. याच्याच ग्रंथाच्या आधारावर चिदानंदावधूत यानें आपला 'ज्ञानसिंधु' हा ग्रंथ लिहिला. रंगनाथ हा 'अनुभवामृत' या ग्रंथामुळें लोकप्रिय झाला. हा सहवासी वंशांतील महालिंगदेवाचा पुत्र व सहजानंदांचा शिष्य. हा १६७५ च्या सुमारास होऊन गेला.

**रंगनाथस्वामी निगडीकर** (१६१२–१६८४)—रामदास पंचायतनांतील एक संतकवि. आडनांव खडके. वयाच्या चौदाव्या वर्षापासून घर सोडून विद्या संपादन केली. नंतर निगडी येथें मोठ्या ऐश्वर्यानें राहूं लागला. यानें भगवद्गीता, योगवासिष्ट, सुदामचरित्र, रंभाशुकसंवाद, इ. कविताबद्ध ग्रंथ व शेंकडों पदें केलीं आहेत. यानें केलेला 'गजेंद्रमोक्ष' बायकांच्या नेहमीं पठणांतला असतो.

**रंगपूर**—पूर्व बंगाल, पाकिस्तान, राजशाही भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३६०६ चौ. मैल. जिल्हा दलदलीचा आहे. जंगल मुळींच नाहीं. लो. सं. (१९४१) २८,७७,८४७. शें. ६४ मुसलमान आहेत. भाषा रंगपुरी किंवा राजबन्सी आहे. तांदूळ, ताग, मोहरी व तंबाखू हीं मुख्य पिकें होत. कापड, भांडीं, यांचा मोठा व्यापार चालतो. रंगपूर हें प्राचीन कामरूप देशाचें मुख्य ठिकाण होतें. १५ व्या शतकापूर्वी चार निरनिराळ्या घराण्यांनीं या प्रदेशावर राज्य केलें. १४९८ त नीलांबर राजाला गौरचा अफगाण राजा अल्लाउद्दीन यानें कैद केलें. १५८४ त रंगपूर मोंगल साम्राज्यास जोडलें गेलें. १७६५ त ईस्ट इंडिया कंपनीकडे कारभार गेला.

रंगपूर शहर पौराणिक राजा भगदत्त याचें राहण्याचें ठिकाण होतें. येथें बरेच लहान उद्योगधंदे चालतात. धंदेशाळाहि आहेत. १८९७ च्या भूकंपानें शहरांतील बहुतेक इमारती पडल्या. लो. सं. सुमारें बावीस हजार आहे.

**रंगभूमि**—ज्या उंच केलेल्या व सजविलेल्या जागेवर नाटकें होतात ती मुद्दाम तयार केलेली जागा. फार प्राचीन काळीं साध्या जमिनीवरच खेळ होत. नंतर नीटनेटकी जमीन व पुढें उंच व्यासपीठ आलें (खि. पू. ४ थें शतक). नंतर दोन शतकांनीं दगडी नाट्यमंदिर दिसूं लागलें. ही ग्रीक लोकांची प्रगति झाली. रोमन लोकांनीं तर रंगभूमि उत्कृष्ट सजविली. तीवर खालून वर जाणारे पुढचे पडदे असत. इंग्लंड आणि फ्रान्स देशांमध्यें मध्ययुगांत पौराणिक नाटकें देवस्थानच्या पटांगणांत होत. पुढें शहराच्या मध्यवस्तींत नाटकगृहें जाऊं लागलीं. त्यांत निरनिराळ्या देखाव्यांचे फिरते पडदे असत. ज्याला आजच्यासारखें नाट्यगृह म्हणतां येईल असें एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत बांधण्यांत आलें. तथापि अर्वाचीन आंग्ल रंगभूमीच्या प्रगतीचें श्रेय फ्रेंच आणि इटालियन रंगभूमीला द्यावें लागेल. सचित्र रंगभूमीची कल्पना आणि वाढ त्यांची आहे. इ. स. १८१७ त इंग्लिश नाटयगृहांत प्रथम गॅसचे दिवे आले. पुढें ६५ वर्षांनीं वीज आली. आजच्या विसाव्या शतकांत रंगभूमि खालवर करण्याची युक्ति व झटपट प्रवेशांची बदल या गोष्टी लोखंडी बांधकामाच्या नाट्यगृहांतून सर्रहा दिसूं लागल्या आहेत. सभागृहाची घोड्याच्या नालासारखी रचना, उतरत्या जमिनी, बरेच सज्जे, चष्मे आणि वादनस्थान हीं आधुनिक रंगभूमीचीं वैशिष्ट्यें आहेत. प्रवेशांच्या उठावाला यांत्रिक साधनें भरपूर असतात.

अँफी थिएटर—रोमन लोकांच्या प्राचीन काळांत एक दीर्घ वर्तुळाकृति बिनछपराची इमारत बांधीत असत तिला अँफी थिएटर किंवा चंद्राकृति नाटकगृह म्हणत असत. या इमारतीवर छप्पर नसे व मध्यभागीं थोडी जागा मोकळी सोडलेली असे. तिच्याभोंवतीं बसण्याच्या जागांच्या रांगा बांधलेल्या असत व त्या एकावर एक चढत गेलेल्या असत. या जागांवर बसून लोक रानटी पशू व मनुष्य यांचीं युद्धें व इतर खेळ चाललेले पाहत असत. अशा तऱ्हेचें पहिलें नाटकगृह रोममध्यें खिस्तपूर्व ५९ मध्यें सी. स्क्रिबोनियस क्युरिओ यानें बांधलें. कोलोसिअममध्यें ५०,००० प्रेक्षक बसण्याची व्यवस्था असे. (कोलोसिअम पाहा.) व्हेलोना आणि आर्लेस येथील अशा रंगभूमी आज चांगल्या स्थितींत पाहावयास मिळतात. इंग्लंडमध्यें डॉर्चेस्टर व चेस्टर या ठिकाणीं अशा अर्धचंद्राकृति रंगभूमीचे अवशेष आढळले आहेत. अलीकडे या धर्तीवर नाट्यगृहें किंवा प्रेक्षागृहें बांधण्यांत येतात.

भारतीय—आपल्याकडे नाट्याचार्य भरतानें व त्याच्यामागून झालेल्या शास्त्रकारांनीं नाटकगृहाची रचना व व्यवस्था यांसंबंधीं अनेक नियम दिलेले आहेत. परंतु ते केवळ नाटकविषयक नसून त्यांत गायन व नृत्य यांसंबंधींच्या नियमांचाहि समावेश केलेला आहे. या सर्वांचे प्रयोग देवालयांतून व राजगृहांतून होत असत हें निश्चित आहे. परंतु त्यांच्याकरितां स्वतंत्र इमारतीहि होत्या. फार प्राचीन काळीं काव्यग्रंथ तोंडपाठ म्हणून दाखविण्याकरितां एक गुहा होती ही गोष्ट तिच्यांत असलेल्या खि. पू. दुसऱ्या शतकातील शिलालेखावरून सिद्ध झालेली आहे. परंतु तिच्यांत केवळ पठण होई, किंवा नाटकें व नकला वगैरेहि होत असत हें निश्चयानें ठरवितां येत नाहीं. या लहानशा गुहा—नाटकगृहाच्या प्रवेशद्वारांतील फरशीला खोल भोंकें पाडलेलीं आहेत. जर या भोंकांचा उपयोग त्या काळीं नाटकाच्या पडद्यांचीं दांडकीं बांधण्याकडे होत असला तर या गुहेत नाटकांचे प्रयोग होत असले पाहिजेत हें उघड आहे. प्राचीन काळीं मनोरंजनाचीं ठिकाणें म्हणून गुहांचा फार उपयोग करीत असत असें लूडर्ससारख्या पाश्चात्य पंडितानें प्रतिपादन केलें आहे; आणि ज्या अर्थी भरतानें नाटकगृह हें पर्वताच्या गुहेसारखें व दुमजली असावें असा नियम घातला आहे त्यावरून अशा तऱ्हेच्या नाटकोपयोगी गुहा होत्या ही गोष्ट त्यानें गृहीत धरली आहे.

नाटकगृहाच्या रचनेसंबंधींचे नियम भरताने आपल्या ग्रंथांत दिलेले आहेत. त्यानें नाटकगृहाचे तीन प्रकार वर्णिले आहेत: (१) विकृष्ट—हें देवाकरितां असून त्याची लांबी १०८ हात (प्रत्येक हात म्हणजे १८ इंच लांब) असावी; (२) चतुरस्र—हें राजे लोकांकरितां असून त्याची लांबी ६४ हात व रुंदी ३२ हात असावी; आणि (३) त्र्यस्र—म्हणजे त्रिकोनी नाटकगृह; हें इतर जनांकरितां असून तें ३२ हात लांबीचें असावें. श्रवणाच्या सोयीच्या दृष्टीनें चतुरस्र मंडपाची शिफारस केली आहे.

नाटकगृहाचे दोन भाग असत: एक प्रेक्षकस्थान व दुसरा रंगभूमि. प्रेक्षकस्थान हें स्तंभाच्या योगानें विभागीत असत. ब्राह्मणांची बसावयाची जागा असें दर्शविण्याकरितां अग्रभागीं एक धवलस्तंभ रोवीत असत. त्यानंतर क्षत्रियांची बसावयाची जागा दाखविण्याकरितां एक रक्तस्तंभ रोवीत असत आणि त्याच्यामागें वायव्येच्या बाजूस शूद्रांची जागा दाखविणारा एक निळाकाळा स्तंभ असे. प्रेक्षकांच्या बसावयाच्या जागा कौलें व लांकूड इत्यादिकांच्या केलेल्या असत आणि त्या एकावर एक अशा तऱ्हेनें रचलेल्या असत. सर्व प्रेक्षकस्थानाच्या पुढें रंगभूमीशिवाय एक मत्तवारणी नांवाची ओसरी असे. तिला चार खांब असत आणि ती प्रेक्षक लोकांच्याच उपयोगाकरिता असे.

प्रेक्षकगृहाच्या समोर सदर ओसरीच्या शेजारीं रंगभूमि असे. ती आदर्शाप्रमाणें स्वच्छ असून तिच्यावर साधीं व ओल्या गिलाव्यावर काढलेलीं चित्रें असत. चतुरस्त्र मंडपांत ही रंगभूमि आठ हात लांब व तितकीच रुंद असे. या रंगभूमीच्या कडेला रंगशीर्ष म्हणत. हें रंगशीर्ष निरनिराळ्या आकृतींनीं सुशोभित केलेलें असे व त्यावरच बळी देण्यांत येत असत.

रंगभूमीच्या मागें एक रंगविलेला पडदा असे. त्यास पटी, अपटी, प्रतिसीरा किंवा यवनिका अशीं नांवें होतीं. यवनिका म्हणजे आयोनिया प्रांतांतील असा अर्थ होतो. परंतु ‘यवन’ हा शब्द फक्त ग्रीक लोकांसच वापरीत नसत. त्याचप्रमाणें यवनिका या शब्दाचा अर्थहि केवळ नाटकाचा पडदा नसून तो इतर परदेशी वस्तूंसहि लावीत. वस्तुतः सर्व प्राचीन ग्रंथांतून ह्याच त्या शब्दाचा नेहमींच अर्थ आहे. ‘यवनिका’ शब्दाच्या जागीं जर ‘यमनिका’ हा शब्द होता असें मानलें तर त्यावरून सदर पडद्याचें कापड दुहेरी असे, असें निष्पन्न होईल; आणि तिसरा पर्याय शब्द जो ‘जवनिका’ हें मूळ शब्दाचें प्राकृत भाषेंतील अपभ्रष्ट स्वरूप होय हें उघड आहे. कांहीं असलें तरी यवनिका (ज्याला पटी किंवा अपटी या शब्दाची जोड द्यावी लागते) या संज्ञेवरून नाटकाच्या पडद्याची कल्पना प्रथम ग्रीक लोकांनीं काढली हें सिद्ध होत नाहीं आणि त्यापेक्षा भारतीयांनीं आपल्या नाट्याची कल्पना ग्रीक लोकांपासून घेतली हें तर मुळींच निष्पन्न होत नाहीं. जेव्हां एखादा नट एकदम किंवा त्वरेनें रंगभूमीवर प्रवेश करतांना पडदा बाजूला करतो तेव्हां त्यास ‘अपटिक्षेप’ असें म्हणतात. पडद्याच्या मागें नटांची खोली (नेपथ्य-गृह) असून तिला दोन प्रवेशद्वारें असत. या नेपथ्यगृहांत निरनिराळे नट आपापलीं सोंगें सजवीत असत. ज्यांचे प्रयोग रंगभूमीवर दाखवीत नसत म्हणजे उदाहरणार्थ, नाटकांतील दंगल किंवा मारामारी इत्यादि प्रकार–ते नटांच्या खोलींत (नेपथ्यें) गलबला करून दाखविण्यांत येत असत. नाटकांत जर देवतांचीं किंवा दैवी व्यक्तींचीं भाषणें असलीं तर तींहि तेथूनच करण्यांत येत. नेपथ्य-गृहाच्या दोन द्वारांच्या मधल्या जागेंत वाद्यस्थान असे.

अद्यापि खेड्यातून नाटकें देवळासमोर मांडव घालून त्यांत करतात. अलीकडील आपलीं नाट्यगृहें हीं युरोपियन धर्तीचीं आहेत. पुण्यास पहिलें नाटकगृह १८६० च्या सुमारास बांधलें. नाटकांसंबंधींचा कायदा १८८५ त झाला. त्यांत पुढें बऱ्याच दुरुस्त्या झाल्या.

**रंगरेझ**—रंगाऱ्यांची एक जात. या जातीची लो. सं. (१९२१) १,२३,००० आहे. पैकीं ६५ हजार हिंदू व ५८ हजार मुसलमान आहेत. संयुक्त प्रांतांत यांची वस्ती सर्वांत जास्त (३४,०००) आहे. मुसलमानांत खेरावाल म्हणून एक दुसरी रंगारी पोटजात आहे.

**रँगलर**—ही पदवी केंब्रिज युनिव्हर्सिटींत मॅथेमॅटिकल ट्रायपॉसच्या दुसऱ्या भागांत पहिला वर्ग मिळवणाऱ्या विद्यार्थ्यांना देण्यांत येतें. १९०९ पर्यंत ही पदवी सदर विषयाच्या पहिल्या भागांत पहिला वर्ग मिळवणारांना देण्यांत येत असे आणि त्या वर्गांत गुणानुक्रमानें सीनियर रँगलर, सेकंड रँगलर, इत्यादि विशिष्ट पदव्या देण्यांत येत असत. हल्लीं ही पद्धत बंद करून वर्णानुक्रमें नांवें जाहीर होतात. हिंदुस्थानांत पहिले सीनियर रँगलर (सर) रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे हे आहेत. १८९९ सालीं यांनीं हा मान मिळविला.

**रंगशलाका**—रंगाच्या कांड्या. खडूमध्यें किंवा शाडूमध्यें निरनिराळे रंग मिसळून गोंद किंवा मेण घालून त्यांच्या कांड्या करण्यांत येतात. प्रथम अशा कांड्यांनीं आकृति काढून नंतर बोटांनीं तो रंग सारखा करून चित्र काढतां येतें. याप्रमाणें चित्रें काढणें फार सुलभ होतें व सहज अनेक प्रकारचे रंग त्यामध्यें भरतां येतात. याकरितां लागणारा कागद खेदार असतो.

**रंगारी**—रंगरेझ व शिंपी पाहा. शिंप्यांमध्यें भावसार ही रंगाऱ्यांची पोटजात आहे.

**रंगाऱ्याची केरसुणी**—(जेनिस्टा.). [वर्ग—लेग्युमिनोसी]. शिंबी वर्गांतील वनस्पतींची एक जाति. हीमध्यें सुमारें १०० पोटजाती आहेत. यांपैकीं एक प्लांटाजेनिस्टा नांवाची जात आहे. यापासून इंग्लंडमधील प्लँटाजेनेट नांवाच्या राजकुलास नांव पडलें. दुसरी एक जात आहे, तिला रंगाऱ्याची केरसुणी (जेनेस्टा टिंक्टोरिआ) म्हणतात.

**रंगीत कांच**—वास्तविक रंगीत कांचांमध्यें सर्व रंगयुक्त कांचांचा अंतर्भाव होतो. परंतु मुख्यतः हा शब्द खिडक्यांना ज्या कांचा बसविण्यांत येतात त्यांना अंगचा रंग असला किंवा वर दिलेला रंग असला तरी लावण्यांत येतो. पूर्वीं कांचांना वरून रंग देण्यांत येत नसून अंगचा रंग असलेल्या कांचांचेच निरनिराळ्या रंगांचे व आकारांचे तुकडे घेऊन ते विशिष्ट आकृतींमध्यें शिशाच्या खोबणी असलेल्या पट्ट्या व तार यांच्या साहाय्यानें भिंतींत बसविलेल्या गजांस पक्क्या जोडण्यांत येत असत. जसजशी निरनिराळ्या प्रकारच्या चित्रांची तऱ्हा प्रचारांत येऊं लागली तसतशीं चित्रें परिणामकारक दिसावीं म्हणून या कांचांस निरनिराळे रंग देण्यांत येऊं लागले. १६ व्या शतकामध्यें ही कांचास रंग देण्याची व जेथून प्रकाश यावयास पाहिजे त्या ठिकाणचा रंग काढून टाकण्याची पद्धति विशेष प्रचारांत आली आणि ती गॉथिक शिल्पपद्धतीचा एक भागच बनली. सर्वांत जुने गॉथिक रंगीत कांचांचे नमुने ११–१२ व्या

रंगपूर शहर पौराणिक राजा भगदत्त याचें राहण्याचें ठिकाण होतें. येथें बरेच लहान उद्योगधंदे चालतात. धंदेशाळाहि आहेत. १८९७ च्या भूकंपानें शहरांतील बहुतेक इमारती पडल्या. लो. सं. सुमारें बावीस हजार आहे.

**रंगभूमि**—ज्या उंच केलेल्या व सजविलेल्या जागेवर नाटकें होतात ती मुद्दाम तयार केलेली जागा. फार प्राचीन काळीं साध्या जमिनीवरच खेळ होत. नंतर नीटनेटकी जमीन व पुढें उंच व्यासपीठ आलें (ख्रि. पू. ४ थें शतक). नंतर दोन शतकांनीं दगडी नाट्यमंदिर दिसूं लागलें. ही ग्रीक लोकांची प्रगति झाली. रोमन लोकांनीं तर रंगभूमि उत्कृष्ट सजविली. तीवर खालून वर जाणारे पुढचे पडदे असत. इंग्लंड आणि फ्रान्स देशांमध्यें मध्ययुगांत पौराणिक नाटकें देवस्थानच्या पटांगणांत होत. पुढें शहराच्या मध्यवस्तींत नाटकगृहें जाऊं लागलीं. त्यांत निरनिराळ्या देखाव्यांचे फिरते पडदे असत. ज्याला आजच्यासारखें नाट्यगृह म्हणतां येईल असें एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत बांधण्यांत आलें. तथापि अर्वाचीन आंग्ल रंगभूमीच्या प्रगतीचें श्रेय फ्रेंच आणि इटालियन रंगभूमीला द्यावें लागेल. सचित्र रंगभूमीची कल्पना आणि वाढ त्यांची आहे. इ. स. १८१७ त इंग्लिश नाट्यगृहांत प्रथम गॅसचे दिवे आले. पुढें ६५ वर्षांनीं वीज आली. आजच्या विसाव्या शतकांत रंगभूमि खालवर करण्याची युक्ति व झटपट प्रवेशांची बदल या गोष्टी लोखंडी बांधकामाच्या नाट्यगृहांतून सर्रहा दिसूं लागल्या आहेत. सभागृहाची घोड्याच्या नालासारखी रचना, उतरत्या जामिनी, बरेच सज्जे, चष्मे आणि वादनस्थान हीं आधुनिक रंगभूमीचीं वैशिष्ट्यें आहेत. प्रवेशांच्या उठावाला यांत्रिक साधनें भरपूर असतात.

ॲंफी थिएटर— रोमन लोकांच्या प्राचीन काळांत एक दीर्घ वर्तुळाकृति बिनछपराची इमारत बांधीत असत तिला ॲंफी थिएटर किंवा चंद्राकृति नाटकगृह म्हणत असत. या इमारतीवर छप्पर नसे व मध्यभागीं थोडी जागा मोकळी सोडलेली असे. तिच्याभोंवतीं बसण्याच्या जागांच्या रांगा बांधलेल्या असत व त्या एकावर एक चढत गेलेल्या असत. या जागांवर बसून लोक रानटी पशू व मनुष्य यांचीं युद्धें व इतर खेळ चाललेले पाहत असत. अशा तऱ्हेचें पहिलें नाटकगृह रोममध्यें खिस्तपूर्व ५९ मध्यें सी. स्क्रिबोनियस क्युरिओ यानें बांधलें. कोलोसिअममध्यें ५०,००० प्रेक्षक बसण्याची व्यवस्था असे. (कोलोसिअम पाहा.) व्हेलोना आणि आर्लेस येथील अशा रंगभूमी आज चांगल्या स्थितींत पाहावयास मिळतात. इंग्लंडमध्यें डॉर्चेस्टर व चेस्टर या ठिकाणीं अशा अर्धचंद्राकृति रंगभूमीचे अवशेष आढळले आहेत. अलीकडे या धर्तीवर नाट्यगृहें किंवा प्रेक्षागृहें बांधण्यांत येतात.

भारतीय—आपल्याकडे नाट्याचार्य भरतानें व त्याच्यामागून झालेल्या शास्त्रकारांनीं नाटकगृहाची रचना व व्यवस्था यांसंबंधीं अनेक नियम दिलेले आहेत. परंतु ते केवळ नाटकविषयक नसून त्यांत गायन व नृत्य यांसंबंधींच्या नियमांचाहि समावेश केलेला आहे. या सर्वांचे प्रयोग देवालयांतून व राजगृहांतून होत असत हें निश्चित आहे. परंतु त्यांच्याकरितां स्वतंत्र इमारतीहि होत्या. फार प्राचीन काळीं काव्यग्रंथ तोंडपाठ म्हणून दाखविण्याकरितां एक गुहा होती ही गोष्ट तिच्यांत असलेल्या ख्रि. पू. दुसऱ्या शतकातील शिलालेखावरून सिद्ध झालेली आहे. परंतु तिच्यांत केवळ पठण होई, किंवा नाटकें व नकला वगैरेहि होत असत हें निश्चयानें ठरवितां येत नाहीं. या लहानशा गुहा-नाटकगृहाच्या प्रवेशद्वारांतील फरशीला खोल भोंकें पाडलेलीं आहेत. जर या भोकांचा उपयोग त्या काळीं नाटकाच्या पडद्यांचीं दांडकीं बांधण्याकडे होत असला तर या गुहेंत नाटकांचे प्रयोग होत असले पाहिजेत हें उघड आहे. प्राचीन काळीं मनोरंजनाचीं ठिकाणें म्हणून गुहांचा फार उपयोग करीत असत असें लूडर्ससारख्या पाश्चात्य पंडितानें प्रतिपादन केलें आहे; आणि ज्या अर्थीं भरतानें नाटकगृह हें पर्वताच्या गुहेसारखें व दुमजली असावें असा नियम घातला आहे त्यावरून अशा तऱ्हेच्या नाटकोपयोगी गुहा होत्या ही गोष्ट त्यानें गृहीत धरली आहे.

नाटकगृहाच्या रचनेसंबंधींचे नियम भरतानें आपल्या ग्रंथांत दिलेले आहेत. त्यानें नाटकगृहाचे तीन प्रकार वर्णिले आहेत: (१) विकृष्ट–हें देवाकरितां असून त्याची लांबी १०८ हात (प्रत्येक हात म्हणजे १८ इंच लांब) असावी; (२) चतुरस्र– हें राजे लोकांकरितां असून त्याची लांबी ६४ हात व रुंदी ३२ हात असावी; आणि (३) त्र्यस्र–म्हणजे त्रिकोनी नाटकगृह; हें इतर जनांकरितां असून तें ३२ हात लांबीचें असावें. श्रवणाच्या सोयीच्या दृष्टीनें चतुरस्र मंडपाची शिफारस केली आहे.

नाटकगृहाचे दोन भाग असत: एक प्रेक्षकस्थान व दुसरा रंगभूमि. प्रेक्षकस्थान हें स्तंभाच्या योगानें विभागीत असत. ब्राह्मणांची बसावयाची जागा असें दर्शविण्याकरितां अग्रभागीं एक धवलस्तंभ रोवीत असत. त्यानंतर क्षत्रियांची बसावयाची जागा दाखविण्याकरितां एक रक्तस्तंभ रोवीत असत आणि त्याच्यामागें वायव्येच्या बाजूस शूद्रांची जागा दाखविणारा एक निळाकाळा स्तंभ असे. प्रेक्षकांच्या बसावयाच्या जागा कौलें व लांकूड इत्यादिकांच्या केलेल्या असत आणि त्या एकावर एक अशा तऱ्हेनें रचलेल्या असत. सर्व प्रेक्षकस्थानाच्या पुढें रंगभूमीशिवाय एक मत्तवारणी नांवाची ओसरी असे. तिला चार खांब असत आणि ती प्रेक्षक लोकांच्याच उपयोगाकरिता असे.

प्रेक्षकगृहाच्या समोर सदर ओसरीच्या शेजारीं रंगभूमि असे. ती आदर्शाप्रमाणें स्वच्छ असून तिच्यावर सार्धी व ओल्या गिलाव्या-वर काढलेलीं चित्रें असत. चतुरस्त्र मंडपांत ही रंगभूमि आठ हात लांब व तितकीच रुंद असे. या रंगभूमीच्या कडेला रंगशीर्ष म्हणत. हें रंगशीर्ष निरनिराळ्या आकृतींनीं सुशोभित केलेलें असे व त्यावरच बळी देण्यांत येत असत.

रंगभूमीच्या मागें एक रंगविलेला पडदा असे. त्यास पटी, अपटी, प्रतिसीरा किंवा यवनिका अशीं नांवें होतीं. यवनिका म्हणजे आयोनिया प्रांतांतील असा अर्थ होतो. परंतु 'यवन' हा शब्द फक्त ग्रीक लोकांसच वापरीत नसत. त्याचप्रमाणें यवनिका या शब्दाचा अर्थहि केवळ नाटकाचा पडदा नसून तो इतर परदेशी वस्तूंसहि लावीत. वस्तुतः सर्व प्राचीन ग्रंथांतून हाच त्या शब्दाचा नेहमींच अर्थ आहे. 'यवनिका' शब्दाच्या जागीं जर 'यमनिका' हा शब्द होता असें मानलें तर त्यावरून सदर पडद्याचें कापड दुहेरी असे, असें निष्पन्न होईल; आणि तिसरा पर्याय शब्द जो 'जवनिका' हें मूळ शब्दाचें प्राकृत भाषेंतील अपभ्रष्ट स्वरूप होय हें उघड आहे. कांहीं असलें तरी यवनिका (ज्याला पटी किंवा अपटी या शब्दाची जोड द्यावी लागते) या संज्ञेवरून नाटकाच्या पडद्याची कल्पना प्रथम ग्रीक लोकांनीं काढली हें सिद्ध होत नाहीं आणि त्यापेक्षां भारतीयांनीं आपल्या नाट्याची कल्पना ग्रीक लोकांपासून घेतली हें तर मुळींच निष्पन्न होत नाहीं. जेव्हां एखादा नट एकदम किंवा त्वरेनें रंगभूमीवर प्रवेश करतांना पडदा बाजूला करतो तेव्हां त्यास 'अपटिक्षेप' असें म्हणतात. पडद्याच्या मागें नटांची खोली (नेपथ्य-गृह) असून तिला दोन प्रवेशद्वारें असत. या नेपथ्यगृहांत निरनिराळे नट आपापलीं सोंगें सजवीत असत. ज्यांचे प्रयोग रंगभूमीवर दाखवीत नसत म्हणजे उदाहरणार्थ, नाटकांतील दंगल किंवा मारामारी इत्यादि प्रकार-ते नटांच्या खोलींत (नेपथ्यें) गलबला करून दाखविण्यांत येत असत. नाटकांत जर देवतांचीं किंवा दैवी व्यक्तींचीं भाषणें असलीं तर तींहि तेथूनच करण्यांत येत. नेपथ्य-गृहाच्या दोन द्वारांच्या मधल्या जागेंत वाद्यस्थान असे.

अद्यापि खेड्यांतून नाटकें देवळासमोर मांडव घालून त्यांत करतात. अलीकडील आपलीं नाट्यगृहें हीं युरोपियन धर्तीचीं आहेत. पुण्यास पहिलें नाटकगृह १८६० च्या सुमारास बांधलें. नाटकांसंबंधींचा कायदा १८८५ त झाला. त्यांत पुढें बऱ्याच दुरुस्त्या झाल्या.

**रंगरेझ**—रंगाऱ्यांची एक जात. या जातीची लो. सं. (१९२१) १,२३,००० आहे. पैकीं ६५ हजार हिंदू व ५८ हजार मुसलमान आहेत. संयुक्त प्रांतांत यांची वस्ती सर्वांत जास्त (३४,०००) आहे. मुसलमानांत खेरावाल म्हणून एक दुसरी रंगारी पोटजात आहे.

**रँगलर**—ही पदवी केंब्रिज युनिव्हर्सिटींत मॅथेमॅटिकल ट्रायपॉसच्या दुसऱ्या भागांत पहिला वर्ग मिळवणाऱ्या विद्यार्थ्यांना देण्यांत येतें. १९०९ पर्यंत ही पदवी सदर विषयाच्या पहिल्या भागांत पहिला वर्ग मिळवणारांना देण्यांत येत असे आणि त्या वर्गांत गुणानुक्रमानें सीनियर रँगलर, सेकंड रँगलर, इत्यादि विशिष्ट पदव्या देण्यांत येत असत. हल्लीं ही पद्धत बंद करून वर्णानुक्रमें नांवें जाहीर होतात. हिंदुस्थानांत पहिले सीनियर रँगलर (सर) रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे हे आहेत. १८९९ सालीं यांनीं हा मान मिळविला.

**रंगशलाका**—रंगाच्या कांड्या. खडूमध्यें किंवा शाडूमध्यें निरनिराळे रंग मिसळून गोंद किंवा मेण घालून त्यांच्या कांड्या करण्यांत येतात. प्रथम अशा कांड्यांनीं आकृति काढून नंतर बोटांनीं तो रंग सारखा करून चित्र काढतां येतें. याप्रमाणें चित्रें काढणें फार सुलभ होतें व सहज अनेक प्रकारचे रंग त्या-मध्यें भरतां येतात. याकरितां लागणारा कागद खेदार असतो.

**रंगारी**—रंगरेझ व शिंपी पाहा. शिंप्यांमध्यें भावसार ही रंगाऱ्यांची पोटजात आहे.

**रंगाऱ्याची केरसुणी**—(जेनिस्टा.). [वर्ग—लेग्यु-मिनोसी]. शिंबी वर्गांतील वनस्पतींची एक जाति. हीमध्यें सुमारें १०० पोटजाती आहेत. यांपैकीं एक प्लांटाजेनिस्टा नांवाची जात आहे. यापासून इंग्लंडमधील प्लँटाजेनेट नांवाच्या राजकुलास नांव पडलें. दुसरी एक जात आहे, तिला रंगाऱ्याची केरसुणी (जेनेस्टा टिंक्टोरिआ) म्हणतात.

**रंगीत कांच**—वास्तविक रंगीत कांचांमध्यें सर्व रंगयुक्त कांचांचा अंतर्भाव होतो. परंतु मुख्यतः हा शब्द खिडक्यांना ज्या कांचा बसविण्यांत येतात त्यांना अंगचा रंग असला किंवा वर दिलेला रंग असला तरी लावण्यांत येतो. पूर्वीं कांचांना वरून रंग देण्यांत येत नसून अंगचा रंग असलेल्या कांचांचेच निरनिराळ्या रंगांचे व आकारांचे तुकडे घेऊन ते विशिष्ट आकृतींमध्यें शिशाच्या खोचणी असलेल्या पट्ट्या व तार यांच्या साहाय्यानें भिंतींत बसविलेल्या गजांस पक्क्या जोडण्यांत येत असत. जसजशी निरनिराळ्या प्रकारच्या चित्रांची तऱ्हा प्रचारांत येऊं लागली तसतशीं चित्रें परिणामकारक दिसावीं म्हणून या कांचांस निरनिराळे रंग देण्यांत येऊं लागले. १६ व्या शतका-मध्यें ही कांचास रंग देण्याची व जेथून प्रकाश यावयास पाहिजे त्या ठिकाणचा रंग काढून टाकण्याची पद्धति विशेष प्रचारांत आली आणि ती गॉथिक शिल्पपद्धतीचा एक भागच बनली. सर्वांत जुने गॉथिक रंगीत कांचांचे: नमुने ११-१२ व्या

शतकांतलि आढळतात व त्यावर बायझन्टाइन शिल्पकलेचा प्रभाव दृष्टीस पडतो. परंतु १३ व्या शतकामध्यें ही कला कळसास पोंचली. १४ व्या शतकांत या कलेमध्यें अधिक स्वाभाविकता दिसून येते. १५ व्या शतकांतील रंगीत कांचा अधिक चकाकणाऱ्या दिसतात. विद्यापुनरुज्जीवनाच्या कालांत ही कला मृत्युपंथास लागली. १९ व्या शतकांत कांहीं काल हिचें पुनरुज्जीवन झालेलें दिसतें. जॉन फ्लेटन आणि जॉन पॉवेल यांनीं या कलेमध्यें बरेंचसें प्रावीण्य दाखविलेलें दृष्टीस पडतें.

**रंगीत फरशी**--( एन्कॉस्टिक टाइल्स ). मध्ययुगामध्यें देवळांत व धार्मिक इमारतींत जमिनीवर एका प्रकारच्या विटांची फरशी करण्यांत येत असे तिला हें नांव होतें. या विटांमध्यें निरनिराळया तऱ्हेचे रंग भरण्यांत येत असत. ते भरण्याची पद्धति अशी होती कीं, विटा कच्च्या असतांना त्यांच्या पृष्ठभागामध्यें निरनिराळ्या आकृतींमध्यें निरनिराळ्या रंगांची माती भरण्यांत येत असे व नंतर त्या भट्टींत भाजून काढण्यांत येत असत. त्याबरोबर ती मातीहि भाजली जाऊन त्या आकृती त्या विटांबरोबर निरनिराळ्या रंगांत दिसून येत. ही कला बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रचारांत आली व तेराव्या शतकांत पूर्णत्वास पोंचली आणि पंधराव्या शतकांत मागें पडली.

**रंगीत शिळाछाप**— ( क्रोमोलिथोग्राफी ). शिळाछापाचाच हा एक प्रकार आहे. यांत मूळच्या आकृतीसारखे रंग शिळाछापानें उठवावयाचे असतात. या कृतीनें साध्या खडूच्या रंगानें काढलेलीं, जलरंगानें काढलेलीं, तसेंच अनेक प्रकारचीं तैलरंगापर्यंतचीं चित्रें हुबेहूब छापतां येतात. या पद्धतींत प्रत्येक रंगाकरितां एक वेळ अशी अनेक वेळां छपाई करावी लागते व व ती अशा तऱ्हेनें करण्यात येते कीं, सर्व छपाई झाल्यावर मूळ चित्रांतील रंगाबरहुकूम रंग छापून होतात. अलीकडे नवीन नवीन पद्धती प्रचारांत आल्यामुळें रंगीत छपाईच्या बाबतींत ही पद्धति मागें पडली आहे. या पद्धतीनें हल्लीं फक्त नकाशे छापले जातात व त्याकरितां ही पद्धति उत्तम आहे. त्याप्रमाणेंच रंगीत लेबलें छापण्याकरितांहि या पद्धतीचा उपयोग करण्यांत येतो. तसेंच भिंतीवर चिकटविण्याच्या जाहिरातीहि या पद्धतीनें छापतात.

**रंगून**—ब्रह्मदेश, मुख्य बंदर व राजधानी. हें तीन नद्यांच्या संगमावर व समुद्रापासून आंत २१ मैलांवर वसलें आहे. बंदर फार मोठें व सोयीचें आहे. येथून आंत व बाहेर मोठा व्यापार चालतो. तांदूळ, लांकूड, कापूस, कातडीं, डिंक, तेल, हस्तीदंत, रत्नें, इ. जिन्नस निर्यात होतात. हस्तीदंत आणि चांदी यांवरचीं कामें फार सुबक होतात. शहर फार मोठें गजबजलेलें आहे. एक विद्यापीठ व इतर शैक्षणिक संस्था, दवाखाने, कचेऱ्या, वगैरेंच्या इमारती आहेत. लो. सं. चार लाखांइतकी आहे. जास्त लोक बौद्ध धर्मीय आहेत. ख्रिस्ती धर्मसंस्था बऱ्याच आहेत.

याचा इतिहास इ. स. ६ व्या शतकापर्यंत मागें जातो. १४१३ त हें ब्रह्मी लोकांकडे आलें. १७९० त पेगूच्या लोकांनीं जिंकलें व १८५२ त ब्रिटिशांकडे गेलें. १९४२ त जपान्यांनीं हें जिंकून घेतलें होतें. पण १९४५ सालीं जपान शरण आल्यावर परत मिळालें.

येथील शेवडॅगॉन पागोडा हें बौद्ध देवालय फार प्रख्यात आहे. याची उंची ३६८ फूट असून कळस सोन्यानें मढविलेले आहेत.

**रंगो बापूजी**—मराठ्यांच्या इतिहासांतील शेवटचा मुत्सद्दी. याचें पूर्ण नांव रंगोजी बापूजी गुप्ते-देशपांडे-रोहिडखोरेकर असें होतें. याच्या पूर्वजांनीं स्वराज्यस्थापनेच्या कामीं आपलें रक्त सांडलेलें आहे. हा सातारला प्रतापसिंह छत्रपतीच्या पदरीं होता. प्रतापसिंहास साताराच्या गादीवरून पदच्युत व्हावें लागल्यानें त्याची बाजू ब्रिटिश पार्लमेंटपुढें मांडण्यासाठीं म्हणून जे लोक विलायतेस गेले त्यांपैकीं रंगो बापूजी हा प्रमुख होता. लंडनला गेलेल्या या मंडळींची बरेच दिवस दादच लागेना. त्यामुळें यांपैकीं बरेचसे लोक परत आले. हा मात्र चौदा वर्षें तेथेंच होता. या मुदतींत यानें सुमारें पंचवीस सभा भरवून प्रतापसिंहावर इकडे होणाऱ्या जुलमांची तिकडील लोकांना जाणीव करून दिली. इंग्लिश भाषा अवगत नसल्यामुळें यास आपलें सर्व काम मध्यस्थामार्फत करावें लागे. विलायतेंत घडलेली सर्व हकीगत यानें मोडी लिपींत २२५ पानी पुस्तकांत लिहून तेथेंच प्रसिद्ध केली. प्रतापसिंहाचें चरित्रहि या पुस्तकात आलें आहे. पण याच्या या कामगिरींत यास अपेश घेऊनच परत फिरावें लागलें. सचिवाकडे असलेल्या याच्या घराण्याचें वतन मिळवण्यासाठीं यानें अनेक प्रयत्न केले. पण ते सिद्धीस गेले नाहींत. पुढें १८५७ सालच्या बंडांत याजवर कटाचा आरोप आला व हा परागंदा झाला. पण याचा पुत्र सीताराम यास फांशीं देण्यांत आलें. शेवटीं रंगो बापूजीची परिस्थिति अगदीं करुणाजनक झाली होती. याचे मोठें चरित्र प्रबोधनकार ठाकरे यांनीं लिहिलें आहे.

**रघु**—सूर्यवंशांत, इक्ष्वाकुकुलांत हा एक प्रख्यात राजा होऊन गेला. हा दिलीपाचा नातू व अजाचा पिता होता. याच्या पराक्रमावरून व उत्कृष्ट राज्यकारभारावरून याच्या वंशाला रघुवंश किंवा राघवकुल असें नांव पडलें.

**रघुजी भोसले**, पहिला ( मृत्यु १७५५ )—नागपूरकर भोसल्याच्या घराण्यांतील एक शूर व कर्तृत्ववान् पुरुष. नागपूर येथील गादीचा संस्थापक जो बिंजाजी त्याच्या या मुलास पहिला रघुजी असें म्हणत. हा मानी व स्वतंत्र बाण्याचा असूनहि

याचा स्वभाव मोकळा व दिलदार होता

पृष्ठक्रमांक ३००० ते ३०१० ऐवजी
पृष्ठ क्रमांक २१०० ते २११० असे वाचावें.

...शाहूचा मर्जी याजवर असे. शाहूनें याची हुशारी पाहून यास सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें व बंगालपर्यंत चौथाईचे हक्क वाढविण्याची सनद दिली. सन १७३८ मध्यें लखनौ, बेदर, बुंदेलखंड, अलाहाबाद, पाटणा, यांवरहि मराठ्यांची सत्ता प्रस्थापित करण्याचा शाहूनें यास अधिकार दिला. सन १७२८ मध्यें चिमाजी आप्पाबरोबर हा माळव्याच्या स्वारींत होता. देवगडच्या रतनकुंवर राणीच्या बाजूनें यानें पवनी, भंडारा काबीज करून देवगडवर हल्ला केला, वलीशहास कैदेंत टाकलें व रतनकुंवरच्या मुलास गादीवर बसवलें. या मदतीबद्दल यास रतनकुंवरनें आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा व खर्चासाठीं म्हणून १० लक्ष रुपये दिले. बाजीरावानंतर पेशवेपद याला द्यावें अशी वाटाघाट चालली होती. सन १७४१ मध्यें हा कर्नाटकच्या स्वारींत अर्काटच्या दोस्तअलीचा पराभव करण्याच्या वेळीं उपयोगी पडल्यानें यास कान्होजीच्या वेळचा सरंजाम बहाल करण्यांत आला. यानें बाजीराव पेशवे यास भोपाळच्या लढाईंत मदत न केल्यानें बाजीरावानें आवजी कवडे यास याच्या मुलुखावर पाठवलें. परंतु ही हकिकत याजकडून शाहूस कळतांच त्यानें पेशव्यास याला त्रास न देण्याबद्दल कळवलें. बादशहाच्या मुलुखावर यानें स्वारी केल्यामुळें नानासाहेब पेशवे बादशहातर्फे याच्याशीं लढला. सन १७४२ ते १७५१ या मुदतींत याच्या बंगालवर चार स्वाऱ्या झाल्या. प्रसिद्ध वीरगाजी कोल्हटकर बंधू याच्याच पदरीं होते. याची कलकत्तेकर इंग्रजांना फार दहशत वाटून त्यांनीं 'मराठा डिच' नांवानें एक खंदक खणला.

लोकांच्या हिताकडेहि याचें लक्ष असे. भंडारा ते रायपूर यांमधील भागांत अनेक तलाव व कालवे बांधून यानें शेती वाढवली. याच्या वेळीं नागपूर, उमरखेड, एलिचपूर, बाळापूर येथील कापडाच्या धंद्यास उर्जितावस्था लाभली. नागपूर व चंद्रपूर येथें संस्कृत विद्येला उत्तेजन देऊन यानें विद्वान्...

...र्माण करण्याचें श्रेय संपादलें. ता. १४ डिसेंबर, ...हा पोटदुखीनें मरण पावला. यास जानोजी, ...जी व बिंबाजी असे चार मुलगे होते. याच्या ...या सहा स्त्रिया सती गेल्या. भोसले घराण्यांत ...र्तृत्ववान् निघाला. हिंदुस्थानच्या पूर्व भागांत ...पसरविण्यास हा बहुंशीं कारण आहे.

...रा (१७५७-१८१६)— जानोजी भोसले हा ...यानें त्यानें मुधोजीच्या या मुलास दत्तक घेतलें ...जीची पत्नी दर्याबाई हिला हें न आवडल्यानें ...पुत्रास. गादी न देतां स्वतःच राज्यकारभार ...न केली. तसेंच आपला दीर साबाजी याच्या नांवानें तिनें माधवराव पेशव्याकडून वस्त्रें आणलीं. यानंतर सन १७७३ मध्यें कुंभेरीच्या लढाईनंतर मुधोजी व साबाजी यांच्यामधील वाद मिटला व रघुजीस गादी मिळाली. १७७५ मध्यें सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत रघुजीस सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें व नेमणूक देण्यांत आली. याच्या खंडोजी (चिमणाबापू) व व्यंकोजी नाना (मन्याबापू) या दोन धाकट्या भावांपैकीं खंडोजीशीं याचें जमत नसे. पुढें हेस्टिंग्जनें खंडोजीस आपल्या बाजूस वश करून घेतलें. खंडोजी वारल्यावर यानें छत्तीसगडाकडील जमीनदारांनीं उभारलेल्या बंडाचा मोड केला व हरिपंत फडक्यास टिपूवरील मोहिमेसाठीं सैन्याची मदत केली. नाना फडणिसाचें याजविषयीं चांगलें मत असल्यानें त्यानें याजबरोबर नवा करार करून पंधरा लक्ष रुपये नगदी देववले व गढामंडला प्रांत याजकडे दिला. खर्ड्याच्या लढाईंत हा होता. यानें इंग्रजांशीं गाविलगड येथें केलेल्या लढाईंत इंग्रजांचा जय झाला व इंग्रजांनीं या वेळीं भोसल्यांच्या सर्व दौलतीची लूट केली. सन १८०३ डिसेंबर या महिन्याच्या सतराव्या तारखेस इंग्रज व भोसले यांमधील झालेल्या तहांत ओरिसा प्रांत इंग्रजांस मिळाला व छत्तीसगड भोसल्यांकडेच राहिला. यानंतर सन १८०६ ऑगस्ट या महिन्याच्या २४ तारखेस रघुजीनें सर जॉन शोअरशीं निराळा तहनामा करून पाटणा व संबळपूर हीं संस्थानें परत मिळवलीं. निरनिराळ्या मानगर्दीमुळें हा अतिशय कर्जबाजारी बनला. त्यांतच याच्या खंडण्या बंद झाल्या व त्यामुळें याच्या राज्यास उतरती कळा लागली. राज्यकारभारांत यानें मेहनतीनें लक्ष दिलें. हा मातृभक्त असून धार्मिक कृत्यें पार पाडण्याकडेहि याचा कल विशेष असे. चिन्नूर येथें यानें 'सोमयाग' केला. (नागपूरकर भोसले पाहा).

रघुनाथ—तंजावरकडील एक मराठी कवि. हा व्यंकोजीची राणी दीपांबिका हिच्या पदरीं होता. याचें संस्कृत काव्य 'भोजन

कुतूहल' हें प्रसिद्ध आहे. याखेरीज यानें अनेक संस्कृत व मराठी ग्रंथ रचिले. त्याच्या 'नरक वर्णन' या मराठी काव्यांत इतर ग्रंथांची माहिती दिली आहे. हे ग्रंथ तंजावरच्या सरस्वती महालांत आहेत.

**रघुनाथ** (१८ वें शतक, पूर्वार्ध)— काशीराज बरिवंडसिंहाच्या पदरीं असलेला एक हिंदी कवि. काव्यकलाधर, रसिकमोहन व इष्कमहोत्सव या ग्रंथांचा हा कर्ता असून, बिहारी सत्सईवरील याची टीका सुप्रसिद्ध आहे. काशीराज बरिवंडसिंहानें यास चौरा नामक गांव इनाम दिलें होतें.

**रघुनाथदास**—एक गुजराथी कवि. हा अहमदाबाद जवळील गोमतीपूरचा व लेवा कुळंबी जातीचा. श्रीमद्भागवत्, रामायण, ध्रुवाख्यान, अभिमन्युविवाह, चक्रव्यूहवर्णन, छप्पर या नांवांचे याचे काव्यग्रंथ आहेत. हा १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला.

**रघुनाथ नायक** (१७ वें शतक, पूर्वार्ध)—दक्षिण हिंदुस्थानांतील एक ग्रंथकार. हा पारिजातहरण, अच्युताभ्युदय, नलाभ्युदय, महाभारतसारसंग्रह, रामायणसारसंग्रह, व तेलंगी रामायण या संस्कृत व तेलंगी ग्रंथांचा कर्ता होय. तंजावरच्या अच्युत नायकाचा हा पुत्र रामभक्त असून यानें श्रीरंगम्, विजयराघवपुरम् व कुंभकोणम् येथील सुप्रसिद्ध राममंदिरें बांधलीं. दुसरा वेंकटपतिदेवराय आरविदु याला याचें बहुमोल साहाय्य झालें.

**रघुनाथ नारायण हणमंते** (मृ. १६८३)—शहाजी व शिवाजी यांच्या पदरीं असलेला एक स्वामिनिष्ठ मुत्सद्दी. याचा बाप नारायण हणमंते हा शहाजीचा चिटणीस होता. सन १६५३ मध्यें यास शहाजीनें आपल्या कर्नाटकांतील जहागिरीवर कारभारी नेमलें व या पदावर हा शेवटपर्यंत होता. शिवाजीच्या अष्टप्रधानांत पंडितराव पद याच्याकडे होतें. शिवाजीनें याच्याच साहाय्यानें कर्नाटकवर स्वारी केली. याच्या कर्तबगारीवर खुप होऊन शिवाजीनें यास जिंकलेल्या कर्नाटकांतील प्रांतांवर आपला कारभारी नेमून याचा भाऊ जनार्दनपंत यास सुमंताचा अधिकार दिला. शिवाजीच्या प्रोत्साहनानेंच यानें 'राज्यव्यवहारकोश' लिहिला. शिवाजीच्या पश्चात् संभाजीच्या कारकीर्दींतहि यानें राज्याचा बंदोवस्त उत्तम ठेवला होता. संभाजीस त्याच्या गैरवर्तनाची यानें चांगलीच जाणीव करून दिल्यानें त्यानें जुन्या प्रधान-मंडळास, पेशवे मोरोपंत पिंगळे यास व याचा भाऊ जनार्दनपंत हणमंते यांस ताबडतोब कैदेंतून मोकळें केलें. जनार्दनपंत हणमंते यास राजारामाच्या कारकीर्दींत अमात्यपद लाभलें. हा संभाजीस भेटून परत कर्नाटकांत चालला असतां वाटेंत वलण येथें सन १६८३ मध्यें मरण पावला. कर्नाटकांत आपल्या सद्गुणांनीं यानें चांगलेंच नांव कमावलें. यास नारोबा व त्रिमल असे दोन मुलगे होते.

**रघुनाथ पंडित**—एक मराठी कवि. याचें नल-दमयंती आख्यान सुप्रसिद्ध आहे. याशिवाय गजेंद्रमोक्ष, रामदासवर्णन, यांसारखीं आख्यानेंहि त्यानें रचिलीं आहेत. तंजावरच्या व्यंकोजी राजाजवळील 'राज्यव्यवहारकोशा'चा कर्ता रघुनाथपंत हणमंते आणि हा रघुनाथ पंडित एकच कीं काय याविषयीं विद्वानांत मतभेद आहेत. कांहीं संशोधकांच्या मतें हा अठराव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला असावा.

**रघुनाथ बल्लाळ कोरडे** (मृ. १६७४)—शिवाजीचा एक सरदार. शहाजीनें शिवाजीस स्वराज्यसंस्थापनेच्या कामीं ज्या लायक व विश्वासू माणसांची निवड करून दिली त्यांपैकीं हा एक होता. पुढें यास सैन्याची सबनिशी देण्यांत आली. सन १६५७ मध्यें यास मराठयांचा वकील म्हणून मोंगलांकडे पाठवण्यांत आलें होतें. सन १६६५ मध्यें जयसिंगाशीं शिवाजीतर्फे बोलणीं करण्याचें काम याच्यावरच सोंपवलें असावें. शिवाजीबरोबर हा आग्र्यास कैदेंत होता. शिवाजी कैदेंतून सुटून गेल्यावर याला पकडण्यांत आलें. पुढें १६६७ च्या मार्च महिन्यांत हा सुटला. सिद्दीशीं झालेल्या लढाईंत हा मारला गेला.

**रघुनाथ बाजीराव पेशवे** (१७३४-१७८३)—हा पेशवा बाजीराव (पहिला) याचा तिसरा मुलगा. हा लहानपणीं सातार्‍यास शाहू छत्रपतीजवळ होता. पुढें मोहिमांवर जाऊं लागला. पेशव्यांचे बंधु म्हणून याला जुने शिंदे-होळकरादि सरदार मान देत, पण याला डावपेंच किंवा मुत्सद्देगिरी माहीत नव्हती. याच्या भोंवतालीं सामान्य माणसांचा गराडा असे. सखारामबापू बोकील या अत्यंत हुशार मुत्सद्यावर याचा विश्वास पण बापूच्या तंत्रानें नेहमींच चालत नसे. बायको आनंदीबाई फार हुशार आणि कारस्थानी पण तिचेंहि नवर्‍याच्या चंचल वृत्तीमुळें फारसें चालत नसे.

राघोबानें दोन वेळां उत्तर हिंदुस्थानांत पंजाबपावेतों स्वार्‍या करून नांव मिळविलें होतें, पण त्या मुलखांचा नीट बंदोबस्त त्याला राखतां आला नाहीं. स्वार्‍या पेशाव्या दृष्टीनेंहि आंतबट्ट्याच्या होत. त्यामुळें सदाशिवरावभाऊशीं त्याचे तंटे

म्हैसूर—राजवाडा (पृ. २०६८)

रंगून—शेवडॅगॉन देवालय (पृ. ३०००)

छत्रपति राजाराममहाराज यांची समाधि, सिंहगड (पृ. २१३६)

होत. नानासाहेब पेशव्याच्या मृत्यूनंतर माधवराव याच्या तंत्रानें वागण्यास तयार होता. पण राघोबाच्या एककल्ली आणि चंचल वृत्तीमुळें दोघांचें जमेना. माधवराव जसा मोठा कर्तबगार तसा तापटहि होता. त्यानें राज्याचें नुकसान होऊं नये म्हणून याला नजरकैदेंत ठेवलें. नंतर मरणाच्या द्वारीं असतां नारायणरावाला याच्या स्वाधीन केलें. पुढें आनंदीबाईचा राज्यलोभ व राघोबाचा दुबळा स्वभाव यांमुळें नारायणरावाचा खून झाला. तेव्हां पेशवाईचीं वस्त्रें यानें जेमतेम कांहीं महिने अंगावर धारण केलीं इतकेंच. बारभाईचें कारस्थान त्याला उखडून टाकण्याचें सुरू होऊन त्या कारस्थानाला फळ येऊं लागलें. सवाई माधवराव पेशवा झाला. तेव्हां राघोबानें इंग्रजांची कास धरली. इंग्रजांना मराठ्यांत असा घरभेदीपणा पाहिजे होताच. त्यांनीं निवळ स्वार्थबुद्धीनें राघोबाची बाजू घेऊन मराठ्यांशीं युद्ध केलें, पण ते हरले. तेव्हां राघोबाला त्याच्या शत्रूच्या-बारभाईच्या स्वाधीन करावें लागलें. याप्रमाणें राघोबाची फजिती होऊन त्याला कोपरगांवीं जाऊन कैद्याप्रमाणें राहावें लागलें. पण लवकरच त्याचा तेथें अंत झाला.

उत्तर पेशवाईचा इतिहास राघोबाच्या अपकृत्यांनीं व त्यामुळें मराठेशाहीवर ओढवलेल्या संकटांनीं भरलेला आढळून येईल. राज्यांत यादवी उत्पन्न झाली व त्याचा शेवट पारतंत्र्यांत झाला.

राघोबाला अमृतराव हा दत्तक मुलगा व बाजीराव आणि चिमाजी हे दोन औरस मुलगे होते. दुर्गाबाई नांवाची मुलगी बारामतीकरांकडे दिली होती. राघोबाचा स्वभाव धर्मभोळा असे. त्यानें धार्मिक कृत्यें बरींच केलीं आहेत. पौराणिक ग्रंथांचा मोठा संग्रह त्यानें जमा केला होता.

**रघुनाथ यादव चित्रगुप्त** (१७०८-७०)— कोल्हापूरच्या छत्रपति संभाजीचा चिटणीस. शिवाजीच्या मृत्यूनंतर संभाजीकडून निष्कारण ठार झालेला बाळाजी आवजी चित्रे हा याचा चुलतआजा. सन १७२० च्या सुमारास यास कोल्हापूरची चिटणिशी मिळाली व या जागेवर यानें सन १७६० पर्यंत म्हणजे एकूण चाळीस वर्षें काम केलें. यानंतर हा, चिकोडी तालुक्यांत साताऱ्याच्या शाहूच्या मुलखांत बंडाळी माजवणाऱ्या यशवंतराव शिंद्याच्या पदरीं जाऊन राहिला. याच वेळीं यानें शिवाजीच्या काळाची एक बखर लिहिली. परंतु त्यांत बहुतेक सभासदाच्या बखरीचाच अनुवाद झाला आहे. स्वतःच्या कांहीं कविता यानें मधून मधून त्यांत घातल्याचें दिसून येतें. मात्र याची कथानक रंगवून सांगण्याची शैली कौतुकास्पद आहे. याला ऐकीव माहिती बरीच दिसते. या बखरीचा लेखनकाल शक १६८२ ते १६९२ च्या दरम्यानचा असावा.



**रघुनाथशास्त्री पर्वते**—पेशवाईचा अस्त झाल्यावर जी जुनी विद्वान् मंडळी महाराष्ट्रांत होती त्यांपैकीं हा एक धर्मनिष्ठ व विद्वान् ब्राह्मण होता. हा स्वतंत्र वृत्तीचा असून पुण्यास वेळोवेळीं झालेल्या अनेक धार्मिक व खाजगी वादांत भाग घेत असे. या वेळीं देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे यांत शरीरसंबंध होण्याबाबत वाद माजला असतां यानें असे शरीरसंबंध जरूर व्हावेत असें आपलें मत देऊन स्वतः देशस्थ व कऱ्हाडे कुलांतील मुलींशीं लग्नें करून लोकांना उदाहरण घालून दिलें. पुढें पुण्यांत इसबनिसांच्या घराण्यांत निर्माण झालेल्या वादांत जी दंगल झाली त्यांत भाग घेतल्याच्या आरोपावरून यास कित्येक वर्षें साध्या कैदेची शिक्षा झाली होती. कैदेंत असतांना यानें भगवद्गीतेवर 'शंकरपादभूषण' या नांवानें एक टीका लिहिली. तसेंच पुढें 'गदाधर पंचवाद' या ग्रंथावरहि यानें टीका लिहिली. याचा एक 'न्यायरत्न' नांवाचा ग्रंथ आहे. राघवाचार्य हे याचे गुरु होते.

**रघुनाथ शिरोमणि** (१४७७-१५४७)—एक सुविख्यात टीकाकार. याचें जन्मस्थान नदिया हें आहे. लहानपणींच याचा बाप वारल्यामुळें यास याच्या आईनें लहानाचें मोठें केलें. पुढें याची तरतरीत बुद्धि पाहून याचा गुरु वासुदेव सार्वभौम (पाहा) यानें यास आपल्यापाशीं विद्यार्जनासाठीं ठेवून घेतलें. हा व्याकरण व शब्दकोश यांत पारंगत झाल्यावर पुढें तर्कशास्त्राचा अभ्यास करूं लागला व त्यांत यानें चांगलीच प्रगति केली. आपल्या गुरूच्या सांगण्यावरून यानें मिथिलेस जाऊन तेथील शिक्षक पक्षधर याचा वादांत पराभव केला. तेव्हां पक्षधरानें रागानें याच्या श्रीमुखांत भडकावली. या अपमानाचा सूड घेण्याच्या उद्देशानें हा एका रात्रीं हातांत तलवार घेऊन पक्षधराच्या घरीं गेला असतां पक्षधर बायकोजवळ आपली स्तुति करीत असल्याचें यानें पाहिलें. तेव्हां पश्चात्ताप पावून यानें पक्षधराची क्षमा मागितली. याच्या विद्वत्तेमुळेंच नदिया विद्यापीठाला पदव्या देण्याचा अधिकार मिळाला. यानें गंगेशाच्या तत्त्वचिंतामणीवर व उदयनाचार्यांच्या आत्मतत्त्वविवेकावर अनुक्रमें 'तत्त्वचिंतामणि' व 'बुद्धधिक्कारशिरोमणि' या टीका लिहिल्या आहेत. तसेंच पदार्थतत्त्वनिरूपण अथवा पदार्थखंड, न्यायलीलावतीप्रकाशदीधिति अथवा विस्तारिका, किरणावलिप्रकाशदीधिति, आख्यानवाद, खण्डनखण्डखाद्यदीधिति, नयवाद व अवच्छेदकत्वनिरुक्ति याहि ग्रंथांचा कर्ता हाच होय.

**रंजक**—(क्रोमियम). एक राखी पांढऱ्या रंगाचा धातु. परमाणुभारांक ५२. १७९४ सालीं व्होकेलिन नांवाच्या फ्रेंच रसायनशास्त्रज्ञानें ह्याचा शोध लावला. लोखंडाबरोबर हा क्रोमाइट या खनिज धातूंत सांपडतो. अगदीं थोड्या प्रमाणांत

क्रोमाइसाइट म्हणूनहि सांपडतो. ॲल्युमिनियमच्या साहाय्यानें रंजक–प्राणिदा( क्रोमिमय ऑक्साइड )पासून लघुकरणानें ( डिडक्शन ) हा धातु तयार करतात. कठिण पोलाद ( क्रोमस्टील ) तयार करण्यासाठीं या धातूचा उपयोग होतो. ह्याचीं लवणेंहि अतिशय उपयोगी आहेत. क्रोमॲलम ह्याचा कपड्यावर रंगीत काम ( कॅलिको प्रिंटिंग) करण्यासाठीं व कातडें कमावण्यासाठीं उपयोग होतो. पालाश द्विरागेत ( पोटॅशियम डायक्रोमेट ) आणि सिंधु द्विरागेत ( सोडियम डायक्रोमेट ) यांचा रंगधारक ( मॉर्डंट ) म्हणून विशेषतः लोंकर रंगवितांना, फोटोग्राफींत, सेंद्रिय रसायनांचें प्राणिदीकरण ( ऑक्सिडेशन ) करतांना, तेलांचा रंग घालविण्यासाठीं गंधकाम्लाबरोबर उपयोग होतो. इतर पुष्कळ धातूंच्या रागेता( क्रोमेट्स )चा रंग म्हणून उपयोग होतो. कांहीं रत्नांमध्यें जो हिरवा रंग आला असतो तो रंजकाच्या *प्राणिदामुळेंच. हिरवी कांच किंवा हिरव्या पोर्सेलेनसाठीं* याच रंजक प्राणिदा( क्रोमियम डाय–ऑक्साइड )चा उपयोग करतात.

**रंजक खनिज**—( क्रोमाइट ). पोलादाचा धंदा आणि रंगाचा व्यापार या कामीं या खनिजाची फार आवश्यकता असते. हें मग्न खनिजाप्रमाणें दिसतें, पण तांबडें असून याचे पातळ अर्धपारदर्शक पत्रे निघतात. याला खनिजांच्या शनिमालेंतील ( स्पायनेलिड ) एक म्हणून समजण्यांत येतें.

**रजत नत्रित**—( नायट्रेट ऑफ सिल्व्हर ). नत्राम्लांत रुपें विरघळवून हें लवण तयार करतात. अग्नीनें तापवून तें वितळल्यावर त्याच्या कांड्या ओततात. त्या कांड्यांचा उपयोग डॉक्टर लोक कातडीं जाळण्या( कॉटरी )साठीं करतात. याशिवाय फोटोग्राफींत, आरसे तयार करण्यासाठीं, शाई ( नांवें घालण्याची ) तयार करण्याकरितांहि ह्याचा उपयोग करतात.

**रजपूत**—राजपूत. संस्कृत राजपुत्र शब्दाचा हा अपभ्रंश आहे व एक ज्ञातिनाम झालें आहे. राजपूत राहतात त्या प्रदेशाला राजपुताना हें नांव साहजिक पडलें. राजपूत लोक आपणांस सूर्यचंद्राच्या कुलांतील अस्सल क्षत्रिय समजतात. कांहीं विद्वान् संशोधकांच्या मतें आजचीं सर्व राजपूत क्षत्रिय घराणीं इ. स. ६ व्या शतकानंतरचीं आहेत. कारण यामागें शकहूणादि मध्य आशियांतील अनार्य टोळ्यांची धाड हिंदुस्थानावर येऊन मोठा वर्णसंकर झाला. हे सर्व बाहेरचे लोक देश्य लोकांत बेमालूम मिसळून गेले.

राजपुतांच्या ३६ कुळी आहेत. विवाहाच्या वेळीं या कुळी गोत्रांप्रमाणें पाहाव्या लागतात. हा वर्ग लढवय्यांचा व बाणेदार आहे. पृथ्वीराज चव्हाणापासून प्रतापसिंहापर्यंत त्यांचा स्वाभिमान आणि धर्माभिमान टिकून होता. मोंगल बादशहांनीं त्यांचा छळ करून त्यांना परतंत्र बनविलें. पातिव्रत्य सांभाळण्यासाठीं राजपूत स्त्रिया जोहार करीत व पुरुष धर्मसंस्कृतिरक्षणासाठीं 'केसरिया' बनत. सर्व राजपूत राजघराण्यांचा इतिहास असाच रोमांचकारी आढळेल.

आज हिंदुस्थानांत आपणांस रजपूत म्हणविणारे सुमारें ९५ लाख लोक आहेत. त्यांची विशेष वस्ती पंजाब, संयुक्त प्रांत व बंगाल यांतून आहे. राजपुतान्यांत सारी सात-आठ लाख रजपूत वस्ती आहे. हे शैव आणि वैष्णवहि आहेत. उदेपुरापासून १२ मैलांवर असलेलें एकलिंगजीचें देवस्थान यांचें मुख्य क्षेत्र आहे. नाथद्वार हेंहि दुसरें मोठें क्षेत्र आहे. *गुर्जरांप्रमाणें* रजपूतहि कमालीचे कृष्णभक्त आहेत.

**रजोगोल**—( ओव्हम ). स्त्रीच्या शरीरांतील गर्भांड किंवा बीजपेशी तिला रजोगोल म्हणतात. या रजोगोलाबरोबर एका सूक्ष्म पुरुष-रेतगोलाचा संयोग झाला म्हणजे त्याची वाढ होऊन *गर्भ तयार होतो व त्यापासून नवीन प्राणी जन्म* पावतो.

**रजोवस्था**—( मेन्स्टुएशन ). स्त्रीच्या जननेंद्रियापासून जो एक विशिष्ट कालाच्या अंतरानें रक्तप्रवाह सुरू होतो त्यास रजोवस्था असें म्हणतात. रजोवस्थेचा काल सुमारें १४ ते १६ वें वर्ष हा असतो. ही अवस्था एक महिन्याच्या अंतरानें प्राप्त होत असते आणि ती चार ते सहा दिवस टिकते व हा क्रम ४५ ते ५० वय होईपर्यंत चालतो. सामान्यतः ६ ते ८ औंस रक्तस्राव प्रत्येक वेळीं होतो.

**रंज्य द्रव्य**—( क्रोमॅटिन ). ॲनिलीन व इतर रंग लाविले असतां पेशींमधील गाभ्यांत जेथें खोल डाग पडतात तो भाग. हा बहुधा जाळीदार असतो व पेशीविभागणीबरोबरच यांत फरक होत जातात. याचा आनुवंशिक गुणांशीं संबंध असल्याचें मानतात.

**रझिया बेगम** (राज्य. १२३६–३९ )—दिल्लीच्या तख्तावर आलेली शम्सुद्दिन अल्तमश बादशहाची मुलगी. आपल्या पश्चात् हिला दिल्लीची गादी मिळावी अशी बादशहा शम्सुद्दिन अल्तमश याची इच्छा होती व त्याप्रमाणें आपल्या सरदारांपुढें त्यानें आपलें म्हणणें मांडलें. परंतु त्याच्या सरदारांना एका स्त्रीनें दिल्लीच्या गादीवर येऊन आपणांवर हुकूमत चालवावी ही गोष्ट पसंत न पडून त्याच्या इच्छेस त्यांनीं विरोध केला व फिरुझ नांवाच्या मुलास तख्तावर आणलें. परंतु पुढें फिरुझ मारला गेल्यानें व रझियाची लोकप्रियता ध्यानांत घेऊन तिला दिल्लीच्या गादीवर येण्यास सरदारांनीं संमति दिली. रझियानें जलालुद्दिन याकूब नांवाच्या आफ्रिकेंतून आलेल्या एका गृहस्थास घोडदळाचा सेनापति नेमून त्यास चांगली बढती दिली. ही गोष्ट सरदारांना न खपल्यानें व रझिया व याकूब यांच्यांत कांहीं तरी प्रेमसंबंध आहेत अशी शंका आल्यानें अल्तुनिया नामक सरदारानें

हिच्याविरुद्ध बंड करून याकूबचा खून केला. नंतर हिला कैद केलें व शम्सुद्दिन अल्तमशचा तिसरा मुलगा मुइझुद्दिन बहराम यास गादीवर आणलें. मुलतानचा सुभेदार अल्तूनिया यास दिल्लीच्या राज्यकारभारांत मानाची जागा न मिळाल्यानें तो असंतुष्ट होता. त्यानें रझियाशीं लग्न केलें व तिला परत दिल्लीचें तख्त मिळवून देण्याच्या उद्देशानें दिल्लीवर स्वारी केली. परंतु त्यांत त्यास यश न येऊन तो मारला गेला व हिचाहि खून झाला. रझियाला राजकारणाची चांगली माहिती असून ती दरबारांत असतांना पुरुषी पेहरावांत वावरत असे.

**रट्ट घराणें** (९८०-१२२८)—दक्षिण महाराष्ट्रांतील एक राजघराणें. यांची राजधानी प्रथम सौंदत्ती व नंतर वेळगांव येथें होती. प्रथम रट्ट हे चालुक्य आणि राष्ट्रकूट यांचे मांडलिक होते, पण पुढें स्वतंत्र झाले. यांनीं साडेतीनशें वर्षें वेळगांव-कलादगी भागावर राज्य केलें. या घराण्याचा संस्थापक पृथ्वीराम होता. हे राजे जैन धर्मी होते.

**रँडॉल्फ, थॉमस** (१६०५-१६३५)—एक इंग्रज कवि व नाटककार. त्याची बेन जॉन्सनबरोबर ओळख होऊन बेननें त्याला पुत्राप्रमाणें वागवलें. त्याचीं नाटकें पुढील आहेत—'दि जेलस लव्हर्स' (मत्सरी प्रणयी), 'दि म्यूझेस लुकिंग-ग्लास' (गानदेवतेचा आरसा), 'अॅमिनटॉस ऑर दि इंपॉसिबल डॉवरी' (अशक्य हुंडा).

**रॅडिकल**—इंग्लंडमधील लिबरल या राजकीय पक्षांतला अगदीं पुढारलेलीं मतें प्रतिपादन करणारा जो एक उपपक्ष आहे त्याला 'रॅडिकल' किंवा जहाल पक्ष म्हणतात. हा रॅडिकल पक्ष व्हिग पक्षाचा विरोधी आहे व मॉडरेट लिबरल पक्षाचाहि विरोधी आहे. या पक्षानें १९ व्या शतकांत लोकसत्ताक राज्यपद्धतीचा पूर्ण विकास व्हावा म्हणून अगदीं अंतिम स्वरूपाच्या राजकीय सुधारणांचा जहाल पद्धतीनें पुरस्कार केला. नंतर १९ व्या शतकाच्या अखेरीस आणि २० व्या शतकांत इंग्लंडांत समाजवादी-सोशालिस्ट पक्ष निर्माण झाला व मजूर पक्ष (लेबर पार्टी) प्रबल होत गेला. त्यामुळें हा रॅडिकल लिबरल पक्ष मागें पडला. रॅडिकल हा स्वतंत्र पक्ष कधींच नव्हता. तो लिबरल पक्षाच्या अंतर्गत पक्ष होता आणि या पक्षाचें महत्त्व १८८५ च्या सुमारास या पक्षाचे पुढारी जोसेफ चेंबरलेन असतांना अगदीं कळसास पोंचलें होतें.

**रड्डी**—एक शेतकरी जात. यांची वस्ती कर्नाटकांत असून लो. सं. पन्नास हजारांवर आहे. राष्ट्रकूट किंवा रट्ट घराण्याशीं यांचा संबंध लावला जातो. व्यंकटगिरि हें यांचें मूलस्थान आहे. हे बहुतेक लिंगायत धर्मी आहेत. मांस आणि मद्य यांना निषिद्ध आहे.

**रण**—कच्छच्या उत्तर आणि पूर्व बाजूस पसरलेलें मैदान. क्षे. फ. सुमारें ९,००० चौ. मै.. या रणाचे लहान व मोठे असे दोन भाग पडतात. पश्चिम भाग सखल व दलदलीचा आहे. वायव्येस एक डोंगराची ओळ ५० मैल लांब गेली आहे. रण हा भूप्रदेश फार प्राचीन काळीं समुद्रांत बुडालेला भाग असावा.

**रणगाडे**—(टँक्स). शस्त्रास्त्रांनीं सज्ज असा हा चालता किल्ला असून वाटेंतील कोणत्याहि अडथळ्याला जुमानीत नाहीं. पहिल्या युरोपीय महायुद्धामध्यें प्रथम ब्रिटिश सैन्यांत चिलखती गाड्यांचा उपयोग १५ सप्टेंबर १९१६ रोजीं करण्यांत आला. यांची गति व माऱ्याचें क्षेत्र सारखें वाढत आहे. दुसऱ्या महायुद्धामध्यें यांची रचना व विनाशकशक्ति यांमध्यें पुष्कळच प्रगति झाली होती व आरंभींचा जर्मनांस मिळालेला विजय व फ्रान्सची उडालेली धूळधाण जर्मनीच्या चिलखती गाड्यांचाच परिणाम होता. आरंभींच्या चिलखती गाड्यांचा वेग ताशीं २½ मैल असे. त्यावर दोन सहा पौंडी व तीन हाचकिस तोफा असून १० फूट रुंदीच्या चरावरून ते सहज जाऊं शकत. तसेंच साडेचार फूट उंचीच्या भिंतीवरून ते आक्रमण करीत. प्रत्येक रणगाड्यावर आठ असामी असत. मध्यम रणगाड्याचा वेग ताशीं पांच मैल असे, पण त्यावर फक्त तीन हाचकिस तोफा असत. हे गाडेहि १० फूट रुंदीच्या खड्ड्यांतून पुढें जात, पण हे फक्त पावणेचार फूट उंचीच्या भिंती ओलांडीत. यांवर तीन माणसें असत. त्याच वेळीं वीस मैल गतीचेहि रणगाडे बनविण्यांत आले होते व त्यांवर एक सहा पौंडी व ३ हाचकिस तोफा असत. दुसऱ्या महायुद्धांत यांच्या रचनेंत व शक्तींत पुष्कळच वाढ झाली. रणगाड्यांचें एक स्वतंत्र दळ आतां सैन्यांत असतें.

**रणछोडजी दिवाण** (१७६८-१८४१)—काठेवाडांत सुप्रसिद्ध असलेला एक विद्वान् कवि. हा नागर ब्राह्मण असूनहि यास युद्धकलेची विशेष माहिती असल्याचें दिसून येतें. 'चंडीपाथना गर्भो' व 'शिवगीता' हीं दोन काव्यें व 'तारीख-इ-सोरठ' व 'रुकात-इ-गुणागुण' हे दोन ग्रंथ यानें लिहिले असून शिवरहस्याचें व्रज भाषेंत भाषांतर केलें आहे. काठेवाडांतील वंडाळीचा कर्नल वॉकरच्या हस्तें शेवट झाल्यावर यानें आपली शिपाईगिरी सोडून लिखाण सुरू केलें.

**रणछोडलाल अमृतलाल** (१८९१- )—एक गुजराथी व्यापारी. हे गिरण्यांचे अडत्ये व कापडाचे कारखानदार आहेत. यांनीं कापडाच्या गिरण्या स्थापन केल्या आहेत. तसेंच अमेरिकन व युरोपियन कापडकारखान्यांचे अडत्ये आहेत. यांनीं युरोपमध्यें प्रवास केला आहे, व राष्ट्रीय चळवळींतहि बराच भाग घेतला आहे. त्यामुळें यास दोनदां तुरुंगवासाची शिक्षा

झाली आहे. अहमदाबाद मिल-ओनर्स असोसिएशनचे ते उपाध्यक्ष होते. तसेंच अहमदाबाद म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. दिल्ली येथें १९३२ मध्यें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे हे अध्यक्ष होते. अखिल भारतीय चरखा संघाचे हे विश्वस्त आहेत. लाइप्झिग प्रदर्शनास हे प्रतिनिधि म्हणून गेले होते. साबरमती येथील हरिजन आश्रमाचे ते एक विश्वस्त आहेत. त्याचप्रमाणें अशोक इन्शुअरन्स कंपनीचे ते संस्थापक व कार्याध्यक्ष आहेत.

**रणजितसिंग** ( १७८०-१८३९ )— पंजाबांतील एक विख्यात शीख राजा. याचा बाप महासिंग यानें पंजाबांतील लहान राजांचा एक संघ बनविला होता. रणजितसिंग वयाच्या १३ व्या वर्षी गादीवर आला व त्यानें थोड्याच वर्षांत सर्व शीखांचें आधिपत्य आपल्याकडे घेऊन पेशावर ते सतलजपर्यंत आपलें राज्य वाढविलें. म्हणून इंग्रज याच्याशीं दोस्ती ठेवीत व याला सतलजच्या पूर्वेकडे येऊं देत नसत. हा जसा शूर तसाच चांगला मुत्सद्दी व व्यवस्थित राज्य चालविणारा राजा होता. पंजाबांत याचा फार दरारा असे व म्हणून याला पंजाबचा सिंह असें म्हणत. यानें फ्रेंच व इटालियन अधिकारी ठेवून लष्कर चांगलें तयार केलें. पण याच्यामागें याचें राज्य फार दिवस टिकलें नाहीं. दिलीपसिंग पाहा.

**रणजितसिंहजी विभासिंहजी** ( १८७७-१९३३ )— जगद्विख्यात हिंदी क्रिकेटपटु व नव्या वळणाच्या हिंदी व इंग्लिश क्रिकेटचे जनक. 'रणजी' या नांवानें हे ओळखले जातात. नवानगरच्या जामसाहेब विभासिंहजींना हे दत्तक गेले होते. १९०७ मध्यें यांच्या हातांत नवानगरचीं सूत्रें आलीं.

यांचें शिक्षण राजकोट येथें राजकुमार कॉलेजमध्यें झालें व नंतर पुढील उच्च शिक्षणासाठीं सन १८८९ मध्यें हे केंब्रिजला रवाना झाले. हिंदुस्थानांत असल्यापासूनच यांना क्रिकेटची अतिशय आवड होती. पुढें इंग्लंडमध्यें गेल्यानंतर यांच्या खेळांत तिकडील नवीन कल्पनांची भर पडली व थोडक्याच काळांत या क्षेत्रांत हे 'रणजी' या नांवानें सर्वांस सुपरिचित झाले. सन १८९९-१९०४ या सहा वर्षांत यांनीं तेरा हजार सातशे नव्याण्णव धांवा व बेचाळीस शतकें काढण्याचा विक्रम केला. एकदां तर यांनीं एकाच महिन्यांत हजार धांवा काढल्या. धांवांच्या दृष्टीनें या कालांत यांचा इंग्लंडमध्यें दोन वेळां पहिला क्रम आला. Leg-Theory व Body Line Bowling हीं यांचीं या क्षेत्रांतील वैशिष्ट्यें होत.

१९३४ सालीं पतियाळच्या महाराजांनीं 'रणजी ट्रॉफी' नांवाची विजयढाल यांचें स्मारक म्हणून देण्यास सुरुवात केली.

**रणदुल्लाखान** (मृत्यु १६४३)—कर्नाटकाचा एक आदिलशाही सुभेदार व सरदार. यानेंच शहाजीला निजामशाहीकडून आदिलशाहींत नेलें. फरादखानाचा हा मुलगा. यानें बंगळूरच्या वीरभद्र राजावर स्वारी करून त्याचा पराभव केला व या जहागिरीची व्यवस्था पाहण्याचें काम आपल्या हाताखालीं असलेल्या शहाजीकडे सोंपविलें. पुढें सन १६३७-३९ च्या दरम्यान हाच बंगळूर प्रांत विजापूरकरांकडून शहाजीस त्याच्या कर्तबगारीचें इनाम म्हणून जहागीर देण्यांत आला. रणदुल्लाखानाच्या मुलाचें नांव रुस्तुमजमा असें होतें. परंतु त्यास धाकटा रणदुल्ला असेंहि म्हणत.

**रणसिंह गुहिलोत** ( राज्य. ११५८-६८ )— मेवाडचा एक राणा. रणपूर व कुंभलगड येथील शिलालेखांत यास रणसिंह असें म्हटलें असून राणा कुंभकर्णाच्या वेळीं तयार झालेल्या एकलिंग माहात्म्यांत याचें नाव कर्ण उर्फ कर्णसिंह असें दिलें आहे. याच्या वेळेपासूनच रावळ व राणा अशा दोन शाखा सुरू होऊन रावळशाखेचा अमल मेवाडवर राहिला व राणाशाखेंतील लोक सिसोदे येथील जहागीरदार बनले. रावळशाखेंत जितसिंह ( जैत्रसिंह ), तेजसिंह, समरसिंह व रत्नसिंह हे उदयास आले. माहप, राहप, वगैरे राजे राणाशाखेपैकीं होत. अल्लाउद्दिनानें सन १३०३ मध्यें चितोड आपल्या ताब्यांत घेतल्यावर रावळशाखेची समाप्ति झाली. या वेळीं रत्नसिंह हा मेवाडवर राज्य करीत होता. मेवाडचें गेलेलें राज्य परत मिळवण्याचें काम सिसोदियांपैकीं राणा हमीरनें केलें. रणसिंहानंतर क्षेमसिंह हा गादीवर आला.

**रतनगड**—१. मुंबई, कुलाबा जिल्हा, पेणच्या आग्नेयीस ६ मैलांवर एका टेंकडीवर हा किल्ला आहे. याची उंची १८०० फूट आहे. याच्या पूर्वेस मिऱ्या डोंगर आहे. हा बाबूराव पाशिलकर यानें बांधला असें सांगतात.

२. राजपुताना, बिकानेर संस्थान, सुजानगड निजामतींतील एक ठिकाण. हें १८ व्या शतकांत सुरतसिंगानें वसविलें व रतनसिंगानें पुनर्रचना करून नांव दिलें. याला भोंवतीं एक तट आहे. मोठी बाजारपेठ आहे.

**रतनपूर**—१. मध्यप्रांत, बिलासपूर जिल्हा, एक ठिकाण. हें १० व्या शतकांत रतनदेव राजानें वसविलें असें सांगतात. येथें ३०० तळीं व बरींच देवळें आहेत. लाख, काशाचीं भांडीं

व बांगड्या यांचा व्यापार चालतो. या ठिकाणीं कल्चुरी (हैहय) राजघराणें बाराव्या शतकांत नांदत होतें. लोकसंख्या ५,०००.

२. मुंबई, रेवाकांठा, रूपनगर विभागांतील एक ठिकाण. जवळच तांबड्या दगडाच्या खाणी आहेत. टेंकडीवर बावाघोर याची कबर आहे. १७०५ सालीं मराठ्यांनीं दिल्लीच्या सैन्याचा येथें पराभव केला होता.

**रतलाम संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या माळवा एजन्सींतील एक संस्थान. क्षे. फ. ६९३ चौ. मैल. यांत खेराची जहागिरी येते. हें संस्थान जोधपूरच्या उदयसिंह राजाचा पणतू रतनसिंग यानें १६५२ त स्थापन केलें. रतनसिंह हा शहाजहान बादशहाचा आवडता सरदार होता. हा १६५८ त लढाईंत मारला गेला. पुढें संस्थान खालावलें व त्याचे रतलाम, सीतामऊ व रावती असे तीन भाग झाले. १८ व्या शतकांत संस्थानिक शिंद्यांचें मांडलिक बनले. नंतर इंग्रजांनीं आपलें मांडलिक बनविलें (१८१९). माळव्यांतील रजपूत घराण्यांत रतलामचें घराणें श्रेष्ठ समजलें जातें.

सध्यांचे महाराज सर सज्जनसिंगजी १८९३ त गादीवर बसले. यांची पोलो खेळण्यांत जगांत प्रसिद्धि आहे. संस्थानची लो. सं. सव्वा लाख आहे. शें. ७० लोक माळवी अथवा रांगडी भाषा बोलतात. संस्थानांतील जमीन सपाट व सुपीक आहे. गहूं, ज्वारी, मका, चणा, कापूस व अफू हीं पिकें होतात. संस्थानचें उत्पन्न १२ लाख रु. आहे. रतलाम हें राजधानीनें ठिकाण आहे. लो. सं. सुमारें ३०,००० आहे. तेथें एक कॉलेज आहे. हें संस्थान आतां मध्यभारत संघांत सामील झालें आहे.

**रताळें**—[वर्ग-कॉनव्होल्व्हुलासी. इपोमिया पोटॅटोज. इं. स्वीट पोटॅटो]. एक कंद. याची लागवड हिंदुस्थानांत सर्वत्र होते. याच्या मुख्य जाती तांबडी व पांढरी या दोन. खरीप आणि रब्बी या दोन्ही हंगामांत रताळीं लावतात. उपवासाला भाजून, उकडून खातात. पाश्चात्य देशांत याची दारू करतात. गुजराथी रताळ्याला कोन म्हणतात. हा साधारण चौकोनी दिसतो. विंचू चावल्यास वेलाचा पाला वांटून किंवा सुकलेलें रताळें उगाळून दंशाच्या जागीं लावतात.

**रति**—मदनाची स्त्री. हिचा जन्म दक्षप्रजापतीपासून झाला. एक अप्सरा म्हणून हिचें पुराणांत नांव आहे. शंकरानें मदनाला जाळल्यानंतर तो कृष्णपत्नी रुक्मिणी हिच्या पोटीं आला. शंबरासुरानें या प्रद्युम्न नांवाच्या मुलाला पळविल्यावर त्याच्या घरीं रतीनें मायावती असें नांव घेऊन व राहून या मुलाचें म्हणजे आपल्या पतीचें लालनपालन केलें.

**रंतिदेव**—पुरुवंशांतील एक प्रसिद्ध राजा. यज्ञ, आतिथ्य आणि दानधर्म यांविषयीं याची मोठी कीर्ति होती. याच्या यज्ञांतील कातड्यांमधून निघालेली नदी चर्मण्वती होय. याचा दानधर्म तर रात्रंदिवस चाले.

**रत्नसिंह गुहिलोत** (१४ वें शतक प्रारंभ)—चितोडचा एक राजा. समरसिंहानंतर त्याच्या गादीवर आलेला त्याचा पुत्र. स्वरूपसुंदर म्हणून सुप्रसिद्ध असलेली व पावित्र्यरक्षणार्थ स्वतःचें अर्पीत बलिदान करणारी पद्मिनी ही याची स्त्री. (कांहीं ठिकाणीं पद्मिनी ही भीमसिंहाची स्त्री असल्याचें म्हटलें आहे. पद्मिनी पाहा.) हा गादीवर आल्यावर सहा महिन्यांतच अल्लाउद्दिन खिलजीची चितोडवर स्वारी झाली. यानें चितोडचा किल्ला सहा महिनेपर्यंत लढवला. परंतु पुढें किल्ल्यांतील अन्नधान्यसामुग्री संपुष्टांत आल्यानें, यास शत्रूस शरण जाणें भाग पडलें असतें. परंतु शेवटपर्यंत हा लढत राहिला व लढतां लढतांच मृत्युमुखीं पडला. हा मरण पावल्यावर पद्मिनी वगैरे कांहीं स्त्रियांनीं शीलरक्षणार्थ अग्नींत उड्या घेतल्या. चितोड जिंकल्यावर अल्लाउद्दिनानें चितोडच्या किल्ल्याचें नांव खिजराबाद असें ठेवलें.

**रत्नाकर**—एक कानडी जैन कवि. हा १६ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. याचें 'भरतेशवैभव' हें गेय काव्य मोठें हृदयंगम आहे.

**रत्नाकरपंत राजाज्ञा** (कारभार १७८३-१८१२)—कोल्हापूरकरांकडील एक मुत्सद्दी. कोल्हापूरकर छत्रपतींचा कारभारी येसाजी कुसाजी हा सन १७८३ मध्यें मरण पावल्यावर त्याच्या जागीं रत्नाकरपंत राजाज्ञा याची नेमणूक झाली. याच वेळीं यास 'राजाज्ञा' हें पद मिळालें. हा रायाजीपंताचा मुलगा तिसऱ्या शिवाजीच्या वेळीं उदयास आला. शिवाजीच्या मृत्यूपर्यंत म्हणजे १८१२ पर्यंत हा कोल्हापूरचा कारभारी होता. हा सातारा जिल्ह्यांतील वाळवें तालुक्यापैकीं ऐतवडें गांवचा असून याचें उपनांव सरवळे असें होतें. हा भारद्वाज गोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून निरिच्छपणाबद्दल व स्वामिनिष्ठेबद्दल याची ख्याति होती. छत्रपतींनीं देऊं केलेलीं इनामेंहि यानें घेण्याचें नाकारलें. अनेक अडचणींतून कोल्हापूरच्या राज्याचें यानें संरक्षण केलें. याचे वंशज अजूनहि कोल्हापुरांत वास्तव्य करून आहेत.

**रत्नाकर स्वामी**—एक मराठी संतकवि. आडनांव सदावर्ते. यानें मुसलमानांच्या पदरीं मोठ्या दर्जाची नोकरी करून मागाहून संन्यास घेतला. यानें अनेक ग्रंथ, पदें व अभंग केले आहेत. याचा 'दीपरत्नाकर' ग्रंथ प्रसिद्ध आहे. कांहीं ग्रंथ गुजराथी व व्रज भाषेंत आहेत.

**रत्नागिरी**--मुंबई, कोंकण भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,९९८ चौ. मै.. उत्तरेस जंजिरा व कुलाबा, पूर्वेस सातारा व कोल्हापूर, दक्षिणेस सांवतवाडी व गोवें हे प्रदेश, व पश्चिमेस अरबी समुद्र आहे. जिल्ह्यांत बंदरें पुष्कळ आहेत. पश्चिमेस सह्याद्रीची रांग गेली आहे व तींतून पलीकडे जाण्यास रस्ते ( घाट ) आहेत. जमीन खडकाळ आहे. मात्र नद्यांच्या कांठीं सुपीक जमिनी आहेत. नारळ व सोनताग यांची फार लागवड होते. साग, किंजळ, बांबू यांपासून बरेंच उत्पन्न येतें. सुपारी, आंबे, फणस, काजू यांचें पीक भरपूर आहे. दक्षिण भागांत तांदूळ होतो. कांहीं ठिकाणीं लुगडीं व घोंगड्या होतात. बाणकोट, हर्णै, देवगड, दाभोळ, संगमेश्वर, रत्नागिरी, राजापूर, मालवण व वेंगुर्लें हीं व्यापाराचीं व मोठीं ठिकाणें होत. विद्येविषयीं हा जिल्हा प्रसिद्ध आहे. देशावर जाऊन ज्यांनीं नांव काढलें अशीं बहुतेक घराणीं या जिल्ह्यांतलीं आहेत.

या जिल्ह्यांत बौद्धांचे प्राचीन अवशेष सांपडतात. अनेक हिंदु राजघराण्यांमध्यें चालुक्य हें सर्वांत प्रबळ होतें. १३१२ पासून मुसलमानी वर्चस्वाला जी सुरुवात झाली ती मराठ्यांची सत्ता येईपर्यंत टिकली. १७५६ त आंग्र्यांचा पराभव मराठे आणि इंग्रज या दोघांनीं मिळून केल्यानंतर कांहीं ठिकाणें इंग्रजांकडे गेलीं. या जिल्ह्यांत ३६५ लहानमोठे किल्ले आहेत. त्यांत मंडनगड फार प्राचीन आहे. बरेचसे किल्ले बाराव्या शतकांत भोज राजानें बांधले.

दापोली, खेड, चिपळूण, संगमेश्वर, रत्नागिरी, राजापूर, देवगड व मालवण असे आठ तालुके जिल्ह्यांत आहेत. मालवण, वेंगुर्लें, रत्नागिरी व चिपळूण हीं मोठीं शहरें आहेत. जिल्ह्याची लो. सं. ( १९४१ ) १३,७३,४६६ आहे.

रत्नागिरी शहर मुंबईपासून १३६ मैल दूर आहे. हें बंदर आहे. येथें एक दीपगृह व किल्ला आहे. एक कॉलेज, तीन हायस्कुलें, एक औद्योगिक शाळा व बऱ्याच मराठी शाळा आहेत. दोनतीन वर्तमानपत्रें निघतात. १८७६ सालीं नगरपालिका स्थापन झाली. लो. सं. सुमारें सतरा हजार.

किल्ला—रत्नागिरी बंदराच्या उत्तर बाजूस एका उंच डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. याची लांबी १३२७ यार्ड व रुंदी १००० यार्ड असून क्षेत्रफळ १२० एकर आहे. किल्ल्याच्या तीन बाजूंस समुद्र आहे. पायथ्यापासून उंची २०० ते ३०० फूट आहे. याचे बाहेरील व आंतील असे दोन भाग आहेत. या किल्ल्याची तटबंदी धोंडो भास्कर प्रतिनिधि यानें १७९० च्या सुमारास बांधली. बालेकिल्ला अलग असून क्षेत्रफळ ६॥ एकर आहे. किल्ल्यांत भगवतीचें देवालय आहे. पायथ्याशीं नैर्ऋत्य व वायव्य कोपऱ्यांत कांहीं बोगदे आहेत. त्यांतून वर जातां येतें असें सांगतात. १६७० त शिवाजीनें हा जिंकून घेतला. ज्यावर दीपगृह आहे त्या बुरुजास सिद्ध बुरूज म्हणतात. बालेकिल्ल्याची विशेष मजबुती आंग्र्यांनीं केली असें सांगतात.

**रत्नें**—रत्नें अथवा मूल्यवान् खडे यांचे बहुधा नियमित आकारांचे स्फटिक असून त्यांस स्वाभाविकपणें तकाकी असते. परंतु त्यांचा नैसर्गिक आकार अनियमित असून त्यांवर खरचरीत आस्तर असतें. रत्न ही संज्ञा सामान्यतः ज्या खड्यास पैल पाडून तकाकी आणलेली असते किंवा ज्यामध्यें कोरीव काम केलेलें असतें अशा खड्यासच लावतात. रत्नामध्यें मोत्यें, आणि इतरहि कांहीं वस्तूंचा समावेश होतो. रत्नांतील प्रमुख व अत्यंत मौल्यवान् रत्न म्हटलें म्हणजे हिरा हें होय. त्यानंतर पाच, माणिक, इंद्रनील मणि, वगैरे येतात. हीं सामान्यतः पहिल्या वर्गांत मोडतात. यानंतर याकूत, पुष्कराज, लालडी अथवा चुनडी, वगैरे दुय्यम प्रतीचीं रत्नें मानण्यांत येतात. तथापि त्यांचा उपयोग अलंकारांत पुष्कळच करण्यांत येतो. पण त्यांस अव्वल दर्जाचीं रत्नें मानण्यांत येत नाहीं. या रत्नांचें वर्णन त्या त्या शब्दाखालीं केलेलें आहे.

अलीकडे कृत्रिम रीतीनें रत्नें बनविण्याचा उद्योग फार वाढीस लागला आहे. अशीं कृत्रिम रत्नें बनविण्याकरितां सिकता, पालाश, सीसप्राणिद, टांकणखार ( सिलिका, पोटॅश, ऑक्साइड ऑफ लेड, बोरॅक्स ), वगैरेंच्या संयोगापासून बनविलेलें एक संयुक्त ( लुकण ) द्रव्य वापरतात. यास याच्या संशोधकावरून ( जोसेफ स्ट्रास ) स्ट्रास असेंहि म्हणतात. हें द्रव्य साध्या कांचेपेक्षां निराळें असतें, याचें कारण त्यांत ५० टक्के सीसप्राणिद असतें व तें सीस व पालाश यांचें भारसिकतित ( लेड व पोटॅशियम यांचें बोरोसिलिकेट ) असतें. जेव्हां हें मूलद्रव्य ( स्ट्रास ) शुद्ध स्थितींत तयार करण्यांत येतें तेव्हां त्यांत एखादें धातुयुक्त द्रव्य, बहुधा प्राणिद ( भस्म ) मिसळण्यांत येतें. त्यामुळें त्यास निरनिराळे रंग येतात. दुसरा एक कृत्रिम रत्नें तयार करण्याचा प्रकार म्हणजे स्ट्रासच्या खड्यावर एखाद्या लुकणाच्या साहाय्यानें रत्नाचा पातळ तुकडा चिकटविणें हा होय. बेक्केरेल, एबेलमन, गौडिन, डेस्प्रेट्झ, इत्यादि फ्रेंच रसायनशास्त्रज्ञांनीं खऱ्या रत्नांसारखीं कृत्रिम रत्नें बनविण्याच्या कामीं बरेंच कार्य केलें आहे.

सन १८५८ मध्यें डेव्हिले आणि कॅरॉं यांनीं पॅरिस शहरांतील शास्त्रविद्यापीठास माणिकें व नीलमणी कृत्रिम रीतीनें बनविण्याची पद्धति लिहून कळविली. कर्बोज्जितांस अतिशय उष्णता व दाब देऊन लहान लहान आकारांचे कृत्रिम हिरे बनविण्यांत आले आहेत. ज्या रत्नांवर उठावदार पद्धतीनें एखादी आकृति कोरून काढलेली असते, त्यांस कॅमिओ

म्हणतात. रत्नांमध्यें आंत कोरीव आकृति असते त्यास इंतागिलओ म्हणतात. रत्नांवरील कोरीव काम करण्याच्या कलेची वाढ पंधराव्या शतकापासून होऊं लागल्याचें दृष्टीस पडतें. हें काम बहुतेक इटली व जर्मनी यांमध्यें होतें. मुद्रा (सील) करण्याचें मुख्य केन्द्र हल्लीं रोम शहर बनलें आहे.

रत्नें हिंदुस्थानांत वेदकालांतहि परिचित होतीं. पुराणांतून अलंकारांत किती तरी रत्नें आढळतात व त्यांचा वापर फार दिसतो. पाश्चात्यांत रत्नांची माहिती इकडूनच झाली असावी. फिनीशियन व्यापारी ईजिप्त व ग्रीस देशांस रत्नें पुरवीत. लंका, ब्रह्मदेश, हिमालय, अफगाणिस्तान, वगैरे ठिकाणांहून हिंदुस्थानांत रत्नें येत. हिंदुस्थानांतील हिऱ्यांच्या खाणी प्रसिद्ध होत्या.

हिरा, मोती, प्रवाळ, गोमेद, इंद्रनील, वैडूर्य, पुष्कराग, पाच व माणिक हीं नऊ महारत्नें होत; व वैक्रांत (तोरमल्ली), सूर्यकांत, चंद्रकांत, राजावर्त, लाल व पेरोज हे मणी उपरत्नें होत. कांहीं मोतीं, प्रवाळ यांसारखीं रत्नें औषधीहि आहेत.

रत्न हें फार कठिण असतें व तें तसें असणें अवश्य आहे. कारण त्याचा अलंकार घडतांना तें ठोकणें, कापणें, वगैरे क्रिया करणें अवश्य असतें. हिरा हा सर्वांत कठिण व मौल्यवान् असतो. ज्या रत्नांचें विशिष्टगुरुत्व अधिक तें अधिक उच्च समजण्यांत येतें. झिर्कन याचें विशिष्टगुरुत्व ४·७ असतें व स्फटिकाचें फक्त २·२ असतें. रत्नाची रंगावरहि किंमत असते व कांहीं रत्नांस एकाहून अधिक रंग असतात. रत्नांचे पैलू पाडल्यास त्यांचें तेज वाढतें; कारण तेज हें त्याच्या अंगच्या प्रकाशवक्रीभवनाच्या गुणावर अवलंबून असतें. रत्नांचे रासायनिक गुणधर्महि निरनिराळे असतात. हिरा हा कर्ब या मूलद्रव्याचा बनलेला असतो. लाल, नीलमणि व स्फटिक हीं प्राणिदें आहेत. पुष्कराग व लसण्या हीं स्फटिकें आहेत; व वैडूर्य आणि गोमेद हीं स्फुरितें आहेत. कांहीं रत्नें सिकितें असतात.

रत्नें खोदून त्यांवर नक्षीकाम करण्याची कला फार प्राचीन असून मिसरी आणि बाबिलोनियन काळापासून खोदलेलीं रत्नें आढळतात. यानंतर ईजियन, ग्रीक, रोमन, वगैरे सर्व कालांत ही कला वाढीस लागलेली दिसते. जगांतील कांहीं उत्तम उत्तम रत्नें आज निरनिराळ्या देशांत प्रसिद्ध असून कांहीं राजघराण्यांत, तर कांहीं पदार्थसंग्रहालयांत ठेवलेलीं आहेत. कांहीं रत्नांचा फार मोठा व मनोरंजक इतिहास आहे.

**रथ**—वेदकालांत रथाला बहुतकरून दोन चाकें असत व त्याविषयीं उल्लेख वारंवार आलेला आहे. नेहमींची पद्धत म्हणजे साधारणपणें रथास दोन घोडे असत. पण कधीं कधीं तीन किंवा चारहि असत. पांच घोड्यांचासुद्धां उपयोग करीत. रथांना बहुतेक घोडे जुंपीत; तरी पण गाढवांचा आणि खेचरांचा उपयोग केलेलाहि आढळतो. गाड्या ओढण्यास बैलांचा उपयोग करीत व म्हणूनच अनड्वाह हा शब्द प्रचारांत आला. कधीं गरीब लोकांना एका घोड्यावरच संतुष्ट राहावें लागे. अशा वेळीं घोड्याच्या दोन्हीकडे दोन दोन दांड्या असलेल्या जुवाचा उपयोग करीत (ऋ. १०·१०१,११; १३१,३). आपस्तंबाच्या शुल्ब सूत्रांमध्यें रथाची लांबीरुंदी दिली आहे ती अशीः—रथाचा दांडा १८८ अंगुळें, कणा १०४ अंगुळें व जूं ८६ अंगुळें. धांवेशिवाय बाकी चहूंकडे लांकडाचा उपयोग करीत.

पौराणिक काळांत रथ हें प्रवासाचें वाहन व युद्धोपयोगी साधन म्हणून फार प्रचारात असे. कोठल्याहि पुराणग्रंथांतून याचे उल्लेख येतात.

भारतांतील आर्यांप्रमाणेंच ईजिप्त, असुरिया, ग्रीस, रोम यांमधील लोकहि रथांतून युद्ध करीत. रथांचीं वर्णनें निरनिराळ्या प्रकारचीं आढळतात. हिंदी रथ दोन चाकांचा असून तो उघडा असावा. ईजिप्तमधील रथांचीं जीं चित्रें खोदलेलीं आढळतात त्यांवरून त्यांस दोन चाकें असून आंत सारथी व योद्धा असून केव्हां केव्हां ढाल धरणारा एक तिसरा इसम आढळतो. असुरी रथांचींहि चित्रें खोदलेलीं आढळतात व हीं ईजिप्तमधील रथासारखींच दिसतात. युद्धांतील रथांच्या आंसाच्या दोन्ही टोकांस विळ्यासारखीं शस्त्रें जोडलेलीं असत. हा प्रकार इराणी व ब्रिटन लोकांच्या रथांत दिसतो. ग्रीक व रोमन लोकांत रथांच्या शर्यतीहि होत असत. आपल्याकडे वाजपेय यज्ञामध्यें सतरा रथांच्या शर्यतीचा एक विधि आहे.

**रद्द करणें**—(रिव्होकेशन). ब्रिटिश कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखादा दस्तऐवज किंवा मृत्युपत्र फाडून टाकणें, किंवा त्यावर रद्द केल्याचा शेरा मारणें. सामान्यतः दस्तऐवजांत रद्द करण्याची शर्त लिहिलेली असेल तरच तो दस्तऐवज रद्द करतां येतो. मृत्युपत्र पुढील चार निरनिराळ्या मार्गांनीं रद्द करतां येतें: १. मूळच्या मृत्युपत्राला पुरवणी मृत्युपत्र लिहून मुळचें रद्द करणें, किंवा दुसरें मृत्युपत्र लिहून पहिलें रद्द करणें. २. मृत्युपत्र हेतुपूर्वक जाळून टाकणें किंवा इतर रीतीनें नष्ट करणें. ३. मृत्युपत्रांत लिहिलेल्या मिळकतीची आपल्या हयातींतच इतर रीतीनें विल्हेवाट लावणें. ४. विवाह करणें. स्कॉटलंडमध्यें मृत्युपत्र करून ठेवणाराला मूल झालें असतां त्याचें मृत्युपत्र रद्द होतें.

हिंदुस्थानांत 'सक्सेशन ॲक्ट' मध्यें अशा प्रकारचें कलम 'विल' रद्द करण्याबद्दलचें आहे (कलम ७०). इतर दस्तऐवज रद्द करण्यासंबंधींचा कायदा 'स्पेसिफिक रिलीफ ॲक्ट' मध्यें आहे (कलम ३९).

**रंधा**—कोणत्याहि पदार्थाचा पृष्ठभाग तासून काढावयाचा असल्यास हें यंत्र वापरतात. पदार्थ मोठा असल्यास मोठ्या यंत्रावर काम करून घेतात. त्यामध्यें पदार्थ मागेंपुढें होत असून हत्यार स्थिर असतें. पदार्थ लहान असल्यास 'शेपिंग मशिन' वापरतात. त्यामध्यें पदार्थ स्थिर असून हत्यार मागेंपुढें होत असतें.

**रन्न** (सु. ९४९–१०००)—एक कानडी जैन कवि. याचा जन्म बंगडकासार जातींत बेळगुरी भागांतील मृदु वोळल (मुधोळ) या गांवीं झाला. बापाचें नांव जिनवल्लभेंद्र व आईचें अब्बलब्बे होतें. यास पुढें चामुंडरायाचा आश्रय मिळाला. सन ९९७–१००९ पर्यंत हा तैलप सत्याश्रयाच्या पदरीं होता. कविचक्रवर्ती ही पदवी यास दुसऱ्या तैलप (पश्चिम) चालुक्यानें दिली. 'सांहसभीमविजय' या आपल्या चंपूरूप ग्रंथांत यानें, भीमानें दुर्योधनाशीं केलेल्या गदायुद्धाचें वर्णन केलें आहे. याच ग्रंथावरून यास गंगसेनापति चामुंडराय याचा आश्रय लाभला असावा असें दिसतें व चामुंडराय यास उद्देशूनच यानें 'चक्रेश्वरचरित' हा काव्यग्रंथ लिहिला असावा. वरील दोन ग्रंथांशिवाय यानें अजितपुराण, रन्नकंद (कोश) व परशुरामचरित हे ग्रंथ लिहिले. वीररसाबद्दल या कवीची ख्याति आहे.

**रफ**—सॅडपायपरची ही एक जात असून या पक्ष्याची लांबी दहाबारा इंच असते. रंग वेगवेगळे असतात. साधारणपणें तपकिरी रंग अंगाचा असून पंख आणि पोट मात्र पांढरें असतें. प्रजननकालांत नराला गळ्याशीं लांब पिसें फुटतात व तीं गळसरी–झालरी(रफ)प्रमाणें दिसतात. याच हंगामांत नराला दुसऱ्याबरोबर भांडण्यास चेव येत असतो. लांडोरीप्रमाणें याच्या मादीचा रंग साधाच असून तिला कांहीं अंगसौष्ठवहि नसतें.

**रंफोर्ड, बेंजामिन थॉमसन** (१७५३–१८१४)— एक अमेरिकन शास्त्रज्ञ. बव्हेरियाचा युद्धमंत्री असतांना यानें उष्णतेचे प्रयोग करून पाहिले व असें सिद्ध केलें कीं, उष्णता हें जडद्रव्य नाहीं.

**रबडी**—एक गुराखी जात. हिंदुस्थानांत सुमारें ३ लाख वस्ती आहे. सर्वांत जास्त मुंबई इलाखा व राजपुताना यांत आहे. बहुतेक गुजराथच्या बाजूस हे आढळतात. यांची कुलदेवता जोधपूर संस्थानांत सिकोत्रा येथे आहे. तथापि इतर अनेक देवांचीहि पूजा करतात. यांचे उपाध्ये औदीच, सोमपुरे व राजगोंड ब्राह्मण असतात.

**रबर**—उष्ण प्रदेशांतील अनेक निरनिराळ्या प्रकारच्या झाडांपासून जो दुधासारखा चीक निघतो त्यापासून रबर तयार होतें. हें अनेक झाडांपासून मिळत असलें तरी जगांतील रबरापैकीं नऊ-दशांश रबर ॲमेझॉन नदीच्या तीरावरील झाडांपासून किंवा त्यांपासून इतर लागवड केलेल्या मळ्यांतून 'हेव्हिआ ब्रॅसिलिएन्सिस' नांवाच्या झाडांपासून मिळतें. मलाया, सीलोन, इंडोनेशिया व इतर कांहीं देश यांतून आज पुष्कळ रबर तयार होतें. रासायनिक दृष्ट्या पाहतां रबर हें राळ, उज्जकर्बें, पाणी व इतर पदार्थ यांचें मिश्रण आहे असें दिसेल. झाडाच्या सालींत खांचा पाडून भांड्यांतून चीक जमा करतात. गंधकीकरण (व्हल्कनायझेशन) क्रियेनें रबरांत लवचिकपणा व बळकटी आणतात. रबराचे औद्योगिक क्षेत्रांत अनेक उपयोग आहेत. गाडीच्या धांवा (टायर्स) व इतर कित्येक गोष्टी यांना रबर इतकें लागतें कीं, जगांतील रबर तयार होणाऱ्या सर्व देशांतून मोठ्या प्रमाणावर याची निर्मिति चालू आहे.

जगांतील रबराचें उत्पादन—१९४० सालीं १३,९०,६६१ टन रबराचें उत्पादन झालें. त्यापैकीं १३,५३,०५२ टन आशिया खंडांतून (हिंदुस्थान, सीलोन, मलाया, व इंडोनेशिया), १७,६६१ ॲमेझॉन खोऱ्यांतून, ३,६३४ मेक्सिकोंतून व १६,३१४ आफ्रिकेंतून मिळालें. दुसऱ्या महायुद्धाच्या सुरुवातीस जगांतील निम्में रबर एकटी अमेरिका (संयुक्त संस्थानें) खपवीत असे.

कृत्रिम रबर—१९४२ सालीं जेव्हां जपाननें मलाया आणि इंडोनेशिया जिंकून घेतलें तेव्हां अमेरिकेचें सुमारें ९०% रबर तुटलें; तेव्हां अमेरिकन शास्त्रज्ञांनीं कृत्रिम रबर तयार करण्यास सुरुवात केली. या कृत्रिम रबराला ब्यूना-एस् म्हणतात. हें रबर ब्यूटाडिएन पेट्रोल आणि धान्यमद्यार्क यांपासून तयार करतात. १९४४ सालीं सुमारें ७ लाख टन कृत्रिम रबर तयार केलें गेलें.

**रबाब**—हें मुसलमानी वाद्य आहे. ह्याचें बूड लांकडाचा गोल ओंडा कोरून केलेलें असतें. तें उथळ असून कातड्यानें मढवितात. हें वाद्य कांहींसें कच्छव्याच्या आकाराचें असून यास पाटीच्या ऐवजीं कातड्यानें मढविलेला चपटा लांकडी भोंपळा लाविलेला असतो. ह्याला सतारीप्रमाणें पडदे नसतात. ह्याला मुख्य चार तारा असतात. त्यांपैकीं एक पितळेची असते. या चार तारांपैकीं दोन तांती असतात. हें वाद्य गजानें वाजवितात. उत्तर हिंदुस्थानांतील रामपूर संस्थानांत हें वाद्य वाजविणारे कांहीं निपुण वादक आहेत. प्रसिद्ध मिया तानसेन हा हें वाद्य वाजावीत असे. हें वाद्य मोठें डौलदार असतें व ह्याचा आवाज मधुर असून सारंगीपेक्षां गंभीर आहे. ह्याला पडदे नसल्यानें जी कामगत सतारींत होत नाहीं ती यांत फार झोकांत झालेली दृष्टीस पडते.

**रबेले, फ्रान्स्वा** (१४९०–१५५३)—एक फ्रेंच विनोदी लेखक. तो प्रथम फ्रॅन्सिस्कन धर्मपंथांत सामील झाला व उपाध्यायाचें काम करूं लागला. नंतर त्यानें वैद्यकीचा अभ्यास

केला. त्याचे गार्गोन्त्वा आणि पान्ताग्रुएल हे दोन ग्रंथ मिळून वास्तविक एकच ग्रंथ आहे व त्यांत एका राक्षसाची व त्याच्या मुलाची कृत्यें व भाषणें दिलीं आहेत. या पुस्तकाचे चार भाग १५३२ ते १५५२ पर्यंत क्रमाक्रमानें प्रसिद्ध झाले व पांचवा भाग त्याच्या मरणोत्तर प्रसिद्ध झाला. हा विनोदी ग्रंथ लिहिण्यांत रचेलाचा उद्देश, तत्कालीन अनेक धार्मिक, नैतिक व सामाजिक अनिष्ट चालींची सुधारणा व्हावी, हा होता.

**रंभा**—एक अप्सरा. हिची सौंदर्याविषयीं फार ख्याति होती व इंद्रानें विश्वामित्राचा तपोभंग करण्यासाठीं हिला पाठविलें होतें; पण विश्वामित्र चलित झाला नाहीं. त्यानें शाप दिल्यावरून ही हजारों वर्षें पाषाण होऊन राहिली होती. अप्सरा पाहा.

**रमझान**—मुसलमानी महिन्यांतील हा नववा महिना आहे. या महिन्यांत रोज सकाळपासून संध्याकाळपर्यंत मुसलमान कडकडीत उपवास करतात; नमाज पढतात व कुराण वाचतात. या महिन्यांत २१ व्या किंवा २२ व्या तिथीला अली मारला गेला म्हणून शियापंथी रस्त्यांतून हाय! हाय! करीत फिरतात व त्याचे ताबूत मिरवितात. रमझानच्या शेवटच्या दहा दिवसांत कुराण अवतीर्ण झालें म्हणून त्या रात्री जागून काढतात.

**रमल**—होरास्कंधांत रमल अथवा पाशकविद्या म्हणजे फांसे टाकून त्याप्रमाणें प्रश्नाचें उत्तर सांगण्याची प्रश्नविद्या हा एक भाग असून यावर संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहेत. ह्यांतील परिभाषा अरबी आहे. रमलचिंतामणि नांवाचा ७०० श्लोकांचा ग्रंथ चिंतामणिकृत (शक १६०० पूर्वीचा) आहे. रमलामृत नांवाचा जयरामकृत ८०० श्लोकांचा दुसरा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. शिवाय स्वप्न व पल्लीपतन हीं संहिता किंवा होरा या दोहोंची अंगें असून त्यांवरहि कांहीं स्वतंत्र ग्रंथरचना आढळते.

**रमावल्लभदास** (जन्म सुमारें शक १५१०)—एक मराठी कवि. यांचें पहिलें नांव तुकोपंत. दौलताबादच्या अंबाजीपंत ऊर्फ ममाजीपंत राळेरासकराचा हा पुत्र. पुढें यास विरक्ति आल्यानें यानें लक्ष्मीदासापासून अनुग्रह घेतला. तेव्हांपासून यास रमावल्लभदास हें नांव प्राप्त झालें. यानें दशकनिर्धार हा ग्रंथ, श्रीकृष्णजयंतीव्रतकथा, कांहीं अभंग व पदें लिहिलीं आहेत. तसेंच शंकराचार्यांच्या वृहद्वाक्यवृत्तीवरील याची 'वाक्यवृत्ति' व गीतेवरील यानें लिहिलेली 'चमत्कारी' नांवाची टीका प्रसिद्ध आहे. याचा संप्रदाय गोमांतकांत झालेला दिसून येतो. कारवार जिल्ह्यांतील चंदावर येथें याचा मठ व परंपरा चालू आहे. लक्ष्मीदास, कृष्णदास व कान्हायी हे याचे तीन प्रसिद्ध शिष्य व आवडाबाई उभयकर ही शिष्या. या आवडाबाईवरूनच नांव पडलेला 'आवडी मठ' कारवार जिल्ह्यांतील मल्लापूर गांवीं आहे. या मठांतून कृष्णजयंती-उत्सव फार मोठा होत असतो.



**रॅम्से, सर अँन्ड्र्यू क्रॉंबी** (१८१४–१८९१)—एक स्कॉटिश भूगर्भशास्त्रज्ञ. तो जिऑलॉजिकल सर्व्हेचा डायरेक्टर–जनरल आणि प्रॅक्टिकल जिऑलॉजीच्या म्यूझियमचा डायरेक्टर–जनरल १८७२ ते १८८१ पर्यंत होता. त्यानें ग्रंथ लिहिले ते :— 'ब्रिटनचा भूगोल आणि प्राकृतिक भूशास्त्र', 'आरनचें भूशास्त्र', इ. होत.

**रॅम्से, सर विल्यम** (१८५२–१९१६)—एक ब्रिटिश रसायनशास्त्रज्ञ. १८९४ सालीं त्यानें व लॉर्ड रेले यानें मिळून अर्गन या हवेंतील मूलद्रव्याचा शोध लावला. नंतर रॅम्से व ट्रॅव्हर्स यांनीं मिळून निऑन, क्रिप्टॉन आणि क्सेनॉन या मूलद्रव्यांचा शोध १८९८ सालीं लावला. कांहीं धातूंत 'हेलिअम' नांवाचा जो घटक असतो त्याचा यानें शोध लावून त्याचें विवरण केलें. १९०४ सालीं रसायनशास्त्र विषयाचें 'नोबेल' पारितोषिक याला मिळालें.

**रॅले, सर वाल्टर** (१५५२–१६१८)—एक इंग्रज मुत्सद्दी, योद्धा, नौकानयनज्ञ व लेखक. आयर्लंडमधील बंड मोडण्यांत यानें हुषारी दाखविली (१५८०–८१), त्यामुळें लवकर पुढें आला. एलिझाबेथ राणीच्या दरबारांत हा चमकला; पण कांहीं अनाचारांमुळें याला कैद झाली. नंतर बंधमुक्त होऊन त्यानें व्हर्जिनियाची वसाहत करण्याचे प्रयत्न केले, पण ते फसले. स्पॅनिश आरमारी युद्धांत त्यानें पराक्रम गाजविला व पुन्हां सोन्याच्या खाणी शोधण्यास जलपर्यटणें आरंभिलीं. पहिल्या जेम्स राजाचें मन याविषयीं फार कलुषित झालें होतें व राज्यद्रोहाच्या आरोपावरून याला फांशीची शिक्षाहि फर्मावण्यांत आली; पण फांशीं न जातां तो १२ वर्षें लंडन टॉवरमध्यें बंदिवासांत लेखन करीत राहिला. सोन्याची खाण दाखवितों असें सांगून यानें सुटका करून घेतली, पण ती न सांपडल्यामुळें पूर्वीच्या राज्यद्रोहाच्या आरोपावरून हा शेवटीं फांशीं गेला. यानें लिहिलेला जगाचा इतिहास हा तत्कालीन इंग्रजीचा उत्कृष्ट नमुना आहे.

**रवंथ करणारे प्राणी**—हा एक सखुर, सस्तन व वनस्पत्याहारी प्राण्यांचा वर्ग आहे. यामध्यें साधारणतः पांच जाती आढळतातः १. कॅमेलिडी–यांत उंट, लामा हे येतात. २. ट्रॅग्यूलिडी-यांत शेव्हरोटेनसारखे प्राणी येतात. ३. सर्व्हिडी-यांत हरिणवर्ग मोडतो. ४. कॅमेलो पार्डालिडी–यांत जिराफ, ओकापी हे प्राणी येतात. ५. बोव्हिडी अथवा कॅव्हिकॉर्निया-यामध्यें बैल, मेंढ्या, बकऱ्या, काळवीट, वगैरे प्राणी येतात. हे सर्व प्राणी रवंथ करणारे म्हणजे एकदां खाल्लेलें अन्न पुन्हां चघळून खाणारे

असल्यामुळें त्यांचा स्वतंत्र वर्ग मानण्यांत येतो. या प्राण्यांची दांतांची रचनाहि इतर प्राण्यांपेक्षां निराळी असते. यांच्या पायांच्या खुरांस भेगा असतात. बहुतेकांस शिंगांच्या जोड्या असतात. यांच्या उदराचे चार भाग असतात व त्यांस चार उदरें किंवा पक्वाशय म्हणतात. पहिल्या भागांत प्रथम चारा गिळल्याबरोबर आंत येतो व तो नंतर दुसऱ्या भागांत जातो. तेथून तो पुन्हां तोंडांत चघळण्याकरितां आणण्यांत येतो त्यास रवंथ करणें असें म्हणतात. यानंतर पुन्हां गिळलेला चारा तिसऱ्या भागांत येऊन अखेरीस चौथ्या पाचक विभागांत जातो. द्रवपदार्थ पोटाच्या कोणत्याहि एका भागांत सरळ जाऊं शकतात.

**रविवर्मा** (१८४८–१९०६)—एक हिंदी चित्रकार.

हे त्रावणकोरच्या राजघराण्यांतील होते. लहानपणापासून यांना चित्रें काढण्याचा नाद लागला. पुढें ते सरकारी मदतीनें उत्कृष्ट तैलचित्रें काढूं लागले व या कलेंत त्यांनीं प्रावीण्य मिळविलें. बडोदें, म्हैसूर, इ. संस्थानिकांच्या राजवाड्यांतून त्यांनीं चित्रें काढून ठेवलेलीं अद्यापि पाहण्यास मिळतात. त्यांनीं आपल्या चित्रांसाठीं एक छापखानाहि कार्ल्याजवळ काढला होता.

लक्ष्मी, सरस्वती, शकुंतला-जन्म, शकुंतला-पत्रलेखन, कृष्णशिष्टाई, वगैरे त्यांचीं चित्रें प्रसिद्ध व लोकप्रिय आहेत.

**रॅव्हेना**—इटली, एक महत्त्वाचें शहर. देवस्थान, डान्टेचें थडगें, नगरसभागृह व कांहीं कबरी हीं शिल्पदृष्ट्या प्रेक्षणीय आहेत. बंदर कालव्यानें अॅड्रियाटिक समुद्राला जोडलें आहे. कारखाने महत्त्वाचे नाहींत. रोमनकाळापासून रॅव्हेनाचें नांव ऐकूं येतें. लो. सं. सुमारें पाऊण लाख.

**रशिया**—आशिया–युरोपमधील प्रख्यात सोव्हिएट प्रजासत्ताक राष्ट्र. पूर्वीची राजधानी पेट्रोग्रॅड पण हल्लींची राजधानी मॉस्को आहे. क्षेत्रफळ ८८,१९,७९१ चौरस मैल. लो. सं. १९,२६,९५,७१०. रशियांतील लहान लहान राज्यांचा मिळून 'युनियन ऑफ् सोशॅलिस्ट रिपब्लिक' या नांवाचा एक संघ केला आहे. रशियन सोशॅलिस्ट फेडरेटेड सोव्हिएट रिपब्लिक हें एक त्याच संघांतलें राष्ट्र आहे. आर्क्टिक महासागरापासून कॉकेशस पर्वतापर्यंत आणि पोलंडपासून उरल पर्वतापर्यंत असा युरोपमधल्या रशियाचा विस्तार आहे. आशियायी रशियांत सायबेरियाचा अफाट विस्तीर्ण प्रदेश मोडतो. तो पूर्वेस पॅसिफिक (प्रशांत) महासागरापर्यंत पसरला असून कास्पिअन समुद्र व आशिया मायनर पावेतोंहि आला आहे. युरोपांतील भागांत व्होल्गा, उरल, डॉन व नीपर या प्रमुख नद्या आहेत व आशियांत ओब, येन्सी व लेना या नद्या आर्क्टिक महासागराला मिळतात. लागोडा, ओनेगा, बैकल व बल्खश हीं मोठीं सरोवरें आहेत. रशियन शेती सामुदायिक स्वरूपाची असून सोव्हिएट राज्यप्रस्थापनेपासून औद्योगीकरणांत क्रांतिकारक वाढ झाली आहे. ख्रिस्ती शतकापूर्वी या प्रदेशांत सिथियन व सारमाथियन लोक होते. काळया समुद्राच्या उत्तरेस ग्रीक वसाहती होत्या. स्लाव्ह व स्कॅंडिनेव्हियन यांच्या हल्ल्यांनंतर मोंगोलांचा हल्ला झाला. नंतर इव्हान राजे आले. १५४७ मध्यें त्या वेळचा राजा इव्हान यानें प्रथम झार हा किताब घेतला.

मागाहून बरेच झार राजे झाले. त्यांत पीटर हा मोठा हुशार व कार्यकर्ता होता. त्यानें सेंट पीटर्सबर्ग येथें राजधानी वसवली आणि राष्ट्रामध्यें नवकल्पनांचा प्रसार केला. मागाहून झालेल्या सम्राटांच्या अमदानींत युरोपमध्यें व आशियामध्यें रशियानें आपले हातपाय चांगलेच पसरले. नेपोलिअनच्या वेळींच 'एक मोठी व प्रचंड सत्ता' असें स्वरूप रशियाला प्राप्त झालें होतें. १८६७ सालीं अलास्का अमेरिकेला विकलें. १९०४ सालीं चिमुकल्या जपाननें रशियाचा पराभव केल्याचा चमत्कार दाखविला. देशांतील नेहमींच्या बंडाळया व अराजकता यांजपासून अतोनात त्रास होत असूनहि इ. स. १९१७ पर्यंत झारशाही टिकाव धरून राहिली होती. १९१४–१८ च्या जागतिक महायुद्धानें निर्माण झालेल्या हलाखीमुळें देशांतील आधींचीच असंतुष्टता विकोपास गेली. झार निकोलस याला गादी सोडावी लागली. तो व त्याचें कुटुंब यांना गोळया घालून ठार मारण्यांत आलें. व १९१७ च्या मार्च महिन्यांत समाजसत्तावादी लोकसत्ताक सरकारची स्थापना झाली. पुढें त्याचें बोल्शेव्हिक अगर सोव्हिएट सरकारांत रूपांतर झालें. लेनिन व ट्रॉट्स्की हे त्या वेळचे सूत्रधार होते.

लेनिन हा १९२४ सालीं वारल्यावर स्टॅलिन हा त्याच्या जागीं आला व तोच आज रशियाचा सर्वसत्ताधीश आहे. पण त्यानें राष्ट्राच्या ऊर्जितावस्थेसाठीं पंचवार्षिक योजना आंखून त्या अमलांत आणल्या. लवकरच राष्ट्र इतकें बलवान् केलें कीं, दुसऱ्या महायुद्धांत त्यानें जर्मनीशीं टक्कर देऊन त्याला शेवटीं नामोहरम केलें. नंतर युरोपचा पूर्व भाग बहुतेक आपल्या वर्चस्वाखालीं ठेवला. (युरोप पाहा.) जगांत कम्यूनिझमचा प्रसार व्हावा यासाठीं त्याचे मोठे प्रयत्न चालू आहेत. मोठें

चीन राष्ट्र हें या तत्त्वाच्या आहारीं गेलेंच. आतां कोरिया, इंडोचीन, वगैरे त्याच मार्गावर आहेत.

सर्व पश्चिम युरोपांतील राष्ट्रांना व खुद्द अमेरिकेला रशियाची मोठी भीति वाटत आहे. 'युनो' या संयुक्त राष्ट्रसंघाला न जुमानतां रशिया स्वतंत्र वृत्तीनें व बाणेदारपणानें वागत आहे. युरोपांतील पन्नास वर्षांपूर्वीचा हा दुबळा व अराजक देश आज जगाला भारी होऊन बसला आहे.

आज रशियांत प्रत्येक जातीचें फळ, धान्य व वनस्पति होत आहे. कापड, यंत्रें, लोखंड व पोलाद, दारूगोळा व युद्ध-साहित्य, कागद, सेल्युलोज, रबर, रासायनिक द्रव्यें, वगैरे तयार करण्याचे मोठमोठे कारखाने चालले आहेत. मच्छीमारी हा धंदा फारच मोठ्या प्रमाणावर चालतो. नौकाबंधनासाठीं गोद्या आहेत. कोळसा, अशुद्ध लोखंड, पेट्रोलियम, तांबें, सोनें, रुपें, मँगॅनीज, जस्त, कथील, गंधक, वगैरे खनिजें खाणींतून निघतात. या सर्व धंद्यांची मालकी सरकारची आहे.

रशियांत धार्मिक स्वातंत्र्य आहे. त्यामुळें अनेक धर्मांचे व पंथांचे लोक आपआपलीं देवळें व उपाध्याय ठेवून आहेत. ८००० वर देवळें व ६०,००० वर उपाध्याय आज रशियांत आढळतील. शिक्षण सक्तीचें आहे. सहशिक्षण १९४३ पावेतों होतें; पण त्यानंतर खेड्यांतून मुलांची व मुलींची शिक्षणाची वेगवेगळी व्यवस्था करण्यांत आली. एक चार वर्षांचा, एक सात वर्षांचा व एक दहा वर्षांचा असे शिक्षणसंस्थांचे तीन प्रकार आहेत. १९३६ त रशियांत १,६४,०८१ प्राथमिक शाळा, १,७९७ गिरणीशाळा, २,५७२ यांत्रिक शाळा, ७१६ कामगार-शाळा व ७०० विद्यापीठें आणि महाविद्यालयें होतीं. १९४५ त विद्यापीठें आणि कॉलेजें (बहुधा कलाविषयक) ७७२ होतीं व ५,६४,००० विद्यार्थी त्यांतून शिकत होते. मॉस्को, लेनिनग्राड, खारकोव्ह, ओडेसा, डॉरपट, कझान, वगैरे सोळा शहरीं विद्यापीठें आहेत. १९३९ सालीं ७०,००० सार्वजनिक वाचनालयें होतीं. १९४० सालीं ७० वेगवेगळ्या भाषांत निघणारीं ९,००० वृत्तपत्रें होतीं. त्याच सालीं १११ भाषांतून ४४,००० पुस्तकें प्रसिद्ध झालीं. नाट्यगृहें ८२५ व सिनेमा २८,००० होते.

रशियन वाङ्मय— रशियन वाङ्मयाचे दोन प्रकार आहेत. हे दोन प्रकार म्हणजे एक तोंडी व दुसरा लेखी. तोंडी वाङ्मयामध्यें सर्व देशभर भटकत हिंडणाऱ्या भाटांच्या तोंडी असलेल्या गाण्यांचा समावेश होतो. या गाण्यांना प्रास नसतो. परंतु तालबद्धता असल्यामुळें तीं कर्णमधुर असतात. बरींच वर्षे त्यांच्याकडे विशेष कोणाचें लक्ष नव्हतें. पण पुढें १७ व्या शतकांत त्यांचा संग्रह करण्यांत आला. १८०४ पासून पुढें तीं छापून प्रसिद्ध होऊन फार लोकप्रिय झालीं.

आतां दुसरा प्रकार लिखित वाङ्मयाचा. त्यांतील सर्वांत जुनें पुस्तक म्हणजे ग्रेगरीनें लिहिलेलें १०५६-५७ मधील स्लॅव्हॉनिक गॉस्पेलचें होय. दुसरें १०७३ सालीं ग्रीक साधनांवरून लिहिलेलें पुस्तक म्हणजे एक रशियन ज्ञानकोशच आहे. या जुन्या पुस्तकांत कांहीं राजांच्या स्तुतिपर काव्यें आहेत, नेस्टरसारख्या बहुतेक मोठमोठ्या गांवांचीं बखरीवजा इतिहासवर्णनें आहेत. पवित्र क्षेत्र जेरुसलेमला ११-१२ व्या शतकांत जाऊन आलेल्या डॅनियलचें, हिंदुस्थानांत जाऊन आलेले ए. निकितिन (१४७०), कॉरोबिनिकोव्ह, ग्रेकोव्ह यांचीं व इतर अनेकांचीं प्रवासवर्णनें आहेत.

धार्मिक वाङ्मय—बाराव्या शतकांतील सीरिलचीं धर्मावर व्याख्यानें, व बेझबोरोडकोनें लिहिलेलीं अनेक उपदेशपर व साधूंचीं चरित्रें हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

गोष्टी—इगोरनें पोलोव्ह लोकांवर केलेल्या स्वाऱ्यांच्या गोष्टी, किटोव्हरास व सालोमन झारच्या गोष्टी, बल्गेरियन गोष्टींवरून लिहिलेल्या गोष्टी, १३८० सालीं कुडकॉव्ह येथें मोंगलांविरुद्ध मिळविलेल्या जयाची हकीगत, वगैरे पुस्तकें आहेत.

कायदेग्रंथ—सन १०५४ च्या सुमाराचा यरोस्लाव्हचा रस्कायप्रवदा हा ग्रंथ, सन १४९७ मधील ३ ऱ्या इव्हानचा सुडेबनिक हा कायदेग्रंथ व सन १५५१ मधील स्टोग्लाव्ह हा धार्मिक नियमग्रंथ हे प्रसिद्ध आहेत. या कायद्यांत कांहीं कांहीं चमत्कारिक शिक्षा आहेत. नवऱ्याच्या खुनाबद्दल बायकोला जिवंत पुरण्याची शिक्षा सांगितली आहे; तंबाखूचा उपयोग करणाऱ्याला नाक कापण्याची फारच चमत्कारिक शिक्षा लिहिलेली आहे. पुढें पीटर दि ग्रेटनें ती शिक्षा रद्द करून स्वतःच तंबाखूच्या प्रचारास उत्तेजन दिलें.

क्रूरकर्मी इव्हान याच्या काळचें डोमोस्ट्राय म्हणजे गृहव्यवस्थे-वरील पुस्तक हें फार मजेदार आहे. तें सिल्व्हेस्टर नांवाच्या भंकनें लिहिलेलें आहे. या पुस्तकांत त्या काळच्या रशियन लोकांच्या राहणीचें, त्यांच्या अज्ञानाचें व रानटीपणाचेंहि चित्र उत्तम रेखाटलें आहे.

सतरावें शतक— या शतकाच्या आरंभींचा टोबोलस्कच्या कुवासोव्हचा क्रोनोग्राफ (बखरग्रंथ) प्रसिद्ध आहे. त्यांत त्यानें जगाच्या उत्पत्तीपासून मायकेल रोमोनोव्हची व लेखकानें स्वतः पाहिलेल्या राजघराण्यांतील इसमांची माहिती दिली आहे. त्या वेळचा प्रसिद्ध पॅन-स्लाव्हिस्ट क्रझानिच यानें स्लॅव्हियन व्याकरण लिहिलें. स्लाव्हॉनिक तत्त्वज्ञानामध्येंहि त्याची गति चांगली होती. क्रझानिचनें १७ व्या शतकांतील रशियन

शोध लागले व यांपासूनच बऱ्याच अर्वाचीन काळीं शुद्ध रसायनशास्त्राची उत्पत्ति झाली. या रसायनशास्त्राची स्थापना करण्याच्या कामीं १८ व्या शतकांतील स्टाल, लाव्हॉझिए, बॉइल आणि प्रीस्टले व १९ व्या शतकांतील डाल्टन वगैरे शास्त्रज्ञांचीं नांवें निगडित आहेत.

निरिंद्रिय रसायनशास्त्र—निरिंद्रिय रसायनशास्त्रामध्ये कर्ब (कार्बन) या मूलद्रव्याखेरीज बाकीच्या सर्व मूलद्रव्यांची उत्पत्ति, गुणधर्म व त्यांत होणारे बदल यांचा विचार केलेला असतो. खनिज रसायनशास्त्रामध्यें निरनिराळया जातींचीं खनिज द्रव्यें, खडक, वगैरेंचा अभ्यास करण्यांत येतो. कृषि रसायनशास्त्रामध्यें जमीन, खतें, इत्यादि अनेक गोष्टींचें संशोधन करण्यांत येतें.

सेंद्रिय रसायनशास्त्र—रसायनशास्त्राचा दुसरा मोठा व महत्त्वाचा विभाग म्हणजे सेंद्रिय रसायनशास्त्र हा होय. यामध्यें कर्बाच्या निरनिराळया असंख्य संयुक्तांचा विचार व अभ्यास केलेला असतो.

जीविरसायनशास्त्र— रसायनशास्त्राच्या या अत्यंत महत्त्वाच्या व वैशिष्ट्य प्राप्त झालेल्या विभागामध्यें सजीव पदार्थांच्या रासायनिक गुणधर्मांचा व त्यांतील निरनिराळया प्रमेयांचा अभ्यास करण्यांस येतो.

पदार्थवैज्ञानिक अथवा ऐंद्रिय रसायनशास्त्र—हा एक रसायनशास्त्राचा तिसरा मोठा विभाग आहे. यामध्यें निरनिराळया पदार्थांचे रासायनिक रूपांतराशीं संबद्ध असे ऐंद्रिय किंवा पदार्थवैज्ञानिक गुणधर्म यांचा अभ्यास करण्यांत येऊन रसायन व पदार्थविज्ञान या दोन शास्त्रांचा परस्परांशीं संबंध जोडण्यांत आलेला असतो.

यांखेरीज औद्योगिक रसायनशास्त्र अथवा रसायनशास्त्राचा व्यावहारिक उपयोग हीहि एक स्वतंत्र शाखाच म्हणतां येईल व अलीकडे अनेक लोक या धंद्यामध्यें शिरलेले आपणांस आढळून येतात.

सर्व विश्वविद्यालयांतून अलीकडे रसायनशास्त्राचा अभ्यास करण्यांत येतो. व रासायनिक संशोधन करण्याकरितां प्रत्येक देशात अनेक संस्था स्थापन करण्यांत आलेल्या आहेत.

प्राचीन पाश्चात्य रसायनशास्त्र—आधुनिक रसायनदृष्ट्या प्राचीन ग्रीकांच्या कल्पना चुकीच्या होत्या. आजच्या शास्त्रीय दृष्टीनें जरी किमया विद्येस महत्त्व नाहीं तरी रसायनशास्त्राची वाढ होण्यास या अज्ञानमूलक शास्त्राचीच मदत झाली आहे. किमयाशास्त्रांत कांहीं शास्त्रज्ञ प्रामाणिक व कांहीं तोतये असून शिक्षणेच्छूंसाठीं या शास्त्राचा एक अभ्यासक्रमहि ठरलेला असे. परिसाच्या स्वरूपासंबंधीं किमयागारांनीं बहुतेक मुग्धताच स्वीकारलेली आढळते. किमयाशास्त्राचे संस्थापकांच्या नांवावरून पडलेले दोन संप्रदाय होते. किमयागारांच्या लबाड्यांच्या आविष्करणांतूनच रसायनशास्त्र व प्राणिशास्त्र यांची आधुनिक वाढ झालेली दिसते. क्षार, गंधक व पारा हीं तत्त्वें मानण्याऐवजीं ज्वलनशक्ति हें एकच तत्त्व मानणें ही आधुनिक रसायनशास्त्राच्या प्राणप्रतिष्ठेंतील पहिली पायरी होय. रॉबर्ट बॉइलच्या हवेवर लिहिलेल्या ग्रंथानें या उत्पत्तीस जोर आला. जॉर्ज अर्न्स्ट स्टॉल यानें ज्वलनतत्त्वविषयक सिद्धांताची स्थापना केली. यानंतर स्टीफन हेल्सनें हवेच्या स्थितिस्थापकत्वाचा अभ्यास सुरू करून आधुनिक रसायनशास्त्राचा पाया घातला. अर्वाचीन रसायनशास्त्र हेल्सच्या दिशेनेंच संशोधन करणाऱ्या जोसेफ ब्लॅकच्या कर्बाम्ल वायूच्या गुणधर्मसंशोधनामुळें रसायनशास्त्रज्ञांच्या वायूसंबंधीं कल्पनांत क्रांति घडून आली. ब्लॅकचा शिष्य हेन्री कॅव्हेंडिश यानें पाणी व नत्राम्ल यांच्या घटकावयवांचा व त्याच सुमारास जोसेफ प्रीस्टले यानें ज्वलनतत्त्वविरहित हवा ऊर्फ प्राणवायु याचा अत्यंत महत्त्वाचा शोध लाविला. याच वेळीं स्वीडनमधील कार्ल विल्हेम श्रील या शास्त्रज्ञानें अगदीं स्वतंत्रपणें प्राणवायु, मंगलद्विप्राणिद, दुग्धाम्ल, डिकाम्ल, तुंगस्थाम्ल, स्निग्धशर्करा, जंबीराम्ल, रेवसाम्ल, काष्ठाम्ल, हरिताम्ल, वगैरेसंबंधीं शोध लावून सेंद्रिय रसायनशास्त्राचा पाया घातला. या शास्त्रसिद्धतेचा फायदा घेऊन लाव्हाझिए या फ्रेंच विद्वानानें एकंदर माहितीस आपल्या 'रसायनशास्त्राचीं मूलतत्त्वें' या ग्रंथांत शास्त्रस्वरूप दिलें. हिरा व कोळसा हे रासायनिक दृष्ट्या एकाच जातीचे आहेत असें दाखविलें व प्राचीन ज्वलनतत्त्वविषयक उत्पत्ति खोटी ठरविली.

यानंतरचा सुप्रसिद्ध शोध डाल्टनचा परमाणुवाद हा असून परमाणुविषयक सिद्धांतास डॉ. वोलेस्टन याच्या गुणकप्रमाणाच्या नियमानें व जोसेफ लुई गाय लुझॅक नामक एका फ्रेंच शास्त्रज्ञाच्या संयोजक आकारमानाच्या नियमांमुळें पुष्टि मिळाली. वर्झेलियसच्या रासायनिक सारण्यांतील सुधारणेमुळें ड्युलाँग व पेटिट यांच्या परमाणूंच्या विशिष्ट उष्णतेसंबंधाचा व मिश्चरलिच यांचा समाकृतिकत्वाचा या दोन नियमांचें अवगमन झालें. याच सुमारास प्रो. हंप्रे डेव्ही यानें विद्युत्प्रवाहानें मूलद्रव्य म्हणून वाटणाऱ्या पदार्थांचें रासायनिक पृथक्करण करून दाखविलें व मूलद्रव्यांच्या उत्पत्तीसंबंधीं भ्रामक कल्पना नाहींशा केल्या. वर्झेलियसचा शिष्य फ्रेडरिक वोह्लर यानें मूत्रसत्त्व कृत्रिमरीत्या तयार केलें.

सेंद्रिय रसायनशास्त्र म्हणजे संयुक्त मूलकांचें रसायनशास्त्र होय अशी व्याख्या करण्यात आली. याच सुमारास वर्झेलियसच्या द्विमूलक सिद्धांताविरुद्ध ड्युमासच्या संशोधनानें

बळकट पुरावा पुढें आला. या सिद्धांताच्या जागीं लॉरेंट व गेरहार्ट यांच्या प्रयत्नानें अणुविषयक कल्पना उभारण्यांत आली. फ्रँकलंडच्या ध्यानांत प्रथम मूल्यकत्वाची कल्पना येऊन रासायनिक पदार्थांच्या स्थिरास्थिरतेबद्दलची मीमांसा झाली. स्टेक्लेयर डेव्हिली यानें विश्लेषणाची कल्पना पुढें मांडली. लीबिग व वाहेलर यांनीं असें दाखविलें कीं, दोन पदार्थांची रासायनिक घटना सारखी असली तरी त्यांचे भौतिक गुणधर्म भिन्न असणें शक्य असतें. परमाणूंच्या गुणधर्मांचें अव्ययत्व सिद्ध करणारे प्रयोग चालले असतांनाच परमाणुभारांकाच्या नियतान्तरतेवरून प्रौटनें सर्व मूलद्रव्यांचे परमाणू उज्ज या एकाच मूलद्रव्याच्या परमाणूंच्या निरनिराळ्या संख्येचे बनले असावेत असा आपला तर्क पुढें मांडला. अष्टकांच्या नियमांचें अवगमन व विछिन्नकिरणदर्शकासंबंधीं शोध व प्रकाश-लेखनकला यांमुळें मूलद्रव्यांच्या संशोधनास बरीच मदत झाली. लॉकिअरच्या सौररसायनशास्त्रविषयक संशोधनानें प्रौटच्या उपपत्तीस कांहींसा पुष्टिकारक पुरावा मिळाला. डाल्टनच्या अनुमानाप्रमाणें डेव्ही व फॅरेडे यांनीं चांगलीं वाताकर्षक यंत्रें व तीव्र शैत्यजनक मिश्रणें यांच्या साहाय्यानें बऱ्याच वायूंस द्रवरूपांत आणलें. राहिलेल्या कांहीं वायूंचें द्रवीकरण पिक्टेट, कॅलेटेट यांनीं स्वतंत्रपणें केलें. इ. स. १८९८ मध्यें फॅरेडेच्या प्रयत्नांनीं उज्ज वायूसहि द्रवरूप प्राप्त झालें.

या नीचोष्णमानविषयक कार्यामध्यें विद्युद्दाहकता, चुंबकत्व, प्रकाशग्राहकत्व, अत्यल्पोष्णमानाच्या द्रव्यांतील रासायनिक आकर्षण, वगैरेसंबंधीं नवीन संशोधनक्षेत्रें निर्माण होऊन निरनिराळ्या संशोधकांनीं त्यांत पुष्कळ कार्य केलें. या द्रवरूपांत आणल्या गेलेल्या वायूंचा अन्न न नासतां सुरक्षित ठेवणें, बर्फ तयार करणें, कृत्रिम थंडी उत्पन्न करणें, वगैरे कामांत व्यावहारिक उपयोग होत असून आणखी कांहीं महत्त्वाच्या बाबतींतहि त्यांचा फायदेशीर रीतीनें उपयोग केला जाऊं शकेल. १८५० नंतर अनेक नवीन मूलद्रव्यांचे शोध लागले असून तीं सर्व द्रव्यें लागलींच व्यावहारिक उपयोगाला लावलीं जात आहेत. याच काळांत केक्यूल यानें गंधयुक्त पदार्थांचें रासायनिक स्वरूप ओळखण्याचे शोध लाविले. संयोगीकरण ही रासायनिक क्रिया आज व्यवहारांत अत्यंत उपयुक्त झाली असून तिच्या योगानें अनेक नवीन उपयुक्त द्रव्यें तयार करतां येतात. वैद्यकास या क्रियेचा फारच उपयोग झाला आहे. यान्त्र पद्धतीनें कृत्रिम नीळ तयार केली गेली असून शर्करांचेंहि संयोगीकरण करण्यात आलें आहे. प्राण्यांच्या व वनस्पतींच्या शरीरांत तयार होणारीं द्रव्यें कृत्रिम रीतीनें करतां येतात. या पाश्चात्य परंपरेच्या रसायनशास्त्रामध्यें आधुनिक कालांत प्रो. गज्जर, राय व बोस या भारतीय विद्वानांनीं स्वतंत्र संशोधन केलें आहे.

भारतीय रसायनशास्त्र—आधुनिक पाश्चात्य रसायनशास्त्रापेक्षां प्राचीन भारतीय रसायनशास्त्राचें स्वरूप अगदीं भिन्न म्हणजे वैद्यकाची औपाधिशाखा या प्रकारचें आहे. भारतीय रसायनशास्त्राच्या इतिहासासाठीं प्राचीनांच्या रासायनिक क्रियांची कल्पना येण्याकरितां केवळ रसायनविषयकच नव्हे तर इतर विविध वैदिक, तांत्रिक, वैद्यकीय, शैव, बौद्ध, इत्यादि वाङ्मय पाहिलें पाहिजे. रासायनिक क्रियांचें भारतीयांचें ज्ञान वेदाविद्येइतकें प्राचीन असून बौद्धधर्मीय वर्चस्वामुळें या ज्ञानांत पुष्कळ भर पडली. इ. स. १००० पासून रसायनशास्त्रावर स्वतंत्र ग्रंथरचना होऊं लागली. धातूंच्या भस्माखेरीज निरनिराळे क्षार, सेंद्रिय व खनिज अम्लें, अल्कोदविषें, कल्प, अंजनें, लेप, केशनाशक साबण, वगैरे अनेक रासायनिक वस्तू भारतीयांस ज्ञात होत्या. लोह, जस्त, ताम्र, इत्यादि निरनिराळ्या धातूंच्या संशोधनक्रिया, तसेंच मोरचूद, तुरटी, हिराकस व रसकापूर, इत्यादि पदार्थ तयार करण्याच्या क्रिया प्राचीनांस माहीत होत्या. कज्जली, पर्पटिताम्र, इत्यादि प्राचीन रसायनांचें आधुनिकरीत्या परीक्षण करतां ते बहुतेक प्रसंगीं संयुक्त पदार्थ आढळून आले. हीं भस्में पक्कीं झालीं किंवा नाहींत हें ओळखण्याच्या निरनिराळ्या कसोट्या ठरल्या आहेत. अणु व परमाणु यांसंबंधीं भारतीयांस बरीच स्पष्ट कल्पना असून साधें मिश्रण, रासायनिक संयोग, पृथक्करण, इत्यादि क्रिया त्यांना परिचित होत्या असें दिसतें. अनुमानप्रधान व प्रयोगप्रधान या दोन संशोधनपद्धतींपैकीं पहिलीचा प्राचीनांनीं बराच विकास केला असून, दुसरी म्हणजे प्रयोगप्रधान संशोधनपद्धति शुद्ध स्थितींत त्यांना अपरिचित होती. त्यांच्या संशोधनपद्धतीची थोडी कल्पना त्यांचीं विद्यापीठें, रसशाळा, प्रायोगिक उपकरणें व रासायनिक द्रव्यांच्या कसोट्या यांच्या माहितीवरून येण्यासारखी आहे. मध्ययुगाच्या अखेरपर्यंत पाश्चात्यांपेक्षां तत्कालीन भारतीयांसच रसायनशास्त्रविषयक ज्ञान अधिक होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**रसाळगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. ज्या डोंगरावर सुमारगड व महिपतगड आहेत त्याच डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. याचें क्षेत्रफळ ५ एकर आहे. तीन मैलांवर मांडव नांवाचें खेडें आहे, तेथून रस्ता आहे. आंत सोलाई व वाघाई या देवींचें देवालय आहे व त्याचें काम नक्षीदार आहे. येथें दरवर्षी १४ गांवांची जत्रा भरते. कांहीं शिलालेख आहेत; पण ते अस्पष्ट आहेत.

**रसेल, बर्ट्रांड आर्थर विल्यम** (१८७२-        )--एक इंग्रज तत्त्वज्ञानी. यानें प्रथम गणितशास्त्राचा अभ्यास करून ए. एन्. व्हाइटहेड याच्या सहकार्यानें 'गणितशास्त्राचीं तत्त्वें' हा ग्रंथ १९१० ते १९१३ या दरम्यान प्रकाशित केला. यानें बरेच ग्रंथ लिहिले असून त्यांमध्यें 'तत्त्वज्ञानांतील शास्त्रीय पद्धति', 'द्रव्यविश्लेषण', 'मनोविश्लेषण', 'विवाह आणि नीति', 'गूढविद्या आणि तर्क', इत्यादि विषयांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. रसेल हा विधायक तत्त्वज्ञानी नसून विघातक तत्त्वज्ञानी आहे असें म्हणतात. गणिती तत्त्वज्ञानांत त्याचा हात धरणारा ग्रेट ब्रिटनमध्यें तरी कोणी नाहीं. तो अतिशय प्रामाणिक आणि निर्भीड लेखक आहे. आपले क्रांतिकारक विचार स्पष्टपणें मांडण्यास तो कचरत नाहीं.

**रस्किन, जॉन** (१८१९-१९००)—एक ब्रिटिश टीकाकार व अर्थशास्त्रज्ञ. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झाल्यावर तेथेंच 'ललितकला' (फाइन आर्ट्स) या विषयाचा प्रोफेसर १८७०-१८७९ सालीं व पुन्हां १८८३-१८८४ सालीं होता. १८८५ पासून मरणापर्यंत तो दूर एकान्तांत ब्रँटवुड येथें राहिला. त्याचे चित्रकलाविषयक ग्रंथ आहेत ते 'मॉडर्न पेंटर्स' (कलेचीं तत्त्वें विशद करणारा प्रबंध), 'दि सेव्हन लँप्स ऑफ आर्किटेक्चर' आणि 'दि स्टोन्स ऑफ व्हेनिस' हे होत. त्याचे अर्थशास्त्र, समाजशास्त्र व नीतिशास्त्र या विषयांचे ग्रंथ आहेत ते—'सीसेम अँड लिलीज', 'अनटु धिस् लास्ट', 'एथिक्स ऑफ दि डस्ट' आणि 'क्राउन ऑफ वाइल्ड ऑलिव्ह'. तो 'मँचेस्टर-स्कूल' या अर्थशास्त्रीय पंथाचा कट्टा शत्रु होता. ग्रेट ब्रिटनमधील कामकऱ्यांना त्यानें लिहिलेल्या पत्रांमुळें तत्कालीन अर्थशास्त्रीय विचारांवर बराच परिणाम झाला.

**रस्ते**—शास्त्रीय पद्धतीनें रस्ते बांधण्यास सुरुवात रोमन लोकांनीं केली. त्या रस्त्यांचे अवशेष अद्यापहि पाहावयास मिळतात. रोमन लोकांनीं मोठमोठे रस्ते बांधण्याची कल्पना कार्थेजियन लोकांपासून घेतली असावी. रोमन साम्राज्याचें वैशिष्ट्य व त्यांतील विशेष महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे त्यांतील सम्राटांनीं बांधलेले युरोप खंडांतून जाणारे मोठमोठे रस्ते, ही होय. या रस्त्यांमुळेच ऑगस्टसला आपलें साम्राज्य स्थापन करतां आलें. या रस्त्यांतील सर्वांत पहिला रस्ता व्हाया ॲपिया हा खि. पू. ३१२ या सालीं बांधण्यास आरंभ झाला. या रस्त्यांचा उपयोग रोमन लोकांस आपलें सैन्य नेण्याच्या व इतरहि दळणवळणाच्या कामीं सारखाच होत असे. या रस्त्यावरून चपळ घोडे व रथ त्वरेनें प्रवास करीत असत. टायबेरियस हा बादशहा आपला भाऊ ड्रुसस याच्या मृत्युसमयीं जेव्हां लिॲन्स शहरीं गेला त्या वेळीं त्यानें या रस्त्यावरून एक दिवसांत २०० मैल प्रवास केला असें सांगतात. डायोक्लेरियन याच्या कारकीर्दीत रोमन साम्राज्यांत एकंदर ३७२ रस्ते असून यांची लांबी ५२,९६४ मैल होती. हे सर्व रस्ते रोम शहरापासून निघून साम्राज्याच्या निरनिराळ्या टोंकापर्यंत जात होते व त्यांच्या शाखांचें एक जाळेंच बनलेलें होतें. रोमन लोकांनीं ब्रिटनमध्येंहि बांधलेले कांहीं रस्ते अद्यापि दृष्टीस पडतात व त्यावरूनच अर्वाचीन रस्ते करण्याची पद्धति निघाली आहे. १८ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत सडका बांधण्याकडे विशेषसें लक्ष दिलेलें आढळत नाहीं. सध्यांच्या सडकांमध्यें तीन थर असतात: १. पाया; २. मुख्य थर व ३. अस्तर अथवा वरील थर. पाया हा बहुतेक दगडांचा किंवा गोट्यांनीं भरलेला असतो. त्यानंतर मुख्य थर लहान फोडलेल्या खडीचा व अलीकडे सिमेंटचा बनविलेला असतो. वरील थर वाळू, वाळूचा चाळ, किंवा डांबरांत मिसळलेली बारीक खडी, वगैरेंचा असतो. रस्त्याचा पृष्ठभाग मध्यमागीं उंच व बाजूंस उतार असा केलेला असतो. यामुळें रस्त्यावरील पाणी बाजूंस वाहून जातें. मॅकॲडम नांवाच्या गृहस्थानें खडी घालून रस्ता करण्याची पद्धति प्रथम प्रचारांत आणली व त्यामुळें त्या पद्धतीस त्याचेंच नांव देण्यांत येतें. अलीकडे रस्त्यावरून डांबर वापरण्यांत येतें, त्यामुळें तो अधिक गुळगुळीत होतो.

हिंदुस्थानांत पूर्वीच्या काळापासून पुढील चार मोठे रस्ते चालू आहेत: (१) उत्तरेकडील जुना मोठा लष्करी दळणवळणाचा रस्ता, खायबर ते कलकत्त्यापर्यंतचा; (२) कलकत्ता आणि मद्रास यांना जोडणारा; (३) मद्रास आणि मुंबई यांना जोडणारा व (४) मुंबई आणि दिल्ली यांना जोडणारा. या चार खडीच्या रस्त्यांची लांबी सुमारें ५००० मैल आहे. आतां भारताच्या नव्या घटनेंत मोठे राष्ट्रीय रहदारीचे रस्ते म्हणून स्वतंत्र केले असून त्यांवरचा सर्व खर्च भारत सरकार करतें व प्रांतिक रस्ते प्रांताचें पी. डब्ल्यू. डी. खातें बघतें.

इ. स. १८२६ मध्यें महाराष्ट्रांत अस्तित्वांत असलेले रस्ते खालीं दिल्याप्रमाणें होते:—

१. मुंबई-अहमदनगर रस्ता—पनवेलपासून या रस्त्याची लांबी १४८ मैल. मार्ग—पनवेल, चौक, खालापूर, खोपवली, बोरघाट, खंडाळें, लोणावळें, खडकाळे, वडगांव, कुवले, ताथवडे, औंध, पुणे, वाघोली, लोणी, कोरेगांव, गणपतीचें रांजणगांव, कर्देळवाडी, शिरूर, हिंगणी, कडूस, रांजणगांव, सारोळें, अकोळनेर व केडगांव.

२. कल्याण-औरंगाबाद रस्ता—१८५ मैल.

३. पुण्याहून जे निरनिराळ्या गांवीं रस्ते जात त्यांची लांबी पुढें दिली आहे—पुणें-सुरत रस्ता २५४ मैल. पुणें-कल्याण

रस्ता ७५ मैल. पुणें-जुन्नर रस्ता ८५ मैल. पुणें-खंडाळा रस्ता ५० मैल. पुणें-धुळें रस्ता २०१ मैल. पुणें-औरंगाबाद रस्ता १४४ मैल. पुणें-सोलापूर (सावळेश्वर मार्गें) रस्ता १५७ मैल. पुणें-सोलापूर (दिवाघाट मार्गें) रस्ता १५७ मैल. सोलापूर-सिकंदराबाद रस्ता १९२ मैल. पुणें-एद्रूर-बेळगांव रस्ता २४१ मैल. एद्रूर-धारवाड रस्ता २१३ मैल. पुणें-दापोली रस्ता ९७ मैल. पुणें-गोरेगांव रस्ता ६६ मैल. पुणें-निपाणी रस्ता २११ मैल. पुणें-नागोठणें रस्ता ६४ मैल.

४. मराठ्यांच्या अमदानींत सह्याद्रीपार होण्यास दोन महत्त्वाचे मार्ग होते : (१) पुणें-कोल्हापूर-कर्नाटक. या रस्त्यास बोरघाट-साल्पाघाट आणि न्हावीघाट लागत. (२) रत्नागिरी-पंढरपूर रस्ता : हा कलढोण घाटांतून पंढरपूरकडे जात असे.

५. सातारा जिल्ह्यांत पुढील रस्ते होते. पुणें-सातारा-बेळगांव (दोन रस्ते : एक २४१ व दुसरा २१३ मैल). सातारा-शिरूर ८७ मैल. पुणें-सातारा-अहमदनगर १२० मैल. सातारा-सोलापूर (दोन रस्ते, एक १३१ व दुसरा १४८ मैल). कऱ्हाड-राजापूर ११७ मैल. कऱ्हाड-मालवण ११९ मैल; हा रस्ता कोल्हापूरवरून फोंडा घाटांतून जात असे. सातारा-दापोली (एक कुंभारली घाटांतून व दुसरा आंबोली घाटांतून).

६. पुणें जिल्ह्यांतून कुलाबा जिल्ह्यांत जाण्यास खालील रस्ते होते—

(१) सावे खिंडींतून उन्हेरी, राहुबगांव, चिकणी व नागोठणें. एकंदर रस्त्याची लांबी ६३ मैल.

(२) पुणें-रत्नागिरी रस्ता—एकंदर लांबी १६३ मैल. हा रस्ता चिरवाडी, खरवली, माटवण, कंगुलु, दिवी व पोलादपूर याप्रमाणें होता.

(३) पुणें-घोडेगांव रस्ता—एकंदर लांबी ६५ मैल. कुंभ-घाटांतून खालीं येऊन हा रस्ता निजामपूर, काळ, तरमरी व कडापा या ठिकाणांवरून जात असे. या रस्त्यावर लागणारीं गांवें- शिरसदचोरवाडी, हरोंडी, करंबेळी, ताम्हणें, फुलसगांव, हटकेळी, तळेगांव, वडगांव, इ.

(४) पुणें-घोडेगांव रस्ता—एकंदर लांबी ५६ मैल. देवस्थळी घाटांतून खालीं उतरून उंबर्डी-शिरवली या गांवांवरून घोडेगांवास जात असे. याशिवाय सावित्री नदीच्या तीरावर असलेल्या दासगांवापासून तीन रस्ते गेले होते : (अ) दासगांव-नागोठणें, लांबी ३८ मैल. (आ) दासगांव-शेवत्या घाटाचा माथा, लांबी २३ मैल. (इ) दासगांव-खेड रस्ता. लांबी २७ मैल. पेण-पनवेल रस्ता एकंदर लांबी २१ मैल.

इ. स. १८४० सालीं पुढील रस्ते तयार झाले व पेणहून अलीबागेस जाण्यास तीन मार्ग होते.

(१) पेण, नागोठणें, साचरी, पोयनाड व अलीबाग हा खुष्कीचा मार्ग होता. लांबी ४५ मैल.

(२) पेण, कासू, सांबरी, पोयनाड व अलीबाग. यानें दळणवळण कमी असे. लांबी ३२ मैल.

(३) पेण, धरमतर, पोयनाड व अलीबाग. मध्यंतरीं खाडी लागत असल्यामुळें पादचारी या रस्त्याचा क्वचितच उपयोग करीत. लांबी २४ मैल.

यानंतर इ. स. १८८१ सालीं आणखी कांहीं रस्ते उपयोगास आणतां येण्यासारखे झाले. हे एकंदर रस्ते बारा होते व त्यांची एकंदर लांबी १८७ मैल होती. यांपैकीं तीन रस्त्यांवर पूल असून त्यांची एकंदर लांबी ४८ मैल होती. बाकीचे नऊ बरसातीखेरीज इतर आठ महिन्यांत उपयोगांत आणण्यासारखे होते.

(१) नागोठणें-धरमतर रस्ता. लांबी १३ मैल. हा इ. स. १८८१ सालीं तयार झाला. (२) मुख्य रस्ता नागोठणें, कोलाड, माणगांव, महाड, पोलादपूर व महाबळेश्वराचा पायथा. लांबी ५६ मैल. नागोठणें-महाबळेश्वर रस्त्यास फुटलेले फांटे : (३) कोलाड-रोहें, लांबी १० मैल. (४) माणगांव-निजामपूर, लांबी ७ मैल (लोकलफंडी). (५) लोणेरे-घोडेगांव (गोरेगांव), लांबी २ मैल. (६) महाड-नाते, लांबी ४ मैल. (७) महाड-विन्हेरे, लांबी १२ मैल. (८) मुख्य रस्ता-वरंधा घाटाचा पायथा, लांबी ९ मैल. (९) मुख्य रस्ता महाप्रळ, लांबी १६½ मैल. (१०) रेवस-अलीबाग, लांबी १५ मैल. (११) धरमतर-खोपवली (बोरघाटाचा पायथा), लांबी २५ मैल. (१२) खोपवली-अलीबाग.

नागोठणें-महाबळेश्वर रस्त्यावरील इंदापूरपासून तळयास एक रस्ता जातो. तो येथून मालाटी या गांवीं, मांदाड नांवाच्या खाडीवर जातो. पावसाळ्याशिवाय इतर वेळीं हा रस्ता उपयोगी पडतो. या खाडींतून माणगांव तालुक्यांतील माल जलमार्गानें बाहेर जात असे.

आज हिंदुस्थानांत १२,१०,००० चौ. मैलांच्या क्षेत्रांत सुमारें २,४०,००० मैल लांब रस्ते आहेत. म्हणजे साधारणतः दर चौ. मैलास ०·२० मैलाचा रस्ता पडतो. ब्रिटनमध्यें हें प्रमाण २·०२ इतकें आहे. म्हणजे तेथें दहापट रस्ते आहेत. १९२८ सालीं जी जयकर समिति रस्त्याबाबत नेमिली, तिच्या शिफारशीप्रमाणें एक मध्यवर्ती रस्ताफंड उभारण्यांत आला आहे. पेट्रोल खपाच्या प्रमाणांत प्रांत आणि संस्थानें यांकडून कर घेण्यांत येतो व तो या फंडांत जमा होतो. या पैशांतून रस्ते-बांधणी व रस्ते-दुरुस्ती होते. मोटारींची रहदारी अतिशयच वाढल्यामुळें रस्त्यांची निगा ठेवण्याची आवश्यकता फार भासते. मध्यवर्ती सरकारनें 'रोड्स ऑर्गनिझेशन' नांवाचें एक

निराळें खातें काढलें आहे. त्याकडे रस्त्यांचे सर्व प्रश्न सोंपविले आहेत.

**रहदारीचा हक्क**—आपल्या मालकीची नाहीं अशा जमिनीवरून जाण्यायेण्याचा जो हक्क असतो त्याला रहदारीचा हक्क ( राइट ऑफ वे ) म्हणतात. या हक्काचे १. सार्वजनिक म्हणजे सर्वांचा जाण्यायेण्याचा हक्क, आणि २. खासगी म्हणजे एखाद्या विशिष्ट व्यक्तीला किंवा विशिष्ट प्रकारच्या अनेक इसमांना असलेला जाण्या-येण्याचा हक्क, असे दोन प्रकार आहेत. ज्या रस्त्यावरून सर्वांना जाण्या-येण्याचा हक्क असतो त्याला राजरस्ता किंवा सार्वजनिक रस्ता ( हाय वे ) म्हणतात. खासगी रहदारीचा हक्क पुढील मार्गांनीं मिळवितां येतो—१. अनादि कालापासून चालू असलेली किंवा निदान ४० वर्षे चालू असलेली जाण्या-येण्याची रूढि; किंवा २. प्रत्यक्ष दस्तऐवजानें देण्यांत आलेला रहदारीचा हक्क.

हिंदुस्थानांत ' इंडियन ईझमेंट ॲक्ट ' मध्यें २० वर्षे वहिवाटीनें किंवा दस्तानें हा हक्क प्राप्त होतो ( कलमें १३।१४।१५ ).

**रहिम, सर अब्दुर** ( १८६७- )—एक हिंदी मुसलमान पुढारी. यांचें शिक्षण कलकत्ता प्रेसिडेन्सी कॉलेजांत झालें. मिडल टेंपल इनमधून १८९० सालीं बॅरिस्टर झाल्यावर कलकत्ता येथें वकिली सुरू केली. १९००–०३ सालीं प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट (कलकत्ता) व पुढें मद्रास हायकोर्टचे न्यायाधीश झाले. १९०८ पासून मद्रास विश्वविद्यालयाचे सदस्य असून १९१३–१९१५ च्या रॉयल कमिशन ऑन पब्लिक सर्व्हिसचे सभासद होते. १९१० व १९१९ सालीं कांहीं काल मद्रासच्या हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधीशाचें काम केलें. १९२०–२५ मध्यें बंगाल सरकारचे कार्यकारी मंत्री होते. १९२५–२९ या कालांत बंगाल कायदे मंडळांत मुस्लिम पक्षाचे अध्वर्यु होते. १९३१ सालीं मध्यवर्ती कायदे मंडळांत निवडून गेले व तेथें स्वतंत्र पक्षाचे पुढारी व १९३१–३४ त विरोधी गटाचे पुढारी होते. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचे सभासद म्हणून विलायतेस गेले होते. १९३५–४५ पर्यंत मध्यवर्ती कायदे मंडळाचे अध्यक्ष होते. यांनीं ' प्रिन्सिपल्स ऑफ महॉमेडन जुरिस्प्रुडन्स ' ( मुसलमानी न्यायशास्त्राचीं तत्त्वें ) नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे.

**रहिमतखां** ( मृत्यु १९२२ )—एक सुविख्यात हिंदी गवई. ग्वाल्हेरच्या मिया हद्दूखांचे हे कनिष्ठ चिरंजीव होत. वडिलांच्या पश्चात् यांना अफूचें व्यसन लागलें. या व्यसनापायीं अगदीं हीन स्थितींत हे काशीस भीक मागत असतां सर्कसवाले विष्णुपंत छत्रे यांच्या नजरेस आले. निसार हुसेन व विष्णुपंत छत्रे हे यांचे सहाध्यायी होत. विष्णुपंत छत्रे यांनीं यांना आपल्या देखरेखीखालीं ठेवून यांचें अफूचें व्यसन बरेंचसें कमी केलें. शेवटपर्यंत छत्रे यांनींच यांचें संगोपन केलें. १९०० सालीं नेपाळच्या दरबारांत झालेल्या भारतीय गवयांच्या जलशांत रहिमतखांना पाहिल्या प्रतीचें बक्षीस मिळालें होतें. अगदीं शांत वृत्तीनें हे गात. त्याचबरोबर मधुर, खणखणीत व सुरेल आवाजाची यांना देणगी होती. यांना ' संगीताचे बादशहा ' म्हणत. कुरुंदवाड येथें यांचें देहावसान झालें.

**रहिमतपूर**—मुंबई, सातारा जिल्हा. कोरेगांव तालुक्यांतील एक गांव. हें साताऱ्याच्या आग्नेय दिशेस १७ मैलांवर आहे. व्यापारी ठिकाण व आगगाडीचें स्टेशन आहे. एक हायस्कूल आहे. येथें रणदुल्लाखानाचा घुमट आहे. लो. सं. ( १९४१ ) ६,५४३.

**रक्षक काफिला**—( कॉन्व्हॉय ). युद्ध चालू असतां व्यापारी गलबतें माल घेऊन समुद्रावरून वाहतूक करीत असतात त्यांचें संरक्षण करण्याकरितां लढाऊ गलबतांची योजना केलेली असते. अशा तऱ्हेच्या सुरक्षित काफिल्यास किंवा रक्षक काफिल्यास राक्षित किंवा रक्षक काफिला म्हणतात. यासंबंधीं १९०८–१९०९ मध्यें आरमारी युद्धासंबंधीं नियमांस अनुसरून लंडनमध्यें नियम ठरविण्यांत आले आहेत.

**रक्षक दीप**—( सेफ्टी लँप ). सर हम्फ्रे डेव्ही आणि जॉर्ज स्टीफनसन या दोघांनीं तेलानें जळणारे व जाळीचें आवरण असणारे संरक्षक दीप शोधून काढले. हे दिवे विशेषतः खाणींतून वापरण्यांत येतात. अशा दिव्यामध्यें ते कुलूप लावून बंद करण्याची योजना केलेली असते व ते फक्त खाणीबाहेर असलेल्या चौकीदारासच उघडतां येतात. जर खाणीमध्यें पेट घेणारा वायु ( अनूपवायु पाहा ) उत्पन्न झाला असेल तर या दिव्यांच्या ज्योतीमध्यें विशिष्ट तऱ्हेचा फरक पडलेला आढळून येतो व त्यावरून अशा स्फोटक वायूचें अस्तित्व दर्शित होतें. विजेच्या संरक्षक दिव्यापासून प्रकाश अधिक चांगला मिळतो. परंतु स्फोटक वायूचें अस्तित्व दिग्दर्शित होत नाहीं. याकरितां तपासणीच्या वेळीं अद्यापहि जुन्या तऱ्हेचेच दिवे वापरण्यांत येतात.

**रक्षक पडदा**—( सेफ्टी व्हाल्व्ह ). एखाद्या तापका ( बॉयलर )मध्यें जर वाजवीपेक्षां अधिक दाब उत्पन्न झाला तर तो कमी करण्याकरितां संरक्षक पडद्याची योजना केलेली असते. हे पडदे त्यांतील आंसावर तरफा व कमानी यांच्या साहाय्यानें कांहीं वजन ठेवून त्यांच्या योग्य ठिकाणीं पक्के बसविलेले असतात. हें वजन अशा तऱ्हेनें नियमित केलेलें असतें कीं, जोंपर्यंत तापकांतील दाब योग्य प्रमाणांत असेल तोंपर्यंत त्या दाबाचें समतोलन या वजनामुळें होत राहतें. परंतु मर्यादेपेक्षां

अधिक दाब झाल्यावरोबर हा संरक्षक पडदा वर उचलला जाऊन कांहीं वाफ बाहेर पडून जाते व त्यामुळें आंतील दाब पुन्हां कमी होतो. प्रत्येक तापकास अशा तऱ्हेचे दोन संरक्षक पडदे बसविण्याची योजना केलेली असते.

**रा**—हें प्राचीन ईजिप्शियन लोकांच्या सूर्यदेवतेचें नांव आहे. या देवतेचें शीर हॉक पक्षाच्या डोक्यासारखें असून त्याच्यावर सूर्याचें वर्तुळ बसवलेलें असतें.

**राइट, ऑरव्हिल** ( १८७१- )—ऑरव्हिल व त्याचा भाऊ विल्बर ( १८६७-१९१२ ) हे दोघे प्रसिद्ध अमेरिकन विमान-संशोधक आहेत. यांनीं प्रथम उत्तर कॅरोलिना संस्थानांत किट्टीहॉक येथील वाळूच्या टेंकड्यांवरून सुरकांड्या मारण्यास सुरुवात केली व विमानाच्या गतीवर नियंत्रण कसें ठेवावें यासंबंधीं बहुतेक सर्व शोध १९०२ पर्यंत लावले. या सुरकांड्या मारणाऱ्या विमानास ( ग्लायडर ) त्यांनीं १९०३ मध्यें डिसेंबरच्या १७ तारखेस एक धुराचें इंजिन बसविलें व त्याच्या साहाय्यानें चार उड्डाणें केलीं. त्यांतील सर्वांत लांब ८५२ फूट होतें. अशा तऱ्हेनें इंजिनाच्या शक्तीनें मनुष्य जमिनीवरून उडाल्याचें हें पहिलेंच उदाहरण होतें. १९०८ मध्यें हे दोघे बंधू फ्रान्समध्यें गेले व तेथें बरींच उड्डाणें करून विमानविद्येंतील आपलें कौशल्य प्रगट केलें. त्यांनीं केलेल्या पहिल्या विमानाचें पहिलें उड्डाण ५९ सेकंद टिकलें.

**राइट, सर आलमरॉथ एडवर्ड** ( १८६१-१९४७ )—एक ब्रिटिश वैद्यक. यानें दोषी तापावरील टोंचण्याचें औषध शोधून काढलें. तसेंच यानें कांहीं रोगांवरील लस व मनुष्याच्या रक्तांतील रोगप्रतिबंधक द्रव्यें यासंबंधीं बरेंच संशोधन केलें आहे.

**राइट, फ्रँक लॉइड**—( १८६९- )—एक अमेरिकन शिल्पशास्त्रज्ञ. हा प्रथम शिकागो येथील लुई सुलिव्हन याच्या हाताखालीं काम करीत होता. यानें एक नवीनच इमारत बांधण्याची पद्धति शोधून काढली. त्याच्या घरामध्यें रुंद अशा पागोळ्या आणि ठेंगणी रचना ही प्रामुख्यानें दिसते. त्याचें स्वतःचें स्प्रिंगग्रिन येथील घर आणि टोकीयोमधील इंपीरियल हॉटेल या इमारती त्याच्या पद्धतीचीं उत्तम उदाहरणें आहेत. याची कीर्ति सर्व देशांत पसरली. त्यानें कांहीं ग्रंथरचनाहि केली आहे व स्वतःचें आत्मचरित्रहि लिहिलें आहे.

**रॉइस, जोशिया** ( १८५५-१९१६ )—एक अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ आणि तत्त्ववेत्ता. हा हार्वर्ड विद्यापीठांत १८९२ सालीं तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचा प्राध्यापक नेमला गेला. त्या जागेवर तो १९१४ पर्यंत असून नंतर तो नैसर्गिक धर्माचा ऑल्फोर्ड प्राध्यापक बनला. यास अमेरिकेंतील एक प्रमुख तत्त्वज्ञ म्हणून मानण्यांत येत असे. राजनिष्ठा व व्यक्तिनिष्ठा यांबद्दल त्याचे सिद्धान्त प्रसिद्ध आहेत.

**रॉकफेलर, जॉन डेव्हिसन** ( १८३९-१९३७ )—सुप्रसिद्ध अमेरिकन कोट्याधीश व दानशूर व्यापारी. त्यानें तेलाच्या धंद्यांत मोठी क्रांति करून सोडली. हळूहळू लहान तेलाचे कारखाने हस्तगत करीत त्यानें स्टॅन्डर्ड ऑइल कंपनीमार्फत अमेरिकेचे ९० टक्के तेलाचे कारखाने ताब्यांत घेतले.

तो १८७० सालीं स्टॅन्डर्ड ऑइल कंपनीचा अध्यक्ष झाला व १८९५ सालीं निवृत्त झाला. वयाच्या पन्नासाव्या वर्षी हा जगांतील सर्वांत श्रीमंत इसम म्हणून गणला जात असे.

रॉकफेलरनें खालील व इतर संस्थांसाठीं ६० कोटी डॉलर इतकी रक्कम वांटून दिली—१. वैद्यकीय संशोधन-संस्था, २. 'रॉकफेलर फाउंडेशन' संस्था—मानवजातीच्या स्वास्थ्यासाठीं प्रयत्न करणारी, ३. सामान्य शिक्षणमंडळ, ४. लॉरा स्पेलमन रॉकफेलर स्मारक.

न्यू यॉर्क शहरांत एक मोठें रॉकफेलर केंद्र फार मोठ्या खर्चानें चाललें आहे. जगांत अनेक ठिकाणीं त्याच्या देणग्यातून सार्वजनिक हिताच्या गोष्टींना मदत होत आहे. त्याच्या देणग्या फार व्यापक दृष्टीनें योजल्या असून अखिल मानवजातीच्या कल्याणासाठीं आहेत.

**राका कुंभार**—एक महाराष्ट्रांतील संत. हा परदेशी जातीचा कुंभार होता. हा वैराग्यशील भक्त असून याच्या कथा भक्तिविजयादि पुराणांत दिल्या आहेत. याच्या बायकोचें नांव बाका किंवा बंका. हा १६ व्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला असावा.

**रॉकी पर्वत**—उत्तर अमेरिकेंतील पश्चिम भागांतल्या फार मोठ्या पर्वतांच्या रांगेला हें नांव आहे. ही रांग न्यू मेक्सिकोपासून उ. ध्रुव समुद्रापर्यंत पसरलेली आहे. या पर्वतांची सर्वसाधारण उंची १३,००० फूट असून सर्वांत उंच शिखरें माउंट लोगन ( १९,५०० फूट ), माउंट सेन्ट एलिअस ( १,८०० फूट ), ब्लँका पीक ( १४,४६४ फूट ), पाइक्स पीक ( १४,१४७ ), लाँग्ज पीक ( १४,२७१ ), ग्रेज पीक ( १४,३४१ ), वगैरे आहेत. या पर्वताचे कोलोरॅडो रेंज, सॅन जॉन रेंज, सॅन्ग्रे डी क्रिस्टो रेंज, युन्टा रेंज, वॅसॅच रेंज, वुइंड रिव्हर रेंज आणि कॅनेडियन रॉकी माउंटन्स इतके निरनिराळे विभाग आहेत.

याच्या उत्तर आणि दक्षिण भागामध्यें एक दरी आहे. तींतून युनियन पॅसिफिक आगगाडीचा फांटा गेला आहे.

**रॉकेल**—केरोसीन. हें पेट्रोलियमपासून तयार होतें. पूर्वी हें कोळशापासून तयार होई, त्यामुळें त्याला कोळशेल (कोल-आइल) असें कोठें कोठें म्हणतात. आज पाश्चात्य देशांत रॉकेलला फारशी किंमत नाहीं, कारण दिव्याच्या कामीं त्याचा उपयोग नाहीं. वीज किंवा वायु यांनीं त्याचें स्थान पटकावलें आहे. गॅसोलिन (वायुतेल) निघाल्यावर तर यंत्रांच्या कामींहि केरोसीनचा उपयोग कमी झाला. तथापि रॉकेल किंवा 'मातीचें तेल' फार प्राचीन काळापासून माहीत आहे. चीन, ईजिप्त यांसारख्या प्राचीन राष्ट्रांतून जाळण्याकडे याचा उपयोग होत असे. उत्तर अमेरिका आणि रशिया या देशांत रॉकेल पुष्कळ सांपडतें. इराण, ब्रह्मदेश व हिंदुस्थान (पंजाब) यांतून थोड्या प्रमाणांत निघतें. रॉकेलपासून जवळजवळ दोनशें निरनिराळे पदार्थ तयार होतात. यापासून मेण, अत्तरें, अस्फाल्ट हे महत्त्वाचे व्यापारी पदार्थ बनतात. पेट्रोल पाहा.

**राखी बुधवार**—(अॅश वेडनसडे). गुडफ्रायडेपूर्वीं जे ख्रिस्ती लोक उपवास करतात त्या उपवासास आरंभ होण्याच्या वेळचा पहिला बुधवार. या बुधवारीं जे लोक पश्चात्ताप करतात व ज्यांस तपश्चर्या करण्याची किंवा व्रत आचरण्याची परवानगी मिळते त्यांच्या डोक्यावर राख टाकली जाते; म्हणून या बुधवारास राखी बुधवार म्हणतात.

**राखीव फौज**—(रिझर्व्ह). इंग्लंडांत १८८२ चा रिझर्व्ह फोर्सेस अॅक्ट या कायद्यानें आर्मी रिझर्व्ह म्हणजे राखीव फौज अस्तित्वांत आली. या फौजेंत ज्या इसमांनीं आपली पहिली ठरलेल्या मुदतीची नोकरी पुरी केलेली आहे अशा इसमांचा समावेश करण्यांत येतो. राखीव फौजेंत नोकरी करण्याची मुदत ९ ते ५ वर्षेपर्यंत निरनिराळी, म्हणजे ज्यानें पूर्वी जितकी कमी-जास्त लष्करी नोकरी केलेली असेल त्या मानानें असते. या राखीव फौजेंतील इसमांना राष्ट्रावर कांहीं आकस्मिक आपत्ति आली तर लष्करी नोकरींत हजर व्हावें लागतें. शिवाय लष्करी कामाची संवय कायम राहावी म्हणून एक वर्षाआड १२ दिवस सैन्यांत हजर होऊन लष्करी कवाईत करावी लागते.

हिंदुस्थानांत 'टेरिटोरियल फोर्स' या तुकडींतला एक भाग म्हणून विद्यापीठांतील विद्यार्थ्यांना कांहीं दिवस लष्करी शिक्षण देत. नंतर हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर 'नॅशनल कॅडेट कोअर' स्थापन करण्यांत आलें. व आतां शाळाकॉलेजांतील निवडक विद्यार्थ्यांसाठीं लष्करी शिक्षणाची तरतूद करण्यांत आली आहे. हे तयार होणारे विद्यार्थी व शिक्षक राखीव सैन्य म्हणून उपयोगी पडेल.

**राग**—ध्वनींची अशी एक विशिष्ट रचना कीं, जिला स्वर व वर्ण यांच्या योगानें सौंदर्य प्राप्त झालें असून ती लोकांचें रंजन करते. या ठिकाणीं स्वर म्हणजे वादीस्वर असा अर्थ घेणें जरूर आहे. रागाच्या लक्षणांत वर्ण आल्यामुळें थाट अथवा मेळ हे निराळे पडतात. कारण त्यांना वर्णाची जरूरी नसते. रागाचे मार्ग आणि देशी असे दोन भेद आहेत. मार्गी रागांत निर्बंध मोडतां येत नाहींत. त्यामुळें हे राग आज प्रचलित नाहींत. देशी रागांत निर्बंध नसून निरनिराळ्या देशांच्या अभिरुचीप्रमाणें ते निरनिराळे असतात. विशिष्ट स्वरांचें महत्त्व, आरोहावरोहाचा विशिष्टपणा व स्वरांचें तीव्रकोमलत्व यांवरून रागांचे अनेक वर्ग पाडण्यांत आलेले आहेत. विशिष्ट प्रकारच्या स्वरसमूहास थाट किंवा मेळ म्हणतात व अशा थाटांपैकीं रंजकतेच्या दृष्टीनें निवडून काढलेल्या समुच्चयास राग म्हणतात.

रागांचें वर्गीकरण निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळे केलेलें आढळतें. कांहीं ग्रंथकार पुरुष, स्त्री, पुत्र, स्नुषा, इ. नांवें देऊन कौटुंबिक वर्गीकरण करतात. हिंदुस्थानी संगीत पद्धतींत दहा थाटांत दीडशें राग साधारणपणें प्रचलित आहेत. (या रागांचें वर्णन त्या त्या नांवाखालीं या कोशांत केलेलें आढळेल).

गायनांत मूळ सप्तसूर आहेत त्यांचीं नांवें—सा, री, ग, म, प, ध, नी. यांचे री सा, सा री असे उलटपालट सूर म्हणून सुमारें ५२०० प्रस्तार होतात. यांजपासून वर्ज्यावर्ज्य पद्धतीनें राग होतात त्यांचीं नांवें—भैरव, मालकंस, परज, सोनी, कालंगडा, हिंडोल, मारू, बसंत, पंचम, ललत, केदार, बिहाग, खमाज, आडाणा, बागेसरी, कानडा, इ.. त्यांच्या पोटीं दरबारी, मियाचा, कौशिक, वगैरे भेद आहेत. तसेंच कल्याणांतहि नऊ भेद आहेत:—शाम, यमन, पूर्वी, शुद्ध, हमीर, जयत, मोहन, कमोद आणि भूप. श्रीरागांत सहा भेद आहेत: जयताश्री, दीपश्री, मालवश्री, पूर्वीश्री, धवलाश्री, आणि ललताश्री. शिवाय सोरट, पिलू, मुलतानी, देस, मालव, गुर्जरी, शहाणा, सरपर्दा, तोडी, शंकराभरण, जोगी, बागेसरी, धनासरी, मार्वा, केदार, निषापुरी, काफी, झिंझुटी, बिभास, सिंधी, अलैय्या, तैलंग, बिलावल, वगैरे आहेत. यांतील तोडीचे भेद पांच आहेत:—देशी, जीवनपुरी, मियाचा, लक्ष्मणपुरी आणि आसावरी; शिवाय खट, रामकली, गुणकरी, सुगराई. बिलावलचे तीन भेद: यमन बिलावल, कोकब बिलावल व मियाचा बिलावल. सारंगाचेहि भेद तीनच आहेत: वृंदावनी, मधुमाध व गौड. मल्हाराचे पांच भेद आहेत: मियाचा, गौड, सूर, मेघ व देशी; शिवाय सोरट, धनाश्री, अहंग, मधुमाधवी, वगैरे. बहाराचे भेद चार: वसंताचा, बागेसरीचा, कानड्याचा व केदाराचा;

याशिवाय अनंत, भैरवी, कांमोज, जयजयवंती, दीपचंदी, खुरजन, गेहनावती, वगैरे.

राग अनेक असून ते केव्हां केव्हां म्हणावे याच्या वेळा व ऋतू जाणत्या लोकांनीं ठरविले आहेत. त्यांत मुख्य राग व रागिण्या यांत आमेज, धनु, वगैरे भेद आहेत. गायनाच्या वाण्या चार आहेत: नारद, तुंबर, रंभा व गंधर्व. शिवाय गोबर, हार, खडार, डागर, त्रिंदाचनी, वगैरे आहेत. यांस जे ताल असतात त्यांत आदिताल, चौताल, झंपा, चिलंदी, त्रिवट, वगैरे नांवें आहेत. स्वर केवळ नादब्रह्म असून त्यांचेलगत चर्मतारादि युक्त अनेक वाद्यें कंठास साहाय्य करतात. मृदंग, सारंगी, सतार, सारमंडळ, बीन, ताऊस, रुद्रवीणा, वगैरे वाद्यें हीं गायनशास्त्रास आणखी साहाय्य करतात. यासंबंधानें मनुष्याची एक एक वाद्यांत चांगली प्रगति होण्यास बराच काळ लागतो.

रागाच्या रसानुकूल वेळा—

(१) प्रातःकाल ४–९ पर्यंत —प्रभात, बिभास, ललित, भैरव, भैरवी, बिलावल, आसावरी, तोडी, सुवासुधराई.

(२) दोन प्रहर ९–३ पर्यंत—सारंग, गौडसारंग, गौडमल्हार, गौड.

(३) सायंकाल ३–७ पर्यंत—मल्हार, मुलतानी, पिलू, भीमपलासी, धनाश्री, पूर्वी, पूरिया, श्री, गौरी.

(४) रात्रीं ७ ते १२ पर्यंत—कल्याण, बिहाग, भूपाली, हमीर, केदार, देस, कामोद, दरबारी कानडा, तिलंग, मालकंस, जयजयवंती, काफी, शंकरा, वडहंस, तिलककामोद, बरवा.

(५) उत्तररात्रीं—बहार, बागेश्री, परज, सोहनी, कालिंगडा, वसंत, हिंडोल.

(६) कोणत्याहि वेळीं लायक—खमाज, काफी, झिंझोटी, गारा, मांजी, पहाडी, आसा, मांड, आसा-मांड, छाया-खमाज, सिंधोरा, सिंध-काफी, वृंद.

**रांगणा किल्ला**—हा सह्याद्रीच्या सपाट माथ्याच्या फांट्यावर बांधलेला आहे. उंची २६०० फूट. हा भूधरगडच्या नैर्ऋत्येस ३० मैलांवर व कोल्हापूरच्या नैर्ऋत्येस ५५ मैलांवर आहे. याची उत्तरेकडील चढण सोपी असून बाकीच्या तीन बाजूंची फार अवघड आहे. लांबी ४७५० व रुंदी २२४० फूट आहे. आंत वस्ती नाहीं. १६५९ मध्यें हा शिवाजीनें घेतला. यास प्रसिद्धगड असेंहि नांव आहे. १८४४ मधील गडकऱ्यांच्या बंडांत हा सामील झाल्यामुळें याची तटबंदी पाडून टाकण्यांत आली. शिलाहार भोजानें बांधलेल्या १५ किल्ल्यांत हा मोडतो.

**रांगामाती**—बंगाल, मुर्शिदाबाद जिल्ह्यांतील एक प्राचीन शहर. हें बऱ्हामपूरच्या दक्षिणेस ६ मैलांवर भागीरथीच्या तीरावर वसलें आहे. येथें ६३९ च्या सुमारास ह्युएनत्संग हा चिनी प्रवासी आला होता. ईस्ट इंडिया कंपनीचा येथें एक रेशमाचा कारखाना होता.

**रागी**—नागली, नाचणी पाहा.

**रागेश्वरी**—हा राग खमाज थाटांतून निघतो. याच्या आरोहांत ऋषभ व पंचम हे स्वर वर्ज्य आहेत, व अवरोहांत फक्त पंचम वर्ज्य होतो, म्हणून याची जाति औडुव-षाडव होते. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर आहे. या रागांतील मध्यम व धैवत या स्वरांची संगति रक्तिदायक आहे. या रागांत तीव्र गांधार असल्यानें बागेसरी रागापासून हा सहजच निराळा राहूं शकतो. या रागाच्या अवरोहांत ऋषभ स्वर लागतो त्यामुळें दुर्गा रागापासून तो स्पष्टपणें भिन्न भासतो; कारण दुर्गा रागात ऋषभ अजीबात वर्ज्य आहे. अवरोहांत धैवत वक्र ठेवावा असें कांहींचें मत आहे. हा राग अप्रसिद्ध रागांपैकीं एक आहे.

**रांगोळी**—स्त्रिया एखाद्या दगडाच्या किंवा धान्याच्या पिठानें जमिनीवर ज्या विविध आकृती काढतात त्यांस म्हणतात. हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांतून ही रांगोळीची कला आढळते. जमीन सारवल्यावर ती तशी ठेवूं नये म्हणून रांगोळीच्या रेघा किंवा कांहीं आकृती काढतात. चैत्र महिन्यांत कांहीं बायका अंगण किंवा त्याचा एक भाग रोज सकाळीं सारवून त्यावर धार्मिक चिन्हें काढतात. मेजवानीच्या प्रसंगीं व सणावारीं जेवणाच्या पानांभोंवतीं मंहिरापदार रांगोळी काढतात. याप्रमाणें ही घरगुती चित्रकला फार पूर्वीपासून आपल्याकडे स्त्रियांमध्यें होती. आज दिवाळीनंतर त्रिपुरी पौर्णिमेच्या सुमारास देवळांतून कांहीं कलावंत विविध रंगांच्या पुडींनीं निरनिराळे देखावे काढतात. त्यांना 'गालिचे' म्हणतात. हौदांतील पाण्यावरहि असे गालिचे काढण्यांत येतात. पण ठिपक्यांची रांगोळी शिरगोळ्याच्या पिठानें काढण्याची स्त्रियांची पद्धत विशेष संस्मरणीय व पुनरुज्जीवनास योग्य अशी आहे. जुन्या घरगुती कला जाऊन आज शाळेंत रेखाकला शिकविण्यांत येतात. पण त्यांचा व्यवहारांत फारसा उपयोग होत नाहीं, हें कटु सत्य आहे.

**राघवगड**—राघूगड. मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. हें माळव्यांत खीचवाडा जिल्ह्यांत आहे. १६७७ त लालसिंग खीची यानें बांधलेल्या राघवगड किल्ल्यावरून नांव पडलें. संस्थान फार लहान आहे, पण मराठ्यांच्या इतिहासांत याचे उल्लेख येतात. महादजी शिंद्यांशीं राघवगडच्या सरदारांचे खटके उडत. लो. सं. सुमारें वीस हजार. भाषा रांगडी आहे.

**राघवचैतन्य** (१६ वें शतक)—एक संतकवि. याचें पहिलें नांव रंगनाथ. याचें वास्तव्य गिरनार पर्वताच्या

पायथ्याशीं असे. उत्तरेकडे यवनी अमल जसजसा वाढूं लागला तसतसा त्यांचा जुलूम लोकांना असह्य होऊं लागला. तेव्हां यानें आपल्या बापास यवनांच्या नोकरीचें जूं उडवून देण्याबद्दल सांगितलें. पण त्यानें याचें म्हणणें न मानल्यानें यानें गृहत्याग केला व हिंदु धर्मावरील या यवनी संकटाचा नायनाट करण्यासाठीं प्रथम गिरनार पर्वतावर व नंतर जुन्नरजवळच्या अंकुशधार पर्वतावर कडकडीत तपाचरण केलें. या वेळीं व्यासानें यास दर्शन देऊन उपदेश केला म्हणतात. यानें मायाविचार, ब्रह्मस्वरूप, निराकार मन, बुद्धिविकास, इंद्रियदमन, त्रिगुणलीला, वगैरे नऊ ग्रंथ लिहिले आहेत. विरक्त झाल्यानंतर गुलबर्ग्यास यानें कांहीं दिवस आपलें वास्तव्य ठेवलें होतें. निरंजन कवीच्या केशवचैतन्य-चरित्र या ग्रंथांत याची समाधि गुलबर्ग्यापासून दीड योजनावर असलेल्या आळंदगुंजोटी या गांवीं असल्याबद्दल लिहिलें आहे. याचा शिष्य केशवचैतन्य होय.

**राघवांक** ( सु. ११६५ )— एक कानडी कवि. हा हरिश्चंद्रकाव्य, सोमनाथचरित, सिद्धरामपुराण, शरभचरित्र, हरिहरमहत्त्व व वीरेश्वरचरित या ग्रंथांचा कर्ता तुंगभद्रेच्या कांठीं पंपापुरीं जन्मला. हंपीच्या विरूपाक्षावर याची भक्ति होती. हरीश्वर हा याचा गुरु व मामा. यानें हरिश्चंद्रकाव्य लिहून एका मनुष्याची स्तुति केली हें हरीश्वरास सहन न होऊन त्यानें याच्या तोंडांत भडकावली व त्यामुळें याचे पांच दांत पडले. परंतु त्यानंतर यानें शिवस्तुतिपर चार काव्यें लिहिल्यावर याचे पांच पडलेले दांत पुन्हा आले असें सांगतात. याच्या हरिश्चंद्रकाव्याबद्दल पंपापुरच्या देवराज राजानें याची वाहवा केली. यानंतर हा पद्मरस-दीक्षा बोधे या कानडी ग्रंथाचा कर्ता व नरसिंह बल्लाळाचा मंत्री कैरेय यास भेटण्यासाठीं होयसळनगरला म्हणजे द्वारसमुद्रास गेला. कानडींतील षट्पदी वृत्ताचा कर्ता हाच होय. बेलूर येथें हा मरण पावला.

**राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर**—एक प्रसिद्ध टीकाकार. हा उत्तर पेशवाईंत होऊन गेला. याने परिभाषेंदुशेखरावर 'त्रिपथगा' नांवाची टीका, लघुशब्देंदुशेखरावर 'विषमी' नांवाची टीका, मनोरमाशब्दरत्नाकरावर 'चंद्रिका' नांवाची टीका, विष्णुसहस्रनामटीका, गीताभाष्य, उपनिषद्भाष्य व पिष्टपशुमीमांसा, इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत. याचे वंशज सातारला असतात.

**राघो बल्लाळ अत्रे**—शिवाजीचा एक सरदार. हा पुणें, पन्हाळा, कल्याण, राजापूर, वगैरे प्रांतांचा सुभेदार होता. चंद्रराव मोरे व सिद्दी यांच्याशीं झालेल्या लढाईंत याचें शौर्य व कर्तबगारी शिवाजीस दिसून आल्यानें त्यानें यास आपल्या पठाण पलटणीच्या आधिपत्याचा पहिला मान दिला.

**रांची**—बिहार, एक जिल्हा. क्षे. फ. ७,१५९ चौ. मै.. जिल्ह्यांत दोन मोठीं मैदानें आहेत. त्यांत इमारती लांकूड होतें. वायव्य भागांत डोंगरांच्या रांगा आहेत. जिल्ह्यांत प्रेक्षणीय धबधबे आहेत. सुवर्णरेखा व कोल या मुख्य नद्या आहेत. दऱ्यांतून तांदूळ पिकतो. अभ्रक व लोखंड सांपडतें. लाख तयार करण्याचे पुष्कळ कारखाने आहेत. लोहार डागा येथें भांडीं होतात. लो. सं. ( १९४१ ) १६,७५,४१३. ओरावन, मुंडा व खरिया या असंस्कृत जाती आहेत.

यांतील ओरावन लोकांना प्रथम नागवन्सी राजांनीं जिंकलें. १५८५ त हा प्रदेश अकबराकडे आला. यावर मराठ्यांच्या स्वाऱ्या होत. १७६५ त ईस्ट इंडिया कंपनीकडे कारभार गेला. तथापि नागवन्सी राजांचे कांहीं हक्क राहिलेच होते. १८५७ च्या शिपाई युद्धांत राजानें इंग्रजांना मदत दिली होती.

रांची शहर बंगाल-नागपूर आगगाडीच्या फाट्यावर आहे. बिहार सरकारचें हें उन्हाळी राजधानीचें ठिकाण आहे. येथें रिसाला असतो. बरींच हायस्कुलें व शाळा आहेत. लो. सं. सुमारें ५५,०००. बंगालमधील मिशनरी लोकांचें हें मुख्य ठिकाण असे.

**रॉचेस्टर**—अमेरिकन सं. संस्थानें. हें शहर न्यूयॉर्क संस्थानांतील गेनेसी नदीच्या कांठीं आहे. येथें पुष्कळ जलविद्युच्छक्ति निर्माण करण्यांत येते, व त्या शक्तीनें पुष्कळ पिठाच्या गिरण्या चालतात. येथें फोटोग्राफीचे आणि डोळ्याच्या चष्म्यांना लागणारे जिन्नस फार मोठ्या प्रमाणावर तयार होतात. लो. सं. सु. साडेतीन लाख. वंगण तेल ( लुब्रिकेटिंग ऑइल ) येथें मोठ्या प्रमाणांत तयार करतात.

**राजकुंवर**—नानीबाई. ही शिवाजीची सगुणाबाईपासून झालेली मुलगी असून ती गणोजी राजे शिर्के मळेकर यास दिली होती. शिवाजीनें आपला जांवई मळेकर यास दाभोळची देशमुखी देऊं केली होती. ( गणोजी शिर्के पाहा. )

**राजकोट संस्थान**—मुंबई, काठेवाडांतील एक प्रमुख संस्थान. क्षे. फ. २८३ चौ. मै.. प्रदेश फार उंचसखल व खडकाळ आहे. पुष्कळ लहान नद्या यांतून वाहतात. हवा निरोगी आहे. पाऊस सुमारें २५ इंच पडतो. संस्थानांत राजकोट शहर व ६० खेडीं आहेत. सर्वसाधारण धान्यें, ऊंस व कापूस पिकतो. सुती व लोंकरी कापडाचा मोठा व्यापार चालतो. लो. सं. १,०३,०३३. राजघराणें जाडेजा रजपुतांचें आहे. सध्यांचे ठाकूरसाहेब श्रीप्रद्युम्नसिंह १९४० सालीं गादीवर बसले. यांस ९ तोफांच्या सलामीचा मान आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें १४ लाख आहे. आतां हें संस्थान सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे.

राजकोट ही राजधानी काठेवाडांत प्रमुख शहर आहे. या ठिकाणीं पुष्कळ उद्योगधंदे चालतात. शिक्षणाच्या बाबतींत सबंध काठेवाडांत हें पहिलें शहर आहे. तीनचार कॉलेजें व तेवढींच हायस्कुलें आहेत. राजकुमार कॉलेज १८७० पासून चाललें आहे. स्त्रियांसाठीं स्वतंत्र मोठें इस्पितळ आहे. दोन-तीन गिरण्या आहेत. लो. सं. सुमारें तीस हजार.

**राजखेकडा**—( किंग क्रॅब ). हा अग्रपाद वर्गांतील खड्गपुच्छ जातीच्या प्राण्यांपैकीं एक आहे. हा पॅसिफिक व ॲटलांटिक महासागरांत उथळ पाण्यांत आढळतो. याचें डोकें नालाच्या आकाराच्या रुंद ढालीसारखें असून त्याच्या वरच्या पृष्ठभागावर दोन डोळ्यांच्या जोड्या असतात. याचें तोंड खालच्या बाजूस उघडतें व त्याच्या सभोंवतीं सहा अवयवांच्या जोड्या जोडलेल्या असतात. दुसरा एक ढालीसारखाच भाग पोटावर आच्छादिलेला असतो व त्याच्या खालीं फुफ्फुसें असतात. यांची सरासरी लांबी दोन फूट असते. खेकडा पाहा.

**राजगड**—राजपुताना, अलवार संस्थान, राजगड जिल्ह्यांतील मुख्य ठिकाण. हें अलवार शहराच्या दक्षिणेस २२ मैलांवर आहे. याची स्थापना १७६७ त अलवार संस्थानचा संस्थापक प्रतापसिंग यानें केली. शहरांत पुष्कळ सुंदर इमारती आहेत. जुनें राजगड जवळच आहे. तेथें पुष्कळ जुने शिल्पाचे अवशेष सांपडतात.

**राजगड किल्ला**—मुंबई, भोर संस्थानच्या हद्दींतील एक प्रसिद्ध किल्ला. हा पुण्याच्या दक्षिणेस सुमारें ४० मैलांवर आहे. हा १६४८ त शिवाजीनें बांधला. रायगड राजधानी होण्यापूर्वी येथेंच शिवाजीची राजधानी होती. हा कांहीं काळ मोंगलांच्या ताब्यांत होता. राजारामाचा जन्म १६७० त याच गडावर झाला. १७०४ पासून हा किल्ला पंतसचिवांकडे आहे.

**राजगड संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या भोपाळ एजन्सींतील एक संस्थान. क्षे. फ. ९६२ चौ. मै., लो. सं. सुमारें सव्वा लाख. संस्थानांत राजगड आणि बीत्रार हीं दोन शहरें व ७२८ खेडीं आहेत. शें. ८९ हिंदू आहेत. मुख्यत्वें भिल्ल लोक आहेत. माळवी भाषा प्रचारांत आहेत. धान्य व अफू या मुख्य व्यापारी जिनसा आहेत. संस्थानिक उमत रजपूत हे परमार घराण्यांतील आहेत. १६८१ मध्यें संस्थानची विभागणी राजगड आणि नरसिंगगड या दोन संस्थानांत झाली. १८ व्या शतकांत हीं संस्थानें मराठ्यांच्या ताब्यांत गेलीं होतीं. पण पुढें इंग्रजांच्या मध्यस्थीनें संस्थान चालू होऊन त्याचें मांडलिक बनलें. संस्थानिकांना ११ तोफांची सलामी मिळते. उत्पन्न सुमारें सात-आठ लाखांचें आहे. आतां हें संस्थान मध्य भारत संघांत सामील झालें आहे.

राजधानी राजगड उज्जैन-भोपाळ रेल्वे फांट्यावरच्या शुजालपूर स्टेशनापासून ५७ मैल दूर आहे. हें शहर १६४० सालीं रावत मोहनसिंगानें वसविलें.

**राजगिरा**—एक धान्य. याचें पीक गुजराथ आणि मोंगलाई प्रदेश यांतून फार होतें. हें धान्य स्वतंत्रपणें लावीत नसून इतर धान्यांत बीं टाकून करतात. पानांची भाजीहि होते. राजगिरा ( बीं ) उपवासाला खातात. पांढरा, तांबडा, काळा याप्रमाणें रंग असतात. राजगिऱ्याच्या लाह्या चांगल्या होतात. धान्य शीतल व जड आहे. खांद्रक लवकर फुटण्यास देंठ उगाळून लावतात.

**राजगीर**—( राजगृह ). बिहार, पाटणा जिल्ह्यांतील प्राचीन शहर. याला गिरिव्रज असेंहि नांव आहे. ही मगध देशाची राजधानी असे. फाहिआन व ह्युएनत्संग येथें येऊन गेलेले आहेत. येथील टेंकड्यांवर जुने अवशेष व लेख सांपडतात. उष्णोदकाचे झरे सरस्वती नांवाच्या प्रवाहाच्या बाजूस आहेत.

**राजगुरु, शिवराम हरि** ( १९०८–१९३१ )—एक महाराष्ट्रीय क्रांतिकारक. यांचा जन्म पुणें जिल्ह्यांतील खेड या गांवीं झाला. यांनीं काशीस जाऊन संस्कृत भाषेचें अध्ययन केलें व तर्कशास्त्राची मध्यमा परीक्षा हे उत्तीर्ण झाले. यांस सामान्यतः मर्दानी खेळांची फार आवड असे. उमरावती येथील हनुमान व्यायाम शाळेंत यांनीं लाठीचें वगैरे शिक्षण घेतलें होतें व कांहीं दिवस ते डॉ. हर्डीकर यांच्या सेवादलांतहि दाखल झाले होते. काशीस राहत असतांनाच त्यांचा 'हिंदुस्थान रिपब्लिकन पार्टी'शीं संबंध आला व चन्द्रशेखर आझाद, महावीरसिंग, भगतसिंग, सुखदेव, जयगोपाळ, वगैरेंबरोबर ते एम्. या टोपण नांवानें काम करूं लागले. ता. १७-१२-१९२८ रोजीं लाहोर येथें जो सॉंडर्सचा खून झाला तो यांनींच केला. याखेरीज नॅशनल बॅंकेवर दरवडा घालणें, जोगेश चतर्जींची सुटका करणें, वगैरे कामांत त्यांनीं भाग घेतलेला होता. त्यांना लाहोर येथें २३ मार्च १९३१ रोजीं फांशीं देण्यांत आलें.

**राजगोपालाचारी, चक्रवर्ती** ( १८७९- )—एक हिंदी पुढारी, राजकारणी पुरुष व पहिले हिंदी गव्हर्नर जनरल. यांचें शिक्षण बंगळूर येथील सेंट्रल कॉलेज व मद्रास येथील लॉ कॉलेज यांमध्यें झालें. यांनीं प्रथम सालेम येथें वकिली सुरू केली. १९१७ ते १९१९ मध्यें हे सालेम म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. १९२० मध्यें यांनीं गांधीप्रणीत असहकारिता करून वकिली

सोडून दिली. १९२१ मध्यें यांस वेलोर येथें अटक होऊन शिक्षा झाली. महात्मा गांधी तुरुंगांत असतांना यांनीं 'यंग इंडिया' पत्राचें संपादन केलें. सत्याग्रह समितीचे सभासद असतांना यांनीं कायदेमंडळावरील बहिष्काराचा जोरानें पुरस्कार केला. १९२२ सालीं गया येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत हे नाफेर पक्षाचे पुढारी होते. या वेळीं फेरपक्षाचे पुढारी बॅ. चित्तरंजन दास होते. १९३० सालीं काँग्रेसनें पुकारलेल्या सत्याग्रहांत भाग घेतल्यामुळें यांस २१ महिन्यांची तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३२ सालीं यांस पुन्हां शिक्षा झाली. १९३२ सालीं येरवडा येथें गांधी–आंबेडकर यांच्यामध्यें झालेला करार घडवून आणण्यासाठीं यांनीं फार परिश्रम केले. तसेंच १९३३ मध्यें अस्पृश्यता–निवारण करण्यासाठीं कायदेमंडळांत बिलें आणण्याचीहि यांनीं खटपट केली. तसेंच हरिजन–सुधारणेसाठीं महात्मा गांधी यांनीं सुरू केलेल्या चळवळींत यांनीं भाग घेतला. १९३३ च्या सत्याग्रहाच्या चळवळींत यांस पुन्हां एकदां शिक्षा झाली. यांनीं मिचेनगोड येथें एका गांधी आश्रमाची स्थापना केली. हे मद्यपान-प्रतिबंधक (प्रोहिबिशन लीग) सभेचे व कॉंग्रेसच्या मद्यपानबंदीच्या चळवळीचे कार्यवाह होते. अखिल भारतीय काँग्रेस वर्किंग कमेटीचे हे सभासद होते. परंतु डॉ. राजन् यांच्याबरोबर मतभेद झाल्यामुळें यांनीं राजीनामा दिला. १९३६ मध्यें हे कॉंग्रेस पक्षातर्फे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें गेले. व पुढें मद्रास असेंब्लींत जाऊन प्रधान मंत्री झाले. पुढे महात्मा गांधी यांच्याशीं पाकिस्तानविषयक धोरणामध्यें मतभेद झाल्यामुळें यांनीं राष्ट्रीय सभा सोडून दिली व हिंदु–मुसलमान ऐक्याचा प्रयत्न करीत राहिले. मध्यवर्ती हंगामी मंत्रिमंडळांत व पुढेंहि हे एक मंत्री होते (१९४६–४७). नंतर यांना प. बंगालचे गव्हर्नर करण्यांत आलें. लॉर्ड मौंटबॅटननंतर हे स्वतंत्र भारताचे पहिले गव्हर्नर जनरल झाले (१९४८–५०). आतां पुन्हां मध्यवर्ती सरकारांत एक मंत्री म्हणून आहेत. हे चांगले लेखक व साहित्यिक म्हणूनहि प्रसिद्ध आहेत.

**राजचंडेश्वर रस**—एक आयुर्वेदीय रसायन. पारा १, गंधक १, बचनाग १, हिंगूळ २ या प्रमाणांत एकत्र करून निर्गुंडी आणि आलें यांच्या रसाची भावना द्यावी. नंतर मात्रा गुंजप्रमाण करावी. ही मात्रा आल्याचा रस व मध हीं एकत्र करून त्यांत द्यावी. याच्या सेवनानें तात्काल ज्वरशांति होते.

**रांजणगांव**—मुंबई, पुणें जिल्हा, शिरूर तालुक्यांतील एक गांव. हें महाराष्ट्रांतील प्रसिद्ध अष्टविनायकांतील एका गणपतीचे स्थान आहे. गणेश-चतुर्थीस जत्रा भरते. देऊळ हेमाडपंती धर्तीवर बांधलेलें आहे. पण आज पडीक आहे.

**रांजणवाडी**—डोळ्यांच्या पापणीवर एखाद्या केंसाच्या मुळाशीं पू उत्पन्न झाल्यास एक लहानशी पुटकुळी येते, तीस रांजणवाडी म्हणतात. हिचा उद्भव होत असतांना शेक द्यावा व पू उत्पन्न झाल्यास फोड फोडून पू बाहेर काढावा. यांचा वरचेवर उद्भव होऊं लागल्यास रोगी अशक्त झाला आहे असे समजावें.

**राजतरंगिणी**—या संस्कृत ग्रंथांत काश्मीरचा जुना इतिहास दिलेला आहे. याचा कर्ता कल्हण (पाहा) १२ व्या शतकांत होऊन गेला. कल्हणानें या राजांच्या तरंगिणीं (प्रवाहां)त पांडवकालापासून पुढें तीन हजार वर्षांत झालेल्या राजांच्या कारकीर्दी वर्णिल्या आहेत. याचे सात हजार श्लोक आहेत. या ग्रंथाचें ऐतिहासिक महत्त्व फार आहे. जहांगीर बादशहानें याचें फारसी भाषांतर करविलें. फ्रेंच भाषेंत गेल्या शतकात भाषांतर झालें. नंतर १९०० सालीं डॉ. स्टीन यानें इंग्रजींत भाषांतर केलें. मराठींत श्री. मा. त्र्यं. लेले यांनीं केलेलें भाषांतर चित्रशाळेनें प्रसिद्ध केलें आहे. मूळ काव्य शारदा लिपींत आहे.

**राजताटस्थ्य**—(लेसे फेर). याला व्यक्तिवाद असाहि प्रतिशब्द आहे. अर्थशास्त्रांतील हा एक सिद्धांत असून सरकारनें उद्योगधंद्यांत कोणतीहि ढवळाढवळ करूं नये (फ्रेंच लेसे फेएर = तसेंच राहूं द्या) असें हा बजावतो. जें सरकार आपली सत्ता जाणवूं देत नाहीं तें सरकार उत्कृष्ट होय. सरकारचें काम केवळ शांतता ठेवण्याचें आहे असे या सिद्धांतावरून दिसतें. ॲडम स्मिथ, बेन्थॅम आणि उपयुक्ततावादी पंडित, यांनीं याला उचलून धरलें. कारखान्यांच्या नियंत्रणाचे कायदे, मजूर संघांना मान्यता, यांसारख्या गोष्टी याना वावड्या वाटतात. तथापि आज हा सिद्धांत मागे पडला आहे. मजूर व उद्योगधंदे यांसंबंधीं झालेले कायदे पाहिल्यास सरकारी हात देशांतील उद्योगधंद्यांत फार पुढें गेला आहे हें दिसून येईल. सर्व उद्योगधंदे राष्ट्रीय पाहिजेत अशा विचाराचें वारें आज वाहत आहे.

**राजद्रोह**—फितुरी. (इं. ट्रीझन). या शब्दाचे दोन अर्थ आहेत : राजद्रोह म्हणजे राजसत्ताक पद्धति (मॉनर्की) जेथें असेल तेथे राजाशीं राजनिष्ठ न राहणे किंवा फितुरी करणें असा एक अर्थ आहे आणि दुसरा लोकशाही राज्यपद्धति (रिपब्लिक) जेथें असेल तेथें लोकशाही पद्धतीविरुद्ध किंवा सर्व राष्ट्राविरुद्ध फितुरीचें किंवा राष्ट्रद्रोहाचें कृत्य करणें, असा अर्थ आहे. इंग्लंडांत राजद्रोहासंबंधींचा कायदा तिसरा एडवर्ड राजा याच्या कारकीर्दींत मंजूर झालेला हल्लीं जो लागू आहे तो असा– १. राजद्रोह म्हणजे राजाचा, राणीचा किंवा युवराजाचा, किंवा राज्यावरील वारसाचा खून करणें, किंवा खुनाचा प्रयत्न किंवा बेत करणें; २. इंग्लंडच्या शत्रूंना सामील असणें व शत्रूंना मदत

करणें किंवा त्यांच्या हिताचें कोणतेंहि कृत्य इंग्लंडांत किंवा इतर कोठेंहि करणें; आणि ३. चॅन्सेलर, ट्रेझरर, वगैरे मंत्र्यांचा खून करणें. १८४८साली व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीत ट्रीझन-फेलनी या गुन्ह्यांसंबंधीं कायदा झाला तो असा— १. राज्याचे अधिकार किंवा विशेष हक्क (प्रिरॉगेटिव्ह) नष्ट करण्याचा प्रयत्न करणें, योजना करणें, किंवा तसा हेतु असणें; २. राजानें आपल्या राज्यकारभाराच्या योजना बदलाव्या म्हणून त्याच्या विरुद्ध देशांत यादवी माजविणें; ३. पार्लमेंटच्या लॉर्ड सभेला किंवा कॉमन्स सभेला धमकी देणें; व ४. ब्रिटिश साम्राज्याच्या कोणत्याहि भागांत स्वारी करण्याबद्दल चिथावणी देणें.

हिंदुस्थान— इंडियन पीनल कोडमध्यें (कलम १२१) इंग्लंडच्या राजाविरुद्ध युद्ध करणें, किंवा युद्धाचा प्रयत्न करणें, किंवा अशा युद्धाला मदत करणें, या गुन्ह्याला फांशीची किंवा जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा आणि दंड अशी शिक्षा आहे. कलम १२१ (अ)मध्यें कलम १२१ मधील गुन्हा करण्याचें संगनमत करणें, किंवा हिंदुस्थान सरकारला किंवा कोणत्याहि प्रांतिक सरकारला अत्याचारी मार्गांनीं दहशत घालण्याचें संगनमत करणें, या गुन्ह्याला जन्मठेप किंवा कमी मुदतीची काळ्या पाण्याची शिक्षा, किंवा दहा वर्षें कैद आणि दंड, अशी शिक्षा आहे. तसेंच इंग्लंडच्या राजाविरुद्ध युद्ध करण्याकरितां हत्यारें किंवा दारुगोळा किंवा माणसें जमा करणें, किंवा इतर प्रकारें तयारी करणें, या गुन्ह्याला १२१ (अ) कलमांतल्याप्रमाणें शिक्षा आहे (कलम १२२). वरील प्रकारचें युद्ध करण्याचा गुन्हा करण्याचा कट झाला असेल तर तो कट छपवून अशा युद्धास मदत करण्याचा गुन्हा करणाराला दहा वर्षें कैद व दंड ही शिक्षा आहे (कलम १२३). हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल किंवा प्रांतिक गव्हर्नर, किंवा त्यांच्या कौन्सिलचा सभासद यांनीं आपले कायदेशीर अधिकार अमलांत आणूं नये म्हणून त्यांच्यावर अत्याचार करील, किंवा अत्याचार करण्याची धमकी देईल, त्या गुन्हेगाराला सात वर्षें कैद आणि दंड, अशी शिक्षा आहे (कलम १२४).

पीनल कोडात मूळ १८६० सालीं फौजदारी कायदा घातला, त्या वेळीं एकंदर कलमें ५११ होतीं व तीच संख्या अद्याप कायम आहे व नंतर वेळोवेळीं पीनल कोडांत दुरुस्त्या झाल्या. त्या दुरुस्त्या मूळ कलमांतच अ, ब, क, वगैरे अक्षरें जोडून करण्यांत आल्या. त्याप्रमाणें १२४ कलमाला १२४ (अ) हें दुरुस्त कलम १८९८ सालीं जोडण्यात आलें, आणि 'राजद्रोह' हा गुन्हा फार व्यापक करण्यांत आला. तो गुन्हा असा— जो कोणी इसम तोंडीं किंवा लेखी शब्दांनीं, किंवा चिन्हांनीं, किंवा इतर रीतीनें हिंदुस्थानचा बादशहा किंवा हिंदुस्थानचें कायदेशीरपणें प्रस्थापित झालेलें सरकार यांच्याविषयीं द्वेष (हेट्रेड), तिरस्कार (कन्टेम्प्ट) किंवा अप्रीति (डिस्अफेक्शन) उत्पन्न करील, किंवा उत्पन्न करण्याचा प्रयत्न करील, त्या गुन्हेगाराला जन्मठेप काळें पाणी आणि दंड, किंवा तीन वर्षें कैद आणि दंड, किंवा नुसता दंड, ही शिक्षा आहे (१२४ अ). हिंदुस्थानांत स्वराज्याची व स्वातंत्र्याची चळवळ सुरू झाल्यामुळें १९४५ सालापर्यंत या कलमान्वयें लोकमान्य टिळकांपासून शेंकडों हिंदी देशभक्तांना कैद किंवा काळें पाणी या जबर शिक्षा झाल्या आहेत; व त्यामुळें हें १२४ (अ) कलम हिंदी आबालवृद्ध रयतेला माहीत झालें आहे.

**राजनांदगांव**—मध्यप्रांत, नांदगांव संस्थानची राजधानी. हें मोठें व्यापारी गांव आहे. राजवाडा, बागा, गिरण्या, शाळा, वगैरेंच्या इमारती आहेत. शिवनाथ नदीचें पाणी गांवांत घेतलें आहे.

**राजनिष्ठा**— प्रत्येक प्रजाजनाला किंवा नागरिकाला आपल्या देशाच्या सरकारशीं आज्ञाधारक असावें लागतें. त्या आज्ञाधारकपणाला राजनिष्ठा असें म्हणतात. प्रजेनें राजनिष्ठ राहिलें पाहिजे हा दंडक फार जुना म्हणजे शासनसंस्था सुरू झाल्यापासूनचा आहे. राजा किंवा सरकार याविरुद्ध जो वागेल तो राजद्रोही समजून त्याला शिक्षा केली जाते. यासंबंधीं कायदे केलेले असतात (राजद्रोह पाहा). इंग्लंडच्या कायद्याचें असें तत्त्व आहे कीं, जो जन्मतः इंग्लंडचा प्रजाजन आहे त्यानें नेहमीं सरकारशीं राजनिष्ठ राहिलें पाहिजे, आणि या कर्तव्यांतून तो प्रजाजन कोणत्याहि रीतीनें मुक्त होऊं शकत नाहीं. १८७० सालीं नागरिकीकरण कायदा (नॅचरलायझेशन ॲक्ट) होऊन असा निर्बंध घातला आहे कीं, कोणत्याहि ब्रिटिश प्रजाजनाला किंवा इंग्लंडांत राहिल्यामुळें इंग्लंडचा प्रजाजन बनलेल्या कोणत्याहि परदेशीय इसमाच्या मुलांना युद्धकाळांत ब्रिटिश नागरिकत्व रद्द करून इंग्लंडचें शत्रुत्व पत्करतां येणार नाहीं. इंग्लंडांत राहणाऱ्या परकी इसमानें सुद्धां इंग्लंडच्या सरकारशीं राजनिष्ठ राहिलें पाहिजे.

**राजन्यायालय**—(प्रिव्ही कौन्सिल). ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं सरकारी कामकाजांत सल्ला घेण्याकरितां आणि आपल्या राज्याचें संरक्षण आणि उच्च दर्जा कायम राहावा म्हणून मदत करण्याकरितां नेमलेलें सल्लागार मंडळ असा प्रिव्ही कौन्सिलचा अर्थ आहे. नॉर्मन राजे 'क्यूरिया रेजिस' या नांवाचें मंडळ नेमून त्या मंडळाच्या हातीं सल्ला, अमलबजावणी व न्यायदान या तिन्ही प्रकारच्या सत्ता या कौन्सिलला देत असत. पहिल्या एडवर्डच्या कारकीर्दीत हें कौन्सिल व्यवस्थित स्वरूपांत स्थापन

झालें. चौथ्या हेन्रीच्या वेळीं या मंडळांत तीन बिशप, नऊ उमराव ( पीअर्स ) व सात कॉमन्स अशा १९ सभासदांचा समावेश होत असे. राजाची सत्ता अमलांत आणण्याचें काम या मंडळाकडे असे. तरी ज्या मानानें राजा कर्तृत्ववान् अगर दुर्बळ असेल त्या मानानें या मंडळाच्या हातीं कमीअधिक सत्ता असे. ट्यूडर राजांच्या वेळीं पार्लमेंटला न जुमानतां या मंडळामार्फत राजा आपले हक्क प्रस्थापित करी. त्या वेळीं या मंडळाचे ४० सभासद होते. पण त्यांपैकीं मुख्य सभासदांचा सल्ला घेण्याची पद्धत पडली. व या रूढीमध्यें हल्लींच्या कॅबिनेटचें मूळ सांपडतें. पहिला जेम्स व चार्लस या राजांच्या कारकीर्दींत हें मंडळ केवळ नामधारी झालें होतें. दुसऱ्या चार्लस राजानें या मंडळांतील मुख्य सभासदांचा सल्ला घेण्याची पद्धत सुरू केली. पहिल्या जॉर्ज राजाच्या कारकीर्दीपासून 'पार्टी सिस्टिम' म्हणजे पार्लमेंटांतील बहुमतवाल्या पक्षाचें प्रधान मंडळ नेमण्याची पद्धत सुरू झाली व तेव्हांपासून प्रिव्ही कौन्सिलचे महत्त्व कमी झालें. तथापि अद्यापि प्रिव्ही कौन्सिल अस्तित्वांत आहे, व त्यांत ब्रिटिश साम्राज्यांतील मोठमोठे नामांकित मुत्सद्दी व इतर मोठे पुरुष यांची निवड राजा या मंडळांत करतो. उदा., नामदार श्रीनिवासशास्त्री, सर सप्रू, डॉ. जयकर यांना प्रिव्ही कौन्सिलर करण्यांत आलें होतें. ब्रिटिश साम्राज्यांतील प्रिव्ही कौन्सिलमध्यें राजघराण्यांतील इसम, ब्रिटिश प्रधान मंडळाचे सभासद, आर्चबिशप, लंडनचे बिशप, लॉर्ड चॅन्सेलर, मुख्य न्यायाधीश, कॉमन्स सभेचा अध्यक्ष ( स्पीकर ), साम्राज्यांतलि स्वायत्त वसाहतींचे मुख्य प्रधान यांचा समावेश होतो. प्रिव्ही कौन्सिलच्या सभासदाला राइट ऑनरेबल ही पदवी असते. १८३३ पासून या कौन्सिलच्या ज्यूडीशियल कमिटीकडे न्यायदानाचें काम देण्यांत आलें. त्या कमिटींत लॉर्ड चॅन्सेलर व इतर न्यायाधीश असतात. त्यांपैकीं कांहीं न्यायाधीश हिंदुस्थानांतले व इतर ब्रिटिश वसाहतींतले इसम असत. प्रिव्ही कौन्सिलची ही ज्यूडीशियल कमिटी हें हिंदुस्थान व इतर वसाहती यांचें शेवटलें अपील कोर्ट होय, व या ज्यूडीशियल कमिटींत हिंदुस्थानांतील कांहीं कायदेपंडित घेण्यांत येत. आतां भारत स्वतंत्र झाल्यापासून हिंदुस्थानांतच वरिष्ठ न्यायालय स्थापन झालें आहे.

**राजपिपला संस्थान**—मुंबई, गुजराथेंतील एक संस्थान. क्षे. फ. १,५१७ चौ. मै. व लो. सं. २,४९,०३२ आहे. संस्थानचा भाग सातपुडा पर्वताच्या टेंकड्यांनीं व्यापला आहे. नर्मदा व करझन या मोठ्या नद्या आहेत. जंगल पुष्कळ असून त्यांत साग, खैर व इतर झाडें होतात. पाऊस सु. ४५ इंच पडतो. हवा रोगट आहे. कापूस हें मुख्य पीक असून ज्वारी, बाजरी, कोद्रु हीं धान्येंहि होतात. लोखंड व अकीक दगड सांपडतात. पुष्कळ खनिजेंहि आहेत. जलविद्युद्योजना मोठ्या प्रमाणावर करणें शक्य आहे.

परमार वंशांतील चोखाराणा हा राजवंशाचा मूळ पुरुष होय. पुढें मोंगल बादशहांनीं याच्यावर खंडणी लादली. मराठेशाहींत गायकवाडांनींहि बराच भाग घेतला. संस्थानिक आणि गायकवाड यांच्या तंट्यांत इंग्रज मध्यस्थ होऊन राज्यकारभार बरींच वर्षे इंग्रजांनींच हांकला. १८९७ सालीं संस्थानिकाकडे तो आला. सध्यांचे महाराज श्रीविजयसिंहजी १९१५ त गादीवर आले. हे चांगले सुशिक्षित व क्रीडापटु आहेत. यांनीं एक प्रातिनिधिक कायदेमंडळ स्थापन करून बऱ्याच सुधारणा केल्या आहेत. प्राथमिक शिक्षण मोफत आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें ३२ लाख आहे. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे. राजपिपला ही राजधानी अंकलेश्वराला आगगाडीनें जोडली आहे.

**राजपुताना**—हिंदुस्थानांतील एक मोठा प्रदेश. क्षे. फ. १,३६,६७२ चौ. मैल. यांत २३ संस्थानें, १ जहागीर, १ इस्टेट व अजमीर मेरवाड हा ब्रिटिश जिल्हा इतक्यांचा समावेश होतो. पश्चिमेस सिंध, वायव्येस बहावलपूर संस्थान, उत्तर आणि ईशान्य या बाजूंस पंजाब, पूर्वेस संयुक्त प्रांत आणि ग्वाल्हेर व दक्षिणेस मध्य हिंदुस्थानचा भाग येतो. संस्थानें आणि जहागिरी यांच्या अधिपतींमध्यें २१ रजपूत, २ जाट ( भरतपूर आणि धोलपूर ) व २ मुसलमान ( पालनपूर आणि टोंक ) आहेत. जुन्या राजपुताना एजन्सींत पुढील संस्थानें होतीं :—

( १ ) मेवाड आणि दक्षिण रजपूत संस्थानें—
उदयपूर, बांसवाडा, डुंगरपूर, प्रतापगड, खुशालगड ( जहागिरी ), ईंदर व विजयनगर.

( २ ) जयपूर एजन्सी—
अलवार, जयपूर, किशनगड, टोंक, शहापुरा व लेवा इस्टेट.

( ३ ) पश्चिम राजपुताना एजन्सी—
बिकानेर, जोधपूर, जैसलमीर, पालनपूर, सिरोही व दांता.

( ४ ) पूर्व संस्थान एजन्सी—
बुंदी, भरतपूर, धोलपूर, करौली व कोटा.

( ५ ) ब्रिटिश जिल्हा—
अजमीर मेरवाडा.

हीं संस्थानें आतां बृहद्राजस्थान संघांत सामील झालीं आहेत.

अरवली पर्वत उत्तर-दक्षिण पसरल्यानें राजपुतान्याचे साधारण पूर्व आणि पश्चिम असे दोन भाग पडतात. सर्वांत सुपीक भाग आग्नेयीकडील होय. अरवलीचें उंच शिखर जें अबूचा पहाड त्याची उंची ५,६५० फूट आहे. लुनी, चंबळ, मही, बनास व बाणगंगा या मुख्य नद्या आहेत. राजपुतान्यांतून सुमारें ३,२५१

मैल आगगाडीचा फांटा गेला आहे. लोकसंख्येपैकीं निम्मे शेतकरी व एक-चतुर्थांश कारागीर आहेत. मुख्य भाषा राजस्थानी आहे. रजपूत लोक शें. सहासातच असतील; पण त्यांच्या हातीं सत्ता आहे; व समाजांत त्यांना विशेष मान आहे.

सांचर सरोवर फार मोठें असून तेथें मीठ तयार होतें. राजपुतान्यांत मिठाचे कारखाने पुष्कळ असून ते सरकारच्या ताब्यांत आहेत. संगमरवरी दगडाच्या खाणी जयपूर, अलवार यांसारख्या संस्थानांतून आहेत. दगडी कोळशाच्या खाणी पलाण येथें आहेत. राजपुतान्यांत ऐतिहासिक आणि प्रेक्षणीय स्थळें अनेक आहेत. दिलवाडा, चितोड, पुष्कर, संस्थानिकांचे राजवाडे, लेणीं, मशिदी, देवस्थानें, इ. पाहण्यास बाहेरून अनेक लोक येतात. प्रदेश रेताड असला तरी तांदुळाखेरीज बहुतेक सर्व धान्यें होतात. मलमलीचें कापड विणणें, रंग देणें, भांडीं व इतर नक्षी माल तयार करणें यांसारखे उद्योगधंदे चालतात. वाहतूक उंटावरून चालते. पक्क्या सडका पुष्कळ आहेत. बहुतेक मोठाल्या संस्थानांतून कॉलेजें, इस्पितळें, धंदेशिक्षण-संस्था, गिरण्या, वगैरे आहेतच.

अशोकाचे शिलालेख राजपुतान्यांत आहेत. तेव्हां त्याच्या काळापासून बॅक्ट्रियन, ग्रीक, शक, गुप्त, हर्ष व रजपूत यांचीं राज्यें या प्रदेशांत होऊन गेलीं व त्यांचे पुरावेहि आहेत. गुहिलोट, परिहार, चव्हाण, परमार, सोळंकी, वगैरे घराण्यांचीं राज्यें आज हयात आहेत. मुसलमानांनीं रजपूत राजांना आपले मांडलिक बनविले खरे, पण उदेपूरच्या बाप्पा-प्रतापादि कांहीं महाराण्यांनीं त्यांच्याशीं जोराची टक्कर दिली. चितोड, हळदीघाट, रणथंबोर, कालिंजर, वगैरे ठिकाणीं निकराचे संग्राम झाले आहेत. अकबरानें रजपुतांशीं बेटीव्यवहार सुरू करून वितुष्ट कमी करण्याचे प्रयत्न केले. पुढें मराठ्यांनीं त्यांना आपल्याकडे ओढण्याच्या खटपटी केल्या, पण शिंदे-होळकरादि सरदारांच्या आपआपसांतील वैरामुळें मराठ्यांना कायमचें वर्चस्व राखतां आलें नाहीं. याच वेळीं भरतपूरचें जाट संस्थान नवीन झालें. तसेंच अमीरखानाचें टोंक संस्थान तयार झालें. इंग्रजांनीं मराठ्यांच्या विरुद्ध हीं संस्थानें फोडून आपल्याकडे घेतलीं. १८५७ च्या क्रांतियुद्धांत रजपूत राजे इंग्रजांना राजनिष्ठ राहिले, पण त्यांची प्रजा (सैन्य) फुटली होती. राजपुतान्यांतील प्रत्येक संस्थानाची माहिती वेगळी दिलेली आहे.

**राजप्रतिनिधि**—याचे दोन प्रकार आहेत: एक परराष्ट्र वकील (अँबॅसडर) व एक परराष्ट्र प्रतिनिधि (कॉन्सल). एका राजानें किंवा सरकारनें दुसऱ्या राज्यांत राजकीय बाबींची किंवा स्वतःच्या हिताच्या इतर सर्व बाबींची व्यवस्था पाहण्याकरितां जो उच्च दर्जाचा अधिकारी किंवा प्रतिनिधि नेमलेला असतो त्याला परराष्ट्र वकील म्हणतात. अशा परराष्ट्र वकिलांचे पुन्हां सामान्य (ऑर्डिनरी) आणि विशिष्ट (एक्स्ट्रा-ऑर्डिनरी) वकील असे दोन प्रकार असतात. परकीय दरबारीं कायमचा नेमलेला वकील असतो, आणि शिवाय कांहीं विशिष्ट कामापुरता नेमलेला वकील असतो. अशा वकिलांना तह करणें, तहाच्या अटी ठरविणें, वगैरे बाबतींत भरपूर अधिकार दिलेले असतात. त्या वेळीं त्यांना सर्वाधिकारी राजप्रतिनिधी (प्लेनिपोटेन्शियरीज) म्हणतात. अशा वकिलांना मंत्री (मिनिस्टर्स) असेंहि म्हणतात. यांच्यापेक्षां कमी दर्जाचे मंत्री असतात त्यांना राजदूत (एन्व्हॉय) म्हणतात.

कॉन्सल हें नांव मूळ रोमन रिपब्लिक राज्यांतील दोन सर्वश्रेष्ठ मॅजिस्ट्रेटांना देण्यांत आलें होतें. सेनेट सभेचे हे दोन वरिष्ठ अधिकारी खि. पू. ५०९ पासून नेमण्यांत येऊं लागले. प्रथम त्यांची निवड दरसाल पॅट्रिशियन लोकांमधून होत असे, नंतर प्लीबियन लोकांतूनहि होऊं लागली. या जागेचे उमेदवार वयानें किमान ४५ वर्षांचे आणि पूर्वी क्वेस्टॉर, एडाइल व प्रीटॉर या अधिकारांच्या जागांवर काम केलेले इसम असत. रोमन साम्राज्य स्थापन झाल्यावर रोमन बादशहाच्या हातांखालीं मानापुरतीच ही जागा इ. स. ५२६ पर्यंत कायम ठेवण्यांत आली होती. पुढें फ्रान्समध्ये १७८९च्या राज्यक्रांतीनंतर स्थापलेल्या फ्रेंच रिपब्लिक राज्यांत कॉन्सल पदवी पुन्हां सुरू करण्यांत आली, व ती १८०४ सालीं नेपोलियननें बादशहा ही पदवी स्वीकारीपर्यंत चालू होती. हल्लीं एका देशानें दुसऱ्या देशांत नेमलेल्या अधिकाऱ्याला कॉन्सल म्हणतात. यांचे कॉन्सल जनरल, कॉन्सल, व्हाइस-कॉन्सल, कॉन्सुलर एजंट व अटॅची असे वर्ग आहेत. हे कॉन्सल आपल्या देशांतील व्यापारी, प्रवासी व प्रजाजन यांना सर्व प्रकारें परदेशांत मदत करतात. लंडन, वॉशिंग्टन व इतर राजधान्यांतून असे सर्व परराष्ट्रांतील प्रतिनिधी असतात. आतां आपल्याकडेहि न्यू दिल्लीस आहेत.

**राजबन्सी**—हिंदुस्थानांतील एक मोठी जात. यांची लोकसंख्या सु. २० लाख असून तीपैकीं १८ लाख बंगाल्यांत व बाकी आसामांत आहे. कोच किंवा मेच जातीशीं यांचा निकट संबंध आहे. यांच्यांत विवाह गांधर्वपद्धतीनेंहि करण्याची चाल आहे. पुनर्विवाहित स्त्रीस ज्या पद्धतीनें तिचा पुनर्विवाह झाला असेल तीवरून नांव देण्यांत येतें.

**राजभोज, पांडुरंग नथोजी** (१९०५- )—एक महाराष्ट्रीय हरिजन पुढारी. यांचा जन्म नाशिक जिल्ह्यांतील एका दलित वर्गाच्या कुटुंबांत झाला. शिक्षण धुळें येथें झालें. १९२५ सालीं सरकारी नोकरींत शिरले. हे मागासलेल्या जातींची सुधारणा करण्यांत पुढाकार घेतात, व त्यामुळें यांना प्रसिद्धि मिळाली

आहे. हे पुणें नगरपालिकेचे सभासद होते व पुणें जिल्हा स्थानिक स्वराज्य बोर्डाचे सरकारनियुक्त सभासद होते. यांनीं प्रथम पर्वतीवरील देवदेवेश्वराच्या दर्शनाबद्दल सत्याग्रह केला व पुढें नाशिकच्या काळाराम मंदिरांतील प्रवेश सत्याग्रह व महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह केला. त्यासाठीं त्यांना शिक्षाहि झाली होती. यांनीं हिंदुस्थानांत व हिंदी संस्थानांत केलेल्या हरिजन चळवळीमुळें यांची गणना पुढाऱ्यांत होऊं लागली व त्यामुळें १९३२ च्या पुणें-करारावर यांचीहि सही आहे. यांनीं सायमन कमिशनला दलित वर्गातर्फे अर्ज सादर केला होता व मतदान कमिटीपुढेंहि यांनीं पुरावा हजर केला होता. हे 'दलित-बंधु' हें मराठी व 'इंडियन स्टेट्स' हें इंग्रजी साप्ताहिक चालवितात. यांचा पुण्यास अनाथ हरिजन महिलाश्रम असून हे डिप्रेस्ड ऑफ इंडिया सर्व्हंट्स सोसायटीचे चिटणीस व अखिल भारतीय हरिजन राजकीय परिषदेचे व अखिल भारतीय दलितवर्ग शिरगणति परिषदेचे अध्यक्ष आहेत. हे राजकारणांत प्रारंभीं टिळक पंथाचे होते. आतां डॉ. आंबेडकर यांच्या पक्षांत असतात.

**राजमल, लखीचंद लालवानी** (१८९४- )—एक हिंदी जमीनदार व सावकार. यांचा जन्म जोधपूर संस्थानांत आड येथें झाला. यांचें शिक्षण मुडी व जळगांव येथें झालें. हे जामनेर येथील लखीचंद यांचे दत्तक पुत्र होत. गेल्या महायुद्धांत यांनीं सरकारास युद्ध-कर्ज व सैनिक मिळवून देऊन मदत केली होती. १९२१ मध्यें हे असहकारितेच्या चळवळींत पडले. हे मुंबई कादेमंडळाचे सभासद होते. अखिल भारतीय ओसवाल महासभेचे अध्यक्ष आहेत. खानदेश शिक्षणसंस्था, खानदेश ओसवाल शिक्षणसंस्था, जिल्हा लोकल बोर्ड, लँड मॉर्गेज बँक, कॉमनवेल्थ इन्शुअरन्स कंपनी, वगैरे अनेक संस्थांतून अध्यक्ष, उपाध्यक्ष, चालक, वगैरे अधिकारांवर आहेत. १९३७ मध्यें हे काँग्रेसतर्फे मुंबई असेंब्लीमध्यें निवडून आले व पुन्हां मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले. यांनीं अनेक संस्थांस आतांपर्यंत हजारों रुपये धर्मादाय दिलेले आहेत.

**राजमहाल**— बिहार, संताळ जिल्ह्याचा एक विभाग. क्षे. फ. ७४१ चौ. मै.. यात २ शहरें व १२९२ खेडीं आहेत. डोंगराळ भागालाहि राजमहाल असेंच नांव आहे. त्याचें क्षे. फ. १३६६ चौ. मै. आहे. या टेंकड्यांत पहाडी लोक राहतात. येथील सबाई गवत कलकत्त्याच्या कागदाच्या गिरण्यांना उपयोगी पडतें.

राजमहाल शहर गंगेच्या कांठीं आहे. अकबराचा बंगालचा सुभेदार मानसिंग याची ही राजधानी होती. नबाबांचे राजवाडे, बगीचे व थडगीं येथें पाहावयास सांपडतात. साहेबगंजामुळें राजमहालाचा व्यापार कमी झाला.

**राजमहेंद्र चोल** (११ वें शतक, उत्तरार्ध)—हा चोल राजा अतिशय न्यायी म्हणून प्रसिद्ध आहे. राजेंद्र चोलाचा हा पुत्र. राजमहेंद्री शहर यानेंच वसवलें. चोल घराण्यांतील राजपुत्रांमध्यें सिंहासनाच्या वारसांबाबत यादवी माजली असतां, या संधीचा फायदा घेऊन मल्ल चालुक्यानें याच्या प्रांतावर स्वाऱ्या करून याचे बरेचसे प्रांत बळकावले. राजमहेंद्रानें श्रीरंगमच्या देवालयास वर्षासन सुरू केलें होतें. याच्यानंतर याचा चुलता वीरराजेंद्र या गादीवर आला.

**राजमहेंद्री**—मद्रास, गोदावरी जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ३७६ चौ. मै. व लो. सं. सुमारें दोन लाख. यांत दोन शहरें व ८५ खेडीं आहेत. बराच भाग खडकाळ आहे. तांदूळ, तूर व तंबाखू हीं मुख्य पिकें होत. कोरुकोंडा देऊळ प्रसिद्ध आहे. राजमहेंद्री शहर गोदावरीच्या कांठीं आहे. लो. सं. (१९४१) ७४,०००. हें चालुक्य राजांनीं स्थापन केलें. पुढें अनेक हिंदू आणि मुसलमान राजे एकामागून एक सत्ताधीश झाले. पुढें फ्रेंच आणि इंग्रज यांच्यांत याविषयीं लढा चालला होता. या ठिकाणीं कॉलेजें व दुय्यम शाळा आहेत. सतरंज्या, घोंगड्या व कातडी सामान तयार होतें.

**राजमाची किल्ला**—मुंबई, पुणें जिल्हा. बोरघाटापासून ६ मैलांवर सह्याद्रीच्या एका ओसाड फांट्यावर हा बांधलेला आहे. याचे दोन भाग असून आंतील भागास श्रीवर्धन म्हणतात व बाहेरच्यास मनरंजन म्हणतात. यास बळकट तट असून त्याची उंची १० फूट व रुंदी ८ फूट आहे. मधील पट्टीमध्यें बहिरोबाचें देवालय आहे. या किल्ल्यावरून सर्व बाजूंचा अफाट देखावा फार रमणीय दिसतो. हा प्रथम शिवाजीमहाराजांनीं १६४८ त घेतला. पुढें १७१३ त शाहूमहाराजांनीं तो कान्होजी आंग्र्यास दिला. पुढें १७३० मध्यें बाजीराव पेशवे यास मिळाला. सदाशिवरावभाऊच्या तोतयानें हा किल्ला घेऊन कांहीं दिवस धूम माजविली होती. १८१८ त हा इंग्रजांस मिळाला.

**राजमृगांक रस**—एक आयुर्वेदीय रसायन. शुद्ध सुवर्णभस्म भाग १, रससिंदूर ॥, ताम्रभस्म ॥, लोहभस्म ॥, वंगभस्म ॥, अभ्रकभस्म ॥, नागभस्म ॥, मौक्तिकभस्म भाग २, प्रवालभस्म २, आणि हिऱ्याचें भस्म २, या सर्वांची एकत्र कज्जली करून रससिंदूराच्या चतुर्थांश टांकणखार घालून कांचेच्या कुपींत भरून त्या कुपीला मातकापड करावें. नंतर एका डेऱ्यांत मीठ भरून त्यांत ती कुपी ठेवावी आणि दोन प्रहरपर्यंत खैराच्या लांकडाचा मंदाग्नि द्यावा. आपोआप थंड

झाल्यावर डब्यांत किंवा कुपींत घालून ठेवावें. तूप, मध आणि त्रिकूटचें चूर्ण यांत हें रसायन घ्यावें. याच्या योगानें खोकला, श्वास, मंदाग्नि, सूज, पांडुरोग, कफ, क्षयरोग, इत्यादि रोग बरे होतात.

**राजराज चोल** ( राज्य ९८५-१०१६ )— सर्व चोल राजामध्यें अतिशय कर्तबगार व महापराक्रमी निघालेला हा दुसऱ्या आदित्य चोलाचा धाकटा भाऊ होय. गादीवर येतांच यानें आपला अंतःस्थ कारभार सुधारला. यानंतर चालुक्य व गंग यांच्यामधील सुरू असलेल्या यादवीचा फायदा घेऊन यानें आपल्या राज्याचा विस्तार वाढवला. सन ९९५ मध्यें यानें कांडलूरजवळ चेर आरमाराचा पराभव करून ९९७ मध्यें गंगप्पाडी, तुळुंबप्पाडी, तळिगैवळी व वेंगैनाड्ड या प्रांतावर आपली सत्ता प्रस्थापित केली. तसेंच पांड्यांना जिंकून यानें कोल्लम व कलिंग देश मिळवले. सन १००३ मध्यें सिलोन व सन १००७ मध्यें सत्याश्रय चालुक्यापासून साडेसात लाख वसुलाचा रट्टपाडी प्रदेश यानें जिंकला. आयुष्याच्या अखेरीस याचा समुद्रावरील बारा हजार बेटांवर अमल होता असा उल्लेख आढळतो. याच्या ताब्यांत कावेरीच्या उगमाजवळील येडतोरे-नाड गांवापासून थेट कृष्णा नदीच्या मुखापर्यंतचा प्रदेश आला होता. रामनाडपासून विशाखापट्टमपर्यंत याचा समुद्रावर अमल होता. यास मुम्मुडी चोल, जयैमगौंडा, राजाश्रम, अरुमोळीदेव, वगैरे पदव्या होत्या. चालुक्यांनीं उध्वस्त केलेल्या तंजावर शहराची यानें पुनर्रचना केली. याच्या पश्चात् याच्यासारखाच महत्त्वाकांक्षी असा याचा पुत्र गंगईकोंड ऊर्फ मुडिगोंड निगंरिली उत्तम चोल राजेंद्र हा गादीवर आला.

**रॉजर्स, सॅम्युएल**—एक इंग्रज कवि. हा वडिलांच्या पेढीवर राहून पुढें तिचा प्रमुख बनला ( १७९३ ). त्याचे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत ते— 'ओड टु सुपरस्टिशन ॲन्ड अदर पोएम्स' ( मूढश्रद्धास्तोत्र व इतर कविता ), 'दि प्लेझर्स ऑफ मेमरी' ( स्मृतिसुखें ), 'ॲन एपिसल टु ए फ्रेन्ड' ( एका मित्राला पत्र ), 'दि व्हॉएज ऑफ कोलंबस' ( कोलंबसाचा प्रवास ), 'जॅकेलाइन', 'ह्यूमन लाइफ' ( मानवी जीवन ), आणि 'इटली'. १८०३ सालीं तो कार्यनिवृत्त होऊन चैनींत काळ कंठूं लागला. त्याचा विनोद मर्मस्पर्शी असला तरी तो उमद्या स्वभावाचा असे.

**राजवाडे, कृष्णशास्त्री केशवराव** (१८१५-१९०१)— एक संस्कृत पंडित व मराठी ग्रंथकार. पुण्याच्या विश्रामबाग पाठशाळेंत यांचें शिक्षण झालें व याच पाठशाळेच्या उपगुरु-पदावर यांची पुढें नेमणूक झाली. नंतर ही पाठशाळा बंद पडल्यामुळें गुजराथी संस्कृत पाठशाळेंत हे काम करूं लागले. अनेकदां वेदशास्त्रोत्तेजक सभेचे परीक्षक व समारंभाचे अध्यक्ष म्हणून यांचीच निवड झालेली होती. पुण्यात अधिक मासांतील भागवत सप्ताह यांनींच सुरू केला.

मुद्राराक्षस, मालतीमाधव, शाकुन्तल यांसारख्या संस्कृत वाङ्मयाला मराठी रूप देण्याची कामगिरी यांनीं केली आहे. याशिवाय 'उत्सवप्रकाश' व 'ऋतुवर्णन' हें यांचें स्वतंत्र पद्यात्मक वाङ्मय होय.

**राजवाडे, रावराजे सर दिनकरराव रघुनाथ** ( १८१९-१८९६ )—एक राजकारणी पुरुष व ग्वाल्हेरचे दिवाण. हे रत्नागिरी जिल्ह्यांतील निर्वे गांवचे. यांनीं तवरघार-च्या सुभ्याची कामगिरी अत्यंत चोख रीतीनें बजावल्यामुळें १८५२ सालीं देवराव जाधवांच्या नंतर यांना ग्वाल्हेर संस्थानची दिवाणगिरी मिळाली. या वेळीं ग्वाल्हेरच्या गादीवरील महाराज जयाजीराव शिंदे हे अल्पवयी असल्यानें राज्यकारभार कौन्सिल-मार्फत चाले. यांनीं आपल्या काटकसरीच्या व शिस्तीच्या धोरणानें राज्यकारभारांत अनेक उपयुक्त सुधारणा घडवून आणल्या व सर्वांचा विश्वास संपादन केला.

१८५७ सालीं शिपायांचें बंड सुरू झाल्यानें यांना ग्वाल्हेरला राहणें धोक्याचें वाटलें. शिवाय आपलें सैन्यहि बंडवाल्यांना फितुर आहे याची जाणीव यांना झाली. तेव्हां महाराजांसह ग्वाल्हेर सोडून हे आग्र्यास गेले. यानंतर सर ह्यू यांच्या साहाय्यानें यांनीं जयाजीरावांना पुन्हां गादीवर बसवलें. ग्वाल्हेर या क्रांतियुद्धांत न पडल्यानें इंग्रजांना मोठा आधार मिळाला. हे उपकार स्मरून ब्रिटिश सरकारनें संस्थानाला बऱ्याच सवलती दिल्या. १८५९ मध्यें रावराजे दिवाण-गिरीच्या जबाबदारींतून मुक्त झाले.

सन १८६१ च्या कायद्याप्रमाणें अस्तित्वांत आलेल्या कायदे-मंडळांतील हे एक सभासद होते. धोलपूर, रेवा, देवास, इत्यादी-च्या संस्थानिकांनीं आपल्या राज्याची व्यवस्था लावण्याच्या कामीं यांचेंच साहाय्य घेतलें. तसेंच बडोद्याचे महाराज मल्हारराव गायकवाड यांच्यावर झालेल्या विषप्रयोगाची चौकशी करण्या-साठीं जें हायकमिशन नेमलें होतें त्यांतहि हे होते. या राजवाडे घराण्यास संस्थानांत व ब्रिटिश सरकारांत मोठा मान असे.

**राजवाडे, विश्वनाथ काशीनाथ** ( १८६३-१९२६ )— सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय इतिहास-संशोधक व प्रतिभावान् वाङ्मय-सेवक. कोंकणांतील वरसई हें यांचें जन्मठिकाण. बी. ए. पर्यंतचें यांचें सर्व शिक्षण पुण्यासच झालें. त्यानंतर कांहीं वर्षें यांनीं पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें. पुढें इंग्रजी भाषेंतील उत्कृष्ट ग्रंथांची मराठी वाचकांना ओळख करून देण्याच्या दृष्टीनें यांनीं 'भाषांतर' नांवाचें मासिक चालू

केलें. यांत प्लेटोच्या 'रिपब्लिक' चें व इतर अनेक उत्कृष्ट ग्रंथांचें भाषांतर करण्यांत आलें होतें. पुढें सन १८९६ मध्यें वांईस जाऊन यांनीं तेथील एरंडे यांच्या दप्तराचा पानपत-(युद्ध)विषयक भाग छापण्याची कामगिरी हातीं घेतली. परंतु विठ्ठल छापखान्यास आग लागल्यानें त्याबरोबर यांचीं मुद्रितेंहि आगीच्या भक्ष्यस्थानीं पडलीं. तेव्हां १८९८ सालीं यांनीं तोच भाग 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड पहिला' या नांवानें प्रसिद्ध केला. यानंतर क्रमाक्रमानें यांनीं या साधनांचे एकूण बावीस खंड प्रसिद्ध केले.

संपादन, संकलन व संशोधन या गुणांबरोबरच नवे नवे सिद्धांत प्रतिपादण्याचा गुणहि यांच्या ठायीं होता. महाराष्ट्राचा इतिहास लिहावयास लागणारीं साधनें हीं महाराष्ट्रांतील प्रत्येक घरांत विखुरलेलीं आहेत व त्यांच्या साहाय्यानें महाराष्ट्राचा इतिहास आपण स्वतः निर्माण करूं, अशी भावना यांनीं लोकांत निर्माण केली. इतिहास-संशोधनाचीं साधनें निर्माण होतांच त्यांना संघटित रूप देण्यासाठीं सन १९१० मध्यें यांनीं पुण्यांत भारत इतिहास-संशोधक मंडळाची स्थापना केली. यानंतर यांनीं महानुभावांच्या गुप्त संकेत लिपीचा उलगडा करण्याची कामगिरी हातीं घेतली व ती पुरी होतांच यांनीं भाषा, व्याकरण व समाजशास्त्र या विषयांत लक्ष घातलें. एकनाथपूर्व ज्ञानेश्वरीचा शोध लावणारे हेच होत. यांचा मराठी धातुकोश हा ग्रंथ यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला.

आरोग्यमंडळ, समाजविचारमंडळ यांसारखीं मंडळेंहि यांनीं काढलीं. तसेंच अनेक प्रकारचें मौलिक महत्त्वाचें लिखाण यांनीं केलें. त्यांत यांचा देशाभिमान, समाजाविषयीं कळकळ व महाराष्ट्राच्या भवितव्याबद्दल यांना लागलेली आंच ही सदैव दिसून येत असे. प्रतिभेचाहि यांना वरदहस्त होता. १९२५ सालीं पुण्यास जें 'शारदोपासक साहित्य-संमेलन' भरलें होतें त्याच्या अध्यक्ष-पदावर यांचीच निवड झाली होती.

ऐतिहासिक कागदपत्रें, मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, राधामाधवविलासचंपू, मराठी धातुकोश, संकीर्ण लेखसंग्रह, वगैरे ग्रंथ यांचे आहेत. त्यांच्या लेखनांत कल्पनेची भरारी असल्यानें त्यांनीं काढलेले सिद्धांत पुष्कळदां विक्षिप्त वाटतात. त्यांचें वागणेंहि असेंच विक्षिप्त होतें. पण मराठी साहित्याच्या प्रत्येक क्षेत्रांत त्यांनीं नवीन विचार मांडले आहेत व अभ्यासाची दिशा दाखवून दिली आहे. संशोधनाभ्यासी माणसास कसे कष्ट करावे लागतात यांचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे राजवाडे होत. महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचीं, जाणण्याचीं अस्सल साधनें त्यांनीं दाखवून दिलीं व संपादनहि केलीं. महाराष्ट्राच्या संशोधनक्षेत्रांत राजवाड्यांचें नांव अजरामर राहील यांत संशय नाहीं.

**राजवार**—हिंदुस्थानांतील एक जात. संख्या सुमारें दोन लाख आहे. पैकीं निम्म्याच्या वर लोक बिहार-ओरिसांत आहेत. हे लोक शेतकी करतात. चैलो नांवाचें नृत्य हे चांगलें करतात. यांच्यांत हिंदु चालीरीती फारशा नाहींत. ही आदिवासियांची जात आहे.

**राजशक**—राज्याभिषेक शक. मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी यानें आपल्या राज्यारोहणाच्या दिवशीं (ज्येष्ठ शुद्ध १३ शके १५९६, ता. ६ जून १६७४) हा शक सुरू केला. पुढें उत्तर पेशवाईत हा बंद पडला. सातारचे छत्रपति हा शेवटपर्यंत वापरीत. तथापि हा मराठे अमदानींतहि सर्वत्र प्रचलित असल्याचें दिसत नाहीं.

**राजशाही**—पाकिस्तान, बंगाल, एक विभाग व जिल्हा. विभागाचें क्षे. फ. १९,६४१ चौ. मैल व लो. सं. सुमारें एक कोटी वीस लक्ष आहे. जिल्ह्याचें क्षे. फ. २,५२६ चौ. मैल व लो. सं. सोळा लाख आहे. बहुतेक लोक मुसलमान आहेत. पद्मा आणि महानंदा या मोठ्या नद्या जिल्ह्यांतून वाहतात. मुख्य पीक तांदुळाचें आहे. तागहि फार होतो. मुर्शिदाबाद आणि मालदा यांप्रमाणें राजशाहींतहि रेशमाचा व्यापार मुख्य आहे. रामपूरबोआलिया हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे.

प्राचीन काळीं हा पौंड्रवर्धन राज्याचा एक भाग होता. सेन राजांच्या वेळीं यास वरेंद्रभूमि असें नांव असे. आठव्या शतकांत राजशाही जमीनदारी नाटोर घराण्याकडे गेली ती शेवटपर्यंत होती. १७९३ सालीं बंगालचे वेगवेगळे जिल्हे केले गेले.

**राजशेखर**—एक संस्कृत नाटककार. हा महाराष्ट्रांत राहत असे. याचा काल निश्चित नाहीं, तथापि इ. स. ८ व्या शतकाच्या अखेरीस हा होऊन गेला असावा. 'कर्पूरमंजरी' व 'विद्धशालभंजिका' हीं त्याचीं नाटकें प्रसिद्ध आहेत. कनोजच्या महेंद्र प्रतिहाराच्या दरबारीं हा उदयास आला.

**राजसिंह पांड्य** (७१०–७४०)—एक पांड्य राजा. पांड्यांपैकीं कोच्चदैयन याचा हा पुत्र. यानें आपल्या कारकीर्दीत चेर व चोल यांना आपल्या वर्चस्वाखालीं आणलें. आपल्या बापाच्या वेळेपासून गंग व कांगू राजे यांच्याशीं सुरू असलेलीं युद्धें यानें पुढें चालवून त्यांत विजय मिळवले. कुडाल (मदुरा), वंजी, कोली (उरैपूर) या गांवांना तटबंदी करून यानें त्या गांवांना संरक्षण केंद्राचें महत्त्व प्राप्त करून दिलें. पल्लवांनीं तर याच्या सामर्थ्यापुढें हतबल झाल्यामुळें समुद्रतीरापर्यंत माघार घेतली. राजसिंहानें माळव्याच्या राजकन्येशीं विवाह केला. तीपासून यास झालेला जटिल नांवाचा पुत्र याच्या पश्चात्

गादीवर आला. राजसिंहास अरिकेसरी, परांतक, नेदुमारण, परांकुश, वगैरे पदव्या होत्या.

**राजसूय**— तैत्तिरीय संहितेंत, अथर्ववेदांत आणि नंतरच्या वाङ्मयांत ज्यांत अभिषेक केला जातो अशा एका यज्ञाचें हें नांव आहे. सूत्रामध्यें या विधीचें बरेंच लांबलचक वर्णन दिलें आहे. परंतु त्याचें मुख्य स्वरूप ब्राह्मणांमध्यें रेखाटलेलें आहे आणि विधीच्या प्रसंगीं म्हणावयाचे मंत्र यजुर्वेदाच्या संहितेंत दिले आहेत. सामान्य विधीशिवाय या यज्ञाच्या प्रसंगीं लौकिक विधीहि करीत अशाविषयीं उल्लेख सांपडतात. उदाहरणार्थ, राजाला त्याच्या दर्जाचीं वस्त्रें घालीत आणि राजसत्तेचीं धनुष्य-बाण हीं जीं चिन्हें तीं त्याच्या हातीं देत. नंतर त्याला अभिषेक करीत. नंतर तो एखाद्या नातेवाइकाच्या लटक्याच गायी हरण करी किंवा एखाद्या राजकन्येशीं लटुपुटीचें युद्ध करी. नंतर तो फांसे खेळे व त्यांत तो हरत असे. आपण सर्व जगाचे मालक आहोंत हें दाखविण्याकरितां तो आकाशाच्या सर्व दिशांकडे जाई, व व्याघ्राचें बळ आणि पुढारीपण दाखविण्याकरितां व्याघ्रचर्मावर उभा राही.

**राजस्थान संस्थानी संघराज्य**— हें राजपुतान्यांतील संस्थानांचें संघराज्य ता. १८ एप्रिल १९४८ रोजीं स्थापन झालें. उदेपूरचे महाराणा या संघाचे प्रमुख आहेत. हिंदुस्थानांतील संघराज्यांत हें सर्वांत मोठें असून यांत बांसवाडा, बुंदी, डुंगरपूर, झालवाडा, किसनगड, कोटा, प्रतापगड, शहापुरा, टोंक व उदेपूर हीं १० संस्थानें येतात. क्षे. फ. ३० हजार चौ. मै. आहे व उत्पन्न तीन कोटीहून अधिक आहे.

यानंतर १९४९ सालीं मार्चमध्यें जयपूर, जोधपूर, जेसलमीर व बिकानेर हीं संस्थानें व पुढील महिन्यांत मत्स्यसंघांतील अलवार, भरतपूर, घोलपूर व करौली हीं संस्थानें यांत सामील होऊन बृहद्राजस्थानसंघ बनला. याच्याइतका मोठा संस्थानी संघ दुसरा नाहीं. जयपूरचे महाराज याचे राजप्रमुख आहेत.

**राजस्थानी वाङ्मय**—राजपुताना, राजस्थान, मारवाड, मरुदेश अशीं विविध नांवें राजस्थान प्रांताला आहेत. विक्रम संवताच्या ८ व्या शतकापासून वाङ्मयाचे अवशेष सांपडतात. माऊभाषा, डिंगल, मारवाडी किंवा राजस्थानी अशा नांवानें ओळखलें जाणारें कोणतेंहि प्राचीन वाङ्मय एकाच भाषेचें होय. मौखिक किंवा तोंडी व लिखित असे या वाङ्मयाचे इतर वाङ्मयांप्रमाणेंच दोन प्रकार आहेत. हस्तलिखित साहित्याचे (१) चारणी, (२) ब्राह्मणी, (३) जैन, आणि (४) संत असे चार विभाग पडतात. चारणी साहित्य मुख्यतः वीररसात्मक असून, प्रबंध, गीत व दोहा, सोरठ, कवित्त, इत्यादि स्फुट छंद-रचना अशा स्वरूपाचें आहे. गीत साहित्यांत राजस्थानाचा जुना इतिहास सांठवला आहे. पण त्याचें संशोधन झालें पाहिजे. दोहादि संग्रह गीतापेक्षां पुष्कळच आहेत. दोहा छंद फार प्राचीन म्हणजे वि. सं. दुसऱ्या शतकापासून आढळतो.

गद्य साहित्यांत इतिहास-पुराणें, कथा-कहाण्या, वंशावळ्या, वृत्तांत, इ. ब्राह्मणी आणि जैन स्वरूपांत उपलब्ध असून काव्य-साहित्यापेक्षां हें साहित्य अगदीं अल्पच म्हणावें लागेल. बांकीदासाचा 'ऐतिहासिक वार्तोका संग्रह' आणि दयालदासाचा 'राठोडारी ख्यात' या दोन गद्याकृती महान् गणल्या जातात. याप्रमाणेंच सूर्यमल्ल या चारण पंडिताचा 'वंशभास्कर' ग्रंथ राजस्थानी इतिहास आणि साहित्य यांमध्यें अमोल मानावा लागतो. जैन यतींनीं संस्कृत–प्राकृतमध्यें ज्याप्रमाणें रचना केली आहे त्याचप्रमाणें राजस्थानींत प्रबंध, काव्य, कथा, रास, फाग, सभाय व गीत या प्रकारचें किती तरी लोक-साहित्य निर्माण केलें आहे. त्यांचीं सर्व भांडारें अद्यापि खुलीं झालीं नाहींत. ब्राह्मणी साहित्य संस्कृत कथा-पुराणांचा अनुवाद म्हणतां येईल. मोंगल अमदानींत ब्राह्मण लेखकांना आश्रय राहिला नाहीं. त्यामुळें त्यांची प्राचीन संस्कृत साहित्याविषयींचीच आठवण ठेवावी लागते. संतसाहित्य राजस्थानांत भरपूर सांपडतें. मुसलमानी त्रासापासून संरक्षण राजस्थानांत मिळाल्यानें संतांचा ओघ इकडे आला. दादू, कबीर, गोरख, मीरा, रैदास, जसनाथ, सुंदरदास, महमद, नरसी, इ. संतकवी होऊन गेले व त्यांची वाणी अद्यापि प्रांतभर दुमदुमते आहे.

मौखिक साहित्यांत स्त्रियांचीं गाणीं विशेषतः येतात. सणांचीं, देवादिकांचीं, लग्नादि संस्कारांचीं, प्रेम-विरहादि प्रसंगांचीं गाणीं फार हृदयंगम व वास्तवपूर्ण आहेत. दोहे, चुटके, म्हणी, इ. देखील कमी नाहींत. यांचा नीट संग्रह झाला पाहिजे.

**राजहंस**—१. हा एक बदकाच्या जातीचा पोहणारा पक्षी आहे. याची चोंच याच्या डोळ्याइतकीच लांब असते व सर्वत्र सारख्याच रुंदीची असते. तसेंच चोंचीच्या सुरवातीच्या जवळचा मांसल भाग मृदु असतो. याच्या पायाचीं पुढील बोटें बदकासारखीं मजबूत कातड्यानें जोडलेलीं असतात. पण मागील सुटीं असतात आणि त्यांच्याखालीं नरम कातडी नसते. यांचीं पिलें अंड्यांतून बाहेर पडल्याबरोबर किंचित् निळसर करड्या रंगाचीं असतात. हे आपली उपजीविका फळें, पानें, लहान मासे, किडे, वगैरेंवर करतात. याच्या निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या अनेक जाती आहेत. दक्षिण अमेरिकेमध्यें एक सुंदर काळ्या मानेची जात आढळते. ऑस्ट्रेलियामधील एक जात मोठी व डौलदार दिसते. इंग्लंडमध्यें कायद्यानें या पक्ष्याचें संरक्षण करण्यांत येतें व टेम्स नदीवर यांच्यावर खुणा करण्याचा एक समारंभ राजाच्या व कांहीं कंपन्यांच्या वतीनें करण्यांत येतो.

संस्कृत साहित्यांतून मानस सरोवराच्या कांठीं सुंदर राजहंस असतात व ते मोत्यांचा चारा खातात, वगैरे वर्णनें आढळतात.

२. एक झाड. हीं झाडें लहान भुईसरपट असून पडसर जमिनींत किंवा भिंतींवर उगवतात. बारीक तांबूस फुलें व शेंगा येतात. लहान मुलांच्या खोकल्यावर पाला विड्यांत घालून देतात.

**राजा**—एखादें राष्ट्र, संस्थान, जमात, किंवा वंश यावर राज्य करणारा जो सर्वांत श्रेष्ठ अधिकारी त्याला 'राजा' पदवी देतात. प्राचीन काळांत राजा ही पदवी ज्या इसमांना मिळाली ते इसम त्यांच्या इतर सहकाऱ्यांपेक्षां शारीरिक बलानें, बुद्धीनें, किंवा संपत्तीनें वरचढ ठरल्यामुळें मिळाली. राजांचें सामर्थ्य वाढत गेल्यावर राजा ही पदवी एकाच कुटुंबांत वंशपरंपरेनें चालू झाली; तथापि कांहीं वेळां राजांची निवडहि होत असे. पण पुढें राजा हा ईश्वराचा पृथ्वीवरील प्रतिनिधि आहे, असें मानण्यांत येऊं लागलें, आणि त्यामुळें राजाला पूज्य, पवित्र मानून त्याला ईश्वराप्रमाणें मान देण्यात येऊं लागला. आधुनिक काळांत राज्यघटना व सनदशीर राज्यपद्धति यांची वाढ झाल्यामुळें राजाकडे अनियंत्रित सत्ता किंवा अंतिम सत्ता राहिली नाहीं; तर ती सत्ता कायदेमंडळाच्या हातीं गेली आहे, इतकेंच नव्हे तर नालायक राजांना पदच्युत करण्याचा हक्कहि अशा कायदेमंडळाच्या हातीं आहे.

ऋग्वेदांत आणि तदुत्तर वाङ्मयांत राजन् शब्द नेहमीं आढळतो. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत साधारण रीत्या राजशासनपद्धति म्हणजे एकसत्ताक राज्यपद्धतिच अस्तित्वांत होती, आणि याचें कारण आर्य लोक हे प्रतिपक्षीय आणि परराष्ट्रांतून हिंदुस्थानांत आलेले होते. व ग्रीसला पादाक्रांत करणाऱ्या आर्य लोकांप्रमाणें किंवा इंग्लंडला पादाक्रांत करणाऱ्या जर्मन लोकांप्रमाणें या लोकांच्या स्वाऱ्यांचा परिणाम एकसत्ताक राज्यपद्धति दृढ करण्यांत झाला. राजघराण्यांतील राज्यपदारूढ होण्यायोग्य अशा व्यक्तीला बाजूस सारून दुसरीच व्यक्ति राज्यपदारूढ होण्याची चाल प्रचलित होती, हें यास्कानें निरुक्तामध्यें (२·१०) दिलेल्या कुरुकुलोत्पन्न देवापि आणि शन्तनु यांच्या गोष्टींवरून सिद्ध होतें. राजाची सत्ता अत्यंत असुरक्षित होती ही गोष्ट स्पष्ट आहे. राजांना राज्यांतून हांकून दिल्याविषयीं व राजांनीं आपली सत्ता पुन्हां परत मिळविण्याविषयीं खटपट केल्याबद्दल अनेक (उदा., अथर्व ३·३४; काठक संहिता २८, १; तैत्तिरीय सं. २·३,१; मैत्रायणी सं. २,२,१; पंचविंश ब्राह्मण १२, १२, ६; शतपथ ब्राह्मण १२·९·३३; इत्यादि) उल्लेख आहेत. अथर्ववेदांत राजाच्या हितासंबंधीं अनेक मंत्र आहेत. वैदिक कालांतील लढायांची माहिती ऋग्वेदांत अनेक स्थलीं आली आहे. ज्याप्रमाणें ब्राह्मण आपल्या यज्ञयागादि कर्मांत दक्ष असत त्याप्रमाणें क्षत्रियहि लढाईच्या कामांत दक्ष असत. लढाईशिवाय देशाचें रक्षण करणें हेंहि राजाचें एक कर्तव्यच असे. त्याला जनतेचें रक्षण करणारा (गोपा जनस्य) किंवा राजसूय-प्रसंगीं म्हटल्याप्रमाणें ब्राह्मणांचें रक्षण करणारा असें म्हटलें आहे. राजाला लढाईंत जय मिळावा म्हणून पुरोहित मंत्र म्हणत असे.

लढाईच्या कामीं लोकांना आपल्या राजाची आज्ञा पाळावी लागे व ते ती पाळीत असत. राजत्वाचें रक्षण त्यांना करावें लागे. राजे आपले हक्क क्षत्रियांना देत व अशा प्रकारें सरदारांचा वर्ग अस्तित्वांत आला. साधारणतः क्षत्रियांना किंवा ब्राह्मणांना कर द्यावा लागत नसे. राजाचें बल लोकांमध्येंच सांठविलेलें असे. राजा हा न्यायाधीशाचीं कामेंहि पाहत असे. तो स्वतः कोणत्याहि शिक्षेपासून मुक्त (अदण्ड्य) असे. तो राजदंड धारण करीत असे असा उल्लेख आहे. फक्त फौजदारी गुन्ह्यांचाच राजा निवाडा करीत असे. मुलकी न्यायाच्या बाबतींत राजाचे अधिकार बरेच संकुचित असत. आणि या बाबतींत राजा ही न्याय मिळण्याची शेवटची जागा म्हणून मानीत, परंतु याबद्दल सबळ पुरावा नाहीं. ऋग्वेदांतील मध्यमशी हा राजानें नेमिलेला न्यायाधीश नसून खाजगी न्यायाधीश किंवा पंच असावा. वेदकालीन वाङ्मयांत राजा कायदे करीत असे असा उल्लेख आढळत नाहीं; परंतु पुढील वाङ्मयांत मात्र कायदे करणें हें त्याच्या अनेक कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य होतें, असें दिसून येतें. प्रत्यक्ष राजाकडे कोणकोणतीं कामें असत हें नक्की सांगतां येत नाहीं. प्रत्येक कार्यामध्यें राजाला बहुतेक आपल्या पुरोहिताची सल्लामसलत घ्यावी लागत असे. राजाच्या दर्जाचीं बाहेरील चिन्हें म्हणजे त्याचा राजवाडा आणि मौल्यवान् पोषाख हीं होत. जमिनीसंबंधानें राजाचे अधिकार काय होते, हें सांगतां येत नाहीं. राजा हा जमिनीचा मालक ही कल्पना मूळांतील नसून इंग्लंडांतल्याप्रमाणें या तत्त्वाची पुढें हळूहळू क्रांति होत गेली असावी. लोकांच्या वित्ताचें हरण करतां येणें ही राजकीय सत्ता आहे, मालकीचा हक्क नव्हे.

महाभारतकालीं भारतात अनेक लहान लहान राज्यें होतीं व त्यांवरील सत्ता राजे लोकांच्या हातीं असे. तथापि लोकसभा त्या वेळीं असून त्रैवर्णिकांना त्यांत बसण्याचा हक्क होता; म्हणजे राजा लोकमतानें कारभार करीत असे. कधीं कधीं राजा निवडण्याचा लोकांना अधिकार असे. पूर्वेकडील राजास सम्राट्, दक्षिणेकडील भोज, पश्चिमेकडील विराट् व मध्यदेशांतील राजास नुसता राजा म्हणत. पुराणातून अनियंत्रित व स्वायत्त राजसत्तेचे उल्लेख येतात. राजा हा परमेश्वराकडून अधिकार घेऊन आलेला असतो ही लोकांची कल्पना असे. तेव्हां राजाज्ञा ही मानलीच पाहिजे अशा तऱ्हेची लोकांना शिकवण असे.

राजा जसा देवनिर्मित तसें दंडनीतिशास्त्रहि देवनिर्मित, असें मानलें जात असल्यामुळें कायदे मोडण्याला राजास मुळींच अधिकार नाहीं असें राजसत्तानियंत्रक तत्त्व रूढ झालें.

पाश्चात्य देशांत राजाकडे कायदे करण्याचा अधिकार अंगभूतच ठेवलेला असे, त्यामुळें राजा हा फार कायदेशीर जुलमीहि होऊं शके. ईश्वरप्रणीत कायद्यांचें उल्लंघन राजानें केलें तर ऋषी किंवा पुरोहितवर्ग त्यास राज्यावरून काढून टाकीत असे. ऋषींनीं वेन राजास मारल्याची प्राचीन कथा आहेच. राजवंशाबद्दल लोकांना फार आदर असे. राजास काढला तरी त्याच्या मुलाला किंवा वारसाला गादीवर बसवीत. पुढें बौद्ध कालांत धर्माचें दडपण कमी झाल्यानें राजसत्ता फार अनियंत्रित झाली व वाटेल तो राजा होऊं लागला. राजाचें वर्तन कसें असावें याविषयीं शांतिपर्व व सभापर्व यांत उत्कृष्ट विवेचन आहे. असेच राजनीति सांगणारे किती तरी ग्रंथ संस्कृतांत आहेत. कौटिलीय अर्थशास्त्र हा राज्यव्यवस्थेचा तत्कालीन आदर्श आहे.

आज सर्वत्र लोकसत्ताक राज्यपद्धति देशहिताच्या दृष्टीनें योग्य अशी ठरली असल्यानें जुन्या परंपरागत आलेल्या राजवटी बुडत चालल्या आहेत. पहिल्या महायुद्धानंतर स्पेन आणि जर्मनी हीं राष्ट्रें प्रजासत्ताक झालीं. उरलेल्यांपैकीं ब्रिटन हेंच मोठें राष्ट्र राजा ठेवून आहे. पण त्याच्या राजाच्या हातीं शिक्कामोर्तबाची फक्त सत्ता आहे. याप्रमाणें आज राजसंस्थेचा पूर्ण ऱ्हास झालेला आहे. हिंदुस्थानांत स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अनेक संस्थानें विलीन झालीं व उरलेल्यांत लोकमतानुवर्ती राज्यकारभार चालतो. तेव्हां मागें गाजलेले हिंदी राजे आतां सामान्य जनाप्रमाणें राहूं लागले आहेत.

जगांतील राजे असलेले देश—

| देशाचें नांव | राजाचें नांव |
|---|---|
| अरेबिया–सौदी | अबदेल अझीझ |
| अफगाणिस्तान | महंमद झहीरशहा |
| इराक | फैजल ( २ रा ) |
| इराण | महंमद रेझा पेहलवी |
| ईजिप्त | फरूक ( १ ला ) |
| ग्रीस | पॉल ( १ ला ) |
| जपान | हिरोहिटो |
| ट्रान्स जॉर्डन | अमीर अबदुल्ला |
| डेन्मार्क | फ्रेडरिक ( ९ वा ) |
| नॉर्वे | हॅकन ( ७ वा ) |
| नेदर्लंड्स | ज्युलिआना |
| नेपाळ | मोहन समशेरजंग बहादूर |
| बेल्जिअम | बदोउन |
| ब्रिटन | जॉर्ज ( ६ वा ) |
| भूतान | जिग्मे–वंग–चुक |
| मोनॅको | लुई ( २ रा ) |
| मोरोक्को | सुलतान सिद्दी महंमद |
| स्वीडन | गुस्ताफ ( ५ वा ) |



**राजा, एम्. सी.** ( १८८३–१९४३ )—एक हरिजन पुढारी. यांचें शिक्षण मद्रास येथील ख्रिश्चन कॉलेजांत झालें. यांनीं प्रथम कांहीं वर्षें शिक्षकाचें काम केलें. हे मद्रास येथील लेबर ॲड्व्हायसरी बोर्ड, मद्रास सोल्जर्स बोर्ड, यांचे सभासद असून ऑनररी प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट, युनिव्हर्सिटी सीनेट व दुय्यम शिक्षण बोर्ड, वगैरेंचेहि सभासद होते. सायमन कमिशनच्या वेळीं जी मध्यवर्ती सल्लागार समिति नेमली होती तिचे हे सभासद होते. १९२६ मध्यें हरिजन पुढाऱ्यांची जी अखिल भारतीय परिषद् भरली होती तिचे हे अध्यक्ष होते. याप्रमाणेंच दुसऱ्या कांहीं परिषदांचे हे १९२८, १९३१ व १९३२ मध्यें अध्यक्ष होते. अखिल भारतीय हरिजन सभेचे हे अध्यक्ष होते. अखिल भारतीय हिंदुमहासभेचे ते उपाध्यक्ष होते व हे गोलमेज परिषदेचे एक सभासद होते. संयुक्त मतदार संघ तयार करण्यासाठीं केलेला राजा–मुंजे करार प्रसिद्ध आहे. हे मद्रास प्रांतांत काँग्रेस राजवटींत एक मंत्री होते.

**राजाधिराज चोल** ( राज्य. १०४०–५२ )—राजेंद्र चोलानंतर हा गादीवर आला. यास तीन राण्या होत्या. यानें दक्षिणेकडील मानाभरण, वीर–केरल, सुंदरपांड्य, विक्रमादित्य ६ वा, विष्णुवर्धन, विजयादित्य, वगैरे राजांना युद्धांत जिंकून कंपिली येथील चालुक्यांचीं ठाणीं उध्वस्त करून टाकलीं. तसेंच चालुक्य, चेर, पांड्य, गंग, पल्लव व कनोज या राज्यांत आपले सुभेदार नेमले. सन १०५२ मध्यें पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर १ ला याजबरोबर लढतां लढतां हा युद्धांत मारला गेला. याचा भाऊ राजेंद्रदेव यानें सोमेश्वराचा पराभव केला. राजाधिराजानंतर राजेंद्रदेवच त्याच्या गादीवर आला.

**राजापूर**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे.फ. ६१६ चौ. मै.. लो. सं. १,८०,२७४. तालुक्यांत राजापूर शहर व १८१ खेडीं आहेत. जैतापूर व राजापूर हीं दोन बंदरें आहेत. राजापूर समुद्राच्या आंत १५ मैलांवर आहे. तथापि जैतापूरच्या खाडीचें भरतीचें पाणी राजापुरापर्यंत येतें ; व गलबतें चालतात. बंदर म्हणून हें पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. १३१२ त मुसलमानांनीं हें जिंकून घेतलें. नंतर १६६०–६१ व १६७० या सालांत शिवाजीनें स्वाऱ्या करून इंग्रज वखारी लुटल्या. १७१३–५६ पर्यंत आंग्ऱ्यांकडे होतें. शहराजवळ एक ऊन पाण्याचा झरा आहे व त्याच्यापलीकडे गंगेचा झरा आहे. गांवांत इंग्रजी व संस्कृत शाळा आहेत. तांब्यापितळेचीं भांडीं व चवाळीचे पंचे यांबद्दल राजापूर प्रसिद्ध आहे.

राजापूरचा किल्ला—राजापूरच्या किंवा जैतापूरच्या खाडीच्या कांठीं राजापूर शहरांत हा किल्ला बांधलेला आहे. हा लहान असून यास गढी म्हटल्यास चालेल. हल्लीं यांत मामलेदाराची कचेरी आहे. तट मजबूत असून दोन बुरूज आहेत. १७१३ त हा आंग्ऱ्यास मिळाला. १८१८ त कर्नल इमलॉक यानें हा घेतला.

राजापूरची गंगा—राजापुरापासून खाडीच्या पलीकडे टेंकडीवर हें गंगेचें स्थान आहे. येथें गंगा केव्हां येते याचा नेम नाहीं. तरी पण तीनचार वर्षांनीं एकदां ती येते. एकदां गंगा आली म्हणजे चौदा कुंडांतून वाहूं लागते. गंगा आल्यावर पंधरावीस दिवस साधारणपणें राहते. या गंगेमुळेंच राजापूरची गणना क्षेत्रस्थानांत होते. गंगा आलेली कळल्यावर मोठी यात्रा जमते व तीर्थविधी होतात.

**राजाराम छत्रपति** (१६७०–१७००)—स्वराज्यसंस्थापक शिवाजीचा दुसरा मुलगा. याची आई सोयराबाई. शिवाजीच्या कारकीर्दीच्या अखेरीस संभाजीच्या दुर्वर्तनामुळें शिवाजीच्या मागून राजारामास गादीवर बसविण्याचा मुत्सद्यांचा बेत होता. त्याप्रमाणें शिवाजीच्या मृत्यूनंतर लगेच त्याला राज्यावर बसविलें, पण संभाजीनें दोन महिन्यांनींच त्याला रायगडावर नजरकैदेंत जें ठेविलें होतें तें संभाजीच्या वधानंतर त्याची सुटका झाली. तथापि त्यानें राज्यकारभार संभाजीच्या मुलाच्या नांवानें चालविला. महाराष्ट्राच्या स्वराज्यावर त्या वेळीं मोंगलांनीं सर्व बाजूंनीं आपत्ति आणली होती. पण राजारामानें मोठ्या धूर्तपणानें व निर्लोभ वृत्तीनें राज्य राखलें व अनेक मुत्सद्दी आणि वीर पुरुष यांना कर्तबगारी दाखविण्यास संधि दिली. तो जिंजी येथें राहून राज्यकारभार पाही. प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत बावडेकर, धनाजी जाधव, संताजी घोरपडे, इ. त्या वेळच्या मराठे राज्यांतील पुढाऱ्यांनीं मोंगलाशीं टक्कर देऊन त्यांना नामोहरम केलें. नंतर जिंजीहून राजाराम स्वराज्यात येऊन साताऱ्यास राजधानी करून राहिला. नंतर त्यानें खानदेश, वऱ्हाड या भागांत मोहीम काढून चौथाई–सरदेशमुखी गोळा केली. परत येतांना मोंगल सरदार पाठीस लागला तेव्हां मोठ्या परिश्रमानें तो सिंहगडास पोंचला व तेथेंच वारला. त्याचें वर्तन शुद्ध व सात्त्विक असे. संभाजीनें घालविलेलें स्वराज्य राजारामानें मिळविलें याबद्दल महाराष्ट्राला त्याचा अभिमान वाटतो. राजारामाची स्त्री ताराबाई हिनें शाहू आल्यानंतर कोल्हापूरला स्वतंत्र गादी स्थापली.

**राजाराम प्रसादी**—रामदासी पंथांतील सिद्धेश्वरमहाराजांचा शिष्य व 'भक्तमंजरीमाला' या ग्रंथाचा कर्ता. याच्या या ग्रंथाचे १०९ अध्याय असून त्यांत १३,००० ओंव्या आहेत. यानें आपल्या ग्रंथांत महिपतीनंतरच्या शंभर वर्षांत महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या निरनिराळ्या कवींचीं व सत्पुरुषांचीं चरित्रें वर्णिलीं आहेत. ग्रंथकाल सन १८३४ हा आहे. वरील ग्रंथाखेरीज यानें कांहीं पद्यरचनाहि केली आहे.

**राजावर्त**—१. लाजवर्द. (इं. लापिस लाझली). हें एक अस्मानी निळ्या रंगाचें रत्न आहे. याचा दगड अल्युमिनम सोडियम व कॅल्शियम यांचें सिलिकेट असून त्यांत थोडा गंधक असतो. याचे उत्तम प्रकार चीन, इराण व मध्य आशिया यांतून येतात. या दगडामध्यें कोरीव काम व जडाव काम चांगलें होतें. यापासून समुद्रपार या नांवाचा निळा रंग तयार होतो. परंतु तो अलीकडे कृत्रिम रीतीनें बनविण्यांत येऊं लागला आहे.

२. (इं. ॲमेथिस्ट). ही एक निळसर किंवा जांभळी गारेची जात आहे. हिचे सहा पृष्ठभाग असलेले किंवा निमुळते स्फटिक आढळतात. तसेंच वाटोळे, लांबट किंवा समपार्श्वयुक्त स्फटिकहि आढळतात. राजावर्त हें एक पूर्वेकडील देशांत आढळणारें निळसर रंगानें रत्न असून ती एक अल्युमिना किंवा कुरुंदाची जात आहे.

राजावर्ताच्या रंगांत निरनिराळ्या छटाहि आढळतात. रंग गहिरा असल्यास पुरुषजात व फिक्का असल्यास स्त्री-जात म्हणतात. हा पारदर्शक, प्रकाशभेद्य व अपारदर्शकहि असतो. याचें विशिष्टगुरुत्व २·३८ ते २·४५ असतें. अफगाणिस्तानांतील बदकशान प्रांत, बैकल सरोवरतीर, ॲंडीज पर्वत, ऑक्सस नदीतीर या भागांत राजावर्त सांपडतो. हिंदुस्थानांत फक्त मारवाडांत थोडा सांपडतो. चीन समुद्रांतील हैनान बेटांतून फार येतो. हा रंग देण्यासाठींहि वापरतात.

**राजाज्ञा**—मराठ्यांच्या राज्यकारभारांत राजाज्ञा हें पद संभाजीच्या वेळीं सुरू झालें असावें. सरकारी कागदावर

राजाज्ञानें 'संमत सरकार' अशी मखलाशी करावयाची असे. उद्धव योगदेव याचें नाव प्रथम राजाज्ञा म्हणून येतें. तो शाहूबरोबरच बादशाही कैदेंत होता व तेथें शाहूचा कारभार पाही. राजाराम व शाहू यांच्या अमदानींत ताराबाईचा राजाज्ञा पंताजी शिवदेव सोमण होता. शाहूनें पुढें बऱ्याच जणांना राजाज्ञा केलेलें दिसतें. शेवटीं मोरो जिवाजीच्या घराण्यांत हें पद पेशवाई अखेरपर्यंत राहिलें.

राजाज्ञाचीं कर्तव्यें म्हणजे राजाच्या खाजगी कारभारावर देखरेख ठेवणें व राजाच्या गैरहजेरींत त्याची हुजरात घेऊन स्वाऱ्यांवर जाणें. त्याच्या हाताखालीं मुतालिक व खासनीस असत. इतिहासांत शंकराजी नारायण याला मिळालेलें हें पद प्रसिद्ध आहे.

**राजुल क्षत्रप** (सुमारें खि. पू. १००)— सत्रप हा शब्द इराणी असून त्याचा अर्थ देशाचा स्वामी किंवा जिल्हाधिकारी असा होतो. हेच क्षत्रप पुढें स्वतंत्र झाल्यावर यांनीं राजपुताना, गुजराथ, काठेवाड, कच्छ व दक्षिण हिंदुस्थान यांवर आपलीं राज्यें स्थापन केलीं. पहिल्या दोन क्षत्रपांना उत्तरेकडील क्षत्रप व बाकीच्यांना पश्चिमेकडील क्षत्रप म्हणतात. उत्तरेकडील क्षत्रपांपैकीं पहिला राजुल व दुसरा सोडास. राजुलनें आपणांस महाक्षत्रप अशी पदवी धारण केली होती व त्याचें राज्य मथुरेवर होतें. मथुरेवर यास सत्ता चालवण्याचा अधिकार शक राजांकडून मिळाला असावा. याची राणी 'नदसी अकसा' हिनें मथुरेंत एक बौद्ध स्तूप व मठ बांधला आहे. त्यांवरील लेखांत याच्या कालांतील त्रोटक अशी माहिती मिळते.

**राजेंद्र चोल** (१०१२–१०४३)—पहिल्या राजराजाचा हा मुलगा महापराक्रमी होता. हा युवराज असल्यापासूनच बापाबरोबर स्वारीवर जात असे. सीलोन व केरळ या प्रांतांवर व मुयंगीवर स्वाऱ्या करून यानें तेथील राजांपासून मौल्यवान् असे मुकुट, अलंकार व इतर संपत्ति मिळवली. मदुरमंडळ, पंचपल्ली, माशुणीदेश, वळंगदेश, निकोबार बेटें, गंगराजाची राजधानी यांसारखीं अनेक शहरें व देश यानें जिंकले. पांड्य देश जिंकून यानें आपल्या मुलास तेथें सुभेदार नेमलें. गंगातटाकापर्यंत मोहीम काढून याच्या सेनापतीनें ओरिसा व बंगाल या देशांच्या राजांना चोलांचें मांडलिकत्व मान्य करावयास लावलें. यानें गंगैकोंड चोळापुरम् या आपल्या राजधानींत जयस्तंभतडाग नांवाचा एक मोठा तलाव व बरींच देवळें बांधलीं. एकतीस वर्षांच्या आपल्या कारकीर्दींत यानें प्रजेस सुख दिलें.

**राजेंद्रप्रसाद, डॉ. बाबू** (१८८४– )—स्वतंत्र भारताचे पहिले अध्यक्ष. यांनीं विद्यार्थी-

दशेंतच बिहारी विद्यार्थ्यांची एक परिषद् भरविली होती. तसेंच बिहारमधील जलप्रलयनिवारणासाठीं निधि गोळा केला होता. यांनीं १९११ मध्यें कलकत्ता हायकोर्टांत वकिली करण्यास सुरुवात केली व पाटणा येथें हायकोर्ट स्थापन झाल्यावर १९१५ पासून तेथें वकिली करूं लागले. चंपारण्यामध्यें निळीच्या मळ्यांतून मजुरांवर जो जुलूम होत असे त्यांतून त्यांची सुटका करण्याकरितां महात्मा गांधींच्याबरोबर हे गेले होते. यांनीं १९२० मध्यें असहकारितेच्या चळवळींत वकिली सोडून दिली. १९३० ते १९३२ यांच्या दरम्यान यांस तीन वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. यांनीं बिहारमध्यें झालेल्या भूकंपाच्या वेळीं तेथील लोकांचें दुःख निवारण करण्याकरितां एक मोठा फंड उभारून त्याची व्यवस्था पाहिली. हे बिहार प्रांतिक राजकीय परिषद्, बिहार हिंदी साहित्य-संमेलन, अखिल भारतीय हिंदी साहित्य संमेलन (मद्रास अधिवेशन) व राष्ट्रीय सभेचीं १९३४ (मुंबई) व १९३९ (कलकत्ता) सालचीं अधिवेशनें यांचे अध्यक्ष होते. राजकीय आंदोलनांत हे इतर पुढाऱ्यांबरोबर तुरुंगांत असत. १९४७ सालीं हे मध्यवर्ती सरकारांत अन्नमंत्री होते, पण राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद स्वीकारण्यासाठीं राजीनामा दिला. हिंदी घटना समितीचे ते अध्यक्ष होते. नंतर नवी घटना अमलांत आल्यावर भारत लोकराज्याचे अधिपति झाले. यांचा स्वभाव अत्यंत शांत व सौजन्यशील आहे. यांच्याविषयीं सर्व पुढाऱ्यांना फार आदर वाटतो.

**राज्यवर्धन** (मृ. ६०६)—प्रभाकरवर्धनाचा पुत्र व हर्षवर्धनाचा भाऊ. बाप वारला तेव्हां हा उत्तरेकडे हूणांशीं लढत होता. परत आल्यावर पित्याच्या शोकामुळें हा राज्यावर बसण्याचें मनांत आणीना; उलट बौद्ध भिक्षु होण्याच्या विचारांत होता. इतक्यांत त्याची बहीण राज्यश्री हिच्या नवऱ्याला माळव्याच्या राजानें ठार करून राज्यश्रीलाहि बंदिवासात टाकलें, ही बातमी येतांच हा मोठ्या सैन्यानिशीं माळव्याच्या राजावर चालून गेला व माळव्यांतील सर्व राजांचा पराभव करून लूट आणीत असतां बंगालच्या नरेंद्रगुप्त राजानें यास विश्वासघातानें ठार मारलें. हर्षाच्या दानपत्रांत या गोष्टीचा उल्लेख आहे.

**राज्याभिषेक**—अभिषेक पाहा.

**राज्याभिषेक शक**—राजशक पाहा.

**राझबेरी**—[ वर्ग-रोझासी, रुबास इडिअस ]. या झुडपांचीं फळें पिंवळीं किंवा शेंदरी असतात. याच जातीमध्यें ब्रॅंबल, ब्लॅकबेरी, डयूबेरी, क्लाउडबेरी, वगैरे येतात. या फळांचा मोरंबा करतात. व्हिनेगारमध्यें रस घालतात. अर्क, सरबतें, वगैरे पदार्थांसाठीं वापरतात.

**रॉंटजेन, विल्हेल्म कोन्राड** ( १८४५-१९२३ )—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. यानेंच रॉंटजेन किंवा 'क्ष' किरणांचा शोध लाविला. यानें रसायनशास्त्रांतीलहि महत्त्वाचे शोध लाविले आहेत. हा १८९९ त म्युनिक येथें पदार्थविज्ञानशास्त्राचा प्राध्यापक होता. याला १९०१ सालीं नोबेल पारितोषिक मिळालें.

**रॉटरडॅम**—हें नेदर्लंड्समधील मुख्य बंदर व दुसऱ्या क्रमाचें महत्त्वाचें शहर आहे. हें दक्षिण हॉलंड या प्रांतांत म्यूझ नदीच्या कांठीं उत्तर समुद्रापासून १४ मैलांच्या अंतरावर आहे. व हें जहाजवाहू कालव्यानें समुद्राला जोडलेलें आहे. त्या कालव्यांतून अतिशय मोठालीं जहाजेंहि जाऊं शकतात. त्या शहरांतूनहि अनेक कालवे काढलेले आहेत. येथील मुख्य इमारती ग्रूटकर्क आणि बॉयमन्थस पदार्थ-संग्रहालय ह्या आहेत. जहाजें बांधणें, साखर, दारू, तमाखू, यंत्रें, रासायनिक द्रव्यें, कृत्रिम खतें, वगैरेंचे मोठाले कारखाने आहेत. येथें फार मोठा व्यापार जगांतील बहुतेक सर्व भागांशीं आणि विशेषतः डच वसाहतीबरोबर चालतो. तसेंच जर्मनी, स्वित्झर्लंड व मध्य युरोपांतील इतर देश यांच्याबरोबरहि मोठा व्यापार चालतो. येथील बंदरांत ४६,००० टनी जहाजें येऊं शकतात. येथून कॉफी, सिगार, साखर, मसाल्याला लागणारे जिन्नस, पेट्रोलियम, रासायनिक द्रव्यें, शेतकीचीं पिकें, इत्यादि माल परदेशीं जातो. शिवाय येथून परदेशीं जाणाऱ्या प्रवाशांची संख्याहि मोठी असते. लो. सं. ५,८७,०००.

**राठी**—पंजाबांतील एक जात. यांची संख्या एक लाखाजवळ आहे. हे सर्व हिंदू असून यांचा सामाजिक दर्जा रजपूतांहून थोडा कमी आहे.

**राडार**—('रेडिओ ॲंगल डायरेक्शन ॲंड रेंज' याचा संक्षेप). संदेशतार, टेलिफोन आणि बिनतारी यंत्र यांनंतर ध्वनिशास्त्राचा सर्वांत आश्चर्यकारक शोध म्हणजे राडारचा होय. सूक्ष्म अशा रेडिओच्या लहरींच्या प्रतिध्वनीमुळें दूरचे आणि अदृश्य पदार्थ समजून येतात. आणि काळोखामुळें अगर दूरच्या अंतरामुळें किंवा अंधुकपणामुळें ज्या वस्तू सहजासहजीं दिसणार नाहींत त्या 'राडार' मुळें दृग्गोचर होतात. हवाई हल्ला करणारीं बॉंबर विमानें दिसावीं म्हणून राडारचा संरक्षक शस्त्र म्हणून उपयोग करून ब्रिटननें हवाई लढाई जिंकली. पुढें पुढें युद्धांत राडारचा आक्रमक शस्त्र म्हणूनहि उपयोग करून शत्रूच्या युद्धसामर्थ्याचा नाश करण्यांत आला; आणि असें असूनहि शांतता कालांत राडारचे उपयोग कांहीं कमी नाहींत. वादळी हवेंत दर्यावर्दी जहाजांना राडारमुळें समुद्रप्रवास सुखरूप करतां येतो. राडारच्या लहरींच्या अनुरोधानें विमानें इच्छित स्थळीं बिनधोक पोहोंचतात आणि हल्लींच्या जलद वाहतुकीला येणारे कित्येक तरी अडथळे त्यामुळें दूर झालेले आहेत.

दृष्टीच्या तत्त्वावर या राडारची मूळ कल्पना आहे. काळोखांत आपण उजेड पाडल्यास वस्तु दिसते; कारण प्रकाशलहरी तीपासून परावृत्त होऊन आपल्या डोळ्याकडे येतात. डोळ्याला त्या समजतात. त्याचप्रमाणें राडार स्टेशनांत वस्तु दिसते; कारण प्रेषणयंत्रा( ट्रॅन्समीटर )पासून निघणाऱ्या रेडिओच्या अदृश्य लहरी त्यापासून परावृत्त होतात; व ग्राहकयंत्रा( रिसीव्हर )कडे परत येतात व या यंत्राला त्या समजतात.

**रॉडिन, ऑगस्ट** ( १८४०-१९१७ )—एक फ्रेंच शिल्पशास्त्रज्ञ. हा मोठा कल्पक आणि प्रभावी शिल्पकार होता. यानें अनेक पुतळे व ऐतिहासिक स्मारकें तयार केलीं आहेत. कॅले शहरामध्यें युस्टाश डी सेंट पीयर याच्या शौर्याचें जें स्मारक यानें तयार केलें आहे त्याबद्दल त्यास पुष्कळच प्रसिद्धि मिळाली. 'विचारमग्न' ( थिंकर ) ही त्याची अत्युत्कृष्ट कलाकृति होय.

**राणी**—राजसिंहासनावर अधिष्ठित झालेली आणि राज्याभिषेक झालेल्या राजाप्रमाणें अधिकार असलेली जी स्त्री तिला राणी म्हणतात. ब्रिटनमध्यें राणी या शब्दाचे तीन अर्थ आहेत. १. क्वीन-कॉन्सॉर्ट ( राजकर्त्या राजाची बायको ), २. क्वीन-रीजेंट ( राजप्रतिनिधि ), किंवा ३. राज्यकर्ती राणी. इंग्लंडांतील कायद्याप्रमाणें राज्याचा वारसा स्त्रियांकडेहि जातो आणि अशा स्त्री वारसांना ऊर्फ राज्यकर्त्या राण्यांना राज्यकर्त्या राजाप्रमाणेंच सर्व सत्ता विशेष हक्क आणि कर्तव्यें असतात.

आपल्याकडे अभिषिक्त राणीला महिषी म्हणत. राजाला अनेक स्त्रिया असून त्यांमधील प्रमुख जी तिला पट्टराणी असें नांव असे.

**राणीगंज**—बंगाल, बरद्वान जिल्ह्यांतील एक शहर. हें दामोदर नदीच्या तीरावर आहे. हें कोळशाच्या व्यापारासाठीं फार प्रसिद्ध आहे. कागद, भांडीं व तेल यांच्या गिरण्या असून तांदुळाचा मोठा व्यापार चालतो. कोळशाच्या उत्पादनांत सर्व हिंदुस्थानांत हें दुसरें मोठें शहर आहे. लो. सं. सुमारें १६,०००.

**राणीबेण्णूर**—मुंबई, धारवाड जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ४०५ चौ. मैल. लो. सं. १,२१,४२२. तीन शहरें व ११६

खेडीं आहेत. जमीन उंच-सखल आहे. राणीबेण्णूर शहर मद्रास सदर्न मराठा रेल्वेवर आहे. गांवाला म्युनिसिपालिटी आहे. लो. सं. सुमारें ११,०००. कापसाचा मोठा व्यापार चालतो. विणकामाबद्दल गांव फार प्रसिद्ध आहे. कर्नल वेलेस्लीनें १८०० सालीं धोंडी वाघाचा पाठलाग करीत असतांना हें जिंकलें होतें.

**राणेखान भाई** (मृत्यु १७९१)— शिंद्यांच्या पदरचा एक सरदार. पानपतच्या युद्धात जखमी झालेल्या महादजी शिंद्यास दाक्षिणेंत सुखरूप आणून पोहोंचवणारा भिस्ती हाच असून याचा सल्ला महादजी नेहमींच मानत असे. नाना फडणिसासारखे मुत्सद्दी महादजीपुढें कुंठित झाल्यावर ते याच्या मध्यस्थीनेंच महादजीकडील आपलें काम पार पाडीत. हसनखान नामक याच्या मुलानें एक शूर योद्धा म्हणून नांव कमावलें. याचे वंशज आजहि शिंदेशाहींत आहेत.

**राणोजी शिंदे** (मृत्यु १७४५)—शिंदेशाहीचा मूळपुरुष. मूळचा हा साताऱ्याजवळील कन्हेरखेड गांवचा होय. बाळाजी विश्वनाथाच्या पदरीं असलेल्या शूर व कर्तबगार शिपायांपैकीं हा होता. बाजीरावानें वऱ्हाणपूरच्या सुभेदाराशीं व माळव्यांतील दाऊदखानाशीं दिलेल्या लढाईच्या प्रसंगीं याची कर्तबगारी दिसून आल्यानें यास याच्या फौजेच्या खर्चासाठीं माळव्याचा अर्धा मोकासा तोडून देण्यांत आला व यास चौथाईवसुलीच्या कामावर नेमण्यांत आलें. सन १७२८ मध्यें झालेल्या भोपाळच्या लढाईंतहि यानें आपलें शौर्य गाजवलें.

**रातकिडा**—(क्रिकेट). हा एक टोळ-झुरळांच्या वर्गातील किडा आहे. यांच्यापैकीं नर आपल्या पंखावरचीं आच्छादनें एकमेकांशीं घांसून एक प्रकारचा कर्कश आवाज करतो. श्रवणेंद्रियें याच्या पायांत असतात. याच्या बऱ्याच जाती आहेत.

**रॉथसचाइल्ड**—हें ज्यू पेढीवाल्यांचें एक कुटुंब असून तें अतिशय श्रीमंत व वजनदार म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांच्या पेढीचा मूळ संस्थापक मेयर अनसेलम बेऊर (१७४३–१८१२) आहे. त्यानें प्रथम आपला धंदा फ्रँकफुर्ट येथें सुरू केल्यावर त्याचे पांच मुलगे त्याच धंद्यांत शिरले. त्यांपैकीं सर्वांत वडील मुलगा ॲनसेल्म मेयर (१७७३–१८५५) हा फ्रँकफुर्ट येथील फर्मचा मुख्य अधिकारी झाला, आणि त्याच्या बाकीच्या भावांनीं निरनिराळ्या पुढील परदेशी राजधान्यांच्या शहरीं पेढीच्या शाखा चालू केल्या—सालोमन मेयर (१७७४–१८२६) व्हिएन्ना येथें; नाथन मेयर (१७७६–१८३६) लंडन येथें; कार्ल मेयर (१७८८–१८५५) नेपल्स येथें; आणि जेकब (१७९२–१८६८) पॅरिस येथें. या सर्व भावांनीं १८१३ नंतरच्या राजकीय अशांततेच्या काळांत आपला पेढीव्यवहाराचा धंदा अतिशय सावधागिरीनें चालवल्यामुळें त्यांची पेढी अतिशय श्रीमंत होत गेली. पुढें एका मुलाच्या घराण्यांत सरदारकी आली.

**राधनपूर संस्थान**—मुंबई, पश्चिम हिंदुस्थानांतील एक संस्थान. क्षे. फ. ११५० चौ. मै. यांत साप्टी व मुंजपूर या दोन जहागिरी येतात. सर्व प्रदेश सपाट आहे. संस्थानिक बाबी घराण्यांतील मुसलमान आहेत. हुमायूनच्या कारकीर्दीपासून गुजराथच्या इतिहासांत या घराण्याचें नांव येतें. राधनखान या मूळ पुरुषावरून संस्थानाला नांव पडलें. १७५३ सालीं रघुनाथराव पेशव्यानें हें जिंकलें; पण पुन्हां नबाबाच्या स्वाधीन केलें. पुढें इंग्रजांची मदत संस्थानिक घेऊं लागले व त्यांना संरक्षणासाठीं खंडणीहि देऊं लागले. ही खंडणी १८२५ सालीं बंद झाली. संस्थानची लो. सं. (१९४१) ६७,६९१. कापूस, गहूं व धान्य हीं मुख्य पिकें आहेत. संस्थानांत बरींच जुनीं ठिकाणें आहेत. संकेश्वर हें जैनांच्या यात्रेचें प्रसिद्ध स्थान आहे. संस्थानचें उत्पन्न सु. ६ लाख आहे. सध्यांचे नबाब मूर्तजाखानजी जोरावरखानजी आहेत. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे. राधनपूर शहराभोंवतीं एक तट आहे. कच्छ आणि गुजराथ या भागांतील हें एक महत्त्वाचें व्यापारी ठिकाण आहे. एक अनाथाश्रम, बधिरार बँक, फत्तेकोट, वगैरे इमारती आहेत.

**राधा**—१. ही गोपाल कृष्णाची पत्नी किंवा सखी समजण्यांत येते. हिच्यासंबंधीं निरनिराळ्या पुराणांत निरनिराळ्या कथा आहेत. ही लक्ष्मीरूप मानून वैष्णवपंथ हिची मोठी आराधना करतात. राधावल्लभ पंथ, राधास्वामी पंथ (पाहा) यांसारखे राधेला प्रामुख्य देणारे पंथ त्याच्यांत आहेत.

२. कर्णाची मानलेली आई व अधिरथ सुत याची बायको. यामुळें कर्णाला राधासुत, राधेय अशीं नांवें आहेत.

**राधाकृष्णन्, डॉ. सर सर्वपल्ली** (१८८८– )—एक प्रमुख हिंदी तत्त्वज्ञानी व मुत्सद्दी. यांचें शिक्षण प्रथम वेलोर येथील वूरही कॉलेज व नंतर मद्रास येथील प्रेसिडेन्सी कॉलेज यांमध्यें झालें. १९११ ते १९१७ पर्यंत हे मद्रास येथें प्रेसिडेन्सी कॉलेजांत प्रथम दुय्यम व नंतर मुख्य म्हणून तत्त्वज्ञान या विषयाचे प्राध्यापक होते.

१९१८ ते १९२१ मध्यें हे म्हैसूर युनिव्हर्सिटींत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. १९२१ ते १९३१ मध्यें कलकत्ता युनिव्हर्सिटींत

तत्त्वज्ञानाचे जॉर्ज दि फिफ्थ प्रोफेसर म्हणून होते. यांनी १९२७ मध्यें युरोप-इंग्लंडमध्यें पुष्कळ प्रवास करून अनेक व्याख्यानें दिलीं. १९२६ मध्यें हे ऑक्स्फर्ड येथें अप्टन व्याख्याते होते. १९२६ मध्यें शिकागो युनिव्हर्सिटीमध्यें हेकेल व्याख्याते व १९२९ मध्यें हर्बर्ट व्याख्याते म्हणून होते. १९२९–३० मध्यें यांस ऑक्स्फर्ड येथें तौलनिक धर्मशास्त्राचे प्राध्यापक म्हणून नेमण्यांत आलें. १९३१ मध्यें जिनेव्हा येथें लीग ऑफ नेशन्सनें बौद्धिक सहकार्याकरितां एक सार्वराष्ट्रीय समिति नेमली होती तिचे हे सभासद होते. १९३२ ते १९३६ पर्यंत हे वाल्टेअर येथें आन्ध्र विश्वविद्यालयाचे कुलगुरु होते. यांनी तत्त्वज्ञानावर मोठी ग्रंथरचना केली आहे. नंतर १९३९–४८ त हे बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे व्हाइस चान्सेलर होते. अखिल हिंदी विश्वविद्यालय समितीचे हे अध्यक्ष असतांना यांना रशियांत वकील म्हणून नियुक्त करण्यांत आलें. आतां ते त्या जागेवर आहेत. 'युनेस्को'च्या सांस्कृतिक शाखेचे हे कर्ते सभासद आहेत. भारतीय तत्त्वज्ञानावर यांचे उत्कृष्ट ग्रंथ आहेत. या तत्त्वज्ञानाची महती व माहिती यांनीं पाश्चात्य समाजाला चांगली पटवून दिली.

**राधाबाई पेशवे** (मृत्यु १७५३)— पेशवाईंतील एक कर्तबगार स्त्री. ही बाळाजी विश्वनाथ पेशवा याची पत्नी. हिला राजकारणाची बरीच माहिती असून दरबारांतील मंडळीवर हिचें वजन असे. सन १७५१ मध्यें नानासाहेब पेशव्यानें हिची रौप्यतुला करवली होती. बाजीराव, चिमाजी, भिऊबाई व अनूबाई हीं हिचीं मुलें सर्व चांगलीं निघालीं. हिचा पेशवे घराण्यांत बराच वचक असून हिला सर्व जण फार मान देत. ही काशीयात्रेस गेली असतां रजपूत राजांनींहि हिची मोठी बडदास्त ठेविली होती.

**राधावल्लभ पंथ**—हा पंथ उत्तर हिंदुस्थान व गुजराथ या भागांत प्रचलित आहे. हरिवंश नांवाच्या साधूनें हा पंथ स्थापन केला. या पंथांत राधेला कृष्णापेक्षां जास्त मान आहे व कृष्णाची पूजा राधावल्लभ म्हणूनच केली जाते. राधा व कृष्ण यांचें भजन होतें. भक्तीनें मोक्षप्राप्ति होते असें या पंथाचे लोक समजतात. वृंदावन हें या पंथाचें मुख्य स्थान आहे. अनुयायांची संख्या सुमारें २५,००० आहे.

**राधास्वामी पंथ**—शिवदयाळ ऊर्फ राधास्वामी नांवाच्या एका क्षत्रियानें हा स्थापन केला. राधास्वामी पंथ कृष्णभक्तीचा पंथ नसून परमेश्वर या शब्दाऐवजीं समानार्थी राधास्वामी हा शब्द योजिला आहे, असें पंथाचे लोक समजतात. कबीर पंथाशीं याचें साम्य आहे. या पंथांत जातिभेद नाहीं. हिंसा व मद्यमांस वर्ज्य करून भगवच्चिंतन करावें, तसेंच विनय, क्षमा, इत्यादि गुणांचा आपल्या अंगीं विकास करावा, असें या पंथाचें सांगणें आहे. या पंथांत गुरुभक्तीचें फार माहात्म्य आहे. त्यामुळें पंथांत अनीति उद्भवते. कारण गुरूची सेवा करण्याला सीमाच नाहीं. आग्र्याजवळ या पंथाचे लोक आहेत. या पंथाच्या लोकांस सत्संगी असेंहि म्हणतात.

**रान उंदीर**—(डॉरमाउस). उंदीर वर्गांतील खार आणि साधे उंदीर यांमधील ही एक जात आहे. हे उष्ण व समशीतोष्ण प्रदेशांत आढळतात; व पानें, फळें, वगैरे खाऊन राहतात. हे मागील पायांवर बसून पुढील पायांनीं अन्न तोंडांत घालून खातात. यांची लांबी सुमारें तीन इंच असून शेपटी अडीच इंच लांब असते.

**रानडे, माधव गोविंद** (१८४२–१९०१)— आधुनिक भारताचे एक प्रमुख निर्माते. यांचे पूर्वज कोंकणांतून येऊन करकंब येथें स्थायिक झाले होते. १८५१ ते १८५६ पर्यंत माधवराव कोल्हापूर येथें शिक्षण घेऊन नंतर मुंबईस गेले. तेथें एम्. ए. (१८६४) व एल्एल्. बी. (१८६६) होऊन नंतर ॲडव्होकेट (१८७१) झाले. यांनीं विद्यार्थीदशेंत अनेक शिष्यवृत्ती मिळविल्या होत्या व वाचन पुष्कळच केलें होतें. प्रथम हे कांहीं दिवस शाळाखात्यांत तात्पुरते मराठी ट्रान्स्लेटर, अक्कलकोटास कारभारी व कोल्हापुरास न्यायाधीश होते. १८६८ ते १८७२ पर्यंत एल्फिन्स्टन कॉलेजांत असिस्टंट प्रोफेसर होते. १८६९ मध्यें हायकोर्टांत असिस्टंट रिपोर्टर होते. १८७३ मध्यें यांस फर्स्ट क्लास फर्स्ट ग्रेड सबजज्ज म्हणून पुण्यास नेमण्यांत आलें. १८८१ पासून ते कोर्टांचे तपासनीस झाले. १८८४ पासून पुण्यास स्मॉल कॉज जज्ज झाले. यानंतर फायनॅन्स कमिटीवर व १८९३ मध्यें हायकोर्ट जज्ज म्हणून यांची नेमणूक झाली. त्यांची तीन वेळां कायदे मंडळाचे सभासद म्हणून नेमणूक झाली होती.

"समाजामध्यें जागृति उत्पन्न करण्याचें गुरुत्व ज्यांच्याकडे देतां येईल अशा विरळा लोकांपैकीं हे एक होते" असें लो. टिळक यांनीं यांच्याविषयीं म्हटलें आहे. टिळक-गोखले प्रभृति राजकारणी यांस आपले गुरु समजत असत. महाराष्ट्रांतील राजकीय, सामाजिक, औद्योगिक, धार्मिक, इत्यादि सर्व चळवळींचे न्या. रानडे हे आद्य पुरस्कर्ते होत. यांनीं स्वदेशीची कल्पना काढली. ती

पुढें सार्वजनिक काकांनीं प्रसृत केली. वसंत व्याख्यानमाला, सार्वजनिक सभा, प्रार्थना समाज, पुनर्विवाह संस्था, वगैरे अनेक संस्थांस त्यांनीं नांवारूपास आणलें. हे उत्कृष्ट वक्ते व ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध होते. 'राइज ऑफ दि मराठा पॉवर', 'एसेज ऑन इंडियन इकॉनॉमिक्स', इत्यादि त्यांचे ग्रंथ मौलिक महत्त्वाचे आहेत. त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचें चारित्र्य, त्यांचा देशाभिमान यांबद्दल कोठेंच दुमत नाहीं. त्यांचा स्वभाव थंड, विनयशील व विचारप्रधान होता. निराशेचा अभाव, साधेपणा, परोपकार, सहनशीलता, दीर्घ प्रयत्न हे गुण त्यांच्यांत वसत होते. उत्कृष्ट लेखक, हुशार न्यायाधीश, विद्वान्, अर्थशास्त्री, इतिहासविशारद, उत्कृष्ट वक्ते व पहिल्या प्रतीचे मुत्सद्दी असें त्यांचें वर्णन थोडक्यांत करतां येईल.

**रानतंबाखू**--[ वर्ग-कांपोझिटी; इं. आर्निका ]. रानतंबाखूच्या जातीचें झाड. याच्या अठरा उपजाती आहेत. या झाडाचा बहुधा बाहेरून लावण्याच्या औषधींमध्यें उपयोग करतात. परंतु केव्हां केव्हां पोटांतहि घेतात. याचा अर्क तयार करून तो जखमांवर व मुरगळलेल्या अवयवांवर लावतात.

**राफेल, सान्झिओ**—( १४८३-१५२० )—एक इटालियन चित्रकार. १५०४ सालीं फ्लॉरेन्स येथें जाऊन तेथें त्यानें आपली मॅडोनाज् ही चित्रमाला सुरू केली. तींतील कांहीं चित्रें अतिशय प्रसिद्ध आहेत. 'एटोंवमेंट' हें त्याचें फार प्रसिद्ध चित्र आहे. १५०८ सालीं ज्यूलियस पोप (दुसरा) यानें राफेलला रोम येथें चित्रें काढण्याकरितां बोलावलें. तेथेंहि त्यानें काढलेलीं बरींच चित्रें सुप्रसिद्ध आहेत. शिवाय त्यानें रोमच्या व इतर शहरांमधील कित्येक राजवाड्यांमध्यें सुशोभित चित्रें काढलीं. त्यांपैकीं 'क्युपिड व साइक' या गोष्टीबद्दलची चित्रमाला आणि मॅडोना हीं त्याचीं चित्रें प्रसिद्ध आहेत. शिवाय त्यानें ज्यूलियस (दुसरा), लिओ (१० वा), फेराराची बिअॅट्रीस, काउंट कॅस्टीग्लिओन यांचीं चित्रें काढलीं. नंतर त्यानें लिओ याच्या सांगण्यावरून विनोदी चित्रें काढलीं, तींहि फार प्रसिद्ध आहेत. राफेलचें शेवटचें व अपुरें राहिलेलें चित्र 'दि ट्रॅन्स्फिगरेशन ऑफ ख्राइस्ट' (ख्रिस्ताचें रूपांतर) होय.

**रॉबर्ट्स, फ्रेडरिक स्ले** ( १८३२-१९१४ )—एक ब्रिटिश योद्धा. हा प्रथम हिंदुस्थानांत बंगाल तोफखान्यावर होता. पुढें १८५७ च्या क्रांतियुद्धांत यानें बराच पराक्रम गाजविला व दिल्ली, लखनौ, इ. शहरांचे वेढे उठविले. १८६७-६८ च्या अॅबिसिनियाच्या युद्धांत व १८७८-८० च्या अफगाण युद्धांत यानें असेच पराक्रम केले. १८८५-९३ पर्यंत हा हिंदुस्थानचा सरसेनापति होता. १९०० च्या बोअर युद्धांतहि त्याच्याकडे सेनाधिपत्य होतें. पहिलें महायुद्ध सुरू झालें तेव्हां तो फ्रान्समधील हिंदी सैन्याबरोबर राहण्यासाठीं गेला असतां तेथेंच वारला. 'हिंदुस्थानांतील चाळीस वर्षें' (१८९७) या नांवाचें त्यानें पुस्तक लिहिलें आहे. त्याला अनेक पदव्या व मानमरातब मिळाले होते.

**रॉबिन्सन, एड्विन अलिंग्टन** ( १८६९-१९३५ )—अमेरिकेचा एक प्रमुख कवि. छंद आणि रचना यांमध्यें जुन्या परंपरेला धरून त्याचें काव्य असलें तरी त्यांत साधेपणा, सूचकता, नाट्यछटा आणि बौद्धिक सूक्ष्मता हे नवे गुण दिसून येतात. विचाराचें गांभीर्य दिसतें तरी त्यांत मधून मधून बोंचक विनोदहि आहे. त्याच्या सुनीतांचा संग्रह महत्त्वाचा आहे.

**राबी**—साधारणपणें ज्यू धर्माचार्याला ही पदवी असते. ही बहुमानार्थीहि वापरतात. या हीब्रू संज्ञेचा मूळ अर्थ 'माझे गुरुदेव' असा आहे. ख्रिस्त जन्मापूर्वी ही ज्यू लोकांत प्रचारांत असून ख्रिस्तकालांत ही कोणत्याहि धर्माच्या आचार्यांना लावीत. खुद्द ख्रिस्तालाहि या पदवीनें भूषविलेलें आढळेल. सांप्रत तालमुदप्रणीत ज्यू धर्मांचें अध्ययन केलेल्यांसच विशेषतः ही पदवी लावतात. अमेरिकेंत सिनसिनाटी, फिलाडेल्फिआ व न्यूयॉर्क या ठिकाणीं ज्यू राबी शिकवून तयार करणारीं विद्यापीठें आहेत.

**राभा**—आसामांतील एक वन्य हिंदु जात. हे बहुधा मंगोलियन मानववंशांतील असावेत. हे मूळचे शेतकरी, पण आतां लष्करांत व पोलिस खात्यांत नोकरी धरतात. यांच्यांत निरनिराळ्या भाषा आहेत व सात पंथ आहेत. कांहीं पंथांत परस्पर लग्नें निषिद्ध आहेत. मुलांना आईचें गोत्रनाम दिलें जातें, पण वडिलांची मालमत्ता मुलालाच मिळते. पैसे देऊन वधू विकत घेतात. हे पूर्वी गारो टेंकड्यांत राहत असावेत असें दंतकथांवरून वाटतें.

**राम**—एक प्रमुख हिंदु देवता व प्राचीन वीरपुरुष. रघुवंशांत अयोध्येचा दशरथ राजा होता त्याचा हा वडील मुलगा. त्याच्या आईचें नांव कौसल्या. रामाला तीन सावत्र भाऊ होते. त्यानें लहानपणींच राक्षसांना मारून विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण केलें. मिथिलेला जनक राजाची कन्या सीता हिचें स्वयंवर होतें. तेथें विश्वामित्रानें त्याला नेलें असतां त्यानें कोणास न पेलणारें शिवधनुष्य उचलून सज्ज केलें. तेव्हा जनकराजानें त्याचा सीतेशीं विवाह करून दिला. दशरथानें त्याला राज्यावर बसविण्याचें मनांत आणिलें असतां रामाची सावत्र आई कैकेयी हिनें दशरथानें पूर्वी देऊं केलेले वर मागून रामाला वनवासाला धाडिलें. रामाबरोबर सीता व त्याचा भाऊ लक्ष्मण हे चौदा वर्षे वनवासांत राहिले. वनवासाच्या कालांत लंकेचा महापराक्रमी राजा रावण यानें सीतेला चोरून नेऊन लंकेंत ठेविलें. तेव्हां सुग्रीव-हनुमंतादि वानरांच्या साह्याने राम-लक्ष्मणांनीं रावणाशीं युद्ध करून त्याला व त्याच्या सर्व सैन्याला ठार केलें व लंकेच्या राज्यावर रावणाचा भाऊ बिभीषण यास बसविलें. नंतर सर्व जण अयोध्येला परत आले व रामराज्य सुरू झालें.

एकवचनी, एकबाणी व एकपत्नी म्हणून रामाची ख्याति आहे. तसेंच अत्यंत न्यायी कारभार व प्रजाहितदक्षता यांबद्दलहि रामाचें नांव घेण्यांत येतें. रामाला विष्णूचा एक अवतार समजतात व त्या अवताराची कथा वाल्मीकि ऋषींनें लिहिली असून 'वाल्मीकि रामायण' हा ग्रंथ भरतखंडाचें एक प्राचीन महाकाव्य म्हणून आदरिलें जातें.

केवळ रामाची भक्ति करणारे व तिचा प्रसार करणारे बरेच संप्रदाय व साधू होऊन गेले आहेत. आनंदतीर्थ, रामानुज, रामानंद, कबीर, रामदास, इ. रामभक्ति वाढविणारांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. ही रामभक्ति हिंदुस्थानाबाहेर सयाम, मलाया, इंडोनेशिया, वगैरे भाषांत परदेशांत गेल्याचे दाखले आहेत. रामायणावर बरेंच वाङ्मय आहे व एकसारखें होत आहे. दरसाल 'रामनवमी' हिंदुस्थानांत पाळली जाते. उत्तर हिंदुस्थानांत 'रामलीला' दाखविण्याची फार आवड दिसून येते. विष्णूच्या सर्व अवतारांत रामाचा अवतार सात्त्विक आहे. रामायण पाहा.

**रामअमात्य**—या दक्षिणेंतील संगीतज्ञानें इ. स. १२५० च्या सुमारास लिहिलेल्या आपल्या 'स्वरमेलकलानिधि' या ग्रंथांत दक्षिणेंतील संगीत पद्धतीचें सविस्तर वर्णन केलेलें आहे. दक्षिणी पद्धतीसंबंधानें लिहिणारा हा पहिलाच ग्रंथ आहे. हे राग कर्नाटक पद्धतींतील असून ते सर्व षड्जांत बसविलेले आहेत. निदान दक्षिणेंत तरी हल्लीं सर्व राग एका विशिष्ट स्वरापासून आरंभ करून बसविलेले आहेत आणि यावरून तिकडे वाद्यसंगीताची पुष्कळच वाढ झालेली आहे असें स्पष्ट दिसतें.

**रामकली**—हा राग भैरव थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागत असल्यानें याची जाति संपूर्णसंपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी ऋषभ आहे. गानसमय प्रातःकाल सर्वसंमत आहे. याचें सामान्य स्वरूप भैरव रागासारखें आहे. परंतु या रागांत तीव्र, मध्यम व कोमल निषाद या स्वरांचा प्रयोग एका विशिष्ट तऱ्हेनें होतो. म्हणून हा राग भैरव रागाहून निराळा होतो. हा एक भैरवप्रकार आहे.

**रामकृष्ण परमहंस** (१८३६-१८८६)—एक प्रसिद्ध बंगाली सत्पुरुष. हे नास्तिक्याकडे झुकलेल्या व स्वत्व विसरत चाललेल्या हिंदुस्थानला नवचैतन्याचा संदेश देणारे सिद्धपुरुष, वेदान्तप्रतिपादक व स्वामी विवेकानंदांचे गुरु होते. बंगालमधील हुगळी जिल्ह्यांतील कामारपुकुर हें गांव यांचें जन्मठिकाण.

यांचें पहिलें नांव गदाधर चट्टोपाध्याय असें होतें. यांचें घराणे सनातनी व धार्मिक वृत्तीचें. यांचे वडील बंधु कलकत्त्याजवळील कालीच्या दक्षिणेश्वर मंदिराचे पुजारी होते. त्यांना हे मदत करीत असत. हे सतत दक्षिणेश्वर मंदिरांत राहत व एखाद्या तपस्व्याप्रमाणें आचरण करीत, म्हणून लोक यांना दक्षिणेश्वरचे संत म्हणत. पुढें तोतापुरी नांवाच्या एका संन्याशानें यांना संन्यासदीक्षा दिली व यांचें नांव 'रामकृष्ण परमहंस' असें ठेवलें. वयाच्या चौथ्या वर्षापासून हे देहभान विसरून समाधिसुखांत निमग्न होत. ख्रिश्चन व मुसलमान धर्मांचा अभ्यास करून व अनेक मतमतांतरें विचारांत घेऊन यांनीं ईश्वरविषयक आपली दृष्टि स्थिर केली व त्या स्वानुभवांवर यांनीं सर्व जगाला उपदेश दिला. सर्व धर्मांच्या मुळाशीं एकच तत्त्व असल्याची यांना खात्री पटली होती. यांच्यामागें वैदिक धर्माचीं तत्त्वें सर्व जगाच्या कानाकोपऱ्यांत पोहोंचविण्याची कामगिरी यांचे परम शिष्य स्वामी विवेकानंद यांनीं केली. परमहंसांनीं आत्मशुद्धि करण्याकरितां अनेक प्रकार केले. अंत्यजांच्या घरांतील केर यांनीं आपल्या जटांनीं काढला. द्रव्याबद्दल तर सदैव निरिच्छ वृत्तिच यांनीं दाखविली. साधी राहणी व उच्च विचारसरणी डोळ्यांपुढें ठेवून यांचें वर्तन होई. शेवटीं अंतःस्थ तीव्र भावनेमुळे व

घसा दुखेतोंपर्यंत अनुभवकथन व उपदेश करण्याच्या यांच्या उपक्रमामुळें यांना घशाच्या व्रणरोगानें ग्रासलें.

यांच्या नांवानें स्थापन झालेल्या 'रामकृष्ण-मिशन' या संस्थेच्या जगभर शाखा असून ही संस्था वेदान्तप्रचाराबरोबरच लोकसेवेचेंहि कार्य करीत असते. बेलूर येथें सात लक्ष रुपये खर्च करून यांची समाधि बांधण्यांत आली आहे. यांची जन्मशताब्दि सर्व हिंदुस्थानांत मोठ्या समारंभानें व श्रद्धापूर्वक साजरी करण्यांत आली व त्या वेळीं 'हेरिटेज ऑफ इंडिया' (भारताचा वारसा) हा चतुःखंडात्मक ग्रंथ तिचें स्मारक म्हणून काढण्यांत आला. महेंद्रनाथ गुप्त ऊर्फ एम्. यांनीं आपल्या 'दि गॉस्पेल ऑफ रामकृष्ण' या आपल्या ग्रंथांत त्यांच्या आठवणी प्रसिद्ध केल्या आहेत.

रामकृष्ण मिशन—स्वामी रामकृष्ण परमहंस यांच्या स्मरणार्थ *ही संस्था चालली आहे.* वेदान्त हाच या संप्रदायाचा धार्मिक पाया आहे व ज्ञानदान हेंच मुख्य कर्म आहे. सर्व धर्मोविषयींच्या वादांत पडूं नये, अनाथ बांधवांस आपत्तींच्या प्रसंगीं साहाय्य द्यावें, स्वयंसेवक वृत्तीनें परोपकाराच्या कार्यांत गुंतावें, वगैरे या संप्रदायाचीं मुख्य तत्त्वें आहेत. बेलूर, काशी, खार (मुंबई), मद्रास, बंगळूर, वगैरे ठिकाणीं या मिशनचे मठ असून अनेक ब्रह्मचर्य पाळणारे संन्यासी या मिशनचें धर्मकार्य चालवितात. या देशांत सुमारें वीस-पंचवीस हजार लोक या संप्रदायाचे आहेत. सर्व धर्मांतील ग्राह्य व बुद्धीस पटणारा तेवढाच भाग जगासमोर मांडून या रामकृष्ण मिशनच्या अनुयायांनीं परमहंसांचीं धर्ममतें जगांत फैलावण्याचा उपक्रम चालविला आहे. स्वामी विवेकानंद, अभेदानंद व इतर कित्येकांनीं अमेरिकेंत या मताचा प्रसार करण्याचें महत्कार्य केलें आहे.

**रामगड**—मुंबई, मालवण तालुक्यांत बेलें बुद्रुक या नांवाच्या खेड्यांत हा किल्ला मोडतो. हा एका टेंकडीवर असून याचें क्षेत्रफळ ८ एकर आहे. तटाची उंची ८ फूट असून रुंदी १० फूट आहे. परिघ ७०० यार्ड आहे. तटाला १५ बुरूज आहेत. किल्ल्यांत किल्लेदाराचा वाडा व एक देवालय आहे.

**रामगड**—१. मध्यप्रांत, सुरगुजा संस्थानांतील एक टेंकडी. या टेंकडीवर कांहीं गुहा व जुन्या देवळांचे अवशेष आहेत. जोगीमारा नांवाच्या गुहेंत दोन हजार वर्षांपूर्वीचीं चित्रें आढळतात.

२. राजपुताना, अलवार संस्थानांतील एक तहशील व ठिकाण. रामगड गांव अलवारच्या पूर्वेस १३ मैलांवर आहे. याला भोजपूर असें नांव होतें. १७७७ पासून हें अलवार संस्थानांत आहे. या ठिकाणीं एक मराठी शाळा आहे.

३. (रामन् गड). मद्रास इलाला, सोंडूर संस्थान, एक हवा खाण्याचें ठिकाण. हें सोंडूरपासून जवळच आहे.

**रामचंद्र गणेश कानडे** (मृ. १७८०)—उत्तर पेशवाईंतील एक ब्राह्मण सरदार. याचे वडील शाहूच्या वेळीं उदयास आले. रामचंद्रपंतानें कर्नाटक आणि उत्तर हिंदुस्थान या भागांत अनेक मोहिमा केल्या. विशेषतः पानपतानंतर उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांचें वर्चस्व बसविण्याचें व दिल्लीची पादशाही मराठ्यांच्या छापाखालीं ठेवण्याचें अवघड काम पंतानें केलें. सरदार बिनीवाले यांच्याशीं वांकडें येऊन रामचंद्रपंताला दक्षिणेंत परत यावें लागलें. बारभाईंतील एक मुत्सद्दी म्हणून याची गणना आहे. १७८० त इंग्रजांशीं झालेल्या खंडाळ्याच्या लढाईंत रामचंद्रपंत पडला. याचा वाडा पुण्यास शनवारांत नदीकांठीं (पुढें कोनकरांचा वाडा म्हणत तो) होता. याचे वंशज *निजामहद्दींत इनामाच्या गांवीं असतात.*

**रामचंद्र नीलकंठ अमात्य** (१६५०–१७३३)—मराठेशाहीचा एक कर्तबगार मुत्सद्दी. शिवाजीचा अमात्य निळो सोनदेव हा सन १६७२ मध्यें मरण पावल्यावर त्याच्याच जागीं शिवाजीनें त्याच्या या मुलाची नेमणूक केली. याचें लग्न शिवाजीचा मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे याच्या मुलीशीं झालें. अण्णाजी दत्तोनंतर त्याचें सचिवपदहि यालाच मिळाल्याचा उल्लेख आहे. संभाजी मरण पावल्यावर मराठी राज्यावर ओढवलेल्या बिकट परिस्थितींत याची कर्तबगारी कसास लागली. संभाजी मरण पावल्यामुळें औरंगजेबासारख्या शत्रूपासून मराठी राज्याचें संरक्षण करणें हें एक बिकट काम झालें होतें. रायगड घेऊन येसूबाई व बाल शाहू यांना शत्रूनें आपल्या कैदेंत ठेवलें. राजारामास स्वसंरक्षणासाठीं कर्नाटकांत जिंजीस जाणें भाग पडलें. अशा बिकट परिस्थितींत यानें महाराष्ट्रांत सैन्याची उभारणी करून औरंगजेबाशीं दोन हात केले. जिंजीस सात वर्षें वेढा पडला असतां यानें इकडून तिकडे सैन्य पाठवून मोंगलांची रसद लुटली, फितुरीमुळें होणारे अनर्थ टाळून आपला लष्करी पत्रव्यवहार बिनचूक राखला व शेवटीं जिंजीहून मोंगलांच्या तडाख्यांतून राजारामास सुरक्षितपणें बाहेर पळवून आणलें. राजारामानें नंतर अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या त्या वेळीं त्यानें हणमंते यास अमात्यपद दिलें; पण यामुळें रामचंद्रपंतास हणमंत्यांचें वैषम्य वाटूं नये म्हणून त्यानें याच्यासाठीं 'हुकमतपन्हा' नांवाचें एक अमात्याच्या वरचें पद निर्माण करून त्याचीं वस्त्रें सन १६९१ मध्यें जिंजीहून याजकडे विशाळगडास पाठविलीं. सन १६९७ मध्यें हणमंते वारल्यावर त्याचें अमात्यपद परत याजकडे आलें.

आपल्या कारकीर्दीत यानें आपल्या अधिकाराचा उपयोग अत्यंत नेकीनें केला. मोंगलांच्या आक्रमणाबद्दल लोकांत निर्माण झालेल्या द्वेषाचा यानें मराठेशाहीच्या हितासाठीं चांगलाच उपयोग करून घेतला. अनेक वतनांचें आमिष निर्माण करून यानें लोकांतील शूरवृत्तीस चेतना दिली. राजारामाच्या मृत्यूनंतर अनेक कपट-कारस्थानें रचून औरंगजेबानें मराठेशाहींत फूट पाडण्याचे केलेले प्रयत्न यानें हाणून पाडले. राजारामानंतर यानें ताराबाईचा पुत्र शिवाजी याची मुंज करून त्यास गादीवर बसवलें. शाहूचाहि याजवर दृढविश्वास होता. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहूची सुटका झाली व ताराबाईकडील सरदार शाहूस मिळाले. शाहूनें महाराष्ट्रांत सत्ता स्थापन केल्यावर ताराबाईचा एक वेगळा पक्ष निर्माण झाला. रामचंद्रपंत हा ताराबाईच्या पक्षाकडेच राहिला. परंतु ताराबाईची सवत राजसबाई हिनें आपला मुलगा संभाजी यास गादीवर बसवून ताराबाई व शिवाजी यांना कैदेंत टाकतांच हा संभाजीस मिळाला. संभाजीला उद्देशून लिहिलेलें राजनीतीचें 'आज्ञापत्र' हेंच याचें राजकारणांतील शेवटचें कार्य ( सन १७१६ ) होय. यानंतर यानें राजकारणांतून आपलें अंग काढून घेतलें व अलीबागेच्या उत्तरेस श्रीकनकेश्वर येथें शेवटपर्यंत वास्तव्य केलें. यानें लिहिलेली 'राजनीति' किंवा 'आज्ञापत्र' हा ग्रंथ याच्या राजनीतिनैपुण्याची व कर्तबगारीची साक्ष देतो. यास भगवंतराव, मोरेश्वर व शिवराम असे तीन पुत्र होते.

**रामचंद्रबाबा शेणवी** ( मृ. १७५४ )—पेशवाईतील एक सारस्वत मुत्सद्दी. हा मूळ सांवतवाडीकडचा राहणारा. पुढें कचेश्वरबाबा ब्रह्मे यांच्यामार्फत बाळाजी विश्वनाथाजवळ राहिला. आपल्या हिशेबी आणि राजकारणी धोरणामुळें लवकरच प्रसिद्धीस आला. पेशवे त्याची सल्ला घेत. नानासाहेब आणि भाऊसाहेब यांचें राज्यकारभाराविषयींचें शिक्षण रामचंद्रबाबाजवळ झालें. पेशव्यानें त्यास राणोजी शिंद्याचा दिवाण केलें. पण पुढें याच्या द्रव्यलोभी वृत्तीमुळें जयाप्पाशीं पटलें नाहीं. तेव्हां शिंद्याची दिवाणगिरी सोडून बाबा भाऊसाहेबाचा दिवाण झाला. जमीनमहसुलाच्या बाबतींत रामचंद्रबाबानें बऱ्याच सुधारणा केल्या व पैसा कसा उभारावा याविषयीं योजना ( नवीन पट्ट्यांच्या ) करून दिल्या. बाबा पुण्यास वारला तेव्हां त्याजवळ बरीच संपत्ति होती. कसब्याच्या गणपतीमागें याचा सात मजली वाडा होता.

**रामजोशी** ( १७५८-१८१२ )—एक मराठी कवि, कीर्तनकार व शाहीर. हा देशस्थ ब्राह्मण, आडनांव तासे. सोलापूरच्या जोशीपणाची वृत्ति याच्या घराण्यांत होती. लहानपणापासून लावण्या-तमाशांचा नाद लागला. पण मोठ्या ईर्षेनें संस्कृत विद्येचेंहि अध्ययन करून तींत पांडित्य मिळविलें. मोरोपंताच्या आर्या रामजोशी आपल्या कथाकीर्तनांत वापरीत असल्यानें त्यांची फार प्रसिद्धि झाली. त्या वेळच्या लावण्या-पोवाडे करणारांत रामजोशी प्रमुख असे. राम, व्यंकटपति किंवा कविराय अशीं नांवें आपल्या काव्यांत घातलेलीं आढळतात. सबंध महाराष्ट्रभर याचीं कीर्तनें होत. पुण्यास तर नेहमीं तो येई व तेथेंच वारला. याचें खाजगी वर्तन चांगलें नसल्यानें याच्या काव्यगुणाची चहा त्या वेळीं फारशी झाली नाहीं. याची छेकापह्नुति फार प्रसिद्ध आहे. छंदःशास्त्रावरचा 'छंदोमंजरी' हा ग्रंथ, 'मदालसाचंपू' व इतर कांहीं खंडकाव्यें, त्यानें स्फुट पदांखेरीज केलीं आहेत.

**रामटेक**—मध्यप्रांत, नागपूर जिल्हा, रामटेक तहशिलींतील एक शहर. हें नागपूरच्या ईशान्येस २५ मैलांवर एका टेंकडीच्या पायथ्याशीं आहे. टेंकडीवर बरींच देवळें असून त्यांपैकीं रामाचें मोठें आहे. मेघदूतांतील 'रामगिरि' हाच असावा असें कांहीं संशोधकांचें मत आहे. शहराभोंवतीं २७ तळीं आहेत. अंबातळें हें प्रसिद्ध असून कुष्ठादि रोगांवर याच्या पाण्यानें स्नान केल्यास चांगला गुण येतो असा समज आहे. तेव्हां अनेक रोगी येथें स्नानास येतात. जवळच विड्याच्या पानांच्या बागा व मँगॅनीजच्या खाणी आहेत.

**रामतीर्थ, स्वामी** ( १८७३-१९०६ )—एक प्रसिद्ध हिंदी सत्पुरुष, तत्त्वज्ञानी व कवि. पंजाब प्रांतांतील गुजराणवाला जिल्ह्यांतील मुरलीवाला गांवीं यांचा जन्म झाला. यांचें पहिलें नांव तीर्थराम असें होतें. परंतु यांनीं संन्यास घेतल्यावर तें बदलून रामतीर्थ असें ठेवलें. हे तुलसीदासाच्या वंशांतील असल्यानें त्या भागांत यांचें घराणें सुप्रसिद्ध आहे. अनेक सांपत्तिक अडचणींना तोंड देऊन यांनीं आपलें एम्. ए.पर्यंतचें शिक्षण पूर्ण केलें. त्यानंतर प्रथम कांहीं दिवस सियालकोटच्या मिशन हायस्कूलमध्यें व नंतर लाहोरच्या मिशन कॉलेजमध्यें यांनीं गणिताच्या प्राध्यापकाची नोकरी केली. याच कालांत आध्यात्मिक ज्ञानार्जनाची यांची इच्छा वाढीस लागली व यांनीं आपल्या नोकरीचा त्याग केला. रँग्लर होण्यासाठीं मिळालेली शिष्यवृत्तिहि यांनीं या वेळीं नाकारली. स्वामी विवेकानंदांच्या वेदान्तावरील व्याख्यानांचा अभ्यास करून नंतर हे हिमालयांत गेले व तेथें यांनीं संन्यास

घेतला. मध्यंतरीं टेहरीच्या महाराजांच्या विनंतीवरून ऑगस्ट १९०२ मध्यें हे टोकियो येथें भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय धर्मपरिषदेसाठीं म्हणून गेले. जपानमध्यें यांनीं वेदान्तविषयक जीं व्याख्यानें दिलीं त्यांवरून यांचें पांडित्य व सखोल अभ्यास दिसून येतो. जपानहून हे अमेरिकेस गेले. विवेकानंदांच्याइतकेंच यांचेंहि तेथें स्वागत झालें. नंतर हे मायदेशीं परत आले. यांनीं शिष्यपरंपराहि निर्माण केली आहे. पूर्वायुष्यांत यांनीं अनेक ग्रंथांची निर्मिति केली होती. परंतु एकदां निराशेच्या भरांत यांनीं या आपल्या लिखाणाला गंगेंत जलसमाधि दिली. आतां यांचे ग्रंथ म्हणजे अमेरिकेंत किंवा हिंदुस्थानांत दिलेलीं व्याख्यानें हेच होत. हीं व्याख्यानें हिंदी, इंग्रजी व मराठी भाषेंत प्रसिद्ध झालीं आहेत.

एकदां हे गंगेंत स्नान करीत असतां यांच्या पायाखालचा दगड निसटला व हे बुडून मरण पावले. यानंतर मृत्यूपूर्वी यांनीं लिहिलेला आपला मृत्युलेख यांच्या टेबलावर आढळला. हृषिकेशजवळ ब्रह्मपुरीस एक सुंदर ग्रंथालय उघडून यांचें स्मारक करण्यांत आलें आहे.

**रामदासपंत** (मृत्यु १७५२)—निजामाच्या पदरचा एक मुत्सद्दी. नासिरजंगाच्या पदरीं असलेला हा शिकाकोलचा एक ब्राह्मण असून नासिरजंगास नेस्तनाबूद करण्याच्या हुल्लेच्या कटांत याचें अंग होतें. यानंतर हा मुजफरजंगाचा दिवाण झाला व यास 'रघुनाथदास' ही पदवी मिळाली. मुजफरजंग मरण पावल्यावर सलाबतजंगास निजामी मिळवून देण्याचें काम यानें व फ्रेंचांकडील बुसीनें मिळून केलें. याच वेळीं नानासाहेब पेशव्यानें निजामशाही नाहींशी करण्याच्या हेतूनें निजामावर स्वारी करण्याचें ठरवलें तेव्हां यानें पेशव्याच्या वकिलाच्या मध्यस्थीनें नानासाहेबास त्याचें सर्व कर्ज निवारण करण्याची हमी दिली व आपल्या वागणुकीनें त्याच्या मनांत आपल्याबद्दल विश्वास निर्माण केला. दमाजी गायकवाड ताराबाईतर्फे नानासाहेब पेशव्यांवर चालून आला असतां यानें पेशव्यांना सैन्याची मदत केली. पेशव्यांचा पांच लक्षांचा खजिना उत्तरेकडून पुण्यास येत असतां यानें बुसीच्या साहाय्यानें तो लुटला व आपलें या प्रकरणांत कांहींच अंग नाहीं असें यानें पेशव्यांना भासवलें. परंतु सर्व कारस्थान पेशव्यांनीं ओळखलें होतें. ता. २१-११-१७५१ रोजीं पेशवे व निजाम यांमध्यें नगर जिल्ह्यांतील कुकडी नदीवर युद्ध झालें. याच वेळीं चंद्रग्रहण आल्यानें पेशव्यांकडील मंडळी नदीवर स्नानास गेली आहेत अशी संधि साधून यानें पेशव्यांवर अचानक हल्ला करून त्याचा पराभव केला. यानंतर शिंदे-होळकरांच्या साहाय्यानें नानासाहेबानें याजवर परत चालून जाण्याचें ठरवलें होतें; परंतु याच वेळीं याचा खून झाला. यास उत्तमराव व अच्युतराव असे दोन मुलगे होते.

**रामदासस्वामी** (१६०८-१६८२)—महाराष्ट्रांतील प्रसिद्ध संत व कवि. यांचे वडील सूर्याजीपंत ठोसर हे निजामराज्यांतील जांबगांवचे कुळकर्णी होते. तेथेंच रामनवमीस रामदासांचा जन्म झाला. लहानपणींच रामदास घराबाहेर पडले व पुरश्चरण करूं लागले. त्यांनीं सर्व देश यात्रेच्या निमित्तानें पालथा घातला व देशाची आणि हिंदु धर्माची स्थिति अजमावली. नंतर ते महाराष्ट्रांत येऊन राहिले. त्या वेळीं शिवाजी स्वराज्य-स्थापनेच्या कामास लागला होता. त्याला समर्थांनीं नुसता यशाचा आशीर्वादच दिला असें नव्हे तर राजकारणाचे धडे देऊन प्रत्यक्ष पण गुप्त मदत केली, असे अनुमानणारे पुष्कळ विद्वान् आहेत. रामदासांनीं हिंदुस्थानांत मोक्याच्या जागीं आपल्या मठांची जी स्थापना केली व आपल्या पंथाचे अनुयायी मारुति-उपासक आणि ब्रह्मचारी करण्यावर जो कटाक्ष ठेवला त्याचें कारण वरील अनुमानांत सांपडेल. रामदासांनीं जो 'दासबोध' हा प्रवृत्ति-निवृत्तिपर ग्रंथ लिहिला तो इतर संतांच्या ग्रंथांहून फार निराळा आहे व तो पौराणिक किंवा नुसता वेदान्तपर नसूनहि त्याला ज्ञानेश्वरीच्या खालोखाल महाराष्ट्रांत अद्यापि मान आहे. रामदास आणि शिवाजी ही त्या वेळची गुरुशिष्यांची अपूर्व जोडी इतिहासांत मागें किंवा पुढें कधीं झालेली नाहीं. फकीरी वृत्तीच्या भगव्या कफनीच्या आंत देशहितासाठीं तळमळणारें हृदय असावें लागतें व 'भिक्षां देहि' ही पोट भरण्यासाठीं करावयाची नसून प्रचारासाठीं आहे, यांसारखी रामदासी पंथाची शिकवण पाहिल्यास रामदासांची योग्यता इतर संतांपेक्षां निराळीच मानावी लागते. शिवाजीनें त्याच्या झोळींत राज्याचीं दानपत्रें टाकिलीं असतां समर्थांनीं तीं त्याला परत केलीं, या आख्यायिकेंतहि अर्थ आहे. शिवाजीच्या मृत्यूनंतर संभाजीला त्यांनीं जो उपदेश केला तो अत्यंत मननीय आहे. समर्थ शेवटीं परळीस जाऊन राहिले व तेथेंच त्यांचें अवसान झालें. तेव्हांपासून परळीच्या ठिकाणास सज्जनगड म्हणतात. त्यांनीं दासबोधाखेरीज, रामायण, मनाचे श्लोक, सप्तसमासी, करुणाष्टकें, इ. असंख्य कवितारचना केली आहे.

समर्थांचे अत्यंत निष्ठावंत असे आधुनिक भक्त श्री. शंकर श्रीकृष्ण देव (धुळें) यांनीं समर्थांच्या जन्मस्थानीं जांबेस सूर्यमंदिर बांधलें असून धुळयास 'समर्थ वाग्देवता मंदिर'

नांवाची समर्थांच्या वाङ्मयाचा संग्रह आणि अभ्यास करणारी संस्था स्थापन केली आहे. आज रामदासी संप्रदाय जुन्या स्वरूपांत राहिलेला नाहीं खरा, पण आधुनिक पंडित रामदासी वाङ्मयाचें संशोधन आणि मनन करून त्या संप्रदायाचें नवीन प्रकारानें सातत्य टिकवीत आहेत यांत शंका नाहीं.

रामदासी संप्रदाय—हा रामदासस्वामींनीं स्थापिला असून या संप्रदायाचें मुख्य अंग समाजाची ऐहिक व पारलौकिक उन्नति करणें हें आहे. हरिकथा-निरूपण, राजकारण आणि सावधपण हें संप्रदायाचें मुख्य लक्षण रामदासांनींच सांगितलें आहे. वारकरी संप्रदाय व हा संप्रदाय यांत फरक असा कीं, वारकरी संप्रदाय पूर्ण निवृत्तिपर आहे तर रामदासी संप्रदाय प्रवृत्ति-निवृत्तींचा संगम होऊन बनला आहे. सावधपणा व यत्न यांवर समर्थांचा मोठा कटाक्ष आहे. यत्न हाच देव; यत्नानें सर्व कांहीं साधतें; सावध, साक्षेपी व दक्ष राहिल्यास मोक्ष तात्काळ मिळतो; शक्तीनें राज्य मिळतें व युक्तीनें यत्न सिद्धीस जातो; म्हणून या दोहोंचीहि कास धरली पाहिजे; असें रामदासी तत्त्वज्ञान आहे.

असुरमारक व देवतारक अशा धनुर्धारी रामाची उपासना या संप्रदायांत सांगितली आहे. तसेंच रामापुढच्या दासमारुती-ऐवजीं भीममारुतीची उपासना संप्रदायांत आहे. ब्रह्मचारी राहून व भिक्षेवर उपजीविका करून निष्काम बुद्धीनें समाजाचें धारण-पोषण करणें व त्याला आत्मज्ञानाची ओळख करून देणें हेंच या पंथांतील महंताचें मुख्य कर्तव्य आहे.

समर्थांच्या पश्चात् कांहीं कालच ही उज्ज्वल परंपरा टिकली होती. पुढें स्वार्थ आणि सुखासीनता पंथांत शिरून समाज-सेवेचीं कर्तव्यें सुटलीं व पंथ बहुतेक विलयास गेला. आतां फक्त पंथाच्या नांवावर पोट भरणें उरलेलें दिसतें.

**रामदासी मल्लार**—हा काफी थाटाचा जन्यराग आहे. याचे आरोह व अवरोह सातहि स्वरांनीं होतात. म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. शुद्ध मल्लारांत सुधराई रागाचें मिश्रण झालें म्हणजे हा राग होतो. हा एक मल्लारप्रकार आहे.

**रामदुर्ग संस्थान**—दक्षिण महाराष्ट्रांतील एक संस्थान. याचें क्षे. फ. १६९ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ४०,११४ आहे. संस्थानचें उत्पन्न १,६८,००० रुपये आहे. संस्थानांत २ शहरें व ३७ खेडीं आहेत. तीं धारवाड आणि विजापूर जिल्ह्यांत सलग आहेत. संस्थानांतून मलप्रभा नदी वाहते. गहूं, हरभरा, ज्वारी, बाजरी, तांदूळ व कापूस हीं मुख्य पिकें होत. सुती कापडाचा मोठा व्यापार आहे. भाषा कानडी चालते.

नरगुंद आणि रामदुर्ग हे किल्ले शिवाजीनें बांधल्याचें सांगतात. पुढें ते औरंगजेबानें घेतले (१६९२). संस्थानिकांचा मूळ पुरुष रामराव दादाजी भावे यानें १७०७ सालीं हे किल्ले परत घेतल्यानें कोल्हापूरकरांनीं त्याला आपला सचिव केलें. त्याच्या वंशजांनीं पुढें वांटण्या करून घेतल्या. हैदरनें हें संस्थान आपल्या ताब्यांत घेतलें होतें तें पुढें मराठ्यांनीं सोडविलें. शेवटच्या बाजीरावाच्या वेळीं नारायणराव भावे पेशव्याविरुद्ध इंग्रजांस मिळाला. त्यामुळें रामदुर्गची गादी राहिली व नरगुंदची तेथील संस्थानिक भास्करराव १८५७ च्या क्रांतियुद्धात सामील झाल्यानें ती खालसा झाली (नरगुंद पाहा). रामदुर्गचे हल्लींचे संस्थानिक श्रीमंत राजे रामराव व्यंकटराव ऊर्फ बाबासाहेब भावे हे आहेत. आतां रामदुर्ग मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**रामदेवराव यादव** (१२७१-१३०९)—देवगिरि ऊर्फ दौलताबाद येथें राज्य करणारा महाराष्ट्रांतील एक ऐश्वर्यवान् सम्राट्. कृष्णदेव यादवाचा हा मुलगा. याच्या कारकीर्दीत अल्लाउद्दीन खिलजीनें याचा मुलगा शंकरदेव हा परप्रांतीं गेल्याची संधि साधून दौलताबादेस वेढा दिला. याच वेळीं यास आपल्या किल्ल्यांत धान्याऐवजीं मिठाचीं पोतीं भरलीं असल्याचें आढळून आल्यानें किल्ला लढवणें शक्य होईना. शिवाय फितुरीचाहि यास संशय आल्यानें अल्लाउद्दिनास शरण जाण्यावांचून दुसरा मार्ग राहिला नाहीं; तेव्हां यानें पुष्कळ द्रव्य देऊन अल्लाउद्दिनाशीं तह केला. परंतु याच वेळीं याचा परमुलखांत गेलेला शूर मुलगा शंकरदेव हा राजधानीस परत आला व त्यानें अल्लाउद्दिनाचा नक्षा उतरविण्यासाठीं पुन्हां युद्धास सुरुवात केली. या वेळीं मुसलमानांचा सर्वनाश होण्यापर्यंत परिस्थिति आली होती. परंतु दिल्लीहून अल्लाउद्दिनास कुमक येत असल्याची बातमी आल्यानें शंकरदेवाच्या सैन्याची भयानें पांगापांग होऊन मुसलमानांच्या हातांत देवगिरीचें राज्य पडलें. सन १३०६ मध्यें मलिक काफुर खंडणी वसुलीसाठीं दक्षिणेंत आला असतां रामदेवराव त्याच्या स्वाधीन होऊन दिल्लीस गेला. तेथें अल्लाउद्दिनानें याचा मानमरातब ठेवून यास एक छत्र, राजाधिराज हा किताब व एक लाख रुपये देऊन यास स्वदेशीं परत पाठवलें. याच्या वेळींच महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर-नामदेवादिकांनीं आपल्या धर्माची ध्वजा उभारून प्रचारास सुरुवात केली होती. हेमाद्रीसारखे धुरंधर पंडित, महानुभाव पंथाचा चक्रधरकृष्ण, भास्कराचार्य हे याच्याच कालांतील होत. ज्ञानेश्वरींत याचा गौरवपर उल्लेख आहे.

**रामन्, सर चंद्रशेखर व्यंकट** ( १८८८- )— एक जगद्विख्यात हिंदी पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व 'रामन् इफेक्ट' या शोधाचे जनक. त्रिचनापल्लीस यांचा जन्म झाला. वयाच्या बाराव्या वर्षीच हे मॅट्रिक झाले. नंतर मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमधून 'विज्ञान' हा विषय घेऊन यानीं एम्. ए. ची पदवी मिळवली. १९०६ मध्यें लंडनच्या फिलॉसफिकल मॅगेझिनमध्यें यांचा पहिला संशोधनपर निबंध प्रसिद्ध झाला. कांहीं दिवस यांनीं मध्यवर्ती सरकारांत डेप्युटी अकौंटंटचेंहि काम केलें. परंतु याच वेळीं कलकत्त्याच्या 'इंडियन असोसिएशन फॉर कल्टिव्हेशन ऑफ सायन्स'चे अमृतलाल सरकार यांच्या प्रोत्साहनानें यांनीं त्या संस्थेच्या प्रयोगालयांत आपल्या संशोधन-कार्यास सुरुवात केली. तसेंच यानंतर १९०७ सालीं 'युनिव्हर्सिटी कॉलेज ऑफ सायन्स'मध्यें हे विज्ञानाच्या प्राध्यापकाचें काम करूं लागले. यांचें महत्त्वाचें संशोधन झालें तें याच कालांत. 'रामन् इफेक्ट' या यांच्या प्रकाशविषयक अपूर्व शोधामुळें जगांतील विज्ञान-संशोधकांच्या मालिकेंत यांचें नांव गोवलें गेलें आहे. एखाद्या त्रिपार्श्वा( प्रिझम )मधून जर आपण पारदबाष्पदीपा( मर्क्युरी व्हेपरलॅम्प )मध्यें आढळणाऱ्या प्रकाशाकडे पाहिलें तर तो आपणांस निरनिराळ्या पट्ट्यांत विभागलेला दिसतो. परंतु हाच प्रकाश ज्या वेळीं पाणी व बर्फ यांमधून जातो त्या वेळीं त्रिपार्श्वामधून आपणांस दिसणाऱ्या रंगीत पट्ट्यांत आणखी कांहीं नवीन प्रकाशरेषांचा उदय झालेला दिसून येतो. याच नव्या प्रकाशरेषांना 'रामन् लाइन्स' किंवा 'रामन् बॅड्स' म्हणतात. प्रकाशपट्टयाला 'रामन् स्पेक्ट्रा' व या शोधाला 'रामन् इफेक्ट' असें नांव आहे. यांच्या या संशोधनानें परमाणू व अणू यांच्या रचनेवर बराच नवीन प्रकाश पडला आहे. या शोधामुळें यांना १९३० सालीं स्वीडनच्या राजेसाहेबांच्या हस्तें नोबेल पारितोषिक अर्पण करण्यांत आलें. याच वेळीं लंडनच्या रॉयल सोसायटीनें 'ह्यूजेस' पदक देऊन यांचा सत्कार केला.

यांनीं, कलकत्त्याची इंडियन असोसिएशन व बंगळूरची इंडियन इन्स्टिटयूट या संस्थांत काम करीत असतां अनेक होतकरू शास्त्रज्ञांना संशोधन-कार्यांत मार्गदर्शन केलें आहे. १९३४ सालीं यांनीं बंगळूर येथें 'इंडियन ॲकॅडेमी ऑफ सायन्स' ही संस्था स्थापन केली. या संस्थेतर्फें दर महिन्यास प्रसिद्ध होणाऱ्या 'प्रोसीडिंग्ज'मधून हिंदुस्थानांत चाललेलें प्रातिनिधिक संशोधन सादर करण्यांत येतें. त्या संशोधन-संस्थेचे हे संचालक आहेत. यांनीं बंगळूरास आपली स्वतःची संशोधनसंस्था काढली आहे (१९४३). हे अनेक पाश्चात्य शास्त्रीय संशोधन-संस्थांचे सभासद आहेत.

**रामनाड जहागिरी**— मद्रास, मदुरा जिल्ह्यांतील जहागिरी. यांत पांच तहशिली आहेत. क्षे. फ. २,१०४ चौ. मैल. मदुरा जिल्ह्यांतील सर्व समुद्रकिनारा यांत येतो. जहागिरींत रामनाड व रामेश्वर हीं दोन मुख्य शहरें आहेत. कीलकरै हें मुख्य बंदर आहे. परमकुडी व अरूपकोट्टई हीं व्यापाराचीं ठिकाणें आहेत. रामाचा सेतु या जहागिरींत असल्यामुळें जहागिरदारास सेतुपति ही पदवी आहे. रामनाड ते पाचनबेट यांमध्यें जी खडकांची ओळ आहे तोच पुराणप्रसिद्ध रामाचा सेतु होय. पांबन व इतर मानारच्या आखातांतील प्रवाळांचीं बेटें प्रेक्षणीय आहेत.

**रामपूर संस्थान**—१. हिंदुस्थान, रोहिलखंडांतलि एक संस्थान. क्षे. फ. ८९३ चौ. मै. व लो. सं. ४,७६,९१२. संस्थानांतून पुष्कळ नद्या वाहतात. जमीन सपाट व सुपीक आहे. तांदूळ, गहूं, मका, कापूस व ऊंस हीं मुख्य पिकें होत. उद्योगधंदे पुष्कळच आहेत. लोकसंख्येपैकीं शें. ५५ हिंदू व ४५ मुसलमान आहेत. भाषा हिंदुस्थानी आहे. रोहिलखंडाचा व रामपूरचा इतिहास एक आहे. अली महमद रोहिला यानें रोहिलखंड मिळविला. त्याचा धाकटा मुलगा फैझुल्लाखान याच्याकडे रामपूरची जहागिरी आली. त्याच्याच वंशजाकडे आज गादी चालत आहे. हल्लींचे नबाब सर सय्यद महमद राजा अलीखान हे १९३० सालीं गादीवर बसले. यांनीं लष्करी हुद्यांचीं कामें केलेलीं आहेत. संस्थानच्या कारभारासाठीं स्टेट कौन्सिल आणि असेंब्ली हीं दोन मंडळें आहेत. दुय्यम व प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जातें. संस्थानचें उत्पन्न सुमारें ७८ लक्ष रुपये आहे. रामपूर शहराचें नांव कांहीं काळ मुस्तफाबाद असें होतें. शहरांत एक किल्ला आहे. एक दुय्यम कॉलेज, अरबी कॉलेज, राजवाडा, बागा, इस्पितळ, संग्रहालय, इ. च्या मोठ्या इमारती आहेत. दोन साखरेच्या गिरण्या, कापड आणि तेल यांच्या गिरण्या, यांत्रिक सामान आणि हत्यारें करण्याचे कारखाने, नक्षीचीं भांडीं, लाखेच्या वस्तू, वगैरे करण्याचे कारखाने रामपुरांत आहेत. लो. सं. सुमारें पाऊण लाख आहे.

२. या नांवाचीं मुंबई इलाख्यांत रेवाकांठा आणि महीकांठा या जिल्ह्यांत दोन अगदीं लहान संस्थानें आहेत.

**रामपूर बोवालिया**— पूर्व बंगाल, राजशाही जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. २४,०००. रेशमाच्या व्यापाराचें ठिकाण

म्हणून हें पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं डच वखार होती. येथें एक कॉलेज आहे.

**रामपूर भानपूर**—मध्य हिंदुस्थान, इंदूर संस्थानांतील एक जिल्हा. रामपूर आणि भानपूर हे दोन्ही जिल्हे मिळून हा बनला आहे. क्षे. फ. २१२३ चौ. मै.. येथें बौद्ध लोक राहत असल्यामुळें चैत्य, विहार व लेणीं यांचे अवशेष दृष्टीस पडतात. हा भाग प्रथम परमार राजांकडे होता, तो १५ व्या शतकांत मुसलमानांकडे गेला. नंतर उदेपूर, जयपूर व इंदूर या संस्थानांकडे अनुक्रमाने आला. यशवंतराव होळकरानें येथें आपली राजधानी महेश्वराहून नेली होती.

**रामफळ**— हें फळझाड बरेंच उंच वाढतें. पानें अशोकाच्या पानांसारखीं असतात व फळें मोठीं व तांबूस रंगाचीं होतात. रामफळ सीताफळाप्रमाणें थंड नाहीं व लांकूडहि इमारतीच्या कामीं उपयोगी पडत नाहीं.

**रामबाण रस**—एक आयुर्वेदीय रसायन. गंधक, पत्रीहरताळ, सोमल, मनशीळ, वंशलोचन, कात, हिंगूळ आणि पिंपळी हीं औषधें समभाग घेऊन नागवेलीच्या पानाच्या रसांत त्यांचा खल पांच प्रहरपर्यंत करावा. नंतर उडदाएवढ्या गोळ्या बांधाव्या. त्यांतील एकेक गोळी कणीक व तूप या अनुपानांत सात दिवसपर्यंत द्यावी. आंबट, तेलकट, खारट पदार्थ आणि शीतोदकाचें पान वर्ज्य. या रसायनाच्या सेवनेंकरून वात, कफ, पित्त, भगंदररोग, मूळव्याध, गंडमाळा, श्वास, उरःक्षत, खांडूक हे रोग दूर होतात.

**राममोहन रॉय** ( १७७४–१८३३ )—एक प्रमुख बंगाली देशभक्त, धर्मसुधारक व ब्राह्म समाजाचा आद्य संस्थापक. यांचा जन्म बंगालमधील हुगळी या जिल्ह्यांतील राधानगर येथें झाला. यांस बंगाली, फारसी व अरबी आणि संस्कृत या भाषांचें शिक्षण मिळालें होतें. वेदान्त व उपनिषदें यांच्या वाचनानें हे एकेश्वरी मताचे बनले व त्यांनीं 'तुहफतुल मुवहिद्दीन' नांवाचा फारसी भाषेंत ग्रंथ लिहून मूर्तिपूजेवर झणझणीत टीका केली. त्यामुळें यांस घर सोडून जावें लागलें. नंतर त्यांनीं इंग्रजी भाषेचा अभ्यास केला. १८०० सालीं रंगपूर येथें कलेक्टर कचेरींत कारकुनाची नोकरी धरली व पुढें जिल्ह्याचे दिवाण झाले. १८१४ सालीं नोकरी सोडून ते कलकत्त्यास गेले. तेथें त्यांनीं धर्मसुधारणेचें व समाजसुधारणेचें कार्य चालविलें व उपनिषदांचें भाषांतर करून एक आत्मीय सभा नांवाची संस्था स्थापन केली व जुन्या मताची मंडळी किंवा मिशनरी यांबरोबर वादविवाद करूं लागले. १८३० सालीं यांनीं ब्राह्म समाजाची स्थापना केली. यांनीं सतीची चाल बंद करण्यासाठीं खटपट केली. १८३० सालीं मोंगल बादशहानें त्यांस राजा ही पदवी देऊन आपलें गाऱ्हाणें निवेदन करण्यास इंग्लंडच्या राजाकडे पाठविलें. तेथें त्यांनीं हाउस ऑफ कॉमन्सच्या सिलेक्ट कमिटीपुढें हिंदुस्थानांतील न्याय व जमाबंदी या प्रश्नांवर साक्ष दिली. तेथून ते फ्रान्समध्यें गेले पण प्रकृति बिघडल्यामुळें पुन्हां ब्रिस्टल येथें आले व तेथेंच १८३३ सालीं मृत्यु पावले. आर्नोव्हेल येथें यांची समाधि आहे. ब्रिटिश अमलानंतर हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची चळवळ करणारांमध्यें हे आद्य पुढारी होत. यांना अर्वाचीन बंगाली वाङ्मयाचेहि आद्य प्रवर्तक मानण्यांत येतें. यांचा देशाभिमान जाज्वल्य होता. आपल्याकडे न्या. मू. रानडे यांना जो मान आहे तोच बंगालमध्यें रॉयना आहे.

**रामराजा छत्रपति** ( १७२६–१७७७ )—शाहूच्या मृत्यूनंतर त्याच्या इच्छेप्रमाणें नानासाहेब पेशव्यानें याला सातारा छत्रपतीच्या गादीवर बसविलें. हा राजाराम छत्रपतीचा मुलगा जो कोल्हापूरचा शिवाजी त्याचा मुलगा होय. चुलता संभाजी ठार मारील म्हणून ताराबाईनें याला लपवून ठेविलें होतें. कारभाराचें किंवा कसलेंच शिक्षण नसल्यानें हा अगदीं दुबळा बनला होता. ताराबाई त्याच्यावर चांगलेंच वर्चस्व गाजवी व तिनें त्याला पेशव्यांचें ऐकतो म्हणून आपल्या कैदेंत ठेविलें होतें. ताराबाईच्या मृत्यूनंतर ( १७६१ ) तो पेशव्यांच्या सांगण्याप्रमाणें चाले. शाहूनंतर मराठ्यांचें साम्राज्य पेशवेच चालवीत असल्यानें छत्रपतींना वस्त्रें देण्याखेरीज कांहींच काम नसे. याला पुत्रसंतति नसल्यानें याच्या मृत्यूनंतर याच्या राणीनें वावीकर भोंसल्यांपैकीं विठोजी नांवाचा मुलगा दत्तक घेतला; तो धाकटा शाहू म्हणून ओळखला जातो.

**रामराय आरविडु** (मृत्यु १५६५)—विजयानगरचा एक सर्वाधिकारी प्रधान. श्रीरंग व तिरुमलांबा यांचा हा पुत्र असून यास सम्राट् कृष्णदेवराय तुळुवाची मुलगी दिली होती. कृष्णदेवराय तुळुवाच्या कारकीर्दीपासूनच याचें राज्यकारभारांत अंग होतें. कृष्णदेवरायाचा मृत्यु झाल्यावर पहिला अच्युतराय गादीवर आला. प्रथम कांहीं दिवस त्याचें राज्यकारभारांत लक्ष होतें. परंतु नंतर त्यानें आपला राज्यकारभार आपले मेहुणे सकलम (सलाकम) व तिम्मराजू यांच्याकडे सोंपवला. तें यास सहन न होऊन यानें त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्यास सुरुवात केली व याचा परिणाम म्हणजे यास विजयानगर सोडणें भाग पडलें. यानंतर यानें अच्युतरायावर स्वारी केली. जुलमी कारभारामुळें अप्रिय झालेला अच्युतराय याच वेळीं त्याच्या सैन्यांत फितुरी होऊन मारला गेला व रामराय मुख्य प्रधान झाला. यानें नंतर सदाशिवरायाला गादीवर आणलें व स्वतः राज्यकारभार पाहूं लागला. विजापूर, अहमदनगर व गोवळकोंडा येथील राजांना वेळोवेळीं याचें साहाय्य मिळत असे. परंतु पुढें यास आपल्या

कर्तृत्वाचा गर्व चढला. याचा वरचढपणा असह्य झालेल्या मुसलमानांपैकीं हुसेन निजामशहा यानें मुसलमानांचा याच्याविरुद्ध एक संघ निर्माण केला व या दोन्ही पक्षांत तालिकोट येथें लढाई झाली. त्यांत रामराय व त्याचा भाऊ व्यंकटराय हे मारले गेले. यानंतर विजयानगरची लूट होऊन या राज्यास उतरती कळा लागली. हा जरी सदाशिवरायाचा प्रधान म्हणून काम करीत असे, तरी सर्व राज्यकारभारावर याचीच सत्ता असे. सन १५४२-६५ पर्यंत यानें राज्यकारभार पाहिला. यानंतर याचा भाऊ तिरुमल्ल (पाहा) हा आरविदु घराण्याचा राजा म्हणून राज्यकारभार पाहूं लागला.

**रामलीला**—उत्तर हिंदुस्थानांत हा उत्सव फार मोठा असतो. नवरात्रांत (आश्विन शु. प्र. ते दशमी) रामायणांतील—रामकथेंतील एकेक प्रसंग एकेका दिवशीं दाखविण्यांत येतो. राम-रावण-युद्धांत रावण मारला गेल्यावर त्याला जाळतात.

**रामशास्त्री प्रभुणे** (सु. १७२०-१७८९)—पेशवाईंतील एक सुप्रसिद्ध न्यायाधीश. हा माहुलीचा राहणारा देशस्थ ब्राह्मण. हा प्रथम साताऱ्यास अनगळ सावकारांकडे शागीर्दी करी. नंतर उपरति होऊन काशीस जाऊन संस्कृत विद्येंत पूर्ण पारंगत झाला. प्रथम शास्त्री व नंतर न्यायाधीश म्हणून हा पेशवे सरकारच्या पदरीं राहिला. न्याय देण्याच्या कामांत हा अत्यंत निःस्पृह व निष्ठुर असे. प्रभु, सारस्वत, वगैरे जातींवर त्यानें संकुचित वृत्तीनें कधीं अन्याय केला नाहीं. त्याचीं मतें प्रागतिक असत. नारायणरावाच्या वधाचें पाप राघोबाकडे येतें हें स्पष्ट झाल्यावर त्यानें राघोबाला देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं, असें निर्भीडपणें बजावलें व तात्काल न्यायाधिशी सोडली. पुढें बारभाईची कारकीर्द सुरू झाल्यावर नाना फडणिसानें त्याला परत बोलावून घेतलें व तो मृत्यूपर्यंत (१७८९) न्यायासनावर होता. याचे कोणी वंशज प्रसिद्धीस आले नाहींत.

**रामस्नेही पंथ**—रामानंदी पंथाच्या एका रामचरण नांवाच्या जयपूर येथील साधूनें या पंथाची स्थापना केली. या पंथांत उच्चनीच असा जातिभेद नाहीं. रामनाम हाच मंत्र व सूक्ष्म वेद मानतात. यास मूर्तिपूजा मान्य नाहीं. गुरु हा परमेश्वराहूनहि श्रेष्ठ आहे, असें या पंथाचे लोक समजतात व त्याचें ध्यान करतात. शाहपूर येथें या पंथाचें मुख्य पीठ आहे. तेथें महंत असतो. मेवाड व राजपुताना या भागांत हा पंथ प्रचलित आहे.

**रामाजी कामत** (मृत्यु १७२८)—मुंबईचा एक दानशूर हिंदु व्यापारी. हा जातीनें सारस्वत असून अंतःकरणाचा उदार व धार्मिक होता. यानें मुंबईंत अनेक देवालयें बांधलीं. त्यांपैकींच सध्यांचें वाळकेश्वराचें देवालय हें एक होय. यानें तंबाखूच्या व्यापारांत इमान राखून पैसा मिळवला. याच्याबद्दल इंग्रजांचें मत चांगलें असल्यानें त्यांनीं यास सैन्याचें आधिपत्य दिलें होतें. परंतु पुढें इंग्रजांना प्रतिकूल असणाऱ्या कान्होजी आंग्ऱ्याशीं याचा कांहीं तरी अंतःस्थ संबंध आहे असा संशय आल्यावरून यास इंग्रजांनीं राजद्रोहाच्या आरोपावरून जन्मठेपेची शिक्षा दिली. यानंतर आठ वर्षांनीं हा मरण पावला. याजवर भरण्यांत आलेला खटला बनावट होता असें नंतर उघडकीस आलें.

**रामाजी महादेव बिवलकर** (मृत्यु १७७२)—कोंकणचा एक सुभेदार. नानासाहेब पेशव्यानें तुळाजी आंग्ऱ्याच्या या कारभाऱ्यास फितवून आपल्या विश्वासांत घेतलें व याजकडे कोंकणची सुभेदारी दिली. याच्या ताब्यांत साष्टी, वसई, ठाणें व कुलाबा हे प्रांत होते. १७५५ मध्यें याच्या साहाय्यानें पेशव्यानें आंग्ऱ्यांपासून अंजनवेल मिळवली. तसेंच पेशव्यानें यास हबशांवर स्वारीस पाठवलें असतां यानें जलमार्गानें राजापुरीं जाऊन तेथें लूट केली व नंतर जंजिऱ्याकडे आपला मोर्चा वळवला. याच्याच साहाय्यानें इंग्रजांनीं तुळाजी आंग्ऱ्याविरुद्ध कारस्थान रचलें. चिमाजीआप्पानें ठाणें-साष्टीची मोहीम उभारली त्या वेळीं हा त्या फौजेंत होता. ठाण्यास यानें कौपीनेश्वराचें देवालय बांधलें. तेथेंच याचा वाडा होता.

**रामानंद**—१. (१३००-१४११)—वैष्णव पंथाचा एक आदिपुरुष. रामानंदाचें जन्मस्थान मेळकोट होतें. काशीस शिक्षण घेतल्यानंतर राघवानंद या विशिष्टाद्वैत पंथाच्या आचार्यांचें शिष्यत्व पत्करलें. रामानंदानें आपल्या पंथाला सर्वसंग्राहक करण्यासाठीं नवीनच पंथ काढला; व त्याच्या प्रचारासाठीं सर्व देशभर हिंडला. पीपा, कबीर, सेना, इ. त्याचे तेरा प्रख्यात शिष्य होते. पंथाचे अनुयायी वेगवेगळ्या जातींचे व धर्मांचे असत. जे जे विष्णुभक्त असतील त्यांनीं एकत्र बसून जेवण्यास हरकत नाहीं हा त्याचा उपदेश फार प्रगतिपर होता. धर्माचरणाला मातृभाषेची कास धरण्यास व कृष्ण-राधा सोडून राम-सीता यांसारख्या सात्त्विक देवावताराची उपासना करण्यास त्यानें शिकविलें. त्याच्या रामानंदी किंवा रामावत पंथांत दीड-दोन लाख लोक आज आहेत. रामानंदाचे ग्रंथ संस्कृतांत आहेत, पण कांहीं हिंदी पदें रामानंदाच्या नांवावर मोडतात.

रामानंदी संप्रदाय—संस्थापक रामानंद, दैवत राम, लक्ष्मण, सीता व हनुमान. रामानंदी संप्रदायांत संन्यासी देखील असतात. ते भिक्षाटन व तीर्थाटन यांत काल घालवितात. या संन्यासी पंथांत निर्वाणी, खाकी, संतोषी, निर्मोही, बलभद्री, टाटंबरी व दिगंबरी असे भेद आहेत. या संप्रदायांत महंत व त्यांची शिष्यशाखा मठाचा आश्रय करून राहते. या संप्रदायांतील वैरागी

जातिभेद पाळीत नाहींत. रामानंदाच्या शिष्यांत कबीर हा मुसलमान कोष्टी, रोहिदास चांभार, पीपा रजपूत, धन्ना जाट, आणि सेना न्हावी हे होते. यांपैकीं रोहिदास, सेना व कबीर यांचे पुढें पंथ उत्पन्न झाले. रामानंद पंथाचे लोक जातिभेदास महत्त्व देत नाहींत. सूरदास व तुलसीदास हे सुप्रसिद्ध धार्मिक कवी रामानंदी संप्रदायाचे होते.

२. एक महाराष्ट्रीय संतकवि. हा सासवडास असे व तेथें त्याची समाधि आहे. यानें केलेल्या भूपाळ्या प्रसिद्ध आहेत. हा अठराव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला. याचाहि कबीर नांवाचा मुसलमान शिष्य होता. त्याला शाहूनें कांहीं इनाम करून दिलें होतें.

**रामानुज**—विशिष्टाद्वैत मतप्रतिपादक. श्रीरामानुजाचार्यांनीं *विशिष्टाद्वैत संप्रदाय* प्रवृत्त केला. या संप्रदायाला श्रीसंप्रदाय असेंहि म्हणतात. रामानुजांचा जन्म मद्रास इलाख्यांत पेनमुतुर या गांवीं झाला. पित्याचें नांव केशवाचार्य व आईचें नांव कांतिमती असें होतें. रामानुजांनीं वेदवेदांगांचा आणि

शांकरमताचा अभ्यास केला. वेदान्तसूत्रें, दशोपनिषदें व गीता यांजवरील शंकराचार्यांचीं भाष्यें पठण केल्यावर रामानुजाचार्यांस त्यांचीं मतें सर्वथैव पटेनात. त्यांनीं कांहीं काळ एकांतवास पत्करून रामाची उपासना केली. त्यांनीं विष्णुभक्तीचा पुरस्कार केला. रामानुजाचार्यांनीं बहुजनसमाजाच्या पचनीं पडेल असा ज्ञानमार्ग रूढ करण्यासाठीं प्रयत्न केला. लोक सांसारिक सुखासाठीं कामनेच्या जाळ्यांत गुंतलेले असतात. सर्वांच्या अंतःकरणांत वैराग्य उत्पन्न होणें शक्य नाहीं. सर्वांनाच त्यागी किंवा मुक्त होतां येत नाहीं. धर्माचे खडतर नियम सामान्य जनांना पाळतां येणें शक्य नाहीं. यासाठीं सांसारिक लोकांना सोपे उपायच दाखविले पाहिजेत. म्हणून सामान्य जनतेस समजण्याजोगा धर्ममार्ग त्यांनीं दर्शविला. शंकराचार्याप्रमाणेंच यांनींहि प्रस्थानत्रयीवर आपल्या मतानुसार भाष्यें रचिलीं. रामानुजाचार्यांनीं वेदान्तसूत्रावर भाष्य लिहिलें. याशिवाय गीताभाष्य, न्यायामृत वेदान्तप्रदीप, तर्कभाष्य, वेदार्थसंग्रह, वेदान्ततत्त्वसार, श्रौतभाष्य, शतदूषणी, नारदीय पञ्चरात्र, त्रिशतध्यान, चंडमारुति, विष्णुपूजा, विष्णुप्रबोधन, रंगनाथस्तोत्र, त्रिगद्य सिद्धान्त, विष्णुसहस्रनाम, विशिष्टाद्वैत, इत्यादि अनेक लहानमोठे ग्रंथ रचले. यांच्या उपदेशामुळें राम व कृष्ण यांची पूजा हिंदु समाजांत जोरानें चालू झाली.

रामानुजांचे अनेक शिष्य होते. यांपैकीं रामानंद, कबीर, रामचरण, यांनीं आपले संप्रदाय स्थापन केले. दक्षिण हिंदुस्थानांत रामानुज संप्रदायाचा विशेष प्रचार आहे. रामानुजाचार्यांच्या परंपरेचे ८९ मठ असून त्यांपैकीं ८४ मठ रामानुजाचार्यांच्या वंशाकडे आणि ५ इतर संन्याशांकडे आहेत. यांपैकीं म्हैसुरांत श्रीरंगपट्टणच्या जवळ मेलकोटे (पाहा) येथील मठ मुख्य असें मानतात. ताटोद्रि, रामेश्वर, श्रीरंग, कांची, आणि अहवल्ली येथील मठ संन्याशांच्या ताब्यांत आहेत. विशिष्टाद्वैत पाहा.

***रामानुजम्, डॉ. श्रीनिवासन्*** (१८८७-१९२०)—एक श्रेष्ठ दर्जाचे गणितज्ञ. वयाच्या १६ व्या वर्षापर्यंत त्यांना उच्च गणिताचें एकहि पुस्तक माहीत नव्हतें. नंतर त्यांनीं त्रिकोणमितीच्या अभ्यासास सुरुवात करून साइन आणि कोसाइन यांसंबंधीं यूलरचे सिद्धांतच पुन्हां शोधून काढले व 'जांवई शोध' झाल्याची निराशा त्यांच्या पदरांत पडली.

यांचें कॉलेजांतील शिक्षण सारखें अपेशी ठरल्यावर यांनीं मद्रास येथें पोर्ट ट्रस्टमध्यें कारकुनाची नोकरी धरली. इंग्लंडमधील कांहीं गणिती नियतकालिकांतून यांचे लेख येऊं लागले. तेव्हां केंब्रिजच्या विद्यापीठांतील शुद्ध गणितशास्त्राचे प्राध्यापक जी. एच्. मूर यांचे रामानुजम्कडे लक्ष गेलें व त्यांनीं रामानुजम्ला केंब्रिज येथे बोलावून घेतलें. पुढें ते आपल्या विद्वत्तेमुळें ट्रिनिटी कॉलेजचे फेलो झाले व नंतर त्याहून मोठा मान म्हणजे त्यांना रॉयल सोसायटीचे फेलो निवडण्यांत आलें.

बीजगणिताचे सिद्धांत, अनंत माला (इन्फिनिटी सिरीज), इत्यादि विषयांतहि यांनीं महत्त्वाचें संशोधनकार्य करून ठेवलें आहे. यूलर, यॉकोबी यांसारख्या जगद्विख्यात गणितज्ञांच्या मालिकेंत यांचें नांव आतां गोवलें जातें. यांच्या महत्त्वाच्या निबंधांचा संग्रह यांच्या मृत्यूनंतर १९२८ सालीं केंब्रिज युनिव्हर्सिटीनें प्रसिद्ध केला आहे.

पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर हे हिंदुस्थानांत परत आले. परंतु थोड्याच अवधींत मद्रास येथें क्षय होऊन मरण पावले.

**रामायण**—भारतीयांचें एक आदिकाव्य व महाकाव्य. याचा कर्ता वाल्मीकि ऋषि. यालाहि आदिकवि म्हणून यथार्थपणें संबोधण्यांत येतें. रामायणाच्या धर्तीवरच पुढचीं काव्यें रचिलीं गेलीं. हें दोन हजार वर्षें लोकांच्या अत्यंत आवडीचें व

आदरार्चे म्हणून टिकून राहिलें आहे. रामायणांतील रामाचें उदात्त चारित्र्य, सीतेची पतिनिष्ठा, लक्ष्मणाचें बंधुप्रेम, हनुमंताचा सेवाधर्म, वानरांसारख्या अप्रबुद्ध जातीची रामभक्ति आणि कार्यतत्परता, इ. आदर्श सारखे डोळ्यांपुढें आहेत. रामायणांतील वचनें, दाखले, कथा या सर्व वाङ्मयांतून व लोकांच्या तोंडीं खेळविल्या गेल्या व जात आहेत. याची विविध भाषांतून भाषांतरें व रूपांतरें झालेलीं आहेत. तुलसीदासाचें 'रामचरितमानस' व श्रीधराचा 'रामविजय' उत्तर हिंदुस्थानांत महाराष्ट्रांत आबालवृद्धांच्या तोंडीं आहे. रामायणकथेचीं नाटकें किती तरी लिहिलीं गेलीं आहेत. उत्तर हिंदुस्थानांत 'रामलाला' दरवर्षी होतात. रामनवमी हा हिंदूंचा महत्त्वाचा सण आहे.

वाल्मीकीनें रचलेल्या संस्कृत रामायणांत सात कांडें असून त्यांत एकूण २४,००० श्लोक आहेत. रामाची प्राचीन कथा वाल्मीकि ऋषीनें इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत रामायण या नांवाखालीं ग्रथित केली असावी असें कांहीं संशोधकांचें मत आहे.

**रामीरामदास** (१६०५–१६७७)—एक मराठी संतकवि. 'सुगमोपाय' व 'भक्तिरहस्य' या ग्रंथांचा कर्ता. रामदासस्वामींचा हा ज्येष्ठ बंधु असून याचें नांव गंगाधर असें होतें. फाल्गुन वद्य १४ शके १५९९ रोजीं याचें दाहिफळ येथें निधन झालें. याची पत्नी सती गेली. रामचंद्रबाबा व शामजीबाबा असे याला दोन मुलगे होते. दाहिफळ येथें असलेल्या याच्या वृंदावनास मोंगलाईतून ८० रुपयांचें वर्षासन मिळतें.

**रामेठा**—डोंगराळ प्रदेशांत होणारें हें झाड बरेंच मोठें असून पानें चार बोटें लांब व अरुंद असतात. यास गोंडेदार पांढरीं फुलें येतात. याचा चीक डोळ्यांस लागल्यास अपाय होतो.

**रामेश्वर**—मद्रास, मदुरा जिल्ह्यांतील एक शहर व प्रसिद्ध देवस्थान. हें पांबन बेटावर आहे व तेथपर्यंत आगगाडीचा रस्ता आहे. पंधराव्या शतकाच्या आरंभीं उदयन सेतुपतीनें सिंहलद्वीपाच्या परराजशेखर या राजाच्या मदतीनें या देवस्थानचा मुख्य भाग बांधला (१४१४). नंतर साडेतीनशें वर्षेंपर्यंत नवे नवे भाग जोडले जातच होते. किरण नायर या कोणीं दक्षिणी माणसानें उत्तर आणि दक्षिण बाजूंकडील गोपुरें बांधण्यास सुरुवात केल्याचें दिसतें (१४२०). पण तीं अर्धवटच राहिलीं आहेत. पण यांखेरीज किती तरी कोणीं ना कोणीं बांधलेलीं लहान गोपुरें आहेत. देवळाभोंवतीं तट आहेत. दक्षिण हिंदुस्थानांतील शिल्प या दृष्टीनें देवळाची रचना प्रेक्षणीय वाटते. देऊळ १००० फूट लांब व ६५० फूट रुंद आहे. देवस्थानचा खर्च फार मोठा व उत्पन्नहि तसेंच आहे. पुजाऱ्यांमध्यें कांहीं दक्षिणी ब्राह्मणहि आहेत. रामचंद्रानें लंकेस जातांना येथें शिवलिंगाची स्थापना केली अशी कथा आहे. देवापुढचा नंदी दोन पुरुष उंच आहे. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं रामेश्वरचें एक आहे. देवळाचें आवार फारच विस्तृत म्हणजे गांवाएवढें आहे. येथील सेतु (वाळू) नेऊन गंगेंत टाकतात व गंगेचें उदक येथें देवावर वाहतात. यात्रेस सर्व ठिकाणांहून भाविक लोक येतात.

रामेश्वराचा सेतु—रामेश्वरापासून मानार बेटापर्यंत १७ मैल लांब असा एक खडकाळ भाग आहे. यासच रामानें बांधलेला सेतु असें भाविक लोक म्हणतात. आज याचें नांव ॲडाम्स ब्रिज (आदामचा पूल) असें आहे. यावरून सीलोनला आगगाडी नेली आहे. आदामचा पूल पाहा.

**रामेश्वरभट्ट** (१६ वें शतक प्रारंभ)—मीमांसा, व्याकरण, न्याय व वेदान्त या शास्त्रांत पारंगत असलेला काशींतील भट्ट घराण्याचा मूळ पुरुष. याच्या बापाचें नांव गोविंदभट्ट. हा चमत्कारहि करून दाखवीत असे. याच्या विद्वत्तेवर खुष होऊन निजामशाहीच्या बादशहानें यास सुवर्णमुद्रांकित निमंत्रण पाठवून आपल्या दरबारीं याचा चांगला सत्कार केला. येथून पुढें हा विद्यानगर येथें व तेथून पुढें द्वारकेस गेला. द्वारकेस यानें महाभाष्य व सुरेश्वरवार्तिक यांचें आपल्या शिष्यांकरवीं अध्ययन करवलें. तेथून पुढें हा पैठणास व नंतर काशीस गेला. याच्या शिष्यगणांत बहुतेक सर्व प्रांतांतील लोक असत. त्यांत अनंतभट्ट चितळे, मधुसूदन सरस्वतीचा गुरु माधव सरस्वती, दामोदर सरस्वती, दाक्षिणेंतील वेदान्ताचे अध्यापक आचार्यभट्ट, कनोज येथील गीतगोविंदाचा टीकाकार शंकरमिश्र शर्मा, विश्वनाथ तुळशी, महेश ठक्कर, इत्यादि सुप्रसिद्ध पुरुषांची गणना होते. यास नारायणभट्ट, रामकृष्ण, कमलाकर व दिनकर असे चार पुत्र झाले. यानें शेवटपर्यंत काशींतच वास्तव्य केलें. याच्यामुळेंच भट्ट घराणें नांवलौकिकास चढलें.

**रामेसस**—ईजिप्शियन भाषेंत या शब्दाचा अर्थ सूर्यदेवतेचें मूल असा आहे. हें नांव ईजिप्तमधील १९ व्या व २० व्या राजघराण्यांतील १२ राजांना देण्यांत आलेलें आहे. १ ला रामेसस हा १९ व्या राजघराण्यांतील १ ला राजा होय. यानें हिटाइट लोकांशीं तह केला व ईजिप्त देशाचा विस्तार वाडी हाल्फापर्यंत नेला. २ रा रामेसस हा १ ल्या रामेससचा नातू व १९ व्या राजघराण्यांतील ३ रा राजा होय. त्याची कारकीर्द अजमासें ख्रि. पू. १३४० ते १२७३ पर्यंत होती. त्याच्या कारकीर्दींत त्यानें हिब्रू लोकांचा फार छळ केला, व त्यामुळें हिब्रू लोक ईजिप्त देश सोडून गेले, असें मानतात. हा सर्वांत थोर (ग्रेट) म्हणतात. यानें हिटाइट लोकांचा पराभव करून त्यांच्या राजकन्येशीं लग्न लावलें. यानें एथिओपिया जिंकला. व भूमध्य

समुद्रांत आपलें आरमार ठेवलें. ३ रा रामेसस हा २० व्या राजघराण्यापैकीं राजा होय. यानें फिलिस्टाइन लोक व ग्रीस आणि आशिया मायनर यांतील टोळ्या यांच्याशीं युद्ध केलें व पुन्हां एथिओपिया जिंकून घेतला.

**रामोजी शेणवी कोठारी**—गोव्वेंकरांचा एक वकील. रामोजी शेणवी हा गोव्वें प्रांतांतील डिचोलीचा राहणारा. सन १६६२ च्या मे महिन्यांत शिवाजीनें वेंगुर्ल्यास मुक्काम ठोकला असतां त्या वेळीं त्यानें मोंगलांवर मिळविलेल्या विजयाबद्दल गोव्वेंकर अधिकाऱ्यांनीं त्याचें अभिनंदन करण्याचें ठरवलें व या कामासाठीं आपला वकील म्हणून रामोजी यास बरोबर मौल्यवान् नजराणा देऊन शिवाजीकडे पाठवलें. परंतु शिवाजीनें या वेळीं वेंगुर्ला सोडला असल्यानें या दोघांची भेट झाली नाहीं. यानंतर शिवाजी आग्र्याच्या कैदेंतून सुटून आल्यावर यानें त्याची भेट घेतली व शिवाजीनें याजबरोबर आपल्या सकोपंत नामक वकिलास गोव्यास पाठवलें.

**रामोशी**—एक जात. ही पश्चिम हिंदुस्थानांत व विशेषतः महाराष्ट्रांत आढळते. यांची संख्या सुमारें साठ हजार आहे. 'रामवंशी' शब्दापासून रामोशी नांव पडलें असावें. यांची गणना बारा बलुत्यांमध्यें होत असे. यांचा जुना धंदा चोरी आणि रखवाली हा असे. अलीकडे शेतकी, सावकारी करतात. महाराष्ट्रांत यांचें चव्हाण व जाधव असे दोन पोटभेद आहेत. यांचें मुख्य दैवत राम आहे. पण हे खंडोबालाहि भजतात. शिवाजीच्या स्वराज्य-संस्थापनेंत रामोशांची मदत होती. पूर्वी यांची गणना बारा बलुतेदारांत असे, पण पुढें ब्रिटिश सरकारनें यांची गणना गुन्हेगार जातींत केली.

**राय**—हें खाण्याचें धान्य उत्तर युरोपांतलें आहे. याच्या भाकरी रशिया, स्वीडन, नॉर्वे, डेन्मार्क, हॉलंड, इ. देशांतून मजूरवर्गांतील लोक खातात. तेंच त्यांचें मुख्य खाद्य आहे. हें धान्य निकस जमिनींत पुष्कळ मिळतें. गवत गुरांना घालतात व घरांच्या छपरांसाठींहि वापरतात.

**रायआंवळा**— हरपररेवडी. झाड मोठें असून अंगावर फळांचे घोस येतात. या आंवळ्यांचें लोणचें घालतात. हे आंवळे औषधी आहेत. रसाचा उपयोग अंगावर पित्त उठलें त्यावर होतो. नाडीव्रणावर पोटांत घेतात.

**राय, कृष्णदास** (१८९२-        )—हिंदी भाषेंतील सुप्रसिद्ध लघुकथालेखक व कलाप्रेमी. नागरी प्रचारिणी सभेच्या ताब्यांत असलेल्या काशीच्या 'भारत कलाभवन' या संस्थेचे हे पालक (क्युरेटर) असतांना यांनीं त्या संस्थेस आपल्या जवळील लाख रुपये किंमतीचा चित्रकला व शिल्प यांसंबंधीं विविध वस्तूंचा अमोल संग्रह अर्पण केला. भारतीय चित्रकला व संगीत यांच्या उन्नतीप्रीत्यर्थ यांनीं १९२१ मध्यें भारतीय कला परिषदेची स्थापना केली. १९४४ सालीं यांनीं पाटणा विश्वविद्यालयातर्फे भारतीय चित्रकलेवर एक व्याख्यानमाला गुंफली. रवींद्रनाथांच्या गीतांजलीच्या धर्तीवर १९१६ सालीं यांनीं साधना नांवाचें गद्य पुस्तक लिहिलें आहे. भावपूर्ण व नमुनेदार लघुकथांबद्दल हे सुप्रसिद्ध आहेत. तसेंच हे कवीहि आहेत.

भारतीय मूर्तिकला (विवेचनात्मक), भारतीय चित्रकला (विवेचनात्मक), प्रवाल (गद्य गीत), साधना (गद्य गीत), सुधांशु (लघुकथासंग्रह), वगैरे वाङ्मय यांनीं निर्माण केलें आहे.

**रॉय, सर प्रफुल्लचंद्र** (१८६१-१९४४)—एक विख्यात हिंदी शास्त्र-संशोधक. शिक्षण कलकत्ता व एडिंबर्ग युनिव्हर्सिटीमध्यें झालें. १९१५ मध्यें हे कलकत्ता युनिव्हर्सिटीचे शास्त्रशाखेचे प्रमुख (डीन) होते. १९१६ पासून हे कलकत्ता येथील प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें प्राध्यापक होते. लंडन येथील रसायन-संस्थेचे हे फेलो होते. बंगाल एशियाटिक सोसायटीचेहि हे फेलो होते. कलकत्ता येथील रसायन-संस्थेचे (केमिकल सोसायटीचे) हे पहिले अध्यक्ष होते (१९२४-२६). बंगाल केमिकल व फार्मास्युटिकल वर्क्स, लि., चे हे संस्थापक व चालक होते. यांनीं हिंदु रसायनशास्त्राचा इतिहास, बंगाली रसायनज्ञाचे अनुभव, वगैरे ग्रंथ लिहिले आहेत व अनेक रासायनिक शोध लावले आहेत. यांची राहणी अत्यंत साधी असून हे अत्यंत थोर देशभक्तांपैकीं एक होते. कॉंग्रेस चळवळ सुरू झाल्यावर तींत यांनीं धडाडीनें भाग घेतला.

**रॉय, डॉ. बिधनचंद्र** (१८८२-        )—एक बंगाली कार्यकर्ते व बंगालचे प्रधान मंत्री. हे कलकत्त्याचे एक प्रसिद्ध डॉक्टर असून कट्टे कॉंग्रेसभक्त आहेत. यांनीं असहकारितेच्या चळवळींत प्रमुखत्वानें भाग घेतला. देशबंधु दास यांस बंगालमध्यें स्वराज्यपक्ष स्थापन करण्याच्या कामीं यांनीं चांगलें साहाय्य केलें. १९३० व १९३२ सालच्या सत्याग्रहाच्या चळवळींतहि यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे हे पहिले सेक्रेटरी होते. १९३३ मध्यें हे कलकत्ता म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे मेयर होते. यांनीं महात्मा गांधी, देशबंधु दास, मोतीलाल नेहरू, जे. एम्. सेनगुप्त, श्रीमती स्वरूपराणी नेहरू व सौ. कमला नेहरू यांच्या आजारामध्यें त्यांना औषधोपचार केले आहेत. नंतर कांहीं काळ हे प्रत्यक्ष राजकीय चळवळींतून बाहेर पडले. १९४२-४४ मध्यें कलकत्ता विद्यापीठाचे कुलगुरु होते. दोनदां कलकत्त्याचे मेयर होते. १९४७ सालापासून प. बंगालचे पंतप्रधान आहेत.

**रॉय, मानवेन्द्र** (१८९३- )—प्रसिद्ध हिंदी कम्युनिस्ट पुढारी. यांस मीरत व कानपूर येथील कटाच्या खटल्यांत आरोपी केलें होतें. हे रशियामध्यें कांहीं दिवस लेनिन व ट्रॉट्स्की यांच्या सहवासांत राहिले होते. यांनीं चिनी पुढारी डॉ. सन्यतुसेन यांचीहि भेट घेतली होती. चीनमधून हे फिलिपाइन्समध्यें गेले, तेथून त्यांस मेक्सिकोमध्यें पाचारण करण्यांत आलें. हे मार्क्सवादावर अधिकारी तज्ज्ञ समजले जातात. यांस बादशहांविरुद्ध युद्ध पुकारण्याबद्दल सहा वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा झाली होती. नंतर त्यांस १९३६ त सोडून देण्यांत आलें. याचा एक स्वतंत्र (रॉय) पक्ष आहे. गेल्या महायुद्धांत रशिया हा मित्रसंघांत असल्यामुळें हे लोकांस युद्धकार्यामध्यें मदत करण्याचा उपदेश करीत. पुढें कॉंग्रेस अधिकारावर आल्यानंतर यांचा पक्ष खालावला.

**रायगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा, एक इतिहासप्रसिद्ध किल्ला. यास पूर्वीं रेडी असें म्हणत. पुढें रायरी किंवा रायगिरी असें नांव पडलें. समुद्रसपाटीपासून याची उंची २,८५१ फूट आहे. हा महाडच्या ईशान्येस १६ मैलांवर व जंजिऱ्याच्या पूर्वेस ४० मैलांवर आहे. यावर महाडहून नातें येथें जाऊन तेथून पाचाड येथून जाता येतें. पाचाड येथें पूर्वीं बाजारपेठ होती व जिजाबाईचा वाडा होता. थोडा चढाव चढून गेलें म्हणजे एक वाडी लागते व छत्री निजामपूरकडून येणारा रस्ता मिळतो. नंतर खूबलढ बुरुज लागतो. त्यानंतर नाना दरवाजा लागतो. पुढें वाटेंत सांडणींचा कोनाडा व नंतर मदरशाचें थडगें लागतें. नाना दरवाजापासून १००० फूट चढून गेलें म्हणजे महादरवाजा लागतो. हा हिरकणी बुरुजाच्या खालीं ४०० फूट व बालेकिल्ल्याच्या खालीं ६०० फूट आहे. यानंतर २००-२०० फुटांवर तीन भिंती लागतात.

किल्ल्याच्या माथ्याची लांबी दीड मैल व रुंदी एक मैल आहे व त्याचीं पश्चिमेस हिरकणी, उत्तरेस टकमक व पूर्वेस भवानी हीं तीन टोंकें पुढें गेलेलीं आहेत. श्रीगोंदा म्हणून एक टोंक आग्नेयीस आहे. माथ्यावर गंगासागर नांवाचें विपुल पाण्याचें टांकें आहे. याच्या दक्षिणेस दोन द्वादशकोनी मनोरे आहेत. यानंतर चढून वर गेलें म्हणजे पालखी दरवाजा लागतो व त्यांतून बालेकिल्ल्यांत प्रवेश होतो. हा ३०० यार्ड लांब व १५० यार्ड रुंद आहे. एक १५० यार्ड लांबीचा रस्ता आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस इमारतींचे अवशेष आहेत. यास सातमाड्या म्हणतात. याच्या पूर्वेस राजवाड्याची जागा आहे. पालखी दरवाजाच्या आंतल्या अंगास एक रस्ता जातो त्या बाजूनें गेलें म्हणजे सरकारी कचेरीची जागा लागते, तेथें पूर्वी शिवाजीमहाराजांचें सिंहासन होतें. उत्तर बाजूस बाजारपेठेचीं उंच जोतीं लागतात.

बालेकिल्ल्याच्या ईशान्येस अर्ध्या मैलावर जगदीश्वराचें देवालय आहे व त्याच्या नगारखान्याच्या तटावर संस्कृत लेख आहे. या देवालयाच्या मुख्य दरवाजासमोर जरा उतरणीवर शिवाजीमहाराजांची समाधि आहे. या किल्ल्यांत १६६४ ते १६८० पर्यंत राजधानी होती. या किल्ल्याचा विजयानगरच्या अमलापासून इतिहास मिळतो. १६७४ त शिवाजीनें येथें आपणांस राज्याभिषेक करून घेतला. त्याचें सविस्तर वर्णन उपलब्ध आहे. पुढें सूर्याजी पिसाळाच्या फितुरीनें हा किल्ला मोंगलांस मिळाला; परत तो १७३५ मध्यें मराठ्यांनीं घेतला. १८१८ मध्यें प्रोथरनें हा किल्ला घेतला व दुसऱ्या बाजीरावाचें कुटुंब वाराणशीबाई हीस पुण्यास रवाना केलें. रायगडला शिवाजीचा उत्सव करण्याची प्रथा लो. टिळकांनीं पाडून समाधिजीर्णोद्धारासाठीं एक निधि उभारला. पुढें सरकारनें या कामांत लक्ष घालून समाधि बांधून काढली. गडावर जाणाऱ्यांच्या सोयीसाठीं आतां धर्मशाळा बांधली असून जाण्याचा रस्ताहि बरा ठेवला आहे.

**रायगड संस्थान**—मध्यप्रांत, एक मांडलिक संस्थान. क्षे. फ. १४४४ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ३,१२,६४३. संस्थानांत रायगड शहर व ७२१ खेडीं आहेत. शें. ८० लोक छत्तीसगडी व १५ उडिया भाषा बोलतात. शें. ८० एकर जमिनींत तांदूळ पिकतो. संस्थानांत जीं १८०० वर तळीं आहेत त्यांतून कालव्यांनीं पाणी पुरविलें जातें. संस्थानांत लोखंड व कोळसा सांपडतो. संस्थानचें उत्पन्न सुमारें वीस लाख रु. आहे. रायगड हें संस्थानचें मुख्य ठिकाण बंगाल-नागपूर रेल्वेवर एक स्टेशन आहे. लो. सं. १६,०००. येथें एक किल्ला आहे. संस्थानिक गोंड आहेत. १८ व्या शतकाच्या प्रारंभीं गोंड लोक येथें येऊन राहिले. १८०० सालीं संस्थानिकांनीं मराठ्यांविरुद्ध इंग्रजांशीं तह केला. हल्लींचे संस्थानिक भूपदेवसिंह १८९४ त गादीवर बसले.

**रायचूर**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. क्षे. फ. ६,८०० चौ. मै. व लो. सं. सुमारें दहा लाख. कृष्णा व तुंगभद्रा आग्नेय दिशेस वाहतात व भीमा उत्तरेस आहे. ती कृष्णेला मिळते. पाऊस सुमारें २५ इंच पडतो. जिल्ह्यांत ७ शहरें व ८९९ खेडीं आहेत. ज्वारी व बाजरी हीं मुख्य पिकें आहेत. धोतरजोडे, लुगडीं, सतरंज्या, पडदे, खेळणीं, इ. व्यापारी जिनसा होतात. या जिल्ह्यांतील कित्येक ठिकाणें पौराणिक व ऐतिहासिक म्हणून आदरणीय आहेत. इट्टगी येथील महादेवाचें देऊळ शिल्पकलेच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. मुसलमानी अमलापूर्वी हा भाग

वारंगळ राज्याचा एक भाग होता. चौदाव्या शतकांत विजयानगरच्या राज्यांत याचा समावेश असे. नंतर बहामनी व आदिलशाही राज्यांत मोडत असे. विजापूर औरंगजेबानें जिंकल्यानंतर हा प्रदेश दिल्लीच्या बादशाहींत व नंतर निजामाच्या राज्यांत समाविष्ट झाला.

रायचूर शहर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. या प्रदेशांत पुष्कळ लढाया झाल्या आहेत. शहराभोंवतीं एक तटबंदी आहे व आंत १४ व्या शतकांतील किल्ला आहे. डोंगरावरचा बालेकिल्ला व त्यावरील मोठमोठे उभे दगड पाहून मन थक्क होतें. हें राक्षसीच काम वाटतें. रायचूर हें चांगलें व्यापारी ठिकाण असून कापसाच्या गिरण्या, कातडी कमावण्याचे, दारू-गोळयाचे, वगैरे कारखाने आहेत. लो. सं. सुमारें २५,०००.

**रायपूर**—मध्यप्रांत, छत्तीसगड भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ८,२०५ चौ. मै. व लो. सं. (१९४१) १५,१६,६८६. जिल्ह्यांत महानदी व शिवनाथ या नद्या आहेत. पाऊस सुमारें ५५ इंच पडतो. जिल्ह्यांत जमीनदारी पुष्कळ आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे. इतर पिकेंहि कोठें कोठें होतात. लोखंड, तांबें शिसें, छपाईसाठीं लागणारा दगड, गेरू, चुना, इ. खनिजें सांपडतात. कांहीं रेशमी व सुती कापड होतें. शिक्षणांत हा सर्व प्रांतांत दुसऱ्या क्रमांकाचा जिल्हा आहे. राजकुमार कॉलेज व इतर अनेक दुय्यम व प्राथमिक शाळा आहेत.

मूळच्या भुइया व मुंडा या लोकांना हांकलून देऊन गोंडांनीं हा प्रांत बळकावला. ११ व्या शतकांत हैहयवंशी राजे राज्य करीत होते. पुढें मराठ्यांचें वर्चस्व यावर होतें. १८५३ सालीं छत्तीसगडच्या राजाला मुलगा नसल्यानें इंग्रजी राज्याला हा भाग जोडला गेला व १८६१ त निराळाच जिल्हा करण्यांत आला. या भागांत शिलालेख व बौद्ध अवशेष सांपडतात.

रायपूर शहर हें आगगाडीचें जंक्शन आहे. लो. सं. ६३,४६५. नवव्या शतकापासून शहराचा उल्लेख सांपडतो. जुने अवशेष पुष्कळ आहेत. छत्तीसगड भागाचें हें मुख्य ठिकाण असल्यानें बऱ्याच सरकारी कचेऱ्या आहेत. पितळकाम, रोंगणकाम, विणकाम, दागिने व भांडीं तयार करणें, कापसाच्या व तेलाच्या गिरण्या, असे कित्येक धंदे आहेत. राजकुमारांचें कॉलेज व इतर इंग्रजी–हिंदी–मराठी शाळा पुष्कळ आहेत. एक पदार्थ-संग्रहालय आहे.

**रायफल**—*या प्रकारच्या बंदुकींत नळीच्या आंतल्या बाजूस* सर्पाकार खोबणी असतात. साधी बंदूक (मस्केट) अशी नसते. या रचनेमुळें गोळीला चक्राकार गति मिळून ती सरळ मार्गानें जाते. या रायफल बंदुकीचा शोध प्रथम जर्मनींत १४९८ मध्यें होऊन १६३१.पासून तर तिचा लष्करांत वापर होऊं लागला. १८५१ त ‘मिनिए’ रायफल व नंतर ‘एन्फील्ड’ रायफल प्रचारांत आल्या. याचा पुढचा शोध म्हणजे तोड्याची बंदूक (ब्रीच लोडर). हिला ‘स्नायडर’ रायफल म्हणत. यांत पुन्हां सुधारणा होऊन एकामागून एक गोळया उडविणारी रायफल निघाली. १९१८ सालीं अमेरिकन लष्करांत यांत्रिक किंवा स्वयंचल रायफल ‘ब्राउनिंग’ या नांवाची उपयोगांत आणूं लागले. यांत वायूच्या जोरानें गोळी उडते व एका मिनिटांत लागोपाठ चाळीस गोळया सोडतां येतात. मागील महायुद्धामुळें बंदुकीच्या रचनेंत फार सुधारणा झाल्या आहेत. बंदूक पाहा.

**रायबरेली**—संयुक्त प्रांत, लखनौ विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १,७६५ चौ. मै.. लो. सं. १०,६४,८०४. गंगा व सई या मोठ्या नद्या वाहतात. जमीन फार सुपीक आहे. गहूं, तांदूळ व अफू हीं पिकें होतात. पांच-सहा शहरें जिल्ह्यांत मोठीं आहेत. अकराव्या शतकांत येथें राजपुतांचीं तीन घराणीं नांदत होतीं. पुढें राजपुतांचे आपसांत तंटे होऊन अकबरानें हा प्रदेश जिंकला. हिंदूंची वस्ती शें. ९१ आहे. रायबरेली शहर रोहिल्यांनीं वसविलें. इब्राहिमशहानें बांधलेला किल्ला व मशीद येथें आहे. शहराचे रायबरेली व जहानाबाद असे दोन भाग आहेत. जहानखानाचा राजवाडा जहानाबादेमध्यें आहे. रायबरेली हें व्यापाराचें मोठें ठिकाण आहे. सुती कापड व मलमल यांचा व्यापार चांगला चालतो.

**रायबागीण**—एक शूर मराठा स्त्री. मध्यप्रांतांतील रायबागचा जगजीवनराम उदाराम याची ही पत्नी असून जगजीवनराम (पाहा) वारल्यावर हरचंदराय रजपुताची स्वारी झाली, तेव्हां हिनें ‘बहिणीची लज्जा राखा’ असा एक जाहिरनामा काढला व चोळीचें निशाण करून ती सर्वत्र फिरवली. औरंगजेबानें हिचें शौर्य पाहून हिला ‘पंडिता’, ‘राजव्याघ्री’ म्हणजे ‘रायबागन्’ असे किताब देऊन हिचा गौरव केला. शाहिस्तेखानाच्या स्वारींत ही होती असें शिवभारतांत आहे. उंबरखिंडीच्या लढाईत शिवाजीच्या सैन्यानें करतलबखानास पकडींत धरलें असतां, शिवाजीस शरण जाऊन सैन्य सुरक्षित राखण्याविषयीं तिनें खानास सल्ला दिला होता (१६६१). सन १६७० मध्यें शिवाजीनें सुरत लुटली असतां औरंगजेबानें त्याचा बंदोबस्त करण्याच्या कामीं महाबतखानाची नेमणूक केली. त्याच वेळीं त्यानें महाबतखानाबरोबर हिलाहि पाठवलें. तेव्हां ही शिवाजीच्या हातीं सांपडली. शिवाजीनें हिचा आदरपूर्वक सन्मान करून हिला परत पाठवलें. हिला बापूराव नांवाचा एक मुलगा होता.

**रायराखोल**—ओरिसा, एक संस्थान. क्षे. फ. ८३३ चौ. मै. व लो. सं. ३१,२२५. संबळपूर हें एजन्सीचें मुख्य

ठिकाण आहे. त्याच्यापासून ४४ मैलांवर असलेलें रामपूर खेडें या संस्थानची राजधानी आहे. सर्वत्र जंगलें व मैदानें आहेत. तांदूळ, तीळ, उडीद व कुळीथ हीं पिकें होतात. संस्थानांत ३७६ तळीं आहेत. टसर रेशिम व कात काढण्याचे धंदे चालतात. खोंड लोक लोखंडाचीं हत्यारें बनवितात. शें. ९० लोक उडिया भाषा बोलतात. सर्वांत जास्त लोक चास आहेत.

पूर्वी हें संस्थान बामरा संस्थानचें मांडलिक होतें. १८ व्या शतकांत गढजाटला जोडलें गेलें. मागचा राजा बिसनचंद्र १९०० सालीं मरण पावल्यावर त्याचा पुतण्या राजा गुरुचंद्रदेव गादीवर बसला. १९४८ सालीं हें संस्थान ओरिसा प्रांतांत विलीन झालें.

**रॉयले, जॉन विल्यम स्टूट** (१८४२-१९१९)—एक ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. तो केंब्रिज येथें प्रायोगिक पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर १८७९ ते १८८४ पर्यंत आणि रॉयल इन्स्टिटयूशनमध्यें नॅचरल फिलॉसफीचा प्रोफेसर १८८७ ते १९०५ पर्यंत आणि रॉयल सोसायटीचा सेक्रेटरी १८८७ ते १८९६ पर्यंत होता. त्यानें सर विल्यम रॅम्से यांशीं अर्गान या मूलद्रव्याच्या संशोधनाच्या कामांत सहकार्य केलें. त्याचा महत्त्वाचा ग्रंथ ध्वनिसिद्धांतावर आहे. १९०४ सालीं त्याला पदार्थविज्ञानशास्त्राबद्दलचें नोबेल पारितोषिक मिळालें.

**रायो द ओरो आणि आडूर**—उत्तर आफ्रिका, पश्चिम किनाऱ्यावरील स्पेनचा मुलूख. क्षे. फ. १,०९,२०० चौ. मै. यांत तीन वसाहती आहेत. रायो दि ओरो वसाहतीचें क्षे. फ. ६५,५०० चौ. मै. आहे. या वसाहती कॅनरी बेटांच्या अधिकारांत असतात. व्हिला सिस्नेरॉस ही राजधानी आहे. एकंदर लो. सं. २०,५०० आहे.

**रायो द जानेरिओ**—दक्षिण अमेरिका, एक बंदरी शहर व ब्राझील संयुक्त संस्थानांची राजधानी. जगांतील प्रमुख बंदरांपैकीं हें एक असून मोठमोठ्या गोद्या व गलबतांसाठीं सर्व सोयी येथें आहेत. शहराभोंवतीं डोंगर आहेत व शहरांत पुष्कळ सुंदर इमारती व बागा आहेत. उपनगरें बरींच आहेत. एन्वसाडास बेटावर नाविक विद्यालय आहे. ब्राझीलच्या संघराज्याचें मुख्य ठिकाण व जिल्हा रायो हाच आहे. कापड, साबण, दारू, मेणबत्त्या, साखर, बिस्किटें, तंबाखू, बर्फ, यंत्रें, इ. चे कारखाने रायोमध्यें आहेत. रायो आखात हें एका पोर्तुगीज कॅप्टननें १ जानेवारी १५३१ त शोधून काढलें व त्याला हें एखाद्या नदीचें मुख वाटल्यानें 'जानेवारीची नदी' असें नांव त्यानें दिलें. तेंच चालू आहे. लो. सं. (१९३६) १७,११,४६६. या ठिकाणीं एक विद्यापीठ आहे.

**रॉलिन्सन, सर हेन्री क्रेस्विक** (१८१०-१८९५)—एक ब्रिटिश योद्धा आणि प्राच्यभाषापंडित. हा इराणांत नोकरीस असतांना यानें प्राचीन पाचरी लिपीचा अभ्यास करून बेहिस्तुनच्या शिलालेखाचें वाचन केलें व कीर्ति मिळविली. ॲसीरिया आणि बाबिलोनिया यांसंबंधीं ऐतिहासिक पुस्तकें त्यानें लिहिलीं आहेत. रॉलिन्सन हा ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींत असून १८४९ सालीं सेवानिवृत्त झाला.

**राव, ए. कालेश्वर**—आंध्र प्रांतातील हे कार्यकर्ते समाजसुधारक व हरिजन चळवळीचे पुढारी आहेत. बेझवाडा म्युनिसिपालिटीचे हे कांहीं वर्षें अध्यक्ष होते. असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकिली सोडून दिली व त्यांस एक वर्षाची तुरुंगवासाची शिक्षा झाली. आंध्र प्रांतांत आधुनिक विचारांचा प्रसार करणाऱ्या संस्थेचे हे संस्थापक आहेत. यांनीं तेलगू भाषेंत अनेक ऐतिहासिक ग्रंथ लिहिले आहेत. आंध्र स्वराज्य पक्षाचे हे अध्यक्ष होते. मद्रास कायदेमंडळाचे हे सभासद होते. परंतु लाहोर काँग्रेसनंतर त्यांनीं राजीनामा दिला. आंध्र युनिव्हर्सिटी सेनेटवर हे सभासद आहेत. आंध्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे हे प्रधान मंत्री होते. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे ते अनेक वर्षें सभासद होते. १९३० व १९३२ मध्यें सत्याग्रहात याना पुन्हां तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३४ सालीं ते आंध्र प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते.

**राव, के. नागेश्वर** (१८६७- )—आंध्र प्रांताचे एक पुढारी. यांचें शिक्षण गुन्तूर व मद्रास येथें झालें. १८९३ मध्यें यांनीं अमृतांजन डेपो मुंबई येथें उघडला. १९०८ मध्यें 'आंध्रपत्रिका' नांवाचें एक साप्ताहिक सुरू केलें. १९१४ मध्यें तें दैनिक करण्यांत आलें व त्याची कचेरी मद्रास येथें नेण्यांत आली. आंध्र प्रांतीय चळवळींत यांनीं फार प्रामुख्यानें भाग घेतला आहे. यांस आंध्र महासभेकडून १९२४ मध्यें 'देशोद्धारक' व १९२९ मध्यें 'विश्वदाता' या पदव्या मिळाल्या. १९१९ मध्यें गुंतूर येथें भरलेल्या विशेष आंध्र परिषदेचे हे अध्यक्ष होते. 'आंध्रविज्ञानसर्वस्वमु' या तेलगू ज्ञानकोशाचे ते संपादक होते. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे हे सभासद होते, त्याप्रमाणेंच आंध्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे हे अध्यक्ष होते. आंध्र महासभेचे ते खजिनदार आहेत. हिंदुस्थान बँक, लि., चे ते डायरेक्टर आहेत. १९३० मध्यें यांस मिठाच्या सत्याग्रहांत शिक्षा झाली होती. १९३५ मध्यें हे फार मोठ्या बहुमतानें मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले.

**राव, सर बेनेगल नरसिंह** (१८८७- )—भारत सरकारचे परदेशांतील एक प्रतिनिधि. यांचें शिक्षण मद्रासमध्यें होऊन पुढें १९१० त हे आय्. सी. एस्. ला गेले. नंतर चढत

चढत मध्यवर्ती सरकारच्या कायदे खात्याचे चिटणीस (१९३४) व पुढें कलकत्ता हायकोर्टाचे न्यायाधीश झाले. 'हिंदु लॉ कमिटीचे' ते अध्यक्ष होते (१९४१). नंतर काश्मीर संस्थानचे दिवाण झाले (१९४४). घटना परिषदेचे सल्लागार म्हणून यांना नेमण्यांत आलें होतें. संयुक्त राष्ट्रसंघा(युनो)नें यांना इंटरनॅशनल लॉ कमिशनचे सभासद निवडलें (१९४८). भारत सरकारनेंहि राष्ट्रसंघाच्या कामीं आपले कायमचे प्रतिनिधि म्हणून यांना नियुक्त केलें. तेव्हांपासून ते तिकडेच आहेत. युनोच्या सुरक्षा मंडळाचे ते हिंदी सभासद असून एकदां या मंडळाचे अध्यक्षहि होते. यांची तेथील कामगिरी उत्कृष्ट असून भारताचा जागतिक दर्जा वाढविणारी आहे.

**रावण**—प्राचीन लंकेचा राजा व रामायणांतील प्रसिद्ध खलनायक. हा विश्रवा ब्राह्मणाचा मुलगा व कुबेराचा सावत्र-भाऊ होता. कुबेरासारखी संपत्ति मिळविण्यासाठीं यानें घोर तप केलें व लंकेचें राज्य मिळविलें. नंतर यानें अनेक देवांना आणि राजांना जिंकून सर्वांचा कर्दनकाळ होऊन राहिला. तेव्हां विष्णूला याला मारण्यासाठीं रामावतार घ्यावा लागला. यानें सीतेचें कपटानें हरण केल्यामुळें राम-रावण युद्ध होऊन त्यांत रावणाचा नाश झाला. हा मोठा शिवभक्त होता. याच्यासंबंधीं पुष्कळ कथा पुराणांतून आहेत.

वेदाध्ययनासाठीं पदें, क्रम, जटा, घन, वगैरे प्रकार यानेंच केले असें कांहीं मानतात. रावणकृत ऋग्वेदभाष्यहि आहे. पण हा रावण व रामायणांतील रावण निरनिराळे असावेत.

**रावळ**—एक जात. राउळ, रावळे, जोगी अशींहि नांवें आहेत. ही जात मुख्यत्वेंकरून गुजराथेंत आहे. कांहीं थोडे रावळ महाराष्ट्र आणि कर्नाटक या भागात आढळतात. एकंदर लो. सं. ४६,०००. भिक्षा, भाटपणा, नवार विणणें, शेतकाम हे यांचे उद्योग आहेत. गुजराथेंत रावळांचे १०-१२ खेड्यांचे गटच असतात व गटांतच लग्नव्यवहार होत असतो. यांचें उपास्य दैवत हिंगलाज माता होय. यांच्यांतील उपाध्याय धर्मविधी चालवितात. ग्रामपंचायती आहेत. मराठे रावळ आपणांस ब्राह्मणेतरांत श्रेष्ठ समजतात.

**रावळपिंडी**—पाकिस्तान, प. पंजाब, एक विभाग व जिल्हा. विभागाचें क्षे. फ. १५,७४० चौ. मै. व लो. सं. २७,९९,३०० आहे. जिल्ह्याचें क्षे. फ. २,०१० चौ. मै. व लो. सं. ५,६०,००० आहे. शें. ८० लोक मुसलमान आहेत. जिल्हा फार सुपीक आहे. झेलम नदी पूर्व बाजूनें वाहते व तींतून जहाजें जातात. हा प्रदेश अतिशय थंड आहे. उन्हाळा तीनच महिने असतो. पाऊस १० इंचांपर्यंत पडतो. ज्वारी, बाजरी, कडधान्यें, गहूं व मका हीं धान्यें खरीफ आणि रब्बी हंगामांत होतात. उंट आणि घोडे फार व दुभतीं गुरें अगदींच कमी असतात. कापूस पुष्कळ पिकतो. इतर व्यापार फारसा नाहीं.

हा प्रदेश प्राचीन काळापासून प्रसिद्ध मोहिमांनीं गाजला आहे. शिकंदर व ग्रीक लोक, नंतर शकराजे, नंतर काश्मीरचे राजे यांच्या अमलाखालीं होता व पुढें रणजितसिंग १८१४ त हा घेईपर्यंत मुसलमानी सत्तेखालीं तुडविला गेला. १८४९ सालीं हा भाग ब्रिटिशांकडे आला. या प्रदेशांत ऐतिहासिक अवशेष अनेक आहेत.

रावळपिंडी शहर सिकंदराच्या वेळीं भरभराटलेलें होतें. याचें नांव पूर्वी गजनीपूर असावें; पण तें शहर १४ व्या शतकांत नष्ट झालें. नवीन शहर झंडाखानानें उदयास आणिलें. हें ब्रिटिश अमदानींत लष्करी ठाणें व व्यापारी ठिकाण झालें. आगगाडीचा मुख्य कारखाना सोडून गॅस, तंबू, यंत्रें, दारू, इ. चे कारखाने आहेत. लो. सं. सुमारें एक लाखावर आहे. कॉलेजें व हाय-स्कुलें आहेत.

**रावी**—पंजाबांतील सिंधु नदाला मिळणारी एक मोठी नदी. वेदांत हिला परुष्णी असें नांव आहे. ज्या पांच नद्यांवरून पंजाब (पंच आप्) हें नांव पडलें, त्यांतील रावी एक आहे. ही कांग्रा प्रांतांतील कुलु विभागांत उगम पावते. हिचे बरेच कालवे आहेत. त्यांमध्यें बारी-दुआब हा मोठा आहे. ही चिनाब नदीस मिळते. एकंदर प्रवाह ४५० मैल लांबीचा आहे.

**रावेर**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका व गांव. तालुक्याचें क्षे. फ. ४८१ चौ. मै. व लो. सं. ८०,०००. तापी नदी या भागांतून वाहते. जमीन सुपीक आहे. रावेर व सावदें हीं मुख्य शहरें आहेत. रावेर कलाबतू व कापड यांविषयीं प्रसिद्ध आहे. हें शहर १७६३ त निजामानें पेशव्यांस दिलें. लो. सं. (१९४१) ९,९१३.

**रावेरखेडी**—मध्यप्रांत, नेमाड, एक गांव. इंदूर-खांडवा आग-गाडीच्या फांट्यावर सनावद स्टेशनपासून १५ मैल आहे. स्थान नर्मदातीरीं वसलें आहे. या ठिकाणीं पहिला बाजीराव पेशवा याचा २८ एप्रिल १७४० रोजीं काल झाला. येथें नानासाहेब पेशव्यानें राणोजी शिंदे याजकडून बांधविलेलें बाजीरावाचें वृंदावन (समाधि) आहे. १९२५ पासून दरसाल पुण्यतिथीचा उत्सव होतो.

**राशि**—अश्विनीपासून विभागात्मक सवा दोन नक्षत्रांची एक राशि होते (नक्षत्र-गण पाहा). क्रांतिवृत्ताच्या बारा भागांच्या मेष-वृषभादि बारा राशी आहेत. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तुला, वृश्चिक, धन, मकर, कुंभ व मीन या बारा राशी आहेत. सूर्याच्या एका राशींतून दुसऱ्या राशींत जाण्याच्या क्रियेस संक्रांति किंवा संक्रमण म्हणतात. सूर्य मेष

राशींत गेल्यास मेष-संक्रमण होतें. चंद्र एका राशींत सुमारें दोन अडीच दिवस असतो व सूर्य एक महिना असतो. माणूस जन्मल्या वेळीं चंद्र ज्या राशींत असेल ती त्याची जन्मरास होय. फलज्योतिषांत जन्मराशीचें फार महत्त्व आहे. राशींचे अनुकूल व प्रतिकूल ग्रह सांगितलेले असतात.

**राशिचक्रप्रकाश**—(झोडिआकल लाइट). आकाशांत क्षितिजावर एक फिकट प्रकाशाचा पट्टा उन्हाळ्यांत सूर्यास्तानंतर पश्चिमेकडे व पावसाळ्यांत सूर्योदयापूर्वी पूर्वेस दिसतो. क्रांतिवृत्ताच्या पातळीच्या आसपास जे असंख्य लहान कण पसरलेले असतात त्यांच्यावर सूर्यप्रकाशाचें परिवर्तन होऊन हा प्रकाश दिसत असावा.

**राष्ट्रकूट घराणें**—हें यादववंशीय घराणें दक्षिणेंत (महाराष्ट्रांत) सुमारें सव्वा दोनशें वर्षें नांदलें (७५०–९७३). रट्ट लोकांच्या संघा(कूट)पासून याची वाढ झाली असावी असें एक मत आहे. उत्तरेकडून येऊन यांनीं चालुक्यांपासून राज्य कमावलें. या घराण्यांतील पहिला प्रसिद्ध राजा दन्तिराज होय. नर्मदा आणि तुंगभद्रा या नद्यांमधील प्रदेशावर याची सत्ता असे. याचा चुलता कृष्ण यानें वेरूळचें कैलास लेणें बांधलें. याचा नातू तिसरा गोविंद याच्याइतका या घराण्यांत दुसरा शूर राजा झाला नाहीं. यानें उत्तरेस कनोजपासून दक्षिणेस कांचीपर्यंत राज्यविस्तार केला. याचा मुलगा अमोघवर्ष असाच फार शूर व कीर्तिमान होता. यानें मालखेड राजधानी केली. जगांतील चौथा मोठा बादशहा असें सुलेमान नांवाच्या एका अरब प्रवाशानें याचें वर्णन केलें आहे. यानें जैन धर्माला चांगला आश्रय दिला. यानंतर फारसे प्रसिद्ध व कर्तबगार राजे झाले नाहींत. तैलप चालुक्यानें हें घराणें नष्ट केलें. या घराण्याच्या अमदानींत अनेक पंडित होऊन गेले व विद्येला उत्तेजन मिळालें. वेरूळप्रमाणें हिंदु देवतांचीं लेणीं बांधण्यांत येऊं लागलीं. लाट, गुजराथ, हस्तिकुंडी, मूल्ताई, इ. ठिकाणींहि राष्ट्रकूटांच्या शाखा होत्या. राजपुतान्यांतील राठोडवंशीय घराणीं या राष्ट्रकूटांपैकींच होत असें कांहीं संशोधकांचें मत आहे.

**राष्ट्रगीत**—प्रत्येक राष्ट्राचें एखादें विशिष्ट गीत जनता आणि सरकार या सर्वांकडून आदरण्यांत येत असतें. तथापि अशा राष्ट्रगीताची वहिवाट फार प्राचीन नाहीं. इंग्लंडचें 'गॉड सेव्ह दि किंग' हें राष्ट्रगीत सोळाव्या किंवा सतराव्या शतकांत पुढें आलेलें दिसतें. फ्रान्सचे 'ल मार्सेलेझ' हें सुप्रसिद्ध गीत फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळांतील आहे. बेल्जमचें 'ला ब्राबानसान' हें सुद्धां क्रांतींतून निघालें आहे (१८३०). अमेरिकनांचें 'यांकी डूडल' १७५५ त झालें. तथापि तें सरकारमान्य नाहीं.

हिंदुस्थानांत राष्ट्रीय चळवळ निघाल्यापासून बंकिमचंद्र चतर्जी यांचें 'वंदे मातरम्' हें गीत राष्ट्रीय म्हणून मानण्यांत आलें. याच्या जोडीला 'सारे जहाँसे अच्छा' हें हिंदुस्थानी पद कधीं कधीं स्वीकारण्यांत येतें. महाराष्ट्रांत श्री. कृ. कोल्हटकर यांचें 'बहु असोत सुंदर संपन्न...' हें महाराष्ट्रगीत म्हणून सर्वमान्य आहे. गुजराथेंत नर्मदाशंकरचें 'जयजय गुर्वी गुर्जर राष्ट्र।' हें राष्ट्रगीत धरण्यांत येतें.

'वंदे मातरम्' हें गीत बंगाली कादंबरीकार बंकिमचंद्र चतर्जी यांच्या 'आनंदमठ' कादंबरींत कांहीं प्रसंगानें आलेलें आहे. हें मूळ बंगाली आहे, तथापि यांतील बहुतेक शब्द संस्कृत असल्यामुळें राष्ट्रगीताच्या दर्जाला हें पद पोंचलें. प्रथम १९०५ च्या काँग्रेसच्या अधिवेशनसमातीला म्हणण्यांत आलें होतें. पण पुढील सालीं कलकत्याच्या अधिवेशनास याच गीतानें सुरुवात झाली. व प्रतिनिधी परस्परांचें स्वागत याच 'वंदे मातरम्' शब्दानें करूं लागले. पुढें वंगभंगाच्या व इतर राजकीय चळवळींत या गीतासाठीं देशभक्तांनीं फार हाल सोसले. नंतर या गीताला मुसलमानांचा हिंद राष्ट्रगीत म्हणून विरोध होऊं लागला. तेव्हां यांतील थोडाच प्रथम भाग मोठाल्या समारंभांतून म्हणण्यांत येऊं लागला. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानची स्वतंत्र राज्यघटना अमलांत येण्याचा दिल्लीचा समारंभ याच गीतानें सुरू झाला. आज हें अखिल हिंदूंचें तरी एकमेव राष्ट्रगीत ठरलें आहे, तथापि भारत सरकारनें रवींद्रनाथ टागोर यांनीं केलेलें 'जनगणमन' हें गीत राष्ट्रगीत ठरवून बँडवर त्याचें सरकारी समारंभाच्या प्रसंगीं वादन सुरू केलें. तथापि खाजगी समारंभांतून 'वंदे मातरम्' हेंच राष्ट्रगीत म्हणण्यांत येतें.

**राष्ट्रसंघ**—(लीग ऑफ नेशन्स). पहिल्या महायुद्धाचा एक महत्त्वाचा परिणाम म्हणजे राष्ट्रसंघाची (लीग ऑफ नेशन्स) स्थापना हा होय. हा संघ स्थापन करण्याचें श्रेय मुख्यतः संयुक्त संस्थानांचे त्या वेळचे अध्यक्ष डॉ. विल्सन यांना आहे. राष्ट्रसंघांत ब्रिटिश साम्राज्यानें आपणास महत्त्वाचें स्थान व अधिक मतें मिळावीं म्हणून आपल्या सर्व स्वायत्त वसाहती कानडा, दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड यांना आणि स्वायत्ता नसलेला हिंदुस्थान यालाहि सामील करून घेतलें. फक्त स्वतंत्र व स्वायत्त देशांचाच हा संघ असूनहि स्वतंत्र नसलेल्या हिंदुस्थानला अपवाद म्हणून राष्ट्रसंघांत स्थापनेपासूनचा एक आद्य समासद करून घेतल्यामुळें हिंदुस्थानला स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा ब्रिटिश कायद्यानें दिलेला नव्हता तरी आन्तरराष्ट्रीय व्यवहारांत तसा दर्जा प्राप्त झाला; व याचें महत्त्व व फायदे फार होते. राष्ट्रसंघाच्या प्रत्येक बैठकींत हिंदुस्थानला आपलें

गाऱ्हाणें मांडतां आलें, आणि राष्ट्रसंघाच्या अनेक समितींत सभासदत्व मिळालें.

राष्ट्रसंघाचा घटनाविषयक करारनामा शांतता परिषदेनें ता. २८ एप्रिल १९१९ रोजीं मंजूर केला, व त्याचा अन्तर्भाव व्हर्सायच्या तहांत करण्यांत आला. सदर करारनाम्यांतील महत्त्वाचीं कलमें येणेंप्रमाणें :—

( १ ) राष्ट्राराष्ट्रांत सहकारित्व वाढत जावें; राष्ट्राराष्ट्रांतील परस्पर संबंध शांततेचे राहून सर्वांना निर्भयतेची स्थिति प्राप्त व्हावी; आणि एतदर्थ ( इष्टप्राप्तीसाठीं ) युद्धाचा आश्रय करणार नाहीं ( तर शांततेच्या मार्गांनीं शक्य तेवढी सर्व खटपट राष्ट्र-संघ-समय-पत्रिकेनुसार करूं ), हें बंधन मान्य करणें; राष्ट्रा-राष्ट्रांतील व्यवहार उघडपणें व न्यायाच्या आणि सन्मान्यतेच्या तत्त्वावर चालतील असें करणें. आन्तरराष्ट्रीय कायद्याच्या सर्वसंमत तत्त्वांना शासनसंस्थांनीं ( सरकारांनीं ) प्रत्यक्ष आचार-नियमांत स्थान द्यावें व ही सुधारणा कायमची व्हावी असा प्रयत्न करणें, सुसंघटित जनसमाजांच्या परस्पर व्यवहारांत न्याय राखणें, व तहनाम्यांनीं उत्पन्न झालेल्या सर्व बंधनांबद्दल सर्वां-कडून पूर्ण आदरभाव कृतीनें व्यक्त केला जाईल अशी व्यवस्था करणें, या हेतूनें करार करणारे महापदस्थ पक्ष( राष्ट्रें ) हा राष्ट्रसंघाचा करारनामा मान्य करितात. दुसरें, ( २ ) त्याची लष्करी व आरमारी सामुग्री व फौज किती असावी, इत्यादीं-संबंधीं जे नियम संघ त्याला घालून देईल ते त्यानें मान्य करावे. ( ३ ) एक संघसभा, एक कारभारी मंडळ आणि एक कायम चिटणीस-कचेरी या साधनांमार्फत राष्ट्रसंघाचें कार्य-कर्तृत्व व्यक्त होईल. ( ४ ) या बैठकींत राष्ट्रसंघाच्या कार्य-क्षेत्रांत येणाऱ्या अथवा जगाच्या शांततेशीं संबद्ध अशा कोणत्याहि गोष्टीचा विचार संघ-सभा करील. ( ५ ) कारभारी मंडळाची वर्षांतून एक बैठक झालीच पाहिजे. ( ६ ) संघाचें 'गृहस्थान' जिनेव्हा येथें स्थापिलें आहे. हें गृहस्थान केव्हांहि बदलण्याचा अधिकार कारभारी मंडळास आहे. ( ७ ) राष्ट्र-संघाच्या सदस्यास जाणीव आहे कीं, जगतांत शांतता राखावयाची तर प्रत्येक राष्ट्रानें त्याची अंतर्गत सुरक्षितता असावी, आणि त्याचीं अन्यराष्ट्रविषयक कर्तव्यें त्याजकडून संघबलानें करवून घेण्याला राष्ट्र-संघाला जरूर असणारें सामर्थ्य असावें, या दोन तत्त्वांची उपेक्षा होऊं न देतां युद्धसाहित्य जितकें किमान पक्षीं कमी करतां येईल तितकें केलें पाहिजे. ( ८ ) आपआपसांत युद्ध जुंपण्यासारखें कांहीं वितुष्ट उत्पन्न झाल्यास सदस्य राष्ट्रें हीं आपली वितुष्टाची बाब निर्णयासाठीं पंचायतीपुढें अथवा चौकशीसाठीं कारभारी मंडळापुढें मांड-ण्याचें मान्य करीत आहेत; तसेंच पंचायतीनें निकाल दिल्यानंतर अथवा कारभारी मंडळानें चौकशीचा अहवाल प्रसिद्ध केल्यानंतर तीन महिनेपावेतों कसलीहि बाब असली तरी युद्धाचा आश्रय करावयाचा नाहीं अशीहि मान्यता सदस्य राष्ट्रें देत आहेत. ( ९ ) या करारनाम्यांतील कांडें १२, १३ व १५ यांची अवहेलना करून जें सदस्य राष्ट्र युद्धाचा आश्रय करील त्याच्या या करणीवरूनच त्यानें इतर सर्व संघसदस्यांविरुद्ध युद्धाचें कृत्य केलें आहे असें मानलें जाईल, आणि संघसदस्य या कांडान्वयें असा करार करीत आहेत कीं, अशा राष्ट्राशीं असलेले सर्व व्यापारी व देण्याघेण्याचे संबंध तोडून टाकणें, आपलें राष्ट्रजन व करार मोडणाऱ्या राष्ट्राचे लोक यांजमध्यें चालू असलेल्या सर्व व्यवहाराला बंदी करणें, तसेंच संघसदस्य असलेल्या या नसलेल्या कोणत्याहि राष्ट्राचे नागरिक व करार-बंधन तोडणाऱ्या राष्ट्राचे नागरिक यांजमध्यें देण्याघेण्याचा, व्यापारी अथवा खासगी वैयक्तिक असे सर्व प्रकारचे व्यवहार बंद करणें, या गोष्टी ते ( यथाशक्य ) ताबडतोब अमलांत आणतील. ( १० ) मागील युद्धानें ज्या वसाहती व जे प्रदेश युद्धापूर्वींच्या सत्ताधीशांच्या सत्तेखालून निघालेले आहेत, परंतु ज्या ठिकाणचे रहिवासी आधुनिक जगताच्या कठोर परिस्थितींत आपल्या पायावर उभे राहण्यासारखे अद्यापि बनलेले नाहींत, त्या ठिकाणांचीं पुढची व्यवस्था लावतांना जें तत्त्व अमलांत यावें तें येणेंप्रमाणें :—या ( मागासलेल्या ) मुलखांतील लोक सुखी राहून त्यांची उन्नति कशी होईल याची विवंचना व खटपट करणें हें सुधारलेल्या जगाचें ( ईश्वरानें ) त्याजवर सोंपविलेलें असें पवित्र कर्तव्य मानलें जावें आणि हें ( ईश्वरदत्त ) कर्तव्य नीटपणें बजाविलें जाईल याबद्दलच्या हमीची व्यवस्था या संघ-करारांत अंतर्भूत केली जावी. ( ११ ) सदरील तत्त्व व्यवहार-गत करण्याचा उत्तम प्रकार असा :—साधनसंपत्ति, अनुभव व प्रादेशिक दूर-निकट-भाव या सर्व दृष्टींनीं जें पुढारलेलें राष्ट्र विवक्षित मागासलेल्या मुलखाचें पालकत्व पत्करण्यास सर्वांत अधिक लायक असून ही पालकत्वाची जबाबदारी शिरा-वर घेण्यास तयार असेल त्या राष्ट्रावर हें पालकत्व सोंपविलें जावें आणि त्यानें हें पालकाचें काम संघाचा आज्ञाकारी या नात्यानें करावें. ( १२ ) जगतांत सर्वत्र आरोग्यसंवर्धन व्हावें, रोगाचा प्रादुर्भाव टळावा व दुःखाचें साम्राज्य आकुंचित होत जावें, या हेतूंनीं प्रेरित होऊन खटपट करणारे स्वयंसेवकांचे समुचित अधिकारपत्र मिळविलेले 'राष्ट्रीय शुश्रूषा संघ' ( रेड क्रॉस ) संस्थापित होऊन त्यांनीं सहकार्यानें काम करावें, या गोष्टीस हरतऱ्हेचें उत्तेजन व साहाय्य देण्याचें सदस्य-राष्ट्रें मान्य करीत आहेत.

राष्ट्रसंघाच्या मुख्य कार्यकारी संस्था पांच होत्या त्या–

रामटेक—देवळांचा भाग (पृ. २१४४)

रामेश्वर—ब्राह्मणाचें घर (पृ. २१११)

(अ) कौन्सिल–याचे कायम सभासद पांच : ग्रेट ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, इटली व जपान, आणि तात्पुरते सभासद नऊ असून या कौन्सिलच्या सभा दरसाल निदान चार वेळां भरत. (आ) असेंब्ली–हिची सभा दरसाल सप्टेंबरच्या पहिल्या सोमवारीं भरे व जरूर तेव्हां जादा सभा भरत. या सभेला प्रत्येक सभासद-राष्ट्राचे तीन प्रतिनिधी येत. प्रत्येक सभेचा अध्यक्ष (प्रेसिडेंट) निवडला जाई. या असेंब्लीच्या पुढील सहा मुख्य समिती होत्या : १ ज्युडिशियल (न्यायविषयक), २ टेक्निकल ऑर्गनायझेशन्स (तंत्रविषयक व्यवस्था), ३ डिसॅआर्मामेंट (निःशस्त्रीकरण), ४ लीग फायनॅन्स (संघ फडणिशी), ५ सोशल क्वश्चन्स (सामाजिक प्रश्न), ६ पोलिटिकल क्वश्चन्स अँड अॅडमिशन ऑफ दि न्यू मेंबर्स (राजकीय प्रश्न व नवीन सभासद-प्रवेश). (इ) सेक्रेटरिएट– यांत सेक्रेटरी जनरल असून त्याच्या हाताखालीं कायमचे अधिकारी असतात. (ई) इंटरनॅशनल लेबर ऑर्गनायझेशन (आंतरराष्ट्रीय कामगार संघ)—या संस्थेच्या मदतीला इंटरनॅशनल कमिशन्स पुढील कामाकरितां असतात : (१) मॅरिटाइम अफेअर्स (नाविक कामें), (२) ॲग्रिकल्चर (शेतकी), (३) एमिग्रेशन (परदेशगमन), (४) इंडस्ट्रियल हायजिन (औद्योगिक आरोग्य), (५) सोशल इन्शुअरन्स (सामाजिक विमा), (६) नेटिव लेबर (देश्य मजूर). (उ) पर्मनन्ट कोर्ट ऑफ इंटरनॅशनल जस्टिस (कायमचें आंतरराष्ट्रीय न्यायालय)—हें कोर्ट हेग येथें असे व त्यांत ११ मुख्य न्यायाधीश आणि चार दुय्यम न्यायाधीश असत. राष्ट्रसंघाच्या दुय्यम कार्यकारी संस्था (सेकंडरी आर्गन्स) आहेत त्या : १. टेक्निकल ऑर्गनायझेशन्स (एकॉनॉमिकल अँड फायनॅन्शियल, हेल्थ, ट्रॅन्झिट, लेबर) (आर्थिक, आरोग्यविषयक, श्रमिक, इ. तांत्रिक व्यवस्था), २. अॅडव्हायसरी कमिशन्स (मिलिटरी, नेव्हल अँड एअर, रिडक्शन ऑफ आर्मामेंट्स, मॅंडेट्स, ओपियम, सोशल) (लष्करी, नाविक, वैमानिक, निःशस्त्रीकरण, मॅंडेट, अफू, इ. साठीं सल्लागार समिति), ३. इंटरनॅशनल ब्यूरो (हायड्रोग्रॅफिक, रिलीफ, इन्स्टिटयूट ऑफ कॉमर्स, इन्स्टिटयूट ऑफ इन्टेलेक्चुअल कोऑपरेशन, इन्स्टिटयूट ऑफ प्रायव्हेट लॉ) (समुद्रविद्या, व्यापारसंस्था, बौद्धिक सहकारी संस्था, खाजगी कायद्याची संस्था, इ. चें आंतरराष्ट्रीय मंडळ), आणि ४. अॅडमिनिस्ट्रेटिव्ह ऑर्गनायझेशन्स (कारभार व्यवस्था).

राष्ट्रसंघाचे आरंभींचे सभासद— १ ऑस्ट्रेलिया, २ बेल्जम, ३ बोलिव्हिया, ४ ब्राझील, ५ कानडा, ६ चीन, ७ क्यूबा, ८ झेकोस्लोव्हाकिया, ९ इक्वेडोर, १० फ्रान्स, ११ ग्रीस, १२ ग्वाटीमाला, १३ हायटी, १४ हेझाज, १५ हाँडुरस, १६ हिंदुस्थान, १७ इटली, १८ जपान, १९ लायबेरिया, २० न्यू झीलंड, २१ निकाराग्वा, २२ पनामा, २३ पेरू, २४ पोलंड, २५ पोर्तुगॉल, २६ रुमानिया, २७ सयाम, २८ दक्षिण आफ्रिका, २९ युनायटेड किंग्डम, ३० युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका, ३१ युरुग्वे, व ३२ युगोस्लाव्हिया.



राष्ट्रसंघाचे नंतर झालेले सभासद—१ आर्जेंटिना, २ चिली, ३ कोलंबिया, ४ डेन्मार्क, ५ नेदर्लंड्स, ६ नॉर्वे, ७ पॅराग्वे, ८ इराण, ९ साल्व्हाडोर, १० स्पेन, ११ स्वीडन, १२ स्वित्झर्लंड, १३ व्हेनेझुएला, १४ आल्बेनिया, १५ ऑस्ट्रिया, १६ बल्गेरिया, १७ कोस्टारिका, १८ फिन्लंड, १९ लग्झेम्बर्ग, २० इस्टोनिया, २१ लिथुआनिया, २२ लाटव्हिया, २३ हंगेरी, २४ आयरिश फ्री स्टेट, २५ अॅबिसीनिया, व २६ सॅंटोडॉमिंगो.

राष्ट्रसंघाची मुख्य कचेरी जिनीव्हा येथें असे व कामकाजाची भाषा इंग्लिश व फ्रेंच होती. वार्षिक खर्च १० लक्ष पौंड असे. त्याकरितां प्रत्येक सभासद राष्ट्राकडून वर्गणी घेण्यांत येई. राष्ट्रसंघानें पहिलें महायुद्ध संपल्यानंतर अनेक महत्त्वाचीं कामें केलीं तीं : १ देशांच्या सरहद्दी ठरविल्या. २ पूर्वी शत्रूंचे असलेले प्रदेश मोठाल्या राष्ट्रांच्या पालकत्वाखालीं दिले. ३ ऑस्ट्रिया व हंगेरी यांची आर्थिक स्थिति सुधारली. ४ राष्ट्राराष्ट्रांतील कित्येक तंटे मिटविले. ५ आरमार कमी करण्याबद्दल पुष्कळ प्रयत्न केले. ६ जगांतील मजूर वर्गाकरितां सुखसोयींचे कायदे सुचविले. याप्रमाणें राष्ट्रसंघानें आपली उपयुक्तता सारखी वाढवीत नेली होती.

प्रेसिडेंट विल्सन यांनीं जे १४ मुद्दे पुढे मांडले, त्यांपैकीं १४ वा मुद्दा राष्ट्रसंघ-स्थापनेबद्दलचा होता. परंतु यू. एस्. अमेरिकेच्या कॉंग्रेसनें व्हर्सायच्या तहाला आणि लीगचें सभासदत्व स्वीकारण्याला मान्यता दिली नाहीं. राष्ट्रसंघाच्या करारनाम्यानें लीगचे सभासद असलेल्या राष्ट्रांनीं परस्परांवर प्रादेशिक आक्रमण करावयाचें नाहीं व राजकीय स्वातंत्र्य नष्ट करावयाचें नाहीं. तसेंच आपसांतील भांडण किंवा वाद राष्ट्रसंघापुढें मांडावयाचा, आणि सहा महिन्यांत राष्ट्रसंघानें त्या वादाचा निर्णय केला नाहीं तर त्यानंतर तीन महिने वाट पाहिल्यावर मर्जी असेल तर युद्ध करावें असें बंधन सभासद राष्ट्रावर असे. राष्ट्रसंघाच्या या कलमांचें उल्लंघन करून परराष्ट्रावर आक्रमण केल्यास त्या गुन्हेगार राष्ट्राविरुद्ध कोणते शासनात्मक उपाय योजावे तें १६ व्या कलमांत सांगितलें आहे. सैन्य कमी करणें आणि राष्ट्राराष्ट्रांमध्यें झालेल्या तहांचा फेरविचार करणें, यांसंबंधीं कलमें राष्ट्रसंघाच्या करारनाम्यांत आहेत.

राष्ट्रसंघाच्या असेंब्लीची वार्षिक सभा जिनीव्हा येथें भरे आणि त्या सभेंत प्रत्येक सभासद राष्ट्राला एकमत असे.

१९३९ सालपर्यंत राष्ट्रसंघाचे ५४ सभासद होते. लीगच्या कौन्सिलची सभा दरसाल तीन वेळां भरे. ग्रेट ब्रिटन, फ्रान्स व रशिया हे तीन देश या कौन्सिलचे कायमचे सभासद असत. आणि बाकीचे १२ सभासद इतर राष्ट्रांनीं निवडलेले असत. या राष्ट्रसंघाच्या इंटरनॅशनल लेबर ऑर्गनायझेशन, पर्मनंट कोर्ट ऑफ इंटरनॅशनल जस्टिस, वगैरे अनेक शाखा असत.

राष्ट्रसंघांत यू. एस्. अमेरिका सामील न झाल्यामुळें, तसेंच राष्ट्रसंघाचा करारनामा सुव्यवस्थित नसल्यामुळें आणि राष्ट्रसंघानें दिलेले निर्णय अमलांत आणण्याचें प्रभावी साधन राष्ट्रसंघाजवळ नसल्यामुळें राष्ट्रसंघाच्या कामाला अडथळे येऊं लागले. तसेंच पहिल्या महायुद्धांतील जित राष्ट्रें आणि जेतीं राष्ट्रें यांच्यामध्यें मतभेद निर्माण होऊन राष्ट्रसंघाच्या कार्यास अडथळे येऊं लागले. १९२५ सालीं जर्मनी राष्ट्रसंघांत सामील झाला व त्यामुळें राष्ट्रसंघ अधिक यशस्वी होण्याची आशा वाटूं लागली. परंतु १९३३ सालीं हिटलर जर्मनीचा हुकूमशहा बनल्यावर जर्मनीनें लीगचें सभासदत्व सोडलें. लीगनें युरोपांतील कांहीं किरकोळ वाद मिटविले खरे, परंतु जपाननें चीनविरुद्ध मांचूरियावर १९३२ सालीं जें आक्रमण केलें, तें आक्रमण राष्ट्रसंघाला बंद करतां आलें नाहीं. राष्ट्रसंघानें जपानच्या या कृत्याचा निषेध केला, व त्यामुळें जपाननें लीगचें सभासदत्व सोडलें, पण राष्ट्रसंघानें जपानविरुद्ध कोणतीहि उपाययोजना केली नाहीं. १९३४ सालीं सोव्हिएट रशिया राष्ट्रसंघाचा सभासद झाला. त्यामुळें राष्ट्रसंघाचें सामर्थ्य पुन्हां वाढलें आणि १९३५ सालीं इटलीनें ॲबिसीनियावर स्वारी केली म्हणून राष्ट्रसंघानें इटलीविरुद्ध शासनयोजना जाहीर केली. त्यामुळें इटली राष्ट्रसंघांतून फुटून निघाला आणि इटलीनें ॲबिसीनिया जिंकला. त्यास प्रतिबंध संघाला करतां आला नाहीं. या अपयशामुळें राष्ट्रसंघाचें वजन कमी झालें आणि त्यामुळें अनेक राष्ट्रें लीगवर अवलंबून न राहतां आपल्या जुन्या धोरणानुसार आपापसांत दोस्तीचे करार करूं लागले. पुढें जर्मनीनें ऑस्ट्रिया व झेकोस्लोव्हाकिया आपल्या साम्राज्यास जोडला व त्या कृत्यास राष्ट्रसंघानें विरोध केला नाहीं; तसेंच जर्मनीनें १९३९ सालीं पोलंडवर स्वारी केली त्या वेळींहि जर्मनीविरुद्ध राष्ट्रसंघानें कोणताहि उपाय योजला नाहीं. पुढें सोव्हिएट रशियानें फिन्लंडवर स्वारी केली तेव्हां १९३९ च्या डिसेंबरांत संघाच्या असेंब्लीची बैठक भरली व तेथें रशियाच्या या अपकृत्याचा निषेध करण्यांत येऊन राष्ट्रसंघांतून रशियाला काढून टाकण्यांत आलें. १९४० पासून पुढें राष्ट्रसंघानें कांहींच कार्य केलें नाहीं. पण त्या सालीं राष्ट्रसंघाच्या कांहीं कचेऱ्या न्यू यॉर्क येथें नेण्यांत आल्या. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर या राष्ट्रसंघाचीं सर्वच कामें थांबलीं, व एप्रिल १९४६ सालीं ही संस्था अस्तित्वांतून जाऊन तिची जागा संयुक्त राष्ट्रसंघानें ('युनो'नें) घेतली. (संयुक्त राष्ट्रसंघ पाहा). या संयुक्त राष्ट्रसंघाचें काम बहुतेक मागील राष्ट्रसंघाप्रमाणेंच चाललें आहे.

**राष्ट्रीय कर्ज**—देशाचें राष्ट्रीय कर्ज म्हणजे ज्या इसमांकडून कर्जाऊ रकमा घेतल्या असतील त्या सर्व इसमांचें मिळून एकंदर देणें जें मध्यवर्ती सरकारला (सेंट्रल गव्हर्नमेंट) असतें, त्याला राष्ट्रीय कर्ज म्हणतात. इंग्लंडांत १६९४ सालीं बँक ऑफ इंग्लंड सुरू झाली. तेव्हांपासून 'ब्रिटिश नॅशनल डेट' ला सुरुवात झाली. १८ व्या व १९ व्या शतकांतल्या इंग्लंडनें केलेल्या युद्धामुळें हें कर्ज सारखें वाढत गेलें. १६९७ सालीं २१५ लक्ष पौंड, १७१४ सालीं ५३० लक्ष पौंड, १७४८ सालीं ७८० लक्ष पौंड, १७६४ सालीं १,३९५ लक्ष पौंड, १७८३ सालीं २,६८० लक्ष पौंड, १८१६ मध्यें ८,८५० लक्ष पौंड कर्ज, नेपोलियनबरोबरच्या युद्धानंतर इंग्लंडला होतें. पहिल्या महायुद्धापूर्वीं ७,०७० लक्ष पौंड कर्ज होतें, तें १९१९ सालीं ८०,७९० लक्ष पौंड इतकें वाढलें. या महायुद्धांत सामील झालेल्या सर्व युरोपीय देशांना फार राष्ट्रीय कर्ज झालें व हें कर्ज सं. संस्थानांच्या अमेरिकन सरकारनें दिलेलेंच मुख्यतः होतें. दुसऱ्या महायुद्धानंतर १९४६ सालीं ब्रिटनला २३,२७,०८,६२,००० पौंड इतकें राष्ट्रीय कर्ज होतें.

राष्ट्रीय कर्जाचे दोन प्रकार (१) स्वकीयांनीं म्हणजे प्रजेनें दिलेलें (इन्टर्नल) कर्ज, आणि (२) परकीयांकडून (एक्स्टर्नल) घेतलेलें कर्ज, असे असतात. शिवाय दुसरे दोन महत्त्वाचे प्रकार म्हणजे: (१) कायमचें कर्ज (पर्मनंट डेट किंवा फंडेड डेट) म्हणजे ज्या कर्जावरील व्याज देण्याकरितां विशिष्ट कराचें, इतर उत्पन्नांच्या बाबींचें उत्पन्न, किंवा विशिष्ट फंड राखून ठेवलेला असतो; पण मुद्दल परत केव्हां फेडावयाचें त्याची मुदत ठरलेली नसते, आणि अमुक मुदतीपर्यंत मुद्दल परत मिळणार नाहीं अशी शर्त असते; आणि (२) तात्कालिक कर्ज (फ्लोटिंग डेट किंवा शॉर्ट मॅचुरिटीज) म्हणजे ठरलेल्या मुदतीनंतर ताबडतोब कर्जाची फेड करण्याची हमी दिलेलें कर्ज. उदा., ट्रेझरी बिल्स, पोस्टल कॅश सर्टिफिकिटें, वगैरे.

हिंदुस्थान—राष्ट्रीय कर्ज देशांतील सरकारनें राष्ट्राच्या पतीवर व जबाबदारीवर आणि राष्ट्रहिताच्या कामाकरितां काढलेलें असतें. प्राचीन रामायण–महाभारतकाळीं युद्धखर्चाकरितां कर्ज काढावें लागे, पण त्याला राजाचें खासगी कर्ज असें स्वरूप होतें, असें पुढील उताऱ्यावरून दिसतें— "अस्यामापदि घोरायां संप्राप्ते दारुणे भये। परित्राणाय भवतां प्रार्थयिष्ये धनानि वः। प्रतिदास्ये च भवतां सर्वं चाहं भयक्षये॥"

(महा. शांतिपर्व, अ. ५६). हें कर्ज परत देण्याचे मार्ग शत्रूपासून घेतलेलें द्रव्य आणि राजानें खर्चांत केलेली काटकसर हे असत. कर कोणते व किती घ्यावे हें धर्मशास्त्रांनीं व राजनीतिपर ग्रंथांनीं ठरवून दिलेलें असल्यामुळें राजांनीं जादा कर बसवणें शक्य नसे.

अर्वाचीन काळांत पेशवाईत राष्ट्रीय कर्जाचें तत्त्व बीजरूपानें आढळतें, तथापि पेशव्यांना आपल्या खासगी पतीवर कर्ज काढावें लागून फार त्रास झाला. १७४० ते १७६० या वर्षांत नानासाहेब पेशव्याला दीड कोटी रुपये स्वतःच्या पतीवरचें कर्ज होतें. या कर्जावर १२ ते १८ टक्के व्याज द्यावें लागे. माधवराव पेशव्याला मरणाच्या वेळीं चोवीस लक्ष रु. च कर्ज होतें. यामुळें त्याचा जीव घोटाळूं लागला. तेव्हां सावकारांनीं कांहीं कर्जरोखे त्याच्या देखत फाडून टाकले व कांहींची हमी कारभाऱ्यांनीं दिली. नाना फडणिसाच्या करड्या व्यवस्थेमुळें दौलतीला कर्ज थोडेंच लाख उरलें होतें. कोणत्याहि देशांत जोंपर्यंत प्रजेचें जीवित व मालमत्ता यांचें संरक्षण करणारें पोलिसखातें व न्यायखातें उत्तम नाहीं, देशांत शांतता नाहीं, परकीयांच्या स्वाऱ्यांची भीति नेहमीं आहे, देशी व्यापाराला उत्तेजन नाहीं, तोंपर्यंत त्या देशाच्या सरकारला पत नाहीं, व त्यामुळें राष्ट्रीय कर्ज मिळणें शक्य नाहीं. व अशी स्थिति पेशवाईअखेरपर्यंत होती.

ब्रिटिश अमदानींत देशांत पोलिसखातें, न्यायखातें व लष्कर यांची व्यवस्था उत्तम होऊन प्रजेला संरक्षण व शांतता लाभली. व्यापारधंदा वाढला व धनिक वर्ग वाढत गेला; त्यामुळें ब्रिटिश सरकारला थोड्या व्याजानें राष्ट्रीय कर्ज मिळूं लागलें. कंपनी सरकारनें व ब्रिटिश सरकारनें युद्धांकरितां, त्रुटित खर्चाकरितां व रेल्वे, कालवे, वगैरे सरकारी उत्पन्नाच्या बाबींकरितां व फायदेशीर खर्चाकरितां राष्ट्रीय कर्ज काढण्यास सुरुवात केली, व हें कर्ज सारखें वाढत गेलें. १८४० सालीं ३१० लक्ष पौंड कर्ज होतें व तें १९०५ सालीं १,३३० लक्ष पौंड झालें. त्यापैकीं त्रुटित कर्ज सरकारनें कमी करीत आणलें; पण पहिल्या महायुद्धामुळें १९२० सालीं हिंदुस्थानला एकंदर कर्ज ५६६ कोटी रुपये म्हणजे माणशीं २४ रु. होतें. सदर युद्धखर्चाकरितां हिंदुस्थाननें इंग्लंडला १५० कोटी रुपये देण्याचें ठरलें होतें. दुसऱ्या महायुद्धामुळें तर हिंदुस्थानचें कर्ज फार वाढलें. १९४५-४६ सालीं तें २,००,०६५ कोटी रुपयांचें होतें. पुढील सालीं तें १९८ कोटींनीं वाढलें.

**राष्ट्रीय स्वयंसेवक संघ**— स्वतःच्या इच्छेनें राष्ट्रसेवा करूं इच्छिणाऱ्या हिंदु लोकांची एक संघटित संस्था. ही डॉ. केशव बळिराम हेडगेवार (पाहा) यांनीं शके १८४७ (सन १९२५) च्या विजयादशमीच्या सुमुहूर्तावर नागपूर येथें स्थापन केली. संघाचा ध्वज भगवा असून स्वयंसेवकांकडून कडक शिस्त पाळली जाते. तीसाठीं नियम असतात. हिंदूंची संस्कृति समजावून देण्यासाठीं बौद्धिक वर्ग घेण्यांत येतात. संघ स्थापन झाल्यानंतर लवकरच हिंदुस्थानांत सर्वत्र संघाच्या शाखा निघाल्या. हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत हिंदूंच्या संरक्षणाचें कार्य आजपर्यंत संघानें उत्कृष्टपणें बजावलें आहे. मध्यप्रांत सरकारनें पण त्यामुळें सरकारचा संघावर रोष होऊन प्रथम १९३२ सालीं कांहीं काळ सरकारी नोकरांना संघांत भाग घेण्यास बंदी केली होती. इतर कांहीं प्रांतांनींहि हेंच धोरण ठेवलें. तथापि संघाची प्रगति जोरानें चालूच होती. संघाला माणसांची किंवा पैशाची कधींच वाण पडली नाहीं. तरुणांना संघाचें विशेष आकर्षण आहे. गुरुदक्षिणेच्या रूपानें संघाला चांगलें द्रव्यसाहाय्य होतें व प्रचाराचा खर्च भागतो. संघानें हिंदु जनतेचा विश्वास संपादन केला असल्यानें संघाच्या घटनेसंबंधीं किंवा पैशाच्या व्यवस्थेसंबंधीं कोणी प्रश्न करीत नाहीं कीं शंका काढीत नाहीं. आज भारतांत संघाचे स्वयंसेवक पांच लाखांपावेतों भरतील.

अखिल हिंदूंची प्रभावी संघटना करून हिंदु राष्ट्र अजिंक्य करावयाचें हा संघाचा उद्देश असल्यानें व त्याप्रमाणें संचालकांनीं संघाचा कार्यक्रम ठेवल्यानें सरकार आणि काँग्रेस पक्ष यांना संघ अनिष्ट वाटूं लागला. १९४० त पहिले सर-संघचालक डॉ. हेडगेवार हे निवर्तल्यावर त्यांनीं नियुक्त केलेले श्री. माधव सदाशिव गोळवलकर हे सर-संघचालक झाले.

गोळवलकर 'गुरुजी' हे मूळ कोंकणातील गोळवली गांवचे. पण वडिलांची नोकरी मध्यप्रांतांत झाली. माधवरावांचा जन्म नागपुरास १९०६ सालीं झाला. त्यांचें महाविद्यालयीन शिक्षण पुणें, नागपूर, बनारस व मद्रास या ठिकाणीं झालें. १९२८ सालीं हिंदु विश्वविद्यालयाची त्यांनीं एम्. एस्सी. पदवी मिळवली व पुढें तेथेंच प्राध्यापक झाले. नंतर १९३५ सालीं ते वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाले व दोनच वर्षें वकिली केल्यानंतर त्यांनीं अध्यात्मज्ञानासाठीं योगसाधना आरंभिली. पण लवकरच हा मार्ग सोडून देऊन ते डॉ. हेडगेवारांच्या रा. स्व. संघाच्या कार्यांत शिरले व त्यांनीं अत्यंत निष्ठेनें संघाची सर्व जबाबदारी डॉ. हेडगेवार वारल्यानंतर पत्करली. त्यांनीं देशांत सर्व ठिकाणीं हिंडून संघाविषयीं जागृति उत्पन्न केली व शाखा वाढविल्या.

१९४७ सालीं हिंदुस्थानची जेव्हां फाळणी झाली तेव्हां असंख्य हिंदूंची मुसलमानी प्रदेशांतून कत्तल होऊं लागली. ती कांहीं अंशीं थांबविण्याचें मोठें देशकार्य संघानें केलें. पण यामुळें हिंदु आणि मुसलमान समाजांत वितुष्ट वाढतें व राष्ट्रांत अशांतता उत्पन्न होते, अशा समजुतीनें म. गांधींच्या वधानंतर सरकारनें संघावर बंदी घातली (१९४८) व संघाच्या कार्यकर्त्यांना कैदेंत ठेवलें. "संघावरचे आरोप सिद्ध करा, नाहीं तर बंदी उठवा" अशी मागणी सरकारकडे सरसंघचालकांनीं केली असतां ती अमान्य झाली. तेव्हां १९४८ च्या अखेरीस संघानें सत्याग्रह सुरू केला. हजारों स्वयंसेवक कारागृहांत गेले. पण पुढें तडजोड होऊन १९४९ च्या जुलै महिन्यांत संघावरची बंदी उठली. सरकारच्या म्हणण्याप्रमाणें संघानें एक घटना तयार करून ती सरकारांत नोंदवून घेतली.

तथापि सरकारचें मन संघाविषयीं अद्यापि स्वच्छ नाहीं. विघातक कृत्यें करणारी एक राजकीय संस्था या संशयी दृष्टीनेंच तिच्याकडे पाहण्यांत येतें; तथापि लवकरच सरकारचा हा दृष्टिकोन बदलेल अशी संघाला आशा वाटते.

संघाची संघटना भारतांत एकमेव व अभूतपूर्व आहे यांत शंका नाहीं. हें संघाचें सामर्थ्य राष्ट्रहिताच्या उपयोगी पडावें अशी योजना सरकारनें करणें इष्ट व आवश्यक आहे.

**रॉस, सर जॉन** (१७७७–१८५६)—एक ब्रिटिश भूप्रदेशसंशोधक. त्यानें १८२९–१८३३ या मुदतींत सफर करून बूथिया फेलिक्स व किंग विल्यम्स लँड हे प्रदेश शोधून काढून त्यांना वरील नांवें दिलीं. १८५० सालीं त्यानें आर्क्टिक महासागरांत सफर करून सर जॉन फ्रँक्लिन (पाहा) याचा शोध केला; पण तो प्रयत्न व्यर्थ ठरला.

**रॉस, सर जेम्स क्लार्क** (१८००–१८६२)—एक ब्रिटिश भूप्रदेशसंशोधक. त्यानें उत्तर चुंबकीय ध्रुव (नॉर्थ मॅग्नेटिक पोल) शोधून काढला. तो अँटार्क्टिक महासागरांतील संशोधनसफरीचा कमांडर होता (१८३९–१८४३). १८४८ सालीं तो बॅफिन उपसागराकडे सर जॉन फँक्लिन (पाहा) या संशोधकाचा शोध लावण्याकारितां गेला होता.

**रॉस, सर रोनाल्ड** (१८५७–१९३२)—एक ब्रिटिश वैद्यक-शास्त्रज्ञ. त्यानें इंडियन मेडिकल सर्व्हिसमध्यें (१८८१) नोकरी पत्करून मलेरिया या जातीच्या तापाविषयींचा अभ्यास केला आणि डांस या जंतूपासून मलेरिया ताप कसा येतो याबद्दलचा संपूर्ण शोध लावला. उष्ण कटिबंधांतील रोगांवरचा हा तज्ज्ञ समजला जात असे. त्याला वैद्यक-शास्त्रविषयाचें नोबेल पारितोषिक १९०२ सालीं देण्यांत आलें.

**रॉस, विल्यम पार्सन्स** (१८००–१८६७)— एक आयरिश ज्योतिषशास्त्रज्ञ. हा उमराव घराण्यांतील असून १८२३ ते १८३४ पर्यंत पार्लमेंटचा सभासद होता. यानें आपल्या बागेंत (बीर कॅसल येथें) एक मोठी वेधशाळा उभारली. त्यांतल्याएवढी मोठी दुर्बीण त्या वेळेपर्यंत कोठेंच नव्हती. या दुर्बिणीमुळें वर्तुलाकार तेजोमेघांचा शोध लागला. १८४९ ते १८५४ पर्यंत तो रॉयल सोसायटीचा अध्यक्ष होता.

**रासपुतिन, ग्रेगरी एफिमोव्हिश** (१८७१–१९१६)—एक रशियन ढोंगी साधु. याला लहानपणीं कांहीं शिक्षण नव्हतें. १९०४ सालापासून हा कांहीं जपजाप्यें करूं लागला. परमेश्वराकडून क्षमा मिळविण्यासाठीं पाप केलें पाहिजे असा नवा सिद्धांत यानें काढला. हा अतिशय दुर्व्यसनी होता. तथापि याच्या अंगीं बरेंच शारीरिक आणि गूढ मांत्रिक सामर्थ्य होतें यांत शंका नाहीं. यानें लवकरच रशियन दरबार आणि राजकुटुंब यांत प्रवेश करून घेऊन त्यांवर मोठी छाप पाडली. त्याला नाहींसा करण्यासाठीं बड्या लोकांनीं कट केले व एकदां जेवण्यास बोलावून गुप्त रीतीनें त्याला मारला व नदींत टाकून दिला. यामुळें राजकुलावरचें व देशावरचें मोठें संकट वांचलें.

**रासीन, जीन बाप्तिस्त** (१६३९–१६९९)—एक फ्रेंच नाटककार. त्याचें पहिलें शोकान्त नाटक 'थेबेद' हें पॅलेस रॉयल थिएटरांत १६६४ सालीं रंगभूमीवर आलें. त्याचें सर्वोत्कृष्ट नाटक 'आंद्रोमाक' (१६६७) हें होय. नंतर त्यानें बरींच नाटकें प्रसिद्ध केलीं. तो १६७८ सालीं फ्रेंच राजाचा इतिहासलेखक (हिस्टोरिओग्राफर) या जागेवर नेमला गेला. रासीनचीं नाटकें उच्च शोकान्त फ्रेंच नाट्य-वाङ्मयाचा आदर्श मानलीं जातात.

**रॉसेटी, डान्टे गॅब्रिएल** (१८२८–१८८२)—एक इंग्रज चित्रकार व कवि. त्यानें १८४८ सालीं 'प्री-रॅफेलाइट ब्रदरहुड' या नांवाची संस्था स्थापन केली. त्याचीं अतिशय महत्त्वाचीं चित्रें आहेत तीं 'दि ॲनन्सिएशन' (प्रसिद्धीकरण); 'मोन्ना व्हन्ना' आणि 'डान्टेज् ड्रीम' (डान्टेचें स्वप्न) हीं होत. शिवाय त्याचीं जलरंगी चित्रें व व्यक्तींचीं चित्रें (पोर्ट्रेट्स) पुष्कळ आहेत. त्याचे काव्यसंग्रह आहेत ते :—'दि हाउस ऑफ लाइफ ('जीवितगृह'–१०१ सुनीतें–सॉनेट्स यांचा संग्रह) आणि 'दि किंग्ज ट्रॅजेडी' (राजशोकांतिका). त्याची बहीण खिस्तीना जॉर्जिना (१८३०–१८९४) हीहि सुप्रसिद्ध कवयित्री असून त्याचा भाऊ विल्यम मायकेल हा देखील प्रसिद्ध लेखक होता.

**रास्ते घराणें**—पेशवाईंतील एक ब्राह्मणी सरदार घराणें. मूळपुरुष आदिलशाहींत सुभ्यांच्या रसदा विजापुरास भरणा

करण्याचें काम करीत असे, तेव्हां मूळ आडनांव गोखले होतें तें रसदे असें पडलें. पुढें शाहूनें यांची सचोटी व रास्त वर्तणूक पाहून रास्ते ही पदवी दिली व तीच पुढें आडनांवाप्रमाणें रूढ झाली. थोरल्या बाजीरावानें भिकाजीपंत रास्त्याची मुलगी आपल्या वडील मुलास, नानासाहेबास करून घेतली. तीच प्रसिद्ध गोपिकाबाई पेशवे (पाहा) होय. भिकाजीपंताच्या मुलांनीं माळवा आणि कर्नाटक या भागांत कामगिऱ्या करून सरंजाम मिळविले. सर्व सरदारांत रास्त्यांची तैनात मोठी असे. पुढें इंग्रजांकडे दळवळण ठेवल्यावरून दुसऱ्या बाजीरावानें यांचा फौज-सरंजाम जप्त केला होता, तो पुढें एल्फिन्स्टननें सोडवून दिला. सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत यांनीं पुण्यास रास्ता पेठ वसविली. देवळें, घाट, वाडे, विहिरी, वगैरे रास्त्यांचीं बरींच इमारतकामें जागजागीं आढळतात. हल्लींचे वंशज सरदार माधवराव रास्ते हे आहेत.

**रास्ना**— मुंगुसवेल. एक वेल. यांत पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत. पांढरा गुजराथकडे होतो. रास्ना वायुहारक आहे. अनेक काढ्यांतून रास्ना असतो. मुळ्या बारीक दामणाएवढ्या असतात व त्यांचाच उपयोग करतात.

**राहु**—नवग्रहांतील एक. समुद्रमंथनांतून काढलेल्या अमृताची वांटणी होत असतां चोरून कांहीं अमृत हा प्याला तेव्हां ही चोरी सूर्य-चंद्रांनीं उघडकीस आणून विष्णूकडून याचें शिर उडविलें. तेव्हां तो राग मनांत धरून ग्रहणाच्या वेळीं राहु त्यांना ग्रासतो, अशी पौराणिक कथा आहे. ज्योतिषशास्त्राप्रमाणें वरच्या पातबिंदूला राहु ही संज्ञा आहे. या पातबिंदूजवळ चंद्र असेल तेव्हां ग्रहण लागण्याचा संभव असतो. फलज्योतिषांत राहु हा पापग्रह समजला जातो.

**राहु खडा**—( इं. जॅस्पर ). कॅल्सेडोनीची ही एक जात आहे. हिंदी नांव संगयशब. हा एक अशुद्ध गारेचा खडा असून याचे रंग निरनिराळे असतात. हा शिंपांच्या बनलेल्या खडकांत किंवा रूपांतरित खडकांत आढळतो. यास उत्तम चकाकी आणतां येते व याचीं पात्रें, मुद्रा, तपकिरीच्या डब्या, वगैरे करतात. राहूचा खडा म्हणजे राहु ग्रहाचें प्रियरत्न नव्हे, तें गोमेद आहे. हा खडा बहुतेक रक्तासारखा लाल असून नर्मदा गणपति या नांवानें याची पूजा होते. तांबडी जात खंबायताकडे सांपडते. पिवळी तेनासरीमकडून येते.

**राहुरी**—मुंबई, अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका व गांव. यांत चार लहान जहागिरी आहेत. तालुक्याचें क्षे. फ. ५०१ चौ. मैल. लो. सं. ८०,०००. मुळा व प्रवरा यांमधील प्रदेश तालुक्यांत आहे. तो सपाट व सुपीक आहे. गोरखनाथ नांवाचें एक डोंगराचें उंच शिखर आहे. राहुरी गांव दौंड-मनमाड रेल्वेफाट्यावर आहे. व्यापार बराच चालतो. फळें पुष्कळ होतात. लो. सं. ( १९४१ ) ८,०००.

**राहुल, सांकृत्यायन** ( १८९३-          )—एक प्राच्यविद्यासंशोधक व समाजसत्तावादी. संयुक्तप्रांतांतील अझमगड जिल्ह्यामधील पंधा गांवीं यांचा जन्म झाला. यांचें पहिलें नांव केदारनाथ पांडे, परंतु नंतर बौद्ध धर्म स्वीकारल्यावर यांनीं सध्यांचें नांव धारण केलें. प्रथम कलकत्त्यास एका दुकानांत हे गुमास्त्याचें काम करीत असत. यांनीं कांहीं काल बनारस येथें काव्य-व्याकरणाचें अध्ययन केल्यावर बिहारमधील छापडा जिल्ह्यांतील एका मठांत वैष्णव साधु होऊन राहिले. १९१३ सालीं कम्यूनिस्ट झाले व दोन वेळां तत्त्वासाठीं शिक्षाहि भोगल्या. यानंतर १९१५ सालीं यांनीं आर्यसमाजी होऊन समाजाच्या प्रचारास सुरुवात केली; परंतु थोडक्याच कालांत यांच्या विचारांची दिशा बदलून हे बौद्ध धर्माकडे खेंचले जाऊं लागले. या वेळीं राजकारणाकडेहि यांचा ओढा होता. असहकारितेंतील राजकीय भाषणांवरून यांना बक्सारच्या तुरुंगांत सहा महिने ठेवण्यांत आलें. या कालांत यांनीं 'बाइसमी सदी' हा ग्रंथ लिहून पुरा केला. चौरीचुरा प्रकरणांतहि जहाल भाषणावरून १९२३ सालीं यांना दोन वर्षांची शिक्षा देण्यांत आली. या वेळीं यांनीं 'शैतानकी आँख', 'विस्मृतिके गर्भमें', 'जादूका मुल्क' यांसारख्या अनुवादित कादंबऱ्या लिहिल्या. पुढें यांनीं लंकेंतील विद्यालंकार कॉलेजमध्यें संस्कृतच्या प्राध्यापकाची जागा स्वीकारली. या वेळीं यांनीं पाली भाषेंतील संस्कृत ग्रंथांचें अध्ययन करून त्रिपिटकाचार्य ही पदवी मिळवली. १९२९ सालीं बौद्धांचे प्राचीन ग्रंथ शोधण्याकरितां हे वेषांतर करून तिबेटांत गेले व सव्वा वर्षानंतर तेथील हस्तलिखित ग्रंथ घेऊन परत आले. यानंतर लंकेंत जाऊन त्यांनीं बौद्ध धर्म स्वीकारला. सन १९२७ सालीं हे हिंदुस्थानांत परत आले.

तिबेटांतून महत्प्रयासानें आणलेल्या हस्तलिखित ग्रंथाच्या साहाय्यानें यांनीं वसुबंधूंचा 'अभिधर्मकोश' व त्यावरील स्वतःचें भाष्यहि प्रसिद्ध केलें. तसेंच 'बुद्धचर्या' नांवाचें गौतम बुद्धाचें चरित्रहि यांनीं लिहिलें. १९३१ सालीं यांनीं बौद्ध मिशनतर्फे युरोपचा प्रवास केला. पुन्हां एकदां तिबेटांत जाऊन यांनीं तेथून आणखी कांहीं महत्त्वाचे ग्रंथ मिळवले व ते इकडे आणून प्रसिद्ध केले. १९३५ सालीं जपानमार्गे हे मॉस्कोला जाऊन इराणमार्गानें परत आले. रशियाच्या आमंत्रणावरून १९३७ सालीं यांनीं तिकडील प्राच्यविद्यामंदिरांत संशोधनकार्य केलें. कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या विनंतीवरून तिबेटांतील फोटो घेण्यास हे गेले असतां यांनीं तिकडील धर्मकीर्ति, प्रज्ञाकरगुप्त, ज्ञानश्री, वगैरेंच्या सत्तर ग्रंथांतील दीड लक्ष श्लोक, चित्रें व कित्येक

हिंदी काव्यें येतांना बरोबर आणलीं. यांनीं आठ प्रवास-वर्णनें, आठ कादंबऱ्या, भोजपुरी भाषेंतील आठ नाटकें, सिलोनी भाषा, तिबेटी भाषेचें व्याकरण, वगैरे साठांहून अधिक पुस्तकें लिहिलीं आहेत.

१९४० सालीं ओरिसांतील किसानसभेच्या अध्यक्षपदासाठीं यांची निवड झाली होती, परंतु त्यापूर्वीच भारत संरक्षण कायद्याखालीं यांना अटक झाली. १९४८ सालीं हे मुंबईस भरलेल्या हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते.

**राळ**—झाडांतून गळणारा चीक वाळून घट्ट झालेला पदार्थ. राळ ज्यांवर होते अशीं झाडें बरींच आहेत. बंगाल, अबूचा पहाड व उत्तर हिंदुस्थान यांत हीं झाडें आहेत. राळ पाण्यांत विरघळत नाहीं, पण अल्कोहोल, ईथर, वगैरेंत थोडीबहुत विरघळते. कागद तयार करतांना, छापण्याची शाई करण्यासाठीं, व्हार्निशें तयार करण्यासाठीं, वगैरे अनेक कामांसाठीं राळेचा उपयोग होतो. राळ औषधीहि आहे. मलमासाठीं व वर लावण्यास हिचा उपयोग करतात. हाड दुखावलें किंवा सूज आली असल्यास राळ पाण्यांत कढवून तिचा लेप करतात. अतिसारावर राळ पोटांत देतात. कान फुटल्यास तिळाच्या तेलाबरोबर राळेचा रस कानांत घालतात.

**राळा**—एक हलकें धान्य. सांवा, कांग या प्रकारचें हें असतें व गरीब लोक यावर उदरनिर्वाह करतात. वरीप्रमाणेंच याचें झाड असतें, पण कणीस लहान असतें. राळ्याचा भात दुधाशीं चांगला लागतो. अतिसारावर राळ्याचें पीठ ताकाबरोबर देतात.

**राक्षस**—दैत्य, दानव, असुर यांप्रमाणेंच ही एक अनार्य जात असावी. वैदिक वाङ्मयांत रक्षस् असा शब्द असुरवाचक येतो. रामायणांत या राक्षसांचें पुष्कळ वर्णन असून त्यांचा राजा जो रावण त्याच्या कुटुंबाचें व राजधानीचेंहि वर्णन आहे. त्यावरून त्यांच्यांत सुधारलेले लोक होते असें दिसतें. असुर, दैत्य पाहा.

**रिकार्डो, डेव्हिड** (१७७२–१८२३)—एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ. तो या शास्त्रांत ॲडम स्मिथचा अनुयायी होता. त्याचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ आहे तो 'ट्रीटाइज ऑन पोलिटिकल एकॉनमी ॲंड टॅक्सेशन' (अर्थशास्त्र व करग्रहण यांवर प्रबंध) हा होय.

**रिंगणी**—हें एक कांटेरी झुडुप आहे. याला सुपारीएवढीं फळें येतात. पांढऱ्या फुलांची व काळसर (निळया) फुलांचीं असे दोन प्रकार रिंगणींत असतात. पांढऱ्या रिंगणीस 'लक्ष्मणा' म्हणतात. रिंगणी औषधी आहे. खोकल्यावर याचा काढा देतात. डोक्यास चाई लागते त्यास रिंगणीचा रस मधांत कालवून लावतात. रिंगणी कृमिघ्न आहे. दाढेंत, कानांत किडे झाल्यास फळांची धुरी देतात.

**रिगा**—बाल्टिक समुद्रांतील एक बंदर व लाटव्हियाची राजधानी. हें रिगा आखाताच्या मुखाशीं ड्विना नदीच्या दोहों अंगांस वसलें आहे. नदीच्या दोहों बाजूंस मोठमोठे धक्के आहेत. सेंट पीटरचें देवस्थान, विविध धंद्यांचें रिगा विद्यापीठ हीं प्रमुख ठिकाणें आहेत. ताग, इमारत-लांकूड, शेतीचा माल व दूधदुभतें यांचा निर्यात व्यापार चालतो. गेल्या महायुद्धांत हें जर्मनांच्या ताब्यांत होतें. लो. सं. सुमारें चार लाख आहे.

**रिचमंड**—अमेरिका, सं. संस्थानें, व्हर्जिनिया संस्थानची राजधानी. हे कारखान्यांचें मुख्य केंद्र असून जेम्स नदीकांठीं वसलेले आहे. येथें पुष्कळ सुंदर इमारती आहेत त्या म्हणजे स्टेट हाउस, युनिव्हर्सिटीची इमारत, वगैरे होत. येथें मुख्य कारखाने तमाखू, यंत्रें, लोखंड व पोलाद, लांकूड, चामड्याचे जिन्नस, कॉफी, वगैरेंचे आहेत. लो. सं. सुमारें दोन लाख आहे.

**रिचर, जीन पॉल फ्रीडरीश** (१७६३–१८२५)—एक जर्मन लेखक. याचे बरेच ग्रंथ व विनोदी काव्यें आहेत. सैतानाच्या कागदांतील उतारे; फुलें, फळें आणि कांटे; उत्सवांतील पाद्री, यांसारखीं त्याच्या पुस्तकांना नांवें असत. कार्लाइलचें 'वाइल्ड ओट्स' हें याच्या 'फ्रेजेल जहरे' या ग्रंथाचें भाषांतर आहे.

**रिचर्ड राजे—रिचर्ड १ ला** (११५७–११९९)—हा इंग्लंडचा राजा 'कोअर द लायन' (सिंहहृदयी) ह्या नांवानें प्रसिद्ध होता. गादीवर येण्यापूर्वी तो बापाशीं व भावांशीं भांडत असे. तो ११८९ सालीं राज्यावर आला. त्याची मुख्य प्रसिद्धि त्यानें धर्मयुद्धांत (क्रूसेड) भाग घेतल्यामुळें झाली. त्या युद्धांतून परत येत असतांना त्याला ऑस्ट्रियाच्या ड्यूकने कैद करून बादशहा ६ वा हेन्री याच्या ताब्यांत दिलें. नंतर इंग्रजांनीं मोठी खंडणी भरून त्याला सोडविलें.

**रिचर्ड २ रा** (१३६६–१३९९)—हा ३ रा एडवर्ड राजाचा नातू व एडवर्ड 'ब्लॅक प्रिन्स' याचा मुलगा. १३८९ सालीं तो राज्यकारभार करूं लागला, पण १३९९ पर्यंत त्याचा राज्यकारभार इतका अप्रिय झाला कीं, पार्लमेंटनें त्याला पदच्युत करून त्याचा मुलगा ४ था हेन्री याला राज्यपद दिलें, व रिचर्डला कैदेंत ठेवलें; पण तेथें त्याचा खून करण्यांत आला.

**रिचर्ड ३ रा** (१४५२–१४८५)—इंग्लंडांतील प्लँटाजेनेट राजघराण्यांतला शेवटचा राजा. त्यानें आपला पुतण्या ५ वा एडवर्ड राजा, व त्याचा भाऊ यांचा खून करून राज्य मिळविलें. पण १४८५ सालीं लँकेस्टर घराण्याच्या हेन्रीशीं झालेल्या युद्धांत तो मारला गेला.

**रिचर्डसन, सॅम्युएल** ( १६८९–१७६१ )—एक इंग्रज कादंबरीकार. त्यानें प्रथम दुसऱ्या छापखान्यांत कंपॉझिटर व प्रूफ-करेक्टर ह्या नोकऱ्या केल्यावर १७१९ सालीं स्वतःचा छापखाना सुरू केला. त्यानें कॉमन्स सभागृहाची जर्नल्स, डेली जर्नल, डेली गॅझेटियर, इत्यादि ग्रंथांचीं छपाईचीं कामें करून फार पैसा मिळवला; व १७६० सालीं राजाचा 'लॉ प्रिंटर' झाला. त्यानें ५० व्या वर्षी कादंबरीलेखन सुरू करून पुढील कांहीं कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या : 'पॅमेला, ऑर व्हर्च्यू रिवॉर्डेड' ( सद्गुणाचें फल ), 'क्लेरिसा ऑर दि हिस्टरी ऑफ ए यंग लेडी' ( एका तरुणीचा इतिहास ) आणि 'दि हिस्टरी ऑफ सर चार्लस ग्रँडीसन'. त्याच्या पॅमेला या कादंबरीची सर्व युरोपभर प्रसिद्धि झाली, आणि अनेक युरोपीय देशांतील कादंबरीवाङ्मयावर फार परिणाम झाला. लेसिंग, शिलर, रूसो, व्होल्टेयर, बाल्झॅक, वगैरे अनेक युरोपीय थोर ग्रंथकारांवर रिचर्डसनच्या वाङ्मयाची छाप पडलेली दिसते.

**रिझर्व बँक ( ऑफ इंडिया )**—रक्षित पेढी. ही हिंदुस्थानची सरकारी देखरेखीखालीं असलेली बँक इ. स. १९३४ च्या कायद्यान्वयें स्थापन झाली व तिनें ता. १–४–१९३५ पासून कामास सुरुवात केली. पहिल्याप्रथम चलनाचा ताबा घेतला व कारभाराला सुरुवात केली. या बँकेचें भांडवल पांच कोटी रुपये असून तें सर्व जनतेनेंच भरलेलें आहे. फक्त दोन लाख वीस हजार रुपयांचे भाग हिंदुस्थान सरकारला जे लोक बँकेचे ( डायरेक्टर ) संचालक होतील त्यांना संचालक होण्यास लागतील तेवढे भाग ( शेअर्स ) देण्याकरितां दिले आहेत. या बँकेचा कायम निधि पहिल्यापासूनच पांच कोटी रुपये इतका आहे. हिंदुस्थान सरकारनें आपल्याजवळच्या तेवढ्या किंमतीच्या प्रॉमिसरी नोटा ( कर्जरोखे ) होत्या त्या या बँकेस देऊन हा निधि तयार केला. सोयीसाठीं हिंदुस्थान देशांचे ( १ ) मुंबई, ( २ ) कलकत्ता, ( ३ ) मद्रास, ( ४ ) रंगून व ( ५ ) दिल्ली असे पांच विभाग पाडले आहेत.

या बँकेचे मुख्य अधिकारी म्हणजे एक गव्हर्नर व दोन दुय्यम गव्हर्नर होत. या सर्वांची नेमणूक हिंदुस्थान सरकार बँकेच्या मध्यवर्ती संचालक मंडळाचा सल्ला घेऊन करतें. रोजच्या व्यवहाराची सर्व सत्ता यांच्याच हातांत असते. मध्यवर्ती सल्लागार संचालक मंडळ हें बँकेचें मुख्य कार्यकारी मंडळ होय. या मंडळावर सरकारनियुक्त असे चार-पांच डायरेक्टर आहेत. बाकीचे त्या त्या स्थानिक मंडळानें निवडलेले असतात. वर जे जे विभाग पाडलेले आहेत त्या त्या शाखेकरितां एक स्वतंत्र मंडळ आहे व त्यावरहि कांहीं नेमणुका सरकार करीत असतें.

बँकेला जो नफा होईल त्या प्रमाणांत भाग-पत्रावर व्याज किती द्यावयाचें हें नियमानें ठरविलेलें आहे. कमींत कमी साडेतीन टक्के नफ्याची जिम्मेदारी हिंदुस्थान सरकारनें घेतली आहे. जास्तींत जास्त नफा दर शेंकडा पांच टक्क्यांप्रमाणें सरकारच्या परवानगीनें देतां येईल. व्याज देऊन उरलेला सर्व फायदा हिंदुस्थान सरकारला द्यावा लागतो.

हिंदुस्थानची मध्यवर्ती बँक म्हणून या बँकेला मुख्यतः पुढील चार प्रकारचें कार्य करावें लागतें : ( १ ) देशांतील चलनाची व्यवस्था. ( २ ) देशांतील एकंदर बँकांची बँक होऊन राहणें. ( ३ ) सरकारी बँक म्हणून काम करणें. ( ४ ) परराष्ट्रीय हुंडणावळीच्या दरास स्थिरता आणणें. यांशिवाय आणखी कित्येक कामें बँक करते. १ एप्रिल १९३५ रोजीं चलनाचें काम बँकेनें स्वतःकडे घेतलें व आपल्या नांवाच्या नोटा १९३८ च्या सुरुवातीस काढल्या. व्यापारी गरजा पुरविल्या जाऊन चलन व पत यांस स्थिरता आणण्यासाठीं देशांतील चलन कमी-जास्त करण्यांत येतें. रिझर्व बँकेला तिनें काढलेल्या एकंदर नोटांच्या शेंकडा ४० टक्के मालमत्ता रुपये ( चांदीचे ), सोनें व स्टार्लिंग कर्जरोखे या रूपांत ठेवावी लागते. परंतु तिजवळील सोन्याची रक्कम चाळीस कोटी रुपयांपेक्षां केव्हांहि कमी होतां कामा नये असा निर्बंध आहे. या शाखेची बाकीची सर्व मालमत्ता सरकारी कर्जरोख्यांतच गुंतविलेली असते.

दर गुरुवारीं बँक आपला व्याजाचा दर प्रसिद्ध करीत असते व या दरानें रिझर्व्ह बँक इतर बँकांकरितां त्यांच्याजवळ असलेलीं बिलें पटवितें किंवा कांहीं विशिष्ट तारणांवर कर्ज देते. यास बँक-रेट असें संबोधण्यांत येतें. या दरांत एकंदर परिस्थितीप्रमाणें फेरबदल करून चलनाचें नियंत्रण करतां येतें. बँक-रेट कमी केल्यास इतर बँका रिझर्व्ह बँकेकडून आपल्याजवळील बिलें जास्त प्रमाणांत व बँक-रेट वाढविल्यास कमी प्रमाणांत आपलीं बिलें वटवून घेतात. चलनाची जरूरी असल्यास रिझर्व्ह बँक खुल्या बाजारांत सरकारी कर्जरोखे विकत घेते व त्या प्रमाणांत एकंदर चलन वाढतें. चलन जास्त असलें तर बँक कर्जरोखे विकते व तेवढा पैसा बाजारांतून खेचून घेते.

शेड्यूल्ड बँका—रिझर्व्ह बँक स्थापन झाली तेव्हां हिंदुस्थानांतील कांहीं विशिष्ट बँकांची एक यादी तयार करण्यांत येऊन त्यांस 'शेड्यूल्ड बँका' ( नोंद पेढ्या ) म्हणून दर्शविण्यांत येऊं लागलें व रिझर्व्ह बँकेचें बँकांची बँक म्हणून जें कांहीं कार्य आहे तें विशेषेंकरून या बँकांसंबंधींच आहे. यादीव्यतिरिक्त असलेल्या बँकांचा साहजिकच एक दुसरा गट ( नॉन–शेड्यूल्ड ) तयार झाला. या यादींतील प्रत्येक बँकेला तिच्या मुदती मागणीच्या जबाबदारीच्या शेंकडा दोन टक्के व दर्शनी मागणीच्या जबाबदारीच्या शेंकडा पांच

टक्के इतकी रक्कम ठेव म्हणून रिझर्व्ह बँकेकडे कायम ठेवावी लागते व या ठेवीवर तिला व्याज मिळत नाहीं. निरनिराळ्या बँकांकडून ठेवी स्वीकारणें, वेळ पडल्यास त्या बँकांना तारणावर कर्ज देणें, त्यांचीं बिलें वटविणें, हीं कामें रिझर्व्ह बँकेला करावीं लागतात. ( १ ) सहजगत्या विकल्या जाणाऱ्या ट्रस्टी सेक्युरिटीज्, ( २ ) त्या बँकेचें स्वतःचें मालकीचें सोनें किंवा चांदी, व ( ३ ) मुदती हुंड्या ( ज्यांची मुदत ९० दिवसांपेक्षां जास्त नाहीं अशा ), या तीन प्रकारच्या तारणांवर कर्ज देण्याचा अधिकार बँकेला आहे. प्रत्येक शेड्यूल्ड बँकेचें मुख्य खातें रिझर्व्ह बँकेच्या ज्या शाखेंत असेल त्या ठिकाणीं शेड्यूल्ड बँकेच्या इतर शाखांना आठवड्यांतून एकदां फुकट पैसे पाठवितां येतात. ज्या बँकांच्या भांडवलाची व कायम निधीची बाजारांतील किंमत पांच लाख रुपयांच्या वर असेल त्यांचेंच अर्ज या शेड्यूल्ड यादींत दाखल करून घेण्याकरितां विचारांत घेतले जातात. कंपनीनिर्बंधाच्या सुधारणा कायद्यानें सर्व बँकांवर त्या जॉइंट स्टॉक कंपनीच्या नोंदणी अधिकाऱ्याकडे पाठवीत असलेल्या पत्रकाची एक प्रत रिझर्व्ह बँकेकडेहि पाठविण्याची सक्ती करण्यांत आली आहे. याशिवाय या नॉन-शेड्यूल्ड बँकांना वेळोवेळीं सल्ला देण्याचें काम रिझर्व्ह बँक करूं लागली आहे.

ज्याप्रमाणें रिझर्व्ह बँक ही बँकांची बँक होय, त्याचप्रमाणें ती सरकारचीहि बँक होय. सरकारचीं सर्व प्रकारचीं खातीं ठेवणें, त्यांच्या वतीनें पैसे घेणें व देणें व त्यांचे पेढीचे इतर सर्व व्यवहार करणें हीं रिझर्व्ह बँकेचीं सरकारी बँक म्हणून मुख्य कामें होत. या कामांबद्दल सरकारचे जे पैसे बँकेकडे असतात ते तिला बिनव्याजी वापरतां येतात. सरकारचें जें एकंदर कर्ज आहे त्याचीहि व्यवस्था ठेवणें हें रिझर्व्ह बँकेचें काम आहे. त्याविषयींचे दाखले ठेवणें, वेळच्या वेळीं व्याज भागविणें, नवीन रोखे काढणें, वगैरे कामाबद्दल तिला वेतन म्हणून दर कोटी कर्जाच्या रकमेवर वार्षिक दोन हजार रुपये मिळतात. हिंदुस्थान व लंडन यांमधील पैशाच्या देव-घेवीची व्यवस्था करून लंडनमध्यें सरकारला लागतील त्या वेळेला पैसे पुरे पाडणें हें तिचें कर्तव्य आहे. जेव्हां सरकार नवीन कर्ज काढते त्या वेळेसहि त्याची व्यवस्था रिझर्व्ह बँकेलाच पाहावी लागते. सरकारला जेव्हां थोड्या दिवसांकरितां कर्ज पाहिजे असेल तेव्हां रिझर्व्ह बँक सरकारच्या वतीनें ट्रेझरी बिलांच्या रूपानें कर्ज काढते. या बिलांची मुदत बहुतेक तीन महिन्यांची असते. लंडनमधील सरकारी देणीं पुरीं पाडण्याकरितां रिझर्व्ह बँक ट्रेझरी बिलांच्या धर्तीवर पौंडाची खरेदी इतर बँकांकडून करीत असते. प्रांतिक स्वायत्तता स्थापन झाल्यापासून प्रांतिक सरकारशीं करार करून त्यांचीं कामेंहि बँक पाहूं लागली आहे. प्रांतिक सरकारला जरूर पडेल तेव्हां त्यांच्या वतीनें ट्रेझरी बिलें काढणें किंवा थोड्या दिवसांकरितां त्यांना कर्ज देणें, त्याचप्रमाणें प्रांतांच्या वतीनें कर्जें काढणें हीं कामें रिझर्व्ह बँक करते. याशिवाय निरनिराळ्या सरकारांचे सल्लागार म्हणून बँक काम करते.

रिझर्व्ह बँकेचें शेवटचें महत्त्वाचें कार्य म्हणजे हिंदी हुंडणावळीच्या दरास स्थिरता आणणें व एकंदर देशाच्या हिताच्या दृष्टीनें त्यांची व्यवस्था करणें हें होय. हें काम करण्यास सोपें जावें म्हणून पौंडाची खरेदी व विक्री अमुक एका भावानें बँकेनें केली पाहिजे असें तिजवर बंधन टाकण्यांत आलें आहे.

ही बँक इतर जीं कामें करते तीं खालीलप्रमाणें होत : ( १ ) नाण्यांचा पुरवठा पाडणें. ( २ ) नोटांच्याबद्दल नाणें देणें. ( ३ ) एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पैसे पाठविण्यास सवलत देणें. ( ४ ) निरनिराळ्या ठिकाणीं क्लीअरिंग हाउसची व्यवस्था पाहणें. व ( ५ ) इतर बँकांना सल्ला देण्याचें काम करणें. निरनिराळ्या बँकांची माहिती संकलित करून ती नेहमीं प्रसिद्ध करणें, हेंहि एक महत्त्वाचें काम आहे. बँकेच्या प्रसिद्धि खात्याकडून निरनिराळीं पत्रकें प्रसिद्ध केलीं जातात.

ॲग्रिकल्चरल क्रेडिट शाखा ( कृषिविषयक पतपेढ्या )—इतर देशांतील मध्यवर्ती बँकांची तुलना करतां ॲग्रिकल्चरल क्रेडिट डिपार्टमेंट हें रिझर्व्ह बँकेचें विशेष अंग होय. शेतकी व रिझर्व्ह बँक यांतील ॲग्रिकल्चरल क्रेडिट डिपार्टमेंट हा दुवा आहे. शेतकऱ्यांच्या आर्थिक गरजांचा अभ्यास करून सरकारला त्याप्रमाणें सल्ला देणें हें या शाखेंतील लोकांचें मुख्य काम होय. शिवाय प्रांतिक सहकारी बँका, इतर सहकारी बँका कीं, ज्यांचा संबंध शेतकऱ्यांशीं येतो, अशा बँकांत एक प्रकारचा संघटितपणा निर्माण करणें हेंहि त्याचें काम होय. या लोकांचें जें कार्य होतें तें पत्रकांच्या रूपानें वेळोवेळीं प्रसिद्ध होत असतें. या खात्याचें शेतकीविषयक जरी मुख्य कार्य असलें तरी त्यांत इतरहि कामें होत असतात. [ चिं. वि. जोगकृत ‘बँका व त्यांचे कारभार’ ]. पेढ्या पाहा.

**रिठा**—[ सॅपिंडस सॅपिनारिआ ]. एक झाड. कोंकणांत यास रिंगी म्हणतात. हें आंब्याएवढें वाढतें व सर्वत्र होतें. रिठ्याच्या फळांचा साबणासारखा उपयोग होतो. सोनार लोक याचा उपयोग दागिने स्वच्छ करण्यासाठीं करतात. यानें रेशमी कपडे चांगले निघतात. रिठ्याच्या रसांत पारा घोटल्यास त्याची गोळी बनते व भांड्यावर पाऱ्याचा मुलामा देतां येतो. याचें पाणी विषावर उतारा म्हणून देतात. बिया बजरबट्टूप्रमाणें माळेंत ओंवून गळ्यांत घालतात.

**रिपन, लॉर्ड** ( १८२७–१९०९ )—एक ब्रिटिश मुत्सद्दी व हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल. याचें संबंध नांव जॉर्ज

फ्रेडरिक सॅम्युएल रॉबिनसन होतें. हा १८८० मध्यें लॉर्ड लिटननंतर हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होण्यापूर्वी युद्धमंत्री व हिंदुस्थानचा स्टेट सेक्रेटरी होता. ग्लॅडस्टन मुख्य प्रधान झाला तेव्हां त्यानें याला हिंदुस्थानांत पाठविलें. तावडतोब यानें अफगाणयुद्ध बंद करून अब्दुल रहमान याला अफगाणचा अमीर म्हणून मान्यता दिली. मुद्रणस्वातंत्र्य लिटननें काढून घेतलें होतें तें यानें परत दिलें. स्थानिक-स्वराज्य-संस्था स्थापन करण्याविषयीं कायदा करून घेतला व हिंदी लोकांना राज्यकारभाराचें प्रत्यक्ष शिक्षण देण्याचा पायंडा घातला. शिक्षणक्षेत्रांतहि त्यानें सुधारणा घडवून आणल्या. म्हैसूरचें राज्य पन्नास वर्षे ब्रिटिश पाहत होतें तें म्हैसूरच्या राजाला परत केलें. सयाजीराव गायकवाडांना राज्याधिकार दिले. युरोपियनांना न्यायालयांत गोऱ्या जातीचे म्हणून कांहीं हक्क होते ते यानें काढून घेतल्यामुळें रिपनच्याविरुद्ध त्यांनीं मोठा गवगवा केला. पण एकंदरींत त्याचा कारभार हिंदी लोकांना फार सुखाचा होता म्हणून चांगल्या गव्हर्नरांमध्यें त्याची गणना होते. चारच वर्षें तो हिंदुस्थानांत होता. पुढें त्याला मोठमोठ्या हुद्यांच्या जागांवर शेवटपर्यंत ब्रिटिश सरकारनें ठेविलें होतें.

**रिबेनट्रॉप, जोचिम फॉन** (१८९९–१९४६)—एक जर्मन परराष्ट्रमंत्री. यानें १९१४–१९१८ च्या महायुद्धांत लष्करी नोकरी केली. नंतर तो दारू-विक्रीचा एजंट झाला व त्यामुळें कोलोन येथील हेनकेल नामक शांपेन फर्मच्या मालकाशीं त्याचा परिचय होऊन त्या मालकाच्या मुलीशीं त्याचा विवाह झाला. १९३२ सालीं तो नाझी पक्षांत सामील झाला व पुढें त्या पक्षांत बढती मिळून तो हिटलरचा परराष्ट्र वकील बनला आणि त्यानें बॅरन न्यूरॉथच्या परराष्ट्र खात्याला प्रतिस्पर्धी असें स्वतंत्र परराष्ट्र खातें चालू केलें. हिटलर अधिकारपदावर आल्यावर त्यानें रिबेनट्रॉपला परराष्ट्रमंत्री नेमलें. तेव्हांपासून जर्मनीचें धाडसी अतिक्रमणात्मक धोरण चालू झालें. नंतर त्याला लंडन येथें जर्मन वकील नेमण्यांत आलें व तेथें त्यानें ब्रिटिश दरबारांत नाझी सलाम-पद्धति व इतर अनेक प्रकारचा नाझी पक्षाचा सामाजिक वर्तनक्रम आचरणांत आणून स्वतःकडे ब्रिटिशांचें विशेष लक्ष वेधून घेतलें. १९३७ सालीं हिटलरनें त्याला जर्मनींत परत बोलावलें व न्यूरॉथऐवजीं परराष्ट्रमंत्री नेमलें व

तेव्हांपासून हिटलरचें जर्मन-राज्यविस्ताराचें धोरण चालू झालें. रिबेनट्रॉप ब्रिटनचा विशेष द्वेष करीत असे आणि ब्रिटन महायुद्धांत सामील होणार नाहीं, अशी त्यानें हिटलरला खात्री दिली. त्यानेंच १९३७ सालीं जर्मन–सोव्हिएट पॅक्टवर जर्मनीतर्फे सही केली होती. दुसऱ्या महायुद्धांत रिबेनट्रॉपची कामगिरी विशेष झाली व त्याचें कर्तृत्व दिसून आलें. तथापि जर्मनीचा पराभव झाल्यानंतर दोस्त राष्ट्रांच्या न्यायालयानें ज्या बारा नाझी पुढाऱ्यांना फांशीची शिक्षा दिली, त्यांत रिबेनट्रॉप होता.

**रियुनियन बेट**—हिंदी महासागरांत मादागास्करपासून ४२० मैलांवर हें बेट आहे. हें जुनें बोरबोन बेट होय. १६ व्या शतकाच्या प्रारंभीं पोर्तुगीजांनीं याचा शोध लावला. १६४९ मध्यें फ्रान्सनें तें स्वतःच्या ताब्यांत घेतलें. १८१०–१४ च्या दरम्यान इंग्रजांनीं तेथें आपला अमल बसविला. नंतर आतां तें पुन्हां फ्रेंचांचें झालें आहे. या बेटांत साखर तयार होते. डेनिस हें मुख्य ठिकाण आहे. याचें क्षेत्रफळ ९६५ चौरस मैल व लो. सं. १,७५,००० आहे. मॉरिशस बेट याच्या नैर्ऋत्येस सुमारें ९० मैलांवर आहे पण तें ब्रिटिश आहे.

**रिव्हॉल्व्हर**—हें एक प्रकारचें पिस्तूल असून त्यामध्यें चक्राकार फिरणारीं सहा घरें असतात व या प्रत्येक घरांत एक काडतूस ठेवलेलें असून तें नुसता घोडा दाबल्यानें उडवितां येतें. अशा तऱ्हेचीं पिस्तुलें १७ व्या शतकांतहि उपयोगांत असत. परंतु १८५१ मध्यें कोल्ट यानें आपलें पिस्तूल बनविल्यापासून हें विशेष उपयोगांत येऊं लागलें व याचा उपयोगहि अचूक परिणामकारक असा होऊं लागला.

**रिशेल्यु, कार्डिनल** (१५८५–१६४२)—एक फ्रेंच मुत्सद्दी. १६१४ त पॅरिसमध्यें येण्यापूर्वी हा एक बिशप होता. पॅरिसला त्यानें राजमातेजवळ वशिला बांधून मोठमोठ्या हुद्यांच्या जागा पटकावल्या. १६१६ त तो परदेशमंत्री आणि युद्धमंत्री होता. आठ वर्षांनीं तर सर्व राज्याचा कारभारी बनला. त्यानें राजसत्ता पुष्कळ बळकट केली व त्यासाठीं सूक्ष्मासूक्ष्म सर्व गोष्टी केल्या. ऑस्ट्रिया आणि स्पेन यांची सत्ता कमी करण्याचे प्रयत्न केले व पोर्तुगॉलला स्पेनपासून वेगळा केला. रिशेल्यूनें कांहीं ग्रंथहि लिहिले आहेत. फ्रेंच बादशाहा तेरावा लुई त्याच्या अंकित असल्यामुळें त्याला मनाप्रमाणें सारें करतां आलें हें निर्विवाद होय.

**रिस्ले, सर हर्बर्ट होप** (१८५१–१९११)—एक इंग्रज मानववंशशास्त्रज्ञ. १८७३ पासून तो हिंदुस्थानांत नोकरीस होता. रिस्लेनें हिंदुस्थानांतील मानववंशांचा व जातींचा सूक्ष्म अभ्यास करून पुस्तकें लिहिलीं. १९०१ ची हिंदुस्थानची

खानेसुमारी त्याच्या नेतृत्वाखालीं झाली. त्यामुळें ते अहवाल सामाजिक अभ्यासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे आहेत.

**रीएन्झी, कोला दि** (१३१३–१३५४)—एक रोमन पुढारी. हा लोकांचा ट्रायब्यून १३४७मध्यें झाला व त्याला सर्वाधिकार देण्यांत आले. त्यानें अनेक सरदारांना कुटुंबासह हद्दपार केलें आणि रोमचा गव्हर्नर कोलोना यालाहि रोम शहर सोडून जाण्यास भाग पाडलें. तो उत्तरोत्तर फार महत्त्वाकांक्षी व बेगुमान बनला; पण १३४८ सालीं त्याच्यावरील लोकांचा विश्वास उडाल्यामुळें तो रोम शहर सोडून गेला. तथापि १३५० सालीं तो गुप्तपणें रोम शहरांत परत आला. पण लवकरच तें उघडकीस येऊन त्याला क्लेमंट पोपनें कैदेंत टाकलें. ३ वर्षांनंतर ६ वा इनोसंट पोप यानें त्याची सुटका केली आणि तो रोम येथें पुन्हां राज्यकारभार पाहूं लागला. तथापि थोड्याच महिन्यांनंतर विरोधी पक्षानें बंडाळी करून त्याला ठार मारलें.

**रीड, चार्लस** (१८१४–१८८४)—एक इंग्रज कादंबरीकार. प्रथम त्यानें नाटकें लिहिण्यास सुरुवात केली व त्याचें 'मास्क्स ॲन्ड फेसेस' (मुखवटे) हें सुखान्त नाटक फार लोकप्रिय झालें. त्यानें कादंबऱ्या लिहिल्या त्या : 'ख्रिस्ती जॉनस्टोन'; 'इट इज नेव्हर टू लेट टु मेन्ड' (सुधारण्याला कधीं उशीर होत नसतो); 'दि क्लॉइस्टर ॲन्ड दि हार्थ'; 'दि कोर्स ऑफ ट्रू लव्ह नेव्हर डिड् रन् स्मूथ' (खऱ्या प्रेमाचा मार्ग निर्धोक कधीं नव्हता); 'लव्ह मी लिट्ल लव्ह मी लॉंग' (मजवर थोडेंच प्रेम असूं दे पण तें दीर्घकाल राहूं दे); 'व्हाइट लाइज'; 'हार्ड कॅश'; 'ग्रिफिथ गॉन्ट'; 'फाउल प्ले'; 'पुट युअर सेल्फ इन् हिज् प्लेस' (आपण त्याच्या जागीं आहों असें समजा); आणि 'ए टेरिबल टेम्पटेशन्' (भयंकर मोह).

**रीड, थॉमस** (१७१०–१७८६)—एक स्कॉटिश तत्त्वज्ञानी. हा ॲबर्डीन व ग्लासगो येथें तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक होता. व्यवहारज्ञान हाच तत्त्वज्ञानाचा पाया होय व बाह्य वस्तूंचें ज्ञान तात्कालिक असतें असे याचें मत होतें. यानें आत्मनिरीक्षणाच्या तत्त्वावर भर दिला होता व तें पुढें सर्वांना पटलेंहि. यानें तत्त्वज्ञानावर तीन ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले.

**रीडिंग**—इंग्लंड, बर्कशायरमधील एक शहर. हें शेतकीचें मोठें केंद्र आहे. जगप्रसिद्ध बिस्किटांचा कारखाना व मोठे यांत्रिक कारखाने येथें आहेत. १९२५ सालीं तेथें विद्यापीठ स्थापन झालें. १८६० पासुन एक कॉलेज आहेच. लो. सं. सुमारें एक लाख.

**रीडिंग, रूफस डॅनियल आयझॅक, लॉर्ड** (१८६०–१९३५)—एक ब्रिटिश मुत्सद्दी. तो १९१० सालीं सॉलिसिटर–जनरल झाला आणि १९१० ते १९१३ पर्यंत ॲटर्नी–जनरल होता. १९१३ ते १९२१ पर्यंत तो इंग्लंडचा मुख्य न्यायाधीश, १९२१ ते १९२६ पर्यंत हिंदुस्थानचा व्हाइसरॉय आणि गव्हर्नर-जनरल, १९२६–३४ पर्यंत डील कॅसलचा कॅप्टन व नंतर मरेपर्यंत सँकपोर्ट्सचा वार्डन व ॲडमिरल होता. हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल असतांना याला हिंदुस्थानांतील म. गांधींनीं सुरू केलेल्या असहकारितेच्या चळवळीला तोंड द्यावें लागलें होतें. या काळीं राजकीय जागृति फार झाली असून कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं विधिमंडळांतून अडचणींचें धोरण स्वीकारलें होतें.

**रीमन, जॉर्ज फ्रीडरिश बर्नहार्ड** (१८२६–१८६६)—एक जर्मन गणितशास्त्रज्ञ. त्यानें फलसिद्धांत (थिअरी ऑफ फंक्शन्स), विशेषतः बीजगणितीय फलें व युक्लिडीयेतर भूमिति यांसंबंधीं शोध लाविले.

**रीशटॅग**—सर्व जर्मन संयुक्त राष्ट्राची ही मुख्य प्रतिनिधि-सभा होती. प्रत्येक जर्मन संस्थानाच्या लोकसभेस बुंडेस्ट्राट असें म्हणत. सर्व जर्मनीला लागू होणाऱ्या प्रत्येक कायद्यास या लोकसभेंत बहुमतानें मान्यता मिळावी लागत असे. या सभेचा अध्यक्ष प्रतिनिधींकडून निवडला जात असे. १९३३ सालापासून हिटलर यानें या सभेवर पूर्ण कबजा मिळविला होता.

**रुई**—मांदार. या झाडाचीं पानें वडाच्या पानांप्रमाणें जाड व मोठीं असतात. लांकूड हवनीय द्रव्यांपैकीं एक आहे. यास फुलें व फळें येतात. फळें वाळलीं म्हणजे आंतून कापूस निघतो. पूर्वीं कागद फारसा प्रचारांत नव्हता तेव्हां मोडी अक्षरें वळविण्यास रुईचीं पानें घेत असत. वायूनें अंग ठणकत असल्यास पानांचा शेक देतात. साधारण दुखापत झाल्यास रुईचा चीक वर लावतात. सर्व विषांवर मुळी उगाळून लावतात. अनेक रोगांवर रुई उपयुक्त आहे.

**रुक्मिणी**—कृष्णाची पट्टराणी. ही विदर्भाधिपति भीष्मक याची मुलगी असून तिच्या भावानें तिला शिशुपालाला देण्याचें ठरविलें, तेव्हां रुक्मिणीनें गुप्तपणें पत्र पाठवून लग्नाच्या वेळीं कृष्णाला बोलावून घेतलें, व कृष्णानें तिचें हरण करून तिच्याशीं लग्न लाविलें. ही रुक्मिणीस्वयंवराची कथा सर्व भाषांतून विविध प्रकारांनीं लिहिली गेली आहे व तिला एक धार्मिक महत्त्व प्राप्त झालें आहे. रुक्मिणीला प्रद्युम्नादि दहा मुलें झालीं. कृष्णनिर्वाणानंतर ती सती गेली.

**रुग्णवाहक**—(ॲम्ब्युलन्स). रणांगणावर युद्ध चालू असतांना जखमी व आजारी लोकांस शस्त्रोपचार आणि औषधोपचार यांची प्राथमिक मदत देण्याकरितां एक वैद्यकीय पथक सैन्यास जोडलेलें असतें. नेपोलियनच्या सैन्यांत अशी व्यवस्था असे. अशा तऱ्हेचीं पथकें ब्रिटिश सैन्यांत प्रथम १९०५ व

१९०६ सालीं स्थापन करण्यांत आली. या पथकाचें मुख्य व महत्त्वाचें काम म्हणजे युद्ध करीत असलेल्या सैन्यांतील जखमी झालेल्या लोकांस काढून घेऊन त्यांस मागील बाजूस असलेल्या तळावरील जखमी लोकांच्या ठाण्याकडे नेणें हें होय. प्रत्येक सैन्याच्या विभागास अशीं तीन पथकें जोडलेलीं असून प्रत्येक ब्रिगेडबरोबर एक पथक असतें. त्यांतील अधिकाऱ्यांचे मुख्य डोलीवाले व उपचार करणारे ( दाया वगैरे ) असे दोन विभाग असतात व त्यांच्याजवळ घोडे, खेचरें, मोटारी, वगैरे वाहनें असतात.

रुग्णशुश्रूषा करणाऱ्या कांहीं संस्थाहि रोग्यास औषधोपचार करण्याचें व दवाखान्यांत पोंचविण्याचें कार्य करतात. यांचींहि पथकें असून यांच्याजवळ मोटार वगैरे वाहनें असतात आणि कांहीं परिचारिकाहि असतात. पद्धतशीर रीतीनें रुग्णवाहकाच्या द्वारें उपचार व्हावेत म्हणून सेंट जॉन अँब्युलन्स असोसिएशन १८७७ सालीं इंग्लंडमध्यें निघाली. तिच्या शाखा हिंदुस्थान व इतर वसाहती यांतून आहेत.

**रुग्बी**—इंग्लंड, वारविकशायरमधील एक बाजाराचें गांव. मुलांच्या शाळेबद्दल हें सुप्रसिद्ध आहे. विद्युत्स्थापत्य व सीमेंट यांचे कारखाने येथें आहेत. रुग्बी विद्यालय १५६७ पासून चाललें असलें तरी डॉ. अर्नोल्ड हा त्याचा प्रमुख झाल्यापासून ( १८२८ ) त्याला महत्त्व चढलें. उत्कृष्ट इंग्लिश पब्लिक स्कूल-मध्यें त्याची आज गणना आहे. लो. सं. सुमारें २५,०००.

**रुटाइल**—तांबड्या रंगाचें एक काठिण खनिज. यांत प्रामुख्यानें तितन द्विप्राणिद (टिटॅनियम डाय-ऑक्साइड) असतें. तितन ( टिटॅनियम ) ह्यांतूनच काढतात.

**रुडोल्फ सरोवर**— पूर्व-मध्य आफ्रिका, एक खाऱ्या पाण्याचें सरोवर. क्षे. फ. ३९७० चौ. मैल. जवळच एक ज्वालामुखी पर्वत आहे.

**रुथेन**—( रुथेनिअम ). प्लॅटिनम वर्गातील पांढऱ्या रंगाचा एक काठिण धातु. परमाणुभारांक १०१·७. विशिष्टगुरुत्व १२·३. प्लॅटिनम धातूबरोबरच हा सांपडतो. हा सहज वितळवितां येत नाहीं. या धातूचीं बरींच प्राणिदें आहेत.

**रुथेनिया**—रुथेनीज लोकांचा देश. हा झेकोस्लोव्हाकियाचा एक प्रांत आहे. पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, वगैरे भागांतील युक्रेनियन लोकांना रुथेनीज म्हणतात. पहिल्या महायुद्धापूर्वी हे लोक रशियन व ऑस्ट्रो-हंगेरियन वर्चस्वाखालीं होते. नंतर स्लोव्हाकियांत त्यांना स्वायत्त राज्य मिळालें. पण १९४५ सालीं याचा ताबा पुन्हां रशियाकडे गेला. रुथेनीज लोकांची संख्या सुमारें चाळीस लक्ष आहे.

**रुद्र**—एक वैदिक आणि पौराणिक देवता. ही क्रूर, संहारक देवता असली तरी भक्तांचें कल्याण करते असें वेदांत वर्णन आहे. ऋग्वेदांत यावर तीन सूक्तें आहेत. तेथें हा बलाढ्य संहारक देव म्हणून दाखविला आहे. पुढें अग्नीलाहि रुद्रच म्हटलें आहे. रुद्र हा कैलासाच्या पलीकडे मुंजवान् पर्वतावर राहत असे. यजुर्वेदांत रुद्राला महादेव म्हटल्यामुळें पुढें रुद्र शिवस्वरूप बनला. कश्यपाला सुरभीपासून अकरा मुलगे झाले ते एकादश रुद्र ( पाहा ) होत. तैत्तिरीय संहितेंतील रुद्राध्याय जपतात व त्याचीं आवर्तनें ( लघुरुद्र, महारुद्र, इ. ) करतात. शंकराला रुद्राभिषेक करण्याची वहिवाट आहे.

**रुद्रट**—एक संस्कृत साहित्यशास्त्रज्ञ. याचा 'काव्यालंकार' ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. 'शृंगारातिलक' हा ग्रंथहि रुद्रटाचा असावा, असें कांहीं पंडितांचें मत आहे. रुद्रट आठव्या-नवव्या शतकांत होऊन गेला असावा.

**रुद्रदामा क्षत्रप** ( राज्य. १४३–१५८ )—क्षत्रपांतील एक महापराक्रमी राजा. याच्या बापाचें नांव जयदामा होतें. आकारवंती ( सर्व माळवा ), आनर्त ( उत्तर काठेवाड ), सुराष्ट्र ( दक्षिण काठेवाड ), अनूप, श्वभ्र ( उत्तर गुजराथ ), कच्छ, सिंधु सौवीर, अपरांत, निषाद, मरु ( मारवाड ), इत्यादि देशांचा हा राजा होता. गिरनारजवळील अशोकाच्या शिलालेखांजवळ याचाहि एक शिलालेख आहे. त्यावरून युद्धाखेरीज मनुष्यवध करावयाचा नाहीं अशी यानें प्रतिज्ञा केली होती असें दिसतें. यानें प्रजेचें पुत्रवत् पालन केलें. याच्या राज्यांत चोरांपासून भय नव्हतें. हिंदु धर्मावर याची श्रद्धा होती. संगीत, व्याकरण, तर्कशास्त्र, इत्यादि शास्त्रें यास अवगत होतीं. शिवाय एक शूर योद्धा म्हणूनहि याची ख्याति होती. लेखन-कलेचीहि यास आवड होती. याला द्रव्याची कधींच कमतरता पडली नाहीं. याच्या वेळीं शा. शक ७२, मार्गशीर्ष वद्य १ रोजीं अतिवृष्टीमुळें सुदर्शन तलावाचा बांध वाहून गेला. हा बांध परत पूर्वीच्या तिप्पट मजबूत असा बांधून देण्याचें काम आनर्त व सुराष्ट्र या प्रांतांचा राजा सुविशाख यानें केलें. या कामासाठीं झालेला खर्च प्रजेवर न बसवतां रुद्रदामानें आपल्या खजिन्यांतून केला. उज्जयिनी येथें याची राजधानी असावी. याचा जवळचा संबंधी दक्षिणापथाचा राजा सातकर्णी याचा यानें दोन वेळां पराभव केला. तसेंच सन १४५ मध्यें आपला जांवई पुलोमायी याचा पराभव करून यानें काठेवाड, कच्छ, सिंध व माळवा हे प्रांत जिंकले. पण जांवयाचें राज्य बहुतेक परत केलें. आंध्र राजा विलिवायकुर यानें नहपानापासून बळकावलेल्या प्रांतांपैकीं पुणें व नाशिक हे प्रांत खेरीजकरून राहिलेले सर्व प्रांत यानें आपल्या अमलाखालीं आणले. पदच्युत राजांनाहि यानें त्यांचीं राज्यें परत

दिली. याच्या दामध्सद (दामजदश्री) व रुद्रसिंह या दोन पुत्रांपैकीं दामध्सद हा याच्यानंतर गादीवर आला.

**रुद्रप्रयाग**—संयुक्तप्रांत, गढवाल जिल्ह्यांतील एक तीर्थ. या ठिकाणीं मंदाकिनी आणि अलकनंदा या नद्यांचा संगम झाला आहे. केदारखंडांत या क्षेत्राचा महिमा वर्णिला आहे.

**रुद्रवंती**—या झुडुपास रानहरभरा असेंहि म्हणतात. पानें हरभऱ्याच्या पानांसारखींच असतात. पिवळी, तांबडी, काळी व पांढरी असे यांत चार प्रकार आहेत. हिचें औषधी गुण बरेच आहेत. हिचें चूर्ण सर्वरोगहारक आहे. काढा स्त्रियांचे रजोदोष दूर करण्याच्या उपयोगी आहे.

**रुद्रवीणा**—हें दक्षिणेकडील एक वाद्य आहे. तंबोऱ्याप्रमाणेंच ह्यास भोपळा, दांडी, खुंट्या, अटी, घोडी, तारदान, इत्यादि सर्व अवयव असतात. पण दांडी शेवटीं सहा बोटें वळवून तिचें शेवट पाठीकडे नेतात. हें शेवट नक्षीदार रीतीनें शृंगारलेलें असतें; ह्यांत सुसरीचें अगर सर्पासारख्या प्राण्याचें मुख कोरलेलें असतें. आणि दांडीवर मेणात पितळेचे अगर रुप्याचे पडदे बसविलेले असतात. भोंपळ्याऱ्याऐवजीं लांकूडच कोरून त्यास दांडी बसवितात. लांकूड फणसाचें अथवा शिसूचें पसंत करतात. अटीपासून दोन-तीन बोटांवर एक वाटोळा लहानसा भोपळा दांडीस खालच्या अंगानें काढतां घालतां येईल असा स्क्रूनें बसविलेला असतो. ह्याच्या साहाय्यानें ध्वनि जोरकस निघतो. ह्यास असलेल्या चार तारा पडद्यावर डाव्या हाताची तर्जनी व मधलें बोट ह्यांनीं दाबून उजव्या हाताच्या तर्जनीनें त्या तारांवर आघात करून हें वाद्य वाजवितात. पडद्यांची संख्या चोवीस असते. मुख्य बाजाच्या चार तारा सा, प, सा, म ह्या स्वरांत मिळविलेल्या असतात व बाकीच्या तीन तारा प, सा, सा ह्या (दुपटीच्या) अशा ठेवितात. ह्याप्रमाणें रुद्रवीण्याचें वादन स्वतंत्रपणें असतें.

**रुद्राक्ष**—एक झाड. याचीं मोठमोठीं झाडें असतात. याच्या फळांचे मणी होतात व ते शैवपंथी व बैरागी धार्मिक भावनेनें वापरतात. शंकराला रुद्राक्ष प्रिय आहे असें मानतात. सिंगापूरसारख्या बाहेरच्या ठिकाणाहूनहि हिंदुस्थानांत रुद्राक्ष येतात. यांच्या माळा करतात. मधुऱ्यावर रुद्राक्ष मद्यांत उगाळून देतात.

**रुपें**—एक मौल्यवान् धातु. परमाणुभाराक १०७·८८. वि. गु. १०५; द्रावणबिंदु ९६३ शतमान. हें उष्णता आणि वीज यांचें सर्वांत जास्त वाहक असून सोन्याच्या खालोखाल याची विस्तारशीलता आहे व प्लाटिनमच्या खालोखाल याची तन्यता आहे. हा धातु हवेंत ठेवल्यास त्यावर जांभळसर रंग चढतो. हा रंग रजत गंधिताचा असतो. जस्त, तांबें, शिसें, कथील व पारा यांच्याशीं रुपें लवकर मिसळतें. रुप्याचीं अशोधितें पुष्कळ आहेत. त्यांपासून रुपें पारदीकरण करून काढतात. ही जुनी पद्धत झाली. याखेरीज विद्रावणानें किंवा रस करून रुपें काढतात. रुपें दागिने आणि भांडीं यांसाठीं फार वापरतात. जुन्या काळापासून रुप्याचीं नाणीं पाडण्यांत येत असतात. रजतनत्रित (नायट्रेट ऑफ सिल्व्हर) औषधांत वापरतात. रजत स्तंभिद-हरिद-अदिद हीं संयुक्तें फोटोग्राफींत आवश्यक आहेत. मेक्सिको, संयुक्त संस्थानें (अमेरिका), कानडा, पेरू व ऑस्ट्रेलिया या देशांत रुपें होतें.

तैत्तिरीय संहितेंत हिरण्याबरोबर रुपें या अर्थी रजत हा शब्द आलेला आहे. चांदीचे दागिने (रुक्म), भांडीं (पात्र) व नाणीं (निष्क) यांचाहि उल्लेख येतो. अथर्ववेदांत व इतस्त्र याचा रुपें या अर्थी नामाप्रमाणें उपयोग केलेला आहे.

१९३९ सालीं जगांत चांदीचें उत्पादन ८,१०० मेट्रिक टन इतकें होतें. यामध्यें मेक्सिको (२३६०) व अमेरिकन सं. संस्थानें (३००२) या देशांत सर्वांत अधिक उत्पादन होतें. हिंदुस्थानांतील उत्पादन ०·७ इतकें म्हणजे सर्वांत कमी होतें.

**रुपेरी फर**—[लॅ. अबिस पेक्टिनाटा; इं. सिल्व्हर फर]. या झाडाच्या पानांच्या खालच्या बाजूस दोन रुपेरी रेषा असतात म्हणून यास रुपेरी फर म्हणतात. याची उंची १५० ते १८० फूट असते. याच्यापासून राळ, टर्पेंटाइन, डांबर, वगैरे मिळतें.

**रुबी माइन्स**—(माणकाच्या खाणी). ब्रह्मदेश, मंडाले विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ५,४७८ चौ. मै. व लो. सं. सुमारें एक लाख आहे. शें. ८० लोक बौद्ध धर्मी आहेत. ब्रह्मी व शान भाषा विशेष प्रचारांत आहे. जिल्ह्यांत माणिक, इंद्रनील, इ. रत्नें पुष्कळ सांपडतात व त्यांचे कारखाने या भागांत आहेत म्हणून जिल्ह्याला रुबी माइन्स हें नांव पडलें. जिल्ह्यांतून इरावती नदी दक्षिणोत्तर वाहत जाते. शेतजमीन फार थोडी आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे. इमारती लांकूड व मासे यांचाहि मोठा व्यापार चालतो.

**रुबेन्स, पीटर पॉल** (१५७७-१६४०)—एक फ्लेमिश चित्रकार. तो १६०० सालीं इटलीमध्यें चित्रकलेच्या अभ्यासाकरितां गेला व १६०८ पर्यंत तेथेंच राहिला. १६०९ मध्यें अँटवर्प येथें त्यानें आपला धंदा सुरू केला. त्याच्याकडे चित्रकला शिकण्याकरितां येणाऱ्या विद्यार्थ्यांची नेहमीं गर्दी असे व त्याचे मदतनीस म्हणून राहणारे पुष्कळच असत. त्यांपैकीं पेनियर्स, फॉन डाइक, जॉर्डियन्स व फ्रॅन्स स्नीडर्स हे प्रमुख चित्रकार होत, व त्याच्या मदतीनें रुबेन्स बरींच चित्रें तयार करूं शकला. त्याचें सर्वोत्कृष्ट चित्र 'डिसेंट फ्रॉम दि क्रॉस' (क्रूसवरून खालीं) हें अँटवर्प कॅथेड्रलमध्यें आहे. १६२९ सालीं लंडन

शहरीं जाऊन त्यानें १ ला चार्लस राजा याच्या व्हाइट हॉल राजवाड्यामधील मेजवानीच्या दालनाचें रंगकाम केलें. नंतर १६३५ सालीं तो चॅटथुडी स्टीन येथें येऊन राहिला आणि मरेपर्यंत तेथेंच त्यानें चित्रें काढण्याचें काम चालू ठेवलें. येथें त्यानें विशेषतः सृष्टीच्या देखाव्याचीं चित्रें काढलीं. या काळांतील चित्रांमध्यें त्याचीं उत्कृष्ट चित्रें 'दि बॅटल ऑफ दि ॲमेझॉन्स' (ॲमेझॉन्सची लढाई) आणि 'दि केर्मेसी' हीं होत. त्याचीं चित्रें लंडनमधील नॅशनल गॅलरीमध्यें आहेत, परंतु त्याचीं सर्वोत्कृष्ट चित्रें युरोपांतल्या इतर देशांत आहेत.

**रुमानिया**—युरोपमधलें एक संस्थान. याच्याभोंवतीं युक्रेन, पोलंड, हंगेरी, युगोस्लाव्हिया, बल्गेरिया हे देश आहेत व याला काळ्या समुद्रावर थोडासा किनारा मिळाला आहे. यांत मोल्डेव्हिया, वालाचिया, बेसअरेबिया, बुकोरिया, आणि ट्रॅन्सिल्व्हानिया यांचा समावेश झालेला आहे. क्षेत्रफळ ७४,२१४ चौ. मै. व लो. सं. १,३२,९१,०००. थोडीशी डोंगराळ जमीन सोडून बाकीची बरीचशी सपाट मैदानी आहे. बुखारेस्ट हें राजधानीचें ठिकाण आहे. हा शेतकीप्रधान देश आहे. दारू गाळण्याचे कारखाने व पिठाच्या गिरण्या अनेक आहेत. सोनें, तांबें, लोखंड, जस्त, मीठ, पेट्रोलियम, वगैरे खनिजें सांपडतात. चार विद्यापीठें आहेत. २० ते ५० वर्षांपर्यंत वयाच्या लोकांस सक्तीचें लष्करी शिक्षण आहे.

प्राचीन काळीं हा देश डेशिया या नांवानें ओळखला जात असून यांत रोमन लोकांची वस्ती होती. मध्ययुगांत मोल्डेव्हिया व वालाचिया या प्रांतांची स्थापना झाली. १८५९ मध्यें मोल्डेव्हिआ व वालाचिया एकत्र झाले त्या वेळीं ते तुर्कस्तानचा भाग होते व तुर्कस्तानच्याच अधिराज्यांत होते. १८७८ मध्यें रुमानिया तुर्कस्तानपासून अलग निघाला व स्वतंत्र झाला. हा राजसत्ताक देश आहे. १९१४ च्या महायुद्धांत तो इंग्लंड व दोस्तराष्ट्रें यांच्या बाजूचा होता. दुसऱ्या महायुद्धांत हा त्यांच्या विरुद्ध बाजूस होता.

रुमानियन भाषा—ओएरिया व डेशिया या रोमन प्रांतांत जी लॅटिन भाषा बोलली जाते तिच्यावर स्लाव्हॉनिक भाषेचा परिणाम होऊन रुमानियन भाषा बनली. ही भाषा रुमानिया, ट्रान्सिल्व्हानिया, बुकोव्हिना, बनत, बेसअरेबिया, सर्व्हिया व बल्गेरियाचा कांहीं भाग, इत्यादि ठिकाणीं बोलण्यांत आहे. मॅसिडो रुमानियन व इस्ट्रो रुमानियन असे या भाषेचे दोन भेद आहेत. या भाषेचे व्याकरणविषयक नियम जरी लॅटिन व्याकरणावरच आधारलेले असले तरी या भाषेंतील शब्दकोशांत स्लाव्हॉनिक शब्दांचीच संख्या अधिक आहे. ही भाषा लॅटिन लिपींतच लिहिली जाते.

वाङ्मय—(१) स्लाव्हॉक वर्चस्वाचा काल (१५५० ते १७१०), (२) ग्रीक वर्चस्वाचा काल (१७१० ते १८३०), व अर्वाचीन काल (१८३० ते १९००) असे रुमानियन वाङ्मयाचे कालदृष्ट्या तीन भाग पडतात.

प्रथम काल (१५५० ते १७१०)—रुमानियन वाङ्मयाच्या या पहिल्या काळांत या वाङ्मयाची सुरवात बायबलच्या भाषांतरानें झाली. या वेळीं या भाषेवर स्लाव्हॉनिक भाषेचा अतिशय मोठा पगडा पडलेला दिसून येतो. यानंतर सन १५७७ मध्यें 'ॲपोसल' चा कांहीं भाग व सन १५८२ मध्यें जुन्या करारांतील ऐतिहासिक भागाचें पॅलिया या नांवाखालीं भाषांतर अशीं दोन भाषांतरें करण्यांत आलीं. सन १६५० पर्यंत या भाषेवर स्लाव्हॉनिक भाषेचें वर्चस्व दिसून येतें. सन १६८८ मध्यें मात्र राडुग्रेझेनु यानें बायबलचें संपूर्ण भाषांतर रुमानियन भाषेंत तयार केलें. यानंतर या भाषेंत फ्लेरोरा दारूरिलॉर, दि इनव्हा ट्रॅटरी केस्टीनेस्टी यांसारखे सुभाषित संग्रह, धार्मिक ग्रंथ, कायद्याचीं व इतिहासविषयक पुस्तकें लिहिलीं गेलीं.

द्वितीय काल (१७१० ते १८३०)—या कालांत रुमानियन वाङ्मयावर रोमन कॅथालिक पंथाच्या वाङ्मयाची छाप पडूं लागली व त्यामुळें या भाषेवर असलेला स्लाव्हॉनिक भाषेचा पगडा कमी होऊं लागला व सतराव्या शतकाच्या अखेरच्या काळांत स्लाव्हॉनिक लिपीचें उच्चाटण होऊन रुमानियन वाङ्मय रुमानियन भाषेंतच प्रसिद्ध होऊं लागलें. केसराई व फिलरेट या दोघां बिशपांनीं लिहिलेला मिनेझ्यू हा बारा भागांचा सुप्रसिद्ध ग्रंथ, 'बॅसिलिका' ग्रंथाच्या आधारानें डोनोसी यानें लिहिलेला कायदेसंग्रह, इत्यादि वाङ्मय याच कालांत निर्माण झालें. शास्त्रीय पद्धतीनें रुमानियाचा इतिहास लिहिणारा क्लेन, मोल्डेव्हियाचा १८ व्या शतकापर्यंतचा इतिहास लिहिणारा प्रख्यात इतिहासकार नेकुलसिया, ट्रान्सिल्व्हानियांतील प्रमुख इतिहासकार मेयॉर व सिन्साइ, ॲरॉन व वराक हे दोन प्रसिद्ध कवी, वकारेस्कु, अलेकु, योअन हे प्रसिद्ध प्रणयगीतलेखक, रुमानियाचा लॉंगफेलो म्हणून प्रसिद्ध पावलेला माल्डेव्हियामधील कॉन्स्टंटाइन कोनकी हा कवि, इत्यादि रुमानियन वाङ्मयाला श्रेष्ठ स्थान प्राप्त करून देणारे लोक याच कालांत निपजले.

तृतीय काल (१८३० ते १९००)—या कालाच्या प्रारंभीं लझार नांवाचा एक शिक्षक व त्याचा शिष्य एलियडे यांनीं रुमानियन भाषेच्या शुद्धीकरणाची चळवळ हातीं घेतली. या कालांत एलियडे हा अत्यंत विद्वान् गृहस्थ होऊन गेला. त्यानें भाषाशास्त्र, व्याकरण, राजकारण यांवर अनेक उपयुक्त ग्रंथ लिहिले. 'करीअर डे अंबे सेक्से' हा त्याचा एक प्रमुख ग्रंथ होय. बोलिंटिनिएनु, अलेक्झांड्रेस्कु, सिहलेनु निकोले निकोलि-

यानु, इत्यादि सुप्रसिद्ध कवी याच कालांत होऊन गेले. याशिवाय अलेक्झांड्री व एमिनेस्कु हेहि याच कालांतील नामवंत कवी होत. मोल्डेव्हियांतील जुन्या बखरी प्रसिद्ध करणारा व राजनीतिशास्त्रावर लिखाण करणारा एकोणिसाव्या शतकांतील सुप्रसिद्ध लेखक म्हणजे कोगाल निसेआनु हा होय. रुमानियांतील विचारक्रांतीचें श्रेय याला आहे. पूर्वी लॅटिन भाषेंतील शब्दांचाच फक्त वापर रुमानियन भाषेंत होई, परंतु टिटु मायोरेस्कु या ग्रंथकारानें इतर भाषेंतील शब्दहि रुमानियन भाषेंत आणले व तिची शब्दसंपत्ति वाढविली. बार्बू स्टेफानेस्कु, कारगियाली व घेरीया यांसारखे कादंबरी-लेखक, व अँटनपन्नसारखे कथा-लेखकहि याच कालांत निर्माण झाले व त्यांनीं रुमानियन वाङ्मयाला पुढें आणलें.

विसावें शतक—एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत रुमानियांत वाङ्मयविषयक जें पुनरुज्जीवन झालें त्याचा परिणाम विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळापर्यंत चालूच राहिला. तितु मायोरेस्कु हा विसाव्या शतकांतील रुमानियन वाङ्मयीन चळवळीचा प्रमुख होय. क्रेअंगा, करगिथेल, एमीनेस्कु, वल्हुटझा, इत्यादि ग्रंथकारांचें त्याला या कामीं साहाय्य झालें. तितु मायोरेस्कु यानें 'कॉनव्होरबीरी लिटरारे' या आपल्या पत्रांतून आपले विचार प्रकट केले. रुमानियन शेतकरी वर्गांच्या आकांक्षांचें प्रतिबिंब चित्रित करणाऱ्या क्रेअंग या लेखकाच्या 'रिकलेक्शन्स ऑफ चाइल्डहुड' (बालपणांतील आठवणी) प्रभृति कथा, पाश्चात्य संस्कृतीचें अंधानुकरण केल्यानें कोणते दुष्परिणाम होतात, हें दृश्य रंगविणारी करगियल या नाटककाराची 'दि लॉस्ट लेटर' व 'स्टॉर्मी नाइट' हीं नाटकें, प्रो. जॉर्गाचें 'हिस्टरी ऑफ रुमानियन लिटरेचर' (रुमानियन वाङ्मयाचा इतिहास) हें पुस्तक यांनीं रुमानियन वाङ्मयांत या कालांत मोलाची भर टाकली. ब्राटेस्कु व्हायनेष्टी व मायकेल सडोवीनु हे कथालेखक व कॉसबुक, ऑक्टेव्हियन, गोगा व शेक्सपियरच्या 'मिड्समर्स नाइट ड्रीम' व शेलेचें 'टु ए स्कायलार्क' यांचें रुमानियन भाषांतर करणारा स्टीफन जोसेफ हा कवि याच कालांतील होय.

प्रो. एन्. इओर्गा (१८७१–१९४०) या अत्यंत विद्वान् व मुत्सद्दी लेखकानें नव्या-जुन्यांची एकवट करून राष्ट्रीय विचार आणि भ्रातृभाव निर्माण केला. तरुण साहित्यिकांत मिहेल साडोव्ही व इओन ए ब्रेटेस्कु-व्हायनेस्टी हे प्रमुख आहेत.

**रुमामस्तकी**—(इ. मॅस्टिक; सं. मुस्तक). मॅस्टिक झाडांतून निघणारा हा राळेसारखा पदार्थ आहे. दक्षिण युरोप, पश्चिम आशिया आणि उत्तर आफ्रिका ह्या ठिकाणीं हीं झाडे उगवतात. मॅस्टिकमध्यें दोन प्रकारच्या राळी असतात. ह्याचा उपयोग सुगंधी द्रव्यासारखा होतो. स्पिरिटमध्यें विरघळवून ह्याचें व्हॉर्निश तयार करतां येतें.

**रुमी, जलालुद्दीन** (१२०७–१२७३)—इराणांतील सुफी पंथाचा एक मोठा कवि. सुलतानाच्या भीतीनें तो आशियामायनरमध्यें जाऊन राहिला होता. जलालुद्दीन निरनिराळ्या विद्यालयांत प्राध्यापक होता. त्यानें जो मौलवी पंथ स्थापन केला तो त्याच्या घराण्याच्या नेतृत्वाखालीं ६०० वर्षें होता. रुमीनें पुष्कळ उत्कृष्ट कविता करून प्रसिद्धि मिळविली.

**रुरकी**—संयुक्तप्रांत, साहराणपूर जिल्ह्यांतील एक तहसील. क्षे. फ. ७९६ चौ. मै. व लो. सं. सुमारें तीन लाख. मुख्य ठिकाण रुरकी हें गंगेच्या कालव्यासंबंधीं कारखान्यामुळें प्रसिद्धीस आलें (१८४६). त्याच सुमारास तेथें एक स्थापत्यशास्त्राचें शिक्षण देणारें कॉलेज निघालें. त्याचा फार मोठा लौकिक आहे. त्या कॉलेजाचें आतां स्थापत्य विद्यापीठ झालें आहे. लो. सं. सुमारें १७,०००.

**रुस्तुम जमा**—एक मुसलमानी सरदार. हा रणदुल्लाखानाचा मुलगा त्याच्या मृत्यूनंतर कर्नाटकाच्या मोहिमेचा नेता झाला. तो बापाप्रमाणेंच शहाजीचा स्नेही होता. तेव्हां हा राजद्रोह मानून मुस्तफाखानानें याला कैद केलें. पण लवकरच याला माफी मिळाली. पुढें १६५८ त याला लखम सांवतवर स्वारी करण्यास पाठविलें असतां सांवतानें याचा पराभव केला. पण यानें रांगणा किल्ला जिंकून घेतला. अफझलखानाच्या वधानंतर शिवाजीचें पारिपत्य करण्याचें याच्यावर सोंपविण्यांत आलें. पण कोल्हापूरजवळ झालेल्या लढाईंत शिवाजीनें याचा मोठा पराभव केला (१६५९).

**रुहर**—ही जर्मनींतील नदी वेस्ट फॅलीयामध्यें उगम पावून ऱ्हाइन नदीला मिळते. व्हर्सायच्या तहाप्रमाणें ठरलेली नुकसानीची रक्कम जर्मनी देऊं शकला नाहीं म्हणून रुहर खोऱ्याचा ७५० चौ. मैल प्रदेश फ्रँको-बेल्जियन सैन्यानें १९२३ च्या जानेवारींत व्यापला. पुढें दोस्त राष्ट्रांनीं भरपाई ठरविणाऱ्या कमिशननें नेमलेल्या दोन समित्यांनीं केलेल्या सूचना मान्य केल्या. त्या सूचनांना 'डॉविज प्लॅन' म्हणतात व तो जर्मनीनें मान्य करून पुन्हां नुकसानभरपाईची रक्कम देण्यास सुरुवात केली व त्यामुळें १९२४ नंतर रुहर प्रांत पुन्हां जर्मनीच्या ताब्यांत गेला.

**रूझवेल्ट, थिओडोर** (१८५८–१९१९)—एक अमेरिकन मुत्सद्दी व सं. संस्थानांचा सव्विसावा अध्यक्ष. १८९८ त तो न्यू यॉर्क संस्थानचा गव्हर्नर झाला व दोन वर्षांनीं सं. संस्थानांचा उपाध्यक्ष झाला. पुढल्याच वर्षी तो अध्यक्षपदावर

चढला व त्या जागेवर १९०८ पर्यंत होता. तो मिरासदारांच्या हक्काविरुद्ध जोरानें झगडला. रूसो–जपानी युद्धानंतरच्या वाटाघाटींत शांतता टिकविण्यासाठीं त्यानें खूप खटपट केली. या कारणानें त्याला नोबेल पारितोषिक मिळालें. पहिल्या जागतिक महायुद्धाच्या प्रसंगीं अमेरिकेनें दोस्तांच्या बाजूनें युद्धांत पडावें अशा मताचा तो होता. प्राणिशास्त्र, इतिहास व राजकारण हे त्याचे आवडते विषय होते व त्यांवर त्यानें पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. अव्वल दर्जाचा मुत्सद्दी म्हणून रूझवेल्टला मोठा मान असे.

**रूझवेल्ट, फ्रँक्लिन** ( १८८२–१९४५ )—एक अमेरिकन मुत्सद्दी व सं. संस्थानांचा ३२ वा अध्यक्ष. हा मागच्या रूझवेल्टचा चुलतभाऊ होता. विल्सनच्या कारकीर्दींत हा नाविक खात्याचा दुय्यम चिटणीस होता. १९२८ त न्यू यॉर्कचा गव्हर्नर म्हणून निवडला गेला व १९३२ सालीं औद्योगिक आणि आर्थिक ऱ्हासाच्या काळांत रूझवेल्ट अध्यक्षपदारूढ झाला व पुढें चार वेळां तो तसाच निवडून आला. हा मान अपूर्व होता यांत शंका नाहीं. आपल्या कारकीर्दींत त्यानें बेकारी नाहींशी करण्यासाठीं बरींच कामें काढलीं. आक्रमक राष्ट्रांविरुद्ध कोंडी करण्याची त्यानें १९३७ सालीं योजना आंखली होती व १९४० सालीं महायुद्धांत भाग घेण्याचें ठरल्यावर त्यानें सक्तीची लष्करी नोकरी घेण्यासंबंधीं कायदा केला. अमेरिकेच्या इतिहासांत हा नवीनच पायंडा होता. १९४१ त रूझवेल्ट आणि चर्चिल यांनीं 'अ‍ॅटलांटिक सनद' तयार केली व जपाननें पर्ल बंदरावर हल्ला केला तेव्हां तर अमेरिकन लष्कराचा तो पुढारीच बनला. ज्या ज्या ठिकाणीं दोस्त राष्ट्रांच्या बैठका झाल्या त्या त्या दूरदूरच्या ठिकाणींहि तो गेला व चर्चिल आणि स्टालिन यांना त्यानें भरपूर पाठिंबा दिला. १९४५ त याल्टा येथें बड्या त्रिकूटांची दुसरी बैठक झाल्यानंतर लवकरच मस्तिष्करक्तस्रावानें तो एकाएकीं वारला. सबंध महायुद्ध खेळल्यानंतर तें यशस्वी होण्याच्या सुमारास या अत्यंत थोर मुत्सद्याचा अंत झाला याबद्दल सर्वांना हळहळ वाटली.

**रूटर, पॉल जुलिअस** ( १८२१–१८९९ )—रूटर्स न्यू एजन्सी या वृत्तसंस्थेचा संस्थापक. हा जर्मन होता. १८४९ सालीं त्यानें ही संस्था काढली व १८५१ सालीं ब्रिटिश प्रजाजन होऊन कॅले व डोव्हर यांच्या दरम्यान केबलची तारायंत्रव्यवस्था पूर्ण झाल्यावर यानें आपली मुख्य कचेरी लंडन येथें नेली. आणि आपल्या संस्थेच्या शाखा (न्यूज एजन्सीज्) अनेक ठिकाणीं काढल्या; त्यामुळें पृथ्वीवरीलें सर्व ठिकाणची अगदीं ताजी बातमी वृत्तपत्रकारांना, तसेंच बँकिंग, शिपिंग व ट्रेडिंग कंपन्यांना मिळूं लागली. १८६५ सालीं त्यानें लिमिटेड कंपनी केली. पुढें १९१६ सालीं एका सिंडिकेटनें ही कंपनी विकत घेतली.

**रूढिप्रणीत कायदा**—( कस्टमरी लॉ ). इंग्लंडमध्यें अलिखित कायद्याचा ( कॉमन लॉ ) हा एक भाग आहे. रूढि म्हणजे अनादिकालापासून सर्वमान्य लोक आचरीत आलेलें विवेकबुद्धीला योग्य वाटणारें कृत्य, असा अर्थ कायद्यानें केलेला आहे. रूढि–कायदे कोर्टांत मान्य होण्यास पुढील गोष्टींची आवश्यकता असते–( १ ) ती रूढि निश्चित स्वरूपाची असली पाहिजे. ( २ ) ती विवेकबुद्धीला पटणारी ( रीझनेबल ) म्हणजे सार्वजनिक हिताला बाधक नसणारी किंवा कोणावर अन्याय करणारी असतां कामा नये. ( ३ ) ती प्राचीन म्हणजे अनादिकालापासून चालत आलेली किंवा बराच काळ सतत अमलांत असलेली, व लोकांनीं हक्क म्हणून चालविलेली असली पाहिजे. ( ४ ) सदर रूढि सरकारनें मान्य केलेल्या कोणत्याहि कायद्याला किंवा कायद्याच्या तत्त्वाला विरोधी असतां कामा नये. हिंदुस्थानांतील न्यायालयांत कोणतीहि रूढि वरील शर्तीप्रमाणें असल्यास मान्य करण्यांत येते. आतांपर्यंत सरकारनें हिंदु कायदा मान्य केलेला नसल्यामुळें वर दिलेल्या शर्तींप्रमाणें चालू असलेल्या हिंदु लोकांच्या अनेक रूढी कोर्टानें मान्य केलेल्या आहेत. ( अलिखित कायदा पाहा. )

**रूदरफर्ड, सर अर्नेस्ट** ( १८७१–१९३७ )—एक ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. तो १९१९ सालीं केंब्रिज येथें प्रायोगिक पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर नेमला गेला. त्याला १९०५ सालीं रसायनशास्त्र या विषयाचें नोबेल पारितोषिक मिळालें. त्यानें 'परमाणुघटन–विघटन' या विषयावर पुष्कळ निबंध लिहिले; त्याचप्रमाणें रेडिओसंबंधींहि कित्येक ग्रंथ प्रसिद्ध केले. १९२५ सालीं त्याला 'दि ऑर्डर ऑफ मेरिट' हा बहुमान मिळाला. शास्त्रीय आणि औद्योगिक संशोधनासाठीं स्थापलेल्या सल्लागार मंडळाचा १९३० पासून तो अध्यक्ष होता.

**रूपककथा**—( ॲलेगरी ). प्रत्यक्ष किंवा शब्दशः अर्थापेक्षां कांहीं निराळें जेव्हां सांगावयाचें असतें तेव्हां या आलंकारिक वाङ्मयप्रकाराचा अवलंब करण्यांत येतो. बौद्धांच्या जातककथा किंवा हितोपदेश-पंचतंत्रांतील गोष्टी अशाच स्वरूपाच्या आहेत. मराठींतील नेवाळकरांचें 'मनोविजय' नाटकहि सबंध रूपकात्मक आहे. इंग्रजींत स्पेन्सरचें 'फेअरी क्वीन' काव्य किंवा बनियनचा 'पिल्ग्रिम्स प्रोग्रेस' हा ग्रंथ संपूर्णपणें रूपककथा आहे. शिल्पकला आणि चित्रकला यांतून रूपकात्मक प्रसंग दाखविलेले आढळतात.

**रूपद**—( रुबिडिअम ). दुर्मिळ क्षारधातूंपैकीं एक. परमाणुभारांक ८३·४५. १८६० सालीं बुन्सेन आणि किर्चोफ ह्यांनीं

किरणयंत्राच्या वर्णलेखक ( स्पेक्ट्रोस्कोप ) साहाय्यानें ह्याचा शोध लावला.

**रूपनगर**—राजपुताना, किसनगड संस्थानच्या उत्तरेकडे असलेलें एक इतिहासप्रसिद्ध गांव. लो. सं. ३,०००. शहराला तट व किल्ला आहे.

**रूपमती**—माळव्यांतील एक सौंदर्यसंपन्न राणी. ही एका रजपूत ठाकुराची मुलगी असून हिला सौंदर्य आणि गायन यांची अपूर्व देणगी होती. हिच्यावर मोहित होऊन बाझबहादुर ( पाहा ) नांवाच्या मुसलमान राजानें हिच्याशीं लग्न केलें व पुढें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करून हिच्या नादांत तो अक्षयीं राहिला. तेव्हां अकबरानें आदमखान सरदाराला बाझबहादुराच्या पारिपत्यासाठीं पाठविलें. आदमखानानें हिला पकडली असतां हिनें पतिनिष्ठा राखून विषप्राशन केलें. मांडवगड (धार) येथें रूपमतीचा महाल दाखवितात. रूपमती आणि बाझबहादुर यांच्यासंबंधीं स्वतः रूपमतीनेंच केलेलीं प्रेमगीतें माळव्यांत फार लोकप्रिय आहेत.

**रूपराम कटारी**—एक हिंदुस्थानी ब्राह्मण मुत्सद्दी. हा सुरजमल जाटाच्या पदरीं असे. शिंदे-होळकर यांच्याशीं सुरजमलच्या ज्या वाटाघाटी चालत त्या रूपरामाच्या मार्फत होत. यानें बरीच 'कारकुनी' मिळविली होती. व त्या पैशाचा विनियोग तो देवळें, घाट, बाग, इ. बांधण्यांत व दानधर्मांत करी. बरसाना येथील लाडली (राधा) हिचें मंदिर याचेंच आहे.

**रूपराम चौधरी** ( मृत्यु १८१४ )—पेशवाईंतील एक अधिकारी. नारायणरावाच्या वधापासून तों शेवटच्या बाजीरावाच्या वेळेपर्यंत हा पेशव्यांच्या नोकरींत होता. हा पानशांच्या तोफखान्यांत चौधरकीच्या कामावर असे. पेंढारी, भिल्ल व कोळी, वगैरे लोकांचीं बंडें मोडण्याचें काम याजकडेच सोंपवण्यांत आलें होतें. याच्या पश्चात् याचा दत्तक मुलगा रामचंद्र यास याच्या जागेवर नेमण्यांत आलें. रूपरामाचा वाडा व हौद पुण्यास वेताळ पेठेंत आहे.

**रूपांतर**—( मेटॅमॉर्फोसिस ). कोणत्याहि पदार्थाच्या अथवा वस्तूच्या रूपामध्यें, आकारामध्यें अथवा रचनेमध्यें स्पष्ट असा फरक दिसूं लागला म्हणजे त्यास म्हणतात. प्राणिशास्त्रामध्यें रूपांतर या क्रियेमध्यें प्राण्याची जी स्वाभाविकपणें वाढ होते तिच्याखेरीज अंड्यांतून किंवा गर्भाशयांतून बाहेर पडल्यानंतर जो विशिष्ट प्राण्यांत फरक दृष्टीस पडतो त्यास रूपांतर म्हणतात. उदा., फुलपांखराच्या बाबतींत अंड्यांतून एक किड्यासारखा प्राणी बाहेर येतो, व त्याचें रूपांतर कोपामध्यें होऊन पुन्हां त्याचें रूपांतर फुलपांखरांत होतें. इतर कीटकांमध्येंहि ( टोळ, ढेकूण, वगैरेंत ) अशींच रूपांतरें दृष्टीस पडतात. बेडूक, कांहीं जातीचे मासे व कीटक यांमध्येंहि रूपांतराचा प्रकार आढळतो.

**रूपांतरित खडक**— भूस्तरशास्त्रामध्यें ज्या खडकांचें अथवा खडकांच्या थरांचें मूळ स्वरूप बदलून जाऊन उष्णता किंवा दाब यामुळें किंवा या दोहोंच्याहि परिणामामुळें आणि रासायनिक क्रियेमुळें ते कमी-अधिक स्फटिकमय घनतात अशा खडकांस रूपांतरित खडक म्हणतात. अशा रीतीनें वज्रतुंड खडकाचें म्हणजे प्रथम अग्निजन्य असलेल्या खडकाचें कांहीं कालानें नीस खडकांत रूपांतर होतें. तसेंच मूळ भस्मस्वरूपांत असलेल्या कांहीं अग्निजन्य खडकांचें हॉर्नब्लेड आणि क्लोराइट सिस्ट या दगडांत रूपांतर होतें.

**रूलेट**—हा एक संभाव्यमानाचा म्हणजे नशिबाचा विलायती खेळ आहे. यामध्यें एक हस्तिदंताची गोळी एका वाटोळ्या फिरत्या तबकडीमध्यें भोंवतीं असलेल्या ३७ किंवा ३८ घरांपैकीं १ ते ३६ आणि एक शून्य व दोन शून्यें अशा आंकडे घातलेल्या एका कोणत्या तरी घरांत फेंकण्यांत येते. ज्या घरांत ती गोळी जाऊन पडेल त्या घरावर ज्यानें पैसे लावले असतील त्याला त्याच्या पैशाच्या ३६ पट पैसे मिळतात.

**रूसो, जीन जाकेज** ( १७१२-१७७८ )—एक फ्रेंच तत्त्वज्ञानी लेखक. प्रथम यानें संगीताचीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं व नंतर कथावाङ्मय हातीं घेतलें. 'सामाजिक करार' हें त्याचें पुस्तक राजकारणावरचें आहे. त्याच्या लेखनांत जो पाखंडी सूर वाहत असे त्यामुळें लोक चिडले व त्याला इंग्लंडला पळून जावें लागलें. तेथें ह्यूम, बॉस्वेल, वगैरेंनीं त्याला चांगल्या रीतीनें वागविलें. पण होरेस वॉलपोलच्या दुष्टाव्याच्या पत्रांमुळें तो फ्रान्सला परतला व दारिद्र्यांत काळ कंठूं लागला. त्याचीं 'सत्य निवेदनें' ( कॉन्फेशन्स ) त्याच्या मृत्यूनंतर जीं प्रसिद्ध झालीं ( १७८२ ) त्यांत दुःखदायी स्पष्टता असली तरी तीं तंतोतंत बरोबर आहेत असें नाहीं. त्याच्या लेखनाचें महत्त्व, पुढें झालेल्या फ्रेंच राज्यक्रांतीच्या बुडाशीं जे सिद्धांत होते ते बीजरूपानें का होईना रूसोनें प्रतिपादले होते, यांत आहे.

**रे मासा**—या माशाच्या अनेक जाती आहेत. याचा आकार चपटा असून त्याचे कल्ले बरेच रुंद व मांसल असतात आणि ते शरीराचा भागच आहेत असें वाटतें. याच्या एका जातीला दंशक म्हणतात व एकाला वैद्युत् म्हणतात. तसेंच एकाला गरुड किंवा सैतानी मासा म्हणतात.

**रेखाकला**—( ड्रॉइंग ). सर्व चित्रकलेच्या मुळाशीं रेखाकला आहे. या कलेच्या साहाय्यानें कोणत्याहि सपाट पृष्ठभागावर एखाद्या वस्तूचें किंवा अनेक वस्तूंचें त्यांच्या परस्परांशीं संबद्ध स्थितींत चित्र काढतां येतें. सर्व चित्रकलाच्या पद्धतींमध्यें

उत्कृष्ट तऱ्हेची रेखाकला प्रतीत होते. त्यांच्या पद्धतीमध्यें मात्र फरक आढळतो. फ्लॉरेन्स चित्रकलेमध्यें प्राचीन चित्रकला व शरीररचनेचा अभ्यास यांचा संयोग दृष्टीस पडतो व या कलेचे प्रणेते मायकेलँजेलो व लिओनार्डो डा व्हिन्सी हे उत्कृष्ट रेखाकलाकार होते. राफेल संप्रदायांत ध्येयात्मक चित्रें काढण्याच्या इच्छेमुळें मूळची जोमदार व भावदर्शक रेखाकला थोडी मागें पडली. लॉंबर्ड संप्रदायांत पुन्हां रेखाकलेस महत्त्व देण्यांत येऊन रंगांच्या मिलाफाकडे विशेष लक्ष देण्यांत येत असे. व्हेनिस संप्रदायामध्यें रंगाच्या भडकपणामुळें रेषांचा लोप झालेला दिसतो. जर्मन व डच संप्रदायांत स्वाभाविक रेषा व उत्तम रंग यांचा मिलाफ झालेला दिसतो. फ्रेंच संप्रदायांत पौसिन यानें रेखांकडे विशेष लक्ष दिलेलें आढळतें. यानंतर डेव्हिडनें पुन्हां रेखाकलेचें महत्त्व प्रस्थापित केलें. यासच अभिजात संप्रदाय म्हणत व इंग्रेस यानें याचाच पुरस्कार केला. ब्रिटिश चित्रकार कलेच्या दृष्टीनें किंवा नियमांच्या दृष्टीनें रेषेस महत्त्व न देतां स्वाभाविकतेच्या दृष्टीनें देतात. तथापि गेन्सबरो व आल्फ्रेड स्टीव्हेन्स यांचें रेखाकाम प्राचीन कलाविदांशीं स्पर्धा करण्यासारखें आहे.

हिंदी चित्रकलेंत रेषेस फारच महत्त्व दिलेलें आढळतें. एवढेंच नव्हे तर रेषांच्या योगानें हिंदी चित्रकार जी भावव्यक्ति करतो ती इतरत्र क्वचितच आढळून येते. अजंठा येथील लेण्यांतील चित्रांत या गोष्टीचें उत्कृष्ट प्रतीक पाहावयास सांपडतें. या चित्रांतील रेषांइतकी जोरदार व भावदर्शक रेषा अन्यत्र आढळत नाहीं.

यांत्रिक रेखाकला— शिल्पशास्त्रामध्यें कोणत्याहि बांधकामाची रूपरेषा (प्लॅन), त्याचें पुरोदर्शन (एलेव्हेशन) व छेददर्शन (सेक्शन) हीं त्याच्या वास्तविक प्रत्यालेखाप्रमाणें काढून दाखविण्याची जी कला तीस यांत्रिक रेखाकला असें म्हणतात. या रेखाकलेसंबंधीं कांहीं संकेत ठरविण्यांत आले आहेत. उदाहरणार्थ, बोल्टांचा आकार समांतर रेषांनीं दाखविणें; रिवेट (रिव्हेट) वगैरेंचा आकार टिंबांनीं दाखविणें; दंतुर चक्रांचा आकार त्यांच्या आंतर चक्रांनीं दाखविणें; झांकलेले भाग तुटक्या रेषांनीं दाखविणें; उंच उंच स्तंभ तुटक भागांनीं दाखविणें; वगैरे. बांधकामांत कोणत्या प्रकारचा माल वापरावयाचा यासंबंधींचीं चिन्हें छायाप्रकाशात्मक रेषा किंवा कांहीं विशिष्ट रंग वापरून दाखविण्यांत येतात.

**रेखांश**—(लॉंजिट्यूड). प्रधान याम्योत्तराची पातळी आणि स्थलयाम्योत्तराची पातळी यांमधील कोन. ग्रीनिच याम्योत्तरापासून रेखांश मोजले जातात. १५ रेखांशांचा एक तास



याप्रमाणें मोजून ग्रीनिच वेळ आणि स्थानिक वेळ यांमधील अंतर काढतात.

जसा हवामानासाठीं अक्षांशांचा उपयोग होतो तसाच रेखांशांचा उपयोग कालमानासाठीं होतो. पृथ्वीची स्वतःच्याभोंवतालची प्रदक्षिणा २४ तासांत पुरी होते. म्हणजे ३६०° फिरण्याला पृथ्वीला २४ तास लागतात. याचाच अर्थ असा कीं, दर तासाला १५° अगर चार मिनिटांना पृथ्वी १° फिरते. यामुळें कोणत्याहि ठिकाणच्या रेखांशाच्या पूर्वेला सूर्योदय चार मिनिटें लवकर होतो व पश्चिमेला चार मिनिटें उशिरां होतो. म्हणजे जर ग्रीनिचला रात्रीचे १२ वाजलेले असतील तर त्याच्या पूर्वेला ९० रेखांशावर सकाळचे ६ वाजलेले असतील व पश्चिमेकडील ९० रेखांशावर सायंकाळचे ६ वाजलेले असतील. जास्त स्पष्टीकरणासाठीं आपण मुंबई हें शहर घेऊं. हें शहर ग्रीनिचच्या पुढें ७२½° पूर्व असें आहे. म्हणजे ग्रीनिचच्यापुढें ४ तास ५० मिनिटें ही मुंबईची वेळ असणार. ज्या वेळीं ग्रीनिचला दुपारचे बारा वाजतात त्या वेळीं मुंबईला सायंकाळ म्हणजे ४ वाजून ५० मिनिटें इतके वाजतात. जसें रेखावृत्तावरून कालमान सांगतां येतें. तसेंच वेळांवरून रेखावृत्तहि सांगतां येतें. समजा, ग्रीनिचला रात्रीचे बारा वाजले व दुसऱ्या ठिकाणीं सायंकाळचे सात वाजले तर तें ठिकाण ग्रीनिचच्या पश्चिमेस ७५ रेखावृत्तावर असलें पाहिजे.

कित्येक मोठमोठ्या देशांतून पुष्कळशीं रेखावृत्तें एकाजवळून एक जात असतात. हा प्रकार हिंदुस्थान, कॅनडा, रशिया, अमेरिकन संयुक्त संस्थानें यांसारख्या अवाढव्य देशांतून दिसतो. या देशांतून बरींच रेखावृत्तें जात असल्यानें प्रत्येक ठिकाणच्या कालमानांत सारखा फरक पडत असतो. अर्थात् एकाच देशांत इतकें कालमान सुरू ठेवल्यास वेळ समजण्याच्या बाबतींत सर्वत्र गोंधळ उडेल. समजा, आपण हिंदुस्थानांतलि कराची, मुंबई व कलकत्ता हीं तीन शहरें घेऊं. जर एखादा प्रवासी कराचीहून कलकत्त्याला जावयास निघाला तर त्याचें घड्याळ त्याला प्रत्येक रेखांशावर बदलावें लागेल. कारण त्याचें घड्याळ स्थानिक रेखांशाच्या वेळेबरोबर जमणार नाहीं. तसेंच समजा, एखाद्यानें कलकत्त्याहून सकाळीं १० वाजतां तार कराचीस केल्यास ती सकाळच्या ८ वाजून ४६ मिनिटांनीं पोंचेल. वास्तविक पाहतां हें सर्व गणितशास्त्राप्रमाणें बरोबर आहे. परंतु दर्शनीं वाटणारा हा घोंटाळा टाळण्यासाठीं सर्व देशभर एकच कालमान ठरविण्यांत आलें. हें ठरवावयाचें म्हणजे साधारणतः देशाच्या मध्यभागांतून एखाद्या प्रमुख स्थलाचे जे रेखांश असतात तेथील वेळ त्या साऱ्या देशभर मानतात. अमेरिकेंत एक एक तासाच्या अंतरानें पांच

प्रमाण वेळा मानतात व त्या पश्चिम रेखांश ६०,७५,९०,१०५, १२० यांवर आहेत. अर्थात् या रेखांशाप्रमाणें ग्रीनिच वेळेपेक्षां या रेखांशावरील कालमानांत ४, ५, ६, ७, ८ तास असा फरक पडत जातो.

असाच फरक पडत असतां आपण सारखे पश्चिमेकडे गेलों तर १८०° रेखावृत्तावर त्या वेळीं ग्रीनिचच्या उलट कालमान आढळतें. समजा, दोन प्रवासी एक पूर्वेकडून व दुसरा पश्चिमेकडून १८०° रेखावृत्तावर आले. या वेळीं ग्रीनिचला रविवारचे दुपारचे बारा वाजले आहेत. अर्थात् पूर्वेकडून प्रवास करीत आलेला प्रवासी १८०° रेखावृत्तावर सोमवार दुपारचे बारा वाजले असें सांगेल व पश्चिमेकडून आलेला प्रवासी शनिवारचे दुपारचे बारा वाजले असें सांगेल. म्हणजे १८०° रेखावृत्तावर एकदम दोन वार दृष्टीस पडतील. अर्थात् हा घोंटाळा टाळण्यासाठीं १८८० च्या आंतरराष्ट्रीय सभेंत असें ठरविण्यांत आलें कीं, १८० रेखांश ओलांडतांना जहाजांनीं एक दिवसाचा फरक करावा. हा फरक पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणाऱ्या जहाजांनीं पुन्हां तोच दिवस म्हणजे सोमवार असें समजावें. अर्थात् ही सर्व रेषा आंतरराष्ट्रीय वाररेषा या नांवानें ओळखली जात असून ही रेषा साधारणपणें मनुष्यवस्ती नसलेल्या भागातून नेलेली असल्याकारणानें ती सरळ १८० रेखांशावरून न जातां जागजागीं वक्र झालेली आहे.

**रेग्नॉल्ट, हेन्री व्हिक्टर** (१८१०–१८७८)—एक फ्रेंच शास्त्रज्ञ. प्रथम रसायनशास्त्रांत व नंतर पदार्थविज्ञानांत त्यानें संशोधन करून शास्त्रांच्या इतिहासांत नांव केलें. १८४५ त लॉर्ड केल्व्हिन हा त्याच्या प्रयोगशाळेंतला एक विद्यार्थी होता. रेग्नॉल्टनें पाऱ्याऐवजीं हवा भरून एक उष्णतामापक यंत्र व आर्द्रतामापक यंत्र तयार केलें. बॉइलच्या नियमाची मर्यादा किती स्थूल आहे हें त्यानें दाखवून दिलें.

**रेचक मीठ**—(इप्सम सॉल्ट). मग्न गंधाकित (सल्फेट ऑफ मॅग्नेशियम) हें एक रेचक औषध असून त्याचे तंतुमय स्फटिक असतात. हें जेथें खनिज झरे असतात अशा ठिकाणीं खडकांच्या फटींत आढळतें. परंतु तें सामान्यतः कृत्रिम रीतीनें मॅग्नेशिअमच्या चुनखडीपासून वर गंधकाम्ल घालून किंवा त्याच्या जातीचा किएसेराइट हा खनिज पदार्थ पाण्यांत उकळून तो द्रव गाळून घेऊन त्या द्रवापासून तयार करण्यांत येतें. याचा औषधामध्यें रेचक म्हणून उपयोग करण्यांत येतो. हा पदार्थ प्रथम इप्सम या गांवीं खनिज पाण्याच्या झऱ्याजवळ सांपडल्यामुळें त्यास इप्सम (मीठ) असें म्हणतात.

**रेजिमेंट**—ब्रिटिश सैन्यरचनेमध्यें हा शब्द (१) घोडेस्वारांच्या एका पथकास, (२) पायदळांच्या एका संघास (बटालियन), किंवा (३) सर्व तोफखान्यास लावण्यांत येतो. सामान्य भाषेमध्यें हा शब्द घोडदळ किंवा पायदळ या कोणत्याहि जातीच्या पथकास लावतात. तथापि हें पथक पायदळाचें असेल तर त्यांत दोन बटालियन असतात. रेजिमेंट जसजसे तयार करण्यांत येत असें तसतसे अनुक्रमानें त्या संख्येचें नांव देत. प्रत्येक रेजिमेंटचें स्वतंत्र निशाण असतें.

**रेझोर्सिनोल**—रेझोर्सिन हें एक द्विमूल्य (डायहायड्रिक) फेनॉल आहे. फ्ल्युरोसीन आणि अझो रंग तयार करण्यासाठीं त्याचा मोठ्या प्रमाणांत उपयोग होतो.

**रेडक्रॉस संस्था**—जिनिव्हा येथें १८६३ सालीं झालेल्या ठरावाप्रमाणें या संस्था निरनिराळ्या देशांत स्थापन झालेल्या आहेत. यांचें चिन्ह पांढऱ्या, वाटोळ्या वर्तुळामध्यें तांबडी चार पाकळ्यांची उभी फुली हें असतें. या संस्था युद्ध चालू असतां शिक्षण घेतलेल्या दाया (नर्सेस), दवाखान्याकरितां लागणारीं औषधें, वगैरे जिन्नस पुरवीत असतात. या संस्थेतर्फे चालणारे दवाखाने, त्यांतील रोगी, त्यांतील अधिकारी व कामगार हीं सर्व 'तटस्थ' मानण्यांत येतात.

शांततेच्या काळांतहि या संस्था समाजाचें कल्याण करण्याचें काम करीत असतात. त्यांच्यामार्फत गरीबगुरिबांस औषधोपचार, आजाऱ्यांस मदत, रोग्यांस वाहून नेण्यास गाड्या, वगैरे पुरविण्यांत येतात.

**रेडमंड, जॉन एडवर्ड** (१८५१–१९१८)—एक आयरिश देशभक्त. तो पार्नेलचा शिष्य असून पार्नेलच्या मृत्यूनंतर (१८९१) त्या पक्षाचा पुढारी बनला. १९१० च्या सार्वत्रिक निवडणुकीनंतर पार्लमेंटमध्यें रेडमंडचें प्राबल्य विशेष दिसून आलें व मुख्य प्रधान आस्क्विथ याला होमरूल बिल पुढें आणून झट्दिशीं पसार करून घ्यावें लागलें (१९१२–१९१४). महायुद्ध सुरू झालें तेव्हां सैन्यभरतीला त्यानें चांगला पाठिंबा दिला. पण आयर्लंडमध्यें सक्तीची लष्करी नोकरी सुरू करण्यास त्याचा विरोध होता.

**रेडियम**—या मूलद्रव्याचा शोध १८९८ सालीं क्यूरी या दांपत्य शास्त्रज्ञांनीं केला. परमाणुभारांक २२५·९५; द्रवणबिंदु ७००°. सर्व युरॅनियम अशोधित खनिजांत एका टनाला ०·३२ ग्रॅम रेडियम सांपडतें. रेडियम क्षारें स्वयंप्रकाशी असतात. रेडियम धातु रुपेरी रंगाचा असून हवेंत लवकर विलीन पावतो. शस्त्रक्रियेंत रेडियम संयुक्ताचा फार उपयोग आहे. वस्तूंना प्रकाशमान रंग देण्यालाहि उपयोग करतात.

रेडियमची उपाययोजना—किरणोत्सर्जी पदार्थांचा उपयोग करून रोग बरे करण्याची पद्धत आहे. रक्तात हे पदार्थ घाल-

तात किंवा बाहेरून लावतात. रॅडन या रेडियम-उत्सर्गाचा इलाज व्रणावर करतात.

**रेडी (यशवंतगड)**— गोव्याकडील एक किल्ला. हा फार मजबूत असून १६६० मध्यें बांधला असावा. तो मूळ वाडीच्या सांवताच्या ताब्यांत असून शिवाजीनें तो घेऊन त्याची डागडुजी केली. १८१७ मध्यें हा सांवताच्या ताब्यांत होता त्या वेळीं पोर्तुगीजांनीं तो घेण्याचा प्रयत्न केला. पण तें साध्य झालें नाहीं. १८१९ त चांच्यांचा बंदोबस्त करण्याकरितां इंग्रजांनीं हा संभाजी सांवतापासून घेतला. तटबंदीचा घेर दीड मैल आहे. तटाच्या आंत बाले-किल्ला आहे. त्याच्या तटाची उंची पंचवीस फूट आहे व बाहेरून २४ फूट रुंद व १३ फूट खोल खंदक आहे. बालेकिल्ल्याचा घेर एक-तृतीयांश मैल आहे. हल्लीं यांत पोलिसठाणें आहे.

**रेड्डी, सर कूर्म वेंकट** (१८७५- )—मद्रास प्रांतांतील एक ब्राह्मणेतर पुढारी. यांचें शिक्षण राजमहेन्द्री व मद्रास येथें झालें. १९१९मध्यें हे ब्राह्मणेतर पक्षाचे नेते म्हणून जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष देण्यास गेले होते. १९२० मध्यें हे मध्यवर्ती सरकारच्या कायदेमंडळांत सभासद होते. १९२० ते १९२६ मध्यें हे मद्रास कायदेमंडळाचे सभासद होते. १९२० ते १९२३ मध्यें हे शेतकी व उद्योगधंदे खात्याचे मंत्री होते. १९२३ ते १९२८ पर्यंत हे बंगलोरच्या सायन्स इन्स्टिटयूटच्या 'कोर्ट ऑफ व्हिजिटर्स'चे सभासद होते. १९२८ मध्यें हे लीग ऑफ नेशन्सच्या असेंब्लीचे प्रतिनिधि म्हणून गेले होते. १९२९ ते १९३२ मध्यें हे दक्षिण आफ्रिकेंत हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून होते. १९३४ मध्यें हे मद्रास सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद झाले. १९३६ मध्यें हे मद्रासचे तात्पुरते गव्हर्नर होते.

**रेड्डी घराणें**—मद्रास इलाख्यांतील कोंडविडूचें हें राजघराणें १३२८ ते १४२७ पर्यंत नांदत होतें. हें वरंगळच्या गणपतिराजांचें मांडलिक होतें. प्रोलयवेम हा घराण्याचा संस्थापक असून तो काकतीय प्रतापरुद्राचा पराभव करून स्वतंत्र झाला. शेवटचा राजा राचवेंका याचा मुसलमानांनीं पराभव करून हें घराणें बुडविलें. कोंडविडू येथें रेड्डी यांनीं बांधलेला एक किल्ला आहे.

**रेणुका**—१. जमदग्नीची पत्नी व परशुरामाची आई. ही एक राजकन्या असून हिनें स्वयंवरांत जमदग्नीला वरलें अशी कथा आहे. हिला परशुराम धरून पांच पुत्र होते. (परशुराम पाहा.) रेणुका देवीची उपासना पुष्कळ ठिकाणीं आहे.

२. एक वेल. ही मेवाड प्रांतांत आढळते. बियांस रेणुकाबीज म्हणतात. बीं कंकोळासारखें पण जरा मोठें व काळसर असतें. पक्षघातावर रेणुका बीजाचा काढा देतात व पित्तगुल्मावर त्याचें चूर्ण मधांत देतात.

**रेणुज प्राणी**—(स्पोरोझोआ). ही एक परोपजीवी एकपेशीमय प्राण्यांची जात असून यांचें पुनरुत्पादन यांच्या शरीरांतून निघालेल्या जीवकणांपासून होतें. हे बहुतेक प्राण्यांच्या मोठाल्या वर्गांत परोपजीवि म्हणून आढळतात. यांचा आकार फार भिन्न भिन्न असतो. कांहीं अत्यंत सूक्ष्म असतात. तर कांहीं सोळा मिलिमीटरपर्यंत मोठे असतात. यांचे पुढें दिलेले पोटवर्ग पाडण्यांत येतात: १ ग्रेगॅरीनेडा-हे बहुतेक प्राण्यांच्या अन्नमार्गांत अढळतात. २ कॉकीडिडीया-हे सामान्यतः श्लेष्मल अंतस्त्वचेमध्यें राहतात. ३ हेमोस्पोरीडीया-हे रक्तकणांमध्यें राहतात. ४ मायसोस्फोरीडीया-हे कृमि-कीटक व सपृष्ठवंश-प्राणी यांच्या शरीरांत राहतात. रेशमाच्या किड्यास उपद्रव करणारे सूक्ष्म जंतू याच वर्गांत मोडतात. याखेरीज सॅर्कोस्पोरिडा असा याचा आणखी एक वर्ग आहे.

**रेन, सर ख्रिस्तोफर** (१६३१-१७२३)—एक इंग्रज शिल्पकलातज्ज्ञ. त्याची मुख्य कलाकृति लंडनचें सेंट पॉल कॅथेड्रल ही इमारत होय (आरंभ १६७५, समाप्ति १७१०). सेंट पॉलची जुनी इमारत १६६६ च्या मोठ्या अग्निप्रलयामध्यें नष्ट झाल्यानंतर ही नवी इमारत पुन्हां बांधण्यांत आली. रेननें तयार केलेल्या आणखी ज्या इमारती आहेत त्या म्हणजे हॅम्प्टन कोर्ट पॅलेसचा आधुनिक भाग, ट्रिनिटी कॉलेजचें ग्रंथालय, चेल्शिया इस्पितळ व ग्रीनिच इस्पितळ, सेंट स्टीफन्स चर्च, वॉलब्रुक चर्च व सेंट मेरी-ली-बो चर्च या होत.

**रेनन, जोसेफ अर्नेस्ट** (१८२३-१८९२)—एक फ्रेंच भाषाशास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ता. त्यानें आपला 'व्हिए द जीझस' हा तत्त्वज्ञानपर ग्रंथ लिहून सर्व युरोपभर प्रसिद्धि मिळविली. त्यानें नंतर ख्रिस्ती धर्माच्या मुळाचा इतिहास देणारी ग्रंथमाला सुरू केली. हे ग्रंथ संशयवादी (नास्तिक) भूमिकेवरून लिहिलेले आहेत.

**रेनोद, पॉल** (१८७८- )—एक फ्रेंच मुत्सद्दी. हा प्रथम पॅरिस शहरांत वकिली करीत असे. पहिल्या महायुद्धांत त्यानें लष्करांत नोकरी केली. रशियन राज्यक्रान्तींत सायबेरियामधील ॲडमिरल कोल्टकच्या सैन्यांत तो होता. १९२५ सालीं बोसेस आल्प्स या विभागातर्फे फ्रेंच पार्लमेंटचा सभासद आणि १९२८ सालीं पॅरिसतर्फे सभासद झाला. १९३० नंतर फ्रानदिन

व तार्दो यांच्या प्रधानमंडळांत तो वसाहतमंत्री, न्यायमंत्री व अर्थमंत्री या जागीं होता. दालादिए प्रधानमंडळांत (१९३८–१९४०) तो अर्थमंत्री झाला व त्यानें कर वाढवून आणि लोकोपयोगी खात्याचा खर्च कमी करून फ्रान्सची आर्थिक स्थिति सुधारली. म्युनिक येथें जर्मनीबरोबर सलोखा राखण्याचें ठरवलेलें धोरण रेनोदला पसंत नव्हतें. म्हणून फ्लानदिनचा पक्ष सोडून तो स्वतंत्र झाला. दुसरें महायुद्ध फार जोमानें चालवावें म्हणून त्यानें जाहीर भाषणें करून बरीच प्रसिद्धि मिळविली, आणि १९४० च्या मार्च महिन्यांत दालादिएनंतर मुख्य प्रधान झाला; पण १९४० च्या जूनमध्यें फ्रान्सचा पाडाव जर्मनीनें केल्यावर रेनोदच्या मंत्रिमंडळाचें पेटाँच्या गटानें उच्चाटन केलें व रेनोदला कैदेंत ठेवलें.

**रेनॉल्ड्स, सर जोशुआ** (१७२३–१७९२)—एक इंग्रज प्रतिमा-चित्रकार (पोर्ट्रेट पेंटर). त्याची विशेष प्रसिद्ध चित्रें आहेत तीं–'डचेस ऑफ हॅमिल्टन', 'मिसेस नेझबिट ॲज सर्स', 'डॉ. जॉन्सन', 'मिसेस सिडॉन्स ॲज दि ट्रॅजिक म्यूज' आणि 'मिस ग्वॉटकिन ॲज सिंप्लिसिटी'. १७६८ सालीं रॉयल ॲकेडमी स्थापन झाल्यावर तो त्या संस्थेचा पहिला अध्यक्ष झाला. १८८४ सालीं त्याला ब्रिटिश राजघराण्याचा मुख्य चित्रकार या जागेवर नेमण्यांत आलें. त्यानें जीं चित्रकला-विषयावर व्याख्यानें दिलीं तीं फार प्रसिद्ध आहेत. त्याचीं चित्रें नॅशनल गॅलरी आणि स्टेट गॅलरी या प्रदर्शनालयांत आणि इतर अनेक इंग्रज लोकांच्या खाजगी चित्रसंग्रहांत ठेवलीं आहेत.

**रेन्वार, पीएर ओग्युस्त** (१८४१–१९११)—हा एक फ्रेंच चित्रकार होता. मोनेट सेझाने, पिझारो आणि दिआझ हे ह्याचे सहकारी होते. यानें अनेक विषयांचीं चित्रें काढिलीं आहेत. त्यांत स्थिरवस्तू, नैसर्गिक देखावे व व्यक्ति-चित्रें हीं आहेत. परंतु तो विशेषतः मनुष्याकृती चित्रित करण्यांत आपलें कौशल्य खर्च करीत असे.

**रेम्ब्रँट, हार्मेंझ फॉन रिन** (१६०६–१६६९)—एक डच कलापद्धतीचा चित्रकार व अम्ललेखनकलावंत (एचर). त्याच्या चित्रकलेंतील प्रगतीचे तीन कालविभाग आहेत. पहिल्या कालविभागांत (१६२७–१६३९) त्यानें धार्मिक विषयावरील पुष्कळ चित्रें काढलीं. त्यांत पुढील सुप्रसिद्ध आहेत : 'लेसन इन् ॲनॅटमी' (शारीरशास्त्रांतील धडा), 'क्वीन आर्टेमिसीया', 'बाथशेबा' आणि 'दि वाइफ ऑफ सॅमसन' (सॅमसनची बायको). त्याच्या दुसऱ्या कालविभागांतील (१६४०–१६५४) चित्रें आहेत तीं : 'दि नाइट वॉच' (रात्र पहारा), 'दि वूमन टेकन इन् ॲडल्टरी' (व्यभिचारास प्रवृत्त झालेली), 'टॉबिट ॲन्ड हिज वाइफ', 'दि बर्गोमास्टर ॲन्ड हिज वाइफ', 'डिसेंट फ्रॉम दि क्रॉस' (क्रूसवरून खालीं), 'पोर्ट्रेट ऑफ कॉपेनॉल', 'बाथशेबा' 'वूमन बेदिंग' (स्नान करीत असलेली–ओलेती). त्याच्या तिसऱ्या कालविभागांतील (१६५५–१६६८) चित्रें आहेत तीं : 'जॉन दि बॅप्टिस्ट प्रीचिंग', 'पोर्ट्रेट ऑफ जॅन सिक्स', 'दि ॲडोरेशन ऑफ दि मगी' (मगीची उपासना), 'दि सिंडिक्स ऑफ ॲम्स्टरडॅम', 'दि प्रॉडिगल सन' आणि 'दि सपर ॲट मास'. अम्ललेखनकलेंत रेम्ब्रँट इतका उत्तम कलावंत (एचर) अद्याप झालेला नाहीं. त्याच्या चित्रांमध्यें मनुष्यस्वभावाचें उत्तम ज्ञान, तसेंच शोकरस, करुणरस, विनोद, इत्यादिकांचे भाव उत्कृष्टपणें व्यक्त करण्याची कला दिसून येते.

**रेम्युसात, चार्लस फ्रँकाज मारी** (१७९७–१८७५)—एक फ्रेंच मुत्सद्दी व तत्त्वज्ञानी. राजकारणाबरोबरच हा लेखनहि करीत असे. तो उत्कृष्ट वक्ताहि होता. त्याच्या ग्रंथांत इंग्लंडवर बरेच ग्रंथ आहेत.

**रेयेज, अल्फान्सो** (१८८९–    )—एक मेक्सिकन पंडित, कवि, निबंधकार व मुत्सद्दी. फ्रान्स आणि स्पेन या राष्ट्रांच्या वकिलातींत नोकरी केल्यानंतर अर्जेंटिना आणि नंतर ब्राझील या देशांत वकील म्हणून रेयेजची नेमणूक झाली. यापुढेंहि त्यानें मेक्सिकोची राजकीय तशीच बौद्धिक सेवा केली व अमेरिकन मुत्सद्यांत आणि विद्वानांत नांव मिळविलें. फ्रेंच, रशियन आणि इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरेंहि त्यानें केलीं. त्याच्या ग्रंथांतील उत्कृष्ट उताऱ्यांचा एक संग्रह १९४४ त प्रसिद्ध झाला आहे.

**रेवदंडा**—मुंबई, कुलाबा जिल्हा, एक बंदर. अष्टागर या प्रसिद्ध भागांत रेवदंड्याचा समावेश होतो. रेवती द्वीप असें याचें जुनें नांव असावें. चौलाबरोबर रेवदंड्याचा उल्लेख इतिहासांत पुष्कळ वेळां येतो. पोर्तुगीजांनीं रेवदंड्यांत बरीच सत्ता गाजविली होती. किल्ल्यांत कित्येक त्यांच्या पडक्या इमारती व तोफा आहेत. येथें कोंकण एज्यु. सोसायटीचें एक हायस्कूल चालतें.

**रेवा**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत, म्हणून याची जाति औडुव–औडुव आहे. वादी स्वर गांधार आहे व संवादी धैवत आहे. हा राग सायंगेय आहे. पहाटेच्या बिभास रागाचा हा

सायंगेय जवाच आहे असें कांहीं पंडितांचें मत आहे. हा दुर्मिळ रागांपैकीं एक आहे.

**रेवाकांठा**—मुंबई इलाख्यांतील एक जुनी संस्थानी एजन्सी. यांत सुरगणा संस्थान व डांग जहागिऱ्या येत. गुजराथेंतील लहान ६१ संस्थानांचा हा गट असे. क्षे. फ. ४९७० चौ. मै. व लो. सं. सुमारें पांच लाख. रेवा किंवा नर्मदा नदीच्या कांठाच्या प्रदेशाला रेवाकांठा हें नांव पडलें आहे. मही नदीच्या कांठचा कांहीं प्रदेशहि या एजन्सींत मोडत असे. रतनमाळचें पठार या एजन्सींत असून अकीक ( अगेट ) रत्नें त्यावर सांपडतात. संस्थानांमध्यें राजपिपला सर्वांत मोठें आहे. नद्याकांठचा भाग फार सुपीक आहे. सर्व धान्यें व फळें होतात. जंगल भाग बराच आहे. त्यांत साग व मोह हीं झाडें मुख्य आहेत.

प्राचीन काळीं अनहिलवाडच्या राजघराण्याकडे हा मुलूख होता. १६ व्या शतकापर्यंत रजपूत राजे अमल करीत होते. पुढें अहमदाबादचे सुलतान व नंतर मराठे यांचे अमल एकामागून एक बसत गेले. १८२६ त ही एजन्सी स्थापिली गेली.

**रेवा संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक मोठें संस्थान. क्षेत्रफळ १३,००० चौरस मैल व लोकसंख्या ( १९४१ ) १८,२०,४४५. कैमूर पहाडामुळें संस्थानाचे दोन भाग पडले आहेत. टेंकड्यांतून खनिजें सांपडतात. प्रदेश फार रमणीय आहे. हवा निरोगी असून पाऊस सुमारें ४१ इंच पडतो. शें. ६४ लोक शेतकी करून राहतात. मुख्य पिकें तांदूळ, मका, बाजरी, गहूं व तीळ हीं होत. व्यापार फारसा नाहीं. संस्थानचें उत्पन्न ६५ लक्ष रुपये आहे. आतां हें संस्थान विंध्य प्रदेश संघांत समाविष्ट आहे.

संस्थानिक सोळंकी वंशाचे बाघेल रजपूत आहेत. १३ व्या शतकापासून हा राजवंश आहे. मध्यंतरीं अल्लाउद्दिनाच्या स्वाऱ्या झाल्यानंतर कांहीं काळ हें घराणें नामशेष झालें होतें. मराठ्यांनीं संस्थानचे जे प्रदेश घेतले होते ते १८५७ च्या युद्धांत इंग्रजांना मदत केल्यामुळें संस्थानिकांना परत मिळाले. हल्लींचे महाराज धीरजमार्तंडसिंह हे १९४६ सालीं गादीवर आले.

संस्थानची राजधानी रेवा शहर चांगलें तटबंदीचें आहे. राजवाडा व सरकारी कचेऱ्या, शाळा, छापखाने, वगैरे इमारती चांगल्या आहेत. लो. सं. सुमारें २५,०००.

**रेवाचिनी**—[ ऱ्हुम ऑफिसिनेल; ऱ्हुबार्ब ]. ही वनस्पति गुल्-इ-हमक्षा ( पॉलीगोनासी ) वर्गांतील असून मध्य आशियांतील आहे. आपल्याकडे मलबार, त्रावणकोर, खंडाळा, वगैरे घाट या ठिकाणीं होतात. खंडाळ्याकडे यास तावीर म्हणतात. याच्या फांद्या मोठ्या वाढतात. रेवाचिनी सारक व स्तंभक आहे. इंग्रजी रेवाचिनी औषधी असून अन्नासारखीहि वापरतात. रेवाचिनीचीं पानें मात्र विषारी असतात. चीनमधून ही फार येते.

झाडांत एक प्रकारचें पिवळें राळेसारखें द्रव्य असतें. त्यास 'रेवाचिनीचा शिरा' म्हणतात. याचा रंगासाठींहि उपयोग होतो.

**रेशीम**—पुराणकालापासून रेशमी वस्त्रें वापरण्याची प्रथा दिसून येते. संस्कृतांत चीनांशुक, पट, कौशेय हीं नांवें रेशमाला आहेत. रेशीम हा शब्द इराणांतून आला आहे. रेशीम हें एक प्रकारच्या कीटकाच्या कोशापासून निघणाऱ्या चकचकीत धाग्यापासून तयार करतात. या कीटकाची मादी उन्हाळ्यांत आपलीं अंडीं तुतीच्या पानांवर घालते. हीं अंडीं उबविण्याकरितां एका खोलींत ८०° फॅ. उष्णतामानांत ठेवतात. आठ-दहा दिवसांत अंड्यांतून किडे बाहेर पडतात. नंतर तीं तुतीचीं पानें कीटकांसह बांबूच्या मांडवीवर ठेवतात. यांपासून कोश बनतात. हे

**रेशमाचा किडा**

[ १. आळी ( कॅटेपिलर ). २. कोश. ३. पतंग. ४ अंडीं. ]

बनावयास सहापासून आठ आठवडे लागतात आणि या काळांत हे किडे आपली त्वचा चार वेळां टाकतात. दहा दिवसांत यांची तीन इंच पूर्ण वाढ होते. यांचें रूपांतर व्हावयाच्या सुमारास या बांबूच्या मांडवीवर तुतीच्या डाहळ्या टाकण्यांत येतात. नंतर हे किडे स्वतःच्याभोंवतीं तंतूचें वेष्टन करून कोश बनवितात. हे कोश बनण्यास तीन ते पांच दिवस लागतात. ही अवस्था तीन आठवडे राहते व त्यानंतर पतंग बाहेर पडतो. परंतु ज्यांच्यापासून रेशीम काढावयाचें त्या कोशांतील किड्यांस पतंगाच्या अवस्थेस पोंचूं देत नाहींत. कोश कीटकांसह गरम पाण्यांत टाकण्यांत येतात व त्यांपासून रेशीम उकलून काढण्यांत येतें. एका कोशापासून तीनशें ते चारशें वार रेशीम निघतें. रेशीम देणाऱ्या किड्यांच्या अनेक जाती आहेत. रेशीम काढण्याची कला प्रथम चीन देशांत जन्म पावली व अद्यापिहि चीन देश सर्व जगांत या बाबतींत पुढें आहे.

एका कोशापासून एक धागा याप्रमाणें उकलून घेतल्यावर अनेक धागे गोंदानें एकत्र डकवून त्यांचा एक धागा करून गुंडाळण्यांत येतो. कोशापासून अर्धा धागा काढून घेतल्यावर पुढील धागा अधिक बारीक येऊं लागतो. या रेशमास कच्चें रेशीम म्हणतात. नंतर तें धुऊन, गुंडाळून स्वच्छ करण्यांत येतें व त्याच्या कांड्या भरण्यांत येतात. नंतर त्यास पीळ घालण्यांत येतो. नंतर या पीळ घातलेल्या धाग्यांचे पुन्हां तीन-चार पाहिजे तसे धागे एकत्र करून पीळ घालण्यांत येतो. नंतर तें विणण्याच्या कामीं उपयोगांत आणण्यांत येतें. टसर रेशीम पाहा.

कृत्रिम रेशीम—कृत्रिम रेशीम निरनिराळ्या अनेक पद्धतींनीं करण्यांत येतें व त्याचे प्रकारहि अनेक आहेत. सामान्यतः मूलद्रव्यापासून एक प्रकारचा नरम जिलेटीनसारखा रांधा तयार करून तो हवेमध्यें किंवा एखाद्या घनकारक द्रवामध्यें घालून घट्ट करण्यांत येतो. हा रांधा कापूस किंवा लोंकरीचा बोळा यांपासून द्रावण करून तयार करण्यांत येतो. कृत्रिम रेशीम करण्याकरितां या रांध्याला सूक्ष्म छिद्रातून जोरानें बाहेर काढून त्याचे लांब धागे तयार करण्यांत येतात. असे सुमारें बारा धागे एकत्र करून त्यांस पीळ भरून एक दोरा विणण्यास योग्य असा तयार करण्यांत येतो. अशा दुपदरी पिळाच्या विणावयाच्या एका धाग्यामध्यें २४ पदर असून मूळ धागे सुमारें तीनशें असतात.

आंखूड धाग्याचें कृत्रिम रेशीम लोंकर किंवा कापूस यांसारखें घेऊन त्याचें सूत कांततां येतें व कांहीं प्रकारामध्यें कृत्रिम रेशीम आणि लोंकर एकत्र करून धागा तयार करण्यांत येतो. अशा धाग्यांमध्यें कृत्रिम रेशमामुळें चमक येते.

कृत्रिम रेशमांतील मुख्य गुण म्हणजे त्यावर दिसणारी चमक होय. व ही विणावयाच्या धाग्यामध्यें जितके मूळ कृत्रिम रेशमाचे धागे असतील व त्यांस ज्या मानानें पीळ दिला असेल त्यावर अवलंबून असते. घट्ट पीळ दिला असतां कृत्रिम रेशमाचें कापड अधिक टिकाऊ होतें. परंतु असा धागा कमी लवचिक होतो.

कृत्रिम रेशीम हें खऱ्या रेशमापेक्षां स्वस्त असतें, परंतु तें खऱ्या रेशमापेक्षां जड असतें. त्यामुळें सारख्याच वजनांत खरें रेशीम अधिक येतें व कृत्रिम रेशीम कमी येतें. कृत्रिम रेशमाची वीण घट्ट असतां कामा नये.

खऱ्या रेशमापासून कृत्रिम रेशीम हें ओळखावयाचें असल्यास त्यास काडी लावून पाहावी. तें सहज जळून जाऊन त्याची पांढरी ज्योत दिसते व खालीं फक्त राख दिसते. खरें रेशीम सहसा पेट घेत नाहीं व त्यांतून ज्वाला निघत नाहींत व राखेऐवजीं एक गोळी बनून दुर्गंधि सुटते. कृत्रिम रेशीम धुतांना काळजी घ्यावी लागते. पाणी कोमट वापरावें व साबण शुद्ध वापरावा. कपडा आपटूं नये. पिळल्यावर आंत राहिलेलें पाणी रुमालानें धरून पिळून काढावें. निरनिराळ्या तऱ्हेच्या कृत्रिम रेशमांस रंग देण्याच्या पद्धती निरनिराळ्या आहेत व त्याकरितां प्रथम एक नमुना रंग देऊन पाहावा व नंतरच सर्व वस्त्रांस रंग द्यावा.

१९४१ सालीं जगांत कच्च्या रेशमाचें उत्पादन ४८,००० मेट्रिक टन झालें. जपान व इटली या देशांत सर्वांत अधिक रेशीम तयार होतें. हिंदुस्थानांत त्या सालीं ३०४ मे. टन तर जपानमध्यें २५,००० वर उत्पादन झालें. रशियामध्येंहि आतां इटलीच्या खालोखाल रेशीम तयार होऊं लागलें आहे.

**रैदास**—मीराबाई व चितोडची राणी 'झाली' या दोघींचा हा गुरु होता. हा चांभार असून याचा जन्म उत्तर हिंदुस्थानांत काशीस झाला. हा रविदास, रोहिदास चांभार या नांवांनींहि प्रसिद्ध आहे. यानें कांहीं कविताहि केल्या आहेत. ईश्वरभजनांत हा सदा निमग्न असे. गुजराथ प्रांतांत याचे अनुयायी असून ते आपणांस 'रविदासी' असें म्हणवतात. महीपतीच्या भक्तिविजयांत याचें चरित्र दिलें असून त्यांत याचे चमत्कार वर्णन करून सांगितले आहेत. हा कबिराचा समकालीन असावा. वयाच्या १२० व्या वर्षी यानें आपला देह ठेवला म्हणतात.

**रो, सर टॉमस** (१५८०–१६४४)—एक सुप्रसिद्ध इंग्लिश वकील. इंग्रजी साम्राज्याची इमारत हिंदुस्थानांत बळकट करण्याच्या कामीं ज्यांनीं प्रयत्न केले त्यांपैकीं हा एक आहे.

**रोकडीची पत**—(कॅश क्रेडिट). पेढीनें खातेदाराला पैसे आगाऊ देण्याची ही एक पद्धत आहे. या प्रकारचें खातें पेढीवर उघडून व्यापारी लागेल त्याप्रमाणें ठराविक रकमेपर्यंत पैशाची उचल करूं शकतो व त्याचा भरणाहि सवडीप्रमाणें करतो. अशा व्यवस्थेसाठीं पेढी त्याची कांहीं मालमत्ता किंवा जामीन लावून घेत असते.

**रोगजंतुनाशन**—(डिसिन्फेक्शन). संसर्गजन्य रोगाच्या जंतूंचा रासायनिक अथवा इतर उपायांनीं नाश करण्याच्या क्रियेस हें नांव आहे. सामान्य रोगांचे जंतू दहा मिनिटें उकळत्या पाण्यांत ठेविले असतां किंवा अर्धा तासपर्यंत उष्ण हवेंत ठेवले असतां मरतात. परंतु ज्यामुळें सडण्याची क्रिया घडते किंवा ज्या सूक्ष्म जंतूंमुळें कांहीं रोग उत्पन्न होतात अशा जंतूंस मारण्याकरितां अधिक वेळ लागतो. अशा जंतूंचा नाश करण्याकरितां हर (क्लोरीन), अद (आयोडिन), कर्बाम्ल (कॅर्बोलिक ॲसिड), शुभ्रक (ब्लीचिंग पावडर), पालाश परमंगलित (पोटॅशियम परमँगनेट), पारद परहरिद (पर क्लोराइड ऑफ मर्क्यूरी), फॉर्फ्युलिन फ्लेव्हिन, वगैरे रासायनिक द्रव्यें वापरतात. कर्बाम्ल हें सर्वांत अधिक परिणामकारक आहे. परंतु हें जपून वापरावें लागतें. कारण तें विषारी असून त्यापासून भाजल्याचे व्रण होतात. व ते एकास चाळीस या प्रमाणांत पाण्यांत विरघ-

ळविले असतां जंतुनाशक म्हणून निरुपयोगी होतें. कातडीवर लावण्याच्या दृष्टीनें टिंक्चर आयोडीन हें सर्वांत सोयीचें होय. संसर्गजन्य रोग झाला असतां मनुष्याच्या शरीरापासून निघणाऱ्या सर्व मलांचा नाश करणें हें महत्त्वाचें आहे. याकरितां कर्बाम्लाचा उपयोग करावा. तसेंच रोग्यास देण्यांत येणाऱ्या सर्व वस्तू जंतुरहित करण्यांत याव्या. मलावर शुभ्रक ( ब्लीचिंग पावडर ) पूड टाकावी. रोगी बरा झाल्यानंतर त्याचें आंथरूण व सर्व कपडे जंतुरहित करण्यांत यावे. ( जंतुनाशक द्रव्यें, जंतुनाशनक्रिया पाहा ).

**रोगजंतुसिद्धान्त**—मनुष्याच्या शरीरामध्यें कांहीं सूक्ष्म जंतूंची वाढ झाल्यामुळें विशिष्ट प्रकारचे रोग उत्पन्न होतात, अशा तऱ्हेचा सिद्धांत १८६० ते १८७७ याच्या दरम्यान पुढें येऊं लागला. अशा सूक्ष्म जंतूंपासून पू उत्पन्न होतो व शरीर कुजूं लागतें. या शोधामुळें आणि लिस्टर यानें शस्त्रक्रियेच्या वेळीं होणाऱ्या जखमा जंतुरहित ठेवल्या असतां रक्ताचा विघार थांबवितां येतो, ही गोष्ट निदर्शनास आणल्यामुळें या सिद्धांताची ऐतिहासिक भूमिका तयार झाली. १८७७ मध्यें कॉच यानें जेव्हां गुरांस होणारा काळपुळी हा रोग एका सूक्ष्म जंतूपासून होतो हें सिद्ध करून दाखविलें तेव्हां या सिद्धान्तास पूर्णपणें बळकटी आली. यानंतर अनेक रोग अशा सूक्ष्म जंतूंपासून उत्पन्न होतात ही गोष्ट दिसून येऊं लागली. उदा., गळवें ( १८८१–१८८४ ), एरिसिपेलास ( १८८४ ), न्युमोनिया ( फुप्फुसदाह–१८८६ ), एपिडेमिक सेरिब्रो-स्पायनल मेनिनजॅटिस (सांथीचा मज्जारज्जु-मस्तिष्कदाह–१८८७), टयूबरक्युलॉसिस (क्षय–१८८२), ग्लँडर्स (श्लेष्मा–१८८२), टायफॉइड फीवर (विषम–१८८०–१८८४), व्हॅसिलरी डिसेंट्री (आमांश–१८९८), डिप्थेरिया (घटसर्प–१८८३–१८९०), टिटॅनस (धनुर्वात–१८८५ ते १८८९), कॉलरा ( १८८४ ते १८९३ ), प्लेग ( १८९४ ), सिफिलिस ( उपदंश–१९०५ ) असे सूक्ष्म जंतू शरीराच्या एखाद्या पृष्ठभागावर वाढूं लागतात किंवा एक प्रकारचें विष तयार करतात व तें विष शरीरांत भिनत जातें किंवा हे सूक्ष्म जंतूच शरीरांत प्रवेश करून एखाद्या त्यास अनुकूल अशा अवयवांत जाऊन राहतात व तेथून रोगाचा प्रसार करतात. शरीर हें त्यांच्या हल्ल्याचा सतत प्रतिकार करीत असतें. कांहीं शरीरांतील पेशी त्यांस आपल्यामध्यें गुंडाळून घेऊन त्यांचा नाश करतात. तसेंच रक्तामध्यें कांहीं द्रव्यें उत्पन्न होऊन त्या द्रव्याच्या योगानें हे रोगाचे जंतू नाश पावतात किंवा त्यांचा परिणाम नाहींसा होतो. प्रत्येक वेळीं संसर्ग झाला असतां हटकून रोग होतोच असें नाहीं, तर रोग होणें किंवा न होणें हें विशिष्ट व्यक्तीच्या शरीर-प्रकृतीवर अवलंबून असतें. हिंवतापाच्या बाबतींत असा रोगोत्पादक सूक्ष्म जंतु न सांपडल्यामुळें दुसरा एक महत्त्वाचा जंतु-सिद्धान्त प्रस्थापित झाला. यामुळें असें सिद्ध झालें कीं, कांहीं सूक्ष्म जंतूंपेक्षां मोठाले जंतू रोगाचा प्रसार करण्याचें काम करतात व अशाच एका प्रकारामुळें हिंवताप होतो.

**रोंगण**—एखाद्या वस्तूवर वातावरणांतील हवेचा परिणाम होऊं नये म्हणून तीवर जो एक पातळ पदार्थाचा थर देतात त्यास रोंगण म्हणतात. याचे तीन प्रकार असतात : १. तेलाचें रोंगण–यामध्यें सुकणारें पण वाफ होऊन न जाणारें ( उदा., अळशीचें वगैरे ) तेल वापरण्यांत येतें. तें गरम करून त्यांत शिशाचें प्राणिद, मंगल (मँगनीज) लवणें, इत्यादि पदार्थ घालण्यांत येऊन त्याची सुकण्याची शक्ति वाढविण्यांत येते. २. लाखेचें रोंगण–या प्रकारांत अळशीच्या तेलाच्या रोंगणांत राळ वगैरे पदार्थ विरघळविण्यांत येतात. त्यामुळें हें रोंगण पहिल्या रोंगणापेक्षां अधिक कडक व अधिक टिकाऊ होतें. ३. बाष्पभावी रोंगणें–हीं स्पिरिटमध्यें व राळ, लाख, डांबर, वगैरे पदार्थ विरघळून किंवा टर्पेन तेलांत मिसळून बनविण्यांत येतें. हें रोंगण लवकर वाळतें व अधिक तकतकीत दिसतें. ह्यांत थोडें अळशीचें तेल मिसळल्यास त्यास चिरा पडत नाहींत.

**रोगप्रतिबंधकता**—(इम्युनिटी). सामान्यतः मनुष्यामध्यें रोगोत्पादक सूक्ष्म जंतूंचा प्रतिकार करण्याची एक प्रकारची शक्ति असते. तीस रोगप्रतिबंधकता असें म्हणतात. ही शक्ति मनुष्यामध्यें कांहीं बाबतींत स्वाभाविक असते. कांहीं बाबतींत एकदां तो रोग प्रत्यक्ष होऊन गेल्यामुळें होते, किंवा कृत्रिम रीतीनें लस टोंचून उत्पन्न करण्यांत येते.

**रोझॅनिलाइन**—हिरव्या रंगाचा धातूसारखा चमकणारा स्फटिकमय पदार्थ. हा पाण्यांत विरघळला म्हणजे गर्द तांबडा तयार होतो. रेशीम, लोंकर किंवा सूत रंगविण्यासाठीं त्याचा उपयोग होतो.

**रोझेटा दगड**—नेपोलियननें ईजिप्तवर स्वारी केली त्या वेळीं १७९९ मध्यें फ्रेंच लोकांस रोझेटा येथें एक काळा दगड सांपडला. हल्लीं तो ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे. या दगडावर टॉलेमी एपीफॉनीज याच्या ख्रि. पू. १९५ मधील आज्ञा कोरलेल्या आहेत. या चित्रलिपि, डेमोटिक लिपि आणि ग्रीक लिपि या तीन लिपींत लिहिलेल्या आहेत. एकच मजकूर तीन लिपींत व भाषांत खोदलेला असल्यामुळें त्यावरून चित्रलिपीचें वाचन करण्यास उत्तम साधन मिळालें.

**रोझेनबर्ग, आल्फ्रेड** ( १८९४–     )— जर्मन नाझी पक्षाच्या तत्त्वज्ञानाचा एक प्रमुख पुरस्कर्ता. तो रशियांतील रेव्हल गांवीं जन्मला आणि १९१४ सालच्या महायुद्धांत त्यानें रशियन सैन्यांत नोकरी केली. त्या युद्धानंतर तो जर्मनींत आला आणि

हिटलरच्या राजकारणांत आरंभापासून सामील झाला. नाझी पक्षाची तत्त्वप्रणाली रोझेनबर्गनें आपल्या 'दि मिथ ऑफ दि ट्वेन्टिएथ सेंचरी' (विसाव्या शतकांतील दंतकथा) या पुस्तकांत प्रतिपादन केली व तो ग्रंथ नाझी पक्षाचा प्रमुख आधारग्रंथ बनला. ही गाथा नॉर्डिक वंश व जर्मन राष्ट्रीय पक्ष आणि जगज्जेतें जर्मन राष्ट्र यांबद्दलची आहे. रोझेनबर्गनें या पुस्तकांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, आधुनिक इतिहासांतली मुख्य अनिष्ट गोष्ट ही कीं, फ्रेंच राज्यक्रान्तीमध्यें (१७८९) नॉर्डिक वंशाचा सरदारवर्ग (अरिस्टॉक्रसी) नष्ट झाला, आणि हलक्या वंशांतल्या लोकांच्या हातीं राज्यसत्ता गेली. त्या लोकांनीं समाजविघातक अशा उदारमतवादी मतांचा प्रसार केला, व त्या मतप्रणालींतूनच मार्क्सवाद उदय पावला; व त्या मार्क्सवादामुळें रशियन राज्यक्रान्ति घडून आली. ही जी अनर्थ-परंपरा फ्रेंच राज्यक्रान्तींतून निर्माण झाली, ती जर्मन राष्ट्रानें नाहींशी केली पाहिजे. झेक, पोल, रशियन व इतर स्लाव्ह लोक हलक्या वंशाचे असून ते स्वतंत्र राज्यें चालविण्यास लायक नाहींत, म्हणून जर्मनीनें त्या सर्वांना आपल्या राज्यछत्राखालीं आणलें पाहिजे. रोझेनबर्गनें ख्रिस्ती धर्महि नालायक ठरवला आहे, आणि चर्चविरुद्ध नाझी मोहीम चालविण्याच्या कामीं स्वतःचें सर्व लक्ष केंद्रित केलें. नाझी पक्षांत तो सर्वश्रेष्ठ मानला जाई, व नाझी पक्षाच्या एका मुखपत्राचा तो मुख्य संपादक होता.

**रोटरी क्लब**—धंदेवाईक लोकांची ही आंतरराष्ट्रीय संस्था आहे. पहिला रोटरी क्लब शिकागो येथें १९०५ त स्थापन झाला व आज त्याचें मुख्य ठिकाण शिकागोच आहे. प्रत्येक धंद्यांतील एकेक सभासद क्लबांत घेण्यांत येतो. ठराविक दिवशीं सभासद जमतात व जेवणानंतर एखाद्या उपयुक्त विषयावर चर्चा करतात. १९४६ सालीं जगांत एकंदर ५,६७८ क्लब होते व सभासदांची संख्या २,६२,००० होती. स्वतःचा उत्कर्ष, धंद्याचा उत्कर्ष, समव्यवसायी मंडळींत स्नेहभाव व उपयुक्त ज्ञानाची देवघेव यांसारखे संस्थेचे उद्देश आहेत. 'स्वार्थ नव्हे, तर सेवा' हें संस्थेचें ब्रीदवाक्य आहे. हिंदुस्थानांत सुमारें ५० क्लब आहेत.

**रोडिन, ऑगस्ट** (१८४०-१९१७)—एक फ्रेंच खोद-कलाकार. 'दि पोर्टल ऑफ हेल' (नरकद्वार) ही त्याची फार मोठी कलाकृति असून, तो तें काम २० वर्षें करीत होता. त्याच्या दुसऱ्या सुप्रसिद्ध कलाकृती 'दि बर्जेसेस ऑफ कॅले' आणि 'ल्पांसर' ह्या आहेत. त्यानें आधुनिक खोदचित्रकलेवर बराच परिणाम घडवून आणला आहे.

**रोबक** (१७१८-१७९४)—एक इंग्रज रसायनशास्त्रज्ञ. हा डॉक्टर होता; पण याला रसायनशास्त्राची फार आवड असे. त्यानें गंधकिताम्ल ठेवण्यासाठीं शिशाच्या टाक्या उपयोगांत आणण्याची युक्ति काढली व ती फार फायदेशीर ठरली. ओतीव लोखंडापासून लवचिक लोखंड तयार करण्याची युक्ति याचीच असून यानें जेम्स वॉटला इंजिनें करण्याच्या कामीं बरीच मदत केली.

**रोबेस्पिएर, मॅक्झिमिलिपन मारी इसिदोर** (१७५८-१७९४)—एक फ्रेंच मुत्सद्दी व क्रांतिकारक. तो १७८९ च्या राज्यक्रांतींत स्टेट्स जनरलचा डेप्युटी होता व लवकरच आपल्या प्रतिस्पर्ध्यांना खालीं ओढून तो सत्ताधीश झाला व सार्वजनिक सुरक्षितता समितीची त्यानें स्थापना केली.

या समितीनें १७९३ सालीं पॅरिसमध्यें हलकल्लोळ उडवून दिला. अनेकांना फांसावर चढविलें. त्यांत रोबेस्पिएरचे जुने प्रतिस्पर्धी होते हें सांगावयास नकोच. तथापि तो आदर्श समाजाचा सिद्धांत प्रतिपादीत असून हें हत्याकांड त्याला पोषकच आहे, असें सांगे. पण पुढें त्याच्याविरुद्ध एक पक्ष तयार होऊन त्यानें याला तुरुंगांत टाकलें. नंतर त्याच्या तेवीस सहकाऱ्यांसह त्याला फांसावर लटकविलें.

**रोम**—इटलीची राजधानी व जगांतील एक मोठें प्रसिद्ध शहर. हें टायबर नदीच्या कांठीं सात टेकड्यांवर वसविलें आहे. प्राचीन काळापासून रोमची प्रसिद्धि आहे. रोमन कॅथोलिक पंथाचें हें केंद्रस्थान असून येथें पोप राहतो. कलाकौशल्याबद्दल रोमची ख्याति पूर्वीपासूनच आहे. शहरांत अनेक स्थळें याची साक्ष देतात. शिक्षणसंस्था आणि व्यापारी ठिकाणें अनेक आहेत. सेंट पीटरचें देवस्थान जगांत सर्वांत मोठें ख्रिस्ती देवस्थान म्हणतां येईल. येथील विद्यापीठ १३०३ सालीं स्थापन झालेलें आहे. लोंकरी आणि रेशमी कापड, कृत्रिम फुलें, मातीचीं भांडीं, जवाहीर, वाद्यें, वगैरे येथें तयार होतात. लो. सं. १४ लाख आहे.

रोमन लोकांच्या इतिहासांत रोमचा इतिहास समाविष्ट आहे. साम्राज्याचा ऱ्हास झाल्यावर पोपच्या राज्याचा इतिहासच उरला. १५२७ त बोर्बोनच्या कॉन्स्टेबलनें हें लुटलें; नंतर पुन्हां १७९८ त फ्रेंचांनीं हें उध्वस्त केलें. पोप सहावा पायस याला फ्रान्सला कैद करून नेलें व येथें रोमन लोकराज्य स्थापन करण्यांत आलें. १८४८ त पोप नववा पायस याला रोमहून हांकलण्यांत येऊन मॅझिनी आणि गॅरिबॉल्डी यांच्या नेतृत्वाखालीं दुसऱ्यानें लोकराज्य स्थापन झालें. पुढील सालीं फ्रेंचांनीं

रोम काबीज करून पोपला परत आणला. फ्रेंचांचें साम्राज्य १८७० मध्यें बुडाल्यावर पोपची रोमवरची सत्ता जाऊन इटालियन सैन्याचा त्यावर ताबा आला व पुढें ही संयुक्त इटलीची राजधानी बनली. (सु. विश्वकोश, वि. ४ था, प्रस्तावना पाहा.)

**रोमन कॅथोलिक**—कॅथोलिक मंडळी पाहा.

**रोमन भाषा व वाङ्मय**—रोमन लोकांची भाषा टायबरच्या दक्षिणेकडील पठारावर बोलली जाणारी लॅटिन होती. ओस्कन, उंब्रिअन यांसारख्या प्राचीन इटालियन बोलींप्रमाणें ही भाषा इंडो-युरोपियन किंवा आर्यन् भाषावंशाची एक शाखा असून इतर शाखापेक्षां ग्रीकशीं जास्त जवळची होती. प्रथम लहान प्रदेशांतच हिचा वापर होता. पण रोमन साम्राज्य जसें वाढत गेलें त्याप्रमाणें हिचा प्रसार वाढला व खिस्ती शकाच्या आरंभीं सर्व रोमन साम्राज्यांत ही चालूं लागली. लॅटिनची पूर्णावस्था सिसेरो, होरेस आणि व्हर्जिल यांच्या लेखनांत (खि. पू. १ ल्या शतकांत) दिसून येते, तर हिचा अभिजात काल इ. स. २ ऱ्या शतकांत संपतो. हॅड्रियनच्या कारकीर्दी (११७-१३८) पासून ऱ्हास सुरू झाला म्हणण्यास हरकत नाहीं.

पहिला रोमन साहित्यिक लिव्हिस अँड्रोनिकस होय. त्यानें खि. पू. २४० च्या सुमारास ग्रीक नाटकाचें एक रूपांतर रोम येथें दाखविलें. नंतर नीव्हिअसनें पहिल्या प्युनिक युद्धावर एक ऐतिहासिक काव्य लिहिलें. त्याचीं कांहीं नाटकें आहेतच. याच्यामागून पॅक्युव्हिअस व ॲक्यिअस हे शोकान्त नाट्यलेखक आले. त्यानंतरचा एनिअस हा रोमन काव्याचा जनक होय. या सर्व प्राचीन साहित्यिकांचें लेखन संपूर्णपणें उपलब्ध नाहीं.

रोमन हास्यप्रधान नाटकांचा जनक प्लाउटस (खि. पू. २५४-१८४) हा असून त्याच्यानंतर टेरेन्स होऊन गेला. त्यानें मेनँडर या ग्रीक नाटककाराचें उत्कृष्ट अनुकरण केलें. लुसिलिअस (खि. पू. १८०-१०३) हा रोमन विडंबनकाव्याचा निर्माता होय. लुक्रेटिअस (खि. पू. ९८-५५) हा चांगला खंबीर व कल्पक लेखक असून त्याचें तात्त्विक काव्य 'डी रेरुम नॅचुरा' हें उपलब्ध आहे. भावगीतें व शोकगीतें, तसेंच सूत्रबद्ध सुभाषितें यांत कॅटुलस (खि. पू. ८४-५४) हातखंडा होता.

ऑगस्टस् युगांत रोमन वाङ्मयांत नवें वारें खेळूं लागलें. या युगांतील पहिला कवि व्हर्जिल (खि. पू. ७०-१९) होय. हा रोमच्या महाकाव्यलेखकांचा अग्रणी म्हणतां येईल. त्याचा समकालीन होरेस (खि. पू. ६५-८) होय. याचीं भावगीतें व विडंबनकाव्यें उत्कृष्ट आहेत यांत शंकाच नाहीं. याच कालांत प्रॉपरटिअस व टिब्युलस हे प्रमुख शोकगीतलेखक होऊन गेले.



यांच्या वेळीं ओव्हिड (खि. पू. ४३-इ. स. १७) पुढें आला. अतिशय प्रसिद्ध विडंबनकार कवी म्हणजे पर्सिअस व जुव्हेनल होत. ल्युकन (इ. स. ३९-६५) व स्टॅटिअस यांचीं काव्यें फारच थंड भासतात. अलंकारांनीं त्यांत ऊच आणण्याचा निष्फळ प्रयत्न केला आहे. मार्टिअलच्या सुभाषितलेखनांत तत्कालीन सामाजिक जीवन अत्यंत ठळकपणें उतरलें आहे. व्हॅलेरिअस फ्लॅकस व सिलिअस इटॅलिकस यांचीं महाकाव्यें फार रुक्ष आहेत. पण सेनेका या अलंकारशास्त्रज्ञाचीं दहा शोकान्त नाटकें काव्यालंकारांनीं परिप्लुत आहेत. अशा निर्जीव काव्याचा मोठा काळ जाऊन शेवटीं ४०० च्या सुमारास क्लॉडिअन उदयास आला. त्याच्या काव्यांत मागच्या वाङ्मयांतील जिवंतपणा व सौंदर्य प्रतीत होतें.

रोमन गद्यवाङ्मयांत वक्तृत्व, इतिहास, तत्त्वज्ञान व न्यायशास्त्र हे प्रमुख विषय होत. कॅटो (खि. पू. २३४)पासून गद्य लेखनास आरंभ होतो. त्याचा शेतकीवरील ग्रंथ अद्यापि टिकून आहे. थोर रोमन लेखकांत सिसेरोचें स्थान पहिलें मानावें लागतें. व्हॅरो याचा 'ॲंटिक्विटीज', सीझरचा 'कॉमेंटरीज', कोर्नेलिअस नेपोस यानें लिहिलेलीं चरित्रें, व सॅलस्ट याचे ग्रंथ हीं सर्व ऑगस्टन-कालापर्यंतची प्रमुख ऐतिहासिक लेखननिर्मिति होय. लिव्हि (खि. पू. ५९-इ. स. १७) हा आगस्टनकालीन गद्य वाङ्मयाचा प्रमुख प्रतिनिधि ठरतो. नेरोच्या काळांतील अत्यंत महत्त्वाचे लेखक पेट्रोनिअस व सेनेका हे होत. पुढील काळांतील लेखकांचा अग्रणी थोरला प्लिनी असून त्याचा 'निसर्गेतिहास' हा ग्रंथ उपलब्ध आहे. क्विंटिलिअन (३५-११८) व सेक्स्टस जुलिअस फॉंटिनस हे या काळांतीलच होत. सेक्सटसचे नहर (ॲक्वेडक्ट) आणि लष्करी डावपेच यांवरील ग्रंथ पाहण्यासारखे वाटतील. कॉर्नेलिअस टॅसिटस (सु. ५४-११९) व धाकटा प्लिनी (६१-११३) हे थोर साहित्यिक नेर्व्हा, ट्राजन व हॅड्रिअन या बादशहांच्या अमदानींत होऊन गेले. स्युएटोनिअसनें बारा सीझरांचीं चरित्रें लिहिलेलीं आहेत. कॉर्नेनिअस फ्रॅन्टो हा मार्कस ऑरेलिअसचा गुरु असून त्याचा पत्रसंग्रह गेल्या शतकाच्या आरंभीं सांपडला. अभिजात रोमन गद्यलेखकांचें युग ऑलस जेलिअस (२ रें शतक) याच्या 'ॲटिक रात्री' या ग्रंथानें समाप्त होतें. हा ग्रंथ संकीर्ण विषयांचा आहे. प्रमुख रोमन लेखकांचीं चरित्रें या कोशांत स्वतंत्र दिलीं आहेत.

**रोमन भिंती**—इंग्लंडच्या उत्तर सरहद्दीवरील पिक्ट् व स्कॉट या लोकांच्या स्वाऱ्यांपासून संरक्षण करण्याकरितां ॲग्रीकोला, हॅड्रियन आणि सेप्टिमियस सेव्हेरस यांनीं कांहीं भिंती बांधल्या होत्या. यांपैकीं पहिली भिंत ॲग्रीकोला यानें सन ७९ मध्यें बांधावयास सुरुवात केली. ही टाइन नदीच्या मुखापासून

सॉलवे फर्थ या खाडीपर्यंत ८० मैल लांब होती. दुसरी फर्थ ऑफ फोर्थपासून फर्थ ऑफ क्लाइडपर्यंत ३६ मैल लांब होती. हॅड्रियन यानें १२१ मध्यें ती आणखी वाढविली, व पुढें सेप्टिमियस सेव्हेरस यानें सन २०८ मध्यें आणखी वाढविली व ती ब्रॉवनेस गांवापासून टाइन नदीवरील वॉलसएन्ड या गांवापर्यंत होती. या भिंतींचे अवशेष अद्यापि आढळतात.

**रोमन शिल्प**—रोमन लोकांनीं आपली ही शिल्पपद्धति कांहीं अंशीं एट्रुस्कन लोकांपासून व कांहीं अंशीं ग्रीक लोकांपासून घेतली व या दोहोंचा मिलाफ होऊन रोमन पद्धति रूढ झाली. या पद्धतीचा विशेष हा आहे कीं, तीमध्यें टस्कन व समुदाय (कॉंपोझिट) पद्धतीची रचना व अर्धवर्तुळाकृति कमानी योजलेल्या आढळतात. या पद्धतीनें पूर्वी ग्रीसमध्यें प्रचलित नसलेल्या अनेक प्रकारच्या इमारती बांधण्यांत आल्या आहेत. उदा., अँफी थिएटर ( अर्धवर्तुलाकार नाट्यमंदिर), सर्कस (वर्तुलाकार नाट्यमंदिर), नहर, पूल, हमामखाने, विजय तोरणें, इत्यादि. याप्रमाणें ही ग्रीक पद्धतीपेक्षां अधिक उपयुक्त असून भव्य व ठसठशीत वाटते.

**रोमन संस्कृति**—रोम शहराची संस्कृति म्हणजेच रोमन संस्कृति. [सु. वि. ४, प्रस्तावना पाहा.] खि. पू. ७५३–५१० हा काल रोमन लोकांच्या अतिशय भरभराटीचा गेला. या कालांत झालेल्या सात राजांनीं लोकांच्या मतानुसार राज्यकारभार चालविला. प्रत्येकाला नागरिकत्वाचें शिक्षण देण्यांत येई. या वेळीं रोमन लोकांची नीतिमत्ताहि अगदीं वरच्या दर्जाची होती. हा आद्य राजसत्ताक काळ होय. यानंतर खि. पू. ५१०–१३१ हा लोकसत्ताक काळ सुरू झाला. या कालांत रोमन लोकांनीं इटली देश आपल्या अमलाखालीं आणला व मॅसिडोनियाच्या राजसत्तेचा निःपात केला. कोणत्याहि प्रौढ व अनुभवी इसमास या वेळीं कॉन्सल होतां येई व सेनेटच्या हातांतच सर्व सत्ता असे. गुलामपद्धति या वेळीं समाजांत रूढ होती. रोमन वाङ्मयाची सुरुवात याच कालांत झाली. यानंतर खि. पू. १३७–३१ या लोकसत्ताक काळाच्या उत्तरार्धांत रोमन लोकांत यादवीनें ठाणें दिलें. कॉन्सल व ट्रायब्यून यांमध्यें तंटे होऊं लागले. सामाजिक स्थिति तर अगदींच निकृष्ट दर्जास पोहोंचली. मात्र एकच गोष्ट चांगली झाली, ती म्हणजे वक्तृत्वकला पुढें आली. यानंतरचा काळ म्हणजे बादशाही सत्तेचा काळ होय (खि. पू. ३०–इ. स. ४७६). ऑगस्टाइन काळ, भरभराटीचा काळ व अवनतीचा काळ असे याचे तीन भाग पडतात. ऑगस्टाइन कालांत रोमन लोकांची भरभराट झाली. तसेंच रोमन वाङ्मयहि बरेंच पुढें आलें. बादशाही अमलाच्या पहिल्या दोन शतकांत रोमनें मुलूखगिरी बरीच केली. तरी देशांतील दारिद्र्य कमी न होतां उलट वाढलें. लोकांत चैनीची प्रवृत्ति बळावली. वैवाहिक नीतिमत्ताहि निकृष्ट दर्जास पोहोंचली. प्राणघातक असे करमणुकीचे प्रकारहि दिसून येत. लोकांची ईश्वरावरील भक्ति डळमळूं लागली होती. खिस्ती संप्रदायी लोकांचाहि छळ होई. लेखनव्यवसाय व ग्रंथालयें मात्र या कालांत बरींच पुढें आलीं. या कालाच्या अखेरच्या तीन शतकांत रोमन साम्राज्य पूर्व व पश्चिम अशा दोन गटांत विभागलें गेलें. यानंतर या साम्राज्यावर रानटी जर्मानिक टोळ्यांचे हल्ले सुरू झाले व इ. स. ४७६ मध्यें हें साम्राज्य लयास गेलें. कॉन्स्टन्टाइन दि ग्रेट याची कारकीर्द ही या कालांतील महत्त्वाची कारकीर्द होय. कालमानानुसार रोमन साम्राज्यांतील जोम न वाढल्यानें हें साम्राज्य नाश पावलें. प्राचीन कालापासून हिंदुस्थान व रोम यांच्यामध्यें व्यापारी दळणवळण चालें व वकिलातीच्या रूपानेंहि प्रत्यक्ष संबंध येत.

**रोमनेस, जॉर्ज जॉन** (१८४८–१८९४)—एक ब्रिटिश जीवशास्त्रज्ञ. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते : 'ॲनिमल इन्टेलिजन्स' ( प्राण्यांची बुद्धि ), 'मेन्टल इव्होल्युशन इन ॲनिमल्स' ( प्राण्यामधील मानसिक विकास ), 'मेन्टल इव्होल्युशन इन् मॅन' ( माणसांतील मानसिक विकास), 'डार्विन ॲन्ड आफ्टर डार्विन', 'माइन्ड ॲन्ड मोशन' (मन आणि गति), 'ॲन एसे ऑन मोनिझम' ( एकतत्त्ववादावर एक निबंध ) आणि 'थॉट्स ऑन रिलिजन' ( धर्मासंबंधीं विचार ).

**रोमानेस्क शिल्प**—पश्चिम युरोपमध्यें पांचव्यापासून बाराव्या शतकापर्यंत रूढ असलेल्या एका शिल्पपद्धतीस हें सर्वसामान्य नांव दिलेलें आढळतें. या पद्धतीचे मुख्यतः दोन वर्ग पडतात : (१) पांचव्यापासून आठव्या शतकापर्यंत प्रचारांत असलेल्या रोमन शिल्पपद्धतीपासून बनलेली पण जरा कमी दर्जाची पद्धति, व (२) आठव्यापासून बाराव्या शतकापर्यंत रूढ असलेली नवीन पद्धति ; या पद्धतीमध्यें लॉंबर्ड, ऱ्हेनिश किंवा जर्मन आणि नॉर्मन पद्धति यांचा अंतर्भाव होतो. पहिल्या पद्धतीमध्यें रोमन शिल्पाचें अनुकरण केलेलें आढळतें. दुसरीमध्यें गॉथिक शिल्पासहि स्थान दिलेलें आढळतें व हींत उभ्या लंबाकृति रचना असून अनेक नवीन नवीन गोष्टी आढळतात. व कांहीं जुन्या कल्पनांस नवीन वळण दिलेलें दिसून येतें. यांतील बऱ्याच इमारती बायझन्टाइन धर्तीच्या इमारती सारख्याहि कांहीं बाबतींत दिसतात.

**रोमान्स भाषा**—आयबेरियन द्वीपकल्पांत तीन रोमान्स भाषा चालतात : (१) पोर्तुगीज गॅलिशिअन–ही लिऑंचा कांहीं भाग, पोर्तुगाल व गॅलिशिया येथें चालते. (२) कॅस्टिलिअन–उत्तर, दक्षिण व मध्य प्रदेश येथें म्हणजे द्वीपकल्पाच्या

एकंदर दोन-तृतीयांश भागांत चालते. (३) कॅटालन-पूर्व व आग्नेय दिशेच्या बऱ्याच मोठ्या पट्टींत चालते.

इटलींतील रोमान्स भाषा परस्परांपासून जितक्या वेगळ्या आहेत त्यांपेक्षां या तीन भाषा परस्परांपासून फारच अधिक प्रमाणांत भिन्न आहेत. त्यांचा एकत्र प्रचार असा कोणत्याहि प्रांतांत नाहीं. एका विभागांत एक तर दुसऱ्यांत दुसरी अशा रीतीनें यांचा प्रचार आहे. या भाषा म्हणजे अनागर अथवा सामान्य (व्हल्गर) लॅटिनचे प्रकार होत. युरोपच्या बाहेरहि रोमान्स भाषा गेल्या आहेत. उदा., अर्जेंटाइन लोकराज्यांत इटालियन व स्पॅनिश भाषा चालतात. पोर्तुगीज भाषा हिंदुस्थान, आफ्रिका व ब्राझील या देशांत चालतात. उत्तर आफ्रिकेंत फ्रेंचचा प्रसार होत आहे. या युरोपबाह्य रोमान्स भाषांत अर्थात् मुळापेक्षां बदल होत आहे.

**रोम्ने, जॉर्ज** (१७३४-१८०२)—एक इंग्रज चित्रकार. त्याची मुख्य कीर्ति व्यक्तींच्या चित्रां(पोर्ट्रेट्)मुळें झालेली आहे. त्यानें आपल्या चित्रांकरिता एमा हार्ट या अतिशय सुप्रसिद्ध सुंदर स्त्रीचा उपयोग ('सिटर' म्हणून) केला. त्याचीं चित्रें नॅशनल आणि स्टेट गॅलरीमध्यें आहेत. त्यानें कांहीं ऐतिहासिक व काल्पनिक चित्रेंहि काढलीं आहेत.

**रोलंड, जीन मारी** (१७३४-१७९३)—एक फ्रेंच मुत्सद्दी. याचा विद्याव्यासंग जबर असून तो अखेरपर्यंत टिकला. याची बायको मॅडम रोलंड ही इतिहासांत प्रसिद्ध आहे. पतीच्या सहकार्यानें तिनें फ्रेंच राज्यक्रांतीच्या आरंभापासून स्वतः तिला बळी पडेपर्यंत फ्रान्सच्या भवितव्यतेवर विलक्षण परिणाम घडवून आणले. राज्यक्रांतीला सुरुवात झाली त्या वेळीं जीनच्या नांवानें राजकारणावर जे लेख येत ते मॅडम रोलंड स्वतः लिही व नवऱ्याच्या नांवानें प्रसिद्ध करी. त्यांत राज्यक्रांतींतील अगदीं पुढारलेल्या पक्षाचीं मतें प्रतिपादिलेलीं असत. पुढें रोलंड पॅरिसमध्यें राहूं लागला व जॅकोबिन पक्षाचा सभासद झाला. लवकरच मॅडम रोलंडच्या बैठकींत ब्रिसॉट, पीटियन, रोबेस्पिएर, न्युझोट असले मोठे गृहस्थ जमूं लागले. बैठकींत बडे बडे विद्वान् जमले असतांहि तिला अध्यक्ष निवडीत. जिरॉंडिस्ट पक्ष अधिकारारूढ झाला तेव्हां रोलंडला अंतर्व्यवस्थामंत्री नेमण्यांत आलें (१७९२). या सुमारास राज्यक्रांतीचें पाऊल झपाट्यानें पुढें पडत होतें, आणि ज्वलत् जहाल (मौंटन) पक्षाच्या भीतीनें राजधानी ब्लॉयला नेण्याची रोलंडनें सूचना आणली व रोबेस्पिएर वगैरे पुढाऱ्यांवर टीकेचा मारा चालविला. या कारणांनीं तो अप्रिय झाला. शिवाय सरकारी महत्त्वाचे कागदपत्र नाहींसे झाल्याचा त्याच्यावर आरोप आला. या व इतर कारणांमुळें रोलंडला आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला (१७९३).

पुढें रोलंड पति-पत्नीवर निंदारोपाचा मारा लोकांकडून चालू झाला. तेव्हां त्यांच्या निरसनार्थ एकदां मॅडम स्वतःच असेंब्लीमध्यें गेली. तेथें तिच्या भाषणाचा परिणाम होऊन सभेनें तिला निरपराधी ठरविलें. तथापि तिच्या शत्रूंनीं तिला कैद केलें. तेव्हां जीन रोलंड गुप्तपणें रुआंडला पळून गेला (१७९३). ८ नोव्हेंबर १७९३ रोजीं तिचा गिलोटीनवर वध करण्यांत आला. पत्नीच्या वधाच्या बातमीनें दुःखित होऊन दोन दिवसांनीं जीन रोलंडनें आत्महत्या केली.

**रोलंड, हेन्री ऑगस्टस** (१८४८-१९०१)—एक अमेरिकन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. यानें हेल्महोल्ट्झ या जर्मन शास्त्रज्ञाजवळ अभ्यास केला. विद्युत्संचारित पदार्थास गति दिली असतां चुंबकक्षेत्र उत्पन्न होतें असें यानें सिद्ध करून दिलें व स्वस्थ ज्योतीच्या प्रकाशाची विकृति करण्याकरितां कांचेवर अतिसूक्ष्म अशा रेषा जवळ जवळ काढून कार्यभाग होऊं शकतो असें यानें दाखवून दिलें.

**रोलांद, रोमँ** (१८६६-१९४४)—एक फ्रेंच ग्रंथकार. तो सोर्बोर्न येथें प्राध्यापक असतांना संगीत व इतिहास यांचा अभ्यासक्रमांत त्यानें अंतर्भाव करून घेतला. त्यानें अनेक नाटकें, चरित्रें व टीकापर ग्रंथ लिहिले. त्याचें सर्वांत प्रसिद्ध पुस्तक 'जीन ख्रिस्तोफ' (१९०४-१९१२) हें आहे. १९२४ सालीं त्यानें म. गांधींचें चरित्र लिहून त्यांचा पक्ष उचलून धरला. त्याच्या ग्रंथांचीं भाषांतरें झालेलीं आहेत. तो पहिल्या महायुद्धाच्या वेळेपासून जागतिक शांततावादी असून, त्याला १९१५ सालीं वाङ्मयविषयाचें नोबेल पारितोषिक देण्यांत आलें.

**रोवेन**—फ्रान्स, नार्मंडीची जुनी राजधानी. फ्रान्समध्यें हें चौथें प्रमुख बंदर आहे. मध्ययुगीन शिल्पाचे नमुने म्हणून कांहीं जुन्या इमारती दाखवितां येतात. रोवेनचें म्हणून एक विशिष्ट कापड निघतें. रसायनें, बीट साखर, मातीचीं भांडीं, मिठाई, इ. चे कारखाने शहरांत आहेत. लो. सं. (१९३६) एक लाख बावीस हजार.

**रोशेल**—रोश. एक प्रकारचें गवत. या गवतास वास येतो. हें कंबरभर वाढतें. याच्या गवतापासून रोशेल तेल काढतात. वातविकारावर हें तेल गुणकारी आहे.

**रोहटक**— पंजाब, अंबाला विभागातील एक जिल्हा. क्षे. फ. १९८० चौ. मै.. लो. सं. ६,३०,०००. जिल्ह्यांत चार तहशिली, अकरा शहरें व ४९५ खेडीं आहेत. शें. ८५ लोक हिंदू आहेत. जमीन फार सुपीक आहे. कालव्याच्या पाण्यावर पिकें होतात. मुख्य पीक गहूं आहे. बैलाच्या उत्कृष्ट जातीबद्दल

जिल्हा प्रसिद्ध आहे. जंगल नाहीं. कांहीं भागांत मिठागरें आहेत. भांडीं, कातडीं सामान व मलमल तयार होते.

याचें जुनें नांव हरियाणा असें आहे. १३५५ त फेरोझशहानें प्रथम सतलजचा कालवा काढला. अकबराच्या दिल्ली सुभ्यांत हा भाग मोडत असे. हा अनेक हिंदु-मुसलमान राजांकडे होता. १८२४ त ब्रिटिशांकडे आला.

रोहटक शहर पूर्वी कोणी पोवार राजानें वसविलें म्हणतात. पण ११६० त पृथ्वीराजानें पुन्हां वसविलें. या ठिकाणीं मोठा व्यापार चालतो. लो. सं. सुमारें २५,०००.

**रोहरी**—सिंध, सक्कर जिल्ह्यांतील एक तालुका व शहर. तालुक्यांत तांदूळ व गहूं हीं मुख्य पिकें होतात. रोहरी हें मुख्य शहर असून त्याची लो. सं. सुमारें १०,००० आहे. हें शहर प्रथम सय्यद रुकनुद्दीन यानें वसविलें असावें. येथें पुष्कळ मशिदी आहेत. वारमुबारिक नांवाची प्रसिद्ध इमारत १७४५ सालीं महंमदाच्या दाढीचा केंस ठेवण्यासाठीं बांधण्यांत आली. रोहरीच्यासमोर ख्वाजा खिझर बेट आहे.

**रोहिणी**—१. प्राचेतस दक्षाच्या साठ मुलींपैकीं एक असून चंद्राच्या सत्तावीस (नक्षत्र) स्त्रियांतील ही प्रसिद्ध स्त्री आहे. हिच्यावर चंद्राचें जास्त प्रेम असल्यानें त्याला क्षयाचा शाप मिळाला. हिला बुध नांवाचा मुलगा झाला.

२. वसुदेवाची एक पत्नी. हिच्या पोटीं बलराम झाला.

**रोहित्र**—(ट्रॅन्सफॉर्मर). या परिवर्तक यंत्राच्या साहाय्यानें विद्युच्छक्तीचा दाब बदलतां येतो. सामान्यतः याचा उपयोग उलटसुलट गतीच्या प्रकाराच्या दाबाचें रूपांतर करण्याकरितां करण्यांत येतो. तथापि याचा उपयोग उलटसुलट प्रवाहाचे सरळ प्रवाहामध्यें रूपांतर करण्याकरितांहि करतां येतो. सामान्यतः या प्रकारच्या यंत्रामध्यें एक प्राथमिक व एक दुय्यम अशीं दोन लोखंडाच्या गाभ्यावर गुंडाळलेल्या तारांचीं वेष्टणें असतात. या दोन वेष्टणांमध्यें तारांचे जितके फेरे असतात त्यांवर या यंत्रापासून होणाऱ्या दाबातील फरकाचें प्रमाण अवलंबून असतें. प्राथमिक वेष्टणामध्यें जितका उलटसुलट दाबाचा प्रवाह सोडण्यांत येतो तितकाच पण निराळ्या दाबाचा प्रवाह दुय्यम वेष्टणामध्यें प्रवर्तित होतो. या यंत्राचा उपयोग विशेषतः विजेच्या उगमापासून मोठ्या दाबाच्या विजेचा प्रवाह घेऊन तो हलक्या दाबाच्या प्रवाहाच्या रूपांत वांटण्याच्या कामीं होतो आणि या रूपांतरामध्यें शक्तीचा व्यय फार थोडा होतो. सामान्यतः ६५०० व्होल्ट दाबाचा प्रवाह प्रथम तयार करण्यांत येऊन तो सुमारें ४४० व्होल्ट दाबाच्या रूपांत निरनिराळ्या ठिकाणीं वांटण्यांत येतो.

**रोहिदास**—रैदास पाहा.

**रोहिलखंड**—संयुक्तप्रांत, बरेली विभागाला हें नांव आहे. क्षे. फ. १२,८०० चौ. मै. व लो. सं. सुमारें ६ कोटी आहे. शें. २८ मुसलमान आहेत. पूर्वी याचा कांहीं भाग उत्तर पांचालांत मोडत असे. नंतर मुसलमानांच्या अमदानींत या भागांत नेहमीं बंडें होत. पंधराव्या शतकांत बदौन राजधानी असलेला हा प्रदेश स्वतंत्र गणला जाऊं लागला. मोंगल साम्राज्यांत हा दिल्लीच्या सुभ्यांत सामील केला असे. १७४० त अली महंमदखान रोहिलखंडाचा सुभेदार म्हणून नेमण्यांत आला. त्याच्यानंतर रहिमतखानानें सुभेदारी बळकाविली व मराठ्यांचा तो शत्रु झाला. मराठ्यांना रोहिलखंडांतून हांकलून लावण्यासाठीं खानानें सुजाउद्दौल्यास ४० लक्ष रु. देऊं केले होते ते दिले नाहींत म्हणून इंग्रजांनीं सुजाउद्दौल्याला रोहिल्यांची कत्तल करण्यास मदत केली (१७७४) व रोहिलखंड सुजाला दिलें. याप्रमाणें रोहिलखंडाचें स्वातंत्र्य गेलें. आज रोहिलखंडापैकीं रामपूर नांवाचें एक संस्थान उरलें आहे. बाकीचा भाग १८०१ सालीं इंग्रजांकडे आला.

**रोहिले**—एक मुसलमानी जात. ही प्रादेशिक असून १७४० च्या सुमारास अली महंमद रोहिला याच्या नेतृत्वावरून नांव पडलें. अली महंमद हा एका हिंदुस्थानी अहिराचा मुलगा एका अफगाणानें वाढविला. अली महंमद रोहिला यानें अफगाण सैन्य ठेवून मुलखगिरी सुरू केली व रोहिलखंड स्थापलें (रोहिलखंड पाहा). मराठ्यांनीं रोहिल्यांना फार दहशत बसविली होती व त्यामुळें ते अयोध्येच्या नबाबाची मदत मागत. पण नबाबानें त्यांना फसवून रोहिलखंड घशांत घातला. रोहिले लोक चांगले धडधाकट व आडदांड असतात. ते बहुधा लष्करांत नोकरी धरतात. कांहीं व्यापार व सावकारी करतात.

**रोही (मासा)**—(कार्प). हे एक प्रकारचे मृदु कल्ले असलेले मासे असून यांच्या अनेक जाती आहेत. यांचें तोंड लहान असून त्यांच्या जबड्यांत दांत नसतात आणि तीन लहान सपाट किरणाकृति फुप्फुसें असतात. यांना पाठीवर एक कल्ला असून खवले मोठाले असतात. हे सामान्यतः शांत गोड्या पाण्यांत राहतात आणि किडे व वनस्पती यावर उपजीविका करतात. यांचा रंग सामान्यतः पाठीवर हिरवट व पोटाकडे पिवळसर असतो. यांना तळ्यामध्यें पाळून खाण्याकरितां उपयोगांत आणतात. यांच्यापैकीं सोनेरी जातीचा मासा हा प्रथम चीन देशांतून आला असें म्हणतात.

**रोही (हरण)**—नीलगाय पाहा.

**रोहें**—मुंबई, कुलाबा जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. २०३ चौ. मैल. लो. सं. (१९४१) ६३,९२९. पाऊस १२५ इंच

पडतो. यांत अवचितगड किल्ला आहे. रोहें हें मुख्य ठिकाण असून तेथें तांदुळाचा व्यापार चालतो. एक हायस्कूल आहे. लो. सं. ६,०००.

**रौप्य भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें औषध मधुर, शीत व स्निग्ध असें आहे. अतिशय मानसिक श्रमामुळें चक्कर येणें, ज्ञानतन्तू अशक्त होणें, अपस्मार, उन्माद, धातुक्षय, शक्तिपात, कोरडा खोकला, इत्यादि विकारांवर हें औषध उत्तम बलवर्धक म्हणून प्रसिद्ध आहे. उपदंशामुळें नपुंसकत्व आलें असलें तर या भस्माचा उपयोग होतो. तसेंच सूतिकाज्वर, पांडुरोग, क्षयाचा खोकला, इत्यादि विकारांवरहि याचा चांगला उपयोग होतो. प्रमाण ·।· ते १ गुंज दूध-साखर, मध, लोणी-खडीसाखर यांत देतात.

**रौले, विल्यम** (१५८५–१६४२)—एक इंग्रज नट व नाटककार. त्याचीं चार नाटकें उपलब्ध आहेत तीं— 'ए न्यू वंडर' (नवी नवलाई), 'ए वूमन नेव्हर व्हेक्स्ड' (न रागवलेली स्त्री), 'ऑल इज लॉस्ट बाय लस्ट' (विषयानें सर्व गमावलें), 'ए मॅच ॲट् मिड्नाइट' (रात्रीचा खेळ) आणि 'ए शूमेकर ए जंटलमन' (चांभार सद्‌गृहस्थ). शिवाय त्यानें हेवुड, मेसिंजर, डेक्कर, फोर्ड आणि वेब्स्टर या अधिक गुणवान् लेखकांबरोबर लेखनकार्यांत सहकार्य केलें. तसेंच सुप्रसिद्ध नाटककार मिडल्टन याच्याशीं सहकार्य करून 'दि चेंजलिंग', 'दि स्पॅनिश जिप्सी', 'दि वर्ल्ड टॉस्ट ॲट् टेनिस', हीं व इतर उत्कृष्ट नाटकें लिहिलीं.

**ऱ्हाइन नदी**—युरोपांतील एक अत्यंत महत्त्वाची नदी. ही स्वित्झर्लंड, जर्मनी आणि हॉलंड या देशांतून वाहते. हिचा प्रवाह सुमारें ८०० मैलांचा आहे व हिच्यामुळें ७५,००० चौ. मै. जमीन भिजते. हिचा उगम स्वित्झर्लंडांतील एका पर्वतांत होतो. हिच्यांत मासे फार सांपडतात. सुमारें ५५० मैल ही नौकानयनाला उपयोगी पडते. हिचे कालवे काढलेले आहेत. हिच्या कांठचे देखावे फार सुंदर म्हणून नांवाजले जातात. हिच्याबद्दल फ्रान्स आणि जर्मनी यांच्यामध्यें बरेच तंटे झालेले आहेत. हिच्यावर कोणाचाच ताबा असूं नये, असें मागच्या महायुद्धानंतरच्या तहांत ठरलें.

**ऱ्हास**—(डिजनरेशन). जीवशास्त्रामध्यें विशिष्ट परिस्थितीमध्यें जेव्हां जीवधारणेसाठीं विशेष संकीर्ण अशा रचनेची आवश्यकता नाहींशी होते तेव्हां त्या रचनेंतील संकीर्णता कमी होऊन ती रचना हळूहळू साधी होत जाते. या क्रियेस ऱ्हास असें म्हणतां येईल. ही क्रिया अनेक तऱ्हेच्या परोपजीवी वनस्पतींमध्यें आपल्या दृष्टीस पडते. उदा., डॉडर नांवाची वनस्पति ही क्लव्हर किंवा इतर वनस्पती यांतील रस शोषून घेऊन राहते यामुळें या वनस्पतीचीं मुळें नष्ट झालीं आहेत व पानास सूक्ष्म खवल्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे. या वनस्पतींतील हिरवें रंगद्रव्य (क्लोरोफिल) हें इतर वनस्पतींत अत्यंत आवश्यक असूनहि नष्ट झालें आहे. प्राण्यांमध्यें तर ही क्रिया अधिक स्पष्टपणें नजरेस येते. उदा., नारूचा किडा इतर सपृष्ठवंश प्राण्यांच्या आंतड्यांत वस्ती करून राहतो व त्या आंतड्यांत त्याच्यासभोंवतीं असलेला अन्नरस खाऊन आपली उपजीविका करतो. अशा तऱ्हेचे कांहीं सपृष्ठवंशवर्गांतील सामुद्रिक प्राण्यामध्येंहि आपणांस गात्रांचा ऱ्हास झाल्याचें उदाहरण आढळून येतें. परोपजीवन पाहा.

**ऱ्हिजोपोडा**—मूलपाद. हा एकपेशीमय प्राण्यांतील सर्वांत खालचा वर्ग आहे. हा प्राणी म्हणजे केवळ जीवनरसाचा एक बिंदु असून त्याला कोणतीहि स्वतंत्र गात्रें नसतात. या वर्गांपैकीं सर्वांत मोठा प्राणी $\frac{1}{3}$ इंच व्यासाचा असतो. आपल्या शरीरांतून कोणत्याहि जागेपासून हे सूक्ष्म तंतू बाहेर काढूं शकतात व पुन्हां आंत घेऊं शकतात.

**ऱ्हीगस, कॉन्स्टन्टाइन** (१७६०–१७९८)—एक ग्रीक कवि व देशभक्त. त्यानें आपल्या मायभाषेंत अनेक राष्ट्रीय भावनेचीं गीतें लिहिलीं आणि तीं लिहिण्यांत त्याचा उद्देश मुसलमान लोकांविरुद्ध ग्रीक तरुणांचीं मनें उद्दीपित करण्याचा होता. त्यामुळें त्याला ऑस्ट्रियन लोकांनीं कैद करून तुर्कांच्या स्वाधीन केलें आणि नंतर त्याचा बेलग्रेड येथें शिरच्छेद करण्यांत आला.

**ऱ्हीम्स**—हें फ्रान्समधील शहर, मार्न प्रांतांत आहे. येथें सुप्रसिद्ध इमारती आहेत त्या : कॅथेड्रल, आर्कोपिस्कोपल राजवाडा, चर्च ऑफ सेंट रेमी, वगैरे. येथें शॅंपेन दारू आणि लोंकरीचीं ब्लॅंकेटें वगैरे करण्याचे कारखाने आहेत. लो. सं. (१९३६) १,१६६८७,

**ऱ्होड बेट**—हें संस्थान अमेरिकन सं. संस्थानांत असून, त्याचें क्षे. फ. १,२४८ चौ. मैल आहे. हा प्रदेश टेंकड्यांनीं युक्त असून त्यांतून लहान लहान नद्या पुष्कळ वाहतात आणि तेथें जलविद्युच्छक्ति पुष्कळ निर्माण होते. येथें शेतकी थोडी आहे, पण कापूस, रेशीम व लोंकर यांचें कापड, विणलेले (निटेड) कपडे, वगैरेंचे कारखाने चांगले भरभराटींत आहेत. येथें मुख्य खनिज द्रव्य ग्रॅफाइट हें सांपडतें. प्रॉव्हिडन्स हें राजधानी शहर आणि पॉटूकेट, वूनसॉकेट व न्यू पोर्ट हीं मोठालीं शहरें आहेत. येथें पहिली वसाहत १६३६ सालीं झाली, व १७९० सालीं हें संस्थान युनियनमध्यें सामील झालें. येथला राज्यकारभार एक गव्हर्नर ४४ सभासदांचें सीनेट व १०० सभासदांचें प्रतिनिधिसभागृह यांच्या मतानुसार चालवतो. लो. सं. (१९४०)

७,१३,३४६ असून त्यांत इटालियन, फ्रेंच, इंग्रज, आयरिश व नीग्रो या जातींचे लोक आहेत. प्रॉव्हिडन्स येथें ब्राउन युनिव्हर्सिटी (१७६४) असून अनेक विषयांचीं कॉलिजें आहेत.

**ऱ्होड्स बेट**—हें बेट आशिया मायनरनजीक एजिअन समुद्रात आहे. क्षे. फ. ५६० चौ. मै. व लो. सं. ३१,००० आहे. येथें पर्वत व बऱ्याच टेंकड्या असून, त्या पाइन-वृक्षाच्छादित आहेत. येथें अन्न-धान्यें, द्राक्षें, अंजीर, नारिंगें, डाळिंबें, वगैरे फळें होतात. ऱ्होड्स ही राजधानी व लीमन व डर्सेना हीं बंदरें आहेत. ऱ्होड्स हें बेट फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध असून तेथें डोरियन ग्रीक लोक राहत असत. हे लोक नाविक विद्येत फार वाकबगार होते. या बेटाचें तुर्की लोकांच्या हल्ल्यापासून संरक्षण सेंट जॉनच्या (नाइट) लढवय्यांनीं १३०९-१५५२ पर्यंत मोठ्या शौर्यानें केलें. पण नंतर हें बेट तुर्कांच्या ताब्यांत गेलें. १९१२ सालीं इटलीनें हें बेट हस्तगत केलें आणि लॉसेनच्या तहानें (१९२३) इटलीची यावरील मालकी मान्य करण्यांत आली.

**ऱ्होडियम**—एक मूलद्रव्य. परमाणुभारांक १०२·९. इ. स. १८०४ मध्यें वोलास्टोन ह्यानें हें मूलद्रव्य शोधून काढलें. त्याच्या लवणांच्या विद्रावाचा रंग भडक गुलाबी असल्यामुळें ह्याला हें नांव पडलें आहे. प्लॅटिनमच्या वर्गांतील हा धातु असून मुशी आणि विद्युदग्निमापक (पायरोमीटर) तयार करण्यासाठीं त्याचा उपयोग होतो.

**ऱ्होडेशिआ**—ब्रिटिश दक्षिण आफ्रिकेचा एक भाग. याचे उत्तर ऱ्होडेशिआ व दक्षिण ऱ्होडेशिआ असे दोन भाग झाले आहेत. यांतील उत्तर ऱ्होडेशिआला कांगो आणि झांबेझी या नद्यांचें पाणी मिळत असल्यानें सुपीकता आली आहे. उत्तर ऱ्होडेशिआचें क्षे. फ. २,८७,९५० चौ. मै. आहे. १३,५९,००० लोकवस्तींत फक्त १०,००० युरोपियन आहेत. लुसाक हें राजधानीचें व मुख्य शहर आहे. दक्षिण ऱ्होडेशिआचे क्षेत्रफळ १,५०,३४४ चौरस मैल आहे व ११,१०,००० लोकवस्तींत ४९,९०० गौरकाय आहेत. सॅलिसबरी ही राजधानी आहे. व्हिक्टोरिया धबधबा हा दक्षिण आफ्रिकेंत पाहण्यालायक स्थळांपैकीं आहे.

---

# ल

**ल**—या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी इ. स. पहिल्या-दुसऱ्या शतकांतल्या मथुरा लेखांत, तिसरी दुर्गगणाच्या लेखांत (इ. स. ६८९) व शेवटची १२०८ मधील ओरिआ लेखांत आढळते.

**लँकॅस्टर**--इंग्लंड, एक नदीकांठचें बंदर. हें लँकेशायर परगण्यांत ल्यून नदीकांठीं आहे. या ठिकाणीं सुताच्या पुष्कळ गिरण्या आहेत. लांकूड सामान, लिनोलियम व आगगाडीचे मालाचे डबे तयार होतात. नदी वाहतुकीला उपयोगी आहे. जुन्या किल्ल्यांत न्यायालयें व पदार्थ-संग्रहालयें आहेत. लो. सं. सुमारें ४७,०००.

**लँकॅस्टर, जोसेफ** (१७७८-१८३८)—एक इंग्रज शिक्षणशास्त्रज्ञ. यानें 'लँकॅस्टेरियन सिस्टिम' या नांवाची एक नवीन शिक्षणपद्धति सुरू केली. या कामांत त्याला डॉक्टर अँड्र्यू बेल यानें मदत केली. या पद्धतीचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, खालच्या वर्गांतील लहान विद्यार्थ्यांना वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांनीं शिक्षण द्यावयाचें. अशा शिक्षण देणाऱ्या विद्यार्थ्यांना 'मॉनिटर्स' (मालचाटे) म्हणत असत. शिवाय या पद्धतींत विद्यार्थ्यांना स्वतःची बुद्धि न चालवितां यांत्रिक पद्धतीप्रमाणें (मेकॅनिकल ड्रिल) विषय शिकविण्यांत येत असत. त्यामुळें एकेक मॉनिटर एका वेळीं पुष्कळ विद्यार्थ्यांना शिकवूं शकत असे.

**लंका**—आधुनिक सिंहलद्वीप (सिलोन). ही नगरी त्रिकूट पर्वतावर विश्वकर्म्यानें माल्यवानासाठीं बांधिली. पुढें तेथें कुबेर राहूं लागला. पण त्याला रावणानें हुसकावून आपण राहूं लागला. रावणाच्या अमदानींत या नगरीचें ऐश्वर्य अवर्णनीय होतें. रावणानंतर त्याचा भाऊ बिभीषण राहूं लागला. तो चिरंजीव असल्यानें आजहि लंकेवर राज्य करतो आहे असें भाविक समजतात.

**लंकादहन सारंग**—हा काफी थाटाचा जन्यराग आहे. याच्या आरोहावरोहांत धैवत स्वर वर्ज्य आहे, म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय मध्यान्ह उचितच आहे. हा राग देसी रागासारखा भासतो; पण देसी रागाच्या आरोहात गांधार व धैवत हे दोन स्वर वर्ज्य आहेत आणि अवरोह संपूर्ण आहे. यामुळें ते एकमेकांपासून भिन्न राहूं शकतात. हा एक सारंगप्रकार आहे.

**लक्झेंबर्ग**—युरोपांतील एक चिमुकलें संस्थान. हें बेल्जिअम, फ्रान्स व जर्मनी यांच्यामध्यें आहे. क्षेत्रफळ अवघें

९९९ चौरस मैल असून लो. सं. ३,००,००० आहे. लक्झेंबर्ग शहर हें राजधानीचें ठिकाण आहे. जमीन शेतीची आहे. दक्षिणेकडे लोखंडाची खाण आहे. बहुतेक प्रदेश अर्देनिस पर्वतश्रेणीनें व्यापला आहे. सूरी ही प्रमुख नदी आहे. गेल्या दोन्ही महायुद्धांत हें जर्मनव्यात होतें. १९२२ मध्यें बेल्जिअमबरोबर आर्थिक संघटन (दोहोंची एकमुखी योजना) करण्यांत येऊन १९३२ सालीं बेल्जिअम व नेदर्लंड यांच्याबरोबर तह झाला व त्या तहान्वयें एकमेकांच्या देशांत जाणाऱ्या-येणाऱ्या मालावर जकात कमी दरानें आकारण्याचें ठरलें. मध्ययुगीन कालांत लक्झेंबर्गचे काउंट हे आपलें वजन व दरारा ठेवून वागणारे व प्रभावशाली होऊन गेले. १३५४ मध्यें तेथील सत्ताधारी काउंटचा ड्यूक झाला. १४४३ मध्यें बर्गंडीमध्यें लक्झेंबर्ग सामील करण्यांत आलें. १८०० मध्यें नेदर्लंडचा राजा मरण पावला त्या वेळीं लक्झेंबर्ग पुन्हां स्वतंत्र झालें.

**लॅक्टोप्रीन**—(एकस दोनशें पंचायशीं). हें एक प्रकारचें नवें कृत्रिम रबर आहे. उष्णताप्रतिबंधक, विद्युत्प्रवाहरोधक, इत्यादि गुणांत हें नैसर्गिक रबराहून फार श्रेष्ठ आहे. हें स्टार्च, दूध, दगडी कोळसा व पेट्रोल या पदार्थांपासून तयार होतें.

**लखतर संस्थान**—मुंबई, काठेवाड. यांत ठाण आणि लखतर असे दोन विभाग आहेत. क्षे. फ. २४७ चौ. मै. व लो. सं. सुमारें ३०,००० आहे. संस्थान मुख्यतः कृषिप्रधान आहे. खाद्य धान्यांखेरीज कापूस पिकतो. ठाणगड व लखतर हीं दोन मोठीं गांवें आहेत. लखतरमध्यें तीन सरकी काढण्याच्या व एक कापूस दाबण्याची गिरणी आहे. एक तेलाची गिरणीहि आहे. ठाणगडला मातीचीं सुंदर भांडीं होतात. संस्थानांत एक हायस्कूल व इतर प्राथमिक आणि माध्यमिक शाळा आहेत. संस्थानचें उत्पन्न सु. पांच लाख रुपये आहे.

संस्थानिक ध्रांगध्रा राजघराण्यांतील आहेत. सध्यांचे महाराज श्रीइंद्रसिंघजी हे १९४० सालीं गादीवर आले. आतां हें संस्थान सौराष्ट्र संघांत सामील झालेलें आहे.

**लखदीव बेटें**—हिंदुस्थानच्या पश्चिमेस अरबी समुद्रांत मलबार किनाऱ्यापासून २०० मैलांवर हीं आहेत. उत्तर भागास अमिनदिवी (पाहा) म्हणत असत. तो दक्षिण कानडांत व बाकीचा भाग मलबार जिल्ह्यांत समाविष्ट आहे. हीं मुख्यतः १४ आहेत व त्यांतील फक्त ९ बेटांवर वस्ती आहे व ती सर्व मुसलमान लोकांची आहे. या बेटांचा समावेश मद्रास इलाख्यांत केलेला आहे. मुख्य उद्योगधंदा नारळाचा आहे. लो. सं. (१९४१) १८,३९३ आहे. भाषा मल्याळी चालते. मिनिकॉयमध्यें महल भाषा आहे.

**लखनौ**—संयुक्त प्रांत, एक जिल्हा. क्षे. फ. ९७५ चौ. मै. गंगथडींतील हा प्रदेश अत्यंत शोभिवंत व सुपीक आहे. गोमती नदी यांतून वाहते. तिच्या पुरामुळें मळई सांचून पिकें चांगलीं होतात. मुख्य पीक गहूं असून इतरहि धान्यें होतात. फळेंहि मुबलक होतात. पाऊस सरासरी ३६ इंच पडतो. तथापि जिल्ह्यांत दुष्काळहि वारंवार पडतात. जिल्ह्यांत सहा शहरें व ९९२ खेडीं आहेत. लो. सं. (१९४१) ९,४९,७२८. शें. ७८ हिंदू व शें. २० मुसलमान आहेत. जिल्ह्यांत कारागिरीचीं कामें उत्कृष्ट होतात. जुने शिल्पावशेष अनेक आहेत.

रामाचा भाऊ लक्ष्मण यानें हें वसविलें असें म्हणतात. येथें भार लोकांची पूर्वी वस्ती असे. नंतर रजपूत लोक ११ व्या-१२ व्या शतकांत येऊन राहिले. पुढें मुसलमानांचें वर्चस्व झालें, व अयोध्येच्या सुभ्यांत लखनौ मोडूं लागलें. अयोध्या प्रांताबरोबर लखनौ इंग्रजांकडे आल्यावर पुढें १८५७ च्या बंडांत सांपडलें.

लखनौ शहर गोमतीच्या कांठीं असून पूर्वी अयोध्या संस्थानची राजधानी होती. त्यामुळें येथें जुन्या राजवाड्यांचे व इमारतींचे अवशेष अनेक पाहावयास मिळतात. अयोध्येचे नबाब येथें राहत असल्यानें हें शहर फार वाढलें. नबाब असफउद्दौल्याच्या कारकीर्दींत शहर फार शोभिवंत झालें. मोतीमहाल, मुबारक मंझील, शहामंझील, वगैरे प्रसिद्ध व प्रेक्षणीय इमारती गाजिउद्दीन हैदरनें बांधल्या. कैसरबाग ही सर्वांत मोठी इमारत वाजिदअल्लीनें बांधिली. लहान व मोठी इमामबारा प्रेक्षणीय आहे. १८५७ च्या क्रांतियुद्धांत हॅवलॉक, लॉरेन्स, औट्रम, कँपबेल, वगैरे इंग्रज योद्धयांनीं लखनौचें मोठ्या मिनतवारीनें संरक्षण केलें. त्यानंतर लखनौला ब्रिटिशांनीं मोठी लष्करी छावणी टाकली. आतां संयुक्त प्रांताची ही राजधानी आहे.

शहर पूर्वीपासून सुंदर कापड, दागिने, भांडीं यांविषयीं अत्यंत प्रसिद्ध आहे. नक्षीकाम फार सुरेख होतें. कागद व लोखंडी सामान करण्याचे कारखाने मोठे आहेत. येथें एक विद्यापीठ आहे. संगीताचें कॉलेज व इतर शिक्षणसंस्था आहेत. लो. सं. (१९४१) ३,५४,५६०. पदार्थसंग्रहालय आणि प्राणिसंग्रहालय हीं चांगलीं ठेविलीं आहेत.

**लखम सावंत** (१६५१-७५)— कुडाळ संस्थान निर्माण करणाऱ्या खेम सावंताचा पुतण्या व आदिलशाहीतर्फे नेमलेला कोंकण प्रांतावरील अधिकारी. यानें १६५८ त रुस्तुमजामाचा पराभव केला होता. शिवाजीचें वाढतें सामर्थ्य पाहून यानें त्याजबरोबर पितांबर शेणवी या आपल्या वकिलामार्फत तह केला (१६५९) व त्यांत प्रांतांतील निम्मा ऐवज शिवाजीस मिळावा व यानें शिवाजीस जरूर पडेल तेव्हां तीन हजार फौजेनिशीं मदत द्यावी, असें ठरलें होतें. परंतु पुढें यानें या अटी न पाळल्यानें

सन १६६२ मध्यें शिवाजीनें याजवर स्वारी केली. तेव्हां यानें विजापुरकरांकडे मदत मागितली असतां खवासखान व बाजी घोरपडे हे याच्या मदतीस निघाले. परंतु शिवाजीनें ते येण्यापूर्वी याजवर हल्ला केल्यानें हा फिरंग्यांच्या राज्यांत जाऊन दडून बसला. परंतु फिरंग्यांशींहि शिवाजीचा तह झाल्यावर हा शिवाजीस शरण गेला. तेव्हां झालेल्या तहांत याजकडे कुडाळची देशमुखी ठेवून दरसाल यानें सहा हजार होन देण्याचें ठरलें. यानें कुडाळास गडबड न करतां राहावें, राहण्याच्या वाड्यास बुरूज बांधूं नयेत असेंहि याजकडून शिवाजीनें कबूल करवलें. यानंतर मात्र सावंत शिवाजीशीं सख्य ठेवूनच वागले.

**लखिमपूर**—आसाम, एक जिल्हा. क्षे. फ. ४,५२९ चौ. मै.. लो. सं. ४,६९,०००. यांत चहाचे मळे पुष्कळ आहेत. ब्रह्मपुत्रा नदीमुळें प्रदेश सुपीक व रमणीय झाला आहे. जंगल पुष्कळ आहे. जिल्ह्याचे दोन भाग आहेत: डिब्रूगड व उत्तर लखिमपूर. डिब्रूगड हें मोठें शहर व ११२३ खेडीं आहेत. यांत अहोम, काचार, मंडा, संताळ, इ. असंस्कृत जाती आहेत. मुख्यतः या जिल्ह्यांत तांदूळ व चहा पिकतो. कोळसा व पेट्रोलियम यांच्या खाणी आहेत. रबरहि होतें. पूर्वी अहोम लोक नदीच्या वाळूंतून सोनें काढीत.

अकराव्या शतकांत तिबेटकडून छुटिया लोक या ठिकाणीं वसाहत करून राहिले व पुढें त्यांना अहोमांनीं जिंकलें. अहोमांना ब्रह्मी लोकांनीं जिंकलें. या ब्रह्मी जेत्यांचा लोकांना फार त्रास झाला. पुढें इंग्रजांकडे सर्वच आसाम गेला. ऑगस्ट १९५० मध्ये झालेल्या मोठ्या भूकंपामुळें हा भाग अतिशय उध्वस्त होऊन गेला आहे.

**लँग, अँड्र्यू** ( १८४४–१९१२ )—एक स्कॉटिश ग्रंथकार. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालें. त्यानें पोवाड्यांचे कित्येक भाग प्रसिद्ध केले. शिवाय सामान्य कविताहि पुष्कळ लिहिल्या. त्यानें पौराणिक कथा या वाङ्मयशाखेंत महत्त्वाची भर घातली. तत्संबंधीं त्याचीं पुस्तकें आहेत तीं: 'कस्टम अँड मिथ' ( रूढी आणि कथा ) आणि 'मिथ रिच्युअल अँड रिलिजन' (कथा संस्कार आणि धर्म) त्याचे इतर महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते स्कॉटलंडचा इतिहास, प्रिन्स चार्लस एडवर्ड, 'मॅजिक अँड रिलिजन' ( जादूगिरी आणि धर्म ), 'दि मिस्टरी ऑफ मेरी स्टुअर्ट' ( मेरी स्टुअर्टची रहस्यकथा ) यांसारखे होत.

**लंगडी**—एक लहान मुलांचा खेळ. खेळणारांचे दोन सारखे संघ तयार करतात. एक रंगण खेळण्यासाठीं आंखतात. एक संघ या रंगणांत उभा राहतो व मारणाऱ्या संघापैकीं एक गडी रंगणांत एका पायावर लंगडत खेळणाऱ्या गड्यांस धरण्याचा प्रयत्न करतो. त्या गड्यांनीं रंगणाबाहेर न जातां धरणाऱ्यापासून दूर पळावयाचें. मारणाऱ्या गड्यानें पाय टेकला तर तो बाद झाला. त्याची जागा त्याच्या संघांतील दुसरा गडी घेतो. मारणारा गडी जेवढ्यांना शिवेल तेवढे रंगणाबाहेर जातात. याप्रमाणें दोन्ही संघांचे सारखे डाव झाल्यानंतर ज्या संघाचे अधिक गडी बाद झाले असतील तो संघ हरला असें समजतात.

**लगध**-- खि. पू. १३०० वर्षांच्या सुमारास लिहिल्या गेलेल्या 'वेदांग ज्योतिष' या ग्रंथाचा कर्ता. या ऋग्वेदी ज्योतिषग्रंथांत यानें तिथी व नक्षत्रें काढण्याच्या म्हणजे सूर्यचंद्राचें गणित करण्याच्या तोंडी हिशेबाच्या रीती दिल्या आहेत. ज्योतिषशास्त्रांतील याच्या या ग्रंथास त्या वेळीं प्रमाण समजलें जात असे.

**लॅगरलॉफ, सेल्मा ओट्टिलिआना लुइसा** ( १८५८–१९४० )—एक स्वीडिश लेखिका. तिला वाङ्मयविषयाचें नोबेल पारितोषिक १९०९ सालीं देण्यांत आलें. तिचे मुख्य ग्रंथ आहेत ते: 'जेरुसलेम' आणि 'दि आउटकास्ट' ( बाहेरवटे ). मनुष्यस्वभावाचें ज्ञान तिच्या लेखनांतून आढळतें. मुलांसाठींहि तिनें पुस्तकें लिहिलीं आहेत. अनेक भाषांतून तिचे कांहीं ग्रंथ भाषांतरले गेले आहेत.

**लॅगॉस**—हे पश्चिम आफ्रिकेंत एक बंदर व नायगेरिया प्रांताचा एक जिल्हा आहे. लॅगॉस १८६१ सालीं ब्रिटनच्या मालकीचें झालें. व त्याला वसाहतीचा दर्जा देऊन १८६६ पासून सिरिया लीऑनच्या गव्हर्नरचा अमल तेथें सुरू केला. १८७४ त लॅगॉस गोल्ड कोस्ट कॉलनीला जोडण्यांत आलें. १९०६ सालीं लॅगॉस व दक्षिण नायगेरिया यांची एक स्वतंत्र कॉलनी व प्रोटेक्टरेट बनविण्यांत आलें. १९१४ पासून नायगेरिया प्रोटेक्टरेटमध्यें त्याचा समावेश करण्यांत आला. शहर नायगेरियाची राजधानी असून येथें मिशन ग्रामर स्कूल आणि सरकारी हायस्कूल आहे. शहराची लोकसंख्या १,६७,०००.

**लगोऱ्या, लिंगोरचा**—एक मुलांचा खेळ. सात लांकडी तुकडे ( लिंगोऱ्या ) उतरंडीसारखे रचून तयार केलेला खेळ म्हणून लिंगोरचा हें नांव. लिंगोऱ्याबद्दल विटा-दगडांचे तुकडे वापरतात. राज्य घेणाऱ्या संघांतील एका मुलानें मर्यादारेषेवरून लगोऱ्यावर चेंडू मारावयाचा. लगोऱ्या न पडल्या व चेंडू झेलला गेला तर हा मुलगा बाद होतो. दुसरा येऊन चेंडू फेंकतो. चेंडूनें लिंगोरचा पडला तर राज्य घेणाऱ्या इतर गड्यांनीं तो चेंडू लाथांनीं दूर न्यावयाचा व एकानें तोंपर्यंत लगोऱ्या रचावयाच्या. राज्य देणाऱ्या गड्यांनीं चेंडू मिळवून तो लिंगोरचा रचणारावर लिंगोरचा रचण्यापूर्वी मारला तर राज्य घेणारा संघ बाद होतो व दुसऱ्या संघाकडे राज्य जातें.

**लँग्मूर, आयर्विन** (१८८१-     )—एक अमेरिकन रसायनशास्त्रज्ञ. १९०९ मध्यें यानें जनरल इलेक्ट्रिक कंपनीच्या स्केनेक्टॅडी येथील प्रयोगशाळेंत प्रयोग केले. यानें वायुपूरित तुंगस्टेन दिवे, विद्युत्कणविसर्जक (एलेक्ट्रॉन डिस्चार्ज) उपकरणें, निर्वातकर्षक यंत्र (व्हॅक्यूम पंप), उष्ण वायूच्या साहाय्यानें धातूची सांधेजोड करणें, इत्यादि कार्यांत बरेंच यश संपादन केलें. १९३२ मध्यें यास तल (सरफेस) रसायनशास्त्रामध्यें नोबेल पारितोषिक मिळालें.

**लघुकथा**—कथावाङ्मयासंबंधीं विवेचन 'कादंबरी' लेखांत आलेंच आहे. लोककथा, कहाण्या या प्राचीन लघुकथाच होत. मराठींत लघुकथांना खरा आरंभ हरिभाऊ आपटे यांनीं केला. त्यांच्या 'स्फुट गोष्टी' या एक प्रकारें लघुकथाच होत. त्यापूर्वी कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या अरबी भाषेंतील गोष्टी किंवा छत्र्यांचा 'बाळमित्र' यांसारख्यांनीं लघुकथेची पार्श्वभूमि तयार केली होती. आपट्यांच्या 'करमणूक' पत्रांत अशा गोष्टी येत. त्यांत घरगुती भाषा आणि समाजाचें यथार्थदर्शन असे. 'सहकारी कृष्ण' हि आपट्यांच्याप्रमाणेंच गोष्टी लिहीत, पण त्यांत लघुकथेचें तंत्र नसे. 'करमणुकी' चा आरंभ झाल्यानंतर सहा वर्षांनीं 'मनोरंजन' मासिक निघालें. त्यांत सुधारणावादी लघुकथा बऱ्याच असत. विशेषतः वि. सी. गुर्जर यांच्या रूपांतरित बंगाली कथा फारच चटकदार आणि परिणामकारक असत. त्या लिखाणांत 'करमणुकी' तील इतर गोष्टींपेक्षां कलेचा हात जास्त फिरलेला दिसे. बंगाली कादंबऱ्या—लघुकथांची ओळख मराठी वाचकांना प्रथम 'मनोरंजना' नें करून दिली यांत शंका नाहीं. या बंगाली गोष्टींबरोबरच कृ. के. गोखले यांच्या इंग्रजी रूपांतरित कथा 'मनोरंजनां' त येत. पण त्या पाल्हाळिक वाटत.

नंतर लघुकथेचें मूळचें उपदेशप्रधान स्वरूप बदलून घटनाप्रधान झालें. अद्यापि कथेचा शेवट गोड करण्याची प्रवृत्ति गेली नव्हती व अद्भुत आणि कल्पनारम्य प्रसंग घालण्याची रूढि होतीच. या मनोरंजनखंडांतील एक लेखक ना. ह. आपटे यांच्यावर थोडी थोरल्या आपट्यांची छाप पडली होती. त्यांचें लेखन बोधवादी व पाल्हाळिक आहे खरें, तथापि त्यांत कला आहे. जुन्या—नव्याच्या उंबऱ्यावर ते उभे आहेत. 'सरस्वतीकुमारांच्या' कथांत रंजकता चांगली आहे, पण रचनातंत्र कमी दिसतें. प्र. श्री. कोल्हटकर यांच्या कथा सरस आहेत. 'मानसपूजा व इतर गोष्टी' हा संग्रह चांगला निघाला आहे. गो. रा. माटे, वा. ना. देशपांडे, दिवाकर कृष्ण, इ. लेखक या युगांतलेच आहेत. ह. चा. अत्रे यांनीं मुनशी, प्रेमचंदांच्या कथा अनुवादिल्या आहेत. या काळांतील काशीबाई कानिटकर व गिरिजाबाई केळकर या स्त्रीलेखिकांच्या कथा घरगुती असून वास्तवपूर्ण आहेत. तथापि त्यांत रचनाकौशल्य नाहीं. आनंदीबाई शिर्के यांच्या लघुकथा रहस्यमय आहेत.

वाङ्मयाच्या इतर क्षेत्रांत फार प्रसिद्धि पावलेले विद्वान् न. चिं. केळकर, शि. म. परांजपे, श्री. कृ. कोल्हटकर व वा. म. जोशी यांनीं ज्या लघुकथा लिहिल्या आहेत त्या सामान्यतः जुन्या वळणाच्या असल्या तरी त्यांत प्रत्येकाची विशिष्ट शैली प्रगट होते. केळकरांची स्वभावलेखनपद्धति, शिवरामपंतांचा उपरोध, कोल्हटकरांचा विनोद आणि वामनराव जोशांच्या ठिकाणीं असणारा अव्यवस्थित साधेपणा हीं त्यांच्या लेखनांत ओळखूं येतात. शिवाय या काळांतल्याप्रमाणेंच यांच्या लघुकथा कथानकप्रधान होत्या. तरी पण या वेळीं लघुकथेच्या तंत्रांत आधुनिकता येत चालली होती.

इ. स. १९२५ नंतरच्या काळांत पाश्चात्य लघुकथांचा परिणाम होऊन इकडील लघुकथेंत फार झपाट्यानें प्रगति होत गेली. कथानकापेक्षां स्वभावदर्शनाकडे लेखकांचें जास्त लक्ष गेलें. पात्रांच्या आंतरिक आंदोलनांचें चित्रण करण्यांत कौशल्य खर्चीं पडूं लागलें. ना. सी. फडके आणि वि. स. खांडेकर यांनीं नवीन युगाला सुरुवात करून दिली. 'करमणूक' आणि 'मनोरंजन' या मागील काळच्या नियतकालिकांप्रमाणें 'यशवंत' आणि 'किर्लोस्कर' यांनीं लघुकथांना महत्त्व प्राप्त करून दिलें. ना. सी. फडके यांनीं पाश्चात्य कथाकारांनीं घालून दिलेले या कलेचें तंत्र अभ्यासून त्यांचे प्रत्यक्ष धडे दिले. फडक्यांच्या कथा-कादंबऱ्या फार आकर्षक असतात. त्यांची भाषा सुंदर व प्रासादिक असते. रचना बांधेसूद असते व वर्णनाच्या बारीक मजेदार छटा आल्हादकारक होतात. यांमुळें त्यांच्या लेखनावर वाचक फार खुष असतात. वि. स. खांडेकर यांनीं अनेक लघुकथा लिहून संख्येच्या बाबतींत तरी पहिलें स्थान मिळविलें आहे. त्यांच्या कथा फारच अलंकारिक भाषेंत लिहिलेल्या असतात, तरी त्यांत तंत्रशुद्धता आणि विविधता असते. कथांत कोंकणची सजावट करणें त्यांना साधत असल्यामुळें एक प्रकारचें नावीन्य त्यांत येतें. ते ध्येयवादी लेखक आहेत. तरी त्यांच्यांत कलेची मुळींच उणीव नाहीं. त्यांचे एकविसावर लघुकथासंग्रह आकर्षक नांवांनीं प्रसिद्ध आहेत.

श्री. य. गो. जोशी यांना 'यशवंतां' तल्या 'शेवग्याच्या शेंगां' नीं प्रथम पुढें आणलें. नंतर त्यांनीं 'पुनर्भेट' या नांवानें आपल्या लघुकथांचे सात खंड प्रसिद्ध करून या क्षेत्रांत अढळ स्थान मिळविलें. मध्यंतरीं त्यांच्या लेखनांत मोठा खंड पडला होता.

पण आतां ‘औदुंबर आणि पारिजात’ या सदराखालीं आपल्या ‘प्रसाद’ मासिकांतून ते पुन्हां लिहूं लागले आहेत. त्यांना मध्यमवर्गीयांच्या कुटुंबांतील, घरांतील प्रेमळ वातावरण थोडक्या शब्दांनीं चित्रित करण्याची हातोटी साधली आहे. त्यांच्या कथा बहुधा कौटुंबिक, सामाजिक असतात व त्यांत शिवरामपंतांसारखा पण फार थोडा उपरोध डोकावतो. वि. वि. बोकील यांनाहि ‘यशवंत’ नेंच पुढें आणलें. त्यांची भाषा खेळकर असून संसारांतील विविध चित्रें ते मजेशीर रंगवितात. अनंत काणेकर लघुनिबंधांविषयीं प्रसिद्ध आहेत. तथापि त्यांच्या लघुकथा कमी परिणामकारक नाहींत. सूक्ष्मनिरीक्षण आणि मनोव्यापाराचें अचूक ज्ञान हीं त्यांच्या कसलेल्या भाषेंतून प्रतीत होतात. त्यांच्या कथा वाचकाला अस्वस्थ करतात, उद्वेग आणतात. लक्ष्मणराव सरदेसाई यांचे कथाविषय गोमांतकातले असल्यानें त्यांत नवीन माधुरी उत्पन्न होत असते. दौंडकरांचा ‘मोत्याची कुडी’ हा कथासंग्रह तंत्रशुद्धतेच्या दृष्टीनें चांगला आहे. द. र. कवठेकराना सामाजिक प्रसंग व पात्रें मनोविश्लेषणाच्या सूक्ष्म पद्धतीनें विस्तृत ग्रामीण पार्श्वभूमीवर उत्कृष्ट रंगवितां येतात. भावनेची उत्कटता दाखवून ते वाचकांना रडवितात, संतप्त करतात किंवा विमनस्कता आणतात. ‘अंध अंधारीं बैसले’ ही लघुकथा या दृष्टीनें उत्कृष्ट आहे. दीर्घ वाचन आणि व्यापक अवलोकन या बाबतींत कवठेकर होतकरूंना अनुकरणीय लेखक ठरतील.

व्यक्तिचित्रें रंगविणारे लघुकथालेखक म्हणून कुमार रघुवीर, बागल, गांगल, ताम्हणकर, इ. चीं नांवें सांगतां येतील. ताम्हणकरांचा ‘दाजी’ अविस्मरणीय आहे. त्यासारखेच ‘तात्या’, ‘गोट्या’, ‘चिमणराव’, ‘अण्णा’, इ. प्रयत्न आहेत. विभावरी शिरूरकर यांचे ‘कळ्यांचे निःश्वास’ स्त्रीजीवनांतील प्रश्नांकडे समाजाचें लक्ष वेधतात. अशा इतर पांचसहा स्त्री-लेखिका सागतां येतील. तथापि सुशिक्षित स्त्रियांनीं अद्यापि चालू गुंतागुंतीच्या सामाजिक जीवनांतील प्रश्नांना हात घातलेला नाहीं.

विनोदी लघुकथा विनोदी वाङ्मयांत पडतील. लघुतमकथा म्हणून एक नवीन प्रकार प्रा. भा. म. गोरे यांनीं मराठींत आणण्याचा प्रयत्न केला आहे, पण तो अद्यापि मूळ धरीत नाहीं.

याप्रमाणें मराठींतील लघुकथाक्षेत्राची थोडी पाहणी झाली. या क्षेत्रांत गेल्या दहा-वीस वर्षांत फार प्रगति होत गेली असून यापुढेंहि औद्योगिक, शास्त्रीय, यांत्रिक, इ. लघुकथा-विषयांचीं दालनें जीं आज आपल्याकडे रिकामीं दिसतात तींहि भरून जातील अशी आशा वाटते. मराठी कादंबरीपेक्षा आज मराठी लघुकथाच जास्त सुधारली आहे व लोकप्रिय ठरली आहे. इतर भाषांतील लघुकथांसंबंधीं त्यांच्या वाङ्मयाच्या आढाव्यांत परामर्ष घेतला आहे.

मागच्या महायुद्धापेक्षां या महायुद्धामुळें पाश्चात्य लेखकांचें जास्त लक्ष वर्णद्वेषाचें निर्मूलन करण्याकडे गेलें आहे. अमेरिकेंत नीग्रोविषयींच्या भावना मानवी मूल्यांच्या भूमिकेवरून चित्रित केल्या जात आहेत. महायुद्धामुळें गोऱ्यांची तुटक व तुच्छतेची वागणी बदलत चालली व आपली चैन आणि स्वास्थ्य केवळ आपल्याच हातीं नसून त्यासाठीं शेजारच्या विजातीयांचें सहकार्य अवश्य आहे याची स्पष्ट जाणीव त्यांना झाली. ही जाणीव लघुकथा-लेखकांनीं प्रामुख्यानें उचलली आहे. आपल्याकडेहि निर्वासितांच्या गोष्टी नवीनच लिहिल्या जात आहेत, पण त्यांत खऱ्या अनुभूतीची आणि राजकीय वस्तुस्थितीची प्रतीति दिसत नाहीं.

‘विरंगुळ्या’ (एस्केपमेंट) च्या म्हणून बऱ्याच गोष्टी लिहिल्या जात आहेत व त्यांचा संपादकांकडूनहि उदोउदो होत आहे; पण त्यांतहि कल्पनांच्या भराऱ्याखेरीज फारसें तथ्य आढळत नाहीं. घटनांचा संबंध कांहीं चमत्कारांशीं लावून परिस्थितीला दैवी कलाटणी देण्याकडे लेखकांची वृत्ति अद्यापिहि दिसून येते व हें वळण कोणत्या थराला जाईल याचा कयास लागत नाहीं, असें लघुकथांचा वाङ्मयीन आढावा घेताना विवेचक पाश्चात्य पंडितहि कबूल करतात. प्रत्यक्ष महायुद्ध चालू असतांना लिहिलेल्या लघुकथा घाईनें, विकारवशतेनें लिहिलेल्या असल्यामुळें त्यांचा परिणाम तात्कालिकच होता. आतां युद्धसमाप्तीनंतर अनेक आपत्ती आणि अडचणी उपस्थित झाल्यामुळें त्यांचें प्रतिबिंब साहजिकच कथालेखनांत पडल्याखेरीज राहत नाहीं.

एवढें मात्र खरें कीं, आजचें लघुकथालेखन रूढ तंत्रबद्धतेतून सुटलें असून अनेक लेखक स्वैरपणें आपलेंच विशिष्ट तंत्र अवलंबीत आहेत. तथापि या वैयक्तिक तंत्रांत क्रांतिकारक नावीन्य क्वचितच दिसतें.

**लघुग्रह**—(ॲस्टेरॉइड्स). सूर्याभोंवतीं फिरणारे शेंकडों लहान ग्रह आहेत व ते बहुधा मंगळ आणि गुरु या ग्रहांच्या मध्यें असतात. क्रांतिवृत्ताशीं यांच्या कक्षा अतिशय विषम स्थितींत असतात. यांच्यापैकीं जास्त मोठा लघुग्रह जो आहे त्याचा व्यास ४५० मैलांहून अधिक नाहीं. पहिला लघुग्रह सेरेस हा १ जानेवारी १८०१ रोजीं सांपडला. आज ज्ञात लघुग्रहांची संख्या एक हजारापेक्षां थोडी अधिक आहे.

**लघुदंतुरचक्र**—(पिनिअन). लहान व्यासाचें एक दंतुरचक्र मोठ्या गतिचक्राला वगैरे जोडून वापरण्यांत आलेलें असतें. कांहीं ठिकाणीं गतिदंड व लघुदंतुरचक्र हीं एकसंध व एकाच तुकड्यांतून कांतून काढलेलीं असतात. अशाच एका

प्रकारच्या चाकांचा उपयोग नौका चालविण्याकरितां गति देण्याच्या कामीं करण्यांत येतो.

**लघुप्रतिमा**—( मिनिएचर ). एखाद्या वस्तूचें अथवा विशेपतः व्यक्तीचें अगदीं लहान चित्र काढल्यास त्यास लघुप्रतिमा असें म्हणतात. अशा तऱ्हेचीं चित्रें सोळाव्या शतकापासून आढळतात. अशीं चित्रें काढणारे पहिले चित्रकार हॉलबीन व निकोलस हिलिअर्ड हे होत. पहिला जेम्स व पहिला चार्लस यांच्या कारकीर्दीत ऐझाक व पीटर ऑलिव्हर यांस अशीं चित्रें काढण्याकरिता नेमलें होतें. यानंतर जॉन हॉस्किन्स व त्याचा भाचा सॅम्युएल कूपर यांचीं नांवें आढळतात. अठराव्या शतकामध्यें लॅरेन्स क्रॉस, जर्व्हेस स्पेन्सर व बर्नार्ड लेन्स यांचीं चित्रें दिसतात. यानंतर रिचर्ड कॉसवे व त्याचे शिष्य अँड्र्यू व नाथानिएल प्लिमर, त्यांचा प्रतिस्पर्धी जॉर्ज एंजल हार्ट, तसेंच स्वभावनिदर्शक जॉन स्मार्ट (१७४१-१८११) आणि हेनरी बोन (१७५५-१८३९) (मीना-एनामेल चित्रकार), इत्यादि चित्रकार होऊन गेले. नंतर ही कला बहुतेक नामशेष झाली.

हिंदुस्थानांत ऐतिहासिक व्यक्तींच्या लघुप्रतिमा उत्तर हिंदुस्थानांत जयपूर वगैरे ठिकाणीं अद्यापहि चांगल्या तयार होतात.

**लघुमालिनीवसन्त**—एक आयुर्वेदीय औषध. कलखापरी व मिरे यांचा गाईच्या लोण्यांत खल करतात. जीर्ण ज्वरावर हें एक अप्रतिम औषध आहे. पान्थरी वाढणें, हातापायांची आग, भूक न लागणें, तहान लागणें, इत्यादि लक्षणें असतांना हें औषध उपयुक्त आहे. लहान मुलांच्या विकारांवर, गरोदर स्त्रियांच्या विकारांवर हें औषध चांगलें लागू पडतें. स्त्रियांच्या प्रदरावरहि याचा चांगला उपयोग होतो. आयुर्वेदाच्या अत्युत्कृष्ट औषधांपैकीं हें एक आहे. १ ते ३ गुंजा लोणी, खडीसाखर किंवा मध यांबरोबर देतात.

**लघुमृगांकरस**—एक आयुर्वेदीय रसायन. १ पारा, १ सोनें, २ मोतीं, १ गंधक व ½ टांकणखार या सर्वांचा कांजिकामध्यें एक दिवस खल करावा. तो शरावांत घालून तो शराव लवणपूरित पात्रांत ठेवून बंद करावा. आपोआप थंड झाल्यावर औषध खलून ठेवावें. हें रसायन तूप व पिंपळी, अथवा मध व पिंपळी यांत द्यावें. याच्या सेवनानें क्षयादिक रोग दूर होतात.

**लघुलेखन**—( शॉर्ट हँड ). माणूस जितक्या वेगानें बोलत असेल तितक्याच वेगानें त्याचें सर्वच्या सर्व भाषण उतरवून घेतां येण्याजोगी एखादी लिपि संग्रहीं असावी, ही कल्पना वाटते तेवढी आधुनिक नाहीं. लघुलिपीचा उगम कांहीं पंडितांच्या मतें मिसरदेशीय चित्रलिपीपर्यंत अगर हिब्रू व इराणी लोकांपर्यंत म्हणजे खिस्तपूर्व १००० वर्षें इतका मागें नेतां येतो. ग्रीक लोकांच्या संग्रहींहि एखादी लघुलिपि असावी असें वाटतें

पण हे सारे तर्क कांहींसे अतिशयोक्त असणें शक्य असलें तरी खिस्तपूर्व ६३ मध्यें मार्कस ट्यूलियस् टिरो नांवाच्या एका बंधमुक्त रोमन गुलामानें लघुलिपीचा वापर रूढ केल्याची इतिहासांत नोंद आहे. टिरो हा सुप्रसिद्ध रोमन वक्ता जो सिसेरो त्याचा चिटणीस व मित्र होता. सुप्रसिद्ध कॅटिलाइन कटाच्या चौकशीचें प्रतिवृत्त उतरवून घेण्यासहि सिसेरोनें लघुलेखकांची योजना केली होती.

टिरोच्या लघुलिपीस 'नोटी टिरोनिआनी' असें नांव होतें. व्यवहारांत ज्याप्रमाणें आपण सा॰ म्हणजे साहेब अगर प्रा॰ म्हणजे प्रमाणें अशा सर्वमान्य संक्षिप्तांचा वापर करतों त्याप्रमाणें टिरोनें आपल्या लिपींत त्याच्या काळीं प्रचलित असलेल्या अगर करण्याजोग्या अनेक संक्षिप्तचिह्नांचा वापर केला होता. टिरोच्या लिपींत स्वरदर्शनासाठीं बिंदु इत्यादींच्याऐवजीं रेषेच्या दिशेनें स्वरनिश्चिति करीत असत. टिरोची लघुलिपि रोमन शाळांमधून शिकवीत व राजेलोकहि ती शिकत असत. महत्त्वाच्या कागदपत्रांत अफरातफरीला जागा असूं नये म्हणून नेहमींच्या मजकुरानंतर लघुलिपीचा उपयोग करीत असावे, असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

मध्ययुगांत खिस्ती धर्माच्या प्रसाराबरोबर टिरोच्या लघुलिपीचें महत्त्व वाढतच गेलें. खिस्ती धर्माच्या उपःकालांत खिस्त धर्मप्रसारकांवर भरलेल्या खटल्यांचे वृत्तांत लघुलिपींत लिहिलेले आहेत. शार्लमेन या फ्रेंच सम्राटानें टिरोच्या लघुलिपीचा अभ्यास केलेला होता.

लघुलेखनकला केवळ पाश्चात्यांनाच अवगत होती असें नाहीं. अरबांमध्येंहि लघुलिपि प्रचलित होती. एवढेंच नव्हे तर तिचा अभ्यास करून एका चिनी अभ्यासकानें इ. स. ९२३ त टिपणें करून घेतल्याची इतिहासांत नोंद आहे.

इंग्रजी भाषेंत लघुलिपीची कल्पना पहिल्यानें मांडल्याचें श्रेय एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींतल्या काळांत झालेल्या टिमोथी ब्राइट नांवाच्या माणसाकडे जातें. त्यानें आपला Characterie: An Arte of Shorte, Swifte& Secrete writing by Character हा ग्रंथ इ. स. १५८८ मध्यें प्रसिद्ध केला. फ्रेंच लघुलिपीवरील पहिलें पुस्तक जेकस कोसार नांवाच्या माणसानें इ. स. १६५१ त प्रसिद्ध केलें, तर जर्मन लघुलिपीवरील पहिलें पुस्तक इ. स. १६७९ मध्यें प्रसिद्ध झालें.

जगांत आजवर होऊन गेलेल्या लघुलिप्यांची मोजदाद करणें खरोखरच मोठें अवघड काम आहे. केवळ इंग्रजी भाषेंतच एक हजारावर लघुलिप्या होऊन गेलेल्या आहेत. सुदैवाची गोष्ट

एवढीच कीं, त्यांपैकीं कमींत कमी नऊ-दशांश लिप्या तरी आज इतिहासजमा आहेत.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | | | | |
| २ | | | | | | | | |
| ध्वनिमूल्य | प | ब | ट | ड | क | ग | फ | व्ह |
| १ | | | | | | | | |
| २ | किंवा | किंवा | किंवा | किंवा | | | | |
| ध्वनिमूल्य | थ | द | स | झ | श | झ | च | ज |
| १ | | | | किंवा | | | | किंवा |
| २ | | | | | | | | |
| ध्वनिमूल्य | न | ङ॰ | म | र | ल | व | य | ह |

↓ स्वर-चिन्हें. * टीप पहा VOWELS. | व्यंजन-चिन्हें.↑ CONSONANTS.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | | | | |
| २ | | | | | | | | |
| ध्वनिमूल्य | अॅ | आ | ए | एऽऽ | इ | ई | ऑ | ऑऽऽ |
| १ | | | | | | | | |
| २ | | | | | | | | |
| ध्वनिमूल्य | अ | ओ | उ | ऊ | आय् | ऑइ | औ | यू |

१ सर आयझॅक पिटमन
२ जॉन रॉबर्ट ग्रेग.

संधि-स्वर-चिन्हें.↑ DIPTHONGS.

**पिटमन व ग्रेग पद्धतींमधील ध्वनिचिन्हांचा तौलनिक तक्ता**

टीप :—पिटमन पद्धतींतील बिंदू ( dots ), लघुरेखा ( dashes ), शंकू ( cones ), इत्यादि स्वरचिन्हांचें मूल्य तीं चिन्हें निकटवर्ती अक्षराच्या शिरोभागाजवळ आहेत, मध्याजवळ आहेत, कीं तळाशीं आहेत, यावर अवलंबून असल्यानें त्या स्वर-चिन्हाजवळ एक उभी रेघ कल्पून तिच्या योगानें स्वरमूल्य दाखविलें आहे. परंतु ती उभी रेषा म्हणजे मात्र स्वरचिन्ह नव्हे.

पिटमन—आधुनिक इंग्रजी लघुलेखनकलेचा आद्य प्रवर्तक ही पदवी ज्याला यथार्थतेनें शोभेल असा पुरुष म्हणजे सर आयझॅक पिटमन ( पाहा ) हा होय. लघुलिपि ही अक्षरानुसारी ( Orthographic ) असण्याऐवजीं ती ध्वन्यनुसारी ( Phonetic ) असावी ही कल्पना इंग्लंडमध्यें पहिल्या प्रथम विल्यम टिफिन यानें इ. स. १७५० मध्यें मांडली खरी. पण तदनुसार इंग्रजी भाषेंतील सर्व वर्णोच्चारांचें शास्त्रशुद्ध पृथक्करण करून प्रत्येक वर्णोच्चारासाठीं सोईचें असें चिन्ह ठरविणें इतकेंच नव्हे तर वारंवार वापरांत येणाऱ्या शब्दांसाठीं अगर शब्द-समुच्चयांसाठीं सोपीं संक्षिप्त चिह्नें प्रचारांत आणणें हीं कामें पिटमन यानेंच अतिशय कौशल्यानें पार पाडलीं. या बहुमोल कामगिरीबद्दल सम्राज्ञी व्हिक्टोरिया हिच्याकडून त्याला सरदार-कीचा किताब मिळाला. आपल्या लघुलिपीचा प्रसार इंग्रजी भाषा जेथें जेथें प्रचलित आहे तेथें तेथें सर्वत्र झालेला पाहूनच पिटमन इ. स. १८९७ त मरण पावला. वार्ताहरांच्या विश्वांत पिटमनची लघुलिपि अजूनहि अग्रेसर आहे. ( १ ) बेन पिटमन, ( २ ) ग्रॅहॅम, ( ३ ) आयझॅक पिटमन, व ( ४ ) मन्सन हे पिटमनच्या लघुलिपीचे चार पोटभेद म्हणतां येतील.

जॉन रॉबर्ट ग्रेग (इ. स. १८६७–१९४८)— इंग्रजी भाषेंतील ध्वनींचें शास्त्रशुद्ध वर्गीकरण करून तदनुसार चिन्हें ठरविण्याचें श्रेय ज्याप्रमाणें पिटमनकडे जातें त्याप्रमाणें लघुलिपीसाठीं वापरण्यांत येणाऱ्या चिन्हांचेंहि शास्त्रशुद्ध वर्गीकरण करून हीं चिन्हें एकमेकांस जोडतांना सुलभ जातील अशी त्यांची योजना करणें व अक्षराच्या पुसट अगर ठळक-पणावर त्याचें ध्वनिमूल्य अवलंबून न ठेवतां अक्षराच्या लांबीवर तें ठेवणें, या सुधारणा लघुलिपींत घडवून आणण्याचें श्रेय जॉन रॉबर्ट ग्रेग याच्याकडे जातें. अमेरिकेंत आज ग्रेगची लघुलिपिच बहुंशीं प्रचलित आहे.

लघुलेखनयंत्र—लघुलेखनहि यंत्राच्या साहाय्यानें करतां यावें अशा प्रकारचीं कांहीं यंत्रें एकोणिसाव्या शतकाच्या शेव-टच्या चरणांत कल्पक माणसांनीं शोधून काढलीं आहेत. वार्ड-स्टोन आयलँड नांवाच्या एका अमेरिकनानें इ. स. १९११ मध्यें शोधून काढलेलें स्टेनोटाइप या नांवाचें यंत्र सुप्रसिद्ध असून इ. स. १९३५ मध्यें त्या यंत्रावर एका मिनिटास ३८२ शब्द उतरवून घेण्याचा विक्रम क्लेम बोलिंग नावाच्या माणसानें करून दाखविला आहे. या यंत्राचें वजन अवघें साडेचार पौंड असून लघुलेखन करताना लेखणीपेक्षां या यंत्राचा उपयोग माणसें अधिकाधिक प्रमाणांत करूं लागतील असें या यंत्राच्या संशोधकाचें म्हणणें आहे. कोणींहि या यंत्रावर करून घेतलेली

टिपणें ती लिपि जाणणाऱ्या कोणाहि माणसास वाचतां येतील (transferability of notes) हा यांत्रिक लघुलेखनाचा सर्वांत मोठा फायदा आहे.

मराठी लघुलेखन—लघुलेखनावर मराठींत कालानुक्रमानें खालील पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत :—

(१) रामचंद्र भिकाजी गुंजीकर–लाघवी लिपि किंवा अति त्वरेनें लिहिण्याची युक्ति (१८७४). (२) गजानन भाऊ वैद्य–लघुलेखनपद्धति किंवा अति त्वरेनें मराठी भाषणें लिहिण्याची युक्ति (१८८१). (३) भुजंगराव रामचंद्र मानकर–लघुलेखनकला (१८९७). (४) वासुदेव सीताराम वेंद्रे—वेंद्रे यांची अखिल हिंदी भाषांकरितां शीघ्रध्वनिलेखनपद्धति (१९२२). (५) गणेश गंगाधर मराठे–मराठी लघुलेखनपद्धति (१९३७). (६) एल्. पी. जैन–संकेत–लिपि (१९३९). (७) दि. गो. मालेगांवकर–मालेगांवकरांचें मराठी लघुलेखन (१९४०). (८) हरि पंढरीनाथ मोहोळकर–मराठी लघुलिपि (१९४९).

वरीलपैकीं वेंद्रे यांची लघुलिपि स्लोनच्या लिपीवर आधारलेली आहे तर श्री. मराठे व श्री. जैन यांनीं बरीचशी स्वतंत्रपणे लघुलिपि बसविण्याचा यत्न केलेला आहे. श्री. मोहोळकर यांनीं व्यंजन चिन्हांत पिटमनचा बराच अंगीकार केला असला तरी स्वरचिन्हांच्या बाबतींत स्वतंत्र मार्ग आचरिला आहे. उरलेल्या सर्व जणांनीं कमजास्त प्रमाणांत पिटमनच्या लघुलिपीचाच अंगीकार केलेला आहे. ऋषिलाल आग्रवाल (१९४७) या हिंदी लघुलेखकासंबंधानेंहि हेंच विधान करतां येईल.

**लघुक्षेत्र**—(स्मॉल होल्डिंग्स). शेतजमिनीचा लहान तुकडा. इंग्लंडच्या कायद्याप्रमाणें ५० एकरांपेक्षां जास्त मोठी नसणारी शेतजमीन या व्याख्येंत येते. अशा तुकड्यावर शेतकरी आपला उदरनिर्वाह करतो. १९३२ सालीं इंग्लंडांत यांची संख्या ३,९०,४६९ होती. हिंदुस्थानांत शेतजमिनीचे फारच लहान तुकडे आहेत. कुटुंबांतील वांटण्यामुळें हे झाले असून कायद्याचें बंधन नसलें तर याहूनहि जास्त होतील. यामुळें जमिनीकडे मालकाला लक्ष देतां येत नाहीं व उत्पन्न निघत नाहीं. अमुक एका प्रमाणाखालीं शेतजमिनीचें क्षेत्रफळ असूं नये असा कायदा करण्याचे कांहीं प्रांतिक सरकारांचे प्रयत्न बरेच दिवस चालू होते. १९२० सालीं पंजाबांत सहकारी तत्त्वावर अशा लहान तुकड्यांचें एकीकरण करून उत्पन्न काढण्यांत आलें. पुढें या बाबतींत बरीच प्रगति झालेली पाहून १९२८ सालीं मध्यप्रांत सरकारनें 'कॉन्सॉलिडेशन ऑफ होल्डिंग्स ॲक्ट' करून तो प्रथम छत्तिसगड भागांत लागू केला. त्याच सालीं मुंबई प्रांतांत विधिमंडळांत असेंच एक बिल आलें असतां फार विरोध होऊन तें मागें घेण्यांत आलें. आतां नुकताच पुन्हां अशाच तऱ्हेचा कायदा करण्यांत आलेला आहे.

**लच्छासाग**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतात, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण होय. वादी धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय सकाळचा पहिला प्रहर मानतात. याच्या आरोहांत तीव्र निषाद व अवरोहांत कोमल निषाद लागतो. बिलावल व खमाज या दोन रागांच्या मिश्रणानें हा राग बनलेला आहे. यांतील गांधार स्वराच्या प्रयोगानें यांत गौडसारंग रागाची छाया उत्पन्न होते, पण बिलावल अंग पुढें आल्यानें ती दूर होते. हा एक बिलावल प्रकार आहे.

**लॅटिन भाषा व वाङ्मय**—भाषा–आर्यन भाषावंशांतील ही एक शाखा असून खि. पू. १५०० पासून इटली देशांत बोलली जात असे. पुढें रोमन साम्राज्य झाल्यावर या भाषेला महत्त्व येऊन उत्कृष्ट वाङ्मय तयार झालें व त्याला 'अभिजात' (क्लासिकल) असें विशेषण यथार्थतेनें आजच्या काळांत मिळूं लागलें. रोमन साम्राज्याच्या अखेरच्या दोन शतकांत व तें साम्राज्य नष्ट झाल्यानंतर इतर भाषांशीं संघर्ष होऊन लॅटिन भाषा अपभ्रष्ट झाली. आठव्या शतकाच्या सुमारास लॅटिन भाषा बरीचशी बोलण्यांतून गेली, पण ज्या ज्या भागांत रोमन साम्राज्य पसरलें होतें त्या त्या भागांत लॅटिनपासून बनलेल्या अनेक भाषा तयार झाल्या व त्या आजहि रोमान्स भाषा (पाहा) या नांवानें ओळखल्या जातात. इटालियन, फ्रेंच, स्पॅनिश, पोर्तुगीज व रुमानियन या त्या भाषा होत. इंग्रजी भाषेंत तीन-सप्तमांश शब्द लॅटिनमधले आहेत, तरी प्रत्यक्ष रोमन लोकांपासून ते न येतां नॉर्मन-विजयानंतर ग्रेटब्रिटनमध्यें ते रूढ झाले.

या रोमान्स भाषा प्रत्यक्ष अभिजात लॅटिनपासून न बनतां लॅटिन बोलींपासून बनल्या आहेत, हें चमत्कारिक वाटलें तरी खरें आहे. 'तमोयुगांत' (डार्क एज) अपभ्रष्ट लॅटिन हीच धर्म, कायदा आणि विद्या यांची माध्यम असून दोन शतकांपूर्वींहि कांहीं देशांतून ती तशीच रूढ होती. अभिजात स्वरूपांतील लॅटिन पुढच्या काळांत पंडिती लिखाणांतून व आंतरराष्ट्रीय व्यवहारांतून उपयोजिली जाऊं लागली. आपल्याकडे ज्याप्रमाणें वैदिक वाङ्मयाचें रक्षण भिक्षुकांनीं केलें त्याचप्रमाणें तमोयुगांत लॅटिन भाषा–वाङ्मयाचें रक्षण पाद्री लोकांनीं केलें यांत संशय नाहीं.

लॅटिन भाषा पुष्कळशी ग्रीक भाषेसारखी आहे. तिची घटना संस्कृतप्रमाणें परिपूर्ण असून, अचूक शब्दयोजना तीमध्यें आहे. म्हणून कायद्यांत तिला महत्त्वाचें स्थान आहे. संस्कृतप्रमाणें

लॅटिन उच्चार निरनिराळ्या देशांत तिकडच्या भाषेप्रमाणें विकृत होत असतात. अमेरिकन लॅटिन उच्चार शिकण्याची एक 'रोमन पद्धत' निघाली आहे. सिसेरोच्या काळांतील लॅटिन उच्चार करावयास यावा असा या पद्धतीचा उद्देश आहे.

लॅटिन वाङ्मय—लॅटिन वाङ्मय हें बहुतेक ग्रीक वाङ्मयाचें अनुकरण करणारें व त्याच्याच धर्तीवर लिहिलें गेलेलें वाङ्मय आहे. या वाङ्मयांत ग्रीक वाङ्मयाहून निराळें व नवीन कांहीं फारसें आढळत नाहीं. लॅटिन ग्रंथकारांत नवीन कल्पना फारशा आढळून येत नाहींत. तथापि लॅटिन गद्य व पद्य या दोन्ही प्रकारच्या वाङ्मयाचा पुढील युरोपीय वाङ्मयावर फार महत्त्वाचा परिणाम झालेला आहे. एवढेंच नव्हे तर ग्रीक वाङ्मयापेक्षांहि लॅटिन वाङ्मयाचें वर्चस्व आपणांस उत्तरकालीन युरोपीय वाङ्मयांत विशेष आढळून येतें. त्याप्रमाणेंच या वाङ्मयाचा युरोपीय शिक्षणावरहि फार महत्त्वाचा परिणाम झालेला आहे. लॅटिन भाषा जेव्हां बनत होती त्या वेळचें लॅटिन वाङ्मय अगदींच प्राथमिक स्वरूपाचें व अगदींच साधें असलेलें दिसून येतें व या कालांतील वाङ्मय फारसें टिकूनहि राहिलेलें नाहीं. यानंतर सुमारें ख्रि. पू. ८४ पर्यंतच्या कालांत वाङ्मयांत थोडीफार सुधारणा झालेली आढळून येते. या कालांत कांहीं रोमन ग्रंथकार झळकलेले आपल्या दृष्टीस पडतात. त्यांचा अग्रणी म्हटला म्हणजे केटो हा होय. ख्रि. पू. ८४ पासून ख्रिस्तोत्तर १४ हा काल म्हणजे लॅटिन वाङ्मयाचें सुवर्णयुग समजण्यांत येतें. या कालांत व्हर्जिल, सीझर, सिसरो आणि लिव्ही या ग्रंथकारांचीं नांवें आपणांस प्रामुख्यानें आढळतात. ऑगस्टस बादशहाच्या मृत्यूपासून हॅड्रिअन बादशहापर्यंतच्या कालास लॅटिन वाङ्मयाचें 'रौप्ययुग' मानण्यांत येतें. या कालांत जुव्हेनल, टॅसिटस आणि प्लिनी हे ग्रंथकार होऊन गेले. यानंतर ख्रिस्ती शकाच्या चौथ्या शतकापर्यंत लॅटिन वाङ्मयास उतरती कळा लागली होती व त्यानंतरच्या काळांत तर या वाङ्मयाची इतकी अवनति झाली कीं, लॅटिन भाषा ही अजीबात प्रचारांतून नाहींशी झाली व तिला एका मृत भाषेचें स्वरूप आलें. रोमन भाषा व वाङ्मय पाहा.

**लॅटेक्स**—हा कांहीं जातीच्या झाडास खांचा पाडल्यावर त्यांतून जो दुधासारखा रस बाहेर पडतो तो होय. हा रस हवेमध्यें उघडा ठेवला असतां घट्ट होतो व त्यांत कडू व विषारी घटक असतात. याचा मुख्य उपयोग जखम भरून काढण्याच्या कामीं व तिचें संरक्षण करण्याच्या कामीं करण्यांत येतो.

**लट्टोरा पक्षी**—(श्राइक). ही झाडावर राहणाऱ्या लॅनिइडी वर्गांतील पक्ष्यांची एक जात आहे. या पक्ष्याची चोंच बांकदार असते व याची लांबी ९ ते १० इंच असते. याच्या एका जातीच्या पक्ष्यांची पाठ तांबडी असते. हिंवाळयांत ब्रिटनमध्यें यांतील चार जातींचे पक्षी येतात. पैकीं तांबडी पाठ असलेलाच तेथें विण्यास राहतो.

**लट्ठे, आण्णा बाबाजी** (१८७८-१९५०)—एक महाराष्ट्रीय सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण पुणें येथील डेक्कन कॉलेजमध्यें झालें. १९०७ ते १९११ पर्यंत हे राजाराम कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक होते. नंतर १९१४ पर्यंत एज्युकेशनल इन्स्पेक्टर होते. सदर्न मराठा जैन असोसिएशनचे अध्यक्ष होते. १९१८ ते १९२० पर्यंत यांनीं 'डेक्कन रयत' या पत्राचें संपादन केलें. १९२१ ते १९२३ पर्यंत हे मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. १९२६ ते १९३० पर्यंत हे कोल्हापूर संस्थानचे दिवाण होते. त्या वेळीं हे गोलमेज परिषदेस गेले होते. १९३२ मध्यें हे परत बेळगांव येथें वकिली करूं लागले. तेथील सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँकेचे चेअरमन होते. मुंबई इलाख्यांत पहिलें काँग्रेस मंत्रिमंडळ असतांना ते अर्थमंत्री होते. नंतर १९४२ च्या काँग्रेस चळवळींत भाग न घेतल्याकारणानें हे काँग्रेसच्या राजकारणांत मागें पडले. यांनीं कोल्हापूरच्या शाहूमहाराजांचें चरित्र व कांहीं जैनधर्मविषयक ग्रंथ लिहिले आहेत.

***लंडन***—ब्रिटिश साम्राज्याच्या राजधानीचें ठिकाण व जगांतील सर्वांत मोठें शहर. हें थेम्स नदीवर वसलें असून याचें एकंदर क्षे. फ. ४,४३,४५५ एकर आहे व लो. सं. ८७ लाख आहे. बृहत् लंडन एवढें मोठें आहे. यांत शहर व उपनगरें येतात. खुद्द लंडन शहर ६७५ एकर आहे व यांत व्यापारी ठिकाणें मुख्य आहेत व वेगळी नगरपालिका आहे. लंडनमधील बाकिंगहॅम राजवाड्यांत राजा व सेंट जेम्स राजवाड्यांत युवराज राहतो. व्हाइट हॉल व त्याभोंवतालच्या इमारतींतून सरकारी आणि वसाहती कचेऱ्या आहेत. वेस्ट मिन्स्टर हॉल, टॉवर, पार्लमेंटगृहें, कोर्टें, बँक ऑफ इंग्लंड, मॅन्शन हाउस, गिल्ड हॉल यादि प्रसिद्ध इमारती आहेत. देवस्थानांपैकीं सेंट पॉल्स कॅथीड्रल आणि वेस्ट मिन्स्टर ॲबे हीं प्रमुख आहेत. नेल्सन, व्हिक्टोरिया, ब्रिटिश योद्धे, इ. चीं स्मारकें शहरांत उभारलीं आहेत. आगगाड्यांचें तर येथें जाळेंच आहे. धक्के आणि गोद्या या ठिकाणीं जगांतील दळणवळण चाललें असतें. 'ट्यूब' नांवानें जमिनीखालून जाणाऱ्या गाड्यांची रहदारी आहेच. ट्रॅम आणि बस जिकडे तिकडे मोठ्या रस्त्यांवरून धांवतात. ठराविक रस्त्यांवर ठराविक धंद्यांचीं आणि मालांचीं दुकानें आहेत. सर्व प्रकारचा जगांतील व्यापार येथें चालतो. कापड, कागद, यंत्रें, लाकूडकाम, अन्न, पेयें, शास्त्रीय उपकरणें, रसायनें आणि औषधें, वायु आणि वीज, कांतडीं, कांच, इ. जिन्नसा या ठिकाणीं भरपूर तयार होतात.

लंडनमध्यें नऊ बाजार (मार्केट) आहेत. लंडनच्या बंदरांत अनेक गोद्या आहेत व १९०९ सालीं एक स्वतंत्र बंदरखातें निर्माण करण्यांत आलें.

करमणुकीसाठीं अनेक गृहें एकाच लहान भागांत आहेत. त्याला 'थिएटरलंड' असेंच नांव आहे. नाटकें, सिनेमा, गाणीं, इतर खेळ तेथें अक्षयीं चाललेले असतात. क्रिकेट, फुटबॉल, टेनिस यांसारख्या खेळांसाठीं मोठमोठीं मैदानें राखून ठेवलेलीं आहेत. बागा तर अनेक आहेत. वाचनालयें, ग्रंथालयें आणि प्राणि-पदार्थ-संग्रहालयें प्रशस्त इमारतींतून ठेविलीं आहेत. लंडन विद्यापीठ १८३६ सालापासून आहे. त्यांत आज दहा हजारांवर विद्यार्थी आहेत व साडेचाराशें प्राध्यापक आहेत.

रोमन लोक येण्यापूर्वीं या ठिकाणीं केल्टिक ब्रिटन लोक राहत होते. रोमन लोकांनीं या शहराचें वैभव वाढविलें; पण नंतर डेन्स चाच्यांनीं तें बरेंच उध्वस्त केलें. नॉर्मन राज्य सुरू झाल्यावर पुन्हां लंडन वाढूं लागलें. १६६५-१६६६ सालीं प्लेग आणि आग यांनीं पुन्हां शहराचा फार नाश झाला. १८५१ सालीं येथें पहिलें सार्वराष्ट्रीय प्रदर्शन भरलें व १९२४-२५ सालीं प्रसिद्ध वेंब्ले प्रदर्शन गाजलें. गेल्या (दुसऱ्या) महायुद्धांत जर्मन बाँबच्या हल्ल्यांनीं लंडनची शोभा गेली यांत शंका नाहीं. आतां पुन्हां शहराची सुधारणा व जीर्णोद्धार यांचीं कामें चाललीं आहेत.

**लढाऊ मासा**—हा मासा आकारानें लहान असून याच्या कल्ल्यांत हाडांचा कणा असतो. हा आग्नेय आशियांत आढळतो. हा रागावला म्हणजे घातुसारखा चकाकूं लागतो.

**लतिफी, अल्लम्मा** (१८७९-    )—एक हिंदी अधिकारी. यांचें शिक्षण मुंबई, लंडन, पॅरिस, हायडेलबर्ग, कैरो, वगैरे ठिकाणीं झालें. यांनीं परीक्षांत उत्तम प्रकारचें यश मिळाविलें. १९०३ मध्यें यांची पंजाबमध्यें असिस्टंट कमिशनर म्हणून नेमणूक झाली. तेथून अनेक निरनिराळ्या मोठमोठ्या हुद्यांवर जमाबंदी व न्यायखात्यांत नेमणूक झाली होती. १९०९-१० मध्यें यांनीं पंजाबमधील उद्योगधंद्यांची पाहणी केली. १९११ मध्यें हे दिल्ली दरबारला प्रेस कँपमध्यें होते. १९११-१२ मध्यें दिल्लीस डिस्ट्रिक्ट जज्ज होते. १९१३ ते १९१८ मध्यें हे हैद्राबाद (दक्षिण) मध्यें शिक्षणाधिकारी होते. १९१८ ते १९२१ मध्यें हिस्सार जिल्ह्यांत डेप्युटी कमिशनर होते. १९२१ ते १९२४ मध्यें हे सेक्रेटरी व पंजाब कायदे मंडळाचे समासद होते. १९२८ मध्यें हे कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद होते. मार्च १९३० मध्यें हे हेग येथें भरलेल्या इंटरनॅशनल लॉ कॉन्फरन्सला प्रतिनिधि म्हणून गेले होते व त्याच वर्षीं इंटरनॅशनल लेबर कॉन्फरन्सला जिनिव्हा येथें प्रतिनिधि व सल्लागार म्हणून गेले होते. त्याच वर्षाच्या जून महिन्यांत लंडन येथील इंटरपार्लमेंटरी कॉन्फरन्सला प्रतिनिधि म्हणून गेले होते. ते तिन्ही गोलमेज परिषदास उपस्थित होते व त्या परिषदेच्या कमिटीचे ते सेक्रेटरी होते (जून १९३२). १९३८ त हे सेवानिवृत्त झाले. यांनीं सर्व भरतखंडास सर्वसामान्य होईल अशी लिपि बसविण्याचा प्रयत्न केला आहे, पण ती रोमन लिपीवर आधारलेली असल्यामुळें सदोष आहे. यांनीं अनेक ग्रंथहि लिहिले आहेत.

**लँथनम्**—मृत्तिका (सेरियम) वर्गातील एक दुर्मिळ धातु. परमाणुभारांक १३९.०. त्रावणकोर संस्थानांत मोनॅझाइट वाळूंत सांपडते. १८४१ त मोझॅन्डरनें हिचा शोध लावला.

**लदख**—हिंदुस्थान, काश्मीरमधील एक प्रांत. सिंधु आणि तिच्या उपनद्या यांचीं खोरीं या प्रदेशांत असून हिमालयाचा कांहीं उंच भाग यांत येतो. याची उंची ९,००० ते १४,००० फुटांपर्यंत आहे. क्षे. फ. सुमारें ४५,७६२ चौ. मै. व लो. सं. १,८६,०००. हवा कोरडी, पाऊस अगदीं कमी व बर्फ मात्र भरपूर असा हा निर्वृक्ष प्रदेश आहे. याक, काळविटें, बकरीं हीं जनावरें दिसतात. जमीन रेताड आहे, पण कांहीं धान्यें व गवत होतें. या भागांत पुष्कळ मठ आहेत व त्यांच्या मदतीनें शेतकी चालते. चिनी, तार्तरी, तिबेट आणि पंजाब या प्रांतांशीं व्यापार लदखमार्फत होतो. १९ व्या शतकांत काश्मीर संस्थान स्थापन होईपर्यंत या प्रदेशावर सत्ता तिबेटची होती. लदखची राजधानी लेह असून त्याची लो. सं. सुमारें ३,००० आहे. यांत 'अर्जुन' लोक पुष्कळ राहतात. स्त्रियांमध्यें बहुपतित्वाची चाल आहे.

**लॅन्सेलेट**—हे एक समुद्रकांठीं आढळणारे प्राथमिक अवस्थेंतील सपृष्ठवंशी प्राणी आहेत. यांची लांबी दोन-तीन इंच असून यांचें शरीर बारीक, चपटें, पारदर्शी व भाल्याच्या आकाराचें असतें. हे समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांतील प्रदेशांत समुद्रकांठीं उथळ पाण्यामध्यें आढळतात. अशा ठिकाणीं ते वाळूमध्यें घरें करतात.

**लपंडाव**—लहान मुलांचा एक खेळ. ज्याच्यावर डाव असेल (म्हणजे जो चोर होईल) त्याचे डोळे 'भोग्या' (गुजराथेंत 'डाई') बांधतो. इतर मुलें कोठें तरी आजूबाजूस लपतात. मुलांस लपण्यास पुरेसा वेळ दिल्यावर 'सुट्यो!' असा इशारा मिळतो. चोर लपलेल्यांना हुडकण्यास जातो. तेव्हां कांहीं लपलेले भोग्याला येऊन शिवतात. भोग्याकडे येतांना किंवा दडलेल्या जागीं चोरानें शिवल्यास त्यावर चोर होण्याची पाळी येते. जास्त मुलें पकडल्यास अशा चोरांना 'चंद्र', 'सूर्य', इ. कांहीं नांवें देऊन त्यांची मागणी होते. मागणी होऊन उरलेला चोर बनतो.

याच खेळाचा एक 'सातटाळ्या' म्हणून प्रकार आहे. चोराच्या हातावर एकानें सात टाळ्या देईपर्यंत इतरांनीं लपावयाचें. चोरानें लपणारांना हुडकून धरावयाचें. धरण्यापूर्वी 'अव्वा' म्हणून खालीं बसल्यास त्याच्यावर डाव नाहीं. पण त्या मुलास कोणी तरी येऊन शिवल्याखेरीज तो जिवंत होत नाहीं.

**लॅपलंड**—लॅप लोकांचा देश. या देशाला स्वतंत्र राजकीय स्थान नाहीं. नॉर्वेपासून उत्तरेकडे स्वीडन–फिन्लंडवरून रशियाच्या कोला द्वीपकल्पापर्यंत हा प्रदेश पश्चिम ते पूर्व असा धरण्यांत येतो. या भागांत राहणारे लॅप लोक लहानसरच पण चांगले धडधाकट व मोठ्या डोक्याचे असतात. बहुधा अडाणी पण भोळे आणि आतिथ्यशील आढळतील. नॉर्वेतील लॅप लोक लूथर पंथीय तर रशियांतलि ग्रीक पंथीय आहेत. यांची एकूण लो. सं. ३०,००० भरते. त्यांपैकीं १९,००० नॉर्वेत, ८,००० स्वीडनमध्यें व २,००० फिन्लंडमध्यें आहेत.

**लंबक**—( पेंड्युलम ). सामान्यतः एखादा जड पदार्थ हेलकावे मोकळ्या रीतीनें घेऊं शकेल अशा स्थितींत टांगला असतां त्यास लंबक म्हणतां येईल. साधा लंबक म्हणजे एका स्थिर बिंदूपासून एका दोरीला एक लहानसा जड पदार्थ टांगलेला असतो व तो घर्षण न होतां हेलकावे खाऊं शकतो, अशा पदार्थास म्हणतात. साध्या लंबकाचे हेलकावे जेव्हां फार मोठे नसतात म्हणजे ते त्याच्या स्थिर स्थितीपासून तीनपेक्षां अधिक अंशांचा कोन करीत नाहींत तेव्हां हा लंबक समावधिक ( आयसोक्रोनस ) असतो, म्हणजे त्याच्या प्रत्येक हेलकाव्यास सारखाच वेळ लागतो. हा आंदोलनाचा काल पुढें दिलेल्या समीकरणाप्रमाणें असतो—$ट = \pi \sqrt{ल \div ज}$. या ठिकाणीं **ट** हा प्रत्येक पूर्ण आंदोलनाचा काल असून 'पाय' ची किंमत ३·१४१६ ही असते. **ल** ही त्या लंबकाची फुटांमध्यें लांबी असते आणि **ज** ही गुरुत्वाकर्षणशक्ति असते व तिचें प्रमाण लंडन येथें दर सेकंदास ३२·१९ हें असतें. घड्याळांतील लंबकाचा एका विमोचक ( एस्केपमेंट ) चक्रामुळें आंतील रचनेशीं संबंध जोडलेला असतो व त्यामुळें घड्याळ नियमितपणें चालतें. उष्णतेमुळें पदार्थाची लांबी वाढते व थंडीमुळें कमी होते, त्यामुळें लंबकाचा आंदोलनकाल कमीअधिक होत असतो. याकरितां उष्णतामानावर आंदोलनकाल अवलंबून नसणाऱ्या, तर आपोआप कमीअधिक होणाऱ्या लंबकांची योजना करण्यांत येते.

**लंबन**—( पॅरॅलॅक्स ). जेव्हां एखाद्या पदार्थाकडे आपण निरनिराळ्या ठिकाणांवरून पाहतों तेव्हां आपल्या दृष्टीस त्या पदार्थाचें स्थानांतर झाल्यासारखें दिसतें. या चमत्कारास लंबन असें म्हणतात. ज्योतिषशास्त्रामध्यें सूर्य, चंद्र, ग्रह अथवा धूमकेतु यांच्या बाबतींत हें लंबन म्हणजे त्यांच्याकडे पृथ्वीच्या पृष्ठभागावरून व पृथ्वीच्या केंद्रावरून पाहिलें असतां जें त्यांमध्यें स्थानांतर दिसून येतें तें होय. ताऱ्याच्या बाबतीमध्यें किंवा तेजोमेघाच्या बाबतींत पृथ्वीच्या कक्षेच्या त्रिज्येशीं त्या ताऱ्याच्या अंतराच्या रेषेनें जो कोन होतो त्यास त्याचें लंबन म्हणतात.

**लँबर्ट, जोहान हेन्रिच** ( १७२८–१७७७ )—एक जर्मन गणित–ज्योतिषशास्त्रज्ञ. यानें स्वप्रयत्नानें आपलें उच्च शिक्षण पुस्तकांवरून संपादन केलें. याची योग्यता ओळखून फ्रेडरिक दि ग्रेट बादशहानें याचा सन्मान केला. खगोल आणि पदार्थविज्ञान या शास्त्रांत त्यानें शोध लाविले आहेत. लॅबर्टचे लेख व ग्रंथ आहेत.

**लंबशिल्प**—( पर्पेन्डिक्युलर स्टाइल ). गॉथिक किंवा निमुळत्या कोनाकृति कमानींच्या शिल्पाचा हा एक प्रकार आहे. या प्रकारची शिल्पपद्धति इंग्लंडमध्यें चौदाव्या शतकाच्या अखेरीपासून सोळाव्या शतकाच्या मध्यापर्यंत प्रचलित होती. ऑक्सफर्ड व केंब्रिज येथील बहुतेक कॉलेजांच्या इमारती या पद्धतीच्या आहेत. तसेंच इंग्लंडमधील बरींच खिस्तमंदिरें याच पद्धतीचीं आहेत.

**लबाडी**—( फ्रॉड ). याचा कायद्यांत अर्थ एखाद्या माणसाला स्वतःचा गैरकायदेशीर किंवा अयोग्य रीतीनें फायदा करून घेण्याकरितां मुद्दाम हेतुपुरस्सर फसविणें, किंवा तो फसेल असें कृत्य करणें. या लबाडीच्या कृत्याचा दिवाणी व फौजदारी अशा दोन्ही प्रकारच्या कायद्यांत अंतर्भाव केलेला आहे. म्हणजे लबाडीचीं कृत्यें हा गुन्हा ठरवून त्यांना फौजदारी कायद्यांत शिक्षा सांगितलेली आहे, आणि अशा लबाडीच्या कृत्यांमुळें होणारी आर्थिक नुकसानी भरून मिळण्याकरितां दिवाणी कोर्टांत दावा लावून नुकसानभरपाई मागतां येते. एखाद्या धंदेवाईक कंपनीनें लबाडीचें उद्देशपत्रक ( प्रॉस्पेक्टस ) काढलें तर त्या कंपनीच्या डायरेक्टरला सदर लबाडी त्याच्या संमतीवांचून किंवा त्याला न कळवितां केलेली असली तरी कायदा जबाबदार धरतो. हिंदुस्थानांतील कायद्यांतहि लबाडीच्या कृत्याला फौजदारी व दिवाणी या दोन्ही कायद्यांत कायदेशीर इलाज सांगितलेला आहे. पण लबाडी ( फ्रॉड ) हा इंडियन पीनल कोडांत स्वतंत्र गुन्हा नसून अनेक गुन्ह्यांमध्यें लबाडी हा आवश्यक भाग मानला जातो. शिवाय लबाडी ( फ्रॉड ) आणि कपट ( डिस्‌ऑनेस्टी ) अशा दोन निरनिराळ्या व्याख्या

रोम—फोरमचे अवशेष (पृ. २१८२)

लंडन—सेंट पॉल कॅथीड्रल (विमानांतून दिसणारें) (पृ. २१९६)

लखनौ—इमामवाडा (पृ. १२८९)

लाहोर—जहांगीर कबर (पृ. २२१५)

देऊन त्यांचा अंतर्भाव निरनिराळया प्रकारच्या गुन्ह्यांत केलेला आहे (इंडियन पीनल कोड, कलमें ४०३ ते ४२० पाहा).

**लॅब्राडोर**—हें कानडांतील द्वीपकल्प १७६३ त ब्रिटनला जोडण्यांत आलें. याचें क्षे. फ. ४,७१,७८० चौ. मैल आहे. एक-चतुर्थांश भाग अद्यापि असंशोधित आहे. १९२७ सालीं लॅब्राडोरपैकीं १,१०,००० चौ. मै. इतका प्रदेश प्रिव्ही कौन्सिलनें न्यू फाउंडलंडला दिला. लो. सं. ४,७१६ आहे. येथें कॉड व लॉब्स्टर या जातींचे प्राणी धरण्याचा धंदा महत्त्वाचा आहे. येथील बहुतेक लोक एस्किमो जातीचे आहेत.

**लॅम्ब, चार्लस** (१७७५-१८३४)—एक इंग्रज निबंधकार व विनोदी लेखक. तो कोलेरिजचा जिवलग मित्र होता. त्यानें इंडिया हाउसमध्यें ३३ वर्षें कारकुनाची नोकरी केली. त्याचें लिखाण आहे तें—'ए टेल ऑफ रोझमंड ग्रे' (एक अद्भुतरम्य गोष्ट), 'जॉन वुडव्हिल', 'टेल्स फ्रॉम शेक्स्पियर' (शेक्स्पिअरच्या नाटकांचीं कथानकें) आणि 'दि एसेज् ऑफ एलाया' (पहिला निबंधसंग्रह), 'दि लास्ट एसेज् ऑफ एलाया' (दुसरा निबंधसंग्रह). लॅंबचीं पुस्तकें फार लोकप्रिय आहेत. त्याच्या लेखनांत विनोद, अतिशय विनययुक्त केलेलें आत्मनिवेदन, विशिष्ट लेखनशैली व लेखनचातुर्य हे गुण आहेत.

**ललित**—हा राग मारवा थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत पंचम स्वर वर्ज्य असल्यानें याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर शुद्ध मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा शेवटचा प्रहर आहे. यांत दोन्हीहि मध्यमांचा प्रयोग होतो व ते दोन स्वर एकापुढें एक जोडून घेण्यांत येतात. हा उत्तरांगप्रधान असून याचें स्वरूप स्वतंत्र आहे.

**ललितकला**—मनुष्याच्या सौंदर्यदृष्टीला आकर्षून घेणाऱ्या व ज्यांचा उद्देश केवळ सुख देण्याचा असतो अशा कलांना हें नांव देण्यांत येतें. या कला मानवाच्या बाल्यावस्थेंतहि दृग्गोचर होतात. गुहावासी माणसांनीं रंगीत खडूंनीं काढलेलीं चित्रें उपलब्ध आहेतच. हीं काढण्याचा उद्देश वेळ जावा व करमणूक व्हावी हाच असला पाहिजे. नंतर माणसानें फावल्या वेळीं करावयाची गोष्ट म्हणून कलेकडे पाहिलें. प्रत्येक सुसंस्कृत माणसांत सौंदर्याची मोठी आवड असते. या आवडीचे प्रकार व परिणाम वेगवेगळे असूं शकतात हें उघड आहे. काव्य, शिल्प, संगीत, चित्रकर्म यांसारख्या उच्च गोष्टींत ही आवड जशी प्रतीत होते तशी हलक्या, वैषयिक व हीन कृतींतहि तिचें रूपांतर झालेलें दिसून येतें. कोणी म्हणतात, कला ही निसर्गाची नक्कल आहे तर इतर याला मुरड घालून असें सांगतात कीं, कलाकारावर होणारा निसर्गाचा परिणाम कलेंत प्रादुर्भूत होतो.



यांत्रिक, व्यावहारिक उपयोगाच्या व उद्यम-व्यवसायाच्या कलांहून ललितकला निराळया काढण्यांत येतात. साधारणपणें संगीत, रेखाकला, चित्रकला व शिल्पकला यांचाच ललितकलांत समावेश केला जातो.

**ललितपंचम**—हा राग भैरव थाटांतून निघतो. याच्या आरोहांत पंचम स्वर वर्ज्य आहे व अवरोह सात स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति षाडव-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर मानितात. या रागांत दोन माध्यमांचा प्रयोग होतो. हा राग ललित रागाच्या अंगानें गाण्याचा परिपाठ आहे. तथापि याच्या अवरोहांत पंचम असल्यानें हा ललित रागापासून निराळा होतो. याचा अवरोह वक्र आहे.

**ललितपूर**—संयुक्त प्रांत, झांशी जिल्हा, एक तहसील. क्षे. फ. १०५८ चौ. मै. व लो. सं. सुमारें एक लाख. तहसिलींत पाटबंधारे पुष्कळ आहेत. मुख्य शहर ललितपूर रेल्वेस्टेशन आहे. लो. सं. सुमारें १०,०००. राजा सुमेरसिंग याची राणी ललितादेवी हिचें नांव गांवाला आहे. मराठ्यांच्या अमदानींत गोविंदपंत बुंदेले यानें हें गोंडांपासून घेतलें. १८४४ पर्यंत शिंद्यांकडे होतें. १८९१ त इंग्रजांनीं ललितपूर व झांशी एकत्र करून झांशी जिल्हा बनविला. ललितपुरांत हिंदु व जैन देवळें पुष्कळ आहेत. धान्यें, कातडीं व तूप यांचा मोठा व्यापार चालतो. येथून सुप्रसिद्ध प्राचीन चंदेरी गांव १८ मैलांवर आहे. त्या ठिकाणीं उत्कृष्ट मखमल होते.

**लल्ल**—एक प्राचीन गणित-ज्योतिषशास्त्रज्ञ. 'धीवृद्धितंत्र' हा गणितग्रंथ व 'रत्नकोश' नांवाचा मुहूर्तग्रंथ यानें लिहिला आहे. याचा काळ शक ५६० असावा. पण त्यापूर्वींहि दीडशें वर्षें असेल असे कांहीं संशोधक समजतात. लल्लाच्या ग्रंथावरून पुढील कांहीं ग्रंथकारांनीं आपले ग्रंथ सजविलेले दिसतात. 'पाटीगणित' असा एक लल्लाचा ग्रंथ असावा असें भास्कराचार्यांच्या गोलाध्यायावरून वाटतें.

**लल्लूजी लाल**—एक हिंदी साहित्यिक. यानें हिंदी भाषेंतून अरबी-फारशी शब्दांचें उच्चाटन करण्याचा प्रयत्न करून शुद्ध संस्कृत वळणाची हिंदी भाषा बनविली. तीच आज प्रचारांत आहे. याचा 'प्रेमसागर' हा ग्रंथ भागवताच्या दशम स्कंधाचें हिंदी भाषांतर आहे. यानें इतर बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत.

**लव**—लव ही कांहीं प्राण्यांच्या कातडीवर असते. विशेषतः उत्तरेकडील थंड प्रदेशांत राहणाऱ्या प्राण्यांच्या अंगावर ही विशेष असते. ही अनेक प्राण्यांपासून मिळते; उदाहरणार्थ, चीन्हर, कस्तुरी उंदीर, खार, ससा, अस्वल, सील, लांडगा, अरमाइन, कोल्हा, वगैरे. या प्राण्यांचीं कातडीं केवळ वाळवून

बाजारांत पाठवितात. लहान कातडीं बहुधा तुरटीच्या पाण्यांत बुचकळतात. यानंतर तीं कमावण्यांत येतात. त्याकरितां तीं प्रथम मऊ करून नंतर आंतील बाजूनें खरवडण्यांत येतात. अखेरीस लव स्वच्छ करून विंचरण्यांत येते. नंतर तिला कापून पाहिजे तो आकार देण्यांत येतो. सामान्यतः कानडा, सायबेरिया, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, पेरू व आर्जेंटाइन यांमध्यें हा व्यापार चालतो. इतरहि आर्मेनिया, तुर्कस्तान, ऑस्ट्रिया, चीन, वगैरे देशांत हा धंदा चालतो. हा धंदा प्रथम फ्रेंच लोकांनीं कानडामध्यें सुरू केला. परंतु सध्यां यामध्यें एक ब्रिटिश कंपनी प्रमुख आहे.

**लवंगल**—( युजेनोल ). हा लवंगाच्या वेलांतील मुख्य घटक आहे. बऱ्याच सुगंधी तेलांत हा असतो. लवंगांचें बाष्पोद्रेकपातन ( स्टीम डिस्टिलेशन ) केलें म्हणजे लवंगल तयार होतो. हा निर्वर्ण, तैलरूप असून २४७° उष्णतामानावर ह्याला उकळी फुटते.

**लवंगा**—[ कार्योफिलस अॅरोमॅटिक्स. इं. क्लोव्हज. ] लवंगा या मर्टल जातीच्या एका झाडाच्या वाळलेल्या कळ्या असतात. याचें मूलस्थान मोलक्का बेट हें होय. परंतु अलीकडे या झाडाची लागवड सुमात्रा, झांझीबार, मलाक्का व जमेका या बेटांतहि करण्यांत आली आहे. हें झाड नेहमीं हिरवींगार पानें असलेलें व सुंदर दिसतें. याची वाढ १५ ते २० फूटपर्यंत उंच

होते. याचीं पानें मोठीं, लांबट, वाटोळसर व गुळगुळीत असतात. याला पुष्कळ जांभळया फुलांचे झुबके येतात. या झाडापासून एक बाष्पभावी तेल निघतें व याकरितां या झाडाच्या कळ्यांस फार महत्त्व आहे. या कळ्यांस एक प्रकारचा चांगला वास येतो व त्यांस कडवट तिखट चव असून त्याचा औषधांत व मसाल्यांत उपयोग करतात. या तांबूलांत घालतात. लवंगेचा काढा सर्दी व मोडशी यांवर घेतात.

**लवणत्रितयादिचूर्ण**—एक आयुर्वेदीय औषध. सैंधव, खार, संचळखार, बिडलोण, सज्जीखार, जवखार, बडीशेप, बाळंतशेपा, वेखंड, अजमोदा, रानतुळस, शेरणी, जिरें, शहाजिरें, मिरें, पिंपळीमूळ, पिंपळी, गजपिंपळी, हिंग भाजलेला, चाफळ्या, कचोरा, पाहाडमूळ, काळे जिरें, सुंठ, चित्रक, चवक, वावडिंग, अम्लवेतस, डाळिंबसाल, चिंचेची साल, निशोत्तर, दांतीचें मूळ, शतावरी, कंवडळीचें मूळ, भारंग मूळ, देवदार, अजमोदा, धणे, तुंबुरू, पुष्कर मूळ, चोरें आणि हरितकी या समभाग औषधांचें चूर्ण करून त्याला आल्याच्या रसाचें व महाळुंगीच्या फळाच्या रसाचें पुट अशीं दोन पुटें देऊन वाळवावें. याच्या सेवनानें यकृत्, प्लीहा, कटिशूल, गुदरोग, कुशीचा शूल, हृद्रोग, मूळव्याध, मलावरोध, अग्निमांद्य, गुल्मरोग, अष्ठीलरोग, उचकी, पोटफुगी, उदररोग, कास, श्वास, इत्यादि सर्व रोग दूर होतात.

**लवणासुर**—एक राक्षस. याच्याजवळ एक शंकराचा शूल होता. त्यामुळें तो अजिंक्य असे व ब्राह्मणादि लोकांना फार छळी. तेव्हां रामानें शत्रुघ्नाला लवणासुराचा नाश करण्यास पाठविलें. शत्रुघ्नानें लवणासुराजवळ शूल नाहीं अशा स्थितींत त्याला ठार केलें.

**लवाद**—( आर्बिट्रेशन ). दोन पक्षांमधील वादाची चौकशी करून त्याचा निर्णय देण्याकरितां उभय पक्षांना संमत असे जे इसम नेमतात त्यांना 'लवाद' म्हणतात. त्यांचें वर्तन निःपक्षपाती असलें पाहिजे. दोन इसम लवाद असतील व त्यांच्यांत मतभेद होईल तर तिसरा इसम निर्णायक (अंपायर) नेमतात. लवादाच्या निकालाला 'अवॉर्ड' म्हणतात व तो निकाल लेखी असावा लागतो. इंग्लंडांत या लवादनिवाड्याला १० शिलिंगाचा स्टॅंप जोडावा लागतो. यासंबंधीं इंग्लंडांत १८८९ चा 'आर्बिट्रेशन अॅक्ट' आहे. याशिवाय संपाच्या वादाचा निर्णय करणारें लवाद ('संप' पाहा), राष्ट्रसंघाचें आंतरराष्ट्रीय लवाद मंडळ (इंटरनॅशनल आर्बिट्रेशन), इत्यादि आहेत.

हिंदुस्थानांतील दिवाणी कायद्यांत लवाद नेमण्याची तरतूद आहे ती : ( १ ) कोर्टांत दावा चालू असतांना कोर्टामार्फत लवाद नेमून निर्णय करणें, व ( २ ) कोर्टाबाहेर लवाद नेमून त्यांचें लवादपत्र कोर्टांत दाखल करून हुकूमनामा ( डिक्री ) मिळवणें ( सि. प्रो. कोड, दुसरें शेड्यूल पाहा ).

**लव्हलेस, रिचर्ड** ( १६१८–१६५८ )—एक इंग्रज कवि. तो राजपक्षाचा उत्साही अनुयायी ( रॉयलिस्ट ) होता. त्याला १६४२ सालीं पार्लमेंटकडे केंटिश पिटिशन पाठविल्याबद्दल कैदेंत टाकण्यांत आलें. त्याच्या कवितांची कीर्ति बरीच झाली व त्याचें कारण त्याच्या पुढील दोन कविता होत: 'टु आल्थीया फ्रॉम प्रिझन' आणि 'टु लुकास्टा ऑन गोइंग टु दि वॉर्स'.

**ल्हाळा**—१. [ जाती–जन्सी अथवा जंकासी ]. ल्व्हाळयाच्या जातीच्या झाडांची एक जात. या जातीचें नांव जंकस नांवाच्या ल्व्हाळयावरून पडलें आहे. हें एकगर्भपर्ण जातीचें (एकदळ) आहे. याच्या चटया, खुर्चीच्या बैठका, केरसुण्या, वगैरे तयार करतात.

२. [ वर्ग–सायपेरासी, कॅरेक्स. इं. सेज ]. तृणसदृश वनस्पतीची एक मोठी जात. यांच्या उपजाती हजारों आहेत. या बहुतेक उत्तरेकडील व समशीतोष्ण प्रदेशांत होतात. विशेषतः या वनस्पती दलदलीच्या जागीं होतात.

ल्व्हाळयाचीं मोठमोठीं बेटें नदीकांठीं असतात. मुळया किंवा गड्डे यास नागरमोथा म्हणतात. हा औषधांत व सुगंधी पदार्थांत घालतात. ल्व्हाळयाच्या काड्यांच्या चटया करतात.

**लव्हेंडर**—[ जाति–लेबिएटी. लाव्हेंडुला व्हेरा ]. एक तीन ते चार फूट उंच वाढणारें सुगंधी झुडूप. याचें मूलस्थान दक्षिण युरोप होय. चांगल्या परिस्थितींत या झाडामध्यें त्याच्या एक-चतुर्थांश वजनाइतका कापूर निघतो. याच्यापासून एक प्रकारचें बाष्पभावी तेल निघतें. तें फार सुगंधी असून त्याला मागणी फार असते. गुलाबपाण्याप्रमाणें या तेलांत स्पिरिट, गुलाबी अत्तर, बर्गामट, कस्तूरी, लवंगा, वगैरे मिसळून लव्हेंडर पाणी तयार करतात.

लव्हेंडर तेल—लव्हेंडर नांवाच्या झाडाच्या जातीच्या एका झाडाच्या पानांचें व देठांचें ऊर्ध्वपातन करून एक प्रकारचें बाष्पभावी तेल बनविण्यांत येतें. त्यास स्पाईक तेल म्हणतात.

**ल्हेरिए, उर्बे जीन जोसेफ** (१८११–१८७७)—एक फ्रेंच ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें युरेनस या ग्रहाच्या गतींतील अनियमितपणाबद्दलचें संशोधन केलें. त्याच काळांत जॉन काऊच ॲडॅम्स याचें याच बाबतींत संशोधन चालू होतें व त्यामुळें त्यानें नेप्च्युन या ग्रहाचा शोध लावला.

**लष्कर**—ग्वाल्हेर संस्थानची राजधानी (ग्वाल्हेर पाहा). याची स्थापना १८१० मध्यें दौलतराव शिंदे यानें केली. जुनें ग्वाल्हेर शहर व किल्ला यांपासून दोन मैलांवर लष्करची जागा आहे. जयविलास राजवाडा, मोतीमहाल कचेरी, एल्जिन क्लब, इस्पितळ, इ. इमारती मोठ्या आहेत. मध्यभागीं सराफकट्टा आहे. घरें बहुतेक नक्षीदार दगडाचीं आहेत. शहर चांगलें संपन्न आहे. लो. सं. सुमारें ८०,०००. किल्ला पाहण्यासारखा आहे. दोन कॉलेजें व बरींच हायस्कुलें व इतर शिक्षणसंस्था लष्करांत आहेत.

**लष्कर**— सैन्य पाहा.

**लष्करी अधिकारी**—सध्यांच्या ब्रिटिश लष्करात जे निरनिराळे अधिकारी असतात ते पुढें दिले आहेत : १. सेकंड लेफ्टनंट, २. लेफ्टनंट, ३. कॅप्टन, ४. मेजर, ५. लेफ्टनंट कर्नल, ६. कर्नल, ७. कर्नल ऑन दि स्टाफ, ८. कर्नल कमांडर, ९. मेजर जनरल, १०. लेफ्टनंट जनरल, ११. जनरल व १२. फील्ड मार्शल. यांपैकीं ७ व ८ यास ब्रिगेडियर जनरल असें पूर्वी नांव असे व तीं नांवें हुद्दा न दाखवितां काम दाखवितात. कॅप्टन हा हुद्दा जुना आहे. त्याखालीं लेफ्टनंट हा आला. मेजर यास पूर्वी सार्जंट मेजर म्हणत. कर्नल हा शब्द स्पेनमधून किंवा इटलीमधून आला. सतराव्या व अठराव्या शतकाच्या आरंभीं सर्वांत मोठा हुद्दा कॅप्टन जनरल हा होता. फील्ड मार्शल हा अर्वाचीन आहे.

**लष्करी कायदा**—लष्करी कायदा ( मार्शल लॉ ) आणि लष्करी नोकरीचा कायदा ( मिलिटरी लॉ ) यांचा अर्थ भिन्न आहे. 'मार्शल लॉ' या नांवाचा स्वतंत्र कायदा नाहीं, तर युद्धजन्य परिस्थितीमुळें किंवा बंडाळीमुळें नेहमींचा चालू कायदा तहकूब ठेवून लष्करी नोकरीसंबंधींचा कायदा सामान्य प्रजाजनांना लागू करण्यांत येतो. हिंदुस्थानांत १९४६–४७ सालीं हिंदु-मुसलमानांचे जातीय स्वरूपाचे दंगे मुंबई, कलकत्ता, दिल्ली, लाहोर व इतर अनेक ठिकाणीं होऊं लागले त्या वेळीं 'कर्फ्यू ऑर्डर' व 'लष्करी कायदा' (मार्शल लॉ) सरकारनें वेळोवेळीं व ठिकठिकाणीं लागू केला. १९२० ते १९४२ या काळांत हिंदुस्थानांत काँग्रेस या राजकीय संस्थेनें कायदेभंगाची चळवळ पुष्कळ वेळां केली, तेव्हांहि वरील दोन्ही उपाय अमलांत आणले. मात्र यांचा अमल अगदीं आवश्यक तितक्या मुदतीपर्यंतच करतात आणि त्या मुदतींत घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी 'कोर्ट मार्शल' पद्धतीनें करण्यात येते.

**लष्करी कोर्ट**—( कोर्ट मार्शल ). लष्करी कायदा ज्या इसमांना लागू असतो त्या लोकांनीं केलेल्या गुन्ह्यांची चौकशी करणें व जरूर तर शिक्षा करणें हा अधिकार ज्या कोर्टाला असतो त्या कोर्टाचें हें नांव आहे. हल्लीं लष्करी कोर्टें दोन प्रकारचीं असतात : १. जनरल कोर्ट-मार्शल, आणि २. डिस्ट्रिक्ट कोर्ट मार्शल. या दोन प्रकारच्या कोर्टांचे अधिकार पुढील तीन बाबतींत निरनिराळे असतात—( अ ) न्यायाधिशांची संख्या, ( ब ) शिक्षेची मर्यादा, व ( क ) निरनिराळ्या दर्जाच्या इसमांची चौकशी करण्याचा अधिकार. जनरल कोर्ट मार्शल या कोर्टाला 'आर्मी ॲक्ट' या कायद्यांत सांगितलेली कोणतीहि शिक्षा देतां येते. परंतु डिस्ट्रिक्ट कोर्ट मार्शल या कोर्टाला दोन वर्षांहून अधिक कैदेची शिक्षा देतां येत नाहीं. तसेंच जनरल कोर्ट मार्शल या कोर्टाला कोणत्याहि दर्जाचा ऑफिसर किंवा सोलजर याला लष्करी कायद्याप्रमाणें शिक्षा करतां येते. परंतु डिस्ट्रिक्ट कोर्ट मार्शल या कोर्टाला ऑफिसरवरील खटला चालविण्याचा अधिकार

नसतो. पण वॉरंट ऑफिसरांना (नॉन-कमिशंड ऑफिसर) विशिष्ट प्रकारच्या शिक्षा देतां येतात. जनरल कोर्ट मार्शल या कोर्टांत न्यायाधीशाची किमान संख्या नऊ असते आणि डिस्ट्रिक्ट कोर्ट मार्शल या कोर्टांत न्यायाधिशांची संख्या जास्तींत जास्त तीन असते.

**लष्करी नोकरीचा कायदा**—(मिलिटरी लॉ). हा कायदा इंग्लंडांतील सैन्यांतल्या सर्व अधिकाऱ्यांना व नोकरांना शांततेच्या व युद्धाच्या दोन्ही काळांत सारखाच लागू असतो. कोणीहि इसम लष्करी नोकरींत शिरला कीं लगेच त्याला हा कायदा लागू होतो; तरी पण त्याला इतर नागरिकांप्रमाणें सर्व दिवाणी कायदेहि लागू असतातच. म्हणजे लष्करी नोकरींत असतांना त्याला लष्कराचा कायदा आणि इतर सर्व सामान्य कायदे हे दोन्ही पाळावे लागतात. इंग्लंडांतला लष्करी नोकरांचा कायदा 'आर्मी ॲक्ट', 'रूल्स ऑफ प्रोसीजर', आणि 'किंग्ज रेग्युलेशन्स' यांमध्यें समाविष्ट झालेला आहे.

हिंदुस्थानांत १९२० सालीं 'ऑक्झिलरी फोर्सेस ॲक्ट' झाला. तदनुसार सोळा वर्षें वयापुढील कोणाहि पुरुषास (कोणत्याहि जातीच्या किंवा धर्माच्या) सैन्यांत दाखल करून लष्करी शिक्षण देण्याची तरतूद केली आहे. दुसऱ्या महायुद्धांत व नंतर लष्करभरती करतांना लष्करी नोकरीसंबंधीं इंग्लंडप्रमाणेंच कायदे करण्यांत आले.

**लस**—(लिंफ). ज्याप्रमाणें स्पंजामध्यें पाणी राहतें त्याप्रमाणें शरीराच्या निरनिराळ्या पेशींच्या जाळ्यामध्यें जो जलरस धरलेला असतो त्यास म्हणतात. ही लस प्रथम रक्तगोलकांपासून उत्पन्न होऊन केशनलिकांच्या भिंतींतून बाहेर पडते व सर्व पेशींवर पसरून लहान लहान रक्तपेशींच्या जाळ्यांतून लसिकावाहिनींतून बाहेर येते. शरीरांतील सर्व लसिकावाहिन्या कोणत्या तरी लसिकाग्रंथींतून जातात व तेथें त्यांचे लसिकाकण बनून तें लसिकावाहिन्यांतून रक्तपेशीस जाऊन मिळतात.

**लसण्या**—(मार्जारनेत्री. इं. कॅट्स आय). ही एक गारेची जात आहे. तीमध्यें ॲसबेस्टॉसचे तंतू असतात. त्यामुळें तिला दुधासारखा रंग येतो. या गारेला घासून दीर्घवर्तुळाकृति गोलाचा अथवा कोंबडीच्या अंड्यासारखा पण लहान आकार दिला असतां ती मांजराच्या डोळ्याप्रमाणें दिसूं लागते. म्हणून तीस हें नांव देण्यांत येतें.

**लसाज, आलँ रेने** (१६६८–१७४७)—एक फ्रेंच कादंबरीकार व नाटककार. त्यानें स्पॅनिश नाटककारांचें व विशेषतः रोजस व लोप द व्हेगा यांच्या नाटकांच्या आधारें पुष्कळ नाटकें लिहिलीं. 'त्युरकारेत' हें त्याचें सर्वांत उत्तम नाटक असून तें त्यानें मोलियरचें अनुकरण करून लिहिलें आहे. त्याची कीर्ति मुख्यतः पुढील दोन पुस्तकांमुळें झाली आहे; त्यांपैकीं एक 'ल दिआब्ल ब्वातो' (दोन कांठांवरील सैतान) असून यांत पॅरिसमधील जीवनक्रमावर उपरोधिक व मनोरंजक टीका केली आहे. दुसरें पुस्तक 'जिल ब्लास' ही कादंबरी चार भागांत प्रसिद्ध झाली. फ्रेंच लेखकांत मोलियरच्या खालोखाल याचा क्रम लागतो.

**लसूण**—[अलिअम साटिव्हम. इं. गार्लिक]. कांद्यासारखें बहुवर्षायु रोपटें. हें दक्षिण युरोपमध्यें प्राचीन काळापासून आढळतें. लसूण मुख्य अन्नाबरोबर तोंडी लावणें म्हणून सर्वत्र वापरण्यांत येते. हिला एक प्रकारचा तीव्र नाकांत भरणारा वास असतो व ती तिखट असते. हिच्या एका कांद्यास पुष्कळ पाकळ्या असतात. याच्या पाकळ्या लावून रोपें करावीं लागतात. लसूण फार औषधी आहे. अर्धशिशीवर रस नाकांत घालतात. हा वातनाशक व कृमिघ्नहि आहे.

**लसूण घांस**—(ल्युसर्न). [वर्ग-लेग्युमिनोसी मेडिकॅगो]. द्विदलवर्गांतील एक वनस्पतीची जात. याच्या ९० पोटजाती आहेत. मेथी हें याच जातीचें झाड आहे. याचा [एम्-साटिव्हा जातीचा] गुरांस चारा म्हणून फार मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येतो.

**लहरी**—पाण्याच्या पृष्ठभागावर ज्या लाटा दृष्टीस पडतात त्यावरून सामान्यतः लहरीची कल्पना आपणांस येऊं शकते. जर एखादा कण **ट** या वेळांत आपल्या जागेपासून एक आंदोलन पूर्ण करीत असेल व अशीं आंदोलनें दर सेकंदास **फ** होत असतील तर प्रत्येक कालामध्यें अशा आंदोलनापासून उत्पन्न होणाऱ्या लहरीची लाट $\lambda$ (लांबडा) या लांबीची **व** या स्थिर गतीनें होत राहील असें गृहित धरलें तर $\lambda$ = **वट** आणि $\lambda$ **फ** = **व** अशीं समीकरणें आपणांस मिळतील (ध्वनि पहा).

**लळिंग किल्ला**—मुंबई, पश्चिम खानदेश, धुळ्याच्या दक्षिणेस सहा मैलांवर असलेला किल्ला. हा एका टेंकडीवर असून फार जुना आहे. मोंगलांच्या स्वाऱ्यांत याचा नेहमीं उल्लेख येतो. हा आतां पडला आहे.

**ललित**—उत्सवांत ललित करण्याचा संप्रदाय आहे. त्याचा मूळ हेतु असा आहे कीं, ईश्वरभक्तीस्तव जीं सहा दर्शनें व छत्तीस पाखंडें निर्माण झालीं त्यांची फोड करून, जे ईश्वरप्राप्तीविषयीं खटपट करतात, त्यांजवर ईश्वरानें प्रसाद करावा असें हें ललितरूप नाटक करून दाखवून प्रार्थना करावी. ललित हा मराठी नाट्याचा अगदीं प्राथमिक प्रकार होय. या खेळाला साहित्य फारसें लागत नाहीं. अभिनय, संगतवार भाषणें, सुबुद्ध

कथारचना, वगैरे गोष्टी ललितांत पूर्वीपासूनच नसत. पुढें तर धांगडधिंगाच जास्त आला.

ललितांत सोंगें येतात तीं—कापालिक, मराडी, दाकोता, जोशी, भाट, ब्राह्मण, लेखक, पंडित, वासुदेव, गोंधळी, मानभाव, फकीर, जंगम, गोसावी, नाथ, जती, रावळ, वगैरे. या सर्वांवर ईश्वरानें प्रसाद करावा अशी त्या लाळितान्या शेवटीं प्रार्थना करतात. खेड्यांतून विशेषतः देवाच्या उत्सवानंतर एखादें लाळित होतें. त्याचा मजकूर जुन्या बाडांत लिहिलेला असतो व परंपरेनेंहि लोकांच्या स्मरणांत असतो. दशावताराच्या कथाहि ललितांतून असतात.

**लक्षसिंह गुहिलोत** (१३८२–१४२१)—मेवाडच्या क्षेत्रसिंहाचा मुलगा. यास लाखा असेंहि म्हणत. क्षेत्रसिंहाच्या मृत्यूनंतर हा गादीवर आला. लहानपणापासूनच याचे शौर्यादि सद्गुण दृष्टोत्पत्तीस येऊं लागले होते. युवराज असतांना यानें जोगा दुर्गाधिपतीला जिंकून त्याजपासून त्याची कन्या व हत्ती, घोडे मिळवले. यानंतर डोंगरांतील मेर लोकांना पराभूत करून यानें त्यांजपासून जिंकलेल्या वर्धन (बदनोर) नांवाच्या प्रदेशावर आपला अमल बसवला. याच्या कारकीर्दीत मगरा जिल्ह्यांतील जावर गांवीं सांपडलेल्या एका चांदीच्या खाणीमुळें याची आर्थिक परिस्थिति सुधारली व यानें या पैशानें काशी, प्रयाग व गया हीं क्षेत्रें मुसलमान राजांच्या करांपासून मुक्त केलीं. यानंतर यानें तलाव, कुंडें, किल्ले व अनेक नव्या इमारती बांधल्या. तसेंच अल्लाउद्दिन खिलजी व खिजरखां यांच्या वेळच्या लढायांत उध्वस्त झालेल्या इमारतींची डागडुजी केली. यानें एकलिंगजीला चीखा गांव, झोटिंगभट्टाला पिप्पली गांव व धनेश्वरभट्टाला पन्नदेवालय गांव दान दिला. याच्या द्वारकेच्या यात्रेस गेलेल्या आईस काबो नांवाच्या लुटारी लोकांनीं वेढा दिला असतां, तिला त्यांच्यापासून मुक्त करून मेवाडच्या हद्दीपर्यंत सुरक्षित आणून पोहोंचविण्याची कामगिरी करणाऱ्या शार्दूलगडच्या रावसिंह डोहियाच्या धवलनामक पुत्रास यानें पांच लाखांची जहागीर बहाल केली. मंडोवरच्या चूंडा राठोडनें आपल्या गोहिलवंशीय राणीचा पुत्र कान्हा यासच आपलें राज्य देण्याचें ठरवलें. तेव्हां त्याचा ज्येष्ठ पुत्र रणमल्ल पांचशें स्वारांसह याच्या आश्रयास आला असतां यानें त्यास चाळीस गांवें देऊन आपला सरदार केलें व त्याच्या हंसाबाई नामक बहिणीशीं लग्न केलें. आपल्या आयुष्याच्या शेवटीं यानें मोकलला संभाळण्याची जबाबदारी चूंडावर सोंपवली. चूंडा, राघवदेव, अज्जा, दुल्हा, गज, डुंगर, सिंह, लूणा, मोकल व वाघसिंह हे याचे पुत्र होत.

**लक्ष्मण**—रघुवंशातील दशरथ राजाचा दुसरा पुत्र व रामचंद्राचा सावत्र भाऊ. याच्या आईचें नांव सुमित्रा व बायकोचें नांव ऊर्मिला होतें. हा अत्यंत भ्रातृभक्त होता. राम वनवासाला निघाला असतां हा आपण होऊन रामाच्या पाठीस लागून त्याच्याबरोबर गेला व यानें वनवासांत रामाची अहर्निश मनोभावानें सेवा केली. हा नेहमीं रामाबरोबर असे म्हणून 'रामलक्ष्मणाची जोडी' असें दोघांच्या जुटीला म्हणण्याचा प्रघात पडला आहे. यानें इंद्रजिताचा वध केला व राम गादीवर बसल्यानंतरहि यौवराज्य स्वीकारलें नाहीं. रामानें याला ब्रह्मविद्या दिली. रामाचा काल होण्यापूर्वींच यानें योगधारणेनें देहत्याग केला.

लक्ष्मणाचें एक देऊळ हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. लक्ष्मणझूला प्रसिद्धच आहे. या ठिकाणीं जावयाला (इंद्रजिताला) मारल्याच्या दोषाचें प्रायश्चित्त म्हणून लक्ष्मणानें एक हजार वर्षें तप केलें अशी कथा आहे.

**लक्ष्मणसेन शक**—या शकाचा आरंभ एक तर शके १०४१ मध्यें झाला असावा किंवा त्याचा आरंभकाल शके १०२८ च्या जवळपास कोठें तरी असेल. तारीख ७ ऑक्टोबर सन १११९ ह्याच दिवसापासून लक्ष्मणसेन-शकाचा आरंभ होतो असें मानणें विशेष संयुक्तिक होईल. कारण बंगालचा लक्ष्मणसेन राजा सिंहासनारूढ झाल्यापासून ह्या शकाचा आरंभ होतो असें मानण्यांत येतें. आरंभीं ह्या शकाचा प्रचार बंगाल, बिहार व मिथिला एवढ्या प्रदेशांत होता. परंतु आतां फक्त मिथिलेंतच त्याचा प्रचार राहिला असून तेथें त्याचा वर्षारंभ माघ शुद्ध प्रतिपदेपासून होतो.

**लक्ष्मणा**—[ वर्ग-सोलानासी. जाति-मँड्रागोरा. इं मांड्रेक. ] हीं झाडें पश्चिम आशिया, दक्षिण व पूर्व युरोप, वगैरे प्रदेशांत आढळतात. ब्रिटनमध्यें हीं बागेंत लावण्यांत येतात. याला खोड नसतें. दांड्याला फुलें येतात, तीं पांढरीं असतात. याचें फळ नारिंगी रंगाचें बोराएवढें असून त्यांत फार बिया असतात.

**लक्ष्मणा**—१. मद्रदेशाची राजकन्या व कृष्णाची एक राणी.

२. दुर्योधनाची कन्या. हिनें कृष्णपुत्र सांब याला स्वयंवरानें वरलें.

**लक्ष्मी**—एक स्त्री-देवता. वेदकालापासून लक्ष्मीचा संबंध वैभव, संपत्ति यांच्याशीं जोडला आहे. विष्णूची प्रधान पत्नी म्हणून पुराणांत लक्ष्मीच्या पुष्कळ कथा आहेत. समुद्रमंथनांतील एक रत्न व कमलापासून उत्पन्न झालेली असें हिचें वर्णन आहे. विष्णूबरोबर हीहि त्याची सहचरी म्हणून राहण्यासाठीं अवतार घेते. रामाची सीता आणि कृष्णाची रुक्मिणी लक्ष्मीचीं रूपेंच होत.

**लक्ष्मी, कॅप्टन** ( १९११- )— एक शूर हिंदी महिला. मद्रास प्रांतातर्फे मध्यवर्ती असेंब्लींत निवडून गेलेल्या अम्मू स्वामिनाथन् या यांच्या आई होत. कप्टन लक्ष्मी यांचें संपूर्ण नांव लक्ष्मी एस्. स्वामिनाथन् हें असून या मद्रास युनिव्हर्सिटीच्या एम्. बी., बी. एस्. झालेल्या आहेत. पहिल्या पतीपासून घटस्फोट घेतल्यावर दुसरे पति इब्राहिम हे ब्रिटिश लष्करांत नोकरीस असल्यानें त्यांच्याबरोबर याहि सिंगापुरला गेल्या व तेथें यांनीं एक मोफत दवाखाना काढला. याच वेळीं सिंगापुरावर जपान्यांनीं हल्ला केला. तेव्हां सिंगापूर सोडण्याबद्दल यांना हुकूम झाला. परंतु तो न मानतां या तेथेंच राहिल्या व हिंदी स्वातंत्र्य संघाच्या सभासद झाल्या. पुढें १९४३ सालीं आझाद हिंद सेनेनें स्त्रियांची 'झांशीची राणी' सेना तयार केली तेव्हां तिचें पुढारीपण यांच्याकडे देण्यांत आलें. यांनीं या पथकांतील स्त्रियांची संख्या एकशें पंचायशींवरून दोन हजारांवर नेऊन पोहोचविली. या स्त्रियांना पिस्तुल, बंदूक व मशिनगन्स यांसारखीं शस्त्रें वापरण्याचें शिक्षण देण्यांत आलें होतें. प्रथम जरी पथकाला शुश्रूषेचें काम असे तरी नंतर यांच्या इच्छेवरून सुभाषबाबूंनीं यांना या पथकासह प्रत्यक्ष रणांगणावर पाठवलें. त्या वेळीं हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांच्या आघाडीवर झालेल्या लढायांत यांनीं ब्रिटिशांवर विजय मिळवला होता. पुढें मौलमीन येथें हिंद सेनेवर माघार घेण्याची पाळी आली असतांना यांच्या सेनेनें सुभाषबाबूंना निसटून जाण्यास साहाय्य केलें. पण यानंतर या ब्रिटिशांच्या हातीं लागल्या.

नंतर महायुद्ध संपण्याच्या मार्गावर असतांनाच लष्करी कामाचा त्याग करून या फक्त जखमी सैनिकांची शुश्रूषाच करीत राहिल्या होत्या. या मुद्यावरच सरकारनें यांच्यावर खटला न भरतां सन १९४६ मध्यें यांना मुक्त केलें.

**लक्ष्मीधर** ( २ रा )—भोज राजाच्या पदरीं असलेला एक बंगाली कवि. हा शांडिल्यगोत्री ब्राह्मण असून मूळचा बंगालमधील भट्टकोसलचा राहणारा. धारा येथें भोज राजाच्या पदरीं असतांना यानें 'महाकाव्य' किंवा 'चक्रपाणिविजय' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथामध्यें यानें बाणासुर-कन्या उषा हिच्या लग्नाचें कथानक घेतलें आहे.

**लक्ष्मीनारायण**—एक आयुर्वेदीय औषध. मुख्य औषधें गंधक, टांकणखाराची लाही, बचनाग, हिंगूळ, कुटकी, अतिविष, कुडा, अभ्रक भस्म व सैंधव हीं असतात. दंतीमूळ व त्रिफळा यांची भावना असते. सन्निपात ज्वरावरील हें एक प्रमुख औषध आहे. ज्वरामुळें हृदयाची शक्ति अतिशय क्षीण झाली असतांना हें औषध दिल्यानें हृदय सुरळीतपणानें चालतें व रोग्याला बरें वाटतें. अतिशय ताप असणें (प्रसूतीनंतरचा), तहान लागणें, बडबड करणें, तगमग होणें, इत्यादि लक्षणांवर याचा उपयोग होतो. ·।· ते १ गुंज मधाबरोबर देतात.

**लक्ष्मीपति रुक्मिणी** ( १८९१- )—एक विदुषी हिंदी कार्यकर्त्या. यांचें शिक्षण मद्रास येथें झालें. या भारत स्त्रीमंडळाच्या कार्यवाह आहेत. जून १९२६ मध्यें पॅरिस येथें भरलेल्या आंतरराष्ट्रीय महिलाधिकार संघाच्या दहाव्या परिषदेस ( इंटरनॅशनल वीमेन्स सफ्रेज अलायन्स कॉन्फरन्स ) प्रतिनिधि म्हणून गेल्या होत्या. चिंगलपट जिल्हा बोर्डाच्या व मद्रास युनिव्हर्सिटी सीनेटच्या त्या सभासद आहेत. १९३० मध्यें यांनीं मिठाचा सत्याग्रह केला व त्यांत त्यांस शिक्षा झाली. अशा तऱ्हेनें शिक्षा झालेल्या या पहिल्या महिला होत. मद्रास येथील यूथ लीगच्या त्या अध्यक्ष आहेत. या कॉंग्रेस पक्षातर्फे मद्रासच्या कायदेमंडळांत निवडून येणाऱ्या पहिल्याच महिला होत. १९३६ मध्यें त्या मद्रास म्युनिसिपल कॉर्पोरेशनच्या सभासद म्हणून निवडून आल्या.

**लक्ष्मीविलास**—एक आयुर्वेदीय औषध. सुवर्ण, रौप्य, अभ्रक, ताम्र, वंग, कांतलोह, नाग, बचनाग, मौक्तिक व रससिंदूर हीं यांत मुख्य औषधें असतात. कोणत्याहि कारणानें झालेल्या शक्तिपातावरील हें एक प्रमुख औषध आहे. क्षयरोगांतहि याचा उपयोग होतो. हृदयाच्या दुर्बलतेवर हें औषध चांगलें उपयोगी पडतें. छाती धडधडणें, एकाएकीं घाम येऊन जीव घाबरा होणें, चक्कर येणें या लक्षणांवर याचें कार्य त्वरित होतें. १ ते १॥ गुंज मध, आर्द्रकावलेह, वासावलेह किंवा विड्याच्या पानाचा रस व मध यांत घेतात.

**लक्ष्मीश** ( १६ वें शतक )— एक कानडी कवि. हा कडुरू तालुक्यांतील देवनूरू ( देवपूर ) गांवचा राहणारा. हा वैष्णव पंथी असून लक्ष्मीपति या नांवानेंहि सुप्रसिद्ध आहे. लालित्यपूर्ण, मधुर व सर्वांना सहज समजणारी भाषा हें याचें लेखनवैशिष्ट्य होय. याच्या 'जैमिनी भारत' नांवाच्या ग्रंथामुळें यास कर्नाटकांत विशेष लोकप्रियता प्राप्त झाली आहे. याला 'कर्णाट कविचूतवनचैत्र' अशी सार्थ पदवी होती.

**लक्ष्मेश्वर**—मुंबई, मिरज संस्थान, एक तालुका व गांव. हें गांव फार प्राचीन आहे व यांतील देवळें आणि मशिदी देखील याची साक्ष देतात. जैनांची वस्ती बरीच आहे. कापड फार निघतें. गांव व्यापारी आहे. लो. सं. १२,०००.

**लॉ, अॅन्ड्र्यू बोनर** ( १८५८-१९२३ )—एक ब्रिटिश मुत्सद्दी. १९०० पर्यंत हा व्यापारांत पडला होता. नंतर हा पार्लमेंटमध्यें युनिॲनिस्ट पक्षाचा सभासद म्हणून आला. नंतर याने बऱ्याच सरकारी हुद्यांवर कामें केलीं. बाल्फोरच्या राजीनाम्यानंतर हा पार्लमेंटांत प्रतिपक्षाचा नेता बनला ( १९१५ ). संयुक्त

प्रधानमंडळांत १९१६ पासून यानें मंत्रिपद स्वीकारलें व कॉमन्स सभेचा नेता झाला. १९२२ सालीं नवी निवडणूक झाली तेव्हां बोनर लॉ पंतप्रधानाच्या अधिकारावर आला, पण प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें एका वर्षानेंच त्याला राजीनामा देणें भाग पडलें.

**लाइप्झिग**—जर्मनी, सॅक्सनींतील एक शहर. जगांतील एक प्रमुख व्यापारी शहर म्हणून प्रख्यात आहे. या ठिकाणीं मुद्रणाचा आणि प्रकाशनांचा अतिशय मोठा धंदा आहे. सतराव्या शतकापासून पुस्तकांचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चालू आहे. येथील रेल्वे स्टेशन सर्व युरोपांत मोठें आहे. येथील प्रसिद्ध विद्यापीठ १४०९ सालीं स्थापन झालेलें आहे. पुष्कळ सुंदर इमारती व शिक्षणसंस्था या ठिकाणीं दिसतील. पुस्तकांचा संग्रह करण्याचा नाद असणाऱ्यांचें हें काशीक्षेत्र आहे असें म्हटल्यास चुकीचें होणार नाहीं. लो. सं. सुमारें ७ लाख.

**लॉइड-जॉर्ज, डेव्हिड** (१८६३–१९४५)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व पंतप्रधान. तो १८९० सालीं कार्नार्व्हन बरोजतर्फे रॅडिकल पक्षीय सभासद म्हणून पार्लमेंटांत निवडून आला. आणि तेव्हांपासून तें सभासदत्व त्याच्याकडे कायम होतें. लिबरल पक्ष १९०५ सालीं अधिकारारूढ झाला, त्या वेळीं प्रधान मंडळांत लॉइड जॉर्जला जागा मिळाली. १९०८ सालीं ॲस्क्विथच्या प्रधानमंडळांत त्याला चॅन्सेलर ऑफ एक्सचेकर या हुद्यावर नेमण्यांत आलें. त्यानें 'ओल्ड एज पेन्शन' (वृद्धवेतन) बिल मंजूर करून घेतलें, आणि १९०९ सालचें सुप्रसिद्ध अंदाजपत्रक (बजेट) पार्लमेंटपुढें त्यानेंच मांडलें. १९११ सालीं 'नॅशनल हेल्थ इन्शुअरन्स ॲक्ट' हा राष्ट्रीय आरोग्यविम्याचा कायदा करून आणखी एक महत्त्वाची सुधारणा अमलांत आणली. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर आरंभीं आरंभीं त्याच्यावर जोराची टीका झाली. त्या युद्धखर्चाकरितां चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर या अधिकारपदावरून त्यानें फार मोठालीं कर्जें काढण्याची व्यवस्था केली. इंग्लंडच्या इतिहासांत इतक्या मोठाल्या कर्जाऊ रकमा पूर्वी कधींच घेतल्या नव्हत्या. १९१५ सालीं ॲस्क्विथनें संमिश्र प्रधानमंडळ बनविलें त्यांत लॉइड जॉर्जला 'मिनिस्टर ऑफ म्युनिशन्स' (युद्धसाहित्य-मंत्री) ही नवी निर्माण केलेली जागा देण्यांत आली, आणि १९१६ सालीं लॉर्ड किचनेरच्या जागीं युद्धखात्यांत तो नेमला गेला. ॲस्क्विथनें राजीनामा दिल्यावर बोनर लॉनें मुख्य प्रधान होण्याचें नाकारल्यामुळें लॉइड जॉर्ज मुख्य प्रधान झाला, आणि पुढें तीन वर्षें त्यानें अनियंत्रित सर्वाधिकाऱ्याप्रमाणें कारभार केला.

त्यानें पहिल्या महायुद्धांत अखेरीस विजय मिळविला, आणि त्यामुळें शांतता तहपरिषदेमध्यें तो एक अतिशय वजनदार प्रतिनिधि बनला. १९२१ सालीं त्याची अतिशय महत्त्वाची राजकीय कामगिरी म्हणजे आयर्लंडचा प्रश्न मिटविण्याकरितां त्यानें केलेल्या वाटाघाटी ही होय. त्यानें १९२२ सालीं आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर तो फारसा चमकला नाहीं. पहिल्या महायुद्धांत त्याची कामगिरी व धडाडी विलक्षण व कौतुकास्पद होती. त्याच्यामुळेंच जर्मनीचा पाडाव दोस्तांना करतां आला. चर्चिलप्रमाणें त्याचें विस्मरण ब्रिटिशांना कधीं होणें शक्य नाहीं.

**लॉइड्स**—ग्रेट ब्रिटनमध्यें नाविक वाहतुकीसंबंधींचे विमे उतरणें आणि बोटींच्या वाहातुकीसंबंधींची माहिती प्रसिद्ध करणें हीं कामें करणारी ही संस्था आहे. या संघानें ब्रिटिश बेटांमध्यें सिग्नल स्टेशनें ठेवलेलीं आहेत आणि पृथ्वीवरील सर्व भागांत आपले एजंट नेमले आहेत. बोटींची वाहतूक, बोटींचे अपघात, वगैरे संबंधींची माहिती आणि सल्ला-मसलत देण्याचें काम हे एजंट करतात. या लॉइड्स कॉर्पोरेशननें आपलें स्वतःचें दैनिक 'लॉइड्स लिस्ट ॲंड शिपिंग गॅझेट' या नांवाचें चालविलें असून त्यांत पृथ्वीवरील नाविक वाहतुकीसंबंधींची फार महत्त्वाची माहिती दिलेली असते. बोटी किती प्रकारच्या व कशा बांधाव्या याबद्दलहि या कार्पोरेशननें आपली नियमावली तयार केली असून त्यासंबंधींची माहिती वेळोवेळीं 'लॉइड्स रजिस्टर ऑफ शिपिंग' यात प्रसिद्ध होते.

**लाए, मारिअस सोफस** (१८४२–१८९९)—एक नॉर्वेजियन गणितशास्त्रज्ञ. १९ व्या शतकांतील गणितशास्त्रज्ञांमध्यें लाएचा क्रम बराच वर लागतो. त्याचे बरेच ग्रंथ आहेत.

**लाएबिग, ज्युस्टस बॅरन फॉन** (१८०३–१८७३)—एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. तो अनुक्रमें गीसेन, हायडेलबर्ग व म्युनिक येथें प्रोफेसर होता. तो सेंद्रिय रसायनशास्त्राचा (ऑर्गॅनिक केमिस्ट्री) आद्यजनक होय. त्यानें वर्गीकरणाच्या पद्धतींत सुधारणा करण्याकरितां पुष्कळ कार्य केलें आणि खाद्यपदार्थांच्या बाबतींत ते शिजविणें व त्यांचा खाण्याकडे उपयोग करणें, यांमध्यें नव्या योग्य पद्धती सुरू केल्या. तसेंच शेतीमध्यें जमीन व खतें यांची सुधारणा रसायनशास्त्राच्या साहाय्यानें त्यानें पुष्कळ केली.

**लाओ**—लाव. ही भाषा इंडोनेशियांत समुद्रकिनाऱ्यापासून दूर राहणारें एक राष्ट्र वापरतें. यांना पोर्तुगीज लोक लाओ असें म्हणत व तेंच नांव पुढें प्रचारांत आलें. या भाषेचा अभ्यास युरोपियनांनीं मुळींच केलेला आढळत नाहीं. अलेक्झांडर डी ऱ्होडस नांवाचा एक मनुष्य पूर्वी या प्रांतांत गेला होता. कोहांफर यानें दिलेल्या माहितीवरून लाओ (लाव) राष्ट्र हें सयामी राष्ट्रापासून भाषा व लिपि या बाबतींत फारसें भिन्न

नाहीं. अही व सयामी लोक आपला धर्म, शास्त्रें, इत्यादि सर्व संस्कृती लाव राष्ट्रापासून मिळाली असें म्हणतात. लाव लोकांच्या देशांत बौद्ध संप्रदायाच्या संस्थापकांनीं आपल्या अस्तित्वाचे बरेच अवशेष ठेवले आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. सिंहलद्वीपांत ज्याप्रमाणें अमलश्रीपाद पर्वतावर बुद्धाच्या डाव्या पायाची खूण आहे असें सांगतात, त्याप्रमाणें त्याच्या उजव्या पायाची खूण सयाममध्यें 'स्वन्नबपतो' (सुवर्ण पर्वत) या पर्वतावर आहे असें सांगतात. दुसरीं कांहीं पावलें पेगु, आवा, आराकान यांमध्यें आहेत असे म्हणतात. परंतु लाव देशामध्यें सर्व खुणा एकत्र आढळतात व बरेच यात्रेकरू या देशांत 'प्रकुकुसोन', 'प्रकोन्नकोन', 'प्रपुत्थकत्सोप' आणि 'प्रसमुत्तकोदोम' यांच्या पादुकांचें दर्शन घेण्यास येतात. हीं सर्व नांवें हेमचंद्राचार्यांच्या 'अभिधान चिंतामणी'मध्यें जीं शेवटच्या चार बुद्धांचीं क्रुद्रुच्छन्द (ककुच्छन्द), कांचन, काश्यप आणि शाक्यसिंह अशीं संस्कृत नांवें आहेत त्यांचींच अपभ्रष्ट रूपें असावीं. लाव लोकांच्या भाषेंत बरेच ग्रंथ आहेत असें म्हणतात.

**लाओत्झे**—याला लाओ-किउन हेंहि नांव आहे. हा थोर चिनी तत्त्ववेत्ता व ताओ पंथाचा आद्यजनक आहे. तो खिस्त-पूर्व ६०० च्या सुमारास जन्मला. पुढें आपलीं मतें त्यानें 'ताओ-तेह-किंग' (सद्गुणाचा मार्ग) या नांवाच्या पुस्तकांत लिहून ठेवलीं आणि हें काम पुरें झाल्यावर तो जंगलांत जाऊन नाहींसा झाला. तो स्वर्गांत गेला असें म्हणतात. लाओत्झे यानें प्रतिपादिलेले नैतिक आचरणाचे नियम शुद्ध असून भूतदया, दानधर्म, परोपकार, सद्गुण, इच्छास्वातंत्र्य आणि मनुष्याच्या जबाबदाऱ्या यांचा पुरस्कार करणारे आहेत. त्याच्या या पंथाचा प्रसार इ. सनाच्या दुसऱ्या शतकापासून चीन, जपान, कोचीन चीन, टाँकिन आणि इंडोचीन या राष्ट्रांत झाला.

**लॉक, जॉन** (१६३२-१७०४)—एक इंग्रज तत्त्वज्ञानी. त्याचा 'मानवी आकलनशक्तीवर निबंध' वीस वर्षे तयार होत होता. शिक्षणासंबंधींहि त्यानें आपले विचार मांडले आहेत. याच्या तत्त्वज्ञानी सिद्धांतास 'अनुभवजन्य ज्ञानवाद' (पाहा). असें नांव आहे. सर्व ज्ञान इंद्रियदत्त संवेदनांपासून होतें असें लॉकचें म्हणणें आहे.

**लांकडाचा रांधा**—हा लांकडापासून तयार करतात व त्याचा उपयोग कागद, रेऑन, प्लॅस्टिक आणि इतर अनेक पदार्थ तयार करण्याकरितां होतो. वर्तमानपत्री रांधा सामान्यतः लांकूड भरडून करण्यांत येतो. लांकडाचे ओंडे मोठमोठ्या फिरणाऱ्या दगडांच्या रुळांत दाबून भरडण्यांत येतात व त्यावर एकसारखा पाण्याचा झोत सोडलेला असतो. त्यामुळें ओंड्यांतील तंतू भरडले जातात, नंतर त्यांत चिकटपणा येण्याकरितां रासायनिक रांधा पुरेशा प्रमाणांत घालण्यांत येतो. या क्रियेमध्यें लांकडाच्या ओंड्याचा सर्व भाग उपयोगांत येतो.

**लांकडी डांबर**—लांकडाचें विनाशक ऊर्ध्वपातन केलें असतां त्यापासून हा एक गौण पदार्थ म्हणून मिळतो. हें डांबर दाट काळ्या रंगाचें व द्रवस्थितींत असून त्यास क्रिओसोटसारखा वास येतो. यामध्यें पॅराफिन, राळ, फिनोल, फिनोलिक ईथर, इत्यादि द्रव्यें असतात.

**लांकडी सामान**—अत्यंत प्राचीन काळापासून मनुष्य आपल्या घरांत कांहीं तरी घरगुती सामान वापरीत आला आहे. आतांपर्यंत निरनिराळ्या देशांतील सामान कसें असे याचें थोडक्यांत निरीक्षण केलें असतां आपणांस असें दिसतें कीं, अगदीं प्राचीन काळीं ईजिप्त देशांत घरांतील सामान रंगीत व त्यांत लांकडी, कांचेचे किंवा हस्तदंती तुकडे बसवून नक्षी केलेलें व केव्हां केव्हां सोन्यानें मढविलेलें असे. बसावयाच्या आसनांस वगैरे पाय असत व त्यांस स्त्रीमुखीसिंहाची किंवा प्राण्यांच्या पायांची आकृति देण्यांत येत असे. असें सामान ब्रिटिश म्यूझियम, लुव्हर, पॅरिस, लेडेन, बर्लिन, कैरो, वगैरे ठिकाणच्या पदार्थसंग्रहालयांत पाहण्यास सांपडतें. बाबिलोनी किंवा असीरियामधील सामानाचे अवशेष क्वचितच आढळतात. पण त्यांच्या आकृती तत्कालीन शिल्पांत आढळतात. ब्रिटिश म्यूझियममध्यें बाबिलोनियाच्या गुडिया नांवाच्या राजाचा (खि. पू. २५००) पुतळा व असीरियांतील काशाचें सिंहासन आढळतें; त्यांना प्राण्याचे पाय आहेत, व एका सिंहासनास (खि. पू. ८००) एडक्याचें डोकें आहे. यहुदी सामानाचा बायबलमध्यें अनेक ठिकाणीं उल्लेख आढळतो. ग्रीक लोकांच्या सामानाची माहिती त्यांच्या शिल्पावरून मिळते. त्यांची पद्धति स्वतंत्र असून तिचें अनुकरण पुढें झालेलें दिसतें. हर्क्युलानियन व पांपी या शहरांचे अवशेप खोदून काढण्यांत आल्यामुळें तत्कालीन रोमन सामानाची माहिती मिळते. यांत निरनिराळे प्रकार व भरकाम असून सोनें, रुपें, काशें वगैरेंचा भरपूर उपयोग केलेला आढळतो. बायझंटाइन कलेची वाढ सन ३२१ पासून १२०४ पर्यंत झालेली कान्स्टांटिनोपल येथें आढळते. त्यानंतर मध्ययुगीन कलेचें वर्चस्व तेराव्या व चौदाव्या शतकांत आढळतें. पॅरिस येथील क्लुनी पदार्थसंग्रहालयांत गॉथिक पद्धतीच्या पंधराव्या व सोळाव्या शतकांतील शवपेटिका आढळतात. झूरिच येथील लँडस पदार्थसंग्रहालयांत स्विस कारागिरांच्या जर्मनपद्धतीच्या पंधराव्या व सोळाव्या शतकांतील शवपेटिका आढळतात.

इंग्लंडमध्यें विद्यापुनरुज्जीवनानंतरच्या काळांत फ्लँडर्समधून कांहीं फ्लेमिश कारागीर येऊन त्यांनीं इटालियन व फ्लेमिश पद्धतीच्या मिश्रणानें एक नवीनच ट्यूडर नांवाची पद्धति

प्रचारांत आणली. या कामीं ते ओक लाकडाचा उपयोग करीत. सहाव्या एडवर्डच्या कारकीर्दीत लांकडामध्यें खचकाम सुरू करण्यांत आलें. एलिझाबेथच्या कारकीर्दीत कोरीव काम विशेष प्रचारांत आलें. यानंतर जाकोबाइट पद्धति व पुढें आक्रोडाच्या झाडाचा उपयोग हीं आढळतात व अर्वाचीन तऱ्हा दृष्टीस पडूं लागतात. दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दीत वेताच्या पाठी व बैठकी सुरू झाल्या. दुसऱ्या जेम्सच्या कारकीर्दीत लांकडाचा आकार बारीक होत जाऊन गाद्या व गिरद्या भरणें प्रचारांत आलें. यानंतर आक्रोडाचें लांकूड विशेष प्रचारांत आलें. यानंतर शिशवावरचा कर माफ केल्यामुळें शिशवाचा प्रचार वाढला. तसेंच फ्रेंच पद्धतीचें अनुकरण होऊं लागलें. या वेळीं चिपनडेल हा कारागीर प्रसिद्धीस आला, पण लवकरच रॉबर्ट ॲडम यानें इटलींतून पाहून येऊन जुनी अभिजात पद्धति प्रचारांत आणली. पुढें या दोन्ही पद्धतींचें एकीकरण झालें; तथापि फ्रेंचांचें अनुकरण चालूच होतें. यानंतर साम्राज्य पद्धति व राजपद्धति अशा दोन पद्धती प्रचारांत आल्या. यानंतर पुन्हां साध्या पद्धतीकडे लोकांची आवड वळली. विसाव्या शतकात पुन्हा सौंदर्यदृष्टि जागृत झाली. परंतु अलीकडे कारखान्यांतून मोठ्या प्रमाणावर माल काढण्याची पद्धति वाढत चालल्यामुळें नवीन नवीन प्रकार प्रचारांत आणण्याची प्रवृत्ति मागें पडत चालली आहे.

आपल्याकडे वैदिक कालीं औदुंबर-खदिरादि लांकडापासून बनविलेला पलंग (तल्प, आसन्दी), झोंपाळा, (वह्य, प्रेंख), मांस ठेवण्याची टोपली (सूना), वेताची चटई (कट, कशिपु), काडण्याचें मुसळ (मुसल), उपमन्थनी (रवी), ताट (पिशील), पाट (फलक), इत्यादि लांकडी सामानाचे उल्लेख आढळतात. महाभारतांत बसण्यासाठीं चौरंगासारखें पीठ असे. मंचकावरहि राजपुरुष बसत. यावर सुंदर गाद्या आंथरलेल्या असत. सिंहासनें तर फार सजविलेलीं व सुवर्ण-रत्नखचित असत. पाय ठेवण्यास पादपीठें असत. नागार्जुनकोंडा येथील शिलावरून राजवाड्यांतील सामानाची चांगली कल्पना येते. सिंहासनांचे कित्येक प्रकार दिसत असून पादपीठेंहि आढळतात. तिपायी, उंच पाठीच्या, हातांच्या, इ. खुर्च्यांचे प्रकारहि दिसतात. वेताच्या बैठका व पलंग आहेतच. पुढें ऐतिहासिक कालीं पश्चिमेकडून खुर्च्या, वगैरे सामान इकडे आलें. आजचें लांकडी सामान सर्व पाश्चात्य धर्तीचें दिसेल.

सु. वि. भा. ५-४६

**लॉकीयर, सर जोसेफ नॉर्मन** (१८३६-१९२०)— एक इंग्रज ज्योतिषशास्त्रज्ञ. विच्छिन्नकिरण-दर्शक (स्पेक्ट्रोस्कोपी) यंत्राचा सूर्याच्या बाबतींत उपयोग करणारा हा पहिला शास्त्रज्ञ होय. तसेंच वर्णमंडळा (क्रोमोस्फीअर) चें अस्तित्व सिद्ध करणारा आणि हेलियम धातु शोधून काढणारा हाच पहिला शास्त्रज्ञ होय. त्यानें १८६९ सालीं 'नेचर' या नावाचें शास्त्रीय मासिक सुरू केलें.

**लाख**—पुष्कळ झाडांवर विशिष्ट किड्यांपासून निघालेला हा राळेसारखा पदार्थ चिकटलेला असतो. अशाच स्थितींत त्याला चिकटी लाख (स्टिक् लॅक) म्हणतात. ही चिकटी लाख पाण्यांत धुतल्यावर हिचा पांढरा रंग जाऊन ही चियांसारखी दिसूं लागते, म्हणून हिला बी-लाख (सीड लॅक) म्हणतात. ही लाख वितळवून हिच्या वड्या किंवा कांड्या (शेलॅक) करतात. इतर द्रव्यांशीं मिसळून शिक्क्याची रंगीत लाख बनवितात. लाखेचीं निरनिराळीं रोगणेंहि होतात. अशीं रोगणें लावून लाखलोट्या तयार करतात.

लाखेच्या धंद्यांत हिंदुस्थान जगांत अग्रणी आहे. जागतिक उत्पादनापैकीं शें. ९० उत्पादन एकट्या हिंदुस्थानांत होतें. वार्षिक निर्यात सु. ३६,००० टनांची असून सु. ४ कोटी रु. उत्पन्न आहे. यासंबंधीं एक शैक्षणिक चित्रपटहि सरकारनें तयार केला आहे.

**लाख धान्य**—याचें रोप हातभर असून जमिनीवर पसरतें. त्याला वाटाण्यासारख्या चपट्या शेंगा येतात. लहान धान्याला लाखोरी म्हणतात. लाखोरी मध्यप्रांतांत फार होते. हें रब्बी हंगामांतील पीक आहे. लाखेची डाळ हरभऱ्याच्या डाळीऐवजीं खातात. ही चांगली शिजवावी लागते. गुरांना याचा चारा देतात.

**लाखाळणें**—(जपानिंग). जपान व चीन या देशांत लाखेचें व्हार्निश किंवा जिल्हई दिलेल्या अनेक वस्तू तयार होतात. तशा तऱ्हेच्या कृत्रिम वस्तू तयार करण्याकरितां लांकूड, धातु, चामडें किंवा कागदाचा लगदा यांच्या तयार केलेल्या वस्तूंवर एका तऱ्हेचें रोगण बसविण्याच्या कृतीस लॅकरिंग, किंवा जपानिंग म्हणतात. ज्यावर हें काम करावयाचें ती वस्तु अगदीं कोरडी करून ब्रशानें वर दोनतीनदां बी-लाखेच्या व्हार्निशाचा हात देतात. नंतर त्यावर लागेल त्या रंगाचें व्हार्निश फिरवितात, किंवा कांहीं नक्षीकाम करतात. शेवटीं पुन्हां व्हार्निशाचे थर त्यावर चढवितात. वाळल्यानंतर झिलई देतात. लोखंडी वस्तु लाखाळल्यावर भट्टींत भाजतात, म्हणजे पाहिजे तशी दिसूं लागते.

**लॉंगफेलो, हेन्री वड्स्वर्थ** (१८०७–१८८२)—एक अमेरिकन कवि. १८३५ ते १८५४ पर्यंत हार्वर्ड येथें तो अर्वाचीन भाषाचा प्राध्यापक होता. या काळांत त्यानें बऱ्याच चांगल्या कविता करून नांव मिळविलें. अमेरिकन काव्याची वाढ यानें केली असली तरी याच्या काव्यांत उच्च कल्पकता, ओज किंवा भव्यपणा नाहीं. यानें

युरोपीय वाङ्मय बरेंच भाषांतरून आणि काव्याची तिकडील धाटणी उचलून अमेरिकनांना नावीन्य दाखविलें व अमेरिकन साहित्याला नवें तेज आणलें यांत शंका नाहीं.

**लाग्रांज, जोसे लुइ** (१७३६–१८१३)—एक फ्रेंच गणितशास्त्रज्ञ. त्याला गणिताची आवड जन्मतः होती, आणि त्याला १९ व्या वर्षी टूरीन येथील आर्टिलरी स्कूलमध्यें गणिताचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. १७६६ सालीं फ्रेडरिक दि ग्रेट बादशहानें त्याला बर्लिनला बोलाविलें, व तेथील अॅकेडमीचा डायरेक्टर नेमलें. या जागेवर तो वीस वर्षें होता. १७९४ सालीं पॅरिस येथें नवी अध्यापनशाला (नॉर्मल स्कूल) स्थापन झाली, त्यांत त्याला प्रोफेसर नेमण्यांत आलें. त्याचे कांहीं फार महत्त्वाचे ग्रंथ आहेत.

**लांच**—बहुतेक देशात लांच हा गुन्हा फार कडक शिक्षेला पात्र आहे, असें मानतात. इंग्लंडमध्यें १८५४ आणि १८६८ या सालीं निवडणुकीच्या वेळीं होणाऱ्या लांचलुचपतींसंबंधींचे पूर्वीचे कायदे दुरुस्त करून एकत्र करण्यांत आले, आणि या गुन्ह्यांची चौकशी करण्याकरितां स्वतंत्र कोर्टें असावीं, असें ठरलें. १८७२ सालीं 'बॅलट अॅक्ट' झाला. त्याचा हेतु म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत होणाऱ्या लांचेच्या गुन्ह्याला नियंत्रण घालणें, हा होता. पार्लमेंटच्या निवडणुकींतील लांच-लुचपत बंद व्हावी म्हणून १८८३ सालीं 'करप्ट प्रॅक्टिसेस अॅक्ट' करण्यांत आला. या कायद्यानें लांचलुचपतीचा गुन्हा करणाऱ्याला दंड किंवा सक्त मजुरीची कैद अशी शिक्षा ठरविण्यांत आली. पैका किंवा दुसरी कोणतीहि किंमत पडणारी वस्तु मतदारांना मतदानाच्यापूर्वी, मतदान चालू असताना, किंवा मतदान झाल्यानंतर देणें किंवा देण्याचें वचन देणें या कृत्याला लांच देण्याचा गुन्हा म्हणावें, अशी व्याख्या केली आहे. शिवाय उमेदवारानें केलेला कोणता खर्च कायदेशीर मानावा, हेंहि या कायद्यानें ठरवून दिलें आहे. या लांचेच्या गुन्हेगाराला पुढें सात वर्षें पार्लमेंटचा सभासद होतां येत नाहीं; शिवाय त्याला सरकारी नोकरीस आणि निवडणुकींत मतदान करण्यास कायद्यानें नालायक ठरवलें आहे. १८८४ च्या कायद्यानें म्युनिसिपल निवडणुकींना असलेच शिक्षेचे व नालायकीचे नियम लागू केले आहेत. शिवाय ज्यूरीमेन (पंच) आणि जमाबंदी खात्यांतले अधिकारी यांच्याबद्दल लांचलुचपतप्रतिबंधक स्वतंत्र कायदे केलेले आहेत. लांच देणारा इसम हा गुन्हेगार असून त्याला व लांच घेणाराला ५०० पौंड दंड व शिवाय दोन महिनेपर्यंत साधी किंवा सक्त मजुरीची कैद अशी शिक्षा १९०६ च्या 'प्रिव्हेन्शन ऑफ करप्शन अॅक्ट' या कायद्यांत सांगितली आहे. हा गुन्हा करणारा परकी गुन्हेगार परत ताब्यात द्यावा, असें १९०६ च्या 'एक्स्ट्राडिशन अॅक्ट' नें ठरविलें आहे. हिंदुस्थानांत अशाच स्वरूपाचे कायदे आहेत (इंडियल पीनल कोड, कलमें १६१ ते १६९ पाहा). निवडणुकींबाबतच्या गुन्ह्यांना याच कायद्यांत शिक्षा सांगितली आहे (कलमें १७१ ए ते आय् पाहा).

**लाचारी तोडी**—हा राग तोडी थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सात स्वरांनीं होतात म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय सकाळचा दुसरा प्रहर मानितात. शुद्ध तोडीमध्यें थोडासा कोमल मध्यम लाविल्यानें हा राग उत्पन्न होतो, पण हे स्वर लावण्यांत फार कौशल्य लागतें. हा तोडीचा एक प्रकार आहे.

**लॉज, सर ऑलिव्हर** (१८५१–१९४०)—एक इंग्रज पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. तो १८८१ ते १९०० पर्यंत लिव्हरपूल येथें युनिव्हर्सिटी कॉलेजांत पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर होता. आणि १९०० पासून १९१९ पर्यंत बर्मिंगहॅम युनिव्हर्सिटीचा प्रिन्सिपॉल होता. १९०२ सालीं त्याला नाइट ही पदवी देण्यांत आली. बिनतारी तारायंत्राचा तो आद्यप्रवर्तक होय. त्यानें मानसशास्त्रीय संशोधन कार्यांत अतिशय लक्ष घातलें. त्यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. त्यांत महत्त्वाचे आहेत ते: 'अॅटम्स अॅन्ड रेज्' (परमाणु आणि किरण), 'रेमंड ऑर लाइफ अॅन्ड डेथ (रेमंड अर्थात् जीव आणि मृत्यु), 'फेथ अॅण्ड सायन्स' (श्रद्धा आणि शास्त्र), इ. होत.

**लाजाळू**—[वर्ग–लेग्युमिनोसी, पोटवर्ग–मिमोसी]. शेंगा येणाऱ्या द्विदल वनस्पतींची एक जाति. या जातीच्या झाडांचीं पानें फार संवेदनाक्षम असतात. लाजाळूस संयुक्त पर्णें असून त्यांस स्पर्श केला असतां तीं खालीं गळून गेल्यासारखीं वांकतात व मिटतात, ही गोष्ट सर्वपरिचित आहे. या लाजाळूच्या

धर्मांवरून वनस्पतींसहि संवेदना असतात, हा शोध सर जगदीश-चंद्र बोस यांनीं लावला. लाजाळूचीं पानें चिंचेच्या पानांसारखीं असतात. मोठ्या जातीच्या झाडांस बारीक कांटे असतात. डांग्या खोकल्यावर लाजाळूचें चूर्ण मधांतून देतात. मूळव्याधीस पाल्याचा रस त्या जागीं दिवसांतून दोनतीन वेळां लावतात.

**लाट**—हिंदुस्थानांतील एक प्राचीन देश. यांत खानदेश आणि गुजराथ यांतील कांहीं भाग येत असावा. शिलालेखांतून लाट देशाचा उल्लेख येत असतो. हा देश सातव्या शतकांत चालुक्यांच्या अमलाखालीं होता.

**लाटण यंत्र**—( रोलिंग मिल ). धातूचे पत्रे बनविण्यासाठीं जें यंत्र वापरलें जातें त्याला म्हणतात. याची थोडक्यांत कल्पना द्यावयाची तर उंसाच्या आडव्या चरकासारखें तें असतें. या यंत्रामध्यें एकावर एक असे दोन जड, बळकट, बहुधा पोलादी रूळ असतात. हे दांत्यांच्या चक्रांमधून फिरत असतात. पत्र्याची जाडी कमीअधिक करतां यावी म्हणून हे रूळ खालीं वा वर करण्याची योजना केलेली असते. लोखंडाच्या कारखान्यांत लाटणें हा एक फार मोठा भाग असतो. तेथें अतिशय मोठ्या अशा रुळांमधून कित्येक टन वजनाचे लोखंडी जाड तुकडे–ह्यांना बिलेट म्हणतात– अतिशय तापवून या यंत्रामध्यें घातलें असतां पंधरा मिनिटांच्या आंत पाव इंच किंवा त्याहूनहि कमी जाडीचा पत्रा तयार होऊन येतो. हें यंत्र चालविण्यास शक्तिहि कित्येक हजार अश्वशक्ति लागते. रेल्वेचे रूळ, लहानमोठे लोखंडी बार, सर्व तऱ्हेचे पत्रे, अँगल, वगैरे सर्व प्रकार या रोलरमधूनच निरनिराळ्या आकारांचे रूळ लावून तयार करतां येतात. पितळ वगैरे धातूंचे पत्रेहि अशाच लाटण यंत्रामध्यें बनविले जातात; परंतु ते आकारानें लहान असतात व त्यांना शक्तिहि कमी लागते.

**लाटव्हिया**—रशिया, एक स्वतंत्र लोकसत्ताक राज्य. क्षे. फ. २५,४०२ चौ. मै.. लो. सं. १९,५०,५०२. उत्तर युरोपांत एस्तोनिया आणि लिथुआनिया यांमध्यें हें राज्य वसलें आहे. जमीन खोल व सपाट आहे व पश्चिमेकडे रिगाच्या आखाताचा कांठ आहे. आग्नेयीकडे ड्विना, पश्चिमेकडे व्हेंटा व उत्तरेकडे गौजा अशा महत्त्वाच्या नद्या आहेत. शेतकीमध्यें मुख्यतः बटाटे, धान्यें व ताग हा माल होतो. धातू, रसायनें, मद्यें, कापड, इ. जिन्नस तयार केले जातात. मच्छीमारी हा प्रमुख धंदा आहे. गुरें आणि मधमाशा यांचें चांगलें संवर्धन करण्यांत येतें. रिगा हें राजधानीचें शहर आहे.

१९१८ सालीं हें संस्थान नवीन पाहून स्वतंत्र करण्यांत आलें. यांत जास्त वस्ती लिथुआनियन लोकांची आहे. १९२१ सालीं राष्ट्रसंघात याचा प्रवेश होऊन नवीन घटना तयार करण्यांत आली. १९४० सालीं सोव्हिएट लोकसत्ताक राज्यांत लाटव्हियाचा अंतर्भाव करण्यांत आला. १९४१ त जर्मनांनीं हा देश जिंकून घेतला, पण तो १९४४ त रशियानें परत सोडवून घेतला. १९४५ सालचें देशाचें उत्पन्न सुमारें ८० कोटी रूबल होतें.

**लाठी, लठ**—एक व्यायामसाधन. लठ जाडा, वजनदार व डोक्यापेक्षां एक हात उंच असतो. लाठी फिरवितांना जाड बाजू पुढच्या अंगास ठेवून फिरवितात. लठ मध्यभागीं धरून फिरविण्याचा प्रघात आहे. लठानें हूल व फटका मारतां येतो. तसेंच लठानें हल्ला व बचाव दोन्ही एकाच वेळीं करतां येतात. लठानें एका शत्रूशीं सामना करण्यापेक्षां गर्दीच्या मारामारींत लठाचा जास्त उपयोग होतो. लठ फिरविल्यानें मेहनतहि चांगली होते.

**लाठी संस्थान**—मुंबई, काठेवाडात हें संस्थान ४ थ्या दर्जाचें आहे. क्षे. फ. ४८ चौ. मै. व लो. सं. १०,८१२. भावनगर आणि पालिठाणा या घराण्यांचा मूळपुरुष जो शेजकजी गोहेल तोच या घराण्याचाहि आहे. या घराण्यांतील एक मुलगी दमाजी गायकवाडानें केली होती व संस्थानची खंडणी त्याबद्दल माफ केली होती. गायकवाडांना दरसाल एक घोडा अंदण देण्यांत येत असे. सध्यांचे ठाकूरसाहेब श्रीप्रल्हादसिंघजी हे १९१८ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न ४,६७,००० रु. आहे. संस्थानांत हातमाग पुष्कळ आहेत. खाण्याचें तेल मोठ्या प्रमाणावर निघतें. गोंडल संस्थान रेल्वे लाठी गांवावरून जाते. संस्थानची राजधानी लाठी गाव आहे. हें संस्थान आतां सौराष्ट्रसंघांत सामील झालें आहे.

**लाड**—एक प्राचीन राष्ट्रजात. लाट शब्दाचा अपभ्रंश लाड असावा. आतां ही स्वतंत्र जात राहिला नसून वाणी, कुंभार, सोनार, वंजारी, वगैरे जातींतून पोटजात म्हणून आढळून येते. लाड सुलेमानी म्हणून एक मुसलमान कसायाचीहि जात आहे. गुजराथेंतून हे लोक दुर्गादेवीच्या दुष्काळांत खालीं येऊन निरनिराळे धंदे करून राहिले असावेत.

**लांडगा**—हा एक सस्तन, चोर्टे असणाऱ्या मांसाहारी वर्गाचा प्राणी आहे. याचें कुत्र्याशीं फार साम्य आहे. याचा रंग पिवळट करडा असतो. याची खांद्याजवळची उंची २७ ते २९ इंच असते. मेक्सिकोमध्यें हे मैदानात आढळतात. टास्मानिया बेटात आढळणाऱ्या लांडग्यास पोटाला पिशवी असते. पाश्चात्य देशांत लांडग्यांच्या धाडी येत असतात, व त्या फार भयंकर असतात.

लांडगा फार धाडशी असतो. भुकेच्या वेळीं तो कांहीं न

मिळाल्यास चिखल देखील खातो. लांडगा आणि कोंकरूं यांच्या गोष्टी आपल्याकडे लहान मुलांना सांगतात. तान्हीं मुलें लांड-

ग्यांनीं नेल्याच्या पुष्कळ गोष्टी घडलेल्या आहेत. आजहि उत्तर प्रदेशात लांडगे आणि तरस यांनीं धुमाकूळ मांडला असून त्याच्या बंदोबस्तासाठीं सरकारनें सैन्याची योजना केली आहे !

**लाडोगा**—हें युरोपांतील सर्वांत मोठें गोड्या पाण्याचें सरोवर रशियात आहे. त्याची लांबी १३० मैल व सरासरी रुंदी ७५ मैल आहे. हें सरोवर वर्षाचा बराच काळ बर्फाच्छादित असतें. येथून कालवे काढून ते लेनिनग्राड व फिन्लंड आखातापर्यंत नेलेले आहेत. येथील व्हालामो व कोनेविट्झ या बेटावर यात्रेकरू पुष्कळ जातात.

**लातूर**—हैद्राबाद संस्थान, उस्मानाबाद जिल्ह्यांतील एक गांव. कापसाचा व धान्याचा मोठा व्यापार चालतो. लो. सं. सु. १०,०००. लट्टुर ( लट्ट + ऊरु ) असें या गावाचें नांव जुन्या इतिहासांत येतें.

**लॉन् टेनिस**—हा चेंडूचा खेळ टणक जमिनीवर किंवा हिरवळीवर खेळतात. खेळण्याचें अंगण ७८ फूट लांब व ३६ फूट रुंद असून मध्यभागी ३ फूट उंचीची जाळी असते. चेंडू पोकळ, रबरी व वरून कापडाचें वेष्टण असलेले असतात. वजन सुमारें दोन औंस असतें. खेळणारांचें उद्दिष्ट असें असतें कीं, जाळीला न लागतां चेंडू समोरच्या हद्दींत असा मारला जावा कीं, प्रतिस्पर्ध्याला तो उलट आपणांकडे मारतां येऊं नये. चेंडू चुकला म्हणजे प्रतिस्पर्ध्यावर 'झकू' लागले. १५, ३०, ४०, ५० असे 'झकू' ( पॉइंट ) झाले कीं एक डाव झाला. असे एका पक्षानें सहा डाव जिंकले कीं एक 'संच' ( सेट ) पुरा झाला. हा खेळ दोन किंवा चार गड्यांत खेळतां येतो. या खेळाचे सर्व देशांतून क्लब आहेत. विंबल्डन येथें आंतरराष्ट्रीय सामने होतात. डेव्हिस कप जिंकण्यासाठीं मोठी चढाओढ लागते. हा खेळ प्रौढ बायका-पुरुषहि आवडीनें खेळतात. टेनिस पाहा.

**लापाझ**—बोलिव्हिया, एक प्रमुख व्यापारी शहर. बोलिव्हियाच्या एकंदर राजकीय चळवळींचें हें केंद्रस्थान आहे. या ठिकाणीं फार मोठें देऊळ असून त्यांत १२,००० उपासक मावतात. येथ विद्यापीठहि आहे. लो. सं. सुमारें तीन लाख.

**लांप्रे**—हे एक लांचट माशासारखे पण पृष्ठवंश असलेले व

खवले नसलेले प्राणी आहेत. हे खाऱ्या व गोड्या दोन्ही प्रकारच्या पाण्यात राहतात. हे माशानंतरच्या 'सायक्लो स्टोमाटा' या वर्गांत मोडतात. समुद्रांत आढळणाऱ्या या प्राण्यांचें वजन ४ ते ५ रत्तलापर्यंतहि आढळतें. हे वसंत ऋतूमध्यें अंडीं घालण्याकरितां नदीच्या पात्रांतून वर येतात. यांचा खाण्याच्या कामीं बराच उपयोग करण्यांत येत असे. नदीमध्यें आढळणारी या प्राण्यांची जात लहान असते. हे दुसऱ्या माशांस चिकटून त्यांचें मास खातात व इतरहि बारीकसारीक प्राण्यांच्या मांसावर उपजीविका करतात.

**लाप्लाटा**—अर्जेंटाइनमधील एक शहर. हें स्वाभाविक व सुंदर बंदरहि आहे. ब्युएनोज ऐरीज प्रांताची ही राजधानी असून येथें विद्यापीठहि आहे. लो. सं. ( १९४५ ) २६,२०,८२७.

**लाप्लास, पियर सिमोन, मार्किस द** ( १७४९-१८२७ )—एक फ्रेंच गणित-ज्योतिषशास्त्रज्ञ. गणितशास्त्रांत त्याचा क्रम न्यूटनच्या खालोखाल लागतो. त्याचें कार्य ज्योतिषशास्त्रांतील गणितविषयक भागांत विशेष महत्त्वाचें झालेलें

आहे. त्यानें ज्योतिषशास्त्रांत ग्रहांच्या कक्षांच्या प्रमुख आंसांचें अचलत्व, शनि आणि गुरु या ग्रहाच्या गतींतील मोठ्या विषमतेचें कारण, चंद्राच्या मध्यमगतिवर्धनाच्या प्रश्नाचा निकाल, गुरूच्या चंद्राचा सिद्धांत, वगैरे महत्त्वाचे शोध लाविले. त्याचे बरेच महत्त्वाचे ग्रंथहि आहेत. पदार्थविज्ञानशास्त्रांतहि त्याचे शोध आहेत.

**लॅंबॉक**—डच ईस्ट इंडीज, सुंडा संघापैकीं एक बेट. प्रदेश डोंगराळ आहे. दऱ्यांमधून तांदूळ, कापूस, मका, कॉफी व तंबाकू हीं पिकें होतात. मातरम् व अंपनम् हीं दोन मुख्य शहरें आहेत. मातरम् राजधानी असून अंपनम् हें बंदर आहे. ससक लोकांची बेटावर वस्ती आहे. लो. सं. सुमारें चार लाख. राज्यकारभारासाठीं बलिद्वीपाशीं हें जोडलें आहे.

**लाबॉन**—मलाया द्वीपसमूहांतील एक बेट. बोर्निओच्या वायव्य किनाऱ्यावर हें असून १८४६ सालीं ब्रुनेईच्या सुलतानाकडून ब्रिटिशांनीं हें घेतलें व १९०७ सालीं स्ट्रेट्स सेटलमेंटच्या वसाहतींत समाविष्ट केलें. क्षे. फ. ३५ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ८,९६३. यांत ५,३४२ मलायी व ३,३१९ चिनी लोक आहेत. राजधानीचें शहर व्हिक्टोरिया आहे. येथें साबूदाणा करण्याचे कारखाने आहेत.

**लाब्रादोर**—उत्तर अमेरिकेंतील ईशान्य टोंकाचा एक प्रदेश. हें एक मोठें द्वीपकल्प आहे. क्षे. फ. ५,१०,००० चौ. मै. यांतील ॲटलांटिक किनाऱ्याकडचा कांहीं भाग न्यू फाउंडलॅंडमध्यें सामील आहे व बाकीचा कानडामध्यें मोडतो. एकंदर लाब्रादोर विभागांत १,००० मैलाचा समुद्रकिनारा आहे. याच्या किनाऱ्यानें अनेक आखातें, उपसागर व खाड्या आहेत आणि किनाऱ्याच्या बाजूबाजूनें अनेक बेटें आहेत. हवा थंड आहे. जमीन थोडी आहे पण सुपीक आहे. अंतर्भाग बहुतेक डोंगराळ आहे. वस्ती फक्त ४,००० व ती मुख्यतः एस्किमोंची आहेत. मुख्य धंदा मासेमारी आहे.

**लॉब्स्टर**—हा एक लांब शेपटीचा, दहा पायांचा व खवले असून डोक्यांत डोळे असलेला खेकड्याच्या जातीचा प्राणी आहे. याचे पुढील पाय मोठे असून त्यांत आंकडे असतात. आणि शेपटी चपटी असून तीस खवले असतात. हे स्वच्छ पाण्यात राहतात. यांचें मांस फार रुचकर असतें. खेकडा पाहा.

**लामा**—हा उंटासारखा दिसणारा प्राणी अमेरिकेमध्यें आढळतो व तेथें त्याचा उपयोग ओझें वाहण्याच्या कामीं करतात. हा कांहींसा लांब मानेच्या मेंढ्यासारखा दिसतो. याच्या दोन जाती अद्यापि रानटी स्थितींत आढळतात, पण हा आणि अल्पाका हे आतां पाळीव प्राणी बनले आहेत.

**लामापंथ**—बौद्ध धर्मांतील हा पंथ मोंगोलिया आणि तिबेट प्रदेशांत लामांनीं चालविला आहे. हा पंथ महायान पंथासारखाच आहे. सातव्या शतकांत बौद्ध धर्म इकडे रुजला व पुढें राजधर्म झाला. बौद्ध धर्मग्रंथांचीं तिबेटीमध्यें भाषांतरें होऊन ठिकठिकाणीं मठ स्थापिले गेले. तिबेट जिंकणाऱ्या चेंगीझखानच्या नातवाला (कुब्लाईखानाला) बौद्ध धर्माची दीक्षा देऊन चीनचा बादशहा करण्यात आलें. १४ व्या शतकांत अतीशानें कादम पंथ तिबेटांत सुरू केला व तोच पुढें प्रबल झाला. १६५० त या पंथाच्या मुख्याला चीनच्या बादशहानें तिबेटचा राजा (दलाई) बनविलें. तेव्हांपासून तिबेटवर सर्व सत्ता दलाईलामाची आहे. दलाई लामा हा अवलोकितेश्वराचा अवतार असून एक दलाई मेल्यावर त्याचा दैवी आत्मा कोणा तरी मुलामध्यें शिरतो. अमक्या मुलांत शिरला अशी खात्री पटल्यास त्या मुलाला दलाई लामा करण्यांत येतें. हा मुख्य लामा मोंगोलिया व चीन या भागांतील बौद्ध मठांचाहि अधिपति असतो.

लामा साधूंचे दोन वर्ग आहेत. एक प्रव्राजक व दुसरा भिक्षु. तिबेटमध्यें दर तीन माणसास एक लामा असें प्रमाण पडतें. तेव्हा त्या देशांत भौतिक सुधारणा होण्याला फारसा वावच नाहीं. तिबेट पाहा.

**लामार्क; जीन बाप्तिस्त** (१७४४–१८२९)—एक फ्रेंच सृष्टिशास्त्रज्ञ. हा सप्तवार्षिक युद्धांत शिपाई होता. त्यांत जखमी झाल्यामुळे तो दुसरीकडे वळला. अपृष्ठवंशी प्राचीन प्राणिशास्त्रा–(इन्व्हर्टिब्रेट पॅलेओन्टॉलजी) चा आद्य जनक होय आणि कुव्हीएर हा पृष्ठवंशी प्राचीन प्राणिशास्त्राचा आद्य जनक होय. लामार्कचे मुख्य ग्रंथ तत्त्वज्ञान व प्राणिशास्त्र यावर आहेत. या ग्रंथात त्यानें जो विकासवादाचा नियम हल्लीं प्रसिद्ध आहे त्याच्या उपपत्तीचें पूर्व दिग्दर्शन केलेलें आहे.

लामार्कचा सिद्धांत—कोणत्याहि जातीचें रूपांतर होत नाहीं हा सिद्धात प्रथम यानें अमान्य केला आणि परिस्थितीस अनुरूप असा प्रत्येक जातीमध्यें बदल होत असतो, या सिद्धांताचें महत्त्व यानें प्रथम प्रस्थापित केलें. लामार्क यानें विशेषतः कोणत्याहि प्राणिजातीनें संपादन केलेले गुणधर्म त्या जातींत पुढें वंशपरंपरेनें चालू राहतात, हा सिद्धांत प्रस्थापित केला. उदा., लामार्क यानें असें दाखविलें कीं, जिराफ या प्राण्याची मान एवढी उंच होण्याचें कारण झाडावरील पाल्यास आपलें तोंड पोंचावें म्हणून प्रत्येक पिढीनें आपली मान लांचविण्याचा थोडथोडा प्रयत्न केला; त्यामुळें ही मान लांचविण्याची क्रिया वंशपरंपरेनें चालू राहून आज या प्राण्याची मान इतकी लांब बनली. विशिष्ट प्राणी आपल्यासभोंवतीच्या परिस्थितीशीं स्वतःस अनुरूप करून घेतो. याविषयीं कांहींसंशय नाहीं, परंतु

गाल्टन, वेसमन, वगैरेंनीं केलेल्या संशोधनापासून असें दाखविण्यांत आलें आहे कीं, हे विशिष्ट व्यक्तीनें परिस्थितीशीं अनुरूप होण्याकरितां संपादन केलेले गुणधर्म पुढें वंशपरंपरेनें चालू राहत नाहींत. या शास्त्रज्ञांच्या सिद्धांताप्रमाणें जे बदल जीवाणूमध्यें किंवा बीजपेशीमध्यें होतात तेच फक्त पुढील वंशजांस प्राप्त होतात. डार्विन यानें जरी लामार्कचा सिद्धांत तत्त्वतः मान्य केला नाहीं तरी त्यानें विशिष्ट अवयवांचा उपयोग करणें किंवा मुळींच उपयोग न करणें या गोष्टींचा विकासक्रियेमध्यें फार महत्त्वाचा परिणाम होतो असें म्हटलें आहे. परंतु अलीकडील शास्त्रज्ञात लामार्कचा सिद्धांत मान्य करणारे अद्यापि कांहीं शास्त्रज्ञ असून त्यांनीं एक नवलामार्कसिद्धांत काढिला आहे. तो असा कीं, बदलेल्या परिस्थितीचा परिणाम जर अनेक पिढ्यांवर सतत होत राहिला तर त्यामुळें संपादित केलेल्या गुणधर्मांच्या योगानें प्राण्याच्या शारीरिक रचनेमध्येंहि फरक होणें स्वाभाविक आहे आणि यामुळेंच अर्थातच हे गुणधर्म पुढील पिढ्यांत वंशपरंपरेनें उतरत जाणें स्वाभाविक आहे.

**लाय पाटील**—मराठ्यांचा एक आरमारी अधिकारी. सुभानजी खराडे सरनोबत व सुभानजी मोहिते हवालदार यांच्यातर्फे याची शिवाजीच्या आरमारांत नेमणूक झाली. सन १६६१-६२ मध्यें शामराज नीलकंठ रोझेकर पेशवे व रोहिड्याचा किल्लेदार बाजी घोलप यांनीं जंजिऱ्याच्या सिद्दीवर केलेल्या स्वारींत त्यांना अपयश आल्यानें या कामीं मोरोपंत पेशवे याची नेमणूक करण्यांत आली. त्या वेळीं याजकडे जंजिऱ्यास रात्रीं शिड्या लावून देण्याची कामगिरी सोंपवण्यांत आली होती व ती कामगिरी यानें फत्ते केली. त्यामुळें मोरोपंतानें शिवाजीकडे याची शिफारस केली. शिवाजीनें याच्या गुणाचा गौरव करून यास पालखीचा मान देऊं केला, पण तो यानें विनयपूर्वक नाकारल्यानें शिवाजीनें यास पालखी नांवाचें जहाज बांधून दिलें. बादशहाकडून यास पाटिलकी मिळाली होतीच. म्हणून यास सरपाटिलकीहि बहाल करण्यांत आली.

**लायकर्गस**—स्पार्टामधील एक कायदेपंडित. याचा काळ संशोधिला गेला नाहीं. कदाचित् ही काल्पनिक व्यक्ति असावी. क्रीट, ईजिप्त व आशिया या बाजूंस यानें प्रवास केल्याचें सांगतात. त्यानें जे स्पार्टासाठीं कायदे केले त्यामुळें त्याचें नांव अजरामर होऊन राहिलें आहे.

**लायबेरिया**—पश्चिम आफ्रिका, गिनी किनाऱ्यावरील नीग्रो लोकांचें एक राज्य. क्षेत्रफळ ४५,००० चौ. मैल. लो. सं. १५,००,०००. याला सुमारें ३५० मैल लांबीचा समुद्रकिनारा आहे. मनरोव्हिया हें राजधानीचें ठिकाण व मुख्य बंदर आहे. रबर व पामतेल मोठ्या प्रमाणांत निघतात. थोडीशी खनिज संपत्तिहि आहे. अमेरिकेंतील दास्यमुक्त नीग्रोंकरितां या मुलुखाची योजना करण्यांत आल्यानें संस्थानची राज्यघटना वगैरे यू. एस्. ए. (अमेरिका)च्या वळणावर आहे. कांहीं काळ हें संस्थान अमेरिकेचें संरक्षित (प्रोटेक्टरेट) म्हणूनच होतें. देशांतील अंतर्गत भागात जुनाट अरण्यांत राहणाऱ्या मूळच्या नीग्रो लोकांत अद्याप बऱ्याच रानटी चालीरीती चालू आहेत. यांत दोन कॉलेजें व १६१ शाळा आहेत.

१८२१ त हें राज्य अमेरिकन वसाहत मंडळानें दास्यमुक्त होऊन आफ्रिकेला परत जाणाऱ्या नीग्रोंसाठीं स्थापलें. १८४७ त लायबेरिया स्वतंत्र झालें. नंतर मात्र ब्रिटिश आणि फ्रेंच यांच्याशीं सरहद्दीबाबत अनेक तंटे झाले. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांत हें दोस्तांच्या बाजूस होतें.

**लायलपूर**—पंजाब, पाकिस्तान, मुलतान भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,५२२ चौ. मै.. हा जिल्हा १९०४ सालीं बनविला गेला. चिनाब आणि रावी या दोन नद्यांमध्यें हा आहे. लो. सं. (१९४१) १३,९६,३०५. लायलपूर मुख्य ठिकाण आहे व तें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर आहे. लो. सं. (१९४१) ६९,९०३. येथून बाहेर गहूं फार जातो. कापूस दाबण्याचे व सरकी काढण्याचे कारखाने आहेत.

**लायार्ड, सर ऑस्टेन हेन्री** (१८१७-१८९४)—एक ब्रिटिश पुराणवस्तुशास्त्रज्ञ. त्यानें १८४५ सालीं नीमरुड, निनेव्हे येथील प्राचीन टेकड्यांचें उत्खनन सुरू केलें. या उत्खननांत त्याला पुष्कळ दुर्मिळ कीलाकृति (क्युनिफॉर्म) लेख आणि बाह्यगोलशिल्प (बास-रिलीफ) सांपडलें. या सर्व उत्खननकार्याचें वर्णन त्यानें आपल्या पुस्तकांत दिलें आहे.

**लारखाना**—सिंध, एक जिल्हा. क्षे. फ. २,८५७ चौ. मै. व लो. सं. ५,११,२०८. जिल्ह्यांतून कालवे गेले आहेत. त्यांपैकीं पश्चिम नार हा सर्वांत मोठा आहे. पाऊस फार थोडा व उष्णतामान ११५° पर्यंत आहे. शें. ८५ मुसलमान आहेत. मुख्य पिकें तांदूळ, गहूं व ज्वारी. ऊंस, तंबाखू व नीळ हीं लारखाना व मेहर तालुक्यांत होतात. जाड कापड, सतरंज्या, चटया, कातडी जिन्नस, भांडीं, इ. तयार होतात.

लारखाना हे सुंदर व व्यापारी शहर आहे. याला सिंध प्रांतांतलें इंद्रभुवन म्हणतात. शहाबहारची कबर प्रेक्षणीय आहे. लो. सं. १६,०००.

**लॉरेन्स, टॉमस एडवर्ड** (१८८८-१९३५)—हा एक इंग्रज सैनिक विद्वान् व साहसी गृहस्थ होता. पुराणवस्तुसंशोधनाच्या कार्याकरितां त्यानें अरबी व इतर पूर्वेकडील भाषांचा अभ्यास केला व पहिल्या महायुद्धामध्यें गुप्तवार्ताखात्यामध्यें प्रवेश केला. यानें अरब लोकांस चिथावणी देऊन तुर्के

लोकांच्याविरुद्ध युद्धास उठविलें व त्यांचें पुढारीपण घेऊन तुर्कीच्या दळणवळणाच्या मार्गांत अडथळे आणले. यानें केलेल्या तुर्क लोकांवरील हल्ल्यामुळें जनरल ॲलेन्बी यास तुर्क लोकांवर जय मिळविणें सोपें झालें. याच्या सैन्यांत उंट, घोडे, चिलखती गाड्या व बाँबफेकी विमानें असत. शांतता परिषदेमध्यें हा प्रतिनिधि म्हणून हजर होता. युद्धानंतर यानें आपले सर्व हुद्दे सोडून देऊन तो एक साधा सैनिक म्हणून सैन्यांत दाखल झाला. यानें 'शहाणपणाचे सात स्तंभ' आणि 'वाळवंटांतील बंड' या ग्रंथांत आपलीं अरबस्तानांतील साहसी कृत्यें वर्णन केलीं आहेत. यानें होमरच्या 'ओडेसी' या काव्याचेंहि भाषांतर केलें आहे.

**लॉरेन्स, लॉर्ड जॉन** (१८११–१८७९)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. १८२९ सालीं हा हिंदुस्थानांत आला व १८५३ सालीं पंजाबचा चीफ कमिशनर झाला. १८५७ च्या शिपायांच्या युद्धांत यानें मोठ्या मिनतवारीनें शीख लोकांना बंडापासून अलिप्त ठेवलें, एवढेंच नव्हे तर ६०,००० हिंदी लोकांचें सैन्य दिल्ली शहर काबीज करण्यासाठीं पाठविलें. 'ब्रिटिश राज्याचा संरक्षक' म्हणून याला सरकारांतून बहुमान मिळाले. १८६४ सालीं त्याला हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल करण्यांत आलें. त्यानें आपल्या कारकीर्दींत शहाणपणानें मिळतें घेण्याचें धोरण ठेविलें होतें. लाहोर शहरांत त्याचा पुतळा बसविण्यांत आला होता.

**लॉरेन्स, सर हेन्री माँटगॉमेरी** (१८०६–१८५७)—एक अँग्लो-इंडियन लढवय्या व परराष्ट्र-मुत्सद्दी. हिंदुस्थानांत १८५७ चें बंड सुरू झाल्यावर त्याला अयोध्या प्रांताचा सेनापति नेमण्यांत आलें. तो बंडवाल्याकडून लखनौ रेसिडेन्सीमध्यें वेढला गेला होता आणि तो वेढा सुरू झाल्यानंतर थोड्याच दिवसांत मारला गेला.

**लॉरेल**—[वर्ग-लॉरेसी. जाति-लॉरस]. हें झाड उत्तर आफ्रिका व दक्षिण युरोप यांमध्यें आढळतें. या जातीचीं झाडें अनेक देशांतून आढळतात व त्यांच्या निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या जाती आहेत. यांतील एका जातीच्या झाडाच्या फळांपासून तेल व चरबी काढण्यांत येते. ग्रीक लोकांत विजयी वीराचा सन्मान त्याला या झाडाच्या पानांचा हार किंवा तुरा देऊन करण्यांत येत असे.

**लाल**—(कार्बंकल). हें एक लालभडक रंगाचें रत्न असून तें पूर्वेकडील बेटांत आढळतें. हें सूर्याच्या दिशेकडे धरल्यास त्याचा लालभडक रंग कमी होऊन तें निखाऱ्यासारखें दिसूं लागतें. माणिक पाहा.

**लाला लजपतराय** (१८६५–१९२८)—एक प्रमुख हिंदी पुढारी. जुन्या राष्ट्रीय पुढाऱ्यांत लाला लजपतराय हे प्रमुख होते. यांनीं १८८८ मध्यें प्रथम काँग्रेसमध्यें भाषण केलें. हे राजकीय व सामाजिक चळवळींत पुढाकार घेऊं लागल्यामुळें ते पंजाबांत व सर्व हिंदुस्थानांत पुढारी म्हणून मान्यता पावले. १९०७ सालीं यांस सरदार अजितसिंह यांच्यासह हद्दपार करण्यांत आलें. १९०६ मध्यें गोखले यांच्याबरोबर त्यांस हिंदी शिष्टमंडळाचे सभासद म्हणून पाठविण्यांत आलें होतें. १९०७ च्या सुरत काँग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षातर्फे लाला लजपतराय यांचें नांव अध्यक्ष म्हणून सुचविण्यांत आलें; पण ना. गोखले यांनीं या सूचनेला विरोध केला व लालाजी यांनीं थोर मनानें हा मान नाकारला. पुढें तडजोडीचीं बोलणीं चालू असतां लालाजींस काँग्रेसच्या अध्यक्षपदाचा मान देऊन त्यांचा गौरव करावा, असें टिळक व सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं योजलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पण पुढें त्यांस गुप्त पोलिस खात्यांतील लोकांनीं इतका त्रास दिला कीं, ते पहिल्या महायुद्धाच्या काळांत अमेरिकेंत जाऊन राहिले. १९२० मध्यें कलकत्ता येथील जादा काँग्रेसचे ते अध्यक्ष होते व तेथेंच प्रथम असहकारितेचा ठराव मान्य करण्यांत आला. परंतु त्यांच्या मनास तो पटला नव्हता व समारोपाच्या भाषणांत या ठरावास यश येणार नाहीं असें त्यांनीं म्हटलें होतें. ते लढाऊ वृत्तीचे होते, पण सत्याग्रही नव्हते. असहकारितेच्या काळांत त्यांच्या प्रांतांत त्यांच्याविरुद्ध एक पक्ष उत्पन्न झाला. कौन्सिल-प्रवेशाचा कार्यक्रम सुरू झाला तेव्हां त्यांस पुन्हां जरा उमेद चढली; परंतु सायमन कमिशन-बहिष्काराच्या वेळीं त्यांस पोलिसांच्या लाठीचा तडाखा लागल्यामुळें ते आजारी पडले व त्यांतच त्यांचा अंत झाला. त्यांनीं काँग्रेसमध्यें अर्धा दिवस औद्योगिक व शैक्षणिक बाबतींसाठीं ठेवावा असें सुचविलें होतें व तेव्हांपासून औद्योगिक प्रदर्शन हें एक काँग्रेसचें अंग झालें.

**लाला सेवकराम** (मृ. १७९२)—कलकत्ता येथें इंग्रजांच्या दरबारीं असणारा मराठ्यांचा वकील. जातीनें हा कायस्थ असून याचा जन्म उत्तर हिंदुस्थानांत झाला. याचा बाप लाला तुळजाराम व लाला कृपाराम हा याचा आजा. हे सुद्धां मराठ्यांच्याच नोकरींत होते. लाला तुळजाराम मरण पावल्यावर यास सन १७७० मध्यें जयपूर दरबारीं मराठ्यांनीं आपला वकील नेमलें. तेथें हा सन १७७३ पर्यंत होता. पुढें बारभाईचें कारस्थान सुरू झाल्यावर याच्याकडे शिलेदारीचें व पेशव्यांच्या कचेरींत कारकुनीचें काम आलें. यानंतर यास कलकत्त्यास इंग्रजांच्या दरबारीं

पाठवण्यांत आलें. जातांना यानें वॉरन हेस्टिंग्जसाठीं बहुमानाचा पोशाख, फत्तेह लष्कर नांवाचा हत्ती व एक घोडा, तसेंच तीन कौन्सिलरांसाठीं आणखी तीन घोडे इतका लवाजमा बरोबर घेतला होता. कलकत्त्यांत मराठ्यांचा वकील म्हणून यानें सन १७७७ ते १७९० पर्यंत काम केलें. याच्या कामाबद्दल यास प्रथम सालिना रु. ८०० पगार मिळत असे. याची कामांतील हुशारी पाहून हें वेतन पुढें रु. ३६०० पर्यंत वाढविण्यांत आलें. यास पालखी व अब्दागिरीचा मान असे. याच्या चिमणलाल व गुलाबराम या दोन मुलांपैकीं फक्त गुलाबराम याजबरोबर कलकत्त्यास होता व तोच याच्या मृत्यूनंतर याचें काम पाहूं लागला. चिमणलाल मात्र पुण्यास असे.

**लाली, कांउट थॉमस आर्थर** (१७०२–१७६६)—एक फ्रेंच सेनापति. १७४५ त तो इंग्लंडच्या तोतयाबरोबर स्कॉटलंडला गेला होता. १७५६ त त्याला पॉंडेचरीचा गव्हर्नर करण्यांत आलें. सर आयरकूट या इंग्रज सेनापतीनें १७६१ सालीं त्याचा पराभव करून पॉंडिचेरी घेतलें व त्याला कैद करून इंग्लंडांत पाठविलें. नंतर तात्पुरती सुटका करून घेऊन तो फ्रान्सला गेला, पण तेथें त्याला फ्रेंच सरकारनें कैदेंत टाकून चौकशी चालविली व राजद्रोहाच्या आरोपावरून फांशीं दिलें.

**लावणी**—हा एक गाण्याचा व कवित्वाचा प्रकार आहे. व ही म्हणण्याची धाटणी विशेष प्रकारची आहे. हा गाण्याचा प्रकार पेशवाईच्याहि पूर्वी प्रचारांत असावा. शिव आणि शक्ति यांचे उपासक आपआपलें वैशिष्ट्य जें दाखवितात त्याचेंच एक रूपांतर 'तुरेवाला पक्ष' (शिवाचा) व 'कलगीवाला पक्ष' (शक्तीचा) म्हणून लावण्यांतून दिसून येतें. एका पक्षानें पौराणिक गोष्टींचे प्रश्न विचारावेत व त्याला दुसऱ्या पक्षानें लगेच काव्यमय वेदान्ती उत्तर द्यावें व तें देतां आलें नाहीं तर त्या पक्षाचा पराजय झाला असें समजतात.

लावणी गाण्याचे तीन मुख्य प्रकार आहेत : (१) बैठकीची अथवा तंबुरीची, (२) कडे-ढोलकीची, व (३) तबला-पेटीच्या साथीवरची. बैठकीची लावणी स्फुट म्हणजे तुटक तुटक असते, तर कडे ढोलकीच्या लावणीचा एखाद्या कथेंतील संविधानकाशीं संबंध असतो. यांत गद्याचाहि उपयोग करतात. दोन लावण्यांचा संदर्भ दाखवून देणाऱ्या भाषणाला संपादणी म्हणतात व संपादणी करणाऱ्याला सोंगाड्या म्हणतात.

भेदक लावणीच्या प्रकारांत दुसऱ्या पक्षाचें मर्मान्वेषण असतें व त्याला तसेंच उत्तर त्या पक्षाकडून मिळावें लागतें.

लावणी हा गायनप्रकार ग्रामीण जीवनांत अत्यावश्य आहे. त्यानेंच तेथली रंगभूमि सजविली जाते. ज्यांत लावण्या म्हणून करमणूक केली जाते तो प्रकार तमाशा या नांवानें प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रांत राम जोशी, प्रभाकर, होनाजी बाळ, सगन, इ. बरेच लावणीकार होऊन गेले व त्यांचीं कवनें हा मराठी काव्यांतील एक स्वतंत्र भाग आहे. पठ्ठे बापूराव हा अगदीं अलीकडचा व शेवटचा लावणीकार म्हणतां येईल.

**लावा पक्षी**—(क्वेल). या पक्ष्याची शिकार करतात. हा कवड्यासारखा असतो. हा दूरवर भटकत जातो. याची लांबी आठ इंच असते. याच्या पाठीचा रंग फिकट, पिंगट असून मधून मधून काळी छटा असते व पोटाचा रंग पिवळसर असतो.

**लाव्हाझिए, आन्त्वान् लॅरां** (१७४३–१७९४)—एक फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ. यानें प्रथमच रसायनशास्त्रांतील पद्धतींची आंखणी करून त्यांतील संज्ञा ठरविल्या. त्याचें अत्यंत महत्त्वाचें संशोधन रसायन आणि पदार्थविज्ञान या शास्त्रांवरील ग्रथांत दिलें आहे (उदा., 'त्रेते द शिमी', 'मेम्वार द फिजिक ए द शिमी'). लाव्हाझिएनें शेतकी, पेढ्या, आरोग्य, इ. अनेक राज्यकारभाराच्या क्षेत्रांत सुधारणा घडवून आणल्या. पण याच्याबद्दल अधिकारी पक्षाला संशय वाटून याला फांसावर चढविण्यांत आलें.

**लॉसएंजेलस**—हें अमेरिकन संयुक्त संस्थानांतील कॅलिफोर्नियांत लॉसएंजेलस नदीच्या कांठीं एक शहर आहे. अमेरिकेंतील सिनेमा धंद्याचें तें केंद्र आहे. शिवाय हवा खाण्याचेंहि तें उत्तम ठिकाण आहे. या शहराच्या आसपास फळफळावळ पुष्कळ होते, व त्याकरिता येथें कालव्यांची भरपूर योजना केलेली आहे. लोकसंख्या १५,०४,२७७.

**लॉस बेटें**—आफ्रिका, फ्रेंच गिनीच्या किनाऱ्यालगतच्या बेटांचा समूह. हीं १९०४ सालीं ग्रेट ब्रिटननें फ्रान्सला दिलीं. हीं सर्व ज्वालामुखींनीं बनलेलीं बेटें असून त्यांवर नीग्रो लोकाची वस्ती आहे.

**लासबेला**—बलुचिस्तान, एक लहान संस्थान. क्षे. फ. ७,०४३ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ६९,०६७. लोक मुख्यत्वें सुनी पंथाचे मुसलमान आहेत. पुरली नदीच्या बेचक्यांत संस्थानचा बहुतेक भाग असून पूर्वेस हाब नदी व सिंधचा मुलूख आहे. संस्थानांत सात तालुके व १३९ खेडीं आहेत. बेला हें मुख्य ठिकाण आहे. जमीन फार सुपीक आहे, पण पुरामुळें नुकसानी होऊं नये म्हणून धरणें बांधावीं लागतात. ज्वारी व मूग हीं धान्यें होतात. या ठिकाणीं सुंदर वेलबुट्टीचें कापड होतें.

सातव्या शतकांत एक बौद्ध उपाध्याय घराणें राज्य करीत होतें. नंतर मुसलमान आले. सध्याच्या आलियानी राजवंशात आठ पुरुष होऊन गेले आहेत. जाम मीरगुलाम कादिरखान हे सध्यांचे संस्थानिक आहेत. संस्थानावर कलातचें वर्चस्व असतें.

उत्पन्न सुमारें ३½ लाख रुपयांचें आहे. हें संस्थान आतां पाकिस्तानला जोडलें गेलें आहे.

**लासूर**—मुंबई, पूर्व खानदेश, चोपडें तालुक्यांतील एक गांव. गांव इतिहासप्रसिद्ध आहे याची साक्ष येथील पडका किल्ला देतो. कर्नाटकी लोकांचा उपद्रव टाळण्याठीं गुलशारखान ठोके यानें हा बांधला होता.

**लासेन, ख्रिश्चन**—एक युरोपियन प्राच्यविद्यापंडित. हा विल्यम श्लेजेलचा शिष्य. ह्यानें त्याच्या वेळीं उपलब्ध असलेली हिंदुस्थानबद्दलची संपूर्ण माहिती गोळा करून 'भारतीय प्राचीन संस्कृति' या नांवानें ती चार खंडांत प्रसिद्ध केली (१८४३-६२). यांनंतर 'Sanskrit worterbuch' हा संस्कृत कोश ओटो बोटलिंग व रूडोल्फ रोठ ह्यांनीं सात खंडांत प्रसिद्ध केला (१८५२-७५). ह्या अवाढव्य कामाला वरींच वर्षें लागलीं. पण ह्यापासून फार फायदा झाला. डॉ. लासेन यानें वेबरच्या रामायणावरील सिद्धांताला उत्तर दिलें आहे. पूर्व आशियांतील देशांचा प्राचीन इतिहास लासेननें चांगला अभ्यासला होता.

**लासेल, फर्डिनंड** (१८२५-१८६४)—एक जर्मन समाजसत्तावादी. त्यानें आपलें 'सिस्टिम ऑफ ॲक्वायर्ड राइट्स' (संपादित हक्कांची व्यवस्था) हें पुस्तक १८६१ सालीं प्रसिद्ध केलें. १८६३ सालीं त्यानें लेबर युनियन ही संस्था स्थापिली आणि समाजसत्तावादाचा प्रचार सुरू केला; त्यामुळें त्याचीं मतें जर्मनींत सर्वत्र पसरलीं. पुढील सालीं तो एका द्वंद्वयुद्धांत ठार मारला गेला. त्याचा अतिशय प्रसिद्ध निबंध आहे तो : 'प्रोग्रॅम फॉर दि वर्किंग क्लासेस' (कामकऱ्यांसाठीं कार्यक्रम) होय.

**लास्की, हॅरोल्ड** (१८९४-१९५०)—ब्रिटिश समाजसत्तावाद्यांचा एक पुढारी. हा ज्यू वंशाचा असून याचा जन्म इंग्लंडमध्यें झाला होता. याचें शिक्षण मँचेस्टर आणि ऑक्सफोर्ड येथें झालें. तीस वर्षेंपर्यंत हा लंडन स्कूल ऑफ एकॉनॉमिक्स या संस्थेंत राज्यशास्त्राचा प्राध्यापक होता. यानें त्या शास्त्रावर अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. अमेरिका आणि कानडा या देशांतील कांहीं विद्यापीठांतून त्याचीं व्याख्यानें झालीं आहेत. तो ज्यू राष्ट्राचा पक्का पुरस्कर्ता असून पॅलेस्टाइनमध्यें त्या राष्ट्राची स्थापना होण्यासाठीं त्याला तळमळ लागून राहिली होती. १९४६ सालीं रशियाला जें सोशॅलिस्टांचें स्नेहसंवर्धक शिष्टमंडळ गेलें होतें त्याचा लास्की हा पुढारी होता. सोशॅलिस्ट पक्षाला राजकारणात महत्त्वाचें स्थान मिळण्यांत लास्कीचा मोठा उपयोग झाला.

**लाहोर**—पाकिस्तान, पश्चिम पंजाब, एक जिल्हा. क्षे. फ. २,८२४ चौ. मै.. जिल्ह्यांत रावी आणि सतलज या नद्यांमधील



प्रदेश येतो. पाऊस सरासरी २२ इंच पडतो. जिल्ह्यात ६ शहरें व ११९४ खेडीं आहेत. शेती पाटाच्या पाण्यावर अवलंबून आहे. व्यापार लाहोर शहरांत फार मोठा चालतो. लाहोर शहर ही पंजाब प्रांताची राजधानी व हिंदुस्थानच्या वायव्य भागांतील सर्वांत मोठें शहर असल्यानें त्याला अतिशय महत्त्व प्राप्त झालें आहे. हें पेशावर, कराची, मुंबई, कलकत्ता, इ. प्रमुख शहरांना आगगाडीनें जोडलें गेलें आहे. ह्युएनत्संगच्या वेळीं येथें ब्राह्मणवस्ती होती व दहाव्या शतकात देखील लाहोरचे राजे ब्राह्मण होते. १०३१ सालीं लाहोर जें एकदां मुसलमानांच्या ताब्यांत गेलें तें कायमचेंच. अकबरच्या अमदानींत लाहोर भरभराटलेलें होतें. मोंगल बादशहांनीं येथें बऱ्याच सुंदर इमारती बांधल्या. नूरजहान आणि जहागीर यांच्या कबरी येथेंच आहेत. सुंदर शालमार बाग शहाजहाननें बांधविली. औरंगजेबाच्या कारकीर्दीपासून लाहोरचें वैभव नष्ट झालें तें पुन्हां रणजितसिंगाच्या अमदानींत परत आलें. ब्रिटिश राज्यांत नव्या सरकारी इमारती उठल्या. आज अनेक गिरण्या, कारखाने, विद्यालयें, छापखाने लाहोरला चालले आहेत. विश्वविद्यालय व त्याला जोडलेलीं कॉलेजें आहेत. हें एक प्रमुख फौजी ठिकाण असे. मोठा लष्करी तळ येथें असतो. लो. सं. (१९४१) ६,३२,०००.

रणजितसिंगाची छत्री; जहांगीर, नूरजहान, असफखान, अनारकली यांच्या कबरी; बादशाही, सुन्हेरी व मोती या माशिदी; लॉरेन्स, मिंटो, गुलाबी व शालीमार या बागा, किल्ला, पदार्थसंग्रहालय, प्राणिसंग्रहालय, इ. वास्तू येथें पाहण्यासारख्या आहेत. देशाची फाळणी होण्यापूर्वी आर्यसमाजाचें हें केंद्रस्थान होतें. फाळणीमुळें हिंदु वस्ती अगदीं कमी होऊन त्यांचे उद्योगधंदे आणि कारखाने यांचें हस्तांतर झाल्यामुळें शहराला आतां बकालीपणा फार आला आहे. मुसलमान निर्वासितांमुळें आजच्या जुन्या दिल्लीप्रमाणेंच हें मूळचें मोठें सुंदर असेलेलें शहर गलिच्छ बनलें आहे.

**लिआँ**—फ्रान्समध्यें औद्योगिक क्षेत्रांत दुसरें व लोकसंख्येच्या दृष्टीनें तिसरें शहर. हें नद्यांच्या कांठीं वसलेलें आहे. देवस्थान व 'होतेल द व्हील' या मुख्य इमारती होत. येथील विद्यापीठ १८३४ सालीं स्थापन झालें. रेशमाच्या उत्पादनाच्या बाबतींत हें जगाचें केंद्रस्थान म्हणतां येईल. कागद, लोखंड, विमानें, यंत्रें, इ. चे कारखाने आहेत. सीझरच्या काळापासून या शहराला महत्त्व आहे. १३१२ मध्यें हें फ्रान्सच्या राजाकडे आलें. लो. सं. (१९३६) ५,७०,६२२.

**लिआंग ची चाव** (१८७३-१९२९)—एक चिनी ग्रंथकार. विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांत यानें चिनी

वाङ्मयक्षेत्रांत फार मोठा दर्जा प्राप्त करून घेतला होता. राष्ट्रीयता, स्वातंत्र्य, सामाजिक नीति, देशाभिमान यांसारख्या विषयांवर आपल्या जोरदार लेखणीनें आणि विद्वत्तेनें त्यानें अप्रतिम लेखन केलें. याच्या ठिकाणीं आशावाद आणि खिलाडू वृत्ति असल्यामुळें व तसेंच लेखनाच्यामागें गाढ विद्वत्ता आणि खोल विचार असल्यामुळें त्यानें चिनी लोकांना नवी दृष्टि प्राप्त करून दिली. त्यानें मासिकें चालविलीं व अनेक पत्रकें प्रसिद्ध करून लोकजाग्रति केली. चिनी इतिहासाच्या अभ्यासाची दिशा, चिनी राजकीय विचाराचा इतिहास, यांवर त्याचे ग्रंथ आहेत.

**लिंकन**—इंग्लंड, लिंकनशायरमधील एक शहर. हें लंडनपासून १३० मैलांवर आहे. येथील प्रसिद्ध ठिकाण म्हणजे टेंकडीवरील गॉथिक शिल्पपद्धतीचें देवालय होय. जगांतील उत्कृष्ट व भव्य देवालयांपैकीं हें एक आहे. जुना व नवा राजवाडा व एक धार्मिक महाविद्यालय याला जोडून आहे. रोमन शहर व नॉर्मन किल्ला यांचे प्राचीन अवशेष येथें आढळतात. येथील उद्योगधंद्यांत यंत्रें व पिठाच्या चक्क्या प्रामुख्यानें पडतात. इमारती लाकडाचा व्यापारहि मोठा आहे. लो. सं. ६६,०००

**लिंकन, आब्राहाम** ( १८०९–१८६५ )—अमेरिकन संयुक्त संस्थानांचा १६ वा अध्यक्ष. प्रथम इलिनॉइज् कायदेमंडळांत निवडून येत असे व पुढें १८४६ त कॉंग्रेसमध्यें निवडून आला व तेव्हांपासून गुलामगिरीच्या विरुद्ध असणाऱ्या पक्षास मिळाला. १८६० सालीं तो कॉंग्रेसचा अध्यक्ष झाला व त्याच वेळीं दक्षिण आणि उत्तर संस्थानामध्यें युद्ध जुंपलें. हें युद्ध चालू ठेवण्याच्या प्रश्नाला महत्त्व येऊन पुन्हां निवडणुकी झाल्या व त्यांत लिंकनच अध्यक्ष निवडून आला ( १८६४ ). यानंतर लवकरच उत्तर संस्थानांचा युद्धांत जय झाला होता. पण त्या सुमारास लिंकनचा एकानें नाटकगृहांत एकाएकीं खून केला. अमेरिकेच्या इतिहासांत लिंकन हा फार थोर पुरुष असून गुलामांचा कैवारी म्हणून त्याचे गुण घेण्यांत येतात.

**लिंग पुराण**—अठरा पुराणांतील एक. या शैव पुराणाची श्लोकसंख्या अकरा हजार आहे. विष्णुदेवतेहून शिवदेवता श्रेष्ठ आहे, शिवलिंगाचा आदि किंवा अंत विष्णूस किंवा ब्रह्मदेवास हि लावतां आला नाहीं, यासाठीं शिवाचा महिमा थोर आहे, तोच महेश्वर आहे, वगैरे वर्णन या पुराणांत आहे. इतर पुराणांतल्याप्रमाणेंच लिंग पुराणांत वैवस्वत मन्वंतरापासून श्रीकृष्णाच्या कालापर्यंत होऊन गेलेल्या अनेक राजवंशांची माहिती दिली आहे.

**लिंगहीन प्राणी**—प्राणिशास्त्रामध्यें ही संज्ञा मुंग्या, मधमाशा, गाधीलमाशा, वगैरे प्राण्यांतील ज्या कांहीं किड्यांस मुळींच लिंगोद्भव झालेला नसतो किंवा अतिशय प्राथमिक स्वरूपांत तो असतो अशा कीटकांस लावण्यांत येते. प्रत्येक मुंग्यांच्या थव्यामध्यें नर व माद्या मुंग्या असून नपुंसक अथवा 'कामकरी' मुंग्याहि असतात.

**लिंगाणा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा. महाडच्या आग्नेयीस १५ मैलांवर एका सह्याद्रीच्या फांट्यावर तोरणा व रायगड याच्या दरम्यान हा किल्ला बांधलेला आहे. उंची २९६९ फूट आहे व चढाव ४ मैलांचा आहे. खडक फोडून पायऱ्या केलेल्या होत्या त्या आतां फोडून टाकलेल्या आहेत. येथें मराठ्यांच्या कारकीर्दींत कैद्यांस अंधारकोठडींत ठेवीत. हा शिवाजीनें १६४८ त बांधला.

**लिंगायत**—वीरशैव. बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बसवानें या पंथाची स्थापना केली. बसवाला नंदिकेश्वराचा अवतार मानून लिंगायत नंदीची पूजा करतात. दक्षिणेंत नंदीच्या मोठ्या मूर्ती व देवळें अनेक आहेत. ( बसव, चन्न बसव पाहा. ) यांची एकूण लोकसंख्या ( १९२१ ) २७,३८,२१४ असून यांचा मुख्य भरणा विजापूर, धारवाड, बेळगांव हे जिल्हे, मद्रास इलाखा, हैद्राबाद व म्हैसूर संस्थानें, व वऱ्हाड–मध्यप्रांत इकडे आहे. यांचीं लिंगायत, लिंगावंत, लिंगांगी, शिवभक्त व वीरशैव अशींहि नांवें आहेत. सर्व लिंगायत स्त्रीपुरुषांच्या गळ्यांत चांदीच्या शाळुंकेंत एक महादेवाचें लिंग असतें. लिंगायत हे मूळचे द्राविड असून, आर्य लोक हिंदुस्थानांत येण्याच्या पूर्वींपासूनचे ते येथले स्थायिक लोक होते, असें एन्थोवेनसारखे कांहीं ज्ञातिसंशोधक म्हणतात. दाक्षिणात्यांप्रमाणे हे रंगानें काळे असून द्राविडी भाषेची शाखा जी कानडी ती हे बोलतात. शैवशास्त्र संपूर्ण वेदसंमत आहे. चारहि वेद हे शिवाच्या निःश्वासाच्या रूपानें आपोआप अवतरलेले असून अकृत्रिम आहेत. दीक्षा, संस्कार, शिवलिंगार्चनें, वगैरे नित्यनैमित्तिक वैदिक व तांत्रिक कर्में करण्यास स्त्रियांनाहि अधिकार आहे, असें लिंगायत मानतात. तसेंच जन्मापासून ८ ते १६ वर्षांपर्यंत लिंगायतांना शिवदीक्षा संस्कार होतो. वीरशैवांत सामान्य, विशेष व निराभारी असे तीन भेद आहेत. यांच्यांत ब्राह्मणादि चार वर्ण व ब्रह्मचर्यादि आश्रम आहेत. भक्त व माहेश्वर असे दोन ठळक वर्ग आहेत. भक्तभेदांत निरनिराळ्या आचारांमुळें पंचम, दीक्षित,

शीलवंत, धूळपावड, इ. उपभेद होऊन या भेदांतील कर्मठ लोक पूर्वभेदांतील लोकांशीं अन्नोदकादि व्यवहार करीत नाहींत. मात्र स्वतःप्रमाणें ते आचारसंपन्न असल्यास मग हा व्यवहार होतो. भक्त म्हणजे शिष्यवर्ग. गुरुवर्गाचें नांव माहेश्वर होय. माहेश्वर हे भक्ताच्या येथील हव्यकव्यादि कर्में करतात.

शिवच मोक्षदाता व उपास्य दैवत, त्याच्याखेरीज दुसऱ्या कोणत्याहि देवाची पूजा करण्याची इच्छा स्वप्नातहि करूं नये, ज्या घरांत शिवाखेरीज इतर देव असतील तेथें राहूं नये, शिवलिंग वस्त्रांत, बेलफळांत, चांदीच्या लिंगाकार पेटींत ठेवून जानव्याप्रमाणें तें सदोदित धारण करणें, अहिंसेला प्राधान्य देणें, इत्यादि गोष्टी या धर्मांत प्रमुख मानल्या जातात. प्रणव व ब्रह्म शब्द हे सदा शिवैकबोधक आहेत. यांचीं गोत्रें पुरुपनंद्यादि प्रथम होत. ऋषिगोत्रें नाहींत. दीक्षेचे एकंदर २१ प्रकार असून त्यांत ३ मुख्य आहेत. गुरूपदेश घेऊन व्रताची प्रतिज्ञा करणें ती वेददीक्षा; गुरूपदेशानें मिळणारी मंत्रदीक्षा; व विरक्ताश्रमी अज्ञानांना देण्यांत येणारी ती क्रियादीक्षा होय. ब्राह्मविवाह मुख्य मानून तो आपल्या जातीच्या पुरोहिताकडून करवितात. पंचकलश स्थापून त्यांत पंचाचार्यांचें आवाहन करून त्यांच्या साक्षीनें लग्न लागतें. पुनर्विवाहाची रूढि कोठें कोठें आहे. यांच्यांतील और्ध्वदेहिक कर्म मात्र फार निराळें आहे. मठ व मठपति यांच्या पंचाचार्य जगद्गुरूंच्या हाताखालीं मठ, मठपति, स्थावर, गणाचार्य व देशिक असे पांच उपाचार्य असून त्यांचे मठ ठिकठिकाणीं आहेत. यांना गांवांतील (लिंगायत) श्रेष्ठी, महाजन यांची मदत असते. बहुतेक लिंगायत लोक व्यापारी आहेत. यांना ब्राह्मणेतर वर्गांत स्वतंत्र राजकीय स्थान आहे.

**'लिंच' न्याय**—(लिंच लॉ). या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या अपकृत्याबद्दल किंवा गुन्ह्याबद्दल न्यायकोर्टांत दाद न मागता कोणाहि इसमानें स्वतःच्या अधिकारांत दंडेलीनें न्यायनिवाडा करणें. हा खाजगी न्यायदानाचा प्रकार प्रथम युनायटेड स्टेट्समधील व्हर्जिनिया नांवाच्या संस्थानांतला एक जे. पी. चार्लस लिंच (१७३६–१७९६) यानें सुरू केला आणि अशा न्यायदानाचें म्हणजे शिक्षा करण्याचे अनेक मार्ग व उपाय त्यानें स्वतः सुचविले व अमलांत आणले. म्हणून अशा या दंडेलीच्या न्यायदानपद्धतीला 'लिंच लॉ' हें नांव रूढ झालेलें आहे. या न्यायदानाचें एक उदाहरण म्हणजे अमेरिकेंतील एखाद्या नीग्रोनें एखाद्या युरोपियन बाईचा अगदीं सामान्य प्रकारचा जरी गुन्हा केला, तरी त्याबद्दल कायदेकोर्टांत खटला न चालवितां त्या नीग्रोला पकडून जिवंत जाळण्याचा उपक्रम या न्यायदानपद्धतींत करण्यांत आला व हा प्रकार बरींच वर्षें चालू होता. आतां तो कायद्यानें बंद झाला आहे. तथापि मधून मधून अशा गोष्टी घडतात. ज्या वेळीं जातीयता किंवा वर्णद्वेष फार बोकाळलेला असून सरकार दुबळें असतें त्या वेळीं सरकारी कायदा बाजूला ठेवून पिसाट लोक आपणच आरोपीला वाटेल ती क्रूर शिक्षा देतात.

**लिंची**—एक फळझाड. हें मूळ चीन देशांतील असून १८ व्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत आलें. फळ प्रथम तांबूस व नंतर भुरक्या रंगाचें असतें. सालीवर बारीक कांटे असतात. फळांत आंबटगोड गर असतो व पोटांत बी असतें.

**लिच्छवी**—एक लोकराष्ट्र. लिच्छवी हें नांव निछिबिया-(प्राचीन इराणचा निसिबस भाग)पासून झालें असावें. हे लोक वैशालींत मोठ्या जमावानें राहत, असें बौद्ध ग्रंथांवरून दिसतें. लिच्छवी राजे नेपाळवर खि. पू. १७१२ ते इ. स. ६४० पर्यंत राज्य करीत होते. हे लोक दरायसच्या सैन्याबरोबर इराणांतून हिंदुस्थानांत आले असें संशोधक सांगतात. चंद्रगुप्ताची एक राणी लिच्छवी राजकन्या होती. लिच्छवी हे सूर्यवंशी ठाकूर रजपूत होते असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

**लिटन, एडवर्ड जॉर्ज** (१८०३–१८७३)—एक इंग्रज कादंबरीकार, नाटककार व मुत्सद्दी. हा कवि होता. तथापि याला प्रथम प्रसिद्धि त्याच्या 'पेलहॅम', 'डिस्ओन्ड', इ. कादंबऱ्यांमुळें मिळाली. 'लेडी ऑफ लिऑन्स', 'रिशेल्यू' व 'मनी' या नाटकांनींहि त्याला कीर्ति लाभली. १८५८ त त्याला वसाहतींचा चिटणीस नेमण्यांत आलें व १८६६ त तो वरिष्ठ सभागृहांत बॅरन लिटन म्हणून दाखल झाला. 'दि कमिंग रेस' हा त्याचा ग्रंथ निनांवी प्रसिद्ध झाला. त्याच्या ग्रंथांवरून १९ व्या शतकांतील ज्ञानविषयक चळवळी कळतात. त्याच्या कादंबऱ्या फार भावनाप्रधान असून कंटाळवाण्या वाटतात.

**लिटन, लॉर्ड एडवर्ड रॉबर्ट** (१८३१–१८९१)—एक इंग्रज कवि, मुत्सद्दी व हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल. हा पहिल्या बॅरन लिटनचा मुलगा असून इंग्रजी वाङ्मयाचा याचा अभ्यास फार चांगला असे. याला निरनिराळ्या वकिलातींत चिटणीस म्हणून नेमण्यांत आलें होतें. १८७५ सालीं हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल झाला. याच्या अमदानींत अफगाणिस्तानशीं युद्ध सुरू झालें व त्यांत इंग्रजांना फार नुकसानी पोंचली. तेव्हां लिटन राजीनामा देऊन इंग्लंडला निघून गेला. याच्या कारकीर्दींत १८७७ त मोठा दिल्ली दरबार व्हिक्टोरिया राणीनें 'हिंदुस्थानची बादशाहीण' हा किताब धारण करण्याबद्दल भरला. पुढील सालीं हिंदुस्थानांत मोठा दुष्काळ पडला.

**लिटमस**—दगडावरील शेवाळ्यांत सांपडणारें एक जांभळ्या रंगाचें द्रव्य. क्षार आणि अम्ल यांचा दर्शक (इंडिकेटर) म्हणून त्याचा उपयोग करतात.

**लिंडबर्ग, चॉर्लस ऑगस्टस** (१९०२- )—या अमेरिकन वैमानिकाचा जन्म मिचिगानमध्यें डेट्राइट येथें झाला. यानें विस्कॉन्सिन विद्यापीठांत दोन वर्षें अभ्यास केल्यानंतर तो विमानोड्डाणाच्या मार्गे लागला. १९२५-२६ या सालांत त्यानें शिकागोपासून सेंट लुई येथें टपाल नेण्याचें काम केलें. १९२७ मध्यें त्यानें स्वतः योजना केलेल्या विमानांत बसून न्यू यॉर्कपासून पॅरिसपर्यंत एकट्यानें ३३॥ तासांत उड्डाण केलें. या गोष्टीमुळें त्याचा फ्रान्स, बेल्जम व इंग्लंड या देशांत सत्कार झाला. त्याला अनेक बक्षीसेंहि मिळालीं. यानंतर त्याने दक्षिण अमेरिकेंत कांहीं देशांस विमानानें भेट दिली. १९२८ व १९२९ मध्यें त्याची वैमानिक व्यापारखात्यांत नेमणूक झाली. त्याच वर्षी त्यानें मेक्सिको देशांतील अमेरिकेच्या वकिलाच्या मुलीबरोबर (ॲन मॉरो) लग्न केलें. नंतर या दोघांनीं मिळून जगांतील अनेक देशात प्रवास केला. १९३० मध्यें त्यांस झालेला चॉर्लस ऑगस्टस लिंडबर्ग हा मुलगा चोरांनीं पळवून नेऊन त्याचा खून केला (१९३२). लिंडबर्गनें मय संस्कृतीच्या प्रदेशांत बरेंच पुराणवस्तुसंशोधन केलें. दुसऱ्या महायुद्धामध्यें मित्रसंघास मदत करण्याच्या तो विरुद्ध होता. परंतु युद्ध सुरू झाल्यावर त्यानें फोर्ड कंपनीच्या कारखान्यांत संशोधनाचें कार्य केलें.

**लिंडसे, सर डेव्हिड** (१४९०-१५५५)—एक स्कॉटिश कवि. त्यानें 'ड्रीम' हें रूपकात्मक काव्य; 'कंप्लेंट', 'सटायर ऑफ दि थ्री ईस्टेटिस' नाटक; 'ॲन्सर टु दि किंग्ज फ्लायटिंग', 'हिस्टरी अँड टेस्टेमेंट ऑफ स्क्वायर मेल-ड्रम', आणि 'दि मॉनर्की' हीं पुस्तकें लिहिलीं. लिंडसे हा स्कॉटलंडमध्यें दोन शतकें अतिशय लोकप्रिय कवि होता. त्यानें खिस्ती धर्मांतील 'क्लर्जी' (भटजी) वर्गावर उपरोधिक भाषेंत हल्ले चढविले, आणि त्यामुळें पुढील धर्मसुधारणेचा पाया घातला गेला.

**लिडिया**—आशिया मायनरमधील एक प्राचीन बलाढ्य राष्ट्र. याची राजधानी सार्डिस होती. खि. पू. ७०० नंतर हें राष्ट्र उदयास आलें असावें. क्रोएससच्या कारकीर्दींत आशिया मायनरचा बहुतेक भाग त्याच्या वर्चस्वाखालीं होता; पण खि. पू. ५४६ त इराणी लोकांनीं त्याचा पराभव करून त्यास मांडलिक बनविलें. खि. पू. १३३ मध्यें रोमन साम्राज्यात लिडियाचा अंतर्भाव होत असे. धातूचीं नाणीं प्रथम लिडियांत सुरू झालीं असावींत.

**लित्र, मॅक्सिमिलन पोल एमिल** (१८०१-१८८१)—एक फ्रेंच भाषाशास्त्रज्ञ. त्यानें १८६२ सालीं आपलें 'फ्रेंच भाषेचा इतिहास' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याचा मुख्य ग्रंथ जो फ्रेंच भाषेचा शब्दकोश तो त्यानें १८७७ सालीं पुरा केला व त्याची विक्री ताबडतोब झाली. त्याचे आणखी ग्रंथ वाङ्मय आणि इतिहास, औषधें आणि रोग यांवर आहेत.

**लिथिअम**—परमाणुभारांक ६.९४ व विशिष्टगुरुत्व ०.६. हा अल्क-क्षार धातूंतील एक धातु असून द्रवरूप आणि घनरूप पदार्थांतील सर्वांत हलका पदार्थ आहे. हा लिथिआपासून काढतात. याचा शोध एका स्वीडिश शास्त्रज्ञानें लावला.

**लिथुआनिया**— लाटव्हिया, पोलंड व जर्मनी या त्रिवर्गाच्या सरहद्दींवर असलेलें बाल्टिक समुद्राच्या कांठचें एक संस्थान. क्षेत्रफळ २२,९५९ चौरस मैल. याशिवाय सुमारें ८,५११ चौरस मैलांच्या क्षेत्राबद्दल वाद चालू आहे. लोकसंख्या सु. २९,००,०००. व्हिल्ना हें राजधानीचें शहर आहे. हा कृषिप्रधान देश सपाट व सुपीक आहे. ओट, गहूं, राय, बटाटे, वगैरे पिकें निघतात. जनावरें, मेंढ्या व डुकरे पाळतात. मोठमोठीं जंगलें आहेत. दुग्धपदार्थ, धान्य, जनावरें, लांकूड, कातडीं यांची निर्यात होते. एक विद्यापीठ, कला-विद्यालयें व अनेक सार्वजनिक पदार्थ-संग्रहालयें आहेत. आगगाडीचा फांटा सु. १,१०० मैलाचा आहे.

इ. स. १३०० नंतरच्या थोड्याच काळांत लिथुआनियाचा भाग एक डची (ड्यूकचे अमलाखालील प्रदेश) होता. १५ व्या शतकांत तर हें फारच मोठें असें राज्य होतें. बाल्टिक समुद्रापासून काळ्या समुद्रापर्यंत त्याचा विस्तार झाला होता. १५६९ मध्यें पोलंडशीं जोडलें गेलें. पण पुष्कळसें स्वतंत्रच होतें. १८ व्या शतकाच्या अखेरीस पोलंडप्रमाणेंच याचीहि वांटणी झाली व तें रशिया-प्रशियांत विभागलें गेलें. १९१८ मध्यें रशियनांकडील लिथुआनिया स्वतंत्र झाला. १९२० मध्यें रशियानें व १९२२ मध्यें युरोपांतील इतर राष्ट्रांनीं स्वतंत्र लिथुआनियास मान्यता दिली. १९४० सालीं सोव्हिएट लोकराज्यसंघानें हें संस्थान आपल्याकडे घेतलें.

**लिनेट**—हा गाणारा पक्षी मूळ ब्रिटनमधील असून फिंच पक्षिवर्गातला आहे. हा साधारण साडेपांच-सहा इंचांपर्यंत लांब असून याची चोंच मात्र फार टणक असते. याचा रंग करडा, पिंगट किंवा गुलाबी असा त्या वेळचा जो हंगाम किंवा लिंगभेद

असेल त्याप्रमाणें बदलत असतो. याचें गाणें किंवा आवाज गोड असतो. म्हणून हा पाळतात. स्कॉटलंडमध्यें याची एक डोंगरी जात असते.

**लिनोलियम**—हें एक प्रकारचें जमिनीवर आंथरण्याचें टिकाऊ व फार उपयुक्त कापड असतें. याचा मुख्य आधार तागाचें कापड असतें. या कापडावर बुचाचें पीठ व अळशीच्या तेलाचें प्राणिद व राळेसारखे पदार्थ यांच्या मिश्रणाची पुटें चढविण्यांत येतात. या कापडावर वरून तऱ्हेतऱ्हेच्या रंगीत नक्षीच्या आकृती काढण्यांत येतात. परंतु त्या लवकरच झिजून जातात. परंतु हें कापड बनवितांनाच जर त्यांत निरनिराळ्या रंगीत आकृति भरल्या तर त्या कापड फाटेपर्यंत जात नाहींत. मेणकापड हें बरेंच पातळ असून तें सुती कापडावर बनविलेलें असतें.

अळशीचें तेल व गंधहरिद (क्लोराइड ऑफ सल्फर) या लिनोलियम मिश्रणाचें व्हार्निश कापडाला लावतात; म्हणजे तें कापड (टेबलावरील रुमाल, हातऱ्या, वगैरे) जलाभेद्य होतें. लांकूड व लोखंड यांना याचें रोगण देतात. सिमेंट म्हणूनहि हें उपयोगी पडतें.

**लिपि**—मनुष्यानें आपले विचार व्यक्त करण्यासाठीं ज्या-प्रमाणें प्रथम भाषा तयार केली त्याप्रमाणेंच त्यानंतर लिपि तयार केली. प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यानें प्रथम चित्रलेखन करण्यास सुरुवात केली. अत्यंत प्राचीन गुहानिवासी माण-सांनीं कोरलेलीं चित्रें आढळतात. या चित्रांपासून चित्रलिपि निघाली. प्रथम चित्रांवरून पूर्ण शब्दाचा बोध होत असे. त्यां-पासून पुढें आद्य वर्णाचा बोध होऊं लागला व चित्राचा आकार लहान लहान व सुलभ होऊन वर्ण बनले. ईजिप्तमध्यें चित्रलिपि दीर्घ काल अस्तित्वांत होती. तिचाच विकास पुढें वर्णलिपींत झाला. चीनमध्यें कल्पनादर्शक चित्रलिपि प्रथम असून तीवरून सध्यांची लिपि बनली आहे. ईजिप्तमधून फिनिशिया, ग्रीस, वगैरे देशांत लिपीचा प्रसार झाला. सध्यां जगांत सेमेटिक व भारतीय अशा दोन प्रकारच्या लिपी प्रचा-रांत आहेत. भारतीय लिपीची पूर्वज ब्राह्मी ही खि. पू. ५ व्या शतकांत उत्पन्न झाली असावी. तीपासून गुप्त, कुटिल, प्राचीन नागरी, तिबेटी, शारदा, बंगाली, गुजराती व अर्वाचीन नागरी (हिंदी व मराठी) या लिपी तयार झाल्या. नागरीपासूनच कानडी, तेलगू, तामिळ व मल्याळम् या लिपी बनल्या; पण लेखनपद्धतीच्या भिन्नत्वामुळें त्यांचें वळण अगदीं भिन्न दिसूं लागलें.

सेमेटिक लिपींतील प्राचीन ईजिप्तमधील चित्रलिपीपासून पुढें हीब्रू, मंगोलियन, काल्मुक, खाल्डी, अरबी, तुर्की, फारसी, वगैरे लिपी उत्पन्न झाल्या.

फिनिशियन लिपीपासूनच एट्रुस्कन व पुढें लॅटिन, इंग्लिश, जर्मन, वगैरे लिपी उत्पन्न झाल्या. सध्यां रोमन लिपि म्हणजेच इंग्लिश लिपि फार मोठ्या जगाच्या भागावर प्रचलित आहे व हिंदुस्थानांत ब्राह्मीपासून उत्पन्न झालेल्या नागरी (हिंदी, मराठी), गुजराती, बंगाली, पंजाबी, तसेंच कानडी, तेलगू, मल्याळम्, तामिळ या द्राविड लिपी चालत असून अरबी–फारसी-पासून बनलेली ऊर्दूहि कांहीं भागांत प्रचलित आहे.

**इतिहास**—वर्णमालायुक्त लेखनपद्धति तयार होण्यापूर्वी मानवी प्राण्यांची चित्रांच्या साहाय्यानें विचार व्यक्त करण्याची प्राथमिक अवस्था व पुढील विकासाच्या पायऱ्या यांसंबंधीं इतिहास कल्पनाशक्तीच्या जोरावरच तयार केला पाहिजे. लेखन-कलेच्या विकासांतील मुख्य अवस्था म्हणजे (१) चित्रलिपि, (२) कल्पनादर्शक लिपि, व (३) ध्वनिसूचक लिपि. मिसर देशीय चित्रलिपि ही लेखनकलेच्या निरनिराळ्या अवस्थांतील चिन्हांचें कडबोळें असून बाबिलोनी कीलाकृति लिपीच्या विकासामध्यें वरील तीन अवस्था मानल्याच पाहिजेत. परंतु उपलब्ध जुन्या बाबिलोनी लेखांवरील लिपि ध्वनिचिन्हयुक्त म्हणजे विकासाची दुसरी अवस्था दर्शविते. ध्वनीच्या पृथक्करणाची कल्पना फार उशीरां निघाली. स्वर आणि व्यंजनें यांचें पृथक्करण म्हणजे ध्वनिचिन्हयुक्त लिपीचें मरणच होय. फिनीशियन भाषेच्या व्यापकतेमुळें फिनीशिअन लिपि हीच आजच्या सुधारलेल्या राष्ट्रांतील वर्णमालायुक्त लिपीची जननी होय, अशी हेन्री स्मिथ विल्यम्स, इत्यादि युरोपीय पंडितांची सामान्य समजूत आहे.

भारतीय कलेच्या इतिहासास उपयुक्त अशीं साधनें म्हणजे शिलालेख, भरतखंडांत येऊन गेलेल्या ग्रीक लेखकांचीं वर्णनें, वैदिक व बौद्ध ग्रंथांतील वचनें व संस्कृत वाङ्मय हीं होत. भूर्जपत्र, ताडपत्र किंवा कागद यांवर लिहिलेले लेख हजारों वर्षे टिकणें शक्य नसल्यामुळें लेखनकलेची प्राचीनता ठरविण्यास ते निरुपयोगी आहेत. अशोककालीन पाषाणांवर व स्तंभा-वर कोरलेल्या लेखांवरून खिस्तपूर्व पांचव्या शतकांत

भरतखंडांतील लोक लेखनकलेस अनभिज्ञ नव्हते असें दिसतें. अलेक्झांडरचा सेनापति निआर्कस याच्या हकिगतीवरून तसेंच बौद्धांचे विनय, अभिधम्म, इत्यादि सूत्रग्रंथ किंवा जातककथा यांतील पुराव्यांवरून अशोकपूर्वकाळींहि लेखनकलेचें अस्तित्व व्यक्त होतें. पाणिनीच्या अष्टाध्यायींतील लिपि, लिबि, लिपिकर, यवनानी, इत्यादि शब्द आणि अनेक प्राचीन ग्रंथकारांचे उल्लेख यांवरून लेखनकलेची उत्पत्ति पाणिनीपूर्वकालींहि नेतां येते. कोणत्याहि संस्कृतिविकासांत वर्णपृथक्करणाची क्रिया होण्यापूर्वी लेखनकलेचें अस्तित्व मानणें जरूर आहे. श्रुतिग्रंथांतील व्याकरणविषयक उल्लेख पाहतां त्या वेळीं व्याकरणशास्त्राचा अभ्यास होत असावा असें दिसतें व म्हणून त्या काळीं लेखनकला अस्तित्वांत नव्हती हें म्हणणें असंभवनीय आहे. वेदकालीन छंदःशास्त्रावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते. वेदग्रंथांत दिसून येणारें गणितज्ञान लेखनकलेच्या अभावीं प्राप्त करून घेणें शक्य नाहीं. लेखनकलेचें ज्ञान नसतां यजुर्वेदासारखा कोणताहि गद्यात्मक ग्रंथ तयार होणेंच असंभवनीय आहे. वेदादि ग्रंथ मुखोद्गत करण्याच्या रूढींचीं कारणें म्हणजे शुद्ध स्वरोच्चाराची आवश्यकता, यज्ञीय प्रसंगीं त्या त्या विषयांचें मंत्रपठण करण्याची आवश्यकता व थोडासा गतानुगतिकपणा हीं होत.

प्रागैतिहासिक कालीं ब्राह्मी लिपीचें अस्तित्व सिद्ध करणारे लेख आहेत. अवेस्ता भाषेचा वर्णानुक्रम किंचित् वर्णविपर्यय केला असतां ब्राह्मी वर्णानुक्रमाप्रमाणेंच आहे. या गोष्टीवरून ब्राह्मी लिपीचा संबंध पर्शुभारतीय काळापर्यंत पोहोंचतो. भरतखंडांत ब्राह्मी व खरोष्ठी या दोन लिपी अस्तित्वात असल्याबद्दल अशोककालीन शिलालेख व नाणीं आणि चिनी व बौद्ध ग्रंथ यांतील उल्लेख आहेत. ब्राह्मी लिपि ही हायरेटिक, फिनीशियन, इत्यादि परकीय लिपींपैकीं कोणत्या तरी एका लिपीपासून निघाली असल्याचें सिद्ध करण्याबद्दल पाश्चात्य पंडितांनीं सहेतुक धडपड केली. वैज्ञानिक क्रमाच्या दृष्टीनें ब्राह्मी लिपीसंबंधानें विचार करतां ती अव्यवस्थित अशा फिनीशियन लिपीपासून उत्पन्न झाली ही कल्पनाच अग्राह्य ठरते. खिस्तपूर्व पांचव्या शतकापूर्वीचा ब्राह्मी लिपीचा इतिहास अज्ञात आहे. खरोष्ठी लिपींतील अशोककालीन ग्रीक राजांचे, शक राजांचे, क्षत्रपांचे व पार्थियन राजांचे तसेंच कुशान राजे व एतद्देशीय औदुंबरादि राजे यांचे लेख या सर्वांचें निरीक्षण करतां, खरोष्ठी ही हिंदुस्थानांतील सार्वत्रिक लिपि नसून तिचा प्रचार फक्त वायव्येकडील कांहीं भागांतच होता हें निर्विवाद सिद्ध होतें. खरोष्ठीचें अरेमाइक लिपीशीं सादृश्य आहे. 'अरेमाइक' लिपि हाखामणी वंशातील इराणच्या बादशहांनीं हिंदुस्थानांत आणली. या दोन गोष्टींचा साकल्यानें विचार केला तर खरोष्ठीची उत्पत्ति अरेमाइकपासून झाली असावी असें अनुमान निघतें. ब्राह्मीसारखी विकसित लिपि अस्तित्वांत असलेल्या हिंदुस्थानांत खरोष्ठीसारख्या दरिद्री लिपीचा प्रसार होणें शक्य नव्हतें. प्राचीन लिपिशास्त्र व प्राचीन अंकितलेखनशास्त्र असे प्राचीन लिपिशास्त्राचे दोन भेद होण्यास लेखनसाहित्याची प्रकारभिन्नताच कारणीभूत झाली.

प्राचीन लिपिशास्त्र—अत्यंत प्राचीन काळापासून लेखनकलेच्या बाबतींत कोणत्या प्रकारचें साहित्य उपयोगांत आणलें गेलें याचा इतिहास अत्यंत मनोरंजक आहे. प्राचीन लिपिशास्त्र व प्राचीन अंकितलेखनशास्त्र असे प्राचीन लिपिशास्त्राचे दोन निरनिराळे भेद लेखनसाहित्याच्या प्रकारभिन्नतेमुळेंच उत्पन्न झाले हें वर सांगितलेंच आहे. शिला, धातू किंवा असेच दुसरे टिकाऊ पदार्थ यांवर कोरलेल्या प्राचीन लेखांचा अभ्यास करण्याकरितां प्राचीन अंकितलेखनशास्त्र निर्माण झालें. प्राचीन लेखनशास्त्रांत वाङ्मयात्मक, धर्मविषयक, इत्यादि विविध स्वरूपाच्या लेखांचा समावेश होत असून त्या शास्त्रांतील लेखासाठीं उपयोगांत आणलेलें लेखनसाहित्य म्हटलें म्हणजे कापड किंवा लांकडाची फळी यांसारखे लेखनपट, व शंकु किंवा वेत अगर बोरू यांसारख्या पदार्थांपासून केलेल्या लेखण्या हें होय. लेखनकलेचा पूर्वीपासूनचा इतिहास लक्षांत घेता असें दिसतें कीं, भिन्न भिन्न प्रकारच्या लेखनसाहित्याचा प्राचीन लिपीवर एकंदरींत बराच परिणाम झाला असावा. बाबिलोन व मिसर देशांतील लोक प्रथमतः लेखनाकरितां मातीच्या विटांचा उपयोग करीत असत. त्याचा परिणाम असा झाला कीं, विटांसारख्या कणखर पदार्थांवर कोणत्या तरी बारीक अणकुचिदार हत्यारानें टोंचून लिहिण्याची पद्धति अमलांत येऊन कीलाकृति अक्षरांची (क्युनिफॉर्म) लिपि तयार झाली.

त्याचप्रमाणें ग्रीक व रोमन लोकांनीं उपयोगांत आणलेल्या लेखनपटांचा पृष्ठभाग चिकट मेणाचा असल्यामुळें ह्या लोकांमध्यें तुटक व असंयुक्त अशी लेखनशैली उत्पन्न झाली. यांच्या मानानें थोड्या खरबरीत असलेल्या पापीरस नांवाच्या लेखनपटाच्या पृष्ठभागावर लिहिली जात असलेली लिपि किंचित् अधिक जोर देऊन लिहावी लागल्यामुळें तिचीं अक्षरें अतिशय किरटीं बनलीं.

लिपि भाषेस दृष्टिगोचर करते, श्रुतिगोचर करीत नाहीं. शिवाय लिपीच्या इतिहासांमध्यें लघुलेखन, मुद्रण, इत्यादि प्रयोजनांमुळें अनेक निरनिराळे प्रकार उत्पन्न होतात (लघुलेखन व मुद्रण पाहा). लघुलेखनाच्या प्रयोजनामुळें आणि छापण्याच्या

[पुढील मजकूर पान २२२३ वर पाहा.]

## हिंदुस्थानांतील लिपींचा परस्परसंबंध दाखविणारा वंशवृक्ष

(कंसांतील आंकडे ती लिपि ख्रिस्ती शकाच्या कोणत्या शतकांत प्रचलित होती हें दाखवितात).

१. चौथ्या शतकाच्या उत्तरार्धापासून उत्तरेकडील व दक्षिणेकडील ब्राह्मी लिपींनीं परस्पर भिन्न वळणें घेतलीं व त्यामुळें कालांतरानें उत्तरेकडील लिपि व दक्षिणेकडील लिपि यांच्यामध्यें फारच फरक पडला. २. ही शाखा क्षत्रप व आंध्रवंशी राजांच्या लेखांतील व त्यानंतरच्या नाशिक, कार्ले, इत्यादि ठिकाणच्या लेण्यांवरील लेखांतील ब्राह्मीपासून निघाली असली पाहिजे. ३. मराठी व नागरी या दोन लिपींत फारच थोडा भेद आहे. आपल्या मोडी लिपीचा विकास कोणी नागरीपासून तर कोणी प्रत्यक्ष मौर्यांपासून म्हणजे अशोककालीन ब्राह्मीपासून झाला असें म्हणतात. ४. हिचीं बरींच अक्षरें शारदा लिपीपासून सिद्ध झालेलीं आहेत. ५. अकराव्या शतकानंतरची नेपाळी लिपि प्राचीन बंगालीपासून निघाली.

मूल | प्राचीन | क्लासिक | मध्ययुगीन | अर्वाचीन

- सेमेटिक वंशोद्भव लिपी / मिसरदेशीय चित्रलिपि — हायरोटिक — सेमिटिक
  - फिनिशियन
    - कॅडमियन
      - इटॉलिक
        - एट्रुस्कन
        - अंब्रियन
        - लॅटिन — अन्शल लॅटिन —
          - इंग्लिश लिपि
          - जर्मन लिपि
          - रोमन टाइप
          - इटालियन टाइप
        - फालिस्कन
        - ओस्कन
        - मेसापियन
      - हेलेनिक
        - रुनिक
        - ग्रीक —
          - सिरिलिक —
            - सर्व्हियन
            - वालाशियन
            - राशियन
          - लंपेटीची ग्रीक, मिसोगॉथिक, कॉप्टिक
            - ग्लागोलिटिक
            - अल्बेनियन
            - रोमइक
            - ग्रीक मायन्यूस्क्यूल
      - लिशियन
      - कॅरियन
    - टायरियन
      - मोआबाइट
      - इस्त्राइलाइट — अस्मोनियम — जुनी सामारिटन — अर्वाचीन सामारिटन
    - सिडोनियन
      - प्युनिक
        - इबेरियन
        - न्युमिडियन
      - अरेमाइक
        - हेरोडियन — चौकोनी हिब्रू — रॅबिनिक
        - पाल्मीरीन
        - एक्ट्रांघेलो
          - मेल्चाइट, नेस्टोरियन, जॅकोबाइट, मेंडाइट
            - उइगर: मोंगोलियन, कालमुक, मांचू
            - सिरो-खाल्डी
            - कारशुनी
        - हौरेनिटिक, नाबाथियन
          - कूफी, नेस्खी —
            - अरबी
            - तुर्की
            - पार्शियन
            - हिंदुस्थानी
        - इराणी, बॅक्ट्रियन
          - पेहेलवी — पारसिक
          - मेस्त्रोबियन —
            - आर्मीनियन
            - जॉर्जियन
  - दक्षिण सेमेटिक
    - जोक्टानाइट
      - सेबियन — हिमिअरिटिक — इथिओपिक — अम्हरिक
      - थामुडाइट (साफा)
      - ओमानाइट (येमेन) — [ ब्राह्मी टेलरच्या मतें ]

[ पान २२२० वरून चालू. ]

हेतूमुळें इंग्रजींत लिहिण्याची लिपि आणि छापण्याची लिपि असें द्वैत झालें. मराठींत कांहीं अंशीं तेंच द्वैत मोडी व बालबोध यांमध्यें आहे. बालबोधीचें स्वरूप मुद्रणाच्या सोईसाठीं बदलण्याची खटपट पुष्कळ चालू आहे. बोलण्यामुळें हवेंत उत्पन्न होणाऱ्या लहरींचे लेख घेण्याची जी कृति निघाली आहे, तिजवरून जगांतील अस्तित्वांत असलेल्या सर्व लिपींस दूर टाकून स्वाभाविक सर्वजनमान्य लिपि उत्पन्न करावी अशीहि खटपट चालू आहे. एतद्विषयक काम जगदीशचंद्र बोस यांनींहि थोडेंसें केलें आहे.

**लिप्टन, सर थॉमस जॉनस्टन** (१८५०-१९३१)—जगांतील एक मोठा चहाचा व्यापारी. हा स्कॉटलंडमध्यें जन्मला, पण अमेरिकेंत त्यानें लहानपणीं मजूर व कारकून म्हणून कामें केलीं. नंतर ग्लासगोला घरीं परत येऊन लहान किराणा मालाचें दुकान उघडलें. त्याचा हा धंदा चांगला चालू लागल्यावर त्यानें हिंदुस्थान आणि सीलोन येथील चहा, कॉफी व रबर यांच्या लागवडींत लक्ष घातलें. त्याला नौकानयनाचीहि फार आवड असे व बोटींच्या शर्यतींत तो भाग घेत असे. यानें दानधर्मांत पुष्कळ पैसा खर्च केला आहे. लिप्टन चहाविषयीं जगभर याची प्रसिद्धि आहे.

**लिंबराज दैठणकर** (सन १६०० सुमार)—एक मराठी संतकवि. हा नगर जिल्ह्यांतील दैठण गांवचा. याचा गुरु एकनाथस्वामी होय. हा भजन करीत असतां याच्या खांद्यावर विठोबा नाचला अशी आख्यायिका सांगतात. पंढरीच्या काल्याचा मानहि याच्याच घराण्याकडे आहे.

**लिबिया**—हें नांव पूर्वी सबंध उत्तर आफ्रिकेला असून ग्रीक-रोमन इतिहासांत याचे नेहमीं उल्लेख येतात. यांत ईजिप्तचा समावेश नसे. दुसऱ्या महायुद्धापूर्वी ही इटलीची वसाहत होती. क्षे. फ. ६,७९,३५८ चौ. मै. व लो. सं. सुमारें ८,८८,४००. त्रिपोली आणि बेंगाझी हीं दोन मोठीं राजधानीचीं शहरें भूमध्यसमुद्रावर आहेत. खजूर, ऑलिव्ह, बदाम, अंजीर, लिंबें व द्राक्षें या प्रदेशांत होतात. तंबाखू, गालिचे, कातडी जिन्नस, नक्षीदार कापड, इ. माल बाहेर पाठविला जातो. स्पंजाचा मोठा व्यापार चालतो. मिठाच्या खाणी आहेत. दुसऱ्या महायुद्धांत १९४२ सालीं ब्रिटिशांनीं हा प्रदेश जिंकून घेतला.

**लिंबू**—[ सायट्रसमेडिका; पोटजाति लिमोनम ]. कागदी लिंबू सर्वांच्या परिचयाचें आहे. याचें उत्पादन फार मोठ्या प्रमाणावर युरोपमध्यें व विशेषतः सिसिली बेटांत होतें. हें नारिंगाच्याच जातीचें आहे. या झाडाची उंची सुमारें ८ फूट असते. लिंबाच्या रसाचा सरबत वगैरे करण्याच्या कामीं, तसेंच लोणच्यामध्यें वगैरे करण्यांत येतो, पण विशेष उपयोग रंगकामांत कपड्याचा रंग काढून टाकण्याच्या कामीं होतो व त्यामुळें चिटांच्या कारखान्यांत याचा खप फार असतो. लिंबू फार औषधी आहे. पित्तावर याचा चांगला उपयोग होतो.

**लिबो**—लाटव्हिया, एक महत्त्वाचें बंदर. हें बाल्टिक समुद्रावर असून समुद्रस्नानासाठीं प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं लोखंडाचें ओतकाम होतें व लांकूड कापण्याच्या गिरण्या व रासायनिक कारखाने आहेत. धान्यें, ताग, लांकूड, जवस, इ. माल निर्यात होतो. बंदरांत बारमहा जहाजें येतात-जातात. लो. सं. ७७,०००.

**लिमडी संस्थान**—मुंबई, काठेवाडांतील एक संस्थान. क्षे. फ. ३४४ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ४४,०२४. प्रदेश सपाट आहे. कापूस व धान्य पुष्कळ पिकतें. जाडेंभरडें कापड तयार होतें. संस्थानचें उत्पन्न सात लाख रुपये आहे. हरपालदेवाचा मुलगा मंगुजी यानें संस्थान स्थापलें. संस्थानिक झाला घराण्यापैकीं आहेत. मागचे ठाकूर दिग्विजयसिंहजी १९४१ सालीं वारले तेव्हां त्यांचा मुलगा एक वर्षाचा होता. या छत्रसाल ठाकुराच्या नांवानें एक कारभारी राज्य चालवितो. आतां हें संस्थान सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे. राजधानी लिमडी शहर भोगाव नदीच्या कांठीं आहे. शहराभोंवतीं तटबंदी आहे लो. सं. सुमारें १२,०००.

**लिमये, दत्तात्रेय बाळकृष्ण** (१८८७-- )—एक हिंदी रसायनशास्त्रज्ञ व संशोधक. स्वतःच्या पायावर आपलें शिक्षण करून बी. ए., बी. एस्सी. व एम्. ए. झाले. बी. ए. मध्यें असतांनाच यांनीं १९०८ सालीं बाळकृष्ण रसशाळेची स्थापना केली. १९११ सालीं हे एम्. ए. च्या परीक्षेंत पहिले आले. प्रथम १९१२ सालापासून हे पुण्याच्या रानडे इन्स्टिटयूटमध्यें असिस्टंट डायरेक्टर म्हणून काम पाहत असत. नंतर १९३० सालीं हे डायरेक्टर झाले. याच कालांत यांनीं रसायन-निधीची स्थापना केली. यांच्या मार्गदर्शनाचा उपयोग अनेक विद्यार्थ्यांना झाला. १९३२ सालीं यांनीं जर्मन केमिकल सोसायटीच्या मुखपत्रांत 'फ्युरोकुमारिन' संघटनासंबंधींचा पहिला संशोधनात्मक निबंध लिहून, संत्र्यांच्या एका जातीच्या फळांच्या सालींत असणाऱ्या 'बरगॅप्टेन'-सदृश पदार्थांची पहिली संघटनात्मक सिद्धि पुढें मांडली. यानंतर १९३४ सालीं याच मुखपत्रांतून प्रसिद्ध झालेला 'निघोनपद्धती'वरचा निबंध हा यांचा दुसरा संशोधनात्मक निबंध होय. असिटोन जातीचे म्हणजे केटोन वर्गाचे पदार्थ बनविण्याची यांनीं शोधून काढलेली पद्धति 'निघोनपद्धति' या नांवानें प्रसिद्ध आहे.

करंजेल तेलांतून करंजिन, वावडिंगांतून विडंगिन, पांगळा वनस्पतीपासून पांगळी, कापूर यांसारख्या पदार्थांचें यांनीं संशोधन केलें. रासायनिक संघटनात्मक विषयांवर यांनीं अनेक निबंध लिहिले आहेत. यांनीं स्थापन केलेल्या 'रसायननिधीं-' तून आतां स्वतंत्र संशोधनकार्य चाललें.

**लिमा**—पेरू देशाची राजधानी. यापासून कलाव बंदर सात मैलांवर आहे. लिमा विद्यापीठ १५५१ सालीं स्थापन झालेलें आहे. लो. सं. (१९४०) ५,२२,८२६. हें देशाचें व्यापारी केंद्र असून कापड, कागद, साखर, लोखंडी माल, वगैरे तयार होतो.

**लिलिएन्थल, एस्.** (१८१५-१८९१)—एक होमिओपाथिक डॉक्टर. यांचा जन्म जर्मनींत म्यूनिचमध्यें झाला. १८३९ मध्यें हे अमेरिकेस गेले. न्यू यॉर्क होमिओपाथिक मेडिकल कॉलेजमध्यें ते औषधिविज्ञानाचे प्रमुख प्राध्यापक होते. त्यांचा 'होमिओपाथिक थेरॅप्युटिक्स' हा ग्रंथ बहुधा प्रत्येक होमिओपाथिक डॉक्टराच्या संग्रहीं दैनंदिन चिकित्सेस उपयोगी पडणारा प्रमुख संदर्भग्रंथ आहे. ह्या ग्रंथामुळें त्यांचें नांव होमिओपाथिक वाङ्मयात गाजलें असलें तर त्यांत आश्चर्य नाहीं. कार्बॉलिक ॲसिड, सिलिकम, फिजिओस्टिग्मा, इ. औषधांचें त्यांनीं होमिओपाथिक प्रत्ययन (ड्रग्-प्रूव्हिंग) केलें.

**लिली**—[वर्ग-लिलिआसी. जाति-लिली]. ही एक वनस्पतींची जाति आहे. या वनस्पतीचा कांदा असून त्यास खवले असतात. पानें साधीं विरळ किंवा एकाच जागीं सर्व बाजूंनीं फुटलेलीं अशीं झुबकेदार असतात. देंठ साधा व वनस्पतिमय असून त्याच्या शेवटास मोठालीं व सुंदर फुलें असतात. फुलांस सहा पाकळ्या असून पुष्पकोश व पुष्पमुकुट हेहि पाकळ्यांसारखेच रंगानें व आकारानें असतात. याच्या अनेक जाती आहेत. युरोपमध्यें विशेषतः पांढरी, नारिंगी, लालभडक व वाघी या प्रसिद्ध आहेत.

**लिलीवर्ग**—१. [वर्ग-लिलिआसी]. हा एकगर्भपर्णी (एकदल) वनस्पतींचा मोठा वर्ग आहे. या वनस्पतींस जाड दांडा किंवा खोड नसतें. परंतु यांचा देंठ एकेरी किंवा शाखायुक्त असतो व त्याला जमिनींत कांदे किंवा झुपकेदार मुळें येतात. यांची वाढ समशीतोष्ण कटिबंधांत फार होते. कांदा, लसूण, ट्युलिप, कोरफड, लिली, वगैरे सर्व याच जातींच्या वनस्पती होत. हिंदी कमल या वर्गांत मोडतें.

२. [वर्ग-लिलिआसी. इं. ॲस्फोडेल]. याच्या बागेंत लावावयाच्या पांढरी व पिवळी अशा दोन जाती आहेत. हें बहुवर्षायु आहे. अल्जीरियामध्यें याची एक जात तयार करण्यांत येते. ती पांच फूटपर्यंत उंच वाढते. त्याच्या मुळाच्या ग्रंथींपासून शुद्ध मद्यार्क निघतो व त्याच्या झाडांपासून व पानांपासून पुठ्ठा व कागद तयार करण्यांत येतो.

**लिव्हरपूल**—इंग्लंड, लँकेशायरमधील एक शहर. ग्रेट ब्रिटनमधील हें दुसरें मोठें बंदर आहे. या ठिकाणीं कालवे आणि आगगाड्या यांनीं मोठी वाहतूक होत असते. येथील गोद्यांत पाणी ४२० एकर इतकें असून धक्क्यांची लांबी २६ मैल आहे. बंदरांत सर्व सोयी आहेत. त्यामुळें फार मोठ्या बोटीहि येतात व राहतात. व्यापाराच्या दृष्टीनें लिव्हरपूल फार मोठें नसलें तरी जहाजें बांधण्यासाठीं प्रसिद्ध आहे. तंबाखू, सिमेंट व अस्फाल्ट यांचा मोठा व्यापार चालतो. विद्यापीठ १९०३ सालीं स्थापन झालें आहे. एक मोठें देवालय आहे. लो. सं. सुमारें ६,८०,०००.

**लिव्हिंग्स्टन, डेव्हिड** (१८१३-१८७३)—एक स्कॉटिश मिशनरी व आफ्रिकेंतील भूप्रदेशसंशोधक. तो १८४० सालीं लंडन मिशनरी सोसायटीच्यातर्फे दक्षिण आफ्रिकेंत गेला. १८५३ ते १८५६ या दरम्यान त्यानें आफ्रिकेंत अनेक प्रवास केले आणि पूर्व किनाऱ्यावरील क्विलिमेनपर्यंत तो गेला. याप्रमाणें त्यानें तें सर्व खंड ओलांडलें. त्याच्या या प्रवासाची माहिती त्यानें

'मिशनरी ट्रॅव्हल्स ॲंड रीसर्चेस इन् साउथ आफ्रिका' (दक्षिण आफ्रिकेंतील मिशनरी प्रवास व संशोधनें) या पुस्तकांत दिली आहे. नंतर त्यानें पुन्हां अनेक प्रवास करून न्यासा सरोवर आणि झँबेझी नदीकांठचा प्रदेश शोधून काढला व नंतर १८६५ सालीं तो नाइल नदीच्या उगमाचा शोध लावण्याकरितां गेला. यानंतर मरेपर्यंत दक्षिण आफ्रिकेंतील सरोवरमय प्रदेशांचा आणि विशेषतः न्यासा सरोवर व टँगानिका सरोवर यांच्या पश्चिमेकडील प्रदेशाचा शोध लावण्यांत तो गुंतला होता. या वेळीं त्यानें बँग्वेलो सरोवर व मोएरो सरोवर, उत्तर काँगो, इत्यादि प्रदेश शोधून काढले. या वेळीं सुमारें तीन वर्षें त्याचा कोणाला कांहीं पत्ता नव्हता, व त्यामुळें तो मरण पावला असावा, अशी भीति निर्माण झाली. परंतु नंतर 'न्यू यॉर्क हेरल्ड'चा बातमीदार एच्. एम्. स्टॅन्ले यानें याच प्रदेशात प्रवास केला, तेव्हां टँगानिका सरोवरावरील उजिजी येथें त्याची व लिव्हिंग्स्टन याची भेट झाली (१८७१). नंतरहि त्यानें आपलें संशोधनकार्य चालूच ठेवलें. पण तो अगदीं क्षीण झालेला होता. लवकरच बँग्वेलो सरोवराजवळ तो इलाला येथें वारल्यावर त्याचें शव वेस्ट मिन्स्टर ॲबेमध्यें पुरण्यांत आलें. याचीं बरींच स्मारकें झालीं आहेत.

**लिव्ही** (खि. पू. ५९–इ. स. १७)—एक रोमन इतिहासकार. यानें कांहीं लहान पुस्तकें लिहिलीं असावींत, पण तीं उपलब्ध नाहींत. पण त्याची कीर्ति रोमचा इतिहास लिहिल्यामुळें झाली. या ग्रंथाचीं मूळ १४२ पुस्तकें होतीं, पण आतां फक्त ३५ शिल्लक आहेत. रोमन इतिहासावरच्या साहित्यांत याच्या इतिहासाला अग्रस्थान आहे. त्यानें अनेक जुन्या साधनांवरून हा इतिहास जशाचा तसा उभा केला; त्यामुळें त्यांत संकलनपर विवेचन व व्यवस्थित मांडणी नाहीं. पण त्याची लेखनशैली अप्रतिम आहे. त्याची गिबनशीं कांहींशी तुलना होते.

**लिसिया**—आशिया मायनरमधील एक प्राचीन समुद्रकांठचें राष्ट्र. यांत अनेक नगरराज्यें असून त्यांचा एक संघ केलेला असे. लिसियानें लिडियन लोकांच्या हल्ल्यांपासून आपलें स्वातंत्र्य टिकविलें. पुढें अलेक्झांडरनें हें जिंकून आपल्या राज्यास जोडलें. क्लॉडियसच्या अमदानींत हा रोमन प्रांत बनला. लिसियन लोकांचा उल्लेख खि. पू. १४०० पासून सांपडतो. हिरोडोटसनें यांना टर्मिलियन असें नांव दिलें आहे. यांची शिल्पकला विशिष्ट प्रकारची होती.

**लिस्ट, फ्रेडरिक** (१७८९–१८४६)—एक जर्मन अर्थशास्त्रज्ञ. हा कारकुनाच्या जागेपासून मंत्र्यांच्या जागेपर्यंत चढला. याच्यावर सरकारचा रोष झाल्यामुळें हा कांहीं काळ अमेरिकेंत जाऊन राहिला होता. यानें 'राष्ट्रीय अर्थशास्त्र' अशा नांवाचा राष्ट्राला कोणतें अर्थशास्त्र पाहिजे याचा ऊहापोह करणारा प्रसिद्ध ग्रंथ तयार केला व नांव मिळविलें. सर्व देशांना एकाच जातीचे अर्थशास्त्रीय सिद्धांत लावून चालत नाहींत; प्रत्येक राष्ट्राच्या परिस्थितीच्या मानानें अर्थशास्त्र निराळें असलें पाहिजे, असें लिस्टचें ठाम मत असे. तो खुल्या व्यापाराविरुद्ध होता.

**लिस्टर, जोसेफ** (१८२७–१९१२)—एक ब्रिटिश शस्त्रक्रियातज्ज्ञ. तो ग्लासगो येथें १८६० ते १८६९ पर्यंत, एडिंबर्ग येथें १८५९ ते १८७७ पर्यंत आणि लंडन येथील किंग्ज कॉलेजांत १८७७ ते १८९३ पर्यंत शस्त्रवैद्यकाचा प्रोफेसर होता. त्यानें जंतुशास्त्रविषयक अनेक प्रयोग करून जंतुनाशक औषधें तयार केलीं आणि तीं शस्त्रक्रियेच्या कामांत उपयोगांत आणल्यामुळें त्यानें शस्त्रक्रियाविद्येंत मोठी क्रांति घडवून आणली. या त्याच्या शोधामुळें शस्त्रक्रिया अगदीं स्वच्छ व निर्जंतुक स्थितींत करतां येऊं लागल्या आणि त्यामुळें पूर्वीं शस्त्रक्रियेच्या वेळीं जखमा पूतिविषार (सेप्टिक पॉयझनिंग) होऊन रोगी बहुधा मरत असत, ती आपत्ति अजीबात टळली.

**लिस्बन**—पोर्तुगाल, राजधानीचें शहर. हें टेगस नदीवर बंदर आहे. या ठिकाणीं मच्छीमारी मोठ्या प्रमाणांत चालते. इतर व्यापार-धंदे कमी आहेत. येथें विद्यापीठ, लष्करी विद्यालय, व्यवसाय विद्यालय, नॅशनल लायब्ररी, इ. शिक्षणसंस्था आहेत. ॲटलांटिक समुद्रावरचें हें मोठ्या बंदरांपैकीं एक असून लहान-मोठीं सर्व गलबतें येथें उतरतात. लो. सं. (१९४१) ७,०९,१७९. इ. स. ७१६ मध्यें हें मूर लोकांनीं जिंकून घेतलें होतें तें ११४७ त पोर्तुगीजांनीं परत घेतलें. १२६० त राजधानी बनल्यामुळें हें शहर इतकें वाढलें कीं, युरोपांत याच्याइतकें श्रीमंत शहर दुसरें नव्हतें. १७५५ त येथें भूकंप होऊन फार नाश झाला व सुमारें ४०,००० लोक मेले.

**ली, सर सिडने** (१८५९–१९२६)—एक इंग्रज विद्वान्. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालें. तो 'डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्रफी' (राष्ट्रीय चरित्र-कोश) या ग्रंथाचा दुय्यम संपादक (१८९० ते ९१), सहसंपादक आणि १८९१ ते १९१७ पर्यंत एकटाच संपादक होता. या ग्रंथाचे ६३ भाग व शिवाय ६ पुरवणी भाग प्रसिद्ध झाले. तो ईस्ट लंडन कॉलेजांत इंग्रजी भाषा व वाङ्मय यांचा प्राध्यापक १९१३ ते १९२४ पर्यंत होता. त्यानें लिहिलेलें शेक्स्पिअरचें चरित्र उत्तम नमुनेदार मानलें जातें. त्याचीं मुख्य पुस्तकें आहेत तीं: 'स्ट्रॅफर्ड-ऑन ॲव्हॉन फ्रॉम दि अर्लिएस्ट टाइम्स टु दि डेथ ऑफ शेक्स्पियर' (प्राचीन काळापासून शेक्सपियरच्या मृत्यूपर्यंतचें स्ट्रॅफर्ड), 'ए लाइफ ऑफ विल्यम शेक्स्पिअर', 'ए लाइफ ऑफ क्वीन व्हिक्टोरिया', 'शेक्स्पियर फर्स्ट फोलिओ फॅसीमल', 'विथ इंट्रोडक्शन ॲन्ड सेन्सस ऑफ एक्स्टंट कॉपीज्', 'एलिझाबेदन सॉनेट्स', 'ग्रेट इंग्लिश मेन ऑफ दि सिक्स्टीन्थ सेंचरी' (सोळाव्या शतकांतील थोर इंग्रज), 'दि फ्रेंच रेनेसान्स इन् इंग्लंड', 'दि प्रिन्सिपल्स ऑफ बायॉग्रफी' (चरित्रलेखनाचे सिद्धांत), 'किंग एडवर्ड दि एट्थ', 'ए बायॉग्रफी', इ..

**लीज**—बेल्जिअम, लीज प्रांताची राजधानी. हें म्यूज नदीवर असून महत्त्वाचें व्यापारी ठिकाण आहे. मोठाल्या तोफा, बंदुका, यंत्रें व धातू तयार होतात. कोळसा आणि कापड यांचेंहि उत्पादन होतें. येथें विद्यापीठ आहे. लो. सं. (१९४५) १,४२,५०७.

**लीड्स**—इंग्लंड, यॉर्कशायरमधील एक शहर. आयर नदीवर हें वसलें असून, आयरच्या कालव्यांनीं लिव्हरपूल आणि

हल यांशीं जोडलें आहे. लोंकरीच्या कापडासंबंधीं हें शहर सुप्रसिद्ध आहे. येथील पोलादी-लोखंडी कामें, आगगाडीचे डबे तयार करणें, यंत्रें आणि हत्यारें करणें यांच्या कारखान्यांतून हजारो लोक आहेत. तसेंच पादत्राणें आणि कातडी सामान यांचे कारखाने, रंगीत छापकाम, तंबाकू, रसायनें, कांच, विटा, मातीचीं भांडीं, इ. करण्याचे कारखाने गांवांत आहेत. जवळपास कोळशाच्या खाणी पुष्कळच आहेत. लो. सं. सुमारें ४॥ लाख आहे.

**लीथ**—हें स्कॉटलंडमध्यें मिडलोथियन परगण्यांत एडिंबर्गपासून दीड मैलावर बंदर आहे. येथें मुख्य कारखाने आहेत ते: दोरखंडें, शिडांचें कापड, रंग आणि कृत्रिम खतें, लोखंडाचें ओतीव काम, एंजिनें, पिठाच्या गिरण्या, तेलाच्या गिरण्या, लांकूड कापण्याच्या गिरण्या, बर्फ तयार करण्याची गिरणी, वगैरे. येथून फ्रेंच, जर्मन, डच व बेल्जिअम बंदरांशीं धान्य व पीठ या मालाचा मोठा व्यापार चालतो. येथील बंदर मोठें म्हणजे १०६ एकर आहे आणि २८ फूट खोलीच्या बोटी आंत येऊं शकतात. लोकसंख्या ८०,००० आहे.

**लीबनिझ, गॉट फ्रीड विल्हेल्म** ( १६४६–१७१६ )—एक जर्मन विद्वान् व तत्त्ववेत्ता. तो १६७२ सालीं पॅरिसला व नंतर इंग्लंडला गेला व तेथें त्याला रॉयल सोसायटीचा सभासद निवडण्यांत आलें. या सुमारास त्यानें चलनकलन ( डिफरन्शिअल कॅल्क्युलस )चा शोध लावला. नंतर ब्रुन्स्विक-लुनेबर्गच्या ड्यूकनें त्याला आपला सल्लागार नेमून पेन्शन सुरू केलें; म्हणून तो १६७६ सालीं हॅनोव्हरला परत आला व पुढें मरेपर्यंत त्या ड्यूकच्या आश्रयानें राहिला. लीबनिझची मुख्य कीर्ति तत्त्वज्ञानविषयक व गणितशास्त्रविषयक कार्याबद्दल आहे. अतींद्रियविज्ञान या शास्त्राबद्दलचे मुख्य विचार त्याच्या ग्रंथांतून आहेत.

लॉक हा तत्त्ववेत्ता जन्मसिद्ध कल्पना मानीत नसे. त्याच्या या मताला विरोध करून लीबनिझनें असें प्रतिपादन केलें कीं, कांहीं सत्यें अशीं असतात कीं, तीं अनुभवानें शिकणें शक्य नसतें, तर तीं मनुष्याच्या आत्म्यांतून प्रसंगविशेषीं स्वयंस्फूर्तीनें बाहेर पडतात, म्हणजे ज्ञात होतात. त्याची स्वयंभू व्यक्ती-( मोनाड )बद्दलची उपपत्तिहि प्रसिद्ध आहे.

**लीय ( लील )**— हें शहर फ्रान्समधील नोर्ड प्रांताची राजधानी असून महत्त्वाच्या कारखान्यांचें केंद्र आहे. ईशान्य भागांतला देशसंरक्षणाचा मुख्य किल्ला येथें आहे. येथें मुख्य गिरण्या ताग व कापूस यांचें सूत, उत्तम लोंकरी कापड, मखमलीचें कापड आणि सतरंज्या यांच्या असून मुख्य कारखाने सर्व प्रकारचे विणलेले कपडे, रासायनिक द्रव्यें, चामड्याचे जिन्नस, यंत्रें, कागद, बीटची साखर, इत्यादींचे आहेत. हें शहर ११ व्या शतकात स्थापन झालें व प्रथम तें फ्लँडर्सच्या काउंटच्या मालकीचें होतें. पुढें अनुक्रमें तें शहर बर्गंडी, ऑस्ट्रिया आणि स्पेन यांच्या मालकीचें झालें. लोकसंख्या ( १९३६ ) २,००,५७५.

**लीवर्ड आयलंड्स**—( वायुसम्मुख बेटें ). वेस्ट इंडीजमधील बेटांचा एक गट. ॲटलांटिक महासागर व कॅरिबिअन समुद्र यांच्या दरम्यान हीं आहेत व व्यापारी वाऱ्यांपासून बचाव होण्याजोगी त्यांची विशेष स्थिति असल्यामुळें त्यांना लीवर्ड बेटें असें नामाभिधान प्राप्त झालें. एकूण क्षेत्रफळ ७२७ चौरस मैल. लो. सं. ९७,६४४. डोमिनिका, मॉन्टेसराट, सेंट क्रिटस्, ॲन्टिग्वा, अंग्विला, नेव्हिस, व्हर्जिन आयलंड्स यांपैकीं कांहीं बेटें ब्रिटिशांचीं व कांहीं अमेरिकेचीं आहेत. मार्टिनिक्, ग्वाडेलोप व सेंट मार्टिन हीं फ्रेंचांचीं आहेत. ॲंटिग्वामधील सेंट जॉन हें प्रमुख शहर आहे. साखर, गूळ, फळें, नारळ, मीठ, तंबाखू हीं या बेटांतून होतात.

**लुई राजे**—या नांवाचे अठरा राजे फ्रान्सच्या गादीवर बसले. त्यांपैकीं ९ वा, ११ वा, १४ वा, व १६ वा एवढेच महत्त्वाचे आहेत.

नववा लुई ( १२१४–१२७० )—हा १२२६ त गादीवर आला. यानें वयांत आल्यावर इंग्लंडच्या तिसऱ्या हेन्रीशीं युद्ध सुरू केलें व फ्रान्सची सत्ता जोरकस केली. १२४८–१२५४ या कालांत तो क्रूसेड युद्धांत गुंतला होता व पुढील अठरा वर्षांत त्यानें राज्यांत बरेच कायदे करून सुधारणा घडवून आणल्या. १२७० त तो पुन्हां क्रूसेड युद्धासाठीं जात असतां ट्यूनिस येथें प्लेग होऊन वारला.

अकरावा लुई ( १४२३–१४८३ )—हा १४६१ त गादीवर बसला. यानें सरदार लोकांची सत्ता कमी करून ती राजाकडे घेतली. बर्गंडीचा चार्लस व इंग्लंडचा ४ था एडवर्ड यांच्याशीं युद्धें आणि कारस्थानें करण्यांत तो गुंतलेला असे. एकदां त्याला चार्लसनें कैद करून ठेवलें होतें. आपल्या शत्रूला शस्त्रापेक्षां कपटानें नामोहरम करण्यांत तो फार कुशल होता. पुढील वयांत तो फार धर्मभोळा बनला व एकांतांत राहूं लागला.

चौदावा लुई ( १६३८–१७१५ )—१६४३ पासूनच हा राज्य करूं लागला. यानें जें ७२ वर्षें राज्य केलें त्या अमदानींत हा युरोपच्या सर्व घटनेंत प्रामुख्यानें वावरला. राजकारणाखेरीज कला, वाङ्मय व लोकाचार यांवरहि त्याची छाप पडली आहे. कारकीर्दीच्या प्रारंभींच्या दिवसांत यानें राज्य वाढविलें, पण शेवटच्या दिवसांत त्याला तें कमी करावें लागलें. त्यानेंच व्हर्साय येथील सुंदर राजवाडा बांधला.

सोळावा लुई ( १७५४–१७९३ )—हा १७७४ त गादीवर आला तेव्हां फ्रान्सची स्थिति अत्यंत वाईट झाली होती. १७८९ त

तर फ्रेंच राज्यक्रांति होऊन लुईला आपल्या पूर्वजांच्या पापांबद्दल झाडा द्यावा लागला. १७९१ त तो पळण्याचा प्रयत्न करूं लागला, पण शेवटीं धरला जाऊन, त्याची न्यायासनापुढें चौकशी चालली. तींत अपराधी ठरून तो फांशीं गेला.

**लुई, सिंक्लेअर** (१८८५- )—या अमेरिकन ग्रंथकाराचा जन्म मेनेसोटा संस्थानांत सौक सेंटर येथें झाला. याचें शिक्षण येल विद्यापीठांत झालें. यानें प्रथम कांहीं लेखन केलें, परंतु त्यास फारशी प्राप्ति झाली नाहीं. १९१० मध्यें तो वर्तमानपत्राच्या व जाहिरातीच्या धंद्यांत शिरला. परंतु १९१६ मध्यें तें काम सोडून तो आपल्या लेखनाकडे पुन्हां वळला. १९२० मध्यें प्रसिद्ध केलेल्या 'मेनस्ट्रीट' (मुख्य रस्ता) या ग्रंथामुळें त्यास प्रसिद्धि मिळाली. अमेरिकन कादंबरीकारांमध्यें नोबेल बक्षीस मिळविणारा हा पहिला ग्रंथकार होय. १९२६ मध्यें त्यास मिळालेलें पुलिट्झर बक्षीस त्यानें त्याबरोबर योजलेल्या भाषेवरून नाकारलें. 'बॅबिट', 'ॲरो स्मिथ' आणि 'डॉड्सवर्थ' हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**लुईसियाना**—अमेरिकन संयुक्त संस्थानांपैकीं दक्षिणेकडचें एक संस्थान. हें मिसिसिपी नदीच्या मुखापाशीं आहे. मेक्सिकोच्या आखातावर ही किनारपट्टी आहे. क्षेत्रफळ ४८,५२३ चौ. मै. व लोकसंख्या २३,६३,८८०. सर्व जमीन मिसिसिपींतून वाहून येणाऱ्या गाळाची झालेली आहे व अशी नवी जमीन बनण्याचें कार्य चालूच आहे. बॅटनरोग हें मुख्य ठिकाण आहे. न्यू ऑर्लिअन्स हें फार मोठें शहर व बंदर आहे. हें मेक्सिकोचें आखात व मिसिसिपी नदी या दोहोंच्या कांठानें आहे. १९२३ मध्यें लेक पॉन्ट चार्ट्रेन व मिसिसिपी नदी यांना जोडणारा कालवा काढण्यांत आला तो ४ मैल लांबीचा आहे. खनिजांच्या बाबतींत एकंदरीनें व विशेषतः पेट्रोलियमसंबंधीं या संस्थानचा क्रम अमेरिकेंत चौथा लागतो. आखाताच्या बाजूला मच्छीमारी बरीच आहे. पर्जन्य विपुल पडतो व त्यामुळें शेती चांगली होते. जनावरें पाळण्याचा एक धंदाच आहे. जंगलांतून भारी किंमतीचें लांकूड- विशेषतः पाइन फार निघतें. लोक बहुतेक मूळ फ्रेंच वसाहतवाल्यांच्या वंशांतले आहेत. बॅटनरोग येथें विद्यापीठ आहे.

द सोटो याच्या नेतृत्वाखालीं प्रथम बरेच स्पॅनियर्ड या प्रदेशांत संशोधनास आले. गौर वर्णीयांचें हेंच पहिलें आगमन. मिसिसिपी नदीच्या खोऱ्यासुद्धां फार मोठ्या प्रदेशाला प्रथम लुईसियाना हें नांव देण्यांत आलें होतें. प्रथम फ्रेंच लोकांनींच या भागांत वसाहती केल्या. संशोधक ला साले यानें आपल्या चौदाव्या लुई या फ्रेंच राजाच्या नांवावरून लुईसियाना हें नांव योजलें. यामुळें फ्रान्स या भागावर आपला हक्क सांगत होतें व अखेरीस १७३२ मध्यें तो हक्क मान्य झाला व हा प्रदेश स्पेनकडून फ्रान्सकडे आला. थोड्याच वर्षांत पुन्हां खादेपालट होऊन तो स्पेनला परत मिळाला (१७६२). पुन्हां एकदां नेपोलिअनच्या गुप्त तहानें तो फ्रान्सकडे आला (१८००) व १८०३ मध्यें अमेरिकेनें तो फ्रान्सपासून 'लुईसियाना पर्चेज- (विक्री)' च्या प्रसिद्ध व्यवहारानें मिळवला.

**लुक्रेशिअस** (खि. पू. ९८-५५)—(टिटस लुक्रेशिअस कॅरस). एक रोमन कवि. त्याच्या चरित्राबद्दल त्याच्या लेखनांत जी थोडी माहिती मिळते तेवढीच उपलब्ध आहे. तो रोमन रहिवासी असून सामान्य कुळांत जन्मला होता व त्याला होमर, युरिपिडीज व एनियस यांचे ग्रंथ वाचण्याची आवड होती व शिवाय सृष्टिनिरीक्षण करण्यांत त्याला आनंद वाटत असे. त्याचा मुख्य काव्यग्रंथ 'डी रेऱ्यूम नॅटुरा' ह्याचीं सहा पुस्तकें आहेत. या ग्रंथांत त्यानें तत्त्वज्ञानांतील एका पंथाचीं मतें संपूर्ण पद्यमय भाषेंत वर्णिलीं आहेत. लुक्रेशिअसची अशी खात्री झाली होती कीं, मनुष्यप्राण्याचीं सर्व दुःखें देवांची भीति व मृत्यूची भीति या दोन लोकभ्रमांमुळें उद्भवतात. हे सर्व लोकभ्रम नाहींसे करण्याकरितां तत्त्वज्ञानांतील सुखवाद (एपिक्युरिअन पद्धति) या पंथाच्या मतांचें सविस्तर प्रतिपादन सदर काव्यग्रंथांत त्यानें केलें आहे. वास्तविक हा गद्य ग्रंथ असून पद्यभाषेंत लिहिलेला आहे आणि रोमन भाषेवर उत्तम प्रभुत्व असल्यामुळें लुक्रेशिअसच्या या तत्त्वज्ञानविषयक काव्यानेंहि रोमन कवींमध्यें तो उच्च दर्जाचा म्हणून गणला गेला आहे.

**लुखजी जाधव** (मृत्यु १६२९)—निजामशाहींतील एक सरदार. हा विठोजी जाधवाचा पुत्र व छत्रपति शिवाजीचा आजा. यानें आपली मुलगी जिजा ही शहाजीस १७१७ च्या सुमारास दिली. प्रथम हा निजामशाहींतील एक सरदार होता. परंतु निजामशाहींतून ज्या वेळीं सर्व सरदार बाहेर पडूं लागले त्या वेळीं खंडागळ्यांचा हत्ती पुढें निघाल्यावरून भांडणास सुरुवात झाली व विठोजी भोसल्याचे पुत्र संभाजी व खेलोजी व याचे दत्ताजी वगैरे पुत्र यांच्यांत युद्ध होऊन त्यांत शहाजी बेशुद्ध पडला व संभाजी भोसले व दत्ताजी जाधव हे बळी पडले. या वेळीं निजामशहानें याचा जांवई शहाजी याची बाजू घेतल्यानें हा मोंगलांस जाऊन मिळाला. तिकडे हा दहा वर्षे होता. पुढें फत्तेखानास कैदेंत टाकण्यांत आल्यावर हा निजामशहाकडे येण्यास तयार झाला. हा निजामशहाकडे आला असतां निजामशहानें दारूच्या धुंदींत याचा अपमान केला. तेव्हां हाहि बेहोप झाला असतांना हमीदखान सेनापतीनें भर दरबारांत याचा खून केला. त्या वेळीं लुखजी ऐशीं वर्षांचा होता. लुखजीस रघूजी, दत्ताजी, अचलोजी व बहादुरजी हे पुत्र व

जिजाई ही मुलगी होती. जिजाबाईचा पुत्र शिवाजी. लुखजीस जगदेवराव नांवाचा भाऊ होता. याच्या पत्नीचें नांव गिरजा. शिंदखेडला या जाधव घराण्याचे वंशज आहेत. जाधव घराणीं ( शिंदखेडकर ) पाहा.

**लुझोन**—फिलिपाइन बेटांपैकीं हें सर्वांत मोठें बेट आहे. येथें कित्येक ज्वालामुखीचीं शिखरें आहेत (उदा., मेअॉन ७९१६ फूट ). येथें वस्ती आदिवासी नेग्रीटो, फिलिपिनो, आणि चिनी या लोकांची आहे. आणि तीन हजार अमेरिकन लोक या बेटांत आहेत. भात, मॅनिला, ताग, तमाखू, कॉफी, सुंठ हीं पिकें होतात. येथें जंगलांत एबनी जातीचें लांकूड आहे. मॅनिला ही बेटाची राजधानी असून लाओग, आल्बे, व्हिगन आणि नागा हीं इतर शहरें आहेत. क्षेत्रफळ ४०८१४ चौ. मैल व लोकसंख्या ६६, ५०, ००० आहे.

**लुडेनडॉर्फ, एरिच फॉं**( १८६५–१९३७ )—एक जर्मन जनरल. १९०४ पासून १९१३ पर्यंत जर्मन लष्करांतील युध्यमान सैन्याधिकाऱ्यांना सल्लामसलत देण्याचें काम त्याच्याकडे होतें. त्या वेळीं युद्धाची तयारी पूर्ण करण्याचें काम चालू होतें. १९१४ सालीं त्याला खात्याचा मुख्य अधिकारी नेमण्यांत आलें. पुढें सैन्याची जमवाजमव सुरू झाल्यावर त्याला मेजर जनरल नेमण्यात आलें व तो फॉं ब्युलो ह्याच्या हाताखालीं दुय्यम प्रमुख या हुद्यावर काम करूं लागला. पुढें रशियन सरहद्दीवरील सैन्यांत हिंडेनबुर्गच्या हाताखालीं त्याला जागा मिळाली. त्यानें रशियन हद्दींत जोरानें घुसून टॅनेनबर्ग येथें मोठी कत्तल केली. रशियावरील स्वारीचीं सर्व सूत्रें तो हालवीत होता आणि त्या विजयाचा सर्व सन्मान मात्र हिंडेनबुर्गला मिळाला. व्हर्डून येथें जर्मन सैन्याचा पराभव झाल्यावर हिंडेनबुर्ग जनरल स्टाफचा प्रमुख झाला, आणि लुडेनडार्फ क्वार्टर मास्टर–जनरल झाला, आणि नंतर जर्मनीचा अखेरचा पराभव होईपर्यंत जर्मन सैन्याचीं सर्व सूत्रें या दोघांच्या हातीं होतीं.

**लुधियाना**—पंजाब, जालंधर भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १३९९ व लो. सं. ( १९४४ ) ८,१८,६१५. यांत ५ शहरें व ८६४ खेडीं आहेत. भाषा पंजाबी चालते. जाट लोक शेतीचीं कामें करतात. सतलज नदीच्या गाळामुळें जमीन सुपीक आहे. कुरणें कमी असल्यानें जनावरें चांगलीं पोसलीं जात नाहींत. सरहिंद कालवा जिल्ह्यांतून जातो. शाली ( रामपुरी चादरी ) विणण्याचा धंदा मोठा आहे. लष्करी कोटाचें व फेट्याचें कापड येथें होतें.

अकबर बादशहाच्या वेळीं हा प्रदेश सरहिंद सरकारांत मोडत असे. पुढें शिखांकडे हा आला. नंतर १८३५ सालीं इंग्रजांनीं मिळविला. १८५७ च्या बंडांत फारशी गडबड झाली नाहीं. लुधियाना शहर तीन आगगाड्यांच्या फांट्यांचें संगमस्थान आहे. लो. सं. ( १९४१ ) १,११,६३९. हें शहर १४८१ सालीं दोघा लोदी पठाणांनीं वसविलें. येथें पश्मीना शाली फार चांगल्या होतात. तसेच रेशीम व लोंकर यांना रंग देण्याचें काम उत्कृष्ट होतें.

**लुनावाडा**—मुंबई, गुजराथेंतील एक संस्थान. क्षे. फ. ३८८ चौ. मै.. व लो. सं. १,०५,३१८. मही नदी संस्थानांतून वाहते. यांत ३१८ खेडीं आहेत. कांहीं भाग फार सुपीक आहेत. जंगलांत इमारती लांकूड मुबलक मिळतें. हवा बरीच थंड असते. संस्थानिक रजपुतांच्या सोळुंकी घराण्यांतील असून अनहिलवाडच्या सिद्धराज जयसिंगाचे वंशज आहेत. ही गादी १२२५ सालापासून आहे. मराठ्यांच्या अमदानींत शिंदे आणि गायकवाड या दोघांच्या मांडलिकत्वाखालीं संस्थान होतें. सध्यांचे संस्थानिक श्रीवीरभद्रसिंहजी १९३० सालीं गादीवर बसले. संस्थानांत शिक्षण मोफत ठेवलें आहे. तसेंच औषधोपचारहि प्रजेला विनामूल्य मिळतात. संस्थानचें उत्पन्न सुमारें ७ लाख रुपये आहे. हें संस्थान मुंबई प्रांतांत १९४८ सालीं विलीन झालें.

लुनावाडा शहर गोध्रा शहरापासून २५ मैल लांब आहे. लो. सं. १०,०००. लुनेश्वराचा उपासक साधु होता. त्याच्या सांगण्यावरून राणा भीमसिंगानें १४३४ सालीं हें वसविलें. माळवा आणि गुजराथ यांच्या दरम्यान् असल्यानें पूर्वी येथें मोठा व्यापार असे.

**लुनी**—राजपुतान्यांतील एक नदी. ही अजमीरजवळच्या एका डोंगरांत उगम पावते. अरवली पहाडांतून निघणाऱ्या बऱ्याच नद्या हिला मिळतात. मारवाडांत जेवढें धान्य पिकतें त्यापैकीं निम्में धान्य लुनी नदी पिकविते. हिच्यावर धरण बांधून कालवा नेला आहे.

**लुशाई डोंगर**—आसाम, एक जिल्हा, क्षे. फ. ८,१४२ चौ. मै.. हा हिंदुस्थानच्या ईशान्य सरहद्दीवर आहे. बहुतेक भाग ३००० ते ८००० फूट उंच डोंगरांचा असून त्यांच्या उतरणीवर अरण्यें आहेत. खोऱ्यांतून नद्या वाहतात. पाऊस सुमारें ८० इंच पडतो. लो. सं. ( १९४१ ) १,५२,७८६. यांतील लुशाई लोक वन्य हिंदू आहेत. हे शेतांत व जंगलांत कामें करतात. यांचे आचार विचित्र आहेत. हे मातीचीं भांडीं चांगलीं करतात. पाश्चात्य विद्वानांनीं लुशाई भाषेचा चांगला अभ्यास करून पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. या भाषेच्या कांहीं पोटभाषा आहेत. भाषेंत वाङ्मय नाहीं, पण गाणीं व गोष्टी पुष्कळ आहेत.

**लुसिपस** ( ख्रि. पू. ५०० )—एक ग्रीक तत्त्ववेत्ता. हा परमाणुवाद पंथाचा ( ॲटॉमिक स्कूल ) संस्थापक होय. त्याच्यापूर्वीचे एलियाटिक पंथाचे तत्त्ववेत्ते असें मानीत असत कीं,

या जगांत जें जें अस्तित्वांत आहे त्या सर्वांचें मूळ एकजिनसी, अविनाशी (इटर्नेल), आणि अविकार्य (इंटेचल) असें द्रव्य आहे. लुसिपसनें असें प्रतिपादन केलें कीं, हें जग मूळ एका मूलद्रव्याच्या अपरिमित कणांनीं भरलेलें होतें व ते कण अतिशय सूक्ष्म असल्यामुळें ज्ञानेंद्रियांनाहि अज्ञेय होते, ते मूळ कण अविभाज्य आहेत. त्यांना परमाणू म्हणावें. या अणूंनीं मूळ हें जग व्यापलेलें असून त्यांचें चलनवलन सतत चालू असतें. हें परमाणू एकत्र होऊन (युनियन) जगांतील हरएक निर्जीव व सजीव वस्तू बनतात; आणि ते परमाणू विलग झाले म्हणजे वस्तू नाश पावतात.

**लूकन** (३९–६५)— मार्कस अनीअस लूकॅनस. हा रौप्य युगांतील रोमन कवि सेनेका या वक्त्याचा नातू, आणि सेनेका या तत्त्ववेत्त्याचा पुतण्या होय. त्याच्या प्रगल्भ बुद्धिमत्तेमुळें त्याच्या लहानपणांतच लोक आश्चर्यचकित होत असत. तो आपल्या विसाव्या वर्षानंतर लवकरच आपल्या कवितांमुळें इतका प्रसिद्ध झाला कीं, रोमन बादशहा नीरो याला त्याच्याबद्दल हेवा वाटूं लागला. म्हणून नीरोनें त्याला आपल्या कविता सार्वजनिक जागीं म्हणण्यास मनाई केली. त्याचा सूड उगविण्याकरितां लूकन हा नीरोच्या विरुद्ध पिसो यानें केलेल्या गुप्तकटांत सामील झाला. परंतु कोणीं फितुरानें त्याचें नांव बादशहाला कळविल्यामुळें लूकननें आत्महत्या केली. लूकननें फार्सालिया हें महाकाव्य लिहिलें, व हें त्याचें एकच काव्य उपलब्ध आहे. या काव्यांत त्यानें सीझर आणि पाँपे यांच्यामधील लढ्याची हकीगत सविस्तर कालक्रमानुसार वर्णिली आहे. या काव्याच्या योग्यतेबद्दल मतभेद आहे. कोणी त्याची अतिशय स्तुति करतात व कोणी त्याला अगदीं टाकाऊ मानतात. वास्तविक या काव्यांत आवेशयुक्त भाषा आणि वक्त्यांना नमुनेदार असे भाग पुष्कळ आहेत.

**लूत**—एक सुरणाची जात. झाड सुरणाच्या झाडाहून लहान असतें. हीं झाडें कोंकणांत फार व यांचे कोंब वर आले कीं ते काढून त्यांतील पाला घेतात व त्याची भाजी करतात. ही भाजी चिंच घालून चांगली शिजवावी लागते; नाहीं तर खाजते. लुतीच्या वाळलेल्या कांद्याचीहि भाजी होते. कांद्यास कडवा सुरण म्हणतात. कर्णमुळावर कांदा उगाळून लावतात.

**लूथर, मार्टिन** (१४८३–१५४६)—प्रसिद्ध जर्मन प्रॉटेस्टंट सुधारक. १५०७ सालीं याला उपाध्यायाची दीक्षा मिळाली व पुढील सालीं त्याला नवीन निघालेल्या विटेनबर्ग विद्यापीठांत तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक करण्यांत आलें. १५१७ त जेव्हां पोपकडून एक माणूस पापविमोचनपत्रें विकण्यास आला तेव्हां लूथरनें ९५ कारणें देऊन या पत्रांचा जाहीरपणें धिक्कार केला. तेव्हां पोपनें याला रोमला बोलाविलें, पण हा गेला नाहीं. तेव्हां त्याच्यावर बहिष्कार टाकण्याची पोपनें आज्ञा दिली. हें आज्ञापत्र लूथरनें विटेनबर्ग येथें जाहीर रीतीनें जाळलें. एवढ्या गोष्टी झाल्यावर जर्मन बादशहानें त्याला बोलावून चौकशी केली. लूथरनें सडेतोडपणें आपली बाजू मांडून अपराध कबूल केला नाहीं. नंतर त्यानें रोमधर्मसंस्थेच्या उपाध्यायगिरीचीं वस्त्रें फेंकून देऊन एका मठवासिनीशीं लग्न केलें. ती व इतर आठ मठवासिनी यांनीं लूथरच्या शिकवणीवरून मतस्थपणा टाकून दिला होता. १५२१ पासून लूथर जर्मन भाषेंत बायबलचें भाषांतर करण्याच्या उद्योगास लागला व तेरा वर्षांत त्यानें तें अचाट काम पुरें केलें. जर्मनींत नवा धर्मपंथ प्रस्थापित करण्याचें कार्य त्यानें जें केलें त्यामुळें प्रॉटेस्टंट संप्रदाय चांगला उदयास आला.

**लूसियन** (१२५–१८०)— एक ग्रीक उपरोधिक लेखक. तो प्रथम शिल्पकाराचा धंदा करूं लागला. परंतु लवकरच त्या धंद्याला कंटाळून त्यानें साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. त्यानें अनेक संवाद लिहिले. त्यांपैकीं मृत माणसें, देव व समुद्रदेवता यांचे संवाद अतिशय प्रसिद्ध आहेत. हे संवाद विनोदी भाषेंत पण वक्रोक्तीनें लिहिलेले आहेत. त्याचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ 'सत्य इतिहास' हा असून तो त्यानें वाचकांचें मनोरंजन करण्याचा मुख्य हेतु धरून लिहिला आहे.

**लेकी, विल्यम एडवर्ड हार्टपोल** (१८३८–१९०३)— एक आयरिश इतिहासविषयक लेखक. त्याचें शिक्षण डब्लिन युनिव्हर्सिटींत झालें. आणि तो १८९६ ते १९०३ पर्यंत पार्लमेंटचा सभासद होता. त्याचे पुढील दोन तात्त्विक ग्रंथ फार महत्त्वाचे आहेत: 'दि राइझ अँड इन्फ्लुअन्स ऑफ दि स्पिरिट ऑफ रॅशनॅलिझम् इन् युरप' (युरोपांतील बुद्धिप्रामाण्यवादाचा उदय व प्रभाव), 'हिस्टरी ऑफ युरोपियन मॉरल्स' (युरोपियन नीतिमत्तेचा इतिहास). अठराव्या शतकांतील इंग्लंडचा इतिहास त्यानें लिहिला आहे. त्याचें चरित्र त्याच्या बायकोनें लिहिलें आहे.

**लेखणी**—लेखनाच्या साहित्यांत लेखणी प्रामुख्यानें येते. या लेखणीचे निरनिराळे प्रकार आहेत. ताडपत्रावर लिहिण्यासाठीं एक लोखंडी सळई वापरीत. धूळपाटीवर लिहिण्यासाठीं लांकडाचा तुकडा घेत. बोरूपासून लेखण्या करण्याची चाल बहुतेक देशांत जुनीच आहे. पक्ष्यांच्या पिसांच्या लेखण्या (क्विलपेन) इ. स. च्या ५ व्या शतकांत देखील आढळतात. पोलादी टांक (स्टील पेन) प्रथम १८०३ सालीं वाइजनें शोधून काढला, पण १८२८ सालीं जोशिआ मेसन अशा टांकांचा कारखाना काढीपर्यंत त्याचा फारसा प्रसार नव्हता. १९०६ सालीं मुंबईस निर्ब होऊं लागलीं.

फाउंटनपेनचा शोध जोसेफ ब्रमाचा असून, सोन्याच्या निबाच्या टोंकास इरिडियम लावण्यांत येतें त्यामुळें टांक खराब होत नाहीं. स्टायलोग्राफ पेनमध्यें निब सुईसारखें असतें.

**लेखनकला**—लेखनकलेला अनुलक्षून केलेला असा अत्यंत जुना उल्लेख म्हणजे 'शील' नांवाच्या ग्रंथांत सांपडतो. सुत्तंताच्या म्हणजे संवादपद्धतीनें बुद्धानें दिलेल्या व्याख्यानाच्या पहिल्या वर्गाचा पहिला भाग म्हणून जे तेरा संवाद आहेत त्यांना ही संज्ञा समष्टिरूपानें दिलेली आहे. ह्या शील ग्रंथांचा काळ ऱ्हीस डेव्हिड्सच्या मतें अजमासें ख्रिस्तपूर्व ४५० हा असावा. या ग्रंथांत बौद्ध संप्रदायाच्या अनुयायांनीं काय काय गोष्टी करूं नयेत याच्या याद्या सांपडतात. यांपैकीं एका यादींत पुष्कळ खेळ आहेत. अक्षरिका नांवाचा एक खेळ यांत आहे. हा खेळ म्हणजे हवेंत बोटांनीं दाखविलेलीं, किंवा एखाद्याच्या पाठीवर लिहिलेलीं अक्षरें ओळखणें हा होय. संदर्भावरून पाहतां, हे सर्व खेळ मुलांचे असावेत, व हाहि त्यांतलाच एक खेळ असावा.

लेखनकलेबद्दल विनय नांवाच्या ग्रंथांतहि बरेच सूचक उल्लेख सांपडतात. उदाहरणार्थ, विनय ४·७ यामध्यें लेखनकलेची एक उत्तम कला या नात्यानें स्तुति केल्याचें दिसून येतें. बौद्ध संप्रदायाच्या अनुयायी म्हणविणाऱ्या स्त्रियांनीं ज्या ज्या गोष्टी करूं नयेत म्हणून लिहिलें आहे त्यांत लेखनकला हा एक अपवाद आहे. गुन्हेगार लोकांपैकीं ज्यांचीं ज्यांचीं नांवें राजाच्या देवडीवर नमूद करून ठेवलेलीं असत, त्यांना संप्रदायांत घेतलें जात नसे. मुलानें पुढें कोणता धंदा करावा अशाबद्दल विचार करतांना त्याचे आईबाप म्हणत, "यानें लेखकाचा धंदा केल्यास हा सुखासमाधानानें आनंदांत दिवस काढील, परंतु याचीं बोटें मात्र दुखूं लागतील." संप्रदायापैकीं एखाद्या इसमानें दुसऱ्या एखाद्याला लिहितांना जर आत्महत्येपासून होणाऱ्या फायद्याचें वर्णन केलें तर त्या लेखांतील प्रत्येक अक्षरागणिक त्यानें एक एक गुन्हा केला असें मानलें जात असे.

विनयांतील या सर्व उदाहरणांवरून एवढें स्पष्ट दिसतें कीं, विनय ग्रंथ रचला गेला त्या काळीं लेखनकला अस्तित्वांत होती; सरकारी जाहिराती, सूचना, वगैरेंच्या कामीं व खासगी पत्रव्यवहाराच्या बाबतींत लेखनकलेचा उपयोग होत होता. मानमरातबानें उपजीविका करण्याचें साधन म्हणून लेखनकलेचा उपयोग होण्याइतकी पात्रता तिला आली होती; आणि लेखनकला विशिष्ट वर्गांतले लोक शिकत इतकेंच नव्हे, तर सामान्य लोक किंवा स्त्रियासुद्धा या कालांत लिहिण्यास शिकत.

लिपि या लेखांत लेखनाच्या अवस्था दिल्या आहेत. लेखन आणि लिपि यांचा अन्योन्य संबंध आहे. लेखनसाहित्यांत शाई, लेखण्या व कागदासारखे पट हीं येतात. त्यांची माहिती स्वतंत्र दिलेलीच आहे.

लेखणीनें अक्षरें व शब्द लिहून अर्थ व्यक्त करण्याची कला ख्रि. पू. चारपांच हजार वर्षांपासूनची तरी आहे. लिपी अगदीं वेगवेगळ्या तयार झाल्या हें आपण लिपीसंबंधींच्या लेखांत पाहिलेंच. दगडें, हाडें किंवा कांहीं टणक वस्तू यांवर चित्रें काढून आपलें म्हणणें दुसऱ्यास कळविण्याची प्रथम क्लृप्ति निघाली असली पाहिजे. यानंतर पुढें चित्रलिपि निघाली. पापीरसचा लिहिण्याच्या कामीं शोध लागून फर्डेशाही लिहिण्यास आरंभ झाला. कागदाचा शोध लागल्यावर लेखनास ऊर्जितकाल आला. लेखण्यांमध्यें सुधारणा झाली.

लेखनांत अक्षरांचा अनुक्रम कसा असावा याबद्दल निरनिराळे प्रकार आढळतात. संस्कृत, ग्रीक, लॅटिन व सर्व अर्वाचीन युरोपीय भाषा डावीकडून उजवीकडे वाचल्या जातात. चिनी अक्षरें वरून खालीं तर मेक्सिकन खालून वर वाचलीं जातात. हीब्रू, अरबी व फारसी, ऊर्दू लिखाण उजवीकडून डावीकडे वाचतात.

युरोपांत मध्ययुगांत मठवासीच बहुधा बरेंच लेखन करीत व तें फार सुंदर वळणाचें असे. छपाई आल्यापासून वळणाकडे लक्ष कमी झालें व आतां तर टंकयंत्रें (टाइपरायटर) मिळूं लागल्यानें हातानें सुंदर तऱ्हेनें सुबोध व सुवाच्य लिहिण्याचा परिपाठ गेला. सर्वत्र हाच अनुभव आहे.

**लेगहॉर्न**—(लिव्होर्नो). इटली, एक बंदर. जिनोआच्या खालोखाल लेगहॉर्नची महत्त्वाचें व्यापारी शहर म्हणून प्रसिद्धि आहे. या ठिकाणीं इटलीचें नाविक महाविद्यालय आहे. शहरांतून कालवे जात असून त्यांच्या द्वारें दळणवळण चालतें. येथील देवस्थान प्रेक्षणीय आहे. येथून गलबतांतून तेलें, रेशीम, दारू, कातडीं, संगमरवरी दगड, पारा, इ. माल पूर्वेकडील देशांना व अमेरिकेला पुष्कळ जातो. बंदर चांगलें मोठें आहे. लो. सं. (१९३६) १,२४,९१६३.

**लेजान्द्र, आद्रिआं मारी** (१७५२–१८३३)—एक फ्रेंच गणितशास्त्रज्ञ. तो पॅरिस येथील एकोल मिलिटेर (लष्करी विद्यालय)मध्यें गणितशास्त्राचा प्रोफेसर होता. त्याचें अतिशय प्रसिद्ध पुस्तक 'भूमितीचीं मूलतत्त्वें' असून तें पुस्तक युक्लिडच्या भूमितीऐवजीं युरोपांत पुष्कळ ठिकाणीं उपयोगांत आणलें गेलें. त्यानें दैर्घ्यफल (एलिप्टिक फंक्शन्स), आणि अंकांची उत्पत्ति (थिअरी ऑफ नंबर्स) या विषयांवर महत्त्वाचे ग्रंथ लिहिले.

**लेजीम**—एक व्यायामसाधन. जुन्या काळांत धनुष्यबाणाचा उपयोग होत असे. तशा प्रकारचें धनुष्याचें सामर्थ्य

रुमानिया — एक शेतकरी दृश्य (पृ. २१७१)

लेनिनग्राड — जुनें सेंटपीटर्सबर्ग (पृ. २२३२)

वास्तुशिल्प — गगनचुंबी इमारती (पृ. २२९५)

हातांत आणण्यासाठीं लेजीमची मेहनत बसविली असावी असें वाटतें. लेजीम हा फारशी शब्द असून त्याचा अर्थ लोखंडी तार लावलेलें धनुष्य असा आहे. संघव्यायामांत वापरण्यांत येणाऱ्या लेजीम फारच लहान व हलक्या वजनाच्या असतात. लेजिमीची सांखळी भारी वजनाची केल्यानें, लेजीम करणारास चांगली मेहनत होऊन हातात चांगली ताकद येत असते. लेजीम करणाराची ताकद वाढेल त्याप्रमाणें जास्त जास्त वजनाच्या लेजिमी घ्याव्या लागतात. संगीताच्या तालावर लेजीमचे हात शाळांतून करण्यास शिकवितात.

**लेक्टुस**—[ लॅक्टुसा साटीव्हा ]. एक गुळगुळीत, वर्षायु वनस्पति. याचा देंठ सुमारें २ फूट उंच वाढतो आणि त्यास लहान फिकट पिंवळसर फुलें येतात. याच्या कोंवळ्या झाडाचाच खाण्याच्या कामीं उपयोग करतात. कारण त्यास फुलें आलीं म्हणजे या झाडाच्या अंगीं माज आणण्याचा विषारी गुणधर्म उत्पन्न होतो.

**लेडन**—हॉलंड, एक शहर. येथील प्रसिद्ध विद्यापीठ १५७६ सालीं स्थापलेलें आहे. येथील पुराणवस्तुसंग्रहालय प्रेक्षणीय आहे. कापड, मुद्रण, इ. चे कारखाने आहेत. १५७२–७३ सालीं स्पॅनियर्ड लोकांनीं याला दिलेला वेढा इतिहासांत प्रसिद्ध आहे. लो. सं. ( १९३९ ) ७७,००९.

**लेडनपात्र**—( लेडन जार ). लेडनच्या मुस्चेनब्रोएक या शास्त्रज्ञानें १७४६ सालीं हें पुढें आणलें, म्हणून हें नांव देण्यांत आलें. हा एक प्रकारचा विद्युत्संचायक असतो. यामध्यें एका कांचेच्या बरणीस आंतून व बाहेरच्या बाजूनें तिच्या खालच्या पृष्ठभागावर कथलाचा वर्ख चिकटविलेला असतो. त्या बरणीच्या गळ्यामधून जाणारा एक कांचेचा दांडा आंतील या कथलाच्या पत्र्याशीं जोडलेला असतो व त्याच्या बाहेरच्या टोंकाशीं एक पितळेचा गोळा असतो. त्यामार्फत या पात्रांत विजेचा भार पोंचविण्यांत येतो. जेव्हां हा विद्युद्भार नाहींसा करावयाचा असतो तेव्हां एका विद्युद्वाहकाच्या मार्फत पत्र्याचा संबंध जोडण्यांत येतो; मात्र अशा वेळीं विद्युद्वाहकाचा संयोग प्रथम बाहेरच्या अंगाशीं करण्याची काळजी घ्यावी लागते.

**लेडीस्मिथ**—दक्षिण आफ्रिका, नाताळ प्रांतातील एक शहर. बोअर युद्धांत या शहरानें शत्रूच्या वेढ्यांत बराच काळ टिकाव धरला, म्हणून हें प्रसिद्धीला आलें. हें एक चांगल्या हवेचें ठिकाण आहे. लो. सं. सुमारें सात हजार.

**लेणीं**—( गुहा व गुहावासी पाहा ). बौद्ध लेण्यांतून चैत्य व विहार असे दोन प्रकार असतात. ( चैत्य, विहार पाहा ).

हिंदुस्थानांत एकंदर एक हजार लेणीं असतील. यांपैकीं ९०० बौद्ध व उरलेलीं १०० ब्राह्मणी व जैन आहेत.



लेण्यांपैकीं ⅘ लेणीं बहुधा महाराष्ट्रांतच आहेत. पुणें, सातारा, अहमदनगर, नाशिक, ठाणें, कुलाबा व रत्नागिरि या जिल्ह्यांतून हीं आढळतील. वेरूळ व अजंठा लेणीं मराठवाड्यांत आहेत. बौद्ध लेण्यांपैकीं हीनयान पंथाचीं खि. पू. २०० ते इ. स. २०० पर्यंतच्या काळांत खोदलेलीं असून महायान पंथाचीं इ. स. ४५० ते ६४२ पर्यंतचीं आहेत. भाजें, कोंडाणें, पितळखोरें, अजंठा, बेडसें, नाशिक, कार्लें, कान्हेरी व जुन्नर येथील लेणीं हीनयान पंथाचीं प्रमुख होत. अजंठा–वेरूळ लेण्यांत कांहीं महायान पंथाचींहि आहेत. महायानपंथी लेण्यांत हीनयानांच्या स्तूपा ऐवजीं बुद्धमूर्ती असत. लेण्यांचें मुख्य केंद्र ठाणें जिल्ह्यांत दिसतें. कान्हेरी, कोंडिवटी, जीवधन, लोनाड येथील बौद्ध लेणीं जवळजवळच आहेत. जुन्या व्यापारी मार्गावर हीं लेणीं आहेत. महाराष्ट्राबाहेर खंडगिरि ( ओरिसा ) व गिरनार ( गुजराथ ) येथील लेणीं जैन आहेत. हीं खि. पू. २ ऱ्या शतकांतील दिसतात. कर्नाटकांत बदामी व ऐहोळ येथील लेणीं ब्राह्मणी व जैन आहेत. महाराष्ट्रांतील ब्राह्मणी लेणीं बहुतेक शैव आहेत. या लेण्यांची माहिती त्या त्या नांवांखालीं दिलेली आढळेल.

**लेनिन, व्लाडिमीर इलिच** ( १८८०–१९२४ )—

समाजवादाचा जनक व सोव्हिएट रशियाचा संस्थापक व सर्वाधिकारी. हा वकील होऊन मजूरचळवळींत पडला. रशियांतील समाजसत्तावादी पक्षांतील जहाल गटाचा हा पुढारी बनला. या गटाला बोल्शेविक असें नांव होतें. १९०७ ते १९१७ पर्यंत लेनिननें हद्दपारी भोगली. पॅरिस, व्हिएन्ना व झ्यूरिच या ठिकाणीं राहून त्यानें क्रांतीचा प्रचार सुरू ठेवला. १९१७ च्या मार्चमध्यें जेव्हां रशियांत क्रांति झाली तेव्हां लेनिन तिकडे जर्मनांच्या मदतीनें गुप्त रीतीनें गेला व बोल्शेविक पक्षाचें नेतृत्व हातीं घेतलें. ट्राट्स्कीच्या मदतीनें त्यानें उठाव करून केरेन्स्कीचें मवाळ सरकार उलथून पाडलें. नंतर पहिल्या लोकराज्याचा तो अध्यक्ष बनला. त्या वेळीं रशियांत औद्योगिक क्षेत्रांत काम करणारे लोक शेंकडा एक जेमतेम होते. तेव्हां देशांत यादवी सुरू झाली ती १९२१ सालपर्यंत टिकली. लेनिननें तावडतोब ऑस्ट्रिया-जर्मनीशीं चाललेलें युद्ध थांबविलें व देशांतील शत्रूंना वठणीस आणलें. बोल्शेविक पक्षाचा कम्यूनिस्ट

पक्ष बनवून व्यापार-धंदे वाढविण्यासाठीं त्यानें भांडवलदारांनाहि कांहीं काळ हातांशीं धरलें. अशा नव्या कामकरी राज्याची स्थिरस्थावर करण्याच्या ऐन मोसमांत त्याला एका विरुद्ध पक्षांतील बाईनें गोळी घालून जखमी केलें (१९२२). त्यानें तसेंच रेटून काम चालविलें, पण प्रकृति खालावत जाऊन तो २१ जानेवारी १९२४ या दिवशीं वारला. त्याचा देह मसाला भरून मॉस्कोच्या कबरस्थानांत कायमचा पाहण्यासाठीं ठेवला आहे. त्याचें स्मरण म्हणून पीटर्सबर्ग या राजधानीचें नांव बदलून लेनिनग्राड असें ठेवण्यांत आलें. लेनिननें क्रांतिकालांत प्रचारासाठीं काढलेलें 'प्रवदा' (सत्य) पत्र अद्याप चाललेलें आहे. लेनिनचा मित्र व अनुयायी स्टॅलिन यानें लेनिननंतर समाजवाद दृढमूल करून रशियन राष्ट्राची उन्नति केली व समाजवादाची शिकवण रशियांत इतकेंच नव्हे तर पूर्व युरोप आणि पूर्व आशिया या खंडांत फैलावून लेनिनचें जीवितकार्य बहुतेक तडीस नेलें.

**लेनिनग्राड**—पूर्वीं या शहराला सेंटपीटर्सबर्ग आणि पेट्रोग्रॅड हें नांव होतें, व पूर्वीं तें रशियन साम्राज्याची राजधानी होतें. हें शहर फिनलंड आखातानजीक नेव्हा नदीच्या मुखाशीं असून या शहराचा मोठा भाग नेव्हा नदीच्या मुखाजवळील बेटावर बांधलेला आहे. येथें मुख्य देवस्थानें सेंट आयझॅक्स कॅथेड्रल, सेंट पीटर कॅथेड्रल व सेंट पॉल कॅथेड्रल हीं आहेत. शिवाय राजवाडेहि—विंटर पॅलेस, ओल्ड मायकेल पॅलेस, न्यू मायकेल पॅलेस, हार्मिटेज पॅलेस, इत्यादि अनेक आहेत. शिवाय येथें आर्सेनल, पेट्रो पाव्हलोस्कचा किल्ला, सायन्स अॅकेडमी, जुनी इंपीरियल लायब्ररी ह्या इमारती महत्त्वाच्या आहेत. येथें १८१९ सालीं स्थापलेली युनिव्हर्सिटी आहे. येथें पूर्वीं मोठा व्यापार चालत असे व परदेशीं जाणारा मुख्य माल इमारती लांकूड, अंडीं, अन्नधान्यें, खनिज तेल, व हातऱ्या हा होय. रशियांतील सर्व भागांकडे व युरोपकडे दळणवळण असलेल्या अनेक रेल्वे येथून सुरू होतात. सेंटपीटर्सबर्ग शहर, पीटर दि ग्रेट बादशहानें १७०३ सालीं स्थापिलें. पण शिल्पकलेच्या दृष्टीनें हें शहर शोभिवंत करण्याचें मोठें कार्य दुसऱ्या कॅथराइननें केलें. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर त्या जुन्या नांवाऐवजीं या शहराला पेट्रोग्रॅड हें नवें नांव देण्यांत आलें. १९१७ सालीं पेट्रोग्रॅड शहर रशियन क्रांतिकारकांच्या तुफानी चळवळींचें केंद्र बनलें. कांहीं काळ तें शहर सोव्हिएट सरकारचें मुख्य ठाणें होतें. १९२४ सालीं लेनिन वारल्यावर या शहराला लेनिनग्राड हें नांव देण्यांत आलें. लोकसंख्या ३१,९१,३०४.

**लेप्टिस**—या नांवाचीं प्राचीन आफ्रिकेंत दोन शहरें होतीं. एक नवें व दुसरें जुनें याप्रमाणें वसलीं होतीं. जुनें लेप्टिस चांगलें बंदर असून सिडोनियनांनीं तें स्थापलें. या ठिकाणीं पुढें रोमन लोकांनीं आपलें ठाणें केलें होतें. अद्यापि तट, गोद्या, नाटकगृहें, इ. चे अवशेष पाहावयास मिळतात.

**लेफ्टनंट**—एक लष्करी अधिकारी. भूदलांत ही पदवी कर्नलच्या खालची आहे. आरमारांत लेफ्टनंट हा अधिकारी लेफ्टनंट-कमांडर याच्यानंतरचा वरच्या दर्जाचा होय.

**लेफ्टनंट-कर्नल**—ब्रिटिश भूदलांत हा कर्नलच्या खालचा, आणि मेजरच्या वरचा अधिकारी होय. एका रेजिमेंटवर किंवा बॅटॅलियनवर त्याची प्रत्यक्ष हुकमत असते, आणि तेवढ्या सैनिकांची शिस्त, लष्करी शिक्षण, आणि त्यांच्या सुखसोयी यांची जबाबदारी त्याच्यावर असते, आणि ती रेजिमेंट सुव्यवस्थित ठेवण्याबद्दल हरएक प्रकारच्या बाबतींत तोच जबाबदार असतो.

**लेबानॉन**—१. सिरिआमधलें एक लोकसत्ताक संस्थान. राष्ट्रसंघानें तें पहिल्या महायुद्धानंतर फ्रेंच मॅंडेटखालीं दिलें आहे. पूर्वीं तें सिरिआचाच एक भाग होतें. १९२० सालीं तें स्वतंत्र संस्थान बनविण्यांत आलें. क्षेत्रफळ ४३०० चौरस मैल. मुख्य ठिकाण बैरूट. लो. सं. १०,४७,७४५. यापैकीं ४,३४,७०५ मुसलमान आहेत. बैरूट येथें दोन विद्यापीठें (१ फ्रेंच व १ अमेरिकन) आहेत.

२. सिरियामधील एक पर्वतश्रेणी. ही १०० मैल लांब असून भूमध्यसमुद्राला समांतर अशी जाते. सर्वसाधारण उंची ७,००० फूट आहे. सॉलोमनचें लांकडी देवालय वर आहे.

**लेमूर**—लेमूर हें नांव सामान्यतः माकड, वानर व मनुष्य या प्राण्यांचा पूर्वज म्हणून मानण्यांत येणाऱ्या एका प्रकारच्या प्राथमिक अवस्थेंतील प्राण्यास देण्यांत येतें. खरा लेमूर हा प्राणी वास्तविक चार पायांवर चालतो. अशा तऱ्हेचे प्राणी मादागास्कर व कॉमोरो बेटें यांमध्यें आढळतात, परंतु या वर्गांतील कांहीं प्राणी आशियामध्येंहि दृष्टीस पडतात. हे सामान्यतः झाडींत राहतात व त्यांचें भक्ष्य वनस्पती व प्राणी या दोन्ही प्रकारचें असतें. माकड पाहा.

**लेम्बर्ग**—हें शहर पोलंडमध्यें गॅलिशिया जिल्ह्याची राजधानी आहे. हें शहर १२५९ सालीं स्थापण्यांत आलें. पहिल्या महायुद्धांत या शहरावर सर्व प्रमुख राष्ट्रांचें लक्ष वेधल्यामुळें तें शहर ताब्यांत घेण्याकरितां तेथें फार भयंकर लढाया झाल्या. तेथें १६६१ सालीं स्थापन झालेली युनिव्हर्सिटी आहे. येथें मुख्य कारखाने लोखंडी माल, यंत्रें, चामडीं व मेणबत्त्या यांचे आहेत. लोकसंख्या ३,१६,७१७ आहे.

**लेले, काशीनाथ वामन** (मृ. १९१८)—एक महाराष्ट्रीय संस्कृत पंडित. हे वांईतील एका श्रौती घराण्यांतील असून यांचें संस्कृत, वैदिक आणि पौराणिक अध्ययन फार खोल असे.

'आर्यधर्मदर्पण', 'आर्यधर्मरहस्य', 'धर्म,' इ. नियतकालिकें आपल्या मोदवृत्त छापखान्यांतून काढीत. यांनीं कांहीं वेद आणि पुराणें यांचीं मराठी भाषांतरें प्रसिद्ध केलीं आहेत. हे स्वतः अग्निहोत्री असून यांनीं एक सोमयागहि पार पाडला होता.

**लेले, विसाजी रघुनाथ** (१८२७-१८९५)--एक महाराष्ट्रीय ज्योतिषी. हे सायनवादी होते व ग्रहलाघवाच्या साहाय्यानेंच कांहीं वर्षे सायन पंचांग करीत. पुढें नॉटिकल अल्मॅनॅकवरून करूं लागले.

**लेव्ही, सिल्व्हन लुई** (१८६३-१९३६)— सुप्रसिद्ध फ्रेंच प्राच्यविद्यापंडित व इतिहाससंशोधक. १८९० सालीं यांनीं डॉक्टर ऑफ लेटर्सची पदवी मिळवली. सुप्रसिद्ध फ्रेंच संस्कृत पंडित अबेल बर्ग्ने यांच्या सहवासामुळें यांना संस्कृत भाषा व बौद्ध धर्म यांची गोडी लागली. पुढें अबेल बर्ग्ने यांच्या मृत्यूनंतर फ्रेंच एशियाटिक सोसायटीच्या कौन्सिलवर त्यांच्या जागीं यांनाच नेमण्यांत आलें. तेव्हांपासून आपल्या प्राच्यविद्याविषयक कार्यास यांनीं सुरवात केली. १९०४ सालीं हे 'एकोल दे होत एत्यूद' व नंतर 'कॉलेज द फ्रान्स' मध्यें संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम करूं लागले. याच वेळीं यांनीं चिनी, तिबेटी, पाली व संस्कृत या भाषांचे वर्ग सुरू केले व 'एकोल फ्रान्सेझ देक्सत्रीम ओरिआन्त' या संस्थेची स्थापना केली. ही संस्था यांनीं हिंदी संस्कृतीचे अध्ययन करण्याच्या हेतूनेंच निर्माण केली. मध्य आशियांतून तोखारी व कौटचि भाषांसंबंधीं हस्तलिखितें मिळवून यांनीं त्या भाषांचें संशोधन केलें. यांच्या या संशोधनाला पुढें ऑरेल स्टाइन यांच्या संशोधनाचाहि आधार मिळाला. जावा, कॅम्बोडिया, सुमात्रा, बोर्नियो यांसारख्या दूरदूरच्या देशांत स्थापन झालेलीं हिंदु राज्यें व ब्रह्मदेश, सयाम, चंपा, जावा, इत्यादि देशांतील लिपी, भाषा व वाङ्मय यांवर महत्त्वपूर्ण प्रकाश टाकण्याची कामगिरी यांनीं केली आहे. भारतीय नाट्य, यज्ञ, भारत यांसारखे ग्रंथ फ्रेंच भाषेंत यांनीं लिहून भारताचा मोठा गौरव केला. त्यांचे कांहीं इंग्लिश भाषेंतहि ग्रंथ आहेत.

**लेसिंग, गॉटहोल्ड एफ्राइम** (१७२९-१७८१)—एक जर्मन नाटककार, टीकाकार व पंडित. यानें एका पुस्तकविक्याला हाताशीं धरून टीकाविषयक नियतकालिक काढलें. १७५५ त इंग्रज जीवनाला धरून असलेली 'मिस सारा सॅम्पसन' नांवाची शोकान्तिका प्रसिद्ध केली. 'लाओकून' या ग्रंथांत त्यानें काव्य आणि चित्रकला यांच्या मर्यादा व यांतील भेद दाखवून दिले आहेत. या पुस्तकाचा जर्मनांची वाङ्मयीन अभिरुचि बदलविण्याच्या कामीं चांगला उपयोग झाला. १७५७ मध्यें राष्ट्रीय नाट्यगृहांचा अधिकारी झाल्यावर त्यानें नाट्यशास्त्रावर एक प्रबंध लिहिला. फ्रेंचांच्या आवडीनावडींचें अंधानुकरण जें जर्मन ग्रंथकारांनीं चालविलें होतें त्याला आळा घालण्याचा लेसिंगचा मुख्य उद्देश असे. पण यामुळें त्याच्या लिखाणांत अतिरेकाचा दुर्गुण नकळत शिरला.

**लेस्ली, सर जॉन** (१७६६-१८३२)—एक स्कॉटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व गणितशास्त्रज्ञ. त्यानें भेदोष्णमापक (डिफरेन्शियल थर्मामीटर), आणि आर्द्रतामापक (हायग्रोमीटर), हीं दोन नवीं यंत्रें तयार केलीं. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते— 'एसे ऑन नेचर अॅन्ड प्रोपॅगेशन ऑफ हीट' (उष्णतेचा धर्म व प्रसार यांवर निबंध), 'फिलॉसफी ऑफ अॅरिथमेटिक' (अंकगणिताचें तत्त्वज्ञान), आणि 'रूडिमेंट्स ऑफ जीऑमेट्री' (भूमितीचीं मूलतत्त्वें).

**लेह**—१. पंजाब, मियानवाला जिल्ह्यांतील एक शहर. हें मिरानी बलुचीनें वसविलें असें म्हणतात. शीखांच्या अमदानींत याला चांगलें महत्त्व होतें. या ठिकाणीं कांबळी विणण्याचा मोठा धंदा आहे.

२. काश्मीर, लदख प्रांतातील मुख्य शहर. पंजाब, चिनी तुर्कस्तान आणि ल्हासा यांमधील व्यापाराचें हें मध्यस्थान आहे. लो. सं. सुमारें ३,०००.

**लैख**—ब्रह्मदेश, दक्षिण शान संस्थानांतील एक मोठें संस्थान. क्षे. फ. १४३३ चौ. मै.. बहुतेक प्रदेश डोंगराळ आहे. नमटेंग नदी यांतून वाहते. संस्थानांत लोखंडी माल बनवितात. हें लोखंड पनलांग नदीच्या पश्चिमेस पुष्कळ सापडतें. लो. सं. सुमारें २५,०००. मुख्य ठिकाण खावबा आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें अर्धा लाख असावें.

**लैंगिक अपात्रतेचा कायदा**—(सेक्स डिस्क्वालिफिकेशन अॅक्ट). पूर्वी इंग्लंडांत स्त्रियांना अनेक बाबतींत अपात्र मानीत असत. १९१८ च्या 'दि रिप्रेझेंटेशन ऑफ दि पीपल अॅक्ट' या कायद्यानें स्त्रियांना मतदानाचा हक्क बऱ्याच प्रमाणांत देण्यांत आला. १९१८ चा 'क्वॉलिफिकेशन ऑफ वीमेन अॅक्ट' या कायद्यानें कॉमन्स सभेचे सभासद होण्याचा हक्क स्त्रियांना देण्यांत आला. १९१९ च्या 'सेक्स डिस्क्वॉलिफिकेशन (रिमूव्हल) अॅक्ट' या कायद्यानें स्त्रियांना स्त्रीत्वामुळें जी अनेक बाबतींत अपात्रता पूर्वी असे ती नाहींशी करण्यांत आली व पुढील हक्क देण्यांत आले : १ मुलकी किंवा न्यायखात्यांत कोणतीहि अधिकाराची किंवा साधी नोकरी; २ कोणताहि उद्योग किंवा धंदा; ३ सरकारांत नोंदलेल्या कोणत्याहि संस्थेचें सभासदत्व; ४ ज्यूरर म्हणून काम करण्याचा हक्क; ५ सॉलिसिटरचा धंदा; ६ युनिव्हर्सिटींत सभासदत्व, किंवा परीक्षा, पदवी किंवा अधिकार. येणेंप्रमाणें अनेक प्रकारचे हक्क

स्त्रियांना देण्यांत आले, आणि अशा अपात्रतेसंबंधींचे पूर्वींचे सर्व कायदे रद्द करण्यांत आले. हिंदुस्थानांत वरील प्रकारचे सर्व हक्क स्त्रियांना ब्रिटिश अमदानींतल्या कायद्यानें दिलेले आहेत. नवीन घटनेप्रमाणें स्त्रियांना या बाबतींत पुरुषांइतकेच हक्क ठेवले आहेत.

**लैंगिक संवरण**— ( सेक्शुअल सिलेक्शन ). हा जीवशास्त्रांतील सिद्धान्त असून तो प्रथम चार्लस डार्विन या शास्त्रज्ञानें प्रतिपादन केला. अपत्योत्पादन आणि प्राणिमात्रांत माशापासून वानर-मनुष्यापर्यंत होत गेलेला विकास, यामध्यें अप्रधान लैंगिक लक्षणांचा जो भाग येतो त्याचा व लैंगिक प्रकृतीचा अर्थ लावतांना लैंगिक संवरणाची उपपत्ति त्यानें दिली. डार्विननें आपल्या 'दि डिसेंट ऑफ मॅन अँड सिलेक्शन इन् रिलेशन टु सेक्स' या ग्रंथांतील दोनतृतीयांशाहून अधिक भाग 'लैंगिक संवरण' या सिद्धांताच्या स्पष्टीकरणाला दिला आहे. 'लैंगिक संवरण' म्हणजे अपत्योत्पादनाच्या बाबतींत कांहीं व्यक्तींना आपल्याच जातीच्या इतर प्राण्यांहून अधिक फायदेशीर संधि मिळते व या संधीवर 'लैंगिक संवरण' अवलंबून असतें. या डार्विनच्या उत्कृष्ट कल्पकतेच्या सिद्धांतामुळे १८७१ पूर्वी जीवशास्त्रात जे कित्येक कूटप्रश्न होते, त्यांचा उलगडा होतो, आणि अद्यापहि जीवशास्त्रांतील संशोधनकार्यांत याच डार्विनच्या सिद्धांतानें अनेक गोष्टींचें तर्कबुद्धीला पटणारें स्पष्टीकरण करण्यांत येतें.

**लोइलोंग**—ब्रह्मदेश, दक्षिण शान संस्थानांतील एक संस्थान. क्षे. फ. १६०० चौ. मै.. उत्तर-दक्षिणभाग डोंगराळ व जंगलमय आहे. मुख्य पीक तांदूळ आहे. लो. सं. सुमारें चाळीस हजार. संस्थानचें उत्पन्न पावलाखापर्यंत असावें.

**लोककथा**— आज लोककथांच्या अभ्यासाला मोठें महत्त्व प्राप्त झालें आहे. अलिखित, परंपरागत आलेल्या कल्पना, समजुती आणि चालीरीती सर्व समाजांतून आढळतात. यावरून समाजाची बाल्यावस्था व पुढें होत गेलेली प्रगति यांचा ग्रंथांतरीं न सांपडणारा इतिहास समजतो. जुनीं गाणीं, भुताखेतांच्या गोष्टी, कहाण्या व कांहीं वाक्प्रचार-या वाङ्मयावरून तसेंच वास्तुशिल्प, घरगुती भाषा, माणसांचे प्रकार व माणसानें केलेल्या गोष्टी यांच्या साहाय्यानें राष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचें नवीन ज्ञान होतें. पुराणांतल्या कथांतूनहि या वाङ्मयाचीं बीजें सांपडतील. या लोकवाङ्मयाला १९ व्या शतकापर्यंत कांहीं महत्त्व नव्हतें. जर्मनींतील भाषाशास्त्रज्ञ ग्रिमबंधु यांनीं जेव्हां अशा लोककथा प्रसिद्ध केल्या ('मार्शेन' १८१२-१५) तेव्हा कोठें इतर साहित्यिकांचें त्यांकडे लक्ष गेलें. ट्युटॉनिक, ग्रीक आणि भारतीय दंतकथा इंडो-युरोपीय गटांतील असल्याचें त्यांनीं दाखवून दिलें. पुढें ख्रिस्ती धर्म येण्यापूर्वी समाजांत ज्या प्राचीन धार्मिक पद्धती अस्तित्वांत होत्या त्यांचे अवशेष कृषिवलांच्या जीवनांतून व राहणींतून आढळून येत असल्याचें मॅनहार्टनें सिद्ध केलें. टेलर, लँग, फ्रेझर, वगैरेंनीं धर्मांचा तौलनिक अभ्यास करतांना लोककथांतील हलक्या समजल्या जाणाऱ्या पुराणांचें महत्त्व कसें आहे हें पटवून दिलें. कांहीं विद्वानांच्या मतें प्राचीन काळीं, आज एकमेकांपासून फार दूर असलेल्या लोकसमाजांत दळणवळण असलें पाहिजे व त्यामुळेंच त्यांच्या लोकवाङ्मयांत साम्य दिसून येतें. उदाहरणार्थ, ईजिप्त देशांत ज्याचा शोध लागला असें मानण्यांत येतें तें कुंभाराचें चाक, युरोप आणि आशिया खंडांतील ज्या संस्कृति-केंद्रांतून हें चाक पुढें वापरण्यांत आलें त्या केंद्रात आढळणाऱ्या एका संमिश्र संस्कृतीला धरून असल्याचें लौफर हा अमेरिकन प्राच्यविद्याविशारद दाखवून देतो. याप्रमाणें लोकवाङ्मयाचें एक शास्त्र बनलें आहे. व धार्मिक कल्पनासंकेतचिन्हें, राजकीय संस्था, वैद्यक-ज्योतिष-रसायनादि शास्त्रें व संगीत, चित्रकर्म, शिल्प, इत्यादि कला, यांच्या वाढीचा इतिहास समजून घेण्यास त्याची आवश्यकता भासते. आपल्या हिंदुस्थानांत लोककथा आणि लोकगीतें यांकडे प्रथम लक्ष गेल्या शतकाच्या पूर्वार्धांत इंग्रज लेखकांनींच दिलें. सर रिचर्ड टेंपल व क्रूक यांनीं पंजाब व उत्तर हिंदुस्थान यांतील दंतकथा, लोकाचार, धार्मिक समजुती, इ. जमा करून ग्रंथ छापले. थर्स्टन यानें दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व जातींची माहिती गोळा करून त्यांचें प्राचीन अलिखित वाङ्मय विद्वानांपुढें आणलें. लालबिहारी डे यांनीं बंगालच्या लोककथा प्रसिद्ध केल्या. तथापि हे सर्व प्रयत्न उसने म्हणतां येतील. प्रत्यक्ष आपल्यांतील संशोधकांचें लक्ष तिकडे जावें तसें गेलें नव्हतें.

महाराष्ट्रांत वि. का. राजवाडे आणि इस्लामपूरचे वासुदेवराव मुंडले यांनीं भारत इतिहास संशोधक मंडळाच्या नियतकालिकांतून अस्सल लोकगीतें प्रसिद्ध केलीं. बदलापूरचे ना. गो. चापेकर यांनीं 'आमचा गांव' या ग्रंथांत निरनिराळ्या जातींतील जन्म-लग्न-उत्तरक्रियादि संस्कारांच्या वेळचीं गाणीं व गोष्टी पुष्कळच एकत्र करून दिल्या. महाराष्ट्र-ग्रंथसूचीकार शं. ग. दाते यांनीं 'लोककथा' या नांवानें कोंकणांतील लोकवाङ्मयाचे दोन भाग प्रसिद्ध करून या वाङ्मयाला जोराची चालना दिली. डॉ. इरावतीबाई कर्वे, साने गुरुजी, दुर्गाबाई भागवत, भिडे, यांनीं घरगुती जात्यावरचीं व इतर बायकी गाणीं मोठ्या कसोशीनें गोळा करून प्रसिद्ध केलीं. 'आनंद'कार वा. गो. आपटे व 'बालोद्यान'कार सहस्रबुद्धे यांनीं आपल्या बालमासिकांतून मुलांमुलींचे जुने खेळ, आजीबाईंच्या गोष्टी, प्राण्यांच्या जुन्या गोष्टी, वगैरे देण्याचा उपक्रम केला.

एवढे प्रयत्न झाले तरी या लोकवाङ्मयाचा पद्धतशीर संग्रह आणि अभ्यास अद्यापि होत नाहीं असें म्हणणें भाग आहे. बहुतेक खालच्या जातींतून कहाण्या असतात. त्या जमवून त्यांचें सामाजिक व वाङ्मयीन संशोधन झालें पाहिजे.

**लोकनाथ**—एक आयुर्वेदीय औषध. पारागंधक कज्जली, कपर्दिक, टांकणखार लाही हीं औषधें लिंबाच्या रसांत खलून तयार करतात. क्षयरोगावर हें एक चांगल्यापैकीं औषध आहे. क्षयामुळें उत्पन्न झालेला जुनाट अतिसार, अरुचि, तोंडाला पाणी सुटणें, मुरडा येणें, इत्यादि विकारांवर याचा चांगला उपयोग होतो. शरीरांतील ग्रंथी वाढल्या असल्यास त्यावरहि याचा उपयोग होतो. ·।· ते १ गुंज आल्याचा रस, साखर, मध, दाडिमावलेह यांबरोबर देतात.

**लोंकर**—लोंकरीची माहिती वैदिककालापासून असल्याबद्दल उल्लेख सांपडतात. उर्णा हा शब्द तेथें लोंकरीसाठीं आहे. ऋग्वेदानंतर याचा बराच उल्लेख आलेला आहे. गंधार देश मेंढ्याकरितां प्रसिद्ध होता. तसा परुष्णी (नदीकांठचा) देशहि लोंकरीकरितां प्रसिद्ध होता. मेंढ्यांच्या अंगावरील लोंकरीच्या गुच्छांना पर्वन् परुस् हा शब्द योजीत असत. 'लोंकरीसारखा मऊ' (उर्णम्रदस्) हें विशेषण सर्वसाधारण आहे. मेंढीला उर्णावती असें म्हणत. संहिता, ऋग्वेदोत्तर ग्रंथ आणि ब्राह्मण ग्रंथ यांमध्यें वारंवार ऊर्णसूत्राचा उल्लेख केलेला आहे. ऊर्णा हा शब्द मेंढ्याच्या लोंकरीलाच लावीत असत असें नाहीं तर बकऱ्याच्या केंसालाहि योजीत असत. वेदीवर अग्नीची स्थापना करतांना जे पदार्थ टाकीत त्यांत लोंकर आहे. सोमरस लोंकरींतून गाळीत. वैश्याचें जानवें लोंकरीचें असावें असें सूत्रग्रंथातून सांगितलें आहे. धार्मिक विधी करतांना सोवळें लोंकरीचें असावें असें धर्मशास्त्रांत आहे. अरबी व फारसी ग्रंथांतूनहि लोंकरीच्या कापडांचे उल्लेख आहेत. हें कापड बहुधा विणलेलें नसून लोंकर दाबून केलेलें असे. आज बुरणूस, फेल्ट अशाच रीतीनें करतात.

इंग्लंडमध्यें रोमन लोकांनीं हा धंदा वाढीस लाविला व मध्ययुगांत फ्लेमिश विणकर इंग्लंडांत आणून देशांतच कापड करण्याचा एकसारखा प्रयत्न इंग्लंडच्या राजांनीं केला व तो यशस्वी झाला. ऑस्ट्रेलिया आणि दक्षिण आफ्रिका या देशांतहि चांगली लोंकर तयार होते. १९२९ सालीं जगांत १९,००,००० टन लोंकर तयार झाली. तीपैकीं ५,७१,००० टन ऑस्ट्रेलियांतली होती. सिडने येथील लोंकरबाजार जगांत पहिल्या प्रतीचा आहे. रशिया, अमेरिका, अर्जेंटाइन, न्यू झीलंड, वगैरे देशांतहि लोंकर होते. हिंदुस्थानांत होणाऱ्या लोंकरींत तिबेटी मेंढ्यांची लोंकर सर्वांत उत्तम असते. तिला पशना म्हणतात. काश्मीर शालीविषयीं प्रसिद्ध आहे. या शालींना जगांत सर्व ठिकाणांहून मागणी येते, पण आज हा व्यापार नीट चालत नाहीं (शाली पाहा).

लोंकरीमध्यें जाडीभरडी, मध्यम व तलम असे तीन प्रकार आहेत. तंतूच्या लांबीवर व आकारावर हे अवलंबून असतात. मेंढ्या-बकऱ्यांच्या जातींप्रमाणें लोंकर मिळत असते. मेरिनो मेंढीपासून अत्यंत तलम लोंकर निघते. काश्मिरी बकऱ्यापासून मऊ रेशमी लोंकर मिळते व तिच्या शाली करतात.

मेंढ्यांच्या अंगावर सांपडणाऱ्या लोंकरीचे तिची लांबी, रंग व सफाईदारपणा यांस अनुसरून निरनिराळे वर्ग करण्यांत येतात. लोंकरीचें कापड विणतांना पहिली क्रिया म्हणजे ती कापून तिची निवड करणें व तिच्या लांबीप्रमाणें तिचें वर्गीकरण करणें हें होय. हें करीत असतांना लोंकरींतील केरकचरा, वाळू, वगैरे इतर पदार्थ काढून टाकून ती साफ करण्यांत येते. नंतर ती रुळामध्यें घालून सुकविण्यांत येते व चडविण्यांत येते. नंतर तिच्यामध्यें इतर तंतू मिसळण्यांत येऊन तिला तेल देण्यांत येतें व पुन्हां दाबण्यांत येते. यानंतर ती पिंजण्यांत येते. या पिंजण्याच्या यंत्रातच तिचे लांब पेळू बनविण्यांत येतात. नंतर या पेळूंपासून सूत काढण्यांत येऊन त्याचें कापड विणण्यांत येतें. या कापडावरहि अनेक क्रिया करण्यांत येऊन त्याचें आवश्यक अशा प्रकारांत रूपांतर करण्यांत येतें. इंग्लंडमध्यें लोंकरीच्या विणकामाचा धंदा मोठ्या प्रमाणांत असून तो यॉर्क परगण्यांत आहे.

**लोकशाही**—इंग्रजी 'डेमॉक्रसी' हा शब्द मूळ ग्रीक शब्द 'डेमॉस' म्हणजे लोक आणि 'क्रॅटिएन' म्हणजे राज्य करणें या दोन शब्दांपासून बनला आहे. याचा अर्थ लोकांनीं चालविलेला राज्यकारभार असा आहे. लोकशाही दोन प्रकारची असते: एक प्रकार प्रत्यक्ष लोकशाहीचा (डायरेक्ट डेमॉक्रसी)-म्हणजे प्राथमिक लोकसभांनीं राजकारभार चालवणें; आणि दुसरा प्रकार लोकांनीं निवडून दिलेल्या प्रातिनिधिक संस्थांनीं राज्यकारभार चालवणें (इनडायरेक्ट डेमॉक्रसी). आइसलंडमध्यें पार्लमेन्ट ही संस्था १००० हून अधिक वर्षें चालू आहे. लोकशाही राज्यपद्धति प्रथम इंग्लंडांत १४ व्या शतकांत सुरू झाली. नंतर १६ व्या व १७ व्या शतकांत राजकीय तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ निर्माण होऊन इंग्लंडच्या लोकशाही राज्यपद्धतींत सुधारणा झाली. पुढें १८ व्या शतकांत इंग्लिश लोकशाहीच्या कल्पनांनुसार अमेरिकेंत आणि फ्रान्समध्यें राजक्रांति झाली. १९ व्या शतकांत सुधारलेल्या बहुतेक देशांनीं लोकशाही राज्यपद्धति सुरू केली.

लोकशाही राज्यपद्धतीचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, राजसत्तेची लेजिस्लेटिव्ह (कायदे करणें), एक्झिक्युटिव्ह (कायद्यांची अमलबजावणी करणें), व ज्यूडिशियरी (कायद्याप्रमाणें न्याय

देणें ), याप्रमाणें तीन ठिकाणीं विभागणी करण्यांत येते. कायदे करण्याचा अधिकार लोकांनीं निवडलेल्या पार्लमेन्टला असतो आणि अमलबजावणीचा अधिकार लोकांना जबाबदार असलेल्या सरकारला म्हणजे प्रधानमंडळाला असतो. प्रधानमंडळ पार्लमेन्ट-मधील बहुसंख्याक पक्षाकडून बनवलें जातें. अशा सरकारला पार्लमेन्टरी ऊर्फ कॅबिनेट गव्हर्नमेन्ट म्हणतात. अशा प्रकारचें सरकार ब्रिटनमध्यें आहे. यु. एस्. अमेरिकेमध्यें सरकार प्रत्यक्ष लोकांकडून निवडलें जातें ; कारण अध्यक्ष मतदार निवडतात. या पद्धतीला 'प्रेसिडेन्शियल गव्हर्नमेन्ट' म्हणतात. लोकशाही राज्यपद्धतींत लोकांचा मुख्य राजकीय हक्क प्रतिनिधी निवडणें हा असल्यामुळे मतस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य आणि संघस्वातंत्र्य हे नागरिकांचे मूलभूत हक्क राज्यघटनेंत मान्य केलेले असतात. लोकशाही राज्यपद्धतींत सरकारविरोधी पक्षाचें अस्तित्वहि मान्य करावें लागतें.

आधुनिक काळांत लोकशाही राज्यपद्धतींचे लोकसत्ताक ( रिपब्लिक ) आणि सनदशीर राजसत्ताक ( कॉन्स्टिटयूशनल मॉनर्की ) असे दोन प्रकार आहेत. या दोन्ही प्रकारच्या राज्यपद्धतींत मूलभूत तत्त्व एकच आहे तें हें कीं, राज्य-कारभाराची अंतिम सत्ता लोकांच्या हातीं असावी. अलीकडे देशांतील आर्थिक सत्ता बड्या बड्या आणि संख्येनें थोड्या भांडवलदारांच्या हातीं जाऊन सरकारवर ह्या भांडवलदारांचें अप्रत्यक्ष नियंत्रण कित्येक देशांत चालू झालें आहे. त्यामुळें श्रम-जीवी शेतकरी-कामकरी वर्गांनीं आपले संघ बनवून अनेक देशांत जोरदार चळवळी भांडवलशाहीला विरोध करण्याकरितां सुरू केल्या. रशियामध्यें भांडवलदार वर्ग नष्ट करून लोकशाही-ऐवजीं शेतकरी-कामकरी वर्गानें राज्यक्रांति करून सोव्हिएट ऊर्फ समतावादी राज्यपद्धति स्थापन केली आहे.

लोकशाहीच्या राज्यपद्धतींत सुधारणा करण्याच्या अनेक सूचना पुढें आल्या आहेत. लोकशाहींतले मुख्य दोष तीन आहेत ते असे : ( १ ) पक्षभेद ( पोलिटिकल पार्टीज् ); ( २ ) दीर्घ-कालीन वादविवाद ; आणि ( ३ ) अतिमंद गतीनें निर्णय. मार्क्सनें लोकशाहींतील सदर तीन दोष नाहींसे करण्याचा एक-मेव उपाय समाजसत्तावादी राज्यपद्धति ( सोशॅलिस्ट गव्हर्नमेंट ) स्थापन करणें हा आहे, असें प्रतिपादन केलें आहे.

प्राचीन भारतात गणराज्यें होतीं ( गणसत्ताक राज्य पाहा ). तसेंच ग्रीसमध्यें प्राचीन काळीं लहान लहान लोकराज्यें होतीं व त्यांत प्रत्येक नागरिकाला भाग घेतां येत असे. अँग्लो-सॅक्सन, व टयुटॉनिक टोळ्यांतूनहि अशाच प्रकारची शासनसंस्था असे. धर्मसंस्थेंतून पुढें प्रतिनिधिद्वारां राज्यकारभाराची प्रथा सुरू झाली व हीच प्रथा मोठाल्या राष्ट्रांतून चालू आहे. लोकशाही कारभारांतूनच विसाव्या शतकांत सर्वाधिकारित्व एका नेत्याला देण्याचा प्रकार पुढें आला. मुसोलिनी, हिटलर, स्टॅलिन हे असेच सर्वाधिकारी होत.

लोकशाही राज्यपद्धतीच्या विरुद्ध प्रकार म्हणजे एकसत्ताक ( ऑटॉक्रसी ) किंवा राजसत्ताक ( मॉनर्की ) पद्धति, आणि दुसरी अल्पसत्ताक ऊर्फ उमरावसत्ताक पद्धति ( ॲरिस्टॉक्रसी ). प्राचीन ग्रीस देशांत नगरराज्यें ( सिटी-स्टेट्स ) होतीं ; म्हणजे एकाच शहरांतील नागरिक सर्व राज्यकारभार चालवीत असत. उदा., अथेन्स शहरांतील नागरिकांना कायदे करण्यांचा व सरकारी अधिकाराच्या सर्व जागा भरण्याचा हक्क होता. पुढें या शहराची लोकसंख्या वाढूं लागल्यावर कांहीं विशिष्ट इसमांनाच नागरिकत्वाचा हक्क देण्यांत आला. तथापि राज्याचा विस्तार वाढला, व लहान राज्यांचीं साम्राज्यें बनलीं, तेव्हां ही पद्धति अव्यवहार्य ठरली ; आणि नंतर कांहीं काळ एकसत्ताक किंवा अल्पसत्ताक राज्यपद्धति चालू राहून शेवटीं लोकसत्ता उदयास आली.

लोकसत्ताक पद्धतीचा मूळ आरंभ इंग्लंडांत झाला, आणि इंग्लंडच्या पार्लमेंटरी राज्यपद्धतीचें अनुकरण अमेरिकन सं. संस्थानांनीं व ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींनीं आणि युरोपांतील अनेक देशांनीं केलें. रिपब्लिक किंवा लोकराज्य हा राज्यघटनेचा एक प्रकार आहे. या घटनेंत राज्यकारभाराची वरिष्ठ सत्ता वंशपरंपरागत राजाच्या हातीं नसून ती सत्ता प्रजाजनांकडेच दिलेली असते. या रिपब्लिक राज्यघटनेचे अनेक निरनिराळे प्रकार आहेत. फ्रान्स व पोर्तुगाल यांमध्यें युनिटरी कॉन्स्टिटयूशन आहे ; म्हणजे राज्यकारभाराचे सर्व अधिकार एकाच प्रातिनिधिक संस्थेकडे आहेत. कारण या दोन्ही देशांत एकाच जातीचे लोक आहेत. स्वित्झर्लंड, ब्राझील, जर्मनी आणि अमेरिकेंतील संस्थानें यांतून फेडरल कॉन्स्टिटयूशन आहे ; म्हणजे अनेक स्वतंत्र संस्थानांचा एक गट बनवून त्यांतून प्रातिनिधिक वरिष्ठ संयुक्त सरकार ( फेडरल गव्हर्नमेंट ) बनलें असतें. हल्लीं रशियांत देखील फेडरल रिपब्लिक या प्रकारची राज्यघटना आहे. पण ती नाममात्र असून राज्यकारभाराची खरी सत्ता अल्पसंख्याक पुढारीवर्गाच्या हातीं ( ऑलिगर्की ) आहे.

**लोकसंख्या**—जगाची लोकसंख्या साहाजिकच एकसारखी बदलत असते. सुधारलेल्या देशांतून खानेसुमारी घेतली जाते ( खानेसुमारी पाहा ) व तीवरून कांहीं राजकीय व सामाजिक निष्कर्ष काढले जातात. १९३९ सालीं जगाच्या ५,१२,३०,२१७ चौ. मैलांच्या जागेंत लो. सं. २,१६,९८,६८,००० इतकी होती. निरनिराळ्या खंडांतील देशांची लोकवस्ती त्या त्या ठिकाणीं दिलेली सांपडेल. युरोप खंडांत सर्वांत दाट लोकवस्ती

आहे व त्या खालोखाल आशिया येतो. सर्द, उष्ण हवेंत, जेथें तांदूळ पिकतो तेथें लोकवस्ती जास्त आढळून येईल ( उदा., चीन व जपान ). दुसरें, समशीतोष्ण हवामान व खनिज संपत्तीची समृद्धि अशा प्रदेशांत लोक जास्त जाऊन राहतात. ( उदा, पश्चिम युरोप, यु. एस्. ए. ). चीन, हिंदुस्थान आणि आफ्रिका या भागांत सर्वांत अधिक लोकवस्ती आढळेल. त्यामुळें तेथें नक्की खानेसुमारी करणेंहि कठिण पडतें.

युरोपांत पुरुषांपेक्षां स्त्रियांची संख्या जास्त मरते. याचें एक कारण असें देतात कीं, पुरुषांना टक्केटोणपे व अपघात सोसावे लागतात. उलट यु. एस्. ए. मध्यें पुरुष जास्त आहेत. कारण तेथें बाहेरून पुरुषच फार येतात. हिंदुस्थान, ईजिप्त आणि जपान या देशांत पुरुष जास्त मरतात याचें कारण स्त्रियांमध्यें मृत्युसंख्या फार आहे. गेल्या महायुद्धानंतर युरोपांत स्त्रियांची किती संख्या वाढली तें पाहा—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सोव्हियेट रशिया | १३४ | स्त्रिया व | १०० | पुरुष हें प्रमाण |
| बर्लिन | १४६ | ,, | १०० | ,, ,, |
| ब्रिटन | ११९ | ,, | १०० | ,, ,, |
| जर्मनी | १२५ | ,, | १०० | ,, ,, |

जर्मनींत २० ते ४० वर्षें वयाच्या स्त्रियांपैकीं शेंकडा ४० ते ४५ जणांचींच लग्नें होण्याचा संभव आहे.

लोकसंख्येची विषम वांटणी—जगांत श्वेतवर्णी आणि श्वेतेतर यांची भू-प्रदेशांत वांटणी किती विषम आहे हें पुढील आंकड्यांवरून कळेल.

( १ ) श्वेतवर्णीय लोकांचे व त्यांच्या अंकित असलेले महत्त्वाचे प्रदेश—

| प्रदेश | क्षे. फ. (चौ. मै.) | लो. सं. (गेल्या २।३ वर्षांतले लोकवस्तीचे आंकडे) | दर चौ. मै. प्रमाण |
|---|---|---|---|
| ऑस्ट्रेलिया | २९,७४,५८१ | ७३,७८,३०१ ( तद्देशीय लोक ४७,००० ) | २·४ |
| कॅनडा | ३६,९०,४१० | १,१५,०६,६५५ | ३·१ |
| न्यू झीलंड | १,०३,७२३ | १७,१३,२२५ ( माओरी १ लाख ) | १७·१ |
| रशिया | ८७,०८,०७० | १९,१८,८८,४४५ | २२ |
| नॉर्वे | १,२४,५५६ | ३१,२३,३३८ | २५ |
| स्वीडन | १,७३,३७८ | ६७,६३,६८५ | ४२·७ |
| अमे. सं. संस्थानें | २९,७७,१२८ | १३,१६,६९,२७५ | ४४·२ |

( २ ) श्वेतेतर लोकांचे प्रमुख देश—

| | | | |
|---|---|---|---|
| चीन ( मांचुरियासह ) | ३३,८०,६९२ | ४५,७३,९०,००० | १३५·३ |
| फिलिपाइन्स | १,१५,६०० | १,८८,४६,८०० | १६४ |
| भारत | १२,१७,००० | ३३,७०,००,००० | २७६ |
| जपान | १,७५,५२१ | ७,४७,९८,५१७ | ४२६ |

भारतांत प्रतिवर्षी ५० लाख संख्या वाढते. जननप्रमाण हजारीं ३३·६ आहे तर मृत्युप्रमाण हजारीं २२·२ आहे. व बालमृत्युप्रमाण पूर्वी २४० होतें, तें १६३ पर्यंत खालीं आलें आहे.

सामान्य जीवमान—न्यू झीलंड ६८, ऑस्ट्रेलिया ६७, जर्मनी ६३, कॅनडा ६०, इंग्लंड ६५, जपान ५०, अमेरिका ६४, असें इतर देशांचें पडतें तर भारताचें जीवमान फक्त २६ आहे. चार मुलें जन्माला आलीं तर त्यांत ६० टक्केच जगतात. शिवाय एकंदर मृत्युसंख्याहि अधिक दिसून येते.

१९१८ सालीं एका इन्फ्ल्यूएंझानें १ कोटी ३० लाख लोक मेले. १८९१–१९०५ पर्यंतच्या दुष्काळांत १ कोटी लोक मेले. बंगालच्या १९३९ च्या दुष्काळांत ३५ लाख व इतरत्र १५ लाख लोक मेले. सर्व महायुद्धांतील हानीपेक्षां रोगराईची मरणसंख्या आपल्या देशांत जास्त आहे. शिवाय सुशिक्षितांना २·७ प्रमाणांत संतति तर शेतकरी-कामकरी यांना ४·३ प्रमाणांत संतति होते.

मृत्यूप्रमाणें प्रजावाढहि फार आहे, हें पुढील कोष्टकावरून समजेल—

प्रजावाढीचें कोष्टक

| साल | कोटी | साल | कोटी |
|---|---|---|---|
| १६०५ | १० | १९२१ | ३२ |
| १८७१ | २४ | १९३१ | ३५ |
| १८९१ | २८ | १९४१ | ३८ |
| १९०१ | २९ | १९४८ | ४१ कोटी ५० लाख |
| १९११ | ३१ | १९५० | ५० कोटी होईल. |

म्हणजे पहिल्या ६० वर्षांत प्रजावाढ ४० टक्के झाली तर १९२१ ते १९४१ या वर्षांत २७ टक्के प्रजावाढ झाली. पण प्रजावाढीप्रमाणें पिकाचें वाढतें प्रमाण पाहिजे तें नाहीं.

पीक-क्षेत्र-वाढ—१९०१ सालीं ६१ टक्के, १९११ सालीं ७२ टक्के, व १९४० सालीं ७५ टक्के इतकी होती. म्हणजे पीक-क्षेत्रवाढ १४ टक्के तर प्रजावाढ ४० टक्के झाली.

पण पिकाऊ जमीन-क्षेत्र दर माणशीं भारतांत ०·८६ एकर तर अमेरिकेंत ३·१ एकर आहे व किमान अन्नाला तर माणशीं १·२ एकर लागते. म्हणजे क्षेत्र कमी होत चाललें आहे. तेव्हां यापुढें ३० टक्के अन्नधान्य–वाढ पाहिजे.

भारतेतर देशांची प्रजावाढ (शेंकडा)—रुमानिया २८३; न्यू झीलंड १७२; ऑस्ट्रेलिया १६६; रशिया ११७; युरोप (रशिया वगळून) ६४; अमेरिका ११५; जपान ११३; हॉलंड ९०; इंग्लंड ७७; जर्मनी ६०. तर भारताची अवघी ३० टक्केच प्रजावाढ झाली. पण इतकें असून भारतांत दुर्भिक्ष आहे!

**लोकालोक**—दाक्षिणेकडील एक पौराणिक पर्वत. याच्या आंतल्या अंगास प्रकाश आहे व सप्तमहाद्वीपें, सप्तमहासमुद्र, मानसोत्तर पर्वत आणि कांचनभूमि, इ. याच्या पोटांत आहेत.

**लोखंड**—एक सुप्रसिद्ध व अत्यंत उपयुक्त धातु. पूर्ववैदिक काळांत लोखंड माहीत होतें कीं नाहीं व 'अयस्' हा शब्द कोणत्या धातूचा बोधक आहे, हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. या शब्दावरून लोखंडापेक्षां 'ब्रॉंझ' धातूचाच बोध होतो. लोखंडाला श्याम अयस् किंवा नुसतें श्याम असें म्हणतात व तांब्याला लोहायस् अथवा लोहितायस् असें म्हणतात. कुदळ वगैरे श्याम रंगाच्या अयस्ची करीत व लोहित-अयस् हें ताम्र, असें सायणभाष्यांत म्हटलें आहे. यावरून लोहित म्हणजेच ब्रॉंझ धातु असावा. ऋग्वेदांत 'अयोमुख इषु' असा उल्लेख आहे. म्हणजे बाणाच्या टोंकाला लोखंड लावीत असत असें दिसतें. (लोहयुग पाहा). जगांत अशोधित लोखंडापासून शुद्ध लोखंड करण्याची कृति प्रथम हिंदुस्थानांतच निघाली असें बहुतेक संशोधकांचें मत आहे. साठ फूट लांबीचे लोहस्तंभ, हत्यारांना लागणारें पोलाद व सर्वत्र असलेल्या लोखंडाच्या खाणी यांवरून आजच्याप्रमाणें लोखंडाच्या जिन्नसांसाठीं परदेशांकडे धांव घ्यावी लागत नसे हें उघड होतें.

या महत्त्वाच्या खनिज धातूचा परमाणुभारांक ५५·८४ व द्रवणबिंदु १५०५° शत. आहे. पुष्कळ खनिजांशीं बहुतांशीं संयुक्त असलेला पण क्वचित् शुद्ध धातुस्वरूपांत हा आढळतो. खडकांच्या रंगांत व प्राण्यांच्या रक्तांत लोखंड असतें. व्यापारी लोखंड हें अनेक अशोधितापासून काढतात. कर्ब, सिकित, गंधक व स्फुर हीं थोड्या प्रमाणांत त्यांत असतात. चुंबकीय लोहखनिज, हेमॅटाइट किंवा परावर्तक रक्त खनिज, पिंगट (हेमॅटाइट) खनिज, स्फॉथिक खनिज, पायराइट (सुवर्णमुखी) हीं मुख्य लोह-अशोधितें (ओअर) होत. लोखंड गाळण्याची कला फार प्राचीन काळीं माहीत होती. प्रथम लोखंड जें गाळतात तें बीड किंवा 'डुकरी' (पिग्) लोखंड म्हणून तयार होतें. हें बिडाचें लोखंड ओतीव कामासच उपयोगी पडतें. हें ठिसूळ असल्यानें यापासून पुन्हां कावी करून व इतर द्रव्यें काढून घडीव लोखंड बनवितात. हें लोखंड मात्र शुद्ध निर्मळ असतें.

लोखंड साध्या उष्णमानांत गंजतें व नत्राम्लांत लगेच विरघळतें. लोखंड आणि पोलाद हीं ओळखणें कठिण जातें. अनुभवी कारागीर आवाज काढून ओळखतात. यापेक्षां कमजोर नत्राम्ल किंवा गंधकाम्ल वर टाकून तावडतोच परीक्षा होते. धातूवर जर कांहीं परिणाम झाला नाहीं तर लोखंड समजावें. कारण पोलादावर अम्लाचे डाग पडतात.

जगांतील लोखंड तयार करणारे मुख्य देश म्हणजे अमेरिकन संयुक्त संस्थानें, ग्रेट ब्रिटन, जर्मनी, फ्रान्स व बेल्जिअम होत. जगांत सुमारें ६ कोटी टन लोखंड दरसाल तयार होतें. यापैकीं ½ अमेरिकन संयुक्त संस्थानांत होतें. ब्रिटिश साम्राज्यात ग्रेट ब्रिटन-आयर्लंडच्या खालोखाल हिंदुस्थानांत लोखंडाचें मोठें उत्पादन होतें. बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांत पाश्चात्य पद्धतीनें हें खनिज काढण्यांत येतें. १९३८ सालीं सुमारें २७ लाख टन लोखंड निघालें. १९४५-४६ सालांत ६ कोटी ६५ लाख रुपयांचें लोखंड आणि पोलाद बाहेरून आणावें लागलें. या आयातीचा आंकडा सारखा वाढत आहे. लहान खिळ्यांपासून मोठ्या यंत्रांपर्यंत सारेच लोखंडी जिन्नस आणावे लागत आहेत.

लोखंडाचा उपयोग यंत्रें, हत्यारें इ. कामीं मोठा आहेच. त्याचप्रमाणें औषधासाठींहि उपयोग आहे. लोह हें शक्तिवर्धक आहे (लोहभस्म पाहा).

काटकोनी लोखंड (ॲंगल आयर्न)—दोन्ही बाजूंमध्यें काटकोन करणाऱ्या लोखंडाच्या लांब पट्टीस काटकोनी लोखंड असें म्हणतात. या काटकोनी आकारामुळें त्या पट्टीची शक्ति व ताठपणा वाढतो. काटकोनी लोखंड एक, सव्वा, दीड, दोन आणि तीन इंची आकाराच्या पट्ट्यांमध्यें मिळतें व तें वजन करून विकण्यांत येतें.

लोखंडी तुळई (गर्डर)-दोन्ही बाजूंस आधारावर ठेवून अधांतरीं जो लांब लोखंडाचा वाशासारखा तुकडा वापरण्यांत येतो त्यास म्हणतात. सामान्यतः असल्या लोखंडी तुळया इंग्रजी 'आय' या वर्णाच्या आकाराच्या असतात. म्हणजे मधील भाग उभा असून त्यास खाल-वर आडवा पृष्ठभाग असतो व हा आडवा भाग थोडा अधिक जाड असतो. अलीकडे अशा प्रकारच्या तुळया एका विशिष्ट पद्धतीनें तयार करण्यांत येतात. व त्यास विशेष प्रकारचें पोलाद वापरण्यांत येतें. अशा तऱ्हेच्या तुळया निरनिराळे तुकडे रिबिटांनीं जोडूनहि तयार करण्यांत येतात.

**लोणार**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, एक गांव. मेहकरच्या दक्षिणेस हा १२ मैलांवर आहे. हें फार प्राचीन गांव असून याचें नांव विरजक्षेत्र होतें. लवणासुराला मारणाऱ्या दैत्यसूदनाचें देवालय शिल्पाच्या दृष्टीनें प्रेक्षणीय आहे. येथें खाऱ्या पाण्याचें सरोवर आहे.

भारतेतर देशांची प्रजावाढ (शेंकडा)—रुमानिया २८३; न्यू झीलंड १७२; ऑस्ट्रेलिया १६६; रशिया ११७; युरोप (रशिया वगळून) ६४; अमेरिका ११५; जपान ११३; हॉलंड ९०; इंग्लंड ७७; जर्मनी ६०. तर भारताची अवघी ३० टक्केच प्रजावाढ झाली. पण इतकें असून भारतांत दुर्भिक्ष आहे!

**लोकालोक**—दाक्षिणेकडील एक पौराणिक पर्वत. याच्या आंतल्या अंगास प्रकाश आहे व सप्तमहाद्वीपें, सप्तमहासमुद्र, मानसोत्तर पर्वत आणि कांचनभूमि, इ. याच्या पोटांत आहेत.

**लोखंड**—एक सुप्रसिद्ध व अत्यंत उपयुक्त धातु. पूर्ववैदिक काळांत लोखंड माहीत होतें कीं नाहीं व 'अयस्' हा शब्द कोणत्या धातूचा बोधक आहे, हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. या शब्दावरून लोखंडापेक्षां 'ब्रॉंझ' धातूचाच बोध होतो. लोखंडाला श्याम अयस् किंवा नुसतें श्याम असें म्हणतात व तांब्याला लोहायस् अथवा लोहितायस् असें म्हणतात. कुदळ वगैरे श्याम रंगाच्या अयस्‌ची करीत व लोहित-अयस् हें ताम्र, असें सायणभाष्यांत म्हटलें आहे. यावरून लोहित म्हणजेच ब्रॉंझ धातु असावा. ऋग्वेदांत 'अयोमुख इषु' असा उल्लेख आहे. म्हणजे बाणाच्या टोंकाला लोखंड लावीत असत असें दिसतें. (लोहयुग पाहा). जगांत अशोधित लोखंडापासून शुद्ध लोखंड करण्याची कृति प्रथम हिंदुस्थानांतच निघाली असें बहुतेक संशोधकांचें मत आहे. साठ फूट लांबीचे लोहस्तंभ, हत्यारांना लागणारें पोलाद व सर्वत्र असलेल्या लोखंडाच्या खाणी यांवरून आजच्याप्रमाणें लोखंडाच्या जिन्नसांसाठीं परदेशांकडे धांव घ्यावी लागत नसे हें उघड होतें.

या महत्त्वाच्या खनिज धातूचा परमाणुभारांक ५५·८४ व द्रवणबिंदु १५०५° शत. आहे. पुष्कळ खनिजांशीं बहुतांशीं संयुक्त असलेला पण क्वचित् शुद्ध धातुस्वरूपांत हा आढळतो. खडकांच्या रंगांत व प्राण्यांच्या रक्तांत लोखंड असतें. व्यापारी लोखंड हें अनेक अशोधितांपासून काढतात. कर्ब, सिकित, गंधक व स्फुर हीं थोड्या प्रमाणांत त्यांत असतात. चुंबकीय लोहखनिज, हेमॅटाइट किंवा परावर्तक रक्त खनिज, पिंगट (हेमॅटाइट) खनिज, स्पॅथिक खनिज, पायराइट (सुवर्णमुखी) हीं मुख्य लोह-अशोधितें (ओअर) होत. लोखंड गाळण्याची कला फार प्राचीन काळीं माहीत होती. प्रथम लोखंड जें गाळतात तें बीड किंवा 'डुकरी' (पिग्) लोखंड म्हणून तयार होतें. हें बिडाचें लोखंड ओतीव कामासच उपयोगी पडतें. हें ठिसूळ असल्यानें यापासून पुन्हां कांबी करून व इतर द्रव्यें काढून घडीव लोखंड बनवितात. हें लोखंड मात्र शुद्ध निर्मळ असतें.

लोखंड साध्या उष्णमानांत गंजतें व नत्राम्लांत लगेच विरघळतें. लोखंड आणि पोलाद हीं ओळखणें कठिण जातें. अनुभवी कारागीर आवाज काढून ओळखतात. यापेक्षां कमजोर नत्राम्ल किंवा गंधकाम्ल वर टाकून तावडतोब परीक्षा होते. धातूवर जर कांहीं परिणाम झाला नाहीं तर लोखंड समजावें. कारण पोलादावर अम्लाचे डाग पडतात.

जगांतील लोखंड तयार करणारे मुख्य देश म्हणजे अमेरिकन संयुक्त संस्थानें, ग्रेट ब्रिटन, जर्मनी, फ्रान्स व बेल्जिअम होत. *जगांत सुमारें ६ कोटी टन लोखंड दरसाल तयार होतें. यापैकीं ½* अमेरिकन संयुक्त संस्थानांत होतें. ब्रिटिश साम्राज्यात ग्रेट ब्रिटन–आयर्लंडच्या खालोखाल हिंदुस्थानांत लोखंडाचें मोठें उत्पादन होतें. बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांत पाश्चात्य पद्धतीनें हें खनिज काढण्यांत येतें. १९३८ सालीं सुमारें २७ लाख टन लोखंड निघालें. १९४५–४६ सालांत ६ कोटी ६५ लाख रुपयांचें लोखंड आणि पोलाद बाहेरून आणावें लागलें. या आयातीचा आंकडा सारखा वाढत आहे. लहान खिळ्यांपासून मोठ्या यंत्रांपर्यंत सारेच लोखंडी जिन्नस आणावे लागत आहेत.

लोखंडाचा उपयोग यंत्रें, हत्यारें इ. कामीं मोठा आहेच. त्याचप्रमाणें औषधासाठींहि उपयोग आहे. लोह हें शक्तिवर्धक आहे (लोहभस्म पाहा).

काटकोनी लोखंड (ॲंगल आयर्न)—दोन्ही बाजूंमध्यें काटकोन करणाऱ्या लोखंडाच्या लांब पट्टीस काटकोनी लोखंड असें म्हणतात. या काटकोनी आकारामुळें त्या पट्टीची शक्ति व ताठपणा वाढतो. काटकोनी लोखंड एक, सव्वा, दीड, दोन आणि तीन इंची आकाराच्या पट्ट्यांमध्यें मिळतें व तें वजन करून विकण्यांत येतें.

लोखंडी तुळई (गर्डर)—दोन्ही बाजूंस आधारावर ठेवून अधांतरीं जो लांब लोखंडाचा वाशासारखा तुकडा वापरण्यांत येतो त्यास म्हणतात. सामान्यतः असल्या लोखंडी तुळया इंग्रजी 'आय' या वर्णाच्या आकाराच्या असतात. म्हणजे मधील भाग उभा असून त्यास खाल–वर आडवा पृष्ठभाग असतो व हा आडवा भाग थोडा अधिक जाड असतो. अलीकडे अशा प्रकारच्या तुळया एका विशिष्ट पद्धतीनें तयार करण्यांत येतात. व त्यास विशेष प्रकारचें पोलाद वापरण्यांत येतें. अशा तऱ्हेच्या तुळया निरनिराळे तुकडे रिबिटांनीं जोडूनहि तयार करण्यांत येतात.

**लोणार**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, एक गांव. मेहकरच्या दक्षिणेस हा १२ मैलांवर आहे. हें फार प्राचीन गांव असून याचें नाव विरजक्षेत्र होतें. लवणासुराला मारणाऱ्या दैत्यसूदनाचें देवालय शिल्पाच्या दृष्टीनें प्रेक्षणीय आहे. येथें खाऱ्या पाण्याचें सरोवर आहे.

**लोणारी**—चुना आणि लांकडी कोळसा तयार करणारी जात. ही महाराष्ट्र आणि कर्नाटक यांतून आढळते. यांना गाढव लोणारी व रेडा लोणारी असेंहि म्हणतात. बेळगांवाकडे यांची मीठ नांवाची एक शाखा आहे. लो. सं. दहा हजार भरेल.

**लोणारी कोळसा**—( इं. चारकोल ). लांकडें एकावर एक रचून मधून मधून वाऱ्यासाठीं फटी ठेवतात व वर गवत रचतात. अशा भट्टीला जाळ लावून ठेवल्यानंतर कांहीं दिवसांनीं कोळसा तयार होतो. याप्रमाणें लांकूड अर्धवट जाळल्यानें कोळसा पडतो. आधुनिक सुधारलेल्या शास्त्रीय पद्धतीप्रमाणें बंद वक्रपात्रांत ( रेटॉर्ट ) लांकडाला उष्णता देतात. म्हणजे कोळशाखेरीज ज्वलनशील वायु, काष्ठमद्य, अग्निकाष्ठाम्ल ( पायरोलिग्निअस ॲसिड ) व डामर हीं द्रव्यें मिळतात. चांगला कोळसा पाहिजे तर चांगलीं बाभळीसारखीं लांकडें वापरतात. बंदुकीच्या दारूला जो कोळसा लागतो तो आल्डर, डॉगवुड यांसारख्या लांकडांचा करतात. जर चांगला कोळसा तयार झाला तर तो काळा कुळकुळीत, ठिसूळ व सच्छिद्र असतो. त्याला चव किंवा वास मुळींच नसतो व जळतांना जाळ किंवा धूर होत नाहीं. पाण्यांत हा विरघळत नाहीं किंवा बिघडत नाहीं, म्हणून पाण्यांतील लांकडी खांब प्रथम थोडे जाळतात. सच्छिद्रतेमुळें यांत हवा व इतर वायु दडून राहतात व तापविल्यास बाहेर पडतात. कोळसा हा दुर्गंधिनाशक, कृमिनाशक व वर्णनाशक आहे. पाणी शुद्ध करण्यासाठींहि हा वापरतात. कोळसा पाहा.

**लोणावळें**—मुंबई, पुणें जिल्हा, मावळ तालुक्यातील एक शहर. हें बोरघाटाच्या माथ्यावर जंगलभागांत आहे. येथें विजेच्या गाड्या होण्यापूर्वी मोठा आगगाड्या-दुरुस्तीचा कारखाना व आगगाड्यांवरच्या लोकांची बरीच वस्ती होती. येथें १८७७ पासून म्युनिसिपालिटी आहे. योगोपचार पद्धतीचें रुग्णालय, योगसंशोधन संस्था, एक हायस्कूल व प्राथमिक शाळा आहेत. थंड हवेचें ठिकाण म्हणून उन्हाळ्यांत येथें मुंबईकडील श्रीमंत लोक राहावयास येतात. भांगरवाडी आणि वळवण हीं दोन जीं मोठीं तळीं आहेत त्यांचें पाणी खोपोलीच्या टाटा कंपनीच्या विजेच्या कारखान्यासाठीं उपयोगांत आणलें आहे. लो. सं. ( १९४१ ) १०,८७६.

**लोणी**—दुधाचें प्रथम दहीं व नंतर तें घुसळून ताक आणि लोणी तयार करण्याची पद्धत आहे. पाश्चात्य पद्धतींत दुधाची मलई ( क्रीम ) आणि मलईचें लोणी अशी रीत आहे. ( मलई पाहा. ) लोण्यापेक्षां तूप जास्त काळ टिकत असल्यामुळें आपल्याकडे लोण्यापेक्षां तुपाचा वापर जास्त आहे, पण पाश्चात्य लोकांना तुपाची संवय नसल्यामुळें लोणी टिकविण्याकडे त्यांचें लक्ष असतें. व त्यासाठीं सिरका, टार्टारिक ॲसिड, किंवा नेहमींचें मीठ यांचा ते उपयोग करतात. शुद्ध लोण्यांत शें. ८०-९० चरबी व बाकीचें पाणी ( १३ पर्यंत ), केसीन व लवणें ( १% ) असतात.

गायीचें लोणी पिवळसर असतें. पुष्कळ वेळां असा रंग येण्यासाठीं हळद, केशर, मेरिगोल्डचीं पानें, कॅरटचा रस, इ. वापरतात. चांगल्या लोण्याला घाण कधीं येत नाहीं व तें लवकर पसरतें. लोण्यांत चवीसाठीं पाश्चात्य देशांत थोडें मीठ टाकतात. लोण्याबद्दल ओलिओ मार्जारिन वापरतात.

लोण्यामध्यें पौष्टिक गुण चांगला आहे. यामुळें आयुर्वेदांत औषधाच्या कामीं उपयोग करतात. मलमासाठींहि उपयोगी पडतें.

जगांत दरसाल चाळीस ते पंचेचाळीस टन लोणी तयार होतें. यापैकीं ¼ अमेरिकेंतलें आहे.

**लोदी घराणें** ( १४५०-१५२६ )—या हिंदुस्थानांतील मुसलमानी घराण्याचा संस्थापक बहलोलखान लोदी हा अफगाण व्यापारी घराण्यांतील होता. बहलोल प्रथम लाहोरचा सुभेदार होता. त्यानें पंजाब जिंकून दिल्लीचें तख्त मिळविलें ( १४५१ ). तो १४८९ त वारल्यानंतर त्याच्या मुलांत राज्याविषयीं तंटे सुरू झाले व शेवटीं सिकंदरशहा गादीवर बसला. त्यानें हिंदु राज्यें जिंकून आपलें साम्राज्य वाढविलें. त्यानें हिंदूंना पुष्कळ छळलें. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा इब्राहिम गादीवर आला. त्याच्या अमदानींत सरदार बंडखोर बनले व एकानें काबूलचा राजा बाबर यास बोलाविलें. १५२६ त पानपत येथें बाबरनें इब्राहिमचा पराभव करून लोदी घराणें बुडविलें.

**लोधा**—लोधी. एक शेतकरी जात. लो. सं. सुमारें १७ लाख असून ११ लाख संयुक्त प्रांतांत, ३ लाख वऱ्हाड-मध्यप्रांतांत व उरलेले राजपुताना, मध्य हिंदुस्थान भागांत आहेत. हे बुंदेले राजांस आपले नेते समजत व शेतकी करून राहत. पुष्कळ वेळां यांनीं दंगेधोपेहि केलेले आहेत. रजपुतांच्या संसर्गानें यांनीं आपल्यांत कांहीं अविवाह्य पोटजाती पाडल्या आहेत. उच्च कुलांतील लोधी विधवाविवाह निषिद्ध मानतात. कांहीं वर्ग मद्यमांस घेत नाहींत.

**लोध्र**—या झाडांत तांबडा व पांढरा अशा दोन जाती आहेत. झाडें कोंकण, बंगाल, नेपाळ या बाजूंस फार आढळतात. रंग व औषधें यांकडे लोध्राचा उपयोग करतात. आळित्यांत लोध्र घालतात. प्रदर, दंतरोग, जीर्णज्वर, वगैरे रोगांवर इतर औषधींबरोबर लोध्र घालतात.

**लोपामुद्रा**—अगस्ति ऋषीची पत्नी. ही सुंदर विदर्भराजकन्या होती. हिनें आपण होऊन अगस्तीला वरलें. व वनवासांतहि पतीची सेवा उत्कृष्ट केली. सतीचा ही एक आदर्श

**लोहपर्पटी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक-कज्जली व लोहभस्म, हीं मुख्य औषधें असतात. ही पर्पटी मुख्यत्वें-करून पांडुरोगावर जास्त उपयोगी पडते. रोगी अंगदीं फिका दिसणें, संग्रहणी, अतिसार, पोटांत दुखणें, पान्थरी वाढणें, मूळव्याध, कुष्ट, इत्यादि रोगांवर याचा चांगला उपयोग होतो. ।। ते १ गुंज मध, आल्याचा रस किंवा लोणी-खडीसाखर यांत देतात.

**लोहभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. पांडुरोगावरील हें एक प्रमुख औषध आहे. पांडुरोगामुळें आलेला अशक्तपणा, फिक्केपणा, ग्रहणी, मूळव्याध, सर्वसामान्य अशक्तपणा, पान्थरी वाढलेली असणें, धातुक्षय, शूळ, इत्यादि विकारांवर हें औषध अप्रतिम आहे. यांखेरीज क्षयरोग, कुष्ट, नपुंसकत्व, इत्यादि विकारांवर हें उपयोगी पडतें. १ ते २ गुंजा लोणी, खडीसाखर किंवा मध यांबरोबर देतात.

**लोहमग्नाश्म**—(पायरोक्सीनीज). अग्निजन्य व रूपांतरित खडकामध्यें आढळणारा हा एक महत्त्वाचा खनिज पदार्थांचा वर्ग आहे. यामध्यें ऑगाइट हा खनिज पदार्थ येतो. हे पदार्थ लोहमग्नयुक्त असून खट (कॅल्शियम), मग्न (मॅग्नेशियम), लोह आणि अल्युमिनम यांचे सिक्तित (सिलिकेट) आहेत.

**लोहयुग**—मानव संस्कृतीचें मापन मानवप्राणी धातू कधीं-पासून वापरूं लागला यावरून होतें. अश्मयुगानंतर (नूतन अश्मयुगाचीं सहा हजार वर्षें गेल्यानंतर) माणसाला तांबें, कथील व नंतर लोखंड यांचा उपयोग माहीत झाला असें समजतात. आफ्रिकेंत लोहयुग अश्मयुगानंतर लगेंच सुरू झालें असावें. युरोपांत भूमध्य समुद्राभोंवतालच्या देशांतून खि. पू. १,००० च्या सुमारास लोखंडाचें घडण होऊं लागलेलें दिसतें. अमेरिकेंत लोहयुग नव्हतेंच असें संशोधक समजतात. हिंदुस्थानांत वेदकाळीं (खि. पू. ५०००) लोखंड माहीत होतें असें 'अयस्' या शब्दावरून दिसतें. तथापि 'अयस्'चा अर्थ तांबें, ब्रॉंझ किंवा लोखंड यांपैकीं कोणता यांबद्दल संशोधकांत एकवाक्यता नाहीं.

**लोहाणा**—लुहाणा. एक जात. लो. सं. (१९११) ६,०५,४८२. मुख्य वस्ती सिंध, कच्छ, काठेवाड व गुजराथ या भागांत आहे. हे पंजाबमधून मुसलमानांच्या त्रासामुळें खालीं आले. सिंधचे लोहाणा लोक उच्च दर्जाचे असें मानलें जातें. यांचे उपाध्याय सारस्वत ब्राह्मण आहेत. यांच्यांत जातपंचायती आहेत. मजूर, माळी, शेतकरी, गवंडी अशा धंदेवाइकांत हे मोडतात. मुंबई भागांत व्यापार व दुकानदारी करतात.

**लोहार**—एक जात. लो. सं. (१९११) २०,७०,३७२. यांचा जुना पिढीजाद धंदा शेतकीचीं हत्यारें करण्याचा आहे. खेड्यांतून यांना 'अलुतें' मिळत असतें. यांच्यांत सुमारें पावणेचार लाख लोक मुसलमान आहेत. या लोहारांची जास्त वस्ती संयुक्त प्रांत, बिहार, ओरिसा, मध्यप्रांत व मुंबई या भागांत आहे. मुंबई इलाख्यांत मराठा, पांचाळ, कन्नड, कोंकणी व गुजराथी अशा पोटजाती आहेत. या पोटजातींत पुन्हां प्रकार आहेत. कोंकणी लोहारांना धावड म्हणतात. गुजराथी लोहारांत पुनर्विवाह प्रचलित नाहीं व कांहीं शाकाहारी आहेत. मध्यप्रांतांत बिसाडी ही यांच्यांतील एक पोटजात आहे. पंजाबी लोहारांत भुबालिया म्हणून जी भटकी पोटजात आहे ती आपणांस तुंवर रजपूत म्हणविते. चितोडगड परत मिळे-पर्यंत घरें न बांधण्याची व पोगोटें न घालण्याची यांच्यांत पूर्वी चाल होती.

**लोहारू संस्थान**—पंजाब. क्षे. फ. २२६ चौ. मै. व लो. सं. (१९४१) २७,८९२ आहे. ५६ खेडीं व लोहारू शहर यांत आहे. लोहारू येथील जयपूर संस्थानच्या टांकसाळींत लोहार काम करीत होते त्यावरून नांव पडलें असें सांगतात. लोहारू हें लहान गांव असून राजधानी आहे. लो. सं. दोन-तीन हजार असेल. संस्थानचा मूळ पुरुष अहमदबक्षखान यानें १८०३ सालीं आल्मोरा आणि इंग्रज यांच्यांत मध्यस्थी केल्या-वरून आल्मोराच्या राजानें लोहारू इनाम दिलें. सध्यांचे नबाब मिर्झा अमीनउद्दीन अहमदखान १९२६ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सुमारें एक लाख तीस हजार रुपये आहे. हें संस्थान पूर्व पंजाब प्रांतांत आतां विलीन झालें आहे.

**लोहितांग ज्वर**—(स्कार्लेट फीव्हर). हा एक तीव्र संसर्ग-जन्य रोग असून यामध्यें घसा धरतो आणि अंगावर पुरळ उठतो. हा रोग समशीतोष्ण कटिबंधाच्या प्रदेशांत होतो. हा एक वर्षाच्या आंतील मुलास बहुधा होत नाहीं, परंतु सहा वर्षांनंतर व वयांत येण्याच्या दरम्यान होतो. याच्या संसर्गाचा मुख्य काळ पुरळ येण्याच्या अवस्थेंत असतो, आणि घसा, नाक व कान यांतून निघणाऱ्या स्रावापासून याचा प्रसार होतो. चार आठवडे लोटल्यानंतर रोगी सामान्यतः बरा होतो. या रोगाचे जंतू अद्यापि सापडले नाहींत. याची गर्भावस्था सामान्यतः २।३ दिवस असते. परंतु कधीं कधीं हा २४ तासांतहि उद्भवतो, व कधीं कधीं सात दिवसहि घेतो. याचा प्रादुर्भाव फार जलद होतो व तावडतोब ओकारी, डोकें-दुखी व घसा धरणें हीं लक्षणें दिसूं लागतात. ताप जलद चढूं लागतो व नाडीचे ठोके जलद पडूं लागतात. दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं पुरळ दिसूं लागतो. जीभ प्रथम पांढरी असून तीवर लाल ठिपके दिसूं लागतात व पुढें तिचा सर्व पृष्ठभाग लाल दिसूं लागतो. जरी याच्या कांहीं प्रकारात भयंकर तीव्रता असली तरी सामान्यतः याची तीव्रता

आहे. ही चांगली विदुषी असून ऋग्वेदांत हिच्या नांवावर एक सूक्त आहे.

**लोमश**—एक ऋषि. याच्या अंगावर बरेच केंस असल्यानें हें नांव पडलें. हा पांडवांबरोबर वनवासांत होता व यानेंच त्यांना इतिहास, धर्म, इ. वरची बरीच माहिती करून दिली. याला आयुष्य अतिशयच लाभलें होतें. याच्या नांवावर 'लोमश-संहिता' व 'लोमशशिक्षा' हे ग्रंथ मोडतात.

**लोयोला, इग्नेटिअस** (१४९१–१५५६)—जेसुइट पंथाचा संस्थापक. त्याला पँपेलूना या शहराला पडलेल्या वेढ्याच्या वेळीं भयंकर जखम झाली, म्हणून त्यानें संसारत्याग केला, आणि मॉटसेराट येथील व्हर्जिनच्या देवालयांत (श्राईन) तो दर्शनाला गेला, आणि तेथें त्यानें धर्मकार्याचा प्रचारक (नाइट) होण्याची शपथ घेतली (१५२२). १५३४ सालीं त्यानें पॅरिस येथें सोसायटी ऑफ जीझस् या संस्थेचा आरंभ केला. त्या वेळीं त्याला तत्त्वज्ञानाचा प्रोफेसर फ्रँकॉईस झेवियर, लेनेझ, आणि इतर अनेक लोक शपथा घेऊन येऊन मिळाले. रोम हें पुढें त्याच्या कार्याचे मुख्य ठिकाण बनलें. लोयोलाला १६०७ सालीं पोपनें धार्मिक आशीर्वाद-दीक्षा दिली आणि १६२२ सालीं १५ व्या ग्रेगरी पोपनें त्याचें नांव संतांच्या (सेंट्स) यादींत दाखल केलें.

**लोरलई**—बलुचिस्तान, एक जिल्हा. क्षे. फ. ७३७५ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ८३,६८५. जिल्ह्यांत ४०० खेडीं आहेत. शें. ९५ मुसलमान आहेत. जिल्ह्यांत उंच डोंगर व दऱ्याखोरीं पुष्कळ आहेत. पाऊस ७ इंचांपर्यंत पडतो. अफगाणांची भाषा पुश्तु व खेतरानांची पश्चिम पंजाबीसारखी आहे. मुख्य पिकें गहूं, ज्वारी, मका व तांदूळ होत. जनावरांचे कळप पुष्कळ आहेत. जीन, तोबरे, इ. कांहीं कातडी जिन्नस चांगले होतात.

हा प्रदेश पूर्वी कंदाहार प्रांतांत मोडत असून हिंदुस्थानांतून पश्चिम आशियाकडे जाणारा रस्ता यांतून होता. पूर्वीची राजधानी डुकी होती. आजची जिल्ह्याची रचना १९०३ सालची आहे. लोरलई हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून लो. सं. चार हजार आहे.

**लोलिंबराज** (सोळावें शतक)— एक मराठी संतकवि. हा जुन्नरचा राहणारा असून याचें उपनांव जोशी होतें. धंदा वैद्यकीचा असून 'वैद्यजीवन' नांवाचा संस्कृतांत एक वैद्यकग्रंथ लिहिला आहे (शके १५५५). याचे 'हरिविलास' हें काव्य प्रसिद्ध आहे. याची बायको रत्नकला ही मुसलमानाची मुलगी होती. तिच्यावर 'रत्नकला-चरित्र' हें एक काव्य यानें लिहिलें आहे. बायको वारल्यावर हा विरक्त होऊन ईश्वर-भक्तींत काळ घालवूं लागला.

'हरिविलास' काव्याचा कर्ता लोलिंबराज व 'वैद्यजीवना'दि ग्रंथांचा कर्ता लोलिंबराज हे निराळे असावेत असें कांहीं संशोधकांचें मत आहे.

**लोहगड**—मुंबई, पुणें जिल्हा. मळवली स्टेशनजवळील भाजें गांवाच्या पश्चिमेस हा किल्ला आहे. प्रथम एक डोंगराचें टोंक लागतें त्यास विंचूकांटा म्हणतात. त्यापुढें कमान दरवाजा लागतो. व जवळ लोहगांव लागतें व तेथून पायऱ्या लागतात. मार्गांत ४ दरवाजे लागतात. याच्या बुरजाखालीं एक जोडपें चळी दिल्यामुळें साबळे कुटुंबास येथील पाटिलकी नाना फडणिसानें दिली असें सांगतात. किल्ल्यांत नाना फडणिसानें शके १७११ मध्यें एक तळें बांधल्याचा लेख आहे. हा फार बळकट किल्ला आहे. यांत कांहीं बौद्ध लेणीं आहेत. शेख उमरच्या कबरीजवळ पौष पौर्णिमेस मोठी जत्रा भरते. जवळच *जुनें महादेवाचें देऊळ आहे. हा बोरघाटाच्या तोंडाशीं अस-*ल्यानें इतिहासामध्यें या किल्ल्याला फार महत्त्व असून येथें अनेक घडामोडी निजामशाहीपासून होत होत्या. शिवाजीनें हा १६४८ त विजापूरकरांपासून घेतला. १७२० मध्यें कान्होजी आंग्र्यानें तो बाळाजी विश्वनाथास दिला. पुढें नाना फडणिसानें हा आपल्या ताब्यात घेऊन आपला खजिना येथें ठेवला होता. १८४५ पर्यंत येथें फौज असे.

**लोहगांव**—मुंबई, पुण्याच्या ईशान्येस ९ मैलांवर हें गांव आहे. तुकारामाचें आजोळ या गांवीं होतें. त्याचें आडनांव मोझे. शिवबा कासाराचा जो वाडा दाखवितात त्यासमोर महादेवाचें देऊळ आहे. या देवळांत तुकाराम आणि शिवाजी यांच्या भेटी होत असत असें सांगतात. गांवांत तुकाराम मंदिरहि आहे. कासार विहीर फार मोठी आहे. आंत बसण्यासाठीं जागा आहेत. विहिरींत एक शिलालेख दिसतो.

**लोहजीवाणु**—(आयर्न बॅक्टेरिआ). गोड्या पाण्यांत राहणारे असे कांहीं सूक्ष्मजंतू आहेत कीं, जे ते राहत असलेल्या पाण्यांतील लोहाचा अंश लोहउज्जप्राणिदा (फेरिक हायड्रोआक्साइड)च्या स्वरूपामध्यें पाण्याच्या पृष्ठभागीं आणून सोडतात. कांहीं जातींच्या सूक्ष्म जंतूंमध्यें ही शक्ति फार मोठ्या प्रमाणावर असते व त्यांची वाढ कांहीं पिण्याच्या पाण्याच्या जलाशयामध्यें इतक्या मोठ्या प्रमाणांत होते कीं, त्यामुळें पुष्कळदां अडचणी उत्पन्न होतात. हे सूक्ष्म जंतू मेले म्हणजे लहान गंजाच्या कणांच्या स्वरूपांत पाण्याच्या तळाशीं जाऊन बसतात व हा गंज म्हणजे शुद्ध लोह-उज्ज-प्राणिद असतें. जे पाण्याचे प्रवाह लोहमय भूमींतून वाहतात अशा प्रवाहामध्यें हे सूक्ष्म जंतू फार मोठ्या प्रमाणांत आढळतात.

**लोहपर्पटी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक-कज्जली व लोहभस्म, हीं मुख्य औषधें असतात. ही पर्पटी मुख्यत्वें-करून पांडुरोगावर जास्त उपयोगी पडते. रोगी अगदीं फिक्का दिसणें, संग्रहणी, अतिसार, पोटांत दुखणें, पान्थरी वाढणें, मूळव्याध, कुष्ट, इत्यादि रोगांवर याचा चांगला उपयोग होतो. १ ते १ गुंज मध, आल्याचा रस किंवा लोणी—खडीसाखर यांत देतात.

**लोहभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. पांडुरोगावरील हें एक प्रमुख औषध आहे. पांडुरोगामुळें आलेला अशक्तपणा, फिक्केपणा, ग्रहणी, मूळव्याध, सर्वसामान्य अशक्तपणा, पान्थरी वाढलेली असणें, धातुक्षय, शूळ, इत्यादि विकारांवर हें औषध अप्रतिम आहे. यांखेरीज क्षयरोग, कुष्ट, नपुंसकत्व, इत्यादि विकारांवर हें उपयोगी पडतें. १ ते २ गुंजा लोणी, खडीसाखर किंवा मध यांबरोबर देतात.

**लोहमग्नाश्म**—(पायरोक्सीनीज). अग्निजन्य व रूपांतरित खडकामध्यें आढळणारा हा एक महत्त्वाचा खनिज पदार्थांचा वर्ग आहे. यामध्यें ऑगाइट हा खनिज पदार्थ येतो. हे पदार्थ लोहमग्नयुक्त असून खट (कॅल्शियम), मग्न (मॅग्नेशियम), लोह आणि अल्युमिनम यांचे सिकित (सिलिकेट) आहेत.

**लोहयुग**—मानव संस्कृतीचें मापन मानवप्राणी धातू कधीं-पासून वापरूं लागला यावरून होतें. अश्मयुगानंतर (नूतन अश्मयुगाचीं सहा हजार वर्षे गेल्यानंतर) माणसाला तांबें, कथील व नंतर लोखंड यांचा उपयोग माहीत झाला असें समजतात. आफ्रिकेंत लोहयुग अश्मयुगानंतर लगेच सुरू झालें असावें. युरोपांत भूमध्य समुद्राभोंवतालच्या देशांतून ख्रि. पू. १,००० च्या सुमारास लोखंडाचें घडण होऊं लागलेलें दिसतें. अमेरिकेंत लोहयुग नव्हतेंच असें संशोधक समजतात. हिंदुस्थानांत वेदकाळीं (ख्रि. पू. ५०००) लोखंड माहीत होतें असें 'अयस्' या शब्दावरून दिसतें. तथापि 'अयस्'चा अर्थ तांबें, ब्रॉंझ किंवा लोखंड यांपैकीं कोणता यांबद्दल संशोधकांत एकवाक्यता नाहीं.

**लोहाणा**—लुहाणा. एक जात. लो. सं. (१९११) ६,०५,४८२. मुख्य वस्ती सिंध, कच्छ, काठेवाड व गुजराथ या भागांत आहे. हे पंजाबमधून मुसलमानांच्या त्रासामुळें खालीं आले. सिंधचे लोहाणा लोक उच्च दर्जाचे असें मानलें जातें. यांचे उपाध्याय सारस्वत ब्राह्मण आहेत. यांच्यांत जातपंचायती आहेत. मजूर, माळी, शेतकरी, गवंडी अशा धंदेवाइकांत हे मोडतात. मुंबई भागांत व्यापार व दुकानदारी करतात.

**लोहार**—एक जात. लो. सं. (१९११) २०,७०,३७२. यांचा जुना पिढीजाद धंदा शेतकीचीं हत्यारें करण्याचा आहे. खेड्यांतून यांना 'अलुतें' मिळत असतें. यांच्यांत सुमारें पावणेचार लाख लोक मुसलमान आहेत. या लोहारांची जास्त वस्ती संयुक्त प्रांत, बिहार, ओरिसा, मध्यप्रांत व मुंबई या भागांत आहे. मुंबई इलाख्यांत मराठा, पांचाळ, कन्नड, कोंकणी व गुजराथी अशा पोटजाती आहेत. या पोटजातींत पुन्हां प्रकार आहेत. कोंकणी लोहारांना घावड म्हणतात. गुजराथी लोहारांत पुनर्विवाह प्रचलित नाहीं व कांहीं शाकाहारी आहेत. मध्यप्रांतांत विसाडी ही यांच्यांतील एक पोटजात आहे. पंजाबी लोहारांत भुबालिया म्हणून जी भटकी पोटजात आहे ती आपणांस तुंवर रजपूत म्हणविते. चितोडगड परत मिळे-पर्यंत घरें न बांधण्याची व पोगोटें न घालण्याची यांच्यांत पूर्वी चाल होती.

**लोहारू संस्थान**—पंजाब. क्षे. फ. २२६ चौ. मै. व लो. सं. (१९४१) २७,८९२ आहे. ५६ खेडीं व लोहारू शहर यांत आहे. लोहारू येथील जयपूर संस्थानच्या टांकसाळींत लोहार काम करीत होते त्यावरून नांव पडलें असें सांगतात. लोहारू हें लहान गांव असून राजधानी आहे. लो. सं. दोन-तीन हजार असेल. संस्थानचा मूळ पुरुष अहमदबक्षखान यानें १८०३ सालीं आलमोरा आणि इंग्रज यांच्यांत मध्यस्थी केल्या-वरून आलमोराच्या राजानें लोहारू इनाम दिलें. सध्यांचे नबाब मिर्झा अमीनउद्दीन अहमदखान १९२६ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सुमारें एक लाख तीस हजार रुपये आहे. हें संस्थान पूर्व पंजाब प्रांतांत आतां विलीन झालें आहे.

**लोहितांग ज्वर**—(स्कार्लेट फीव्हर). हा एक तीव्र संसर्ग-जन्य रोग असून यामध्यें घसा धरतो आणि अंगावर पुरळ उठतो. हा रोग समशीतोष्ण कटिबंधाच्या प्रदेशांत होतो. हा एक वर्षाच्या आंतील मुलास बहुधा होत नाहीं, परंतु सहा वर्षांनंतर व वयांत येण्याच्या दरम्यान होतो. याच्या संसर्गाचा मुख्य काळ पुरळ येण्याच्या अवस्थेंत असतो, आणि घसा, नाक व कान यांतून निघणाऱ्या स्रावापासून याचा प्रसार होतो. चार आठवडे लोटल्यानंतर रोगी सामान्यतः बरा होतो. या रोगाचे जंतू अद्यापि सापडले नाहींत. याची गर्भावस्था सामान्यतः २।३ दिवस असते. परंतु कधीं कधीं हा २४ तासांतहि उद्भवतो, व कधीं कधीं सात दिवसहि घेतो. याचा प्रादुर्भाव फार जलद होतो व तावडतोब ओकारी, डोकें-दुखी व घसा धरणें हीं लक्षणें दिसूं लागतात. ताप जलद चढूं लागतो व नाडीचे ठोके जलद पडूं लागतात. दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं पुरळ दिसूं लागतो. जीभ प्रथम पांढरी असून तीवर लाल ठिपके दिसूं लागतात व पुढें तिचा सर्व पृष्ठभाग लाल दिसूं लागतो. जरी याच्या कांहीं प्रकारांत भयंकर तीव्रता असली तरी सामान्यतः याची तीव्रता

विशेष भासत नाहीं. यापासून उद्भवणारे दुसरे विकार म्हटले म्हणजे संधिवात, गलग्रंथि, वगैरे होत.

रोगोत्तर कालांत अल्कयुक्त औषधे देत गेल्यास इतर विकार होत नाहींत. रोग उद्भवल्याबरोबर घशावर उपचार करतात व विषनाशक लस टोंचतात. म्हणजे रोग कह्यांत राहतो.

**लोहिया, राम मनोहर** (१९१०- )—काँग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे एक प्रमुख नेते व निष्ठावंत कार्यकर्ते. हे मारवाडी जातीचे आहेत. पीएच्. डी. ही पदवी मिळाल्यानंतर यांनीं आपलें शिक्षण पूर्ण केलें व काँग्रेसच्या चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली. काँग्रेस सोशॅलिस्ट पक्षाची तात्त्विक बाजू घडविण्याचें श्रेय यांनाच आहे. १९४२ सालच्या "चले जाव" चळवळींतील प्रतिकारसामर्थ्याचे हेच जनक होत. पोर्तुगीज अमलाखालीं असलेल्या गोव्यांतील राजकीय चळवळींना तोंड फोडण्याची कामागिरी यांनींच केली आहे. 'मिस्टरी ऑफ सर स्टॅफर्ड क्रिप्स' (सर स्टॅफर्ड क्रिप्सचें गूढ) हा यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ होय.

**लौजी, नसरवानजी** (मृत्यु १७७४)—जहाजें बांधण्याचा धंदा करणारा एक पारशी गृहस्थ. प्रथम हा धनजीभाई नांवाच्या व्यापाऱ्याकडे नोकरीस होता. पुढें मुंबई सरकारच्या परवानगीनें यानें मुंबईस जहाजें बांधण्याचा कारखाना सुरू केला. अगदीं थोडक्या अवधींत या धंद्यांत याचा जम बसल्यावर याजकडे आरमारी जहाजें दुरुस्तीसाठीं पाठवण्यांत येऊं लागलीं. याचे माणिकजी व बमनजी हे दोन मुलगेहि याच्याप्रमाणेंच या धंद्यांत पुढें उदयास आले. नौकानयन पाहा.

**ल्युसर्न**—स्वित्झर्लंड, एक सरोवर. याच्या पश्चिम टोंकाला ल्युसर्न शहर आहे. ल्युसर्न सरोवर अतिशय सुंदर व रमणीय असल्याबद्दलची ख्याति आहे. सरोवराचें क्षे. फ. ४४३/४ चौ. मै. असून खोली ७०२ फूट आहे.

**ल्युसाइट**—हें एक खनिज द्रव्य असून अल्युमिनम व पालाश (पोटॅशियम) यांचें सिकित (सिलिकेट) आहे. व त्यांत बहुधा थोडा सिंधु (सोडियम)चा अंश असतो. याचे स्फटिक बहुधा पांढरे असून अपारदर्शक असतात. जरी हा सर्वत्र आढळत नसला तरी रोम, नेपल्स आणि एफेल यांच्या आजूबाजूस हा फार मोठ्या प्रमाणांत आढळतो. याचें शेतीस खत होतें, व कॅपानिया या इटलींतील प्रदेशामध्यें हें खत फार महत्त्वाचें मानण्यांत येतें.

**ल्यूक, सेंट**—बायबलमधील एक शुभवर्तमानलेखक (इव्हँजेलिस्ट). त्यानें (तिसरें) 'गॉस्पेल' आणि 'ॲक्ट्स ऑफ दि ॲपोसल्स' हें बायबलमधील पुस्तक लिहिलें आहे. तो वैद्यकीचा धंदा करीत असे. ॲपोसल पॉल याच्याबरोबर त्यानें अनेक वर्षें अनेक ठिकाणीं प्रवास केला आणि त्या प्रवासाचें वर्णन त्यानें 'ॲक्ट्स ऑफ दि ॲपोसल्स' या पुस्तकांत लिहिलें आहे. 'गॉस्पेल ऑफ सेंट ल्यूक' हे पुस्तक इ. स. ५८-६० या सुमारास लिहिलें गेलें असावें. त्यांत जीझस ख्राइस्टच्या पूर्ववयांतील अनेक प्रकारची हकीगत दिली आहे, व ती सेंट ल्यूकला खुद्द मेरीनें सांगितली असावी. बिथिनियामध्यें ७४ वर्षांचा होऊन हा वारला असें मानतात. १८ ऑक्टोबर ही त्याची तिथि पाळण्यांत येते.

**ल्हासा**—तिबेटची राजधानी. या ठिकाणीं बौद्ध धर्माचें अधिष्ठान टिकून असल्यानें यात्रेचें ठिकाण बनलें आहे. जवळच पोटाला गांवीं तिबेटचा राजा व बौद्ध धर्माचा जगद्गुरु दलाई लामा राहतो. शहर उंचावर असून भोंवतालीं लामांचे मठ आहेत. तिबेटांत होणारा सर्व माल या ठिकाणीं येऊन व्यापार होतो. रेशीम, चहा, लोंकर, इ. प्राच्य तऱ्हेचा माल निर्यात होतो. दरसाल असंख्य लोक ल्हासाला येतात जातात. लो. सं. ५०,०००. इ. स. ७ व्या शतकांत तिबेटांत बौद्ध धर्म सुरू झाला व त्याच वेळीं ल्हासा हें राजधानीचें शहर बनलें.

---

# व

**व**—या अक्षराच्या विकासाच्या पांच अवस्था आहेत. पहिली गिरनार शिलालेखांत, दुसरी-तिसरी खि. पू. १ ल्या शतकाच्या सुमारच्या जैन लेखांत, चौथी इ. स. ८३७ मधील एका जोधपूर लेखांत व शेवटची इ. स. ९०४ मधील एका दानपत्रांत आढळते.

**वकफ**—मुसलमानी कायद्यांतील देणगीचा एक प्रकार. कोणाहि मुसलमानाला आपली स्थावर-जंगम मिळकत धार्मिक कारणासाठीं कोणालाहि अर्पण करतां येते. तथापि आपल्या हयातीपर्यंत तींत आपला हक्क राखून ठेवतां येतो. तसेंच मुलें व वंशज यांच्या पिणाची या वकफमध्यें तरतूद करतां येते. वकफ तोंडी अगर ले[illegible] करतां येतो. मृत्युपत्रांतहि आपला हिस्सा वकफ करतां येतो. मृत्युपत्र पाहा.

**वकील**—(ॲडव्होकेट). न्यायकोर्टांत आपल्या पक्षकारातर्फे खटला किंवा दावा चालविण्याचा ज्याला अधिकार असतो त्याला म्हणतात. इंग्लंडांत व आयर्लंडांत वरिष्ठ कोर्टांतील वकिलांना 'बॅरिस्टर' म्हणतात आणि स्कॉटलंडांत 'ॲडव्होकेट' म्हणतात. यांना खालच्या कोर्टांतहि काम चालवितां येतें.

हिंदुस्थान—मुंबई इलाख्यांत १८६५ च्या लेटर्स पेटंट बाँबे ॲक्ट या कायद्यानें हायकोर्ट स्थापन झालें, आणि या हायकोर्टाला ॲडव्होकेट, वकील व ॲटर्नी यांना वकिलीचें काम करण्याच्या सनदा देण्याचा, आणि त्याबाबत कायद्याच्या परीक्षा, सनदेची फी, वगैरे बाबतींत नियम करण्याचा अधिकार देण्यात आला. ईस्ट इंडिया कंपनीच्या कारकीर्दींत हिंदुस्थान सरकारनें १८४६ व १८५३ या सालीं लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्ट मंजूर केले होते ते रद्द करून १८७९ सालीं याच नांवाचा कायदा केला व तोच कायदा १८८४ व १९०८ सालीं झालेल्या दुरुस्त्यांसह हायकोर्टाला व इतर कोर्टांना लागू होता. १९२६ सालीं इंडियन बार कौन्सिल ॲक्ट अमलांत आला आणि कायदेज्ञानाची लायकी, वकिलीच्या सनदांचे प्रकार व फी यांत महत्त्वाचे फेरफार करण्यांत आले (बार कौन्सिल पाहा).

प्रचलित कायद्याप्रमाणें न्याय करणें जसें न्यायाधीशाचें कर्तव्य आहे, त्याप्रमाणेंच पक्षकारातर्फे न्यायाधीशास पक्षकाराचें म्हणणें विशद व स्पष्ट करून सांगणें हें कर्तव्य वकीलवर्गाचें आहे. सर्वसाधारण मनुष्यास कायदा व कायद्याचे सूक्ष्म फरक समजणें अत्यंत कठिण जातें. कायद्याचे सूक्ष्म फरक दाखविणें व कायद्याप्रमाणें आपलें म्हणणें कोर्टापुढें मांडणें हें पक्षकारास त्याच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत जरूरीचें असतें. अशा वेळीं आपलें गाऱ्हाणें कायद्याच्या भाषेंत कोर्टापुढें स्पष्ट व सुलभपणें मांडण्यासाठीं कायदा जाणणारा असाच एखादा निष्णात मनुष्य मिळाल्यास त्या पक्षकाराची सोय होते. उलट पक्षीं अशा तऱ्हेनें काम करणाऱ्या कायदेपंडितास त्या इसमाकडून काम केल्याबद्दल योग्य तो मोबदला मिळतो. मुंबई इलाख्यांत वकील-वर्गाचे मुख्यतः बॅरिस्टर व वकील असे दोन भाग पडतात. यांखेरीज मुखत्यार वकील यांचाहि वर्ग अस्तित्वांत आहे. इंग्लंड, स्कॉटलंड व आयर्लंड येथील बॅरिस्टरीची परीक्षा पास झालेल्या सर्व इसमांस हिंदुस्थानांत कोठेंहि वकिली करण्यास परवानगी आहे. मुंबई इलाख्यांत वकिली करण्यापूर्वी त्यास मुंबई हायकोर्टाचे ॲडव्होकेट म्हणून नांव नोंदून घ्यावें लागतें. अशा ॲडव्होकेट लोकांस हायकोर्टाच्या अव्वल बाजूस काम करण्यास परवानगी असते. इतर वकीलवर्गास ॲडव्होकेट म्हणून नोंदून घेतां येत नाहीं. पण अशा लोकांस फक्त हायकोर्टाचे अॅपेलेट बाजूस काम चालविण्याची परवानगी असते. वरील दोन्ही ॲडव्होकेट लोकांस इलाख्यांत कोठेंहि काम करण्याची परवानगी असते. वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झालेल्या वकिलास फक्त एका जिल्ह्यापुरती सनद काढतां येते व मग त्यास फक्त त्या जिल्ह्यांतच काम करतां येतें. ॲडव्होकेट म्हणून नोंदून घेण्यास रुपये ५२५ द्यावे लागतात. जिल्ह्याची सनद काढण्यास रुपये ५० भरावे लागतात.

प्रत्येक जिल्ह्यांत जिल्हाधिकाऱ्याच्या परवानगीनें कोणासहि फौजदारी कामांत वकिली करण्याचा अधिकार असे. अशा लोकांस मुखत्यार म्हणत. ज्या वेळीं वकिलांची संख्या मर्यादित होती त्या वेळीं मुखत्यार वकिलांची नेमणूक करण्याची जरूरी भासत असे. हल्लीं अशी नेमणूक क्वचितच केली जाते. विश्वविद्यालयाची वकिलीची परीक्षा उत्तीर्ण होऊन दोन वर्षें झाल्यावर हायकोर्टाच्या ॲडव्होकेटच्या परीक्षेस बसतां येतें व ही परीक्षा उत्तीर्ण झालेला जो ॲडव्होकेट त्यास बॅरिस्टरप्रमाणें सर्व हक्क मिळतात. त्यास हायकोर्टाच्या अव्वल बाजूस काम चालवितां येतें. परीक्षा उत्तीर्ण झालेल्या कित्येक वकिलांचें नांव अव्वल बाजूच्या ॲडव्होकेटच्या यादींत घालण्याचा हायकोर्टास हक्क आहे. मुंबई हायकोर्टांत काम करण्याच्या बाबतींत दुहेरी पद्धत अस्तित्वांत आहे. बॅरिस्टर अगर ॲडव्होकेट यांना स्वतंत्र काम चालवितां येत नाहीं. त्यांना माहिती देण्यासाठीं म्हणून दुसरा वकील अगर सॉलिसिटर असावा लागतो. येथें अशा सॉलिसिटर लोकांच्या 'फर्म्स' आहेत. मुंबई विश्वविद्यालयाची वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झालेल्या कोणत्याहि माणसास दोन वर्षांनीं हायकोर्टाच्या सॉलिसिटरच्या परीक्षेस बसता येतें. अशा लोकांस उमेदवार म्हणून सॉलिसिटरच्या हाताखालीं काम करावें लागतें. वकीलवर्गाचें काम, त्यांचीं कर्तव्यें व त्यांना मिळणारें कायदेशीर वेतन, वगैरेसंबंधीं वकिली करणारा-बाबत म्हणून कायदा आहे. त्या कायद्यान्वयें कोणत्याहि वकिलानें बेकायदा कृत्य केल्यास त्याची चौकशी केली जाते. त्याचप्रमाणें वकिलांच्या फीबाबत तसेंच इतर बाबतींत नियम या कायद्यान्वयें घातले आहेत. या कायद्यान्वयें अशा कृत्यां-बाबत चौकशी करण्याचा अधिकार जिल्हा-जज्जास आहे. चौकशी करून व स्वतः अभिप्राय देऊन त्यास सर्व प्रकरण हायकोर्टाकडे पाठवावें लागतें.

वकिलांचा कायदा—(लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्ट, १८७९). 'वकील' याचा अर्थ ॲडव्होकेट, वकील, हायकोर्टाचा ॲटर्नी, मुखत्यार किंवा रेव्हेन्यू-एजंट असा आहे. 'वकिलाचा दलाल' (टाउट) याचा अर्थ जो इसम (अ) वकिलाला मिळावयाच्या फीपैकीं कांहीं मोबदला घेण्याच्या शर्तीवर त्या वकिलाला वकिलीचें काम मिळवून देतो, किंवा तसा करार करण्याची सूचना करतो तो, किंवा (ब) वरील प्रकारें वकिलांना काम मिळवून द्यावें या उद्देशानें जो दिवाणी, फौजदारी, किंवा रेव्हेन्यू कोर्टें, किंवा रेल्वे-स्टेशन, किंवा इतर कोणत्याहि सार्वजनिक ठिकाणाच्या हद्दींत वरचेवर वावरतो, तो इसम 'टाउट' होय.

वकिलीच्या सनदा देण्याचा, व सनदेकरितां लायकी, फी, वगैरे बाबींसंबंधीं नियम करण्याचा अधिकार प्रत्येक प्रांताच्या हाय-कोर्टाला आहे (कलम ६). वकिलीच्या धंद्यांत अयोग्य (अन्-प्रोफेशनल) वर्तन केल्यास त्या वकिलाची सनद तात्पुरती किंवा कायमची रद्द करण्याचा अधिकार हायकोर्टाला आहे. अयोग्य वर्तन म्हणजे (अ) पक्षकार किंवा त्याच्या तर्फेचा अधिकृत इसम, नोकर, नातेवाईक, मित्र यांच्याखेरीज इतर इसमाकडून दाव्यासंबंधीं माहिती मिळवणें; (ब) वकिलीच्या कामांत लबाडीचें किंवा अतिशय अयोग्य वर्तन करणें; (क) आपल्या वकिलीच्या फीपैकीं कांहीं रक्कम एखाद्यास देऊं करून त्या इसमामार्फत वकिलीचें काम मिळवणें, किंवा तसा प्रयत्न करणें; (ड) जो इसम टाउट आहे त्याच्यामार्फत वकिलीचें काम मिळविणें; इत्यादि (कलम १३). १९२३च्या 'लीगल प्रॅक्टिशनर्स (वीमेन) ॲक्ट'नें स्त्रियांना वकिलीची सनद घेण्याचा हक्क दिला आहे. १९४२ च्या कायद्यानें वकिलांना आपली फी वसूल करण्याकरिता दिवाणी कोर्टांत दावा लावण्याचा हक्क दिला आहे. वकिलाच्या निष्काळजीपणामुळें नुकसान झाल्यास वकिलावर नुकसानभरपाईचा दावा लावण्याचा हक्क पक्षकाराला आहे.

**वक्कलिग**—वक्कल, वक्कलीगार. कानडी मुलखांतील एक जात. लो. सं. (१९११) १५,०७,०९२. म्हैसूर संस्थानांत बहुतेक वस्ती आहे. यांपैकीं कांहीं जैन व लिंगायत आहेत. यांच्यांत सात पोटजाती आहेत. कांहीं पाळेगार या जातींतले आहेत. केंपेगौडा मागडी, ज्यानें बंगळूर शहर वसविलें तो या जातीचा होता. कांहीं पोटजातींत प्रौढ विवाहाची चाल प्रचलित आहे.

**वक्तृत्व**—श्रोत्यांचीं मनें आकर्षून घेण्यासारखें सुंदर भाषण तें वक्तृत्व म्हणतां येईल व असा बोलणारा तो वक्ता. वक्तृत्वाची ईश्वरी देणगी मानली जाते; तथापि अभ्यासानें अंगीं वक्तृत्व येतें, हें सर्वश्रेष्ठ ग्रीक वक्ता जो डेमॉस्थिनीझ याच्या उदाहरणावरून दिसून येतें. ग्रीक महाकवि होमर हा सर्व ग्रीक वक्त्यांचा गुरु शोभतो. आरिस्टॉटल, सिसेरो यांसारख्या कांहीं वक्त्यांनीं वक्तृत्वशास्त्रावर ग्रंथहि रचले आहेत. गद्य भाषेची शैली बनविण्याचें कामहि वक्ते करीत असतात. जो उत्तम वक्ता असेल तो पुढारी समजला जातो व त्याचें समाजावर वजन पडतें. याच्या उलट म्हणावयाचें तर पुढाऱ्याला वक्तृत्व अवश्य आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत वक्तृत्वावर चांगला मोठा निबंध लिहिला आहे.

**वक्र व वक्रता**—विशिष्ट नियमाप्रमाणें नेहमीं जाणाऱ्या एखाद्या बिंदूच्या स्थानांचा समूह किंवा त्या बिंदूचा मार्ग याला वक्र (कर्व्ह) म्हणतात. यापेक्षां सोपी व्याख्या म्हणजे प्रत्येक बिंदूच्या ठिकाणीं दिशा बदलणारी रेषा तें वक्र. अशा फिरत्या बिंदूच्या भुजयुग्मा(कोऑर्डिनेट्स)च्या भाषेत व्यक्त केलेला जो नियम त्याला 'वक्रसमीकरण' (ईक्वेशन ऑफ दि कर्व्ह) म्हणतां येईल. वक्रावरील एखाद्या बिंदूच्या ठिकाणची वक्रता (कर्व्हेचर) म्हणजे स्पर्शज्या (टॅन्जेंट) वर्तुलांशाच्या दर मूलमान लांबी(युनिट लेंग्थ)ला जी दिशाबदल करते तिचें मान होय. त्या बिंदूचें वक्रतावृत्त (सर्कल ऑफ कर्व्हेचर) म्हणजे त्या जागीं वक्राला स्पर्श करणारें वर्तुल होय. त्याची वक्रता तीच असते. वक्रतावृत्ताच्या त्रिज्येला वक्रतात्रिज्या (रेडियस ऑफ कर्व्हेचर) म्हणतात. एकाच पृष्ठभागा (पातळी)-वर नसणाऱ्या वक्राला परिवृत्त (ट्विस्टेड) वक्र म्हणतात. उच्च गणितशास्त्रांत वक्ररेषेचें महत्त्व फार आहे.

**वक्रीभवन**—(रिफ्रॅक्शन). ध्वनि, विसर्जक उष्णता, प्रकाश आणि हर्टझियन लहरी एका माध्यमांतून दुसऱ्या माध्यमांत जात असतां त्यांच्या दिशेमध्यें जो बदल होतो त्यास वक्रीभवन असें म्हणतात. प्रकाशकिरणांचें अशा तऱ्हेनें वक्रीभवन होतें ही गोष्ट फार प्राचीन काळापासून माहीत होती. परंतु या वक्रीभवनाचे निश्चित नियम स्नेल यानें १६२१ मध्यें शोधून काढले. हायगेन्स यानें प्रकाशवक्रीभवनाचें स्पष्टीकरण असें केलें कीं, या दोन माध्यमांतून जात असतांना प्रकाशाच्या गतीमध्यें जो फरक पडतो त्या प्रमाणांत हें वक्रीभवन होतें.

या वक्रीभवनाचा आकाशस्थ गोलांवर परिणाम होतो. म्हणजे हे खस्थ पदार्थ क्षितिजावर येण्यापूर्वीच दिसूं लागतात व क्षितिजाखालीं गेल्यानंतरहि कांहीं काळ दिसतात. मृगजळाचे देखावे हे वक्रीभवनाचाच एक परिणाम आहे.

**वंग**—बंगालचें नांव. पद्मा नदीच्या दक्षिणेस भागीरथी आणि ब्रह्मपुत्रा या नद्यांमधील प्रदेशाचें हें नांव होतें. बृहत्संहितेंत एक उपवंग देश सांगितला आहे.

**वंगण**—जेव्हां दोन पृष्ठभागांचा एकमेकांवर भार पडतो किंवा ते एकमेकांवर घासले जातात तेव्हां त्यांमधील घर्षण कमी करण्यासाठीं कांहीं एका पदार्थाचा उपयोग करतात. तो पदार्थ वंगण होय. वंगणें घन, अर्धघन व द्रव अशा तिन्ही रूपांत असतात. शंखजिरें, शिसपेनीचा दगड (ग्रॅफाइट), इ. घन वंगणें, घट्ट तेलें हीं अर्धघन वंगणें, व पातळ तेलें हीं द्रववंगणें होत.

**वॅगनर, विल्हेम रिचर्ड** (१८१३–१८८३)—एक जर्मन गीतकार व कवि. त्याला १८३३ सालीं वुर्झबर्ग थिएटरांत कोरस-मास्टर आणि पुढील वर्षी मॅगडेबर्ग येथें म्यूझिक डायरेक्टर नेमण्यांत आलें. १८३९ पासून तो पॅरिस शहरांत आणि १८४२ पासून ड्रेसडेन शहरांत राहिला. त्यानें बरींच संगीत नाटकें (ऑपेरा) लिहिलीं. वॅगनरला बव्हेरियाचा वेडगळ राजा

२ रा लुड्विग यानें आश्रय दिला होता. वॅगनरनें आपल्या संगीत नाटकांत संगीतकला, काव्यकला, चित्रकला, इत्यादि कलांचा एकत्र संयोग करणें, हा हेतु धरला होता. त्याला अत्यंत थोर व कोणत्याहि काळांत श्रेष्ठच गणला जाणारा संगीत नाटककार असें अगदीं यथार्थतेनें म्हणतां येतें.

**वंग भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें रसायन कथलाचें प्राणिद असतें. शुक्रस्थानाचा अशक्तपणा, स्वप्नावस्था, धातुक्षय, शीघ्रपतन, मैथुनाचा अतिरेक व त्यामुळें येणारा अशक्तपणा, इत्यादि विकारांवर हें औषध रामबाण आहे. यांखेरीज अग्नि-मांद्य, पांडुरोग, शरीरांत कोणत्याहि ठिकाणीं पू होणें, इत्यादि विकारांवर हें औषध देण्याचा प्रघात आहे. इसब, अंगावर पुरळ उठणें, व्रण पुष्कळ दिवस वाहत असणें, यांवर याचा उपयोग फार चांगला होतो. १ ते २ गुंजा लोणी-खडीसाखर यांत घेतात.

**वचनचिठ्ठी**—(प्रॉमिसरी नोट). इंग्लंडांतील 'बिल्स ऑफ एक्सचेंज ॲक्ट' या कायद्यांत याची व्याख्या अशी दिली आहे कीं, एका इसमानें दुसऱ्या इसमाला त्यानें मागणी केल्याबरोबर किंवा ठरलेल्या मुदतीनंतर ठरलेली रक्कम खुद्द त्या इसमाला किंवा तो इसम सांगेल त्या इसमाला किंवा सदर वचनचिठ्ठी ज्याच्याजवळ असेल त्या इसमाला देण्याबद्दलचें दिलेलें व स्वतःची सही केलेलें लेखी वचन.

प्रॉमिसरी नोट धनकोच्या किंवा त्यानें सांगितलेल्या इस-माच्या ताब्यांत दिली नाहीं तोंपर्यंत ती अपूर्ण असते व म्हणजे कायदेशीर नसते. अशी वचनचिठ्ठी दोन किंवा अधिक इसमांनीं दोन किंवा अधिक इसमांना संयुक्त आणि पृथक् बजावणीच्या हक्कानें लिहून देतां येते.

हिंदुस्थान—'निगोशिएबल इन्स्ट्रुमेंट्स ॲक्ट' नांवाचा जो कायदा (१८८१) आहे त्यांत 'वचनचिठ्ठी' ची व्याख्या आहे ती—'वचनचिठ्ठी' म्हणजे (बँकनोट किंवा करन्सी नोट नव्हे) एका इसमानें दुसऱ्या इसमाला एक ठराविक रक्कम बिनशर्त देण्याबद्दल लिहून दिलेला दस्तऐवज (कलम ४).

**वजनें आणि मापें**—वस्तूचें, पदार्थाचें प्रमाण, आकार, वजन, इ. मोजण्यासाठीं सरकार कांहीं विशिष्ट परिमाणें ठरवून देत असतें. प्रथम हीं परिमाणें वाटेल तशींच घेण्यांत येत असतात. हात (क्युबिट), पाय (फूट), यव, वीत, इ. मापें अशींच ठरविलीं. अरत्नि हें वैदिक लांबीचें माप 'हात' या अर्थीच आहे. 'बाहु' हेंहि माप असेंच आहे. शिवाय पाद, अंगुष्ठ, क्रोश, योजन, इत्यादि प्राचीन भारतीय परिमाणें आढ-ळून येतात. आजचीं इंग्रजी पद्धतीचीं मापें इंग्लंडांत १२६६ पासून कायद्यानें आलेलीं आहेत. इंचापासून मैलापर्यंत लांबीचीं मापें, चौ. इंचापासून एकरापर्यंत क्षेत्रफळाचीं मापें, घनइंचा-पासून गॅलनपर्यंत विस्ताराचीं मापें व ड्रॅमपासून टनापर्यंतचीं मापें आज सर्वत्र व्यवहारांत दिसतात. दशमानपद्धति (पाहा) गणितांत येतेच.

हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळीं वजनें-मापें आहेतच, पण एकाच प्रांतांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं आढळतात. यामुळें व्यापारास फार त्रास पडतो. सरकारनें एका पद्धतीचीं वजनें-मापें करण्याचे आजवर पुष्कळ प्रयत्न केले. १९३२ सालीं मुंबई सरकारनें वजनमापांचा कायदा करून १८० ग्रेन = १ तोळा, ८० तोळे = १ शेर व ४० शेर = १ मण असें ठरवून टाकलें. हिंदुस्थान सरकारनें १९३९ सालीं असाच एक कायदा केला. पण अद्यापि तो सर्व प्रांतांना लागू केला नाहीं. भारवस्तुतुलामानांत १ पौंड = ७००० ग्रेन धरला. या-प्रमाणें आतां इंग्रजी पद्धतीवर सर्व सारखी आंखणी केली आहे. वजनांमापांवर शिक्के मारून त्यांची दरसाल तपासणीहि ठेविली आहे.

वजनामापांचा कायदा—(इंडियन वेट्स अँड मेझर्स ऑफ कपॅसिटी ॲक्ट, १८७१). हिंदुस्थानांत निरानिराळ्या वज-नांचें प्रमाण ठरवतांना 'शेर' हा मूळ घटक मानला जावा, व त्या शेराचें वजन फ्रान्समधील किलोग्रामेदे अक्यांइव्हज् या वजनाच्या बरोबर असलें पाहिजे; निरनिराळीं मापें ठरवतांना शेर हा मूळ घटक मानला जावा व त्या शेराचें माप एक शेर वजनाचें पाणी राहील इतकें असावें आणि इतर वजनें व मापें एक शेराची पूर्ण पट (इन्टेग्रल मल्टिपल) किंवा पूर्ण अंश असलीं पाहिजेत. या कायद्याच्या अमलबजावणीकरितां जिल्हे ठर-वून त्या जिल्ह्यांच्या ठिकाणीं सरकारी शिक्क्याचीं वजनेंमापें मिळण्याची सोय करावी. प्रांतिक सरकारांनीं निरनिराळ्या जिल्ह्यांच्या भागांत आवश्यक वाटतील तीं वजनेंमापें चालू करावीं. याप्रमाणें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत व जिल्ह्यांत निरनिराळीं वजनेंमापें चालू होतीं. त्यामुळें फार अड-चणी होऊं लागल्या, आणि सर्व हिंदुस्थानांत वजनेंमापें सर्वत्र सारखीं असावींत, असें लोकमत बनत चाललें. म्हणून हिंदु-स्थान सरकारनें १९३९ सालीं नवा कायदा केला. तदनुसार मुंबई इलाख्यांत सर्वत्र सारखीं वजनेंमापें चालू झालीं आहेत, तीं अशीं—

वजनें—१८० ग्रेन = १ तोळा; ५ तोळे = १ छटाक; १० तोळे = अदपाव; २० तोळे = पावशेर; ४० तोळे = अच्छेर; ८० तोळे = १ शेर; ४० शेर = १ मण.

घन पदार्थाचीं मापें—१६ छटाक = १ शेर; २ शेर = अधोली; ४ शेर = १ पायली; १६ पायली = १ मण; २ मण = १ माप.

द्रवपदार्थांचीं मापें—८ पिंट = १ गॅलन. छटाक ते शेरपर्यंत मापें वरीलप्रमाणें आहेत.

**वंजारी**—लमाण, लंबाडी. एक जात. लो. सं. (१९११) १०,८४,९५५. यांच्यात हिंदू, शीख, जैन व मुसलमानहि आहेत. बहुतेक सर्व प्रांतांतून हे आहेत. तथापि हैद्राबाद संस्थानांत सर्वांत जास्त वस्ती आहे (सव्वाचार लक्ष). यांच्यांत बऱ्याच पोटजाती आहेत. जुना धंदा बैलांचे तांडे बाळगून मालाची नेआण करण्याचा होता; पण आगगाड्या, मोटारी झाल्यापासून शेती व सावकारी करतात. यांची भाषा साधारणपणें हिंदी आहे. माथूर, लमाण यांसारख्या कांहीं पोटजातींत मद्यमांस निषिद्ध आहे. गोकुळाष्टमीचा सण सर्वांत मोठा मानला जातो. चारण पोटजातीचे लोक व्यवस्थित राहतात व गाणें-बजावणें करून पोट भरतात. माथूर पोटजातींत अग्नि घरांत सतत ठेवतात. मुंबईकडे वंजाऱ्यांत अनेक धंद्यांचे लोक आहेत. कर्नाटक प्रांतांत वंजारी चोरांत गणले जातात. मध्यप्रांतांत तर मिठू भूखिया या दरोडेखोराला देव म्हणून पूजतात. पूर्वीच्या काळीं लष्कराला धान्य पुरविण्याचें महत्त्वाचें काम वंजाऱ्यांकडे असे. यांच्यांत वंशपरंपरागत एक नाईक असतो व पंचायतपद्धत आहे.

**वजावाट**—(सेट-ऑफ). इंग्लिश कायद्यांत दिवाणी दाव्यांतील प्रतिवादीला वादीकडून कांहीं कायदेशीर येणें असल्यास वादीच्या मागणीमध्यें त्या येण्याची वजावाट व्हावी, अशी मागणी त्याच दाव्यांत करतां येते, त्याला 'वजावाट' म्हणतात व असा हक्क प्रतिवादीला असतो. असाच हक्क हिंदुस्थानांत चालू दिवाणी कायद्यांत दिलेला आहे. (सिव्हिल प्रोसीजर कोड पाहा.)

**वजावाट घर**—(क्लीअरिंग हाउस). पेढ्या आणि रेल्वे कंपन्या यांच्या देवघेवींच्या हिशेबाच्या बाबतींत निकाल करणारी अशी एक संस्था असते. एकमेकांना दिलेले व घेतलेले पैसे (चेक, तिकिटें, मालाचें इंशील, इ. साठीं) वजावाट करून जें देणें-घेणें प्रत्येकाचें उरतें तेवढें शेवटीं देण्यांत येतें. यामुळें सर्वांना फार सोयीचें होतें. पेढ्यांच्या बाबतींत ही पद्धत पाश्चात्य देशांत १७७६ सालापासून आहे.

**वजिराबाद**—पंजाब, गुजराणवाला जिल्हा, एक शहर. शहाजहान बादशहाच्या वेळीं वजीरखान नांवाच्या सरदारानें हें शहर वसविलें. १८५५ पर्यंत हें जिल्ह्याचें ठाणें व लष्करी ठिकाण होतें. शहरांत इमारती लांकूड, कपडा, धान्य, साखर, इ.चा व्यापार चालतो. येथें चाकू, कात्र्या, सुऱ्या यांसारखा माल चांगला होतो. या शहराजवळ चिनाब नदीला बांधलेला पूल हिंदुस्थानांतील नांवाजलेल्या पुलांपैकीं एक आहे.

**वजिरिस्तान**—हिंदुस्थान (आतां पाकिस्तान)च्या वायव्य सरहद्दीवरील प्रदेश. याचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग आहेत. उ. भागाचें क्षेत्रफळ २३१० चौ. मै. व द. भागाचें २७३४ चौ. मै. आहे. यांत वजीर लोकांची वस्ती आहे. हा प्रदेश डोंगराळ असल्यानें लोकांना चोऱ्यामाऱ्या करणें आणि दरोडे घालणें या साधनांनीं उपजीविका करावी लागते. दरवेशखेल, तहिसूद, दावर व बतन्नी या मुख्य जाती आहेत. या लोकांचे सारखे दंगेधोपे चालू असतात व यांचा त्रास होऊं नये म्हणून हिंदुस्थान सरकारला सैन्य ठेवून एकसारखा यांच्यावर पाहारा ठेवावा लागत असे. गेल्या महायुद्धानंतर या प्रदेशांतून मोटारीचे रस्ते नेले व बंदोबस्त ठेवतां येईल अशी जास्त व्यवस्था सरकारनें केली.

**वज्रकहूर**—मद्रास, अनंतपूर जिल्हा, गुटी तालुक्यांतील एक गांव. येथें पूर्वी हिऱ्याची खाण असे. क्वचित् एखादे वेळीं कोठ कोठें हिरे सांपडतात.

**वज्रतुंड**—(ग्रॅनाइट). हा एक खडबडीत स्फटिकमय स्तरविरहित खडक असून यामध्यें मुख्यतः गार, पालाश, फेलस्पार, अभ्रक, वगैरे मिसळलेले असतात व त्याची स्फटिकरचना नियमित नसते. हा अग्निजन्य खडकांतील सर्वत्र विपुलतेनें आढळणारा खडक असून पुष्कळ दाबाखालीं जमिनींत खोल गडून घट्ट बनलेला आहे. हा पूर्व केंब्रिअन युगापासून कायनोझोइकयुगापर्यंत निरनिराळ्या युगांत आढळतो. तसेंच उत्तर कालामध्यें युरोपांतील आल्प्स पर्वतांत व स्काय डोंगरांतहि हा आढळतो. हा सर्वांत उंच पर्वतश्रेणींत मुख्यतः आढळतो. कांहीं ठिकाणीं या खडकामध्यें अभ्रकाऐवजी हॉर्न ब्लेंड आढळतें. जेव्हां अभ्रक व हॉर्न ब्लेंड दोन्ही असतात तेव्हां त्यास सायेनिटिक आनाइट म्हणतात. वज्रतुंडाच्या अशुद्ध जातीस पेग्मॅटाइट म्हणतात. या खडकांत बेरिल, लालडी अथवा चुनडी, तोरमल्ली, वगैरेहि आनुषंगिक दगड आढळतात. या खडकांत धातू आढळत नाहींत.

**वज्राबाई**—वज्रेश्वरी, वज्रयोगिनी. मुंबई, ठाणें जिल्हा, भिवंडी तालुक्यांतील एक यात्रेचें ठिकाण. येथील वज्रेश्वरीदेवीचें देवालय चिमाजीआप्पा पेशवे यानें वसई घेतल्यानंतर बांधलें. या भागांत पुष्कळ उन्हाळीं आहेत. चैत्रांत देवीची यात्रा भरते. देऊळ टेंकडीवर आहे.

**वॅट, जेम्स** (१७३६–१८१९)—एक स्कॉटिश इंजिनिअर. त्याला १७५७ सालीं ग्लासगो युनिव्हर्सिटींत गणित विषय शिकवण्याला लागणारीं उपकरणीं (इन्स्ट्रुमेंट्स) तयार करण्याकरितां नेमण्यांत आलें. १७६३ ते १७७४ पर्यंत त्यानें सिव्हिल इंजिनिअर ही हुद्याची नोकरी करून अनेक कालवे व बंदरें यांचे योजना-नकाशे

(प्लॅन्स) तयार केले व त्याप्रमाणें पुढें कांहीं कालवे व बंदरें बांधलीं गेलीं. याच काळांत त्यानें स्टीम इंजिनमध्यें कांहीं महत्त्वाच्या सुधारणा केल्या, आणि त्या सुधारणांनुसार त्यानें १७७५ सालीं आपलें नवें सुधारलेलें स्टीम इंजिन तयार केलें. शिवाय वॅटनें लेटर-कॉपीइंग प्रेस व इतर अनेक यांत्रिक साधनें यांमध्यें सुधारणा केल्या.

**वटवाघूळ**—पंखांसारखे हात असलेले हे एक प्रकारचे सस्तन प्राणी आहेत. वाघळें वडाच्या झाडावर लोंबतांना दिसतात म्हणून वटवाघूळ नांव पडलें. हा धड पक्षी नाहीं किंवा पशु

नाहीं, मधलाच आहे; म्हणून वटवाघूळ हें नांव निंदात्मक झालें. वाघळें समशीतोष्ण कटिबंधांत आढळतात, पण उष्ण कटिबंधांत विशेष असतात. यांचा आकार उंदराहूनहि लहान असला तरी पंखांची एकंदर लांबी १५ इंचांपर्यंत भरते. हीं संध्याकाळीं भक्ष्य शोधावयास बाहेर पडतात व किडे, वगैरे खाऊन राहतात. यांच्यांत कीटकभक्षी व फलभक्षी असे दोन वर्ग पडतात. पहिल्या वर्गाचीं वाघळें युरोप, आफ्रिका, अमेरिका, वगैरेमध्यें आढळतात व दुसऱ्या वर्गाचीं उष्ण प्रदेशांत आढळतात. ऑस्ट्रेलियामध्यें फलभक्षी वाघळांचीं सर्वांत मोठी एक जात आढळते. हीं वाघळें प्रत्येक वेळीं दोन पिलें घालतात. आपल्या पिलांना यांची मादी फार जपते व त्यांस कोणीं पकडलें तर पाठलाग करून स्वतः पकडली जाते, पण पिलांपासून दूर राहत नाहीं.

हे प्राणी कळप करून राहतात. एकेका झाडावर पांचशेंपर्यंतहि वटवाघळें आढळतील. एकदोन उडून गेलीं तर बाकीचीं तसेंच करतात.

**वड**—एक प्रसिद्ध झाड. संस्कृतांत न्यग्रोध (खालीं खालीं वाढणारें झाड) अशी संज्ञा आली आहे. हें आपल्या फांद्या जमिनींत रोवून नवीन धुंधे बनविण्याबद्दल प्रसिद्ध आहे. ऋग्वेदामध्यें जरी या वृक्षाचें नांव आलेलें नाहीं तरी प्राच्यविद्यापंडित डॉ. पिशेलनें एका सूक्तावरून (त्यांत न्यग्रोधाचीं सर्व लक्षणें आलीं आहेत) सिद्ध केल्याप्रमाणें हा वृक्ष त्या कालीं लोकांस ठाऊक असला पाहिजे, असें दिसतें. या वृक्षाचा उल्लेख अथर्ववेद व मागाहूनचें वाङ्मय यांत आलेला आहे. यज्ञांतील पात्रें याच्याच लांकडाचीं बनविलेलीं असत; हल्लींप्रमाणें पूर्वीं सुद्धां या झाडाचें महत्त्व फार असावें.



अंजिराच्या जातीचें हिंदुस्थानांत वाढणारें हें झाड [ जातिफिकस बेंघालेन्सिस ] असून या झाडाचा एक विशेष हा आहे कीं, याच्या आडव्या फांद्यांपासून पारंब्या फुटतात व त्या जमिनीस पोंचल्या म्हणजे त्यांचींच मुळें बनून त्यांचें पुढें खोड बनतें. याचें लांकूड मऊ व सच्छिद्र असतें. याचा चीक पांढरा असून त्याचा पक्षी पकडण्यासाठीं चिकटा तयार करण्यात येतो. वडाच्या झाडाखालीं पुष्कळ माणसें बसतील एवढा तो वाढतो. पारंब्या फुटून त्या जमिनींत शिरतात व विस्तार होत जातो. गुजराथेंत नर्मदेच्या मुखाजवळ जो 'कबीरवट' (पाहा) आहे त्यास साडेतीनशें पारंब्या आहेत व विस्तार एवढा आहे कीं, खालीं पांच हजार माणसें बसतील. सिंहलद्वीपांत असाच एक वड आहे त्याला ३५० मोठीं व ३,००० बारीक खोडें आहेत.

हिंदु लोकांत हें झाड पूज्य मानलेलें आहे. देवळानजीक वड लावून त्याला पार बांधतात. हा यज्ञीय वृक्ष आहे. सुतारकामास उपयोगी पडत नाहीं, पण छायेसाठीं हीं झाडें लावतात. वटपौर्णिमेस (ज्येष्ठ शु॥ १५) सुवासिनी बायका याची पूजा करतात. या झाडाचा औषधी उपयोग आहे. विंचवाच्या विषावर चीक लावतात. धातुपुष्टीसाठीं तो बत्ताशांत घालून देतात. मुळव्याधीवर वडाचीं पिकलेलीं पानें जाळून त्यांची राख तेलांत खलून लेप देतात.

**वडगांव**—मुंबई, पुणें जिल्हा, मावळ तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें पुण्याहून २३ मैलांवर असून आगगाडीचें स्टेशन आहे. तालुक्याच्या कोर्टकचेऱ्या स्टेशनाजवळच आहेत. एक तलाव व पोटोबाचें देऊळ आहे. येथें १७७९ सालीं मराठ्यांनीं इंग्रजांचा चांगला पराभव केला होता.

**वडनगर**—बडोदें संस्थान, कडी प्रांत, एक गांव. हें नागर ब्राह्मणांचें मूलस्थान होय. याला आनंदपूर असेंहि नांव आहे. पूर्वीं हें स्थान फार प्रसिद्ध असे. ह्युएनत्संग, अबुल फजल, इ. प्रवाशांनीं याचें सुंदर वर्णन केलें आहे. अनेक देवळें व तलाव याच्या परिसरांत होतीं. ११५२ सालीं कुमारपालानें हें वसविलें. हाटकेश्वर महादेवाचें प्रसिद्ध देवस्थान शहराच्या पश्चिम बाजूस आहे. समोर शर्मिष्ठा तलाव आहे. लो. सं. सुमारें १५,०००.

**वडवाळ सिद्ध नागेश**—एक मराठी संतकवि. हा ज्ञानेश्वराचा समकालीन असावा. यानें कांहीं पदें, अभंग व १४१ ओव्यांचा 'संकटहरणी शिवग्रंथ' लिहिला आहे.

**वड्डर**—एक मजूर जात. यांची वस्ती मुंबई, हैद्राबाद, म्हैसूर, मध्यप्रांत, वऱ्हाड या प्रांतांतून विशेष आहे. लो. सं.

(१९११) ३,९०,११९. याना बेलदार असेंहि म्हणतात. हे बहुशः तेलगू भाषा बोलतात व माती आणि दगड या कामांवर असतात. हे लोक फार मेहनती असतात व पैसेहि चांगले मिळवितात. पण अव्यवस्थित राहणी आणि दारूबाजी यांत सर्व घालवितात. यांच्यांत पंचायती आहेत. सामान्यतः हे सर्व हिंदु देव मानतात. यांचे उपाध्याय ब्राह्मण असतात. मुर्गव्वा, येल्लम्मा, तुळजापूरची देवी यांना बायका भजतात. निरनिराळ्या प्रांतांतलि वड्डरांच्या निरनिराळ्या चाली आहेत. यांच्यांतील टाकारी वड्डर जात्यांना टाकी लावतात.

**वढवाण संस्थान**—मुंबई, काठेवाडांतील एक संस्थान. क्षे. फ. २४२ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ५०,९१५. प्रदेश सपाट असून पाटस्थळाचा आहे. कापूस व धान्यें होतात. वढवाण शहरांत साबण करणें, सरकी काढणें, कापूस दाबणें, यांचे कारखाने आहेत. पूर्वी वाघेल, सोळंखी व मुसलमान राजे यांचें वर्चस्व या भागावर होतें. ध्रांगध्रा संस्थानच्या एका राजपुत्रानें १६२८ त येथील गादी स्थापिली. सध्यांचे ठाकूर श्रीसुरेंद्रसिंहजी हे आहेत. संस्थानचें उत्पन्न सुमारें सहा लाख आहे. राजधानी वढवाण शहर असून त्याची लो. सं. सुमारें १७,००० आहे. शहराला तटबंदी आहे व दक्षिणेस उंचावर राजवाडा आहे. येथील साबण सर्व काठेवाडांत वापरण्यांत येतो. घोड्याचे लगाम, जीन, वगैरे कातडी माल उत्कृष्ट होतो. हें संस्थान आतां सौराष्ट्र संघांत सामील झालेलें आहे.

**वणी**—वऱ्हाड, यवतमाळ जिल्हा. पूर्वी यवतमाळ जिल्ह्याचें नांव वणी जिल्हा असे. आतां फक्त तालुका व गांव वणी या नांवानें प्रसिद्ध आहे. तालुक्याचें क्षे. फ. ८६२ चौ. मै. व लो. सं. सुमारें सव्वा लाख आहे. मध्यभाग डोंगराळ असून पैनगंगा व वर्धा या नद्यांच्या कांठची जमीन मात्र सुपीक आहे. वणी गांवची लो. सं. सुमारें सात हजार आहे. येथें महाशिवरात्रीपासून महिनाभर मोठी यात्रा भरते. जाजमें चांगलीं होतात.

**वत्सराज प्रतिहार** (सु. ७७०–८१४)—कनोजच्या प्रतिहार घराण्यांतील एक पराक्रमी राजा. देव राजाचा हा पुत्र. सन ७८३ मध्यें दिगंबर जैन जिनसेनानें लिहिलेल्या हरिवंश पुराणावरून याचें राज्य उत्तरेकडे कनोज व मारवाड यांमध्यें होतें असें दिसतें. यानें आपला सामंत मंदोरचा प्रतिहार राजा कक्क याच्या साहाय्यानें बंगालच्या राजाचा पराभव केला. यानंतर यास माळव्याच्या स्वारीच्या वेळीं दक्षिणचा राष्ट्रकूट ध्रुवराज व त्याचा सामंत लाट देशचा राठोड राजा कर्कराज यांची मदत झाली. पण या लढाईंत अपयश येऊन यास मारवाडांत जावें लागलें. बंगालच्या राजाकडून यानें मिळवलेलीं दोन पांढरीं छत्रें राठोडनें याच्यापासून घेतलीं. भंडी कुलांतील इंद्रायुधाच्या राज्यावरहि स्वारी करून यानें तें जिंकलें. हा परममाहेश्वर होता. याच्या सुंदरीदेवी नामक राणीपासून यास नागभट हा पुत्र झाला.

**वत्सला**—बलरामाची कन्या व अभिमन्यूची स्त्री. बलरामानें हिला दुर्योधनाच्या मुलाला देऊं केलें होतें. पण हिला अभिमन्यूशीं विवाह करावयाचा होता. तेव्हां अभिमन्यूनें घटोत्कचाच्या मदतीनें हिला पळवून विवाह केला. जैमिनी भारतांतील वत्सला-हरणाची कथा प्रसिद्ध आहे.

**वंदनगड**—मुंबई, सातारा जिल्हा, वांई तालुका. साताऱ्याच्या ईशान्येस १० मैलांवर ३,८४१ फूट उंचीवर हा किल्ला आहे. जरंड्याहून जाण्यास मार्ग आहे. एक फारसी भाषेंत लेख आहे. येथें बरेच चौथरे आहेत. अवश्य तेथें तट बांधलेले आहेत. पूर्वी यावर एक किल्लेदार व दोनशें शिबंदी असे.

**वद्दादार प्रीति**—एक क्रांतिकारक हिंदी तरुण महिला. या धाडसी तरुण बंगाली स्त्रीनें २४ सप्टेंबर १९३२ रोजीं चितागांग येथील पहारतली रेल्वे अधिकाऱ्यांच्या क्लबावर आकस्मिक छापा घातला व त्यांच्यावर बाँबचा व पिस्तुलांच्या गोळ्यांचा वर्षाव केला. कांहीं अधिकारी मरून पडले व कांहीं जखमी झाले. तिचे आठ तरुण सहकारी हल्ला करून निसटून पळून गेले, पण हिच्या छातींत एक बाँबचा छर्रा लागला. तेव्हां आपण जखमी स्थितींत पोलिसांच्या हातीं लागूं नये म्हणून तिनें जवळच्या पुडींतील विष भक्षण केलें. नंतर ती क्लबाच्या इमारतीपासून चाळीस पावलांवर मरून पडलेली आढळली. हिची सहकारी कल्पना दत्त (पाहा) हिच्यापेक्षां फक्त दोन वर्षांनीं मोठी होती. या वीस वर्षांच्या तरुणीनें जें धाडस केलें तें अपूर्व आहे. अशा बंगाली क्रांतिकारकांनीं आपण तुरुंग, काळें पाणी किंवा मृत्यु यांपैकीं कोणासहि भीत नाहीं हें सिद्ध केलें आहे.

**वनवासी**—बनवासी. उत्तर कानडा जिल्हा, एक जुनें गांव. याचा उल्लेख खि. पू. २४० पासून येतो. येथें अशोकानें पाठविलेले बौद्ध भिक्षू आले होते. ही कदंब राजांची राजधानी असे. विजयानगरच्या राज्यांत येथें याच नांवाच्या प्रांताचें एक ठाणें असे. कदंब पाहा.

**'वनस्पति' तूप**—'वनस्पति' याचा नवा अर्थ म्हणजे शुद्ध केलेलें आणि उज्जीकृत (हायड्रोजनेटेड) असें भुईमुगाचें किंवा सरकीचें तेल. भुईमूग किंवा कापसाची सरकी या बियांचें तेल काढून शुद्ध करतात. शुद्ध केल्यामुळें तेलांतील मुक्त अम्ल (फ्री ॲसिड) व वास निघून जातो. या शुद्धीसाठीं कॉस्टिक सोडा किंवा सोडा कार्बोनेट वापरतात. तेलाचा रंग नाहींसा करण्यासाठीं विशेष प्रकारें प्रेरित (ॲक्टिव्हेटेड) केलेल्या कोळशांतून किंवा 'फुलर्स अर्थ' सारख्या मातींतून तें गाळतात.

नंतर रासायनिक तऱ्हेनें उज्जवायू( हायड्रोजन गॅस )शीं संयोजित करतात. या क्रियेला उज्जीकरण ( हायड्रोजनेशन ) म्हणतात. निकल किंवा पॅलिडियम यांचा धातुमय आवेजक ( मेटॅलिक कॅटॅलिस्ट ) म्हणून या कामीं उपयोग होतो. या कृतीनंतर उज्जाचें प्रमाण वाढून तेल घनरूप आणि दाणेदार बनतें. सरकारनें या तुपावर मार्च १९४७ पासून पुढील कांहीं बंधनें घातलीं आहेत ; हें तेल असल्यानें याला ' तूप ' हा शब्द कारखानदारांनीं लावून लोकांना फसवूं नये. उज्जीकृत तेलाचा द्रावांक ३१° ते ३७° इतका ठेवावा; म्हणजे माणसाच्या कोठ्याला हें पचविण्यास त्रास पडणार नाहीं.

शिळ्या तेलापेक्षां ' वनस्पति ' जास्त आरोग्यकारक आहे यांत शंका नाहीं.

**वनस्पतिशास्त्र**—या शास्त्रामध्यें वनस्पतींचा विचार केलेला असतो. अत्यंत साध्या वनस्पती ह्या अत्यंत सूक्ष्म असून त्यांचा अभ्यास संयुक्त सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानेंच केवळ करतां येणें शक्य असतें. पावसाचे कांहीं थेंब जर एका पात्रांत गोळा केले तर त्यांमध्यें केवळ एकपेशीमय अशा अनेक वनस्पती आढळून येतात. यांच्या बाहेरच्या बाजूस काष्ठद्रव्याची ( सेल्यूलोज ) एक पेशीभित्ती अथवा अंतस्त्वचा असते, व तीमध्यें एक चिकण असा जीवनरसाचा ( प्रोटोप्लॅझम ) कण असतो. या जीवनरसाच्या अथवा जीवद्रव्याच्या आंत मध्यें एक लांबट-वाटोळा असा थोडा अधिक घन स्वरूपाचा एक सूक्ष्म कण असतो त्यास केंद्र ( न्यूक्लस ) असें म्हणतात. याला एक ओठासारखा पुढें आलेला हिरवट भाग असतो. त्यामध्यें एक हिरवें रंजक द्रव्य ( क्लोरोफिल ) असतें. या सूक्ष्म वनस्पतीस मूलरूप वनस्पति किंवा आदि वनस्पतिबीज ( प्रोटोकॉकस ) असें म्हणतात व यापासून अशा तऱ्हेचीं नवीन वनस्पतिबीजें उत्पन्न होतात. प्रथम एक सूक्ष्म वनस्पतिबीज असतें. तें आकारानें लांबट होत जातें, व त्यामध्यें पेशीभित्ती निर्माण होऊन त्याचे विभाग पडत जातात आणि अशा तऱ्हेनें एक पेशींची रांग अथवा तंतु निर्माण होतो, व याच पद्धतीनें पुष्कळशा अगदीं खालच्या वर्गांतील आदि वनस्पती तयार होतात. किंवा पेशींचा एक अत्यंत पातळ असा समुद्रांतील अत्यंत नाजूक अशा हिरव्या लव्हाळ्यासारखा ( उल्व्हा ) थर तयार होतो. सामुद्रिक लव्हाळ्यामध्यें कांहींच्या बाबतींत बरीच संकीर्ण रचना आढळून येते. परंतु त्यामध्यें आपणांस देंठ, पान व मूळ असे निरनिराळे अवयव पृथक्पणें दाखवितां येत नाहींत. अशा तऱ्हेनें ज्यांचे अवयव पृथक्पणें दाखवितां येत नाहींत अशा वनस्पतींस स्थाणुवर्ग अथवा निरवयव वनस्पती ( थॅलोफाइट्स ) असें म्हणतात. यांचे दोन वर्ग पाडण्यांत येतात. एक पाणकेश अथवा शैवाल, आणि दुसरा भूछत्र अळिंब अथवा किण्व हा होय. यांपैकीं पहिल्या वर्गांतील वनस्पतींमध्यें हरित रंजक द्रव्य ( क्लोरोफिल ) अस्तित्वांत असतें. या दोन वर्गांच्या दरम्यान शिलावल्क अथवा दगडफूल ( लायकेन ) हा एक वर्ग असतो. यांच्या घटनेंत शैवाल आणि भूछत्र या दोहोंचेंहि एकत्र व परस्परांवर अवलंबून असलेलें अस्तित्व असतें.

यानंतर खरा शैवाल ( मॉसिस ) हा थोडा अधिक उच्च दर्जाचा वनस्पतिवर्ग येतो. या ठिकाणीं प्रथम आपणांस जमिनीच्यावर वनस्पतीचे स्कंध, पर्ण, वगैरे भाग आढळतात. यांपैकीं स्कंध ( स्टेम ) हा जमिनीशीं एका नाजुक विवर्ण केशाकृति अवयवांनीं जोडलेला असतो. यास केशमूल ( ऱ्हिझॉइड ) असें म्हणतात. यापेक्षां थोड्या वरच्या वर्गाच्या वनस्पती म्हटल्या म्हणजे नेच्या अथवा हंसराज वनस्पती होत. या वनस्पतींमध्यें अश्वपुच्छ ( इक्विसेटम्स ) व मुद्गल ( लायकोपोड्स ) या वनस्पती आढळतात. यांच्या बाह्य स्वरूपांत आणि आंतररचनेंत आपणांस पुष्कळच संकीर्णता व प्रगति आढळून येते. यांच्या स्कंधाचे, पानाचे व मूळाचे पातळ छेद घेऊन ते सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं ठेवून पाहिल्यास त्यांच्या रचनेमध्यें व पेशीसमूहामध्यें बराच फरक आढळतो. थोडक्यांत म्हणजे यांच्या पेशींमध्यें पुष्कळच भेद अथवा वर्गीकरण ( डिफरेनृशिएशन ) झालेलें स्पष्ट दृष्टीस पडतें. यावरून असें दिसून येतें कीं, निरनिराळ्या पेशींच्या थरांची, रांगांची आणि संघांची वाढ निरनिराळ्या प्रकारें होत गेलेली असून त्यांवरून आपणांस स्कंधाच्या व पानांच्या पेशींच्या बीजांमध्यें स्पष्टपणें फरक दिसून येऊन अमुक बीजें स्कंधाचीं आहेत व अमुक पानांचीं आहेत हें स्पष्टपणें सांगतां येतें. नेच्यांमध्यें अशा तऱ्हेनें स्पष्टपणें निरनिराळ्या पेशी आढळतात. एवढेंच नव्हे तर त्यामध्यें उच्च दर्जाच्या वनस्पतींमध्यें आढळणारी अत्यंत महत्त्वाची अशी विशिष्ट रचना इतकी स्पष्टपणें व इतकी नियमितपणें दृष्टीस पडते कीं, यावरील सर्व वनस्पतींचे वर्ग आपणांस शैवाल वर्गांत टाकून निराळे काढतां येतात. नेचे व इतर सपुष्प वनस्पती ज्यांच्यामध्यें अशा तऱ्हेच्या शिरायुक्त ( व्हॅस्क्युलर ) पेशी आढळून येतात त्यांस शिरायुक्त वनस्पती असें म्हणतात व त्यांस निरवयव आणि शैवाल वर्गांतील वनस्पती यांच्यापासून म्हणजे काष्ठद्रव्यमय ( सेल्युलर ) वनस्पतीपासून भिन्न समजण्यांत येतें. कारण या काष्ठद्रव्यमय वनस्पतींत शिरा नसतात.

दृश्यबीज अथवा सपुष्प वनस्पती ( फॅनरोगॅम्स ) हा वनस्पतिसृष्टींतील सर्वांत उच्च वर्ग होय. या वनस्पतीचे दोन वर्ग करण्यांत येतात : १. ज्या वनस्पतींमध्यें एका उघड्या पानामध्यें किंवा पाकळीमध्यें ( कार्पेल ) बीजाची वाढ होते त्यास अना-

वृत बीज किंवा नग्नबीज वनस्पती ( जिम्नोस्पर्म्स ); व २. ज्या वनस्पतींमध्यें बीजाची वाढ बंद अशा एक किंवा अधिक पाकळ्यांच्या पुटकामध्यें होते त्यांस अनग्नबीज किंवा आवृत्तबीज वनस्पती ( अँजिओस्पर्म्स ) म्हणतात. पहिल्या वर्गामध्यें शंक्वाकारी किंवा सूचिपर्ण वृक्ष, देवदार, सुरू, वगैरे ( कोनिफर्स ) आणि सावुदाणावर्ग ( सायकॅड्स ) या जातीचे वृक्ष येतात, व दुसऱ्या वर्गामध्यें इतर सर्व झाडें आणि शेतांत व बागेंत उत्पन्न होणारीं नेचे व शैवाल वर्गांतील झाडें वगळून बाकीचीं सर्व झाडेंझुडपें येतात. आवृत्तबीज वर्गांतील वृक्षांचे पुनः दोन जातींमध्यें वर्गीकरण करण्यांत येतें : १. एकदलवर्ग ( मोनोकॉटिलेडॉन्स )—यांमध्यें बीजामध्यें असलेल्या बीजवृक्षास एकच प्राथमिक अथवा गर्भपर्ण असतें; आणि २. द्विदल अथवा द्विगर्भपर्ण ( डायकॉटिलेडॉन्स )—यांतील बीजामध्यें बीजवृक्षास समोरासमोर असलेल्या दोन गर्भपर्णांची एक जोडी असते.

बीजामध्ये असलेला गर्भवृक्ष अथवा प्राथमिक बीजवृक्ष यामध्यें एक अतिशय लहान असा अक्ष अथवा स्कंध असतो व त्यास एक किंवा दोन गर्भपर्णे ( कॉटिलेडॉन्स ) असून त्याच्यावर एक लहान कळा अथवा मुकुल ( प्लुमूल ) असते, व खालच्या बाजूस स्कंधाचा आकार बारीक होऊन त्याचें प्राथमिक मूळ ( रॅडिकल ) बनलेलें असतें. जेव्हां बीज रुजतें तेव्हां हें प्राथमिक मूळ बीजावरील आवरण दूर करून बाहेर निघतें, आणि वाढून जमिनीमध्यें घुसतें. नंतर वरील कळ्याची अथवा मुकुलाची वाढ होते. याबरोबर गर्भपर्णांची त्यांच्या परिस्थितीप्रमाणें वाढ होते. या गर्भपर्णांच्यामध्यें हा मुकुल अथवा कळा प्रथम लपलेला असतो व त्याची पुढें लवकरच जलद वाढ होऊन त्याचा स्कंध बनून त्यावर नवीन पर्णांची वाढ सुरू होते. यापुढें वृक्षाच्या सर्व आयुष्यभर स्कंधाची वरच्या बाजूस सारखी वाढ होत राहते. अगदीं शेंड्यापासून थोड्या खालच्या बाजूस लांबीची वाढ बंद होते. परंतु नग्नबीज वृक्षामध्यें आणि द्विदल वृक्षामध्यें वृक्षाची सर्व शरीरभर जाडीमध्यें वाढ होत जाते. परंतु एकदल वृक्षामध्यें एकदां स्कंध तयार झाला म्हणजे त्याच्या व्यासाची जाडी न बदलतां कायम राहते. हाच नियम शाखांच्या बाबतींत लागू पडतो. या दोहोंमधील फरकाचें कारण त्याच्या अंतर्रचनेमध्यें असतें. कारण एकदल वनस्पतींमध्यें ज्यापासून नवीन काष्ठ आणि साल तयार होते अशा मृदुपेशींचें, ज्यांस वृद्धिघातु किंवा काष्ठवर्धक स्तर ( कॅंबियम ) असें म्हणतात, त्यांचें अस्तित्व नसतें.

वृक्षाचे स्कंध साधे किंवा शाखायुक्त असे दोन प्रकारचे असतात. तसेंच ते हवेंत वर वाढणारे किंवा भूम्यंतर्गत अशाहि दोन प्रकारचे असतात. हवेंत वर वाढणाऱ्या स्कंधाचे पुनः दोन वर्ग पाडण्यांत येतात : १. उन्नत अथवा ऊर्ध्वरोही म्हणजे वृक्षाची खोडें असतात त्याप्रमाणें वर सरळ ताठ वाढणारे, किंवा गवताचे अथवा पालेभाजीसारख्या वानस्पतिक वर्गांतील झाडांचे जसे नाजुक देंठ असतात त्यासारखे, किंवा बोरूसारख्या पोकळ दांड्यासारखे; २. पसरणारे अथवा वेलीसारखे इकडेतिकडे धांवणारे; किंवा ३. आरोही अथवा चढणारे म्हणजे जे वेल एखाद्या आधाराला धरून वर चढतात व आपल्या कुसांनीं किंवा कांट्यांनीं किंवा तंतुहस्तांनीं ( टेंड्रिल ) द्राक्षासारखे किंवा आपल्या मुळांनीं आयव्हीसारखे दुसऱ्या झाडांचा अगर पाषाणांचा आश्रय घेऊन वर चढतात त्यासारखे, अशा निरनिराळ्या प्रकारचे असतात. जमिनींत वाढणाऱ्या स्कंधांचे प्रकारहि तीन असतात : १. मूलकोष्ठ अथवा कुडी किंवा गड्डेमुळें–यांच्या वरच्या भागांतून हवेंत अंकुर निघतात आणि खालच्या भागांतून जमिनींत मुळें निघतात; २. ग्रंथिमूळ किंवा ग्रंथिकंद यांचे बटाट्यासारखे कांदे असून त्यांच्या डोळ्यांपासून अंकुर फुटतात; ३. पर्णकंद अथवा कांद्यासारखे पापुद्रे असणारे—कांदे वगैरे.

पर्णांच्या कक्षेमध्यें अथवा दुबेळक्यामध्यें वर्षाऋतूच्या सुमारास डोळे तयार होऊन त्यापासून शाखा फुटूं लागतात. हे डोळे हिंवाळ्यामध्यें सुप्तावस्थेंत असून वसंत ऋतूमध्यें वाढून त्यांस अंकुर फुटतात.

पर्ण हें स्कंधापासून फुटतें. त्याच्या पेशी स्कंधासारख्याच आणि त्यास जोडूनच तयार झालेल्या असतात. परंतु त्यांची रचना थोडीशी पानाच्या आकारासारखी पातळ व चपटी असते. स्कंधापासून ज्या ठिकाणीं पानें फुटतात त्यास पर्णग्रंथि अथवा पेरें किंवा पर्व म्हणतात. पानांचे आकार व त्यांचीं स्थानें यांचे पुष्कळच प्रकार असतात. जेव्हां पानें स्कंधाच्या मुळाशींच फुटतात तेव्हां त्यांस मूलज किंवा मूलीय पर्ण म्हणतात. जेव्हां तीं स्कंधाच्या थोडें वरच्या बाजूस फुटतात तेव्हां त्यांस स्कंधज किंवा प्रकांडरोही असें म्हणतात. अशा वेळीं त्यांचा आकार मंडलाकृति किंवा चक्रांकित, अथवा परस्पराभिमुख किंवा पर्यायी, अथवा एकांतरित असा असतो. कांहीं पानांस देंठ असतात व कांहीं पानांस देंठ नसून तीं स्कंधाशीं प्रत्यक्षच जोडलेलीं असतात. देंठास पर्णदंड असें म्हणतात. आणि पुढील पसरलेल्या भागास पत्रदल अथवा पातें म्हणतात. पानें एकेरी किंवा संयुक्त असतात. एकेरी पानाचा पत्रभाग फाडल्याशिवाय त्याचे विभाग करतां येत नाहींत. परंतु संयुक्तपर्ण अनेक लहान लहान पर्णदलांचें बनलेलें असतें. हीं सर्व पर्णदलें हाताच्या पंजासारखीं एकदम पुढें आलेलीं असतात, किंवा एका शिरेच्या बाजूस पिसासारखीं अलग अलग जोडलेलीं असतात ( पक्ष्याकारपिनेट ). कांहीं वृक्षांचीं पानें दरवर्षी गळून पडून दुसरीं येतात.

ही गोष्ट आपणांस जंगलामधील पुष्कळ झाडांच्या बाबतींत दृष्टीस पडते. उलट कांहीं झाडांचीं पानें एकदम गळून न पडतां अधिक दिवस टिकतात व तीं झाडें नेहमीं हिरवीं असतात.

द्विदल आणि नग्नबीज वनस्पतींमध्यें प्राथमिक मूल बीजापासून बाहेर येऊन एकसारखें जोरानें वाढत राहतें व अनेक वनस्पतींमध्यें त्यास पुष्कळच शाखा फुटतात व तसेंच जमिनींतहि त्याच्या मुळाचा बराच शाखाविस्तार होतो. परंतु एकदल वनस्पतींच्या बाबतींत बीजमूल लवकरच नष्ट होतें. आणि त्याच्याऐवजीं स्कंधाच्या मुळापाशीं नवीन मुळें फुटतात. अशा मुळांस आगंतुक मुळें असें म्हणतात. कांहीं द्विदल वनस्पतींमध्येंहि (उदा., स्ट्रॉबेरी) अशीं आगंतुक मुळें फुटतात. आयव्हीला फुटणारीं आधारमुळेंहि आगंतुक मुळेंच असतात. मुळांचे प्रकार अनेक असतात. कांहीं झाडाच्या मुळांसारखीं मोठीं व काष्ठमय असतात. कांहीं गवताच्या मुळांसारखीं तंतुमय असतात. कांहीं टर्मिकसारखीं वाटोळीं, मांसल आणि फुगलेलीं असतात; तर कांहीं गाजरासारखीं शंक्वाकृती असतात. मिसल्टोसारख्या कांहीं परोपजीवी वनस्पतींस शोषक मुळें असून तीं मूळ वृक्षाच्या पेशीमध्यें घुसतात.

वनस्पतींचें पुनरुत्पादन लैंगिक व अलैंगिक अशा दोन्हीहि पद्धतींनीं होतें. अगदीं खालच्या वर्गाच्या आदिवनस्पतिबीजासारख्या वनस्पतींमध्यें अलैंगिक व लैंगिक या दोन्ही पद्धतींनीं पुनरुत्पादन होत असतें. अलैंगिक पुनरुत्पादन पद्धतीमध्यें कांहीं रेणू अथवा लघुपेशी तयार होतात, आणि त्यांच्यापासून मूळ वनस्पतीसारख्या अधिक वनस्पती उत्पन्न होतात. लैंगिक पद्धतीमध्यें पुल्लिंगापासून कांहीं बीजकण निघून ते बीजांडामध्यें गर्भधारणा करतात; किंवा स्त्रीपेशीमध्यें असलेल्या स्त्रीलिंगामध्यें गर्भजनन करतात. स्त्रीपिंडाची गर्भधारणा होऊन बीज पक्व झाल्यानंतर त्यास बीजोड (उस्पिअर—ओव्हम) असें म्हणतात; व याची वाढ आणि विभागणी होऊन मूळ उत्पादक वनस्पतीसारखी नवीन वनस्पति तयार होते. शेवाल आणि नेचे (फर्न) यांच्यासारख्या वनस्पतींमध्यें लैंगिक आणि अलैंगिक अशा दोन्ही पद्धतींनीं पुनरुत्पत्ति होत असते. परंतु या वर्गाच्या वरील वनस्पतींमध्यें स्पष्ट असे दोन वर्ग अथवा दोन अवस्था दृष्टीस पडतात. एका अवस्थेमध्यें कांहीं वनस्पती अलैंगिक असतात. आणि दुसऱ्या अवस्थेमध्यें लैंगिक असतात. उदा., नेच्यांमध्यें कांहीं पानांच्या पाठीमागील बाजूस पिंगट ठिपकेहि आढळतात. हे ठिपके म्हणजे रेणुकोश होत. नेचा ही वनस्पति अलैंगिक असून तिच्यापासून फक्त रेणू अथवा जननपेशी तयार होतात. ह्या रेणू वनस्पतीपासून स्वतंत्र झाल्या म्हणजे ओलसर जमिनीवर एक नवीन नेच्याचें झाड निर्माण करण्याच्या ऐवजीं एक लहानसा बदामाच्या आकाराचा पेशीमय विस्तार तयार करतात. त्यास आदिशरीर किंवा प्रसवपिंड किंवा पुरस्थाणु (प्रोथॅलस) असें म्हणतात व हा मूळ वनस्पतीस लहान केशमुळांनीं जोडलेला असतो. याच्या खालचा पृष्ठभाग घेऊन त्याची सूक्ष्मदर्शक यंत्रानें तपासणी केल्यास त्यामध्यें लैंगिक अवयव आढळून येतात व त्यांत पुल्लिंगी अवयव असून त्यापासून कांहीं नरपेशी तयार होतात व त्या स्त्रीलिंगी इंद्रियामध्यें जाऊन स्त्रीपिंडास गर्भयुक्त करतात व त्यापासून बीजांडें तयार होतात. बीजांडापासून नवीन पुरस्थाणु तयार न होतां मूळ वनस्पतीसारखी नेचा जातीची वनस्पति तयार होते. याप्रमाणें हे पुनरुत्पादनाचें चक्र पूर्ण होतें.

बीजयुक्त वनस्पतींमध्यें तीस जें फूल येतें तें एक अंकुराचेंच पुनरुत्पादनाकरितां बनलेलें निराळें रूप असतें. उदा., एखादें कर्णफुलाचें झाड घेतल्यास त्याच्या देंठाच्या शेवटीं आपणांस चक्राकृति पर्णें आढळतील. फुलाचें विच्छेदन करून पाहिल्यास आपणांस त्यामध्यें पुढीलप्रमाणें निरनिराळे अवयव आढळून येतात: १. प्रथम बाहेरच्या बाजूस पाच हिरव्या पानांचा घेर असतो. हीं पानें साध्या पानासारखींच जवळ जवळ असतात. यांस हारितदल असें म्हणतात. या सर्व पानांचा मिळून पुष्पकोश (कॅलिक्स) बनतो. २. याच्या आंतील बाजूस पांच पिवळ्या पानांचा एक घेर असतो त्यास पुष्पमुकुट (कोरोला) असें म्हणतात. याचें प्रत्येक पान म्हणजे एक पाकळी (पेटल) असते. ३. या पाकळ्यांनीं संरक्षित असे बरेचसे पुंकेसर (स्टॅमेन्स) असतात. हे बारीक तंतूंसारखे असून त्यांच्या टोंकाशीं परागपिटक (ॲन्थर) असून ती परागकणांनीं (पोलन) भरलेली असते. पुंकेसर हेहि एक प्रकारचीं पानेंच असतात. मात्र त्यांचा आकार फारच भिन्न असतो. हे सर्व पुंकेसर मिळून पुंकोश (अँड्रोसियम) बनतो. ४. यानंतर यापुढील पुष्पाचा भाग अशाच विशिष्ट पण निराळ्या आकारांच्या पानांचाच बनलेला असतो. त्यास किंजल्क अथवा स्त्रीकेसर (कार्पेल्स) असें म्हणतात. हे स्त्रीकेसर मिळून स्त्रीकोश बनतो (पिस्टिल अथवा जिनोशियम). प्रत्येक स्त्रीकेसरामध्यें एक आद्यभाग असतो त्यास अंडाशय किंवा बीजांडकोश (ओव्हरी) असें म्हणतात. त्यामध्यें बीजांड (ओव्ह्युल) असतें व अखेरीस एक चोंचीसारखा भाग असतो त्यास ध्वज अथवा परागवाहिनी (स्टाइल) असें म्हणतात. पुंकोश आणि स्त्रीकोश यांचा संबंध पुनरुत्पादनामध्यें प्रत्यक्ष असल्यामुळें फुलाचे हे अवयव पुष्पकोश आणि पुष्पमुकुट यांपेक्षां अधिक आवश्यक असें समजले जातात. कारण त्यांचा संबंध अप्रत्यक्ष असतो. तथापि

त्यांचें हें महत्त्व पुनरुत्पादनामध्यें असतें. बीजांडकोशामध्यें असलेलें बीजांड हें नेच्यामध्यें तयार झालेल्या रेणुकोशासारखें असतें, परंतु तें स्वतंत्र होऊन रेणू बाहेर टाकण्याच्याऐवजी बीजांडकोशामध्येंच राहतें व तेथेंच नेच्यामध्यें ज्याप्रमाणें स्वतंत्र पुरस्थाणु तयार होतात त्यासारखीच एक क्रिया बीजांडकोशामध्यें होत असते व अखेरीस एक स्त्रीलिंगी पेशी तयार होते. यानंतर पुंकेसरापासून परागकण त्याच वनस्पतीपासून किंवा दुसऱ्या एखाद्या वनस्पतीपासून येऊन स्त्रीकेसराच्या दंडावर किंवा परागवाहिनीवर पडतात. या भागास स्त्रीकेसराग्र किंवा चूडा (स्टिग्मा) असें म्हणतात. त्या ठिकाणीं एक लांबट नळी पुढें येऊन ती परागवाहिनींतून बीजांडापर्यंत पोंचते. या नळीमध्यें पुंबीजें असतात. तीं स्त्रीलिंगी पेशीशीं संयोग पावतात आणि त्यांपासून बीजांड तयार होतें व त्याची वाढ आणि विभजन होऊन गर्भ (एम्ब्रायो) तयार होतो व त्यापासून नवीन वनस्पति तयार होते. अर्थात् ती कांहीं काळ बीजांडामध्येंच असते. हें बीजांडच बीचें स्वरूप धारण करतें व या बीमध्येंच नवीन वनस्पतीचा गर्भ असतो.

द्विदल वनस्पतींमध्यें मुख्य दोन वर्ग पडतात : १. मुक्तदल वर्ग (पॉलीपेटॅली)—यामध्यें फुलाच्या सर्व पाकळ्या सुट्या असतात. २. संयुक्त दलवर्ग (गॅमोपेटॅली)—यांतील फुलांच्या पाकळ्या एकमेकींस जोडलेल्या असतात.

गर्भामध्यें बीजारोपण झाल्यानंतर फल तयार होतें. बीजांडापासून बीज तयार होण्याची क्रिया चालू असतां एकीकडे बीजांडकोश वाढतच असतात व कांहीं बाबतींत त्यांची वाढ पुष्कळच होते व त्यापासून फळाचें आवरण अथवा कवच (पेरिकार्प) तयार होतें. हें आवरण बीजासभोंवतीं असून बीजाचें संरक्षण करतें. या कवचामध्येंहि एक बाह्यकवच (एपिकार्प), एक मध्यकवच अथवा गर (मेझोकार्प) आणि एक अंतःकवच अथवा आंतील थर (एन्डोकार्प) असतो. बाह्य कवचापासून फळाची साल तयार होते. आंतील दोन्ही थर कांहीं फळांमध्यें मांसल असतात. परंतु कांहीं थरांमध्यें फक्त मध्य थर किंवा कवच मांसल अथवा गरयुक्त असतो, आणि अंतःकवच पुनः कठिण असून त्याची अठुळी किंवा कोय बनते. बीजामध्यें गर्भ असून त्याबरोबरच त्याच्या वाढीच्या प्राथमिक अवस्थेंत त्याला हें अन्न पुरेल इतकें अन्न बलकयुक्त, पिष्टयुक्त किंवा मेदयुक्त असें असतें. ताडासारख्या बलकयुक्त गर असणाऱ्या फळांमध्यें बराचसा अन्नमय पेशींचा भाग असून एक लहानसा गर्भ असतो. नारळांतील खोबरें हेंहि त्यांतील गर्भाचें खाद्यच होय. घेवडा वगैरे बियामध्यें त्या बियांच्या पाकळ्यांत हा अन्नांश असतो व बीजाचा अंकुर त्या अन्नावर आपलें पोषण करतो. अशा बियांस अकल्कित किंवा कल्कहीन (एक्स–अल्ब्युमिनस) असें म्हणतात.

पुष्कळशा फुलांमध्यें पुंकेसर आणि स्त्रीकेसर दोन्ही असतात. यांस द्विलिंगी किंवा उभयलिंगी (बाय–सेक्शुअल किंवा हर्मोफ्रोडाइट) असें म्हणतात. कांहीं फुलांमध्यें फक्त स्त्रीकेसर किंवा पुंकेसर असतात त्यांस एकलिंगी (युनिसेक्शुअल) असें म्हणतात. जेव्हां एकाच झाडावर पुंपुष्पें आणि स्त्रीपुष्पें अशा दोन्ही प्रकारचीं येतात तेव्हां त्यांस एकजातीय किंवा प्रवृत्ति-उभयलिंगी (मोनोशियस) असें म्हणतात. जर पुंपुष्पें आणि स्त्रीपुष्पें निरनिराळ्या झाडांवर येत असतील तर त्यांस द्विजातीय किंवा विभक्तलिंगी (डायोशियस) असें म्हणतात.

सूर्यफुलासारख्या कांहीं फुलांच्या बाबतींत बीजधारणेपासून फलोत्पत्तीपर्यंत सर्व क्रिया एकाच हंगामांत पूर्ण होतात. अशा वनस्पतींस एकवर्षायु असें म्हणतात. जर या क्रियेस दोन वर्षांचा काल कांदा, वगैरे वनस्पतींसारखा लागत असेल तर त्यांस द्विवर्षायु असें म्हणण्यांत येतें. याच्या उलट कांहीं वनस्पती पुष्कळ वर्षें जगतात आणि त्यांस अनेक वर्षें पुष्पें व फलें येत राहतात; त्यांस बहुवर्षायु असें म्हणतात.

वनस्पति-इंद्रियविज्ञान—वनस्पतींमध्यें मुख्यतः चार मूलद्रव्यें असतात: कर्ब, उज्ज, प्राण आणि नत्र. यांखेरीज गंधक व स्फुर (फॉस्फरस) आणि इतर कांहीं खनिज द्रव्यें थोड्या प्रमाणांत असतात. हिरव्या वनस्पती अथवा पालेभाज्या, वगैरे या आपलें कर्बयुक्त अन्न अगदीं साध्या पद्धतीनें त्यांच्या पानांमध्यें असलेल्या हरितपिंडाच्या (क्लोरोप्लास्ट) साहाय्यानें घेतात. या वनस्पती सूर्याचे किरण या हरितपिंडाच्या साहाय्यानें शोषून घेतात आणि वातावरणांतील कर्बाम्ल वायूपासून कर्बाचें ग्रहण करतात. त्यास लागणारें इतर अन्न, पाणी आणि जमिनींतील इतर खनिज लवणें यांपासून मिळतें. वनस्पती त्यांस लागणाऱ्या अन्नापेक्षां अधिक पाणी शोषून घेतात. तें पाणी बाष्पीभवन होऊन पानांमार्फत निघून जातें. आपण एखादें झाड जर कांचेच्या पेल्याखालीं ठेवलें तर त्या झाडापासून निघणाऱ्या वाफेचें पाणी झालेलें आपणांस त्या ग्लासवर दिसून येईल. भूछत्र किंवा आळिंब जातीच्या वनस्पती आणि कांहीं बीजधारी वनस्पती यांमध्यें हरितरंजक (क्लोरोफिल) नसतें, म्हणून त्यांस कुजणाऱ्या वनस्पती व इतर प्राणिज अन्न यांवर अवलंबून राहावें लागतें. यावरून त्यास शवोपजीवी (सॅप्रोफाइट्स) असें म्हणतात. अशा तऱ्हेच्या वनस्पती परोपजीवी असतात. आणि त्यांपैकीं बुरशी, वगैरेसारख्या कांहीं वनस्पतींमुळें इतर पदार्थांस रोग उत्पन्न होतो. प्राण्यांप्रमाणें वनस्पतीहि श्वासोच्छ्वास करतात व ही श्वासोच्छ्वासाची क्रिया

दिवस आणि रात्र या दोन्ही काळांत चालते, व त्या क्रियेमध्यें वातावरणांतील प्राणवायु आंत घेऊन कर्बाम्ल वायु बाहेर सोडण्याची क्रिया चालू असते.

वर्गीकरणात्मक वनस्पतिशास्त्र—प्राणिशास्त्राप्रमाणें वनस्पतिशास्त्रांतहि ज्या वनस्पतींमध्यें सादृश्य असतें त्यांस सर्वं मिळून उपजाती ( स्पिसीज् ) असें म्हणतात. ज्या उपजाती थोडाफार फरक असूनहि कांहीं बाबतींत सदृश असतात त्यांची एक जाति होते ( जीनस ). अशा कांहीं जातींचा सदृश गुणधर्मांवरून कुल अथवा नैसर्गिक वर्ग ( फॅमिली अथवा नॅचरल ऑर्डर ) असा एक गट होतो. यानंतर एकदल व द्विदल हे दोन मोठाले वर्ग येतात. यांमध्यें पुष्कळ फुलांचा समावेश होतो. पूर्वी वनस्पतींचें वर्गीकरण; त्यांच्या उपयोगावरून, विशेषतः त्यांच्या वैद्यकीय गुणधर्मांवरून करीत असत. कारण पूर्वी त्यांचा केवळ वैद्यकीय दृष्ट्याच उपयोग करण्यांत येत असे. सन १६८२ मध्यें जॉन रे यानें एकदल व द्विदल हे वनस्पतींमध्यें असणारे भेद शोधून काढले व त्यांच्या बीजास अनुसरून त्यांचें वर्गीकरण केलें. व याप्रमाणें नैसर्गिक वर्गीकरण पद्धतीचा पाया घातला. यानंतर लिनियस यानें १७३६ मध्यें आपली नवीन वर्गीकरण-पद्धति प्रचारांत आणली. त्यानें रे याच्या प्राथमिक वर्गांचा उपयोग केला नाहीं. त्याची वर्गीकरण-पद्धति कृत्रिम असून फुलामध्यें असणाऱ्या अवयवांवर अवलंबून आहे. या वर्गीकरण-पद्धतीस लैंगिक वर्गीकरण-पद्धति असें म्हणतात. याच्या पद्धतीचा विशेष म्हणजे त्यानें त्या वेळीं उपलब्ध असलेल्या सर्व वनस्पतींच्या जातींचें शास्त्रशुद्ध वर्गीकरण केलें आणि दुहेरी नांवांची पद्धति प्रचारांत आणली. या दुहेरी नांवांमध्यें त्या वनस्पतीच्या जातीचा पहिल्या भागांत निर्देश असतो आणि उपजातीचा दुसऱ्या भागांत निर्देश असतो. यानंतर जुशियस यानें लिनियसच्या सर्व जातींचा समावेश रेच्या प्राथमिक वर्गीकरणामध्यें केला. यानंतर डी कॅन्डोल, रॉबर्ट ब्राउन, लिंडले, वगैरे शास्त्रज्ञांनीं ही वनस्पतींच्या नैसर्गिक वर्गीकरणाची पद्धति पूर्णपणें परिणत केली.

इतिहास—आपल्याकडील आयुर्वेद आणि कृषिकर्म या विषयांवरील ग्रंथांतून वनस्पतिविषयक माहिती पुष्कळ सांपडते. तसेंच महाभारत, भागवत यांसारख्या पुराणांतूनहि प्रसंगविशेषीं वनस्पतींची माहिती दिलेली आढळते. या ग्रंथांतून वृक्षांची आयुर्मर्यादा एक हजार वर्षें सांगितलेली असते. भारतीय ग्रंथकारांनीं आजच्यासारखें शास्त्रीय वर्गीकरण केलें नसलें तरी त्यांनीं वनस्पतींच्या कांहीं जाती व उपजाती पाडल्या आहेत. भागवताच्या दहाव्या अध्यायांत सृष्टिवर्णनाच्या ओघांत सर्व वनस्पतींचें स्थूल वर्गीकरण दिलें आहे. उदा., ( १ ) ज्यांना पुष्पांवांचून फळें येतात त्या; ( २ ) एकवार फळें येऊन नंतर नष्ट होणाऱ्या वनस्पती; ( ३ ) आधार लागणाऱ्या; ( ४ ) त्वक्सार म्हणजे कठिण सालाच्या; ( ५ ) आधाराची गरज नसणाऱ्या वेली; ( ६ ) ज्यांना प्रथम फुलें व नंतर फळें येतात असे वृक्ष. निघंट नांवाचे वनस्पतिकोशहि रचिले गेले होते व त्यांचा उपयोग वैद्यकीला होत असे. पुढें वनस्पतींच्या औषधी उपयोगाकडेच विद्वानांचें सर्व लक्ष जाऊन प्रत्यक्ष वनस्पतिशास्त्राच्या अभ्यासाची वाढ खुंटली. वनस्पतींचें शारीरविज्ञान आपल्याकडे नाहीं याचें हेंच कारण. पण वनस्पतिशास्त्राचा उगमच मुळीं औषधि-वनस्पतींपासून आहे.

खि. पू. ४ थ्या शतकांत थिओफ्रॅस्टस या ग्रीक लेखकानें वनस्पतींचा इतिहास म्हणून जो लिहिला त्यांत सुमारें ५०० प्रकारच्या वनस्पती रोग बरे करण्यास उपयुक्त अशाच दिलेल्या आढळतात. तसेंच थोरल्या प्लिनीनें ( इ. स. १ लें शतक ) आपल्या ग्रंथांत १००० औषधि-वनस्पती वर्णिल्या आहेत. तेव्हां प्राचीन ग्रंथकारांचें संशोधन हेतुमूलक असल्यानें वनस्पति-वर्गीकरणाकडे त्यांचें फारसें लक्ष गेलें नाहीं. नंतर १६ व्या शतकांत जेव्हां सर्वच क्षेत्रांत जागृति झाली तेव्हां वनस्पतिशास्त्रालाहि संशोधक लाभले. वनस्पतींचीं चित्रें देऊन युरोपांत अनेक देशांत ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आले. तथापि वैद्यकीय उपयुक्ततेची दृष्टि त्यांत होतीच. नंतर १८ व्या शतकांत लिनिअस हा अर्वाचीन वर्गीकरणपद्धतीचा जनक जेव्हां निर्माण झाला तेव्हांपासून या पद्धतीची वाढ झाली. लिनिअसनंतर रॉबर्ट ब्राउन, जॉन लिंडले, एंडलीशेर, विल्हेल्म हाफमिस्टर, डॉ. एंग्लर हे वर्गीकरणांतील प्रमुख संशोधक असून, शारीर आणि इंद्रियविज्ञान या पोटविषयांत कूर्ट, स्प्रेंगेल, उंगेर, बॅरी व डार्विन यांचे शोध महत्त्वाचे आहेत. त्यानंतर हर्मन मुल्लर, डेल्पिनो, पॉलतुथ, इ. पुढें आले. वानस्पत्य प्रस्तरावशेषशास्त्रांतहि अनेक कार्यकर्ते आहेत.

**वनाट**—( व्हॅनेडिअम् ). एक धातुयुक्त मूलद्रव्य. याचा परमाणुभारांक ५१·० आहे. निरनिराळ्या खनिजांत अनेक ठिकाणीं पण थोड्या प्रमाणांत ह्याचीं संयुक्तें पसरलीं आहेत. व्हॅनेडिनाइट ह्या खनिज धातूंत व्हॅनेडिक अम्लाचें प्रमाण शें. १७ पर्यंत असतें. मूळ धातु रुप्यासारखा पांढरा असून प्राणवायूची त्याच्यावर एकदम क्रिया होत नाहीं. ह्याचें विशिष्टगुरुत्व ५·५ असून १७२०° शतमानाला हा वितळतो. पोलादाची तन्यशक्ति वाढविण्यासाठीं त्यांत थोड्या प्रमाणांत ( शें. ०·२ ) वनाट घालतात.

**वॅन्डोट इंडियन**—इराक्राइस वंशांतील उत्तर अमेरिकेंतील इंडियन् लोकांचा हा एक समाज आहे. कॅनडामध्यें या लोकांस

ह्यूरॉन असेंहि म्हणतात. कारण १७ व्या शतकाच्या आरंभीं त्यांची वस्ती ह्यूरॉन सरोवरावर होती. १६३६ मध्यें या समाजाविरुद्ध गोऱ्या लोकांनीं केलेल्या युद्धामध्यें यांचा बहुतेक निःपात झाला. परंतु त्यांच्या वंशजांपैकीं सुमारें ४०० लोक सध्यां खालच्या कॅनडामध्यें लॉरेट येथें वस्ती करून राहिलेले आढळतात. कांहीं टोळ्या आपला मोर्चा मॅनिटोलीन बेटांतील वस्तीचा प्रदेश सोडून पश्चिमेकडे मिचिगन संस्थानांत जाऊन राहिले. १७५० मध्यें यांनीं ओहिओ संस्थानांत सँडुस्की येथें व मिचिगन संस्थानांत डेट्रॉइट येथें वस्ती केली. स्वातंत्र्ययुद्धामध्यें आणि १८१२ सालच्या युद्धामध्यें यांनीं इंग्रजांशीं सहकार्य करून अमेरिकन लोकांबरोबर युद्ध केलें. १८४२ मध्यें त्यांनीं कन्सस संस्थानांत वॅन्डोट काउन्टीमध्यें वस्ती केली; व १८६७ मध्यें ओक्लाहोमा येथील राखीव जागेंत जाऊन राहिले. यांची संख्या सुमारें ६०० आहे.

**वयोमर्यादा**—माणूस किती जगेल हें नक्की सांगतां येत नाहीं. दीर्घायुष्याचीं कारणें अनेक असतात. आनुवंशिकता, परिस्थिति आणि वैयक्तिक राहणी यांवर बहुशः वयोमर्यादा अवलंबून असते. ज्यांचे वाडवडील दीर्घायुषी होते त्यांपैकीं बहुतेक तसे असतात असें अनुवंशशास्त्रावरून दिसतें. हवामानाचाहि परिणाम आयुष्यावर होत असतो. उष्णकटिबंधांतील लोकांपेक्षां शीतकटिबंधांतील लोक जास्त दिवस जगतात. रानटी लोकात फार दिवस जगणाऱ्यांना मुद्दाम मारतात, तर सुधारलेल्या देशांत वृद्ध माणसें अकालीं मरूं नयेत म्हणून फार काळजी घेतात. नऊ-दहा मुलांच्या मोठ्या कुटुंबांतील माणसांची आयुर्मर्यादा बरीच असल्याचें दिसून येतें. वैयक्तिक राहणी, संवयी, वगैरे गोष्टीहि आयुष्य कमीजास्त करतात. ज्यू लोक आरोग्याच्या बाबतींत फार लक्ष देत असल्यानें त्यांच्यांत दीर्घायुष्य आढळतें. शारीरिक आणि मानसिक क्रियेचाहि आयुष्यावर फार परिणाम होत असतो. खाण्यापिण्याच्या संवयी देखील आयुष्याला कारक किंवा मारक होतात. तरुणपणीं सोसलें म्हणून उतार वयांत तें चालत नाहीं. वृद्धपणीं थोडा आहार हाच स्वाभाविक व आरोग्यदायक असतो.

सामान्यतः माणसाची वयोमर्यादा किती असते, हा प्रश्न आयुष्याचा विमा उतरणाऱ्या कंपन्या निघाल्यापासून फार महत्त्वाचा झाला आहे. एक लाख लोकांपैकीं २० वर्षें किती इसम जगतील, आणि ५० वर्षें वय होईपर्यंत किती जगतील, या प्रश्नांचीं उत्तरें देण्याकरितां आंकडेवारीचे तक्ते तयार केलेले आहेत. त्यांना 'मॉर्टॅलिटी टेबल्स' म्हणतात; आणि त्यांवरून जो नियम सिद्ध होतो, त्याला 'लॉ ऑफ मॉर्टॅलिटी' असें म्हणतात. विमा उतरण्याचा धंदा ज्या कंपन्या करतात, त्यांना अशा प्रकारचे वयोमानाचे तक्ते बाळगणें अत्यंत आवश्यक असतें. सामान्य प्रकारचे धंदे करणाऱ्या इसमाचें वयोमान वरील तक्त्यानुसार गृहीत धरतात, आणि ज्या धंद्यांत अपघात होण्याचा संभव विशेष असतो, त्यांना जादा रकमेचा हप्ता वगैरेसारख्या विशेष शर्ती घालण्यांत येतात. इंग्लंडांत, हिंदुस्थानांत व इतर अनेक सुधारलेल्या देशांत विमा कंपन्यांचें काम वर लिहिलेल्या पद्धतीनेंच चालतें.

सरासरी आयुर्मर्यादा (वर्षें)

| देश | पुरुष | स्त्रिया |
|---|---|---|
| अमेरिका (१९३७) | ६०·७५ | ६५·०८ |
| इंग्लंड (१९३७) | ६०·१८ | ६४·४० |
| फ्रान्स (१९२८–३३) | ५४·३० | ५९·०२ |
| जर्मनी (१९३२–३४) | ५९·८६ | ६२·८१ |
| इटली (१९३०–३२) | ५३·७६ | ५६·०० |
| नेदर्लँड्स् (१९३१–३५) | ६५·१ | ६६·४ |
| नॉर्वे (१९२१–३१) | ६०·९८ | ६३·८४ |
| रशिया (१९२६–२७) | ४१·९३ | ४८·७९ |
| स्वित्झर्लंड (१९२०–३२) | ५९·२५ | ६३·०५ |
| चीन (१९२९–३१) | ३४·८५ | ३४·६३ |
| हिंदुस्थान (१९३१) | २६·९१ | २६·५६ |
| ऑस्ट्रिया (१९३२–३४) | ६३·४८ | ६७·१४ |
| द. आफ्रिका (१९३६) | ६०·१ | ६४·०० |

यावरून हिंदुस्थानांतच आयुर्मर्यादा सर्वांत कमी आहे हें स्पष्ट दिसून येतें, व आशियां खंडांत स्त्रियांची आयुर्मर्यादा पुरुषापेक्षां कमी आहे याचें कारण स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं हें असूं शकेल काय?

**वरंगळ**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. क्षे. फ. ७,९४२ चौ. मै. व लो. सं. सुमारें दहा लाख. या जिल्ह्यांतून गोदावरी व कृष्णा या दोन मुख्य नद्या वाहतात. पाखाल नांवाचा फार मोठा तलाव आहे. मुख्य उत्पन्न ज्वारी, मका, तांदूळ व बाजरी आहे. हिऱ्याच्या, लोखंडाच्या व कोळशाच्या खाणी जिल्ह्यांत आहेत. सिंगाराणी खाण प्रसिद्ध आहे. जिल्ह्यांत कापड बरेंच निघतें. कोंडापल्ली व काजीपेठ येथें प्राचीन शिल्प व अवशेष आहेत. हनमकोंडा येथें हजारखांबी देवालय आहे. आंध्र, काकतीय व गणपति राजे तुघलख आणि बहामनी राजांपूर्वी या प्रांतावर राज्य करीत होते. यानंतर कुतुबशाही अमल सुरू झाला. बाराव्या शतकांत प्रोद राजानें हें शहर वसविलें व त्याचा नातू गणपति यानें दगडी तट बांधला. या शहराचा पूर्वी मोठा विस्तार होता. हल्लीं येथें सतरंज्या व

गालिचे चांगले होतात. तीळ आणि एरंडी यांचा मोठा व्यापार आहे. लो. सं. (१९४१) ६२,११९.

**वरधारा**—या वेलाचा विस्तार मोठा होतो. पानें तळहाता-एवढीं मोठीं असतात. देशावर यास म्हैस वेल व कोंकणांत म्हातारीचा वेल किंवा सांचरवेल म्हणतात. पानांच्या वड्या व भाजी करतात. श्लीपद रोगावर वरधाराचूर्ण गोमूत्रांतून देतात.

**वररुचि**—एक प्राचीन व्याकरणकार. उणादि सूत्रें व इतर कांहीं ग्रंथ याच्या नांवावर मोडतात. विक्रमादित्याच्या पदरच्या नवरत्नांत एक वररुचि आहे. सुप्रसिद्ध वार्तिककार कात्यायन व हा एक असें कांहीं पंडितांचें म्हणणें आहे. 'प्राकृतप्रकाश' वर वररुचीची टीका आहे. गुणाढ्याला बृहत्कथा वररुचीपासून मिळाल्याची कथा आहे. तेव्हां याचा नक्की काल कोणता याविषयीं निश्चिति नाहीं. कोणी याला इ. स. दुसऱ्या शतकांत घालतात.

**वरसोवा**—मुंबई, ठाणें जिल्हा. हा किल्ला वरसोवा खेडें व माढ बेट यांच्यामध्यें खाडीच्या मुखाशीं आहे. हा पोर्तुगीज लोकांनीं बांधला असावा. १६५९ मध्यें इंग्रजांनीं हा घेण्याचा विचार चालवला होता. १६९४ मध्यें मस्कतच्या अरबांनीं येऊन येथील लोकांची कत्तल केली होती. १७३९ त मराठ्यांनीं हा पोर्तुगीजांपासून घेतला व १७७४ मध्यें कर्नल कीटिंगनें तो मराठ्यांपासून घेतला. १८७४ पर्यंत येथें तोफखाना होता.

**वराटी**—हा राग मारवा थाटांतून निघतो. याचा आरोह व अवरोह सातहि स्वरांनीं होतो; म्हणून याची जाति संपूर्ण संपूर्ण आहे. वादी स्वर गांधार व संवादी धैवत आहे. गानसमय प्रदोषकाल मानितात. या रागांत मध्यम स्वर दुर्बल ठेवितात; त्यामुळें गांधार व पंचम स्वरांची संगति रक्तिदायक होते. या रागांत मारवा रागाची छाया बरीच दिसते. परंतु यांत पंचम स्वर लागत असल्यानें हा मारवा रागाहून निराळा होतो.

**वराह**—विष्णूच्या दहा अवतारांपैकीं तिसरा अवतार. यानें हिरण्याक्ष दैत्यास मारिलें व पृथ्वीला तारलें, अशी पुराणांत कथा आहे. वैदिक ग्रंथांत वराहरूपानें प्रजापतीनें पृथ्वी पाण्यांतून वर काढल्याची कथा आहे (तै. सं. ७·१·५·१). चालू कल्पाच्या आरंभीं ही गोष्ट घडली म्हणून तिच्या स्मरणार्थ कल्पास वाराहकल्प हें नांव पडलें.

वराहरूपी विष्णूची उपासना दक्षिणेंत फार होती. चालुक्यांच्या मुद्रेवर वराह काढलेला असे. वेरूळादि लेण्यांतून वराहाचें शिल्प दृष्टीस पडतें. बहुतेक पुराणांतून विष्णूच्या या अवतारापासूनच वर्णनाला सुरुवात असते. वराहतीर्थें अनेक ठिकाणीं दाखविलीं जातात.

**वराहपुराण**—अठरा पुराणांपैकीं एक. या पुराणाची श्लोकसंख्या सुमारें दहा हजारांवर आहे. वराहरूप धारण केलेल्या विष्णूनें हें पुराण पृथ्वी देवतेला सांगितलें म्हणून यास वराहपुराण असें म्हणतात. यांत अनेक धार्मिक कथा सांगितल्या असून कित्येक धार्मिक कर्मांचें महत्त्व वर्णिलें आहे. शिव आणि दुर्गा यांच्याहि कथा आहेत. शिवाय तीर्थें आणि यात्रास्थानें यांचींहि वर्णनें मनोरंजक आहेत. मथुरेचें वर्णन विशेष विस्तारानें दिलें असून या भागाला मथुरामाहात्म्य असें म्हणतात.

**वराह मिहीर** (जन्म सुमारें इ. स. ४९०)—एक प्राचीन ज्योतिषी. हा आर्यभट्टाच्या खालोखाल प्रसिद्ध आहे. याचे बरेच ज्योतिष ग्रंथ आहेत. त्यांत 'बृहत्संहिता' प्रसिद्ध आहे. याचा 'बृहत्‌जातक' ग्रंथहि फार मानण्यांत येतो. प्राचीन इतिहासासाठींहि याचे ग्रंथ उपयुक्त आहेत. यानें हिंदुस्थानांतील २८३ प्रांतांचीं नांवें दिलीं आहेत. याला विक्रमादित्याच्या पदरच्या नवरत्नांत घालतात. याच्या दोन ग्रंथांचें अरबींत भाषांतर अल्बेरुणीनें केलें आहे.

**वरी**—एक हलकें धान्य. हें ईजिप्त–अरबस्तानातून आलें असें म्हणतात. याची लागवड हिंदुस्थानांत सर्वत्र होते. नांवें मात्र वेगवेगळीं आहेत. राळा धान्य याचपैकीं आहे. मुंबई प्रांतांत कोंकणांत व घाटावर कांहीं जिल्ह्यांत (पुणें, नासिक, वगैरे) खरीपाचें पीक म्हणून काढतात. बहुधा जेथें नाचणी पिकते तेथें वरी होते. म्हणून नाचणी-वरी असें जोड नांव येतें. उपवासाला वरी भाताप्रमाणें खातात. गरीब लोक नेहमींच याची आंबील करून खातात.

**वरुण**—१. एक वैदिक देवता. मित्रावरुण असें संयुक्त नांव येतें. हा पश्चिम दिशेचा, जलाचा व नागलोकाचा अधिपति आहे. याची राजधानी मानसोत्तर पर्वतावर निम्लोचिनी किंवा सूषा म्हणून आहे. द्वादशादित्यांत वरुण आहे. आषाढांत हा प्रकाश देतो.

रोमन लोकांची समुद्रदेवता नेप्चुन किंवा वरुण ही होती.

२. (नेप्चुन). सूर्यमालेंतील आज ज्ञात असलेल्या ग्रहांपैकीं सर्वांत दूरचा ग्रह. हा सन १८४६ मध्यें लेव्हेरिएर आणि ॲडाम्स या दोघां ज्योतिषांना स्वतंत्रपणें आढळला. प्रजापति (युरेनस) ग्रहाच्या गतीवर कोणाचा तरी परिणाम होतो आहे, या विचारानें हा शोध लागला. पृथ्वीपेक्षां हा चौपट मोठा असून १६५ वर्षांत सूर्याभोंवतीं एक प्रदक्षिणा घालतो. याला एक चंद्र आहे.

**वरुण धातु**—(युरेनिअम). हें धातुद्रव्य पांढरें असून वर्धनशील आहे. याचा परमाणुभारांक (२३८·२) सर्वांत जास्त आहे. युरेनिनाइट या खनिजापासून हा काढतात. १७८९ सालीं प्रथम याचा शोध लागला. तुंग (टंगूस्टन्) आणि रंज (क्रोमियम) यांच्याशीं याचा रासायनिक संबंध आहे. या धातूच्या किरणोत्सर्गी (रेडियो ॲक्टिव्ह) गुणधर्मामुळें शास्त्रज्ञांना याचें महत्त्व वाटतें.

**वरेरकर, भार्गवराम विठ्ठल** (१८८३- )—मराठींतील एक पुरोगामी नाटककार, लघुकथालेखक व कादंबरीकार. चिपळूणला यांचा जन्म झाला व यांचे शिक्षण मालवण, दापोली व रत्नागिरी येथें झालें. कांहीं दिवस यांनीं पोस्टखात्यांतहि नोकरी केली. १९०७ सालीं यांचें 'कुंजविहारी' हें पहिलें नाटक जनतेसमोर आलें. या नाटकानंतर यांनीं 'हाच मुलाचा बाप', 'संन्याशाचा संसार', वगैरे नाटकें लिहिलीं. नवीन सुधारणांचा पुरस्कार व अभिनव तंत्रदृष्टि यांमुळें हे थोडक्याच कालांत लोकप्रिय झाले. बंगाली शरच्चंद्रांच्या सर्व कथांचें मराठींत भाषांतर करून यांनीं त्यांची ओळख मराठी वाचकांस करून दिली आहे. १९४५ सालीं धुळें येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावर यांची निवड झाली होती.

**वरोडा**—मध्यप्रांत, चांदा जिल्हा, एक तहसील. क्षे. फ. १२८२ चौ. मै. व लो. सं. सुमारें दीड लाख. वरोडा मुख्य ठिकाण असून वस्ती दहा हजारांवर आहे. येथें कोळशाची खाण आहे.

**वर्ख (सोन्याचा)**—सोन्याचा वर्ख करण्याकरितां प्रथम त्याचे तुकडे करून त्याची तार काढून त्या तारेची रुळांत लाटून पातळ पट्टी काढण्यांत येते. त्या पट्टीचे लहान तुकडे करून ते तुकडे कातड्याच्या घडींत घालून ठोकण्यांत येतात. या कृतीनें ते पातळ झाले म्हणजे पुन्हां कापून लहान करतात. ही कृति पुन्हां पुन्हां करण्यांत येते व शेवटीं पातळ पान झालें म्हणजे पातळ कागदांच्या पुस्तकांत तें ठेवण्यांत येतें.

**वर्ग**—प्राणी किंवा वनस्पती यांमध्यें असे कित्येक वर्ग (स्पीसीज्) पडतात कीं, त्या वर्गातील व्यक्ती किंवा वस्तू साधारणपणें एकसारख्या असतात. एका वर्गाचें दुसऱ्या वर्गाशीं जर कांहीं साम्य असलें तर त्या समान वर्गांची मिळून एक जात (जीनस) बनते. प्रत्येक वर्गांत अनेक प्रकार जे असतात त्यांत थोडीफार विषमता राहतेच. पण प्रत्येकाला आपल्यासारखी प्रजा उत्पन्न करून तीस आपले गुणधर्म देतां येतात.

**वर्डस्वर्थ, विलयम** (१७७०-१८५०)—एक इंग्रज कवि. त्यानें १७९१ सालीं केंब्रिज येथील पोल-डिग्री घेऊन नंतर फ्रान्स देशांत प्रवास केला. इंग्लंडमध्यें परत आल्यावर तो रेसडाउन (डॉर्सेटशायर), ऑलफॉक्सडेन (सॉमरसेटशायर), डव्ह कॉटेज, ग्रासमीयर, ॲलन बँक, इतक्या ठिकाणीं राहिला व नंतर १८१३ पासून मरेपर्यंत रीडल माउंट येथें राहिला. त्यानें आपले काव्यग्रंथ प्रसिद्ध केले, ते म्हणजे—'ईव्हिनिंग वॉक ॲंड डिस्क्रिप्टिव्ह स्केचेस'; 'दि बोर्डरर्स' (एक दुःखान्त नाटक); 'लिरिकल बॅलड्स' (यांपैकीं 'दि एन्शन्ट मॅरिनर' व इतर तीन कविता कोलिरिज कवीच्या आहेत); 'दि प्रील्यूड ऑर ग्रोथ ऑफ ए पोएट्स माइंड' (या विषयाचा पहिला भाग 'दि रेक्ल्यूज' आणि दुसरा भाग 'दि एक्सकर्शन' आहे); 'ओड टु ड्यूटी', 'सॉनेट्स डेडिकेटेड टु लिबर्टी' व इतर कविता (यांचे दोन काव्यसंग्रह); इ.. १८२० ते १८३१ पर्यंत त्यानें युरोपांतील अनेक देशांत व स्कॉटलंड व आयर्लंड यांमध्यें प्रवास केला; १८४३ सालीं तो साउदे कवि वारल्यानंतर 'पोएट लॉरेट' (इंग्लंडचा राजकवि) झाला. याच्या डोरोथी नांवाच्या बहिणीनें त्याला लेखनांत बरीच मदत केली. तो इंग्लंडचा एक सर्वश्रेष्ठ कवि असून सृष्टिसौंदर्याचा भोक्ता होता. व्हार्जिल या प्राचीन कवीच्या तोडीचा कवि अशी हा मान्यता पावला आहे.

**वर्णपटशास्त्र**—(स्पेक्ट्रोस्कोपी). रसायनशास्त्र आणि पदार्थविज्ञानशास्त्र यांमध्यें विच्छिन्नकिरणपटाच्या साहाय्यानें अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत आढळणाऱ्या रुबिडियम, सिसीयम, इंडियम, पॅलियम आणि हेलियम या मूलद्रव्यांचें अस्तित्व ओळखून काढण्याकरितां विच्छिन्नकिरणदर्शका(स्पेक्ट्रोस्कोप)चा उपयोग करण्याचा प्रघात विच्छिन्नकिरणपटांचें पृथक्करण करतां येऊं लागल्यापासून होऊं लागला, व याच पद्धतीनें वरील मूलद्रव्यांचें अस्तिव शोधून काढण्यांत आलें. सूर्यामध्यें व ताऱ्यांमध्यें असलेलीं द्रव्यें व त्यांच्या गति यांचा रासायनिक अभ्यास याच उपकरणाच्या साहाय्यानें करण्यांत येऊन निश्चित करण्यांत आल्या. सूर्याच्या किरणांच्या विच्छिन्नकिरणपटाचा अभ्यास केल्यानंतर रसायनशास्त्रांत माहीत असलेल्या निदान निम्म्या मूलद्रव्यांचें अस्तित्व सूर्यामध्यें आढळून आलें. ताऱ्यांच्या किरणपटामध्यें परस्परांत पुष्कळच फरक आढळून येतो. फॉन होफर यास असें आढळून आलें कीं, आर्कट्यूरस·

सारख्या कांहीं ताऱ्यांचा वर्णपट सूर्यासारखाच असतो. उलट सिरियससारख्या कांहीं ताऱ्यांच्या वर्णपटांत काळ्या ड रेषा आढळून येत नाहींत. इटलीमधील सेक्की या शास्त्रज्ञानें ताऱ्यांच्या वर्णपटांचे चार निरानिराळे प्रकार परस्परांपासून भिन्न असतात असें दाखविलें. यांपैकीं पहिल्या गटामध्यें सिरियस आणि वेगा हे तारे येतात व त्यांचा प्रकाश पांढरा किंवा निळा असतो व त्यांच्या वर्णपटांत उज्ज वायूच्या रुंद काळ्या रेषा दिसतात. दुसऱ्या गटामध्यें येणाऱ्या ताऱ्यांचा प्रकाश पिवळसर असतो. यांच्या किरणपटांत अनेक बारीक काळ्या रेषा असतात. अशाच तऱ्हेच्या रेषा सूर्यप्रकाशाच्या किरणपटांत आढळतात. तिसऱ्या गटांत तांबडे तारे येतात. त्यांपैकीं बऱ्याच ताऱ्यांचा प्रकाश बदलत असतो. यांच्या किरणपटांत उभ्या नळ्यासारख्या रेषा दिसतात व त्या नळ्यांची चकाकित बाजू तांबड्या रंगाच्या दिशेकडे असते. अशा तऱ्हेचा तारा बिटल ज्यूस हा होय. चौथ्या गटामध्यें अतिरक्त किंवा लालमडक तारे मोडतात. यांच्याहि वर्णपटांत नळ्यांसारखे पट्टे असतात. परंतु या नळ्यांच्या चकचकीत बाजू वरील गटाच्या उलट असतात. पिकरिंग यानें एक पांचवा गट कल्पिला आहे. त्याच्या वर्णपटांत चकचकीत रेषा असतात.

युजिन्स यास असें आढळून आलें कीं, बऱ्याचशा तेजोमेघांचे वर्णपट असंध असतात व कांहींच्या वर्णपटांत चकचकीत रेषा असतात. यावरून असें दिसतें कीं, तेजोमेघामध्यें ज्वलंत स्थितींत वायू असतात. युजिन्स यानें सिरियस या ताऱ्याचा आणि उज्जवायूचा वर्णपट यांची तुलना करून असें दाखवून दिलें कीं, त्या दोन वर्णपटांत तांबड्या रंगाच्या टोंकाकडे कांहीं रेषांमध्यें फरक आहे. आपण जर अशी कल्पना केली कीं, एखादा तारा पृथ्वीच्या बाजूस येत असेल व त्याच्या या गतीमुळें त्याच्यापासून पृथ्वीवर येणाऱ्या प्रकाशाच्या लहरींची लांबी कमी होत असेल व या लहरींच्या लांबीवर त्याच्या वर्णपटांतील वर्णरेषांची स्थिति अवलंबून असेल तर आपणांस असें अनुमान काढतां येईल कीं, ह्या ताऱ्याच्या वर्णपटांतील रेषा जर नीललोहित टोंकाकडे सरकत असतील तर ती गोष्ट त्याच्या पृथ्वीकडील गतमुळें होत असावी व त्या जर रक्त टोंकाकडे सरकत असतील तर त्या ताऱ्याची गति पृथ्वीपासून दूर जाण्याकडे असावी. यावरून असें दिसून आलें कीं, सिरियस, रिगेल, इत्यादि तारे पृथ्वीपासून दूर जात आहेत आणि आर्कटूरस, वेगा, वगैरे तारे पृथ्वीच्या जवळ जवळ येत आहेत. अलीकडे प्रकाशलेखनपद्धतीमध्यें ज्या सुधारणा झाल्या आहेत त्यांच्या साहाय्यानें या वर्णपटांतील रेषांच्या स्थितींत होणाऱ्या स्थानांतराचा सूक्ष्म अभ्यास करून ज्योतिषशास्त्रज्ञांनीं वर्णपटाच्या साहाय्यानें कांहीं दुहेरी ताऱ्यांचा शोध लावला आहे. हे तारे परस्परांभोंवतीं फिरत असतात. परंतु अतिशय मोठ्या शक्तीच्या दुर्बिणींतूनहि ते दुहेरी तारे म्हणून दिसत नाहींत. याच अभ्यासामुळें दुसरी अशी एक गोष्ट आढळून आली आहे कीं, हर्क्युलीस या नक्षत्रपुंजांतील एका ताऱ्याकडे सूर्य हा दर सेकंदास तेरा मैल या गतीनें जात आहे.

**वर्णपेशी**—(क्रोमॅटोफोर). वनस्पतींच्या पेशींतील एक इंद्रिय किंवा अवयव. हें बहुतेक सर्व स्वपोषक झाडांमध्यें आढळतें. याचा अर्थ 'वर्णधारक' असा आहे. विशेष परिचित वर्णधारक म्हणजे कर्बसात्मीकारक पेशी (क्लोरोप्लास्ट्स) होत. या हरितवर्ण द्रव्याचा (क्रोमोफिल) योगानें हिरव्या होतात.

**वर्णप्रकाशलेखन**—(स्पेक्ट्रोहेलिओग्राफ). हें एक प्रोफेसर जी. ई. हेल यानें तयार केलेले एकवर्णप्रकाशाच्या साहाय्यानें सूर्याचें प्रकाशलेख घेण्याचें उपकरण आहे. यामध्यें अशी रचना केलेली असते कीं, एका विच्छिन्नकिरणदर्शकाच्या फटींतून आंत घेतलेल्या प्रकाशाचा वर्णपट दुसऱ्या एका फटीवर पाडण्यांत येतो आणि त्या फटींतून तो प्रकाशलेख कांचेववर पडतो. यामुळें विशिष्ट एका रंगाचाच प्रकाशलेख कांचेवर पडून बाकीच्या सर्व रंगांचा प्रकाश बंद करण्यांत आलेला असतो, व त्यामुळें हा प्रकाशलेख फक्त एका वर्णाचाच येतो.

**वर्णमाला**—भाषा लिहिण्यासाठीं व तींतील ध्वनींचे विशिष्ट उच्चार करण्यासाठीं योजलेली अक्षरमाला. वर्णमालायुक्त लेखनपद्धति येण्यापूर्वीं चित्रांच्या किंवा चिन्हांच्या साहाय्यानें विचार व्यक्त करण्याची पहिली अवस्था होती. मिसर देशांतील चित्रलिपि व बाबिलोनमधील कीलाकृति लिपि हीं हिचीं ठळक उदाहरणें आहेतच. पुढें फोनिशियन लोकांची लिपि तयार होऊन ती युरोपांत ग्रीक-लॅटिन यांत मुरली गेली असें म्हणावें लागतें. आज लॅटिन वर्णमाला बहुतेक युरोपियन राष्ट्रांतून (इटली, हंगेरी, स्पेन, पोर्तुगॉल, फ्रान्स, हॉलंड, जर्मनी, इ.) दिसते. तथापि प्रत्येक भाषेनें आपले उच्चार बरोबर प्रतीत होण्यासाठीं या वर्णमालेंत थोडाबहुत फरक केलेला आहे. जर्मन भाषेंत इंग्रजी वर्णमालाच दिसेल, पण कांहीं वर्णांचे उच्चार निराळे होतात. पूर्वखंडांत अरबांनीं फोनिशियन उगमाचीच वर्णमाला प्रसृत केली. फारसी, तुर्की, हिंदुस्तानी, इ. भाषांतून ही आढळून येईल. हिंदुस्थानांतील प्राचीन ब्राह्मी लिपि (पाहा) आणि खरोष्ठी लिपि (पाहा) शिलालेख, नाणीं, चिनी बौद्ध ग्रंथ, इत्यादींतून दिसून येते. खरोष्ठी लिपीचा प्रचार फक्त वायव्येकडील कांहीं भागांतच होता. ती बहुधा अरेमाइक लिपीपासून बनली असावी, ब्राह्मी लिपीपासून हिंदुस्थानांतलि

सर्व लिपी तयार झाल्या आहेत. संस्कृत भाषा ज्या लिपींत लिहितात तिला देवनागरी म्हणतात. प्रत्येक वर्णमालेंतील वर्णांची संख्या निरनिराळी आढळते. वर्णांमध्यें स्वर आणि व्यंजनें असे दोन वर्ग पाडलेले असतात. स्वराच्या मदतीखेरीज व्यंजनाचा उच्चार करतां येत नाहीं.

चिनी भाषेंत वर्ण नसून शब्दाचित्रें व कल्पनाचित्रें आहेत. असे स्वतंत्र ध्वनि असलेले शब्द (ज्यांना वाटल्यास वर्ण म्हणावें) ८००।९०० भरतात. लिपि पाहा.

**वर्णलेख**—(स्पेक्ट्रम). जेव्हां एखाद्या पदार्थापासून निघणारा प्रकाश एका त्रिपार्श्व भिंगामधून जातो तेव्हां त्या प्रकाशाचें पृथक्करण होऊन जो वर्णलेख दिसूं लागतो त्यास वर्णपट किंवा वर्णलेख असें म्हणतात. यामध्येंच अधोरक्त आणि अतिनील किरणांच्या प्रकाशाचे आलेखहि येतात. हे आलेख दोन प्रकारचे असतात : १ उत्सर्जनवर्णालेख–हे ज्या वस्तू स्वयंप्रकाशमान असतात त्या प्रकाशापासून मिळतात. २ शोषणवर्णालेख–हे ज्या वस्तूंपासून परावर्तित प्रकाश अथवा आरपार गेलेला प्रकाश पडतो त्यांपासून मिळतात. कारण प्रकाशाचें परावर्तन किंवा पारगमन होत असतांना त्यापैकीं बऱ्याचशा प्रकाशाचें शोषण होतें.

**वर्णलेखक**—(स्पेक्ट्रोस्कोप). विच्छिन्नकिरणपट पाडण्याकरितां व त्यांची तपासणी करण्याकरितां जें उपकरण वापरण्यांत येतें त्यास विच्छिन्नकिरणदर्शक अथवा वर्णलेखक असें म्हणतात. यामध्यें मध्यभागीं एक बैठक असते. तीवर एक त्रिपार्श्व किंवा विवर्तनकारक कांच बसविलेली असते, व त्याच्या दोन बाजूंस दोन नळ्या बसविलेल्या असून त्यांपैकीं एकींत दुर्बीण असते व दुसरींत कॉलिमेटर (अक्षकारक) बसविलेला असतो. या कॉलिमेटरमुळें समांतर रेषांच्या किरणशलाका तयार होतात. याची रचना अशी असते कीं, याच्या नळीच्या बाहेरील तोंडाशीं एक उभी अरुंद फट असते आणि आंतील तोंडाशीं एक बाह्यगोल भिंग बसविलेलें असतें. या भिंगाच्या मुख्य केंद्रामध्यें वरील फट असते. यामुळें या फटीपुढें जर प्रकाशदायक पदार्थ ठेवला तर या भिंगातून बाहेर पडणारे किरण समांतररेषाशलाकेच्या स्वरूपांत पडतात व ते या यंत्राच्या अक्षाशीं समांतर असतात. मध्यावरील त्रिपार्श्व अशा तऱ्हेनें ठेवलेला असतो कीं, त्याची वक्रीभवनकारक कडा उभी असते व तीवर ही प्रकाशशलाका तिरपी एका वक्रीभवनकारक पृष्ठभागावर पडते, आणि या सर्व किरणांचा आगमकोन एकच असल्यामुळें त्या सर्वांचें वक्रीभवन एकाच प्रमाणांत होतें, व त्यामुळें त्या त्रिपार्श्वांतून बाहेर पडणारी किरणशलाकाहि समांतर किरणांची बनलेली असते. हे किरण दुर्बिणीवर पडतात, आणि त्या दुर्बिणींत दिसणारी प्रतिमा ज्या तऱ्हेचा प्रकाश योजण्यांत आला असेल त्या तऱ्हेची पडते. जर एखादी प्लॅटिनम धातूची तार घेतली आणि ती ओलसर करून सिंधुद्विकर्बितांच्या (सोडियम बाय कार्बोनेट) पुडींत बुडविली, आणि बुन्सेन दिव्याच्या ज्योतीमध्यें या फटीसमोर धरली तर तिच्यापासून दोन निरनिराळ्या ५८९० आणि ५८९६ ॲंगस्ट्रॉम दशमानमापकाच्या लांबीच्या लहरी असणाऱ्या (त्यांस १०८ यांनीं भागिलें असतां सेंटिमीटर निघतात) दोन पिवळ्या रंगाच्या रेषा निघतात. दुर्बिणींतून या दोन रेषा दृष्टीस पडल्या म्हणजे त्यांवरून या उपकरणाच्या प्रकाशपृथक्कारक शक्तीची कल्पना येते.

कांहीं विच्छिन्नकिरणदर्शकामध्यें प्रकाशाचें विकिरण अधिक प्रमाणांत मिळावें व प्रकाशाचें विच्छेदन अधिक सूक्ष्म तऱ्हेनें व्हावें याकरितां अनेक त्रिपार्श्व भिंगांची योजना केलेली असते. प्रत्यक्ष पाहावयाच्या विच्छिन्नकिरणदर्शकामध्यें प्रकाशाचें विकिरण थोड्याच प्रमाणांत व्हावें व त्यांची मार्गच्युतिहि अल्प प्रमाणांत व्हावी अशा रीतीनें त्रिपार्श्वांची योजना केलेली असते. प्रकाशाच्या गतीस होणाऱ्या प्रतिरोधाच्या तत्त्वावरूनहि बसविलेला एक प्रकारचा विच्छिन्नकिरणदर्शक आढळण्यांत येतो.

**वर्णहीन लोक**—(अल्बिनो). या जातीच्या लोकांचे केंस, कातडी व डोळे यांत काळेपणा नसतो. हे लोक श्वेतवर्णीय, इंडियन किंवा निग्रो वंशाचे असले तरी त्यांच्या अंगाचा रंग फिक्कट दुधासारखा असतो. त्यांचे केंस पांढरे, व डोळ्यांतील बाहुलीचा पडदा फिक्कट गुलाबी रंगाचा असून डोळ्यांतील बाहुली तांबडीलाल दिसते. या लोकांना दिवसाचा प्रकाश सहन होत नाहीं, पण ते थोड्या अंधारांत किंवा चंद्रप्रकाशांत चांगले पाहूं शकतात. या प्रकारची वर्णहीनता घोडे, ससे, उंदीर, घुशी व कांहीं फुलें यांतूनहि आढळते. तेव्हां एखाद्या मानववंशाचेंच हें वैशिष्ट्य नसून हा दोष किंवा रोग आनुवंशिक म्हणतां येईल.

**वर्णान्धता**—या रोगामध्यें मनुष्यास कांहीं रंग मुळींच दिसत नाहींसे होतात किंवा कांहीं अंधुक दिसूं लागतात, किंवा दोन रंगांमध्यें फरक दिसत नाहींसा होतो. हा रोग झालेल्या मनुष्यास तांबडा रंग विशेषतः प्रथम दिसत नाहींसा होतो. इतर बाबतींत दृष्टि शाबूत असूनहि हा रोग होण्याचा संभव असतो. या रोगाचें कारण नेत्रेंद्रियामध्यें नसून संवेदनाक्षमतेमध्यें असतें.

**वर्णावरण**—(क्रोमोस्फीयर). सूर्याभोंवतीं असणारें एक वायूंचें आवरण. याच्या आंतील आवरण प्रदीप्त द्रव्यांचें तेजसावरण असल्यानें ग्रहणकालाखेरीज नुसत्या डोळ्यांनीं हें दिसत नाहीं. उज्जवायु आणि इतर धातव वायू यांचे दर्शक अशा प्रकाशरेषा वर्णपटावर दिसतात. दगांप्रमाणें वाटणारे

उज्ज आणि सौर वायूंचे स्थिर उंचवटे जसेच्या तसे अनेक दिवस राहतात. स्फोटक उंचवटे धातव वायूंचे असतात. यांचे आंतून स्फोट एका तासाला एक लाख मैलापर्यंतहि जातात. या आवरणाची जाडी सुमारें ६,००० मैल असते.

**वर्तमानपत्रें**—हीं बातम्या देणारीं छापील पत्रें दैनिक, अर्धसाप्ताहिक किंवा साप्ताहिक असतात. मुख्यतः पत्रें सकाळीं निघतात, पण संध्याकाळीं निघणारींहि आहेत. कांहीं मोठ्या पत्रांच्या रोज एकापेक्षां अधिक वेळां आवृत्ती निघतात. रविवारचीं पत्रें वेगळींच असतात व त्यांचा खपहि मोठा असतो. वर्तमानपत्रांच्या हजारों प्रती थोड्या वेळांत आणि श्रमांत छापून देणारीं यंत्रें निघालीं आहेत. आठपानी पत्र, एका तासांत तीन लाख प्रती या गतीनें छापून निघून, चिकटवून, व घड्या घालून बाहेर पडतें. लिनोटाइपची युक्ति निघाल्यापासून टाइप जुळविण्याचा वेळ व श्रम पुष्कळसे वांचले.

पाश्चात्य देशांत वर्तमानपत्राच्या कचेरींत शेंकडों माणसें कामाला असतात. संपादकीय खातें, विक्रीखातें, यांत्रिक खातें व जाहिरातखातें या चारांच्या कार्यक्षमतेवर पत्र चांगलें चालतें. मुख्य संपादकाच्या हाताखालीं संपादकीय व्यवस्थापक, त्याच्या हाताखालीं वृत्तसंपादक, तार-संपादक, नगर-संपादक, साहित्य-संपादक, आर्थिक संपादक, इ. सहसंपादक कामें करतात. नगर-संपादकाच्या हाताखालीं किती तरी बातमीदार असतात. त्यांच्या-खेरीज बाहेरचे बातमीदार नेमलेले असतातच. वर्तमानपत्रांना देशांतील व जगांतील महत्त्वाच्या बातम्या तातडतोब पुरविणाऱ्या असोसिएटेड प्रेस, रायटर न्यूज एजन्सी, इंटरनॅशनल न्यूज सर्व्हिस, इ. अनेक संस्था असतात. संपादकीय कचेरींतच आपोआप बातम्या लिहून देणारें 'टेलेप्रिंट' यंत्र वर्तमानपत्राच्या धंद्याला आज आवश्यक होऊन बसलें आहे.

जगांत एकंदर वृत्तपत्रें आणि नियतकालिकें पाऊण लाख असतील. दोन पानांपासून ऐंशीं पानांपर्यंत वर्तमानपत्रें आहेत व त्यांचा खप कांहीं शेंकड्यांपासून तो पांच लाखांपर्यंत असतो. वर्तमानपत्राचें आजच्या काळांत फार मोठें महत्त्व आहे. ती एक मोठी शक्ति आहे. एवढी प्रचंड शक्ति एक माणूस किंवा थोडी संपादकीय मंडळी वापरतात. चांगलें किंवा वाईट करण्याचें मोठें शस्त्र ते पेलीत असल्यानें संपादकांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडते. सत्य आणि प्रामाणिकपणा यांबरोबरच लोककल्याणाची वृत्ति त्यांच्या ठिकाणीं पाहिजे. वैयक्तिक हेव्यादाव्यापासून त्यांनीं अलिप्त राहावें लागतें.

युरोपांत १६ व्या शतकापासून वृत्तपत्रें निघूं लागलीं. १७०४ मध्यें डॅनिएल डिफोचें 'दि रिव्ह्यू' पत्र निघालें. आज गाजणारें 'दि टाइम्स' १७८५ मध्यें जॉन वॉल्टरनें सुरू केलें. पुढील शतकांत बरींच वर्तमानपत्रें निघालीं. आज लंडनमध्यें 'दि डेली मेल', 'दि डेली एक्सप्रेस' व 'दि डेली हेरल्ड' यांचा मोठा खप आहे.

इंग्लंडमध्यें दैनिकांचा रोज खप २९० लक्ष प्रतींचा आहे तर अमेरिकेंत तो ५ कोटी आहे. लोकसंख्येप्रमाणें पाहतां इंग्लंडमध्यें १½ माणसांना १ पत्र पडतें तर अमेरिकेंत ३ माणसांना १ पत्र हें प्रमाण येतें. हिंदुस्थान आणि पाकिस्तान मिळून रोज दैनिकाचा खप २० लाखांचा आहे. म्हणजे २०० माणसांना १ पत्र पडतें. वर्तमानपत्रांना लागणाऱ्या कागदाच्या खपाचें मान असें आहे—इंग्लंड ८·९ टन; अमेरिका ३८·८ टन; हिंदुस्थान ०·२ टन.

भारतीय वृत्तपत्रें—भारतीय वृत्तपत्रविषयक इतिहासास अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रारंभ झाला. इंग्रजांचा प्रवेश व अमल प्रथमतः बंगालमध्यें झाल्यानें वृत्तपत्राचा जन्म प्रथम त्याच प्रांतात 'हिकीचें बंगाल गॅझेट' निघून झाला (१७८०). परंतु मोठ्या माणसाची बदनामी केल्यावरून सरकारनें त्याच्या संपादकास तुरुंगांत घातलें तेव्हां तें पत्र बंद पडलें. त्यानंतर गॅझेटप्रमाणें दुसरीं कांहीं पत्रें निघालीं. १७९१ त कॉर्नवालिसनें एका संपादकास हद्दपार केलें. गव्हर्नरच्या या अधिकाराविषयीं वाद निघाला असतां कोर्टानें गव्हर्नरला तो हक्क असल्याबद्दल निर्णय दिला. १७९९ त मुद्रणनियंत्रणाच्या कायद्यास अधिकाऱ्यां-कडून संमति मिळून तो अमलांत आला. वृत्तपत्रांतील आगबोटींच्या हालचालीच्या प्रसिद्धीनें फ्रेंच चांचांना फायदा होतो म्हणून वृत्तपत्रांवर आणखी जास्त निर्बंध घातले गेले. हेस्टिंग्जनें प्रेस-सेन्सॉर बंद केला, पण सरकारी कृत्यांवरील व अधिकाऱ्यांच्या वर्तनांवरील कडक टीकेस निर्बंध घालणारा कायदा केला. १८१८ त बकिंगहॅमच्या संपादकत्वाखालीं 'कलकत्ता जर्नल' निघालें. हेस्टिंग्जच्यामागून कांहीं काळ अधिकारावर असलेल्या ॲडॅम्सनें बकिंगहॅमनें सरकारवर केलेल्या टीकेनें चिडून जाऊन प्रत्येक पत्रास लायसेन्स घेण्याची अट घालून बकिंगहॅमला हद्दपार केलें. १८३५ त मेटकॉफनें पूर्वीचे सर्व कायदे रद्द करून राजद्रोह व बदनामी या कायद्यांखालींच संपादकांना आणून ठेविलें. संपादकांनीं रशियाच्या बाजूनें लिहून लोकांचीं मनें कलुषित करूं नयेत म्हणून १८७८ सालीं एक कायदा केला गेला. १८८२ सालीं हा कायदा लॉर्ड रिपननें रद्द करून पीनल कोडांतच १२४ अ कलम घातलें. पुढें १९१० त प्रेस ॲक्ट झाला व युद्धकालांत सेन्सॉरशिप बसून युद्ध संपल्यानंतर ही सेन्सॉरशिप उठली.

देशी वृत्तपत्रें—१८१८ सालीं मार्शमननें बंगाली भाषेंत निघणारें 'समाचार दर्पण' पत्र काढलें. मुंबई इलाख्यांत मुंबई-

सर्व लिपी तयार झाल्या आहेत. संस्कृत भाषा ज्या लिपींत लिहितात तिला देवनागरी म्हणतात. प्रत्येक वर्णमालेंतील वर्णांची संख्या निरनिराळी आढळते. वर्णांमध्यें स्वर आणि व्यंजनें असे दोन वर्ग पाडलेले असतात. स्वराच्या मदतीखेरीज व्यंजनाचा उच्चार करतां येत नाहीं.

चिनी भाषेंत वर्ण नसून शब्दाचित्रें व कल्पनाचित्रें आहेत. असे स्वतंत्र ध्वनि असलेले शब्द (ज्यांना वाटल्यास वर्ण म्हणावें) ८००।९०० भरतात. लिपि पाहा.

**वर्णलेख**—(स्पेक्ट्रम). जेव्हां एखाद्या पदार्थापासून निघणारा प्रकाश एका त्रिपार्श्व भिंगामधून जातो तेव्हां त्या प्रकाशाचें पृथक्करण होऊन जो वर्णलेख दिसूं लागतो त्यास वर्णपट किंवा वर्णलेख असें म्हणतात. यामध्येंच अधोरक्त आणि अतिनील किरणांच्या प्रकाशाचे आलेखहि येतात. हे आलेख दोन प्रकारचे असतात: १ उत्सर्जनवर्णलेख–हे ज्या वस्तू स्वयंप्रकाशमान असतात त्या प्रकाशापासून मिळतात. २ शोषणवर्णलेख–हे ज्या वस्तूंपासून परावर्तित प्रकाश अथवा आरपार गेलेला प्रकाश पडतो त्यांपासून मिळतात. कारण प्रकाशाचें परावर्तन किंवा पारगमन होत असतांना त्यापैकीं बऱ्याचशा प्रकाशाचें शोषण होतें.

**वर्णलेखक**—(स्पेक्ट्रोस्कोप). विच्छिन्नकिरणपट पाडण्याकरितां व त्यांची तपासणी करण्याकरितां जें उपकरण वापरण्यांत येतें त्यास विच्छिन्नकिरणदर्शक अथवा वर्णलेखक असें म्हणतात. यामध्यें मध्यभागीं एक बैठक असते. तीवर एक त्रिपार्श्व किंवा विवर्तनकारक कांच बसविलेली असते, व त्याच्या दोन बाजूंस दोन नळ्या बसविलेल्या असून त्यांपैकीं एकींत दुर्बीण असते व दुसरींत कॉलिमेटर (अक्षकारक) बसविलेला असतो. या कॉलिमेटरमुळें समांतर रेषांच्या किरणशलाका तयार होतात. याची रचना अशी असते कीं, याच्या नळीच्या बाहेरील तोंडाशीं एक उभी अरुंद फट असते आणि आंतील तोंडाशीं एक बाह्यगोल भिंग बसविलेलें असतें. या भिंगाच्या मुख्य केंद्रामध्यें वरील फट असते. यामुळें या फटीपुढें जर प्रकाशदायक पदार्थ ठेवला तर या भिंगातून बाहेर पडणारे किरण समांतररेषाशलाकेच्या स्वरूपांत पडतात व ते या यंत्राच्या अक्षाशीं समांतर असतात. मध्यावरील त्रिपार्श्व अशा तऱ्हेनें ठेवलेला असतो कीं, त्याची वक्रीभवनकारक कडा उभी असते व तीवर ही प्रकाशशलाका तिरपी एका वक्रीभवनकारक पृष्ठभागावर पडते, आणि या सर्व किरणांचा आगमकोन एकच असल्यामुळें त्या सर्वांचें वक्रीभवन एकाच प्रमाणांत होतें, व त्यामुळें त्या त्रिपार्श्वांतून बाहेर पडणारी किरणशलाकाहि समांतर किरणांची बनलेली असते. हे किरण दुर्बिणीवर पडतात, आणि त्या दुर्बिणींत दिसणारी प्रतिमा ज्या तऱ्हेचा प्रकाश योजण्यांत आला असेल त्या तऱ्हेची पडते. जर एखादी प्लॅटिनम धातूची तार घेतली आणि ती ओलसर करून सिंधुद्विकर्बितच्या (सोडियम बाय कार्बोनेट) पुडींत बुडविली, आणि बुन्सेन दिव्याच्या ज्योतीमध्यें या फटीसमोर धरली तर तिच्यापासून दोन निरनिराळ्या ५८९० आणि ५८९६ ॲंगस्ट्रॉम दशमानमापकाच्या लांबीच्या लहरी असणाऱ्या (त्यांत १०८ यांनीं भागिलें असतां सेंटिमीटर निघतात) दोन पिवळ्या रंगाच्या रेषा निघतात. दुर्बिणींतून या दोन रेषा दृष्टीस पडल्या म्हणजे त्यांवरून या उपकरणाच्या प्रकाशपृथक्कारक शक्तीची कल्पना येते.

कांहीं विच्छिन्नकिरणदर्शकामध्यें प्रकाशाचें विकिरण अधिक प्रमाणांत मिळावें व प्रकाशाचें विच्छेदन अधिक सूक्ष्म तऱ्हेनें व्हावें याकरितां अनेक त्रिपार्श्व भिंगांची योजना केलेली असते. प्रत्यक्ष पाहावयाच्या विच्छिन्नकिरणदर्शकामध्यें प्रकाशाचें विकिरण थोड्याच प्रमाणांत व्हावें व त्यांची मार्गच्युतिहि अल्प प्रमाणांत व्हावी अशा रीतीनें त्रिपार्श्वांची योजना केलेली असते. प्रकाशाच्या गतीस होणाऱ्या प्रतिरोधाच्या तत्त्वावरूनहि बसविलेला एक प्रकारचा विच्छिन्नकिरणदर्शक आढळण्यांत येतो.

**वर्णहीन लोक**—(अल्बिनो). या जातीच्या लोकांचे केंस, कातडीं व डोळे यांत काळेपणा नसतो. हे लोक श्वेतवर्णीय, इंडियन किंवा नीग्रो वंशाचे असले तरी त्यांच्या अंगाचा रंग फिक्कट दुधासारखा असतो. त्यांचे केंस पांढरे, व डोळ्यांतील बाहुलीचा पडदा फिक्कट गुलाबी रंगाचा असून डोळ्यांतील बाहुली तांबडीलाल दिसते. या लोकांना दिवसाचा प्रकाश सहन होत नाहीं, पण ते थोड्या अंधारांत किंवा चंद्रप्रकाशांत चांगले पाहूं शकतात. या प्रकारची वर्णहीनता घोडे, ससे, उंदीर, घुशी व कांहीं फुलें यांतूनहि आढळते. तेव्हां एखाद्या मानववंशाचेंच हें वैशिष्ट्य नसून हा दोष किंवा रोग आनुवंशिक म्हणतां येईल.

**वर्णान्धता**—या रोगामध्यें मनुष्यास कांहीं रंग मुळींच दिसत नाहींसे होतात किंवा कांहीं अंधुक दिसूं लागतात, किंवा दोन रंगांमध्यें फरक दिसत नाहींसा होतो. हा रोग झालेल्या मनुष्यास तांबडा रंग विशेषतः प्रथम दिसत नाहींसा होतो. इतर बाबतींत दृष्टि शाबूत असूनहि हा रोग होण्याचा संभव असतो. या रोगाचें कारण नेत्रेंद्रियामध्यें नसून संवेदनाक्षमतेमध्यें असतें.

**वर्णावरण**—(क्रोमोस्फीयर). सूर्याभोंवतीं असणारें एक वायूंचें आवरण. याच्या आंतील आवरण प्रदीप्त द्रव्यांचें तेजसावरण असल्यानें ग्रहणकालाखेरीज नुसत्या डोळ्यांनीं हें दिसत नाहीं. उज्जवायु आणि इतर धातव वायू यांचे दर्शक अशा प्रकाशरेषा वर्णपटावर दिसतात. ढगांप्रमाणें वाटणारे

उज्ज आणि सौर वायूंचे स्थिर उंचवटे जसेच्या तसे अनेक दिवस राहतात. स्फोटक उंचवटे घातव वायूंचे असतात. यांचे आंतून स्फोट एका तासाला एक लाख मैलापर्यंतहि जातात. या आवरणाची जाडी सुमारें ६,००० मैल असते.

**वर्तमानपत्रें**—हीं बातम्या देणारीं छापील पत्रें दैनिक, अर्धसाप्ताहिक किंवा साप्ताहिक असतात. मुख्यतः पत्रें सकाळीं निघतात, पण संध्याकाळीं निघणारींहि आहेत. कांहीं मोठ्या पत्रांच्या रोज एकापेक्षां अधिक वेळां आवृत्ती निघतात. रविवारचीं पत्रें वेगळींच असतात व त्यांचा खपहि मोठा असतो. वर्तमानपत्रांच्या हजारों प्रती थोड्या वेळांत आणि श्रमांत छापून देणारीं यंत्रें निघालीं आहेत. आठपानी पत्र, एका तासांत तीन लाख प्रती या गतीनें छापून निघून, चिकटवून, व घड्या घालून बाहेर पडतें. लिनोटाइपची युक्ति निघाल्यापासून टाइप जुळविण्याचा वेळ व श्रम पुष्कळसे वांचले.

पाश्चात्य देशांत वर्तमानपत्राच्या कचेरींत शेंकडों माणसें कामाला असतात. संपादकीय खातें, विक्रीखातें, यांत्रिक खातें व जाहिरातखातें या चारांच्या कार्यक्षमतेवर पत्र चांगलें चालतें. मुख्य संपादकाच्या हाताखालीं संपादकीय व्यवस्थापक, त्याच्या हाताखालीं वृत्तसंपादक, तार-संपादक, नगर-संपादक, साहित्य-संपादक, आर्थिक संपादक, इ. सहसंपादक कामें करतात. नगर-संपादकाच्या हाताखालीं किती तरी बातमीदार असतात. त्यांच्या-खेरीज बाहेरचे बातमीदार नेमलेले असतातच. वर्तमानपत्रांना देशांतील व जगांतील महत्त्वाच्या बातम्या तावडतोब पुरविणाऱ्या असोसिएटेड प्रेस, रायटर न्यूज एजन्सी, इंटरनॅशनल न्यूज सर्व्हिस, इ. अनेक संस्था असतात. संपादकीय कचेरींतच आपोआप बातम्या लिहून देणारें 'टेलेप्रिंट' यंत्र वर्तमानपत्राच्या धंद्याला आज आवश्यक होऊन बसलें आहे.

जगांत एकंदर वृत्तपत्रें आणि नियतकालिकें पाऊण लाख असतील. दोन पानांपासून ऐंशीं पानांपर्यंत वर्तमानपत्रें आहेत व त्यांचा खप कांहीं शेंकड्यांपासून तो पांच लाखांपर्यंत असतो. वर्तमानपत्राचें आजच्या काळांत फार मोठें महत्त्व आहे. ती एक मोठी शक्ति आहे. एवढी प्रचंड शक्ति एक माणूस किंवा थोडी संपादकीय मंडळी वापरतात. चांगलें किंवा वाईट करण्याचें मोठें शस्त्र ते पेलीत असल्यानें संपादकांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडते. सत्य आणि प्रामाणिकपणा यांचरोबरच लोककल्याणाची वृत्ति त्यांच्या ठिकाणीं पाहिजे. वैयक्तिक हेव्यादाव्यापासून त्यांनीं अलिप्त राहावें लागतें.

युरोपांत १६ व्या शतकापासून वृत्तपत्रें निघूं लागलीं. १७०४ मध्यें डॅनिएल डिफोचें 'दि रिव्ह्यू' पत्र निघालें. आज गाजणारें 'दि टाइम्स' १७८५ मध्यें जॉन वॉल्टरनें सुरू केलें. पुढील शतकांत बरींच वर्तमानपत्रें निघालीं. आज लंडनमध्यें 'दि डेली मेल', 'दि डेली एक्सप्रेस' व 'दि डेली हेरल्ड' यांचा मोठा खप आहे.

इंग्लंडमध्यें दैनिकांचा रोज खप २९० लक्ष प्रतींचा आहे तर अमेरिकेंत तो ५ कोटी आहे. लोकसंख्येप्रमाणें पाहतां इंग्लंडमध्यें १$\frac{3}{5}$ माणसांना १ पत्र पडतें तर अमेरिकेंत ३ माणसांना १ पत्र हें प्रमाण येतें. हिंदुस्थान आणि पाकिस्तान मिळून रोज दैनिकाचा खप २० लाखांचा आहे. म्हणजे २०० माणसांना १ पत्र पडतें. वर्तमानपत्रांना लागणाऱ्या कागदाच्या खपाचें मान असें आहे—इंग्लंड ८·९ टन; अमेरिका ३८·८ टन; हिंदुस्थान ०·२ टन.

भारतीय वृत्तपत्रें—भारतीय वृत्तपत्रविषयक इतिहासास अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रारंभ झाला. इंग्रजांचा प्रवेश व अमल प्रथमतः बंगालमध्यें झाल्यानें वृत्तपत्राचा जन्म प्रथम त्याच प्रांतात 'हिकीचें बंगाल गॅझेट' निघून झाला (१७८०). परंतु मोठ्या माणसाची बदनामी केल्यावरून सरकारनें त्याच्या संपादकास तुरुंगांत घातलें तेव्हां तें पत्र बंद पडलें. त्यानंतर गॅझेटप्रमाणें दुसरीं कांहीं पत्रें निघालीं. १७९१ त कॉर्नवालिसनें एका संपादकास हद्दपार केलें. गव्हर्नरच्या या अधिकाराविषयीं वाद निघाला असतां कोर्टानें गव्हर्नरला तो हक्क असल्याबद्दल निर्णय दिला. १७९९ त मुद्रणनियंत्रणाच्या कायद्यास अधिकाऱ्यां-कडून संमति मिळून तो अमलांत आला. वृत्तपत्रांतील आगबोटींच्या हालचालींच्या प्रसिद्धीनें फ्रेंच चांचांना फायदा होतो म्हणून वृत्तपत्रांवर आणखी जास्त निर्बंध घातले गेले. हेस्टिंग्जनें प्रेस-सेन्सॉर बंद केला, पण सरकारी कृत्यांवरील व अधिकाऱ्यांच्या वर्तनांवरील कडक टीकेस निर्बंध घालणारा कायदा केला. १८१८ त बकिंगहॅमच्या संपादकत्वाखालीं 'कलकत्ता जर्नल' निघालें. हेस्टिंग्जच्यामागून कांहीं काळ अधिकारावर असलेल्या ॲडॅम्सनें बकिंगहॅमनें सरकारवर केलेल्या टीकेनें चिडून जाऊन प्रत्येक पत्रास लायसेन्स घेण्याची अट घालून बकिंगहॅमला हद्दपार केलें. १८३५ त मेटकॉफनें पूर्वीचे सर्व कायदे रद्द करून राजद्रोह व बदनामी या कायद्यांखालींच संपादकांना आणून ठेविलें. संपादकांनीं रशियाच्या बाजूनें लिहून लोकांचीं मनें कलुषित करूं नयेत म्हणून १८७८ सालीं एक कायदा केला गेला. १८८२ सालीं हा कायदा लॉर्ड रिपननें रद्द करून पीनल कोडांतच १२४ अ कलम घातलें. पुढें १९१० त प्रेस ॲक्ट झाला व युद्धकालांत सेन्सॉरशिप बसून युद्ध संपल्यानंतर ही सेन्सॉरशिप उठली.

देशी वृत्तपत्रें—१८१८ सालीं मार्शमननें बंगाली भाषेंत निघणारें 'समाचार दर्पण' पत्र काढलें. मुंबई इलाख्यांत मुंबई-

व्यतिरिक्त सुधारलेलें दुसरें मोठें शहर नाहीं. तेव्हां तेथेंच वृत्तपत्रें जास्त निघालीं, वाढलीं व पोसलीं गेलीं. १७९० त मुंबईस 'गॅझेट' पत्र निघालें. दोन वर्षांनीं विलयम ॲशबर्नररनें 'कुरीअर' पत्र काढलें. सरकारच्या नोटिसा प्रसिद्ध करण्याबद्दल या पत्राला सरकारकडून सालिना दहा हजार रुपये मिळत. द्विसाप्ताहिक 'बॉंबे टाइम्स' १८३७ त सुरू झालें. हें पत्र मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं चालविलें होतें; तें १८५० त दैनिक झालें. १८२८ त 'ओव्हरलॅंड समरी' नांवाचें पत्र निघालें. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत दशकांनीं मोजण्याइतकीं पत्रें एकट्या मुंबईंतच निघूं लागलीं. सत्तावन्न सालच्या बंडानंतर हिंदुस्थानांत एकंदर ४४ पत्रें होतीं. तीं १८८८ त २०३ व १९१८ त ८८३ झालीं.

हिंदुस्थानांतील इंग्रजी वृत्तपत्रें—हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांत इंग्रजी व देशी भाषांतील असे दोन मुख्य वर्ग पडतात. इंग्रजींत पुन्हां ब्रिटिशांच्या मालकीचीं व ब्रिटिश संपादक असणारीं, आणि हिंदी मालकीचीं व हिंदी संपादक असणारीं असे भेद पडतील. इंग्रजी पत्रांपेक्षां देशी पत्रें साहजिकच फार लोक वाचतात; पण त्यांचा खप विशिष्ट भागांतच असतो. ब्रिटिशांच्या मालकीचीं पत्रें आतां कमी होत चाललीं आहेत व हळूहळू तीं हिंदी धनिकांच्या हातांत जात आहेत. देशी पत्रांचे सूर राष्ट्रीयत्वापासून कॉंग्रेस सरकारला विरोध करण्यापर्यंत अगदीं वेगवेगळे दिसतील.

आज ब्रिटिश पत्रांत अगदीं प्रमुख म्हणजे 'कॅपिटल' होय. हें १८८८ पासून कलकत्त्यास व्यापारी साप्ताहिक म्हणून चालू आहे. १९४९ सालीं दिल्लीस निघालेलें 'थॉट' साप्ताहिक व दैनिक 'स्टेट्समन' (स्था. १८७५) हीं काय तीं आज ॲंग्लो-इंडियन समाजाचीं मुखपत्रें म्हणतां येतील. 'स्टेट्समन' कलकत्ता व न्यू दिल्ली या दोन्ही ठिकाणीं निघतें. मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्राला १९३८ सालीं शंभर वर्षें पुरीं झालीं. हें परवांपर्यंत चांगलें वजनदार ॲंग्लो-इंडियन पत्र होतें व त्याचा खप आणि लेखनाचा दर्जाहि मोठा असे. याचीं मतें जोमदार व विचारपरिप्लुत असत; व सरकारबाजूचें म्हणून गणलें जात असलें तरी त्याचें सर्वांवर वजन असे. आतां हें हिंदी मालकीचें व हिंदी वृत्तीचें असें झालें आहे. तथापि यांत कॉंग्रेस सरकारवर निर्भीड टीका योग्य वेळीं येत असते.

पूर्वी अलाहाबादला पण आतां लखनौला निघत असलेलें असेंच वजनदार 'पायोनिअर' नांवाचें दैनिक आतां ॲंग्लो-इंडियन राहिलें नाहीं. हें १८६५ सालापासून चाललें असून १९३३ पर्यंत याचें मोठें प्रस्थ असे व याचें तसेंच वैशिष्ट्यहि असे. मध्यवर्ती ब्रिटिश सरकारशीं याचा निकटचा संबंध असून यांतील मतांप्रमाणेंच बातम्याहि फार महत्त्वाच्या असत. लखनौचें कॉंग्रेस पत्र 'दि नॅशनल हेरल्ड' हें पं. जवाहरलाल नेहरूंनीं सुरू केलेलें दैनिक असून चांगलें चाललें व चालवलें जात आहे.

लाहोरचें 'सिव्हिल अँड मिलिटरी गॅझेट' हिंदुस्थानातील मुलकी आणि लष्करी ब्रिटिश लोकांचें मुखपत्र असे. कराचीचें 'डेली गॅझेट' यांतच पुढें समाविष्ट झालें. हीं पत्रें 'टाइम्स ऑफ इंडिया'प्रमाणें डालमिया वृत्तसंस्थेनें आतां चालविलीं आहेत. यांचें धोरण प्रागतिक असतें व संपादक अर्जुन मि. एफ्. डब्ल्यु. बास्टिन हे युरोपियन आहेत.

पूर्वी 'मद्रास मेल' (आतां नुसतें 'मेल') पत्राचें वजन दक्षिणेंतील ब्रिटिश लोकांत फार असे. आतां हे हिंदी मालकीचें आहे. तथापि अद्याप संपादक एक ब्रिटिशच आहे. मद्रासचें दुसरें पत्र 'इंडियन एक्सप्रेस' हें गोएंका वृत्तसंस्थेच्या मालकीचें तर 'लिबरेटर' हें जस्टिस पक्षाचें आहे. नुकतेंच निघालेलें 'इंडियन रिपब्लिक' हें आंध्र प्रांतातील राष्ट्रीय पक्षाचें आहे. पण सर्वांवर ताण म्हणजे मद्रासमधील 'हिंदू'ची आहे. १८७८ सालीं हें पत्र निघालें व लवकरच दक्षिण हिंदुस्थानचें सर्वश्रेष्ठ वृत्तपत्र बनलें. यांत मोठ्या जबाबदारीनें मतप्रदर्शन केलें जात असून सरकार आणि जनता या दोघांवरहि याचा वचक आहे. हें उत्कृष्ट रीतीनें संपादलें जातें हें विशेष.

कलकत्त्याचें 'अमृतबझार पत्रिका' आतां पूर्वीप्रमाणे ज्वलज्जहाल उरलें नसलें तरी बंगाल आणि उत्तर प्रदेश यांत त्याचें वजन टिकून आहे. याची अलाहाबादला एक आवृत्ति निघते. या पत्राचा मागील इतिहास संस्मरणीय आहे. 'पत्रिके' खेरीज 'हिंदुस्थान स्टॅंडर्ड' व 'नेशन' हीं इंग्रजी पत्रें बंगालमध्यें महत्त्वाचीं आहेत. 'आनंद बझार पत्रिका', 'युगांतर' यांसारखीं देशी भाषेंतील अनेक पत्रें बंगालमध्यें दिसतील व त्यांनाहि स्वतःचा इतिहास आहे.

मुंबईकडे 'टाइम्स' खेरीज 'बॉंबे क्रॉनिकल' व 'नॅशनल स्टॅंडर्ड' हीं पत्रें प्रमुख व राजकीय थाटाचीं असून चांगलीं निघतात. 'ईव्हनिंग स्टार' व 'भारत' हीं नवीनच गुदस्तां (१९४९) निघालेलीं इंग्रजी दैनिकें आहेत. 'भारता'चे संपादक श्री. के. गोपालस्वामी हे चांगले कसलेले व मुरलेले संपादक आहेत. 'ब्लिट्झ' आणि 'फोरम' हीं मुंबईचीं साप्ताहिकें आपल्या स्पष्ट टीकेनें व वैशिष्ट्यानें गाजलीं आहेत. १९४७ च्या फाळणीपर्यंत लाहोर येथें निघत असलेले 'ट्रायब्यून' आतां अंबालयास प्रसिद्ध होतें. यांतील टीका प्रखर पण राष्ट्रीय वृत्तीची असते. 'हिंदुस्थान टाइम्स' हें दैनिक शेट बिर्लांच्या मालकीचें असून सरकारला उचलून धरणारें पत्र आहे.

'इंडियन न्यूज क्रॉनिकल' व 'नॅशनल कॉल' हीं दैनिकें याच वळणाचीं पण डालमियांच्या छापाखालचीं आहेत. दिल्लीस १९४९ सालीं शिखांचें 'खालसा' दैनिक निघालें. कै. चिंतामणि-संपादित अलाहाबादचें प्रख्यात 'लीडर' पत्र पूर्वीप्रमाणेंच सनदशीर असलें तरी आज कॉंग्रेस कारभाराला उचलून धरणारें आहे. हें कांहीं वर्षांपासून बिर्लांच्या वर्चस्वाखालीं आहे.

नागपूरला सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचें 'हितवाद' व कॉंग्रेसचें मुखपत्र 'नागपूर टाइम्स' हीं दोन इंग्रजी दैनिकें निघतात. बिहार सरकारची राजधानी पाटणा येथेंहि 'सर्च लाइट' व 'इंडियन नेशन' हीं दोन दैनिकें प्रसिद्ध होत असतात. पाहिलें बिर्लांच्या मालकीचें आहे. 'इंडियन नेशन' हें सरकारवर फार कडक टीका करतें म्हणून बिहार सरकारनें वृत्तपत्रांच्या सरकारसंमत यादींतून याचें नांव कमी केलें.

पश्चिम पाकिस्तानांत 'सि. मि. गॅझेट' खेरीज 'डॉन', 'सिंध ऑब्झर्व्हर' (कराची) व 'पाकिस्तान टाइम्स' (लाहोर) हीं दैनिकें निघतात. पूर्व पाकिस्तानांत मात्र इंग्रजी पत्रांचा अगदीं अभाव दिसतो. उर्दू पत्रें पाकिस्तानांत बरींच आहेत.

मराठी वर्तमानपत्रें—मराठींतील पहिलें वर्तमानपत्र 'दर्पण' १८३२ त निघालें. बाळशास्त्री जांभेकर त्याचे संपादक होते. त्याचे प्रकाशक भाऊ महाजन यांनीं दुसरें 'प्रभाकर' साप्ताहिक काढलें. तें फार गाजलें. त्यांत लोकहितवादींचीं 'शतपत्रें' प्रसिद्ध झालीं. 'ज्ञानसिंधु' व 'चंद्रोदय' याच सुमारास निघालीं. 'ज्ञानोदय' हें खिस्ती पत्र १८४१ सालीं निघालें. हें पाक्षिक असे. 'ज्ञानप्रकाश' १८४९ त निघूं लागलें. हीं दोन पत्रें मात्र अद्यापि चालू आहेत. 'ज्ञानप्रकाशा'नंतर 'इंदुप्रकाश' निघालें (१८६२); तें तीस वर्षांपूर्वी 'लोकमान्य' दैनिकांत समाविष्ट केलें गेलें. मंडलिकांचें 'नेटिव्ह ओपिनियन' इंग्रजी-मराठी होतें; हें चांगलें भारदस्त निघत असे. प्रार्थनासमाजाचें मुखपत्र 'सुबोधपत्रिका' १८७४ त निघाली. ती अद्यापि जीव धरून आहे. श्री. द्वा. गो. वैद्यांच्या संपादकत्वाखालीं तिला तेज असे. 'केसरी' पत्र विष्णुशास्त्र्यांनीं १८८० त काढलें. त्याला पुढें लो. टिळकांसारखे धुरंधर राजकारणी देशभक्त संपादक लाभल्या-मुळें तें महाराष्ट्राचें एकमेव प्रमुख पत्र बनलें व संस्थारूप पावलें. टिळकांनंतर केळकरांनीं तें टिकवून विविध अंगांनीं नटविलें. पण आज त्याचा राजकीय दर्जा कमी झाला आहे. आगरकरांचा 'सुधारक' क्रान्तिकारक होता. पण तो पुढें फार जगला नाहीं. हरिभाऊंचें 'करमणूक' पत्र नांवाप्रमाणें चटकदार असे. शिवरामपंत परांजपे यांच्या 'काळ'नें मराठी वाङ्मयात उत्कृष्ट भर घातली. त्यांतील निबंध अद्यापि मननीय वाटतात. भोपट-करांचा 'भाला' तिखट असे.

मुंबई-पुण्याबाहेर जिल्ह्यांतून व संस्थानांतून मराठी वृत्तपत्रें निघत होतीं. त्यांत 'सयाजीविजय' बरें असे. नागपुरास 'देशसेवक' ओजस्वी लेखांनीं समृद्ध होता. त्यांतील लेखक अच्युतराव कोल्हटकर यांनीं मुंबईस 'संदेश' काढून वृत्तपत्रांच्या इतिहासांत क्रान्ति करून सोडली. 'यलो पेपर'च्या युगास त्यानें सुरुवात केली. त्याचें अनुकरण 'विविधवृत्ता'सारख्यांनीं केलें. 'लोकमान्य' व 'नवा काळ' हीं मुंबईचीं आजचीं प्रसिद्ध पत्रें 'केसरी'च्या परंपरेंतून निघालीं आहेत व चांगलीं चालविलीं जात आहेत. पुण्यास 'सकाळ' आणि 'काळ' या पत्रांनीं आप-ल्याला विशिष्ट दर्जा प्राप्त करून घेतला आहे व त्यांचा वाचकवर्ग वाढता आहे. नागपुरास 'महाराष्ट्र' पत्रहि वऱ्हाड-मध्यप्रदेशाचें मराठी मुखपत्र बनलें आहे.

आजकाल कित्येक वर्तमानपत्रें निघतात व बंद पडतात. राजकीय पक्षाचें पाठबळ कोणत्याच पत्राला लाभलेलें दिसत नाहीं. शिवाय राजकारणाखेरीज आपल्या पत्रांतून निरनिराळे विषय प्रामुख्यानें चर्चिले जात नाहींत. पाश्चात्य देशांत ज्याप्रमाणें समाजांतील विविध अंगांचीं मुखपत्रें असतात, तशीं आपणांकडे निघत नाहींत व निघालीं तरी चालत नाहींत. नियतकालिकांची हीच कथा आहे. वाचकांना एकच एक वळण लागलें आहे. शिक्षण, उद्योगधंदे, व्यापार, खेळ, कला, इ. भिन्न भिन्न विष-यांना वाहिलेलीं पत्रें पाहिजेत. अद्यापि पत्रें विकत घेऊन वाचण्याची हितकर चटक बहुजनसमाजाला लागलेली नाहीं. चांगल्या सुशिक्षित म्हणविणाऱ्यांतहि यासाठीं पदरमोड होत नाहीं. संपादकवर्गांतील माणसांची आर्थिक स्थिति खालावलेली असते. पत्रकारांच्या संस्था निघाल्या आहेत, पण त्यांना कांहीं सत्ता नसल्यानें नुसतें मतप्रदर्शन होतें. जाहिराती देणारांवर वृत्तपत्रें जगतात अशी दुःस्थिति सांगतां येईल. राज्ययंत्रातील एक महत्त्वाचा भाग म्हणून पाश्चात्य राष्ट्रांत जो वृत्तपत्रांना दर्जा आहे, तो तर राहोच, पण समाजाचें संस्कृतिसंवर्धनाचें अल्पस्वल्प कार्यहि या आपल्या वृत्तपत्र-नियतकालिकांना नीट करतां येत नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें.

हिंदुस्थानांतील वृत्तपत्रें व नियतकालिकें यांची आजची संख्या अशी—इंग्रजी ८६८, हिंदी ८५३, उर्दू ५७१, बंगाली ३६९, तामीळ ३०५, गुजराथी १३७, मराठी २४३, तेलगू १५१, उडिया ४९, सिंधी ८, मल्याळी २३, आसामी ७, कानडी ५१ व पंजाबी ८१.

**वर्तुलचौरस**—(स्क्वेअरिंग दि सर्कल). वर्तुळाच्या क्षेत्राएवढा चौरस काढणें अथवा वर्तुळाच्या परिघाएवढ्या लांबीची रेषा काढणें हे प्रश्न सारखेच आहेत. वर्तुळाचा परिघ व व्यास यांचें गुणोत्तर $\pi$ ह्या ग्रीक अक्षरानें दर्शविलें तर

परिघ = २ $\pi$ × त्रिज्या व वर्तुळाचें क्षेत्रफळ = $\pi$ × त्रिज्या$^{२}$ असें होतें. $\pi$ ची किंमत साध्या मापनानें ३ येते. आर्किमिडीज $\pi$ ची किंमत $३\frac{१}{७}$ व $३\frac{१०}{७१}$ यांमधील घरीत असे. $\frac{३५५}{११३}$ ही $\pi$ ची किंमत ७ आंकड्यांपर्यंत बरोबर येते. $\pi$ काढण्यास ग्रेगरीचें सूत्र $\pi = ४ (१ - \frac{१}{३} + \frac{१}{५} - \frac{१}{७}$ पुढें अनंत पदे). २० आंकड्यांपर्यंत $\pi$ = ३·१४१५९२६५३५८९७९३२३८४६. हा (वर्तुळ चौरस-कार) प्रश्न आंखणी व कंपास एवढ्याच साहाय्यानें सोडवावयाचा असें बंधन घालीत. परंतु आतां असें सिद्ध झालें आहे कीं, हा प्रश्न सोडवितां येणें शक्य नाहीं.

**वर्तुलपाद**—(क्वाड्रंट). १. वर्तुळाच्या परिघाचा चौथा भाग.

२. एकमेकांना लंब असे दोन व्यास काढल्यास वर्तुळाचे चार सारखे भाग होतात, त्यांपैकीं एक भाग.

३. ज्योतिष, गोलंदाजी, नौकानयन, जमीनमोजणी, वगैरे व्यवहारांत उंची मोजण्याचें यंत्र. सध्यां याम्योत्तर वर्तुळानें (ट्रॅन्झिट सर्कलनें) ज्योतिषांत व षडंशयंत्रानें (सेक्स्टंटनें) नौकानयनांत वरील यंत्राची जागा घेतली आहे.

**वर्धनगड**—मुंबई, सातारा जिल्हा. सातार्‍याच्या ईशान्येस १७ मैलांवर व कोरेगांवच्या ईशान्येस ७ मैलांवर खटाव व कोरेगांव तालुक्यांच्या सीमेवर तळापासून ७०० ते ९०० फूट उंचीवर हा किल्ला बांधलेला आहे. १८०५ सालीं फत्तेसिंग माने यानें हा किल्ला घेतला त्या वेळेच्या तोफेच्या गोळ्यांच्या खुणा आढळतात. तटाच्या आंतील क्षेत्रफळ २० एकर आहे. हा शिवाजीनें १६७३ त बांधण्यास सुरुवात करून १६७४ त पुरा केला. १८०० मध्ये तो शिंद्यांच्या लष्करानें घेतला. १८०६ मध्यें प्रतिनिधीनें बापू गोखले याच्या हा स्वाधीन केला. त्याच्या ताब्यांत १८११ पर्यंत होता. नंतर बाजीरावानें घेतला व १८१८ त इंग्रजांकडे आला.

**वर्धा**—मध्यप्रांत, एक जिल्हा. क्षे. फ. २४२५ व लो. सं. (१९४१) ५,१९,३३०. जिल्ह्यांतून वर्धा नदी वाहते. पावसाचें मान सुमारें ४० इंच आहे. यांत मालगुजार-पद्धति बरीच आहे. मुख्य पीक कापूस व ज्वारी होय. हातमाग व कापूस-कापडाच्या गिरण्या पुष्कळ आहेत. पूर्वीं एलिचपूर सुभ्यांत वर्धा मोडत असे. मोंगली सत्ता कमी झाल्यावर गोंड राजे व निजाम यांची सत्ता आली. पुढें निजाम आणि भोसले हे ४०:६० या प्रमाणांत मालक बनले. इंग्रजी अमदानींत १८६२ त वर्धा जिल्हा बनला. वर्धा शहर जी. आय्. पी. रेल्वेचें एक स्टेशन असून चांदाबलारशाकडे येथून आगगाडीचा फांटा जातो. कापसाच्या व्यापाराचें हें एक केंद्र असून येथें ७ सरकी काढण्याचे व ७ कापसाचे गठ्ठे बांधण्याचे कारखाने आहेत. एक व्यापारी कॉलेज, दोन हायस्कुलें व बर्‍याच प्राथमिक शाळा आहेत. रा. ब. शेट बच्छराज यांनीं बांधलेलें देऊळ पाहण्याजोगें आहे. एडवर्ड मेमोरियल नांवाचें मोठें इस्पितळ आहे. लो. सं. चाळीस हजार.

**वर्ष**—पृथ्वीचा सूर्याभोंवतीं आपल्या कक्षेंत फिरण्याचा काळ. हा ३६५ दिवस, ५ तास, ४८ मिनिटें व ४६ सेकंद इतका असतो. हिशेबाला सोयीचें जावें म्हणून इंग्रजी वर्ष ३६५ दिवसांचें धरून ४ वर्षांनीं एक दिवस त्यांत मिळवितात. या वर्षास प्लुत वर्ष (लीप इयर) म्हणतात. हिंदु व मुसलमानी वर्ष ३५४ किंवा ३५५ दिवसांचें असतें. हिंदु पंचांगाप्रमाणें दर तीन वर्षांनीं अधिक मास (पाहा) धरून जुळवून घेतात.

**वर्षासन**—(ॲन्युइटी). वर्षांतून एकदां अथवा जास्त वेळां देऊं केलेली रक्कम. ही रक्कम कायमची किंवा रक्कम देणारा किंवा घेणारा याच्या मरणासारख्या एखाद्या प्रसंगापर्यंत अथवा कांहीं ठराविक काळापर्यंत द्यावयाच्या स्वरूपाची असते. हें वर्षासन कराराच्या वेळीं कांहीं रक्कम देऊन त्याबद्दल रक्कम देणारास अथवा त्यानें ठरविलेल्या एखाद्या इसमास मिळवितां येतें. काळजीपूर्वक गणित करून वर्षासनाची आजची किंमत काढतां येते. अनिश्चित काळापर्यंत देण्यांत येणार्‍या, विशेषतः मरणकाळापर्यंत मिळणार्‍या वर्षासनाचें गणित आयुर्मर्यादेच्या संभाव्यतेच्या तयार केलेल्या कोष्टकावरून करतात. हीं कोष्टकें त्या प्रांतांतील जन्ममरणाच्या आंकड्यांवरून तयार करतात.

वर्षासनाची मुदत देणार्‍या-घेणार्‍या इसमाच्या हयातीपर्यंत, किंवा वंशपरंपरा, किंवा कांहीं ठराविक वर्षें, किंवा एखादी विशिष्ट गोष्ट घडेपर्यंत, याप्रमाणें निरनिराळी असूं शकते. अशी नेमणूक मिळावी म्हणून आरंभीं कांहीं रक्कम भरावी लागते, व ती रक्कम ठरवण्याचे नियम व तत्त्वें यांबद्दल फार सूक्ष्म विचार झालेला आहे. हयातभर नेमणूक असेल तर तिची आगाऊ द्यावयाची रक्कम ठरवतांना स्थानिक सर्वसामान्य वयोमानाचा विचार करावा लागतो; व तदनुसार आकारणी करून सरकार किंवा इतर संस्था आगाऊ रक्कम घेते. ब्रिटिश सरकारनें पोस्ट मास्तर जनरलला याबाबतचे सर्व अधिकार दिलेले आहेत. कांहीं मुदतीनंतर नेमणूक सुरू व्हावयाची, असाहि करार (डीफर्ड ॲन्युइटीज्) करतात. याबद्दलची माहिती पोस्ट ऑफिसांत मिळते.

**वर्‍हाड**—मध्यप्रांताला जोडलेला प्रदेश. क्षे. फ. १७,८०९ चौ. मै. व लो. सं. सुमारें ३६,०२,००० आहे. याच्या उत्तरेस सातपुडा पर्वत व तापी नदी; पूर्वेस वर्धा नदी व पलीकडे नागपूर, वर्धा आणि चांदा हे जिल्हे; दक्षिणेस पैनगंगा नदी व निजामचें राज्य; व पश्चिमेस खानदेश आणि निजामी राज्य आहे. उत्तरेच्या डोंगराळ भागास मेळघाट व दक्षिणेकडच्या

डोंगराळ भागास बालाघाट म्हणतात. यांच्या मध्यभागीं पैनघाट म्हणून जो प्रदेश आहे तो सुपीक आहे. गाविलगडचे डोंगर, अजंठ्याचे डोंगर, इ. सातपुडा पर्वताचे फांटे मेळघाटांत आहेत. वऱ्हाडांतील सर्व नद्या बालाघाट किंवा मेळघाट यांच्या उंचवट्याच्या प्रदेशांत उत्पन्न होतात. तापी, वर्धा, पैनगंगा व पूर्णा या मुख्य नद्या आहेत. लोणारचें सरोवर खाऱ्या पाण्याचें आहे. वऱ्हाडची हवा साधारणपणें उष्ण आहे. पाऊस बेताचाच पडतो. या प्रांतांत मुख्यतः कापूस पिकतो. त्याखालोखाल ज्वारी व गहूं हीं धान्यें होतात. दगडी कोळशाच्या खाणी आहेत व कोठें लोखंडहि सांपडतें. लोकांचा मुख्य धंदा शेती हा आहे. कापूस फार पिकत असल्यानें पूर्वीपासून कापड विणण्याचा धंदा त्याखालोखाल चालतो. सरकी काढण्याच्या, कापूस दाबण्याच्या व कापड विणण्याच्या गिरण्या अनेक ठिकाणीं आहेत. कांहीं ठिकाणीं तेल काढण्याच्याहि गिरण्या आहेत. अकोला, उमरावती व खामगांव हीं मोठीं शहरें आहेत. भाषा मुख्यत्वेंकरून मराठी आहे. शिक्षणाच्या कामीं हा प्रांत पुढारलेला आहे. अकोला आणि उमरावती येथें कॉलेजें आहेत.

या प्रांताचें जुनें पौराणिक नांव विदर्भ आहे. कृष्णरुक्मिणीच्या लग्नासाठीं यादवांचें जें वऱ्हाड येथें आलें त्यावरून हें नांव पडलें अशी आख्यायिका आहे. कांहीं संशोधक वर्धातट यावरून वऱ्हाड शब्द व्युत्पादितात. वऱ्हाडचा खरा इतिहास आंध्र किंवा शातवाहन राजांच्या इतिहासाबरोबर सुरू होतो. वाकाटक व आभीर राजे नंतर यावर राज्य करीत होते. त्यानंतर चालुक्य, राष्ट्रकूट, यादव राजे होऊन गेले. १३१८ पासून मुसलमानी अमल सुरू झाला. बहामनी अमदानींत वऱ्हाड हा स्वतंत्र सुभा होता. इमादशाही अमल ८५ वर्षें होता. पुढें मोंगल साम्राज्यांत वऱ्हाड दखखनच्या चार सुभ्यांपैकीं एक होता व त्याची राजधानी एलिचपूर येथें असे. मराठे वऱ्हाडची चौथाई वसूल करीत असत. निजाम दक्षिणेंत आल्यावर वऱ्हाड त्याच्या राज्यांत जो गेला (१७२४) तो अद्यापपावेतों (नांवाला तरी) आहे. निजामच्या राज्याच्या संरक्षणासाठीं इंग्रजांचें जें सैन्य असे त्याच्या खर्चासाठीं हा प्रांत निजामानें १८५३ त इंग्रजांस लावून दिला. १९०३ सालीं इंग्रज सरकारनें निजामास या प्रांताबद्दल दरसाल २५ लाख रुपये देण्याच्या करारावर आपणांकडे कायमचा ठेवला. आतां निजाम तो परत मागत आहे. १९३६ च्या निजाम आणि इंग्रज यांमधील तहान्वयें निजामचें स्वामित्व वऱ्हाडवर मान्य होऊन त्याच्या वडील मुलास 'वऱ्हाडचा राजा' असें नांव ठेवण्यालाहि दोघांची संमति मिळाली. ब्रिटिशांच्या निशाणाबरोबर निजामचें निशाण वऱ्हाडवर फडकत ठेवावें व वऱ्हाड-मध्यप्रांताचा गव्हर्नर निजामच्या सल्लयानें नेमीत जावा व निजामचा प्रतिनिधि वऱ्हाडमध्यें राहावा असेंहि ठरलें. आतां इंग्रजांचें हिंदुस्थानवरचें स्वामित्व नाहींसें झाल्यावर वऱ्हाडचा प्रश्न कसा निकालांत निघणार हें ठरावयाचें आहे.

वऱ्हाडांत अकोला, उमरावती, बुलढाणा व यवतमाळ हे चार मराठी जिल्हे मोडतात. संयुक्त महाराष्ट्रांत वऱ्हाड येतो.

**वलन**—मद्रासेंतील एक जात. लो. सं. सुमारें पावणेचार लाख. हे मलबारी लोकांप्रमाणेंच आहेत. हे कोळयाचा धंदा करतात. कोचीन किनाऱ्यावरील कोळयांच्या ४ पोटजाती आहेत : संखत, भारत, अमुकवन व मुकवन. आर्यन् ही मलबारांतील दर्यावर्दी जात यांतील पहिल्या पोटजातींतील आहे व वलन दुसऱ्या पोटजातींतील आहे. अमुकवन ही पोटजात आर्यन् व वलन यांचें पौरोहित्य करते. वलन लोकांमध्यें इल्लोम म्हणून आणखी ४ पोटजाती आहेत. ते गोत्रांतरविवाह करतात. आरयर नांवाच्या एक प्रत्येक पोटजातीवर मुख्य असतो; त्याची नेमणूक राजा करतो. आरयरच्या हाताखालीं कांहीं अधिकारी असतात. त्यांची नेमणूक आरयर स्वतः करतो. खाडीमध्यें मासे धरण्याचा अधिकार वलन यांसच फक्त आहे व राजेसाहेबांची पंबनचाची होडी हेच वल्हवीत नेऊं शकतात. हे लोक ३२ फुटांवर आले असतां श्रेष्ठ वर्णांतील लोक त्यांचा विटाळ मानीत.

**वलन**—ज्योतिषशास्त्रांत चंद्राच्या उघड दिसणाऱ्या आंदोलनगतीला ही संज्ञा योजतात. या आंदोलनामुळें चंद्राच्या पृष्ठभागाचा शेंकडा ५९ इतका भाग एखाद्या वेळीं दिसतो व उरलेला ४१ इतका भाग कधींच न दिसणारा असा राहतो.

**वलभी विद्यापीठ**—काठेवाडांत समुद्रकांठीं वलभी हें राजधानीचें शहर होतें. आज त्या ठिकाणीं वला नांवाचें खेडें आहे. (वला संस्थान पाहा). गुप्त सम्राटांचा एक सेनापति भट्टारक नांवाचा, यानें ६ व्या शतकांत या प्रदेशांत राज्य स्थापिलें. भट्टारकामागून जे त्याचे वंशज मैत्रक राजे होऊन गेले, त्यांनीं बौद्ध धर्मास मोठा आश्रय दिला; त्यामुळें या भागांत अनेक बौद्ध विहार तयार झाले.

नालंदाप्रमाणें वलभीची कीर्ति विद्येविषयीं प्राचीन काळांत फार होती. येथील विद्यापीठाला मोठा राजाश्रय असे. येथील पहिला विहार पहिला ध्रुवराजा याची माची राजकन्या दुड्डा हिनें बांधला. इ. स. ५८० मध्यें पहिल्या धरसेन राजाच्या देणगींतून श्रीबप्पपाद विहार बांधण्यांत आला. ह्युएनत्संगानें वलभीला शंभर तरी संघाराम पाहिले असावेत. त्यांतून ६००० भिक्षु राहत होते. या ठिकाणीं बाहेरून अनेक विद्वान् दिकण्यास व

परीक्षा देण्यास येत. एके काळीं स्थिरमति व गुणमति हे विख्यात पंडित येथील विहाराचे कुलगुरु होते. राजांच्या देणग्यांतून तयार केलेला ग्रंथसंग्रहहि फार चांगला असे. येथील विद्याभ्यास पुरा झाल्यानंतर राजदरबारीं परीक्षा द्यावी लागे. इतकेंच नव्हे तर आपलें ज्ञान राज्यकारभारांत उतरून दाखवावें लागे. म्हणजे नुसतेंच बौद्धिक ज्ञान येथें शिकवीत नसत. येथें हीनयानपंथाचा अभ्यास घेत असत.

**वॅलर, एडमंड** (१६०६-१६८७)—एक इंग्रज कवि. हा १६ व्या वर्षी ॲमरशॅमतर्फे पार्लमेन्टचा सभासद निवडला गेला व १८ व्या वर्षी इल्चेस्टरतर्फे निवडला गेला. यामुळें तो पार्लमेन्टचा फार दीर्घकाळ सभासद होता. १६३५ सालीं त्यानें लीस्टरच्या अर्लची मुलगी लेडी डोरोथी सिडने हिला उद्देशून, 'सॅचरिसा' हें तिला टोंपण नाव देऊन कविता करण्यास सुरुवात केली. त्याचें भावगीत 'गो, लव्हली रोझ' (सुंदर गुलाबा, जा!) हें फार प्रसिद्ध आहे. वीररसप्रधान कविताहि त्यानें लिहिल्या आहेत.

**वला संस्थान**—मुंबई, काठेवाड, एक संस्थान. क्षे. फ. २११ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १६,१९७. यांत खेड्यांची संख्या ४० आहे. काठेवाडमध्यें वला संस्थान तिसऱ्या क्रमांकाचें आहे. याचें पुरातन नांव वल्लभीपूर आहे. संस्थानिकांना ठाकूर अशी संज्ञा आहे. हे गोहेल वंशाचे रजपूत आहेत. सध्याचे ठाकूर श्रीगंभीरसिंघजी १९४३ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सु. साडे सहा लक्ष रुपये आहे. वलागांव संस्थानची राजधानी आहे. हें भावनगरपासून २२ मैलावर आहे. लो. सं. ५,०००. गुप्त-राजाच्या सेनापतीनें हें वसविलें. येथें प्राचीन इमारतींचे अवशेष अद्यापि आढळतात. अजून जुनीं नाणीं, ताम्रपट, मुद्रा, मूर्ती, वगैरे वलाच्या आसपास सांपडतात. हें आता सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे.

**वल्लभाचार्य** (१४७९-१५३१)—राधावल्लभपंथाचा व पुष्टिमार्गाचा संस्थापक. तेलगु प्रांतातील कांकरव गांवीं राहणाऱ्या लक्ष्मणभट्ट नांवाच्या कृष्णयजुर्वेद पढलेल्या एका तेलंगी ब्राह्मणाचा हा मुलगा होय. वल्लभानें कांहीं दिवस वृंदावनास व कांहीं दिवस मथुरेस वसाहत केली. या सुमारास गोवर्धन पर्वतावर देवदमन (श्रीनाथजी) या नांवानें गोपाळकृष्ण प्रगट झाले असे सांगतात. वल्लभानें श्रीनाथजींचें दर्शन घेतलें तेव्हां श्रीनाथजींनें, "माझें एक देवालय बांधून माझ्या उपासनेचा प्रसार कर" अशी आज्ञा केली. तेव्हां वल्लभानें पुष्टिमार्गाची स्थापना केली; व श्रीनाथजी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या कृष्णाच्या एका विशिष्ट अवताराशीं आपल्या पंथाची सांगड घालून दिली.

वल्लभाचार्यांचा वेदान्तविषयक सिद्धान्त पुढीलप्रमाणें आहे—आदिपुरुष एकटा असल्यामुळें त्यास बरें वाटेना; व नानारूपें धारण करावीं अशी इच्छा झाल्यावरून तो स्वतःच अचेतन सृष्टि, जीव (जीवात्मा) व अन्तर्यामिन् आत्मा झाला. "यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः तथा" याप्रमाणें हें सर्व उत्पन्न झालें असून त्याचेच अंश होत. वल्लभानें आपल्या पंथाच्या प्रसारार्थ संस्कृत भाषेंत बरेच ग्रंथ रचिले आहेत; त्यांपैकीं तीन मुख्य म्हणजे वेदान्तसूत्र–अनुभाष्य, सुबोधिनी व तत्त्वदीप निबंध. त्याच्या १७ लहान पद्यांपैकीं सिद्धान्तरहस्य सुप्रसिद्ध आहे. कृष्णकथेवरील अत्यंत शृंगारिक वाङ्मयहि या पंथांत आहे. (पुष्टिमार्ग पाहा.) पुष्टि म्हणजे ईश्वरी अनुग्रह; साधारण किंवा ऐहिक व अनन्यसाधारण किंवा पारलौकिक फलावरून पुष्टीचें स्वरूप ठरवितां येतें. ही पुष्टिभक्ति ४ प्रकारची आहे: (१) प्रवाहपुष्टिभक्ति, (२) मर्यादापुष्टिभक्ति, (३) पुष्टि-पुष्टिभक्ति, व (४) शुद्धपुष्टिभक्ति. या पंथातील लोकांचा कृष्णभक्तीचा रोजचा कार्यक्रम असा—(१) घंटानाद, (२) शंखनाद, (३) ठाकूरजींचें उद्बोधन व त्यास फराळ अर्पण करणें, (४) आरती, (५) स्नान, (६) पोषाख, (७) गोपीवल्लभ अन्न, (८) गाई चरावयास नेणें, (९) दुपारचें भोजन, (१०) आरती, (११) अनोसर अगर अनवसर (वामकुक्षी; या वेळीं देवाचें दर्शन व्हावयाचें नाहीं), (१२) समारोप, (१३) रात्रीचें जेवण, व (१४) झोंप. या पंथाचे अनुयायी म्हणजे मुख्यत्वेंकरून गुजराथ-राजपुतान्यापासून तों उत्तरेस मथुरा या प्रदेशांतील व्यापारी वर्गच होत. शुद्धपुष्टिभक्तीस तर अखेर व्यसनांचेंच स्वरूप येतें. कृष्णाच्या नाना तऱ्हेच्या लीलांत रममाण होणें हें या पंथाच्या मताचें सार आहे. कारण रासमंडळें व गोपलीला करणें हें या पंथाचें मुख्य लक्षण होऊन बसलें आहे. वैष्णवधर्माचें राधाकृष्णभक्तीचें जें उपांग, त्यावरच वल्लभपंथाचा सर्व भर आहे. या पंथांतील महाराजांमुळें पंथीयांत बराच अनाचार माजला व कोर्टांतून खटले येऊं लागले. तेव्हांपासून या गुरुभक्तीचें स्तोम कमी झालें आहे.

**वल्लभी राजघराणें**—वल्लभीचे राज्य प्राचीन सौराष्ट्र देशांत (हल्लींचा काठेवाड) मोडत असे. हें जुनें वल्लभीनगर अलीकडे सांपडलें असून तें भावनगरच्या वायव्येस कांहीं मैलांवर वला म्हणून आहे. तेथील राजा ध्रुवसेन नांवाचा क्षत्रिय होता व तो कनोजाधिपति सार्वभौम हर्ष राजाचा जांवई होता. वल्लभी राजे मैत्रकवंशीय भट्टारकाचे वंशज होते असें दिसतें. मौखरी, चालुक्य, पल्लव, इत्यादि नावाप्रमाणें मैत्रक हेंहि कुलनामच आहे. हर्षाच्या काळीं वल्लभीचे राजे म्हणजे उत्तम क्षत्रिय होत, असा समज होता. खुद्द हर्षानें आपली कन्या एका वल्लभी राजाला दिली

होती. वल्लभी घराणें मूळ गुप्तांचें माडलिक असल्यामुळें सौराष्ट्रांत चालू असलेला गुप्तशकच त्यांनीं घेतला. ध्रुवसेनानें बहुधा इ. स. ५२६ ते ५३५ पर्यंत राज्य केलें. दुसऱ्या ध्रुवसेनानें साधारणपणें ५६९ ते ५८९ पर्यंत राज्य केल्यावर त्याचा मुलगा शिलादित्य सिंहासनारूढ झाला. त्याला परममाहेश्वर असें विशेषण लाविलेलें आहे. बुद्धभिक्षूंना देखील त्यानें देणग्या दिल्या होत्या. वल्लभी राजघराणें सन ५०९ पासून ७७५ पर्यंत अस्तित्वांत होतें. या पावणेतीनशें वर्षांत या राज्याखालीं उत्तर गुजराथ व पूर्व काठेवाड हे प्रांत सुखानें ऐश्वर्याचा उपभोग घेत होते. त्या वेळचे गुजराथचे लोक शांत स्वभावाचे, उद्योगप्रिय व काटकसरीनें वागणारे होते. वल्लभी घराण्याचा लय इतक्या लवकर होण्याचें कारण फितुरी, विश्वासघात व लोकांत बौद्ध धर्मांतील अहिंसेच्या तत्त्वाची अतिरिक्त आवड व त्यामुळें *त्यांच्यांतील बाणेदार क्षात्रवृत्तीचा अभाव हें होय.*

मैत्रक घराण्याचा मूळपुरुष भट्टार्क किंवा भट्टारक हा पाटलीपुत्राच्या गुप्त सम्राटाचा सेनापति होता; तेव्हां स्वतंत्र झाल्यावरहि मैत्रक घराण्यानें गुप्तशक चालविला. त्याला पुढें चुकीनें वल्लभी शक म्हणूं लागले. भट्टार्क व त्याचा मुलगा ध्रुवसेन हे आपणांस गुप्तांचे मांडलिक म्हणवीत. पुतण्या गुप्तसेन हा मात्र स्वतंत्र झाला. चौथा ध्रुवसेन हा या घराण्यांतील अत्यंत बलिष्ठ राजा. त्यानें चक्रवर्तीपद धारण केलें होतें (६४९). याच्याच वेळीं भट्टकवि उदयास आला. कांहीं राजांनीं आपणांस शिलादित्य हें उपपद लावून घेतलें आहे. शेवटचा राजा ध्रुव याच्या वेळीं त्याच्या रंक नांवाच्या सरदारानें अरबांना फितुर होऊन राज्यावर स्वारी करविली व त्याचा नाश करविला.

**वल्हवणी**—(रोइंग). वल्हीं मारून जोरानें होडी नेण्याचा हा एक खेळ आहे. यांत दोन, चार किंवा आठ वल्हीं वापरण्यांत येतात. एका मिनिटांत २० पासून ४० पर्यंत वल्ह्याचे फटके मारण्याची गति येण्याचा अभ्यास खेळाडू करतात. इंग्लंडांतील हेन्ले येथें होणाऱ्या बोटींच्या शर्यतींत भाग घेण्याची महत्त्वाकांक्षा खेळाडू बाळगतात. पाण्याच्या प्रवाहाच्या उलट १ मैल ५५० यार्ड अंतर तोडून जाण्याची तेथें शर्यत लागते व आठ वल्ह्यांच्या बोटीला कमींत कमी ६ मिनिटें व ५१ सेकंद लागतात. ऑक्सफोर्ड आणि केंब्रिज विद्यापीठांत. इ. स. १८२९ पासून दरसाल या खेळाचे सामने होतात.

**वल्हांडण सण**—(पास ओव्हर). ज्यू लोकांचा एक सण. ईजिप्त देशांत परमेश्वरानें ईजिप्शियनांचीं पहिलीं मुलें मारतांना यज्ञीय बळीच्या रक्तानें अंकित अशीं इस्त्राएल लोकांचीं घरें 'वलांडून' त्यांचें मात्र रक्षण केलें म्हणून हा सण पाळतात. वसंतऋतूंतील पहिल्या पौर्णिमेला, निसान महिन्याच्या १४ ते २१ व्या तिथीपर्यंत हा सण साजरा करीत.

**वसई**—मुंबई इलाख्यांत ठाणें जिल्ह्याचा अगदीं पश्चिमेकडील तालुका. क्षे. फ. १२३ चौ. मैल. तालुक्याची लो. सं. (१९४१) १,५०,५९३. सर्व जिल्ह्यामध्यें येथें दाट वस्ती आहे. जमीन सुपीक असून तींत तांदूळ, केळी, ऊंस व फळें उत्तम पिकतात. पाऊस सरासरी ७० इंच पडतो. वसई हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून लो. सं. १४,००० आहे. वसई हें बेट असून त्याजवळ खाडी असल्यामुळें त्या ठिकाणीं जहाजें ठेवण्यास चांगली व सोईस्कर जागा आहे. वसईचा शके ९९१ चा एक ताम्रपट उपलब्ध आहे.

इ. स. १२९५ त पैठणच्या बिंब राजानें वसई घेतली तेव्हांपासून पाठारे ज्ञातीची वस्ती या ठिकाणीं झाली. १५३४ मध्यें *त्या लोकांस वसई व आसपासचा प्रदेश गुजराथचा राजा बहादुर*शहा यानें दिला; व दोन वर्षांनीं पोर्तुगीजांनीं तेथें एक किल्ला बांधला. वसई पोर्तुगीजांच्या हातांत २०० वर्षे होती. येथील लोक फार श्रीमंत होते. येथें तेरा ख्रिस्ती देवळें, एक गरीब मुलांकरितां वसतिगृह, एक कॅथेड्रल, पांच कॉन्व्हेंट व इतर मोठमोठ्या इमारती असल्यामुळें वसईस मोठी शोभा आली आहे. १७३९ सालीं प्रसिद्ध मराठा सेनापति चिमणाजी आप्पा मोठ्या सैन्यासह वसई येथें आला; व तीन महिनेपर्यंत किल्ल्यास वेढा देऊन शेवटीं तो त्यानें हस्तगत केला; तेव्हां शहर व जिल्हा पेशव्याच्या ताब्यांत गेला. स. १८०२ मध्यें वसई येथें पेशवे व इंग्रज यांच्यामध्यें प्रसिद्ध तह झाला होता. १८१८ सालीं पेशव्याचा पराभव झाल्यावर इंग्रजांच्या ताब्यांत वसई पुन्हां आलें व तें ठाणें जिल्ह्यांत घालण्यांत आलें. जुन्या वसई शहराच्या भिंती व कोट अद्याप चांगलें आहेत. येथें एक हायस्कूल असून कॉलेज निघालेलें मुलांच्या अभावीं बंद करण्यांत आलें. वाचनालय चांगलें आहे.

**वसईचा किल्ला**—मुंबईच्या उत्तरेस तीस मैलांवर वसईच्या खाडीच्या उत्तर तीरावर हा किल्ला बांधलेला आहे. वसई सोपाऱ्याच्या दक्षिणेस एक मैलावर आहे. यादवकालीं वसई हें प्रांताचें मुख्य ठाणें असावें. हें सोळाव्या शतकात व्यापारांत पुढें असावें. १५२६ त पोर्तुगीजांनीं येथें प्रथम वखार घातली. त्यांच्यापासून रक्षण करण्याकरितां दीवचा सुभेदार मालिक टोकन यानें प्रथम येथें एक लहानसा किल्ला बांधला. १५३१ त पोर्तुगीजांनीं हा किल्ला पाडून टाकला. १५३६ च्या सुमारास गुजराथचा सुभेदार बहादुरशहा याच्या पुरस्कारानें पोर्तुगीजांनीं येथें किल्ला बांधला. १५३९ त गुजराथच्या फौजेनें यास वेढा दिला परंतु पोर्तुगीजांनीं तो उठविला. १५९० त या किल्ल्यास पुन्हां आरंभ होऊन तो

१६०० मध्यें पुरा झाला. त्याच्या तटाला अकरा बुरूज होते. व त्यावर ९० तोफा होत्या. येथें गलबतें बांधण्याचा मोठा कारखाना होता. १६९० त मराठ्यांनीं वसईस वेढा दिला पण त्या वेळीं त्यांस यश आलें नाहीं; पुढें चिमाजीआप्पानें १७ फेब्रुवारी १७३९ या दिवशीं किल्ल्याच्या वेढ्यास आरंभ केला. व तो १६ मे १७३९ रोजीं सर केला. १७७४ त इंग्रजांनीं वसई घेतली होती परंतु ती पुन्हां मराठ्यांस परत दिली. १७८० गॉडर्डनें पुन्हां वसई घेतली ती तहानें पुन्हां मराठ्यांस मिळाली. १८१७ त इंग्रजांनीं वसईसकट सर्व उत्तर कोंकण आपल्या ताब्यांत घेतलें. किल्ल्यांत हनुमानाचें व त्रिविक्रमाचें देवालय आहे. तसेंच सेंट पॉल, सेंट अॅन्थनी, सेंट डॉमिनिकन, वगैरे ख्रिस्ती देवळांचे व मठांचे पुष्कळ अवशेष दृष्टीस पडतात.

**वसंत**—हा राग पूर्वी थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागत असल्यानें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर तार षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर मानितात. या रागांत दोन मध्यमांचा प्रयोग होतो. याच्या आरोहांत कोणी पंचम देत नाहींत. यांत गांधार व मध्यम स्वरांची संगति पुनरावृत्त होत असते. तसेंच याच्या आरोहांत ललितांग दाखल करण्याची वहिवाट आहे. हा राग गंभीर प्रकृतीचा आहे. हा मोसमी राग असल्यानें वसंत-ऋतूंत वाटेल त्या वेळीं गाण्याची मोकळीक आहे. या रागाचा दुसरा एक प्रकार असा आहे कीं, त्यांत पंचम स्वर अजीबात वर्ज्य करून तीव्र धैवत लावितात. वादी तार षड्ज व संवादी शुद्ध मध्यम ठेवितात.

**वसंतकुसुमाकर**—एक आयुर्वेदीय औषध. प्रवाळ, रससिंदुर, मौक्तिक, अभ्रक, रौप्य, सुवर्ण, लोह, नाग व वंग, केळीचा कांदा, अडुळसा, हळद, कमळाचीं व मालतीचीं फुलें, हीं मुख्य औषधें यांत असून दूध व चंदन याच्या भावना देतात. मधुमेहाच्या विकारांत हें एक उत्तमपैकीं औषध आहे. मधुमेह झाल्यानंतर होणारे विकार म्हणजे हृदयाची अशक्तता, धाप लागणें, खोकला, तहान अतिशय लागणें, सर्वांग गळून गेल्यासारखें होणें, इत्यादि विकारांवर याचा फार चांगला उपयोग होतो. याखेरीज हें औषध अतिशय वृष्य व बल्य असें आहे. १ ते ३ गुंजा मध, खडीसाखर, आल्याचा रस यांत देतात.

**वसंतगड**—मुंबई, सातारा जिल्हा, कऱ्हाडच्या वायव्येस कऱ्हाड-सातारा रस्त्याच्या बाजूस तळबिड गांवाजवळील एक किल्ला. हा १६५९ त शिवाजीनें विजापूरकरांकडून घेतला. नंतर १६९९ त औरंगजेबानें तीन दिवस वेढा देऊन घेतला. १७०६ त परशुराम त्रिंबक प्रतिनिधीनें तो मोंगलांपासून परत घेतला. १८०७ त बापू गोखले यानें प्रतिनिधीचा पराभव करून त्यास पुण्यास पाठवून दिलें तेव्हां प्रतिनिधीची रक्षा ताई तेलीण हिनें बापू गोखल्यास सामना दिला. १८१५ त त्रिंबकजी डेंगळ्यास गंगाधरशास्त्र्याच्या खुनाबद्दल येथें अटकेंत ठेवलें होतें, तेथून तो पळून गेला. १८१८ त मन्रोनें हा किल्ला घेतला.

**वसंत पंचमी**—एक हिंदु सण. हा माघ शुद्ध पंचमीस असतो. उत्तर हिंदुस्थानांत याचें फार महत्त्व आहे. या वेळीं हिंवाळा संपून वसंताचा उद्भव होतो व सृष्टिदेवी जणुं काय दीर्घकाळाच्या निद्रेंतून जागी होत आहे असें वाटतें. वनश्रीची शोभा अवर्णनीय असते. या दिवशीं सरस्वती देवीची उपासना करतात. मृण्मय मूर्ति करून किंवा पात्रांत काढून तिचीं फुलें, गंध, धूपदीप यांनीं पूजा करतात. ब्राह्मणेतरांतहि ही पूजा ब्राह्मणांकडून करवितात. मुलांमुलींना हा सण फार आनंदाचा वाटतो. या वेळीं शाळा, वाचनालयें, साहित्यसंस्था यांतून सरस्वतीची पूजा होते.

**वसंत मुखारी**—हा राग भैरवी थाटांतून निघतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी ऋषभ आहे. गानसमय प्रातःकाल युक्त आहे. याच्या पूर्वांगांत भैरव व उत्तरांगांत भैरवी हे राग दृष्टीस पडतात. हा राग दुर्मिळ रागांपैकीं एक आहे.

**वसाम्ल**—(स्टिअरिक अॅसिड). मेदाम्लांपैकीं महत्त्वाचें आणि विपुल मिळणारें एक अम्ल. चरबी आणि तेलें ह्यांच्यापासून कॉस्टिक सोडा किंवा उज्जहराम्ल (हायड्रोक्लोरिक अॅसिड) यांच्या साहाय्यानें हें तयार करतात. ओलीक अम्लापासूनहि हें तयार करतां येतें. साबणांत मुख्यतः ह्या अम्लाचीं सिंधु (सोडियम) किंवा पालाश (पोटॅशियम) लवणें असतात.

**वसाहत**—स्वतःचा देश सोडून परदेशांत स्थायिक होऊन राहणें आणि आपल्या मूळच्या देशांतील सरकारची राज्यसत्ता मानणें अशा परदेशगमनाला वसाहत म्हणतात. पूर्वीं अशा वसाहती जिंकून घेतलेल्या देशांत करण्यांत येत असत. आधुनिक काळांत एखाद्या मोठ्या शहरानजीक परदेशांतले इसम कायमचे येऊन राहिले तरी त्या वस्तीला वसाहत म्हणतात. उदा., इटालियन कॉलनी; फ्रेंच कॉलनी; इत्यादि. सामान्यतः वसाहत केलेला प्रदेश मूळ देशांतील सरकारच्या अमलाखालीं असतो, हें तत्त्व अलीकडे मान्य झालेलें आहे. प्राचीन काळीं फोनिशियन लोकांनीं आणि ग्रीक शहरांतील लोकांनीं परदेशांत केलेल्या वसाहती लोकसंख्या वाढल्यामुळें किंवा स्थानिक सरकारबद्दल असंतोष माजल्याने होत असत. अशा वसाहती मूळच्या ग्रीक शहरांशीं आपला राजकीय संबंध ठेवीत नसत. अथेन्स शहरानें अशा वसाहतींवर आपला संपूर्ण ताबा ठेवलेला होता, म्हणून त्यांनाच खऱ्या अर्थानें वसाहती असें म्हणतां येतें. प्राचीन

## युरोपियन राष्ट्रांच्या वसाहती (महायुद्धापूर्वीच्या)

| | अमेरिका | आफ्रिका | आशिया व पॅसिफिक महासागर | हिंदुस्थान |
|---|---|---|---|---|
| १ पोर्तुगॉल वसाहतींचें क्षेत्रफळ चौ. मै. ८,०३,८३५ | | मदीरा, आझोर्स, केपव्हर्ड वेर्टे, अंगोला, गिनी, मोझँबिक | मकाव, टिमोर. | गोवा, दीव, दमण. |
| २ स्पेन चौ. मै. १,३४,७१६ | | सहारा, गिनी, मोरोक्को. | | |
| ३ हॉलंड चौ. मै. ७,८८,३३६ | वेस्ट इंडीज, | | ईस्ट इंडीज | |
| ४ फ्रान्स चौ. मै. ५३,८३,०३५ | ग्वायना, वेस्ट इंडीज. | मोरोक्को, आल्जेरिया, ट्युनिशिया, सहारा, पश्चिम आफ्रिका, मादागास्कर. | इंडोचायना, गिनी, सोमालीलँड, सेनेगाँबिया, रीयूनियन. | पांदेचरी, कारिकल, माहे, यनान, चंद्रनगर. |
| ५ इटली | | एरिट्रिया, सोमालीलँड, ट्रिपोलीटानिया, लिबिया. | | |
| ६ डेन्मार्क | ग्रीनलंड | | | |
| ७ बेल्जिअम | | कांगो | | |
| ८ जर्मनी (पहिल्या महायुद्धापूर्वी) | | नैर्ऋत्य आफ्रिका, टोगो, न्यू गिनी, कामेरून. | सीरिया, लेबानन. | |
| ९ इंग्लंड चौ. मै. १,२२,७९,२७७ मँडेटेड प्रदेश चौ. मै. ९,८३,७६२ | कानडा, वेस्ट इंडीज, न्यू फाउंडलंड. | दक्षिण आफ्रिका, गोल्ड-कोस्ट, गांबिया, सीरिया-लिऑन, नायगेरिया, केनिया, युगांडा. | ऑस्ट्रेलिया, न्यू झीलंड, फिजी बेटें, हाँगकाँग. | हिंदुस्थान, सीलोन, ब्रह्मदेश. |

[मागील पानावरून चालू.]
रोमन रिपब्लिकच्या काळांत अशा वसाहतींची वाढ पुष्कळ झाली आणि कार्थेज येथील सरकारनेंहि अशा पुष्कळ वसाहती स्थापल्या. मध्ययुगीन काळांत जिनोवा व व्हेनिस येथील लोकांनीं भूमध्यसमुद्रांतील सर्व प्रदेशांत व्यापारी वसाहती स्थापल्या. वसाहती स्थापण्याचा फार मोठा उद्योग अमेरिकेचा शोध लावल्यानंतर आणि पूर्वेकडील ऑस्ट्रेलिया आणि पॅसिफिक महासागरांतील इतर बेटें यांची माहिती झाल्यानंतर सुरू झाला. अनेक लोक केवळ द्रव्याच्या लालसेनें या नूतन भूप्रदेशांत राहावयास गेले. तसेंच धार्मिक, राजकीय किंवा आर्थिक दृष्ट्या असंतुष्ट झालेले लोक आपला मूळ देश सोडून नव्या जगांत राहावयास गेले. ख्रिस्ती धर्म-प्रसारार्थ पुष्कळ मिशनरी लोक या

नव्या प्रदेशांत राहावयास गेले. पोर्तुगीज लोकांनीं या बाबतींत मोठी आघाडी मारली. नंतर स्पॅनियर्ड लोकांनीं वसाहती स्थापल्या. त्यात त्यांचें मुख्य लक्ष सोन्या-रुप्याच्या खाणींकडे होतें. नंतर डच लोकांनीं थोड्या अवधींत पुष्कळ वसाहती केल्या, तर कांहीं पोर्तुगीजांच्याच जिंकून घेतल्या. फ्रेंचांनीं कानडा व हिंदुस्थान येथें वसाहती केल्या, पण या दोन्ही ठिकाणीं त्यांचा लढा ब्रिटिशांशीं होऊन ते पराभूत झाले. इटली, डेन्मार्क, बेल्जिअम व जर्मनी यांचें यश अल्प असून सर्वांत मोठा वसाहतींचा व्याप ब्रिटनचा आहे.

पोर्तुगीज वसाहती—अर्वाचीन राष्ट्रांतील पोर्तुगीज हे पहिले वसाहतवाले म्हणतां येतील. १४१९ त त्यांनीं मदिरा, अझोर्स व केप व्हर्ड बेटें शोधून काढलीं. नंतर ते कॉंगो आणि केप ऑफ गुड होप इकडे गेले. इ. स. १५०० च्या पूर्वी वास्को डि गामा हिंदुस्थानात कालिकतला उतरला. नंतर खरी देशांतर्गत वसाहत सिलोन (१५०५) आणि मोल्युक्स (१५१०) यांतील होय. नंतर ब्राझीलची वसाहत पोर्तुगीजांनीं केली पण पुढें पोर्तुगालमधील वाईट राज्यकारभार व स्पेनचें वर्चस्व यांमुळें बऱ्याच वसाहती हातच्या गेल्या. सध्यां हिंदुस्थान, चीन आणि हिंदी द्वीपसमूह यांतून पोर्तुगीज वसाहती आहेत, पण त्या कधीं हातच्या जातील याचा नेम नाहीं. आफ्रिकेंत सुमारें सात लक्ष चौ. मैलांचा प्रदेश पोर्तुगीज म्हणून आहे.

स्पॅनिश वसाहती—पोर्तुगीजांचें पाहून स्पॅनियर्ड लोकांना भूसंशोधनाची आवड आली. कोलंबसानें सान साल्व्हाडोर शोधून काढलें. नंतर मेक्सिको, इक्वेडोर, व्हेनेझूएला, न्यू ग्रानाडा, पेरू, चिली, वगैरे देश त्यांनीं जिंकून वसाहतकर्मांत आघाडी मारली. पण त्यांचें लक्ष निवळ सोनें–रुपें काढण्याकडे असल्यानें त्यांनीं जिंकलेले देश औद्योगिक साधनांनीं समृद्ध केले नाहींत. स्पेनमध्यें शासनसंस्था दुर्बल झाल्याबरोबर वसाहती हातांतून जाऊं लागल्या. पुढें स्पॅनिश-अमेरिकन युद्धानंतर फिलिपाइन्स व पोर्टोरिको हीं अमेरिकेला द्यावीं लागलीं व क्युबा स्वतंत्र झाला. तेव्हा आता आफ्रिकेंत काय तो स्पेनचा थोडा प्रदेश आहे.

डच वसाहती—डचांनीं हिंदुस्थान आणि पूर्वेकडील देश यांच्याशीं व्यापार करण्यासाठीं बऱ्याच संस्था काढल्या व १६०२ मध्यें त्यांचे एकीकरण (डच ईस्ट इंडिया कंपनीद्वारें) केलें. लवकरच त्यांनीं पोर्तुगीजाना पूर्व भागांतून हांकून लावलें व केप ऑफ गुड होप येथें एक वसाहत केली (१६५०). वेस्ट इंडिया कंपनीनें ब्राझीलमध्यें बराच मुलूख मिळविला. पण ब्रिटिशांच्या वाढत्या सत्तेमुळें डचांच्या वसाहत-चळवळीला मोठाच खो बसला. परवांपर्यंत पूर्वेकडे जावा, सुमात्रा, बोर्निओ, वगैरे इंडोनेशियन प्रदेश त्यांच्याकडे होते; पण इंडोनेशियनांच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ झालेल्या संग्रामामुळें आतां तो भागहि हातांतून गेला. वेस्ट इंडीजकडे कांहीं बेटें व सुरिनाम हीं त्यांच्याकडे अद्यापि आहेत.

फ्रेंच वसाहती—फ्रेंच लोक या वसाहतकर्मांत उशीरां पडले. १६०८ मध्यें उत्तर अमेरिकेंत जाऊन क्विबेक्ला वसाहत केली. कोल्बर्टनें बरींच वेस्ट इंडीज बेटें खरेदी करून तेथें लोक पाठविले. पूर्वेकडे १६७० त पॉंडेचरी येथें वसाहत स्थापिली. अठराव्या शतकाच्या आरंभीं कानडा, नोव्हास्कोशिया व न्यू फाउंडलंड व बरींच वेस्ट इंडीज बेटें यांतून फ्रेंच वसाहती भरभराटल्या होत्या. पण लवकरच ब्रिटिश वसाहतवाल्यांशीं तंटे उत्पन्न होऊन बहुतेक सर्व वसाहती हातांतून गेल्या. आज हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणें आहेत, पण तीं भारत सरकारांत विलीन होण्याच्या मार्गांत आहेत. कोचीन–चीनमध्यें कम्यूनिस्ट सत्ता येऊं पाहत आहेत. आफ्रिका, ओशिआनिआ, वेस्ट इंडीज या भागांत मात्र कांहीं वसाहती टिकून आहेत.

इतर वसाहती—जर्मनीच्या वसाहती पहिल्या महायुद्धानंतर विजयी राष्ट्रांकडे आल्या. डेन्मार्कच्या ग्रीनलंड, फारो बेट, वगैरे उत्तर वसाहती फार मोठ्या भूप्रदेशाच्या आहेत, पण त्याना कांहीं महत्त्व नाहीं. वेस्ट इंडीजमधील डेन्मार्कचीं बेटें अमेरिकेला १९१७ सालीं विकलीं व त्यांना आतां व्हर्जिन आयलंड असें नांव आहे.

१९ व्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेनें वसाहती करण्यास आरंभ केला. पोर्टोरिको, फिलिपाइन्स, हवाई बेटें, व्हर्जिन बेटें, वगैरे प्रदेश त्यानें मिळविले. पण फिलिपाइन्सला जसें स्वातंत्र्य द्यावें लागलें त्याप्रमाणें इतरहि भागांना नांवाचें का होईना द्यावें लागेल.

ब्रिटिश वसाहती—ग्रेट ब्रिटनप्रमाणें युरोपांतील कोठल्याहि राष्ट्राच्या वसाहतींच्या बाबतींत चढती कमान नाहीं. डचांबरोबरच इंग्रज या क्षेत्रांत उतरले व प्रथम हिंदुस्थानांत आले. ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थान हळूहळू कसा घशांत घातला हा इतिहास आपणांस सुपरिचित असल्यानें तो येथें देण्याचें कारण नाहीं. एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत उत्तर अमेरिकेंत इंग्रज वसाहती मोठ्या प्रमाणांत झाल्या. नंतर 'पिल्ग्रिम फादर्स'नीं १६२० त अमेरिकेंत आपलें कायमचें चिन्हाड ठोकलें व त्या पहिल्या तेरा वसाहतींची वाढ होत होत आज अमेरिकन संयुक्त संस्थानांचा देश बनला. वेस्ट इंडीज बेटें, न्यू फाउंडलंड, कानडा हे प्रदेश एकामागून एक इंग्लंडकडे आले. पुढें संयुक्त संस्थानें स्वतंत्र झालीं. १७ व्या शतकाच्या प्रारंभीं ऑस्ट्रेलियाचा

शोध लागला. नंतर हळूहळू तो 'कॉमनवेल्थ' बनूनहि ब्रिटिश साम्राज्याशीं चिकटून राहिला. १८१४ त केप कॉलनी (आफ्रिका) ब्रिटिशांकडे आली. त्यानंतर उत्तर, दक्षिण आणि पूर्व आफ्रिकेंत ब्रिटिश वसाहती झाल्या. अशा तऱ्हेनें ब्रिटिश साम्राज्य अवाढव्य वाढलें. पण आतां हिंदुस्थान, सीलोन व ब्रह्मदेश यांना स्वतंत्र वसाहतींचा दर्जा मिळाला व या आणि इतर ऑस्ट्रेलियासारख्या वसाहती ब्रिटिश मध्यवर्ती सत्तेशीं मांडलिक या नात्यानें वागत नसून स्नेहाच्या नात्यानें समताभावानें राहतात. हा मोठा फरक दुसऱ्या महायुद्धानें घडवून आणला.

**वसिष्ठ**—एक प्रसिद्ध वैदिक ऋषि. हा ऋग्वेदांतील पुष्कळ सूक्तांचा द्रष्टा आहे. मनूनें याची सप्तर्षींमध्यें व दशप्रजापतींमध्यें गणना केली आहे. ब्रह्मदेवाच्या प्राणवायूपासून हा निर्माण झाला असें एका ठिकाणीं म्हटलें आहे. वसिष्ठ व विश्वामित्र या दोघांचें परस्परांशीं असलेलें वैर प्रसिद्धच आहे. वसिष्ठ हा सुदास राजाचा पुरोहित असून त्या जागेसाठीं विश्वामित्र धडपड करीत होता व त्यामुळें या दोघांमध्यें वैर निर्माण झालें असावें. पुढें महाभारत, रामायण व पुराणें यांच्यामध्येंहि वसिष्ठ-विश्वामित्राच्या स्पर्धेसंबंधीं पुष्कळ गोष्टी आलेल्या आहेत. विष्णुपुराणांत दक्षाची कन्या ऊर्जा ही वसिष्ठाची बायको होती असें, तर भागवत पुराणांत वसिष्ठाची बायको अरुंधती होय असें सांगितलें आहे. वसिष्ठाजवळ नन्दिनी नामक एक कामधेनु होती. विष्णुपुराणांत तो इक्ष्वाकु घराण्याचाहि पुरोहित होता असें म्हटलें आहे. वसिष्ठाच्या नांवावर एक धर्मसूत्र व स्मृतिहि प्रसिद्ध आहे. वसिष्ठकुल मोठें आहे. या नावाचे अनेक ऋषी होऊन गेलेले असावेत व त्यामुळें अनेक कथा तयार होऊन कालसंगति न लागल्यानें घोटाळा उडतो.

**वसु**—अष्टवसु. वसु नांवाचे पुरुष बरेच होऊन गेले. चालू मन्वंतरांतील पांचवा देवगण; दहा विश्वेदेवांतील तिसरा.

१. पुरुकुलोत्पन्न (सोमवंशी) कृती राजाचा पुत्र. यासच उपरिचर असें नांव पडलें. यानें गिरिव्रजनगर वसविलें.

२. अष्टवसु हे इंद्राचे अनुचर दिसतात. आप, ध्रुव, सोम, धरा, अनिल, अनल, प्रभास व प्रत्यूष या आठ नैसर्गिक चमत्कारांचीं हीं सगुण रूपें मानिलीं असावींत. रामायणांत अष्टवसु हे अदितीचे पुत्र म्हणून मानिले आहेत.

**वसु**—एक वेल. हिची लांबी एकदोन हात असते. पानें पुनर्नव्याच्या (घेटुळीच्या) पानांसारखीं असतात. या वनस्पतीलाच चुकीनें पुनर्नवा म्हणतात व तीसाठीं वापरतात. वसूंत पांढरी व तांबडी अशा दोन जाती आहेत. सुजेवर पांढऱ्या वसूच्या मुळयांचा काढा घेतात. विंचवाच्या विषावर मूळ चावतात व त्याचा लेप करतात. ज्वर (चातुर्थिक), अम्लपित्त यांवर मुळया चावून खातात.

**वसुदेव**—यदुकुलोत्पन्न सात्वत कुलांतील शूर राजाच्या दहा पुत्रांतील ज्येष्ठ; यास आनकदुंदुभि असें नांव असून यास वीस स्त्रिया होत्या; पैकीं देवकी व रोहिणी या प्रसिद्ध आहेत. देवकीला कृष्ण व रोहिणीला बलराम हे पुत्र झाले. राम आणि कृष्ण यांच्या परलोकगमनानंतर हा प्रभास क्षेत्रीं मृत्यु पावला. याच्या देवकी-रोहिणी आदि स्त्रिया सती गेल्या.

**वसुबंधु** (सुमारें सन ४८०)—एक बौद्ध पंडित व अभिधर्मकोश व विज्ञप्तिमात्रतात्रिंशक या ग्रंथाचा कर्ता. याचा जन्म पेशावर येथें झाला. पेशावर ही त्या वेळच्या गांधार देशाची राजधानी होती. वैभाषिक तत्त्वज्ञानाकडे याचा ओढा असे. यानें आपल्या सूत्रकारिकाबद्ध 'अभिधर्मकोश' या ग्रंथांत नीति, मानसशास्त्र व अध्यात्म यांचें विवरण केलें आहे. याचा ग्रंथ हीनयान पंथासाठीं असला तरी महायानपंथीयहि तो प्रमाण मानतात. वसुबंधु प्रथम सर्वास्तिवादी पंथाचा असला तरी पुढें आपला वडील भाऊ असंग याच्यामुळें यानें महायान पंथ स्वीकारला. वैभाषिक पंडित मनोरथ व संगभद्र हे याचे समकालीन होत. याचें संस्कृत चरित्र सध्यां उपलब्ध नाहीं परंतु त्याचें चिनी भाषांतर मात्र मिळूं शकतें. तसेंच याचें बौद्ध तर्कशास्त्र चिनी व तिबेटी भाषेंत भाषांतर केलेलें असेंच फक्त सध्यां उपलब्ध आहे. यानें अवतंसक, निर्वाण, सद्धर्मपुंडरीक, विमलकीर्ति व इतर कांहीं सूत्रें यावर टीकाहि लिहिल्या आहेत. दिङ्नाग (पाहा) हा याचा शिष्य.

**वस्तुपाल** (मृत्यु १२४१)—लवणप्रसाद व वीरधवल वाघेल यांचा मंत्री. हा मंत्री आशराज (अश्वराज) व कुमारदेवी नामक एक विधवा यांच्यापासून झालेला मुलगा. यास तेजपाळ नांवाचा एक भाऊ होता. दिल्लीच्या मुइज्जुद्दिन बहरामशहानें पश्चिमेकडे स्वारी केल्याची बातमी यास लागतांच यानें अबूच्या पर्वतापाशीं त्यास गांठून त्याच्या सैन्याचा पराभव केला व लाखों यवनांचीं शिरें कापून त्यानें वीरधवलकडे पाठवून दिलीं. यानंतर कच्छयांतील भद्रेश्वरच्या भीमसेन ऊर्फ भीमसिंह यानें जाबालिपूरच्या सामंतपाल व त्रिलोकसिंह यांच्या साहाय्यानें वीरधवलवर केलेल्या स्वारींत याचा पराक्रम दिसून आला. हा धनवान् असून यानें अनेक धर्मशाळा, विहिरी व मंदिरें बांधलीं. धर्मानें हा जैन असून याची प्रशस्ति अबूच्या पहाडावर आहे.

**वस्तुपूजा**—(फेटिशिझम). मणि, मंत्र, यंत्र, औषधि, पाषाण, वृक्ष, ताईत, दोरे, अस्थि, दंत, कपाल, योद्ध्यांचीं किंवा वीर पुरुषांचीं चिलखतें, इत्यादि नैसर्गिक किंवा कृत्रिम जड वस्तूंचा संग्रह किंवा आराधना करण्याचा संप्रदाय. वर दिलेल्या

जड वस्तूंस अद्‌भुत शक्तीचें अधिष्ठान किंवा साधन समजून त्यांची पूजा करण्याचा प्रघात कांहीं लोकसमाजांत आहे. इंग्रजी 'फेटिश' हा शब्द पोर्तुगीज 'फेटिसो' (= जादू) या संज्ञेवरून तयार झाला आहे. म्हणजे अशा वस्तूंच्या ठिकाणीं कांहीं अतर्क्य शक्ति किंवा जादू आहे अशी तिला मानणाऱ्या लोकांची कल्पना असते. आफ्रिकेंतील गिनी या देशांत व पश्चिम किनाऱ्यावरील इतर भागात ही उपासना आहे. जातीची किंवा समाजाची जी पूजावस्तु असते तीखेरीज प्रत्येक व्यक्तीची वेगळी असते. त्या वस्तूपासून त्याला इष्टफलप्राप्ति झाली नाहीं तर तो तिला शिक्षा करतो किंवा फेंकून देतो! हिंदुस्थानांतहि कांहीं असंस्कृत जातींत देवतेला किंवा देवकवस्तूला 'माझी इच्छा पुरी केली नाहींस तर तुला जोड्यानें मारीन' असा धाक घालतात!

**वस्तुबल**—शिल्पशास्त्रांतील ज्या शाखेमध्यें निरनिराळ्या पदार्थांच्या (उदा., घडीव लोखंड, ओतीव लोखंड, मृदु पोलाद, हत्यारांचें पोलाद, पितळ, अल्युमिनम, काँक्रीट, सिमेंट, विटा, दगड, लांकूड.) गुणधर्मांचें ज्ञान करून घेण्यांत येतें व त्यांची निरनिराळ्या यंत्रांच्या साहाय्यानें परीक्षा करण्यांत येते; तसेंच या निरनिराळ्या पदार्थांच्या संयोगानें जे पदार्थ तयार होतात त्यांच्या गुणधर्मांचा अभ्यास करण्यांत येतो व ते किती दाब सहन करण्यास योग्य आहेत हें निश्चित करण्यांत येतें. अशा या शाखेस वस्तुबल शास्त्र म्हणतात. निरनिराळ्या वस्तूंचें प्रमाण किती असतें यासंबंधीं कोष्टकें तयार करण्यांत आलेलीं असतात. उदा., ओतीव लोखंड दर चौरस इंचास ६ हजार टन ते ९ हजार टन दाब सहन करूं शकतें; घडीव लोखंड १२ हजार ते १३ हजार; घडण्यासारखें ओतीव लोखंड ११॥ हजार ते १२ हजार; आणि मृदु पोलाद १३ हजार.

**वस्त्रें**—ऋग्वेदांत व पुढील ग्रंथांत कपडा (अंगावर घेण्याचे अथवा परिधान करण्याचें वस्त्र) अशा अर्थी वासस् शब्द आला आहे. कपडे मेंढ्यांवरील लोकरीचे बनविलेले असत. पूषन् देवाला कपडे विणणारा (वासोवाय, ऋ. १०, २६, ६) म्हटलें आहे. कारण निरनिराळे आकार देण्यांत त्याचा संबंध असे. जीं वस्त्रें वापरलीं जात त्यांवर वेलबुट्टी काढलेली असे. मरुत् हे सोनेरी वेलबुट्टी असलेलीं वस्त्रें वापरीत असा उल्लेख (१०, १५५, ६–हिरण्ययान अत्कान्) आहे. लोकांना दागिन्यांची फार आवड होती असें ऋग्वेदांतील अनेक उल्लेखांवरून दिसून येतें व ही गोष्ट मेगॅस्थेनीसच्या कालांतहि होती. ऋग्वेदांत सुरभि व सुवसन (म्हणजे चांगलें शोभणारें व अंगाला नीट बसणारें वस्त्र) अशीं विशेषणें आलीं आहेत. वैदिक काळांत तीन प्रकारचीं वस्त्रें वापरीत असत : एक नीवी (आंतील वस्त्र), दुसरें वस्त्र, व तिसरें अधीवासन (वरचें वस्त्र). यांशिवाय डोक्यास गुंडाळावयाचें जें वस्त्र त्याचीं टोकें मानेच्या बाजूस गांठी मारून पुढें आणून खोंचलेलीं असत. ही तऱ्हा नेहमींच्या प्रचारांतल्या तऱ्हेहून वेगळी होती. पण ती यज्ञाच्या वेळची असल्यामुळें त्यांत वैशिष्ट्य होतें. वेदकालीन लोकांना विरक्त स्थितीमुळें दिगंबर (नग्न) असणाऱ्या यतींसारख्या लोकांशिवाय प्रत्येक मनुष्यानें वस्त्र धारण केलेंच पाहिजे ही गोष्ट कबूल होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

महाभारतकालीं पुरुषांचा पोषाख फार साधा असे. एक धोतर कमरेला (अन्तरीय) व दुसरें अंगावर मोकळें घेतलेलें (उत्तरीय) हाच तो पोषाख. त्या वेळच्या ग्रीक-रोमनांचा पोषाखहि असाच दिसतो. श्रीमंत लोकांचीं धोतरें फार तलम असत; त्यांस प्रावार असें नांव आहे. स्त्रियांचींहि दोनच वस्त्रें असत : एक नेसण्याचें (लुगड्यासारखें) व दुसरें पांघरण्याचें (पदराप्रमाणें). चोळी घालण्याची पद्धत भारतकालीं नव्हती असें भारताचार्य वैद्य यांचें मत आहे. उत्तरीय वस्त्र फक्त वरच्या दर्जाच्या स्त्रियाच घेत असाव्यात. पुरुष बाहेर जातांना उष्णीष म्हणजे पागोट्यासारखें वस्त्र डोक्याला गुंडाळीत.

वस्त्रें साधारणतः कापसाचीं असत; श्रीमंत लोक रेशमाचीं वस्त्रें वापरीत. थंड प्रदेशांत वस्त्रें लोकरीचीं बनवीत हें साहजिक आहे. अरण्यवासी व ऋषिजन हे वल्कलें व अजिनें वापरीत हे सांगणें नकोच. गवताचीं वस्त्रेंहि वनांत तयार करीत.

१८ व्या शतकापर्यंत मागील दोन हजार वर्षें हिंदुस्थान वस्त्रकलेंत अगदीं पुढें होता. वैदिक, बौद्ध आणि जैन वाङ्मयांत सुंदर वस्त्रांचे किती तरी उल्लेख आढळतात. बनारसच्या कौशेयकाची किंमत एक लाख रुपये असे; गांधार देशांतील तांबडीं लोकरीचीं ब्लँकेटें अद्यापि स्वात खोऱ्यांत विणलीं जात आहेत. रोमसारख्या पाश्चात्य शहरांत उंची वस्त्रें हिंदुस्थानांतीलच वापरलीं जात. कालिदास, बाण यांसारख्यांच्या लेखनांतून नक्षीच्या कापडांचीं नांवें येतात. दहाव्या शतकांत अरब व्यापाऱ्यांनीं गुजराथेंतून मिसर देशांत शिकारी आणि हंसी नक्षीचीं वस्त्रें जीं नेलीं तिचे नमुने ईजिप्तच्या फोस्टाट या जुन्या राजधानींत आढळले आहेत. गुजराथी पाटोळा साडी जावांत आणि बलिद्वीपांतहि जात असे.

मोंगली अमदानींत या वस्त्रकलेला नवी चढती कळा आली. बादशहांच्या आश्रयाखालीं सोन्या-रुप्याच्या जरीचीं चित्रविचित्र व रंगीत मलमलीचीं व विविध प्रकारचीं वस्त्रें या देशांत तयार होऊं लागलीं. चित्रकलेप्रमाणेंच या कलेलाहि अकबर आणि जहांगीर या बादशहांनीं चांगलें उत्तेजन दिलें. आज त्या काळचीं वस्त्रें फारशीं पाहावयास मिळत नाहींत.

मलमल—डाक्क्याची मलमल तर जगप्रसिद्धच आहे. तिची तोड कोणास नाहीं. बादशहाच्या घरीं वापरण्यासाठीं डाक्क्याहून जें मलमलीचें वस्त्र पाठविण्यात येई तें रंगीत बांबूच्या नळींत घालून मिरवीत डाक्का ते दिल्ली शहरापर्यंत नेण्यात येत असे. या 'खास मलमली'ला 'अब्रावान्' (वाहतें पाणी), 'बफ्त हवा' (विणलेली हवा), 'शब्नम' (सायंकाळचें दंव), वगैरे नांवें असत. या वस्त्राचे तंतू इतके बारीक असत कीं, १५० हात तंतूचें वजन १·७५ ग्रेन इतकेंच होई. विणकर एका महिन्यांत फक्त ९० ग्रेन सूत काढी व या बारीक सुताला पावसाळी हवा चांगली असे. ही डाक्क्याची मलमल टिकण्यालाहि फार चांगली असे. १८८० पर्यंत अशी मलमल तेथें तयार होत असे. नंतर ही कला बुडाली. डाक्का पाहा.

पाटोळा—हें रेशमी कापड गुजराथेंत तयार होई. यांत विणकामाची कला उत्कृष्ट दिसून येते. चुनडी किंवा बंधनुकी रंगाई पद्धतीनें बाणा आणि ताणा यांचीं सुतें प्रथम पाहिजे त्याप्रमाणें रंगवून घेतात व मनांत योजलेल्या चित्रप्रकाराप्रमाणें विणतांना त्याचा उपयोग करतात. ही विणकामाची पद्धत फार श्रमाची असली तरी वस्त्र विणून झाल्यावर त्यांतील रंग आणि नक्षी फारच खुलून दिसतात. या पद्धतींत खंबायती आणि पाटणी असे दोन नमुने आहेत.

चित्रें—महाभारतकाळापासून चीट छपाईची पद्धत दिसून येते. मच्छलीपट्टणचे पालंपोर (पलंगपोस) हे छापील कॅलिको कापडाचे सुंदर नमुने इतरत्र पाहावयास सांपडणार नाहींत. त्यावर 'जीवनवृक्षा'ची नक्षी बहुधा आढळेल. गरबा नृत्यें, शिकारीचे देखावे हे गुजराथी चुनडींत पाहावयास मिळतात. राजपुतान्यांतहि असें छापी काम होत असे; व अद्यापि दिसून येतें.

जरतारी वस्त्रें—यांत कित्येक प्रकार आहेत. वस्त्राच्या दोन्ही बाजूंची नक्षी वेगवेगळी दिसते. 'किमखाब' (अरबी किम = फूल, खाब = विणणें) प्रकारांत सोनेरी जर पुष्कळ वापरली जाते; व भारी वस्त्र म्हणून हीच जास्त प्रचारांत आहे. रेशमी सुतांभोंवतीं सोनेरी किंवा रुपेरी तार गुंडाळतात व किमखाब तयार करतात. या जरीचा रंग व तकाकी कधीं जात नाहीं. या वस्त्रासाठीं बनारस प्रसिद्ध आहे. मुर्शिदाबाद, चंदेरी, अहमदाबाद, औरंगाबाद, सुरत व तंजावर या ठिकाणींहि जरीचें कापड होतें.

हिंदुस्थानांतील कलाबतू कापडांत, प्रसिद्ध काश्मिरी शाली, पंजाबच्या फुलकारी चादरी, काठेवाडचे शिलेदार कांठपदर, चंबाचे सचित्र रुमाल, लखनौचें 'चिकन' काम, इ. सांगतां येतील.

वहाबी पंथ—हा एक मुसलमानी पंथ असून, १७६० सालीं अरबस्तानांत अब्द-एल्-वहाब यानें स्थापन केला. वहाब हा चांगला विद्वान् होता. त्याच्या या नव्या पंथांत लागलीच हजारों लोक शिरले व नेज्द हा प्रांत वहाबींचाच बनला. वहाबनंतरहि अरबस्तानचा बहुतेक भाग या पंथाकडे गेला, तेव्हां १८१८ त इब्राहिमपाशानें वहाबींची सत्ता संपुष्टांत आणली. आज फक्त नेज्द आणि हासा यांवरच्या अमीराची सत्ता एवढीच वहाबींकडे शिल्लक आहे. १९२४ सालीं वहाबींनीं हेजाजवर स्वारी केली व १९२६ सालीं इब्न सौदच्या नेतृत्वाखालीं जिद्दा घेतलें व इब्न सौदला हेजाजची गादी मिळवून दिली. वहाबी लोक कट्टे मुसलमान असून जुन्या धर्माला चिकटून असतात.

वहिवाटीचा हक्क—१. (प्रेस्क्रिप्शन). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखादा हक्क किंवा मालकी त्या मिळकतीचा उपभोग कांहीं ठराविक मुदतीपर्यंत घेतल्यास प्राप्त होणें. या वहिवाटीच्या हक्कासंबंधींच्या कायद्याचा हेतु असा आहे कीं, जर एखाद्या इसमाला एखाद्या मिळकतीचा कबजा कायद्यानें ठरविलेल्या मुदतीपर्यंत सतत प्राप्त झालेला असला तर त्या इसमाला सदर वाहिवाटीच्या हक्कामुळें ऊर्फ कबजामुळें जो मालकी हक्क प्राप्त होतो त्या हक्काला बाध आणण्याचा प्रतिबंध इतर इसमांना करणें. 'इंग्लिश कॉमन लॉ' या कायद्यानें हा 'प्रेस्क्रिप्शनचा हक्क', स्थावर मिळकतीसंबंधीं जे जाण्यायेण्याचा हक्क, वगैरे ईझमेंटचे हक्क प्राप्त होतात, त्यांना हा शब्द योजलेला आहे. असा हक्क प्राप्त होण्यास ती वहिवाट अनादिकालापासून चाललेली आहे असें शाबीत करावें लागत असे. नंतर ही कालमर्यादा ४० वर्षें ठरविण्यांत आली, आणि १८७४ सालीं कन्व्हेयन्सिंग ॲक्टनें ही मर्यादा वीस वर्षें ठरविण्यांत आली. हिंदुस्थानांतहि हल्लीं अशाच स्वरूपाचा कायदा आहे. (इंडियन ईझमेंट्स ॲक्ट, कलम १५ पाहा.)

२. (ईझमेंट). कायद्यांत ईझमेंट या शब्दाचा अर्थ एका जमिनीच्या मालकाला नजीकच्या मालकाच्या जमिनीवर स्वतःच्या जमिनीच्या जरूरीकरितां शेजाऱ्याच्या जमिनीचा उपयोग करण्याचा, किंवा दुसऱ्याचीं कृत्यें बंद पाडण्याचा जो हक्क, उदाहरणार्थ, पाणी जाण्याचा मार्ग किंवा जाण्यायेण्याचा रस्ता किंवा खिडक्यांतून हवा, उजेड घेण्याचा हक्क, वगैरे अशा प्रकारचे हक्क असा आहे. असा हक्क, आपसांतील देवघेवीनें, किंवा कांहीं विशिष्ट मुदतीपर्यंत तसा उपयोग बिनहरकत केल्यानें प्राप्त होतो. हिंदुस्थान सरकारनें अशा हक्कांबद्दलचा 'ईझमेंट्स ॲक्ट' या नांवाचा स्वतंत्र कायदा सन १८८२ चा केला आहे.

**वक्षःस्थल**—वक्ष हा शरीराचा भाग पृष्ठवंश, बरगड्या आणि उरोस्थि यांचा बनलेला असून कंठ व उदर यांच्यामध्यें असतो. यामध्यें फुप्फुसें, हृदय, प्लुरा, वगैरे अवयव असतात. इतर प्राण्यांच्याहि यासारख्या अवयवास हाच शब्द लावण्यांत येतो. [ चित्रांत १–७ खऱ्या, ८–१० या खोट्या, ११ व १२ या उडत्या बरगड्या आहेत. ]

**वांई**—मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ३९१ चौरस मैल. तालुक्याचें मुख्य ठिकाण वांई असून तालुक्यांतील खेड्यांची संख्या १२५ आहे. लो. सं. (१९४१) १,०६,४७३. कृष्णा व नीरा या दोन नद्या वाहतात. कृष्णा नदीचा भाग बराच सुपीक आहे. या तालुक्यांत पावसाचें मान सरासरी ३३ इंच असतें. वांई हें तालुक्याचें मुख्य ठिकाण कृष्णातीरीं साताऱ्यापासून २० मैलांवर वसलें आहे. येथून महाबळेश्वर १५ मैल दूर आहे. कृष्णातीरावर वसलेल्या गांवांत वांई हें सर्वांत मोठें गांव असून तें प्रसिद्ध क्षेत्रहि आहे. येथें ब्राह्मणांची वस्ती बरीच आहे. याच्या आसपास पहाडी प्रदेश व पुष्कळशा गुहा असल्यामुळें पूर्वीं बौद्धांचें ठाणें या बाजूस असावें असें वाटतें. वांईला प्राचीन काळीं विराटनगर असें म्हणत व या नगरांत पांडवांनीं आपल्या अज्ञातवासाचें एक वर्ष घालविलें. १६५९ त वांई मराठ्यांकडे आली. १७९१ सालीं सरदार रास्ते यांच्या जहागिरींत वांई गेली तेव्हां कृष्णा नदीवर रास्त्यांनीं बरेच घाट व देवालयें बांधलीं. वांईस देवालयें पुष्कळ असून एक हायस्कूल, प्राज्ञपाठशाळा व इतर मराठी शाळा, कोर्ट व दवाखाना आहे. जवळच लोहारें म्हणून एक खेडें आहे. त्या ठिकाणीं बौद्धांचीं प्रेक्षणीय लेणीं आहेत. लो. सं. १४,८९३.

**वाईट बेट**—हें बेट इंग्लंडच्या दक्षिण किनाऱ्यानजीक असून त्याची लांबी २३ मैल व रुंदी १३ मैल आणि क्षे. फ. ९४,१४६ एकर आहे. याचा उत्तर भाग उंच पठार प्रदेश असून, तेथें मेंढ्या चारण्याची उत्तम सोय आहे. दक्षिण भाग फार आरोग्यकारक हवा असल्यामुळें आजारी माणसांना राहण्याचें सुप्रसिद्ध ठिकाण आहे. लो. सं. ९४,६९७ आहे.

**वाईल्ड, ओस्कार फिंगाल** (१८५६–१९००)—एक आयरिश लेखक व सौंदर्यकलावादी. 'लॉर्ड आर्थर सेव्हिल्स क्राइम'; 'दि कँटरव्हिल घोस्ट'; 'दि हॅपी प्रिन्स ॲन्ड अदर टेल्स'; 'दि पोर्ट्रेट ऑफ मिस्टर डब्ल्यू. एच्.' आणि 'दि पिक्चर ऑफ डोरियन ग्रे' हे त्याचे ग्रंथ आहेत. त्याचीं नाटकें 'सालोमे'; 'लेडी विंडरमिअर्स फॅन'; 'ए वुमन ऑफ नो इंपॉर्टन्स'; 'ॲन आयडियल हजबंड' आणि 'दि इंपॉर्टन्स ऑफ बीइंग अर्नेस्ट' हीं होत. १८९५ सालीं त्याच्यावर अनैतिक कृत्यांबद्दल खटला भरण्यांत आला. गुन्हा शाबीत होऊन त्याला दोन वर्षें सक्त मजुरीची कैद ही शिक्षा देण्यांत आली. या कैदेंतून सुटल्यावर तो फ्रान्समध्यें जाऊन राहिला. त्या वेळीं त्याची प्रकृति खराब झाली होती व त्याची अपकीर्तिहि झाली होती. त्यानें आपला शेवटचा ग्रंथ 'ॲपोलोजिया' (क्षमा) लिहिला. त्याचा १ ला भाग 'डी प्रोफन्डीस' या नांवानें १९०५ सालीं प्रसिद्ध झाला आणि उरलेला भाग १९६० सालापर्यंत प्रसिद्ध करूं नये असें ठरलें होतें. त्याचे कांहीं ग्रंथ बी. बी. सी. कडून १९३७ सालीं ध्वनिक्षेपित करण्यांत आले होते.

**वांकडे सावकार**—मराठेशाहींतील एक प्रमुख सावकार. यांचे मूळपुरुष बळवंतराव पेशवे-शिंदे-होळकरांबरोबर मोहिमांत राहून फिरत्या पेढ्या ठेवीत. त्यामुळें लहान शिपायापासून सुभेदारापर्यंत सैनिकांस परदेशात अधिकउणा खर्च लागल्यास कर्ज मिळे. वांकडे याच्या पेढ्यांचा व्यवहार मराठे सरदारांशीं तर असेच पण रजपूत राजांशींहि असे. काशीलाहि यांची एक पेढी होती. बळवंतराव वांकड्याचा मुनीम आत्माराम शिवराव तांबोळी नांवाचा होता. तोच पुढें वांकडे सावकार म्हणून प्रसिद्धीस आला. दौलतराव शिंद्याचा तो खासगी दिवाण झाला, त्यामुळें त्याला वांकडे दिवाण म्हणत. हें घराणें अद्यापि ग्वाल्हेरास आहे. तांबोळी हा तत्कालीन राजकारणांत नाना फडणिसाप्रमाणें वावरत असल्यानें उत्तर हिंदुस्थानांतील नाना फडणीस म्हणून प्रख्यात झाला. इंग्रजांनीं पुढें याचें वर्चस्व कमी केलें. 'महेश्वर दरबारचीं पत्रें' यांत याचा उल्लेख आहे.

**वाकाटक राजे**—या राजांविषयीं फार थोडी माहिती उपलब्ध आहे. यांची राजधानी मध्यप्रांतांतील चांद्याजवळील भांदक ही असावी. अजंठ्याच्या लेण्यांतील सोळाव्या शिलालेखांत या वंशांतील सात जणांचीं नांवें आढळतात. या वंशांतील पांचवा राजा दुसरा प्रवरसेन याच्या एका ताम्रपटांतील उल्लेखावरून वाकाटकांचें राज्य वऱ्हाडवर असावें असें दिसतें. वऱ्हाडांतील भोजकोटाचें राज्य हें यांचें मांडलिक राज्य होतें. पैठण, अश्मक (खानदेश), सातपुड्याचें पठार व वऱ्हाड येथपर्यंत यांचें राज्य पसरलें होतें. यांनीं तिसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंत राज्य केलें. यांचा मूळपुरुष विंध्यशक्ति नांवाचा होता. विंध्यशक्ति हा वाकाट गांवचा राहणारा. हें गांव ओर्च्छा संस्थानांत आहे. याचें व याचा पुत्र पहिला प्रवरसेन (२८४–३४४) याचें नांव अजंठ्याच्या लेण्यांतील शिलालेखांत

येतें. हें क्षत्रिय घराणें बौद्ध मतानुयायी असून अजंठ्याचीं मूळचीं लेणीं यांनींच कोरविलीं असें म्हणतात. दुसरा प्रवरसेन (३९५-४२०) हा चंद्रगुप्ताची कन्या प्रभावती गुप्ता हिचा मुलगा होय. याच्याच दरबारीं गुप्त राजाकडून वकील म्हणून कालिदास आला होता. या कवीच्या मदतीनें प्रवरसेनानें 'सेतुबंध' हें प्राकृत काव्य रचलें. वाकाटकांना चालुक्यांनीं पदच्युत केलें. हें घराणें इ. स. ५२० पर्यंत टिकलें.

**वांकानेर संस्थान**—मुंबई, काठेवाड, एक संस्थान. क्षे. फ. ४१७ चौ. मैल. यांतील सर्व प्रदेश पहाडी आहे. हवा उष्ण परंतु निरोगी असते. दरसाल पाऊस २२ इंच पडतो. या संस्थानचा मूळ पुरुष पृथ्वीराजाचा मुलगा सरतानजी म्हणून होता. येथील संस्थानिकांना ११ तोफांची सलामी देण्यांत येई. संस्थानची लो. सं. (१९४१) ५४,९६५ आहे. संस्थानांत वांकानेर मुख्य शहर असून खेड्यांची संख्या १०१ आहे. मुख्य पिकें धान्यें, कापूस व ऊंस हीं होत. येथें घोड्यांची पैदास चांगली होते. सध्यांचे महाराणा सर अमरसिंहजी आहेत. काठेवाडमध्यें वांकानेर दुसऱ्या क्रमांकाचें संस्थान असून त्याचें उत्पन्न सहा लक्ष आहे. १८८७९ रुपये खंडणी (इंग्रजांना व जुनागडच्या नबाबांना) द्यावी लागत असे. वाकानेर हें संस्थानचें मुख्य ठिकाण आहे. शहरांत कापसाचें कापड चांगलें तयार होतें. हें संस्थान आतां सौराष्ट्र संघांत सामील आहे.

**वांकेरी**—हीं कांटेरी झाडें कोंकणांत डोंगराळ भागांत आढळतात. पानें सागरगोट्याच्या पानांप्रमाणें असतात. झाडास जाड शेंगा व लाल तुरा येतो. याच्या गड्डयाला 'वांकेरीचें भातें' म्हणतात. तो चाळीस-पन्नास हात खोल जमिनींत असतो. कडे कोसळतात तेव्हां हे गड्डे आपोआप बाहेर पडतात. हे गड्डे दुधांत शिजवून औषधाच्या उपयोगीं आणतात. व्रण भरून येण्यास हें फार उपयुक्त आहे. याचा लेप देतात किंवा पोटांतहि हें घेतात.

**वांगारा**—पश्चिम आफ्रिकेंतील वांगारा नामक लोकांचा देश. मँडिंगो जातीचेंच वांगारा हें दुसरें नांव आहे. वांगारा देश सुवर्णाविषयीं फार प्रख्यात होता. नाइल नदीनें चोहों बाजूंनीं वेष्टिलेल्या एका ३०० मैल लांब व १५० मैल रुंद–नायगर व तिची शाखा बानी यांमधील–देशविभागाशीं हें तंतोतंत जुळतें. १८ व्या शतकाच्या अखेरीस व १९ व्या शतकाच्या आरंभींच्या वर्षांत हॉर्नेमन, मंगोपार्क, वगैरे संशोधकांनीं या सुवर्णभूमीची जगाला माहिती करून दिली. सध्यां हें नांव नकाशावरून नाहींसें झालेलें आहे.

**वांगें**—ही फळभाजी मशहूर आहे. हें झाड २ ते ४ फूट उंच व तितक्याच घेराचें वाढतें. फुलांचा रंग पांढरा, पिवळसर व जांभळा असतो. फळांचा रंग खाण्यायोग्य पूर्ण वाढीच्या वेळीं हिरवा, पांढरा, गुलाबी, जांभळा व काळा व ह्याच रंगांच्या पट्टयापट्टयांचा होतो. फळांचा आकार गोल, लांबट गोल व लांब असतो. फळाची लांबी एक इंचापासून तों ९।१० इंचांपर्यंत असते. कित्येक जातींचीं वांगीं १२ इंच आडवीं, ९।१० इंच अगर १५।१७ इंच लांब होतात. त्यास वेलवांगीं म्हणतात. वांग्याच्या लागणीचा मोसम पावसाळ्यानंतर आहे. कृष्णा नदीच्या कांठीं फार चांगलीं वांगीं होतात. कऱ्हाडजवळ गोटें म्हणून गांव आहे तेथील 'गोटेवांगीं' तिकडे प्रसिद्ध आहेत. पुण्याकडे कांटे वांगीं व डोरली वांगीं प्रसिद्ध आहेत. यांस सर्व उन्हाळाभर फळें येत असतात. पांढऱ्या व हिरव्या रंगाचीं १२ इंच जाड व ८।१० इंच लांब अशीं वांगीं पावसाळ्याच्या शेवटीं पुणें व मुंबई यांच्या आसपास करतात. तीं दिसण्यांत फार सुरेख असून रुचीसहि चांगलीं असतात. रोप वाढीस लागतांच पेंडीचें खत देतात व फुलें येऊन फळें येण्याच्या सुमारास मासळीच्या कुटीचें खोड खत देऊन चाळणी करतात.

हें झाड जाति–सोलानासी व वर्ग–सोलानम मेलोंगेना यांतील आहे. याचें फळ कोंबडीच्या अंड्याहून थोडें मोठें असतें; म्हणून इंग्रजींत याला 'एग्–फ्रूट' म्हणजे अंडवृक्ष म्हणतात. वांगें औषधीहि आहे. अंडवृद्धीवर मूळ उगाळून लेप देतात. धोतऱ्याच्या विषावर उतारा म्हणून रस देतात. झोंप येण्यास संध्याकाळीं वांगें भाजून मधांत कालवून देतात.

**वाग्भट**—१. एक प्राचीन आर्य वैद्य. याचा 'अष्टांगहृदय' ग्रंथ प्रसिद्ध आहे. ह्याच्या बापाचें नांव 'सिंहगुप्त' व आजाचें नांव 'वाग्भट' हेंच होतें. वाग्भट यानें आपल्या पुस्तकांत जें लिहिलें आहे तें सर्व सुश्रुत व चरक ह्या पुस्तकांतून घेतलें असावें असें वाटतें. कारण या दोन्ही ग्रंथांपेक्षां वाग्भटाच्या या पुस्तकांत कांहीं जास्त लिहिलेलें नाहीं. परंतु तऱ्हा निराळी आहे. 'वाग्भट' ग्रंथावर सर्वांगसुंदरा व हेमाद्रि अशा दोन टीका आहेत. त्यांपैकीं हेमाद्रीची टीका सूत्र व कल्प या दोन स्थानांवरच आहे. याचा काळ इ. स. दुसरें शतक धरतात.

२. एक जैन ग्रंथकार. हा बाराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला. याला प्राकृतांत बाहड असें नांव आहे. याचा अलंकारांवर प्रसिद्ध ग्रंथ आहे. यांत २६० पद्यें आहेत. यावर सिंहदेवगणीची टीका आहे.

**वाघ**—एक मांसाहारी सस्तन प्राणी. व्याघ्र हा शब्द ऋग्वेदांत कधीं आलेला नाहीं, पण अथर्ववेदांत वारंवार आलेला आहे; त्याचप्रमाणें सिंह हा शब्दहि आलेला आहे. यावरून साहजिक असें अनुमान काढतां येईल कीं, ज्या वेळीं वैदिक कालचे आर्य लोक

बंगाल प्रांताजवळ येऊन आंत शिरले त्या वेळीं अथर्ववेद लिहिला गेला असावा. मागाहून झालेल्या ग्रंथांत व्याघ्र हा शब्द अगदीं प्रचारांतला झाला. तैत्तिरीय संहितेंत निजलेल्या वाघाला डिवचून जागें केल्यावर उत्पन्न होणाऱ्या भयाचा उल्लेख आलेला आहे. या जनावराच्या जीवनाशक स्वभावाचाहि

वारंवार उल्लेख आलेला आहे. त्याचप्रमाणें तो पुरुषाद म्हणजे मनुष्यभक्षक असल्याचेंहि वर्णन आलेलें आहे. हा सिंहाप्रमाणें शक्तिमान् गणला गेलेला आहे. कारण राजसूय यज्ञाच्या वेळीं राजाला वाघाचें सामर्थ्य यावें म्हणून त्याच्या चर्मावर पाय ठेवावा लागतो.

वाघाला सिंह, चित्ता, वगैरेसारखीं प्रत्येक पुढील पायास पांच बोटें असून मागील पायास चार बोटें असतात व त्या प्रत्येक बोटाच्या अखेरीस तीक्ष्ण नखें असून तीं आंत ओढून घेतां येतात. याचा रंग पाठीवर तकतकीत पिंवळसर असून पोटाकडील भाग पांढरा असतो. पाठीवर काळे पट्टे असतात. हे हिंदुस्थान, जावा, सुमात्रा, वगैरे भागांत आढळतात. हा सिंहापेक्षां अधिक चंचल वृत्तीचा आहे. तसाच धूर्तहि आहे. वाघाला मांसापेक्षां रक्ताची फार आवड असते. वाघाच्या *बिबट्या, चित्ता अशासारख्या कांहीं जाती आहेत.*

**वाघरी**—ही हिंदु जात गुजराथच्या सर्व भागांत आढळते. यांची लो. सं. (१९११) ८२,०१६ आहे. वाघरी म्हणजे वाघासारखे; पण याच्यापेक्षां जास्त सयुक्तिक अर्थ असा करतां येईल कीं, वागद् प्रांतातून आलेले ते वाघरी. राजपुतान्यांतील ओसाड प्रदेशाच्या टेकड्यांना वागद् असें म्हणतात. सं. प्रांतात वागद् भागांत राहणारे वागरी नांवाचे रानटी लोक आहेत, तेव्हां त्या शब्दाचा अपभ्रंश होऊन वाघरी हें नांव रूढ झालें असावें; किंवा वागुरा म्हणजे जाळें या शब्दापासून धंदेवाचक नांव संभवतें. ही एक कोळ्यांची उपशाखा असावी. वाघरी लोक मासे व पक्षी धरतात, व दातवणाच्या काड्या विकतात. त्यांचे चार भेद आहेत: (१) चुनारिये, (२) दांतानिये, (३) वेढ्ढ, व (४) पातानिये. यांशिवाय त्यांचे आणखी उपभेद आहेत. यांपैकीं तलवदे व पोरनाले हे कोणाच्याहि हातचें अन्नपाणी घेत नाहींत; बाकीच्या उपभेदांत रोटीव्यवहार आहे, पण बेटीव्यवहार नाहीं. कांहीं वाघरी बीजपंथी आहेत. कांहीं देवीचे उपासक असून कांहीं हनुमंताचे भक्त आहेत. *जातींतलेच लोक त्यांचे उपाध्याय असतात. स्त्रियांत पातिव्रत्य* कडक असतें.

**वाघांटी**—ही एक जंगली भाजी आहे. हिचे अनेक वर्षे टिकणारे, मनस्वी कांटेरी व प्रचंड असे वेल वाढतात. उन्हाळ्याच्या अखेरीस वेलांस फूट होते व नव्या धुमाऱ्यास चैत्र-वैशाखांत फुलें येतात व आषाढांत फळें तयार होतात. हीं फळें लहानशा बेलफळांएवढीं असतात. तीं कोंवळेपणीं तोडून शिजविल्यास भाजी होते. रुचि उग्रट, कडवट असते. वाघांट्याच्या भाजीचें माहात्म्य आषाढी द्वादशीस ती भाजी खाल्ल्यानें पोटांत 'गोविंद' राहतो या समजुतीमुळें आहे. *घामगलांड्यास मुळीचा* लेप देतात. वाघचवड्यास पाला वांटून बांधतात.

**वाघेल राजे**—*गुजराथवर* स. १२१५–९६ पर्यंत राज्य करणारे हे राजे होत. मूळ पुरुष अरुणराज. त्याला कुमारपाल सोळंखी यानें जहागीर वगैरे दिली. त्याचा मुलगा लवणप्रसाद व त्याचा वीरधवल. हे दोघे फार शूर असून त्यांनीं आपल्या राज्याचा विस्तार केला. वीरधवलानें महंमद घोरीचाहि पराभव केला. तो दयाळू, न्यायी व सत्यप्रतिज्ञ होता. त्याच्या शवाबरोबर त्याच्या १८० सेवकांनीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं. त्याचा पुत्र वीसलदेव. त्याच्या वीरमदेव या भावानें वीरमगांव वसविलें. वीसलच्यानंतर अर्जुनदेव, लवणदेव, सारंगदेव व करणदेव हे राजे झाले. करणदेवाचें राज्य १२९६ सालीं अल्लाउद्दीन खिलजीनें बुडविलें. (*कर्ण वाघेला पाहा.*)

***वाघोजी तुपे***—*कान्होजी जेध्याच्या 'बारा मुळवे' म्हणून* जिवास जीव देणाऱ्या साहाय्यकांपैकीं एक. कासारखिंडीच्या युद्धांत यानें चांगली कामगिरी बजावली. अफजलखान-प्रकरणींहि याचे सद्गुण शिवाजीस दिसून आल्यानें त्यानें कान्होजीकडून यास आपल्याकडे घेतलें व यास कोंकणांत पायदळावरील हजारी नेमलें. पेणजवळच्या मिरे डोंगरावर कोंकणांत धुडगूस घालणाऱ्या नामदारखान या मोंगल सरदाराबरोबर शिवाजीनें जी लढाई दिली तींत हा जखमी झाला.

**वाघोली**—मुंबई, पुणें जिल्हा. पुणें–नगर रस्त्यावर पुण्यापासून दहा मैलांवर हें इतिहासप्रसिद्ध गांव आहे. बाजीराव पेशव्याचा उजवा हातच असा सरदार पिलाजी जाधव याचें हें गांव असून जाधवांचा मोठा तटबंदी वाडा आहे. गांवाजवळ पिलाजीची सुंदर दगडी समाधि बांधलेली आहे. तुकाराम-

घावाच्या वेळचा रामेश्वरभट येथेंच राहत असे. त्याचें वृंदावनहि येथील स्मशानांत आहे.

**वाघोलीकर, मोरो बापूजी** ( मृ. १९०८ )—एक महाराष्ट्रीय नट. हे किर्लोस्कर संगीत मंडळींतील आद्य व प्रमुख नट होते. आण्णा किर्लोस्कर यांना बाळकोबा व मोरोबा यांचें साहाय्य नसतें तर त्यांची कंपनी किंवा ते पुढें न येतां, संगीत नाटकाचाहि प्रवेश महाराष्ट्रांत लवकर झाला नसता असें म्हणतात. मोरोबांचें राहणें वांईपासून पांच कोसांवर असलेल्या वाघोली गांवचें. यांचें शिक्षण चेताचातांचेंच होतें. यांचा आवाज मधुर असल्याकारणानें वांईचे प्रसिद्ध हरिदास मोरशास्त्री वांईकर यांच्या पाठीमागें उभे राहून ते साथ करीत. पुढें वजीरखां नांवाच्या हिंदुस्थानी गवयाजवळ मोरबा गाणें शिकले. १८८० सालीं किर्लोस्करांची व यांची गांठ पडली. रंगभूमीवर यांनीं सतरा वर्षें मुख्य नटाचें काम केलें. दुष्यंत, अर्जुन, वसिष्ठ व पुरुरवा यांच्या भूमिका ते घेत व त्या उत्कृष्ट वठवीत. मोरोबांचा आवाज पहाडी असून लावणीच्या चालीवर पदें म्हणण्यात त्यांचा हातखंडा असे. ते किर्लोस्कर मंडळीचे एक भागीदार होते. वृद्ध झाल्यावर नाटकाचा व्यवसाय सोडून ते घरीं राहिले. वांईस यांचा अंत झाला.

**वाघ्या**—वाघ्या हा शब्द कानडी वग्गे म्हणजे भक्त या शब्दाचा अपभ्रंश आहे. खंडोबास वाहिलेल्या मुलांचा हा एक वर्ग असून निरनिराळ्या जातींचे लोक यांत शिरले आहेत. व त्यांनीं आपापल्या पूर्वजातीच्या चालीरीती कायम ठेवल्या आहेत. खंडोबास वाहिलेल्या मुरळ्या व वाघ्ये हे एकत्र राहतात. खंडोबास मुलें वाहण्याचा विधि असा आहे कीं, प्रथम चैत्र महिन्यांत गुरवाकडे देवास मूल वाहण्याचा आपला उद्देश कळवावा लागतो. मग ठराविक दिवशीं त्या मुलास मिरवीत खंडोबाच्या मंदिरांत नेतात. तेथें गुरव त्या मुलास हळद लावतो. व वाघाच्या कातड्याच्या पिशवींत हळद भरून तो ती पिशवी त्याच्या गळ्यांत बांधतो. मग देवावर हळद टाकून मुलगा स्वीकारण्याची त्याला विनंति करतो. वाघ्ये आपल्या आईच्या कुळांतील मुलीशीं लग्न लावीत नाहींत. कारण अशा कुळांतील मुलगी पुढें मुरळी होण्याचा संभव असतो व वाघ्ये आणि मुरळ्या तर बहीणभावंडें (?). तेव्हां बहिणीशीं कसें लग्न करावें ? वाघ्याचे लग्नसोहाळे मूळ जातींतील सोहाळ्याप्रमाणें होतात. आतां कायद्याप्रमाणें देवाला मुलें वाहण्याचें बंद झालें आहे. मुरळी पाहा.

**वाङ्‌निश्चय**—दोन पक्षांनीं परस्परात लग्नासंबंधीं केलेला क़रार. याला धार्मिक आणि कायदेशीर स्वरूप बहुतेक समाजांतून असतें. हिंदु समाजांत तर हा एक आवश्यक विधिच मानलेला आहे. पांढरपेशापेक्षां खालचे वर्ग याला फार महत्त्व देतात. याला 'साखरपुडा' म्हणतात. वाङ्‌निश्चयानंतर लग्न मोडल्यास फिर्याद होऊं शकते. युरोपियन लोकांत वधूवर अंगठ्यांची अदलाबदल करतात व साक्षी ठेवून परस्परांचें चुंबन घेतात. हा विधि चर्चमध्यें किंवा कोणाच्या घरींहि होतो. मात्र इंग्लंडमध्यें हा विधि फारसा मानीत नाहींत.

**वाचक्नवी**—वाचक्नवी म्हणजे 'वचक्नवीचा वंशज'. हें पैतृक नांव एका स्त्रीचें म्हणजे गार्गीचें आहे. ही बृहदारण्यक उपनिषदामध्यें ब्रह्माची शिष्या म्हणून प्रसिद्ध आहे. गार्गी पाहा.

**वाचस्पति मिश्र**—१. हा प्रसिद्ध कवि विद्यापतीचा समकालीन असून मिथिला देशाचा राजा शिवसिंह ( १४४६–१४५० ) याच्या पदरीं होता. यानें तत्त्वकौमुदी व विवादचिंतामणि हे व दुसरे फार्सी ग्रंथ लिहिले आहेत.

विवादचिंतामणि ग्रंथाचा आजहि न्यायालयांत उपयोग होतो. यानें अंतीं 'चिंतामणि' व 'निर्णय' अशीं ग्रंथांच्या नांवांत अनुपदें असलेले बरेच ग्रंथ रचले. उदा., शूद्र–आचार–आह्निक–तीर्थ, इ. चिंतामणि; तिथि–द्वैत–महादान, इ. निर्णय.

२. एक न्यायपंडित. यानें प्रथम न्यायसूत्रांची एक सूची तयार करून नंतर 'न्यायवार्तिकतात्पर्य' टीका लिहिली. सूची इ. स. ८४१ त लिहिलेली आहे. याचा गुरु त्रिलोचन हा मोठा तत्त्वज्ञानी होता. वाचस्पति मिश्राची 'भामतीटीका' शारीरभाष्यावर व 'सांख्यतत्त्वकौमुदी' सांख्यकारिकेवर लिहिलेली महत्त्वाची टीका आहे. हा अवच्छेदवादाचा पुरस्कर्ता आहे.

**वाचाभंग**—( अफेझिआ ). या रोगामध्यें मनुष्याच्या मेंदूस इजा होते. त्याची बोलण्याची व समजण्याची शक्ति नष्ट होते. या रोगाच्या दोन अवस्था असतात : एका अवस्थेंत वाचाशक्ति बंद होते व दुसऱ्यामध्यें ( अग्रेफिआ ) लेखनशक्ति नाहींशी होते. पहिल्यास गतिभंग व दुसऱ्यास संवेदनाभंग असें म्हणतात. दुसऱ्या प्रकारांत श्रवणशक्तिहि नाहींशी होण्याचा संभव असतो. याच्याच एका प्रकारामध्यें दृष्टिभंग अथवा वाचतां येण्याची शक्ति नाहींशी होण्याचाहि प्रकार असतो.

**वाच्छा, सर दिनशा एदलजी** (१८४४–१९३६)—एक हिंदी प्रागतिक पुढारी. १९१५–१६ मध्यें हे मुंबई कायदे मंडळाचे सभासद होते. १९१६ ते १९२० पर्यंत हे हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती कायदे मंडळाचे सभासद होते. नंतर हे कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद होते. सेंट्रल बँक ऑफ इंडियाचे कांहीं दिवस डायरेक्टर होते. इंपीरिअल बँक ऑफ इंडियाचे एक गव्हर्नर होते. बेरार कंपनी, सिंद्या स्टीम नॅव्हिगेशन, वगैरे कंपन्यांचे व अनेक गिरण्यांचे हे डायरेक्टर होते. १८७४ पासून हे

कापसाचे व्यापारी होते. मुंबई म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे सुमारें ३० वर्षे सभासद होते. १९०१-०२ मध्यें अध्यक्ष होते. १९०१ मध्यें कलकत्ता येथें भरलेल्या १७ व्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १८९४ मध्यें मुंबई प्रांतिक परिषदेचे बेळगांव येथें अध्यक्ष होते. १८९४ पासून १८ वर्षे राष्ट्रीय सभेचे मुख्य चिटणीस होते. १९१९ ते १९२७ पर्यंत वेस्टर्न इंडिया लिबरल असोसिएशनचे अध्यक्ष होते. १८८५ ते १९१५ पर्यंत बाँबे प्रेसिडेन्सी असोसिएशनचे चिटणीस व १९१५ ते १९१९ पर्यंत अध्यक्ष होते. पहिल्या मुंबई इलाखा प्रागतिक परिषदेचे १९१२ सालीं अध्यक्ष होते. हे अनेक वर्तमानपत्रांतून व मासिकांतून लिहीत असत व त्यांनीं अनेक पुस्तकें आर्थिक व राजकीय विषयांवर लिहिलीं आहेत.

**वाजपेय**—एक यज्ञ. तैत्तिरीय संहितेंत याचा उल्लेख असून शतपथ ब्राह्मण व पुढें झालेल्या ग्रंथांत ब्राह्मण आणि क्षत्रिय यांनींच करण्याच्या यज्ञाचें हें नांव आहे. या यज्ञांतील मुख्य भाग म्हणजे रथाची शर्यत होय व त्यांत यज्ञ करणाराला यश प्राप्त होतें. आर्य लोकांत रथांची शर्यत लावण्याची मूळची चाल होती. तिचीच सुधारून वाढविलेली आवृत्ति म्हणजे हा यज्ञ होय व हा यज्ञ केला म्हणजे तो करणाऱ्याला त्या यज्ञाच्या प्रभावानें यश मिळतें अशी समजूत असे.

**वॉट**—विद्युत्‌शक्तीच्या व्यवहारांतील मूलमानास वॉट असें म्हणतात. हें प्रमाण एक ॲम्पियर मापाचा विद्युत्प्रवाह एक व्होल्ट शक्त्यंतर असलेल्या विद्युन्मंडलामध्यें फिरत असला म्हणजे उत्पन्न होणारी शक्ति होय. एका अश्वशक्तीमध्यें ७४६ वॉट असतात. यावरून एक किलोवॉट म्हणजे १·३४ अश्वशक्ति होय. विद्युत्‌शक्ति व तिचें कार्य होत असलेला वेळ यांच्यावरून विद्युत्‌शक्तीचें प्रमाण अथवा किलोवॉट तास काढतां येतात, व यावरून आपण दिव्याकरितां वापरीत असलेल्या विजेची शक्ति मोजण्यांत येते.

वॉटमीटर—(विद्युत्‌शक्तिमापक). विजेची शक्ति मोजण्याच्या या यंत्रांपैकीं बहुतेकांत एक पक्की केलेली व एक फिरती कुंडली (कॉइल) असते. यांपैकीं एक उच्च प्रतिरोधाची असून व्होल्टेज वेष्टण म्हणून वर लावलेली असते; दुसरी कमी प्रतिरोधाची असून त्यांतून विद्युत्प्रवाह जातो. कुंडलीला पीळ पडेल त्या मानानें विद्युत्‌शक्ति मोजली जाते. गिऱ्हाइकांना पुरविलेली वीज मोजण्यासाठीं वॉट तासाचीं यंत्रें केलीं असतात.

**वांटपाचा कायदा**—(पार्टिशन ॲक्ट १८९३). दिवाणी कोर्टांत चालू असलेल्या मिळकतीचें वांटप करण्याच्या दाव्यांत कोर्टाला असें आढळून आलें कीं, एखाद्या विशिष्ट मालमत्तेचें वांटप नैसर्गिक कारणांमुळें, किंवा हिस्सेदार फार असल्यामुळें, किंवा इतर विशिष्ट कारणांमुळें, योग्य रीतीनें किंवा सोयीस्कर रीतीनें करतां येणें शक्य नाहीं, आणि त्या मालमत्तेची विक्री करून येणारी किंमतीची रक्कम हिस्सेदारांना वांटून देणें हिस्सेदारांच्या हिताचें आहे. तर कोर्टानें, एखाद्या हिस्सेदारानें तशी विनंति केल्यास, त्या मालमत्तेची विक्री करावी, आणि विक्रीची येईल ती रक्कम हिस्सेदारांना वांटून द्यावी (कलम २). अशा विक्रीच्या वेळीं एखादा हिस्सेदार ती मिळकत विकत घेण्याला कोर्टाची परवानगी मागेल तर कोर्टानें त्या मिळकतीची किंमत ठरवावी, व ती मिळकत त्या किंमतीला त्या हिस्सेदाराला विकत द्यावी (कलम ३). एखाद्या एकत्र कुटुंबाच्या मालकीच्या राहत्या घराचा एखादा हिस्सा त्या एकत्र कुटुंबाचा सहभागीदार नाहीं अशा इसमानें विकत घेतला, आणि त्या हिश्शाचें वांटप करण्याकरितां कोर्टांत दावा लावला तर कोर्टानें, तो हिस्सा विकत घेण्यास त्या एकत्र कुटुंबापैकीं कोणी सहभागीदार तयार असेल, तर त्या हिश्शाची किंमत ठरवून तो हिस्सा सहभागीदाराला विकावा (कलम ४).

**वाटाणा**—[पिसम साटिव्हम. इं. पी]. शिंबिवर्गांपैकीं एका जातीची वेल. ही एकवर्षायु असून हिचें मूलस्थान दक्षिण युरोप होय. या वेलीस शेंगा येतात. त्यांत दाणे असतात ते ओले असतांना रसाळ असतात व वाळल्यावर त्यांची डाळ किंवा पीठ करतां येतें. यांचा भाजीमध्यें बराच उपयोग करण्यांत येतो. हे फार पौष्टिक आहेत.

चिकपी—[सिसर ॲरिएटिनम]. हें रानांत आपोआप उगवतें. परंतु याची पूर्वेकडील देशांत लागवडहि करण्यांत येते. फ्रान्स व स्पेन यांमध्यें याचा खाण्याकरितां मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येतो. याचे भाजून फुटाणे करतात व शिजवून उसळ करतात. याची डाळहि उपयोगांत आणतात.

वाटाण्याची लागवड हिंदुस्थानांत फार प्राचीन कालापासून होत आहे. वाटाण्याचें रोप सुमारें फूटभर वाढून पुढें त्याचा वेल पसरतो. त्याचा वेल नाजुक असतो. याला शेंगा येतात, व प्रत्येक शेंगेंत चार ते सहा दाणे असून ते गोल असतात. वाटाणा बागाइतांत व जिराइतांत करतात. वाटाण्याच्या अनेक जाती आहेत. वाटाणा हें धान्य हलक्या, मध्यम काळ्या व मळईच्या जमिनींत चांगलें होतें. बीं नोव्हेंबरांत दर एकरीं ४० ते ५० पौंडपर्यंत पेरतात. महाबळेश्वर येथें विलायती वाटाणा फारच चांगला होतो. उत्पन्न सरासरी दर एकरीं ४००-५०० पौंड, देश व मावळी भागांत व गुजराथकडे एकरीं ४००-८०० पौंड बीं व ४-५ शें पौंड भुसा निघतो. वाटाण्याचे हिरवे व वाळलेले दाणे यांची उसळ, आमटी, वगैरे करतात.

**वॉट्स, जॉर्ज फ्रेडरिक** ( १८१७–१९०४ )—एक प्रसिद्ध इंग्रज चित्रकार. याच्या चित्रांत प्रेमाचा प्रभाव व लोभाचा हिडिसपणा व्यक्त होतो. याचें लग्न एलन टेरी या प्रसिद्ध नटीशीं झालें होतें पण लवकरच काडीमोड झाला. 'प्रेम आणि मृत्यु', 'जीवनाभास', 'खिडकींतील बैठक', 'सर गालाहाड', वगैरे त्याचीं चित्रें अत्यंत परिणामकारक आहेत. यानें कांहीं थोर पुरुषांच्याहि प्रतिमा काढल्या आहेत. राष्ट्राची सेवा करावी म्हणून त्यानें आपलीं चित्रें राष्ट्रीय चित्रसंग्रहालयाला विनामूल्य दिलीं व 'लिंकन इन्'चा भोजनाचा दिवाणखाना सजवून दिला. 'कलेचें उद्दिष्ट आध्यात्मिक मूल्याचा, महत्सत्याचा आविष्कार करणें हा असावा', अशी त्याची सांगणी असे.

**वॉट्सन्, जॉन ब्रॉडस** ( १८७८–          )—हा एक अमेरिकन मानसशास्त्रज्ञ असून वर्तनसिद्धान्त ( बिहेविअरिझम ) या नांवानें प्रचलित असलेल्या सिद्धान्ताचा पुरस्कार प्रथम या शास्त्रज्ञानें केला. या सिद्धान्ताप्रमाणें मनुष्याचा मानसशास्त्रीय दृष्ट्या अभ्यास करावयाचा असल्यास त्याच्या शरीरांतील ग्रंथी व स्नायू यांपासून मिळणाऱ्या प्रतिसंवेदनांस फक्त महत्त्व असतें व बाकीच्या गोष्टी गौण असतात.

**वाडाई**—आफ्रिका, एक फ्रेंच-संरक्षित संस्थान. येथें पूर्वी एक स्वतंत्र मुसलमानी राज्य होतें. १९०९ सालीं फ्रेंचांनीं तें खालसा करून फ्रेंच कांगोला जोडिलें. या देशाचें क्षे. फ. १,७०,००० चौ. मैल. व लो. सं. दहा लाखपर्यंत आहे. या देशाचे पूर्व व मध्य हे भाग फार सुपीक आहेत व येथें जंगलहि पुष्कळ आहे. संस्थानांत वाडी राइम, बाथा, वगैरे नद्या आहेत. जंगलांत मोठाले हत्तींचे कळप आढळतात. नीग्रॉइड व नीग्रो राष्ट्रजाती, अरब, फयुला व टिबु, इत्यादि जाती येथें राहतात. माबा ही येथील एक मुख्य जात होय. मका, नीळ व कापूस, इत्यादि वस्तूंची येथें लागवड करण्यांत येते. हस्तिदंत व शहामृगाचे पंख या निर्गत व्यापाराच्या मुख्य वस्तू होत. फ्रेंचांनीं हा देश काबीज करण्याच्या पूर्वी येथें गुलामांचा फार मोठा व्यापार चालत असे. भूमध्यरेषेवरील आफ्रिकेचा अरण्यमय भाग व सहारा वाळवंट यांच्या मधोमध असल्यामुळें या देशांत अरब व नीग्रो संस्कृति लवकरच सुरू झाल्या. स. १८९९ च्या अँग्लो-फ्रेंच करारान्वयें हा देश फ्रेंचांच्या सत्तेखालीं देण्यांत आला. १९०४–०९ पर्यंत वाडाईचे लोक व फ्रेंच यांच्यामध्यें लढाया चालून शेवटीं हें संस्थान पूर्णपणें फ्रेंचांकडे आलें.

**वाडें**—मुंबई, ठाणें जिल्ह्यांतील पूर्वेकडील एक पेटा. याचें क्षे. फ. ५६६ चौ. मैल असून खेड्यांची संख्या २३५ आहे. लो. सं. ४७,२५२. स. १८६६ पर्यंत वाडें लहानसा पेटा असून तो शहापूर तालुक्यांत मोडत होता. वैतरणा नदीचा भाग चांगला सुपीक असून येथील लोक सुखी आहेत. उत्तर भाग डोंगराळ असून तेथील वस्ती विरळ आहे. या पेट्यांतून तीन मोठे रस्ते जातात. सबंध तालुक्यांत जंगल असून साग, ऐन, मोह व खैर हीं मुख्य झाडें आहेत.

**वाणी**—यांना वाणी, बनिया, लाडसक्के, महाजन, साहुकार, वगैरे नांवें असून त्यांत खंडेलवाल, लाड, मोढ, नागर, काठी, अग्रवाल, मिस्तरी, कसेर, उमरा, बागरिया, धुसार, आगरवाल, ओस्वाल, माहेश्वरी, गहोई, श्रीमाळी, सैतवाल, जैसवाल, परवार, लिंगायत, मराठे, वगैरे पुष्कळ पोटजाती आहेत. यांची एकंदर लो. सं. ( १९११ ) ११,२६,५०० आहे. तींत मुसलमान जातीचे वाणी ५९,७१७ आहेत. वाण्यांची सर्वांत जास्त वस्ती ( ४,७१,६०३ ) संयुक्त प्रांतांत असून त्याच्याखालोखाल मुंबई, बिहार, ओरिसा, मध्य हिंदुस्थान, काश्मीर व राजपुताना इकडे आहे. यांचा मुख्य धंदा व्याजबट्ट्याची सावकारी, किराण्याचा व धान्याचा व्यापार, कापडाचें दुकान चालविणें, वगैरे असतो.

हे स्वतःस वैश्य समजतात व कांहीं जण जानवेंहि घालतात. सामान्यतः हिंदु वाणी मद्यमांसनिवृत्त असून खाण्यापिण्याचे नियम हे फार कडक रीतीनें पाळतात. आपलें मूलस्थान राजपुताना असें हे मानतात. तसेंच रजपूत जातीपासून उत्पत्ति झाल्याच्या कथा यांच्यांत अजून प्रचलित आहेत. राजपुतान्यांत बऱ्याच राज्यांत वाणी जातीचे बरेच प्रधान होऊन गेले. याचें कारण यांची व्यवहारचतुरता होय. यांच्यांत जैनधर्मी बरेच लोक आहेत. जैनांचे उपाध्याय ब्राह्मण असून ते हिंदु सणहि पाळतात. कांहीं जणांनीं आपल्यांत श्रेष्ठकनिष्ठदर्शक वीसा व दशा असा भेद पाडला आहे. वीसा हे श्रेष्ठ व दशा हे कनिष्ठ दर्जाचे समजतात. दशाजातींत पौनर्भवसंतति, गंधर्वविवाह आणि कडक जातिनियमांपासून पतित झालेले यांचा समावेश होतो. वाण्यांत बहुतेक १२ गोत्रें आढळतात. मातृवंश किंवा पितृवंश यांच्या ५ पिढ्या तुटल्याशिवाय त्यांत लग्नव्यवहार होत नाहीं. मध्यप्रांतांत हे लोक पुण्याकडील शिराळशेटसारखी एक नाथूरामाची मूर्ति शिमग्यांत मिरवतात. कर्नाटकाकडे यांना बनजिग म्हणतात. इकडील पुष्कळसे वाणी वल्लभाचार्यपंथी आहेत. जानव्याऐवजीं कांहीं जण तुळशीच्या मण्यांची माळ घालतात. मराठे वाण्यांत कुडाळे, संगमेश्वरी, कुणबी, पाताणे, बावकुले, नेवे, काथर व खरोट हे ८ प्रकार आहेत. कुडाळे आपल्याला आर्यवैश्य म्हणवितात. हे मांसाहारी आहेत. पण मद्यपी नाहींत. महाराष्ट्रांत कुलवंतवाणी म्हणून एक वर्ग आहे. यांचें मूळचें नांव कुळमवाणी होतें. यांच्यांत पुनर्विवाह होतात.

**वाणी**—एक किडा. हा नेहमीं अंधारांत व ओल्या जागीं राहतो व लांकडांत किंवा दगडाखालीं दडून बसलेला असतो. ह्याचें शरीर कीटकारखें चिवट आवरणाचें असतें, पण शेवटपर्यंत एकाच आकाराचें असतें. त्यांत 'शीर, ऊर व उदर' असा फरकच करतां येत नाहीं. शरीर कंकणाकृति छेदांचें बनलेलें असून प्रत्येक छेदास (पहिले तीन व शेवटचा एक शिवायकरून) चार पाय असतात. वाणी नुकत्याच उगवत असलेल्या पिकाचे मोड किंवा अंकुर खाऊन बराच उपद्रव करतात.

**वात** (दारूची)—(फ्यूज). सुरुंग लावण्याच्या कामीं किंवा तोफेचे गोळे, तटावर मारा करण्याचे गोळे किंवा बॉम्ब, वगैरे यांस बत्ती देण्याकरितां जी एक ज्वालाग्राही पदार्थांनीं भरलेली नळी वापरण्यांत येते तीस वात किंवा बत्ती असें म्हणतात. खाणीच्या कामांत ज्या बत्त्या वापरण्यांत येतात त्यांमध्यें एका नळींत हळूहळू पेटणारें द्रव्य भरलेलें असतें व तें हळूहळू पेटत जाऊन सुरुंगाच्या दारूपर्यंत पोंचतें आणि सुरुंग उडतो. दुसऱ्या प्रकारच्या बत्त्यांमध्यें तोफा वगैरेंच्या गोळ्यांकरितां नुसत्या दाबानें पेटणाऱ्या किंवा दाबाच्या साहाय्यानें ठिणगी उडून पेटणाऱ्या बत्त्या वापरण्यांत येतात. विजेच्या ठिणगीनें पेटणाऱ्या बत्तीस विजेची बत्ती असें म्हणतात. पाणतीरामध्यें कांहीं ठराविक वेळानंतर पेट घेणारी बत्ती वापरण्यांत येते. व कांहीं ठिकाणीं यांत्रिक शक्तीनें पेटणारी बत्ती उपयोगांत आणली जाते. अशाच प्रकारची बत्ती डायनॅमिट व गन-कॉटन उडविण्याकरितां उपयोगांत आणतात.

**वात**—आयुर्वेदांत कफ, वात व पित्त हीं तीन तत्त्वें मनुष्याच्या शरीरांत प्रधान मानिलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं रोगांत वात तत्त्वाचा प्रकोप होतो. पाश्चात्य वैद्यकाप्रमाणें वात होणें हा रोग नसून इतर रोगांच्या आनुषंगिक असें तें एक लक्षण आहे. त्याचे सौम्य व तीव्र असे प्रकार आहेत. सौम्य वात झाला असतां रोग्यास किंचित् भ्रम उत्पन्न होतो व तो अंथरुणांत कांहीं वेळां बरळतो एवढेंच. पण तीव्र वाताचा झटका आला असतां रोगी अंथरुणावरून उठून कोठें तरी जाऊं लागतो, किंवा दंगा करतो किंवा उडी मारतो. यानंतर बेशुद्धावस्था येते. शरीरास कंप सुटतो व नंतर ग्लानि येते. स्नायूंवरचा ताबा सुटून मलोत्सर्जन होतें पण मूत्र कोंडून राहतें. यास उपाय म्हणजे ताप मर्यादेबाहेर वाढूं न देणें हा होय. सामान्यतः १०४° अंशांवर ताप चढूं देऊं नये. तसेंच वातशमन करण्याकरितां पोटॅशिअम ब्रोमाइड (पालाश ब्रुमिद) व हायोसायमसचा अर्क द्यावा; क्वचित् अफूचा अर्कहि देतात, पण तो विचार करून द्यावा, कारण तो अपायकारक असतो.

वातविकारावर योजावयाच्या वानस्पतिक औषधांचा एक वर्ग (कार्मिनेटिव्ह) आहे. त्यांत पेपरमिंट, आलें, सुंठ, वेलदोडे, बडीशेप, वगैरे येतात.

**वातज्वर**—वाल, उडीद, तुरी, चणे, जडान्न, चिकट पदार्थ, कालिंगड, कवीठ, स्निग्धकंद, कोंडा, मुळें व रुक्ष पदार्थ, इत्यादिकांच्या अतिभक्षणानें हा ज्वर उत्पन्न होतो. या ज्वराच्या योगानें शरीरास कंप होतो; कंठ आणि ओठ शुष्क होतात, मळाचे खडे जमतात, शिंका येतात; मस्तक, पोट, कंबर, डोळे, आणि अंग हीं फार दुखतात, व झोंप येत नाहीं. ज्वर एखादे वेळेस थोडा व एखादे वेळेस पुष्कळ येतो. तोंडास अरुचि येते, अंगावर रोमांच उभे राहतात, डोळ्यांवर झापड व पायांना मेहरी येते. पोटऱ्या व मांड्या फुटतात. कानांत नाद होतो, तोंडाला तुरटपणा येतो, हातपाय गळगळीत होतात, दांत शिवशिवतात, शरीराला रुक्षपणा व अजीर्ण, भ्रम, मोह, शूल, इत्यादि लक्षणें होतात.

**वातपित्त ज्वर**—वात व पित्त यांच्या कोपेंकरून जो ताप येतो तो. या ज्वराच्या योगानें कंठ व तोंड हीं शुष्क होतात व मूर्च्छा, तृषा, निद्रानाश, वांति, भ्रम, डोळ्यांपुढें अंधेरी, श्वास, अरुचि, जिह्वादोष, अंगावर रोमांच, इत्यादि लक्षणें होतात.

**वातपेशी**—(स्विमिंग ब्लॅडर). कांहीं माशांच्या शरीरांत एक पिशवीसारखा अवयव जोडलेला असतो. त्याचें मुख्य कार्य त्या माशांच्या शरीराचें विशिष्टगुरुत्व वाढविणें अथवा कमी करणें हें असतें. अशी पिशवी वायूनें फुगवली असतां त्याचें विशिष्टगुरुत्व कमी होऊन मासा वरतीं येऊं लागतो व पिशवी रिकामी केली असतां तो जड होऊन त्यास बुडतां येतें.

**वातभट्टी**—(ब्लास्ट फर्नेस). भट्टी पाहा. अशुद्ध धातूमध्यें जळण किंवा दुसरी साहाय्यक वितळणारी धातु मिसळून व वाऱ्याच्या झोताचें साहाय्य घेऊन अशुद्ध धातूपासून शुद्ध धातु काढण्याकरितां जी भट्टी वापरण्यांत येते तीस म्हणतात. ही बहुधा वाटोळी असून तिच्या व्यासापेक्षां तिची उंची बरीच अधिक असते. लोखंड शुद्ध करण्याकरितां उपयोगांत आणावयाची भट्टी ८० ते १०० फूट उंच पंचपात्रासारखी असते. तिच्यासभोंवतीं लोखंडी पत्रा बसविलेला असून आंतील बाजूस अग्नि-इष्टिका (फायर ब्रिक्स) यांचा थर असतो. या भट्टींत वरच्या बाजूनें अशुद्ध धातु, जळण व साहाय्यक वितळणारे धातू हीं ओतण्यांत येतात. या भागास भसा म्हणतात. व त्यावर टोपीसारखें झांकण असतें. या भट्टींत एका भात्यासारख्या इंजिनानें १ हजार ते १५ शें अंश फॅरनहाइट उष्णमानावर तापविलेली हवा सोडण्यांत येते. ही उष्ण हवा सोडण्याची युक्ति ग्लासगो येथील जेम्स बी. नेल्सन यानें

शोधून काढली. ही हवा कोरडी केली असतां जळणाची बचत होते. अशा तऱ्हेच्या भट्टींतून पांचशें टन कच्चें लोखंड तयार होतें, आणि त्यास सुमारें ५ ते ६ टन हवा व दर टनास एक टन कोक लागतो. तांब्याच्या भट्ट्या लोखंडाच्या भट्ट्यांइतक्या उंच नसतात. व त्या बहुधा चौकोनी असतात. त्यांस अग्नि-इष्टिका लागत नाहींत. शिशाच्या भट्ट्या तांब्यापेक्षांहि लहान असून अधिक रुंद असतात, परंतु त्यांत अग्नि-इष्टिका घातलेल्या असतात. आणि त्यांतून वक्रनलिकेनें शिसें बाहेर काढण्यांत येतें.

**वातराक्षस**—एक आयुर्वेदीय रसायन. पाऱ्याच्या योगानें मारून निरुद्ध केलेलें सुवर्ण एक भाग, रससिंदूर एक भाग, गंधक एक भाग, कांत एक भाग, अभ्रक एक भाग, चांगलें शुद्ध करून मारलेलें ताम्र एक भाग, हीं एकत्र करून पुनर्नवा, गुळवेल, चित्रक, निर्गुंडी आणि अडुळसा या प्रत्येक औषधीच्या रसानें तीन तीन दिवस खल करून शरावांत घालून लहानसें (सात किंवा आठ रानशेणींचें) पुट द्यावें. थंड झाल्यावर चूर्ण करून ठेवावें. हें चूर्ण गुंजप्रमाण अनुपानपरत्वें सेविलें असतां वातरोग, ऊरुस्तंभ, वातरक्त (रक्तपिती), आमवायु, गात्रभंग, धनुर्वात, पक्षघात, कंपवायु, संधिगतवायु, शूल, उन्माद, इत्यादि रोग दूर होतात.

**वातविध्वंस**—एक आयुर्वेदीय औषध. यांत बचनाग, पारागंधक कज्जली, नाग, सुवर्णमाक्षिक, हरताळ, अभ्रक, त्रिकटु, कासीस भस्म हीं मुख्य औषधें असून एरंडेल व लिंबाचा रस यांत खल करतात. वातावरील हें एक शीघ्रप्रभावी औषध आहे. झटके येणें, अपतानक, अपतंत्रक, आक्षेपक, पक्षघात, इत्यादि वातविकारांत या औषधाचा चांगला उपयोग होतो. ·ll· ते १ गुंज आल्याचा रस, मध किंवा आर्द्रकावलेह यांबरोबर देतात.

**वातावरण**—पृथ्वीच्या सर्व बाजूंनीं वायूंचें आवरण आहे, त्याला हवा किंवा वातावरण म्हणतात. या हवेंत शेंकडा ७८ नत्र वायु, शें. २१ प्राणवायु व शें. १ इतर वायू व पदार्थ आहेत. यांपैकीं प्राणवायु हा प्राणिजीवनाला अत्यावश्यक आहे. हवेला वजन आहे हें तीन शतकांपूर्वी गॅलिलिओनें पटवून दिलें. साधारण माणसाच्या शरीरावर हवेचें १४ टनांइतकें वजन पडतें; पण तें सर्व बाजूंनीं सारखें पडत असल्यानें व शरीरांतील वायु तितक्याच वजनाचा आंतून प्रतिकार करीत असल्यानें या हवेच्या वजनाचा माणसाला त्रास होत नाहीं. हवेचें उष्णमान उन्नतांशाप्रमाणें बदलतें. तसेंच स्थलाच्या उंचीच्या प्रमाणांत कमी होत जातें. दर ६०० फूट उंचीला १° शत. इतकें उष्णमान उतरतें. वातावरणाची उंची किती आहे हें निश्चित नाहीं. निदान २०० मैल तरी असेल. पण इतक्या वर हवा क्वचितच असणार. हवेचे गुणधर्म आणि नियम यांवर हवेच्या यंत्रांची रचना केलेली असते.



**वांतिहृद्रस**—एक आयुर्वेदीय रसायन. लोह, शंखभस्म, गंधक, पारा हीं समभाग औषधें खलांत घालून कोरफड, धोत्रा, आणि चुका यांच्या रसानें खलावीं; नंतर गोळा करून त्यावर सात मातकापडें (लेप) करून पुट द्यावें, आणि खलून ठेवावें. हें रसायन दोन वालप्रमाण अजमोदा आणि वावडिंग यांच्या चूर्णाशीं मध घालून द्यावें. मागून पिंपळाच्या क्षाराचें पाणी पाजावें. म्हणजे कृमी व वांति हे रोग दूर होतात.

**वात्स्यायन**—१. कामसूत्राचा कर्ता. कामसूत्र हा कामशास्त्रावरील प्राचीन सुप्रसिद्ध ग्रंथ असून त्याचा काळ इ. स. ४ थें शतक हा असावा. (कामशास्त्र पाहा.)

२. न्यायभाष्यकर्ता. याला वाचस्पतीनें व हेमचंद्रानें पक्षिलस्वामी म्हटलें आहे. हा द्रविड ब्राह्मण असावा.

**वात्स्यायन, सच्चिदानंद हिरानंद** (१९११- )—एक हिंदी साहित्यिक. यांचे वडील डॉ. हिरानंदशास्त्री हे प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक असल्यानें सच्चिदानंदांचें शिक्षण एके जागीं झालें नाहीं. तथापि त्यामुळें त्यांना अनेक प्रांत व संस्कृती पाहतां आल्या. ते लाहोरचे बी. एस्सी. असून संयुक्तप्रांतांत एम्. ए. चा अभ्यास करीत होते. पण १९३० च्या सत्याग्रहांत त्यांनीं भाग घेऊन तुरुंगवास पत्करल्यानें अभ्यास तेवढाच राहिला; पण साहित्यसेवेला सुरुवात झाली. त्यांच्या 'शेखर-एकजीवन'नें हिंदी साहित्यांत चांगली भर टाकली आहे. तीन कवितासंग्रह, सव्वाशें गोष्टी व निबंध, व एक कादंबरी हीं प्रसिद्ध झालीं आहेत. तीव्र बुद्धिमत्ता व अनुभूति यांचा संगम त्यांच्या लेखनांत दिसतो. 'परंपरा' नांवाचा त्यांचा एक कथासंग्रह प्रसिद्ध आहे. 'अज्ञेय' या टोपणनांवानें ते वाचकांना माहीत आहेत.

**वांदिवाश**—मद्रास, उत्तर अर्काट जिल्ह्यातील एक तालुका. क्षे. फ. ४० चौरस मैल. लो. सं. सुमारें दोन लक्ष. यांत २८४ खेडीं आहेत. जमीन हलकी असून वस्ती विरळ आहे. तालुक्याचें मुख्य ठाणें वांदिवाश येथें आहे. वांदिवाशची लो. सं. सुमारें ५ हजार आहे. १८ व्या शतकांत कर्नाटक युद्धाच्या प्रसंगीं वांदिवाश येथें बऱ्याच महत्त्वाच्या चकमकी घडून आल्या. १७५२ सालीं मेजर लॉरेन्सनें वांदिवाशवर हल्ला केला होता. स. १७५७ त कर्नल अंडरसन यानें किल्ला खेरीजकरून शहराचा विध्वंस करून टाकिला होता. १७६० सालीं फ्रेंच सरदार लाली व बुसी यांचा आयरकूट या इंग्रज सरदारानें वांदिवाश येथील लढाईंत पूर्णपणें पराभव करून बुसीला कैद

केलें. स. १७८० त हैदरअल्लीनें वांदिवाश किल्ला सर करण्याचा प्रयत्न केला होता.

**वाद्यस्वरमालिका**—(सोनाटा). वाद्यानुकूल स्वररचना-पद्धति. ज्याप्रमाणें गायनास अनुकूल अशा पद्यांची अथवा चिजांची रचना करण्यांत येते त्याप्रमाणें वाद्यांस अनुकूल असलेल्या स्वरमालिकेचीहि रचना करण्याचा प्रघात पडत चालला. यामध्यें परस्परविरुद्ध मूलस्वरांवर आधारलेला स्वरमिलाफ हें तत्त्व आहे. अशा तऱ्हेच्या स्वरमालिकारचने-मध्यें स्कारलेटिव व सी. पी. ई. बाक हे प्रथम पुढें आले व त्यानंतर हेडन यानें हा प्रघात विशेष सुरू केला. मोझार्ट यानें यांत भर घातली व बीटोव्हेन यानें ही कला पूर्णत्वास नेली.

**वाद्यें**—गायनांतील वाद्याचे चार प्रकार असतात: (१) तारा व ताती लावून वाजणारीं 'ततवाद्यें'; (२) कातड्यानें मढवून वाजलीं जाणारीं 'आनद्ध' वाद्यें; (३) भोंकांतून वारा भरून वाजणारीं 'सुषिर' वाद्यें; व (४) एकावर एक आघात करून वाजलीं जाणारीं 'घन' वाद्यें. तत आणि सुषिर वाद्यें गीतोपयोगी, व आनद्ध आणि घन हीं तालोपयोगी असतात.

आनामी स्त्री-वादक

काहीं वाद्यें गाण्याला तालसूर देण्यासाठीं असतात, तर कांहीं धार्मिक आणि मंगलप्रसंगीं वाजवावयाचीं असतात. कांहीं शिकारीच्या व कवाइतीच्या वेळीं वाजवितात. कांहीं केवळ गाण्याप्रमाणें स्वतःचें व ऐकणाराचें मनोरंजन करण्या-साठीं असतात. प्रत्येक वाद्याची रचना कशी असते तें त्या त्या नांवाखालीं या कोशांत सांगितलें आहे.

**वांद्रें**—मुंबई, उपनगर, पूर्वी हें ठाणें जिल्ह्यांत साष्टी तालुक्यांत असे. हें मुंबई व साष्टी हीं बेटें जोडणाऱ्या पुलाच्या टोंकाला, मुंबई शहराच्या उत्तरेस ९ मैलांवर असून बी. बी. सी. आय्. या रेल्वेवरील स्टेशन आहे. लो. सं. सुमारें २५,०००. येथील ख्रिस्ती लोक सोळाव्या व सतराव्या शतकांत पोर्तुगीजांनीं बाटविलेल्या ख्रिस्ती लोकांचे वंशज आहेत. येथें बरींच ख्रिस्ती देवालयें आहेत. येथील म्युनिसिपालिटी स. १८७६ त स्थापन झाली. ताडी काढणें व मासे मारणें हे येथील मुख्य धंदे आहेत. मुंबई म्युनिसिपालिटीचा कसाईखाना पुलाच्या उत्तर टोंकाला आहे. वांद्रें येथें एक अनाथबालसंगोपन गृह व सेंट जोसेफ्स कॉन्व्हेंट हीं आहेत. येथें दवाखाना, हायस्कूल, दुय्यम आणि प्राथमिक शाळा आहेत. वांद्रें व पाली या टेंकड्यांवर युरोपियन व पारशी लोक राहतात. आतां हें बृहन्मुंबईंत समाविष्ट आहे.

**वानवळे, आबाजी**—शिंदेशाहींतील एक प्रसिद्ध सावकार. हें सावकार घराणें फार धनाढ्य होतें. खर्ड्यांच्या लढाईची संपूर्ण आर्थिक जबाबदारी एकट्या आबाजीनें घेतल्याची आख्यायिका सांगतात. याच्याजवळ एकटांकी नाणीं पुणें ते सिंहगड दोन हात रुंदीचा रस्ता झांकून टाकतां येईल इतकीं होतीं. एकदां राघोबादादानें याची पेढी लुटविली. पण लगेच यानें राघोबाला ससैन्य जेवणास घालून आपल्याजवळच्या ठायीं ठायीं गुप्त ठेवलेल्या रत्नांच्या राशी दाखवून चकित केलें. यानें एकदां विष्णुयाग केला तो सतत १४० दिवस चालू होता. 'महेश्वर दरबारचीं पत्रें' (इ. स.) यांत या वानवळ्याच्या सावकारीचे बरेच उल्लेख आहेत.

**वांब**—(ईल). वाम. हे एका जातीचे मासे आहेत. हे सर्वत्र आढळतात. यांचा आकार सापासारखा असतो, परंतु यांस तोंडाजवळ कल्ले नसतात. यांचे खवले फार सूक्ष्म असून ते कातडींत घट्ट बसलेले असतात. हे गोड्या पाण्यांतहि पांच-पासून वीस वर्षेपर्यंतहि राहूं शकतात ही गोष्ट डॉ. ब्रिटन यांनीं निदर्शनास आणली. यानंतर ते पुन्हां समुद्राकडे परत फिरतात. हे आपलीं अंडीं खोल पाण्यांत घालतात. यांचीं पिलें तीन वर्षांचीं झालीं म्हणजे तीं धुरकट पिंगट रंगाचीं असून तीं नदीच्या गोड्या पाण्यांत जगतात. यांचें मांस खातात.

**वांबोरी**—मुंबई, अहमदनगर जिल्हा, राहुरी तालुक्यांतील एक गांव. हें राहुरीपासून ९ मैल आहे. लो. सं. ६,७७६. वांबोरी हें मारवाडी वाण्यांचें मुख्य ठिकाण असून येथें व्यापारी घडामोड व हुंडीची देवघेव चांगली चालते. कांहीं घरें चांगलीं मोठीं बांधलेलीं आहेत. येथें धान्य व तेल यांचा व्यापार

चांगला चालतो. मुख्य धंदा गाड्या तयार करण्याचा आहे. हातमाग बरेच असून, सरकी काढण्याचा व कापूस दाबण्याचा कारखाना आहे. येथें मारवाडी लोकांनीं बांधलेलें एक बालाजीचें मंदिर आहे. येथें १८८५ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

**वामक**—( एमेटिक ). वांतिकारक औषध. मनुष्यास ओकारी येण्याकरितां जें औषध देण्यांत येतें त्यास वामक अथवा वांतिकारक असें म्हणतात. अशा औषधाचा परिणाम प्रत्यक्ष जठराच्या मज्जातंतूंवर किंवा अप्रत्यक्ष रीत्या रुधिरप्रवाहामार्फत मेंदूच्या वांतिकारक केंद्रावर होतो. दोन चमचे मीठ एक पेलाभर कोमट पाण्यांत विरघळविलें किंवा, जशद गंधकिताचे ( झिंकसल्फेट ) २० ग्रेन दिले असतां वांति होते. तसेंच आपोमार्फाइन हैड्रोक्लोराइड याचा $\frac{1}{2}$ ग्रेन त्वचेच्या आंत टोंचून घातला असतां तावडतोब वांति होते.

**वामदेव**—१. एक वैदिक ऋषि. हा ऋग्वेदाच्या ४ थ्या मंडलाचा द्रष्टा आहे. हा गौतम कुलांतील दिसतो. हा महान् तत्त्ववेत्ता होता. गर्भांत असतांनाच याला ज्ञान प्राप्त झालें होतें. याचा इतिहास उपनिषदांमध्येंहि आढळतो.

२. अंगिरा कुलांतील एक गोत्रकार ऋषि. यानें एका ब्रह्म राक्षसाचा उद्धार केला.

**वामन**—चालू मन्वंतरांत सातव्या पर्यायांतील त्रेतायुगांत कश्यपापासून अदितीच्या ठायीं झालेला विष्णूचा अवतार. भृगकच्छक्षेत्रीं बलीचा याग सुरू असतां विष्णूनें बटूचें रूप घेऊन त्याच्याजवळ त्रिपादभूमि मागितली. बलीचा गुरु शुक्राचार्य नको म्हणत असतां बलीनें वामनाच्या हातावर दानाचें उदक सोडलें. तेव्हां वामनानें विराट् स्वरूप धारण करून दोन पावलांत स्वर्ग व पृथ्वी व्यापली. तेव्हां बलीनें आपलें वचन खरें करण्यासाठीं तिसऱ्या पावलासाठीं आपलें मस्तक दिलें. वामनानें त्याच्या मस्तकावर पाय देऊन त्याला पाताळांत लोटलें. तथापि त्याचें शुद्ध सत्त्वपालन पाहून त्याचा द्वारपाल होण्याचें ठरविलें. कार्तिक शुद्ध प्रतिपदेस हा दानाचा दिवस होता म्हणून बलिप्रतिपदा पाळतात. बलि पहा.

वामन पुराण—एक महापुराण. या पुराणांत विष्णूच्या बटुमूर्ति अवतार 'वामन' याची कथा सांगितली आहे. वैष्णव पंथाचा हा ग्रंथ आहे. तथापि शैवपंथांतील लिंगपूजेचें वर्णनहि यांत बरेंच आलें आहे. पवित्र तीर्थक्षेत्रांचें वर्णन बऱ्याच भागांत आढळतें. पण पुराण वाङ्मयांतील अवश्य अशा सृष्टयुत्पत्ति वगैरे गोष्टींचा यांत क्वचितच उल्लेख आहे.

**वामन** ( सुमारें इ. स. ७७९–८२५ )—एक संस्कृत ग्रंथकार. हा काश्मीरांतला असावा असें दिसतें. इ. स. आठव्या शतकांत काश्मीरचा राजा जयापीड याचा वामन नांवाचा मंत्री होता तोच हा 'काव्यालंकारसूत्र'–कार असें कित्येक विद्वानांचें मत आहे. पाणिनीच्या व्याकरणसूत्रांवर काशिकावृत्ति नांवाची टीका करणारा वामन हा या काव्यालंकारसूत्रकर्त्या वामनाहून भिन्न असून प्राचीनतर होय, असें कांहींचें म्हणणें आहे. या वामनानें केलेल्या 'काव्यालंकारसूत्रें' या ग्रंथाचे पांच भाग आहेत. शारीर, दोषदर्शन, गुणविवेचन, अलंकारिक व प्रायोगिक हीं तीं पांच अधिकरणें होत. या काव्यालंकारसूत्रांवर स्वतः वामनानेंच वृत्ति म्हणजे टीका लिहिली आहे. सूत्रें व वृत्ति यांच्यावर महेश्वरकृत टीका आहे.

**वामन पंडित** ( १६३६–१६९५ )—एक सुप्रसिद्ध मराठी कवि. हा ऋग्वेदी वसिष्ठगोत्री ब्राह्मण मूळ विजापूरचा राहणारा. याचें आडनांव शेषे होतें. लहानपणापासून हा विद्याव्यासंगी व बुद्धिमान् होता. यानें लहानपणींच फारसी भाषेचा अभ्यास केला होता. उदरनिर्वाहाकरितां कांहीं दिवस ठिकठिकाणीं हिंडून पुढें तो काशीक्षेत्रीं गेला. तेथें एका मध्वमतानुयायी गुरुजवळ त्यानें वेद व शास्त्रें यांचा उत्तम अभ्यास केला. या विद्येच्या जोरावर त्यानें ठिकठिकाणीं पूर्वपक्ष व उत्तरपक्ष करून अनेक सभा जिंकल्या व विजयपत्रें मिळविलीं. यथार्थदीपिकाकार वामन व मर्तृहरीच्या श्लोकांचें भाषांतर करणारा वामन हे वेगवेगळे असेंहि कोणी म्हणतात. वामन पंडिताची गणना उच्च दर्जाच्या कवींत होते. यमकें लांब लांब साधण्यात याचें कौशल्य दिसून येतें. म्हणून यास 'यमक्या वामन' असेंहि म्हणतात. मर्तृहरीचीं शृंगार, नीति व वैराग्य हीं शतकें, गंगालहरी, समश्लोकी गीता हीं याचीं भाषांतरितें होत. 'निगमसागर' नांवाचा वेदांतपर ग्रंथ त्यानें लिहिला आहे. त्यानंतर 'यथार्थदीपिका' या नावाची गीतेवरील टीका अनेक लोकांच्या सूचनेवरुन त्यानें लिहिली. या ग्रंथाची ओवीसंख्या २२ हजारांवर आहे. याशिवाय रामजन्म, कंसवध, हरिविलास, आर्याटीका, कात्यायनीव्रत, अनुभूतिलेश, जलक्रीडा, जटायुस्तुति, अशीं इतर पुराणप्रसंगांवर त्यानें काव्यें केलीं आहेत. 'सुश्लोक वामनाचा' असें प्रत्यक्ष मोरोपंतांनीं म्हटलें आहे. निवृत्तिपर काव्यांत जशी याची प्रसिद्धि आहे, तशीच शृंगार, वात्सल्य, करुण, वगैरे नवरसपूर्ण काव्यहि यानें केलें आहे. वर्णनशैली, रचनाचातुर्य, साधेपणा व प्रसाद त्याच्या काव्यांत जागजागीं दिसून येतो. यानें आपल्या बायकोस उपदेश करण्याकरितां लिहिलेलें प्रियसुधा नांवाचें प्रकरण फार उत्तम वटलें आहे. याचा निधनकाल शके १६१७ मानतात. समाधिस्थान वांईजवळ भोगांव नांवाच्या खेड्यांत आहे.

**वायक्लिफ, जॉन** ( १३२०–१३८४ )—एक इंग्रज धार्मिक सुधारणावादी. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें होऊन डॉक्टर

ऑफ थिऑलजी ही पदवी मिळाल्यावर, तो त्याच युनिव्हर्सिटींत डिव्हिनिटी (धर्मशास्त्र) या विषयाचा अध्यापक झाला. १३७४ सालीं लीसेस्टरशायरमधील लूटरवर्थ येथें तो रेक्टर झाला. आणि धर्मोपदेशकाचें काम त्यानें अतिशय परिश्रमपूर्वक आणि कळकळीनें केलें. त्याच्या धार्मिक भाषणांत त्यानें रोमच्या तत्कालीन पोपला ॲन्टीख्राइस्ट (ख्राइस्टविरोधी) असा शब्दप्रयोग वापरून पोपवर लोभी, महत्त्वाकांक्षी, जुलमी, इत्यादि आरोप केले. इंग्लंडचा राजा तिसरा एडवर्ड याचें पोपशीं भांडण असल्यानें वायक्लिफचा त्याला उपयोग झाला. त्यानें बायबलचें इंग्रजी भाषेंत भाषांतर करण्यास सुरुवात केली, आणि १३८१ सालीं खिस्ती धर्मातील प्रभुभोजनांतील द्रव्यांतरीभवन (ट्रॅन्स-सब्स्टॅन्सिएशन) या धार्मिक कल्पनेच्या खरेपणाविरुद्ध जाहीर आव्हान दिलें. त्यामुळें वायक्लिफला नास्तिक ठरवून त्याचे ग्रंथ जाळून टाकण्याबद्दल फर्मान निघालें व त्याच्या कांहीं अनुयायांना कैदेंत टाकण्यांत आलें. पण वायक्लिफचा कांहींहि छळ न होतां तो लूटरवर्थ येथें मरेपर्यंत राहिला. मात्र त्याच्या मरणानंतर तीस वर्षांनीं कॉन्स्टन्सच्या कौन्सिलनें वायक्लिफच्या धार्मिक मतांचा निषेध केला व १४२८ सालीं त्याचें प्रेत थडग्यांतून उकरून काढून जाळण्यांत आलें.

**वायचर्ले, विल्यम** (१६४०–१७१६)—एक इंग्रज नाटककार. त्याचीं मुख्य नाटकें—'लव्ह इन् ए वुड' (जंगलांतील प्रेम); 'दि जन्टलमन डान्सिंग-मास्टर'; 'दि कंट्री वाइफ' (खेडवळ बायको); 'दि कंट्री गर्ल' (खेडवळ मुलगी); आणि 'दि प्लेन डीलर'. हें शेवटलें नाटक सर्वोत्कृष्ट आहे. इंग्लंडांत राज्यपदोद्धारा (रेस्टोरेशन)नंतर सुखान्त नाटकें लिहिणारे जे नाटककार झाले, त्यांत कॉन्ग्रीव्ह हा पहिला आणि वायचर्ले हा दुसऱ्या क्रमांकाचा नाटककार आहे.

**वायवर्णी वर्ग**—[जाति–कॅपॅरिडासी]. एक वनस्पतींची जात. या जातीच्या वनस्पतींत झाडें, झुडपें, रोपटीं, इत्यादि प्रकार आढळतात. या जातींचीं झाडें द्विगर्भपर्ण (द्विदल) असून त्यांच्या फुलांना पुष्कळ पाकळ्या असतात. यांतील कांहीं फार विषारी आहेत व कांहीं केवळ उत्तेजक आहेत. याच्या फुलांच्या कळ्या बाजारांत मिळतात.

**वायवर्णी**—[लॅ. क्रॅटीव्हा रिलिजिओसा]. हीं झाडें कोंकणांत फार होतात. पानें त्रिदळ असून त्यांस एक लांब देंठ असतो. याची भाजी कडवट होते. पण वायवर्णी वातविकारावर फार गुणकारी आहे. याची मुळी उगाळून वाताच्या जागीं लावतात. पानथरीवर पाल्याचा रस चोळतात.

**वायवीय गतिविशिष्ट सिद्धान्त**—(कायनेटिक थिअरी ऑफ गॅसेस). द्रव्य हें जे गुणधर्म प्रदर्शित करतें ते त्याच्या ठिकाणीं त्यांतील अणूं (मॉलिक्यूल्स) मध्यें जी निरनिराळ्या प्रकारची गति उत्पन्न होते त्यामुळें त्या द्रव्याच्या ठिकाणीं उत्पन्न होतात, अशा तऱ्हेचा जो एक द्रव्याचा गत्यात्मक सिद्धान्त आहे, त्याचीच वायूंचा गत्यात्मक सिद्धान्त ही एक शाखा आहे. वायु इतस्ततः सर्व दिशांनीं व अनेक प्रकारच्या गतींनीं भ्रमण करणाऱ्या अणूंचा बनलेला असतो, असें मानण्यांत येतें. हे अणू एका सरल मार्गानें भ्रमण करीत असतात. परंतु त्यांच्या मार्गांत जर दुसरे अणू आले किंवा ज्या पात्रांत ते ठेवलेले असतील त्या पात्राची बाजू भिंतीसारखी आड आली तर त्यांची ही गति वक्र होते. वायूवर सामान्य दाब असतां त्यांतील परमाणूंची गति दीर्घ कालपर्यंत सरळ दिशेंत असते व त्या मानानें दुसऱ्या अणूंच्या संसर्गानें होणारी वक्रगति अल्पकाल असते. पात्राच्या बाजूवर होणाऱ्या आघातामुळें त्या वायूमध्यें दाब उत्पन्न होतो. त्या वायूचें उष्णतामान त्याच्या अणूंतील गतिशक्तीवर अवलंबून असतें. कारण उष्णता हें एक गतीचें रूप आहे. दोन वायू एकत्र आले असतां ते एकमेकांत मिसळून जातात किंवा दोन वायूंच्या मिश्रणामध्यें एखादें सच्छिद्र पात्र ठेवलें असतां ते दोन वायू एकत्र होतात तीं वायूमधील उपपत्ति या उपपत्तीवरून विषद करतां येते. या गोष्टी व असेच इतर वायूंच्या बाबतींत होणारे चमत्कार या उपपत्तीच्या साहाय्यानें प्रयोगद्वारें दाखवितां येतात.

डेमॉक्रिटसनें आणि इतर कांहीं ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं हा द्रव्याचा गत्यात्मक सिद्धान्त कांहींसा अंदाजानें मांडला होता. १७ व्या शतकांत गॅसेंडी आणि कूक यांनीं त्यांत भर घातली. परंतु त्यानंतर आर्. क्लॉझियस, जे. क्लार्क मॅक्सेल आणि एल्. बोल्ट्झमन यांनीं हा पूर्णपणें प्रस्थापित केला.

**वायवीय पर्यटण**—(एरियल नॅव्हिगेशन). अलीकडे दिवसेंदिवस वायुपर्यटणामध्यें बरीच वाढ झाली आहे. याकरितां विमान आणि विमानतळ यांमध्यें कांहीं तरी संबंध ठेवणें अवश्य झालें आहे. असा संबंध ठेवण्याकरितां रेडिओचा उपयोग करण्यांत येतो. या रेडिओपासून एक किरणशलाका वायुमार्गावर सोडण्यांत येते व तीवरून वैमानिकास विशिष्ट तऱ्हेच्या चिन्हांकित भाषेमुळें आपलें स्थान निश्चित करतां येतें किंवा त्यास तें विमानतळावरून कळवितां येतें व त्यास मार्गदर्शनहि करतां येतें. अशा तऱ्हेनें दीपगृहांतील प्रकाशशलाकेप्रमाणें तळावरून पाठविलेल्या किरणशलाकांमुळें दिशा दाखविल्या जातात. १९३८ मध्यें एका दिग्दर्शक यंत्राचा उपयोग करण्यांत येऊं लागला. याच्या साहाय्यानें रेडिओच्या ठिकाणांच्या दिशा कळूं लागल्या. त्याप्रमाणेंच या

किरणशलाकांच्या परिवर्तनाच्या साहाय्यानें वैमानिकास आपलें जमिनीपासूनचें अंतर कळूं लागलें.

वायुपर्यटणामध्यें एक विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्वयंप्रेरित अथवा चालकरहित नौका चालविण्याची विद्या ही होय. अशा तऱ्हेनें विमान चालविण्याची क्रिया दोन भ्रामक यंत्रांच्या (जायरोस्कोप) साहाय्यानें करतां येतें. एका यंत्रामुळें त्या विमानाच्या सुकाणूचें व लघुपक्षांचें नियंत्रण करतां येतें व दुसऱ्या यंत्राच्या साहाय्यानें त्याच्या उच्चालकांचें नियंत्रण होतें. जर एखादें विमान आपल्या मार्गापासून खालींवर किंवा बाजूस सरकलें तर या भ्रामक यंत्राच्या साहाय्यानें त्या विमानांतील विद्युद्गतियंत्रास गति देण्यांत येते व त्यास योग्य मार्गास लावण्यांत येतें. १९३३ सालीं विले पोस्ट नांवाच्या वैमानिकानें आठ दिवसांत पृथ्वीसभोंवतीं केलेल्या आपल्या उड्डाणामध्यें अशा तऱ्हेचा स्वयंप्रेरित सुकाणूगार बसविला होता. महासागरावरून अथवा मोठमोठ्या भूखंडांवरून उड्डाण करण्याच्या कामीं स्वयंप्रेरित सुकाणूगाराचा उपयोग मोठ्या प्रमाणावर करण्यांत येतो व अशा वेळीं तें विमान रेडिओपासून निघणाऱ्या भोंवतालच्या मार्गानें बरोबर मार्गास अनुसरून नेतां येतें व अवश्य तेथें उतरत्या झोताच्या साहाय्यानें जमिनीवर उतरवितांहि येतें.

**वायव्य सरहद्द प्रांत**—पाकिस्तान, एक प्रांत. हिंदुस्थानच्या वायव्य भागास हा अतिशय डोंगराळ मुलूख वसला आहे. अफगाणिस्तानच्या सरहद्दीला हा प्रांत भिडला आहे. वर हिंदुकुश आणि सुलेमान पर्वत व खालीं सिंधु नद यांमध्यें १३,५१८ चौ. मै. क्षेत्रफळाचा हा प्रांत आहे. लो. सं. (१९४१) ३०,३८,०००. शें. ९० लोक मुसलमान शेतकरी आहेत. या प्रदेशाचें हवामान म्हणजे अत्यंत उन्हाळा (१२०°) व अत्यंत थंडी (३०°) अशा प्रकारचें आहे. पाऊस जेमतेम १५ इंचांपर्यंत पडतो. मुख्य पिकें म्हणजे गहूं, बार्ली, मका व बाजरी हीं होत. डाळिंबें, द्राक्षें व सफरचंदें हीं फळें विपुल होतात. आगगाडी कांहीं थोड्या भागांतून जाते. उंट आणि मोटारी हींच मुख्य वाहतुकीचीं साधनें आहेत. लोकांची भाषा पुश्तु आहे. लोकांमध्यें अनेक रानवट जाती आहेत. व त्यांना सुधारण्याचें काम फार कठिण आहे. या प्रांतांतलें मोठें शहर म्हणजे पेशावर होय. या प्रांताचें लष्करी दृष्ट्या फार महत्त्व आहे; कारण बाहेरचे खुष्कीचे मार्ग यांतूनच आहेत. यामुळें हा प्रांत लढायांसाठीं सारखा सुसज्ज ठेवावा लागतो.

पेशावरला पूर्वी गांधार देश म्हणत. इतिहासकालांत ग्रीक लोक या भागांत आले. नंतर कुशानांच्या स्वाऱ्या झाल्या. त्यांना हूणांनीं जिंकलें. त्यापुढें मुसलमानांच्या स्वाऱ्या या प्रांतांवर झाल्या. मोंगल अमदानींत मराठे इकडे चालून आले होते. १९ व्या शतकांत प्रारंभीं शीखांचा अमल यावर होता. शेवटीं १८४९ त ब्रिटिशांच्या ताब्यांत हा आला. १९०१ सालीं हा प्रांत वेगळा करण्यांत आला. व १९३७ सालीं इतर प्रांतांप्रमाणें याला स्वायत्तता देण्यांत आली. १९४७ च्या राज्यक्रांतीनंतर हा प्रांत पाकिस्तान राज्यांत समाविष्ट झाला.

या प्रांताचें उत्पन्न १९४३-४४ सालीं दोन कोटी छप्पन्न लाख रुपये होतें. यांत १,०१५ मुलांच्या व २०८ मुलींच्या शिक्षणसंस्था आहेत. साक्षरता अगदीं कमी आहे.

**वायुकुंचली**—(एअर ब्रश). ही एक विशिष्ट प्रकारची कुंचली असून तिच्या योगानें निरनिराळ्या पृष्ठभागांस रंग, व्हॉर्निश, लाख, एनॅमल किंवा इतर प्रकारचीं संरक्षक द्रव्यें दाबलेल्या हवेच्या योगानें लावण्यांत येतात. दाबलेल्या हवेच्या योगानें द्रवपदार्थांचें तुषारांत रूपांतर करण्यांत येतें. ही गोष्ट बऱ्याच वर्षांपूर्वी लक्षांत आली होती. परंतु गेल्या सुमारें ३० वर्षांपासूनच या कल्पनेचा उपयोग प्रत्यक्ष करण्यांत येऊं लागला व हवेच्या दाबाच्या कुंचल्या तयार करण्यांत येऊं लागल्या. प्रथम अशा दाबांच्या कुंचल्यांचा उपयोग छायाचित्रांतील विशेष कौशल्याचें काम किंवा वर्तमानपत्रांतील किंवा इतर जाहिराती वगैरे चित्रांवरील सूक्ष्म काम करण्याकरितां करण्यांत येऊं लागला. पुढें पुढें या कुंचल्यांचा उपयोग मोठ्या प्रमाणांत करण्यांत येऊं लागला व अलीकडे तर मोठमोठ्या रंगविण्याच्या कामीं अशा दाब-कुंचल्यांचा उपयोग करण्यांत येऊं लागला असून ते यंत्राच्या साहाय्यानें चालविण्यांत येऊन मोठालीं घरें अथवा पूल यांस रंग देण्याच्या कामीं याचा उपयोग होतो.

**वायुगतिशास्त्र**—(एअरो-डायनॅमिक्स). पदार्थविज्ञानशास्त्रामध्यें गतिशास्त्राची ही एक शाखा आहे. यामध्यें वायूंची गति आणि प्रेरणा यांचा विचार करण्यांत येतो. सामान्य व्यवहारामध्यें या शास्त्राचा उपयोग विमानें व आकाशयानें यांची रचना व त्यांचें उड्डाण यांच्या बाबतींत जीं यांत्रिक तत्त्वें लागू होतात त्यांचा विचार विशेषतः करण्यांत येतो. उदाहरणार्थ, विमानामध्यें एक वायुनलिका (विंड टनेल) बसविण्यांत येते. ही बसविण्याची कल्पना या शास्त्राच्या अभ्यासामुळें निघाली. या नलिकेमुळें विमानाच्या पंखांस व पुच्छास जो हवेकडून प्रतिबंध होतो त्याचा प्रतिकार करतां येतो. व अशा तऱ्हेच्या प्रतिकाराचा अभ्यास या शाखेमार्फत करण्यांत येतो.

**वायुचलित नौका**—(रोटोर शिप). हें गलबत हर अँटोन फ्लेटनर यानें प्रथम प्रचारांत आणलें. हें वाऱ्याच्या साहाय्यानें चालविण्यांत येतें. या गलबतावर दोन धातूंचीं उंच पंचपात्रें बसविण्यांत आलेलीं असतात व त्यांस विजेच्या साहाय्यानें दर मिनिटास १०० फेरे फिरतील इतकी गति देण्यांत येते. याचा

परिणाम असा होतो कीं, या दोन पंचपात्रांवर वाहणाऱ्या वाऱ्याच्या शक्तीचें दोन प्रेरणाशक्तींमध्यें पृथक्करण होतें. त्यांपैकीं एकाची दिशा वाऱ्याच्या दिशेच्या काटकोनामध्यें असते, आणि या प्रेरणांशापासून जहाजास गति मिळते. 'बको' नांवाच्या एका गलबतानें या पद्धतीनें उत्तर समुद्रांत एल्मपासून पर्थपर्यंतचा प्रवास ७० तासांत केला. वाफेनें चालणाऱ्या गलबतास हें अंतर जाण्यास ५० तास लागतात.

**वायुद्रवीकरण**—( लिक्वीफॅक्शन ऑफ गॅसेस ). स. १८२३ पर्यंत कोणत्याहि वायूस द्रवरूप देण्यांत आलेलें नव्हतें. या वर्षी मायकेल फॅरडे यानें हर म्हणजे क्लोरिन वायूस प्रथम द्रवरूपांत आणलें. यानंतर फॅरडे यानें गंधकयुक्त उज्जवायु, कर्बाम्लवायु, नत्रस अम्लवायु, श्यामजन ( सायनोझेम ), अमोनिया, उज्जहरिकाम्ल आणि कांहीं इतर वायूंस द्रवरूपांत आणलें. थ्लिरोरिअर यानें १८३५ मध्यें द्रव कर्बाम्लवायु तयार केला. यानंतर याच वायूस घनस्वरूपहि देण्यांत आलें. प्राणवायूस द्रवरूप देण्याच्या कामीं येणाऱ्या अडचणींचें स्पष्टीकरण अँड्र्यूज यानें प्रथम देऊन एक महत्त्वाचा शोध लावला कीं, प्रत्येक वायूच्या बाबतींत एक स्थित्यंतरदर्शक ( क्रिटिकल ) उष्णमान असतें. त्या उष्णमानापेक्षां अधिक उष्णमान असतां त्या वायूवर कितीहि दाब घातला तरी त्याचें सांद्रीकरण होऊं शकत नाहीं. अखेरीस पिक्टेट आणि कॅलेटेट यांनीं प्राणवायूस द्रवरूपांत आणलें. क्रॅको येथें रोव्ल्यूस्की आणि ओलझेवस्की यांनीं नत्रवायूस द्रवरूप दिलें; व १८८५ मध्यें रोव्ल्यूस्की यानें प्रथम हवेस द्रवस्थितींत आणलें. डेव्ही आणि फॅरडे यांच्यानंतर रॉयल इन्स्टिटय़ूशनमध्यें अधिकारी झालेला सर जेम्स देवार यानें एक असें यंत्र तयार केलें कीं, वायूस सांद्ररूप देऊन जे द्रव तयार होतात ते काढून घेतां यावे. सर जेम्स देवार यानें १८९८ मध्यें उज्जवायूस प्रथम द्रवरूपांत आणलें, व त्याच्या पुढील वर्षी त्यास घनरूप दिलें. डॉक्टर एच्. कॅमेरलींथ ओनेस यानें हेलियम या वायूस १९०८ जुलैमध्यें द्रवरूप दिलें. याचा उत्क्वथनांक अथवा उकळण्याचा बिंदु ४° शत. हा असून त्याचें स्थित्यंतरदर्शक उष्णमान मूल शून्यांश ५° शत. हें आहे. इतकें नीच उष्णमान साध्य करून जवळजवळ मूल शून्यांशाची मजल गांठण्यांत आली आहे.

संशोधनामध्यें द्रवरूप स्थितींत असलेले वायू फार महत्त्वाचे असतात, असें दिसून आलेलें आहे. उद्योगधंद्यांमध्यें त्यांचा उपयोग फार मर्यादित आहे. त्यांपासून मिळणारी शीतता ही व्यवहारांत लागणाऱ्या शीततेपेक्षां फारच मोठ्या प्रमाणांत असते. व सामान्य उपयोगाकरितां सहज सांद्र होणारे वायू वापरण्यांत येतात. द्रवरूप स्थितींतील हवेचा मुख्य उपयोग वातावरणाचें आंशिक ऊर्ध्वपातन करून त्यापासून प्राणवायु मिळण्याच्या कामीं महत्त्वाचा आहे.

**वायुनलिका-प्रेपण**—( न्युमॅटिक डिस्पॅच ). कागद, नाणीं, किंवा इतर लहान वस्तू एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पाठवावयाच्या असतां नळ्यांची योजना केलेली असते. तीस वायुनलिका-प्रेषण म्हणतात. यामध्यें या वस्तू नेण्या-आणण्याचें कार्य दर स्क्वेअर इंचास १० पौंडप्रमाणें दाब असणाऱ्या हवेकडून किंवा दर स्क्वेअर इंचास ६॥ पौंड दाब असणाऱ्या निर्वात केलेल्या नळ्यांकडून करून घेण्यांत येतें. या नळ्या शिशाच्या केलेल्या असतात व त्यांवर लोखंडी नळ्यांचें आवरण असतें. या नळ्यांतून पाठवावयाची वस्तु सुमारें ६ इंच लांबीच्या नमद्याचें आच्छादन असलेल्या गटापरचाच्या नळकांड्यांतून पाठविण्यांत येते. याची गति दर ताशीं २० पासून ३० मैलांपर्यंत असते, व अशा नळ्यांची लांबी सामान्यतः एक मैलावर नसते. पोस्टांतून स्टेशनवर टपाल पाठविण्यासाठीं किंवा मोठाल्या दुकानांतून कौन्टरवरून खजिनदाराकडे पैसे पाठविण्यासाठीं या पद्धतीचा अवलंब करण्यांत येतो.

**वायुनिष्कासक**—( एअर पंप—हवा काढून टाकणारा पंप ). इतर सर्व प्रकारच्या पंपांप्रमाणेंच हा पंप असतो. ज्याप्रमाणें इतर पंपांसाठीं एखाद्या पंचपात्रामध्यें दट्ट्या ( पिस्टन ) पुढें गेल्यामुळें जी पोकळी तयार होते त्या पोकळीचा हवा किंवा इतर वायू ओढून घेण्याकडे उपयोग केला जातो. ज्या कामासाठीं या पंपाचा उपयोग केला असेल त्याचें नांव त्या पंपाला देण्यांत येतें. हवा काढून घेण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या पंपास वायुनिष्कासक ( एअर पंप ) म्हणतात. हाच पंप पोकळी उत्पन्न करण्यास वापरला तर निर्वातकर्षक ( व्हॅक्यूम पंप ) असें त्यास म्हणतात. याच पंपाला त्यामध्यें आंत ओढलेली हवा अगर वायु दाबून बाहेर पडण्याची व्यवस्था केली असल्यास संपीडक ( प्रेशर पंप किंवा कॉम्प्रेसर ) असें म्हणतात.

**वायुनौका**—हवाई जहाज पाहा.

**वायुपुराण**—अठरा पुराणांपैकीं एक. यांत वायूनें श्वेतकल्पाविषयीं कर्तव्यकर्में सांगितलीं आहेत. रुद्राचें माहात्म्य यांत दिले आहे. वायुपुराण हेंच शिवपुराण असावें किंवा शिवपुराण हें वायुपुराणाचा भाग असावा असें वाटतें. या पुराणाची श्लोकसंख्या २४ हजार आहे. या पुराणाचे चार भाग किंवा 'पाद' आहेत, त्यांचीं नांवें अनुक्रमें प्रक्रिया, उपोद्घात, अनुषंग आणि उपसंहार अशीं आहेत.

**वायुपूरक**—(ब्लोइंग मशिन). अनेक ठिकाणीं निरनिराळ्या भट्ट्यांमधून जळण चांगलें जळण्यासाठीं पुरेशी हवा कांहीं तरी बाहेरील साधनानें द्यावी लागतें. यापैकीं अगदीं साधी तऱ्हा

म्हणजे लोहाराचा भाता. हा लहान असल्यामुळेच हातांनीं चालवितां येतो. परंतु लोखंड, तांबें, पितळ, वगैरे वितळविण्याच्या भट्ट्या मोठ्या असल्यानें त्यांना मोठ्या प्रमाणावर हवा द्यावी लागते. यासाठीं जो 'प्रेशर ब्लोअर' किंवा 'कॉंप्रेसर' वापरतात त्याला वायुपूरक (ब्लोइंग मशिन) असें म्हणतात. विशेषतः खनिज धातूपासून लोखंड तयार करीत असतांना त्या धातूचें व व कोळशाचें मिश्रण चांगलें जळण्यासासाठीं बऱ्याच दाबाची फार मोठ्या प्रमाणांत हवा द्यावी लागते. त्यासाठीं हे मोठे भाते (ब्लोअर) किंवा 'कॉंप्रेसर' असतात. त्यांना व ते चालविणारें एंजिन किंवा विजेची मोटार या सर्वांना 'ब्लोइंग एंजिन' असें म्हणतात.

**वायुप्रकाशलेखन**—(एरियल फोटोग्राफी). दुसऱ्या महायुद्धामध्यें जेव्हां निरनिराळ्या प्रदेशांचे नकाशे काढण्याकरितां हवेंतून घेतलेल्या छायाचित्रांचें महत्त्व दिसून येऊं लागलें, तेव्हां वायुप्रकाशनाच्या क्रियेस बरीच चालना मिळाली. तेव्हांपासून भूनिरीक्षण आणि भूपृष्ठचित्रण या कामीं वायुप्रकाशलेखनाचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येऊं लागला आहे. या साधनाचा उपयोग झाडांची वाढ मोजण्याच्या कामीं, तसेंच पुराणवस्तूंचें स्थान निश्चित करण्याच्या कामीं, नगररचनेच्या कामांत, आणि समुद्रांतील माशांचे, विशेषतः सील माशांचे थवे शोधून काढण्याच्या कामीं बराच उपयोग करण्यांत येतो. अलीकडे या प्रकाशलेखक अथवा छायालेखक पेटिका अशा तऱ्हेनें तयार करण्यांत येतात कीं, त्यामुळें एका छायालेखक पट्टीवर पुष्कळ विस्तृत क्षेत्राचें चित्र काढून घेतां येतें. दुसऱ्या महायुद्धांत वायुप्रकाशलेखनाची विद्या फार मोठ्या प्रमाणांत वाढीस लागली. अतिशय वेगानें चालणाऱ्या विमानांतून व अत्यंत थोड्या अंतरावरून विस्तृत क्षेत्रांचें छायाचित्र घेणें शक्य झालें. लढाऊ विमानास भर वेगानें जात असतांहि कॅमेरे जोडून शत्रूच्या देशांतील विस्तृत भूप्रदेशांचीं चित्रें सहज व थोड्या वेळांत काढून घेतां येऊं लागलीं.

**वायुभारमापक यंत्र**—(बॅरोमीटर). वातावरणाचें वजन किंवा त्याचा दाब मोजून हवेंतील फेरफार निश्चित करणें, पर्वतांची उंची काढणें, वगैरे बाबींत हें उपयोगी पडतें. टॉरसेली नांवाच्या एका इटालियन शास्त्रज्ञानें सतराव्या शतकाच्या मध्यकालीं पुढील प्रयोग केला. त्यानें सुमारें ३ फूट उंचीची कांचेची नळी एका टोंकाला बंद व दुसऱ्या टोंकाला उघडी अशी पाऱ्यानें भरली व ती पाऱ्याच्या पेल्यामध्यें उपडी केली. थोडा पारा पेल्यांत आला व सुमारें ३० इंच पाऱ्याचा स्तंभ उभ्या नळींत राहिला. यावरून त्यानें असें अनुमान केलें कीं, पेल्यांतील पाऱ्याच्या पृष्ठभागावर असलेल्या हवेच्या दाबामुळें नळींतील ३० इंच उंचीचा पाऱ्याचा स्तंभ तोलला गेला. याचा अर्थ असा कीं, पेल्यांतील पाऱ्याच्या सपाटीपासून वातावरणाच्या शिखरापर्यंत जो हवेचा स्तंभ आहे त्याचें वजन तेवढ्याच क्षेत्रावर उभ्या असलेल्या ३० इंच उंचीच्या पाऱ्याच्या वजनाइतकेंच आहे. १८४५ मध्यें पास्कलनें हें अनुमान पडताळून पाहिलें. पुढें ६ वर्षांनीं पेरिअरनें हवेमध्यें फेरफार झाले म्हणजे पाऱ्याची यंत्रांतील उंची बदलते असें दाखविलें आणि १८५५ मध्यें बॉइलनें पर्वताची उंची काढण्यासाठीं वायुभारमापक यंत्र उपयोगी पडलें असें सुचविलें.

वायुभारमापक [पारा कातडी पिशवींत असून ती अ या तबकडीवर आहे. ही तबकडी ब या स्क्रू बोल्टच्या शेवटीं असते. क ही हस्तिदंती टांचणी यंत्राच्या चौकटीवर घट्ट बसविली आहे व ती परिमाणांतील शून्य बिंदु दाखविते. मापन करण्यापूर्वी ही टांचणी पाऱ्याच्या पृष्ठभागाला लावून ठेवतात. पाऱ्याच्या वरील पृष्ठभागाचें मापन ड या व्हर्निअरनें करतात. हा व्हर्निअर इ या लहान दांतांच्या चाकामुळें सरकतो.]

सर्वसाधारण वा० यंत्रांत एक ३२ इंच उंचीच्या व १½ इंच व्यासाच्या नळीचें वरचें टोंक वायु जाऊं नये असें पक्कें बंद करतात व खालचें उघडें टोंक पाऱ्याच्या पेल्यामध्यें सोडलेलें असतें. नळी प्रथम शुद्ध पाऱ्यानें भरून नंतर पाऱ्याच्या पेल्यामध्यें उपडी करतात. पाऱ्याची उंची मोजण्याकरितां एक मापनपट्टी नळीला जोडतात. पाऱ्याची उंची बहुशः ३३ इंचांपेक्षां जास्त होत नाहीं व २८ इंचांपेक्षां कमी होत नाहीं. माप बिनचूक येण्याकरितां फॉटिननें एक साधन सुचविलें आहे. त्यामुळें पाऱ्याचा पृष्ठभाग मापनपट्टीवरील एका ठराविक खुणेशीं आणतां येतो. २८ इंच पाऱ्याची उंची असली म्हणजे वादळ होतें; व उंची २८½ किंवा २९ झाली कीं बर्फ अथवा पाऊस पडतो. २९½ उंची झाली कीं हवामान अनिश्चित समजावें. ३० इंच उंची निरभ्र आकाश किंवा हिमग्रस्तता (फ्रॉस्ट) व ३०½ इंच उंचीला निश्चित निरभ्रता अथवा हिमग्रस्तता

दर्शवितेः ३१ इंच उंचीच्या वेळीं कोरडी हवा किंवा दाट हिम पडलेलें असतें. अर्थात् हीं अनुमानें इंग्लंडमधील आहेत.

वक्रनलिका (सायफन) वायुभारमापक—यामध्यें वांकविलेल्या नळीचा एक मोठा भाग टोंकाला बंद व दुसरा छोटा टोंकाशीं उघडा असतो. नळीचा व्यास साधारणपणें सर्व ठिकाणीं सारखाच असतो. मोठ्या भागावर खालून वरपर्यंत वाढणारीं मापें देणारी पट्टी असते. व छोट्या भागावर वरून खालीं वाढणारीं मापें असलेली पट्टी असते. पट्ट्यांनें शून्य माप मध्यें एकाच ठिकाणीं असतें. पाऱ्याच्या दोन भागांतील पातळींतील अंतर ह्या दोन मापांची बेरीज करून मिळतें.

चक्र(व्हील)वायुभारमापक—हें घरगुती उपयोगाकरितां वापरतात. हें बिनचूक वायुभार दर्शवीत नाहीं, पण त्यावरील मापनपट्टी विस्तृत असल्यामुळें हें यंत्र पसंत करतात.

पर्वत( माउंटन )वायुभारमापक यंत्र—प्रवासाला योग्य व तिवईवर बसविलेलें, विस्तृत मापनपट्टीवर पर्वताच्या उंचीचे आंकडे असलेलें पाऱ्याचेंच बनविलेलें असतें.

ॲनेरॉइड वायुभारमापक यंत्र—यांत प्रवाही पारा वापरीत नाहींत. यांत सपाट वर्तुलाकार निर्वात डब्यावरचें पृष्ठ हवेच्या दाबाला परिणामकारक लवचिक असें असतें. व तळ धातूच्या चुणीदार कॅरोगेटेड पत्र्याचा असतो. स्प्रिंग व लिव्हर यांच्या कुशल व्यवस्थेनें हवेच्या दाबामुळें डब्याचा पृष्ठभाग खालींवर होतो व तो एक माप तबकडी व कांटा यांच्या साहाय्यानें दाखविला जातो. हा परिणाम मोठा करून दुसऱ्या यंत्राप्रमाणें इंचांत दाखवितात. पण हें यंत्र पाऱ्याच्या यंत्राइतकें विश्वसनीय नाहीं.

**वायुमिश्रित जलें**—( एरेटेड वॉटर्स ). पाण्यांत कर्बाम्लवायु ( कॅर्बोनिक ॲसिड गॅस ) विरघळवून तयार केलेलीं पेयें. हीं पेयें तयार करून बाटल्यांत भरल्यावर त्यांत त्या वायूचा दाब नेहमींच्या हवामानापेक्षां पांचपट असतो. त्यामुळें बाटली फोडून पेय पेल्यांत भरतांना त्यांतून वायु बाहेर येतांना पेयांत फेंस तयार होतो. कांहीं नैसर्गिक पाण्यांत (उदा., व्हिशी, अपोपिनेटीस, रोरुबाक, वगैरे) हा वायु आढळून येतो; त्यामुळें तें पाणी औषधी उपचारासाठीं तसेंच वापरण्यांत येतें.

द्रवपदार्थाप्रमाणें घनरूप अन्नपदार्थांतहि कर्बाम्लवायु सोडतात. पाव करतांना यीस्ट जो घालतात त्याऐवजीं हा वायु उपयोगी पडतो.

**वायुवाद्यें**—वायुवाद्यामध्यें ज्या प्रकारानें मनुष्य आपल्या ओठांतून हवा फुंकतो त्याप्रमाणें या वाद्यांचे निरनिराळे तीन वर्ग पडतात : (१) बांसरी. या वर्गांतील वाद्यें एका नळीचीं बनविलेलीं असून त्या नळीला छिद्रें पाडलेलीं असतात. या छिद्रांवरील बोटें उचलून किंवा अन्य प्रकारानें तीं उघडण्यांत येतात व तीं उघडतील त्याप्रमाणें या वाद्यांतील हवेच्या स्तंभाची लांबी कमी-जास्त होते. (२) जिभलीचीं वाद्यें–यांचे चार निरनिराळे वर्ग असतात. या जिभा वाजविणाऱ्याच्या ओठाच्या गतीप्रमाणें कंपन पावत असतात. (३) पितळी वाद्यें–यांमध्यें नळीची लांबी महत्त्वाची असते. नळी आंखूड असल्यास खालचे ध्वनी व लांब असल्यास वरचे ध्वनी निघतात. वृंदसंगीतांतील वाद्यांचा क्रम वरून पुढें दिल्याप्रमाणें असतो : पिकोलो, फ्ल्यूट, ओबोए, कोर आंग्ले, क्लॅरिनेट, बासून, डबल बासून, हॉर्न, ट्रम्पेट, ट्रॉमबोन, ट्युबा.

**वायुविद्या**—( न्युमॅटिक्स ). पदार्थविज्ञानशास्त्राच्या ज्या शाखेमध्यें स्थितिस्थापक वायूंचे यांत्रिक गुणधर्म व विशेषतः वातावरणांतील हवेचे गुणधर्म यांचा विचार केला जातो त्यास यांत्रिक वायुविद्या म्हणतात. हवेचें वजन, दार्ढ्य, दाब, समतोलपणा व स्थितिस्थापकता, तसेंच हवेची गति व विरोध यांविषयीं या शास्त्रात विवेचन असतें. हवेचा दाब व स्थितिस्थापकता यांवर परिणाम करणाऱ्या यंत्राची रचना व त्यांतील तत्त्वें यांचाहि विचार हें शास्त्र करतें.

**वायुविमान**—( बलून ). ज्यामधून हवेंत किंवा आकाशांत वर उंच जातां येतें परंतु ज्याला वाटेल तशी गति देतां येत नाहीं अशा प्राथमिक अवस्थेंतील विमानास वायुविमान किंवा फुग्याचें विमान म्हणतात. या विमानात वायु भरलेला असल्यामुळें तें हवेंत तरंगूं शकतें. याचा आकार चेंडूसारखा वाटोळा असतो. यामध्यें बहुधा कोळशाचा धूर ( कोलगॅस ) भरण्यांत येतो. त्याची वजन उचलण्याची शक्ति १००० घन फुटांस ३५ पौंड इतकी असते. या विमानाची खोळ अथवा पिशवी ५ हजार ते २० हजार घनफूट मापाची असून तिच्यावर एक जाळें बसविलेलें असतें व त्याला एक टोपली जोडलेली असते. तींत वैमानिक व उतारू बसतात. या वाटोळ्या पिशवीस खालच्या बाजूस थोडा निमुळता भाग असतो त्यास 'गळा' म्हणतात. त्याचें तोंड उघडें असतें. त्यामुळें जसजसें विमान उंच जाऊन विरल हवेंत उडतें तसतसा आंतील वायु थोडा थोडा बाहेर जाऊं शकतो. खोळीच्या वरच्या बाजूस एक पडदा असतो. त्यांतून जेव्हां खालीं यावयाचें असेल तेव्हां वायु सोडून देण्यांत येतो. या तऱ्हेचीं विमानें बहुधा कापसाच्या कापडाचीं केलेलीं असतात. परंतु कधीं कधीं तीं बैलाच्या आंतड्याचींहि तयार करतात व तशीं असल्यास तीं कोळशाच्या धुराऐवजीं उज्जवायूनें ( हायड्रोजननें ) भरण्यांत येतात. या विमानाच्या साहाय्यानें सप्टेंबर १८६२ मध्यें ग्लेशेर आणि कॉक्सवेल यांनीं सर्वांत उंच म्हणजे ३७ हजार फूट उड्डाण केलें होतें. १८९५ मध्यें प्रशिअन सैन्यांतील पार्सिव्हल आणि सिजफील्ड या दोन

पुढील पदार्थ निरनिराळ्या प्रमाणांत असतात : उज्ज ४८·४९; मार्श गॅस किंवा मेथेन ३५·९०; जळणारे उज्जकर्ब ३·८३; कर्ब एकप्राणिद ६६·६१; कर्ब द्विप्राणिद ०·१२; नत्र ५·०५. जेव्हां या वायूमध्यें १ : ५ ते १५ या प्रमाणांत हवा मिसळली जाते तेव्हां तो स्फोटक होतो. जर हवेचें प्रमाण पांचापेक्षां कमी असेल तर तो वायु स्फोट न होतां जळूं लागतो. हवेचें प्रमाण पंधरापेक्षां अधिक झाल्यास तो वायु क्षीण होऊन जळत नाहीं व त्याचा स्फोटहि होत नाहीं. जळणाऱ्या वायूचे आणि कोळशाच्या उर्ध्वपातनाचे प्रयोग प्रथम फॉं हेल्मॉट, बॉयूइल, थॉमस शर्ले, जॉन क्लेटन, डी जेन्सेन आणि मुर्डॉक यांनीं केले. यांपैकीं मुर्डॉक यानें १७९२ मध्यें आपल्या घरांत धुराचे दिवे लावले. यानंतर त्यानें बर्मिंगहॅम येथील आपल्या कारखान्यांत दिवे लावण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर धुराचा कारखाना काढला. १८०२ मध्यें लेबॉं यानें पॅरिसमध्यें आपल्या घरांत लांकडापासून निघणाऱ्या धुराचे दिवे लावले. शहरांतील रस्त्यांतून दिवे लावण्याचा उपक्रम प्रथम विनसर यानें केला व त्यानें १८१२ मध्यें लंडन शहरांत कांहीं रस्त्यांतून धुराचे दिवे लावले. १८१५ मध्यें सॅम्युअल क्ले यानें या दिव्यांच्या धुराचें मापन करण्यासाठीं धूम्रमापक यंत्र तयार केलें. १८८५ मध्यें फॉं वेल्सबाश या ऑस्ट्रियन गृहस्थानें दीप्तिमान धुराच्या टोपीचा शोध लावल्यामुळें धुराच्या दिव्यांत मोठीच क्रांति घडून आली.

पहिल्या प्रथम धुराचा उपयोग केवळ प्रकाश देण्याच्या कामीं करण्यांत येत असे. परंतु गेल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास धुराचा उपयोग उष्णता उत्पन्न करण्याच्या कामींहि करण्यात येऊं लागला. दीप्तिमान धुराच्या टोपीमुळें धुरापासून उष्णता मिळणाऱ्या शक्तीचें महत्त्व फार वाढलें आहे.

धूर तयार करण्याची कृति—धुराच्या कारखान्यामध्यें प्रथम दगडी कोळसा आगभट्टीच्या पात्रामध्यें ठेवण्यांत येतो. हीं भांडीं एकत्र ठेवण्यांत येऊन भट्टीमध्यें तापविण्यांत येतात. कोळशापासून निघणाऱ्या पहिल्या धुरामध्यें पाण्याच्या व डांबराच्या वाफा असतात. त्या वेगळ्या काढाव्या लागतात आणि धूर शुद्ध करून घ्यावा लागतो. तसेंच धुराशिवाय जे अन्नपदार्थ तयार होतात तेहि [illegible] असतात. उष्णता दिलेल्या एका टाक्यांत नेण्यांत येतें. यानंतर संचायकांतील धूर एका पंपाच्या साहाय्यानें एका दुसऱ्या पात्रांत नेण्यांत येतो. तेथें तो धुण्याची क्रिया होते. या ठिकाणीं पुन्हां त्यांतील अमोनिया शोषून घेतला जातो आणि उरलेली डांबरी वाफ पुन्हां खालीं जमते. यानंतर ह्या धुरावर एक घर्षणाची क्रिया करण्यांत येते व तीमध्यें राहिलेल्या सर्व अमोनियाचा अंश निघून जातो. यानंतर तो एका शोधक म्हणजे शुद्ध करणाऱ्या पत्रामध्यें नेण्यांत येतो. तेथें त्यांतील कर्बाम्ल व गंधकाचे संयुक्त पदार्थ काढून टाकण्यांत येतात व यानंतर तो अखेरीस एका पात्रांत भरून ठेवण्यांत येतो.

धूर तयार करण्याच्या कृतीमध्यें मिळणाऱ्या इतर पदार्थांमध्यें कोक हा प्रमुख असतो. दगडी कोळशाचें ऊर्ध्वपातन होऊन जो खालीं अवशेष राहतो त्यास कोक असें म्हणतात. दुसरा पदार्थ म्हटला म्हणजे डांबर हा होय. याचें ऊर्ध्वपातन केलें असतां अनेक पदार्थ प्राप्त होतात. तिसरा पदार्थ म्हणजे अमोनिया जल होय. यामध्यें गंधकाम्ल मिळविलें असता अमोनियम सल्फेट हें मौल्यवान् खत मिळतें. दुसरा एक पदार्थ सायनोजन या नांवाचा द्रव असून त्यापासून प्रुसिक अम्ल मिळतें. तसेंच 'प्राशियन ब्लू' नांवाचा मौल्यवान् रंगहि प्राप्त होतो.

**वार**—(प्लासेंटा). गर्भाशयामध्यें गर्भाची वाढ व पोषण होण्याकरितां मातेच्या शरीरांतून त्यास रक्ताचा पुरवठा व्हावा म्हणून गर्भाशयाच्या आंतील बाजूस जें एक अंतस्त्वचामय आवरण असतें त्यास वार असें म्हणतात. ही वार उंच दर्जाच्या सस्तन प्राण्यामध्यें आढळते. गर्भावस्थेच्या अखेरीस मनुष्यप्राण्याच्या शरीरांतील वार वाटोळी असून तिचा व्यास ७॥ इंच, जाडी पाऊण इंच, आणि वजन वीस औंस असतें. गर्भावस्था पूर्ण होऊन मुलाचा जन्म झाल्यानंतर ही वार बाहेर पडते. गर्भावस्थेंत हिचा दाह झाल्यास गर्भपात होण्याचा संभव असतो.

**वारकरी पंथ**—एक वैदिक धर्मान्तर्गत पंथ. पंढरपूरच्या श्रीपांडुरंगाच्या दर्शनास नियमानें जाणारा म्हणजे वर्षांतून दोनदां (आषाढ शु॥ ११ व कार्तिक शु॥ ११) किंवा त्याहून जास्त वेळां, गळ्यांत तुळशीची माळ घालून वारी करणारा इसम तो वारी–करी ऊर्फ वारकरी, असा या शब्दाचा विग्रह आहे. "कायावाचामनें जीवें सर्वस्वें उदार। बापरखुमादेवीवरा विठ्ठलाचा वारीकर॥"–ज्ञानदेव. या पंथास माळकरी पंथ किंवा भागवतधर्म असेंहि म्हणतात. या पंथाचें उपास्य दैवत श्रीपांडुरंग हें श्रीकृष्णाचें बाळरूप आहे; म्हणून पंढरपुरास दक्षिण द्वारका असेंहि म्हणतात. वारकरी पंथ जरी भक्तिप्रधान

असला तरी अद्वैतमताचा पुरस्कर्ता आहे. शंकराचार्यांनीं खंडन केलेला रामानुजीय भागवतधर्म द्वैतवादी असून तो वारकरी भागवतधर्माहून भिन्न आहे. तुळशीच्या मण्यांची माळ गळ्यांत घातल्याशिवाय वारकरी होऊंच शकत नाहीं, इतकें महत्त्व तुळशीच्या माळेला या पंथांत आहे. श्रीकृष्णाच्या लीला वर्णन करणारा व्यासकृत द्वादशस्कंदी भागवतग्रंथ व एकनाथ-महाराजकृत 'नाथभागवत' हे वारकरी पंथाचे पूज्य ग्रंथ आहेत. "गीताभागवत करिती श्रवण अखंड चिंतन विठोबाचें॥" (श्रीतुकाराम). या पंथाचा आरंभ केव्हां झाला तें निश्चित सांगतां येत नाहीं. "युगें अठावीस विटेवरी उभा।...... पुंडलिकाचे भेटीं परब्रह्म आलें गा॥" यावरून पुंडलिकाकरितां देव पंढरीस आले. यावरून पुंडलिकाचा कालनिर्णय या पंथाच्या उगमाचा काल होय, हें निश्चित आहे. पुंडलीक हा ब्राह्मण होता; तो काशीस जात असतां कुक्कुट स्वामीच्या आश्रमांत त्यास गंगा-यमुना नद्यांचें दर्शन झालें, व तेथून पश्चात्ताप पावून तो मातृपितृभक्त बनला या त्याच्या मातृपितृसेवेनें संतुष्ट होऊन देव त्याजकरितां आले असतां त्यानें त्यांस आसन म्हणून एक वीट मागें भिरकावली व तीवर देव उभे राहिले, ही कथा प्रसिद्ध आहे. पण पुंडलिकाचा काल अनिश्चितच आहे. "माझे जिवीची आवडी। पंढरपुरा नेईन गुढी॥"-ज्ञानेश्वर. "उंच पताका झळकती। टाळ-मृदंग वाजती॥ आनंदें प्रेमें गर्जती। भद्रजाती विठ्ठलाचे॥" (कित्ता); "आषाढी कार्तिकी विसरूं नका मज। सांगतसे गूज पांडुरंग॥" (नामदेव). ज्ञानदेव व नामदेव यांच्या अशा अनेक अभंगांवरून या दोन संतांच्या पूर्वीपासून पंढरपुरास जाणारा वारकरी पंथ चालू झाला होता असें दिसतें. आणि ज्ञानदेव (शके ११९७) याचा काल निश्चित असल्यामुळें वारकरी पंथ निदान एक हजार वर्षांपूर्वी उगम पावलेला आहे हें उघड होतें. नामदेव हा ऐंशीं वर्षें व ज्ञानदेवाच्या समाधीनंतर पन्नास वर्षें जगला; त्यामुळें या पंथाचें प्रसारकार्य त्याच्याकडून अधिक झालें; शिवाय इ. स. १२९६ मध्यें देवगिरीचें राज्य नष्ट होऊन महाराष्ट्रांत मुसलमानी अमल सुरू झाल्यामुळें नामदेवाला परधर्मांशीं साक्षात् तोंड देण्याचा प्रसंग आला व त्यामुळें त्याचें तेज विशेषत्वानें बाहेर चमकलें. इतकेंच नव्हे तर नरहरी (सोनार), सांवता (माळी), तुकाराम (वैश्य), गोरोबा (कुंभार), चोखामेळा (महार) रोहीदास, (चांभार), वगैरे अनेक संत निरनिराळ्या जातींत उत्पन्न होऊन वारकरी पंथांतला हा काल अनेक दृष्टींनीं अपूर्व झाला. एकनाथ व तुकाराम यांनीं कीर्तनभक्ति विशेष वाढविली. एकनाथ स्वतः रोज कीर्तन करीत असे. वारकरी कीर्तन हरिदासी कथेहून भिन्न असतें. वारकरी कीर्तनास निरूपण असें म्हणतात. एखाद्या साधु-संताचा वैराग्य-वेदान्त-भक्तिपर अभंग घेऊन त्याचा विचार श्रोतृसमुदायापुढें मांडावयाचा व मधून मधून भजन करावयाचें, अशी या कीर्तनाची पद्धत आहे. वारकरी पंथानें परकीय धर्मास तोंड देण्याकरितां हिंदु समाज सुसंघटित करण्याची फार महत्त्वाची कामगिरी केली आहे यांत शंकाच नाहीं.

वारकरी पंथांत चैतन्य, स्वरूप, आनंद व प्रकाश असे चार संप्रदाय आहेत.

(१) चैतन्यसंप्रदायात दोन भेद आहेत—(अ) षडक्षरी मंत्र,-'रामकृष्णहरी', व (आ) द्वादशाक्षरी मंत्र 'ॐ नमो भगवते वासुदेवाय'. पहिल्याची गुरुपरंपरा निळोबारायाच्या अभंगांत दिली आहे ती—महाविष्णु-ब्रह्म-श्रीहरि-नारद-व्यास-राघवचैतन्य-केशवचैतन्य-बाबाजी-तुकया (तुकाराम). व दुसऱ्याची गुरुपरंपरा-आदिनाथ-मच्छिंद्रनाथ-गोरक्षनाथ-गहिनीनाथ-निवृत्तिनाथ-ज्ञानदेव. ज्ञानदेवानें ज्ञानेश्वरीच्या शेवटीं हीच परंपरा दिली आहे. बहुतेक सर्व वारकरी चैतन्य-संप्रदायांतले 'रामकृष्णहरी' हा षडाक्षरी मंत्र म्हणणारे आहेत.

(२) स्वरूपसंप्रदायाचा त्रयोदशाक्षरी मंत्र 'श्रीराम जय राम जयजय राम' हा असून त्यांत (अ) रामानुजीय (कपाळावर तांबडी रेषा लावणारे) पंथाची परंपरा मल्हेरकर, सखारामबुवा, अमळनेरकर व भानुदासबोवा बेलापूरकर अशी आहे; आणि (आ) रामानंदी (पांढरी रेषा-बैरागी) संप्रदायांत रामदासी लोकांचा समावेश होतो.

(३) आनंदसंप्रदायाचा त्र्यक्षरी मंत्र 'श्रीराम' हा असून नारद, वाल्मीकि, रामानंद, कबीर, सेना न्हावी, वगैरे मंडळी या संप्रदायाची आहेत.

(४) प्रकाशसंप्रदायाचा मंत्र 'ॐ नमो नारायणाय' हा आहे. श्यवल ब्रह्म-आदिनारायण-ब्रह्म-अत्री-श्रीदत्तात्रय-सहस्रार्जुन-यदु-जनार्दन याप्रमाणें ही गुरुपरंपरा आहे.

पालख्यांचा सोहळा गेल्या २७५ वर्षांतला असून हैबतराव-बाबा आरफळकर यानें तो फार वाढवला. हल्लीं कर्नाटक-त्रिचनापल्ली ते वऱ्हाड-नागपूरपर्यंतचे वारकरी आषाढी-कार्तिकीला पंढरपुरास जातात. त्यांची संख्या आषाढीस तीन लाख व कार्तिकीस एक लाखापर्यंत असते. आषाढीस निर-निराळ्या ठिकाणांहून कांहीं पुढील पालख्या येतात—ज्ञानेश्वर (आळंदी), निवृत्तिनाथ (त्र्यंबकेश्वर), तुकाराम (देहू), एकनाथ (पैठण), सोपानकाका (सासवड), मुक्ताबाई (एदलाबाद), जनार्दनस्वामी (औरंगाबाद), मच्छिंद्रनाथ (मच्छिंद्रगड), जयरामस्वामी (वडगांव), दामाजी (मंगळवेढे), रुक्माबाई (कौंडणपूर-अमरावती), वगैरे.

पुढील पदार्थ निरनिराळ्या प्रमाणांत असतात : उज्ज ४८·४९; मार्श गॅस किंवा मेथेन ३५·९०; जळणारे उज्जकर्ब ३·८३; कर्ब एकप्राणिद ६६·६१; कर्ब द्विप्राणिद ०·१२; नत्र ५·०५. जेव्हां या वायूमध्यें १ : ५ ते १५ या प्रमाणांत हवा मिसळली जाते तेव्हां तो स्फोटक होतो. जर हवेचें प्रमाण पांचापेक्षां कमी असेल तर तो वायु स्फोट न होतां जळूं लागतो. हवेचें प्रमाण पंधरापेक्षां अधिक झाल्यास तो वायु क्षीण होऊन जळत नाहीं व त्याचा स्फोटहि होत नाहीं. जळणाऱ्या वायूचें आणि कोळशाच्या उर्ध्वपातनाचे प्रयोग प्रथम फॉं हेल्मॉट, बॉयूइल, थॉमस शर्ले, जॉन क्लेटन, डी जेन्सेन आणि मुर्डाक यानीं केले. यांपैकीं मुर्डाक यानें १७९२ मध्यें आपल्या घरांत धुराचे दिवे लावले. यानंतर त्यानें बर्मिंगहॅम येथील आपल्या कारखान्यांत दिवे लावण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर धुराचा कारखाना काढला. १८०२ मध्यें लेबॉं यानें पॅरिसमध्यें आपल्या घरांत लांकडापासून निघणाऱ्या धुराचे दिवे लावले. शहरांतील रस्त्यांतून दिवे लावण्याचा उपक्रम प्रथम विनसर यानें केला व त्यानें १८१२ मध्यें लंडन शहरांत कांहीं रस्त्यांतून धुराचे दिवे लावले. २८१५ मध्यें सॅम्युअल क्ले यानें या दिव्यांच्या धुराचें मापन करण्यासाठीं धूम्रमापक यंत्र तयार केलें. १८८५ मध्यें फॉं वेल्सबाश या ऑस्ट्रियन गृहस्थानें दीप्तिमान धुराच्या टोपीचा शोध लावल्यामुळें धुराच्या दिव्यांत मोठीच क्रांति घडून आली.

पहिल्या प्रथम धुराचा उपयोग केवळ प्रकाश देण्याच्या कामीं करण्यांत येत असे. परंतु गेल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास धुराचा उपयोग उष्णता उत्पन्न करण्याच्या कामींहि करण्यांत येऊं लागला. दीप्तिमान धुराच्या टोपीमुळें धुरापासून उष्णता मिळणाऱ्या शक्तीचें महत्त्व फार वाढलें आहे.

धूर तयार करण्याची कृति—धुराच्या कारखान्यामध्यें प्रथम दगडी कोळसा आगभट्टीच्या पात्रामध्यें ठेवण्यांत येतो. हीं भांडीं एकत्र ठेवण्यांत येऊन भट्टीमध्यें तापविण्यांत येतात. कोळशापासून निघणाऱ्या पहिल्या धुरामध्यें पाण्याच्या व डांबराच्या वाफा असतात. त्या वेगळ्या काढाव्या लागतात आणि धूर शुद्ध करून घ्यावा लागतो. तसेंच धुराशिवाय जे अन्नपदार्थ तयार होतात तेहि गोळा करावयाचे असतात. उष्णता दिलेल्या पात्रांतून निघणारा धूर प्रथम पाण्यांतून एका संचायकाकडे नेण्यांत येतो. त्या संचायकांत धुराचें उष्णमान कमी होतें. त्याबरोबर त्या धुरांतील पाण्याच्या वाफेचें पाणी होतें. पण तें अमोनियायुक्त असतें. हें पाणी धुरांतील गंधकित उज्ज आणि कर्बाम्ल शोपून घेतें. व याच वेळीं डांबराच्या वाफा थंड होऊन त्यांचें डांबर खालीं जमतें. अमोनियायुक्त पाणी जमिनीखालीं असलेल्या एका-टांकयांत नेण्यांत येतें, व पातळ डांबर दुसऱ्या एका टांक्यांत नेण्यांत येतें. यानंतर संचायकांतील धूर एका पंपाच्या साहाय्यानें एका दुसऱ्या पात्रांत नेण्यांत येतो. तेथें तो धुण्याची क्रिया होते. या ठिकाणीं पुन्हां त्यांतील अमोनिया शोपून घेतला जातो आणि उरलेली डांबरी वाफ पुन्हां खालीं जमते. यानंतर ह्या धुरावर एक घर्षणाची क्रिया करण्यांत येते व तीमध्यें राहिलेल्या सर्व अमोनियाचा अंश निघून जातो. यानंतर तो एका शोधक म्हणजे शुद्ध करणाऱ्या पात्रामध्यें नेण्यांत येतो. तेथें त्यांतील कर्बाम्ल व गंधकाचे संयुक्त पदार्थ काढून टाकण्यांत येतात व यानंतर तो अखेरीस एका पात्रांत भरून ठेवण्यांत येतो.

धूर तयार करण्याच्या कृतीमध्यें मिळणाऱ्या इतर पदार्थांमध्यें कोक हा प्रमुख असतो. दगडी कोळशाचें ऊर्ध्वपातन होऊन जो खालीं अवशेष राहतो त्यास कोक असें म्हणतात. दुसरा पदार्थ म्हटला म्हणजे डांबर हा होय. याचें ऊर्ध्वपातन केलें असतां अनेक पदार्थ प्राप्त होतात. तिसरा पदार्थ म्हणजे अमोनिया जल होय. यामध्यें गंधकाम्ल मिळविलें असतां अमोनियम सल्फेट हें मौल्यवान् खत मिळतें. दुसरा एक पदार्थ सायनोजन या नांवाचा द्रव असून त्यापासून प्रुसिक अम्ल मिळतें. तसेंच 'प्राशियन ब्लू' नांवाचा मौल्यवान् रंगहि प्राप्त होतो.

**वार**—(प्लासेंटा). गर्भाशयामध्यें गर्भाची वाढ व पोपण होण्याकरितां मातेच्या शरीरांतून त्यास रक्ताचा पुरवठा व्हावा म्हणून गर्भाशयाच्या आंतील बाजूस जें एक अंतस्त्वचामय आवरण असतें त्यास वार असें म्हणतात. ही वार उच्च दर्जाच्या स्तन प्राण्यामध्यें आढळते. गर्भावस्थेच्या अखेरीस मनुष्यप्राण्याच्या शरीरांतील वार वाटोळी असून तिचा व्यास ७॥ इंच, जाडी पाऊण इंच, आणि वजन वीस औंस असतें. गर्भावस्था पूर्ण होऊन मुलाचा जन्म झाल्यानंतर ही वार बाहेर पडते. गर्भावस्थेंत हिचा दाह झाल्यास गर्भपात होण्याचा संभव असतो.

**वारकरी पंथ**—एक वैदिक धर्मान्तर्गत पंथ. पंढरपूरच्या श्रीपांडुरंगाच्या दर्शनास नियमानें जाणारा म्हणजे वर्षांतून दोनदां (आषाढ शु॥ ११ व कार्तिक शु॥ ११) किंवा त्याहून जास्त वेळां, गळ्यांत तुळशीची माळ घालून वारी करणारा इसम तो वारी–करी ऊर्फ वारकरी, असा या शब्दाचा विग्रह आहे. "कायावाचामनें जीवें सर्वस्वें उदार। बापरखुमादेवीवरा विठ्ठलाचा वारीकर॥"–ज्ञानदेव. या पंथास माळकरी पंथ किंवा भागवतधर्म असेंहि म्हणतात. या पंथाचें उपास्य दैवत श्रीपांडुरंग हें श्रीकृष्णाचें बाळरूप आहे; म्हणून पंढरपुरास दक्षिण द्वारका असेंहि म्हणतात. वारकरी पंथ जरी भक्तिप्रधान

असला तरी अद्वैतमताचा पुरस्कर्ता आहे. शंकराचार्यांनीं खंडन केलेला रामानुजीय भागवतधर्म द्वैतवादी असून तो वारकरी भागवतधर्माहून भिन्न आहे. तुळशीच्या मण्यांची माळ गळ्यांत घातल्याशिवाय वारकरी होऊंच शकत नाहीं, इतकें महत्त्व तुळशीच्या माळेला या पंथांत आहे. श्रीकृष्णाच्या लीला वर्णन करणारा व्यासकृत द्वादशस्कंदी भागवतग्रंथ व एकनाथ-महाराजकृत 'नाथभागवत' हे वारकरी पंथाचे पूज्य ग्रंथ आहेत. "गीताभागवत करिती श्रवण अखंड चिंतन विठोबाचें॥" (श्रीतुकाराम). या पंथाचा आरंभ केव्हां झाला तें निश्चित सांगतां येत नाहीं. "युगें अठ्ठावीस विटेवरी उभा।...... पुंडलिकाचे भेटीं परब्रह्म आलें गा॥" यावरून पुंडलिकाकरितां देव पंढरीस आले. यावरून पुंडलिकाचा कालनिर्णय या पंथाच्या उगमाचा काल होय, हें निश्चित आहे. पुंडलीक हा ब्राह्मण होता; तो काशीस जात असतां कुक्कुट स्वामीच्या आश्रमांत त्यास गंगा-यमुना नद्यांचें दर्शन झालें, व तेथून पश्चात्ताप पावून तो मातृपितृभक्त बनला या त्याच्या मातृपितृसेवेनें संतुष्ट होऊन देव त्याजकरितां आले असतां त्यानें त्यांस आसन म्हणून एक वीट मागें भिरकावली व तीवर देव उभे राहिले, ही कथा प्रसिद्ध आहे. पण पुंडलिकाचा काल अनिश्चितच आहे. "माझे जिवीची आवडी। पंढरपुरा नेईन गुढी॥"–ज्ञानेश्वर. "उंच पताका झळकती। टाळ-मृदंग वाजती॥ आनंदें प्रेमें गर्जती। भद्रजाती विठ्ठलाचे॥" (कित्ता); "आषाढी कार्तिकी विसरूं नका मज। सांगतसे गूज पांडुरंग॥" (नामदेव). ज्ञानदेव व नामदेव यांच्या अशा अनेक अभंगांवरून या दोन संतांच्या पूर्वीपासून पंढरपुरास जाणारा वारकरी पंथ चालू झाला होता असें दिसतें. आणि ज्ञानदेव (शके ११९७) याचा काल निश्चित असल्यामुळें वारकरी पंथ निदान एक हजार वर्षांपूर्वी उगम पावलेला आहे हें उघड होतें. नामदेव हा ऐंशीं वर्षें व ज्ञानदेवाच्या समाधीनंतर पन्नास वर्षें जगला; त्यामुळें या पंथाचें प्रसारकार्य त्याच्याकडून अधिक झालें; शिवाय इ. स. १२९६ मध्यें देवगिरीचें राज्य नष्ट होऊन महाराष्ट्रांत मुसलमानी अमल सुरू झाल्यामुळें नामदेवाला परधर्माशीं साक्षात् तोंड देण्याचा प्रसंग आला व त्यामुळें त्याचें तेज विशेषत्वानें बाहेर चमकलें. इतकेंच नव्हे तर नरहरी (सोनार), सांवता (माळी), तुकाराम (वैश्य), गोरोबा (कुंभार), चोखामेळा (महार) रोहीदास, (चांभार), वगैरे अनेक संत निरनिराळ्या जातींत उत्पन्न होऊन वारकरी पंथांतला हा काल अनेक दृष्टींनीं अपूर्व झाला. एकनाथ व तुकाराम यांनीं कीर्तनभक्ति विशेष वाढविली. एकनाथ स्वतः रोज कीर्तन करीत असे. वारकरी कीर्तन हरिदासी कथेहून भिन्न असतें. वारकरी कीर्तनास निरूपण असें म्हणतात. एखाद्या साधु-संताचा वैराग्य-वेदान्त-भक्तिपर अभंग घेऊन त्याचा विचार श्रोतृसमुदायापुढें मांडावयाचा व मधून मधून भजन करावयाचें, अशी या कीर्तनाची पद्धत आहे. वारकरी पंथानें परकीय धर्मास तोंड देण्याकरितां हिंदु समाज सुसंघटित करण्याची फार महत्त्वाची कामगिरी केली आहे यांत शंकाच नाहीं.

वारकरी पंथांत चैतन्य, स्वरूप, आनंद व प्रकाश असे चार संप्रदाय आहेत.

(१) चैतन्यसंप्रदायात दोन भेद आहेत—(अ) षडक्षरी मंत्र,–'रामकृष्णहरी', व (आ) द्वादशाक्षरी मंत्र 'ॐ नमो भगवते वासुदेवाय'. पहिल्याची गुरुपरंपरा निळोबारायाच्या अभंगांत दिली आहे ती—महाविष्णु–ब्रह्मा–श्रीहरि–नारद–व्यास–राघवचैतन्य–केशवचैतन्य–बाबाजी–तुकया (तुकाराम). व दुसऱ्याची गुरुपरंपरा–आदिनाथ–मच्छिंद्रनाथ–गोरक्षनाथ–गहिनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञानदेव. ज्ञानदेवानें ज्ञानेश्वरीच्या शेवटीं हीच परंपरा दिली आहे. बहुतेक सर्व वारकरी चैतन्य-संप्रदायांतले 'रामकृष्णहरी' हा षडाक्षरी मंत्र म्हणणारे आहेत.

(२) स्वरूपसंप्रदायाचा त्रयोदशाक्षरी मंत्र 'श्रीराम जय राम जयजय राम' हा असून त्यांत (अ) रामानुजीय (कपाळावर तांबडी रेषा लावणारे) पंथाची परंपरा मल्हेरकर, सखारामबुवा, अमळनेरकर व भानुदासबोवा बेलापूरकर अशी आहे; आणि (आ) रामानंदी (पांढरी रेषा–वैरागी) संप्रदायांत रामदासी लोकांचा समावेश होतो.

(३) आनंदसंप्रदायाचा त्र्यक्षरी मंत्र 'श्रीराम' हा असून नारद, वाल्मीकि, रामानंद, कबीर, सेना न्हावी, वगैरे मंडळी या संप्रदायाची आहेत.

(४) प्रकाशसंप्रदायाचा मंत्र 'ॐ नमो नारायणाय' हा आहे. शबलब्रह्म–आदिनारायण–ब्रह्मा–अत्री–श्रीदत्तात्रय–सहस्रार्जुन–यदु–जनार्दन याप्रमाणें ही गुरुपरंपरा आहे.

पालख्यांचा सोहळा गेल्या २७५ वर्षांतला असून हैबतराव-बाबा आरफळकर यानें तो फार वाढवला. हल्लीं कर्नाटक–त्रिचनापल्ली ते वऱ्हाड–नागपूरपर्यंतचे वारकरी आषाढी–कार्तिकीला पंढरपुरास जातात. त्यांची संख्या आषाढीस तीन लाख व कार्तिकीस एक लाखापर्यंत असते. आषाढीस निरनिराळ्या ठिकाणांहून कांहीं पुढील पालख्या येतात—ज्ञानेश्वर (आळंदी), निवृत्तिनाथ (त्रिंबकेश्वर), तुकाराम (देहू), एकनाथ (पैठण), सोपानकाका (सासवड), मुक्ताबाई (एदलाबाद), जनार्दनस्वामी (औरंगाबाद), मच्छिंद्रनाथ (मच्छिंद्रगड), जयरामस्वामी (वडगांव), दामाजी (मंगळवेढे), रुक्माबाई (कोंडणपूर–उमरावती), वगैरे.

**वारली**—एक जात. वारल्यांची वस्ती मुंबई प्रांतांतच आहे. लोकसंख्या (१९११) १,९०,२३७. ही जात बहुधा ठाणें जिल्ह्यांत आढळते. ही एक रानटी जात दिसते. ठाकूर, कातकरी व इतर वन्य जातींप्रमाणें वारली लोकांचा एकच एक धंदा अथवा उद्योग नसतो. ते आपला उदरनिर्वाह गवत व लांकडाच्या मोळ्या विकून अथवा लहान लहान पारध करून करतात. पावसाळ्यांत फक्त कांहीं लोक शेतकाम करतात. पुनर्विवाह व घटस्फोट मान्य व प्रचलित आहेत. दारूवर त्यांची अतोनात भक्ति असते. धर्मानें वारली वन्य हिंदू असून त्यांचा मुख्य देव वाघ्या होय. बहिरोबा-खंडोबाचीहि ते पूजा करतात.

हे मूळचे सातपुड्यांतले भिल्ल असल्यानें प्रथम यांची भाषा भिल्ली होती. पण पुढें मराठीचा संस्कार होऊन एक निराळी उपभाषा म्हणून तिला स्थान मिळालें. या बोलींत ऱ्हस्व स्वर दीर्घ उच्चारतात. सामान्यरूप एकारान्त होतें. हिच्यावर मराठीप्रमाणें गुजराथीचाहि कांहीं परिणाम झाला आहे.

**वारसपट्टी**—(डेथ ड्यूटीज्). माणूस वारल्यानंतर त्याच्या मालमत्तेचा जो वारस होतो त्याच्याकडून सरकारनें घेतलेली पट्टी. पूर्वी सरंजाम बदलतांना अशी पट्टी नजराणारूपानें घेण्याची वहिवाट असे. मृताचा वारस ठरवितांना सरकारचें अशा नजराण्यावर लक्ष असल्याचींहि उदाहरणें आहेत. आज इंग्लंडांत अशी पट्टी घेतात.

**वारसपत्र**—(प्रोबेट). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, मयतानें करून ठेवलेलें मृत्युपत्र (वुइल) कोर्टानें तत्संबंधीं पुरावा वगैरे घेऊन खरें किंवा शाबीत आहे असा निर्णय देऊन तसा दिलेला दाखला. इंग्लंडमध्यें असा दाखला हायकोर्ट ऑफ जस्टिस या न्यायकोर्टाच्या प्रोबेट डिव्हिजन या न्यायकोर्टाकडून दिला जातो. अस्सल मृत्युपत्र सदर कोर्टाच्या दप्तरांत ठेवण्यांत येतें आणि मृत्युपत्राची कोर्टाच्या सहीशिक्क्याची नक्कल मृत्युपत्रांत नेमलेल्या एक्झीक्यूटर इसमांना देण्यांत येते, आणि मृत्युपत्र शाबीत झालें आहे असा दाखला (प्रोबेट) देण्यांत येतो. हिंदुस्थानांत प्रोबेटसंबंधीं असाच कायदा आहे (१९२५ चा कायदा, कलम २२२).

**वारसा**—(डिसेंट). *या शब्दाचा कायद्यांत अर्थ असा* आहे कीं, एखादा इसम आपल्या मालकीच्या इस्टेटीची व्यवस्था मृत्युपत्रानें किंवा व्यवस्थापत्रानें कांहीं एक न करतां मरण पावला तर त्याच्या इस्टेटीवर कायद्यानें ज्यांना जो मालकी हक्क प्राप्त होतो त्याला वारसाहक्क असें म्हणतात. हा वारसाहक्क मयत इसमाच्या नजीकच्या नातेवाईकांना प्राप्त होतो. त्याचा क्रम पुढीलप्रमाणें आहे– १ मयताचे वंशज म्हणजे मुलगे, मुली, नातू व नाती; २ मयत इसमाचे पूर्वज म्हणजे आई, बाप, चुलते, आजे, वगैरे; ३ समान पिढींतले नातेवाईक (को-लॅटरल रिलेटिव्हज) म्हणजे मयताचे भाऊ, बहीण, चुलतभाऊ, चुलतबहीण, वगैरे. वारसांचा क्रम आणि निरनिराळ्या वारसांच्या हिश्शाचें प्रमाण हिंदु कायदा, मुसलमानी कायदा, पारशी कायदा, इंग्रजांचा कायदा व इतर देशांचे कायदे यांत निरनिराळ्या प्रकारें ठरविलेलें आहे.

नवीन येऊं घातलेल्या हिंदु कोडाप्रमाणें या क्रमांत फेरबदल होणार आहेत.

वारसाहक्काचा कायदा—(दि इंडियन सक्सेशन ॲक्ट, १९२५). पूर्वी या बाबतींत इंडियन सक्सेशन ॲक्ट, १८६५; हिंदु वुइल्स ॲक्ट, १८७४; प्रोबेट ॲन्ड ॲडमिनिस्ट्रेशन ॲक्ट, १८८१ व १८८९; सक्सेशन सर्टिफिकेट ॲक्ट, १८८९ व १९०३; वगैरे कायदे होते; ते रद्द करून व ते सर्व एकत्र करून हा नवा कायदा केला. त्यामुळें हा कायदा फार मोठा झाला असून त्यांत ३९१ कलमें आहेत. त्यांत (१) नागरिकत्व (डोमिसाइल), (२) हिंदु, मुसलमान, बौद्ध, शीख व जैन यांखेरीज इतर मयताचे वारस व त्यांचे हिस्से, (३) पारशी मयताचे वारस व त्यांचे हिस्से, (४) मृत्युपत्र व पुरवणी मृत्युपत्र, (५) मृत्युपत्रांतील देणग्या, (६) प्रोबेट, एक्झीक्यूटर, ॲडमिनिस्ट्रेटर, (७) वारसा-सर्टिफिकेट, इत्यादि बाबींचीं कलमें आहेत.

**वारुगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. हा किल्ला माण तालुक्यांत दाहिवडीच्या ईशान्येस २० मैलांवर पनवन खेड्यांत आहे. जवळ घोडवाडी गांवीं गडकऱ्याचे वंशज आहेत. किल्ला मोठा व मजबूत आहे. हा शिवाजीनें बांधला असें सांगतात.

**वार्सा**—पोलंड, एक सर्वांत मोठें व राजधानीचें शहर. हें व्हिस्चुला नदीकांठीं असून, महत्त्वाचें आगगाड्यांचें केंद्रस्थान आहे. नदीच्या पलीकडे प्राग हें मोठें उपनगर आहे. मोठमोठालीं देवळें, राजवाडे, शिक्षणसंस्था, बागा, इ. साठीं वार्सा शहर प्रसिद्ध आहे. कातडी, बूट, कापड, यंत्रें, दारू, कागद, तंबाखू,-वगैरेचें उत्पादन या ठिकाणीं होतें. मोठा सरकारी छापखाना आहे. लो. सं. (१९४५) ४,४८,०००.

**वालखिल्य**—स्वायंभुव मन्वंतरांतील क्रतुऋषीस क्रिया *नामक भार्येच्या ठायीं झालेले* ६०,००० पुत्र. हे आकारानें अंगुष्ठमात्र असले तरी यांचें तेज सूर्यकिरणांप्रमाणें होतें. सूर्याच्या रथाचें ते संरक्षण करीत. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलांत वालखिल्यसंज्ञक कांहीं सूक्तें आहेत.

**वालपापडी**—हा शब्द गुजराथी आहे. तापी, नर्मदा, वगैरे गुजराथेंतील महानद्यांस पूर येतात; तेव्हां पुराचें पाणी दोन्ही थडींस लांबवर पसरतें व पुराच्या पाण्याचा गाळ हात हात

जाडीचा बसतो. गाळांत रेतीचा भाग बराचसा असतो व त्यांत अनेक क्षार असतात. अशा जमिनींत क्षार सुकल्यावर तींत अनेक पिकें करतात; त्यांपैकींच वालपापडी हें एक होय. थंडी पडण्याच्या सुमारास वेलांस फुलें येऊन मुबलक शेंगा येतात. शेंगांचीं सालें घेवड्याप्रमाणें कोंवळेपणीं खातात. दाणे ओलेपणीं वालाच्या दाण्यांपेक्षां गोड व कमी उग्रट असतात. गोड जातीच्या घेवड्याच्या दाण्यांस, ते वाळतांच राखेंत वगैरे न ठेवल्यास कीड पडते व म्हणूनच पावटे सचंध न ठेवितां डाळ करून ठेवितात. वालपापडीचे अनेक पदार्थ करतात. घेवड्यासारखी नुसती भाजी करतात. सोलाण्याची उसळ व आमटी होते. वाळलेले दाणे फुटाण्यासारखे भाजून खातात.

**वॉलपोल, सर रॉबर्ट** (१६७६–१७४५)—एक इंग्रज मुत्सद्दी. १७०८ सालीं हा कॉमन्स सभेचा नेता होता व १७15 सालीं चढत चढत चॅन्सेलर ऑफ दि एक्स्चेकरच्या हुद्यावर गेला. यानंतर १७४२ पर्यंत वॉलपोल हा राज्यांत अगदीं पहिल्या अत्युच्च स्थानावर राहून कारभार हांकीत होता. त्यानें राष्ट्राचा व्यापार पुष्कळ वाढवून लोकांवरचा करांचा भार बराचसा कमी केला. लांचलुचपतीचा फायदा ओळखून तो बड्या धेंडांना आपल्या बाजूला ओढी. इंग्लंडच्या थोर मुत्सद्यांपैकीं वॉलपोल समजला जातो.

**वॉलपोल, होरेस** (१७१७–१७९७)—एक ब्रिटिश ग्रंथकर्ता व विनोदी लेखक. हा सर रॉबर्ट वॉलपोलचा चौथा मुलगा असून त्याचें शिक्षण एटन आणि केंब्रिज येथें झालें. यानें लंडनजवळ एक टेंकडी विकत घेऊन ती सर्व सुखसोयींनीं सुशोभित केली. त्याला जी लेखक म्हणून कीर्ति लाभली ती त्याच्या 'पत्रें आणि आठवणी' या नांवाच्या ग्रंथावरून होय.

**वॉलरस**—हा समुद्रावर आढळणारा एक मांसभक्षक सस्तन प्राणी आहे. याचा एक सील वगैरेंच्या जातींत स्वतंत्र वर्ग आहे. याला मोठाले सुळ्यासारखे दांत असतात. याची लांबी वीस फुटांपर्यंत असते. याच्या चरबीपासून तेल निघतें व याचें कातडें कमावतां येतें व सुळे हस्तिदंतीसारखे मौल्यवान् असतात. हा फार थंड प्रदेशांत आढळतो. पूर्णवाढीचा वॉलरस १२ फूट लांब व २,००० पौंड वजनाचा असतो. सुळ्यांची लांबी २० ते ३० इंचांपर्यंत असते. हे अनेक कामांसाठीं उपयोगी पडतात. यांची शिकार मोठ्या प्रमाणांत होत असल्यानें हे संख्येनें कमी होत चालले आहेत.

**वाली**—किष्किंधेचा एक बलाढ्य वानर राजा. एका गुहेंत वाली शत्रूशीं लढण्यास गेला व बराच काळ बाहेर आला नाहीं. उलट एक रक्ताचा लोट गुहेंतून बाहेर आला. तेव्हां याचा भाऊ सुग्रीव याला वाली मारला गेला असें वाटून तो प्रजाजनांच्या आज्ञेवरून राज्यारूढ झाला. पण पुढें वाली परत येऊन त्यानें बंधुद्रोहाबद्दल सुग्रीवाची बायको तारा हरण केली व त्याला हांकून दिलें. तेव्हां सुग्रीवानें रामाकडून यास मारविलें व तो पुनरपि तारेसमवेत किष्किंधेचा उपभोग घेऊं लागला. वाली रावणापेक्षां फार बलवान् होता. याचा पुत्र अंगद (पाहा) होय.

**वालुकामक्षिका**—(बेंबेसिडी). हा एक गांधिलमाशीसारखा त्वक्पक्षीय कीटकवर्ग (हायमेनोप्टेरस) असून त्यास नांगी असते. हे प्राणी सामान्यतः उष्ण कटिबंधांत आढळतात व त्यास वाळूंतील गांधिलमाशा असें म्हणतात. बेंबेक्स ही या वर्गांतील एक विशिष्ट गांधिलमाशी आहे.

**वालेस, सर विल्यम** (१२७०–१३०५)—एक स्कॉटिश स्वातंत्र्याचा शूर पुढारी. त्यानें स्टर्लिंगनजीक इंग्लिश सैन्याचा पूर्ण पराभव केला (१२९७). नंतर त्याला स्कॉटिश राज्याचा संरक्षक ही पदवी देण्यांत आली. पुढें त्यानें इंग्लंडवर अनेक हल्ले केले. १२९८ सालीं इंग्रज राजा १ ला एडवर्ड यानें ९०,००० सैन्यासह स्कॉटलंडवर स्वारी केली. त्या वेळीं वालेसनें माघार घेतली, पण अखेर फॉलकर्क येथें लढाई होऊन स्कॉटिश सैन्याचा पूर्ण पराभव झाला आणि वालेस पकडला गेला. त्याला लंडन येथें नेऊन व न्यायकोर्टांत चौकशी करून राजद्रोह व बंड या गुन्ह्यांबद्दल ठार मारण्यांत आलें.

**वाल्ट्झ**—त्रितालामध्यें बसविलेला एक अतिशय लोकप्रिय असलेला नृत्याचा प्रकार. यांत पुरुषानें आपल्या जोडीदाराच्या कमरेला हाताचा विळखा घालून नाचावयाचें असतें. या नृत्यप्रकाराचा उगम प्रथम बोहेमिया, ऑस्ट्रिया व बव्हेरिया यांमध्यें अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला. चॉपिन व ब्राह्मस यांनीं या नृत्यप्रकारास योग्य अशी गानरचना केलेली आहे. जोहास्ट्रौस या नाचाचे प्रकार उत्कृष्ट आहेत.

**वाल्मीकि**—एक ऋषि व रामायणकर्ता. हा पूर्वायुष्यांत किरात असून धनुर्विद्येंत निपुण होता. कुटुंबपोषणार्थ हा वाटमाऱ्याचा धंदा करीत असे. एकदां एका ऋषीला हा अडवीत असतां त्यानें, ज्यासाठीं तूं एवढा व्याप व घोर कर्म करतोस तीं स्त्रीपुत्रादिक माणसें या तुझ्या पातकांस विभागी आहेत काय म्हणून चौकशी करावयास सांगितलें. तेव्हां वाल्या कोळी घरीं जाऊन विचारतो तों कोणीहि त्याचें पाप घेण्यास तयार होईना. तेव्हां त्याच महर्षीस तो शरण गेला. ऋषीनें रामनामाचा जप करण्यास सांगितलें असतां हा त्याच ठिकाणीं इतका कालपर्यंत जप करीत बसला कीं, याच्या अंगावर वल्मीक (वारूळ) वाढलें व पुढें त्याच महर्षीनें यास त्यांतून वर काढिल्यामुळें त्यास

वाल्मीकि असें नांव पडलें. पुढें याची गणना प्रमुख ऋषींत होऊन हा तमसा नदीतीरीं आश्रम करून राहिला.

एकदां हा नित्यनियमाप्रमाणें नदीवर स्नानास गेला असतां एका कामासक्त क्रौंच पक्षास एका व्याधानें मारलेलें पाहून त्याच्या विरही स्त्रीची याला अत्यंत करुणा आली व यानें त्या व्याधाला असा शाप दिला :" मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः। यत् क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितुम्॥" तेव्हां ब्रह्मदेव तेथें प्रगट होऊन त्यानें "तूं आतां अनुष्टुपछंदांत स्त्रीविरहरूप असें काव्य कर आणि तूं जसें वर्णन करशील तसें घडून येईल", असें वाल्मीकीस आश्वासन दिलें. त्याच्या आज्ञेनुरूप वाल्मीकीनें शतकोटी रामायण काव्य रचिलें. त्यांतीलच सारांश, चोवीस सहस्र श्लोकांचें काव्य रामपुत्र लवकुशांस जें त्यानें पुढें पढविलें तें प्रस्तुत रामायण सर्वांच्या पाहण्यांत आहे. रामानें सीतेचा त्याग केला असतां यानेंच तिला संभाळून तिच्या पुत्रांचा विद्याभ्यास करविला. रामरक्षास्तोत्र, गंगाष्टक, एक शिक्षा व सूत्र याच्या नावावर आहेत.

**वाल्हें**—मुंबई, पुणें जिल्हा, पुरंदर तालुका. सासवडाहून ७॥ कोसांवर हा गांव आहे. या गांवच्या पाटीलकीचें उत्पन्न शिवाजींची मुलगी सखूबाई ( निंबाळकर ) हिच्या चोळीबांगडीसाठीं इनाम दिलें होतें. गांवापासून २ कोसांवर हरणईच्या डोंगरशिखरावर एक महादेवाचें जुनें स्थान आहे.

**वावडिंग**—[ लॅ. एंबेलिया राइब्स ]. हीं झाडें आठ–दहा फूट उंच वाढतात. पानें लांबट असतात. झाडावर फळांचे घोस येतात त्यांना वावडिंग असेंच नांव आहे. वावडिंग चांगलें कृमिनाशक औषध आहे. जंतावर काढा देतात. खोकला व दमा यांवर चूर्ण मधांत देतात.

**वॉशिंग्टन**—अमेरिकन संयुक्त संस्थानामधलें वायव्य भागांतलें संस्थान. क्षेत्रफळ ६८,१९२ चौ. मै. व लो. सं. १७,३६,१९१. पश्चिमेस पॅसिफिक ( प्रशांत ) महासागर, व दक्षिणेस उत्तर कॅनडा आणि कोलंबिया नदी आहे. कॅस्के व रेनि हे दोन मोठे पर्वत आहेत. पगेट साउन्ड हें एक मोठें आखात पॅसिफिक महासागरास जोडणारें या संस्थानच्या पश्चिम भागांत आहे. याच्या कांठीं पुष्कळ बंदरें व शहरें वसलीं आहेत. २००० चौरस मैलांचा या आखाताचा व्याप आहे. कांहीं ठिकाणीं हें ६५ मैल लांब आहे. पांच-सहा मोठ्या नद्या या संस्थानांतून वाहतात. ऑलिंपिआ राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. सीॲटल व स्पोकेन हीं सर्वांत मोठीं व प्रसिद्ध शहरें आहेत.

वॉशिंग्टन संस्थानांत फार व मोठालीं विस्तीर्ण क्षेत्र व्यापणारीं जंगलें आहेत. पिवळा पाइन, पांढरा पाइन, स्प्रूस, देवदार, वगैरे अनेक प्रकारचें लांकूड विपुल निघतें. समशीतोष्ण प्रदेशांतील सर्व धान्यें, फळें, भाजीपाला, वगैरे यांत होतात. जनावरें, दुभेऱ्या ( डेअरी ) व दुग्ध पदार्थ हे महत्त्वाचे उद्योग-धंदे आहेत. लोखंड, कोळसा, सोनें, तांबें, जस्त, वगैरे अनेक प्रकारचें खनिज उत्पादन निघतें. सालमन, कॉड, हेरिंग, मॅकरेल, हे मासे विशेष सांपडत असल्यानें मच्छीमारीचा धंदाहि विशेष महत्त्वाचा गणला जातो. या संस्थानांतून समुद्रमार्गानें अलास्का व आशियाकडील प्रदेश यांच्याशीं फार मोठा व्यापार चालतो. सीटल येथें संस्थानचें विद्यापीठ आहे. कोलंबिआ नदीवर ग्रँड कूली हें धरण आहे. लाँगशायर येथें उन्हाळीं आहेत.

१७९२ च्या सुमारास रॉबर्ट ग्रेवनंतरचे दर्यावर्दी खलाशी यांनीं या प्रदेशाच्या किनाऱ्यांचा शोध लावला. लेविस, क्लार्क, विल्किस व फ्रेमंट या संशोधकांनीं अंतर्भागांत प्रवेश करून शोध घेतला. १८११ मध्यें पहिली वसाहत झाली. ग्रेट ब्रिटन ( कानडा–ब्रिटिश कोलंबिया ) व अमेरिका ( हें संस्थान ) यांच्या दरम्यान सरहद्दीविषयीं झगडा उत्पन्न झाला. तो ४९ अक्षांशांची रेषा सरहद्द ठरवून निकालांत काढला गेला. या भागांत कित्येक वर्षें स्थानिक रेड इंडियन लोकांच्या बंडाळ्या होत असत. १८५३ पर्यंत हा भाग एक 'टेरिटरी' म्हणून होता. या सालीं हा विभाग रद्द झाला व १८८९ मध्यें हें संस्थान युनियनमध्यें दाखल झालें.

संस्थानचा कारभार एक गव्हर्नर ४६ सभासदांचें सीनेट आणि ९९ सभासदांची प्रतिनिधि सभा यांच्या मतानुसार चालवतो. येथें शिक्षण ८ ते १५ वर्षांपर्यंत मोफत व सक्तीचें आहे. वॉशिंग्टन युनिव्हर्सिटी ( स्थापना १८६१ ) व अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. येथें ६५ वर्षें वयापासूनच्या म्हाताऱ्यांना, तसेंच गरीब कुटुंबांतील मुलांना, आणि अंध इसमांना दरमहा सरासरी ५० डॉलरपर्यंत मदत सरकारकडून मिळते.

**वॉशिंग्टन**—अमेरिका, संयुक्त संस्थानें, राजधानीचें शहर. हें न्यू यॉर्कच्या नैर्ऋत्येस २०० मैलांवर आहे. सर्वांत मोठी इमारत कॅपिटॉल आहे. इतर सरकारी इमारती देखील चांगल्या बांधल्या आहेत. अमेरिकेच्या अध्यक्षाचा राजवाडा ( व्हाइट हाउस ) अगदीं साधा पण सुंदर आहे. या ठिकाणीं जॉर्ज वॉशिंग्टन विद्यापीठ, हॉवर्ड विद्यापीठ ( नीग्रोंसाठीं ) व जॉर्ज टाउन विद्यापीठ ( जेझुइट लोकांसाठीं ) या तीन प्रमुख शिक्षणसंस्था आहेत. येथील काँग्रेसचें ग्रंथालय जगांतील प्रसिद्ध ग्रंथालयांपैकीं प्रमुख आहे. यांतील पुस्तकांच्या कपाटांची एकूण लांची ४१४ मैल भरेल. संगमरवरी दगडांचें राष्ट्रीय स्मारक ५५५ फूट उंच आहे. लिंकनचें स्मारक म्हणून त्याचा मोठा दगडी पुतळा पोटोमॅक बागेंत उभा केला आहे. शहर चांगलें

संरक्षित असून बंदराची व्यवस्था विशेष प्रकारें ठेवली आहे. लो. सं. सुमारें पाच लक्ष आहे.

**वॉशिंग्टन, जॉर्ज** (१७३२-१७९९)— अमेरिकन संयुक्त संस्थानांचा पहिला अध्यक्ष. प्राथमिक शाळेंत मिळालें तेवढेंच याचें शिक्षण. पुढें यानें लष्करांत नोकरी धरली. इंग्लंडशीं झालेल्या स्वातंत्र्ययुद्धांत हा अमेरिकन सैन्याचा मुख्य सेनापति होता (१७७५). पण जेव्हां इंग्लंडचा पराभव होऊन तह झाला तेव्हां तो आपल्या गांवीं जाऊन राहिला व विजयाचें कांहींहि बक्षीस घेण्याचें त्यानें नाकारलें. १७८७ मध्यें मात्र संस्थानांच्या संघाचे नियम दुरुस्त करण्यासाठीं भरलेल्या बैठकीचा तो अध्यक्ष होता. ते नियम अद्यापि अमलांत आहेत. अमेरिकन लोकराज्यानें त्याला पहिला अध्यक्ष करण्याचा मोठा मान दिला (१७८९) व १७९३ सालीं पुन्हां त्याचीच निवड झाली. आपल्या कारकीर्दींत त्यानें अतोनात खटपट करून या लोकराज्याच्या उत्कर्षाचा पाया भक्कम केला.

**वॉशिंग्टन, बुकर टालफेरो** (सु. १८५८-१९१५)— एक अमेरिकन नीग्रो शिक्षणतज्ज्ञ. यादवी युद्धामुळें गुलामगिरींतून मुक्त झाल्यावर हा दिवसां मिठाच्या कारखान्यांत काम करून रात्रीं शाळेंत शिकत असे. नंतर त्यानें अध्यापन आणि शेतकी यांचें उच्च शिक्षण तीन वर्षें घेतलें. नंतर रात्रीच्या शाळांमध्यें शिकविण्याचें व इंडियन मुलांवर देखरेख करण्याचें काम त्यानें पत्करलें. नंतर जनरल आर्मस्ट्रांगच्या प्रोत्साहनानें त्यानें टस्केजी येथें एक अध्यापन विद्यालय काढलें. प्रारंभ लहान होता तरी वॉशिंग्टनच्या कर्तबगारीनें नीग्रोंसाठीं असणारें हें विद्यालय जगांत एक सर्वांत मोठें औद्योगिक आणि अध्यापन विद्यालय बनलें. आज या नीग्रोंच्या शिक्षण-संस्थेंत १८४ अध्यापक व ११६२ विद्यार्थी आहेत.

**वाशिम**—वऱ्हाड, अकोला जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. १०४६ चौ. मै. व लो. सं. सुमारें दोन लाख आहे. तालुक्यांत ३०७ खेडीं असून फक्त एकच मोठें गांव आहे. बहुतेक जमीन सुपीक आहे. वाशिम हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. जुनें नांव वत्सगुल्म, वत्साम असें आहे. वाशिम फार जुनें शहर आहे व वत्स ऋषीनें हें वसवलें असें म्हणतात. १७ व्या शतकांत वाशिमच्या देशमुखास मोंगल राजापासून पुष्कळ मुलूख देणगी म्हणून मिळाला. दक्षिण वऱ्हाडांत हें देशमुखांचें घराणें बरेंच महत्त्वाचें आहे. येथील बालाजीचें देऊळ व तलाव फार प्रेक्षणीय आहेत. येथें कित्येक कापूस पिंजण्याचे व दाबण्याचे कारखाने आहेत. खाद्या चांगल्या होतात. लो. सं. वीस हजार.

**वासन वेल**—हा वेल बराच मोठा होतो. याला 'तान्हीचा वेल' असेंहि म्हणतात. जाडी साधारणपणें दाभणाएवढी असते. पानें बारीक असतात. वेलाच्या लहान टोपल्या विणतात. म्हशीस खाऊं घातल्यास दूध पुष्कळ येतें. याचा पाला वाळवून भुकटी केल्यास ती पाणी घट्ट करते व हा चमत्कार वाटतो. कंठसर्प, पोटदुखी, नारू, वगैरेंवर मुळी वांटून देतात.

**वासुकि**—एक कद्रुपुत्र नाग. हा पाताळांतील सर्पांचा अधिपति होय. याच्या स्त्रीचें नांव शतशीर्षा. जनमेजयाच्या सर्पसत्रांत याचीं पंधरा कुळें दग्ध झालीं होतीं. हा सर्वदां भूषणरूपानें शिवाच्या अंगावर आश्रित झालेला आहे. याची बहीण जरत्कारु ऋषीला दिली होती.

**वासुदेव**—वसुदेवपुत्र कृष्ण. वासुदेवाचा उल्लेख फार प्राचीन आहे. अष्टाध्यायींत व खि. पू. २ ऱ्या शतकांतील शिलालेखांतून वासुदेवाचा उल्लेख आहे. उपनिषत्कालीन नवविचाराच्या लाटेंत बौद्ध आणि जैन पंथांबरोबरच वासुदेवधर्माचा उदय झाला. भक्तिधर्माचा मूळ उपदेशक वासुदेव असून कृष्ण हें त्याचें गोत्रनाम असावें. कारण वासुदेवधर्म व गीतोपदिष्ट धर्म एकच आहेत. नारायण हा धर्मसंस्थापक वासुदेवाच्याहि पूर्वी होऊन गेला. पण पुढें नारायण आणि वासुदेव एकच मानले जाऊं लागले. वासुदेव व विष्णु एकच मानले जात असल्यानें गोपाळकृष्ण व वासुदेवकृष्ण यांच्या कथांतून विसंगति दिसते.

**वासुदेव संभाजी खांडेकर**—मराठेशाहींतील एक मुत्सद्दी. हा पंथपिपलोदा जहागिरीचा संस्थापक संभाजी याचा मुलगा. भाऊ गोपाळ (पाहा). १६ मे १७५३ चें वासुदेव संभाजीचें पत्र श्रीक्षेत्र उज्जैन येथील खांडेकरांच्या उपाध्यायाच्या नांवें लिहिलेलें असून त्यात त्यानें स्वतःचा उल्लेख कमाविसदार परगणे धरमपुरी सरकार मांडव' असा केला असून उक्त परगणा हा धारच्या राज्यांत समाविष्ट होता असें दिसतें.

खांडेकर घराण्यांत एक यादी आहे. तिजवरून वासुदेव संभाजी पुढें होळकरांच्या नोकरींत गेला असें कळतें. पेशवे दप्तरांवरून तो १७५९ मध्यें देपाळपूर महालचा कमाविसदार होता असें सिद्ध होतें. हा महाल इंदूर राज्यांत समाविष्ट होता.

वासुदेव संभाजीस आंबेड परगण्यांत चांगले अधिकार होते. राजवाड्यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' यांत २८ मार्च सन १८६८ चें एक पत्र गंगाधर यशवंत चंद्रचूड याचें दिलें

आहे त्यावरून दिसतें कीं, पूर्वी वासुदेव संभाजीचा तेथें अमल होता व तो परगणा त्या वेळीं होळकर राज्यांत समाविष्ट होता.

मराठ्यांकडून १७७० मध्यें जे तीन परराष्ट्र वकील रोहिले व पठाण यांच्याशीं होळकरांकडून बोलणीं करण्याकरितां गंगापार पाठविले गेले त्यांत वासुदेव संभाजी होता.

वासुदेव संभाजीनें मौजें दाहिपुरी, परगणे आंबेडें, सरकार जालनापूर, सुभा औरंगाबाद येथें अर्ध्या गांवच्या पाटिलकीचा अधिकार व ३६० बिघे जमीन खाजगी मिळकत म्हणून संपादन केली. त्या संबंधानें ता. १८ ऑगस्ट सन १७७१ चें शहाआलम बादशहाकडून फर्मान मिळविलें तें खांडेकरांच्या संग्रहीं आहे. त्यानें आंबेड गावीं एक चांगलें घर बांधून तेथें विहीर करून बाग लाविला होता. हें ठिकाण सन १८११ पावेतों खांडेकरांकडे चाललें. पंथपिपलोदा पाहा.

**वासुदेव सार्वभौम** (१४५०–१५२५)—बंगालमधील नदियाच्या पहिल्या तर्कशास्त्राच्या पाठशाळेचा संस्थापक. महेश्वर विशारदाचा हा पुत्र नदिया येथें जन्मला. यानंतर मिथिला येथील पक्षधराकडे यानें न्यायशास्त्राचें शिक्षण घेतलें. याची विद्वत्ता पाहून गुरूनेंच म्हणजे पक्षधरानेंच यास 'सार्वभौम' अशी पदवी दिली. 'तत्त्वचिंतामणि' व 'कुसुमांजली' हे ग्रंथ यानें तोंडपाठ केले होते. मिथिलेहून परत येत असतां आपणांस धोका निर्माण होऊं नये म्हणून नदियास जाणाऱ्या निमित्तानें यानें बनारसला जाऊन तेथें वेदांचें अध्ययन केलें. गंगेशाच्या ग्रंथावर यानें 'सर्वभूषणनिरुक्ति' नांवाची टीका लिहिली आहे. रघुनाथशिरोमणि (नवन्यायशास्त्रावरील ग्रंथकार), वैष्णवपंथसंस्थापक चैतन्य, रघुनंदन भट्टाचार्य (धर्मशास्त्रकार) व कृष्णानंद आगमवागीश हे याचेच शिष्य होत. नवद्वीप पाहा.

**वासोटा**—मुंबई, सातारा जिल्हा, जावळी तालुक्यांत तांची गांवाच्या ईशान्येस ५ मैलांवर कोयना नदीच्या खोऱ्याच्या कोपऱ्यावर हा किल्ला बांधलेला आहे. खोऱ्याच्या तोंडाशीं वासोटा नांवाचें खेडें आहे. पायथ्यापासून हा ८०० फूट उंच आहे. कोंकणच्या बाजूनें ३७०० फूट उंच आहे. रस्ता मेट-इंदोली गांवावरून आहे. क्षेत्रफळ १५ एकरांवर आहे. किल्ल्यावर महादेवाचें व चंडीचें देवालय आहे. एक फडेलोटाचा कडा ५० फूट खोल आहे. त्यास बाबूखाड म्हणतात. हा किल्ला ...१ जुना असून कोल्हापूरच्या शिलाहार घराण्यांतील दुसऱ्या भोजानें बांधला. दरवाजा मुसलमानी तऱ्हेचा दिसतो. १६५५ त हा शिवाजीनें घेतला. त्यापूर्वीं तो माने व शिरके यांच्या ताब्यांत असे. शिवाजीनें यास वज्रगड असें नाव दिलें होतें. पेशवाईंत या किल्ल्यांत राजकीय कैदी ठेवीत. प्रतिनिधीला यावर कैदेंत ठेवलें असतां त्याची रक्षा ताई तेलीण हिनें हा घेतला व बापू गोखले याच्याशीं बरेच दिवस लढत दिली. याविषयीं एक आर्याहि प्रसिद्ध आहे. १८१७ त खडकी येथें पराजय झाल्यानंतर सातारचा राजा व त्याचें कुटुंब यांस या किल्ल्यांत ठेवलें होतें. येथें हंटर व मॉरिसन या दोन युरोपियनांस कैद करून ठेवलें होतें. इंग्रजांनीं हा किल्ला भास्करपंत या किल्लेदाराकडून वीस तास तोफांचा भडिमार करून घेतला.

**वास्को-द-गामा** (१४६९-१५२४)—एक विख्यात पोर्तुगीज नाविक व हिंदुस्थानांत पोर्तुगीज सत्तेचा पाया घालणारा पहिला इसम. गामा हा थोर घराण्यांत जन्म पावला होता व लहानपणींच तो समुद्रावरील सफरी करूं लागला. त्यानेंच प्रथम केप ऑफ गुड होपला वळसा घालून हिंदुस्थानचा मार्ग शोधून काढला (१४९७). पोर्तुगॉलच्या राजानें त्याला याबद्दल चांगली बक्षिसी दिली. तो पुन्हां १५२४ त हिंदुस्थानच्या सफरीवर निघाला व पोर्तुगीज हिंदुस्थानचा पहिला व्हाइसरॉय झाला. पण याच सालीं तो कोचीन येथें वारला.

वास्को-द-गामा याला आफ्रिकेपासून हिंदुस्थानला पोंचविणारा वाटाड्या एक गुजराथी होता हें लक्षांत घेण्यासारखें आहे. आफ्रिकेंत हिंदु व्यापारी त्या वेळीं होते. हिंदुस्थानांत त्याला प्रवेश मिळवून देण्याचें काम कालिकतच्या झामोरिननें केलें.

**वास्तववाद**—(रिॲलिझम). अतींद्रियविज्ञानशास्त्रांतील हा एक वाद असून तो कल्पनावाद (आयडिॲलिझम) या वादाविरुद्ध आहे. त्याचा अर्थ असा कीं, बाह्य वस्तूंचें ज्ञान अन्तःस्फूर्तीनें तात्कडतोब होतें, आणि संवेदना-कल्पनानिरपेक्ष बाह्य वस्तूंना अस्तित्व असतें. मध्ययुगांत 'रिॲलिस्ट' आणि 'नॉमिनॅलिस्ट' या दोन पंथांमध्यें मोठा वाद होता. स्कूलमेनपैकीं स्कॉटिस्ट आणि थॉमिस्ट व इतर सर्व पक्ष वास्तववादी होते.

**वास्तुशिल्प**—घरें, देवळें, पूल, विहिरी, इ. ची जी विशेष आणि कौशल्ययुक्त रचना केलेली असते तिला म्हणतात. माणूस उत्पन्न झाल्यापासूनच त्याला राहण्यासाठीं कांहीं तरतूद करावी लागली. झाडांच्या ढोली, वनस्पतींचीं जा... कपारी, भुयारें, हीं निसर्गनिर्मित वसतिस्थानें मातीचीं घरें बांधूं लागला. या कामांत ह... सोई येत गेल्या. प्राचीन मिसरी लोकांच्या थडग्यांचे नमुने आज उपलब्ध आहेत, त्य... २५०० वर्षांपूर्वीं वास्तुशिल्प कसें होतें ... येते. छपरें सपाट दगडांचीं असत; भिंत... अनेक असून जाड व जवळ जवळ असत ... विविध नक्षी असे.

ग्रीकांनीं वास्तुशिल्पांत बरीत... आणि भव्यपणा हीं त्यांतील वै...

विजापूर — आसारमहाल (पृ. २३०७)

वास्तुशिल्प — इस्तंबूल येथील जुनी सेंट सोफियाची कबर (इ. स. ५३८) (पृ. २२९५)

वार्सा (पृ. २२९०)

आहे त्यावरून दिसतें कीं, पूर्वी वासुदेव संभाजीचा तेथें अमल होता व तो परगणा त्या वेळीं होळकर राज्यांत समाविष्ट होता.

मराठ्यांकडून १७७० मध्यें जे तीन परराष्ट्र वकील रोहिले व पठाण यांच्याशीं होळकरांकडून बोलणीं करण्याकरितां गंगापार पाठविले गेले त्यांत वासुदेव संभाजी होता.

वासुदेव संभाजीनें मौजे दाहिपुरी, परगणे आंबेडें, सरकार जालनापूर, सुभा औरंगाबाद येथें अर्ध्या गांवच्या पाटिलकीचा अधिकार व ३६० बिघे जमीन खाजगी मिळकत म्हणून संपादन केली. त्या संबंधानें ता. १८ ऑगस्ट सन १७७१ चें शहाआलम बादशहाकडून फर्मान मिळविलें तें खांडेकरांच्या संग्रहीं आहे. त्यानें आंबेड गांवीं एक चांगलें घर बांधून तेथें विहीर करून बाग लाविला होता. हें ठिकाण सन १८११ पावेतों खांडेकरांकडे चाललें. पंथपिपलोदा पाहा.

**वासुदेव सार्वभौम** (१४५०–१५२५)—बंगालमधील नदियाच्या पहिल्या तर्कशास्त्राच्या पाठशाळेचा संस्थापक. महेश्वर विशारदाचा हा पुत्र नदिया येथें जन्मला. यानंतर मिथिला येथील पक्षधराकडे यानें न्यायशास्त्राचें शिक्षण घेतलें. याची विद्वत्ता पाहून गुरूनेंच म्हणजे पक्षधरानेंच यास 'सार्वभौम' अशी पदवी दिली. 'तत्त्वचिंतामणि' व 'कुसुमांजली' हे ग्रंथ यानें तोंडपाठ केले होते. मिथिलेहून परत येत असतां आपणांस धोका निर्माण होऊं नये म्हणून नदियास जाण्याच्या निमित्तानें यानें बनारसला जाऊन तेथें वेदांचें अध्ययन केलें. गंगेशाच्या ग्रंथावर यानें 'सर्वभूषणनिरुक्ति' नांवाची टीका लिहिली आहे. रघुनाथशिरोमणि (नवन्यायशास्त्रावरील ग्रंथकार), वैष्णवपंथ-संस्थापक चैतन्य, रघुनंदन भट्टाचार्य (धर्मशास्त्रकार) व कृष्णानंद आगमवागीश हे याचेच शिष्य होत. नवद्वीप पाहा.

**वासोटा**—मुंबई, सातारा जिल्हा, जावळी तालुक्यांत तांबी गांवाच्या ईशान्येस ५ मैलांवर कोयना नदीच्या खोऱ्याच्या कोपऱ्यावर हा किल्ला बांधलेला आहे. खोऱ्याच्या तोंडाशीं वासोटा नांवाचें खेडें आहे. पायथ्यापासून हा ८०० फूट उंच आहे. कोंकणच्या बाजूनें २७०० फूट उंच आहे. रस्ता मेटइंदोली गांवावरून आहे. क्षेत्रफळ १५ एकरांवर आहे. किल्ल्यावर महादेवाचें व चंडीचें देवालय आहे. एक कडेलोटाचा कडा १५० फूट खोल आहे. त्यास बाबूखाड म्हणतात. हा किल्ला फार जुना असून कोल्हापूरच्या शिलाहार घराण्यांतील दुसऱ्या भोजानें बांधला. दरवाजा मुसलमानी तऱ्हेचा दिसतो. १६५५ त हा शिवाजीनें घेतला. त्यापूर्वी तो माने व शिरके यांच्या ताब्यांत असे. शिवाजीनें यास वज्रगड असें नाव दिलें होतें. पेशवाईंत या किल्ल्यांत राजकीय कैदी ठेवीत. प्रतिनिधीला यावर कैदेंत ठेवलें असतां त्याची रक्षा ताई तेलीण हिनें हा घेतला व बापू गोखले याच्याशीं बरेच दिवस लढत दिली. याविषयीं एक आर्याहि प्रसिद्ध आहे. १८१७ त खडकी येथें पराजय झाल्यानंतर सातारचा राजा व त्याचें कुटुंब यांस या किल्ल्यांत ठेवलें होतें. येथें हंटर व मॉरिसन या दोन युरोपियनांस कैद करून ठेवलें होतें. इंग्रजांनीं हा किल्ला भास्करपंत या किल्लेदाराकडून वीस तास तोफांचा भडिमार करून घेतला.

**वास्को-द-गामा** (१४६९–१५२४)—एक विख्यात पोर्तुगीज नाविक व हिंदुस्थानांत पोर्तुगीज सत्तेचा पाया घालणारा पहिला इसम. गामा हा थोर घराण्यांत जन्म पावला होता व लहानपणींच तो समुद्रावरील सफरी करूं लागला. त्यानेंच प्रथम केप ऑफ गुड होपला वळसा घालून हिंदुस्थानचा मार्ग शोधून काढला (१४९७). पोर्तुगॉलच्या राजानें त्याला याबद्दल चांगली बक्षिसी दिली. तो पुन्हां १५२४ त हिंदुस्थानच्या सफरीवर निघाला व पोर्तुगीज हिंदुस्थानचा पहिला व्हाइसरॉय झाला. पण याच सालीं तो कोचीन येथें वारला.

वास्को-द-गामा याला आफ्रिकेपासून हिंदुस्थानला पोंचविणारा वाटाड्या एक गुजराथी होता हें लक्षांत घेण्यासारखें आहे. आफ्रिकेंत हिंदु व्यापारी त्या वेळीं होते. हिंदुस्थानांत त्याला प्रवेश मिळवून देण्याचें काम कालिकतच्या झामोरिननें केलें.

**वास्तववाद**—(रिॲलिझम). अतींद्रियविज्ञानशास्त्रांतील हा एक वाद असून तो कल्पनावाद (आयडिॲलिझम) या वादाविरुद्ध आहे. त्याचा अर्थ असा कीं, बाह्य वस्तूंचें ज्ञान अन्तःस्फूर्तीनें ताबडतोब होतें, आणि संवेदना-कल्पनानिरपेक्ष बाह्य वस्तूंना अस्तित्व असतें. मध्ययुगांत 'रिॲलिस्ट' आणि 'नॉमिनॅलिस्ट' या दोन पंथांमध्यें मोठा वाद होता. स्कूलमेनपैकीं स्कॉटिस्ट आणि थॉमिस्ट व इतर सर्व पक्ष वास्तववादी होते.

**वास्तुशिल्प**—घरें, देवळें, पूल, विहिरी, इ. ची जी विशेष आणि कौशल्ययुक्त रचना केलेली असते तिला म्हणतात. माणूस उत्पन्न झाल्यापासूनच त्याला राहण्यासाठीं कांहीं तरतूद करावी लागली. झाडांच्या ढोली, वनस्पतींचीं जाळीं, खडकांतील कपारी, भुयारें, हीं निसर्गनिर्मित वसतिस्थानें टाकून तो दगडमातीचीं घरें बांधूं लागला. या कामांत हळूहळू सौंदर्य आणि सोई येत गेल्या. प्राचीन मिसरी लोकांच्या घरांचे, देवळांचे व थडग्यांचे नमुने आज उपलब्ध आहेत, त्यांवरून सुमारें खि. पू. २५०० वर्षांपूर्वी वास्तुशिल्प कसें होतें याची चांगली कल्पना येते. छपरें सपाट दगडांचीं असत; भिंती जाड असत व खांब अनेक असून जाड व जवळ जवळ असत; त्यांच्या मथळ्यावर विविध नक्षी असे.

ग्रीकांनीं वास्तुशिल्पांत बरीत प्रगति केली. साधेपणा आणि भव्यपणा हीं त्यांतील वैशिष्ट्यें होत. खि. पू. ५ व्या

विजापूर — आसारमहाल (पृ. २३०७)

वास्तुशिल्प — इस्तंबूल येथील जुनी सेंट सोफियाची कबर (इ. स. ५३८) (पृ. २२९५)

वार्सा (पृ. २२९०)

शतकांतील ग्रीक शिल्पकलेंत डोरिक, आयोनिक आणि कॉरिन्थियन अशा तीन पद्धती दिसतात. अथेन्स येथील पार्थेनॉन देवस्थान हा ग्रीक शिल्पाचा उत्कृष्ट नमुना आहे. पुढें उदात्त सावेषणा जाऊन अलंकाराला फाजील महत्त्व आलें. अलेक्झांडर बादशहानंतर ग्रीक कला लोपली.

रोमन लोकांनीं नवी भर टाकली नसली तरी त्यांचें लक्ष गटारें, पूल अशांसारखीं कामें करण्याकडे विशेष दिसतें. कमानींची पद्धत या वेळीं रूढ झाली. ऑगस्टस बादशहाच्या कारकीर्दींत रोमन शिल्प कळसास पोंचलें होतें. वर्तुलाकार नाट्यगृहें, स्नानगृहें, मंदिरें, विजयतोरणें, इ. अवशेष आजहि प्रेक्षणीय वाटतात. इ. स. च्या दुसऱ्या शतकांत रोमन शिल्पाला उतरती कळा लागली. पुढें गॉथ, व्हॅन्डॉल, वगैरे रानटी टोळ्या येऊन त्यांनीं या शिल्पवास्तूंचा विध्वंस आरंभिला. पुढें लोम्बार्ड आणि नॉर्मन रोमानेस्क कलापद्धती सुरू झाल्या. अर्धवर्तुलाकार कमान ही नॉर्मन रोमानेस्क पद्धतीची विशेष खूण होय. इंग्लंडमध्येंहि नॉर्मन काळांत ही पद्धत आली. या दोन पद्धतींच्या जोडीला बायझान्टाइन कला (पाहा) आली. व्हेनिस येथील सेंट मार्कचें चर्च या शिल्पाचा नमुना आहे.

आठव्या शतकानंतर युरोपांत मूरांच्या आगमनामुळें मूर शिल्प (पाहा) दिसूं लागलें. तेराव्या शतकांत गॉथिक शिल्प (पाहा) इंग्लंड, फ्रान्स, आणि जर्मनी देशांत प्रसृत झालें. युरोपांत पुनरुज्जीवनकालांतलें शिल्प (पाहा) इटलींत जें आहे, त्यापेक्षां नवीन पुढें फारसें झालेलें नाहीं. भारतीय व इतर विशेष प्रकारच्या शिल्पपद्धती स्वतंत्र विवेचिल्या आहेत.

आजची अमेरिकन पद्धत अगदीं वेगळी जरी नाहीं तरी ज्यासाठीं वास्तु हवी त्याच्या सोयींनीं इमारती बांधलेल्या असतात. कचेरीच्या उपयोगासाठीं बांधलेल्या 'गगनचुंबी' (स्काय-स्क्रेपर) इमारती वस्तुस्थितीला धरूनच बांधलेल्या असतात. पोलादी तुळया आणि यांत्रिक उडते जिने यांमुळें इमारतीला कितीहि मजले ठेवले तरी त्या टिकाऊ व सोयीच्या करतां येतात. लहान लहान झोंपडीवजा घरें देखील थोडक्यांत सौंदर्यपूर्ण आणि सुसज्ज करण्याच्या योजना आधुनिक काळांत सहज सुलभ होत आहेत.

भारतीय वास्तुशिल्प—प्राचीन भारतीय शिल्पात बहुधा लांकडाचा उपयोग करीत, हें पाटलीपुत्रासारखें राजधानीचें शहरहि लांकडी कोटानें वेढलेलें होतें यावरून अनुमानितां येतें. पुढें दगडांचा सर्रास उपयोग होऊं लागला. इराणमधील ॲकेमेनियन राजांच्या कृती पाहून इकडे भारतांत त्याप्रमाणें शिल्पकाम होऊं लागलें, असें ठाम वाटतें. अशोकाचें पाश्चिम राष्ट्रांकडे दळणवळणहि असे. त्याच्या कारकीर्दींत इराणी धर्तीचे शिरोभाग असलेले मोठमोठे दगडी खांब उभारण्यांत आले. त्याच्या लाटांवरील नक्षीहि इराणी धर्तीची आहे.

यानंतर स्तूपांची रचना दृष्टीस पडते. खालीं वाटोळ्या नगाऱ्याचा आकार व त्यावर लहानसा घुमट अशी ही रचना असते. या नगाऱ्याभोंवतीं दगडी कठडा असतो. यावर व याच्या तोरण-दरवाजांवर शिल्पकाम असतें. सांची येथील स्तूप अद्यापि अभंग आहे. त्याचा काळ ख्रि. पू. १२० असा असावा.

यापुढें लेणीं येतात. यांत चैत्य व विहार असे दोन भाग असतात. चैत्य बरेंच उंच असून त्याला पुढें नालाच्या आकाराची खिडकी असते. यांत दालनें व मध्यें नाभि असते. भिक्षूंना राहण्यासाठीं जवळच विहार बांधलेले असतात. विहारांत मध्यभागीं एक मोठें दालन असून बाजूस खोल्या असतात. खोल्यांतून दगडी उंचवटे निजण्यासाठीं केलेले असतात. कार्लें येथील लेणें या दृष्टीनें नमुनेदार आहे. लेणीं पाहा.

हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील प्रदेशांत (गांधार देशांत) ग्रीक पद्धतीचें पाषाणशिल्प दृष्टीस पडतें. यांतील दगडी खांब कॉरिन्थियन मथळे बसवून तयार केलेले असतात. बऱ्याच बुद्ध प्रतिमाहि सांपडतात. ख्रि. पू. पाहिलें शतक ते इ. स. चौथें शतक हा या शिल्पाचा काळ असावा.

गुप्तकालांत शिल्पकला निराळ्या प्रकारची दिसते. खांबाचें पार्सेपॉलिटन स्वरूप जाऊन त्यांना चौकोनी आकार येऊं लागला. देवळांचीं शिखरें निमुळतीं होत गेलीं व शेवटीं त्यांवर खालीं तबकडी व वर चेंबूसारखा कळस आला. शिखराच्या पृष्ठभागावर नालासारखी एकजात नक्षी असे. ही शिल्पपद्धति सर्व देशभर मुसलमानी अमदानीपावेतों होती.

काश्मीरमध्यें मुसलमानी अमदानीपर्यंत एक निराळेंच शिल्प रूढ होतें. त्याचा नमुना मार्तंडाच्या देवळांत दृष्टीस पडतो. देवळांवर व गुंफांच्या दरवाजांवर त्रिदळी कमान आहे. ती चैत्याच्या कमानीप्रमाणें वाटते. खांब डोरिक पद्धतीचे वाटतात. पलीकडे हिमालयांतील देवळें बहुतेक लांकडी आहेत. नेपाळ खोऱ्यांतून स्तूप आढळतात. इकडील देवळें मजल्यांचीं असतात.

दक्षिण कानडा जिल्ह्यांत *दुहेरी तिहेरी उतरतीं छपरें असलेलीं* जैन देवळें व बस्ती आहेत. केंबळी घरांच्या रचनेवरून ही पद्धति आलेली दिसते. हीं आंत चांगलीं भव्य व नक्षीदार असतात. खांब बौद्ध लाटांप्रमाणें वाटतात.

द्राविडी शिल्प अगदीं वेगळेंच दिसेल. मद्रासच्या दक्षिणेस समुद्रकांठीं असलेलें मामल्लपुरम् देवस्थान म्हणजे दगडी रथच आहेत. हे प्राचीन द्राविड शिल्पाचे नमुने सातव्या शतकांतले आहेत. द्राविडी देवस्थानें अतिशयच आहेत. देवळांना चौथरा असून गर्भगृहांत मूर्ति ठेवलेली असते. पुढें एकदोन मोठे सभामंडप असतात. देवावर निमुळतें व मजल्यांचें शिखर असतें व शेवटीं घुमट असतो. छतपट्टी सारखी उतरती नसून बांकदार असते. देवळाला एक किंवा अधिक प्राकार असतात व त्यांवर चारहि बाजूंस उंच उंच गोपुरें असतात. त्यांची रुंदी उंचीपेक्षां दुप्पट असते. तेव्हां मुख्य देवळापेक्षां गोपुरेंच जास्त उठावदार दिसतात. अशा देवळाचा नमुना म्हणजे तंजावरचें प्रसिद्ध देवालय होय. याचें शिखर अकरा मजल्यांचें आहे. प्राकार दोन आहेत. हें देऊळ (मध्य मंदिर) १०२५ च्या सुमाराचें असावें. त्रिचनापल्लीचें देवालय सर्व हिंदुस्थानांत मोठें आहे. याचा पांचवा प्राकार १८ व्या शतकांतला आहे.

सहाव्या शतकापासून दक्षिणेस चालुक्य पद्धतीचीं देवळें बांधलीं गेलीं. प्रथम ही पद्धति द्राविड पद्धतीप्रमाणें होती, पण पुढें तींत निराळेपणा आला. चालुक्य देवळाचें सामान्य स्वरूप म्हणजे एक मधलें दालन व त्याभोंवतीं तीन देवघरें. दालन चार किंवा त्याच्या कांहीं पट संख्येनें असलेल्या खांबांचें असे. वर छपर असे. गर्भगृहाचा आकार नक्षत्राकार असतो. त्याचे सर्व कंगोरे एका वर्तुळांत असतात. शिखरें पायऱ्यांचीं असतात.

हळेबीड येथें जें मोठें देवालय आहे तें इ. स. १२५० त बांधण्यास सुरुवात झाली असावी. हें जोडदेवालय १६०' × १२२' इतक्या मापाचें असून त्यावर अत्यंत बारीक व उठावदार शिल्प आहे; तें पाहून माणूस आश्चर्यानें थक्क होतो. म्हैसूर संस्थानांत दुसरीं कांहीं उत्कृष्ट शिल्पाचीं देवळें आहेत.

उत्तर हिंदुस्थानांत देवळांची रचना दक्षिणेंतल्यापेक्षां जास्त विस्तृत व बहुविध असते. देवळांचीं शिखरें वक्ररेषान्वित असून शिल्प बहुधा नसतें. बारा खांबांवर माया अष्टकोनी ठेवून घुमट चढविला असतो. याच्या एका प्रकाराला जैन धाटणी म्हणतात. पश्चिम हिंदुस्थान आणि राजपुताना यांत ही धाटणी दिसते. यांत सज्जावरील छतें (मेघडंबरी) व दालनावरील आणि देवडीवरील घुमट फार सुंदर व नक्षीदार असतात.

गुजराथी शिल्पपद्धति ११ व्या शतकांतील मुधेरचें देवस्थान व बुंदेलखंडांतील खाजुराहो देवळें यांत दिसून येते. ही पद्धति हिंदु आणि जैन पद्धतीचें मिश्रण आहे. या देवळांतून आंत-बाहेर सर्वत्र नक्षीकाम असतें. ओरिसांतील भुवनेश्वराचें व कोनारकचें देवालय हीं अप्रतिम अशींच निःसंशय म्हटलीं पाहिजेत. एका मोठ्या शिखराभोंवतीं अनेक लहान शिखरें यांत असतात.

मुसलमानी किंवा इंडो-सॅरसेनिक शिल्पकला १३ व्या शतकापासून दृष्टीस पडते. प्रथम पठाणी अमलांत कुतुबमिनार, अल्तमष मशीद, अला-इ-दरवाझा, वगैरे सुंदर बांधकाम झालें. १४ व्या शतकांत पठाणी शिल्पांत भव्यपणा व साधेपणा आला. उतरत्या भिंती हें याचें एक वैशिष्ट्य म्हणतां येईल. दिल्लींतील ग्यासुद्दिन तुघ्लखची मशीद हें याचें एक उदाहरण म्हणून दाखवितां येईल. पुढील शतकांत पुन्हां अलंकारिक रचनेकडे ओघ वळला. मशिदीचे दर्शनी भाग जास्त सुशोभित, नक्षीदार करण्यांत येऊं लागले. प्रत्येक राजघराण्याच्या विशिष्ट अशा शिल्पपद्धती निघाल्या. जौनपूरच्या शर्की घराण्याच्या थोड्याच मशिदी आहेत, पण त्या फार नाजूक काम केलेल्या व शोभिवंत आहेत. महिरपी प्रथम या वेळीं दृष्टीस पडतात. मांडवगड येथील मशिदी व महाल पठाणी पद्धतींत कांहीं बदल करून बांधलेल्या आहेत. येथील जामी मशिदींतील पटांगण अप्रतिम नमुना आहे. सामर्थ्याचा आविष्कार पण वैभवाचा साधेपणा यांत प्रतीत होतो. ही शिल्पपद्धति निव्वळ कमानदार आहे असें दिसेल.

बंगालमधील मुसलमानी शिल्प दगड कमी असल्यानें विटांवर केलेलें आढळतें. विटांच्या मोठ्या इमारतींना जड खांब व जाड भिंती लागतात. तेव्हां त्यांना बाहेरून गुळगुळीत कौलें बसवीत. कोंपऱ्यावरील वळचणींना वक्रस्वरूप देण्याची यांतील तऱ्हा पुढें सर्व हिंदुस्थानांत पसरली. गौरजवळची आदीन मशीद या शिल्पपद्धतीचा नमुना म्हणतां येईल.

गुलबर्ग्याची मोठी मशीद इतर मशिदींपेक्षां निराळी आहे. तींतील २१६' × १७६' चें मधलें पटांगण ६३ लहान घुमटांनीं आच्छादित आहे. बहामनी मशिदी वैभवदर्शक वाटतात. अहमदाबादेंतील मुसलमानी शिल्पपद्धति इतरांपेक्षां उत्कृष्ट वाटते. ती अस्सल भारतीय आहे. कारागीर हिंदूच होते. सर्व सौंदर्यकल्पना व मागील ज्ञान एकवटून या पद्धतीचा उदय झालेला दिसतो. दर्शनी बाजूच्या मध्यभागावर एक मजला चढवून त्याच्यापुढें मनोरे जोडीत. हा मजला मधल्या घुमटाखालीं सज्जासारखा दिसे. नक्षीदार खांब व दगडी जाळ्या या रचनेंत दिसतात.

विजापूरची कला उत्तर हिंदुस्थानच्या मुसलमानी कलेपेक्षां निराळी आहे. हींत प्रमाणाची स्थूलता व वैभवशीलता हे विशेष गुण आहेत. त्यांत हिंदु पद्धतीचा मागमूसहि नाहीं. स्वतंत्र पद्धति कल्पिलेली दिसते. गोलघुमटांतील झुंबर (पेंडेन्टिव्ह) बाह्य प्रतिक्षेपणांना विरोध करण्यासाठीं बांधलें आहे, हें कळून पाश्चात्य शिल्पज्ञांनाहि अचंबा वाटतो. घुमट फारच मोठा आहे. 'इब्राहीम रोझा' मध्यें नक्षीकाम विशेष आहे.

मोंगल अमदानींत अकबराच्या वेळचीं अनेक सुंदर बांधकामें इंडो-सॅरॅसेनिक पद्धतीचीं आहेत. पठाणांप्रमाणेंच मोंगल जातहि इमारतींची शोकीन होती. त्या सौंदर्यसंपन्न व अलंकृत करण्यावर मोंगल बादशहांचा विशेष कटाक्ष. हुमायूनची मशीद, फत्तेपूर-शिक्री येथील इमारती, सिकंदरा येथील अकबराची कबर, इत्यादि या गोष्टीची साक्ष देतील. जहांगीरच्या वेळीं शिल्पांत इराणी मिश्रण आलें. कांचमिना व संगमरवरी दगड यांचा जास्त उपयोग होऊं लागला. शहाजहानच्या अमदानींत जास्त नाजूकपणा, सौंदर्य आणि तपशिलाचा बारकावा हीं प्रत्ययास येतात. ताजमहाल व दिल्ली-आग्रा येथील राजवाडे व मशिदी जगप्रसिद्धच आहेत. या बादशहानें आपलें नांव अजरामर केलें यांत शंका नाहीं.

पुढील कालांत शिल्पाचा ऱ्हास होत गेलेला दिसेल. स्वतंत्र *भारतीय शिल्प राहिलें नाहीं तर सरमिसळ फार झाली.* अर्वाचीन जगांत आंतरराष्ट्रीय अशी सर्वसामान्य पद्धति येत चालली आहे. देश्य साधनांप्रमाणें तींत कमीजास्तपणा येतो इतकेंच.

**वाहतूक**—एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं माणसें व माल नेण्याचा व्यापार फार प्राचीन काळापासून चालत आला आहे. त्याचीं साधनें मात्र बदलत गेलीं. वाहनांना जनावरें जोडण्याची प्रथा अद्यापिहि आहे. कांहीं ठिकाणीं माणसेंहि वाहनें ओढून नेतात. बैलगाड्या व घोड्याच्या गाड्या, लांबच्या प्रवासाला आगगाड्या सुरू झाल्यापासून कमी होत गेल्या. इ. स. १८१२ पासून वाफेची शक्ति वाहनांसाठीं उपयोगांत आणूं लागले. १८९० सालीं लंडनमध्यें पहिली विजेची गाडी निघाली. नंतर अंतर्ज्वलनाचीं एंजिनें, मोटारगाड्या येऊं लागल्या व तीच शक्ति वातनौकांना व विमानांना पण उपयोगी पडूं लागली. समुद्राखालून वाहतूक करण्याला विद्युत्संचयघटमाला आणि विद्युच्चालक (मोटार) या यंत्रांनीं मदत केली. आज आगगाड्या, जहाजें, विमानें, ट्रॅमगाड्या, मोटारी व साध्या गाड्या हीं वाहतुकीचीं साधनें सुव्यवस्थित चालू आहेत. अगदीं थोड्या वेळांत मोठा लांबचा प्रवास सुखानें करतां येतो.

हिंदुस्थानांत अद्यापि या बाबतींत अनवस्था आहे. खेडोपाडीं रस्ते नाहींत; सर्व नद्यांवर पूल नाहींत. पावसाळ्यांत अनेक खेडीं तुटल्याप्रमाणें होतात. मोटार वाहतूकहि प्रत्येक खेड्यापर्यंत पोहोंचली नाहीं. अंतर्गत जलवाहतूक अद्यापि कोठें फारशी नाहीं. विमानांची वाहतूक फारच थोडी व महाग. पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें मालाला व शेतीला विमानवाहतुकीचा उपयोग होण्यास कालावधि लागेल.

सडका—आज हिंदुस्थानांत कच्च्या सडका २,९६,४३८ मैल व पक्के रस्ते ६९,००० मैल भरतात. (रस्ते पाहा.) इंग्लंडशीं तुलना केल्यास ३० लाख मैल रस्ते पाहिजेत. अमेरिकेंत तर २५,००,००० मैल कच्चा व ६,००,००० पक्का रस्ता आहे.

आतां आगगाड्यांच्या मार्गांविषयीं तुलनात्मक विचार करतां असें दिसेल कीं—

| देश | मैल | दशलक्ष प्रजेशीं प्रमाण |
|---|---|---|
| कॅनडा | ४३,१७३ | ४,३१८ |
| अमेरिका | २,८१,८१६ | २,१३२ |
| इंग्लंड | २१,१६२ | ४०६ |
| भारत | ४२,७१३ | १२० |

जलमार्ग–वाहतूक—अंतर्गत वाहतूक नावाची व यथातथाच आहे. किनारा व सागर वाहतूकहि परदेशी कंपन्या करतात. माल व प्रवासी वाहतुकीच्या बाबतींत जपान स्वतःच्या जलवाहतूक कंपन्यांना वर्षाला ७५ लाख येन मदत देतात. आतां *टनेजवरून तुलना करतां असें दिसेल कीं*—

अमेरिका १ कोटि ३४ लक्ष, ग्रेट ब्रिटन १ कोटि ९७ लक्ष व भारत अवघे २,७२,००० टनेज वापरतें.

एके काळीं भारताचें नौकानयन फार समर्थ असे. पण आज पूर्णतया याबाबत भारत परावलंबी आहे. ९० टक्के माल व प्रवासी सागर–वाहतूक परदेशी कंपन्या करतात.

मोटार वाहतूक—१९३० सालीं हिंदुस्थानांत ३२,७०० मोटार गाड्या होत्या. व त्या ७½ कोटींना विकत घेतल्या होत्या. १९३२ सालीं २,००,०००; १९३४ सालीं १,८६,७०६; १९३६ सालीं १,४२,९२४; व १९४४ सालीं १,३१,०६९ मोटरगाड्यांची नोंद झालेली होती. (मोटरगाडी पाहा.)

लोकसंख्येशीं मोटारींचें प्रमाण कसें पडतें तें पाहा:—

| देश | मोटरसंख्या | लोकसंख्येशीं मोटारींचें प्रमाण |
|---|---|---|
| अमेरिका | २ कोटी ६८ लाख | पांच लोकांना एक गाडी असें प्रमाण पडतें. |
| इंग्लंड | २३ लाख | २० लोकांना १ |
| भारत | २ लाख | १३०० लोकांना १ |

विमान–वाहतूक—(एरियल ट्रॅन्स्पोर्टेशन). हवेंतून प्रवास करण्याच्या आरंभींच्या काळीं विमानांतून टपाल पाठविण्यांत येत असे. परंतु लवकरच प्रवासी व मालहि पाठविण्यांत येऊं लागला. १९१९ मध्यें प्रथम विमान–वाहतूक सुरू झाली त्या वेळीं सर्व जगांतील वैमानिक रस्त्यांची लांबी फक्त ३२०० मैल होती. परंतु १९३८ सालीं तीच २,३४,९२२ इतकी झाली. प्रथम विमानांचा वेग दर ताशीं ७५ मैल असे तो आतां २५० मैलपर्यंत वाढला. आतां विमानें प्रवासी घेऊन रात्रीचाहि प्रवास करूं लागलीं आहेत व त्यांत उतारूंची निजण्याचीहि सोय करण्यांत येते. तसेंच विमानामध्यें जेवणाखाण्याचीहि सोय

करण्यांत येते. दूर अंतरावर प्रवास करणाऱ्या विमानांत सुमारें ७४ प्रवासी व १२ कामगार असतात व त्यांत चाळीस प्रवाशांची निजण्याची सोय असते व शिवाय ८०० पौंड टपाल नेतां येतें. यांची गति ताशीं २२५ मैल असते. विमानतळावर उतरण्याची व चढण्याची सर्व सोय केलेली असते. तसेंच विमानें ठेवण्याच्याहि जागा चांगल्या बांधलेल्या असतात. विमानतळावरील उड्डाणमार्गाची लांबी सुमारें एक मैल असते. विमानतळावर एक चालक, एक रेडिओ–चालक, हवामान–निरीक्षक व इतर अधिकारी असतात. विमानतळावर वादळ, सोसाट्याचा वारा, पाऊस किंवा बर्फ पडत असल्यास तें दाखविण्याकरिता विशिष्ट खुणा करण्यांत येतात. तसेंच निरनिराळे सूचक दिवे लावलेले असतात. व मोठमोठे प्रकाशाचे झोतहि मार्गदर्शनाकरितां सोडण्यांत येतात. मोठ्या विमानतळाखेरीज कांहीं ठिकाणीं उतारक क्षेत्रेंहि बनविण्यांत येतात व त्या ठिकाणीं अवश्य तेव्हां उतरतां येतें.

हिंदुस्थानांत १९४८ सालीं ४१ बिनलष्करी विमान-योजना ( सर्व्हिसेस ) अमलांत होत्या व २७ मार्गांवरून त्या चालू होत्या. रोजच्या योजना १७ व आठवड्याच्या ७० चालू होत्या. आठ वाहतूक कंपन्यांचे १६७ एअरक्रॅफ्ट, २३४ पायलट व १६८ हून जास्त विमाननोकर यांनीं ४८,५८,८९३ मैलांचा प्रवास करून १,२४,७५३ प्रवासी नेले व सामानाचें वजन २,५७३ टन जानेवारी ते एप्रिल १९४८ या काळातलें होतें.

**वाळवण यंत्र**—( ड्रायिंग मशिन ). हें यंत्र कपडे वाळविण्याकरितां उपयोगांत आणतात. यामध्यें सामान्यतः २२ इंच व्यासाचीं सुमारें ३० किंवा अधिक पंचपात्रीं वापरण्यांत येऊन तीं वाफेच्या साहाय्यानें गरम ठेवण्यांत येतात. या यंत्राचा उपयोग विशेषतः कापड शुभ्र करण्याच्या कारखान्यांत ( ब्लीचिंग ), रंगविण्याच्या कारखान्यांत आणि खळ देऊन मोहरेदार करण्याच्या कारखान्यांत वापरण्यांत येतात. प्रत्येक पंचपात्राला एक संरक्षक पडदा असतो. व त्यांतून जसजशी वाफ थंड होत जाईल तसतशी हवा आंत येण्याची योजना केलेली असते. पंचपात्राचा आंतील भाग कोरडा राहावा याकरितां वाफेचें झालेलें पाणी काढून घेण्याचीहि योजना केलेली असते. या पंचपात्रावरून रुळांच्या साहाय्यानें कापड नेण्यांत येतें व तें एकाच्या खालून व दुसऱ्याच्या वरून याप्रमाणें उष्ण असलेल्या पंचपात्राच्या दोन रांगातून नेण्यात येऊन एका रुळावर गुंडाळण्यांत येतें. अशाच प्रकारचें दुसरें एक यंत्र केंद्रोत्सारी पद्धतीनें चालविण्यांत येतें.

**वाळवी**—हे संघ करून राहणारे कीटक आहेत. म्हणजे पुष्कळ कीटक एका ठिकाणीं राहतात. उष्ण कटिबंधांत व विशेषतः पश्चिम आफ्रिकेंत हे किडे अतिशय असतात. शेतांत किंवा इतर ठिकाणीं जीं वारुळें दिसतात तीं यांचीं घरें होत. हीं शंक्वाकार असून १० किंवा १२ फूट उंच असतात. घरांत अनेक निरनिराळे विभाग असतात. या वारुळांच्या आंत व जमिनीच्या खालीं तीनचार फूट खोलीवर यांचा सर्व व्यवहार एखाद्या लहानशा संस्थानासारखा चाललेला असतो. वाळवींत चार प्रकारचे कीटक आढळतात: राजे, राण्या, शिपाइ व कामकरी. त्यांना त्यांच्या व्यवसायाप्रमाणें हीं नांवें दिलेलीं

आहेत. यांत राणीचें विशेष महत्त्व आहे. ‘ शिपाई ’ कीटकांकडे संस्थानचें संरक्षण करण्याचें काम दिलेलें असतें. ‘ कामकऱ्यां ’कडे अन्न मिळवून आणणें, तें सर्व किड्यांना पोंचविणें, लहान लहान अर्भकांची जोपासना करणें, राणीची तैनात संभाळणें, अशीं कामें दिलेलीं असतात. ‘ राणी ’ कडे नुसतीं अंडीं घालण्याचेंच फक्त काम असतें. ती एका दिवसांत सुमारें ३००० पर्यंत अंडीं घालूं शकते. या अंड्यांची पुढील सर्व व्यवस्था कामकऱ्यांकडेच असते. वाळवींकडून पिकांना व पदार्थांना पुष्कळ उपद्रव होतो. तेव्हां ‘ राणी ’ नाहींशी करण्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. वाळवी मारण्याच्या यंत्रांतून सोमल व गंधक यांचा धूर वारुळांत सोडला म्हणजे राणी मरते.

**वाळवें**—मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक तालुका. शिराळ पेटा धरून याचें क्षेत्रफळ ५४५ चौरस मैल आहे. तालुक्यांत दोन मोठीं गांवें आहेत ( उरण–इस्लामपूर व अष्टें ). लो. सं. दीड लाख. या तालुक्यांतून कृष्णा व मोरणा या दोन नद्या वाहतात. वाळवें गाव हें कृष्णा नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें असून इस्लामपुरापासून ७ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें ५,०००. येथें थोरात देशमुखांचा एक मोठा वाडा आहे. थोरात देशमुख शाहू छत्रपतीपासून उदयाला आले. पुढें १८१८

सालीं इंग्रजांनीं खालसा करीपर्यंत वाळवें थोरात देशमुखांकडेच मुखत्यारीनें होतें.

**वाळा**—हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सीलोन यांतील सपाटीच्या व कमी उंचवट्याच्या प्रदेशांत, ओलसर जागीं, विशेषतः तळ्यांच्या अथवा प्रवाहांच्या कांठीं वाळा आढळतो. हा गवतासारखा असून याच्या मुळ्यांस वास असतो. याचीं बेटें वाढतात. उन्हाळ्यांत वाळ्याचे सुगंधी पडदे दारांवर लावून त्यांवर पाणी शिंपडतात. त्यामुळें आंतील वातावरण थंड होतें. सांवतवाडी, पुणें, चांदा, वगैरे ठिकाणीं वाळ्याचे पंखे, सुंदर टोपल्या, वगैरे जिन्नस होतात. मद्रास इलाख्याच्या बंदरांतून पुष्कळ वाळा युरोपांत रवाना होतो. इ. स. ११०३ ते ११७४ पर्यंत वाळ्यावर कर वसूल केला जात होता, असें कांहीं शिलालेखांवरून समजतें. पाण्याबरोबर वाळ्याचें ऊर्ध्वपातन केलें असतां सुवासिक तेल अथवा अर्क मिळतो. वाळ्याचें तेल लवकर उडून जात नाहीं. या त्याच्या गुणाचा फायदा घेऊन इतर सुगंधी तेलें तयार करण्याकरितां या तेलाचा उपयोग करतात; वाळ्याच्या तेलाला युरोपांत चांगली किंमत येते. वाळ्याचा उल्लेख करणारा पहिला युरोपियन गृहस्थ न्हीड हा होय. उन्हानें तोंडाला त्रास होऊं नये म्हणून वाळ्याचीं उटणें लावितात. वाळ्याची व रक्तचंदनाची पूड टाकलेल्या सुगंधी व शीतल पाण्यानें आंघोळ केल्यास आराम वाटतो. कागद करण्याला वाळ्याचें गवत उपयोगी पडतें. कोंवळीं पानें गुरें खातात, व घरें शाकारण्याकरितांहि त्यांचा उपयोग होतो.

**वाळी**—ही वेल मयाळीची एक जात आहे. हिच्या मुळास नेहमीं पाणी असेल तर वेल वर्षभर टिकते व पन्नास–साठ हातपर्यंतहि पसरते. वेलीचे फांटे अंगठ्याएवढे जाड होतात. हिचे ताणे तोडून दुसऱ्या ठिकाणीं लावल्यास रुजतात. पाल्याची भाजी करतात.

**वाळींत टाकणें**—गुन्हेगारांना धर्माचा, समाजाचा फायदा न देण्याची पूर्वीं ही शिक्षा असे. युरोपांत धर्मगुरु राजावर देखील असे बहिष्कार घालीत. धर्मसुधारणेच्या (रेफॉर्मेशन) काळांत इंग्लंडचा ८ वा हेन्री आणि एलिझाबेथ राणी यांवर पोपनें बहिष्कार टाकला होता, हें प्रसिद्धच आहे. आपल्याकडे सामाजिक गुन्ह्यासाठीं आरोपी व त्याचें कुटुंब यांना जात-पंचायत वाळींत टाकी. प्रायश्चित्त घेतल्यानंतर पुन्हां जातींत व्यवहार सुरू होत. 'हुक्कापाणी बंद करणें' हा वाक्प्रचार यासाठींच आहे. जातिबहिष्कृतता तर फार जाणवे व शंकराचार्यांकडून आज्ञापत्रें आणवून बहिष्कार उठत. आज हें शस्त्र निकामी झालें आहे.

**वाळू**—खडकाचें चूर्ण होऊन जे बारीक कण बनतात त्यांस वाळू म्हणतात. हे सामान्यतः सिकतामय असतात. कांहीं वाळूचा रंग पिवळा, तांबडा, किंवा पिंगट असतो; याचें कारण त्यांत थोड्या प्रमाणांत लोह उज्जप्राणिद (आयर्न हायड्रॉक्साइड) असून तें त्या कणांच्या पृष्ठभागीं दिसून येतें. सोनें किंवा प्लॅटिनमसारखे कांहीं धातू वाळूशीं मिश्रित आढळतात. कांच करण्याकरितां शुद्ध सिकतामय वाळू फार महत्त्वाची असते. तसेंच अशा वाळूचा चुना–गाळणीं किंवा ओतकामाचे सांचे तयार करण्याकरितांहि उपयोग होतो. समुद्रकांठीं मैलच्या मैल लांब वाळू पसरलेली असते व कांहीं ठिकाणीं वाळूचे डोंगरहि बनलेले आढळतात.

वाळूचा कागद (सँड पेपर)–हा एखादा पृष्ठभाग गुळगुळीत करण्यासाठीं किंवा झिलई देण्यासाठीं तयार केलेला असतो. एका जाड कागदावर गोंदानें वाळू चिकटवून असा कागद करतात. कांच कागद व एमरी कागद यांचा उपयोग या कागदापेक्षां धातूवरील कामासाठीं जास्त होतो. पेन्सिलींचें टोंक बारीक करण्यासाठीं हा बहुधा वापरतात.

वाळूची झिलई—विजेच्या दिव्याचे कांचेचे गोळे, लोखंडी ओतकामाचे नमुने, इमारतींमधील दगडी बांधकामावरील बारीक थर काढून टाकणें, साफ करणें किंवा कानसीनें घासून साफ करणें, वगैरे कामांकरितां त्या वस्तूंवर वाळूचा दाबलेल्या हवेच्या योगानें जोराचा मारा करण्यांत येतो. या क्रियेस वाळूची झिलई (सँड ब्लास्ट) म्हणतात.

वाळूचे दगड—वाळूचे दगड हे सामान्यतः गारेचे कण एकत्र सांधल्यामुळें तयार होतात. त्यांमध्यें क्वचित् फेल-स्पारचे कण व अभ्रकाचा चूर आणि माती असते. यावरून ते वज्रतुंडाच्या कचऱ्यापासून उत्पन्न होत असतात हें उघड दिसून येतें. याची रचना अनेक ठिकाणीं भिन्न भिन्न आढळून येते. याचा रंग करड्यापासून तांबडसर पिंगटपर्यंत कोणता तरी असतो. हा बहुधा एका ठिकाणीं एकरंगी असतो पण कधीं कधीं चित्रविचित्रहि आढळतो. कांहीं वाळूचे दगड लोहयुक्त असतात व त्यांमध्यें लोह उज्जप्राणिद (आयर्न हायड्रॉक्साइड) असतें. वाळूच्या दगडांचे बहुधा थर असतात व त्यांमध्यें दोरे असतात व त्यामुळें ते डोंगराच्या कडेला असल्यास हळूहळू पाण्यामुळें झिजून कड्यासारखे उभे सुळके बनतात. वाळूच्या दगडाच्या कांहीं जाती कलाकुसरीच्या कामांच्या फार उपयोगी असतात. जेव्हां हे पुरेसे कठिण असतात तेव्हां त्यांचा इमारतीच्या कामीं उपयोग करतात.

**विकर्ण**—धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांतील एक. हा महारथी असून सर्व भ्रात्यांमध्यें मोठा न्यायी होता. द्रौपदीला सभेंत

करण्यांत येते. दूर अंतरावर प्रवास करणाऱ्या विमानांत सुमारें ७४ प्रवासी व १२ कामगार असतात व त्यांत चाळीस प्रवाशांची निजण्याची सोय असते व शिवाय ८०० पौंड टपाल नेता येतें. यांची गति तासीं २२५ मैल असते. विमानतळावर उतरण्याची व चढण्याची सर्व सोय केलेली असते. तसेंच विमानें ठेवण्याच्याहि जागा चांगल्या बांधलेल्या असतात. विमानतळावरील उड्डाणमार्गाची लांबी सुमारें एक मैल असते. विमानतळावर एक चालक, एक रेडिओ-चालक, हवामान-निरीक्षक व इतर अधिकारी असतात. विमानतळावर वादळ, सोसाट्याचा वारा, पाऊस किंवा बर्फ पडत असल्यास तें दाखविण्याकरिता विशिष्ट खुणा करण्यांत येतात. तसेंच निरनिराळे सूचक दिवे लावलेले असतात. व मोठमोठे प्रकाशाचे झोतहि मार्गदर्शनाकरितां सोडण्यांत येतात. मोठ्या विमानतळाखेरीज कांहीं ठिकाणीं उतारक क्षेत्रेंहि बनविण्यांत येतात व त्या ठिकाणीं अवश्य तेव्हां उतरतां येतें.

हिंदुस्थानांत १९४८ सालीं ४१ बिनलष्करी विमान-योजना ( सर्व्हिसेस ) अमलांत होत्या व २७ मार्गांवरून त्या चालू होत्या. रोजच्या योजना १७ व आठवड्याच्या ७० चालू होत्या. आठ वाहतूक कंपन्यांचे १६७ एअरक्रॅफ्ट, २३४ पायलट व १६८ हून जास्त विमाननोकर यांनीं ४८,५८,८९३ मैलांचा प्रवास करून १,२४,७५३ प्रवासी नेले व सामानाचें वजन २,५७३ टन जानेवारी ते एप्रिल १९४८ या काळातलें होतें.

**वाळवण यंत्र**—( ड्रायिंग मशिन ). हें यंत्र कपडे वाळविण्याकरितां उपयोगांत आणतात. यामध्यें सामान्यतः २२ इंच व्यासाचीं सुमारें ३० किंवा अधिक पंचपात्रीं वापरण्यांत येऊन तीं वाफेच्या साहाय्यानें गरम ठेवण्यांत येतात. या यंत्राचा उपयोग विशेषतः कापड शुभ्र करण्याच्या कारखान्यांत ( ब्लीचिंग ), रंगविण्याच्या कारखान्यांत आणि खळ देऊन मोहरेदार करण्याच्या कारखान्यांत वापरण्यांत येतात. प्रत्येक पंचपात्राला एक संरक्षक पडदा असतो. व त्यांतून जसजशी वाफ थंड होत जाईल तसतशी हवा आंत येण्याची योजना केलेली असते. पंचपात्राचा आंतील भाग कोरडा राहावा याकरितां वाफेचें झालेलें पाणी काढून घेण्याचीहि योजना केलेली असते. या पंचपात्रावरून रुळांच्या साहाय्यानें कापड नेण्यांत येतें व तें एकाच्या खालून व दुसऱ्याच्या वरून याप्रमाणें उष्ण असलेल्या पंचपात्राच्या दोन रांगातून नेण्यात येऊन एका रुळावर गुंडाळण्यांत येतें. अशाच प्रकारचें दुसरें एक यंत्र केंद्रोत्सारी पद्धतीनें चालविण्यांत येतें.

**वाळवी**—हे संघ करून राहणारे कीटक आहेत. म्हणजे पुष्कळ कीटक एका ठिकाणीं राहतात. उष्ण कटिबंधांत व विशेषतः पश्चिम आफ्रिकेंत हे किडे अतिशय असतात. शेतांत किंवा इतर ठिकाणीं जीं वारुळें दिसतात तीं यांचीं घरें होत. हीं शंक्वाकार असून १० किंवा १२ फूट उंच असतात. घरांत अनेक निरनिराळे विभाग असतात. या वारुळांच्या आंत व जमिनीच्या खालीं तीनचार फूट खोलीवर यांचा सर्व व्यवहार एखाद्या लहानशा संस्थानासारखा चाललेला असतो. वाळवींत चार प्रकारचे कीटक आढळतात: राजे, राण्या, शिपाई व कामकरी. त्यांना त्यांच्या व्यवसायाप्रमाणें हीं नांवें दिलेलीं

आहेत. यांत राणीचें विशेष महत्त्व आहे. ‘ शिपाई ’ कीटकांकडे संस्थानचें संरक्षण करण्याचें काम दिलेलें असतें. ‘ कामकऱ्यां ’कडे अन्न मिळवून आणणे, तें सर्व किड्यांना पोंचविणें, लहान लहान अर्भकांची जोपासना करणें, राणीची तैनात संभाळणें, अशीं कामें दिलेलीं असतात. ‘ राणी ’ कडे नुसतीं अंडीं घालण्याचेंच फक्त काम असतें. ती एका दिवसांत सुमारें ३००० पर्यंत अंडीं घालूं शकते. या अंड्यांची पुढील सर्व व्यवस्था कामकऱ्यांकडेच असते. वाळवींकडून पिकांना व पदार्थांना पुष्कळ उपद्रव होतो. तेव्हां ‘ राणी ’ नाहींशी करण्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. वाळवी मारण्याच्या यंत्रांतून सोमल व गंधक यांचा धूर वारुळांत सोडला म्हणजे राणी मरते.

**वाळवें**—मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक तालुका. शिराळ पेटा धरून याचें क्षेत्रफळ ५४५ चौरस मैल आहे. तालुक्यांत दोन मोठीं गांवें आहेत ( उरण-इस्लामपूर व अष्टें ). लो. सं. दीड लाख. या तालुक्यांतून कृष्णा व मोरणा या दोन नद्या वाहतात. वाळवें गाव हें कृष्णा नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें असून इस्लामपुरापासून ७ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें ५,०००. येथें थोरात देशमुखांचा एक मोठा वाडा आहे. थोरात देशमुख शाहू छत्रपतीपासून उदयाला आले. पुढें १८१८

साली इंग्रजांनीं खालसा करीपर्यंत वाळवें थोरात देशमुखांकडेच मुखत्यारीनें होतें.

**वाळा**—हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सीलोन यांतील सपाटीच्या व कमी उंचवट्याच्या प्रदेशांत, ओलसर जागीं, विशेषतः तळ्यांच्या अथवा प्रवाहांच्या कांठीं वाळा आढळतो. हा गवतासारखा असून याच्या मुळयांस वास असतो. याचीं बेटें वाढतात. उन्हाळ्यांत वाळ्याचे सुगंधी पडदे दारांवर लावून त्यांवर पाणी शिंपडतात. त्यामुळें आंतील वातावरण थंड होतें. सावंतवाडी, पुणें, चांदा, वगैरे ठिकाणीं वाळ्याचे पंखे, सुंदर टोपल्या, वगैरे जिन्नस होतात. मद्रास इलाख्याच्या बंदरांतून पुष्कळ वाळा युरोपांत रवाना होतो. इ. स. ११०२ ते ११७४ पर्यंत वाळ्यावर कर वसूल केला जात होता, असें कांहीं शिलालेखांवरून समजतें. पाण्याबरोबर वाळ्याचें ऊर्ध्वपातन केलें असतां सुवासिक तेल अथवा अर्क मिळतो. वाळ्याचें तेल लवकर उडून जात नाहीं. या त्याच्या गुणाचा फायदा घेऊन इतर सुगंधी तेलें तयार करण्याकरितां या तेलाचा उपयोग करतात; वाळ्याच्या तेलाला युरोपांत चांगली किंमत येते. वाळ्याचा उल्लेख करणारा पहिला युरोपियन गृहस्थ ऱ्हीड हा होय. उन्हानें तोंडाला त्रास होऊं नये म्हणून वाळ्याचीं उटणें लावितात. वाळ्याची व रक्तचंदनाची धूड टाकलेल्या सुगंधी व शीतल पाण्यानें आंघोळ केल्यास आराम वाटतो. कागद करण्याला वाळ्याचें गवत उपयोगी पडतें. कोंवळीं पानें गुरें खातात, व घरें शाकारण्याकरितांहि त्यांचा उपयोग होतो.

**वाळी**—ही वेल मयाळीची एक जात आहे. हिच्या मुळास नेहमीं पाणी असेल तर वेल वर्षभर टिकते व पन्नास–साठ हातपर्यंतहि पसरते. वेलीचे फांटे अंगठ्याएवढे जाड होतात. हिचे ताणे तोडून दुसऱ्या ठिकाणीं लावल्यास रुजतात. पाल्याची भाजी करतात.

**वाळींत टाकणें**—गुन्हेगारांना धर्माचा, समाजाचा फायदा न देण्याची पूर्वी ही शिक्षा असे. युरोपांत धर्मगुरु राजावर देखील असे बहिष्कार घालीत. धर्मसुधारणेच्या (रेफॉर्मेशन) काळांत इंग्लंडचा ८ वा हेन्री आणि एलिझाबेथ राणी यांवर पोपनें बहिष्कार टाकला होता, हें प्रसिद्धच आहे. आपल्याकडे सामाजिक गुन्ह्यासाठीं आरोपी व त्याचें कुटुंब यांना जात-पंचायत वाळींत टाकी. प्रायश्चित्त घेतल्यानंतर पुन्हां जातींत व्यवहार सुरू होत. 'हुक्कापाणी बंद करणें' हा वाक्प्रचार यासाठींच आहे. जातिबहिष्कृतता तर फार जाणवे व शंकराचार्यांकडून आज्ञापत्रें आणवून बहिष्कार उठत. आज हें शस्त्र निकामी झालें आहे.

**वाळू**—खडकाचें चूर्ण होऊन जे बारीक कण बनतात त्यांस वाळू म्हणतात. हे सामान्यतः सिकतामय असतात. कांहीं वाळूचा रंग पिवळा, तांबडा, किंवा पिंगट असतो; याचें कारण त्यांत थोड्या प्रमाणांत लोह उज्जप्राणिद (आयर्न हायड्रॉक्साइड) असून तें त्या कणांच्या पृष्ठभागीं दिसून येतें. सोनें किंवा प्लॅटिनमसारखे कांहीं धातू वाळूशीं मिश्रित आढळतात. कांच करण्याकरितां शुद्ध सिकतामय वाळू फार महत्त्वाची असते. तसेंच अशा वाळूचा चुना–गाळणीं किंवा ओतकामाचे सांचे तयार करण्याकरितांहि उपयोग होतो. समुद्रकांठीं मैलच्या मैल लांब वाळू पसरलेली असते व कांहीं ठिकाणीं वाळूचे डोंगरहि बनलेले आढळतात.

वाळूचा कागद (सॅंड पेपर)–हा एखादा पृष्ठभाग गुळगुळीत करण्यासाठीं किंवा झिलई देण्यासाठीं तयार केलेला असतो. एका जाड कागदावर गोंदानें वाळू चिकटवून असा कागद करतात. कांच कागद व एमरी कागद यांचा उपयोग या कागदापेक्षां धातूवरील कामासाठीं जास्त होतो. पेन्सिलींचें टोंक बारीक करण्यासाठीं हा बहुधा वापरतात.

वाळूची झिलई—विजेच्या दिव्याचे कांचेचे गोळे, लोखंडी ओतकामाचे नमुने, इमारतींमधील दगडी बांधकामावरील बारीक थर काढून टाकणें, साफ करणें किंवा कानसीनें घासून साफ करणें, वगैरे कामांकरितां त्या वस्तूंवर वाळूचा दाबलेल्या हवेच्या योगानें जोराचा मारा करण्यांत येतो. या क्रियेस वाळूची झिलई (सॅंड ब्लास्ट) म्हणतात.

वाळूचे दगड—वाळूचे दगड हे सामान्यतः गारेचे कण एकत्र सांधल्यामुळें तयार होतात. त्यांमध्यें क्वचित् फेल-स्पारचे कण व अभ्रकाचा चूर आणि माती असते. यावरून ते वज्रतुंडाच्या कचऱ्यापासून उत्पन्न होत असतात हें उघड दिसून येतें. याची रचना अनेक ठिकाणीं भिन्न भिन्न आढळून येते. याचा रंग करड्यापासून तांबडसर पिंगटपर्यंत कोणता तरी असतो. हा बहुधा एका ठिकाणीं एकरंगी असतो पण कधीं कधीं चित्रविचित्रहि आढळतो. कांहीं वाळूचे दगड लोहयुक्त असतात व त्यांमध्यें लोह उज्जप्राणिद (आयर्न हायड्रॉक्साइड) असतें. वाळूच्या दगडांचे बहुधा थर असतात व त्यांमध्यें दोरे असतात व त्यामुळें ते डोंगराच्या कडेला असल्यास हळूहळू पाण्यामुळें झिजून कड्यासारखे उभे सुळके बनतात. वाळूच्या दगडाच्या कांहीं जाती कलाकुसरीच्या कामांच्या फार उपयोगी असतात. जेव्हां हे पुरेसे कठिण असतात तेव्हां त्यांचा इमारतीच्या कामीं उपयोग करतात.

**विकर्ण**—धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांतील एक. हा महारथी असून सर्व भ्रात्यांमध्यें मोठा न्यायी होता. द्रौपदीला सभेंत

ओढून आणल्यावर हा मोठा अन्याय होत आहे असें यानें विदुराप्रमाणेंच बजावलें. हा भीमाच्या हातून मारला गेला.

**विकाससिद्धान्त**—(इव्होल्यूशन). हें विश्व, त्यांतील प्राणी व विशेषतः मनुष्य हीं सर्व अत्यंत प्राथमिक अवस्थेतील द्रव्यापासून हळूहळू एक दीर्घकालीन वाढ होण्याच्या पद्धतीनें विकास पावून तयार झालीं, ही गोष्ट या तत्त्वामध्यें प्रतिपादन केलेली . असते. विकासक्रमापैकीं कांहीं गोष्टी शास्त्रीय पद्धतीनें मांडण्यांत येतात. परंतु सर्व विश्व अशा विकासक्रमामुळें उत्पन्न झालें ही केवळ एक गृहीत उपपत्ति आहे.

विकासामध्यें दोन कल्पना आढळतातः-(१) भौतिक विकास—विश्वांतील सर्व व्यवस्था व संगति. यामध्यें मनुष्याच्या जीविताचाहि अन्तर्भाव होतो. हीं सर्व भौतिक व्यापारामुळें घडून आलेलीं आहेत; त्यांच्या पाठीमागें कांहीं बौद्धिक हेतु नसतो, ही गोष्ट पटण्यासारखी नाहीं. कारण अव्यवस्थेमधून कधींहि व्यवस्था निर्माण होत नाहीं. आणि प्राणिमात्रामध्यें आपणांस जी हेतुपूर्वक रचना असलेली आढळते ती केवळ भौतिक व्यापारांमुळें घडून येत नसून तिच्यामागें कोणती तरी नियोजक शक्ति असली पाहिजे. (२) प्रमाणशीर विकास—द्रव्याची उत्पत्ति केवळ अव्यवस्थित द्रव्याच्या रूपानें घडविण्यांत आलेली नसून त्याच्या ठिकाणीं व्यवस्थित सृष्टि निर्माण करण्याचे सर्व गुण अधिष्ठित होते. प्राण्याची उत्पत्तिहि त्याच्या निराळ्या जाती निर्माण होऊं शकतील अशी शक्यता धरूनच झालेली होती; ही उपपत्ति स्वीकारण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण या उपपत्तीमध्यें विश्वांतील व्यवस्था व निश्चितता यांची संगति लावलेली दिसते. हीमध्यें सृष्टीची उत्पत्ति मान्य करून जगांतील व्यवस्था व जीवन यांचें कारण म्हणून परमेश्वराचें अस्तित्व मान्य करण्यांत आलेलें आहे.

मनुष्याच्या आध्यात्मिक जीवनासंबंधीं विचार करूं लागलें असतां त्याची जडद्रव्यापासून उत्पत्ति झाली असावी असें मानतां येत नाहीं. आध्यात्मिक आत्मा हा पहिल्या मानवास व प्रत्येक मानवास प्रत्यक्ष परमेश्वरापासून प्राप्त होतो आणि त्याचें शरीर हें परमेश्वरानें केलेल्या योजनेप्रमाणें तयार होतें व तें त्याच्या आत्म्यास राहण्याकरितां व त्याच्या आध्यात्मिक आत्म्याचें साधन म्हणून तयार होत असतें. याकरितां परमेश्वरानें जडद्रव्याचा उपयोग केला किंवा अस्तित्वांत असलेल्याच एखाद्या जिवंत प्राण्याचा उपयोग केला, हें अनिश्चित आहे.

विकासक्रिया—(शास्त्रीय विवेचन). पृथ्वीवर निरनिराळ्या जातींच्या सामान्य स्वरूपाच्या पूर्वजापासून रूपांतर पावत पावत ज्या अनेक प्रकारच्या संकीर्ण अशा वनस्पतींची व प्राण्यांची निरनिराळ्या प्रकारची व जातींची उत्पत्ति झाली आहे त्या क्रियेस जीवशास्त्रामध्यें विकासक्रिया असें म्हणतात. अर्वाचीन जीवशास्त्राचा सिद्धांत असा आहे कीं, आजच्या सर्व प्राणिज कोटी ह्या एका मूळच्या अतिशय सूक्ष्म अशा एकपेशीमय सेंद्रिय रचनेपासून उत्पन्न झालेल्या आहेत व त्यांच्या अनेक निरनिराळ्या शाखा ज्या आहेत त्यांच्या शारीरिक रचनांमध्यें व क्रियांमध्यें कोट्यवधि वर्षांत अनेक प्रकारचे फरक होऊन कोट्यवधि वनस्पतींच्या व प्राण्यांच्या आज आपणांस आढळणाऱ्या निरनिराळ्या जाती उत्पन्न झाल्या आहेत.

या विकासक्रियेचें कार्य सिद्ध करण्याकरिता अनेक तऱ्हेचीं प्रमाणें उपलब्ध झालेलीं आहेत. अगदीं भिन्न भिन्न स्वभावाचे अनेक जातींचे मोठमोठे वर्ग पाहिले असतां आपणांस असें आढळून येतें कीं, त्या सर्व भिन्न भिन्न प्राण्यांच्या शरीररचनेचें मूलस्वरूप एकाच तऱ्हेचें असावें. तसेंच एकाच प्राण्याचे अथवा वनस्पतीचे निरनिराळे अवयव त्यांचें भिन्न भिन्न कार्य असूनहि एकाच मूलस्वरूपापासून उत्पन्न झाले असावे असें दिसतें. एकाच वर्गांतील दोन जातींपैकीं एका जातीच्या शरीरांत आढळणारे कांहीं अगदीं प्राथमिक स्वरूपाचे व दिसावयास अगदीं निरुपयोगी अवयव दुसऱ्या जातीमध्यें पूर्णपणें वाढ झालेले आणि विशिष्ट स्वरूपाच्या निश्चित क्रिया करीत असलेले आढळतात. हक्सले या शास्त्रज्ञाच्या मतें, अशा गोष्टींचा विचार केला व त्याचबरोबर भूस्तरशास्त्रीय दृष्टीनें पृथ्वीच्या निरनिराळ्या कालांचा व त्या कालांत असलेल्या वनस्पतींच्या व प्राण्यांच्या जातींचा इतिहास लक्षांत घेतला, तसेंच निरनिराळ्या कालीं भूगोलावर ज्या निरनिराळ्या वनस्पती व प्राणी प्रसार पावत होते, त्यांचा अभ्यास केला, आणि निरनिराळ्या तऱ्हेच्या, प्राण्यांवर निरनिराळ्या परिस्थितींत कोणकोणते परिणाम घडत होते ते लक्षांत घेतले तर आपणांस विकासक्रियेबद्दल खात्री पटल्याशिवाय राहणार नाहीं.

मनुष्यप्राण्यामध्यें एक पृष्ठवंश असतो व त्यास मेंदू, मज्जातंतुव्यूह, हृदय, रक्तपेशी, पचनेंद्रियें व इतर इंद्रियें असतात व त्यांची रचना एका विशिष्ट पद्धतीनें झालेली असते आणि हीच रचना व पद्धति आपणांस इतर सर्व सस्तन प्राणी, पक्षी, सरपटणारे प्राणी, भूजलचर प्राणी आणि मासे यांच्यामध्येंहि आढळून येते. यावरून आपल्या लक्षांत ही गोष्ट आली पाहिजे कीं, मनुष्य हा सपृष्ठवंश प्राणिवर्गांतील एक प्राणिवर्ग आहे. आणि हे सर्व सपृष्ठवंश प्राणी एकाच पूर्वजापासून उत्पन्न झालेले असावे, सर्व चतुष्पाद प्राणी अशाच एखाद्या माशासारख्याच परंतु पुढें पाण्यावर व जमिनीवरहि वाढूं लागणाऱ्या प्राण्यापासून उत्पन्न झाले असावे. आज पृथ्वीवरून नष्ट झालेल्या

कांहीं प्राण्यांचे जे प्रास्तर अवशेष सांपडले आहेत त्यांवरून असें दिसून येतें कीं, भूजलचर प्राण्यांच्याहि पूर्वी केवळ जलचर असा मासा प्राचीन काळीं अस्तित्वांत असावा. या भूजलचर प्राण्यांनंतर सरपटणारे प्राणी निर्माण झाले आणि अशा प्राथमिक अवस्थेंतील भूजलचर प्राण्यांपैकीं फक्त एकाच प्राणिवर्गाची विशेष प्रगति होऊन त्याच्या शरीरांत मेंदू, गात्रें आणि रुधिराभिसरणाचीं इंद्रियें विकास पावलीं व त्यामुळें तो सरपटणारा प्राणी झाला आणि पूर्णपणें कोरड्या जमिनीवर राहूं लागला. आणि त्याचा संचार व क्रिया भूजलचर प्राण्यांपेक्षां अधिक मोठ्या क्षेत्रावर होऊं लागल्या. या सरपटणाऱ्या प्राण्यांचीच वाढ होऊन त्यापासून पुढें विशिष्ट स्वरूप प्राप्त झालेलें असे. पाली, कासव, सर्प, वगैरे प्राणी आज आपल्या दृष्टीस पडतात. हे प्राणी त्यांच्या पूर्वींच्या प्राथमिक अवस्थेंतील सरपटणाऱ्या पूर्वजांपेक्षां पुष्कळच निराळे दिसतात. तसेंच ते पक्षी व सस्तन प्राणी यांच्याहि पूर्वजापासून अगदीं निराळे दिसतात. सस्तन प्राणीहि निरनिराळ्या जातींचे असून त्यांच्या शरीराची रचनाहि त्यांच्या आश्चर्यकारक अशा भिन्न प्रकारच्या आयुष्यक्रमामुळें व त्यांच्या जमिनीच्या पृष्ठभागावर जमिनीच्या खालीं झाडावर, हवेमध्यें, नद्यांमध्यें किंवा समुद्रामध्यें वस्ती करून राहण्याच्या प्रकारामुळें त्यांच्या शरीररचनेमध्येंहि अनेक प्रकारचें वैशिष्ट्य व भिन्नता उत्पन्न झालेली आपणांस दिसून येत आहे. सस्तन प्राणिवर्गांपैकीं ज्या प्राणिवर्गाचें वैशिष्टयीकरण फार उशिरां झालें आणि त्यामुळें ज्याला आपल्यासभोंवतालच्या परिस्थितीशीं विशेषपणें अनुरूप करून घेतां आलें अशा प्राण्यांचा वर्ग म्हटला म्हणजे प्रोझिमी अथवा मर्कट आणि मनुष्य यांचा पूर्वजवर्ग होय. हे लहान लहान प्राणी दीर्घकालपर्यंत अज्ञातावस्थेमध्यें झाडांमध्यें वस्ती करून राहिले व त्यामुळें त्यांच्या शरिरामध्यें इतर सस्तन प्राण्यांमध्यें विशेषतः झाडावर राहणाऱ्या व उडणाऱ्या सस्तन प्राण्यांमध्यें परिस्थित्यनुरूप रचनेमध्यें जो फरक पडला तो फरक घडून आला नाहीं. परंतु त्यांच्या दृक्शक्तीची वाढ आणि त्यांच्या प्राथमिक अवस्थेंतील लवचिक हस्तांच्या उपयोगामध्यें दृष्टीच्या साहाय्यानें उत्पन्न झालेलें कौशल्य या जातीस कौशल्ययुक्त क्रिया करण्याची, अनुभवापासून शिक्षण घेण्याची आणि ज्ञान प्राप्त करून घेण्याची शक्ति प्राप्त करून घेण्यास कारणीभूत झाली व याच शक्तीची परिणति पुढें निरनिराळ्या गोष्टींची विचिकित्सा करून त्यांतील फरक जाणणाऱ्या शक्तीची अथवा बुद्धीची वाढ होण्यामध्यें झाली.

मनुष्य हा ज्या प्राथमिक अवस्थेंतील प्राण्यापासून मर्कटाची उत्पत्ति झाली त्याच प्राण्यापासून विकास पावला आहे ही गोष्ट त्याची शरिररचना माकडाच्या गोरीला आणि चिंपॅन्झी, वगैरे जातींच्या माकडांच्या शरीराच्या रचनेसारखीच आहे एवढ्याच एका गोष्टीवरून सिद्ध होत नाहीं, तर मनुष्य व मर्कट यांच्या रक्ताचीहि परस्परांवर क्रिया व प्रतिक्रिया एका जातीच्या प्राण्यांच्या रक्ताप्रमाणें होते व इतर सस्तन प्राण्यांच्या रक्ताइतकी होत नाहीं. या गोष्टीवरूनहि वरील सिद्धांतास बळकटी येते. मर्कटांनाहि कांहीं इतर सस्तन प्राण्यांस न होणारे व केवळ मनुष्यास होणारे रोग होतात. मनुष्य आणि अपुच्छ वानरांच्या गोरिला, चिंपॅन्झी, ओटँग आणि गिब्बन या वानरांच्या जातींमध्यें इतकें साम्य आहे कीं, व इतर सपुच्छ वानरांच्या जातींमध्यें इतकी भिन्नता आहे कीं, मनुष्य व विपुच्छ मर्कट हे एकाच पूर्वजापासून उत्पन्न झाले असावे यांत बिलकुल संशय राहत नाहीं. ही जात मायोसिन कालांत हिमालयाच्या पायथ्याशीं राहत असावी. [ सुलभ विश्वकोश, वि. १ ला. प्रस्तावना पाहा. ]

**विकिरण**—( डिस्पर्शन ). दृक्शास्त्रामध्यें प्रकाशाचें जें कोणात्मक पृथक्करण होतें, म्हणजे प्रकाशाचें जें निरनिराळ्या रंगांमध्यें अथवा त्याच्या प्रकाशलहरींच्या लांबीप्रमाणें पृथक्करण होतें त्यास विकिरण असें म्हणतात. विकिरणाची क्रिया वक्रीभवनामुळें किंवा विवर्तनामुळें घडून येते. जेव्हां एखादा संयुक्त प्रकाशाचा किरण हवेंतून दुसऱ्या एखाद्या पारदर्शक माध्यमांतून तिरप्या दिशेनें जाऊं लागतो, तेव्हां त्या प्रकाशांतील प्रत्येक घटकाचें वक्रीभवन मूळ त्या प्रकाशकिरणाच्या दिशेपेक्षां निरनिराळ्या कोणामध्यें होतें. म्हणजे तो किरण त्यांतील निरनिराळ्या घटकांप्रमाणें मूळ दिशेपेक्षां थोडा कमी–अधिक वांकून बाहेर पडतो. यामुळें असा परिणाम होतो कीं, त्या प्रकाशकिरणांतील निरनिराळ्या रंगांचे किरण पंख्यासारखे वेगवेगळे होतात किंवा दुसऱ्या माध्यमाच्या पृष्ठभागावर पसरून पडतात. पांढऱ्या प्रकाशाच्या वक्रीभवन झालेल्या वर्णपटामध्यें एखाद्या कांचेच्या त्रिपार्श्वामधून जात असतांना जें वक्रीभवन होतें त्यामुळें पडणाऱ्या या वर्णपटामध्यें तांबडे किरण मूळ मार्गापासून फार थोडे वळलेले आढळतात; तर निळे किरण सर्वांत जास्त वळलेले आपल्या दृष्टीस पडतात. यांपैकीं कोणतेहि दोन किरण घेऊन ते कोणत्या कोणामध्यें वळले आहेत हें मोजून पाहिलें तर त्या कोणावरून त्यांच्या वळण्याच्या क्रियेचें मापन करतां येतें आणि हा कोण जर त्या प्रकाशशलाकेंतील मध्यम किरणाच्या वळण्याच्या कोणानें विभागला तर आपणांस त्या विशिष्ट कांचेच्या त्रिपार्श्वांची विकिरणशक्ति मापन करतां येते. निरनिराळ्या पारदर्शक माध्यमांची विकिरणशक्ति निरनिराळी असते. उदा., वातायनकांचेंतील ( क्राउन ग्लासच्या ) विकिरणशक्ति

कर्बोद्विगंधकिद (कार्बन डाय सल्फाइड) याची विकिरणशक्ति तिपटीपेक्षां अधिक असते. या विकिरणशक्तीचें दिग्दर्शन प्रथम न्यूटन यानें केलें. निरंग भिंगांतून फक्त प्रकाशवलन होतें, परंतु विकिरण होत नाहीं. याच्या उलट प्रत्यक्ष विच्छिन्न किरणदर्शकामधून विकिरण होतें, परंतु वर्णपटांतील मधल्या भागाचें प्रकाशवलन होत नाहीं. वक्रीभवन झालेल्या वर्णपटाच्या सर्व भागांची विकिरणशक्ति सारखी नसते. तसेंच निरनिराळ्या पदार्थांचें जर त्रिपार्श्व वापरण्यांत आलें तर त्यापासून पडणाऱ्या विच्छिन्न पटांतील निरनिराळ्या रंगांचें स्थान निरनिराळें असतें असें आढळून आलें आहे. यावरून अशा विच्छिन्न किरणपटास अयुक्तिक (इर्रॅशनल) म्हणण्यांत येतें व या गुणधर्मास अयुक्तिक विकिरणधर्म असें म्हणण्यांत येतें. वक्रीभूत किरणांच्या विच्छिन्न पटामध्यें रंगांचा अनुक्रम उलट असतो. तांबड्या रंगाच्या किरणांचें वलन सर्वांत अधिक झालेलें असतें आणि प्रत्येक रंगाचें वलन हें त्याच्या प्रकाशलहरीच्या लांबीच्या प्रमाणांत असतें. यावरून वक्रीभूत विच्छिन्न किरणपटास प्रमाणविच्छिन्न किरणपट असें मानण्यांत येतें.

सर्व पदार्थांच्या विच्छिन्न किरणपटांतील रंगांचा अनुक्रम नसतो. कांहीं पदार्थांमध्यें हा रंगांचा अनुक्रम बदललयाचीं उदाहरणें आढळून आलीं आहेत. ख्रिश्चनसेन या शास्त्रज्ञानें असें दाखवून दिलें आहे कीं, फुशॉइनच्या मद्यार्कद्रवांतून जाणाऱ्या किरणांच्या विच्छिन्न किरणपटांत नीललोहित (व्हायोलेट), रक्त व पीत एवढेच वर्ण असतात व त्यांपैकीं नीललोहित रंगाचें वक्रीभवन सर्वांत कमी आणि पीत रंगाचें सर्वांत अधिक झालेलें आढळतें. तसेंच नीललोहित व रक्त या वर्णांच्या रंगांमध्यें एक काळा पट्टा दृष्टीस पडतो. या प्रकारास अनियमित विकिरण म्हणतात. आयोडीन व सोडियम यांच्या वाफेमध्यें आणि ॲनिलीन रंगामध्येंहि असाच परिणाम आढळून येतो.

**विकृतिविज्ञान**—(पॅथॉलॉजी). शरीरास ज्या निरनिराळ्या विकृती होतात व ज्यामुळें अशा विकृती होतात त्याचें विवेचन करणारें हें शास्त्र आहे. शरीराच्या रचनेमध्यें जे विकार होतात त्यांच्या विवेचनास विकृतिविज्ञान–शारीरशास्त्र (पॅथॉलॉजिकल ॲनोटॉमी) असें म्हणतात. रासायनिक विकृतिविज्ञानामध्यें शरीरांतील पेशींच्या घटकांमध्यें व रचनेमध्यें जे विकार होतात त्यांचा विचार केलेला असतो. याच शाखेला आनुषंगिक अशी शारीरविषयक (फिजिकल) किंवा शारीररासायनिक विकारांचें संशोधन करणारी एक शाखा आहे. या दोन शाखांतील विषयांचें ज्ञान बरेंचसें अलीकडील काळांत झालेलें आहे. व त्या ज्ञानाची वाढ अद्यापि बरीच होत आहे व व्हावयाची आहे. उदा., मधुमेह वगैरेसारख्या रोगाचा अभ्यास शारीररसायन शास्त्रावरच आधारलेला आहे. जे रोग सामान्यतः बाह्यकारणांपासून उत्पन्न होतात त्यांचा विचार निदानशास्त्र (एटिऑलॉजी) या शाखेंत करण्यांत येतो. सामान्यतः निरोगी माणसाच्या शरीराची रचना व क्रिया हीं नेहमीं एकस्वरूपाचींच असतात. व बाह्य परिस्थितीस अनुरूप करून घेण्याची शक्ति सामान्यतः निरोगी शरीरामध्यें असते. परंतु जेव्हां बाह्य परिस्थिति अथवा कारणें हीं कांहीं विशेष प्रकारचीं असून त्यांचें प्रमाण फार मोठें असतें तेव्हां शरीरांत विकार उद्भवतो. एखादा जोराचा आघात किंवा अपघात घडला असतां, अतिशय उष्णता किंवा थंडी पडली असतां, किंवा एखाद्या रासायनिक द्रव्याचा विशेष परिणाम झाला असतां मनुष्याच्या शरीरामध्यें विकार उद्भवणें साहजिक असतें. कांहीं सूक्ष्म जंतूंपासूनहि मनुष्याच्या शरीरांत विकार उत्पन्न होतात. कांहीं सूक्ष्म जंतू मनुष्याच्या शरीरांतील जिवंत पेशींमध्यें प्रवेश करून वाढूं लागतात; या क्रियेस संसर्ग (इन्फेक्शन) म्हणतात. घटसर्प किंवा धनुर्वात यांसारख्या रोगांचे जंतू शरीरामध्यें भयंकर विष निर्माण करतात. कांहीं सूक्ष्म जंतू रक्तप्रवाहांत शिरून पू उत्पन्न करतात. एकपेशीमय सूक्ष्म जंतूंपासूनहि कांहीं रोग–हिंवताप, झोंपेचा रोग, वगैरेसारखे–उत्पन्न होतात. तसेंच गोंवर, रक्तज्वर, वगैरेसारखे रोगहि अशा आगंतुक कारणांमुळें उत्पन्न होतात.

रोगांचीं अंतर्गत कारणें—शरीरांतील कांहीं ग्रंथींमधून स्राव होऊन तो रक्तप्रवाहांत मिसळतो. कंठग्रंथीसारख्या ग्रंथींपासून मुळींच स्राव होत नसला तर विकार उद्भवतो. किंवा अधिक स्राव झाल्यामुळेंहि दुसराच विकार उद्भवतो. विकृतीचे विनाशात्मक किंवा प्रतिक्रियात्मक असे दोन वर्ग करतां येतील. पहिल्या प्रकारापासून विनाशक क्रिया होत असते. व दुसऱ्या प्रकारापासून कांहीं प्रातिक्रियात्मक विकार उत्पन्न होतात. शरीराच्या विशिष्ट भागांत होणारा रक्ताचा पुरवठा अजीबात बंद केल्यास त्या भागांतील रक्तपेशी मरून जातात, हें पहिल्या प्रकारचें म्हणजे विनाशक क्रियेचें उदाहरण म्हणतां येईल. दुसऱ्या प्रकारामध्यें कांहीं इंद्रियांच्या पेशींमध्यें वाढ होते. उदा., हृदयाच्या स्नायूंची वाढ झाल्यास त्यापासूनहि विकार होतो, हें दुसऱ्या प्रकारचें उदाहरण देतां येईल [illegible] विशिष्ट प्रकारच्या पेशींमध्यें प्रातिक्रियात्मक श[illegible] असते. जेव्हां एखाद्या विनाशक क्रियेमुळें कांहीं होतो, परंतु त्यांचा प्रत्यक्ष नाश होत नाहीं त[illegible] अथवा दाह असें म्हणतात. अशा वेळीं त्या उत्पन्न होऊन तो विकार नाहींसा होतो.

वास्तुशिल्प — सोफिया ( बल्गेरिया ), येथील सेंट अलेक्झांडरचें चर्च. शिल्पावर बायझन्टाइन शिल्पाची छाप दिसेल ( पृ. २२९५ )

वायव्य सरहद्द प्रांत — खोजा बोगद्याचा रस्ता ( पृ. २२८३ )

विजयानगर — विठोबा मंदिर ( पृ. २३०५ )

विजापूर — गोलघुमट ( पृ. २३०७ )

कर्बोद्विगंधकिद (कार्बन डाय सल्फाइड) याची विकिरणशक्ति तिपटीपेक्षां अधिक असते. या विकिरणशक्तीचें दिग्दर्शन प्रथम न्यूटन यानें केलें. निरंग भिंगांतून फक्त प्रकाशवलन होतें, परंतु विकिरण होत नाहीं. याच्या उलट प्रत्यक्ष विच्छिन्न किरणदर्शका-मधून विकिरण होतें, परंतु वर्णपटांतील मधल्या भागाचें प्रकाश-वलन होत नाहीं. वक्रीभवन झालेल्या वर्णपटाच्या सर्व भागांची विकिरणशक्ति सारखी नसते. तसेंच निरनिराळ्या पदार्थांचें जर त्रिपार्श्व वापरण्यांत आलें तर त्यपासून पडणाऱ्या विच्छिन्न पटांतील निरनिराळ्या रंगांचें स्थान निरनिराळें असतें असें आढळून आलें आहे. यावरून अशा विच्छिन्न किरणपटास अयु-क्तिक (इर्रॅशनल) म्हणण्यांत येतें व या गुणधर्मास अयुक्तिक विकिरणधर्म असें म्हणण्यांत येतें. वक्रीभूत किरणांच्या विच्छिन्न पटामध्यें रंगांचा अनुक्रम उलट असतो. तांबड्या रंगाच्या किरणांचें वलन सर्वांत अधिक झालेलें असतें आणि प्रत्येक रंगाचें वलन हें त्याच्या प्रकाशलहरीच्या लांबीच्या प्रमाणांत असतें. यावरून वक्रीभूत विच्छिन्न किरणपटास प्रमाणविच्छिन्न किरणपट असें मानण्यांत येतें.

सर्व पदार्थांच्या विच्छिन्न किरणपटांतील रंगांचा अनुक्रम नसतो. कांहीं पदार्थांमध्यें हा रंगांचा अनुक्रम बदलल्याचीं उदाहरणें आढळून आलीं आहेत. ख्रिश्चनसेन या शास्त्रज्ञानें असें दाखवून दिलें आहे कीं, फुशॉइनच्या मद्यार्कद्रवांतून जाणाऱ्या किरणांच्या विच्छिन्न किरणपटांत नीललोहित (व्हायोलेट), रक्त व पीत एवढेच वर्ण असतात व त्यांपैकीं नीललोहित रंगाचें वक्रीभवन सर्वांत कमी आणि पीत रंगाचें सर्वांत अधिक झालेलें आढळतें. तसेंच नीललोहित व रक्त या वर्णांच्या रंगांमध्यें एक काळा पट्टा दृष्टीस पडतो. या प्रकारास अनियमित विकिरण म्हणतात. आयोडीन व सोडियम यांच्या वाफेमध्यें आणि ॲनिलीन रंगामध्येंहि असाच परिणाम आढ-ळून येतो.

**विकृतिविज्ञान**—(पॅथॉलॉजी). शरीरास ज्या निरनिराळ्या विकृती होतात व ज्यामुळें अशा विकृती होतात त्याचें विवेचन करणारें हें शास्त्र आहे. शरीराच्या रचनेमध्यें जे विकार होतात त्यांच्या विवेचनास विकृतिविज्ञान-शारीरशास्त्र (पॅथॉलॉजिकल ॲनॉटॉमी) असें म्हणतात. रासायनिक विकृतिविज्ञानामध्यें शरीरांतील पेशींच्या घटकांमध्यें व रचनेमध्यें जे विकार होतात त्यांचा विचार केलेला असतो. याच शाखेला आनुषंगिक अशी शारीरविषयक (फिजिकल) किंवा शारीररासायनिक विकारांचें संशोधन करणारी एक शाखा आहे. या दोन शाखांतील विषयांचें ज्ञान बरेंचसें अलीकडील काळांत झालेलें आहे. व त्या ज्ञानाची वाढ अद्यापि बरीच होत आहे व व्हावयाची आहे. उदा., मधुमेह वगैरेसारख्या रोगाचा अभ्यास शारीररसायन शास्त्रावरच आधारलेला आहे. जे रोग सामान्यतः बाह्यकारणांपासून उत्पन्न होतात त्यांचा विचार निदानशास्त्र (एटिऑलॉजी) या शाखेंत करण्यांत येतो. सामान्यतः निरोगी माणसाच्या शरीराची रचना व क्रिया हीं नेहमीं एकस्वरूपाचींच असतात. व बाह्य परिस्थितीस अनुरूप करून घेण्याची शक्ति सामान्यतः निरोगी शरीरामध्यें असते. परंतु जेव्हां बाह्य परिस्थिति अथवा कारणें हीं कांहीं विशेष प्रकारचीं असून त्यांचें प्रमाण फार मोठें असतें तेव्हां शरीरांत विकार उद्भवतो. एखादा जोराचा आघात किंवा अपघात घडला असतां, अतिशय उष्णता किंवा थंडी पडली असतां, किंवा एखाद्या रासायनिक द्रव्याचा विशेष परिणाम झाला असतां मनुष्याच्या शरीरामध्यें विकार उद्भवणें साहजिक असतें. कांहीं सूक्ष्म जंतूंपासूनहि मनुष्याच्या शरीरांत विकार उत्पन्न होतात. कांहीं सूक्ष्म जंतू मनुष्याच्या शरीरांतील जिवंत पेशींमध्यें प्रवेश करून वाढूं लागतात; या क्रियेस संसर्ग (इन्फेक्शन) म्हणतात. घटसर्प किंवा धनुर्वात यांसारख्या रोगांचे जंतू शरीरामध्यें भयंकर विष निर्माण करतात. कांहीं सूक्ष्म जंतू रक्तप्रवाहांत शिरून पू उत्पन्न करतात. एकपेशीमय सूक्ष्म जंतूं-पासूनहि कांहीं रोग-हिंवताप, झोंपेचा रोग, वगैरेसारखे-उत्पन्न होतात. तसेंच गोंवर, रक्तज्वर, वगैरेसारखे रोगहि अशा आगंतुक कारणांमुळें उत्पन्न होतात.

रोगांचीं अंतर्गत कारणें—शरीरांतील कांहीं ग्रंथींमधून स्राव होऊन तो रक्तप्रवाहांत मिसळतो. कंठग्रंथीसारख्या ग्रंथींपासून मुळींच स्राव होत नसला तर विकार उद्भवतो. किंवा अधिक स्राव झाल्यामुळेंहि दुसराच विकार उद्भवतो. विकृतीचे विनाशात्मक किंवा प्रतिक्रियात्मक असे दोन वर्ग करतां येतील. पहिल्या प्रकारापासून विनाशक क्रिया होत असते. व दुसऱ्या प्रकारापासून कांहीं प्रतिक्रियात्मक विकार उत्पन्न होतात. शरीराच्या विशिष्ट भागांत होणारा रक्ताचा पुरवठा अजीबात बंद केल्यास त्या भागांतील रक्तपेशी मरून जातात, हें पहिल्या प्रकारचें म्हणजे विनाशक क्रियेचें उदाहरण म्हणतां येईल. दुसऱ्या प्रकारामध्यें कांहीं इंद्रियांच्या पेशींमध्यें वाढ होते. उदा., हृदयाच्या स्नायूंची वाढ झाल्यास त्यापासूनहि विकार होतो, हें दुसऱ्या प्रकारचें उदाहरण देतां येईल. सामान्यतः विशिष्ट प्रकारच्या पेशींमध्यें प्रतिक्रियात्मक शक्ति फार थोडी असते. जेव्हां एखाद्या विनाशक क्रियेमुळें कांहीं पेशींमध्यें बिघाड होतो, परंतु त्यांचा प्रत्यक्ष नाश होत नाहीं तेव्हां त्या क्रियेस शोथ अथवा दाह असें म्हणतात. अशा वेळीं त्या ठिकाणीं प्रतिक्रिया उत्पन्न होऊन तो विकार नाहींसा होतो. संसर्गजन्य रोगामध्यें

वास्तुशिल्प — सोफिया ( बल्गेरिया ), येथील सेंट अलेक्झांडरचें चर्च. शिल्पावर बायझन्टाइन शिल्पाची छाप दिसेल ( पृ. २२९५ )

वायव्य सरहद्द प्रांत — खोजा बोगद्याचा रस्ता ( पृ. २२८३ )

विजयानगर — विठोबा मंदिर ( पृ. २३०५ )

विजापूर — गोलघुमट ( पृ. २३०७ )

अशा तऱ्हेची प्रतिक्रिया उत्पन्न केल्यामुळें बहुधा पुन्हां संसर्ग होण्याची भीति नसते. या क्रियेस रोगमुक्तता म्हणतात. गळवें होणें ही एक शारीरिक विकृति आहे. या विकृतीस विनाशक किंवा प्रतिक्रियात्मक यांपैकीं कोणतेंहि नांव देतां येत नाहीं. या विकृतीमध्यें नवीनच पेशींची वाढ होते आणि त्या पेशी कोणताहि शारीरिक व्यापार अथवा क्रिया करीत नसतात. त्या जर दुष्ट असतील तर त्यांच्यापासून पेशींचा नाश होतो. अशा तऱ्हेचीं गळवें किंवा ग्रंथी कां उत्पन्न होतात याचा अद्यापि नीट शोध लागला नाहीं.

**विक्रमशीला विद्यापीठ**—विहार प्रांतांत, उत्तर मगधदेशांत गंगेच्या कांठीं एका टेंकडीवर हा विहार ८ व्या शतकांत धर्मपाल राजानें बांधला होता. बरगांवशेजारचें आजचें सिलाव खेडें ही ती जागा असावी असें वास्तुशास्त्रज्ञ कनिंगहॅमचें म्हणणें आहे. हा विहार चांगल्या तऱ्हेनें बांधला होता. भोंवतीं तट असून मध्यें महाबोधी मूर्ति असलेलें एक देवालय होतें. इतर लहान १०८ देवळें होतीं. येथील अभ्यासक्रमावर देखरेख ठेवणारी संस्थाच नालंदावर देखरेख ठेवी. या दोन्ही विद्यापीठांत सहकार्य असे. दीपंकर आणि अभयंकर गुप्त यांसारखे आचार्य दोन्हींकडे शिकवीत.

या विद्यापीठाला जोडलेलीं सहा महाविद्यालयें असून प्रत्येक महाविद्यालयांत १०८ तरी शिक्षक असत. या सहाहि विद्यालयांकडे जाण्यास दारें असलेलें एक मोठें मध्यवर्ती दालन असे. विहाराभोंवतीं चांगला शिल्पालंकृत असा तट असे. आंतील भिंतींवर विख्यात पंडितांचीं चित्रें काढलेलीं असत. सहा दरवाजांवर सहा द्वारपंडित ठेवलेले असत. ते प्रवेशेच्छु विद्यार्थ्यांची प्रथम परीक्षा घेत. या विद्यापीठाचा प्रमुख अतिशय विद्वान् धर्मज्ञानी पुरुष असे. या विद्यापीठांतून बाहेर ठिकठिकाणीं पंडित मागविले जात. असे पंडित येथून तिबेटांत पुष्कळ गेलेले दिसतात. त्यांपैकीं अतीश दीपंकराचें नांव सर्वश्रुत आहेच.

असें हें विद्यापीठ चांगलें चाललें असतांना मुसलमानांची त्यावर धाड आली व येथील सर्व भिक्षूंना छाटून टाकण्यांत आलें व असंख्य ग्रंथांचा नाश झाला (इ. स. १२०३).

**विक्रमसंवत्**—बंगाल सोडून सर्व उत्तर हिंदुस्थानांत हा संवत् चालू आहे. शकांवरील आपल्या विजयाचें स्मारक म्हणून उज्जयिनीच्या विक्रमादित्य राजानें हा इ. स. पूर्वी ५८ या वर्षी सुरू केला, असें कांहीं संशोधकांचें म्हणणें, तर उलट कांहींचें म्हणणें असें कीं, विक्रमाच्या मृत्यूनंतर त्याचें स्मारक म्हणून हा संवत् सुरू करण्यांत आला. ज्याप्रमाणें येशू ख्रिस्त मेल्यानंतर बऱ्याच शतकांनीं इसवी सन सुरू करण्यांत आला त्याचप्रमाणें या संवताचेंहि असेल. कारण या संवताचा इ. स. ८९८ च्या धोलापूर शिलालेखांत प्रथमच उल्लेख येतो. विक्रमसंवताचें जुनें नांव कृत असें होतें. या कृतयुगाचा प्रवर्तयिता शुंगवंशाचा प्रस्थापक पुष्यमित्र होता, असें डॉ. दे. रा. भांडारकर सिद्ध करतात (विक्रमस्मृति लेख पाहा). शककर्त्या विक्रमराजाविषयीं अद्यापि निश्चित कांहीं सांगतां येत नाहीं. पण विक्रमसंवत् अशी एक कालगणना अनेक शतकें चालू आहे खरी.

या संवताचा आरंभ कार्तिकापासून होतो व महिने पौर्णिमान्त असतात. शालिवाहन आणि विक्रम या शकांतील शुद्धपक्ष मात्र एका वेळीं येतात. इसवी सनांत ५७ (नोव्हेंबर-डिसेंबरांत) किंवा ५६ मिळविले म्हणजे विक्रमसंवत् निघतो.

**विक्रमसिंह परमार** (१२ वें शतक पूर्वार्ध).—अबूच्या परमारांपैकीं रामदेवाचा उत्तराधिकारी हेमचंद्र (हेमाचार्य) याच्या 'द्वयाश्रय' या महाकाव्यावरून व जिनमंडनोपाध्यायकृत 'कुमारपालप्रबंधा'वरून असें दिसतें कीं, विक्रमसिंह हा गुजराथच्या कुमारपाल (पाहा) सोळंकीनें अजमीरच्या आना-(अर्णोराजा)शीं पहिली लढाई दिली त्या वेळीं कुमारपालाच्या मदतीस हा होता. परंतु पुढें हा आनाच्या बाजूस मिळाल्यानें कुमारपालानें यास बंदींत टाकून याचें अबूचें राज्य त्याचा भाचा वीरधवल याला दिलें. शिलालेखांत विक्रमसिंहास 'महामंडलेश्वर' म्हटलेलें दिसून येतें.

**विक्रमादित्य**—हें नांव किंवा पदवी धारण करणारे अनेक राजे होऊन गेले. गर्दभिलवंशांत दोन, गुप्तवंशांत तीन, परमारवंशांत एक व चालुक्यवंशांत दोन असे आठ विक्रमादित्य राजे आढळतात. त्यांपैकीं विक्रमसंवताचा ज्याच्याशीं संबंध तो कोणता याबद्दल संशोधकांत एकमत नाहीं. गुप्तवंशांतील दुसरा चंद्रगुप्त (कारकीर्द इ. स. ३७६ त सुरू) हाच शककर्ता असावा असें डॉ. राधाकुमुद मुकर्जींसारखे पहिल्या श्रेणींतील विद्वानहि मानतात. डॉ. दे. रा. भांडारकर शुंगवंशाचा आद्यपुरुष पुष्यमित्र याचें नांव पुढें करतात. गर्दभिलवंशांतील उज्जयिनीचा विक्रमादित्य हाच शकारि व विक्रमशककर्ता होय, असें डॉ. शाह, डॉ. देशपांडे, इ. समजतात (विक्रमस्मृति ग्रंथ पाहा).

विक्रमादित्य चालुक्य (राज्य. सन १०७६–११२६)—पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या सोमेश्वराचा भाऊ व पहिल्या सोमेश्वराचा पुत्र. पहिल्या सोमेश्वराच्या कारकीर्दींत सन १०५५ च्या सुमारास याजकडे बनवासीची सुभेदारी होती. यानें राज्यारोहण केल्याबरोबर फाल्गुन शुद्ध पंचमी शके ९९७ (तारीख १४ फेब्रुवारी सन १०७६ रोजीं) चालुक्यविक्रमशक (पाहा) सुरू केला. हा परमादिकालिविक्रम ऊर्फ दुसरा त्रिभुवनमल्ल विक्रमांक या नांवानेंहि प्रसिद्ध आहे. यानें चोल राजकन्येशीं विवाह केला, व

आपली मुलगी मललदेवी ही जयकेशी कदंब राजास दिली. यास लक्ष्मीदेवी, सावलदेवी, जक्कलदेवी, चंदलदेवी, व माळलदेवी, वगैरे स्त्रिया होत्या. याच्या मलयमतीदेवी राणीनें सन १०९५ च्या सुमारास केरेयूर प्रांतावर राज्य केलें. यानें द्राविड, पांड्य, कोंकण, होयसळ, कदंब, इत्यादि राजांना युद्धांत पराभूत केलें. याशिवाय चोलांचा पराभव करून यानें वेंगी व चक्र-कोत्त (चक्रकोट्ट) हे प्रांत मिळवले. माळव्याच्या राजांस याचें साहाय्य असे. मध्य बंगाल व आसाम या प्रांतांवर यानें स्वाऱ्या केल्या. याच्या पदरीं मिताक्षराकार विज्ञानेश्वर होता.

**विचित्रवीर्य**—पुरुकुलोत्पन्न शंतनु राजापासून सत्यवतीच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा. याचा ज्येष्ठ भ्राता चित्रांगद मृत्यु पावल्यानंतर भीष्मानें यास राज्यावर स्थापिले व काशीराजाच्या अंबिका व अंबालिका, या दोघींशीं याचा विवाह करून दिला. पण हा निपुत्रिक मरण पावला. तेव्हां व्यासानें याच्या स्त्रियांच्या ठायीं प्रजोत्पत्ति केली.

**विंचू**—हा अष्टपादवर्गीतील एक प्राणी असून याचा आकार लांबट असतो व यास एक सहा सांधे असलेली शेपटी असते व तिच्या शेवटीं बांक असून एक कांटा असतो. त्यांतून विष बाहेर टाकतां येतें. या विषापासून तीव्र वेदना होतात. परंतु सहसा मृत्यु येत नाहीं. याच्या कवचाच्या वरील बाजूस सहा ते बारा साधे डोळे असतात. विंचू हे सामान्यतः दगडाखालीं किंवा काळोखाच्या जागेंत राहतात. ते दक्षिण युरोप, आफ्रिका, हिंदुस्थान धरून आशियांतील पूर्वेकडील देश व दक्षिण अमेरिका यांत आढळतात. पुस्तकी विंचू म्हणून एक प्राणी आहे. तो याच्यासारखाच दिसतो, पण तो खरा विंचू नव्हे.

वेदकालींहि याच्या विषाचें लोकांना भय वाटत असे. हा हिंवाळ्यांत निश्चेतन पडतो असें वर्णन आहे (अथर्व १२-१-४६). विंचवाची पूर्ण वाढ होण्यास पांच वर्षें तरी लागतात. हा लहान लहान किडे खातो. त्याला चावून खातां येत नसल्यामुळें पकडलेल्या प्राण्याचें रक्त मात्र शोषून घेतो.

**विंचूर**—मुंबई, नाशिक जिल्ह्यातील एक सरंजामी जहागीर. प्रथमतः हींत नाशिक जिल्ह्यांतील ४५, नगर जिल्ह्यांतील ९ व पुणें जिल्ह्यांतील २ अशीं खेडीं होतीं. १८९२ सालीं अर्धी सरंजाम जप्त झाला. त्यांत येवलें इंग्रज सरकारकडे गेलें. आतां फक्त नाशिक जिल्ह्यांतील २६ खेडीं बाकी आहेत. सरंजामी उत्पन्न ३७,००० रुपये होतें. विंचूरकर घराण्याचा संस्थापक विठ्ठल शिवदेव विंचूरकर (पाहा) होय. विंचूरचे जहागीरदार दक्षिणेंतील पहिल्या दर्जाच्या सरदारांत मोडतात. विंचूर परगण्याचे सर्व हक्क व दिवाणी फौजदारी अधिकार यांना आहेत. विंचूरगांव लासलगांव स्टेशनपासून ४ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें ५,००० आहे. गांवाभोंवतीं मातीचा तट आहे. येथें साड्या होतात.

**विजयगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. शास्त्री नदीच्या किंवा जयगड खाडीच्या उत्तर तीरावर जयगडपासून दोन मैलांवर नदीपलीकडे हा एक लहानसा किल्ला आहे. याच्या तीन बाजूंस खंदक आहे. जयगड पाहा.

**विजयदुर्ग**—१. मुंबई, रत्नागिरी जिल्हा, देवगड तालुक्यांतील एक बंदर. हें मुंबईपासून दक्षिणेस १७० मैल आहे. लो. सं. सुमारें अडीच हजार. पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांत विजयदुर्ग हें उत्तम प्रकारचें बंदर असून पावसाळ्यांत देखील बंदरांतील कामें कांहीं अडथळा न होतां चालू शकतात.

२. घेरिया. मुंबई, रत्नागिरी जिल्हा, एक किल्ला. हा देवगड तालुक्यांत मुंबईच्या दक्षिणेस १७० मैलांवर एका खडकावर बांधलेला आहे. हा फार मजबूत म्हणून प्रसिद्ध आहे. तटास २७ बुरूज आहेत व तो तिहेरी आहे. हा फार प्राचीन असावा. हा विजापूरकरांनीं प्रथम वाढविला. नंतर शिवाजीनें १६५४ त त्याची उत्तम डागडुजी केली. १६९८ त कान्होजी आंगरे याचें मुख्य ठाणें विजयदुर्गावर असे. १७१७ त इंग्रजांनीं हा घेण्याचा प्रयत्न केला. पण आंगऱ्यांपुढें त्यांस पळ काढावा लागला. १७२० त पोर्तुगीज व इंग्रज यांनीं पुन्हां घेण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला व उलट आंगऱ्यानें इंग्रजांचें चार्लोटी हें जहाज धरून आणलें. १७२४ त बटेव्हियाहून आलेल्या डच आरमाराचाहि पराभव झाला. आंगऱ्यांनीं येथून इंग्रजांचीं बरींच जहाजें धरलीं. १७५६ मध्यें पेशवे व इंग्रज यांनीं हल्ला करून तुळाजीकडून किल्ला घेतला व पुढें धुळप हा येथें आरमाराचा अधिकारी झाला. १८१८ त धुळपांपासून हा किल्ला इंग्रजांनीं घेतला.

**विजयध्वज** (सुमारें १५००)—एक संस्कृत ग्रंथकार. मध्वाचार्यांनीं स्थापन केलेल्या आठ मठांपैकीं पेजावर मठावरील अधिपति. यानें भागवतावर 'पदरत्नावली' उर्फ 'विजयध्वजी' नांवाची टीका लिहिली आहे. या विजयध्वजी भागवताच्या दशमस्कंधांतील अध्याय एकशें तीन असून त्यात ४,२७० श्लोक आहेत. श्रीधरी भागवतांत व याच्या भागवतांत बराचसा फरक

दिसून येतो. वामन पंडिताचा समकालीन असलेल्या मल्हारी अंबाजीनें विजयध्वजी भागवताचें मराठी समश्लोकी भाषांतर केलें आहे.

**विजयराघवाचारिअर, सर टी.** (१८७५- )—एक वरिष्ठ हिंदी अधिकारी. यांचें प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें शिक्षण झाल्यावर हे १८९८ मध्यें मद्रास प्रांतिक सरकारी नोकरींत शिरले. १९१२ ते १९१७ मध्यें हे मद्रास कॉर्पोरेशनच्या नोकरींत होते. १९१७ ते १९१८ मध्यें हे रेव्हेन्यू बोर्डाचे चिटणीस होते. १९१८ मध्यें हे डायरेक्टर ऑफ लँड-रेकॉर्ड्स झाले. १९१८-१९ मध्यें उद्योगधंदे खात्याचे डेप्युटी डायरेक्टर होते. १९१९ ते १९२२ पर्यंत हे कोचीन संस्थानचे दिवाण होते. १९२२ ते १९२५ पर्यंत हे विलायतेस वेंब्ले प्रदर्शनाकरितां हिंदुस्थानचे कमिशनर म्हणून गेले होते. १९२५-२६ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. १९२६ मध्यें हे मद्रास इलाख्याचे उद्योगधंदे खात्याचे डायरेक्टर झाले. १९२६ मध्यें यांनीं कानडामधील राष्ट्रीय प्रदर्शनाचें उद्घाटन केलें. १९२४ ते १९२९ पर्यंत हे पब्लिक सर्व्हिस कमिशनचे सभासद होते. १९२९ पासून १९३५ पर्यंत इंपीरिअल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चर रीसर्च याचे उपाध्यक्ष होते. नंतर १९३९ ते १९४७ पर्यंत उदेपूर संस्थानचे दिवाण होते.

**विजयराघवाचारिअर, सालेम** (१८५२-१९४३)—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें झालें. हे १८९५ पासून १९०१ पर्यंत मद्रास कायदे-मंडळाचे सभासद होते. १९१३ ते १९१६ मध्यें हे मध्यवर्ती कायदे-मंडळाचे सभासद होते. १९०० मध्यें कालिकत येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. पुन्हां १९१८ मध्यें मद्रास येथें भरलेल्या खास प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. १९२० सालीं हे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. यांस 'मद्रासचे ग्रँड ओल्ड मॅन' (जुनाट पुरुष) असें म्हणतात. अलाहाबाद येथील ऐक्य परिषदेचे हे अध्यक्ष होते. सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्यापूर्वी जी सर्वपक्षीय परिषद् भरली होती तिच्या कामांत यांनीं मोठा पुढाकार घेतला होता. याच परिषदेंत सायमन-कमिशनवर बहिष्कार घालावा असें ठरलें व हींतूनच पुढें नेहरु-समिति निघाली व तिचा अहवाल बाहेर पडला. अखिल भारतीय हिंदुमहासभेचेहि विजयराघवाचारियर अध्यक्ष होते. घटनाविषयक बाबतींत यांस तज्ज्ञ मानण्यांत येत असे. दिल्ली येथील १९१८ सालच्या राष्ट्रीय सभेंत जो नागरिकत्वाच्या हक्कांचा मसुदा मान्य करण्यांत आला त्याचें जनकत्व यांच्याकडे आहे.

**विजयादशमी**—दसरा. आश्विन शुद्ध दशमी हा हिंदूंचा प्रसिद्ध सण आहे. विजया हें नांव दुर्गा देवीच्या अनेक नांवांपैकीं एक नांव आहे. पुष्कळ ठिकाणीं आश्विन शु. प्रतिपदेपासून नऊ दिवस देवीचे नवरात्र बसवितात व पूजा करतात. बंगालमध्यें या वेळीं कालीमातेचा उत्सव साजरा करतात. नऊ दिवस देवीची पूजा करुन दशमीच्या दिवशीं तिचें विसर्जन करतात. मराठींत या सणास दसरा म्हणतात. (दसरा पाहा.) या दिवशीं रामानें रावणास मारिलें, विराटाच्या गाई पळवून नेणाऱ्या कौरवांचा अर्जुनानें पराभव केला. म्हणून हा युद्धाला निघण्याचा दिवस मानितात.

**विजयानगर**—जुन्या विजयानगर राज्याचें मुख्य शहर. मद्रास इलाख्यांतील बल्लारी जिल्ह्याच्या सांप्रतच्या होसपेट तहशिलींत हें प्राचीन शहर होतें. सध्यां त्या ठिकाणीं हंपी नांवाचें लहानसें खेडें वसलेलें आहे. तुंगभद्रा नदी याच्याजवळच वाहते. आसपासचा प्रदेश टेंकड्यांनीं वेष्टिलेला असून कोणत्याहि ऋतूंत याची नैसर्गिक शोभा कमी होत नाहीं. विजयानगर १३३६ त स्थापन झालें. सुमारें अडीचशें वर्षेंपर्यंत मुसलमान लोक यावर स्वाऱ्या करीत होते. परंतु बराच कालपर्यंत यानें त्यांना दाद दिली नाहीं. विजयानगराचें राज्य कृष्णा नदी ओलांडून दक्षिण हिंदुस्थानपर्यंत होतें असें म्हणता येईल.

आज विजयानगर राजघराण्यांतील वंशज अनागोंदीस राहतात. त्याना थोडीफार जमीन असून इंग्रज सरकार कांहीं पेन्शन देतें. राजवाडा व त्याच्याभोंवतालचें आवार हा या शहराचा मुख्य भाग गणला जातो. राजवाड्याजवळ परंतु तुंगभद्रेच्या कांठीं नरसिंहाची पाषाणाची मूर्ति खोदलेली असून तिची उंची २२ फूट आहे. हीं कामें बहुतेक कृष्णदेवरायाच्या अमलांत झालेलीं आहेत. रामायणांत जी किष्किंधा नगरी वर्णिलेली आहे ती हंपीजवळच असावी. तेव्हां या स्थानाला क्षेत्राचेंहि महत्त्व प्राप्त झालें आहे. आज हंपी येथें विजयानगर साम्राज्याच्या राजधानीचे कित्येक अवशेष दृष्टीस पडतात. येथलि राजवाडे, मंदिरें, तोरणें, गजशाला, तलाव, इ. पाहून मन थक्क होतें.

विजयानगरचीं राजघराणीं—हे राजे आपणांस सोमवंशीय म्हणवीत असत. उत्तरेकडे मुसलमानांनीं आपल्या राज्याचा विस्तार चालविला असतां व दक्षिणेंतहि बहामनी राज्य स्थापन होत असता या हिंदु राजवंशानें आपलें राज्य स्थापन केलें. या राजांनीं बहामनी राज्य व पुढें त्याच्या झालेल्या शाखा यांच्याशीं एकसारखी टक्कर देऊन सव्वादोनशें वर्षें आपलें राज्य टिकवून दक्षिणेंत हिंदु संस्कृति कायम ठेवली, ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. या साम्राज्याचा विस्तार बेळगावपासून कन्याकुमारीपर्यंत झाला होता. या घराण्याचा

इतिहास अनेक दृष्टींनीं मनोरंजक आहे. मुसलमानांनीं नर्मदा ओलांडून १२९३, १३०६ व १३९८ या सालच्या स्वाऱ्यांत देवगिरीच्या यादवांचा नायनाट केला व १३१० त द्वारसमुद्राचे होयसळ बल्लाळ व १३२६ त वरंगळचे गणपती या राजघराण्यांचा पाडाव केला व दक्षिणेंत मुसलमानशाही सुरू केली. या १४ व्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत दक्षिणेंत मुसलमानांनीं हिंदूंचा फार छळ केला व त्यांचीं पुरातन राज्यें बुडविलीं. त्यांचीं मोठमोठीं मंदिरें पाडलीं, त्यांना जुलमानें बाटविलें व दक्षिणेंतील अपार संपत्तीस उत्तरेचा मार्ग दाखविला. अशा संकटावस्थेंत विजयानगरकरांनीं या यावनी लोंढ्यास जोराचा अडथळा केला व पुन्हां हिंदु साम्राज्य स्थापन केलें. प्राचीन युरोपियन प्रवाशांनीं या राज्यास नरसिंहरायाचें राज्य व देशास नरसिंह देश म्हटलें आहे. याच्या राजधानीचें शहर विजयानगर हें तुंगभद्रेच्या कांठावर वसलेलें होतें, व तेव्हां दाट वस्तीचें असून तेथें परदेशांतील सर्व मालांची देवघेव होत असे. हें शहर विद्यारण्यस्वामींनीं हरिहर व बुक्क यांच्या हातून स्थापविलें.

विजयानगरचीं संगम, साळुव, तळु व आरविदु अशीं चार राजघराणीं होऊन गेलीं. संगम घराणें १३३६ ते १४७८ पर्यंत होतें. यांत नऊ राजे होऊन गेले. पहिला हरिहर फारसा प्रसिद्ध नव्हता, पण त्याच्यामागून आलेला बुक्कराय हा फार पराक्रमी निघाला. विद्यारण्यस्वामीच्या मदतीनें त्यानें मोठें साम्राज्य तयार केलें व विजयानगर राजधानीची स्थापना केली. बुक्करायाचा मुलगा दुसरा हरिहर गादीवर आल्यानंतर गुलबर्ग्याच्या बहामनी सुलतानांशीं लढाया सुरू झाल्या व कांहीं काळ विजयानगरला यश आलें तरी हरिहराचा मुलगा देवराय याला आपली मुलगी फिरोजशहा या बहामनी सुलतानाला द्यावी लागली. पुढें देवरायानें याबद्दल मोठा सूड घेतला व फिरोजशहाला एका लढाईंतच मृत्यु आला. पण फेरोजशहानंतरचा सुलतान अहमदशहा यानें विजयानगर साम्राज्यांत गेलेला मुलूख परत मिळविला व हिंदु प्रजेची अतिशय कत्तल केली. तेव्हां हिंदूंनींहि त्याला सळो कीं पळो करून सोडलें व राजधानी गुलबर्ग्याहून बिदरला नेण्यास भाग पाडलें. हा असा निकराचा लढा कृष्णराय गादीवर येईपर्यंत चालू होता. १५२० च्या सुमारास कृष्णरायानें मुसलमानांचा धुव्वा उडवून विजापूरकरांना आपल्यापुढें नमतें घेण्यास लाविलें. पूर्वेस कटक व पश्चिमेकडे साष्टी येथपर्यंत त्यानें आपलें साम्राज्य वाढविलें. संस्कृत आणि तेलगू वाङ्मयास त्यानें चांगलें उत्तेजन देऊन आपला दरबार भोजाच्या दरबाराप्रमाणें नवरत्नांनीं समृद्ध केला.

कृष्णरायानंतर अच्युतराय, नंतर त्याचा अल्पवयी मुलगा व नंतर अच्युतरायाचा पुतण्या सदाशिवराय गादीवर आला. सदाशिवरायाचा दिवाण रामराजा हा अत्यंत पराक्रमी होता. त्यानें मुसलमानी राजांना जबरदस्त तडाखे दिल्यामुळें त्यांनीं त्याच्याविरुद्ध एकजूट केली. १५६५ सालच्या २३ जानेवारीला तालिकोटची प्रसिद्ध लढाई हिंदू-मुसलमानांमध्यें झाली. रामराजा या वेळीं ९० वर्षें वयाचा होता. त्यानें शत्रूशीं फार नेटानें झुंज केली. पण तो पकडला गेला व अहमदनगरच्या सुलतानानें त्याचा शिरच्छेद केला. नंतर पानपतच्या युद्धाप्रमाणें पळापळ सुरू झाली. यानंतर सदाशिवरायानें पेनुकोंडा येथें गादी नेली, पण त्याला सरदारांनीं सोडल्यामुळें तो दुर्बल राहिला. रामराजाचा भाऊ तिरुमल यानें त्याचा खून करून गादी बळकावली. पुढें त्यालाहि गादी सोडून चंद्रगिरीला पळून जावें लागलें. त्याच्या एका वंशजानेंच आज जेथें मद्रास वसलें आहे ती जागा इंग्रजांना दिली (१६३९).

संगम घराण्यानंतर साळुव घराणें आलें. त्यांत दोनच राजे होऊन गेले व १४७८ ते १४९६ पर्यंत हें राज्य टिकलें. नंतर नरसिंह किंवा तुळुव घराणें १५६७ पर्यंत होतें. यांत सहा राजे होऊन गेले. चौथें व शेवटचें घराणें म्हणजे रामराज किंवा कर्नाट घराणें होय. हें १५६७ ते १६४४ पर्यंत सत्तारूढ होतें; व यांत सहा राजे झाले.

विजयानगर-राजांची देवता विरूपाक्ष असून त्यांचें राजचिन्ह चालुक्यांप्रमाणें वराह असे. प्रथम राजधानी तुंगभद्रेच्या उत्तरतीरावर हंपीच्या समोरच्या बाजूस अनागोंदी येथें होती. नंतर साम्राज्य वाढलें तसें ती दक्षिण तीरावर नेण्यांत आली.

**विजयानगरम् जहागीर**—मद्रास इलाख्यांत विजयानगरम् जहागीर मोठी महत्त्वाची समजली जात असून विझगापट्टम जिल्ह्याचा बराच मोठा भाग तिनें व्यापिला आहे. हिच्यामध्यें विजयानगरम्, विमलीपट्टम् व शृंगवरपुकोट तहाशिलींचा समावेश होऊन पालमकोंडा, गजपतिनगरम्, चिपरुपल्ली, विझगापट्टम्, अंकापल्ली, विरव्हल्ली, गोवळकोंडा, सर्वसिद्धि, वगैरे तालुक्यांचा भाग येतो. विझगापट्टम् जिल्ह्यांतील या जहागिरीची जमीन फार सुपीक असून लोकवस्ती दाट आहे. विजयानगर हें मुख्य शहर असून जहागिरीचें वार्षिक उत्पन्न २० लक्षांचें आहे. जहागीरदारांचा मूळ पुरुष माधववर्मा नांवाचा असून ५९१ सालीं त्यानें कृष्णातटाकीं रजपूत वसाहत केली होती. १६३२ सालीं पशुपति माधववर्मा या नांवाच्या पुरुषानें विझगापट्टम् घेऊन उत्तर सरकारमधील बराच प्रदेश हस्तगत केला.

तहशील—मद्रास, विझागापट्टम् जिल्हा, एक जमीनदारी. क्षेत्रफळ ३१९ चौरस मैल असून लो. सं. सुमारें दोन लाख. तहशिलींत १९१ खेडीं असून काळीचें व इतर मिळून उत्पन्न सुमारें नऊ लाख आहे.

शहर—विजयानगर पोटविभागाचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. हीं विजयानगरम् जहागिरीची राजधानी असून हें विजगापट्टम जिल्ह्यात दुसरें मोठें शहर आहे. येथें व्यापारी पेठ, लष्करी छावणी, व म्युनिसिपल कमिटी आहे. लो. सं. पंचेचाळीस हजार. या ठिकाणीं टाउन-हॉल व बाजार चांगल्या रीतीनें बांधलेला असून किल्ल्यांत राजाचें राहणें असतें. शहराच्या उत्तरेस एक मोठा तलाव असून त्याच्याजवळच लष्करी छावणी व रेल्वे स्टेशन आहे. हवा निरोगी आहे. राजाच्या खर्चानें येथें एक कॉलेज चालतें.

**विजापूर**—मुंबई, दक्षिण विभाग, एक जिल्हा. क्षे. फ. ५७०४. यांत नद्या भीमा, डोण, कृष्णा, घटप्रभा व मलप्रभा या आहेत. एकंदरींत येथील हवा निरोगी व कोरडी आहे. पाऊस वेळच्या वेळीं पडत नाहीं. सरासरी दरसाल २०-२५ इंच पाऊस पडतो. या जिल्ह्यांतील ऐहोळ, बदामी, बागलकोट, धुळखेड, गलगली, वगैरे शहरांविषयीं कांहीं दंतकथा आहेत. हीं गांवें दंडकारण्यांत होतीं असें पुराणांत वर्णिलें आहे. ऐतिहासिक दृष्ट्या बदामी हें प्राचीन शहर आहे. येथें पल्लव राजांचा किल्ला होता. सातव्या शतकांत चीन देशचा प्रसिद्ध प्रवासी ह्यूएनत्संग हा बदामी येथें आला होता. या जिल्ह्यांत पुष्कळ ठिकाणीं शिलालेख सांपडले आहेत. त्यांपैकीं अरसीबिडी, ऐहोळ व बदामी येथील फार प्रसिद्ध व महत्त्वाचे आहेत. पट्टदकल येथें द्राविड शिल्पाच्या धर्तीवर बांधलेलीं देवालयें आहेत. १९४१ सालीं जिल्ह्याची लो. सं. ९,७५,९८२ होती. जोंधळा, बाजरी, गहूं, मका, तूर, कुळीथ, हरभरा, मूग, मीठ, कापूस, एरंडी, तीळ व करडई हीं पिकें होतात. हवा गुरांस चांगली मानवते. केंहूर येथें प्राचीन काळचा तलाव आहे. त्याचें पाणी शेतीच्या उपयोगी पडतें. जिल्ह्यांत मलप्रभेंत सोनें सांपडतें. कजाडोनी येथें तांबें व कृष्णेच्या दक्षिण भागीं लोखंड सांपडतें. वाळूचे दगड, जंबूर चुनखडी, स्लेटींचे दगड, ग्रॅनाइट हेहि सांपडतात. जिल्ह्यांत हातमागावर सुती व रेशमी कापड चांगलें काढितात. चांगलीं कांचळींहि होतात. चोरी, दरवडे, आग लावणें व खोटीं नाणीं पाडणें हे गुन्हे फार घडतात. विजापूर तालुका जिल्ह्यांत पश्चिमेकडे आहे. क्षे. फ. ८६९ चौ. मै.. यांत विजापूर हें मुख्य गांव आहे व खेडीं ९४ आहेत. लो. सं. (१९४१) १,५५,४५८.

विजापूर शहर हें ह्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ४८,९६८. येथें धान्याचा व गुरांचा फार मोठा व्यापार चालतो. येथें एक कॉलेज, शाळा, इस्पितळें, वगैरे जिल्ह्याच्या ठिकाणीं असणाऱ्या सर्व संस्था आहेत. अनेक ऐतिहासिक वास्तू आहेत. गोलघुमट ही महंमद आदिलशहाची कबर होय. याखेरीज आनंद महाल, आसर महाल, जुम्मा मशीद, मेहतर महाल, सात मजल, वगैरे प्रेक्षणीय इमारती आहेत. विजापूर हें आदिलशाही घराण्याची राजधानी होती. अली आदिलशहानें विजापूरचा तट, जुम्मा मशीद, वगैरे इमारती बांधिल्या व नळ बांधून गांवांत पाणी आणिलें. गोलघुमट ही जगप्रसिद्ध ऐतिहासिक वास्तु असून तिची रचना अतर्क्य वाटते. हा घुमट १७५ फूट उंच असून १३० फुटांच्या वर्गाइतक्या क्षेत्रावर त्याचें आच्छादन आहे. इतका मोठा घुमट दुसरीकडे नाहीं. घुमटाखालीं आंत सभोंवार जो सज्जा आहे त्यांत कोठेंहि समोरील आवाजाचा प्रतिध्वनि चांगला मोठ्यानें ऐकूं येतो. हेंच याचें वैशिष्ट्य आहे. हिंदुस्थानांतील अत्यंत प्रेक्षणीय स्थळांपैकीं हें एक मानतात.

**विजापूरकर, विष्णु गोविंद** (१८६३-१९२६)—महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे आद्यप्रवर्तक व देशभक्त विद्वान्. यांचा जन्म कोल्हापुरास व अभ्यास तेथील राजाराम हायस्कुलांत व नंतर पुण्यास डेक्कन कॉलेजांत होऊन ते बी. ए. (१८८७) व नंतर एम्. ए. (१८९७) झाले. त्यांना डेक्कन व अहमदाबाद कॉलेजांत फेलो व नंतर राजाराम कॉलेजांत संस्कृत व इंग्रजीचे प्राध्यापक नेमण्यांत आलें. त्यांनीं 'ग्रंथमाला' हें मासिक सुरू केलें. तसेंच ते 'समर्थ' साप्ताहिकांत कोल्हापूरच्या राज्यकारभारावर टीकात्मक लेख लिहीत असत. त्यामुळें १९०६ सालीं यांना नोकरींतून बडतर्फ करण्यांत आल्यावर त्यांनीं कोल्हापुरास 'समर्थ विद्यालय' नांवाचें एक राष्ट्रीय विद्यालय सुरू केलें. व पुढें तें तळेगांव (दाभाडे) येथें आणलें. या वेळीं त्यांनीं चालविलेल्या 'विश्ववृत्त' मासिकांतील लेखांबद्दल त्यांना १९०८ सालीं तीन वर्षांची साध्या कैदेची शिक्षा झाली. हे तुरुंगांत असतांना 'समर्थ विद्यालय' बंद पडलें होतें तें यांनीं १९१८ सालीं तळेगांवींच 'नवीन समर्थ विद्यालय' या नांवानें पुन्हां सुरू केलें. ते शेवटपर्यंत तेथेंच राहिले. न्या. रानडे यांच्या 'राइझ ऑफ दि मराठा पॉवर' या इंग्रजी ग्रंथाचें मराठी भाषांतर ('मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष') त्यांनीं केलें आहे.

**विजेचा गोळा**—(एलेक्ट्रिक बल्ब). प्रकाशासाठीं हा वापरतात. याचे (१) पांढरा कांचेचा, (२) वायु भरलेला (गॅस-फिल्ड), (३) दुधया रंगाचा (फ्रास्टेड) व (४) रंगीत कांचेचा असे कांहीं प्रकार आहेत. प्रत्येक दिवा किती प्रकाशसामर्थ्याचा आहे,

हें त्यावर लिहिलेलें असतें. या दिव्यांत तंतू (फिलॅमेंट), कांचेची नळी, विद्युत्प्रवाहाच्या तारा, सीलची नळी (सीलिंग ट्यूब), बुकण व मधली निर्वात पोकळी अशी रचना असते.

**विजेचा धक्का**—एखाद्या मनुष्यास जोराचा विजेचा धक्का बसल्यास तो मोठ्यानें ओरडतो, किंवा एकदम जमिनीवर पडतो, व त्याचा केव्हां केव्हां श्वासहि बंद होतो. याकरितां त्याचा विद्युत् तारेशीं संसर्ग असल्यास प्रथम प्रवाह बंद करण्यांत यावा. तसें करणें एकदम शक्य नसल्यास त्याचा तारेशीं असलेला संबंध तोडून टाकावा. परंतु हें करतांना योग्य काळजी घेण्यांत यावी. हें करणाऱ्यानें रबराच्या चादरीवर उभें राहावें. तें शक्य नसल्यास निदान कोरड्या कपड्यावर उभें राहावें. हातांत रबराचे हातमोजे किंवा चामड्याची पिशवी किंवा कोरडा लोंकरीचा कपडा घ्यावा. एखादी कोरडी काठी घेऊन तिच्या योगानें विजेची तार दूर करावी. अशा वेळीं वापरावयाची प्रत्येक वस्तु कोरडी असली पाहिजे. कारण ओल्या कपड्यांतून विजेचा प्रवाह चालू होतो. धक्का बसलेल्या मनुष्याचा श्वासोच्छ्वास बंद झाला असल्यास त्यास कृत्रिम रीतीनें श्वासोच्छ्वास घ्यावयास लावावें. नाकाशीं हुंगण्याचा क्षार (स्मेलिंग सॉल्ट) धरण्यांत यावा. त्यास शक्यतों ऊब मिळण्याची व्यवस्था करावी.

**विजेचा पाळणा**—(लिफ्ट). विजेच्या पाळण्यास दोऱ्या लावलेल्या असतात व वरील बाजूनें जें एक पंचपात्र असतें त्यावरून त्या सोडल्या असतात व दुसऱ्या टोंकास एक वजन लावलेलें असतें. विजेच्या प्रवाहाच्या साहाय्यानें व कांहीं चक्रांनीं हा पाळणा वरखालीं नेण्यांत येतो. हा पाळणा वर व खालीं आपटूं नये म्हणून संरक्षक योजना केलेल्या असतात. तसेंच दोऱ्या तुटल्या तर पाळणा तेथेंच अटकून राहावा, खालीं पडूं नये अशी योजना केलेली असते. असे पाळणे खोल खाणीमध्यें उतरण्याकरितां, व उंच इमारतींत वर जाण्याकरितां योजण्यांत येतात.

**विजेची कळ**—(स्विच्). विजेच्या कळी किंवा बटणें निरनिराळ्या प्रकारचीं असतात. त्यांत एक किंवा अधिक विजेचे दिवे लावणाऱ्या किंवा मालविणाऱ्या कळींपासून विजेच्या कारखान्यांतील मोठमोठ्या कळींपर्यंत सुद्धां येतात. या कळींमध्यें मुख्य गुण हा असावा लागतो कीं, ती दाबून विजेचा प्रवाह बंद करावयाचा असल्यास तो पूर्णपणें निःशेप बंद झाला पाहिजे. याकरितां कळ मागेंपुढें करण्याकरितां बळकट कमानी-(स्प्रिंग)चा उपयोग करण्यांत येतो. कळ दाबावयाची असेल तर ती एकदम दाबली पाहिजे, नाहीं तर मध्यंतरीं प्रवाह चालू राहून कळीचे भाग बिघडण्याचा संभव असतो. विजेच्या कारखान्यांतील मोठमोठ्या कळी बहुतेक तेलांत बसविलेल्या असतात. कांहीं कळी आपोआप बंद होणाऱ्या असतात.

**विजेची ट्राम्वे**—विद्युच्छक्तीनें चालणाऱ्या ट्रामगाड्यांस मिळणारी गति ही विद्युद्गतियंत्रापासून मिळते. हीं गतियंत्रें बहुधा सरल प्रवाहाचीं व मालाकार रचनेचीं असतात. परंतु आगगाड्यांस मात्र एककलात्मक किंवा बहुकलात्मक विद्युत्प्रवाहाचीं गतियंत्रें जोडण्यांत आलेलीं असतात. जेथें विशेष हरकत नसेल अशा ठिकाणीं बहुतकरून ट्रामगाड्यास लागणारी विजेची शक्ति ट्रामगाड्यांस जोडलेल्या एका काठीच्या साहाय्यानें डोक्यावरील तारांतून घेण्यात येते. हातांनीं चालवितां येण्यासारखा एक गतिनियामक विद्युत्प्रवाह सुरू करण्याकरितां किंवा बंद करण्याकरितां योजण्यांत येतो. तसाच एक साधा हात–गतिरोधक व दुसरा विद्युच्चुंबकीय गतिरोधक असे दोन स्वतंत्र गतिरोधक बसविलेले असतात. बहुतेक सर्व ठिकाणीं उच्च शक्तीची उलटसुलट प्रवाहाची विद्युच्छक्ति योजण्यांत येते. व या विद्युद्गतिशक्तीचें रूपांतर करण्याकरितां ठिकठिकाणीं उपशक्तिगृहें बांधण्यांत आलेलीं असतात. यांतून कमी शक्तीचे सरलगतिप्रवाह डोक्यावरील तांब्याच्या तारेंत सोडलेले असतात. ट्राम्वेचे रूळ जमिनीशीं जोडलेले असतात व त्यांतून उलट दिशेनें प्रवाह आपलें विद्युन्मंडल पूर्ण करीत असतो.

**विजेची वात**—(एलेक्ट्रिक फ्यूज). एखाद्या विद्युन्मंडलामध्यें विशिष्ट प्रमाणापेक्षां जास्त शक्तीचा विद्युत्प्रवाह आल्यास त्यापासून नुकसान होऊं नये म्हणून विजेची बत्ती वापरण्यांत येते. ही बत्ती म्हणजे एखादी वात किंवा पेट घेणारी वस्तु नसून एक त्या विद्युन्मंडलांतच बसविलेला तारेचा किंवा एखाद्या धातूच्या तुकडा असतो. हा तुकडा अशा प्रकारच्या द्रव्याचा व इतक्या आकाराचा तयार करण्यात आलेला असतो का, त्यांतून सामान्य प्रवाह कोणत्याहि प्रकारची त्यास इजा न होतां जाऊं शकतो. परंतु त्यापेक्षां अधिक शक्तीचा प्रवाह जाऊं लागल्यास तो तारेचा तुकडा वितळतो, पेट घेतो, किंवा उडतो. अशा तऱ्हेचे हे बत्तीच्या तारेचे तुकडे तांबें, जस्त, कथील किंवा शिसें अथवा यांपैकीं कांहीं धातूंच्या मिश्रणाचे बनविलेले असतात, व ते चिनी मातीच्या किंवा धातूच्या उघड्या चौकटीवर एखाद्या अदाह्य पदार्थामध्यें बसविलेले असतात.

**विझगापट्टम्**—विशाखापट्टण. मद्रास, उत्तर सरकारांतील एक जिल्हा. क्षे. फ. ९,१०७ चौ. मै.. विझगापट्टमचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. पावसाचें जास्त मान म्हणजे ६६ इंच असून कमी प्रमाण २८ इंच असतें. प्राचीन काळीं या ठिकाणीं कलिंगांचें राज्य होतें. परंतु तंजावरच्या चोळ राजांनीं विझगापट्टम् येथें १०० वर्षेपर्यंत राज्य केलें. मद्रास इलाख्यांत दाट

वस्ती विझगापट्टमची असून मोठीं शहरें १२ व खेडीं १२,०३२ आहेत. लो. सं. (१९४१) ३८,४५,९४४. विझगापट्टम्, विजयानगर, अंकापल्ली व विमलीपट्टम् हीं जिल्ह्यांत मुख्य शहरें आहेत. ऊंस, कापूस, व तंबाखू यांचें पीक उत्कृष्ट जमिनींत विपुल येतें. निळीचें पीक पूर्वी अतिशय होत असे. परंतु जर्मन रंगामुळें या निळीचा लोप होऊन गेला. जयपूरच्या जंगलांत इमारती लांकडावर कर फार आहे. राखीव जंगल ३०० चौरस मैल आहे. विझगापट्टम् शहरांत हस्तिदंती जिन्नस, कांसवाच्या पाठीच्या जिनसा, वगैरे शोभेचा माल तयार होतो. हातमागावरील कापड बहुतेक सर्वत्र निघतें. हा प्रदेश डोंगराळ असून विझगापट्टम्च्या उत्तरेस कैलास नांवाचें एक उंच स्थान आहे.

विझगापट्टम् हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ७०,२४३. हें चांगलें बंदर असून त्याचा एक भाग समुद्रांत पुढें गेलेला आहे. येथील तुरुंगांत सतरंज्या, घोंगड्या, नारळाच्या दोरखंडें व चटया तयार होतात. विझगापट्टम् हें पूर्वेकडील अति सुंदर व सोईचें असें बंदर आहे. तेव्हां १९३५ सालीं हें बंदर म्हणून खुलें करण्यांत आलें व त्यांत सर्व सोयी करण्यांत आल्या. येथें शिंदिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीनें बोटी बांधण्यास प्रारंभ केला होता, पण तोटा येऊं लागल्यानें हा कारखाना विकला. दुसऱ्या महायुद्धांत यावर जपानी हल्ला होईल अशी भीति होती.

**विटा**—मातीच्या चिखलाची एका सांचांत घालून केलेली व उन्हांत वाळवून भट्टींत भाजून काढलेली अशी चौकोनी दगडासारखी वस्तु म्हणजे वीट होय. विटा करण्याकरितां निरनिराळ्या जातीचा चिखल वापरण्यांत येतो. त्यांपैकीं स्फट सिकतित (अल्युमिनम सिलिकेट) याचा चिखल कितीहि उष्णमान असलें तरी बहुधा वितळत नाहीं. त्यामुळें त्यास आगमाती असें म्हणतात. व त्यापासून अग्नि–इष्टिका अथवा आगविटा बनवितात. ज्या चिखलांत केवळ चुना असून लोखंड नसतें त्याच्या विटा भाजल्या म्हणजे पांढऱ्या होतात. इतर विटांमध्यें ज्या मानानें लोहप्राणिद म्हणजे लोखंडाचा गंज असेल त्या मानानें त्यांचा रंग लालसर असतो, व त्या मानानें त्यांचा कठिणपणा असतो. चिखलाच्या सांचांतून विटा पाडणें ही अगदीं साधी पद्धति आहे. अशा विटा पाडल्यानंतर त्या आठदहा दिवस सुकूं देण्यांत येतात. नंतर त्या भट्टींत घालून भाजण्यांत येतात. भट्टीमध्यें त्यांस योग्य प्रमाणांत उष्णता देण्याच्या बाबतींत फार काळजी घ्यावी लागते. कारण त्या फार भाजल्या तर त्यांचे खंगर बनतात व कच्च्या राहिल्या तर त्या ठिसूळ होतात. यंत्रानें बनविलेल्या विटा कमी सच्छिद्र असून अधिक जड असतात. पण त्या सुकत असतां त्यांस चिरा पडण्याचा संभव अधिक असतो. तथापि त्या अधिक गुळगुळीत व मजबूत असतात. चिखलाशिवाय इतर पदार्थांच्याहि विटा बनविण्यांत येत असतात, व त्यांचें प्रमाण दिवसेंदिवस वाढत चाललें आहे. वीट सामान्यतः ९ इंच लांब, ४॥ इंच रुंद व २॥ इंच उंच असते. तथापि निरनिराळ्या आकाराच्याहि विटा बनविण्यांत येतात.

इतिहाससंशोधनार्थ जें उत्खनन करण्यांत येतें त्यांत प्राचीन विटा सांपडतात. विटांच्या आकारांवरून त्यांचा काळ ठरविण्यांत येतो. विटा करण्याची कला फार प्राचीन आहे यांत शंका नाहीं. असुरी–बाबिलोनी विटांवर तर लेख आहेत. इंग्लंडांत विटा पाडण्याची कला रोमन लोकांनीं आणली.

**विटा रेणुकानंदन** (सुमारें सन १५७८)—एक मराठी कवि. हा रेणुकानंदनाचा शिष्य असून रेणुका देवीवर याची भक्ति असे. यास गोलटगांवकर असेंहि म्हणत. दासोदिगंबराच्या संतविजयांत याचा उल्लेख आढळतो. याची काव्यरचना राममक्तिपर आहे.

**विठोजी बाबाजी भोसले** (१५५२–मु. १६१८)—शहाजीचा बाप मालोजी भोसले याचा विठोजी हा धाकटा भाऊ. हे दोघे देऊळगांवीं एकत्र राहत असतां यांचे वडील बाबाजी हे निवर्तले. यानंतर आपल्या आईच्या संमतीनें या दोघां भावांनीं फलटणच्या निंबाळकरांचेकडे बारगिरी पत्करली. पुढें निंबाळकरांना कोल्हापूर प्रांताच्या मुलूखगिरीच्या वेळीं यांची कर्तबगारी दिसून आल्यानें यांना त्यांनीं सरदारी दिली. पुढें मालोजीस तर निंबाळकरांनीं आपली मुलगी देऊन जांवई करून घेतलें. शिवाय १५०० स्वारांची मनसबदारीहि दिली ती वेगळीच. मालोजी वारल्यानंतर (१६०६) शहाजीची काळजी विठोजीनेंच घेतली. विठोजी १६१८ च्या सुमारास वारला असावा. त्याला आठ मुलगे होते. विठोजीचा एक मुलगा संभाजी हा लखुजी जाधवाशीं झालेल्या लढाईंत मारला गेला.

**विठ्ठल कवि**—एक मराठी कवि. याचें संपूर्ण नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर. हा वामन पंडिताचा समकालीन महाराष्ट्र कवि बीडजवळ गौरीपूर गांवचा राहणारा होता. हा देशस्थ आश्वलायन ऋग्वेदी ब्राह्मण होता. याचा धंदा व्यापाराचा, पण हा सालोसाल पंढरीची यात्रा करी. याचें कुलदैवत विठ्ठल; म्हणून हा आपणास विठ्ठलदास हें टोपणनांव लावीत असे. याचे रुक्मिणी–स्वयंवर, पांचालीस्तवन, सीतास्वयंवर, रसमंजरी, द्रौपदीवस्त्रहरण, विद्वज्जन व मिल्हीणचरित्र असे सात ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यानें प्रत्येक काव्याच्या शेवटीं काव्यांतील श्लोकसंख्या, रचनाकाल, नांव, इत्यादि माहिती दिली आहे. निरनिराळीं वृत्तें, लांब लांब यमकें व अनुप्रास साधण्याची यास

आवड होती. पांचालीस्तवन व दौपदीवस्त्रहरण यांत कांहीं कांहीं सबंध चरणच्या चरण सारखे आढळतात. त्याचें रसमंजरी हें काव्य संस्कृतचें भाषांतर आहे.

**विठ्ठल नरसिंह** (नाईक सांखोळकर) (सुमारें सन १७०० )—एक मराठी कवि. हा गोव्यांतील केरीचा काश्यप-गोत्री गौड सारस्वत ब्राह्मण. हा विद्वान् असून यास काशी येथील पंडितांनीं मानपत्र देऊन याचा गौरव केला होता. काव्यसंग्रहांत याची कविता प्रसिद्ध झाली आहे. यानें वामन चरित्र, आर्या ९५; शुकरंभासंवाद, आर्या ४९; कबीरकथा व सुमारें ६० पदें लिहिलीं आहेत.

**विठ्ठल महादेव किबे** (**तात्या जोग**) (मृत्यु १८२६)—इंदूरच्या यशवंतराव होळकराचा फडणीस. यशवंतरावाच्या पश्चात् हा तुळसाबाईचा कारभार पाहूं लागला; परंतु हा इंग्रजांस आंतून फितुर आहे, अशी तुळसाबाईस शंका आल्यानें तिनें यास १८१८ मध्यें कैदेंत टाकलें. याचे वंशज इंदुरास असतात.

**विठ्ठल शामराज**—मराठ्यांचा एक वकील. सन १७७९ ते सन १७८३ या कालांतील महेश्वर येथें अहल्याबाई होळकर हिच्या दरबारीं हा पेशव्यांचा वकील होता. या कालांत यानें अहल्याबाईच्या दिनचर्येबाबत व राज्यकारभाराबाबत जी हकीगत पत्रद्वारें पुण्यास कळविली ती 'महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें' या नांवानें रा. ब. पारसनीस यांनीं दोन भागांत प्रसिद्ध केली आहे. महेश्वर येथें पेशव्यांचा वकील म्हणून याची नेमणूक होण्यापूर्वी नाना फडणिसानें याजकडे राघोबादादाच्या लष्करांतील माहिती काढण्याची कामगिरी सोंपविली होती.

**विठ्ठल शिवदेव विंचूरकर** (१६७५-१७६७)—मराठे राज्यांतील एक शूर सेनापति व मुत्सद्दी. याचें आडनांव दाणी. हा पुण्याजवळील सासवडचा राहणारा. नारो शंकर राजेबहाद्दर हा याच्या वडील शाखेंतील होय. डुकराच्या शिकारींत धाडस दाखविल्यानें शाहूनें याला प्रथम १० स्वाराची मनसब दिली (१७२०). पुढें हबशाच्या मोहिमेंत यानें सिद्दीसाताचे घोडे पकडून शौर्य गाजविल्यानें याला शाहूनें पेशव्यांच्या हाताखालीं सरदार नेमलें. थोरल्या बाजीरावाच्या बहुतेक मोहिमांत तो हजर असे. दयाबहाद्दर व बंगष यांच्यावरील स्वाऱ्यांत त्यानें चांगला पराक्रम केला. वसईच्या मोहिमेंतहि तो दाखल झाला होता. याचें कुलदैवत नृसिंह असल्यानें यानें नीरा नरसिंगपूर येथें त्याचें मोठें देऊळ बांधलें. कुंभेरी, ग्वाल्हेर, गोहद, सावनूर, वगैरे मोहिमांत त्यानें उत्तम कामगिरी केली. ग्वाल्हेरचा किल्ला यानेंच सर केला. या वेळीं त्याला बादशहानें विंचूरची जहागीर व राजा आणि उमदे-तुलमुल्क किताब दिले. कांहीं दिवस तो दिल्लीस मराठ्यांच्या तर्फें प्रतिनिधि होता. पानपतांतून तो जखमी होऊन माघारा आला त्याबद्दल त्याला स्वतःलाहि खंत वाटे. थोरल्या माधवरावानें याला १६,८५,००० रु. चा सरंजाम नेमून दिला. खेरीज हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राजेरजवाड्यांकडून ४५,५०० रु. चीं वेगवेगळीं इनामें मिळालीं. १७६४ च्या अनेवाडीच्या हैदरावरील मोहिमेंत यानें चांगला पराक्रम केला. याच्या घराण्यांत विंचूरची जहागिरी आहे. विंचूर पाहा.

**विठ्ठल सुंदर परशरामी** (मृ. १७६३)—निजामाकडील एक हिंदु मुत्सद्दी. हा देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण संगमनेरचा राहणारा. इ. स. १७६२ त सलाबतजंगास कैद करून निजामअल्लीनें हैद्राबादची गादी बळकावली त्याच सुमारास यालाहि त्यानें आपल्या दिवाणाची जागा दिली. तत्पूर्वी निजामअल्लीकडे रामदासपंताच्या वशिल्यानें याचा प्रवेश झाला होता. राघोबादादानें आपल्या घालमेलीनें कित्येक मराठे सरदारांचीं मनें असंतुष्ट केलीं तेव्हां चुलत्या-पुतण्यांतील भांडणाची ही संधि साधून मराठ्यांचें राज्य उलथून पाडण्याचा विठ्ठल सुंदरनें प्रयत्न केला. साडेतीन शहाण्यांमध्यें याची गणना होते. दुसरा शहाणा जो देवाजीपंत चोरघडे त्याच्यामार्फत यानें नागपूरच्या जानोजी भोसल्याला फितविलें; व मोरोबा फडणीस, सदाशिव रामचंद्र शेणवी, गोपाळराव पटवर्धन, वगैरे असंतुष्ट मराठे सरदारहि निजामअल्लीस पेशव्याविरुद्ध फितूर झाले. त्यांच्या बळावर निजामानें पुण्यावर चाल करून पुणें लुटलें व जाळलें (मे. १७६३). जानोजीस बराच मुलूख देऊं करून राघोबादादाला त्यास निझामअल्लीच्या पक्षातून फोडतां आलें. यानंतर पेशव्यांनीं निजामाशीं राक्षसभुवन येथें लढाई केली, तींत विठ्ठल सुंदर मारला गेला (ऑगस्ट १७६३). हा मोठा बुद्धिमान् व महत्त्वाकांक्षी होता. यानेंच निझामअल्लीस गादी मिळवून दिली. हा लष्करी डावपेचांतहि निष्णात होता. विठ्ठलपंतास राजाबहादुर प्रतापवंत हा किताब असून निजामशाहींत त्याची जहागीर 'गणेश' या नांवानें ओळखली जाते.